# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.



## (शरीरखंड.)

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

**विभाग दहावा.**

---



क—काव्य

---

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः ॥

---

१९२४

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशक:—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर,
८४१ सदाशिव पेठ, पुणें.

# संपादकमंडळ

## मुख्य संपादक

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए. पीएच्. डी.

## संपादकीय कार्यव्यवस्थापक

रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए. एलएल्. बी

## उपसंपादक

रा. रा. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे, बी. ए.

रा. रा चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

रा. रा. लक्ष्मण केशव भावे, बी. ए. एलूएल्. बी.

हौत्रवेत्ते वेदशास्त्रसंपन्न चिंतामणभट्ट शंकर दातार.

डॉ. भालचंद्र गणेश नेने एल्. एम्. एस्.

मिस्. एच. कोहन, बी. ए. ( लंडन )



## शाखासंपादक

| | |
|---|---|
| रा. सा. विनायक त्र्यंबक आगाशे एल. सी. इ. | स्थापत्यशास्त्र |
| रा. ब. गणेश केशव केळकर | कृषिकर्म |
| प्रो. विनायक नानाभाई हाटे बी. एससी. | प्राणिशास्त्र |
| प्रो. रघुनाथ विष्णु दामले बी. ए. | वनस्पतिशास्त्र |
| प्रो. त्र्यंबक विष्णु मोने एम. ए. | गणितशास्त्र |
| प्रो. दत्तात्रय लक्ष्मण सहस्रबुद्धे एम. एजी. | भूस्तरशास्त्र |
| वैद्यभूषण गणेशशास्त्री जोशी | आर्यवैद्यक |
| कै. विनायकशास्त्री खानापूरकर | आर्यज्योतिषशास्त्र |
| रा. रा. दिवाकर यशवंत फाटक | यंत्रशास्त्र |

ज्या विषयावर शाखासंपादक नाहींत त्या विषयाची जबाबदारी संपादकमंडळावर आहे असें समजावें.

या विभागांतील विशिष्ट लेख व लेखकः—कवचधर—व्ही. एन्. लिखिते, प्रो. टी. जी. येवलेकर व प्रो. व्ही. एन्. हाटे. कांतकाम—के. व्ही. मनोहर. कर्ज( हिंदु कायदा )—बॅरिस्टर ल. ब. पेटकर.

—:*S*:—




## अं त रं ग प रि च य.

### क—काव्य.

**हिंदुस्थान**—

**इतिहास**—वै दि क-कण्व, कलियुग, कल्पसूत्रें, कवष, कवि, कश्यप, कहोळ, काण्वशाखा, कात्यायन, कारस्कर.

पौ रा णि क.—कंक, ककुत्स्थ, कच, कण्व, कद्रु, कपिल, कबंध, कर्कोट, कर्ण, कर्दम, कलंकी, कलि, कलियुग, कल्प, कल्माषपाद, कत्रप, कवि, कश्यप, कंस, कहोळ, काम, कार्तवीर्य, कार्तिकेय, कालकेय, कालनेमी, कालयवन, कालिंदी, कालिया, काली.

बौ द्ध.—कनकमुनि, कपिलवस्तु, कलिंग.

प्रा ची न हिं दु स्था न.—कनिष्क, कनोजचें राज्य, कलचुरी, कलश, कलिंग, काण्व घराणें.

द क्षि ण हिं दु स्था नी य.—कदंब आणि कादंब, कर्णाटक, कलचुरी, काकतीय, कांदलूर.

मु सु ल मा नी.— कमरुद्दीनखान, कामवक्ष, कामरान.

गु ज रा थ चा इ ति हा स.—करणवाघेला, कर्णराज,

म रा ठे—कदम इंद्रोजी, कदम कंठाजी, कर्ण, कलमदाने, कलावंतखातें, कलुशा, कविजंग, कान्होजी आंग्रे, कायगांवकर.

इं ग्र जी अ म दा नी.—करीमखान, कर्णाटक, कॉटन, कॉर्नवालीस.

**इतिहाससाहित्य**—काफीखान, कायगांवकर.

**जातीतिहास**—कक्कलन, कचेरा, कच्छी मेमन, कंजर, कडिया, कडुस, कंडेरा, कणियान, कदन, कद्दुपत्तन, कद्रा, कनकन, कनेत, कन्नालिगर, कमार, कम्मा, कम्माल, करण, कराडी, करेण, कर्णप्रावरण, कलंगा, कलाल, कलावंत, कलित, कल्लार, कवार, कसबी, कसाई, कहार, काकेझी, काचिन, काची, काठी, काठेवाडी, कातकरी, कातारी, कातिया, काथरवाणी, कादिर, कानमैरु, कानिकर, कान्यकुब्ज ब्राह्मण, कापू, कांबोह, कामकार, कामद, कामली, कामाठी, कायस्थ, कारवाल (करौला), कारस्कर, कारेवकल, कालंदर, कालिंजी.

**वाङ्मय**, सं स्कृ त.—कणाद, कणिक, कपिल, कय्यट, कल्पसूत्रें, कल्याणमल्ल, कल्हण, कादंब कवि, कादंबरी, कामंदक, कालिकापुराण, कालिदास.

म हा रा ष्ट्र.—कचेश्वर, कमलाकर, कान्हो पाठक, कान्होपात्रा.

ता मि ळ.—कपिलर, कलथ-थलइ, कल्लाडनार.

ते लु गू.—कावेल्ली व्यंकट बोरय्या.

का न डी.—कानडी वाङ्मय.

हिं दु स्था नी.—कबीर, कमाल.

फि न लं ड.—कलेवल.

इं ग्र जी.—कॉम्ब्रिह, कॉरेली, कार्लाइल.

सा मा न्य.—कल्पसूत्रें, कवि, कादंबरी, काव्य.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**, मुं ब ई इ ला खा,

महाराष्ट्रः—कंकाळा किल्ला, कडूस, कडेगांव, कडेपूर, कण्हेर किल्ला, कण्हेरखेड, कमलगड, करकंब, करकुंब, करंज, करमाळें, कर्जत, कडें, कर्नाळा किल्ला, कऱ्हाड, कऱ्हेपठार, कलसूबाई, कल्याण, कवनाई किल्ला, कवलापूर, कळंब, कळवण, कळसूबाई, कागल, कांचनाकिल्ला, काठी, कांत्रा किल्ला, कानलदे, कान्हिरा किल्ला, कान्हेरी, कापची, कालें, काले.

क र्ना ट क.—ककुर, कग्नेली, कंचिनेगलुर, कचिंचि, कटगेरी, कडुर, कण्णेश्वर, कण्वल्ली, कण्विसिद्गेरी, कदरमंदलगी, कनमडी, करजगी, कलघटगी, कलादगी, कल्लोल, कॅसलरॉक, कळस, काखंडकी, कागवाड, काद्रोली, कानडा कावूर, कामधेनु, कारडगी, कारडी. कारवार.

गु ज रा थ.—कच्छ, कच्छचें रण, कंजरडा, कटोसन, कडान, कडोळी, कणेर, कण्व, कतारिया, कनोरा, कपडवंज, कवारवट, कमधिया, कमालपुर, करिआन, करोड, कर्मद, काकर, काकसिआली, कांत्रेज, काटोडिया, काठेवाड, कांथकोट, काथारिया, काथ्रोटा, कादोद, कापडवंज, कामरेज, कालोल.

सिं ध.—कंदियारो, कंधकोट, कंवर, कराची, काकर.

म ध्य प्रां त,—हिंदीः-कंकर, कटनी, कन्हरगांव जमीनदारी, कन्होली, करणपाली, कर्डी, कवर्धा, कांकेर, मराठीः-कलमेश्वर, काटोल, कापशी. कामटी, कामठा, कामठी.

व ऱ्हा ड.—करंजगांव, कलम, कळंबेश्वर, काप, कापुसतळणी, कामरगांव, कायर, कारंजा.

ब डो दें सं स्था न.—कडी, करनाली, कारवान, कालोल.

म्है सू र सं स्था न.— कंकनहळ्ळी, कडूर, कब्वालदुर्ग, कलले, कळसा, कांपिली, कावेरी.

सं यु क्त प्रां त.—कंकाळा, कट्रा, कनखल, कनोज, कमासिन, करछना, करहल, कर्णप्रयाग, कर्नलगंज, कलंगागोंडर,

काकोरी, काथगोदाम, कादीपुर, कांधळा, कानपूर, कांपिल्य, कारवी, कालसी, कालिंजर, काल्पी.

मध्य हिंदुस्थान.—कच्छी बडोर्दे, कठोडिया, कडौरा, करैया, कांकोली, काथौन, कामटा–राजौला.

मद्रास.—कंजामलाय, कडाप्पा, कडैयनलूर, कंदुकर, कन्याकुमारी, कंपली, कमुदी, करुंगळी, करूर, कर्णाटक, कर्नूल, कर्नूल कडाप्पा कालवा, कलरायण डोंगर, कलिंगपट्टण, कलुगुमलइ, कल्याणदुग, कल्याणपुर, कल्लाकुर्चि, कवराई, कल्लिकोटा आणि अंतगड, कागिरी, कांजीवरम्, कादिरि, कानगुंडी, कानडा, काननोर, कानिगिरी, कायल, कायल. पट्टणम्, कारकळ, कारिकल, कारैकुडी, कारोमांडल, कार्तिकस्वामी, कार्वेटिनगर, कालहस्ती, कालिकत, कालिमिर, कावळी, कावेरीपट्टण, कावेरपाक.

त्रावणकोर संस्थान.—कायनकुलम्.

हैद्राबाद संस्थान—कधार, कन्नड, करीमनगर, कलवगूर, कल्याणी, कल्वकुर्ती, कलम, कळमनूरी, कळ्ळूर, कार्दिराबाद, कांदी, कामारेड्डीपेठ, कारामुंगी.

बिहार-ओरिसा—कटक, कलहंडी, कसवा.

बंगाल—कॅनिंगपोर्ट, कपिलमुनि, कमातापूर, करणगड, करतोया, कर्णफुली, कर्मनाशा, कलकत्ता, काटवा, कांतनगड, कांदी, कामाख्याटी, कालना, कालिंपोंग, कालीघाट.

पंजाब.—कटास, कणावाद, कणेथी, कपुरथळा, कवीरवाल, कमलगड, करमगड, करोरलाल इसा, कर्तारपूर, कर्नाळ, कलइत, कलासिया, कसौली, कहरोर, कहलूर, कहूत, कळानौर, कांग्रा, कानौद, कान्हीरा खेडें, कामालिया, कालरा, काल्का.

ब्रह्मदेश.—कठा, कनवालु, कनि, कनौंग, कमा, कमैंग, कलदन, कलेवा, कवकरीक कवालिन, कांतिगेल, कामतीलांग.

आसाम.—कपिली नदी, करीमगंज, काचार, कामरूप.

राजपुताना.—कठुमर, करवली, कांकोली, कांचोळा, कानोर, कामन, कालिंजर.

वायव्य सरहद्द.—कागान, काफिरकोट.

• हिमालय-नेपाळ.—कांचनगंगा, काटमांडु.

प्राचीन.—कनक, कपिलवस्तु, कर्कोट, कर्णप्रावरण, कर्णसुवर्ण, कर्वट, कांपिल्य, कांवोज, काम्यकवन.

**आशिया—हिंदुस्थानेतर–**

ऐतिहासिक.–कॅथे, कन्फ्यूशिअस, कॅपाडोशिआ, कवध.

प्रादेशिक.—कच्छी, कँटन, कँडी, कंदाहार, कंबोडिया, करवला, कर्मान, कलात, कलात–इ–घिलझई, कॉकेशस, काफिरिस्तान, काबूळ, काबूल नदीचा कालवा, कामश्चाटका, काराकुल, काराकोरम्, कालसेडान.

**आफ्रिका—**ऐतिहासिक.—कर्णक.

जाति.—कविरोंडो, काफिरलोक, कार्थेज.

प्रादेशिक.—कॅझेंबे, कर्णक, कलहारि, कॅसाब्लांका, कांगो, कांगो फ्रीस्टेट, कातांगा, कॉस्टन्टाईन, काफा, काफ्रारिया, कामेरून.

**यूरोप—**

ऐतिहासिक.—कॅथेराइन, कॅनोव्हास, कॅपो, कॅप्रीव्ही, कॅरिअन, कॅल्व्हिन जॉन, कॉन्स्टन्टाईन दि ग्रेट, कायं सरजॉन.

जाति.—कालमक.

प्रादेशिक.—कँटरबरी, कँडिया, कॅनि, कॅनिआ, कॅनी, कॅपरनेअम्, कॅपुआ, कंब्राय, कॅमेरिनो, कॅरिसब्रूक, कर्कवाल, कॅलामेटा, कॅले, कॅसलबार, कॉनवे, कान्स्टंटा, कॉन्स्टन्स, कान्स्टान्टिनोपल, कॉपेन, कायेनी, कारडोना, कॉरिन्थ, कॉर्क, कार्डिफ, कार्पेथियन, कार्लस्कोना, कार्लस्टाट, कार्लाइल, कार्लोविट्झ, कालाटिआ.

**अमेरिका—**

चरित्र.—कार्नेजी.

प्रादेशिक.—कन्सस, कॅराकस, कॅरिवी वेर्टे, कानडा, कार्तागो,

**वैद्यकशास्त्र**—कफ, कांजिण्या, कानाचे रोग, कावीळ.

**वनस्पतिशास्त्र**—कंकोळ, कचोरा, कडधान्यें, कडाळी, कडूजिरें, कडुनिंब, कण्हेर, कनकफळ, कपोक, कमल, करंज, करटोली, करवंद, कलिंगड, कवठ, कसई, काकडशिंगी, कांकडी, कांचन, काजू, कात, कांदा, कानगी, कापूर, कापूस कॉफी, कावरा, कारलें, काली फ्लॉवर.

**रसायनशास्त्र**, कर्व. चरित्रें.–कॅनिझारो स्टानिस्लास,

**पदार्थविज्ञान**—कॅव्हेंडिश हेनरी, कान्टन जॉन, कार्नूमेरी, कार्नो.

**तत्वज्ञान**—कर्ममार्ग, कर्मयोग, कर्मवाद, कर्माकर्मविचार, कल्पना, कल्पनासाहचर्य, कान्ट,

**ज्योतिषशास्त्र**—कन्यागत, कपिलाषष्ठी, कमलाकर भट्ट, करणकमलमार्तंड, करणप्रकाश, करणोत्तम, कराष्टमी, कलियुगवर्ष, कल्प, कालगणना.

**धार्मिक व सांप्रदायिक**–कडालिंगी, कॅनन व कॅनानाइट, कन्फ्यूशिअस, कपालक्रिया, कवीरपंथी, कमाल, करारी, कल्याणगोसावी, कांचुलिया, कानफाटे, कानीफनाथ, कापालिक, काप्ट, कालीघाट.

**सांस्कृतिक**—कमल, कर्णभूषणें, कलगीतुरा, कला, कवि, कसाईखाना, कळसूत्री बाहुल्या.

**सामाजिक**—कामगारहितवर्धक सभा, कामशास्त्र.

**औद्योगिक**—कंपनी, कस्तुरी, कागद, कांच, कांच कागद, कात, कातडीं, कापूर, कापूस, कॉफी.

**शासन व अर्थशास्त्र**—कर, कॅरे हेनरी चार्लस कर्ज, कामेरालिझम.

**कायदेशास्त्र**—कंपनी, करार, कायदा.

**स्थापत्यशास्त्र**—कार्मिआर्ड, कालवे.

**खनिजपदार्थ**—कथील.

**प्राणिशास्त्र**—कवचधरवर्ग, कस्तुरीमृग, कांगारू, काजवा, कावळा.

**मुद्रणशास्त्र**—चरित्र-कॅक्स्टन.

**यंत्रशास्त्र**—कातकाम.

**लिपि व अर्थनिश्चय**—क.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## क



**क**— पहिलें व्यंजन. पुष्कळ संस्कृत नामांनां तीं दुसऱ्या शब्दांशीं संयुक्त होतांनां ( समासांत ) क हा शब्दातिशय प्रत्यय लागतो. उदा. आत्म—आत्मक, मूल—मूलक, पूर्व पूर्वक, हें जग पंचभूतात्मक आहे.—' हा स्त्रीमूलक कहल आहे '—' मी शपथपूर्वक सांगतों '. इत्यादि. लहान वय, सारखेपणा, प्रेम वगैरे दर्शविण्याकरितां कधीं कधीं क हें अक्षर जोडतात, त्यामुळें अर्थ फारसा वदलत नाहीं; उदा. वालक, पुस्तक इ.

अ र्थ.—ब्रह्मदेव ( भाग. १. ७, १८ ). ( २ ) दक्ष प्रजापति ( भाग. ४. ३. ३ ). ( ३ ) कश्यप ( भाग. ४. ६, ४०; म. भा. १. १, ३२ ). ( ४ ) वायु. ( ५ ) सूर्य. ( ६ ) यम. ( ७ ) विष्णु. ( ८ ) कामदेव. ( ९ ) अग्नि. ( १० ) आत्मा. ( ११ ) राजा. ( १२ ) गांठ. (१३) मोर. ( १४ ) पक्ष्यांचा राजा. ( १५ ) पक्षि. ( १६ ) मन. (१७) शरीर. ( १८ ) वेळ. ( १९ ) मेघ. ( २० ) शब्द, ध्वनि. ( २१ ) प्रकाश. ( २२ ) संपत्ति. (२३ ) केस. इ.

अ क्ष र वि का स.—आधुनिक स्वरूप प्राप्त होण्यास या अक्षराला पांच अवस्थांतून जावें लागलें. पहिली अशोकच्या गिरनार येथील शिलालेखांत, दुसरी कुशानवंशीयांच्या वेळेच्या मथुरा येथील लेखांत व तिसरी इ. स. दुसऱ्या शतकांतील क्षत्रपवंशी रुद्रदामनच्या गिरनार येथील लेखांत दिसून येते. यानंतर चवथी अवस्था जपानांतील एका मठांत सांपडलेल्या उष्णी. षविजयधारिणीच्या एका ताडपत्री पुस्तकांत ( काल इ. स. ६ वें शतक ) पहावयास मिळते; यांत ' क 'ला उजव्या वाजूला गांठ आहे. इ. स. १८१५ तील प्रतिहारवंशी राजा नागभट याच्या वुचकला येथील शिलालेखांत ' क ' ची शेवटची अवस्था सांपडेल. या अवस्थेपासून वळणाच्या वावतींत थोडी प्रगति होत होत आजचा वळणदार ' क ' निघाला. हैहयवंशी राजा जाजल्लदेव याच्या वेळचा एक लेख (इ. स. १११४ )व परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या ओरिआ येथील लेख (इ. स. १२०८) यांतून या प्रगतावस्थेंतील ' क ' आढळतो.

[ आपटे—ओक—संस्कृत कोश. मोलस्वर्थ कँडी यांचा मराठी इंग्रजी कोश. प्राचीन लिपिमाला. ]

**कंक.**—( १ ) अज्ञातवासकालीं विराटाच्या घरीं प्रवेश करतांना युधिष्ठिरानें आपणांस धारण केलेलें नांव. हा विराटाचा सभासद असून त्याशीं अक्षक्रीडा करीत असे. दक्षिणगोग्रहणकालीं विराट राजा सुशर्म्यांसमागमें युद्धास गेला असतां त्यानें त्यास भ्रात्यासहित समागमें घेतलें होतें व तेथें त्यास सुशर्मा वांधून नेत असतां त्यापासून यानें आपल्या भ्रात्याकडून ( वल्लवादिकांकडून ) त्याची मुक्तता करविली होती ( म. भा. विराटपर्व अ. १, ७).

( २ ) वृष्णिकुलोत्पन्न एक राजा. याचा महाभारतांत द्रौपदीस्वयंवरप्रसंगीं व राजसूययज्ञप्रसंगीं उल्लेख आढळतो.

( ३ ) एका राष्ट्राचें नांव. यवन, किरात, गान्धार, चीन, शवर, वर्वर वगैरे लोकांबरोवर यांचें नांव आलें असून यांस दस्यु म्हटलें आहे ( महा. शांति. ६५. ). भागवतांतहि यांचा हूण, यवन, शकांबरोबर उल्लेख आढळतो (भा.२.४,१८; ९. २०, ३० ) व त्यांत यांनां हीन म्हटलें आहे. बृहत्संहितेंतहि या लोकांचा उल्लेख आढळतो ( १४. ४ ).

**कंकनहळ्ळी** ता लु का.—वंगलोर जिल्ह्याचा ( म्हैसूर ) दक्षिणेकडील तालुका. उ. अ. १२° १५' ते १२° ४९' व पू. रे. ७७°१४' ते ७७°३८'. क्षेत्रफळ ६२३ चौरस मैल. लोकसंख्या ( इ. स. १९११ ) ९५०२४. या तालुक्यांत एक शहर व २३४ खेडीं आहेत. खुल्या जागेंत रगी, आंवरे आणि एरंडीचीं झाडें होतात. चिंच व नारळ यांचें पीक ओढ्यांच्या कांठानें होतें. या तालुक्याची जमीन उथळ व खडकाळ आहे.

गां व.—वंगलोर जिल्ह्यांतील कंकनहळ्ळी तालुक्याचें मुख्य ठाणें. हें उ. अ. १२° ३३' व पू. रे. ७७°२६' यांमध्यें अर्कावती नदीच्या तीरीं आहे. हें वंगलोरच्या दक्षिणेस ७० मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ४८७०. येथील किल्ला चन्नापट्टणाच्या जगदेवरायानें १५७७त वांधला. ब्रिटिश सैन्यास येथें स्थान मिळूं नये म्हणून टिपूनें हें दोनदां उध्वस्त केलें. १८७० पासून येथें म्युनिसिपालिटी आहे.

**कंकर**—मध्यप्रांतांतील एक संस्थान. उत्तर अ. २०° ६' ते २०° ३४' व पूर्व रेखांश ८०° ४१' ते ८१° ४८' यांच्या मध्यें आहे. उत्तरेस दुग व रायपूर जिल्हे, पूर्वेस रायपूर, दक्षिणेस वस्तर संस्थान, व पश्चिमेस चांदा. मुख्य ठिकाण कंकर हें आहे. रायपूरधरमतरी या बी. एन. रेल्वेच्या धरमतरी स्टेशनहून हें सुमारें ३९ मैल असून हा रस्ता पक्का आहे. क्षे. फ. १४२९ चौरस मैल, लोकसंख्या ( १९११) १२७०१४. यांत खेडीं ५१० आहेत. संस्थान बरेंच डोंगराळ आहे व पूर्वेकडे महानदी वाहात जाते. येथें तांदूळ पिकतो. बहुतेक लोक

काकोरी, काथगोदाम, कादीपुर, कांधळा, कानपूर, कांपिल्य, कारवी, कालसी, कालिंजर, काल्पी.

मध्यहिंदुस्थान.—कच्छी वडोर्दे, कठोडिया, कडौरा, करैया, कांकोली, काथौन, कामटा-राजौला.

मद्रास.—कंजामलाय, कडाप्पा, कडैयनलूर, कंदुकर, कन्याकुमारी, कंपली, कमुदी, करुंगळी, करूर, कर्णाटक, कर्नूल, कर्नूल कडाप्पा कालवा, कलरायण डोंगर, कलिंगपट्टण, कलुगुमलइ, कल्याणदुग, कल्याणपुर, कल्लाकुर्चि, कवराई, कल्लिकोटा आणि अंतगड, कागिरी, कांजीवरम्, कादिरि, कानगुंडी, कानडा, कानानोर, कानिगिरी, कायल, कायल. पट्टणम्, कारकळ, कारिकल, कारैकुडी, कारोमांडल, कार्तिकस्वामी, कार्वेटिनगर, कालहस्ती, कालिकत, कालिमिर, कावळी, कावेरीपट्टण, कावेरीपाक.

त्रावणकोर संस्थान.—कायनकुलम्.

हैद्राबाद संस्थान—कधार, कन्नड, करीमनगर, कलवगूर, कल्याणी, कल्वकुर्ती, कलम, कळमनूरी, कळ्ळूर, कांदंरावाद, कांदी, कामारेड्डीपेठ, कारामुंगी.

बिहार-ओरिसा—कटक, कलहंडी, कसवा.

बंगाल—कॅनिंगपोर्ट, कपिलमुनि, कमातापूर, करणगड, करतोया, कर्णफुली, कर्मनाशा, कलकत्ता, काटवा, कांतनगड, कांदी, कामाऱ्हाटी, कालना, कालिपोंग, कालीघाट.

पंजाब.—कटास, कणावाद, कणेथी, कपुरथळा, कवीरवाल, कमलगड, करमगड, करोरलाल इसा, कर्तारपूर, कर्नाळ, कलइत, कलासिया, कसौली, कहरोर, कहलूर, कहूत, कळानौर, कांग्रा, कानौद, कान्हीरा खेडें, कामालिया, कालरा, काल्का.

ब्रह्मदेश.—कठा, कनवाळु, कनि, कनौंग, कमा, कमैंग, कलदन, कलेवा, कवकरीक कवालिन, कांतिगेल, कामतीलांग.

आसाम.—कपिली नदी, करीमगंज, काचार, कामरूप.

राजपुताना.—कठुमर, करवली, कांकोली, कांचोला, कानोर, कामन, कालिंजर.

वायव्य सरहद्द.—कागान, काफिरकोट.

हिमालय-नेपाळ.—कांचनगंगा, काटमांडु.

प्राचीन.—कनक, कपिलवस्तु, कर्कोट, कर्णप्रावरण, कर्णसुवर्ण, कर्वट, कांपिल्य, कांवोज, काम्यकवन.

**आशिया—हिंदुस्थानेतर—**

ऐतिहासिक.-कंथे, कन्फ्यूशिअस, कॅपाडोशिआ, कवध.

प्रादेशिक.—कच्छी, कँटन, कँडी, कंदाहार, कंबोडिया, करबला, कर्मान, कलात, कलात-इ-घिलझाई, कॉकेशस, काफिरिस्तान, कावूल, काबूल नदीचा कालवा, कामश्चाटका, काराकुल, काराकोरम्, कालसेडान.

**आफ्रिका—**ऐतिहासिक.—कर्णक.

जाति.—कविरोंडो, काफिरलोक, कार्थेज.

प्रादेशिक.—कॅझेंबे, कर्णक, कलहारि, कॅसाब्लांका, कांगो, कांगो फ्रीस्टेट, कातांगा, कॉन्स्टन्टाईन, काफा, काफ्रारिया, कामेरून.

**यूरोप—**

ऐतिहासिक.—कॅथेराइन, कॅनोव्हास, कॅपो, कॅप्रीव्ही, कॅरिअन, कॅल्व्हिन जॉन, कॉन्स्टन्टाईन दि ग्रेट, कायें सरजॉन.

जाति.—कालमक.

प्रादेशिक.—कँटरबरी, कँडिया, कॅनि, कॅनिआ, कॅनी, कॅपरनेअम्, कॅपुआ, कंब्राय, कॅमेरिनो, कॅरिसब्रूक, कर्कवाल, कॅलामेटा, कॅले, कॅसलबार, कॉनवे, कान्स्टंटा, कॉन्स्टन्स, कान्स्टान्टिनोपल, कॉपेन, कायेनी, कारडोना, कॉरिन्थ, कॉर्क, कार्डिफ, कार्पेथियन, कार्लस्कोना, कार्लेस्टाट, कार्लाइल, कार्लोविट्झ, कालाटिआ.

**अमेरिका—**

चरित्र.—कार्नेजी.

प्रादेशिक.-कन्सस, कॅराकस, कॅरिबी वेटें, कानडा, कार्तागो,

**वैद्यकशास्त्र—**कफ, कांजिण्या, कानाचे रोग, कावीळ.

**वनस्पतिशास्त्र—**कंकोळ, कचोरा, कडधान्यें, कडाळी, कडूजिरें, कडुनिंब, कण्हेर, कनकफळ, कपोक, कमल, करंज, करटोली, करवंद, कलिंगड, कवठ, कसई, काकडशिंगी, कांकडी, कांचन, काजू, कात, कांदा, कानगी, कापूर, कापूस कॉफी, कावरा, कारलें, काली फ्लॉवर.

**रसायनशास्त्र,** कर्व. चरित्रें.-कॅनिझारो स्टानिस्लास,

**पदार्थविज्ञान—**कॅव्हेंडिश हेनरी, कान्टन जॉन, कार्नूमेरी, कार्नो.

**तत्वज्ञान—**कर्ममार्ग, कर्मयोग, कर्मवाद, कर्माकर्मविचार, कल्पना, कल्पनासाहचर्य, कान्ट,

**ज्योतिषशास्त्र—**कन्यागत, कपिलाषष्ठी, कमलाकर भट्ट, करणकमलमार्तंड, करणप्रकाश, करणोत्तम, कराष्टमी, कलियुगवर्ष, कल्प, कालगणना.

**धार्मिक व सांप्रदायिक-**कडालिंगी, कॅनन व कॅनानाइट, कन्फ्यूशिअस, कपालक्रिया, कवीरपंथी, कमाल, करारी, कल्याणगोसावी, कांचुलिया, कानफाटे, कानीफनाथ, कापालिक, काप्ट, कालीघाट.

**सांस्कृतिक—**कमल, कर्णभूषणें, कलगीतुरा, कला, कवि, कसाईखाना, कळसूत्री वाहुल्या.

**सामाजिक—**कामगारहितवर्धक सभा, कामशास्त्र.

**औद्योगिक—**कंपनी, कस्तुरी, कागद, कांच, कांच कागद, कात, कातडीं, कापूर, कापूस, कॉफी.

**शासन व अर्थशास्त्र—**कर, कॅरे हेनरी चार्लस कर्ज, कामेरालिझम.

**कायदेशास्त्र—**कंपनी, करार, कायदा.

**स्थापत्यशास्त्र—**काम्भिआर्ड, कालवे.

**खनिजपदार्थ—**कथील.

**प्राणिशास्त्र—**कवचधरवर्ग, कस्तुरामृग, कांगारू, काजवा, कावळा.

**मुद्रणशास्त्र—**चरित्र-कॅक्स्टन.

**यंत्रशास्त्र—**कातकाम.

**लिपि व अर्थनिश्चय—**क.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## क



क— पहिलें व्यंजन. पुष्कळ संस्कृत नामांनां तीं दुसऱ्या शब्दांशीं संयुक्त होतांनां ( समासांत ) क हा शब्दातिशय प्रत्यय लागतो. उदा. आत्म—आत्मक, मूल—मूलक, पूर्व पूर्वक, हें जग पंचभूतात्मक आहे.—' हा स्त्रीमूलक कहल आहे '—' मी शपथपूर्वक सांगतों '. इत्यादि. लहान वय, सारखेपणा, प्रेम वगैरे दर्शविण्याकरितां कधीं कधीं क हें अक्षर जोडतात, त्यामुळें अर्थ फारसा वदलत नाहीं; उदा. वालक, पुस्तक इ.

अ र्थ.—ब्रह्मदेव ( भाग. १. ७, १८ ). ( २ ) दक्ष प्रजापति ( भाग. ४. ३. ३ ). ( ३ ) कश्यप ( भाग. ४. ६, ४०; म. भा. १. १, ३२ ). ( ४ ) वायु. ( ५ ) सूर्य. ( ६ ) यम. ( ७ ) विष्णु. ( ८ ) कामदेव. ( ९ ) अग्नि. ( १० ) आत्मा. ( ११ ) राजा. ( १२ ) गांठ. (१३) मोर. ( १४ ) पक्ष्यांचा राजा. ( १५ ) पक्षि. ( १६ ) मन. (१७) शरीर. ( १८ ) वेळ. ( १९ ) मेघ. ( २० ) शब्द, ध्वनि. ( २१ ) प्रकाश. ( २२ ) संपत्ति. (२३) केस. इ.

अ क्ष र वि का स.—आधुनिक स्वरूप प्राप्त होण्यास या अक्षराला पांच अवस्थांतून जावें लागलें. पहिली अशोकच्या गिरनार येथील शिलालेखांत, दुसरी कुशानवंशीयांच्या वेळेच्या मथुरा येथील लेखांत व तिसरी इ. स. दुसऱ्या शतकांतील क्षत्रपवंशी रुद्रदामनूच्या गिरनार येथील लेखांत दिसून येते. यानंतर चवथी अवस्था जपानांतील एका मठांत सांपडलेल्या उष्णीषविजयधारिणींच्या एका ताडपत्री पुस्तकांत ( काल इ. स. ६ वें शतक ) पहावयास मिळते; यांत 'क 'ला उजव्या बाजूला गांठ आहे. इ. स. १८१५ तील प्रतिहारवंशी राजा नागभट याच्या बुचकला येथील शिलालेखांत 'क' ची शेवटची अवस्था सांपडेल. या अवस्थेपासून वळणाच्या बाबतींत थोडी प्रगति होत होत आजचा वळणदार 'क' निघाला. हैहयवंशी राजा जाजल्लदेव याच्या वेळचा एक लेख (इ. स. १११४ )व परमार राजा धारावर्ष याच्या वेळचा ओरिआ येथील लेख (इ. स. १२०८) यांतून या प्रगतावस्थेंतील 'क ' आढळतो.

[ आपटे—ओक—संस्कृत कोश. मोलस्वर्थ कँडी यांचा मराठी इंग्रजी कोश. प्राचीन लिपिमाला. ]

**कंक.**—( १ ) अज्ञातवासकालीं विराटाच्या घरीं प्रवेश करतांना युधिष्ठिरानें आपणांस धारण केलेलें नांव. हा विराटाचा सभासद असून त्याशीं अक्षक्रीडा करीत असे. दक्षिणगोग्रहणकालीं विराट राजा सुशर्म्यांसमागमें युद्धास गेला असतां त्यानें त्यास भ्रात्यासहित समागमें घेतलें होतें व तेथें त्यास सुशर्मा वांधून नेत असतां त्यापासून यानें आपल्या भ्रात्याकडून ( वल्लवादिकांकडून ) त्याची मुक्तता करविली होती ( म. भा. विराटपर्व अ. १, ७).

( २ ) वृष्णिकुलोत्पन्न एक राजा. याचा महाभारतांत द्रौपदीस्वयंवरप्रसंगीं व राजसूययज्ञप्रसंगीं उल्लेख आढळतो.

( ३ ) एका राष्ट्राचें नांव. यवन, किरात, गान्धार, चीन, शवर, वर्वर वगैरे लोकांवरोवर यांचें नांव आलें असून यांस दस्यु म्हटलें आहे ( महा. शांति. ६५. ). भागवतांतहि यांचा हूण, यवन, शकांवरोवर उल्लेख आढळतो (भा.२.४,१८; ९. २०, ३० ) व त्यांत यांनां हीन म्हटलें आहे. बृहत्संहितेंतहि या लोकांचा उल्लेख आढळतो ( १४. ४ ).

**कंकनहळ्ळी ता लु का.**—वंगलोर जिल्ह्याचा ( म्हैसूर ) दक्षिणेकडील तालुका. उ. अ. १२° १५' ते १२° ४९' व पू. रे. ७७°१४' ते ७७°३८'. क्षेत्रफळ ६२३ चौरस मैल. लोकसंख्या ( इ. स. १९११ ) ९५०२४. या तालुक्यांत एक शहर व २३४ खेडीं आहेत. खुल्या जागेंत रगी, आंवरे आणि एरंडीचीं झाडें होतात. चिंच व नारळ यांचें पीक ओढ्यांच्या कांठानें होतें. या तालुक्याची जमीन उथळ व खडकाळ आहे.

गां व.—वंगलोर जिल्ह्यांतील कंकनहळ्ळी तालुक्याचें मुख्य ठाणें. हें उ. अ. १२° ३३' व पू. रे. ७७°२६' यांमध्यें अर्कावती नदीच्या तीरीं आहे. हें वंगलोरच्या दक्षिणेस ७० मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ४८७०. येथील किल्ला चन्नापट्टणाच्या जगदेवरायानें १५७७त वांधला. ब्रिटिश सैन्यास येथें स्थान मिळूं नये म्हणून टिपूनें हें दोनदां उध्वस्त केलें. १८७० पासून येथें म्युनिसिपालिटी आहे.

**कंकर**—मध्यप्रांतांतील एक संस्थान. उत्तर अ. २०° ६' ते २०° ३४' व पूर्व रेखांश ८०° ४१' ते ८१° ४८' यांच्या मध्यें आहे. उत्तरेस दुग व रायपूर जिल्हे, पूर्वेस रायपूर, दक्षिणेस बस्तर संस्थान, व पश्चिमेस चांदा. मुख्य ठिकाण कंकर हें आहे. रायपूर-धरमतरी या बी. एन. रेल्वेच्या धरमतरी स्टेशनहून हें सुमारें ३९ मैल असून हा रस्ता पक्का आहे. क्षे. फ. १४२९ चौरस मैल, लोकसंख्या ( १९११) १२७०१४. यांत खेडीं ५१० आहेत. संस्थान बरेंच डोंगराळ आहे व पूर्वेकडे महानदी वाहात जाते. येथें तांदूळ पिकतो. बहुतेक लोक

गोंड आहेत. येथील राजा जुन्या रजपूत कुळांतील असून याचा पूर्वज लोकनियुक्त होता. मराठयांनां ५०० शिपायांची मदत देण्याचें अंगीकारल्यामुळें हें संस्थान मराठयांनीं चालू दिलें. छत्तीसगडी व गोंडी भाषा येथें मुख्यतः वापरतात. रेल्वेचा फांटा येथें सुरु केल्यापासून येथील जंगलांतील लांकडापासून बराच फायदा संस्थानास होऊं लागला आहे. शिक्षण बरेंच मागसलेलें आहे. १९०१ मध्यें फक्त ९०४ लोकांनां लिहितां वाचतां येत होतें. संस्थानांत एक हायस्कूल चालतें. छत्तिसगड विभागाच्या कमिशनरच्या हाताखालील पोलिटिकल एजंट संस्थान व ब्रिटिशसरकार यांमधील कारभार पहातो.

**ककुत्स्थ**—( सूर्यवंश ) इक्ष्वाकु राजर्षीचा पौत्र व विकुक्षीचा पुत्र. सांप्रतच्या स्वर्गस्थ पुरंधर इंद्राचें दैत्यांशीं युद्ध चाललें असतां त्यानें यास आपल्या साह्यास बोलावलें होतें. त्या वेळेस यानें इंद्रास वृषभ करून त्यावर आरोहण केलें व दैत्यांचीं पुरें जिंकलीं, म्हणून यास असें नांव पडलें. यास क्वचित इंद्रवाह, पुरंजय अशीं नांवेंहि आढळतात व इंद्रानें धारण केलेलें शुभ्र वृषभ रूप, त्यावर याचें आसन होतें अशा अर्थानें यास कोठें चंद्रवाह असेंहि म्हटलें आहे.

**ककुर**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. तुंगभद्रा नदीच्या तीरावर गदगच्या आग्नेयीस सुमारें ३० मैलांवर हें एक खेडें असून तेथील मारुतीच्या देवळाच्या आवारांत एक शिलालेख अद्यापि सुस्थितींत आहे.

**कंकोळ**—या वेलीस लॅटिनमध्यें क्युबेबा आफिसिनालिस; इंग्रजींत क्युबेब्स; संस्कृतमध्यें सुगंध, मरीच, कंकोल; हिंदींत कवाव चिनी; पर्शियनमध्यें कबाबे; मराठींत कंकोळ, कापूर चिनी, इत्यादि नांवें आहेत. ह्या वेलीची मूळ उत्पत्ति जावा व सुमात्रा बेटांत आहे. हिची हिंदुस्थानांत फारच थोडी लागवड होते. सिंगापूरहून कंकोल बाहेर प्रदेशीं मोठ्या प्रमाणावर जातो. या वेलीच्या वाळलेल्या फळांसच कंकोल ही संज्ञा आहे.

औ ष धी गु ण.—मुखरोगावर कंकोल व खडीसाखर दाढेखालीं धरून रस गिळीत जावा. प्रमेहावर कंकोळाचें चूर्ण साखरेबरोबर द्यावें. उन्हाळी लागल्यास कंकोळाचा काढा करून त्यांत पांच थेंबपर्यंत चंदनी तेल घालून द्यावें.

**ककलन**—मलबारी शिंप्यांची जात. दक्षिणेतील कक्कुरवण व हे एकच आहेत. यांच्या चार पोटजाती आहेत. या जातींतील लोक फक्त आपापल्या जातींतच विवाह करतात. यांच्या जाती ( १ ) कावित्यान, ( २ )माणिप्परायन, ( ३ ) मेलुत्तन व ( ४ ) चपट्टरायन या आहेत. हे लोक बरेच धंदे करतात परंतु त्यांत सामुद्रिक हा मुख्य होय. बापानंतर मालमत्तेचा मालक मुलगाच असतो. हे मृतांनां पुरतात. हे अपभ्रष्ट तामीळ भाषा बोलतात. हे त्रावणकोर, कोचीन वगैरे प्रांतांत आढळतात. उत्तरेकडील प्रदेशांत यांस कुरवन असें म्हणतात.

**कंकाळा**—संयुक्तप्रांत. बदाउन जिल्हा. दातागंज तहशिलींतील एक गांव. उत्तर अक्षांश २७°५३' व पूर्व रेखांश ७९°१२'. लोकसंख्या ( १९११ ) ६९२६. आसपास कंकर पुष्कळ सांपडतो त्यावरून या गांवास हें नांव प्राप्त झालें आहे. इ. स. १८५८ सालीं जनरल पेनीनें आपणांवर हल्ला करण्याकरतां दबा धरून बसलेल्या माथेफिरू मुसुलमानांचा येथें पराजय केला. येथें सराइ आहे.

**कंकाळा किल्ला**—मुंबई. नाशिक जिल्हा. मालेगांवच्या वायव्येस १२ मैलांवर हा किल्ला होता. १८६२ मध्यें हा बहुतेक पडून गेल्याचा दाखला आहे.

**कॅक्स्टन**—कॅक्स्टन विल्यम या पहिल्या इंग्लिश मुद्रकाचा जन्म सुमारें १४२२ मध्यें झाला. याची जन्मतारीख निश्चयात्मक ठरवितां येत नाहीं. रॉबर्ट लार्ज हा लंडनचा लॉर्ड मेयर ( ग्रामाध्यक्ष ) असतांना कॅक्स्टन हा त्याच्यापाशीं उमेदवार होता. यावरून त्याच्या आईबापाचा समाजांतील दर्जा बराच मोठा होता असें मानण्यास हरकत नाहीं. मेयरच्या मरणानंतर कॅक्स्टनला इंग्लिश व फ्लेमिश लोकांच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण जें बर्जेस तेथें पाठविण्यांत आलें. तेथें तो कांहीं दिवसांनीं एका इंग्लिश व्यापारी कंपनीचा गव्हर्नर झाला. बरगंडीच्या ड्यूकबरोबर केलेल्या लोकरीच्या व्यापाराबंधीं तहाची मुदत संपत आल्यामुळें चवथ्या एडवर्डनें तहाची मुदत वाढवण्याकरितां कॅक्स्टनला त्याजकडे पाठविलें. १४७१ त तो कोलोनमध्यें असतांना मुद्रणकला शिकला व नंतर मॅन्शन यास आपला भागीदार करून त्यानें बर्जेस येथें एक छापखाना काढिला. सन १४७६ मध्यें त्यानें छापलेलें इंग्लिश भाषेंतील पहिलेंच पुस्तक होय. त्याच वर्षी तो इंग्लंडमध्यें आला व वेस्टमिन्स्टर ॲबेजवळ त्यानें आपला छापखाना सुरू केला. इंग्लंडमध्यें आल्यावर लॉर्ड रिव्हर्सच्या तत्वज्ञानाचीं वचनें (दि डिक्टेटस् ऑर सेईंग्ज् ऑफ दि फिलॉसफर्स ' ) या भाषांतराची सुधारलेली आवृत्ति त्यानें छापली. मध्ययुगांतील ट्रॉयच्या अद्भुत गोष्टींचीं त्यानें भाषांतरें केलीं व चॉसरच्या ' क्यांटरबरी टेल्स ' व गॉवरचें ' कन्फेसिओ अम्यांटिस,' हीं पुस्तकें छापिलीं. त्याचें महत्वाचें व स्वतंत्र पुस्तक म्हणजे राल्फ हिग्डेन्च्या पॉलिक्रॉनिकनला जोडलेला आठवा भाग हें होय. आपल्या छापखान्याचा उपयोग तो पैसे मिळविण्याकडेहि करीत असे. साधुसंतांच्या चरित्रांच्या आधारें लिहिलेलें 'गोल्डन लिजंड' नांवाचें पुस्तक त्याच्या छापखान्यांत छापलेल्या पुस्तकांत जास्त भपकेदार आहे. तो पुस्तकांतून चित्रें काढण्याकरितां कोरीव ठोकळ्यांचा उपयोग करीत असे. मरणाच्या आधीं एक वर्ष त्यानें इंग्लिश भाषेच्या नेहमीं बदलणाऱ्या स्थितीबद्दल आपली दिलगिरी प्रदर्शित केली. तो सन १४९१ त मरण पावला.

**कग्नेली.**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. कोडच्या वायव्येस सुमारें १३ मैलांवर १२३२ लोकवस्तीचें ( इ. स. १८८१ ) एक गांव. येथें आदिकेशव, कालहस्तेश्वर, लक्ष्मीनरसिंह, संगमेश्वर, सोमेश्वर आणि विदर्भ यांचीं देवळें आहेत. हीं देवळें कोंडया व वेंकप्पा नांवाच्या इसमांनीं बांधलीं असें म्हणतात. आदिकेशवाची मूर्ति सोळाव्या शतकांतील एक कानडी कवि कंकादास यानें वंकापुरांतील वाड नांवाच्या गांवाहून आणली अशी आख्याइका आहे. रथयात्रेच्या समारंभाकरतां येथील पुजाऱ्यांस सरकारांतून कांहीं इनाम आहे. येथील भंडारगिरी स्वामीच्या समाधीवर पांच, कालहस्तेश्वराच्या देवळावर चार, संगमेश्वराच्या देवळावर एक, सोमेश्वराच्या देवळांत तीन व विदर्भाच्या देवळाच्या उत्तरेस तीन असे १६ शिलालेख आहेत.

**कच**—एक ब्रह्मर्षि. बृहस्पतीचा पुत्र. महाभारतांत ( आदिपर्व ७६–८३ ) याविषयीं अशी कथा आहे कीं दैत्यगुरु शुक्राचार्य यालाच फक्त अवगत असलेली संजीविनी विद्या शिकून येण्याकरितां इंद्रानें याला शुक्राकडे पाठविलें. यानें गुरूची फार एकनिष्ठपणें सेवा केली. दैत्यांनां जेव्हां याच्या हेतूविषयीं संशय आला तेव्हां त्यांनीं याला दोनदां मारिलें, पण गुरुकन्या देवयानी हिच्या विनंतीवरून शुक्रानें कचाला पुन्हां जिवंत केलें. शेवटीं शुक्राला हा जिवंत करितां येऊं नये म्हणून दैत्यांनीं याची राख करून ती शुक्राला मद्यांतून पाजली. देवयानीच्या विनंतीवरून शुक्र जेव्हां अंतर्दृष्टीनें कचाचा शोध करूं लागला तेव्हां तो आपल्या पोटांत आहे असें त्यास आढळलें. तेव्हां आपण व कच दोघेहि जिवंत राहावे म्हणून पोटांत कच जिवंत करून त्याला संजीवनी विद्या शिकविली व आपल्या मद्यासक्तीमुळें हा प्रसंग ओढवला याचा खेद होऊन यापुढें कोणीहि ब्राह्मणानें मद्याला स्पर्श करूं नये असा कडक निर्बंध घातला. कच जिवंत झाल्यावर गुरूची आज्ञा घेऊन स्वर्गास जावयास निघाला. तेव्हां देवयानीनें आपलें पाणिग्रहण करण्याविषयीं त्याला विनविलें. पण एकाच उदरांतून निर्माण झाल्यामुळें आपण दोघे बहीणभाऊ आहोंत असा युक्तिवाद करून कचानें तिला झिडकारिलें. तेव्हां या प्रेमळ बालिकेला सात्विक संताप येऊन तिनें कचाला तूं शिकलेली विद्या तुझ्या उपयोगीं पडणार नाहीं असा शाप दिला. कचानेंहि उलट तुला ब्राह्मण पति मिळणार नाहीं असा देवयानीला शाप दिला.

**कंचिनेग्लुर**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. हनगलच्या ईशान्येस सात मैलांवर ७०० लोकवस्तीचें ( इ. स. १८८१ ) एक खेडें असून या ठिकाणीं असलेल्या एका मातीच्या ढिगावर इ. स. ११०५ सालचा शिलालेख आहे.

**कचिवि**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. कोडच्या वायव्येस १५ मैलांवर ८३६ लोकवस्तीचें ( इ. स. १८८१ ) एक खेडें. येथें रामेश्वराच्या देवळासमोर एक वीरगल ( हीरोस्टोन ) व गणप्पाच्या देवळांत इ. स. १२५४ सालचा एक शिलालेख आहे.

**कचेरा**—कांचेच्या बांगड्या करणारांची ही जात जबलपूर जिल्ह्यांत विशेषेंकरून आढळते. यांची संख्या २८०० आहे. हे लोक आपली उत्पत्ति महादेवानें आपल्या लग्नांत पार्वतीच्या हातांत बांगड्या भरण्याकरितां एका यज्ञवेदींतून केली असें सांगतात. दुसरी कथाः महादेवानें एका क्षत्रियास बांगड्या करण्यास सांगितल्यावरून त्यानें तोच धंदा पत्करला व कचेरांचा मूळपुरुष झाला. रसेल म्हणतो कीं बांगड्यांचा धंदा हिंदुस्थानांत मुसुलमानांनीं आणिला व त्याच्या पूर्वी येथें बायका लाखेच्या बांगड्या भरीत. ( लखेरा पहा ) यांचे परस्पर विवाही वर्ग पाहिले म्हणजे यांच्या जातींत बरेच मिश्रण झालें आहे असें आढळून येईल. कारण त्यांतील बरींच नांवें इतर जातींपासूनच घेतलीं आहेत. जसेंः—अरिया, गडरिया, सुनार, नौवा, ठकुरेल, कच्छवाह, चौहान, कुरिया, इ. यावरून रसेल तर्क करितो कीं पूर्वी मुसुलमानांच्या हातच्या बांगड्या घालणाऱ्याच्या नाहींत अशी समजूत असेल तेव्हां बऱ्याच हिंदु जातींनीं हा धंदा पत्करला असेल व कालांतरानें त्यांची एकच जात बनली असेल.

हे निरनिराळ्या वर्गास बैंक नांव देतात व एकाच बैंकांत विवाह होत नाहींत. तसेंच आते, मामे व मावस भांवडांचीं लग्नेंहि होत नाहींत.या जातींत मुलींची कमतरता असल्यामुळें लहानपणापासूनच मुलीच्या लग्नाची घाई असते व कन्याशुल्क बरेंच मिळतें. तें ५० रुपयेपर्यंत असतें. लग्नविधि खांबाला वधूवरांनीं प्रदक्षिणा घातल्या म्हणजे होतो. त्यानंतर एका पाट्यावर वरवंटा ठेवून वधुवरांनीं एकमेकांकडे आपल्या पायांनीं लोटण्याचा प्रयत्न करून शक्तीची परीक्षा पाहतात. लग्न झाल्यानंतर कानांत घालण्याची ढाल ( कर्णफूल ) भिंतीवर चिकटवून ती दूध ओतून पडली म्हणजे लग्न फार सुखकारक होईल असें समजतात.

रसेल म्हणतो कीं हा विधि पुत्रजन्माचा सूचक आहे. बायकांच्या कमतरतेमुळें विधवेला दिराबरोबरच विवाह करावा लागतो. मग तो दीर लहान मूल कां असेना. काडी मोडण्याची चालहि यांच्यांत आहे. स्वजातीयांबरोबर स्त्रियांनीं व्यभिचार केला तर तिकडे दुर्लक्ष करतात पण परजातीशीं केला तर बहिष्कार करतात. हे लोक ब्राह्मणांकडूनच आपलीं लग्नें लावितात. यांचा दर्जा मात्र जातिसोपानांत खालावलेलाच आहे. यांच्या हातचें पाणी उच्च जाती पीत नाहींत. हे मासे व मांस खातात व कोणी कोणी दारू पितात. यांच्या जातींत पंचाईत असते. त्यांतील मुख्यास मालिक किंवा दिवाण म्हणतात. हे देवीची पूजा करतात व आश्विन आणि चैत्र यांच्या शुद्धप्रतिपदेस भांड्यांत धान्य पेरून "जव्हारे" करतात. कोणी कोणी तर स्वतःच्या आंगावर ९ दिवस एकाच ठिकाणीं बसून हें धान्य उगवितात.

हे कच्ची कांच उत्तर हिंदुस्थानांतून आणवितात व त्याच्या बांगड्या करतात. बांगड्या घालण्याच्या निरनिराळ्या जातींत अनेक चाली आहेत. कोणी कोणी मुली कांचेच्या बांगड्या घालीत नाहींत.कोणी हस्तीदंताच्या,कोणी नारळाच्या करवंटीच्या कोणी शंखाच्या व कोणी लाखेच्या घालतात.

उच्च हिंदू जातींत विवाह होईपर्यंतच मुली हिरव्या बांगड्या घालतात. लग्न झाल्यावर हिरवा रंग वर्ज करितात. मुसलमान स्त्रिया हिरव्या व काळ्या बांगड्या घालतात. नीच जातीच्या स्त्रिया 'खाग्गा' नांवाची बांगडी वाहूंवर घालतात. कचेऱ्यांच्या बांगड्या विकण्यास बहुतकरून त्यांच्या बायकाच जातात. यांच्या धंद्यांत भट्टीजवळ राहण्याचें काम फार पडतें त्यामुळें यांचे डोळे लौकर विघडतात.

**कचेश्वर**—एक महाराष्ट्र कवि. हा चाकण येथील एका वैदिक ब्राह्मण घराण्यांत जन्मला. हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण, उपनांव ब्रह्मे. गोत्र काश्यप. बापाचें नांव सिद्धेश्वर. यानें देहूस जाऊन तुकारामाचा एक टाळकरी अंवाजी याजपासून तुकारामाच्या अभंगाच्या वह्या मागून घेऊन त्यांचा अभ्यास केला. हा अक्षय भजन करीत असल्यानें लोक याला वेडा म्हणत. पुढें याची गणना साधु पुरुषांत होऊं लागली.

यानें शके १६०७ त पाऊस पाडून दाखविला. त्यावद्दल त्याला व त्याच्या वंशजांनां चाकण परगण्यापैकीं दर गांवांतून १ टका व धान्य १ मण मिळत असे. यावद्दल शाहूनें करून दिलेलें पत्र उपलब्ध आहे ( भा. इ. सं. मं. इतिवृत्त १८३५ पा. २५३ ).

शाहू राजा याचा शिष्य झाल्याकारणानें यास 'राजगुरु' असें नांव पडलें व हें उपनांव त्याच्या वंशांत चालू लागलें. वाळाजी विश्वनाथहि कचेश्वराला फार मानीत असे. कचेश्वरानें वाळाजीला लिहिलेल्या पत्रांत 'श्रीमत् भगवद्भजनपरायण सद्गुणाधिष्ठान विवेकसागर राजमान विराजित नानास्वामी गोसावी' असा मायना असून पुढें 'अपत्यें कचेश्वरें नमस्कार विशेष' लिहिलें आहे. यावरून वाळाजी नांवाच्या ठिकाणीं कचेश्वराची किती श्रद्धा होती हें व्यक्त होतें. कचेश्वर शके १६५३ त उंब्रज येथें फाल्गुन शु. २ स वारला. समाधी माहुली येथें बांधिली आहे. याचे वंशज हल्लीं खेड तालुक्यांत खेडवाकी, चांडोली व साताऱ्यांतील अतित गांवीं राहतात. यानें स्थापिलेल्या पांडुरंगाच्या मूर्ती खेड व चांडोली येथें आहेत.

कचेश्वराची बहुविध पद्यरचना त्याच्या परंपरेंतील लोकांकडे आहे. 'सुदामचरित्र' व 'गजेंद्रमोक्ष' हींच कायतीं आख्यानें छापून प्रसिद्ध आहेत. या आख्यानांची रचना श्लोकबद्ध असून त्यांत चामर, सवाई वगैरे वृत्तें आहेत. त्यामुळें कचेश्वराची काव्यरचना कानाला गोड लागते. एरवीं तींत फारसें सौष्ठव किंवा शब्दचमत्कार नाहींत. याची शब्दयोजना फार साधी व दृष्टांत नेहमींच्या प्रचारांतले, तेव्हां सहाजिकच वायकांच्याहि तोंडीं याची कविता वसलेली दिसते. कचेश्वराचें गजेंद्रमोक्ष वृद्ध वायका मोठ्या भाविकपणें म्हणतात. कचेश्वराचें एक आत्मचरित्र आहे, तें भा. इ. सं. मं. च्या १८३५ च्या इतिवृत्तांत समग्र दिलें आहे. [ महाराष्ट्रसाहित्य-महाराष्ट्रकविचरित्र सरस्वतीमंदिर ८ वें वर्ष अं. ८ वगैरे. ].

**कचोरा**—ह्यास संस्कृतमध्यें कर्चूर, मराठींत कचोरा, गुजराथींत कचूरो, हिंदींत कर्चूर अशीं नांवें आहेत.

कचोऱ्याचीं झाडें हळदीच्या झाडासारखीं असतात. परंतु हळदीच्या पानापेक्षां कचोऱ्याचें पान किंचित् काळसर असतें. या पानाची लांबी सुमारें दोन हात असते. ह्याचे कंद जमिनींत सांपडतात. कोकणांत हीं झाडें पुष्कळ होतात. यास सुवास चांगला असल्यामुळें हा सुगंधी मसाल्यांत वाटून अंगास लावितात. या झाडाचीच एक जात असते. तीस कापूर काचरी असें म्हणतात. तीस सुगंध जास्त असल्यामुळें कचोऱ्यापेक्षांहि महाग असते. पटकीवर कचोऱ्याच्या कंदाचा व कांद्याचा रस एकत्र करून घ्यावा. जंतावर कचोऱ्याच्या कंदाचे काप काढून त्यांची माळ करून गळ्यांत बांधावी.

**कच्छ**—मुंबई सरकारच्या ताब्यांतील देशी संस्थान.

म र्या दा.—उ. व वा. सिंधप्रांत;पू. पालनपूर एजन्सींतील देशी संस्थानें: द. काठेवाडचें द्वीपकल्प व कच्छचें आखात; व नैर्ऋत्येस हिंदी महासागर. याची लांबी पूर्वपश्चिम १६० मैल व रुंदी दक्षिणोत्तर ३५ ते ७० मैल आहे. कच्छचें रण सोडून याचें क्षेत्रफळ ७६१६ चौ. मै. असून त्यांत ८ मोठीं गांवें व ९३७ लहान खेडीं आहेत. कच्छचा महाराव भूज येथें रहातो. हिंदुस्थानच्या इतर भागांपासून तुटकपणा, येथील लोकांचे विशिष्ट गुणधर्म, त्यांची निराळी भाषा, त्यांच्या राजासंबंधीं वाटणारी त्यांची विलक्षण भक्ति, वगैरे गोष्टींवरून मुंबई इलाख्याच्या इतर संस्थानांपेक्षां हें एक निराळें राष्ट्र असावें असें वाटतें.

स्वा भा वि क व र्ण न.—उत्तरेस मोठें रण, पूर्वेस छोटें रण, दक्षिणेस कच्छचें आखात व पश्चिमेस अरबी समुद्र असल्यामुळें हा प्रदेश हिंदुस्थानापासून बहुतेक वेगळा आहे. जरी एकंदरींत हा देश रुक्ष, ओसाड व खडकाळ असला तरी डोंगराच्या रांगा व तुटक शिखरें, नद्यांचीं खोल पात्रें, लागवड केलेलीं खोरीं व चराईच्या जागा, यांमुळें याला विविधता प्राप्त झाली आहे. दक्षिणेकडील वाळुकामय उंच किनाऱ्याच्या आंतल्या बाजूस २० ते ३० मैल रुंदीचा सखल सुपीक व चांगली लागवड केलेला प्रदेश आहे. त्याच्या पलीकडे पश्चिमेस खुद्द कच्छमधील, पूर्वेस वागदमधील व उत्तरेस रणबेटांतील डोंगर जातात. कच्छच्या डोंगरांत धिनोधरचें शिखर सुमारें १००० फूट उंच असून तेथें पूर्वी ज्वालामुखी पर्वत असल्यावद्दल प्रसिद्धी आहे.

झूरा व वारार हीं शिखरें सुमारें ९०० फूट उंच आहेत. इतर डोंगर फार उंच नाहींत.

वर्षभर ज्यांनां पाणी असतें अशा नद्या कच्छमध्यें मुळींच नाहींत. पावसाळ्यांत मध्य डोंगरांतून उत्तरेकडे व दक्षिणेकडे पुष्कळ प्रवाह जातात. उन्हाळ्यांत त्यांचें पाणी कमी होऊन मधून डवकीं मात्र शिल्लक राहतात. चरवर डोंगरांत बांध घालून एक तळें केलेलें आहे. त्याला सरोवर असें म्हणतात. कच्छच्या मोठ्या रणाच्या पश्चिमेस सिंधी नांवाचे एक तळें अलेक्झांडरच्या वेळेपासून (इ. स. पू. ३२५) अस्तित्वांत असून, सिंधु नदीचें पाणी कमी ज्यास्त मिळेल त्याप्रमाणें ह्या तळ्याचें पाणी कधीं खारें तर कधीं गोड असतें.

क्षारयुक्त ओसाड प्रदेशाचे विशिष्ट धर्म, ज्वालामुखी पर्वतांतून बाहेर आलेले बासाल्ट दगड व डोंगराच्या पायथ्याशीं असलेले अग्नीच्या योगानें तुटलेले कडे यांवरून कच्छमधील ज्वालामुखींचा जोर किती होता हें समजून येतें. हल्लीं येथें ज्वालामुखीचे स्फोट होत नाहींत. परंतु धरणीकंप होतात. गेल्या शतकांत, १८१९, १८४४, १८४५ व १८६४ या सालीं कच्छमध्यें धरणीकंप झाले. १८१९ चा धक्का सर्वांत जोराचा होता. त्यावेळीं भूज येथील रावच्या राजवाड्यासुद्धां ७००० घरांचा नाश होऊन त्यामध्यें ११५० माणसें दबून मेलीं. प्रत्येक किल्ल्याचें थोडें बहुत नुकसान झालें. परंतु पश्चिमेकडील तेराचा सर्वांत मजबूत किल्ला पार जमीनदोस्त झाला. कच्छच्या रणामध्यें पुष्कळ ठिकाणची जागा दबून गेली. सिंधीच्या आजूबाजूला १६मैलपर्यंत जागा एकदम ८ पासून १२ फूटपर्यंत खचून त्या ठिकाणीं सरोवर तयार झालें; व सिंधीच्या उत्तरेच्या सपाट मैदानांत धरणीकंपानंतर १० ते १८ फूट उंचीचा व ५० मैल लांबीचा नवीन प्रदेश दिसूं लागला. सिंधू नदीच्या जुन्या पात्रांत हा प्रदेश एकदम उत्पन्न झाल्यामुळें त्याला अल्लाबंद म्हणजे देवानें घातलेला बांध असें नांव मिळालें आहे.

कच्छमध्यें झाडें फारच थोडीं आहेत. निंब, पिंपळ, बाभुळ हीं झाडें खेड्यांतून आढळतात. वड व चिंच हीं झाडें क्वचित दिसतात व अंब्याचें झाड करण्यास पुष्कळ मेहनत घ्यावी लागते.

कर्क वृत्ताशीं समांतर रेषेंत हा देश वसल्यामुळें, नैर्ऋत्येकडील मनसून वारे येथें येत नाहींत. १९०३ पूर्वीच्या दहा वर्षांत वार्षिक पाऊस सरासरी १२.६ इंच होता. किनाऱ्याची हवा वर्षभर सुखावह असते. इतर ठिकाणची हवा ९ महिने थंड व आरोग्यकारक असते. परंतु एप्रिल व मे आणि आक्टोबर व नववर या महिन्यांत उन्हाळा फार होतो.

इ ति हा स.—ग्रीक ग्रंथांमध्यें कच्छचा उल्लेख आलेला आहे. अलेक्झांडरला (इ. स. पू. ३२६) रणच्या पाण्याची माहिती होती. १५० वर्षांनंतर त्याचा समावेश मेदनेरच्या राज्यांत झाला व नंतर लवकरच तें शकांच्या ताब्यांत गेलें. त्यांच्यामागून पार्थियन आले. इ. स. १४० व ३९० यांच्या दरम्यान सुराष्ट्र येथील क्षत्रप कच्छवर राज्य करीत होते. कांहीं काळपर्यंत, हा देश मगधचे गुप्तराजे व पुढें वल्लभी राजे यांच्या हातांत राहून, सातव्या शतकांत सिंधमध्यें सामील झाला. ह्यानंतर चारण, काठी व चावडा लोकांनीं त्यावर स्वाऱ्या केल्या. नवव्या शतकांत अरब लोक येथील किनाऱ्यावर येऊन राहिले. १०२३ त, अनाहिलवाडचा पहिला भीमदेव हा गझनीच्या महंमुदापासून पळून कानखोत येथें आला; व त्या शतकाच्या अखेर सिंधचा सूम्र राजा सिंगहार यानें हा देश काबीज केला.

चवदाव्या शतकांत सिंधच्या सम्मा रजपुतांनीं जिंकिल्यापासून कच्छच्या अर्वाचीन इतिहासाला प्रारंभ होतो. सुम्रांच्या जुलुमाला कंटाळून आलेल्या ह्या लोकांनां, येथील चावडा रजपुतांनीं राहण्यास जागा दिली. पण सम्मा लोकांनीं आपल्या आश्रयदात्यांचें राज्य घेऊन त्या ठिकाणीं स्वतः राज्य स्थापन केलें (१३२०). सम्मा वंशांतील जोजाड राजा त्याच्या नांवावरून जाडेजा लोक आपल्याला संबोधूं लागले. सम्मा रजपुतांच्या राजघराण्याला जाडेजा "जाडचे पुत्र" असें म्हणत; त्यांचा धर्म हिंदु व मुसुलमानी धर्मांच्या मिश्रणानें झालेला होता. आपल्या जातीपासून वेगळे झाल्यामुळें त्यांच्या मुलींनां योग्य पती मिळेनासे झाले, म्हणून लहान मुलींना मारून टाकण्याची वाईट चाल त्यांच्यामध्यें पडली व ती अगदीं अलीकडच्या काळापर्यंत चालू होती.

इ. स. १४५० पर्यंत जाडेजांच्या तीन शाखा कच्छवर राज्य करीत होत्या. १४५० त जाम हमीराचा मुलगा खेंगार यानें अहमदाबादच्या मुसुलमान राजाच्या साहाय्यानें सर्व देश आपल्या ताब्यांत आणिला. शिवाय त्या राजानें काठेवाडच्या उत्तरेकडील मोर्वी देऊन राव ही पदवी दिली. खेंगारचा चुलता जामरावल यानें काठेवाडांत पळून जाऊन हल्लींचें नवानगरचें घराणें स्थापन केलें. खेंगार अहमदाबादच्या राजांनां खंडणी देत नसे. पण त्याला ५००० घोडेस्वारानिशीं लष्करी मदत द्यावी लागे. खेंगारच्या मुलानें पूर्ण स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला. परंतु १५९० ते १५९१ या दोन वर्षीं त्याचा पराभव होऊन, त्याला मोंगलांची सत्ता कबूल करावी लागली. मक्केस जाणाऱ्या यात्रेकरूंनां वाट देण्याच्या अटीवर जहांगिरानें ही खंडणी माफ केली सहा पिढ्यांपर्यंत रावांची गादी वडील मुलाकडे चालत राहिली. पुढें १६९७ त रायधानच्या मरणानंतर त्याचा तिसरा मुलगा प्रागजी यानें वडील भावाचें खून करून गादी बळकाविली. भावाच्या मुलाला शांत करण्याकरितां त्यानें त्याला मोर्वीवर स्वतंत्र नेमिलें. अद्याप मोर्वी त्याच्या वंशजांच्या ताब्यांत आहे. गुजराथच्या सुभेदारानें १७१८ त कच्छवर पुष्कळ स्वाऱ्या चालविल्या. पण त्यांचा कांहीं उपयोग झाला

नाहीं. १८६२ च्या सुमारास कच्छमध्यें बंड उद्भवून रावाची बुद्धिभ्रष्टता व निरनिराळ्या पक्षांतील भांडणें यांमुळें राज्यांतील अव्यवस्था फारच वाढली. अखेर १८१५ त इंग्रजांशीं तह होऊन इंग्रजांनीं देशांत शांतता राखण्याचें कबूल केलें. व त्याच्या मोबदला त्यांनां अंजारचा किल्ला व दुसरीं २३ गावें देण्यांत आलीं. देशांत शांतता स्थापन झाल्यावर राव इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिला. परंतु त्याच्या दुर्व्यसनांनीं व क्रूरपणानें कंटाळून जाऊन जाडेजा सरदारांनीं १८१८ त इंग्रज सरकारची मदत मागितली. रावानेंहि लढाईची तयारी केल्यामुळें इंग्रज सैन्यानें त्याच्यावर चाल करून भूजचा किल्ला सर केला व त्याला पदच्युत करून त्याच्या जागीं जाडेजा सरदारांनीं निवडलेला अज्ञान राजा गादीवर बसविला; व तेथें आपला रेसिडेंट ठेविला. ब्रिटिशांनां मिळालेला अंजार जिल्हा वार्षिक कांहीं रक्कम घेण्याचें कबूल करून कच्छला परत देण्यांत आला. १८३४ त राव वयांत आल्यावर त्याच्या नांवानें सत्ता चालविणारें मंडळ मोडून टाकण्यांत आलें. रावाला ब्रिटिश सरकारकडून सनद मिळालेली आहे. त्याअन्वयें त्याला दत्तक घेण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे. रावाला २१ तोफांची सलामी मिळते. हल्लींचे संस्थानिक महाराव श्रीखेंगरजी सवाई बहादूर आहेत. यांनां जी. सी. एस. आय; जी. सी. आय. ई. वगैरे पदव्या आहेत. १९२१ सालीं हिंदी संस्थानिकांतर्फे लंडन येथें भरलेल्या वसाहतींच्या परिषदेला महाराव हजर राहिले होते.

लो क सं ख्या.—अठराव्या शतकाच्या मध्य कालांत त्या नंतरच्या पुष्कळ वर्षांपेक्षां लोकसंख्या बरीच ज्यास्त होती असा समज आहे. अठराव्या शतकाच्या शेवटीं राज्यांतील अव्यवस्था, फत्ते महंमदानें चालविलेल्या लढाया व १८१२ चा दुष्काळ यांमुळें कच्छची लोकसंख्या अर्धी कमी झाली. १९११ च्या खानेसुमारींतील आंकडे खालीं दिल्याप्रमाणें आहेत. एकंदर लो. सं. ५१३४२९. पैकीं हिंदूः— २९५४३६; मुसुलमानः—१२६१३३; जैन ६५२९८; पारशी ८० व ख्रिस्ती ६३

सतीची चाल एके काळीं चालू होती. ती बंद करण्यांत आली आहे व मुली मारण्याची चालहि हळूहळू बंद होत चालली आहे. १८४२ त जाडेजा रजपुतांमध्यें पुरुषांचें स्त्रियांशीं प्रमाण ८:१ असें होतें. तें १९०१ त सारखें झालें. येथें कच्छी व गुजराथी पोटभाषा चालतात. कच्छी भाषा ही गुजराथीची पोटभाषा असून फक्त बोलण्यांत उपयोगास आणतात. याशिवाय फारशी व पश्चिमहिंदी या भाषा फारच थोड्या चालतात.

शे त की.—जमिनींत वाळूचा अंश बराच असून नांगरण्यास फार हलकी असल्यामुळें शेतें मोठीं म्हणजे सरासरी ३५ एकरी नंबर असतात. गहूं, बाजरी, कापूस, कडधान्य, वागाइती जिन्नस हीं येथील मुख्य मुख्य पिकें आहेत.

पाळीव जनावरांत, उंट महत्त्वाचा असून चपलतेबद्दल त्याची ख्याति आहे. पूर्वी कच्छचे घोडे प्रसिद्ध असत. परंतु अरबी व इतर घोडे येऊं लागल्यापासून त्यांची किम्मत कमी झाली आहे.

ख नि ज प दा र्थ.—कच्छमध्यें लोखंड व कोळसा सांपडतो, परंतु हल्लीं कोणत्याच खाणी चालू नाहींत. पूर्वी पुष्कळ तुरटी तयार होत असे; परंतु चिनी तुरटीच्या चढाओढीमुळें व येथील तुरटीनें कापड खराब होत असल्यामुळें हल्लीं मागणी कमी झाली आहे. खावद येथें पिंवळा संगमरवरी दगड सांपडतो.

व्या पा र.—कच्छचा बहुतेक व्यापार समुद्रावरून होतो.

आयात जिन्नसः—कच्चा माल, धान्य, लोणी, साखर, किराणा माल, फळें, इमारती लांकूड, लोखंड, तांबें व पितळेचीं भांडीं, लांकडी सामान, स्टेशनरी वगैरे.

निर्गत मालः—तुरटी, कापूस, कडधान्य, लसूण, चांदीचीं भांडीं, काळें कापड इ.

राजपुताना माळवा रेल्वे झाल्यापासून कच्छचा मुंबई व कराची या बंदरांशीं होणारा समुद्रावरचा व्यापार कमी झाला असें म्हणतात. आगस्टच्या मध्यापासून जूनच्या मध्यापर्यंत मांडवी येथून अरबस्तान, मस्कत, सिंध, काठेवाड मुंबई व मलबारचा किनारा इकडे गलबतें जातात.

एके काळीं मांडवी बंदराचा आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील झांजीबारशीं व्यापार चालत असे. काशीदाचें सुंदर काम व रेशमी काम यांबद्दल कच्छ प्रसिद्ध असून येथें रेशमाचे व कापसाचे कांहीं कारखाने आहेत.

द ळ ण व ळ णा चीं सा ध नें.—मुद्दाम तयार केलेले रस्ते या देशांत नसल्यामुळें पावसाळ्यांत प्रवास करणें दुष्कर होतें. भूजपासून निघून मंडोई, रोहर व मुंदवाड येथें जाणारे तीन रस्ते मुख्य आहेत.

दु ष्का ळ.—अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत ७ वर्षें दुष्काळाचीं गेलीं. सर्वांत मोठा दुष्काळ १८१३ सालीं पडलेला होय. त्यावेळीं अन्नाकरितां पुष्कळांनीं आपलीं मुलें विकलीं. कुत्रें किंवा मांजर मिळालें असतां त्यावेळीं मोठी मेजवानी समजण्यांत येत असे व मनुष्याचें मांस खाण्यापर्यंत मजल गेलेली होती. तेव्हांपासून १८९९ पर्यंत टोळधाड, उंदीर व अमर्याद पाऊस या कारणांनीं १५ वर्षें दुष्काळाचीं गेलीं. १८९९–१९०० या सालीं केवळ दोन इंच पाऊस पडला. यामुळें संस्थानचें फार नुकसान झालें.

रा ज्य व्य व स्था.—कच्छवर निरनिराळे अंमल चालू आहेत ते पुढलिप्रमाणें:—

(१) खालसा मुलुख. हा खुद्द रावाच्या अंमलाखालीं आहे.

(२) भायादांच्या जहागिरी; या रावाच्या घराण्यांतील दुसऱ्या पुरुषांकडे वंशपरंपरेनें आहेत.

(३) मोर्वीच्या ठाकुराकडे असलेला व अधोई नांवाचा देशाच्या मध्यभागचा सात गांव मिळून होणारा प्रदेश.

(४) जाडेजा कोर्ट- यावर ब्रिटिश अधिकारी असून तो १८७५च्या करारान्वयें त्याच्याकडे सोंपविलेल्या खटल्यांच्या चवकशीचें काम कारतो.

या संस्थानांत ८ जिल्हे आहेत ते येणेंप्रमाणें:—अब्दास व नख्तरान, अंजार, वचौ, भूज आणि खावद, लखपत, मांडवी, मुंद्रा, आणि रापर व खादिर. वरिष्ठ अदालत हें सर्व संस्थानकरितां दिवाणी व फौजदारी कोर्ट आहे. १४ वर्षांपेक्षां जास्त सक्तमजूरी, जन्मठेम काळें पाणी व फाशीच्या शिक्षांनां रावाची संमति लागते. याशिवाय ५३ दिवाणी व ४५ फौजदारी कोर्टें असून त्यांचे ३प्रकार आहेत. कांहींचीं अधिकार मर्यादा केवळ रावाच्या प्रदेशावर चालते. दुसऱ्या कांहींची फक्त लहान सरदारांच्या जहागिरिवर चालते; व तिसऱ्या म्हणजे जाडेजा कोर्टाचा अधिकार सर्व संस्थानभर चालतो. जाडेजा सरदारांपैकीं रावानें निवडलेले ४ सरदार व नायव दिवाण हे येथील न्यायाधीश होत. भूज,मांडवी व अंजार येथें म्युनिसिपालिटचा आहेत.

उत्पन्न.—भायाद व दुसरे लहान सरदार यांच्या उत्पन्नासुद्धां या संस्थानचें एकंदर उत्पन्न सुमारें चाळीस लक्ष आहे. त्यापैकीं दरवारचें उत्पन्न २५ लक्ष व बाकीचें जमिनदारांचें आहे. येथील करवसूलीच्या पद्धतीला भाग वटाई असें म्हणतात. उत्पन्नाचा एक सप्तमांश ते एक तृतीयांश सरकारास मिळतो. वहिवाटीहक्काला येथें बरीच किंमत आहे. तरी गिराशिया खेड्यांतील शेतकरी वाटेल तेव्हां काढून टाकतां येतात. संस्थानी जमिनींत ज्यांनीं विहिरी खोदून किंवा कोरड्या जमिनीच्या जागीं बागाईत तयार करून आपली योग्यता दाखविली आहे त्यांनांच वहिवाटी हक्क मिळतो.

लष्कर.—संस्थानच्या मदतीकरितां भूज येथें ब्रिटिश सैन्य ठेवलेलें असे. पण हल्लीं तें काढून घेण्यांत आलें असून त्याबद्दल ब्रिटिश सरकारला ८२२५७ रुपये दिले जातात.

शिक्षण.—१९११ त शें. ८ (पुरुषांपैकीं शें. १४.९ व स्त्रियांपैकीं शे. १.०८) लोकांना लिहितां वाचतां येत होतें. भायाद हे या बाबतींत फारच मागसलेले आहेत. शिक्षणाची प्रगति नीटशी दिसत नाहीं. कारण १९२३ सालीं ४२ गांवांतील शाळा पैशाच्या अभावीं वंद कराव्या लागल्या, तेव्हां व्यापाऱ्यांनीं फंड उभारला.

**कच्छचें रण.**—कच्छच्या संस्थानच्या उत्तरेस व पूर्वेस असलेली एक क्षारयुक्त ओसाड जमीन. क्षेत्रफळ ९००० चौ. मै. उत्तरेस सिंधचा प्रांत असून, पूर्वेस व दक्षिणेस राधनपूर व काठेवाड आहे. रुंदी सुमारें २५ ते ३५ मैल आहे. येथील बंदरांत जहाजें वगैरे येऊं शकतात. कधीं कधीं दक्षिणेकडील जोराच्या वाऱ्यामुळें लखपत नदींत समुद्रांतून पाणी वर चढून येतें. उन्हाळ्यांत जमीन सुकल्यावर मोठें मोठे मिठाचे पोपडेच्या पोपडे जमिनीवर दिसूं लागतात. येथें पशु, पक्षी वगैरे कांहीं नाहींत. १८१९ च्या भूकंपांत कच्छचें रण मध्यभागीं वरेंच वर आलें आहे. खाराघोडा येथें मोठ्या प्रमाणावर मीठ तयार करितात. ह्या मिठास बरागड मीठ म्हणतात.

**कच्छी.**—बलुचिस्तान. कलात संस्थानचा एक भाग. हे २७° ५३' ते २९° ३५' उत्तर अक्षांश व ६७° ११' ते ६८° २८' पूर्व रेखांश. यांवर आहे. क्षेत्रफळ ५३१० चौरस मैल. सिंध प्रांताच्याजवळ असल्यामुळें हा प्रदेश अत्यंत उष्ण आहे. उन्हाळ्यांत ऊन वारे सुटतात. डांसांचा उपद्रव फार होतो. पाऊस सरासरी तीन इंच पडतो.

इतिहास.—सिंध प्रांताच्या इतिहासाशीं या प्रदेशाच्या इतिहासाचा फार संबंध आहे. सातव्या शतकांत राय चचनें आपली राजधानी कंदावील ही परत आपल्या ताब्यांत घेतली. अरब लोक या भागास बूड अथवा बुध या नांवानें ओळखीत. कंदाविलाची लूट त्यांनीं अनेक वेळां केली. पुढें हा भाग सिंधच्या सुम्रा व सम्मा यांच्या ताब्यांत गेला. पंधराव्या शतकांत बलुची लोकांनीं आपला मोर्चा या भागांवर फिरविला होता. पुढें अरघुणांनीं या भागाचा तावा घेतला व त्यांच्या हातून नंतर मोंगलांकडे हा भाग आला. इ. स. १७४० सालीं नादीरशहानें ब्राहुई लोकांस हा प्रदेश दिला. पहिल्या अफगाण लढाईत हा प्रदेश ब्रिटिशांच्या ताब्यांत होता. कलातचा खान मीर खुदादाद खान हा तक्तावर असतांना फार बंडें झालीं होतीं. त्यानें पुष्कळ गुन्हे केल्यावरून इ. स. १८९३ सालीं त्यास गादीवरील हक्क सोडावा लागला.

छलगरी आणि तंबु येथें बौद्धकालांतील पुष्कळ अवशेष सांपडतात. या भागांत ५९० गांवें आहेत. व लोकसंख्या (१९११) ९२७५९ आहे. जाटांचीं वस्ती बरीच आहे. या भागास ओसाड अरण्य अशी संज्ञा आहे. परंतु ही चूक आहे. ज्या ज्या ठिकाणी पाण्याची सोय आहे त्या ठिकाणीं उत्तम पीक येतें.

संरक्षित जंगल या भागांत नाहीं. ब्रिटिश अंमल सुरू होण्यापूर्वी अफगाणिस्तानचे अमीर सन्नी येथील गंधकाच्या खाणींतून गंधक काढीत. कोत्रा आणि सन्नीजवळील डोंगरांत लोहगंधकित (फेरस सल्फेट) सांपडतें. त्याचप्रमाणें सिंधुकर्बितहि (कारबोनेट आफ सोडा) येथें बराच सांपडतो. हलक्या प्रतीचें कापड कांहीं ठिकाणीं विणतात. सिंध प्रांतांतील शिकारपूरहून व्यापारी व्यापार करण्यास येथें येतात. पावसाच्या अत्यल्प प्रमाणामुळें या भागावर दुष्काळ फार लवकरच जाणवतो. पाण्याची सोय झाली तर हा भाग अत्यंत सुपीक होईल यांत संशय नाहीं.

कच्छचे दोन मुख्य भाग असून त्यांपैकीं एकावर कलातच्या खानाचा अधिकार चालतो व दुसऱ्यावर त्या त्या भागांत राहणाऱ्या जातींच्या मुख्य पुरुषाचा अधिकार चालतो. इ. स. १९०३ सालीं खानाचें उत्पन्न २॥ लाख रुपये होतें.

**कच्छी बडोदे**—मध्य हिंदुस्थान. भोपावर एजन्सींतील एक ठाकुरात. क्षे. फ. ३४ चौ. मै. यांत १८ खेडीं आहेत. लो. सं. ( १९११ ) ३६३८. पैकीं बहुतेक हिंदु आहेत.

**कच्छी मेमन**—मेमन मुसुलमानांतील एक वर्ग. यांची वस्ती मुंबई व गुजराथ यांमध्यें फार आहे. हे पूर्वी सिंधांतील लोहाना जातीचे हिंदु होते. बगदादचा साधु मौलाना अबदुल कादर जिलानी ( ११६५ )याला हिंदुस्थानांत आपला धर्म प्रस्थापित करण्याची फार इच्छा होती. त्याचा ६ वा वंशज सैय्यद युसुफुद्दिन कोरदिरी यास १४२१ मध्यें दृष्टांत झाला कीं, सिंधमधील हिंदु जातींस मुसुलमान करावें. तो सिंधमध्यें आला. तेथील राजानें त्याचें स्वागत केलें व मुसुलमानी धर्म स्वीकारला. माणिकजी नांवाच्या लोहाना जातीच्या पुढाऱ्यानेंहि तीच दीक्षा घेतली. तेव्हां मुआमीन हें नांव कोरदिरीनें त्या जातीस दिलें (मुआमीन = श्रद्धावान्). टॉडच्या मतें लोहाना हे रजपुतांपैकीं आहेत. हे व खत्री यांचा मध्यआशियांत मोठा व्यापार चाले. १६ व्या शतकांत हे मेमन कच्छ संस्थानांत आले.तेव्हांपासून त्यांना कच्छी हें नांव पडलें. पुढें गुजराथेंत व तेथून मुंबईस असें यांचें स्थानांतर झालें. कच्छी मेमन मुंबई इलाख्यावाहेरहि दूरवर मद्रास, कलकत्ता, मलबार, ब्रह्मदेश, सयाम, जावा, आफ्रिका वगैरे ठिकाणीं गेले आहेत. यांचा सध्यांचा धर्मगुरु सैय्यद जाफिरशाह हा युसुफुद्दीनचा १९ वा वंशज आहे. तो मुंबई किंवा मुंद्रा येथें राहतो. यांच्यांत हिंदू चाली शिल्लक उरल्या आहेत. मुलींचा व विधवांचा वारसाचा हक्क हिंदू शास्त्राप्रमाणें आहे. हे लग्नें निका पद्धतीनें करतात. मुलीचें शुल्क कितीहि गरीब किंवा श्रमंत असो द्यावें लागतें. व्यभिचारावद्दल नवरा किंवा वायकोला काडी मोडतां येते.हे दारू पीत नाहींत व पुष्कळ मेमन गोमांस खात नाहींत.

हे कच्छी मेमन गोरे असतात. यांचा बांधा बळकट व सुरेख असतो. चेहऱ्यावर हुषारी व कर्तृत्व दिसतें. वयातीत पुरुष व वायका आपल्या पांढऱ्या केसांना मेंदी व नीळ लावतात. वायका लहानपणापासून हात, पाय, व नखें मेंदीनें रंगवितात. बायका व पुरुष दोघेहि काजळ घालतात. कांहीं वायका दांतवण लावून दांत काळे करून घेतात. कच्छी मेमन व हालाई मेमन यांच्यांत लग्नें होत नाहींत. कच्छीच्या बोलण्यांत सिंधी वळण दिसून येतें. पोषाख काठेवाडी पद्धतीचा असतो. कच्छी हे हनाफी पंथाचे सुनी आहेत. बहुतेक लोक मक्केची यात्रा करतात. शिवाय ' मेमन ' पहा. [ मुं. गॅ. ९ भा. २. ]

**कंजर**—ही जिप्सी लोकांप्रमाणें फिरस्ते लोकांची एक जात आहे.एकंदर लोकसंख्या(१९११)२३९८३,पैकीं हिंदू२२५११. यांची वस्ती संयुक्तप्रांत, काश्मीर,पंजाब,मध्यप्रांत वगैरे भागांत आहे. पंजाबमध्यें यांना कंचन असें दुसरें नांव आहे.काश्मीरमध्यें यांच्या स्त्रिया वेश्यांचा धंदा करतात. मध्यपंजाबमध्येंहि या वेश्यांचा धंदा करतात. पण दुसरी एक भ्रमणवृत्तीची जात पंजाबांत असून तिचा वरील कंजराशीं संबंध नाहीं. यांपैकीं कांहीं हिंदु व मुसुलमान आहेत. यांचें नांव कुंचबंधिया असेंहि आहे. वऱ्हाडांत सासिया लोकांचा व यांचा संबंध जोडतात. दक्षिणी व मारवाडी कंजर पूर्वी भाट होते असें दिसतें. यांच्या बायका साधारण देखण्या असून त्यांपैकीं कांहीं अश्लील गाणीं गाण्यांत व अभिनय करण्यांत प्रवीण असतात. हे लोक कोल्हाटी व बेरिया लोकांशीं संलग्न असावेत. या सर्वांचे पूर्वज उत्तर हिंदुस्थानांतले डोंब असावेत असें वाटतें. तैमूरलंगाच्या वेळीं पुष्कळ कंजर हिंदुस्थानांतून वाहेर पडले. ते इराण, इजिप्त, स्पेन तुर्कस्तान व इंग्लंड देशांपर्यंत पोंचले. अजून त्यांचे वंशज हिंदी भाषेची अपभ्रष्ट व मिश्र भाषा बोलतात. शाहनाम्यांत वहराम गौर नांवाच्या इराणी राजानें १२००० लुरी जातीचे गवय्ये वजवैये लोक हिंदुस्थानांतून नेले व त्यांचे वंशज इराणांत अद्याप लुली किंवा लुरी म्हणून हयात आहेत. ठग लोकांची उत्पत्ति देखील कंजरांपासूनच झाली होती. दक्षिणी कंजरांनीं मराठी भाषा, पेहराव व चालरीती उचलल्या आहेत. यांच्या बायका कांचोळी घालतात. मारवाडी कंजरांच्या वायका कांचोळी घालीत नाहींत.

या बायका गाऊन,नाचून पैसा मिळवितात व तपकीर फार ओढतात. जवलपुरास या बायका पंखा ओढण्याची नोकरी करून दरोडेखोरांस बातम्या देऊन चोऱ्या करवीत. हे खस ( वाळ्या )च्या ताटचा, व झाडण्या करतात. व त्यामुळें यांस कुंचबंधिया म्हणतात.

मध्यप्रांतांत जाट व मुलतानी कंजर असे त्यांचे दोन वर्ग आहेत. व यांचे दोन परस्परविवाही पण अंतर्विवाहनिषिद्ध असे वर्ग आहेत. त्यांस कलखा व मल्हा म्हणतात व एका वर्गांतील माणसानें दुसऱ्या वर्गांतील मुलगी केली पाहिजे. या दोन्ही वर्गांत कुळें आहेत. वाळा खोदण्याची कुदळ लग्नमंडपांत ठेऊन वरास शपथ घ्यावी लागते कीं, मी बायकोला हांकून देणार नाहीं व टाकणार नाहीं. कधीं कधीं वधूला देणगी द्यावी लागते. व सासरा त्यांतील अर्धी पहिल्याच मेजवानीला माफहि करतो. यांचा मुख्य देव माना म्हणून एक पूर्वज आहे. याची पूजा पावसाळ्यांत समारंभानें करतात व कांहीं प्राणी बळी देतात. व पूर्वजांच्या शौर्याचीं गाणीं गाऊन नाचतात. मरी, प्रभा, भवानी या देवींचीहि भक्ति दृष्टीस पडते. कांहीं प्राचीन पहिलवानहि देवासारखे पूज्य मानतात. नानकाला भजणारा एक वर्ग आहे. प्रेतास पालथें घालून पुरतात. मुसुलमान झालेल्या कंजरांस जातींत दहीं शिंपडून घेतात व नदीवर स्नान घालून सोन्याची कांडी तापवून जिभेला डाग देतात. तसेंच ब्राह्मण, रजपूत, अगरवाल कुणवी अहीर, व लोधी लोकांबरोबर कंजरणीनें व्यभिचार केला तर तिला देखील दहीं शिंपडून शुद्ध करतात. पण कायस्थ, सोनार व लोहारावरोबर व्यभिचार केला तर मात्र जातींत घेत नाहींत. सुनेला थुंकून

जरी हात लागला तरी सासऱ्यास २॥ रु. दंड द्यावा लागतो. यांचे धंदे चटया विणणें, टोपल्या करणें, पिशव्या करणें, मुंज गवताच्या दोऱ्या वळणें, नगारे करणें, व उत्तर हिंदुस्थानांत दगडाचें काम करणें, धान्य दळणें, कुंचले करणें हे आहेत. भटके कंजर चोऱ्यामाऱ्या करून उपजीविका करतात. ही जात म्हणजे हिंदू व वन्य लोक यांचें एक विशिष्ट मिश्रण म्हणतां येईल. [ कूक, रोज, रिस्ले यांचे जातिकोश. सेन्सस रिपोर्ट १९११].

**कंजरडा**—मुंबई. काठेवाड. ह्या चोक ठाण्यांतला स्वतंत्र खंडणी देणारा तालुका आहे. भादवो डोंगराच्या पायथ्याशीं हा असून याच्या शेजारीं शत्रुंजय व लोंच डोंगर आहेत. या तालुक्यांत कंजरडा हा एकच मोठा गांव आहे. येथील तालुकदार सर्वैया रजपूत आहे.

**कंजामलाय**—मद्रास. सालेम जिल्हा. सालेम तालुक्यांतील टेकडी. उ. अ. ११°३६' व पू. रे. ७८° ४'. उंची ३२३८ फूट. सालेममध्यें ही एक सहजदृश्य टेकडी असून तिच्यांत सांपडणाऱ्या मग्नमिश्रित अशुद्ध लोहधातू ( मॅग्नेटिक आयर्न ओअर ) करितां ती प्रसिद्ध आहे. टेंकडीच्या पायथ्याशीं सिद्धर कोविल नांवाचें देऊळ आहे.

**कँझेंबे**—आफ्रिकेमध्यें म्वेरु सरोवराच्या दक्षिणेस व वँग्वेलूच्या उत्तरेस असलेल्या मुलुखाचें हें नांव आहे. पूर्वी या मुलुखावर कँझेंबे नांवाचा आफ्रिकन राजा राज्य करीत असे, म्हणून यास हें नांव पडलें आहे. १९ साव्या शतकाच्या अखेरीस या राजाचें महत्त्व कमी होऊन, कँझेंबे हा एक साधारण प्रतीचा सरदार होऊन बसला. सध्यां हा देश ग्रेटब्रिटन व बेलजिअन कांगोमध्यें विभागला आहे. तद्देशीय राजांच्या कारकीर्दींत हें राज्य सुधारलेलें होतें. लोक शेतीचा धंदा करीत व कापसाचें कापड, मातीचीं भांडीं, व लोखंडी सामान तयार करीत. या देशांत तांबें पुष्कळ सांपडतें. १७९६;९८;१८०२; व १८३१ या वर्षी पोर्तुगालनें कँझेंबेच्या राज्यांत व्यापारी मिशनें पाठविलीं. १८६८ त डेव्हिड लिव्हिंगस्टन हा कँझेंबे येथें आला होता. १८९४ त ब्रिटन व बेलजिअन कांगो यांनीं हा देश आपसांत वांटून घेतला.

**कटक**, जिल्हा.—कटक हा बिहार व ओरिसा प्रांतांत ओरिसा विभागांतील एक जिल्हा आहे. क्षे. फ. ३६५४ चौ. मै. याच्या उत्तरेस वैतरणी नदी, धाम्रनदीमुख व पलीकडे बलसोर जिल्हा; पूर्वेस बंगालचा उपसागर; दक्षिणेस पुरी, व पश्चिमेस ओरिसाचीं मांडलिक संस्थानें.

स्वाभाविक वर्णनः—कटकचे तीन विभाग आहेत. ( १ ) किनाऱ्याची ३ ते ३० मैल रुंदीची अरण्याच्छादित व दलदलीची पट्टी; ( २ ) महानदीच्या मुखप्रदेशाच्या जुन्या भागांतील भाताची जिराइती जमीन; ( ३ ) पश्चिम सरहद्दीवरील तुटक व डोंगराळ प्रदेश. चंदनाचीं झाडें व बौद्ध अवशेष असलेला नल्तिगिरी; बुद्धाची भव्य मूर्ति, पवित्र तळें, देवालयांचे अवशेष व गुहा ज्यावर आहेत असा उदयगिरी; या जिल्ह्यांतील सर्वांत उंच व वर जुनी मशीद असलेला अस्सिअ; व पुष्कळ वर्षे ज्या ठिकाणीं शिवपूजा होत आहे असें महाविन्यक शिखर हे या जिल्ह्यांतील मुख्य डोंगर आहेत.

पश्चिम सरहद्दीवरील डोंगरांतून तीन मोठया नद्या निघतात. वैतरणी नदी केओंझर संस्थानांत उगम पावून कटक व बलसोर यांच्या सरहद्दीवरून दक्षिणेस वहात जाते; कटकच्या पश्चिमेस ७ मैलांवर, नराजजवळच्या दोन डोंगरांमधून महानदी जाते; या दोन नद्यांच्यामध्यें ब्राह्मणी नदी या जिल्ह्यांत शिरते. किनाऱ्यापाशीं या नद्या जवळ जवळ येऊन एकमेकींपासून ३० मैलांच्या अंतरानें वाहतात. यामुळें यांनां पूर आल्यावर त्यांचीं पात्रें फार लहान पडून पाणी देशभर पसरतें. वैतरणी व ब्राह्मणी या नद्यांचा संगम होऊन धाम्र या नांवानें दोन्ही प्रवाह बंगालच्या उपसागरास पालमिरास टोंकाजवळ मिळतात. जिल्ह्याच्या आग्नेय टोंकाकडे महानदी दोन मुखांनीं उपसागरास मिळते. या सर्व नद्यांनां दुसऱ्या लहान नद्या मिळतात त्याः— कातजुरी, पैका, विरूपा, व चितर्तल या होत. इतर नद्या विशेष महत्त्वाच्या नाहींत.

भूस्तर वर्णनः—ब्राह्मणी नदीच्या दक्षिणेस उलती परगण्यापर्यंत, जंबूर दगड असलेल्या टेंकडया सर्व देशभर पसरलेल्या आहेत. कांहीं मैलपर्यंत हा दगड दृढ बनलेला आहे; परंतु दक्षिणेकडे त्याचें विघटन झालेलें असून त्यांत पृथक्करण झालेल्या चुनखडीचे तांबडे डाग आहेत. हा दगड मऊ असल्यामुळें पुष्कळ कामाकरितां याचा उपयोग होतो. दक्षिणेकडील चढउतार असलेल्या मैदानांत कुरुंद व मधून मधून जंबूर आढळतो. कटकच्या पश्चिमेकडे व नैर्ऋत्येकडे महानदीजवळच्या टेंकडया वाळू, गोटे, रेती, आणि पांढरी व तांबडी माती यांच्या बनलेल्या आहेत.

प्राणीः—वाघ, चित्ता, अस्वल, रानरेडे, नीलगायी, ठिपक्यांचें हरीण, डुक्कर, कोल्हे, खोंकड, रानटी कुत्रें व सुसरी येथें आढळतात.

हवामानः—ओरिसामधून जाणाऱ्या चक्रवातांच्या वाटेवर हा जिल्हा असून बंगालच्या इतर भागांपेक्षां थंडी व उष्णता यांची तीव्रता येथें जास्त असते. एप्रिल व मे या महिन्यांतील सर्वांत जास्त उष्णमान १०२° व फेब्रुवारींतील सरासरी उष्णमान ६९° असतें. वार्षिक पाऊस सरासरी ६० इंच पडतो. साधारणपणें ओरिसाच्या किनाऱ्याला चक्रवातापासून धोका होत नाहीं. परंतु अलीकडे कित्येक चक्रवात झालेले आहेत. १८८५ च्या चक्रवातानें समुद्रांत मोठें वादळ होऊन समुद्रकांठचीं पुष्कळ माणसें प्राणास मुकलीं. केवळ केंद्रपार पोटविभागांतील ५००० मनुष्यें मरण पावलीं व घरें आणि पिकें यांचें नुकसान झालें. नद्यांच्या पुरामुळेंहि पिकांचें व घरांचें नुकसान होतें.

इतिहासः—ओरिसा प्रांताच्या इतिहासापेक्षां या जिल्ह्याचा इतिहास निराळा नाहीं. [ ओरिसा पहा ]

लोकसंख्याः—१८७२ पासून या जिल्ह्याची लोकसंख्या वाढत आहे. १९२१ मध्यें ती २०६४६७८ झाली. किनाऱ्यावर व डोंगराच्या दक्षिणउतारावर वस्ती पातळ आहे. या जिल्ह्यांतील पुष्कळ लोक रखवालदार व मजूर म्हणून मोठ्या शहरांत जातात. कटकचे रहिवाशी बंगाल्यांत आचाऱ्याचा धंदा करण्याकरितां व आसाम आणि सुंदरवन येथें शेतीच्या कामाकरितां गेलेले आढळतात. लो. सं. पैकीं शें. ९७ हिंदू व शें २.८ मुसुलमान आहेत. येथें उडिया भाषा चालते.

शेतकीः—समुद्रकांठच्या ज्या प्रदेशांत खारें पाणी न येण्याची व्यवस्था केलेली आहे, तो भाग फार सुपीक आहे. पश्चिमेकडील खडकाळ जमीन नापीक आहे. या दोन प्रदेशांच्या मध्यें नदींतील गाळाच्या योगानें बनलेली सुपीक व चांगली लागवड केलेली जमीन आहे. तांदूळ हें येथील मुख्य पीक असून हिंवाळा, शरदृतु व वसंत ऋतु या तीन ऋतूंत याचीं निरनिराळीं पिकें निघतात. याशिवाय कडधान्यें गळिताचीं धान्यें व ऊंस, तंबाखू, बटाटे, हींहि थोडीं बहुत होतात.

कालवेः—(१) ताळदंड कालवा महानदीच्या उजव्या तीरापासून निघून आग्नेय दिशेकडे विरावर्तापर्यंत गेल्यावर पुढें सुकपैका व महानदी यांच्या दक्षिणतीरावरून जातो. लांबी ५२ मैल. (२) माचगांवचा कालवा, कटकच्या दक्षिणेस ७ मैलांवर ताळदंड कालव्यापासून निघून कातजुरीच्या उत्तर तीरावरून गेलेला आहे. लांबी ३२ मैल. (३) केंद्रपार कालवा. लांबी ३९ मै. (४) गोब्री कालवा. केंद्रपार कालव्यापासून निघतो. लांबी १५ मै. (५) केंद्रपार कालव्यापासूनच निघणारा पतामुंडाई कालवा. लांबी ४७ मै. (६) उंच सपाटीचा कालवा. लांबी ५॥ ७ मैल (७) वैतरणीपासून निघालेला जयपूर कालवा, लांबी ६॥ मैल.

व्यापार व दळण वळणः—कटक येथील जरीचें काम फार प्रसिद्ध आहे. कापड विणण्याचा धंदाहि बराच चालतो. याशिवाय कांशाचीं भांडीं, लाखेचे व पितळी डागिने, पोत्यी, टोपल्या हे जिन्नस तयार होतात. रेड्यांच्या शिंगाचीं खेळणीं व काठ्या, हरणाचीं शिंगें, हस्तीदंती सामान यांचा पुष्कळ खप होतो. तांदूळ हा येथील मुख्य निर्गत माल असून तो कलकत्ता, सिलोन व मारिशस यथें जातो. गळिताचीं धान्यें, कातडीं, ताग, इमारती लांकूड, शिंगें, लाख, कुचला, मेण, राळ व जरीचें काम कलकत्त्यास रवाना होतें. हाडें कलकत्ता व गंजम येथें जातात. कापड, केरोसीन तेल, कांच सामान, सूत, सुपारी, मसाले, धातूचें सामान वगैरे जिन्नस कलकत्याहून येतात. मीठ कलकत्ता व मद्रास इलाखा येथून येतें. कटक, फॉल्स पॉइंट बंदर व चांदवाली हीं व्यापाराचीं मुख्य ठाणीं आहेत.

आगगाड्याः—बंगाल नागपूर रेल्वेचा कटक-मिदनापूर हा फांटा दक्षिणोत्तर गेलेला आहे.

रस्तेः—कलकत्त्यापासून गंजमपर्यंत जाणारा मुख्य रस्ता; व कटकपासून पुरी व संबलपूरकडे जाणाऱ्या रस्त्यांची व्यवस्था स्थानिक (लोकल) फंडांतून होते. याच्या शिवाय कटकपासून, तळदाणा, माचगांव व चांदवालीकडे जाणारा आणि फुल्नाखाहून माधवपर्यंत जाणारा असे दोन रस्ते जिल्हाबोर्डाच्या ताब्यांत आहेत.

उन्हाळ्यांत नद्या बहुतेक आटतात व पावसाळ्यांत पाणी फार येतें. यामुळें नद्यांतून होड्या चालत नाहींत. कालव्यांतून मात्र थोड्या बहुत चालतात.

दुष्काळः-असंरक्षित प्रदेशांत पाऊस कमी झाला, किंवा त्याची वांटणी विषम झाली, किंवा नद्यांना मोठे पूर आले असतां पिकांनां धोका असतो. पाऊस कमी होऊन अवेळीं बंद झाल्यामुळें १८६५-६७ ह्या वर्षी येथें मोठा दुष्काळ पडला होता.

राज्यव्यवस्थाः— कटक जिल्ह्याचे तीन पोटविभाग असून कटक शहर, केंद्रपार व जाजपूर हीं त्यांचीं मुख्य ठिकाणें आहेत. जिल्ह्याचा कलेक्टर कटक येथें रहातो. इतर विभागांवर डेप्युटी मॅजिस्ट्रेट-कलेक्टर आहेत. बाकी येथील तहशील कचेरीवर सब-डेपुटी कलेक्टर आहे. कटक शहर, केंद्रपार व जाजपूर येथील म्युनिसिपालिटयांखेरीज इतर ठिकाणचीं स्थानिक कामें जिल्हाबोर्डाकडे आहेत.

शिक्षणः—१९११ त लोकसंख्येपैकीं शें. ६.५ (पुरुषांपैकीं शें. १३ व स्त्रियांपैकीं शें. ०.५) लोकांनां लिहितां वाचतां येत होतें.

**कटक पोट विभाग.**—बिहार प्रांतांत असलेल्या कटक जिल्ह्याचा एक प्रमुख पोटविभाग. क्षेत्रफळ १५६२ चौरस मैल लोकसंख्या इ. स. १९११ सालीं १०६८७७२. होती. ह्या पोटविभागाचा पश्चिमभाग छोटा नागपूरच्या डोंगरसपाटीच्या किनाऱ्यापर्यंत जात असून पूर्वेस बंगालचा उपसागर आहे. मध्यभाग सुपीक असून लोकवस्ती बरीच दाट आहे. कटक शहर व शिवाय २६७० खेडीं ह्या विभागांत आहेत.

**शहर.**—बिहारमध्यें असलेल्या कटक जिल्ह्याचें व ओरिसा विभागाचें प्रमुख ठिकाण. इ. स. ९५३ तहें शहर वसविण्यांत आलें. पण तें १०व्या शतकांत प्रमुखत्वानें पुढें आलें. त्या वेळचा हिंदु राजा मकर केसरी ह्यानें येथें किल्ला बांधिला. बारबाती किल्ला नांवाचा एक पुरातन हिंदू अमदानींतला किल्ला अजून प्रसिद्ध आहे. मराठयांच्या व त्याचप्रमाणें मोगलांच्या कारकीर्दीच्या वेळीं कटक हें प्रमुख ठाणें होतें. व ब्रिटिशांच्या ताब्यांत हा प्रदेश आल्यानंतर (१८०३) बरेच वर्षांनीं या प्रदेशास कटक हें नांव देण्यांत आलें. कलकत्ता व मद्रास या शहरांनां जोडणारी आगगाडी कटकवरुन जाते. फॉल्स पाईंट हें बंदर कटकशीं कालव्यानें जोडलें गेलें आहे. या बंदरामुळें कटकला जरा महत्त्व आहे. लोकसंख्या (१९११) ५२५२८. चाळीस हजारांहून अधिक लोक हिंदू असून ब्रम्हो

व जैन लोकांची वस्ती फारच थोडी आहे. कटक येथें सोन्याची किंवा चांदीची वारीक तार काढून जरीकाम फार चांगलें होतें अशी ख्याती आहे. जवळच महानदी आहे. ओरिसा विभागाचें हें मुख्य ठाणें असल्यानें येथें विभागांतील सर्व मुख्य अधिकारी असतात. बॅप्टिस्ट मिशन कॉलेज व रॅव्हेन्शा कॉलेज येथें आहे. वैद्यक शिक्षणाचीहि एक शाळा आहे. गणेशघाट रस्त्यावर कटक बँक आहे.

**कँटन**—( खरें नांव क्वांगचौफु ) हें शहर चीन देशांतील क्वांगटुंग प्रांतांत पर्लनदीच्या पूर्व तीरावर असून मोठ्या लोकसंख्येचें व्यापारी शहर आहे. कँटनशहरच्या कांहीं भागाभोंवती कोट आहे. त्याचा परिघ ६ मैल आहे. पूर्वेकडून पश्चिम टोंकाकडे जाणारी एक भिंत कँटन शहरांतून जात असून ती शहराचे दोन भाग करते. उत्तरेकडील भाग मोठा असून जुना आहे. दक्षिणेकडील भाग लहान असून नवा आहे.

शहरांत एकंदर ६०० रस्ते असून ते लांब, सरळ व अरुंद आहेत. लोकांच्या चालीरीती व सरकारचें दुर्लक्ष इत्यादि गोष्टींचा विचार केला तरी कँटन शहराची व्यवस्था चांगली असून, एकंदरींत हें शहर स्वच्छ आहे असें म्हणावें लागतें. घरें लहान असतात. क्वचितच् दुमजली घरें दृष्टीस पडतात. जगांतील कोणत्याहि भागांत तयार झालेल्या गोष्टी येथें मिळतात. येथील व्यापारी हुषार, मेहनती व आदरशील आहेत.

कँटन येथें बऱ्याच इमारती व देवळें आहेत. परंतु विशेष वाखाणण्यासारखें असें कांहींच नाहीं. येथें दोन भव्य मंदिरें आहेत. त्यांपैकीं एकाचें नांव क्वांगटा असें आहे. येथें एक मशीद आहे व ती दहाव्या शतकांत कँटनला येणाऱ्या अरबी दर्यावर्दी लोकांनीं बांधलेली आहे. दुसरें मंदीर तेराव्या शतकांत बांधिलें असावें असा तर्क आहे. कँटन शहरांतील सर्वांत मोठें असें एक बुद्ध मंदीर होनान येथें आहे. त्याला चिनी भाषेंत हैच्वांग्झे असें म्हणतात. याच्या खेरीज दुसरीं महत्वाचीं देवळें म्हणजे पांचशें देवांचें देऊळ व 'दीर्घायुष्यदायक' देऊळ हीं होत. या देवळांसमोरील भागांत बहुतेक भिकारी, निरुद्योगी व आळशी लोकांचा भरणा असतो. मूर्ति मुख्य भागांत असते व तिच्यापुढें नेहमीं दीप ठेविलेला असतो.

सरकारी अधिकाऱ्यांचे बंगले जुन्या भागांत आहेत. गव्हर्नरजनरलचें राहण्याचें ठिकाण नव्या भागांत होतें. परंतु १८५६ सालीं तोफांच्या माऱ्यांत त्याचा नाश झाला. कमांडर इन चीफचा बंगला जुन्या शहरांत आहे. सर्व कँटनशहरांत तो प्रेक्षणीय आहे असें म्हणतात.

कँटन व कलकत्ता एकाच अक्षांशाजवळ आहेत, तरी पण कँटन बरेंच थंड आहे. मेपासून आक्टोबरपर्यंत कायतो उन्हाळा असतो. बाकी सर्व वर्षभर हवा थंड असते. येथें सांथीचे रोग क्वचितच् होतात.

केप ऑफ गुडहोपच्या मार्गानें चीन व यूरोप यांमध्यें दळणवळण प्रथमतः १५१७ त सुरू झालें. त्या वेळेस पोर्तुगालच्या एमॅन्युएल राजानें आपला परराष्ट्रीय वकील आठ जहाजांसह चीन देशास पाठविला. त्यास चीनच्या बादशहानें कँटन येथें व्यापार करण्याची परवानगी दिली. एलिझाबेथ राणीच्या वेळेस इंग्लिशांनीं कँटन येथें वखार स्थापन करून व्यापार करण्याचा घाट घातला. परंतु त्यांचा प्रयत्न फसला. इ. स. १६३४ त इंग्रजांचीं कांहीं जहाजें कँटनला आलीं. परंतु पोर्तुगीज लोकांच्या विश्वासघातकी कृत्यामुळें वेबनाव होऊन युद्ध होण्याच्या बेतांत होतें. पण मोठ्या मुष्किलीनें तह झाला. १६८५ नंतर बादशहानें यूरोपियन राष्ट्रांनां कँटनशीं व्यापार करण्याची परवानगी दिली. पुढें ईस्ट इंडिया कंपनी एकत्रित झाल्यानंतर बादशहानें एक फर्मान काढिलें. त्याप्रमाणें परराष्ट्रीय व्यापार फक्त कँटन बंदराशींच होऊं लागला.

चहाचा प्रचार प्रथमतः इंग्लंड देशांत १६६७ सालीं सुरू झाला. १६८९ त दर पौंडाला ५ शिलिंग याप्रमाणें जकात बसविली. या वेळेपासून १८३५ पर्यंत ईस्ट इंडिया कंपनीचा कँटनशीं व्यापाराचाच मक्ता होता. कंपनीचा मक्ता संपल्यावर देखील स्थानिक अधिकाऱ्यांचे जुलूम चालू होते. त्यामुळें १८३९ सालीं ग्रेटब्रिटननें युद्ध पुकारलें. खंडणीच्या कबुलीवर तह झाला. परंतु दक्षिण चीन देशांत युद्ध चालू राहिलें व त्याचा शेवट १८४२ सालीं नानकिंगच्या तहानें झाला. या तहानें शांघाय, निंगपो, फ्युचौ आणि अमॉय या बंदरांशीं व्यापार करण्याची परवानगी इतर देशच्या लोकांनां मिळाली. शिवाय कँटन शहरांत जाण्याची मोकळीक देखील या तहानें दिली. ही शेवटची अट चिनी लोकांनीं पाळली नाहीं. अर्थात या कारणानें व दुसऱ्या पुष्कळ कारणांनीं १८५६ सालीं पुन्हां युद्ध पुकारण्यांत आलें. लगेच कांहीं चिनी लोकांच्या टोळीनें परराष्ट्रीय वखारी लुटल्या व जाळपोळ करून पुष्कळ नुकसान केलें.

या सर्व तंट्यांत यूरोपियनांकडे मुळींच दोष नव्हता असें मात्र नाहीं. उलट त्यांनींच मतलबासाठीं अरेरावी चालविली होती. ग्रेटब्रिटनच्या प्रतिनिधींचीं जुलुमी कृत्यें या लढाईला कारणीभूत झालीं असें व्हि. स्मिथ देखील म्हणतो ( दि ऑक्स. इंडिया. १९२०. पान ७११ ).

एक वर्षानंतर सर चार्लस् स्ट्रॉबेन्झी यानें हल्ला करून कँटन शहर घेतलें. १८६१ पर्यंत ह्या शहरांत फ्रेंच व इंग्लिश फौजा असून राज्यकारभार दोन इंग्रज व एक फ्रेंच मिळून एका मंडळाच्या देखरेखीखालीं होत असे. सैन्य गेल्यानंतर सर्व देशच्या लोकांनां व्यापार करण्यास कँटन खुलें करण्यांत आलें.

तह झाल्यानंतर परराष्ट्रीय व्यापाऱ्यांनां राहण्यासाठीं म्हणून एक वसाहत स्थापन केली. तिचा $\frac{4}{5}$ खर्च ब्रिटिश सरकारानें व बाकीचा फ्रेंच सरकारानें सोसला. या वसाहतीचें

नांव शामाएन असें आहे. या ठिकाणीं घाऊक व्यापारी, मुख्य व्यापारी व दलाल राहतात.

येथील लोकसंख्या ( १९१७ ) सुमारें ९००००० आहे. परकीय लोक सुमारें ४०० आहेत. कँटन हें क्वांग्टूंग व क्वांग्सी येथील प्रांताचें मुख्य ठिकाण आहे. येथील मुख्य अधिकारी गव्हर्नर जनरल अथवा व्हॉइसराय असतो व ह्याचा दर्जा नानकिंगच्या खालोखाल साम्राज्यांत महत्त्वाचा आहे. १८८९ सालीं बांधलेली एक टांकसाळ येथें आहे. तींत तांब्याचें व इतर हलकें नाणें पाडतात.

**कटनी**—मध्यप्रांतांतील जबलपूर जिल्ह्यांतील मुरवारा तालुक्यांतील रेल्वेचें जंकशन. येथून बिलासपूरपर्यंत बंगाल–नागपूर रेल्वेचा १६८ मैलांचा फांटा आहे, व जी. आय्. पी रेल्वेचा इटारसी–आग्रा लाईनला बीना येथें जोडणारा २६३ मैलांचा दुसरा फांटा आहे. या दोन्ही फाट्यांचा कराचीहून कलकत्त्यास जाणाऱ्या प्रवाशांस चांगला उपयोग होतो. चुन्याचे व लाल वाळूचे दगड कटनीच्या आसपास फार आढळतात. येथें एक सीमेंटचा मोठा कारखाना आहे. तसेंच दारू गाळण्याचा एक व इतर भांड्यांचे कारखाने आहेत.

**कँटरबरी**—हा इंग्लंडमध्यें केन्ट परगण्यांतील पार्लमेंटरी व म्युनिसिपल बरो लंडनच्या पूर्व–आग्नेय दिशेकडे साउथ ईस्टर्न अँड चॅथॅम रेल्वेनें ६२ मैलांवर असून येथें चर्च ऑफ इंग्लंडचे आर्चबिशप राहतात. येथील लोकसंख्या (१९२१) २३७३८ आहे. हें शहर स्टौर नदीवर आहे. ५९७ मध्यें केंटचा ४ था सॅक्सन राजा एथलबर्ट याजकडे रोमहून आगस्टाइन हा मिशनऱ्यासह आला. व येथें तो राहूं लागल्यापासून हें शहर आर्चबिशपचें कायमचें स्थान झालें. आगस्टाइन यानें येथें बेनिडिक्टाइन मठ बांधला. येथील कॅथेड्रलच्या वेदीच्या मागें ट्रिनिटी प्रार्थनामंदिर आहे. यामध्यें सेंट थॉमस ऑफ कँटरबरीचें थडगें आहे. याच प्रार्थनामंदिरांत आर्चबिशप बेकेट याचा खून झाला. यात्रेकरूंच येथें एक आश्रयस्थान आहे. येथें नेहमीं यात्रेकरू उतरतात. ११७४ नंतर ट्रिनिटी प्रार्थनामंदिरांत बेकेटचें उत्तम थडगें बांधलेलें आहे. येथें यात्रेकरूंच्या झुंडीच्या झुंडी येत असत. चॉसर कवीनें या यात्रेचें उत्तम चित्र रेखाटलें आहे. १५३८ मध्यें ८ व्या हेनरीच्या कमिशनरांनीं हें पवित्र स्थान उध्वस्त केलें होतें. येथून जवळच एडवर्ड ब्लॅक प्रिन्स याचें सुंदर थडगें आहे. याशिवाय येथें ४ थ्या हेनरीचें थडगें व सेंट आगस्टाइनचें पीठ आहे. येथील आर्चबिशप साऱ्या इंग्लंड देशाचा मुख्य उपाध्याय असतो. आजपर्यंत येथें एकंदर ९६ आर्चबिशप झाले. कँटरबरमिध्यें धर्मसंबंधीं संस्था बऱ्याच आहेत. यांत कॅथेड्रलशिवाय सेंट आगस्टानईचा बेनीडिक्टाइन मठ ही फार प्रसिद्ध इमारत आहे. डेनजानचा हमरस्ता ज्या उंचवट्याजवळून जातो तेथून कॅथेड्रलचा अति मनोरम देखावा दृष्टीस पडतो. हाय स्ट्रीटवरील गिल्डहॉल, मौल्यवान अवशेषांचें पदार्थसंग्रहालय, कलाभुवन या या शहरांतील मुख्य इमारती आहेत. येथून पार्लमेंटसभेंत १ प्रतिनिधी पाठवितात. येथील व्यवस्था १ मेअर, ६ आल्डरमेन व १८ काउन्सिलर्स मिळून पहातात.

इ ति हा स.—पूर्वी या रोमन–ब्रिटिश शहरास डुरोव्हेर्नेम असें नांव होतें. सॅक्सन लोक या शहरास कँटवरवले म्हणत होते. हें शहर एथलबर्टची राजधानी होती. १३ व्या आणि १४ व्या शतकांत या शहराच्या व्यवस्थेकरितां दोन बेलिफ व १ मोठी व १ लहान अशा दोन मदतनीस सभा होत्या. पुढें या शहरास दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या हेनरीकडून सनदा मिळाल्या. १२८३ मध्यें पार्लमेंटमध्यें या शहराचे दोन प्रतिनिधि पाठविण्यांत येऊं लागले. पुढें १८८५ पासून एक प्रतिनिधि जाऊं लागला. आगस्टच्या ४, ५ व ६ तारखांस जत्रा भरविण्याचा हक्क ६ व्या हेनरीकडून मिळाला. येथें पुरातन कालापासून धान्य व गुरांचा बाजार भरत असतो.

**कटास**— पंजाबमध्यें झेलम जिल्ह्यांत मिठाच्या डोंगराच्या मध्यभागीं असलेलें पवित्र सरोवर. उ० अक्षांश ३२° ४३' व पू. रेखांश ७२° ५९'. हें पिंद दादनखानच्या उत्तरेस असून समुद्रसपाटीपासून २००० फूट उंचीवर आहे. या सरोवरापासून एक प्रवाह निघून शेजारच्या चोअ सैदान शहा गांवावरून गंधालखोऱ्यांत जातो. दरवर्षी हजारों लोक या पवित्र सरोवरांत स्नान करण्याकरितां येतात. सती पार्वतीच्या मरणामुळें शंकराला दुःख होऊन त्याच्या डोळ्यांतून जे अश्रू पडले त्यांपासून कटास अथवा कटाक्ष आणि अजमीरजवळचें पुष्कर हीं सरोवरें तयार झालीं अशी आख्यायिका आहे.

गंधाल खोऱ्यांतून वहाणाऱ्या कटासनदीच्या कांठीं मूर्ति नांवाच्या डोंगरावर एका स्तूपाचे अवशेष आहेत. त्याच्या जवळच एक जैन देवालय होतें ( त्याचें कांहीं अवशेष लाहोरच्या अजवखान्यांत आहेत ). ज्या ठिकाणीं महावीराला ज्ञान झालें तें ठिकाण हेंच होय असें म्हणतात. त्याचप्रमाणें काश्मीरच्या सार्वभौमत्वाखालीं असलेल्या राजाची राजधानी असें ह्युएनत्संगनें ज्याचें वर्णन केलेलें आहे तें सिंघपूरहि येथेंच होतें असें म्हणतात.

पांडव वनवासांत असतां ज्या सातघरांत राहात होते तें कटास येथें आहे असें म्हणतात. कनिंगहॅमला येथील जुन्या किल्ल्याच्या ईशान्य कोपऱ्याला जवळ जवळ असलेलीं बारा देवळें सांपडलीं. इ. स. ६२५–९३९ या काळांतल्या काश्मिरी शिल्पाचे ते नमुने म्हणतां येतील. [ आर्च. सर्व्हे रिपोर्ट्स २ ( १८७१). कनिंगहॅम–एन्शंट जिऑग्रफी ऑफ इंडिया. इं. गॅ. ].

**कटोसन**—मुंबई इलाख्यांतील माहीकांठा संस्थानांतील एक पोटसंस्थान. यांत २९ गांवें आहेत. येथील ठाकोर

मकवाना कोळी आहेत. यांचा मूळपुरुष शामताजी अनहिलवाड वंशांतील होता. पण त्याच्या कानोजी नांवाच्या एका वंशजानें एका भिल्ल राजाची मुलगी बायको केली म्हणून कानोजी जातीबाहेर गेला. त्यानें सुलतान महंमद बेगडा ( ४५९ १५१३ ) याची उत्तम नोकरी बजावल्यावरून त्याला कटोसन संस्थानची जहागीर मिळाली. सध्याचे संस्थानिक गायकवाडाला घासदाण्यादाखल कांहीं रकम देतात. कटोसन गांव ही संस्थानची राजधानी आहे.

**कट्टगेरी**—हें कलादगीच्या आग्नेयीस १२ मैल व बदामीच्या उत्तरेस १२ मैलांवर एक जुनें तटबंदीचें शहर आहे. गांवांत एक हनुमंताचें देऊळ आहे. त्याजवळ दोन कानडी लिपींत शिलालेख आहेत. यांतील १०९८ सालचा दक्षिण चालुक्य ६ व्हावा विक्रमादित्य (१०७५-११२६) याचा आहे. दुसऱ्या शिलालेखाची तारीख जवळ जवळ हीच आहे. कट्टगेरी हें मद्रास सदर्नमराठा रेल्वेच्या गदग- होटगी फांट्यावर स्टेशन आहे.

**कट्रा**—(मिरानपूर कट्रा) संयुक्त प्रांतांतील सहाराणपूर जिल्ह्यांतील तिल्हर तहशीलींतील एक गांव. हें औंध रोहिलखंड रेल्वेनें जोडलेलें आहे. लोकसंख्या (१९११) ६२०९. त्या गांवांत बहुतेक घरें मातीचीं आहेत. येथें एक दवाखाना, पोलिसचें ठाणें व अमेरिकन मेथॉडिस्ट मिशनची एक शाखा आहे. कट्रा व बरेली जिल्ह्यांतील फत्तेगंज ( पूर्व ) यांचे दरम्यान एका बाजूस इंग्रज व अयोध्येचे नवाब व दुसरे बाजूस रोहिले अशी लढाई होऊन रहमतखानाच्या हाताखालच्या रोहिल्यांचा पराभव झाला ( १७ एप्रिल १७७४ ). या लढाईनें रोहिलखंड अयोध्याप्रांतास जोडण्यांत आलें. येथून बराचसा कच्चा माल बाहेर जातो. येथें एक शाळा आहे.

**कठा**, जि ल्हा.—उत्तर ब्रह्मदेशांत, मंडाले विभागांतील जिल्हा. ह्याचा बहुतेक भाग इरावतीच्या कांठीं असून याचें एकंदरक्षेत्र फळ ६९९४ चौरस मैल आहे.

मर्यादाः—उत्तरेस वरचा चिंदविन व म्यित्किना जिल्हे; पूर्वेस कौडे नदी मोंगमित संस्थान, श्वेलीनदी व इरावतीनदी; याची दक्षिण सरहद्द रुबीमाइन्स व श्वेबो जिल्ह्यापर्यंत; व पाश्चिम सरहद्द वरच्या चिंदविनपर्यंत गेलेली आहे.

स्वाभाविक वर्णन; प्राणी, हवामान, इत्यादिः—इरावतीच्या पूर्वेकडील लहानसा प्रदेश सोडला असतां जिल्ह्याचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. गंगॉ, मिनवून व मंगिन या डोंगराच्या मुख्य रांगा असून त्या स्थूलमानानें दक्षिणोत्तर जातात. डोंगर फारसे उंच नाहींत. मंगिन रांगेतील मैंगठोन हें शिखर सर्वांत उंच असून त्याची उंची समुद्रसपाटीवर ५४५० फूट आहे. इरावती, कौके, श्वेली, मेझा, मू व नम्यिन या जिल्ह्यांतील मुख्य नद्या होत. जिल्ह्याच्या मध्यभागीं, नबा स्टेशनच्या पश्चिमेस ५ मैलांवर इंडॉ नांवाचें सरोवर आहे. मंगिन डोंगरांत कांहीं ठिकाणीं सुवर्णयुक्त गारगोटी आढळते; व गंगॉ डोंगरांत दक्षिणेकडे अभ्रक व उत्तरेकडे ग्रानाइट हे पदार्थ थोड्या प्रमाणांत आहेत. वाघ, चित्ता, हत्ती, गवा, हसैंग व अस्वल हे कठा जिल्ह्यांतील जंगली प्राणी होत. येथें रानडुकरेंहि पुष्कळ आहेत. येथील हवा वाईट असून मलेरिया व इतर तापांच्या सांथी नेहमीं सुरू असतात. उन्हाळ्यांतील सर्वांत जास्त उष्णमान १०५° व हिंवाळ्यांतील सर्वांत कमी उष्णमान ४५° असतें. हिंवाळ्यांत दंव पुष्कळ पडतें. कठा येथें वार्षिक पाऊस सरासरी ५८ इंच व इतर ठिकाणीं ४२ ते ६७ इंचपर्यंत पडतो.

इतिहासः—जिल्ह्याच्या प्राचीन इतिहासासंबंधीं सविस्तर माहिती फारशी उपलब्ध नाहीं. अकराव्या शतकांत पगन येथील अनवरत राजानें बुद्धाचे अवशेष शोधण्याकरितां चिनांत प्रवास केला त्यावेळीं, त्याचें राज्य व चीनचा प्रदेश यांच्या दरम्यानची सरहद्द निश्चित होऊन, हल्लींच्या कठा जिल्ह्यांत रहाणाऱ्या त्यावेळच्या टोळ्यांनीं ब्रह्मी सत्ता मान्य केली असें म्हणतात. कठा जिल्ह्याच्या बऱ्याच भागांत एके काळीं काचीन लोक रहात होते; व ब्रह्मी आणि शान लोकांनीं त्यांनां उत्तरेकडे हांकून दिलें असा समज आहे. परंतु त्याच्या खरेपणाविषयीं बराच संशय आहे. चिनी सैन्यानेंहि या जिल्ह्यावर स्वारी केली होती; तिग्यँग येथें त्यानें आपलें ठाणें दिलें होतें; परंतु त्याला . लवकरच हांकून लावण्यांत आलें. इ. स. १८८३ त, जिल्ह्याच्या उत्तर भागावर, उत्तरेकडील काचिन लोकांनीं स्वारी करून पुष्कळ गांवें जाळलीं व बराच प्रदेश उध्वस्त केला.

इ. स. १७८६ त कठा जिल्हा ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. वुंठा संस्थानचा साबवा मौंग औंगम्यात याच्या चिथावणीवरून वुंठोच्या लोकांनीं १८९१ त बंड केलें होतें. परंतु तें मोडलें जाऊन ब्रिटिशांनीं वुंठो संस्थान कठा जिल्ह्यास जोडलें.

म्यझेदी, श्वेगुजि, ऐंगतळ, म्यथेंदन, व श्वेबोंथ हीं जिल्ह्यांतील प्रसिद्ध पवित्र देवालयें आहेत.

लोकसंख्याः—१९२१ मध्यें जिल्ह्याची लोकसंख्या २५३७२५ होती. श्वेबो व मंडाले जिल्ह्यांतील लोक आल्यामुळें येथील लोकसंख्या वाढली आहे. शें. ९५ पेक्षां अधिक लोक बौद्ध आहेत. बहुतेक लोक ब्रह्मी भाषा बोलतात. शिवाय पश्चिमेकडे कदु व उत्तरेकडे शान आणि काचिन या भाषा प्रचारांत आहेत. शें. ७७ लोकांची उपजीविका शेतकीवर होते.

शेतकीः—जिल्ह्याचा बहुतेक भाग डोंगराळ असल्यामुळें, डोंगरावरून वहात आलेला गाळ सांचून जेथें साधारण सपाट जमीन बनलेली आहे त्या ठिकाणीं भाताची लागवड होते. तीळ, चहा व तंबाखू हे जिन्नसहि थोड्या प्रमाणांत होतात. या जिल्ह्यांत सामान्यतः गाई बैलांपेक्षां, म्हशी रेडे जास्त उपयोगांत आणले जातात.

जंगलः—जिल्ह्यांतील जंगलाचें एकंदर क्षेत्रफळ ४००९ चौ. मै. आहे. जंगलांत मुख्यत सागाचीं झाडें आहेत कळक व वेतहि पुष्कळ मिळतो.

खनिज पदार्थः—या जिल्ह्यांत सोनें, तांबें, लोखंड व शिसें हे धातु सांपडतात. कांहीं वर्षेंपर्यंत चौकपन्नट येथें एका इंग्लिश कंपनीनें खाणींतून सोनें काढण्याचें काम चालू ठेवलें होतें, परंतु सध्यां ती खाण बंद आहे; तथापि वुंठो पोटविभागांत पुष्कळ ठिकाणीं व बनमौकमध्यें कांहीं ठिकाणीं प्रवाहांच्या पात्रांतून सोनें धुवून काढण्याचें काम अद्यापहि चालतें. ह्या प्रदेशाला पूर्वी "क्षेत्रप्रदेश" म्हणजे सुवर्णभूमि म्हणत. थंथोडा, गणन्म, गणनन्वॉ व तमन येथें थोडें बहुत लोखंड सांपडतें. परंतु लोखंडाचा स्थानिक व्यापार मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. मॉक, मॉहेंग, व मॉकिन येथें शिसें आहे. परंतु हल्लीं तें खाणींतून काढीत नाहींत. सिंदौंग येथें तांबें सांपडतें, परंतु शिशाप्रमाणें त्याच्याहि खाणी बंद आहेत. मॉलू येथें मर्गझ ( जेड ) व कठा टाऊनशिपमध्यें हलक्या प्रतीचें शंखजिरें थोड्याबहुत प्रमाणांत आढळतें. ह्या जिल्ह्यांत खाऱ्या पाण्याच्या विहिरीपासून थोडें मीठहि तयार होतें.

व्यापार व दळणवळणः—येथें कलाकौशल्य अथवा कारखाने मुळींच नाहींत. बहुतेक लोकांची उपजीविका शेतकीवरच होते. कांहीं थोडे लोक इमारतीचें लांकूड तोडण्याकडे गुंतलेले असतात. इमारती लांकूड, कळक ( वांबू ) वेत व जंगलांतील दुसरे किरकोळ जिन्नस व तांदूळ हे मुख्य निर्गत जिन्नस होत. लोखंडी सामान, सूत व सुतीकापड, रेशीम, जपानी छत्र्या कुंभार सामान, व मुलाम्याचीं भांडीं, तीळ, राकेल व मीठ हे मुख्य आयात जिन्नस आहेत.

सडकाः—मितकिना रेल्वे या जिल्ह्यांतून ईशान्य दिशेनें ११५ मैलपर्यंत गेलेली असून कॉलीन, वुंठो, इंडो, मॉलू, मोहनिन व इतर ठिकाणीं तिचीं स्टेशनें आहेत. नवापासून आग्नेय दिशेनें कठापर्यंत एक शाखा गेली असून तिनें मुख्य फांट्या इरावतीशीं जोडला गेला आहे. जिल्ह्याच्या पूर्व भागांत इरावती नदी हेंच दळणवळणाचें मुख्य साधन आहे. जिल्ह्यांतील पब्लिकवर्क्स खात्याच्या देखरेखीखालीं असलेल्या रस्त्यांची लांबी १८५ मैल असून बहुतेक रस्ते कच्चे आहेत.

राज्यव्यवस्थाः—येथील राज्यकारभाराच्या सोयीकरितां जिल्ह्याचे तीन पोटविभाग केलेले आहेत तेः—(१)कठा; यांत कठा, तिगंग, मॉलू, व इंडो हे तालुके अथवा टाउनशिप्स आहेत. ( २ ) वुंठो; यांत वुंठो, कॉलिन, व पिनलव्यू हे तालुके; व ( ३ ) बनमौक. तालुकाधिकाऱ्याच्या हाताखालीं ५३० गांवपाटील आहेत. जिल्ह्याचा मुख्य डेप्युटिकमिशनर असून त्याच्या हाताखालीं नेहमींचे कामगार असतात. १९०३–०४ सालीं जिल्ह्यांतील जमीनमहसूल १.६९ लक्ष रु. व एकंदर उत्पन्न ६.४८ लक्ष रु. होतें.

ता लु का.—वरच्या ब्रम्हदेशांतील कठा जिल्ह्यांतील तालुका. उ. अ. २३°५३' ते २४°५६' व पू. रे. ९६°१०' ते ९६° ४२'. क्षेत्रफळ ११५२ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २५४२८. या तालुक्यांत ८२ खेडीं व कठा हें एकच शहर असून तें मुख्य ठिकाण आहे. बराचसा भाग जंगली असून त्यामध्यें शिकारीचीं श्वापदें पुष्कळ आहेत. १९०३–०४ च्या पुरवणीदाखल केलेल्या मोजणीवरून या तालुक्यांत ११ चौरस मैल जमीनींत लागवड केली होती असें समजतें.

श ह र.—कठा जिल्ह्याचें ( वरचा ब्रम्हदेश ) मुख्य ठिकाण. उ. अ. २४° १०' व पू. रे. ९६°–२१'. लोकसंख्या ( १९०१ ) २९३१. येथें बाजार भरतो व कांहीं सार्वजनिक इमारती आहेत. येथील दवाखान्यांत २३ रोग्यांची सोय आहे.

**कठुमर**—(कटुंबर) राजपुताना. अलवार संस्थानांतील एक तहशील व शहर. हें ८०० वर्षांपूर्वी वसलेलें आहे. येथें एक किल्ला, पोष्ट ऑफिस व एक प्राथमिक शिक्षणाची शाळा आहे. या तहशिलींत ७८ खेडीं आहेत. लो. सं. (१९११) ४०७८७. शेंकडा ९० वस्ती हिंदूंची आहे. मोंगलांच्या अमलांत ही तहशील आग्रा प्रांतास जोडली होती पण जयपूरपासून जवळ असल्यामुळें जयपूर संस्थानचाच हा भाग असें समजलें जात असे. १७७८ पासून १७८४ पर्यंत येथें मोंगलाचा प्रत्यक्ष ताबा असे. पुढें १७८४ मध्यें मराठ्यांनीं जिंकून येथें आपला अंमल सुरू केला. मराठ्यांच्या जुलमाला त्रासून येथील लोकांनीं १८०२ मध्यें महाराव राजा भक्तवारसिंघ याची मदत मागितली. भक्तवारसिंघानें बरेंचसें सैन्य पाठवून मराठ्यांनां हांकून लाविलें व किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. पुढील वर्षी म्हणजे १८०३ सालीं लॉर्ड लेककडून पराभव पावून पळत असतां मराठ्यांच्या सैन्यानें कठुमरच्या किल्ल्यावर तोफा डागल्या व अलवारच्या फौजेस पळवून लाविलें. याच सैन्याचा पुढें तीनच दिवसांनीं लासवारी येथें पराभव झाला.

लढाईपूर्वीच कठुमर तहशील भरतपूरच्या महाराजास देण्यांत आली होती, परंतु त्यानें आपले इंग्रजांशीं झालेले करार मोडल्यामुळें १८०५ सालीं या तहशिलीचा ताबा अलवारकडे गेला.

**कठोडिया**—मध्यहिंदुस्थानांत भोपावर एजन्सीमधील एक "भूमियात".

**कडधान्यें**.—ह्या वर्गांत द्विदल धान्यें येतात व त्यांत मुख्य पोषक द्रव्य ( प्रोटीड ) असतें. हा पदार्थ फार पौष्टिक व शक्तिवर्धक असतो. पाश्चात्य देशांत मांस खाल्ल्यानें जें काम होतें तेंच काम बहुतेक कडधान्य खाल्ल्यानें मनुष्य प्राण्याच्या शरीरांत घडून येतें. याच तत्वावर तृणधान्यें व कडधान्यें या दोहोंची खाण्याच्या धान्यांत आर्यांच्या पूर्वजांनीं मोठी सांगड घालून ठेवली आहे. या धान्याचें सोट मूळ असून तें जमीनींत खोलपर्यंत जातें. या वर्गांत कांहीं

पिकांचीं खोडें अर्धवट वेलीसारखीं ( उदा. वाल, चवळी, मूग, कुळीथ इ.) असतात व काहींचीं ( उदा. ताग, तूर, गवारी ) खोडें ताठ उभीं राहतात. या झाडांच्या पानांस तीन किंवा तिहीपेक्षां जास्त लहान पानें असतात. या सर्वांचें बीं शेंगांत येतें. या पिकांच्या मुळ्या जमीनींत खोल जातात ह्मणून जमिनीची मशागत, नांगरट, वगैरे खोल करावी लागते.

कडधान्याचीं झाडें हवेंतील नायट्रोजेन शोषून घेतात. हवेंतून नायट्रोजेन घेणारे अति सूक्ष्म जंतू यांच्या मुळ्यावर ज्या लहान गोळ्या असतात त्यांत राहतात. या झाडांचीं मुळें जमीनींत राहिलीं ह्मणजे त्यांतील नायट्रोजेन जमिनींत सांठून राहतो. हरभरा, लाख, मसूर, वाटाणा, हीं मुख्य रब्बींतील कडधान्यें होत. बाकीचीं खरीपांत करितात. कांहीं दोन्हीं हंगामांतहि होतात. खरिपांतील कडधान्यें हीं ज्वारी, बाजरी, कोद्रा, नाचणी वगैरे पिकांबरोबर मिसळून पेरतात. मूग, उडीद, कुळथी, ह्यांचा कडधान्यांतच समावेश होतो. ह्या धान्यांसंबंधानें विस्तृत माहिती पाहिजे असल्यास ती त्या त्या शब्दाखालीं पहावी.

**कडान, संस्थान**—मुंबई इलाखा. रेवाकांठांतील छोटें संस्थान. १८७२ त यांत १०० गावें होतीं. संस्थानचा इतिहास फारसा सांपडत नाहीं. भाटांच्या ह्मणण्यावरून असें दिसतें कीं पंचमहालांतील झालोड शहराचा संस्थापक जो जालमसिंग त्याचा एक लिमदेवजी नांवाचा वंशज सध्यांच्या संस्थानिकाचा मूळपुरुष होय. लिमदेवजीच्या वेळेपासून कडान स्वतंत्र आहे. सुंथ, दुंगरपूर व बालासिनोर यांशी कडानच्या नेहेमीं लढाया होत. हल्लीं सुद्धां त्यांच्यांत फारसें सख्य नाहीं. या भागांतील हवा रोगट आहे; व सर्व प्रदेश डोंगराळ आहे.

**गांव.**—कडानसंस्थानचें ( रेवाकांठा, मुं. इ. ) मुख्य ठिकाण. येथील ठाकुराचा किल्ला किंवा राजवाडा एका निमुळत्या सुळक्यावर बांधलेला आहे.

**कडाप्पा, जिल्हा.**–मद्रास इलाख्यांत असलेल्या जिल्ह्यांपैकीं अगदीं आग्नेय दिशेचा जिल्हा. क्षे. फ. ८७२३ चौ. मै. तेलगू भाषेंत कडापा याचा अर्थ "दरवाजा" असा असून कडाप्पा गांव हें तिरुपति येथील पवित्र ठिकाणीं जाण्याचा दरवाजा असल्यामुळें यांस हें नांव पडलें.

**मर्यादा:**—उत्तरेस कुर्नुल; पूर्वेस, नेलोर; दक्षिणेस उत्तर अर्काट व म्हैसूर; आणि पश्चिमेस, अनंतपूर.

**स्वभाविक वर्णन:**—याचे पश्चिमेकडील चार ताळुके म्हैसूरच्या पठारांत असून, जिल्ह्याच्या इतर भागांपेक्षां उंचावर आहेत. या दोन भागांच्या दरम्यान शेषाचलम् व पालकोंड हे डोंगर आहेत. उंचवटयाच्या प्रदेशांतील जमीन तांबडी, नापीक व मधून मधून खडकाळ आहे; आणि सखल भगांतील जमीन काळी आहे. नल्लमलेचे डोंगर कुर्नूलपासून दक्षिणेकडे गेलेले आहेत.

पेन्नार ही या जिल्ह्यांतील मुख्य नदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वहात जाऊन सोमसलिच्या खिंडींतून नेलोर जिल्ह्यांत शिरते. हिला सागिलेरु व कुंडेरु या नद्या मिळतात. चेयेरु, पापघ्नी, व चित्रावती ह्या नद्या उंच प्रदेशांतून वाहतात व पालकोंड डोंगराच्या खिंडींतून गेल्यावर सखल प्रदेशांत पेन्नारला मिळतात. या सर्व नद्या लहान असून उन्हाळ्यांत त्यांनां पाणी नसतें.

या जिल्ह्याच्या दोन नैसर्गिक विभागांची हवा भिन्न आहे. कडाप्पा गांवाच्या आसपासच्या भागांतील हवा मलेरियायुक्त आहे; व उंचवटयाच्या बहुतेक भागाची हवा निरोगी व तकवा आणणारी आहे. कडाप्पाजवळच्या प्रदेशांत उन्हाळा फार असतो; तेथें मे महिन्यांतील उष्णमान सरासरी ९५° असतें. या जिल्ह्यांत सर्व ठिकाणीं पाऊस सारखा पडत नाहीं. परंतु येथील वार्षिक पावसाचें मान सरासरी २८ इंच आहे. कधीं कधीं पाऊस जास्त झाल्यामुळें लोकांचें नुकसान होतें.

**इतिहास:**—या जिल्ह्याचा इतिहास म्हणजे यावर शेजारच्या राजांनीं केलेल्या स्वाऱ्यांचा इतिहास होय. अकराव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत हा जिल्हा तंजावरच्या चोल राजांच्या ताब्यांत होता. चवदाव्या शतकांत विजयानगरकडे राहून त्यांचा मोड झाल्यानंतर तो गोवळकोंडयाच्या कुतुबशाही सुलतानाकडे आला. त्यानंतर उंचवटयाचे ताळुके, पूर्वीच्या छोटया किल्लेदारांच्या हातांत गेले व अखेर सर्व जिल्हा इंग्रजांच्या हातांत आला.

१६७८ त शिवाजीच्या सैन्यानें हा जिल्हा उध्वस्त करून टाकिला. पुढें १० वर्षांनीं औरंगझेबानें त्यावर स्वारी केली. कर्नाटकच्या युद्धांत, कडाप्पाच्या नबाबानें मुझफरजंगाचा पक्ष स्वीकारुन विश्वासघातानें नासिरजंगास मारिलें. १७५२ मध्यें दक्षिणेचा नवा सुभेदार सलाबतजंग यानें हा जिल्हा आपल्या ताब्यांत घेऊन त्यावर मुझफरजंगाच्या लहान मुलास नेमिलें. १७५७ त मराठयांनी नबाबाचा पराभव करुन, त्याजपासून अर्धा मुलूख मिळविला; यांत गुरुमकोंडचा किल्लाहि होता. नंतर ५ वर्षांनीं हा किल्ला हैदरअल्लीनें घेतला, व उरलेला प्रदेशहि घेण्याचा त्यानें प्रयत्न केला. या कामांत माधवराव पेशव्यानें त्याला अडथळा केला व मराठयांनीं गुरुमकोंडचा किल्लाहि परत घेतला, परंतु १७७२ त माधवराव पेशवे मरण पावल्यामुळें हा किल्ला व पुढें बाकीचा प्रदेश हैदरच्या ताब्यांत गेला.

१७८२ त हैदर मरण पावल्यावर, टिपूचा सेनापति कमर उद्दीन याच्या ताब्यांत हा जिल्हा होता. टिपूच्या निजामशीं झालेल्या युद्धानंतर १७९२ च्या तहांत, गुरुमकोंडचा किल्ला व जिल्ह्याचा बहुतेक भाग निजामास देण्यांत आला. टिपूच्या मरणानंतर उरलेला भागहि निजामास मिळाला व निजामाकडून, मदतसैन्याच्या खर्चाकरितां सर्व जिल्हा १८०० त इंग्रजांस देण्यांत आला.

**प्राचीन अवशेष:**—गुरुमकोंड व गांडिकोट हे किल्ले जुने आहेत. पेन्नारच्या खोऱ्यांत ऐतिहासिक कालापूर्वीची

दगडाचीं हत्यारें, जुनीं हिंदु नाणीं वगैरे सांपडलीं आहेत. सोमपल्ले व कदिरी येथील हिंदू देवालयें प्रसिद्ध आहेत.

लोकसंख्याः—कडाप्पा जिल्ह्याची लो. सं. ( १९२१ ) ८८७९२९ आहे. पुरुषांची संख्या स्त्रियांपेक्षां ज्यास्त आहे. तेलगू ही येथील मुख्य भाषा आहे.

येरुकल लोकांच्या फिरणाऱ्या टोळ्यांशिवाय, बहुतेक सर्व हिंदु तेलगू वंशाचे व थोडेसे तामील वंशाचे आहेत. मुसुलमानांत शेखांचा भरणा जास्त आहे पण हिंदु मुसलमानांच्या विवाहापासून उत्पन्न झालेल्या दुदेकुलाची संख्याहि बरीच आहे. शे. ७१ लोकांची उपजीविका शेतकीवर अवलंबून असते.

शेतकीः—रयतवारी व इनामीपद्धति या जिल्ह्यांत चालू आहेत. चोलम, कंबु व रागी हीं येथील मुख्य पिकें आहेत. याशिवाय तांदूळ, कापूस, तंबाखू, ऊंस वगैरे पिकेंहि होतात. शेताला पाणी पुरविण्याकरितां कुर्नूल कडाप्पा कालवा, व सागिलेरू नदीला बांध घालून काढलेला कालवा असे दोन कालवे या जिल्ह्यांत आहेत याशिवाय या जिल्ह्यांत पुष्कळ तळीं आहेत. त्यांचाहि शेतांनां चांगला उपयोग होतो.

जंगलेंः—२३६० चौरस मैल जागा जंगलांनीं व्यापिलेली आहे. त्यापैकीं बहुतेक डोंगरावर व टेंकड्यावर असून सखल जमीनीवर फारच थोडीं जंगलें आहेत. पुल्लंपेट तालुक्यांतील पालकोंड डोंगरावरची; रयचोटी व सिद्धौत तालुक्यांतील व नल्लमलेवरचीं जंगलें बरींच मोठीं आहेत.

धंदे व व्यापारः—येथें महत्त्वाचा धंदा मुळींच नाहीं. पुल्लंपेटचे जरीचे कपडे प्रसिद्ध आहेत. प्रोद्दतूर येथें कापूस दावण्याच्या दोन गिरण्या हंगामांत चालतात.

मुख्य निर्गत मालः—डाळी, हरभरा, एरंडी, चोलम, नीळ हळद, गूळ, तांदूळ, कापूस वगैरे.

मुख्य अयात जिन्नसः— मीठ, विलायती कापड, भांडीं नारळ, केरोसीन तेल वगैरे.

प्रोद्दतूर, जम्मल मदुगु, वायलपाद, व पुल्लंपेठ हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. या जिल्ह्यांत व्यापार विशेष चालत नाहीं.

दळणवळणाचीं साधनें—यांत मद्रास रेल्वेचा वायव्य फांटा आग्नेय दिशेस पद्दपादूपासून वायव्येकडे गेलेला आहे. हा फांटा कडाप्पावरून जातो. साउथ इंडियन रेल्वे दक्षिण सरहद्दीवर पिलेरूजवळ या जिल्ह्यांत शिरून वायव्येकडे जाते. या जिल्ह्यांत असलेल्या पक्क्या रस्त्यांची एकंदर लांबी ६४२ मैल व कच्च्या रस्त्यांची ६६२ मैल आहे.

राज्यकारभारः—कडाप्पा जिल्ह्याचे चार पोटविभाग आहेत ते येणेंप्रमाणें:—( १ ) रायचोटी, कदिरी, वायलपाद व मदनपल्ले हे तालुके मिळून होणारा मदनपल्ले पोटविभाग; ( २ ) जम्मल मदुगु, यांत प्रोद्दतूर जम्मलमदुगु, पुलिवेंद हे तालुके आहेत; ( ३ ) सिद्धौत; यांत बदवेल सिद्धौत, व पुल्लंपेठ हे तालुके आहेत;(४)चौथा कडाप्पा. कडाप्पा येथें जिल्ह्याचा कलेक्टर, व इतर भागांवर डेप्युटी कलेक्टर, व प्रत्येक तालुक्यावर तहशीलदार आहेत. पिलेरू, चिंवेल, कमलापुरम् व कडाप्पा येथें डेप्युटी तहशीलदार आहेत.

न्याय देण्याकरितां डिस्ट्रिक्ट जज्ज, सेशन्न कोर्ट व मुनसफ कोर्टें इतर जिल्ह्याप्रमाणें येथेंहि आहेत. द्वेष व हेवा यामुळें येथें खून फार होतात. दुष्काळाच्या वेळीं दरोड्यांची संख्या वाढते.

कडाप्पा येथील म्युनिसिपालिटीखेरीज इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हाबोर्डें, व सिद्धौत, मदनपल्ले, कडाप्पा व प्रोद्दतर येथील तालुकाबोर्डाकडे आहे.

शिक्षण.—शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फार मागसलेला आहे.

तालुका.—मद्रास इलाख्यांत कडाप्पा जिल्ह्यांतील एक तालुका व पोटविभाग. क्षेत्रफळ ५०९ चौ. मैं.

दक्षिणेस व पूर्वेस पालकोन्डा टेंकड्या असून उत्तरेस लंकमल्ल पर्वताची ओळ आहे. लोकसंख्या १००५३५. पाऊसपाणी ३२ इंच. यांत कडाप्पा गांव असून ९९ खेडीं आहेत. ह्या तालुक्यांतून पश्चिम–पूर्व पेन्नारनदी वहाते. कुन्देरू, पापघ्नी व वगेरु ह्या तीन नद्या तीस येऊन मिळतात. जमीनींत सोरा वगैरे द्रव्यें असल्यामुळें ती पिकास चांगली नाहीं.

गांव.-मद्रास इलाख्यांतील कडाप्पा जिल्ह्यांतील कडाप्पा तालुक्याचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. मद्रासहून रेल्वेनें १६१ मैल आहे. व समुद्रसपाटीपासून ५०७ फूट उंच आहे. लोकसंख्या १७८०७. पैकीं अर्धी लोकसंख्या मुसुलमानांची असून हे लोक अगदीं निरक्षर व धर्मवेडे आहेत अशी त्यांची ख्याति आहे. नेकनाम खानच्या नांवावरून ह्या गांवास मुसुलमान अमदानींत नेकनामाबाद म्हणत असत. गांवाच्या तीन बाजूस टेंकड्या असून, सर्व इलाख्यांपेक्षां येथें उष्णता फार असते. येथें मलेरियाची सांथ असते. १५७० सालीं गोंवळकोंड्याच्या एखाद्या सरदारानें येथें किल्ला उभारला असावा असें वाटतें. १८ व्या शतकाच्या सुरवातीस कडाप्पाच्या पठाण नवाबाच्या ताब्यांत भोंवतालचा गुत्तीखेरीज करून प्रदेश आला. व बारा महालहि त्यानें घेतले. ह्या जिल्ह्याच्या वेगळ्या वेगळ्या नवाबांचा इतिहास जिल्ह्याच्या इतिहासांत दिला आहे. सन१८०० मध्यें निझामसरकारनें हा प्रदेश कंपनी सरकारास दिला. सन १८६८ सालीं येथें छावणी ठेवण्यांत आली. कडाप्पा हॉस्पिटल नांवाचें एक इस्पितळ आहे. येथें एक ट्रेनिंग स्कूल व दोन, तीन हायस्कुलें आहेत. दगडाच्या खाणीहि बऱ्याच आहेत.

**कडा–लिंगी.**—भटक्या हिंदू वैराग्यांचा एक वर्ग. कडा–लिंगी हें नांव, संस्कृत “कटक” (कडी, आंगठी ) व ‘लिंग’ ( पुरुष जननेंद्रिय) या सामासिक शब्दापासून बनलें आहे. आपण शिवभक्त आहों असें हे लोक सांगतात. यांनां

दुसरें "सेवर" (कदाचित शवर शब्दाचा अपभ्रंश) असेंहि नांव आहे. जटा वाढवून व गेरूच्या रंगाचीं वस्त्रें परिधान करून एकजुटीनें बहुधा हे हिंडत असतात; पण कधीं कधीं नागवे उघडे व एकटे असेहि आढळतात. आपला इंद्रियनिग्रह दाखविण्याकरितां हे जननेंद्रियास एक लोखंडी आंगठी घालतात व सांखळी बांधतात. कांहीं कांहीं तें छाटूनहि टाकतात. आपल्या कोरड्या जटेंतून गंगाजल पिळून काढणें, यासारखे चमत्कार दाखवून कडा–लिंगी हे लोकांपासून पैसे उपटतात. सेवरांचाच एक खेवर नांवाची पोटजात नरकपाल जवळ बाळगिते. दारूपासून दूध तयार करून तें प्राशन करणें, हात चोळून त्यापासून गहूं किंवा दुसरें धान्य निर्माण करणें इत्यादि खेळ खेवर करून दाखवितात. खेवर हें नांव सेवरपासून बनलें आहे. जी. ए. ग्रियरसनला बंगालमध्यें एक कडा–लिंगी भेटला होता. त्याचें जननेंद्रिय एका विशिष्ट पिंजऱ्यांत बंद करून ठेवलेलें त्याला दिसलें. त्याची किल्ली मुख्य महंताजवळ असून त्याच्या संमतीखेरीज हा पिंजरा खुला करावयाचा नसे. [ एच्. एच्. विल्सन–रिलिजिअस सेक्ट्स ऑफ दि हिंदूज; ग्रीअर्सन–मलिक महंमद जाइसीच्या पदुमावतीचें भाषांतर ].

**कडाळी**—( वृक्ष ) जरुळ, अजहर, तमन कडाळी पीइनमा इत्यादि नांवें या वृक्षास आहेत. हें इमारती लाकडाचें झाड आसाम, पूर्वबंगाल, चितागाँग, ब्रह्मदेश, छोटा नागपूर आणि हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर सांपडतें.

उपयोग व वर्णनः—या झाडाच्या उत्पत्तीची विशेषशी काळजी घेत नाहींत. ३० । ३५ वर्षांचें झालें असतां हें झाड वठतें अथवा तोडण्यालायक होतें. जहाजें, बोटी, गाड्या वगैरे करण्याकडे या लांकडाचा उपयोग करतात. पाण्यांत या झाडाचें लांकूड फार वेळ टिकतें, पण जमीनींत मात्र तें लवकर कुजतें.

व्यापारः—गॅरो टेकड्यांवर जेवढें म्हणून लांकूड निघतें, तेवढें सारें बंगालमध्यें विक्रीकरितां जातें. या टेंकड्यावरील एका उभ्या झाडाची किंमत ६ रुपये असते असें सांगतात. काचरमध्यें दरवर्षी २०,००० घनफुटांची निर्यात केली जाते.

**कडिया**-कुंभारांची एक जात. ही गुजराथेंत आढळते. मडकीं करणाऱ्या कुंभारांपेक्षां आपणांला हे श्रेष्ठ समजतात. अमरेली प्रांतांत तर यांची स्वतंत्र जातच बनली आहे. यांस विटा पाडणारे किंवा चुनारा म्हणजे चुनखडीवाले असेंहि म्हणतात. यांची संख्या १०४३९ असून ते मुंबई इलाख्यांतच आढळतात. दिसण्यांत व पोशाखांत यांच्यांत व इतर कारागीर लोकांत फरक नाहीं. यांचीं घरें लहान असतात. यांचें मुख्य अन्न म्हणजे बाजरीची भाकर व डाळ. मांसमच्छर दारू वगैरे ते चोरून पितात. त्यांच्यापैकीं कांहीं गवंड्याचेंहि काम करतात. मुख्य विटा पाडणारास मेस्त्री म्हणतात. घर बांधण्याच्या कामांत तो मुख्य सुतारास मदत करतो व हाताखालच्या गवंड्यांवर देखरेख ठेवतो. छिपा, गोळ, कोळी वगैरे जातभाईबरोबर त्यांची व्यापारविषयक स्पर्धा चालू असते. त्यांच्या धंद्यांत त्यांस बायका मदत करीत नाहींत. परनामी, स्वामीनारायण, रामानंदी व कबीरपंथी या पंथाचे हे लोक अनुयायी आहेत. हिंदूंचे उपासतापास व सणवार हे पाळतात. भुताखेतांवर यांचा विश्वास आहे. जन्म, विवाह, मृत्यु वगैरेविषयक संस्कार इतर कारागीर लोकांप्रमाणेंच असतात. घटस्फोट, पुनर्विवाह रूढ आहेत. शिष्ट मंडळी जातींतील भांडण तंटे मिटवतात. फारच थोडे लोक शाळेंत मुलें पाठवितात.

मुसुलमानी कडिया.—मुसुलमान कडीया फार थोडे आहेत व ते बहुतेक बाटलेले हिंदूच होत. या सुनी पंथाच्या कडियांत उत्तर व दक्षिण गुजराथ या वसाहतप्रांतभेदामुळें भाषाभेद दिसतात; व दक्षिण आणि उत्तरकडियांच्या चालीरीतीहि वेगळ्या वाटतात. लग्नें आपआपसांतच होतात.

**कँडिया.**—कँडिया ही पूर्वी क्रीट बेटाची राजधानी असून व्हेनिसच्या सत्तेच्या वेळचे मोडकळीस आलेले किल्लेहि येथें आहेत. येथें ग्रीक धर्माध्यक्ष (आर्चबिशप) रहातो. या शहरची लोकसंख्या १९१५ सालीं २५१८५ होती व त्यांपैकीं सुमारें निम्मे लोक ग्रीक मुसुलमान होते.

सारासन लोकांनीं ९ व्या शतकांत हें शहर वसविलें व पुढें रोमच्या लोकांनीं याला तटबंदी केली. तुर्क व व्हेनिसचे लोक यांच्यांत येथें लढाई झाली.

**कडी.**–प्रांत—उत्तर गुजराथ. बडोदें संस्थानांतील एक प्रांत. उ. अ. २३° ते २४°९' व पू. रे. ७१°१५' ते ७१°५०.' क्षेत्रफळ ३०५० चौरस मैल. गायकवाड राज्यांतील चार प्रांतांपैकीं सर्वांत जास्त उत्पन्नाचा हा प्रांत आहे. उत्तरेस पालनपूर आणि राधनपूर हीं संस्थानें; पश्चिमेस, राधनपूर आणि अहमदाबाद जिल्हा; दक्षिणेस अहमदाबाद आणि खेडा हे जिल्हे; पूर्वेस महीकाठा संस्थानें. या प्रांतांतील बराच भाग साबरमती नदीच्या पश्चिमेस वसलेला आहे. यांत साबरमती, सरस्वती आणि बणा या नद्या प्रमुख होत.

या प्रांतांतील बहुतेक जमीन लागवडीखालीं आहे. बहुतेक सर्व प्रांत गायकवाड राज्यांतील अत्यंत निरोगी भाग म्हणून समजण्यांत येतो. लो. सं. ( १९२१ ) ९००५७८.

इ. स. १८९९–१९०० च्या दुष्काळामुळें या प्रांतावरील लोकसंख्येस बराच धक्का बसलेला स्पष्ट दिसतो. या प्रांताचे १० तालुके अथवा महाल असून दोन पेटे आहेत. पाटण, विसनगर, सिधपूर, वडनगर, कडी, उंझा, मेहसाणा ( प्रांताचें मुख्य ठिकाण ), विजापूर, चानसमा, खेराळु, लाडोल, काळोल, विलाम, आणि उमटा हीं मुख्य गांवें या प्रांतांत आहेत.

सुमारें शेंकडा ८० एकर जमीन रेताड असून योग्य खत व पाण्याची सोय असल्यास या जमिनींत उत्तम पिकें येतें. विहिरीच्या पाण्यावर येथील बागाइती पिकें अवलंबून आहेत. येथील मुख्य पिक बाजरी, ज्वारी, गहूं, बंटी, वरी, कोद्रा, हरभरा व कडधान्यें हीं होत. इ. स. १९०४–५

साली अफूची लागवड १२२६२ एकर जमीनींत करण्यांत आली होती. कापसाचें व रेशमाचें सूत काढणें व सुती कापड विणणें हे या प्रांतांतील मुख्य धंदे होत. १९२१-२२ साली सुमारें ४० लाख रुपये जमीनीचा वसूल झाला होता. दर पंधरा वर्षांनीं जमीनीची पहाणी करण्यांत येते. या प्रांतांत १२ म्युनसिपालिट्या आहेत. प्रांताधिकारी यास सुभा ही संज्ञा आहे. अवकारी उत्पन्न तीन-लखांवर आहे.

ता लु का-वडोदें संस्थान. कडी प्रांताचा नैर्ऋत्येकडील तालुका. क्षेत्रफळ ३३१ चौरस मैल. लो. सं. (१९११) ७६१९८. या तालुक्यांत कडी हा मोठा गांव व १२१ खेडीं आहेत. जमीनमहसूल (इ. स. १९०४-५) २५८००० रुपये.

गां व-वडोदें संस्थान. कडी तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें राजपुताना माळवा रेल्वेच्या कालोल नांवाच्या स्टेशनापासून निघालेल्या गायकवाड संस्थानच्या एका रेल्वेचें स्टेशन आहे. उ. अ. २३° १८' व पू. रे. ७२°२'. लोकसंख्या (१९११) ११५५६ इ. स. १९०४ पर्यंत हें कडी प्रांताचें मुख्य ठिकाण होतें. येथील किल्ला किंचित उंचवटयाच्या प्रदेशावर असून लहानसाच आहे. किल्ल्याच्या भिंती विटांच्या असून त्या पुष्कळच जाड आहेत. किल्ल्यांत रंगमहाल नांवाचा वाडा असून सरकारवाडा नांवाच्या इमारतींत पूर्वी सुभ्याची कचेरी व इतर कचेऱ्या होत्या. रस्ते फारच अरुंद आहेत. येथील म्युनिसिपालिटीस संस्थानाकडून सालीना २७०० रुपये मदत मिळते. गांवांत व्यापार फारसा नाहीं. येथील छावणींत संस्थानांतील थोडेसें सैन्य असतें.

येथें चीट चांगलें तयार करतात. जस्ताचीं व पितळेचीं भांडींसुद्धां येथें बनावितात. जस्ताच्या भांड्यांची ठेवण विशेषतः पाणी थंड राहील अशी केलेली असते.

इतिहासः—दमाजी गायकवाडानें येथील बाबी लोकांना हांकून देऊन आपला मुलगा खंडेराव याला हा भाग जहागीर म्हणून दिला. पुढें या जहागिरीबद्दल आपसांत भांडणें सुरू झालीं व १८०२ च्या सुमारास इंग्लिशांनीं मल्हाररावपासूनच कडीचें स्वामित्व कायमचें आपणाकडे घेतलें.

**कँडी**—सीलोनमधील हें अर्वाचीन शहर एका सरोवराच्या कांठीं वसलें आहे. समुद्रसपाटीपासून त्याची उंची १७१८ फूट असून कोलंबोच्या वायव्येस सुमारें ७५ मैलांवर हें आहे. 'कंड-उड' (डोंगरावर) या प्रादेशिक नांवावरून कँडी हें नांव पडलें. याचें सिंहली नांव सेंकड-गल-नुवर असें आहे. याच्या भोंवतीं दोन हजारांपासून चार हजार फूट उंचीचे पर्वत आहेत. १५९२-१७९८ पर्यंत सिलोनच्या राजांचे येथें वास्तव्य असे. त्या काळांत सिलोनचें राज्य अगदीं मोडकळीला आलें होतें. तामिल,पोर्तुगीज डच आणि शेवटीं इंग्रज या परकीय शत्रूंबरोबर झगडा चालू असतां राजकुलांतहि गादिवर बसण्यासंबंधीं भांडणें सुरू होतींच. हे प्रतिस्पर्धी गादीचे हक्कदार सिंहली रक्ताचे नसून दक्षिण हिंदुस्थानी व नांवालाबौद्ध पण खरेखरे हिंदू असे होते. त्यांनीं या शहरांत चार हिंदू देवळें बांधिलीं.

चार हिंदू देवळांखेरीज दोन लहान विहार आहेत. त्यांचीं नांवें असागिरिया आणि मलवत्तेविहार अशीं आहेत. यांपैकीं कोणत्या तरी एका विहारांतून दीक्षा मिळाल्याशिवाय कोणालाहि बौद्ध धर्मांत शिरतां येत नाहीं असा सिंहली कायदा आहे. दलदा मलिगांव या लहानशा सुंदर इमारतींत बुद्धाचा दांत ठेवला आहे असें सांगतात. या दांताविषयीं चमत्कारिक कथा आहेत. १३ व्या शतकांत धम्मकित्तिनें याच्यावर एक काव्य केलें आहे. त्यावरून पाहतां इ. स. ४थ्या शतकांत हा दांत सिलोनमध्यें आणला. व तो दाठावंश हें काव्य रचण्याच्या काळापर्यंत त्या ठिकाणीं होता. टेनेंटनें दिलेल्या पोर्तुगीज माहितीप्रमाणें पाहतां असें समजतें कीं, पोर्तुगिजांनीं हा दांत काबीज करून त्याची पूड केली व ती पूड गोव्याच्या बंदरांत फेंकून दिली. सिंहली लोक म्हणतात पोर्तुगिजांनीं ज्याची पूड केली तो दांत येथील नसून तामीळ देशांतील जाफना येथें त्यांनां सांपडलेला एक हिंदू दांत होय. तेव्हां सध्यां कँडी येथें असलेला दांत धम्मकित्तीमध्यें उल्लेखिलेलाच दांत आहे यांत संशय नाहीं.

नॉक्सनें कँडीची कांहीं माहिती दिली नाहीं; पण १७९२ मध्यें जॉन पविस जेव्हां त्या ठिकाणीं गेला होता. त्या वेळची माहिती त्यानें सविस्तर लिहून ठेवली आहे (अकाउंट ऑफ मि. पिवसेज मिशन टु दि कँडी किंग) त्या वेळीं कँडी शहरामध्यें दोन मोठाले रस्ते व अनेक गल्ल्या होत्या. कांहीं थोड्या घरांवर कौलें असत. रात्रीं रस्त्यांत उजेड नसे, पण ८ च्या सुमारास रस्त्यांत एक घंटा वाजविण्यांत येई. त्या वेळेपुढें हातांत मोठा दिवा घेतल्याशिवाय कोणालाहि बाहेर फिरण्याची परवानगी नसे. राजवाडा कसा तरी बांधलेला असून त्याच्यापुढें एक लहान बगीचा असे. जे. फोर्ब्स यानें वरील म्हणण्यास दुजोरा दिला आहे. (एलेव्हेन ईयर्स इन सिलोन-१८२७-३८ लंडन, १८४१ भा. १. पा. २९९-३०१). पण त्याच्या काळीं पीवसनें न उल्लेखिलेलें सरोवर बांधलें गेलें होतें. पुढें तीस वर्षांनीं लिहितांना जे. ई. टेनेंट यानें अर्वाचीन व यूरोपियन कँडी शहराचें वर्णन केलें आहे (सीलोन, लंडन १८५९). हल्लीं या लहानशा भरभराटीच्या शहरांत २५००० लोकवस्ती असून रेल्वेस्टेशन व डोंगर सपाटीवर अनेक बंगले तेथें दिसतात.

१६ व्या शतकांत हें शहर पोर्तुगीजांच्या ताब्यांत होतें. तें १७६३ मध्यें डच लोकांनीं काबीज केलें. पण दोन्ही वेळीं तेथील राजांनीं परकीय सत्ता झुगारून दिली. १८०३ मध्यें हें ठिकाण ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें. पण पुढें बंडाळी होऊन १८१५ त तेथील राजाला पदच्युत करण्यांत आलें.

व ब्रिटिश सत्ता कायम केली गेली. तेथला गव्हर्नर व सर विल्यम ग्रेगरी यानें प्राचीन कँडीमधील प्रेक्षणीय स्थळांचा जीर्णोद्धार केला व कांहीं नवीन इमारती बांधल्या. तेथून तीन मैलांवर पेरॅडेनिया येथें रॉयल बोटॅनिकल गार्डन्स नांवाची वनस्पतिसंशोधनाकरितां एक बाग आहे. कँडी शहरांत पाणीपुरवठा व विजेची रोषनाई झाली आहे. ख्रिस्ती मिशनरी मंडळें धर्मप्रसाराचें काम जारीनें करीत आहेत. या शहराची लो. सं. (१९११) २९४५१ होती. पावसाची सरासरी ८१॥ इंच आहे.

कडुर, जि ल्हा—म्हैसूर संस्थानांतील एक जिल्हा. उत्तर अ. १२° ५५' ते १३° ५४' व पूर्व रेखांश ७५° ५' ते ७६° २२'. क्षेत्रफळ २७८८.६९ चौरस मैल. उत्तरेस शिमोगा जिल्हा; पूर्वेस चितलदुग आणि तुमकुर जिल्हे; पश्चिमेस दक्षिण कानडा जिल्हा. म्हैसूर संस्थानांत हा जिल्हा सर्वांत जास्त डोंगराळ आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं डोंगरांची समुद्रसपाटीपासून उंची ६१००–६२०० फूटपर्यंत आहे. तुंगा आणि भद्रा या दोन नद्या या जिल्ह्यांतून वहात असून कडुर गांवाजवळ त्यांचा संगम होतो. पावसाचें प्रमाण सर्व जिल्ह्यांत सारखें नाहीं. जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं (चिकमुंगळूर) सुमारें ३६ पासून ४२ इंच पर्यंत आहे. परंतु घांटांत बराच पाऊस पडतो. कांहीं ठिकाणीं तर १५६ इंचपर्यंत पाऊस पडतो.

इतिहासः—पूर्वीं या जिल्ह्याच्या पश्चिमेकडील भागावर कदंबांचें राज्य होतें व इतर भागावर गंग राजे राज्य करीत. आठव्या शतकांत सांतर राज्य स्थापन झालें. व त्यांचा अंमल या जिल्ह्यांतील कळसगांवापर्यंत येऊन पोंचला होता. एके काळीं हे चालुक्याचे मांडलिक असून जैनधर्मी होते. पुढें विजयानगरचा अमल सुरू झाल्यावर हे लिंगायत झाले. मध्यंतरी अकराव्या शतकाच्या आरंभीं होयसल यांचा उदय झाला असून म्हैसूर संस्थानांत त्यांची सत्ता झाली होती. उत्तरेकडून मुसुलमानांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या त्यावेळीं त्यांच्या सत्तेचा नाश झाला. सतराव्या शतकांत बेदनूरचा शिवाप्पा नाईक यानें या जिल्ह्याचा बहुतेक भाग पादाक्रांत केला होता, त्यावेळीं म्हैसूर सरकारानें त्यास अडथळा केला होता. अखेरीस इ. स. १६९४ सालीं झालेल्या तहान्वयें हा जिल्हा म्हैसूरकडे आला व इ. स. १७६३ सालीं ज्यावेळीं हैदरअल्लीनें बेदनूर काबीज केलें त्यावेळीं तें सर्व राज्य म्हैसूरांत कायमचें खालसा झालें. तरिकेरें येथील राजा इ. स. १८३० सालीं नागरदेशांत उद्भवलेल्या बंडांत सामील झाला. अखेरीस तें राज्य खालसा झालें. डोंगराळ प्रदेशांत रस्ते तयार झाल्यामुळें या भागांत दंगेधोपे फारसे होत नाहींत.

तरिकेरें येथील अमृतेश्वराचें देऊळ बाराव्या शतकांत होयसल राज्य असतांना बांधण्यांत आलें आहे. अंगडी येथें कांहीं जुनीं जैन देवळें आहेत. त्याचप्रमाणें शृंगेरी येथील विद्याशंकर देऊळ चांगलें आहे. या जिल्ह्यांतील शिलालेखांचें भाषांतर होऊन ते प्रसिद्ध करण्यांत आलें आहेत.

या जिल्ह्यांत कडुर, चिकमुंगळुर, मुडगेर, कोप्प, शृंगेरी जहागीर, व तरिकेर हे तालुके, व येदहळ्ळी हा पोटतालुका आहे. इ. स. १९०२–३ सालीं कडुर तालुक्यांतील २५ चौरस मैल जमीन चितळदुग्ग जिल्ह्यांत घालण्यांत आली.

येथें कडधान्याखेरीज इतर महत्वाचीं पिकें म्हटलीं म्हणजे सुपारीच्या बागा व कॉफीची लागवड हीं होत. सतराव्या शतकांत बाबाबुदन यानें मक्केची यात्रा करून परत येतांना कांहीं कॉफीच्या झाडांचे रोपे बरोबर आणले होते ते आपल्या घराशेजारीं त्यानें लावले. हीच प्रथमची काफीची लागवड होय. या बाबाबुदनच्या नांवानें एक डोंगर प्रसिद्ध आहे. तथापि इ. स. १८२० पर्यंत कॉफीची लागवड मोठ्या प्रमाणांत कोणी केली नव्हती. यापुढें वीस वर्षांनीं यूरोपिअन मळेवाल्यांचें लक्ष कॉफीच्या लागवडीकडे वेधलें. वेलदोडयांचीं झाडें जंगलांत उगवतात. सिंकोना, कापूस, चहा आणि तुतींचीं झाडें यांचे प्रयोग केले होते परंतु ते सिद्धिस गेले नाहींत.

जिल्ह्याच्या पश्चिमेकडील भागांत जंगल उत्तम प्रतीचें आहे. अज्जमपूर येथें खाणींतून सोनें काढण्याकरितां एक कंपनी स्थापन झाली होती, परंतु विशेष फायदा होईल असें न वाटल्यामुळें तिचें काम बंद करण्यांत आलें. कडुरजवळ कुरुंदाचा दगड पुष्कळ सांपडतो. तेल, पेंड, सुती कापड, घोंगडया, कांचेच्या बांगडया वगैरे जिन्नस येथें तयार होतात. येथून कॉफी, मिरीं, वेलदोडे, तांदूळ व गळिताचीं धान्यें बाहेर रवाना होतात. इ. स. १८८९ सालापासून या जिल्ह्याच्या एका लहानशा भागांतून रेल्वे गेली आहे. या जिल्ह्याचे पांच तालुके आहेत. जमीनमहसूल (१९०३–४) ८११. एकंदर उत्पन्न १५५५. इ. स. १९०३–४ सालीं या जिल्ह्यांत आठ म्युनिसिपालिट्या होत्या.

ता लु का—म्हैसूर संस्थानांतील कडुर जिल्ह्याच्या पूर्वेकडील तालुका. उत्तर अक्षांश १३° १९' ते १३° ५०' व पूर्व रेखांश ७५° ५३' ते ७६° ५२. क्षेत्रफळ ५४५.८६ चौरस मैल. लोकसंख्या (इ. स. १९११) ८१०१३. यांत दोन मोठीं गांवें व २५१ खेडीं आहेत. जमीन महसूल (इ. स. १९०३–४) १७५००० रुपये. याचा पश्चिमेकडील मुलुख डोंगराळ आहे. पावसाचा वार्षिक सरासरी २२ इंच. दक्षिणेस व पश्चिमेस तंबाखूची चांगली लागवड होते. पाणी दिल्याशिवाय नारळ येथें होतात. वायव्येस होगरिवेट्ट येथें लोखंड सांपडतें.

कडुर—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. रट्टेहळ्ळीच्या पूर्वेस सुमारें तीन मैलांवरील एक गांव. येथील देवळांत एक शिलालेख आहे.

कडुस—ब्रह्मदेशांतील एक जात. ही कठा जिल्ह्यांत असून इ. स. १९०१ सालीं हिची लोकसंख्या ३४६२९ होती.

यांची उत्पत्ति अद्यापि संशयित आहे. तथापि त्यांची भाषा व राहणी पाहतां वन्य जातींच्या शान व ब्रह्मी लोकांशीं लग्न संबंध होऊन ही एक स्वतंत्र जात बनली असावी असें वाटतें. हे बौद्धधर्मी आहेत.

**कडूस**—मुंबई. पुणें जिल्हा. भीमेस येऊन मिळणाऱ्या कमन्डलु नदीवर खेडच्या वायव्येस ६ मैलांवर हें आहे. आठवड्याचा बाजार बुधवारीं भरतो. नदीकांठीं गांवाच्या पश्चिमेस सिद्धेश्वराचें देवालय आहे. तेथें चैत्र शु. दशमीस जत्रा भरते.

**कडूजिरें**—काळें जिरें, कडूकारळीं हीं यांचीं दुसरीं रूढ नांवें होत. याचें झाड सुमारें दोन तीन हात उंच वाढतें. त्यास जीं बोंडें येतात त्यांत हें जिरें असतें. हें जिरें मूळचें दक्षिण यूरोपांतील आहे. पण याची बियांकरितां हिंदुस्थानांत वरीच लागवड करितात. काळ्या जिऱ्यांतून दोन प्रकारचें तेल निघतें. पहिल्या प्रकारचें तेल काळें, सुवासिक आणि लवकर उडून जाणारें असतें. दुसऱ्या प्रकारचें तेल स्वच्छ, पांढरें व एरंडीच्या तेलाइतकें पातळ असतें. हें मसालेदार, वायुनाशक आणि पचनक्रियावाढविणारें असतें. आमटी, शिरका वगैरे खाण्याच्या पदार्थांत हें टाकितात.

गांडुळाकृति जंतावर (राऊंडवर्मस) कडू जिरें हें एक उत्तम औषध आहे. तें पोटांत दिल्यानें जंत मरून पडतात. कोड व दुसऱ्या प्रकारचे बहुत दिवसाचे त्वग्रोग जाण्यासाठीं कडूजिरें नुसतें अथवा दुसऱ्या औषधांशीं मिश्र करून पोटांत देतात. कडू जिऱ्याच्या अंगीं पौष्टिक, पाचक व मूत्रल धर्महि आहेत. [वाट. पदे. भिषग्विलास पु. १९.]

**कडूनिंब**—यास संस्कृतांत, अर्कपादप, निंबक, पारिभद्रक; मराठींत कडूनिंब, बाळंतनिंब; हिंदींत नीम; गुजराथींत लिमडं इत्यादि नांवें आहेत. हा वृक्ष फार मोठा होतो व कर्नाटक, मुंबई इलाखा, मध्यप्रांत वगैरे बहुतेक ठिकाणीं तो आढळतो. याचे अनेक औषधी उपयोग असल्यामुळें त्यास फार महत्त्व आलें आहे. याचीं पानें कात्रीदार असून फुलें पांढऱ्या रंगाचीं बारीक असतात. लांकूड इमारतीकरितां व इतर औद्योगिक दृष्टीनें उपयुक्त आहे. याच्या सेवनानें अनेक व्याधी बऱ्या होतात म्हणून वर्षप्रतिपदेच्या दिवशीं या वृक्षाचीं कोवळीं पानें व फुलें व मिरीं, सैंध व, हिंग, जिरें, ओवा, चिंच व गूळ यांच्या मिश्रणाबरोबर शुचिर्भूत होऊन सर्वांनीं भक्षण करावींत असा निर्बंध आर्य शास्त्रकारांनीं घालून दिला आहे. या वृक्षाचीं नुसतीं पानेंच खाऊन कांहीं माणसें रहातात. आपल्या देशांत स्त्रिया बाळंतीण झाल्या म्हणजे तीन दिवस जेवणाच्या आधीं ह्या झाडाच्या पानाचा रस देण्याची अद्यापहि कांहीं ठिकाणीं चाल दृष्टीस पडते. याची छाया फार थंड व आरोग्यकारक असते. यास्तव देवालयें, धर्मशाळा, रस्ते आदिकरून सार्वजनिक ठिकाणीं हे वृक्ष फक्त छायेसाठीं व स्वच्छतेसाठीं लावितात. निंबाचा वृक्ष फार जुनाट झाला म्हणजे याच्या आंतील गाभ्यास शुद्ध चंदनाप्रमाणें सुवास येतो. या झाडाचें लांकूड इमारतीच्या कामास अतिशय उत्तम असून त्याच्या आंगच्या जास्त कडूपणामुळें त्याला कीड लागत नाहीं. हें झाड एकदां तोडलें तरी त्याच्या मुळांतून नवीन धुमारा फुटून त्याचा कांहीं वर्षांनीं पुनः मोठा वृक्ष बनतो.

औ ष धी उ प यो ग.—कडूनिंबाची साल, मुळ्यांची साल, फुलें, बीं, इतक्या पदार्थांचा उपयोग औषधी म्हणून होतो. पानें, फळें, मुळ्या, साल, सर्वच अतिशय कडू असून त्यांत एक प्रकारची राळ व एक स्वच्छ प्रभावद्रव्य असतें. औषधांत उपयोग करतांना कडूनिंबाचा काढा, चूर्ण, घनार्क, द्रव्यार्क किंवा मद्यार्क, ह्यांपैकीं कांहींतरी कल्प तयार करावा लागतो.

झाडाच्या सालीपेक्षा मुळाची साल जास्त गुणदायक होय. झाडाची अगर मुळाची साल कडू, शक्तिवर्धक, स्तंभक आणि पाळीचे ताप नाहींसे करणारी आहे. तसेंच ती जंतुघ्नहि असल्यानें जखमा वगैरे धुण्याकरितां सालीचा उपयोग करावा.

पाळीचे ताप, संततादि विषमज्वर किंवा इतर ज्या तापांत ज्वरवेग अगदीं नाहींसा होऊन ताप पुनः भरतो अशा तापावर कडूनिंब फार गुणदायक होय.

इंग्रजी वैद्यकांत "क्वासिया" (काशीया) नामक औषधी वापरतात. त्याऐवजीं कडूनिंब वापरल्यास हरकत नाहीं. त्याच्या गुणधर्माप्रमाणेंच याचे गुणधर्म आहेत. कांहीं त्वग्रोगांवर इतर औषधांशीं मिश्र करून अगर नुसतेंच कडूनिंबपंचांग (पानें, फळें, साल, फुलें व मूळ) देतात. आर्य वैद्यकांत कडूनिंब 'रसायन' (आलटरेटिव्ह) आहे असें वर्णन आहे.

क डू निं बा चीं पा नें:—यांत एक प्रकारचें कडू द्रव्य असतें. तें पाण्याशीं लवकर विद्रुत होतें. सालींत ज्या प्रकारची राळ आहे त्याचप्रकारचें हें द्रव्य होय. हें त्या राळेसारख्या द्रव्याचें हायड्रेट आहे, एवढा कायतो फरक. सालींतील द्रव्याचे व पानांतील द्रव्याचे गुणधर्म सारखेच आहेत. पानांत विशिष्ट क्षारद्रव्य नाहीं. पानें चांगलीं बारीक वाटून त्यांचें पोटीस तयार करावें. तें व्रणावर बांधलें असतां व्रण लवकर भरून येतो.

उत्तम जंतुघ्न असल्यानें कडूनिंबाच्या पंचांगांचा काढा तयार करून त्यानें व्रण धुतल्यास तो लवकर भरून येतो. ह्याच्या अंगीं आधुनिक आंग्लवैद्यकांतील जंतुघ्न औषधांप्रमाणें पुरळ उत्पन्न करण्याचा दुर्गुण नाहीं, हा एक फायदा आहे. म्हणून व्रणरोपक क्रियेंत कडूनिंबाचा जास्त उपयोग आयुर्वेदांत सांगितला आहे. कडूनिंबाच्या पानांचा दाट कल्क करून तो स्तनावर लावल्यास त्या योगानें दूध येऊं लागण्यास जास्त मदत होते. कडूनिंबाचीं पानें गरम करून अगर पाण्यांत वाफळून त्यांचा गरम गरम वाफारा दिल्यास आमवायुपासून आलेली सूज, ठणका, कळा नाहींशा होतात.

देवी आल्यानंतर अगर देवी येत असतांना कडूनिंबाचीं पानें वाटून त्यांचा कल्क लावल्यास फार फायदा होत असतो.

कडूनिंबाचीं पानें वाटून त्यांत थोडें पाणी टाकून नंतर पिळून काढावें. त्यास निम्बाचा स्वरस म्हणतात. हा स्वरस पोटांत दिला असतां यकृताच्या क्रिया शोथिल्यानें उत्पन्न होणारे विकार बरे होतात.

क डू निं बा चें बीं:—हें बीं नुसतें पाण्यांत वाटून अंगास लावल्यानें अंगावरील फोड, पुरळ, चकदें नाहींशीं होतात. कडूनिंबाच्या बियांचें तेलहि अत्यंत उपयुक्त वस्तु होय. ह्या तेलांत सुमारें १.९ ह्या प्रमाणांत गंधक असतो. अंगावर फोड, खरुज, नायटे, अगर इतर भयंकर त्वग्रोग हें तेल लावल्यानें बरे होतात. कडूनिंबाच्या तेलाचा उपयोग महारोगावर( गलत्कुष्ट )हि उत्तम होतो कुष्ठाच्या चट्टयांवर हें तेल लावून वर गार पाण्यानें स्नान वरेच दिवस करावें चौलमोग्रा तेलाप्रमाणें हें तेल अल्प प्रमाणांत पोटांत दिल्यासहि कुष्ठरोगांत उत्तम उपयोग होतो ( वैद्यकपत्रिका वर्ष १, अंक ९ पहा ).

निंबतेलाचा गंडमाळेच्या गांठींवरहि उपयोग होतो. डोक्यांतील उंवा किंवा इतर जनावरांच्या अंगावरील गोचीड हे मारण्याकरितां निंबतेल लावून कांहीं वेळ उन्हांत बसावें.

तसेंच ह्या तेलांत जंतुघ्न गुणहि प्रधान्येंकरून असल्यामुळें ह्याचा दुसरा एक मोठा उपयोग करता येण्याजोगा आहे. तो म्हणजे ह्या तेलाचा औषधि साबण करणें हा होय. रुग्णालयांतून हात वगैरे धुण्याकरितां हा साबण वापरीत गेल्यास पुष्कळ फायदा आहे.

कडूनिंबाचीं फुलें वाळवून त्यांचें चूर्ण करून पाळीच्या तापावर देतात. फुलें ओलीं असतांच त्याचा सुका अर्क काढून त्याच्या गोळ्या करून त्या क्षयांतील खोकल्याकरितां देतात. त्यायोगानें ताप व खोकला दोन्हींहि कमी होण्यास मदत होते [ पदे, भिषग्विलास पु २२ ].

**कडेगांव**—मुंबई. सातारा जिल्हा. हा गाव कऱ्हाड—विजापूर रस्त्यावर असून कडेपूरच्या पश्चिमेस २॥ मैल आणि कऱ्हाडच्या पूर्वेस १२ मैल अंतरावर आहे. हें एका ओहोळाच्या कांठीं आहे. व ओहोळांतील पाणी चिकलीच्या कालव्यांत घेतलें आहे. याच्या भोंवती पडक्या दगडमातीच्या भिंती होत्या. याच्या मध्यभागी उंचवट्यावर एक लहानसा पडका किल्ला होता तो हल्लीं जळला असून किल्लयाची जागा इनामदार देशपांडे यांच्या ताब्यांत आहे. किल्ल्याच्या चारी बाजूस बुरुज आहेत. हा किल्ला पूर्वी मुसुलमान लोकांच्या ताब्यात असल्यामुळें तेथें काजी आणि काहीं मुसलमानांची वस्ती होती. येथें थोडा व्यापार चालतो. मराठी शाळा आहे. गांवांत नाथ, मारुती व कोटाखालील विठोबा अशीं तीन फारच मजबूत व दगडी देवालयें असून तेथील मठांतील गोसावी यांनीं नाथ व मारुती यांचीं मंदिरें बांधलीं असून विठोबाचें देवालय देशपांडे इनामदार यांनीं बांधलें आहे. या देवालयांचा काल २०० वर्षांपूर्वीचा असावा. तीनहि देवालयांसमोर इ. स. १८७५ च्या सुमारास तीन मंडप बांधण्यांत आले आहेत. येथें मोटार सर्व्हिस हल्लीं सुरू झाली आहे. त्यामुळें विटयास वगैरे जाण्यास सोईचें होतें.

**कडेपुर**—मुंबई. सातारा जिल्हा. हें खेडें कऱ्हाडच्या पूर्वेस १३ मैलांवर आणि सातारा–तासगांव आणि कऱ्हाड–विजापूर रस्त्यांच्या संगमावर आहे. १८८१ त येथील लोकसंख्या १३३० होती. येथें एक जुनें देऊळ आहे.

**कंडेरा**—कंडेरा गोलंदाज, बाणदार, हवाईदार. शोभेची अथवा आतषबाजीची दारू तयार करून त्यानें निरनिराळे देखावे दाखविण्याचें काम करण्याचा धंदा हे लोक करतात. लो. सं. ( १९११ ) २८४३८. यांची वस्ती मध्यहिंदुस्थान व राजपुताना यांत फार आहे. हे पूर्वी सैन्यांत गोलंदाज असत. मध्यप्रांतांत यांच्या तीन उपजाती आहेत, त्या डांगीवारा धुनका व मनवाला या होत. यांचीं लग्नें लग्नस्तंभाला प्रदक्षिणा घालून होतात. यांच्या जातींतल्या पंचाइतच्या मुख्यास हे चौधरी किंवा मेहतर म्हणतत. जातींतून बहिष्कृत असलेल्यास परत घेतांना चौधरीस प्रथम त्याच्या हातचें अन्न खावें लागतें व या बद्दल त्याला १ रुपया व पागोटें नजर मिळतें. त्याचा दुय्यम दिवाण असतो. त्याला एक उपर्णे मिळतें. यांच्यात पडदा नाहीं. हे ब्राह्मणास धर्मकृत्यें करण्यास बोलावितात. तरी यांचा दर्जा फार कमी आहे. ज्येष्ठ शुद्ध दशमीस हे लुकमान हकीमाची पूजा दुकानांत करतात व ती मुसुलमानी पद्धतीनें करतात.

**कडैयनलूर**—मद्रास इलाखा. तिनेवेल्ली जिल्हा. टेंकासई तालुक्यांतलि एक गांव. उत्तर अक्षांश ९° ४' व पूर्व रेखांश ७७° २०'. इ. स. १९११ सालीं लोकसंख्या १७०७७ होती. येथें कोष्टयांची बरीच वस्ती असून स्थानिक कामें पंचायती पद्धतीनें होतात.

**कडोली**—मुंबई इलाखा. महीकांठामधील छोटें संस्थान. यांत दोन गावें आहेत. संस्थानिक मकवान कोळी जातीचा असून गायकवाडाला घांसदाणा व ईदरच्या महाराजाला खिचडी म्हणून कांहीं रकम या संस्थानिकानें द्यावी लागते.

**कडौरा**—मध्य हिंदुस्थान. बौनी संस्थानांतील मुख्य गांव. उत्तर अक्षांश २६° ०' व पूर्वरेखांश ७९° ५०'. काल्पी स्टेशनपासून सुमारें १५ मैलांवर हा तीनचार हजार लोकवस्तीचा गांव असून इ. स. १८२० सालापासून हें संस्थानचें मुख्य ठिकाण झालें आहे. यापूर्वी येथील संस्थानिक काल्पी येथें रहात होते. पाऊस सरासरी ३५ इंच पडतो.

**कणाद**—वैशेषिक न्यायशास्त्राचा कर्ता. सहा आस्तिकांतील एक उत्तराध्ययन सूत्रवृत्ति नामक जैन ग्रंथाच्या तिसऱ्या अध्ययनांत याच्याविषयीं, " हा अंत रंजिका नामक

नगरचा राजा जो वलश्री त्याच्या कारकीर्दीत होता " असें आढळतें.

कणाद हें याचें खरें नांव नसून, यानें कण (अणु) वादाचा जोरानें पुरस्कार केला म्हणून याला कणाद, कणभक्ष किंवा कणभुज् ('कण खाणारा') अशा तऱ्हेचीं निंदाव्यंजक नांवें पडलीं. कणादानें रचिलेल्या प्रसिद्ध वैशेषिक दर्शनास औलुक्यदर्शन असेंहि म्हणतात, त्यावरून त्याचें नांव उलुकि असावें असें कोणी मानतात; पण वायुपुराणांत अक्षपाद, कणाद, उलुकि व वत्स हे शिवपुत्र असल्याचें सांगितलें आहे. तेव्हां कणाद व उलुकि हे दोन निराळे पुरुष त्यावेळीं तरी मानीत असें वाटतें. कणादानें वैशेषिक सूत्रें इ. स. २०० आणि ४०० या दरम्यान रचिलीं असावींत. या दर्शनांत दहा अध्याय व ३७० सूत्रें आहेत. विश्वांतील सर्व पदार्थांचे द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष आणि समवाय असे सहा वर्ग पडतात. हेच सहा मुख्य पदार्थ आहेत असें वैशेषिकांचें मत आहे. या पदार्थांसच उद्देश म्हणतात. त्यांचीं लक्षणें व परीक्षा या ग्रंथांत केली आहे. या सहा पदार्थांपैकीं विशेष हा एक स्वतंत्र पदार्थ आहे असें प्रतिपादिल्यावरून या मताच्या लोकांनां वैशेषिक हें नांव पडलें ('वैशेषिक' पहा). द्रव्याचे परमाणु असतात ही कल्पना प्रथम कणादानें काढली. तेव्हां वैशेषिक दर्शनांत प्रथमच परमाणुवादाची उपस्थिति झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**कणावार**—(चिनि) पंजाव. बशहर संस्थानांतील एक विभाग. उत्तर अक्षांश ३१° ७' ते ३२° ५ व पूर्व रेखांश. ७७° ४८' ते ७९° ४, क्षेत्रफळ १७३० चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १७७४१.

येथील लोक तिबेटी व हिंदु रक्ताचे आहेत. या लोकांनीं गुरख्यांच्या स्वाऱ्यांस मुळींच दाद दिली नाहीं. येथील लोकांत बहुपतीत्वाची चाल आहे. उत्तरेकडील भागांत बौद्ध धर्म असून दक्षिणेस हिंदुधर्म आहे.

**कणिक**—धृतराष्ट्राचा ब्राह्मण मंत्री. यानें धृतराष्ट्रास पांडवांविषयीं विपरीत बोध केला होता. (म. भा. आदिपर्व १४०). हा राजनीतीचें तत्व उत्तमप्रकारें जाणणारा, अत्यंत मसलती व सर्व मंत्र्यांमध्यें अग्रगण्य होता. यानें केलेला उपदेश कणिकनीति म्हणून प्रसिद्ध आहे. एखाद्या कुटिल योजनेला हा शब्द योजितात.

**कणियान**—यांनां कनिसन असेंहि म्हणतात. यांची वस्ती मद्रास, त्रावणकोर व कोचीन संस्थान यांतून आढळते. एकंदर लो. सं. (१९११) ३०९२०. हे जोशीपणाचा व वैदूचा धंदा करतात. जन्मपत्रिका पहाण्याकरितां, लग्न किंवा असल्याच दुसऱ्या धार्मिक विधींनां मुहुर्त काढून देण्याकरितां यांची गरज लागते. यांच्यांपैकीं पुष्कळ शाळामास्तर झाले आहेत. अस्पृश्य जातींत हे लोक सर्वांत जास्त शिकलेले आणि साधे आहेत. ते ९४ फुटांच्या आंत आल्यास श्रेष्ठ वर्णाचे लोक त्यांचा विटाळ मानतात.

त्रावणकोरमधील कणियानांत दोन वर्ग आहेत. साधे कणियान व तींट कणियान. पहिले जोसपण करतात व दुसरे छत्र्या करणें व भुताखेतांनां पळविणें हे उद्योग करितात. दोन्हीहि वर्ग तालिकेट्ट व संबंधम् संस्कार पाळतात.

**कणेथी**—पंजाव. बशहर संस्थानचें एक छोटें मांडलिक संस्थान. उत्तरअक्षांश ३१° ९' ते ३१° १८' व पूर्वरेखांश ७७° ३२' ते ७७°४०'. क्षेत्रफळ १९ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २८५४. उत्पन्न सुमारें ४००० रुपये. यांपैकीं सुमारें निम्में जंगलाचें उत्पन्न आहे. बशहर संस्थानास दरसाल ९०० रुपये खंडणीदाखल द्यावे लागतात.

**कणेर**.—मुंबई. काठेवाडांतलि एक छोटें संस्थान. लाखापादर ठाण्यांतील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. यांत फक्त कणेर हेंच मोठें गांव आहे. तालुकदार वाल जातीचा काठी आहे.

**कण्णेश्वर**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. हनगलच्या आग्नेयीस दहा मैलांवर हें खेडें असून येथील कण्णपाच्या देवळांत इ. स. १००५ आणि ११४५ सालींचे दोन शिलालेख आहेत.

**कण्व**, वै दि क.—वैदिक वाङ्मयांत उल्लेखिलेलें एक कुल व व्यक्ति. याच्यासंबंधीं माहिती ज्ञानकोश विभाग तीन, पूर्वार्ध पृ. ६८ व उत्तरार्ध पृ. ४८२-४८३ या ठिकाणीं पहावयास मिळेल.

पौ रा णि क—(१) केवलांगिरसवंशमालिकेंतील एक ऋषि व कुल.

(२) कश्यपकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. याचा आश्रम मालिनी नदीतीरीं असे. यास एक जी कन्या सांपडली होती तिचें नांव यानें शकुंतला असें ठेविलें होतें. शकुंतला शब्द पहा.

(३) (सो. वं.) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु तद्वंशीय अप्रतिरथ राजाचा पुत्र. यास मेधातिथि नांवाचा पुत्र होता.

**कण्व**.—मुंबई. भडोच जिल्हा.एक यात्रेचें ठिकाण. येथें कलंदासजी साधूच्या लांकडी पादुका आहेत. प्रतिवर्षी आक्टोबर महिन्यांत यात्रा भरते व ती तीन दिवस असते. कण्व येथील विहिरींच्या पाण्यापासून सर्पदंश व पिसाळलेल्या प्राण्यांचा दंश यावर उपयोग येतो असें म्हणतात. येथील देवाला कांहीं वर्षासन किंवा दुसरें कांहीं उत्पन्नाचें साधन नाहीं.

**कण्वल्ली**.—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. करजगीच्या आग्नेयीस सुमारें १० मैलांवर सुमारें दीड हजार लोकवस्तीचें एक गांव आहे. येथें परमेश्वर आणि भोगेश अशीं दोन जुनीं देवळें असून गांवांत एकंदर तीन शिलालेख आहेत.

**कण्विसिद्गेरी**.—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. कोडच्या आग्नेयीस दहा मैलांवर सुमारें तीनशें लोकवस्तीचें एक खेडें असून तेथील कण्विसिद्धेश्वराच्या देवालयांत इ. स.

११०८, ११५२, १२६५, १२६९ सालांचे चार शिलालेख आहेत.

**कण्हेर**—ह्यास संस्कृतमध्यें करवीर व मराठींत व गुजराथींत कण्हेर म्हणतात. हें फुलझाड प्रसिद्ध आहे. याची उंची सुमारें एक पुरुषभर असते. या झाडाच्या पांढरी, तांबडीं, गुलाबी व पिवळी अशा चार जाती आहेत. त्यांपैकीं पांढरा कण्हेर औषधाच्या कामीं जास्त गुणावह आहे. या झाडाचीं मुळें फार विषारी आहेत. कण्हेरीचीं पानें लांबट असतात. फुलांस वास नसतो.

उ प यो ग.—सर्प, विंचू व फुरसें यांच्या विषावर पांढऱ्या कण्हेरीचें मूळ उगाळून दंशावर लेप करावा. अथवा मूळ उगाळून शक्तीप्रमाण पाजावें; किंवा पानांचा रस पाजावा. कदाचित या उपायापासून ग्लानि आल्यास तूप पाजावें. उपदंश, विषमज्वर व मुळव्याध यांवरहि कण्हेरीचें मूळ उपयोगी पडतें.

**कण्हेर किल्ला**—मुंबई. पूर्वखानदेश. चाळिसगांव तालुक्यांत चाळिसगांवच्या नैऋत्येस ८ मैलांवर हें निसर्गतः मजबूत ठिकाण आहे.

**कण्हेरखेड**.-शिंद्यांचें मूळगांव. शिंदे येथील पाटील होते.

**कतारिया**—मुंबई. कच्छ वागदमधील एक खेडें. उ. अ. २३° ५'; पू. रे. ७०° ४२'. येथें एक ५०० वर्षांपूर्वीचें जैनमंदीर होतें. खेड्याच्या पश्चिमेस एका तळ्याच्या कांठीं वाळुकामय दगडांचें एक देऊळ असून त्याचें शिखर मनोऱ्याप्रमाणें आहे. तेथील एका लेखावरून हें देऊळ १६८२ त बांधलें असा पुरावा मिळतो.

**कथील**—( परमाणुभारांक ११७.६ ). कथील हें एक धातुरूप रासायनिक मूलद्रव्य आहे. ओतीव कथलाचा रंग पांढरा असतो. परंतु त्यावर थोडीशी निळसर छटा असते. तें चकचकीत असून हवेंत मुळींच गंजत नाहीं. ही धातु मऊ असून तीवर घण मारले असतां पातळ होत जाते. परंतु तिच्या अंगीं धारणशक्ति किंवा चिवटपणा फारसा नाहीं. ओतीव कथलाचें विशिष्ट गुरुत्व ७.२९ व वैद्युतिक रीतीनें तयार केलेल्या धातूचें ७·१४३ ते ७·१७८ पर्यंत असतें. ओतीव कथील रवेदार असतें, यामुळें कथलाची कांडी वांकवितांना एक प्रकारचा आवाज होतो. फार थंड जागीं ( ३९° सें. ) वराच वेळ ठेवल्यास कथील ठिसूळ होतें व खलबत्यांत घालून त्याची भुकटी करतां येते. नेहमींचें उष्णमान असतां कथलाच्या अंगीं थोडीबहुत तन्यता असते. उष्णमान वाढेल तसतशी ( १००° सें. पर्यंत ) ती वाढत जाते. लोखंडाच्या योगानें कथील कठीण व ठिसूळ बनतें. तांबें व शिसें यांच्या योगानें तिचा कठीणपणा व मजबुती हीं वाढतात; परंतु तिची घनवर्धनीयता कमी होते. २३०° श. ला कथील वितळतें व १६००° पासून १८००° श. पर्यंत उकळूं लागतें. त्याचा प्रसरणगुणक ( ०° ते १००° श. पर्यंत ) ०·००२७१७ व विशिष्ट उष्णता ०·०५६२ आहे. कथलाचें उष्णता व विद्युत्‌वाहकत्व अनुक्रमें १४५ ते १५२ व ११४·५ ते १४०·१ आहे. ( चांदीचें वाहकत्व १००० ).

यास संस्कृतांत वंग व त्रपु, हिंदींत कलई, मलायांत तिमा, ब्रह्मदेशांत क्ये-प-क्यू अशा तऱ्हेचीं नांवें आहेत. सर्व जगाच्या पाठीवर कथलाचा जेवढा खप होतो त्याच्या जवळ जवळ अर्धें कथील संयुक्त मलायासंस्थानांतून देतें. या ठिकाणची कथलाची खनिज धातु ही मुख्यत्वेंकरून ओढ्यांमधून सांटलेल्या कथलाच्या खनिज द्रव्यांचा सांठा होय. हल्लीं ब्रह्मदेशांतून ( वरमा ) हि कथलाचा वराच पुरवठा होतो. हीं कथलाचीं उत्पत्तिस्थानें म्हटलीं म्हणजे मर्गुई आणि तव्हॉय या नांवाचे प्रांत होत. इ. स. १९१३ सालीं ब्रह्मदेशामध्यें कथील आणि कथलाची खनिज धातु काढण्यांत आली. तिची किंमत ४६००० पौंड होती. हजारीबाग नांवाच्या परगण्यामध्यें कथलाची खनिज धातु सांपडत असल्याचें माहीत आहे. हजारीबाग येथील नोरुंगा खाणीमधून थोडीशी कथलाची खनिज धातु काढण्यांत आली आहे. इ. स. १९११ मध्यें सर्व जगावरील कथलाची उपज एकंदर ११८२०० टन होती. यापैकीं ५७९४४ टन मलाया द्वीपकल्पामध्यें पैदा झालें. या जगाच्या पाठीवर कथलाचा एकंदर पुरवठा जेवढा होतो, त्यापैकीं निम्म्याहून अधिक कथलाची उपज फक्त ब्रिटिश साम्राज्यांत होते.

खुद्द हिंदुस्थानांत कथील फार विरळ सांपडतें: ब्रह्मदेशांत, विशेषतः तेनासेरीमच्या दक्षिणभागांत मात्र कथलाची अशुद्ध धातु वरचि आहे. वावलेक संस्थान, करेण्णी, दक्षिण शानसंस्थानें व दक्षिणब्रह्मदेशाच्या तवॉय आणि मर्गुई जिल्ह्यांत नद्यांची वाळू धुवून कथलाचे दगड काढण्याचे प्रयत्नहि झाले आहेत. दक्षिण ब्रह्मदेशांत १८९८ ते १९०३ पर्यंत दरवर्षी सरासरी १६४५ हंड्रेडवेट अशुद्ध कथील निघे. पण १९१८ सालीं १५६०७ हंड्रेडवेट कथील निघालें. त्याची किंमत १५९७६७५ रुपये होती.

१९०६–७ सालीं परदेशाहून मुख्यतः स्ट्रेट्स सेटलमेंट मधून हिंदुस्थानांत २९४४०६१ रु. किंमतीचें २०३३६ हं. कथील आलें. आयात मालपैकीं जवळजवळ निम्मा बंगाल्यांत व बाकीचा मुंबई, ब्रह्मदेश व मद्रास येथें जातो.

ब्रह्मदेशांत निघणारें कथील गटांच्या रूपांत परदेशीं पाठवितात. बहुतेक निर्गत माल स्ट्रेट्समध्यें जातो. १९०३–४ मध्यें ३८८२९ रु. किंमतीचें ४८० हं. कथील निर्गत झालें. १९०६–७ पर्यंत निर्गत वरीच वाढली असून त्या वर्षी ७२३१२ रु. किंमतीचें ९२९ हं. कथील निर्गत झालें. मुंबईहून इराण व आशियांतील तुर्कस्थानांत कांहीं कथलाची पुनर्निर्गतहि होते.

ख नि ज क थि लः—अशुद्ध धातूपासून बहुतेक सर्व कथलाची उपज होते, आणि या कथलाची खनिजधातु मर्यादित प्रमाणांत असते. कारण खणून काढण्याइतकी पुष्कळ ती फारच थोड्या ठिकाणीं आढळते. [illegible] जी कथलाची खनिज धातु

आहे ती वंगपाषाण ( कॅसिटराइट् ) होय. या खनिज धातूचें विशिष्ट-गुरुत्व जवळ जवळ सात असल्यानें ती जडत्वाबद्दल प्रसिद्ध आहे. यामुळें या कथलाच्या खनिज धातूसारख्या ज्या दुसऱ्या पुष्कळ खनिज धातू सांपडतात, त्यांपासून ही ओळखतां येते. ही कथलाची खनिजधातु शुद्ध स्थितींत असली म्हणजे तींत धातुरूपानें कथील जवळ जवळ शेंकडा ७९ भाग असतें. जगाच्या सर्व पृष्ठभागावर वंगपाषाण ( कॅसिटराइट् ) हा वज्रतुंड (ग्रॅनाइट), गारेचे स्फटिक (क्वॉर्ट्झ), पॉरफायरी आणि ग्रीसेन हे जे ज्वालामुखींतून रसरूप होऊन आलेले आम्लरूपी ( ॲसिडिक ) खडक आहेत, त्या खडकांमधून शिरारूप किंवा दृष्टोत्पत्तीस येण्यासारख्या कणरूपानें चोहोंकडे पसरलेला आहे. याशिवाय जंबूर ( नीस ) नांवाच्या खडकामधून, अभ्रकाच्या खडकामधून ( मायकासिस्ट ) अथवा ( क्लोराइट सीस्ट ) नांवाच्या खडकामधून धातूच्या शिरा आढळतात. परंतु मुख्यत्वेंकरून या अशुद्ध कथलाच्या शिरा वज्रतुंड ( ग्रॅनाइट ) खडकाच्याच आसपास नेहमीं आढळतात. शिवाय अशुद्ध कथील धातू ही करणरूप आणि खड्यांच्या रुपानें ओढयाजवळील वाळूमध्यें आढळते. हिस "ओढयाचें कथील" असें म्हणतात. हे कथलाचे बारीक कण मूळ सांठलेल्या कथलाच्या दगडाचे क्षरीकरण होऊन झालेले असतात.

खनिज रूपानें जे वंगपाषाण आढळतात ते निरनिराळ्या वर्णांचे व रंगाचे असतात. जसें:—राखेसारखा करडा(ॲसग्रे), फिकट पिंगट (लाईट ब्राऊन), गुलाबी (पिंक), तृणमणीसारखा पिवळसर (अँबर यलो), काळसर पिंगट (डार्क ब्राऊन) आणि काळा (ब्लॅक). ज्यांचा वर्ण उजळ असतो ते वंगपाषाण साधारणतः अगदीं शुद्ध समजले जातात. या खनिज पाषाणाचें चूर्ण केल्यावर आणि त्यावर सिंधुकर्बनत्रिद (सोडियम सायनाइड )आणि पालाशकर्बनत्रिद (पोटयाशियम सायनाईड) यांची क्रिया करून विस्तवावर उष्णता दिली म्हणजे त्यापासून कथलाच्या धातूच्या बारीक पांढऱ्या मण्यासारख्या गोळ्या होतात. या घनवर्धनीय असतात.

या खनिज वंगपाषाणाशीं साधारणतः मिश्र झालेले पदार्थ असतात ते हे:—गार ( कार्ट्स ), पुष्पराग ( टोप्याझ ), ( टूर्मलाइन )चित्रखनिज, तुंगस्थाचे पाषाण ( वुल्फरॅम ), ( क्लोराइट ), लोखंड, तांबें आणि ताल यांचे गंधकित ( पायराइट्स ), ज्या खनिज द्रव्यांत प्लव ( फ्ल्युओरिन ) असतो त्या खनिज द्रव्याशीं हे वंगपाषाण मिश्र असतात. यावरून कथिल धातू ही वंगप्लविदाच्या रूपानें ( फ्ल्यूओराइड ऑफ टिन ) मूळ स्थितींत असली पाहिजे आणि या वंगप्लविदाचें पृथक्करण होऊन त्याशीं मिश्र असलेले खनिज पदार्थ तयार झाले असले पाहिजेत.

खनिज रूपांतून कथिल शुद्ध करण्याच्या रीती अवघड आहेत. प्रथम वंगपाषाण कुटून त्याची चांगली बारीक पूड केल्यावर वंगपाषाण आणि गंधकिद ( पायराइटिक मिनरल्स ) खनिज द्रव्यें यांचें एकीकरण करणें हें होय. हीं गंधकिद खनिज द्रव्यें भाजून चांगलीं धुतल्यावर कथलाची खनिज धातु बरीच शुद्ध स्थितींत येते. या स्थितींत कथलाच्या खनिज धातूला कृष्णवंग ( ब्लॅक टिन ) असें म्हणतात. या कथलाच्या खनिज धातूमध्यें जी तुंगस्थ पाषाणांची ( वोल्फरमाइट ) अशुद्धता असते ती काढणें प्राचीन काळीं फार त्रासाचें काम होतें. कारण याचें विशिष्ट गुरुत्व अतीशय असल्यामुळें तें कथलाच्या खनिज द्रव्यापासून काढणें फार जड जात असे. अलीकडे ही अडचण चुंबकीक ( मॅग्नेटिक ) पृथक्कारका ( सेपॅरेटर )च्या योगानें दूर झाली आहे. या प्रमाणें शुद्ध झालेली कथलाची खनिजधातु कोळशाशीं मिश्र करून भट्टींत वितळवितात. ही भट्टी दोन प्रकारची असते ( १ ) वायुभट्टी किंवा वक्रभट्टी, यानंतर कथलाचा रस करून तो चांगला उकळतात आणि नंतर त्याच्या मोठमोठ्या लगडी पाडून बाजारांत पाठवितात.

उ प यो ग.— कलाकौशल्यांत कथलाचा उपयोग पुष्कळ तऱ्हेनें करितात. कथलाचा पहिला उपयोग म्हटला म्हणजे भांड्यांस कल्हई करण्यास होतो. प्रस्तुत लोखंडाचीं मोठमोठीं भांडीं व छपरावर घालण्याचे पत्रे यांसहि कल्हई करण्यांत येते. हे कथलाच्या कल्हईचे पत्रे म्हणजे लोखंडाचे किंवा पोलादाचे पत्रे असतात ते पत्रे कथलाचा रस करून त्यांत बुडवून त्यावर पातळ थर बसविलेला असतो. शुद्ध कथलावर हवेचा परिणाम होऊन ते गंजत नाहीं त्याचप्रमाणेंच त्याजवर अम्लद्रवाचा (ॲसिड लिक्विड) जसें आसव, लिंबाचा रस, चिंच वगैरे यांचा परिणाम होत नाहीं. म्हणून स्वयंपाकांतील आणि घरकामांतील भांडीं कथलाचीं करितात. त्याशिवाय बाष्पीभवन करण्याचीं पात्रें ( इव्हॅपोरेटिंग बसीन्स ), काढे उकळण्याचीं भांडीं ( इनफ्यूजन पॉटस ) इत्यादि अनेक उपकरणीं करण्याकडे कथलाचा उपयोग करितात.

भांडीं, उपकरणीं वगैरेशिवाय कथलाचे वर्खासारखे पातळ पत्रेहि करितात. हे पातळ पत्रे दोन प्रकारचे असतात. अगदीं पातळ वर्खासारखे कथलाचे पातळ पत्रे असतात, त्यांचा उपयोग भिंगांस पारा चढविण्याच्या ऐवजीं करून आरसे करण्याकडे होतो. दुसऱ्या जातीचे पत्रे असतात त्यांचा उपयोग तंबाखूचे चिरूट, साबूच्या वड्या, चाकोलेटच्या वड्या वगैरे गुंडाळण्याकडे करितात.

कथलाचा उपयोग पुष्कळ प्रकारच्या मिश्र धातु (अलॉय) करण्याकडेहि होतो. जसें:—निरनिराळ्या प्रकारचें कांसें ( ब्राँझ ) म्हणजे तोफांची धातु ( गनमेटल ), घंटेची धातु ( बेलमेटल ), इत्यादि. यांमध्यें कथील तांब्याशीं मिश्र केलेलें असतें. याचें प्रमाण शेंकडा २० भाग कथील आणि ८० भाग तांबें असतें. कथील आणि शिसें हीं एकत्र वितळवून यांपासूनहि एक प्रकारची मिश्रधातु होते. या मिश्रधातूसहि मराठींत कांसें असें म्हणतात, परंतु इंग्रजींत यास प्युटर असें

नांव आहे. यांत कथील चार भाग आणि शिसें एक भाग वितळविलेलें असतें. पुष्कळ प्रकारचे डांक तयार करण्याकडेहि कथलाचा उपयोग होतो. अंज ( अँटीमनी ) आणि कथील वितळवून तयार केलेल्या मिश्रधातूस 'ब्रिटानिया' धातू असें म्हणतात. या धातूचा उपयोग चमचे, पळ्या वगैरे तयार करण्याकडे अतिशय होतो. "क्वीन्स मेट्ल" ही कथील, शिसें आणि अंज धातू मिश्र करून तयार केलेली असते. 'वॉविट्स मेटल' नांवाची धातू कथील, तांबें आणि अंज धातूची मिश्र केलेली असते. डांकाच्या (फ्यूजि-वलडांक लावण्याकरितां जलद वितळणारी धातु)धातूमध्यें कथील आणि शिसें यांच्या मिश्र धातूचा उपयोग केलेला असतो. कथील, शिसें आणि विस्मथ यांच्या मिश्रणापासून तयार केलेली मिश्र धातु पाण्याच्या उत्क्वथनांकापेक्षां कमी उष्णमानावर वितळते. त्याशिवाय कथलाचा उपयोग पांढरी जिल्हई, मिना ( कांचेसारखा मुलामा ), नकशी केलेलीं मातीचीं भांडीं (मॅजोलिका) वगैरे तयार करण्याकडे होतो. याशिवाय रंग देण्याच्या कामीं लागणारे निरनिराळे कथलाचे क्षार आणि इतर रासायनिक कला यांत कथलाचा उपयोग अतिशय होतो.

भां ड्या नां क ल्ह ई क र ण्या ची री तः—ज्या भांड्यांनां कल्हई करणें असेल तीं भांडीं स्वच्छ घांसून तीक्ष्ण टोंकाच्या हत्यारानें सर्व मळ व जुनी कल्हई खरडून काढावी, नंतर तें भांडें भट्टींत घालून खूप तापवावें. मग त्यावर कथलाची कांब थोडीशी फिरवावी व नवसागराची पूड सर्व भांड्यांत थोडी पसरून टाकून चिंध्यांच्या बोळ्यानें तें कथील त्या भांड्यास खूप चोळावें. कच्चें नवसागर पाण्यांत कढवून थंड करून त्याची पूड बनवितात ती या कामास उपयोगी पडते.

प न्हा ळ पा ड ले ले व सा धे लो खं डी प त्रे यां व र क ल्ह ई क र ण्या ची री तः—ही कल्हई दोन तऱ्हेची असते. शुद्ध कथील वितळून त्याचा पातळ थर देणें किंवा कथील व शिसें एकत्र करून त्या मिश्रणाचा थर देणें. पहिल्या जातीच्या पत्र्यास ( टिनप्लेट ) कथलाच्या कल्हईचा पत्रा व दुसऱ्या जातीच्या पत्र्यास टर्नप्लेट अशीं व्यापारी नांवें आहेत. ह्या कामास लागणारे पत्रे पोलादाचे असतात. पूर्वी लोखंडी पत्र्यांचाहि उपयोग करीत. परंतु अलीकडे पोलादी पत्र्यांवरच कल्हई चढवितात. ही कल्हई देण्याची फक्त बोहेमियांतील लोकांनांच माहिती होती. तेथून १६२० च्या सुमारास साक्सनींत त्या कलेचा प्रसार झाला. १६६५ त अंड्र्यू यारन्टन नांवाच्या एंजिनियरला इंग्लंडच्या लोकांनीं ही कला शिकण्याकरितां बोहेमियांत पाठविलें होतें. त्यानें मिळविलेल्या माहितीचा विशेष उपयोग झाला नाहीं. त्याच्या नंतर ५० वर्षांनीं ह्या कलेचा उत्कर्ष झाला व इंग्लंडमध्यें तयार झालेले पत्रे उच्च प्रतीचे ठरले. १८३४ पासून पुढें या धंद्याची फार भरभराट झाली. या कामाकरितां पत्रे प्रथम तापवितात व स्वच्छ घांसून गंधकाम्ल घातलेल्या पाण्यांत अगदीं स्वच्छ व चकचकीत होईपर्यंत ठेवितात. नंतर पाण्यांत धुवून अॅसिडचा व पाण्याचा अंश शिल्लक न रहावा म्हणून खोवरेल तेलांत पत्रे शिजवितात व त्यानंतर वितळलेल्या कथलाच्या कढत्या मिश्रणांत ते बुडवितात. नंतर पहिल्यापेक्षांहि जास्त शुद्ध असलेल्या कथलाच्या दुसऱ्या मिश्रणांत कांहीं वेळ पत्रे राहूं देतात. नंतर अंबाडीच्या बोळ्यानें स्वच्छ घांसून ते पत्रे पुन्हां तिसऱ्यांदा कथलाच्या मिश्रणांत बुडवितात. म्यणजे त्यावर पुरी कल्हई होते. याच पद्धतीनें टर्नप्लेट तयार करतात.

औ ष धि उ प यो गः—आर्यवैद्यकांत वंगभस्माचे उपयोग पुष्कळ सांगितले आहेत. हें भस्म करण्याची रीति शार्ङ्गधर नांवाच्या वैद्यकग्रंथांत पुढीलप्रमाणें दिली आहेः—मातीचें खापर चुलीवर ठेवून त्यांत कथलाचा रस करावा. मग चिंचेची साल व पिंपळाची साल या दोन्ही सालींचें चूर्ण कथलाचा ¼ हिस्सा घेऊन कथलाच्या रसावर थोडें थोडें टाकीत जावें, नंतर लोखंडाच्या पळीनें घोंटावें. याप्रमाणें सुमारें दोन प्रहर घोटल्यास कथलाचें भस्म होतें. त्या भस्माच्या समभाग हरताळ घेऊन कागदी निंबाच्या रसांत दोहोंचा खल करून मातीच्या परळांत घालून मातीकापड करावी व खड्डा खणून रानगोंवऱ्याचा गजपुट अग्नि द्यावा. याप्रमाणें दहा अग्निपुटें दिलीं असतां कथलाचें भस्म उत्तम होतें. यालाच वंगभस्म म्हणतात. हें अनुपानपरत्वें निरनिराळ्या व्याधींवर उपयोगी पडतें.

इ ति हा स.—फार प्राचीन काळापासून कथलाची माहिती सांपडते. ऐतिहासिक कालापूर्वी हजारों वर्षें या धातूचा उपयोग कांसें ( ब्राँझ ) तयार करण्याकडे होत होता. मानवी जातीची उन्नति आणि कांसें याचा फार निकट संबंध आहे. पाषाणयुगानंतर लोहयुगाचा आरंभ होण्यापूर्वी कांस्ययुगाचा आरंभ झाला. यूरोपमध्यें इ. स. पूर्वी २००० ते १८००च्या दरम्यान कांस्ययुगाचा आरंभ झाला असावा असें पुष्कळ संशोधक पंडितांनी निश्चित केलें आहे. यावरून हें स्पष्ट आहे कीं या पुरातन कालीं यूरोपमध्यें कथलाच्या धातूची माहिती होती. परंतु तांब्याची आणि कथलाची अशुद्ध खनिज धातु एकत्र वितळवून किंवा तांबें आणि कथील या शुद्ध धातू एकत्र वितळवून कांसें तयार करीत असत कीं नाहीं हें निश्चित माहीत नाहीं. पुष्कळ संशोधक पंडितांनीं अशी एक उपपत्ति पुढें आणिली आहे कीं, मनुष्याला कांसें तयार करण्याची माहिती ही केवळ आकस्मिक रीतीनें झाली असावी. कथील, तांबें, लोखंड आणि गंधक यांचे संयुक्त असलेले खनिज पायराइट नांवाचे पदार्थ ( गंधाकिदें ) हे सृष्टीमध्यें पुष्कळ सांपडतात, ते आणि एक जातीचें दुर्मिळ असणारें खनिज द्रव्य यांचें मिश्रण होऊन तें अकस्मात कोळशाच्या उष्णतेनें वितळण्यांत आलें असावें. आणि त्यापासून कांसें तयार झालें असावें. परंतु रसायन शास्त्राच्या दृष्टीनें आणि कलाविज्ञानशास्त्राच्या दृष्टीनें ही कल्पना सयुक्तिक वाटत नाहीं. अशीहि एक कल्पना पुढें मांडण्यांत

येते कीं प्रागैतिहासिक कालाच्या आधीचें कांसें हें नाना प्रकारच्या तांब्याच्या खनिज अशुद्ध धातू आणि पुष्कळ सांपडणारे कथलाचे खनिज दगड हे एकत्र वितळवून तयार करीत असत. ही जर कल्पना खरी मानिली तर चिनी कांसें खेरीजकरून बाकीच्या सर्व प्राचीन कांस्यामध्यें शेंकडा १० प्रमाणांत कथील आणि शेंकडा ९० प्रमाणांत तांबें असतें याचें समाधानकारक स्पष्टीकरण होण्यास अडचण पडते. शिवाय धातुविद्येच्या दृष्टीनें पाहतां हल्लींप्रमाणें दोन धातू एकत्र वितळवूनच आपल्या पूर्वजांनीं प्रथम कांसें तयार केलें असलें पाहिजे हेंच मत ग्राह्य मानावें लागतें. याशिवाय कांहीं प्रांतांतील झऱ्यांत कथलाची अशुद्ध धातु विपुल सांपडते आणि तिजपासून कथील धातुरूपांत सहज काढतां येते. या गोष्टीचा विचार करितां कांस्ययुगांतील सुसंस्कृत माणसांस कथील हें धातुरूपांत माहीत असलें पाहिजे हीच कल्पना अधिक संभवनीय दिसते. स्वित्झर्लंड देशांत जीं सरोगृहें होतीं त्यांत कथलाच्या पातळ पत्र्यांनीं मढविलेले कांहीं पदार्थ, मातीचीं भांडीं आणि मोगरे ( नॉब्स ) सांपडलेले आहेत. त्याचप्रमाणें श्लेसविग् हॉलस्टिन जवळील आमरूम बेटावरील प्राचीन कबरस्थानांत कथलाच्या निरनिराळ्या प्रकारच्या वस्तू सांपडलेल्या आहेत.

इजिप्त देशांत दहा भाग कथील असलेल्या कांस्याचा उपयोग बऱ्याच प्राचीनकाळीं म्हणजे बाराव्या राजघराण्याच्या कारकीर्दींत निरनिराळ्या प्रकारचीं हत्यारें व इतर कामाकरितां करीत असत. तांबें आणि कथील यांची मिश्र किंवा जोडधातु ही तांब्यापेक्षां अधिक कठिण असते, म्हणून तिचा उपयोग तरवारी, भाले आणि कुऱ्हाडी करण्याकरितां करीत असत.

हिंदुस्थानांत वेदकालीं कथील माहीत होतें. सोनें आणि रुपें यांशिवाय कथलाचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत व शुक्ल यजुर्वेदांत आला आहे. उदाहरणार्थ "सीसंचमे त्रपुश्चमे लोहंचमे" ( तै. सं.४.७,५ ) त्याचप्रमाणें छांदोग्यउपनिषदामध्यें (४.१७,७) कथलाचा उल्लेख आहे. उदाहरणार्थ लवणेन सुवर्णं संदध्यात्, सुवर्णेन रजतम्, रजतेन त्रपुं (कथील), त्रपुणासीसम्, सीसेन लोहम्, लोहेन दारु, दारु चर्मणा ।

फार प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत तांबें आणि कथील एकत्र वितळवून तयार केलेल्या कांस्याचा उपयोग माहीत होता. उदाहरणार्थः—"यथा त्रपुस्ताम्रयोः संयोगे धात्वन्तरस्य कांस्यस्योत्पत्तिः" मनुसंहितेमध्यें घरांत उपयोगी पडणाऱ्या कथलापासून केलेल्या भांड्याचा उल्लेख आलेला आहे. परंतु या कामीं लागणारें कथील कोणच्या ठिकाणाहून आणीत असत याचा उल्लेख केलेला नाहीं. बहुतकरून सयाम, ब्रह्मदेश आणि मलाया द्वीपकल्प येथून सदर कथलाचा पुरवठा होत असावा.

यूरोपमधील प्राचीन पूर्वज ज्या कथलाचा उपयोग करीत असत, तें बहुतेक सर्व कथील फिनिशियन लोकांनीं कॅसिटराइड्सकडून आणलेलें असे. या कॅसिटराइड्सचें स्थान कोणतें असावें यावद्दल पुष्कळ कल्पना करण्यांत आलेल्या आहेत; आणि पुष्कळ विद्वान पंडितांनीं असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, कॅसिटराइड्स नांवाचीं बेटें हिंदुस्थानच्या जवळच आसपास फिनिशियाच्या पूर्वेस कोठें तरी असावीत. पुराणवस्तुशास्त्रज्ञ पंडितांपैकीं पुष्कळांचें असें मत आहे कीं, कॅसिटराइड्स नांवाचीं बेटें हीं सिलिआइल्स आणि चॅनेल आयलंड्स हींच होत, व त्यांत मुख्यत्वेंकरून कॉर्नवॉल हेंच असावें. कारण त्या कालीं मुख्य बेटापासून हें निराळें मानण्यांत येत असे. कथील या अर्थी ग्रीक शब्द कॅसिटरॉस हा आहे; आणि कॅसिटरॉस हा शब्द हिब्रू शब्द कत्सेह = शेवट या अर्थींच बहुतेक असावा. या ठिकाणीं शेवट याचा अर्थ पृथ्वीचें टोंक असा आहे आणि ब्रिटन देशाचा किनारा हा पूर्वजांस तसा वाटणें हें शक्य आहे. कास्तीर हा शब्द सं. काश् = प्रकाशणें यापासून झाला असून, कास्तीरपासून अरबी शब्द कास्दीर हा झाला आहे ( थॉर्प—हिस्टरी ऑफ केमिस्ट्री पु. १ पहा ).

अर्वाचीन यूरोपियन भाषांमध्यें कथील यास निरनिराळीं नांवें आहेत. जसें:—झिन, टिन, इटेन स्टॅग्नो, एस्ताना इत्यादि; हीं सर्व नांवें केल्टिक धातु 'इस्तइन' यापासून निघालेलीं आहेत. यावरून फिनिशियन लोकांचें कॅसिटराइड्स म्हणजे कॉर्नवॉल असावें या उपपत्तीला बळकटी येते. प्रस्तुत कॉर्नवालमधील कथलाच्या खाणींतलि उपज फार अल्प प्रमाणावर आहे.

प्राचीन कालीं कथलाच्या वस्तू फार तुरळक होत्या याचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कारण कथलाची फार चमत्कारिक विकृति होते किंवा त्या धातूसच प्रत्यक्ष संसर्गजन्य रोग होतो हें प्रस्तुत माहीत आहे. कथलाची ही विकृति दुसऱ्या धातूंच्या विकृतीप्रमाणें नसते.

लोखंड आणि तांबें रासायनिक क्रियेनें हवेंतलि प्राणवायु ( ऑक्सिजन ) आणि पाणी यांशीं संयुक्त होऊन त्यापासून नवीन संयुक्त पदार्थ उत्पन्न होतात. लोखंडाचें उत्प्राणिद ( हायड्रॉक्साइड ) होतें आणि तांब्याचें जलयुक्त कर्बित ( मॅलचाइट ) होतें. परंतु कथलावर कांहीं रासायनिक क्रिया घडत नाहीं. तें धातुरूप कथलाच्याच रूपांत रहातें, परंतु तें हलके हलके बुऱ्या रंगाचें होऊन रजोरूप बनतें व त्याची भुकटी होते. अतिशय थंडी आणि आर्द्रता यांच्या योगानें ही कथलाची विकृति लवकर घडून येते. परंतु ती निर्जल स्थितींतहि घडते. या कथलाच्या विकृतीला "कथलाची सांथ" असें योग्य व अन्वर्थक नांव उट्रेक्टचा प्रोफेसर अर्नेस्ट कोहेन यानें दिलें आहे. एखाद्या कथलाच्या भांड्यावर या कथलाच्या सांथीचा हल्ला झाला म्हणजे त्या भांड्याचें संरक्षण करणें अशक्य होतें. कारण ती विकृति कथलांत पसरत जाते आणि तें ठिसूळ होऊन शेवटीं त्याची भुकटी होते. या कथलाच्या पुढीच्या अंगीं,

दुसरीं कथलाचीं भांडीं जवळ असल्यास त्यांसहि स्पर्शाच्या योगानें ही सांथ त्यांत उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असतें. असें होतां होतां अगदीं सन्निध असणारीं कथलाचीं सर्व भांडीं नाश पावतात. या प्रकारें कथलाचा नाश झाल्याचीं पुष्कळ उदाहरणें माहीत आहेत. उदाहरणार्थः इ. स. १८६८ सालीं पेट्रोग्रॅड येथील जकात खात्याच्या इमारतींतील कोठारांत ठेवलेल्या ब्लांका कथलाच्या (श्वेतवंगाच्या) लगडी सर्व पिष्टरूप झालेल्या आढळल्या; आणि रशियाच्या सरकारी दारुखान्यांत लढाईच्या प्रसंगीं घालण्यांत येणारे एकसारखे पोशाख ( युनिफॉर्म ) यांस लावण्याच्या कथलाच्या गुंड्यांचे ढीग होते त्या ठिकाणीं पिठाचे लहान लहान ढीग आढळले! इ. स. १८७७ च्या हिंवाळ्यांत रॉटरडॅम येथून आगगाडीनें मास्कोला पाठविलेलें सर्व कथील भुकटीच्या रूपात आलें. फिनलंड येथील ख्रिस्त देवालयांतील वाजविण्याच्या पेट्यांनां असलेल्या कथलाच्या नळ्या त्याचप्रमाणें घराच्या छपरावरील कथलाचे पत्रे यांस वारंवार कथलाच्या सांथीचा विकार झालेला आहे.

कथलाची अशी विकृति होण्याचें खरें कारण पुष्कळ दिवसपर्यंत माहीत नव्हतें. प्रथम अशी कल्पना होती कीं, ही विकृति अशुद्ध हवेमुळें घडत असावी. दुसरी अशीहि कल्पना करण्यांत येत होती कीं, घरावरील छपरें आणि गाण्यावजावण्याचीं यंत्रें ( जसें अलगुजें, पावे वगैरे ) हीं जशीं वारंवार हलविलीं जातात त्याचप्रमाणें कथील धातूवर अविरत हालण्याची क्रिया घडल्यामुळें ही विकृति घडत असावी. परंतु फ्रिट्स येथील अन्स्ट कोहेन आणि व्होन इजिक यांनीं केलेल्या प्रयोगांवरून असें सिद्ध झालें आहे कीं, कथील धातूवर घडणारी विकृति ही त्याच्या अंतस्थ स्फटिकीय घटनेचें अवस्थांतररूपच होय; आणि यामुळें कथलाच्या आकारमानाची ( व्हॉल्यूम ) द्रव्य वृद्धि होते. ही विकृति गंधकाच्या स्फटिकाच्या रूपांत ज्याप्रमाणें होते त्यासारखीच आहे. गंधकाचे चौकोनी सुईसारख्या आकाराचे लांब स्फटिक प्रथम असतात. त्यांचें रूपांतर सावकाशपणें घडून त्यांचे अष्टपैलू स्फटिक होतात. त्याचप्रमाणें कथलाच्या बाबतींत त्याच्या स्फटिकाचा आकार बदलतो. परंतु तो फार सावकाश घडून येतो इतकेंच. हे गंधकाचे अष्टपैलू स्फटिक उष्णतेच्या योगानें ज्याप्रमाणें चौकोनी रूपांत पुन्हां पूर्ववत् आणतां येतात, त्याचप्रमाणें ही कथलाची कवरी रंगाची पूड उष्णतेच्या योगानें पांढऱ्या शुभ्र कथील धातूच्या रूपांत आणतां येते.

[ मॉडर्न रिव्ह्यू. जुलै १९१७. ए. ब्रि. वाट. देशी वैद्यक ग्रंथ. दत्त—मटी. मेडिका ऑफ दि हिंदूज, इत्यादि. ]

**कॅथे**—कॅथे ह्या नांवानें चीन देश मध्यकालीन यूरोपांत प्रसिद्ध असे. काव्यांत हेंच नांव प्रचलीत आहे. खितानांनीं उत्तर चिनांत (९०७) खिताई अथवा खितात राज्य स्थापिलें. याच नांवावरुन कॅथेची व्युत्पत्ति असावी. या घराण्याचा ऱ्हास झाल्यावर कॅथे हेंच नांव कायम राहिलें. मध्यआशियांतील राष्ट्रें हेंच नांव सर्वच चीन देशाला लावीत. किताई हें नांव रशियन लोक चीनला अद्यून देखील लावतात. चेंगीझखानाच्या कर्तबगारीबरोबर कॅथे हें नांव यूरोपांत पसरलें. यूरोपियन नाविकांनीं दक्षिण चीन देश शोधिल्यानंतर कॅथे हा देश चीनच्या उत्तरेस असावा असा खोटा समज होता.

**कॅथेराइन**—रशियाची महाराणी कॅथेराइन ( दुसरी ). ही ॲनहॅल्ट झर्वस्ट( जर्मनी )चा राजा ख्रिश्चन आगस्टस याची ही कन्या. ही इ. स. १७२९ त जन्मली. हिचा बाप प्रशियांत सेनापति होता. हिचें बाप्तिस्म्यांतील नांव 'सोफिया आगस्टा फ्रेडरिका' असें होतें. फ्रेंच शिक्षकिणींकडून हिला शिक्षण मिळालें. १७४४ त तिचें रशियाच्या इलिझाबेथ महाराणीच्या पीटर नामक पुतण्याशीं लग्न ठरलें. प्राशिया व रशिया यांची मैत्री दृढ करून आस्ट्रियाचें वजन कमी करणें हा या लग्नाचा हेतु होता. या मुलीनें इलिझाबेथ, पीटर व इतर रशियन लोक या सर्वांची मर्जी संपादिली. तिनें रशियन भाषेचा आस्थापूर्वक अभ्यास केला. प्राटेस्टंट धर्माचा स्वीकार न करितां ग्रीक चर्चचा तिनें स्वीकार केला. त्याच वेळीं तिचें दुसरें नांव ठेवण्यांत आलें. रशियाचा मुगुट धारण करण्याकरितां ज्या ज्या गोष्टी कराव्या लागतील त्या त्या गोष्टी करावयाच्या असा तिनें वयाच्या १५ व्या वर्षीच निश्चय केला होता. १७४५ त सेंट पीटर्सबर्ग येथें तिचा विवाह झाला.

आपण कोणत्याहि इंग्लिश स्त्रीप्रमाणें मोकळया मनाच्या व कल्पक आहोंत असें तिला वाटत असे राशियाचें राज्य करण्याकरितां आपण अगदीं रशियन बनलें पाहिजे असा तिनें निश्चय केला. तिनें रशियन भाषेचा व रशियन लोकांच्या स्वभावाचा नीट अभ्यास केला. विवाहाच्या योगानें तिला कांहींच सुख प्राप्त झालें नाहीं. कारण तिचा पति पीटर हा नीच, दुष्ट, दुर्व्यसनी व कुरूप होता. तो रशियन लोकांचा द्वेष्टा होता. अशा परिस्थितींत कॅथराइनचें आचरणहि अगदीं नीतिबाह्य झालें. अनेक लोक तिचे प्रियकर होते. तिच्या कर्तृत्वशक्तीमुळें तिच्या नवऱ्याला संकटसमयीं तिच्यावर अवलंबून रहावें लागे. तथापि ती वेळ निघून जातांच तो अनेक प्रकारें तिचा छळ करीत असे. जरी तो तिचा द्वेष करी तरी तिची त्याला भीति वाटत असे. १७६२ त इलिझाबेथ मरण पावल्यानंतर पीटर हा गादीवर बसला. परंतु आपल्या होल्स्टीनेर अनुयायांबरोबर तो ओरॅनिंबाम येथें गेला असतां रशियन लोकांनीं त्याला पदच्युत करून कॅथेराइनला महाराणी केलें; कारण पीटर हा अगदीं अप्रिय झाला होता. त्याला रोपशा येथें पाठविण्यांत आलें. तेथें तो लवकरच मरण पावला. कॅथेराइननें आपल्या प्रियकरांच्या साहाय्यानें त्याचा खून केला असावा असें म्हणतात.

गादीवर कांहीं एक हक्क नसतां कॅथेराइननें इ. स. १७६२ पासून १७९६ पर्यंत लोकप्रियता संपादून राज्य केलें व शेजारच्या देशांकडून मानमान्यता मिळवून आपली वाहवा करून घेतली. यावरून तिचें कर्तृत्व दिसून येतें. व्होल्टेअर व इतर ज्ञानकोशकारांनां तिनें मोठमोठ्या देणग्या दिल्यामुळें त्यांनीं तिची खूप स्तुती केलेली आहे. ती मोठी तत्त्वज्ञानी होती असें त्यांनीं लिहिलें आहे. परंतु ज्ञानकोशकारांचें वर्णन व तिचें प्रत्यक्ष आचरण यांमध्यें महदंतर होतें. कलाकौशल्याच्या व अपूर्व वस्तूंच्या संग्रहासाठीं तिनें फार खर्च केला. मात्र चित्रकला, शिल्पकला व संगीतशास्त्र यांची तिला आवड नव्हती हें तिनेंच स्वतः कबूल केलें होतें. लेखनकलेची तिला फार आवड होती; तिनें फ्रेंच व रशियन भाषेंत कित्येक लेख व नाटकें लिहिलेलीं आहेत. तिचे लेख जोरदार असून दूरदृष्टीनें लिहिलेले असत; तथापि तिला शुद्ध फ्रेंच किंवा रशियन लिहितां आलें नाहीं. दरबारच्या स्त्रियांचें गैरशिस्त वर्तन तिला बिलकुल खपत नसे. ती परोपकारी असून आपल्या लोकांनां सुसंस्कृत करण्याची तिनें खूप खटपट केली असें ज्ञानकोशकारांनीं म्हटलें आहे. सरकारी कामांत अधिकाऱ्यांची चूक झाल्यास ती त्यांचे अवयव तोडून त्यांस छिन्नविछिन्न करण्याची आज्ञा करीत असे. राजवाड्यांत १७६२ त जी क्रांति झाली, त्यापूर्वी थोडे दिवस तिला एक पुत्र झाला होता; तो पीटरपासून झालेला नसल्यामुळें तिनें त्याला त्याची नीट व्यवस्था लावून दूर पाठविलें. मात्र पीटरपासून झालेला तिचा एक खराखुरा मुलगा होता. पण तो बापासारखाच दुष्ट असल्यानें त्याला गादीचा वारस न करतां नातवाला केलें होतें. ती मोठी मुत्सद्दी होती यांत संशय नाहीं. कोणत्याहि ठरींव पद्धतीप्रमाणें वागणें तिला आवडत नसे. परिस्थितीप्रमाणें राजानें आपलें धोरण बदलावें असें तिचें मत होतें. एकंदर परिस्थितीचा विचार केला असतां परकीय देशांशीं तिनें ठेवलेलें धोरण योग्य होतें असेंच म्हणावें लागतें. रशियावर व रशियन लोकांवर तिचें प्रेम असून त्या देशाची उन्नति करण्याचा तिनें प्रयत्न केला ही गोष्ट निर्विवाद आहे. पोलंडच्या फाळणीची कल्पना तिनें सुचविलेली नव्हती असें आतां सिद्ध झालें आहे. एखाद्या मांडलिक राजाच्या तर्फेनें पोलंडवर आपला ताबा ठेवणें कॅथेराइनला पसंत पडलें असतें. पहिल्या फाळणींत आस्ट्रिया व प्रशिया यांचें विशेष अंग होतें. पोलंडच्या दुसऱ्या फाळणींत तिनें बिनदिक्कत भाग घेतला; परंतु प्रशियाच्या इतका निष्ठुरपणा तिनें दाखविला नाहीं.

कॅथेराइनचें प्रशियाशीं सख्य होतें व फ्रेडरिक दि ग्रेटबद्दल तिला आदर वाटत असे; परंतु त्याच्या मृत्यूनंतर ती प्रशियाचा द्वेष करूं लागली.

ग्रीक साम्राज्याचें पुनरुज्जीवन करण्याचें तिच्या मनांत होतें. परंतु फ्रान्स व इंग्लंड यांनीं विरोध केल्यामुळें व प्रशिया व आस्ट्रिया यांची तिला भीति वाटत असल्यामुळें तिनें तो आपला बेत रहीत केला. देश जिंकण्याचे अनेक बेत तिनें केले. सैन्यांत घालावें तितकें लक्ष तिनें घातलें नाहीं. वास्तविक लष्कराच्याच साहाय्यानें ती स्वतः गादीवर आली होती. शांततेच्या वेळीं तर तिनें सैन्याची हयगय केलीच परंतु युद्धाच्या वेळींहि तिनें त्याची चांगली व्यवस्था ठेवली नाहीं. आपल्या चहात्या लोकांनां तिनें सेनापति नेमलें होतें. स्वीडिश लोकांशिवाय कवाईत शिकलेल्या कोणत्याहि लोकांशीं तिनें युद्धप्रसंग आणला नाहीं. आपल्या आपक लोकांवर सरकारी पैशांची ( १८ कोट रु. ) व अधिकारांची खैरात करून तिनें आपल्या नांवास काळिमा लावून घेतला. ६१ व्या वर्षीं सुद्धां तिला प्रेमाचे चाळे सुचत होते! हिंदुस्थानावर तिबेटमार्गें स्वारी करण्यासाठीं तिनें २०००० सैन्य पाठविण्याचें ठरविलें होतें. परंतु थोड्याच दिवसांत रक्तजमूर्छा होऊन ती १७९६ त मरण पावली.

**कदन.** —नेलियम्पती आणि परंबिकोलम् येथें राहणारी एक डोंगराळ जात. मद्रास व कोचीन संस्थान यांतून हे लोक आढळतात. एकंदर लोक सं. ( १९११ ) १२३८. पैकीं बरेच वन्यधर्मीय आहेत.

हे लोक ठेंगणे पिळदार बांध्याचे असून त्यांचा वर्ण अतिशय काळा आहे. त्यांचे ओंठ जाड असून केस कुरळे असतात. त्यांच्या भाषेचें तामिलीपेक्षां मल्याळीशीं जास्त साम्य आहे. ते उत्तम माग काढणारे आणि झाडांवर चढणारे आहेत. रानांतील लहान सहान वस्तू जमा करण्यामध्यें त्यांचा चांगला उपयोग होतो. हंगामांत मक्तेदारानें दिलेल्या तांदुळावर व इतर वेळेस जंगली याम किंवा दुसऱ्या वस्तू किंवा जी जनावरें त्यांनां सांपडतील त्यांवर ते उदरनिर्वाह करितात.

**कदंब आणि कादंब**—हीं एकासारखीं एक नांवें धारण करणारीं तीन घराणीं होतीं. त्यांपैकीं पहिलें जास्त जुनें होतें; तें कदंब हें नांव धारण करीत असे. व नंतरचीं दुसरीं दोन घराणीं कादम्ब या नांवानें ओळखिलीं जात असत.

यांतील सर्वांत जुनें कदंब घराणें हें पलाशिका ( बेळगांव जिल्ह्यांतील हळसि ) येथें व उत्तर कानड्यांतील वैजयन्ति अथवा वनवासी येथें होतें. यांच्या निरनिराळ्या दानलेखांवरून त्यांची वंशावळ पुढीलप्रमाणें तयार होते. ( वंशावळ नंबर १ पहा. ) लेखांच्या अखेरीस वंशावळी दिल्या आहेत.

कदंब राजांपैकीं कोणाचाहि नक्की काल समजत नाहीं. शिलालेखांत अथवा दानपत्रांत त्यांच्याविषयीं जे उल्लेख आढळतात त्यांत कालगणना कोणत्याहि शकाप्रमाणें केलेली नसून 'कारकीर्दीच्या असुक वर्षीं' एवढेंच लिहिलेलें असतें. यामुळें त्यांचे काल ठरवितां येत नाहींत. मि. राइस यांनीं ज्या उल्लेखांच्या आधारावर कृष्णवर्मादि कदंबांचे काल ठरविलेले आहेत ते उल्लेखच फ्लीट याच्या मतें बनावट असल्यामुळें ते काल बरोबर धरतां येत नाहींत. फ्लीट याच्या मतें कदंबांसंबंधीं तूर्त एवढेंच बिनधोक म्हणतां येईल कीं ते इ. स. च्या सहाव्या शतकाच्या सुमारास होऊन गेले असावे.

यांपैकीं मृगेश्वरवर्मा याच्या एका शिलालेखांत त्याच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षास पौष असें म्हटलें असून आठव्या वर्षास वैशाख असें म्हटलें आहे. व वर्षाचे काल जुन्या पद्धतीप्रमाणें धरले आहेत. त्यावरून मि. राइस याच्या मतानें काकुत्स्थ ( इ. स. ५३८ ), मृगेश ( इ. स. ५७० ) व भानु ( इ. स. ६०० ) याप्रमाणें हे राजे होऊन गेले.

मि. फ्लीट हा ज्या शिलालेखावरून काकुत्स्थ याचा काल ठरविला आहे, त्याच्या खरेपणाबद्दल संशय प्रदर्शित करून " चालुक्य राजा कीर्तिवर्मा पहिला यानें इ. स. ५६७ मध्यें कदंबांस जिंकण्यापूर्वी हे तिघे राजे इ. स. ५ व्या शतकांत होऊन गेले असावे " असें म्हणतो.

देवगिरी येथील शिलालेखांत कृष्णवर्मा व त्याचा पुत्र देववर्मा यांचीं नांवें आढळतात. हे दोघे या तीन राजांच्या पूर्वी किंवा नंतर होऊन गेले याबद्दल नक्की सांगतां येत नाहीं. कृष्णराजाची बहीण गंगराजा माधव दुसरा यास दिली होती. हे कदंब राजे चालुक्य राजांप्रमाणें हारितिपुत्र मानव गोत्री होते व जैन धर्मी होते.

बनवासी व हानगल येथील कादंब.—हे वरील कदंबांचे वंशज नसावेत असें यांच्या नांवांतील फरकावरून दिसतें असें मि. फ्लीट याचें मत आहे. वंशावळ नंबर २ ( पहा ) ही मि. विल्सन यांच्या यादीवरून मि. राइस यानें सुधारून वाढविलेली आहे. ती घराण्याच्या मूळपुरुषांची असून काल्पनिक किंवा पौराणिक असावी.

वंशावळ नंबर ३ (पहा) ही शिलालेखांवरून केलेली आहे. तिच्याहि खरेपणाबद्दल कांहीं आधार नाहीं. मि. फ्लीट यांनीं असें दर्शविलें आहे कीं, राष्ट्रकूटांच्या बऱ्याच शिलालेखांवरून असें दिसतें कीं, बनवासी येथें कादंबवंशापूर्वी इ. स. ९४७ पर्यंत तरी निदान महामंडलेश्वर हें उपपद धारण करणारा वंश राज्य करीत होता.

वंशावळ नंबर ४ (पहा) ही यांच्या पुढील असून बहुतेक बिनचूक असावी. परंतु मि. फ्लीट याचें असें म्हणणें आहे कीं, तिच्यांतील पहिलें ऐतिहासिक नांव म्हणजे कीर्तिवर्मा(दुसरा) हें ५ होय. या शिलालेखांत आपणास असें आढळतें कीं, इ. स. ११३५ मध्यें होयसल बल्लाळ विष्णुवर्धन यानें हानगल शहरास वेढा देऊन कादंबांपासून बनवासी व. हानगल हे दोन परगणे मिळविले. इ. स. ११९६ मध्यें होयसल बल्लाळ ( दुसरा ) यानें हानगल शहरास वेढा दिला पण त्यास कामदेवानें हांकून दिलें. मि. फ्लीट याच्या मतानें बल्लाळ ( दुसरा ) यानें लवकरच कादम्बांचा पूर्ण पराभव करून त्यांचा प्रदेश आपल्या राज्यास जोडला. याबद्दल कामदेव हा इ. स. १२०३–४ या सालीं बल्लाळाबरोबर झगडत होता; यापेक्षां याची जास्त माहिती मिळत नाहीं.

गोवा येथील कादंब.—हें एक तिसरेंच कदंबांचें घराणें असून यांचा बनवासी येथील कादंबाशीं कांहीं संबंध असावा; पण तो कोणता हें अद्याप कळलें नाहीं. यांनीं गोवा व हलसि ( पलाशिका ) येथें राज्य केलें. ( वंशावळ नं. ५ पहा. ) यांच्यापैकीं षष्ठदेव ( पहिला ) व जयकेशिन् ( पहिला ) हे चालुक्यांचे ( पश्चिम ) मांडलिक होते. गोव्याचा कादंब, पहिला षष्ठदेव, चट्ट, चट्टल अथवा चट्टय, हा पश्चिम चालुक्य जयसिंह ह्याचा मांडलिक होता; असें या शिलालेखांत म्हटलें आहे. जयसिंह हा त्याचा चुलता सत्याश्रय याचा राजप्रतिनिधि असावा. वरील माहिती कदाचित् मागून लिहिली असावी.

पश्चिम चालुक्य पहिला सोमेश्वर याचा मांडलिक, गोव्याचा कादंब, पहिला जयकेशिन् हा श. ९७४ त राज्य करीत होता. यानें कापर्दिक द्वीपाच्या राजाला ठार मारिलें असें म्हणतात. कापर्दिक द्वीपाचा राजा हा कदाचित उत्तर कोंकणप्रांतांतील शिलाहार राजपुत्र मामवाणी असावा ( इ. स. १०६० ). त्यानें चोलांचा पराभव केला; कामदेवाचा समूळ नाश केला; आलुपांनां जिंकलें; चालुक्यांची स्थापना केली व त्यांचें चोलांशीं सख्य केलें आणि गोपकपट्टन हें आपलें राजधानीचें शहर केलें असें म्हणतात. तो कदाचित कर्णदेव चालुक्याचा जांवई असावा.

शके ९८८ त पश्चिम चालुक्य, पहिल्या सोमेश्वराचा मांडलिक तोयिमदेव कादंब हा बनवासी आणि पाड्डुंगल जिल्ह्यावर राज्य करीत होता. शके. ९९०–९९९ मध्यें पहिल्या तैलपाचा मुलगा, ( दुसरा ) कीर्तिवर्मन् ( पहिला कीर्तिदेव ) हा पहिला सोमेश्वर आणि सहावा विक्रमादित्य, या पश्चिम चालुक्य सार्वभौम राजांच्या अंमलाखालीं बनवासी जिल्ह्यावर राज्य करीत होता. या बनवासीच्या कादंबांचा पूर्वीच्या कादंबांशीं नक्की काय संबंध होता हें अद्याप समजलें नाहीं. त्यांच्या नांवावरून पहातां ते त्यांचे औरस पुत्रपौत्र नसावेत असें दिसतें. ज्याच्याविषयीं ऐतिहासिक माहिती उपलब्ध आहे, असा पहिला कादंब म्हटला म्हणजे, दुसरा कीर्तिवर्मन् हा होय. कादंबांच्या संबंधींच्या शिलालेखांमधून सांपडणाऱ्या त्यांच्या पूर्वजांच्या वंशावळींवर विश्वास टाकणें केवळ अशक्य आहे. कारण त्यांत ऐतिहासिक प्रमाणें न दिल्यामुळें ते लेख खरे आहेत किंवा खोटे आहेत हें समजण्याला मार्ग नाहीं. शके ९९७, व १०११ मध्यें दुसरा जयवर्मन् याचा मुलगा दुसरा शांतिवर्मन् कादंब हा पश्चिम चालुक्य दुसरा सोमेश्वर आणि सहावा विक्रमादित्य यांच्या सार्वभौमत्वाखालीं मांडलिक म्हणून हानगलवर राज्य करीत होता. त्यानें पांड्य कुलांतील सिरियादेवी हिच्याशीं लग्न केलें.

गोव्याचा कादंब पहिला जयकेशिन् याच्यामागून राज्यावर बसलेला त्याचा मुलगा विजयादित्य अथवा पहिला विजयार्क, या नांवाचा असून त्यानें चट्टलदेवी हिच्याशीं लग्न केलें (इ. स. १०८८ ). पट्टिपोंबुच्चपुराचा शांतरजगदेव याची आई बिज्जलदेवी हिची चट्टलदेवी ही बहीण होती.

शके १०२२–१०५२ मध्यें वनवासी आणि हानगल या जिल्ह्यांचा कादंब अधिकारी जो शांतिवर्मन् त्याच्या मागून राज्यावर आलेला त्याचा मुलगा तैल अथवा दुसरा तैलप हा सहावा विक्रमादित्य आणि तिसरा सोमेश्वर या चालुक्य राजांच्या सार्वभौमत्वाखालीं राज्य करीत होता. विष्णुवर्धन होयसल यानें हानगलला वेढा दिला असतां अगर त्या वेढ्यानंतर शके १०५८ (इ. स. ११३५) सालीं तैलप मरण पावला असावा. त्याचे प्रांत कांहीं दिवसपर्यंत विष्णुवर्धनाच्या ताब्यांत गेले होते. पांड्य कुलांतील बाचलदेवी आणि चामलदेवी अशा दोन बायका तैल राजाला होत्या. (संपगांव तालुक्यांतील कादरोळी येथील शिलालेख शके-१०२१) या वेळीं पश्चिम चालुक्य सहावा विक्रमादित्य याचा मांडलिक गूवल कादंब हा राज्य करीत होता.

पश्चिम चालुक्य सहावा विक्रमादित्य याचा मांडलिक (गोव्याचा कादंब) जो दुसरा जयकेशिन् तो या वेळीं गादीवर होता शके १०४१–१०४८. त्यानें चालुक्य घराण्याचें सार्वभौमत्वरूपी जूं झुगारून देण्याचा प्रयत्न केला; परंतु येलबुर्गेचा सिंद व अच्चुगीचा मुलगा पर्मार्डि यानीं त्याला पळावयास लाविलें. नंतर त्यानें विक्रमादित्याची मुलगी मैळलदेवी हिच्याशीं लग्न केलें; त्याचा एके काळीं होयसल विष्णुवर्धन यानें पराभव केला होता (इ. सन १११९).

तिसरा सोमेश्वर आणि दुसरा जगदेवमल्ल शके १०५५–१०६७ या चालुक्य राजांच्या सार्वभौमत्वाखालीं पहिला मल्लिकार्जुन (त्रिभुवनमल्लरस) कादंब, हा वनवासी आणि हानगल या प्रांतांवर सुभेदार होता. शके १०५५ सालीं तो आपल्या बापाच्या मदतीनें राज्य करीत असावा व शके १०६० आणि १०६६ सालीं तो एकटाच राज्य करीत असावा असें दिसतें.

शके १०७० त दुसरा जयकेशिन् याच्या मागून राज्यावर बसलेला त्याचा मुलगा पर्मार्डि अथवा परमर्दि शिवचित्त हा राज्य करीत होता. हा कदाचित् आपला भाऊ विजयादित्य अथवा दुसरा विजयार्क याच्या बरोबरीनें राज्य करीत असावा. कोल्हापूर अथवा कऱ्हाडचा शिलाहार विजयादित्य यानें दुसरा जयकेशिन् अथवा पर्मार्डि याच्यापासून कादंब राज्यांतील कांहीं भाग जिंकून घेतल्याचे बरेच उल्लेख आढळतात. तसेंच आहवमल्ल कलचुरीचा मांडलिक चेड्डुगिदेव यानें त्याच्यावर हल्ला केला असावा असें दिसतें. पर्मार्डि यानें कामदेवाची मुलगी कमलादेवी हिच्याशीं व विजयादित्यानें लक्ष्मीदेव राजाची मुलगी लक्ष्मीदेवी हिच्याशीं लग्न केलें.

शके ११०३–११२६ त चवथा सोमेश्वर चालुक्य याचा मांडलिक कामदेव अथवा कावदेव हा वनवासी, हानगल आणि पुलिगर जिल्ह्यांवर राज्य करीत होता. त्यानें केतलदेवी हिच्याशीं लग्न केलें होतें. त्याची अगदीं शेवटची माहिती शके ११२६ सालची आहे. त्यानंतर कामदेवाचा कोठेंहि मागमूस आढळत नाहीं.

शके १११० त तिसरा जयकेशिन् हा त्याचा बाप दुसरा विजयादित्य याच्या मागून राज्यावर बसला. सौंदत्तीच्या रट्ट राजांनीं या गोव्याच्या कादंबांपासून बेळगांव सभोंवतालचा प्रांत जो जिंकून घेतला, तो या तिसऱ्या जयकेशिन् याच्या कारकीर्दीतच असावा. याच सुमारास तेजिराज अथवा तेजुगि (कदंब) याचा मुलगा भायिदेव हा कुंडि जिल्ह्यावर राज्य करीत होता. व भूत अथवा आहवमल्ल भूतिग, याचा मुलगा वर्म, हा लोकापूर, होळ्ळलुगुंद, कोळेजूरु, नविलगुंद, या जिल्ह्यांवर व दोड्डवाड शहरावर राज्य करीत होता.

यापुढें कादंब कुलांतील वीरमल्लिदेव अथवा मल्लिकार्जुन यानें वनवासी आणि हानगल जिल्ह्यांवर राज्य करण्यास सुरुवात केली. शके ११६३ आणि ११७३ या सालच्या शिलालेखांवरून पहातां तो स्वतंत्र असावा असें दिसतें.

शके ११६८ त (इसवी सन १२४६) दुसरा षाष्ठदेव हा त्याचा बाप त्रिभुवनमल्ल याच्या मागून गादीवर बसला. षाष्ठदेव हा त्याच्या (कदंब) घराण्यांतील अगदीं शेवटचा राजा असावा असें दिसतें. रट्ट आणि शिलाहार राजांनीं त्याचे प्रांत जिंकून घेतल्यामुळें त्याच्या हातांत फारच थोडी सत्ता राहिली होती. त्यानें इ. स. १२५७ पर्यंत राज्य केलें.

मि. फ्लीटच्या मतें जयकेशिन् (तिसरा) मेल्याबरोबरच वस्तुतः या गोव्याच्या कादंबांच्या राज्याचा शेवट झाला; कारण षष्ठदेव (दुसरा) याचें सामर्थ्य फारच अल्प होतें.

**वंशावळ नं. १**



* यानें गंग आणि पल्लव हे देश जिंकले.

\+ यानें कांचीचा पल्लव राजा चण्डदण्ड याला हांकून देऊन पलाशिका येथें घराण्याची पुन्हां स्थापना केली.

ऽ ह्याच्या वेळच्या शिलालेखांत संद्रक राजा भानुशक्ति ह्याचा उल्लेख येतो.

### वंशावळ नं. २.




* त्रिलोचन किंवा त्रिनेत्र कदंब घराण्याचा मूळ पुरुष. याची राजधानी वनवासि येथें होती.

\+ कल्याणपुरचा राजा वल्लभ याची मुलगी शशांकमुद्रा इजवरोवर याचें लग्न झालें. उत्तरेकडील ब्राह्मणांचा आपल्या राज्यांत यानें प्रवेश करविला.

ऽ दाक्षिण तुलुव येथील प्रतिनिधी चंद्रसेन ह्याचा मुलगा सरदार लोकादित्य याजवरोवर हिचें लग्न झालें. म्हैसूर देशांतल्या एका राजाला लोकादित्यानें मारून त्याचा मुलूख हस्तगत केला.

### वंशावळ नं. ३.

(हनगळ शाखा)




(मृगवर्मा पुढें चालू)




[ मि. सेवेलच्या म्हणण्यावरून तिसरी वंशावळ बहुतेक वरोवर आहे. मि० फ्लीट म्हणतो कीं, पहिलें ऐतिहासिक नांव कीर्तिवर्मा २ रा हें आहे. ]

### वंशावळ नं. ४

जयवर्मा २ रा

किंवा जयसिंह.



* पश्चिमेकडील चालुक्य विक्रमादित्य ६ वा, याचा हा जहागिरदार होता.

\+ पश्चिमेकडील चालुक्य विक्रमादित्य ६ वा याचा जहागिरदार. हा बहुतेक इ. स. ११३५-६मध्यें मरण पावला.

$ हा बापाबरोबर कारभार करीत होता.

÷ आपल्या बापाबरोबर हा कारभार करीत होता. ई. स. ११३२ पासून ११३५-३६ पर्यंत सोमेश्वर ३ रा याचा जहागिरदार या नात्यानें, आणि ई. स. ११४४ मध्यें जयदेकमल्ल २ रा याचा जहागिरदार म्हणून याला त्रिभुवन मल्लरस असें देखील म्हणत.

॥ हा सोमेश्वर ४ था याचा जहागिरदार म्हणून इ. स. ११८९ मध्यें राज्य चालवीत होता. यानें मले जुलु, कोंकण आणि पश्चिम घांट हे देश जिंकले होते. यानें इ. स. ११८१ त राज्याला सुरवात केली. शेवट इ. स. १२०३-४

**वंशावळ नं. ५. ( गोवें शाखा )**

गुहल्ल.
|
षष्ठदेव १ ला. किंवा चट्ट, चट्टल किंवा चट्टय
( इ. स. १००७ )
|
जयकेशी १ ला
( इ. स. १०५२ )
|
विजयादित्य १ ला, × चट्टलादेवी
|
जयकेशी २ रा, × मैळालदेवी
( इ. स. ११२५ )
|
- पेरमादि × कमलादेवी ( शिवचित्त ) ( इ. स. ११४७-११८८ )
- विजयादित्य २ रा ( विष्णुचित्त )× लक्ष्मीदेवी (इ. स. ११४७-११७१)
  |
  जयकेशी ३ रा
  (इ. स. ११७५ आणि ११८८)
  |
  त्रिभुवनमल्ल.
  × माणिक्य देवी
  - शिवचित्त देव २ रा ( छट्टय ) (इ. स. १२४६ त राज्याला सुरुवात. १२५० तराज्य करीत होता.)
  - मुलगी × कामदेव किंवा कावन.

**कदम इंद्रोजी**—कदम घराण्यांतील एका शाखेंत कंठाजी कदमाच्याच काळांत इंद्रोजी कदम या नांवाचा एक प्रख्यात मराठा सरदार होऊन गेला. हा सातारा जिल्ह्यांतील साप गांवचा राहणारा असून, आपल्या पराक्रमाच्या जोरावर फार योग्यतेस चढला होता. शाहू महाराज दक्षिणेंत येऊन त्यांनीं सातारा येथील छत्रपतीच्या गादीवर आरोहण केलें त्यावेळीं इंद्रोजी कदम याचें प्राबल्य महाराष्ट्रामध्यें इतकें होतें कीं त्याचें नांव केवळ कर्दनकाळासारखें वाटत होतें. त्याच्या शौर्यप्रभावाप्रमाणें त्याचें वैभव व थाटहि फार मोठा होता. त्याच्या जवळ ५०० निवडक सैन्य असून घोडेस्वारहि बरेच होते. तो आपल्या शौर्यप्रभावाच्या योगानें इतका गर्विष्ठ व प्रमत्त झाला होता कीं, त्यास आपल्यापुढें सर्व जग तुच्छ दिसत असे. एवढेंच नव्हे तर त्यानें आपल्या पागेंतील खाशा घोड्यांस रुप्याचे नाल लावून, असा हुकूम सोडला होता कीं, हे रुप्याचे नाल पागेंतील लोकांनीं न घेतां, शत्रूच्या हद्दींत पडूं द्यावे व ते परक्या लोकांनीं पाहून आपल्या वैभवाचें कौतुक करावें. एके वेळीं शाहू महाराजांच्या कानांवर इंद्रोजी कदम याच्या गर्विष्ठपणाची हकीकत सादर झाली. तेव्हां त्यांनीं मुद्दाम त्यास निमंत्रण करून साताऱ्यास बोलाविलें. इंद्रोजी कदम मोठ्या थाटानें आपल्या सैन्यानिशीं सातारा येथें आला व आदितवार पेठेंतील माळावर तळ देऊन राहिला. त्यानें शाहू महाराजांस असा निरोप पाठविला कीं, “ तुमचे पेशवे मुख्य प्रधान तुम्हांस भेटावयास आले म्हणजे लष्करच्या नौबदी व नगारे बंद करितात, त्याप्रमाणें मी करणार नाहीं. मी माझ्या सर्व इतमामानिशीं डंकेनौबदी वाजवीत तुमच्या भेटीस येईन. ” शाहूमहाराजांनीं त्याप्रमाणें त्यास परवानगी दिली व त्याची रंगमहाल राजवाड्यांतील मुख्य दरबारांत भेट घेण्याची योजना केली. इंद्रोजी कदम यास आपल्या वैभवाचें प्रदर्शन करण्याची फार हौस असल्यामुळें, तो आपल्या सर्व सैन्यास कडीतोडे घालून व आपण स्वतः नाना प्रकारचे रत्नालंकार परिधान करून शाहूमहाराजांचे भेटीसाठीं नगारे व नौबदी वाजवीत राजवाड्यांत आला. शाहूमहाराजांस त्याचा हा डामडौलपणा पाहून फार तिरस्कार वाटला. परंतु त्यांनीं तो व्यक्त न करतां, मुद्दाम त्याचा गर्वपरिहार करण्याच्या उद्देशानें आपलें स्वतःचें जडजवाहीर व रत्नालंकार आपल्या खंड्या कुत्र्याच्या अंगावर घातले आणि आपण अगदीं साधा सफेत पोषाख घालून दरबारास आले. इकडे इंद्रोजी कदम मोठ्या थाटानें व दिमाखानें आपल्या रत्नालंकारांचें प्रदर्शन करीत शाहूमहाराजांच्या भेटीस आला. त्याची अशी कल्पना होती कीं, शाहूमहाराजांच्या दरबारांतील अष्टप्रधान व उमराव हे माझें बहुमूल्य जवाहीर पाहून दिपून जातील आणि खुद्द शाहूमहाराज माझें वैभव पाहून खालीं मान घालतील. परंतु दरबारांत प्रवेश करितांच सर्व सरदार लोक व खुद्द शाहूमहाराज यांचा साधेपणा व शुभ्र पोषाख पाहून त्यास फार आश्चर्य वाटलें, व खंड्या कुत्र्याखेरीज दुसऱ्या कोणाच्याहि अंगावर अलंकार नसलेले पाहून तो मनांत फार ओशाळला व लज्जित झाला. आणि शाहूमहाराज छत्रपति हे केवळ अवतारी पुरुष आहेत,

त्यांचा मीं विनाकारण अपमान करण्याची पापबुद्धि मनांत धरिली, असा पश्चात्ताप पावून त्यानें शाहूमहाराजांच्या पायांवर डोई ठेविली आणि त्यांची क्षमा मागितली. शाहूमहाराजांनीं क्षमा करून त्याचा योग्य आदरसत्कार केला. इंद्रोजी कदम यानें शाहूमहाराज यांस सोन्याच्या मोहरांचें सिंहासन करून त्याजवर बसविलें व आपल्या जवळचें जडजवाहीर त्यांस अर्पण केलें. महाराजांनीं त्यास व त्याच्या पदरच्या लोकांस मोठी मेजवानी देऊन पोषाख बक्षीस दिले. तेव्हांपासून इंद्रोजी कदम याचें नांव साताऱ्याच्या दरबारांत फार प्रसिद्धीस आलें. शाहूमहाराज मनुष्याची परीक्षा करण्यांत कसे चतुर असत व दुसऱ्या कोणाचाहि गर्व कसा युक्तीनें परिहार करीत ह्याची ह्या आख्यायिकेवरून साक्ष पटते. इ. स. १७३७ (मार्च) मध्यें बाजीराव साहेबांनीं झील तलाव ( दिल्ली ) येथें दिल्लीकर मोगलांचा जो पराभव केला, त्या लढाईत " इंद्रोजी कदम यांसी बोटास गोळी लागोन दोन बोटें उडोन गेलीं." या वेळीं इंद्रोजी ह्या राणोजी शिंदे यांच्या हाताखालीं सरदार होता. पुढें रामराजे यांनां बाशीं पानगांवहून आणविण्याकरितां जी पेशव्यांची विश्वासाची मंडळी गेली होती. तींत इंद्रोजीहि होता ( जानेवारी. १७५० ) [ इ. सं. ५. ७; म. रि. म. वि. ].

**कदम कंठाजी.**—कंठाजी कदम बांडे ह्या पुणें जिल्ह्यांतील बांध्याच्या वडगांवचा रहाणारा होता. ताराबाईच्या पदरीं दाभाडे सेनापतीच्या हाताखालीं अमृतराव कदम हा एक मोठा शूर पुरुष होऊन गेला. यानें खानदेशांत नंदुरबार, सुलतानपुर, प्रांतीं अंमल बसविला. खाफीखान याला अंबु असें म्हणतो. शाहुमहाराज मोंगलाकडून सुटून आल्यानंतर खानदेशांत त्यांनां जे सरदार मिळाले त्यांत अमृतराव हा होता. याचाच तिसरा मुलगा कंठाजी कदम. हाहि बापाप्रमाणेंच शूर होता. याला पश्चिम खानदेशांत रनाळे, तोरखेडें, कोपरली हीं गांवें पेशव्यांनीं इनाम दिलीं. याच्याकडे २०० स्वारांची पागा होती व गुजराथप्रांतीं याची नेमणूक होती. याच्या पुतण्यास शाहुमहाराजांनीं आपली मुलगी ( गजराबाई ) दिली होती. तोरखेडें येथील मूळच्या राउळानें बंड करून रनाळें व नंदुरबार प्रांतास त्रास दिला. तो मोंगलांचा चाकर होता. त्याचा मोड कंठाजीनें करून तें गांव जहागीर मिळविलें. पुढें तें डेंगळे यांनीं जप्त केलें होतें, परंतु सुटलें. स. १७१० त धनाजी जाधवराव वारला तेव्हां शाहूची स्थिति फारच नाजूक होती. त्यावेळीं जी शेलकी मंडळी शाहूस चिकटून राहिली तींत कंठाजी होता. खानदेश, गुजराथ इकडे हा दंगल उडवीत असे. उदाजी पवार, पिलाजी गायकवाड यांच्या बरोबरीनें तिकडे हा काम करी.

इ. स. १७२४ सालीं कंठाजी कदम यानें निजामाचा काका, गुजराथचा नायब सुभेदार, हमेदखान यास नवीन नेमणूक झालेल्या सरबुलंद खान नामक सुभेदाराकडून कारभार पहाण्याकरितां आलेल्या शुजायत खानाविरुद्ध मदत करून, गुजराथेंत चौथ वसूल करण्याचा हक्क मिळविला. परंतु पुढें एके प्रसंगीं हमेदखानानें पिलाजी गायकवाडाचीहि मदत घेऊन चौथ वसविण्याचा हक्क गायकवाड व बांडे यांच्यामध्यें सारखा वांटून दिला ( १७२५ ). एकदां खंबायत येथून पैसा घेण्याकरितां हे दोघेहि त्या गांवीं गेले असतां गांवकरी लोकांनीं युक्तीनें या दोघांमध्यें कलागत लावून दिली. तेव्हां कंठाजी कदम व गायकवाड यांच्यांत त्या गांवाजवळच लढाई होऊन तींत गायकवाडाचा मोड झाला; व कंठाजी कदमानें गांवकरी लोकांपासून खंडणी वसूल केली. यानंतर हमेदखानानें दोघांत तडजोड करून देऊन कंठाजी कदम यानें माहीनदीच्या पश्चिमेकडील व गायकवाडानें पूर्वेकडील चौथ वसूल करावी असें ठरविलें ( १७२५ ).

इ. स. १७२५ त कंठाजी कदम यानें हमेदखानास मदत करून अहमदाबादेजवळ 'अदालेदजे' येथें सरबुलंदखानाच्या सैन्याचा पराभव केला. परंतु या लढाईत मराठ्यांची बरीच प्राणहानि झाल्यामुळें त्यांनीं मिळविलेल्या जयाचा हमेदखानास फायदा करून घेतां आला नाहीं; व म्हणून सरबुलंदखानास सर्व प्रांतांतून आपले फौजदार नेमतां आले.

सरबुलंदखानानेंहि गुजराथ प्रांताची चौथ पूर्वीप्रमाणेंच कंठाजी कदम याजकडे चालू ठेविली; परंतु मुलखाच्या संरक्षणाच्या कामीं खानाच्या अपेक्षेप्रमाणें कंठाजीचा कांहींच उपयोग होत नसे.

इ. स. १७३१ त कंठाजी कदम बांडे ह्या आपला भाऊ रघुजी कदम यासह बाजीरावाविरुद्ध लढण्याकरितां त्रिंबकराव दाभाड्यास येऊन मिळाला होता. परंतु ता. १ एप्रिल १७३१ रोजीं झालेल्या लढाईत पहिलाच हल्ला आल्याबरोबर यानें आपल्या लोकांसह समरांगणांतून पलायन केलें.

स. १७२७ तील निजामाच्या स्वारींत ह्या हजर होता. या कंठाजीच्या पागेंतच प्रसिद्ध मल्हारराव होळकर हा अगदीं प्रथम शिलेदार होता. पुढें मल्हारराव व कंठाजी यांनीं, ( दमाजी गायकवाडानीं गुजराथ सोडून जावयास लाविल्यामुळें ) १७३४ मध्यें माळव्यांतून गुजराथच्या उत्तरभागीं उतरून पालनपूर, अहमदाबाद, ईदर या प्रांतांत धुमाकूळ घालून पुष्कळ लूट मिळविली. यापुढें कंठाजीचें नांव ऐकूं येत नाहीं. याला चत्रसिंग म्हणून मुलगा होता. याचा वंश खानदेशांत वरील जहागीरगांवीं आहे [ म. रि. कैफियती; डफ ].

**कदरमंदलगी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. राणेबिन्नूरच्या पश्चिमेस अजमासें ९ मैलांवर सुमारें १७०० लोकवस्तीचें एक गांव. येथें मारुती कांतेश नांवाचें देऊळ असून त्याची प्रतिष्ठा पौराणिक कालांतील जनमेजय राजा यानें केली अशी स्थानिक आख्यायिका आहे. या देवळाच्या एका खांबावर इ. स. १५०६ सालचा एक शिलालेख असून जवळच्या शेतांत आणखी एक पुसट शिलालेख आहे.

**कंदाहार,** प्रांत.—अफगाणिस्तानांतील एक प्रांत. याच्या उत्तरेस हिरात प्रांतांतील तैमनी प्रदेश व काबुल प्रांतांतील हजारजात आणि गझनी हे जिल्हे; पूर्वेस आणि दक्षिणेस बलुचिस्तान आणि पश्चिमेस फराह. कंदाहार येथील नायब-उल्‍ हुकुमा ( सुभेदार ) याच्या अमलाखालीं कलात-इ-घिलझइ, माकुर, पुष्त-इ-रुद, झमिंदवर आणि गिरिष्क हे जिल्हे आहेत.

कंदाहारापासून फराह येथवर जर एक रेषा काढली तर या रेषेच्या उत्तरेकडील प्रदेश डोंगराळ आहे. त्या भागांतील पर्वत १००० फूटपासून ४००० फूट उंच आहेत. वर सांगितलेल्या रेषेच्या दक्षिणेस २००० ते २५०० फूट उंचीचे डोंगर प्रथम लागतात. परंतु आणखी थोडें दक्षिणेस गेलें म्हणजे, ही उंची एकदम कमी झालेली आढळते. कंदाहार शहराच्या दक्षिणेस रेजिस्तान नांवाचें एक अरण्य आहे. या प्रांतांतून कडेनइ, तरणक, अरघस्तान, अरघंदाव, हेलमंड, हरूत आणि फरा रुड या नद्या वाहतात. येथें पूर्वी हिंदूंची वस्ती असून ते हिंदु ग्रीक लोकांस 'गंदारी' या नांवानें माहीत होते. यावरूनच यास कंदाहार हें नांव पडलें आहे. परंतु हल्लीं या प्रांतांत दुराणी लोकांची वस्ती आहे. या भागांत पारसीवानांची ( पर्शियन वंशांतील लोक ) वरीच वस्ती असून खुद्द कंदाहार शहरांत ५०० हिंदू आहेत. या प्रांतांतील लोकसंख्येचा अजमास बरोबर सांगतां येणें शक्य नाहीं. स्थानपरत्वें येथील हवा निरनिराळी आहे. अरण्यांतील हवा सोडून दिली तर एकंदरींत येथील हवा चांगली आहे. डोंगराळ प्रदेशांत हिंवाळा जरा कडकच असतो.

**शहरः**—अफगाणिस्तानच्या कंदाहार प्रांताची राजधानी. उत्तर अक्षांश ३१° २७' व पूर्व रेखांश ६५° ४३'. हिरातपासून हें शहर ३५४ मैल व काबूलहून ३१२ मैल आहे. तसेंच ब्रिटिश सरहद्दीवरील न्यू चमन या ठिकाणापासून ६२ मैल हें शहर आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची ३४६२ फूट आहे. तरणक व अरघंदाव या नद्यांच्या दरम्यान असलेल्या सपाट प्रदेशावर हें शहर वसलें असून दक्षिणेस व पश्चिमेस वरीच वस्ती आहे परंतु उत्तरेस, वायव्येस, व ईशान्येस हें शहर ओसाड पडलें आहे. या शहराभोंवती २४ फूट रुंद व १० फूट खोल असा एक खंदक असून २७ फूट उंचीची एक भिंत आहे. दोन पूर्वेस, दोन पश्चिमेस, एक उत्तरेस व एक दक्षिणेस याप्रमाणें या शहरास सहा दरवाजे आहेत. यांपैकीं पूर्व व पश्चिमेकडील दरवाजे प्रमुख असून त्यांची रुंदी सुमारें ४० फूट आहे. शहराच्या उत्तरेस बालेकिल्ला आहे. दक्षिणेस एक मोकळी जागा असून तीस तोफखाना असें नांव आहे. पश्चिमेस याचप्रमाणें एक मोकळी जागा असून तेथें अहमदशहा दुराणी याचें थडगें आहे. या शहरांत सुनी पंथाच्या सुमारें १८० मशिदी आहेत. यांपैकी खिरका मुबारक ही प्रसिद्ध आहे. येथें शिया पंथांतील लोकांचीहि पुष्कळ वस्ती आहे, परंतु त्यांची मशीद या शहरांत नाहीं. हिंदुस्थानाकडे येणारा लोकर व इतर माल सांठविण्याकरतां शहराच्या पूर्वेकडील दरवाजाबाहेर एक मोठी कारवान सराई आहे. या शहराची लोकसंख्या सुमारें ३१,००० असावी असा तर्क आहे. पारसीवान लोकांचाच भरणा जास्त आहे. सुमारें १६०० दुकानें असून येथील गंजांत गुरें, मेंढरें व धान्य यांचा बाजार प्रतिदिवशीं भरतो. पाणीपुरवठा अरघंदाव नदीपासून काढलेल्या कालव्यापासून होतो. विहिरी देखील या शहरांत पुष्कळ आहेत. या शहराची हवा विशेषशी चांगली नाहीं. पाऊस फारच थोडा पडतो.

फळफळावळीविषयीं कंदाहार प्रसिद्ध आहे. अप्रिकॉट, पीच, डाळिंबें, द्राक्षें, अंजीर, कलिंगडें वगैरे फळें ताजीं व सुकविलेलीं बाहेर रवाना होतात. तंबाखूची लागवडहि पुष्कळ आहे. ही तंबाखू हिंदुस्थानांत येते.

हें शहर अफगाणिस्तानांतील महत्वाचें व्यापारी ठिकाण आहे. येथें स्थानिक महत्वाचे असे उद्योगधंदे फारसे नाहींत. तथापि या शहराच्या व्यापाराचें क्षेत्र फार मोठें आहे. निरनिराळ्या देशांतील मालाची देवघेव येथें होत असते. कंदाहारमध्यें हिंदू लोकांची वस्ती पुष्कळ असून त्यांपैकीं बरेच व्यापारी आहेत व ते फार श्रीमंत आहेत. ते सिंधप्रांत व मुंबई बंदराशीं व्यापार करतात. ते ब्रिटिश व हिंदी कारखान्यांतील माल तिकडे नेऊन, हिंग, लोंकर सुकी फळफळावळ, तंबाखू, इत्यादि जिन्नस बाहेर देशीं पाठवितात. इ. स. १९०३-४ सालीं कंदाहारमधून हिंदुस्थानांत ३१ लाखांचा माल आला व हिंदुस्थानातून कंदाहारमध्यें ३३ लाखांचा माल गेला.

**इतिहासः**—याचा प्राचीन इतिहास गांधार शब्दाखालीं दिला आहे. अर्वाचीन इतिहास 'अफगाणिस्तान' या लेखांत बराच येऊन गेला आहे. फार प्राचीन काळापासून कंदाहार हें आशियाखंडांतील एक महत्वाचें ठिकाण असलें पाहिजे. कारण हिरात, सीस्तान, घोर, काबुल आणि हिंदुस्थानकडून येणारे रस्ते येथें मिळतात. अलेक्झांडर दि ग्रेट याच्या लक्षांत या शहराचें महत्त्व आलें होतें व त्यानें जीं शहरें नवीन वसविलीं अगर पुन्हां बांधलीं त्यांत हें असावें असें दिसतें. हें निरनिराळ्या काळीं सेल्युसिड, पार्थिअन, सस्सानिड आणि अरब या साम्राज्यांत होतें. खिलाफतीचा नाश झाल्यावर कंदाहार अनुक्रमें इराणी, सफाविद आणि सामानिद गझनीचें घराणें, सेल्जुक, घोरी आणि ख्वारिझमचे शहा यांच्या ताब्यांत होतें. अखेरीस इ. स. १२२२सालीं चेंगीजखान नांवाच्या मोंगलानें तें काबीज केलें. पुढें त्याच्या वंशजांकडून कांहीं काळपर्यंत घोरी घराण्याच्या एका शाखेंतील हिरातच्या कर्त या नांवाच्या राजाचा यावर अंमल चालत होता. इ. स. १३८९ सालीं तें तैमूरलंगानें सर केलें. पुढें इ. स. १४६८ ते १५१२ च्या दरम्यान यावर स्थानिक

राजांचा ताबा चालत होता परंतु त्या सालीं बाबरानें तें पुन्हां जिंकलें. हा मोंगल साम्राज्याचा संस्थापक होय. याच्या मृत्यूनंतर कंदाहारच्या स्वामित्वाविषयीं मोंगल व पर्शियन सफाविद यांच्यांत तंटा बरींच वर्षे चालला होता. त्यावेळीं कधीं हें मोंगलांकडे व कधीं त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांकडे असे. अखेरीस इ. स. १६४ : सालीं तें मोंगलांच्या ताब्यांतून कायमचें गेलें. शहाजहानानें व औरंगजेब बादशहानें तें परत मिळविण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केले परंतु ते सर्व निष्फळ झाले. इ स. १७०८ सालीं कंदाहारच्या घिलझाई लोकांनीं पर्शियन सत्तेचें जूं झुगारून दिलें व कांहीं वर्षांनीं त्यांनीं खुद्द इराणांत जाऊन सफाविद लोकांस पराजित केलें. नादीरशहाच्या वेळीं पुन्हां थोडा वेळ इराणी अंमल चालू झाला होता. इसवी सन १७३८ सालीं नादीरशहानें कंदाहार शहराचा नाश करून तें पुन्हां वसविलें. हल्लींच्या गांवाच्या पश्चिमेस ३ मैलांवर एका टेंकडीच्या पायथ्याशीं जुन्या गांवाचे अवशेष अद्यापि दिसतात. नादीरशहाच्या हातून हें अहमदशहाच्या ताब्यांत गेलें. त्यानें नादीरशहानें वसविलेलें नगर उध्वस्त करून हल्लीं अस्तित्वांत असलेलें शहर इ. स.१७४७ सालीं वसविलें.

इ. स. १८३४ सालीं अफगाणिस्तानचा पदच्युत झालेला (सदझोई) राजा यानें कंदाहार येथें पुन्हां आपली सत्ता स्थापित करण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याचा प्रतिस्पर्धी दोस्तमहमद यानें त्यास हांकून लावलें व आपण अमीर ही पदवी धारण केली या प्रसंगीं उपर्युक्त शहासुजानें मुसुलमानांची मदत वगैरे न घेतां फक्त ब्रिटिश सरकारची मदत मिळवून तो पुन्हां रणांगणावर आला. त्यावेळीं इ. स. १८३९ सालीं या सैन्यानें कंदाहार हस्तगत करून घेतलें व शहासुजास तेथेंच तख्ताभिषेक करण्यांत आला. इ. स. १८४२ सालीं काबुल येथें ठेवलेल्या ब्रिटिश सैन्याची कत्तल झाली. त्यावेळीं कंदाहार सफदरजंग सदझोई याच्या ताब्यांत दिलें होतें. परंतु कोहनदिल खान नांवाच्या इराणांतून आलेल्या एका माणसानें सफदरजंगास हांकलून दिलें व आपण कंदाहारचा ताबा घेतला. इ. स. १८५५ सालीं कोहनदिल खान मरण पावला व त्याच्यानंतर त्याचा पुत्र महमद सादीक याजकडे सर्व अधिकार आला. परंतु त्याच वर्षीं तें शहर दोस्तमहमदानें पुन्हां हस्तगत करून घेतलें. दोस्तमहमदानें आपला पुत्र गुलाम हैदर खान यास तेथील सुभेदार नेमलें. पुढें हा इ. स. १८५८ सालीं मरण पावल्यावर शेर अल्लीखान यास अधिकार मिळाला. पुढें शेरखानास अमीरपद प्राप्त झाल्यावर त्यानें आपला सख्खा भाऊ महमद अमीन खान यास कंदाहारचा सुभेदार केलें. हा इ. स. १८६५ सालीं लढाईंत मारला गेला. त्यामुळें कंदाहार पुन्हां शेरखानाकडे आलें परंतु लवकरच त्याचा प्रतिस्पर्धी व सावत्र भाऊ यानें तें इ. स. १८६७ सालीं त्याजपासून हिसकून घेतलें. परंतु शेर अल्लीखानाचा पुत्र याकुबखान यानें इ. स. १८६८ सालीं तें पुन्हां मिळविलें.

अखेरच्या अफगाण लढाईंत इ. स. १८७९ सालीं कंदाहार ब्रिटिश सैन्यानें व्यापलें होतें. त्याच सालीं सरदार शेर अल्लीखान यास कंदाहार प्रांताचा वाली म्हणून गादीवर बसविण्यांत आलें व हा प्रांत काबूलपासून अगदीं स्वतंत्र करण्यांत आला. याकुबखानाचा धाकटा भाऊ सरदार महंमद अयुबखान यानें हिरातहून (जुलै १८७९) चाल केली व ब्रिटिश सैन्याचा मैवंद येथें पराजय केला व कंदाहार ताब्यांत घेतलें. परंतु लवकरच (आगष्ट) ब्रिटिशांनीं त्याचा पूर्ण पराजय केला व या विजयामुळें अफगाणिस्तानांत शांतता नांदूं लागली व ब्रिटिश सैन्यानें इ. स. १८८१ सालीं दक्षिण अफगाणिस्तान सोडलें. शेरअल्लीखानास आपणांस मिळालेलें वाली पद संभाळण्याचें सामर्थ्य नव्हतें त्यामुळें त्याच्याच विनंतीवरून त्यास हिंदुस्थानांत आणून पेनशन दिलें. ब्रिटिशांनां अफगाणिस्तान सोडून तीन महिने झाले नाहींत तोंच अयुबखानानें अबदुल रहिमानच्या सैन्याचा पराजय केला व कंदाहार पुन्हां आपल्या ताब्यांत घेतलें. परंतु लवकरच (सप्टेंबर १८८१) अमीराच्या सैन्यानें त्याचा पराजय केला व त्याला हिरातकडे पळून जावें लागलें. परंतु हें शहर अमीराच्याच ताब्यांत असल्यामुळें त्यास तेथें थारा मिळाला नाहीं व अयुबखानास अखेरीस इराणचा मार्ग सुधारावा लागला. इ. स. १८८८ सालीं हा हिंदुस्थानांत आला. ("अयुबखान पहा.")

**कंदियारो**, ता लु का.—मुंबई. सिंध प्रांत. हैद्राबाद जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३२२ चौरस मैल. उत्तर अक्षांश २६°५५' ते २७°.४' व पूर्व रेखांश ६८° २' ते ६८°३०'. लोकसंख्या (१९११) ६५०७५. एकंदर खेडीं ६१. कंदियारो गांव हें मुख्य ठिकाण. एकंदर उत्पन्न (१९०३–०४) १.५ लाख रुपये. मुख्य पिकें—गहूं, ज्वारी, हरभरा. लागवडीखालीं असलेल्या एकंदर जमिनीपैकीं दोनतृतीयांश जमिनीस कालवे व विहिरी यांचें पाणी मिळण्याची सोय आहे.

गां व.—मुंबई. सिंधप्रांत हैद्राबाद जिल्हा. हें कंदियारो तालुक्याचें मुख्य ठिकाण असून नसरत कालव्यावर आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार. उत्तर अक्षांश २७° ३' व पूर्व रेखांश ३८° १७'. येथील मुख्य धंदा शेतकीचा आहे. जहांगीरच्या कारकीर्दींत हें शहर वसविलें गेलें असें म्हणतात. हें वसविण्यापूर्वीं याच्या जवळच पटाइपूर नांवाचें गांव अस्तित्वांत होतें. परंतु नद्यांस पूर आला असतां गांवांत पाणी बरेंच येत असे त्यामुळें ती जागा सोडून जरा उंचवट्यावर हा गांव वसविला गेला. व त्यावेळीं त्या जागेवर कंदी नांवाचीं झाडें फार असल्यामुळें या गांवास कंदियारो हें नांव मिळालें. येथें एक धंदेशिक्षकाची शाळा आहे.

**कंदुकुर**, वि भा ग.—मद्रास. नेलोर जिल्ह्यांतील एक विभाग. यांत कंदुकुर, व कणगिरी हे तालुके आणि दारसी आणि पोदिली या तहशिली आहेत.

ता लु का.—मद्रास. नेलोर जिल्ह्यांतील एक किनाऱ्यावरील तालुका. उत्तर अक्षांश १४° ५८' ते १५° ३०' व पूर्व रेखांश ७९° ३८' ते ८०° ५'. क्षेत्रफळ ७८७ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १५३०५५. यांत मोठें गांव कंदुकुर ( लोकसंख्या ९५६९ ) व खेडीं १५९ आहेत.

एकंदर उत्पन्न(इ. स. १९०३–४) ३५८००० रुपये होतें. तुंगभद्रा, पेन्नार व कृष्णा या नद्यांना कालवे झाले म्हणजे या तालुक्यांस पाण्याची सोय चांगली होईल.

गां व.—मद्रास. नेलोर जिल्हा. कुंदुकुर तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १५° १३' व पूर्वरेखांश ७९° ५४'. सिंगरायकोंड नांवाच्या रेल्वे स्टेशनच्या पश्चिमेस सुमारें ९ मैलांवर हें गांव आहे. लोकसंख्या ( १९११ ) १०२७६. येथें विष्णु व शिव यांचीं दोन फार प्राचीन देवळें आहेत.

**कदुपत्तन**.—लोकसंख्या ( १९११ ) ३४२९४. यांची वस्ती मद्रास व कोचीन संस्थान यांतच आहे. हे हलक्या वर्गाचे मल्याळी शूद्र व पठार ब्राह्मणांचे वंशज होते; परंतु यांनीं कदु नांवाचें मांस खाल्ल्यामुळें ते भ्रष्ट झाले. ब्राह्मणांप्रमाणें हे वृद्धि व आशौच १० दिवस धरतात; परंतु ब्राह्मणांच्या देवळांत जाण्यास त्यांनां मनाई आहे. त्यांची वडिलोपार्जित मिळकतीच्या वांटणीची पद्धत फारच विलक्षण आह. यांच्यांत मुलाच्या अभावीं बापाची इस्टेट मुलीला न मिळतां जवळच्या सपिंड नातेवाईकांस मिळते. कदुपत्तनास एळुथचन असेंहि नांव आहे; आणि पूर्वीं त्यांपैकीं बरेच शाळामास्तर असत. मीठ तयार करणें व तें विकणें हे त्यांचे मुख्य धंदे होते. परंतु मिठाचा मक्ता सरकारनें घेतल्यापासून ते मुख्यत्वें शेतकी किंवा मजुरी करित.त.

**कद्रा**—(कदमा) लोकसंख्या १९२७५३. यांपैकीं बहुतेक वंगाल, विहार व ओरिसा या प्रांतांत आहेत. टोपल्या व इतर बुरुडाचें काम करणारी ही जात आहे. यांपैकीं कांहीं लोक मध्यप्रांतांत रायपूर व बालाघाट या जिल्ह्यांत आहेत. कद्रा शब्द कांड=तरि शब्दापासून निघाला असावा असा एक तर्क आहे. भंडारा जिल्ह्यांतील या जातीचे लोक ही गोंडांची एक शाखा आहे. यांच्या बायका डोक्यावरून पदर घेत नाहींत व केसांची वेणी न घालतां मागें नुस्ता बुचडा बांधतात. हे गोंडी भाषेचेंच अपभ्रष्ट स्वरूप असलेली भाषा बोलतात. हे लोक फार अपवित्र समजले जातात.

**कद्रु**—प्राचेतस दक्षाची कन्या व कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. ही सर्पांची माता असून हिला शेष, वासुकि, तक्षक वगैरे शंभर पुत्र असून त्यांनां काद्रवेय असें म्हणतात. हिचा सूर्यरथाचा अश्व श्याम आहे कीं गौर आहे याविषयीं विनतेशीं वाद झाला होता. त्यांत हिनें आपला पक्ष कपटानें सिद्धीस नेऊन तिला आपल्या दास्यांत ठेविलें होतें.

**कंधकोट**—मुंबई. सिंधप्रांत. अपरसिंध फ्रॉंटिअर जिल्ह्यांतील तालुका. उत्तर अक्षांश २७° ५९' ते २८° २७' व पूर्वरेखांश ६८° ५७' ते ६९° २२'. क्षेत्रफळ ५३६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ५२९१४ यांत एकंदर खेडीं २८ व एकंदर उत्पन्न ( इ. स. १९०३–४ ). १.९ लाख.

**कंधार**—हैदराबाद संस्थान. नांदेड जिल्ह्याचा पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ६३० चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १३७७८०. यांत (इ.स. १९०५ पर्यंत ) एक मोठें गांव व २३५ खेडीं असून त्यांपैकीं ३७ खेडीं जहागिरी आहेत. जमीनमहसूल २.५ लाख रुपये ( इ. स. १९०१ ). इ. स. १९०५ सालीं उस्माननगर तालुक्यांतील कांहीं खेडीं यांत घालून हा तालुका मोठा करण्यांत आला आहे.

**कनक**—पश्चिमविभागांतील सोनें असलेला प्रदेश. याचा बृहत्संहितेंत उल्लेख आहे. ( १४. उ २१ ) मूळ ग्रंथांत जृंग–वैश्य–कनक–शकाः असा पाठ आहे; याचें भाषांतर कर्न हा " जृंग, वैश्य, ( व ) सुवर्ण–सिथियन लोक " असें करतो. परंतु टीकेंत निराळा अर्थ दिला आहे. " सुवर्णभूमी व शक लोक " अशी तो टीप देतो. अल्बेरूनी देखील हे शब्द अलग करून " वैश्य, कनक, शक " असा अर्थ करतो.

**कनकफळ** ( जमालगोटा )— ह्याला लॅटिनमध्यें क्रोटन टिगलिअम्; संस्कृतमध्यें कनकफल व जयपाल;हिंदींत जमालगोटा इत्यादि नांवें आहेत. हिंदुस्थानच्या बहुतेक सर्व भागांत याची लागवड होते. पूर्वबंगाल व आसाम ह्यांमध्यें हीं झाडें आढळतात. हें झाड दिसण्यांत मोगली एरंडाच्या झाडाप्रमाणें दिसतें, परंतु पानें मात्र लहान असतात.

हें झाड मूळचें हिंदुस्थानांतील नाहीं असें कांहीं विद्वान लोकांचें मत आहे. हें झाड अगदीं हलक्या प्रकारच्या जमिनींत होतें. ह्याला दुसऱ्या वर्षीं फळें येतात. कॉफीच्या झाडांना सावली करण्याकरितां हीं झाडें लावितात. ह्याच्या फळापासून पुष्कळ तेल निघतें व तें औषधी असतें. तेलाचा उपयोग कडक जुलाब देण्याकडे करितात. हें तेल अंगाला लाविलें असतां तावडतोव फोड येतात. क्रोटोनोलिक ॲसिडमध्यें असणाऱ्या स्फोटजनक द्रव्यांत या फळाचें तेल असतें. कधीं कधीं व्यापारी लोक या तेलाचें मिश्रण टिंक्चर आयोडिनमध्यें करून तें विकतात. या झाडांस जें बीं येतें त्यास जैपाल किंवा जमालगोटा म्हणतात. हें दिसण्यांत एरंडीच्या बियासारखें दिसतें, परंतु फार विषारी असतें. हें शुद्ध करून अनेक रासायनिक उपयोगाकडे लावतात. हें तीव्र रेचक आहे.

औ ष धी उ प यो ग—विंचवाच्या विषावर—जैपाल पाण्यांत वांटून त्याचा लेप करावा. अर्धशिशीवर—मोठ्या पहांटेस दोन किंवा तीन जेपाळाच्या बियांतील मगज घेऊन तो निंबाच्या रसांत उगाळावा व ज्या बाजूचें मस्तक दुखत असेल त्या बाजूच्या डोळ्यावरील भिंवईवर तें काढीनें

लावावें. थोडी आग झाली तरी व्याधि हटकून बरी होईल असें पदे म्हणतात (भिषग्विलास).

**कनकमुनि.**—[ पाली—कोणागमन ]. कनकमुनि हा चालू युगांतील चार बुद्धांपैकीं दुसरा होय. त्याच्या मागचा बुद्ध क्रकुच्छंद व पुढचे काश्यप आणि शाक्य मुनी हे होत. यांपैकीं पहिल्या तिघांचा जन्म, कपिलवस्तु या गौतमाच्या जन्मभूमीच्या आसपास झाला. भद्रकल्पांत म्हणजे कनकमुनीच्या काळीं, माणसें ४०,००० वर्षे जगत अशी समजूत होती. गौतमानंतरच्या बुद्धांत कनकमुनीला जें जास्त महत्त्व देण्यांत येतें त्याचें कारण अशोकानें कनकमुनीच्या जन्मस्थानी आपण गेल्याचें स्मारक म्हणून व कनकमुनीप्रीत्यर्थ उभारलेला स्तंभ हा प्राचीनवस्तुसंशोधकांनां १८९९ त हिंदुस्थान व नेपाळ यांच्या सरहद्दीवर संशोधन करीत असतांनां सांपडला हें होय. फा-हियन आणि ह्युएनत्संग या दोन चिनी प्रवाश्यांनीं कनकमुनीच्या जन्मस्थानीं जाऊन, तेथील माहिती लिहून ठेविली आहे. फा-हियन लिहितो कीं, ज्या गांवीं कनकमुनीचा जन्म झाला तें श्रावस्तीच्या आग्नेयीस बारा योजनांवर जी क्रकुच्छंदाची जन्मभूमि आहे तीपासून उत्तरेस एक योजनाच्या आंतच आहे, त्याठिकाणीं एक स्तूप होता. पण स्तंभाचा निर्देश केलेला नाहीं. ह्युएनत्संग स्तूपाचें व स्तंभाचेंहि वर्णन देतो. "स्तंभ वीस फूट उंच असून त्यावर सिंह आहे; कनकमुनीच्या निर्वाणाची हकीकत त्यावर कोरली आहे. क्रकुच्छंदाची जन्मभूमि कपिलवस्तूच्या दक्षिणेस सुमारें पन्नास लीवर आहे" असें तो लिहितो.

या चिनी भिक्षूंनीं पाहिलेला स्तूप सध्यां अवशेषरूपानें सुद्धां शिल्लक नाहीं. स्तंभाचे मोडके भाग निग्लीव सागर नांवाच्या मोठ्या तळ्याच्या पश्चिम कांठीं पडलेले सांपडले. गौतमबुद्धाच्या जन्मभूमीचें दर्शन घेतल्याचें स्मारक म्हणून अशोकानें उभारलेला स्तंभ ज्या जागीं सांपडला तेथून जवळच निग्लीव गांव आहे व या निग्लीव गांवाच्या दक्षिणेस एका मैलावर निग्लीव सागर आहे. हें तळें बहुतेक कोरडें असून, यांत भग्नस्तंभाचे दोन सांपडलेले तुकडे एकंदर २५ फूट लांबीचें आहेत; स्तंभशीर्ष व त्यावरील सिंह गहाळ आहेत; त्याचप्रमाणें ह्युएनत्संग म्हणतो त्या लेखाचाहि पत्ता नाहीं. फक्त तिबेटी भाषेंत मिति व "ओम् मणिपद्मो हूम्" अशीं अक्षरें आहेत. अशोकाचा या पूर्वीचा लेखहि अपूर्ण आहे; स्तंभ पूर्वीच्या जागेवरून हालवून या तळ्याच्या कांठीं आणून टांकिलेला दिसतो.

स्तंभाचें स्थान अजमासें उत्तर अक्षांश २७° ४०' व पू. रेखांश ८३° १० आहे. बौद्धग्रंथांतील गौतमाच्या मागील अनेक बुद्धांपैकीं काश्यप व कनकमुनि यांच्याविषयीं कायती कांहीं ऐतिहासिक माहिती सांपडते. [ लेगे—रेकॉर्ड ऑफ बुद्धिस्टिक किंगडम्स ( फाहियनच्या बखरीचें भाषांतर ). बील—बुद्धिस्ट रेकॉर्ड्स ऑफ दि वेस्टर्न वर्ल्ड; लंडन १९०६ ]

**कनकन**—लोकसंख्या. (१९११) ७१०७३, मद्रास, कोचीन व म्हैसूर संस्थान यांतून हे लोक आढळतात. मासे धरणारे आणि नावाडी यांची आपणांकडील कोळ्यांप्रमाणें एक जात. हे जर त्यांच्यापासून ४८ फुटाच्या आंत आले तर श्रेष्ठ वर्णांतील लोक यांचा विटाळ मानतात. ते शेतकी आणि मजुरी करितात. ते फार गरीब असून शिक्षणाच्या बाबतींत फार मागासलेले आहेत. म्हैसूरमध्येंहि कोलार येथील सोन्याच्या खाणींत काम करणारे या जातीचे सुमारें २०० लोक आहेत. हे तामीळ भाषा बोलतात व हिशेबाच्या कामांत हे फार निष्णात असतात.

**कनखल**-एक गांव व तीर्थ. कनखल गांव हरिद्वारापासून दीड दोन मैलांवर आहे. गांवांतील रस्ते फरसबंदी असून घरें बरीं आहेत. येथें दक्षप्रजापतीचें मोठें देऊळ आहे. नदीच्या तीरावर प्रसिद्ध तीर्थस्थान (कनखलतीर्थ) आहे. 'स्नात्वाच कनखले तीर्थे पुनर्जन्मो न विद्यते;' असें याचें माहात्म्य वर्णितात. दक्षानें जेथें यज्ञ केला व ज्या ठिकाणीं शंकराचा अपमान होऊन सतीनें ( पार्वतीनें ) अग्नींत उडी घेतली ती ही जागा असें सांगतात व एक कुंड त्याचा अवशेष म्हणून दाखवितात. येथें गंगेचें पात्र विस्तीर्ण असून प्रवाह अति शुभ्र असतो. गंगाकिनाऱ्यावर असलेलें राधाकृष्णाचें मंदिरहि आल्हाददायक आहे. कनखल गांवांत 'रामकृष्ण मिशन हास्पिटल' नांवाचा विवेकानंदांनीं चालू केलेला एक दवाखाना आहे.

**कॅनन व कॅननाइट**—कॅनन व कॅननाईट या भूगोल व जातिविषयक संज्ञा अनेक निरनिराळ्या भागांनां व लोकांनां लाविलेल्या आढतात. याचें कारण असें आहे कीं, कॅननाईट संज्ञा असलेले लोक फार देशांतर करीत. भूमध्यसमुद्रकिनारा, जॉर्डन नदीचें खोरें, फिनिशिया, फिलिस्टिया या प्रांतांतील लोकांनां ही संज्ञा लावीत असत. फिनिशियन लोक आपल्या देशाला कॅनन म्हणत असें आगस्टाईन म्हणतो. ग्रीक लेखकांच्या आधारावरून असें कळतें कीं फिनिशियाला केना असें म्हणत. हा केनन अथवा कॅननचा संक्षेप असवा. ईजिप्शियन लोकांनां देखील कॅनन नांव पसंत होतें.

"कॅनन म्हणजे कॅननाईट लोकांचा देश असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं" ( पिंक्लेअर ). जुन्या करारांत कॅनन हा हॅमच्या चार मुलांपैकीं एक होता. असें आहे. अलीकडे असें सुचविण्यांत आलें आहे कीं, हॅम म्हणजे थरहॅम अथवा यरहॅम-एलचा संक्षेप होय व कॅनन हें अरबी नांव आहे. एवढें खरें आहे कीं इ. स. पूर्वी ४००० च्या सुमारास अरबस्तानांतून सेमेटिक लोकांची लाट निघून तिनें बाबिलोनिया व साधारणतः सीरिया व पॅलेस्टाईन यांनां व्यापिलें. त्याचप्रमाणें इ. स. पूर्वी २८०० व २६०० च्या दरम्यान दुसरी लाट निघाली व तिनें पहिले देश व्यापून शिवाय ईजिप्तहि व्यापिला. यानंतर प्रसिद्ध साम्राज्य

संस्थापक खमुरब्बी (खि. पू. २२६७–२२१३) याचें नांव ऐकू येतें. याच्या नावांचा प्रथम भाग व कॅननच्या बापाचें नांव हॅम अथवा खाम हीं दोन्हीं एकच आहेत. यावरून खम्मुरबी हें नांव आरबी असावें.

फिनिशियन लोक हे सेमिटिक लोकांच्या दुसऱ्या लाटेबरोबर आले होते. म्हणून ते आपल्या देशाला कॅनन म्हणत. शिवाय पहिल्या कॅननाईट लोकांनां मागाहून येणाऱ्या लोकांनीं समुद्रकिनाऱ्याकडे हांकून दिलें. त्यांनीं फिनिशियांत वसाहत केली. व ते व्यापारांत इतके प्रसिद्ध झाले कीं कॅननाईट म्हणजे व्यापारी ही संज्ञा प्रचारांत आली. यांच्या मागून येणऱ्या लोकांनां बहुधा अमोराईट म्हणत असावे.

अमोराईट हें नांव जुन्या करारांत कांहीं ठिकाणीं प्रामुख्यानें दिलें आहे. एका ठिकाणीं तर अमोराईट व कॅननाईट हीं दोन्हीं नांवें एकाच अर्थानें दिलीं आहेत. दुसऱ्या अरबी देशांतराच्या प्रथमार्धांत फिनियाशिन व अमोराईट आले. दुसरा अर्ध येण्यापूर्वीच सीरिया व पॅलेस्टाईन हीं ईजिप्तच्या अमलाखालीं आलीं. तिसरा थोथमेस व दुसरा आमेन होटेप याच्या अंमलाखालीं सीरियन व कॅननाईट लोक राजनिष्ठ राहिले. तिसऱ्या आमेन होटेपच्या वेळेस व त्याच्या नंतर बंडें वगैरे वरींच झालीं.

सीरियांत हट्टी अथवा हिटाईट लोकांच्या स्वाऱ्या तिसऱ्या आमेन होटेपच्या वेळेस सुरू झाल्या. दुसरी अरेबी देशांतराची लाट सुरू झाल्यापासून ईजिप्शियन लोकांचा आशियांतील अंमल कमी होऊ लागला. याच सुमारास सागा (लुटारू) अथवा हार्बशी यांच्या स्वाऱ्यांचा उल्लेख केला आहे. हे लोक म्हणजे इस्रायल, मोआबाईट, अमोनाइट व एडोमाईट हे होत. सध्यां याविषयीं नवीन माहिती ज्यावरून मिळते अशीं पांच साधनें आहेतः—पॅलेस्टाईन येथें सांपडलेले अवशेष, बाबिलोनी व ईजिप्शिय अंकित लेख, जुना करार व फोनिशियन धर्म. प्राणी, लहान मुलें व मोठीं माणसें यांनां बली देण्याची चाल असावी असें संशोधित अवशेषांवरून दिसतें. संगितार्चे द्योतक जीं कांहीं वाद्यें आढळलीं तीं कॅनानाईट लोकांचा रसिक स्वभाव व्यक्त करितात. हे लोक दुष्प्रभावाच्या प्रतिकारार्थ ताईत वापरीत. उपाध्याय व उपाध्यायिनी देवस्थानांतून असत. पुढील काळच्या हिब्रू इतिहासांत जे पैगंबर दिसतात तसे त्यांच्यांतहि होते. यांचा धर्म सेमाईट व महंमदाच्या अगोदरचे अरब या लोकांच्या धर्मासारखा असावा. एल, बाल, अम्म वगैरे देव यांच्यांत होते. पितृपूजा व सृष्टिपूजाहि दिसतात कांहीं बाबिलोनी व ईजिप्ती देवता कॅननाईट लोकांत आहेत.

[संदर्भग्रंथ—पेटॉन–दि अर्ली हिस्टरी ऑफ सीरिया अँड पॅलेस्टाईन; ब्लिस् मॅकॅलिस्टर–एक्सकॅव्हेशन्स इन् पॅलेस्टाईन ड्यूरिंग दि ईयर्स १८९८–१९००; कुक–दि रिलिजन ऑफ एन्शंट पॅलेस्टाईन.]

**कनवालु**, तालुका.—अप्पर बर्मा. श्वेबो जिल्ह्याचा ईशान्येकडील तालुका (टाऊनशिप). उत्तर अक्षांश २२° ५१' ते २३° ४४' व पूर्व रेखांश ९५° २२' ते ९६° १.' क्षेत्रफळ १५३६ चौरस मैल. हा प्रदेश सपाट आहे. लोकसंख्या (इ. स. १९०१) ५१८९५. यांत १३२ खेडीं आहेत. जमीनमहसूल (इ. स. १९०३–४). ६४३००.

**कनमडी**—मुंबई इलाखा. बेळगांव जिल्हा. अथणीच्या ईशान्येस सुमारें २४ मैलांवर सुमारें अडीच हजार लोकवस्तीचा एक गांव आहे. येथें हरिदेव आणि मल्लिकार्जुन हीं देवळें आहेत. याशिवाय दरिदेवीचें जुनाट देऊळ असून तेथें चैत्र महिन्यांत मोठी जत्रा भरते.

**कनि**—उत्तर ब्रह्मदेशांतील लोअर चिंदविन जिल्ह्याची अगदीं उत्तरेकडील तहशील. उत्तर. अ. २२° २' ते २२°५०' व पूर्व रेखांश ९४° १६' ते ९५° ५'. क्षेत्रफळ १७८८ चौ. मैल. यांत एकंदर खेडीं १२५ व लोकसंख्या (१९११) ५७१३१. ही सर्व तहशील डोंगराळ आहे तरी येथें पाण्याचा चांगला पुरवठा आहे. बऱ्याच भागावर जंगल आहे. १९०३ ते ४ सालीं फक्त ३२ चौ. मैल जमिनीवरच लागवड करण्यांत आली होती.

**कॅनि**—फ्रान्समध्यें आल्प्सच्या विभागांतील भूमध्यसागरावर असणारें हें एक बंदर आहे. येथील लोकसंख्या (१९०६) २४५३१ आहे. हें समुद्राकडच्या बाजूच्या उतरणीवर असल्याकारणानें या शहरास दक्षिणेकडील मोकळी हवा मिळते. परंतु पर्वतांच्या श्रेणीमुळें उत्तरेकडील हवेपासून या शहराचा बचाव होतो.

इ. स. १८३१ पावेतों येथें फक्त एक जुनाट किल्ला व एक ख्रिस्ती देवालय एवढेंच काय तें होतें. परंतु आजकाल हें एक दाक्षिण फ्रान्सांतलें हिंवाळ्यांत येऊन राहण्यास योग्य असें मोठें शहर झालें आहे व इंग्रज लोक या दिवसांत बहुतेक येथें येत असतात. एल्बाहून जेव्हां नेपोलियन १८१५च्या मार्चच्या पहिल्या तारखेस परत आला तेव्हां तो येथून ३॥ मैलांवर असणाऱ्या गॉल्फ जॉन किनाऱ्यावर उतरला. या शहराच्या आसपासची जमीन अति सुपीक व सुंदर आहे. येथें नारिंग व लिंबू यांचीं झाडें लावतात. याशिवाय अंजीर, बदाम, द्राक्षें, आलिव्ह व 'पीच' व इतर फळेंहि फार होतात. हीं सर्व फळें व मासे हा येथील बाहेरगांवीं जाणारा माल आहे. याशिवाय तऱ्हेतऱ्हेचीं सुगंधी अत्तरें येथें तयार करतात व याकरितां निरनिराळ्या फुलांची लागवड करतात. कॅनि हें फार जुनाट शहर आहे. सारासीन लोकांनीं इ. स. ८ व्या व १० व्या शतकांत हें शहर उध्वस्त केलें. पण मागाहून जिनोआंतील लोकांनीं येथें वस्ती केली. शहरासमोर सैंट मार्गारेट बेटावर किल्ला आहे. तेथूनच मार्शल बॅझाइन हा इ. सन १८७४ मध्यें पळाला होता. दुसऱ्या बेटावर ख्रिस्ती भिक्षूंचे मठ आहेत.

**कॅनिआ**—ही क्रीट बेटाची १८४१ नंतरची राजधानी असून मुख्य बंदर आहे. येथें चामड्याचा माल तयार करण्याचे कारखाने असून साबण व तेल यांचाहि व्यापार चालतो. येथील लोकसंख्या ( १९१५ ) २४३९३ असून व्हेनिशिअन सत्तेच्या वेळीं हें क्रीट बेटांतील मजबूत ठिकाण होतें. १८५६ मध्यें भूकंपामुळें याचें बरेंच नुकसान झालें.

**कॅनिंगपोर्ट**—बंगालमधील 'चोविसपरगणे' या जिल्ह्याच्या एका पोटविभागांतील एक खेडें. हुगळी नदींत वाळवंट वाढू लागल्यामुळें जहाजास कायमचा अडथळा होईल या भीतीनें येथें इ. स. १८५३ते ७०त कलकत्त्याऐवजीं बंदर बांधण्याचा उपक्रम केला होता.व त्याप्रमाणें कांहीं काळ येथें चांगल्या तऱ्हेनें जहाजें जाऊं येऊं लागलीं व त्यापासून या कामाच्या उत्पादक मंडळीस चांगला नफाहि मिळाला. पण कांहीं कारणामुळें कंपनीस भयंकर नुकसान येऊन सर्व योजना फिसकटली.

सध्यां येथें सुंदरवनांतील जमीनी सरकारकडून कौलानें घेऊन तींत लागवण करणारी बरीच मंडळी आहेत.

**कॅनिझारो स्टानिस्लास**—हा इटालियन रसायनज्ञ पार्लेमों येथें १८२६त जन्मला. १८४१त तेथील विश्वविद्यालयांत तो वैद्यक शिकण्याकरितां गेला, परंतु पुढें त्याला शास्त्रीय विषय शिकण्याची इच्छा झाली. १८४६ त ट्यूरिन येथें तो रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. सिसिलिच्या राज्यक्रांतीनंतर तो लष्करांत नोकरीस होता. १८४९ तो पारिसला गेला व तेथील शेवरूलच्या रसायनशाळेंत त्यानें प्रवेश करून घेतला. त्याचवेळेस अमोनिया व कर्बनत्र वायूचें हरिद यांच्या संयोगानें कर्बनत्रामिद त्यानें तयार केलें. पुढें तो अलेक्झांड्रीया येथें अध्यापक झाला. तेथें असतांनां 'सेंद्रिय अल्डीहाइडचें मद्यार्कयुक्त पालाशानें पृथक्करण होऊन त्याच प्रकारचा अम्ल व मद्यार्क तयार होतो ' असा शोध त्यानें लावला. शिवाय अणुभारांक व परमाणुभारांक असा मूलद्रव्यांच्या भारांकांत भेद केलाच पाहिजे असें त्यानें सिद्ध केलें. ज्या द्रव्यांच्या वाफेचें विशिष्टगुरुत्व मोजतां येतें त्यांचा अणुभारांक कसा काढावा व ज्यांच्या वाफेचें विशिष्टगुरुत्व मोजतां येत नाहीं त्यांच्या विशिष्ट उष्णतेवरून त्यांचें अणुभारांक कसे काढावे हें त्यानें दाखविलें.

**कनिष्क**—एक कुशान राजा; याच्या जन्मापूर्वी म्हणजे इसवी सनापूर्वीच्या पहिल्या शतकांत हिंदुस्थानच्या उत्तरसरहद्दीवर खालीलप्रमाणें निरनिराळ्या लोकांची सत्ता होती, असें चिनी बखरींवरून दिसतें.

(१) श क लो कां ची स त्ता.—(यांत कांहीं तुर्क लोकांचेंहि मिश्रण झालें होतें ) ही उत्तर व वायव्येकडील हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील भागांत प्रथम काश्मीर व नंतर सिंधु नदीच्या वरच्या भागांवर होती.

(२) यु ह्य-ची.—शक यांच्या उत्तरेस, हिंदुकुशपर्वताच्या दोन्ही बाजूंस व वंक्षु ( ऑक्सस ) नदीच्या वरील भागाच्या तीरांवर यु-एची लोकांच्या हि- हौ ( जब्गु ) वगैरे पांच जाती रहात असत.

(३)भा र ती य पृ थु.—पश्चिमेकडे, दक्षिण अफगाणिस्तानांत, सिंधु नदीच्या मध्य व खालील भागांच्या दोन्ही तीरांवर व आसमंतात पार्थियामधून हांकून दिलेल्या शक लोकांचें इंडोपार्थियन राज्य होतें.

चिनी बखरीमध्यें पहिल्या शक लोकांच्या राज्यास कि-पीनचें राज्य व दुसऱ्या शक लोकांच्या ( भारतीय पृथूंच्या ) राज्यास अन-सीचें राज्य अशी संज्ञा आहे.

या तीन राज्यांपैकीं जें बलिष्ठ असे, तें दुर्बळावर आपली सत्ता चालवीत असे. पुढें युए-ची लोकांनीं जेव्हां अन-सी देश घेतला, त्यावेळीं त्या लोकांनीं प्रथम कौ-फु प्रांत ताब्यांत घेतला ( मरकार्ट ह्या, कौ-फु प्रांत व गांधार प्रांत एकच असावेत असें मानतो ). 'वेइ' घराण्याच्या बखरींत वरील जब्गु जातीच्या पांच प्रांतांचीं नांवें असून त्याबरोबरच क् एन–तुन देश (पूर्वीचा कुएइ-श्वांग) यांचा उल्लेख आहे. हें क्–एन्–तुन–कन्तुर–गन्दुर-गान्धार असावें. कौ-फु प्रांतास येन्–फौ–ये असेंहि म्हटलें आहे. हें नांव जम्बुप्रमाणें जवळ जवळ उच्चारिलें जातें.

पुढें हुन् बखरींत असा उल्लेख आहे कीं, ति-इएन्-चु हें नांव शेन्दु ( सिंधु ) या प्रांताचेंच दुसरें नांव असून हा प्रांत यू–एची लोकांच्या प्रांतापासून १००० ली(सुमारें ३४० मैल) लांब आहे. तेथील लोकांच्या चाली युए-चींच्या चालींप्रमाणें आहेत. ते यु–एची यांच्याच सत्तेखालीं आहेत. त्यांचा प्रदेश यु–एची व कौ–फु यांच्या नैर्ऋत्येस असून पश्चिमेकडे समुद्रापर्यंत पोंचला आहे व पूर्वेकडे प–अन्–की यांच्या देशापर्यंत आहे. यांत शेंकडों प्रांत असून तितकींच मोठीं शहरें आहेत. यांत निरनिराळीं राज्यें असून त्या सर्वांस "सिंधु" हें नांव असून, तीं सर्व यु–एची यांचीं मांडलिक आहेत. या विधानांवरून बखरकारांचें या प्रांतांबद्दलचें ज्ञान अस्पष्ट होतें असें दिसतें.

ना ण्यां चें प्र मा ण.—हें पूर्वोक्त माहितीपासून भिन्न आहे. काबुलिस्तानामध्यें इंडोग्रीक राजा हेरमइ ओस याच्यावेळचीं जीं नाणीं सांपडतात, त्यांवर एका बाजूस हेरमइओस याचें चित्र असून, दुसऱ्या बाजूस कुशान राजा कोझुलो कदफिसेस याचें चित्र आढळतें. यावरून तुइएन्–चु हा प्रांत, इ. स. पूर्वी दुसऱ्या व पहिल्या शतकांत मिलिंद ( मिनन्डॉस ) याच्या वारसांनीं वाढून घेतलेला राज्याचा एक भाग असावा व हेरमइ ओस हा मिलिंदच्या वंशांतील शेवटचा काबुलचा राजा असावा असें दिसतें.

कु शा नां चा इ ति हा स व त्यां त क नि ष्का चें स्था न.—या वरील राज्यांपैकीं कुशानांचें राज्य शेवटीं विजयी होऊन हिंदुस्थानच्या उत्तरेस त्यांनीं आपली सत्ता बसविली. यांच्यांत

( चिनी बखरींप्रमाणें ) किउ-त्सिउ–किओ व येन्–कौ-चेन् हे बापलेक पराक्रमी होऊन गेले. यांपैकीं पहिला कनिष्क असावा असें म्हटल्यास फारसें वावगें होणार नाहीं. व कांहीं विद्वान लोक असें म्हणत सुद्धां. पण कनिंगहॅम यानें किउ-त्सिउ–किओ यास कोझुलो कदफिसेस असें म्हटलें आहे व मरकार्ट हाहि त्याचाच अनुवाद करितो. येन्–कौ–चेन् याचें मातृकांतर " ओइमोकदफिसेस " असें होतें, यामुळें वरील विधानास दुजोरा येतो.

क नि ष्का चा का ल.—( १ ) बुद्धधर्माचा प्रसार मध्य-आशियांत ख्रिस्तापूर्वी झाला होता. कनिष्क हा जर ख्रिस्तानंतर झाला असता तर बौद्धांनीं त्याचा इतका गौरव केला नसता. ( २ ) ख्रिस्तापूर्वीचे चिनी ग्रंथकार कनिष्काचा उल्लेख करीत नाहींत तथापि तेवढ्यावरून कनिष्काचें उत्तर कालीनत्व सिद्ध होत नाहीं. चीनचा व कनिष्काचा कांहीं संबंध आला नाहीं व चिनी राजपुत्राच्या कनिष्काकडील कैदेची कथा सत्य नाहीं ( तो तंगुत राजपुत्र असावा ). कुशान राजांचा अनुक्रम सध्यां पुढीलप्रमाणें समजला जातोः—(१) कुझुलो कदफिसेस, ( २ ) ओइमो कदफिसेस, ( ३ ) कनिष्क. ( ४ ) हुविष्क, ( ५ ) वासुदेव. कनिष्क हा त्याच्या नाण्यावरील लेखांवरून कुशान प्रांताचा राजा होता हें ठरतें. ह्युएन-त्संग याच्या म्हणण्यावरून व दंतकथांवरून यानें कपिश ( काफिरिस्तान ) येथें लोक ओलीस ठेवण्याकरितां एक मोठा मठ बांधिला व तेथें यावेळीं एक चिनी मठहि होता. ( जरी असा कोठें स्पष्ट उल्लेख नाहीं तरी ) हे दोन्ही मठ एकच धरून चालल्यास आपल्यास असें दिसेल कीं, कनिष्कानें तंगुत लोकांपैकीं ओलीस धरून आणलेल्या लोकांस ठेवण्याकरितां एक मठ बांधला होता व तोच पुढें चिनी यात्रेकरूंनां उतरण्याकरितां उपयोगी पडत असे (हे ओलीस ठेवलेले लोक कदाचित चिनी नसतील व त्यामुळें चिनी बखरींमध्यें याबद्दल मुळींच उल्लेख नाहीं).मात्र या मठांत चीनच्या बादशहाचा पुत्र ओलीस ठेवला होता अशी एक बौद्ध दंतकथा आहे. परंतु तीबद्दल ह्युएनत्संग कांहींच बोलत नसून एवढ्या महत्वाच्या गोष्टीबद्दल चिनी बखरींमध्यें एक अवाक्षरहि नाहीं व कनिष्काचा त्यांतून उल्लेखहि नाहीं. चिनी बौद्धांचें कनिष्काबद्दलचें वर्णन पुढीलप्रमाणें आहेः— " तो बौद्ध धर्म स्वीकारून त्याधर्माचा मोठा पुरस्कर्ता होऊन गेला; त्यानें पूर्वहिंदुस्थान जिंकून त्सुंग-लिंगपर्यंत आपलें सैन्य नेलें; पाटलिपुत्र येथील राजास जिंकलें आणि अन्-सी यांच्या राजाचा हल्ला परतवून लाविला. " यांतील अतिशयोक्ति भाग वजा केला तरी कनिष्क हा एक बौद्ध धर्माचा मोठा पुरस्कर्ता असून एक मोठा बलाढ्य राजा होऊन गेला एवढें स्पष्ट होतें. चिनी बखरींमध्यें एका ठिकाणीं ( बुद्ध धर्माच्या इतिहासांत ) म्हटलें आहे कीं, ( इ. स. पूर्वी १२२ –११५) " हन् घराण्यांतील वु–ति बादशहानें हो-कु-पिंग या सेनापतीस हिउंग्-नू राजावर पाठविलें. तेथून त्यानें क-उन्-सी राजास कैद करून आणिलें व एक दहा फूट उंचीची सुवर्णमूर्ति आणली. तिजसमोर यज्ञ वगैरे न करितां धूप जाळीत असत. " या वेळेपासून चीनमध्यें बुद्ध धर्माचा प्रवेश झाला. पुढें चांग-किआन् यास त-हिआ ( बॅक्ट्रिया ) प्रांतांत वकील म्हणून पाठविलें असतां त्यानें परत आल्यावर असें कळविलें कीं 'त-हिआ याला लागून शेन्-तु(सिंधु)अथवा त्येन्-धु हें राज्य आहे.' यावेळीं चांगनें लोकांस बौद्ध धर्माची प्रथम माहिती दिली. पुढें ( इ. स. पूर्वी २ ) "हन् घराण्यांतील ऐ-ति बादशहाच्या कारकीर्दींत राजदेवालयाच्या दुय्यम पुजाऱ्यास त-युएची लोकांच्या वकिलाकडून एक तद्देशीय (चिनी)भाषेंतील बुद्ध सूत्रांचा ग्रंथ मिळाला" असा बखरींत उल्लेख आहे. यावरून व विशेषतः वरील शेवटच्या गोष्टीवरून असें दिसतें कीं इ. स. पूर्वी २ या वर्षी युएची लोकांचा राजा बुद्ध धर्माचा प्रसार जारीनें करीत असावा व म्हणूनच त्यानें चिनी भाषेंत बुद्धसूत्रांचें भाषांतर करून त्याचा प्रवेश राजमंदिरांत करविला.

याप्रमाणेंच सुइ बखरींवरूनहि हे युएची लोक मध्य-आशिया व चीन या देशांत यावेळीं बुद्धधर्माचा प्रसार जारीनें करीत होते असें दिसतें.

आतां कनिष्क राजानेंच प्रथम बुद्धधर्माचा स्वीकार केला व कोझुलो कदफिसेस व ओइमो कदफिसेस हे त्याच्यानंतर होऊन गेले, असें जर न मानलें तर, बुद्ध लोकांनीं कनिष्क राजाचें बुद्धधर्मग्रहण, ही जी एक यांच्या धर्माच्या उर्जितावस्थेस कारणीभूत झालेली विशेष महत्वाची गोष्ट मानून तिचें एवढें स्तोम माजविलें आहे त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें होतें. तसेंच जर कनिष्काच्या पूर्वींचे राजे बुद्धधर्मी असतील असें मानलें तर त्यांच्या पुढचा राजा बुद्धधर्मी होतो, या गोष्टीस मुळींच महत्व येत नाहीं.

कोझुलो कदफिसेस याच्या नाण्यांवर बुद्धाची प्रतिमा आहे. त्यावरून तो बुद्धधर्मी होता हें उघड दिसतें. ह्युएन-त्संग यानेंहि स्पष्ट म्हटलें आहे कीं, कनिष्क हा पहिल्यानें बुद्धधर्मी नसून, त्यानें एका गुराख्यापासून प्रथम त्या धर्माचा उपदेश घेतला.

कनिष्कासारख्या बुद्धिमान राजास आपलें सामर्थ्य वाढविण्यास व लोकांचें साहाय्य मिळण्यास बुद्धसंघांशीं व्हावेसें वाटल्यास नवल नाहीं. यांत त्याचा हेतु धार्मिक असण्यापेक्षां राजकीय असणें साहजिक व संभवनीय आहे, म्हणून कनिष्क हा कोझुलो कदफिसेस व ओइमाकदफिसेस यांच्यापूर्वी होऊन गेला असेंच समजलें पाहिजे.

चिनी लोकांनीं या लोकांनां रानटी समजून यांच्याशीं ( इ. स. पूर्वीच्या पहिल्या शतकांत ) संबंध ठेवण्याचें बंद केलें होतें, असें त्यांच्या बखरींवरून दिसतें. त्यामुळें याची यांच्या वंशावळीची वगैरे माहिती चिनी बखरींवरून मिळत नाहीं. कनिष्काचा चिनी बखरींत उल्लेख नाहीं यावरून असें दिसतें कीं, बुद्धधर्माच्या दृष्टीनें कनिष्काच्या राज्याला

जितकें महत्त्व होतें तितकें चिनी ऐतिहासिक दृष्ट्या नव्हतें. तेव्हां ख्रिस्तपूर्व २ ऱ्या वर्षी (सूत्रांच्या चिनी भाषांतरांवरून) कनिष्क राजा गादीवर होता असें सिद्ध होतें. याच्यानंतरच्या राजांचीं नांवें हुविष्क व वासुदेव हीं आहेत. परंतु मि. फ्लीट यांनीं भोपाळच्या एका शिलालेखावरून असें सिद्ध केलें आहे कीं, कनिष्क व हुविष्क यांच्या दरम्यान वासिष्क अथवा वासष्क या नांवाचा एक राजा होऊन गेला असावा. ख्रिस्तपूर्व २ ऱ्या सालापासून या तिघांनीं मिळून इ. स. ५० पर्यंत राज्य केलें असावें. हुन् बखरीमध्यें एक उल्लेख असा आहे कीं, कोझुलो कदफिसेस यानें अन्–सि लोकांस जिंकून कौ–फु, व पु–त, व किपिन हे प्रांत मिळवून त्यांवर राज्य केलें. यावरून कनिष्कानें मिळविलेलें राज्य त्याच्यानंतर येणाऱ्या राजांनीं घालविलें असलें पाहिजे. म्हणजे कुशान सत्तेस कनिष्क व कोझुलो कदफिसेस यांच्या दरम्यान अन्–सि व किपिन येथील शक लोकांनीं अडथळा केला व कोझुलो कदफिसेस यानें ती पुन्हां प्रस्थापित केली असावी असें दिसतें. यावरून कनिष्काचा काल आणखी ५० वर्षे मागें ढकलला तर जवळ जवळ विक्रम संवताच्या आरंभ(इ. स. पू. ५८)कालाजवळ जातो, आणि कदाचित् हा शक कनिष्काच्या राज्यारंभापासून सुरू झाला असल्याचाहि संभव आहे. कनिंगहॅम यानेंहि याचा राज्यारंभ हाच असावा असें अनुमान काढलें आहे. मि. फ्लीट यांनीं आपल्या शिलालेखावरील निबंधांत म्हटलें आहे कीं, प्रो. एच्. एच्. विल्सन याचें पुढील म्हणणें खरें आहे. "कनिष्क यानें कदफिसेस यांच्या घराण्यापेक्षां निराळ्याच एका वंशाची स्थापना केली. हा वंश कदफिसेस यांच्यापूर्वी सुमारें एक शतक खोतव प्रांतांतून काश्मिर प्रांतांत व नंतर हिंदुस्थानांत आला. तो कुशानच्या राजघराण्यापैकींच होता. यानंतर कदफिसेस याच्या मूळ पुरुषानें ऑक्सस नदीवर आपली सत्ता बसविली व त्याच्या मुलानें हिंदुस्थानावर त्याच दिशेनें हल्ला केला." या विलसनच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून कनिष्क हा कोझुलो-कदफिसेस याच्यानंतर होऊन गेला असें एक चुकीचें मत पसरलें होतें, असें फ्लीट म्हणतो.

कनिष्काच्या कालाबद्दल दुसरेंहि एक मत प्रचलित आहे. त्याला कोणता आधार आहे त्याची माहिती थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे. अशोकाचा काल व कनिष्काचा काल यांमधील दोन शतकाहून अधिकच एवढ्या कालाबद्दल मुळींच माहिती नाहीं. चिनी लोकांकडून वर सांगितलेल्या कांहीं कांहीं सूचक गोष्टी आढळतात; त्यांवरून शक किंवा सिथियन लोक या देशांत केव्हां आले याबद्दल थोडीशी माहिती लागते. अशोकाच्या मरणानंतर लागलींच मगध प्रांताच्या वायव्य सरहद्दीवरच्या प्रांतांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें असावें व या आपसांतील भांडणकाळांत ख्रि. पू. १६० च्या सुमारास ग्रीक लोकांनीं पुढें रेटलेले शक किंवा सिथियन लोक पुढें आले असावेत. पुष्कळ वेळ झगडल्यानंतर ख्रि. पू. १२० च्या सुमारास हे लोक खुद्द हिंदुस्थानांत शिरले असावेतसें वाटतें. यांचा मार्ग सिंधमधून दक्षिणेकडे जाण्याचा होता. मध्यंतरीं यु-एचीचे पांच संघ शकांच्या पाठोपाठ येऊन ख्रि. पू. १२० च्या सुमारास ते बॅक्ट्रिया देशाचे राजे बनले. यानंतर सुमारें एका शतकानें कुशान नांवाची या संघांतली एक जात प्रबळ होऊन बसली. या लोकांनीं शक लोकांच्या सार्वभौम सत्तेला जो शह दिला होता त्यामुळें दक्षिणेंतील सुभेदारांनां आपलें स्वातंत्र्य जाहीर करणें सोपें गेलें असावें. पुढें कुशान लोकांनीं हळूंहळूं हिंदुस्थानांत हातपाय पसरण्यास सुरवात केली. यांनीं उत्तरेकडचा मार्ग पत्करिला व पंजाबांत घुसून, नंतर मथुरेच्या शकक्षत्रपाला त्यांनीं हांकून दिलें. या विस्तृत राज्याची राजधानी तक्षशिला ही झाली. मथुरा ही उपराजधानी ह्मणून कायम राहिली. कुशान राजांच्या नांवाच्या याद्या सांपडतात त्यांवरून व नाण्यांवरून यांची वंशावळ बऱ्याच निश्चितपणानें बसवितां येते; परंतु यांतील तारखांच्या शतकांबद्दल मतभेद आहे.

याबद्दलचा जो तिसऱ्या प्रकारचा पुरावा आहे त्याचा विचार कोणींच केलेला नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट होय !! बुद्धचरित्राचा कर्ता अश्वघोष हा कुशान वंशांतला प्रसिद्ध राजा जो कनिष्क त्याच्या वेळेस होता, हें आतां सर्वांनां मान्य झालें आहे. हें काव्य बुद्धाच्या चरित्रावर लिहिलेलें असल्यानें तें ब्राह्मण लोकांनां उद्देशून लिहिलेलें नाहीं हें उघड आहे. या तऱ्हेचें काव्य केव्हां लिहिलें गेलें असावें? शुद्ध संस्कृतांत लिहिलेला असा शिलालेख इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत सांपडतो. तेव्हां अश्वघोषाचें काव्य जरी सामान्य लोकांनां उद्देशून लिहिलेलें असें संस्कृतांतलें पाहिलेंच काव्य मानिलें तरी सुद्धां याचा काल यापलीकडे ढकलतां येत नाहीं. वर दिलेले आधार प्रमाणभूत मानले, तर कुशनवंशाचा काल हजारों शिलालेखांवरून गोळा केलेल्या भाषेच्या इतिहासाच्या पुराव्याला बाध न येतां इतका मागें (ख्रि. पू. १२०) ढकलतां येणें अशक्य आहे. यासंबंधाचा सर्व पुरावा व्हिन्सेंट स्मिथ या गृहस्थानें गोळा केला आहे. त्यानें कनिष्काचा काल इ. स. १२५–१५३ हा ठरविला आहे. अश्वघोषाच्या बुद्धचरित्राचा काल जो इ. सनाचें दुसरें शतक तो कोणत्याहि गोष्टीनें बाधित होऊं शकत नाहीं, आणि ज्याप्रमाणें गिरीनगर येथील राजांच्या दरबारांत शुद्ध संस्कृतांतला पहिला जाहीरनामा लिहिला गेला, त्याप्रमाणें पहिलें संस्कृत काव्य कुशन वंशाच्या तार्तर अधिपतींच्या दरबारांत लिहिलें जावें ही गोष्ट असंभवनीय नाहीं!

धर्मपुस्तकांवर टीका म्हणून तीन टीका शुद्ध संस्कृत भाषेंत कनिष्काच्या राज्यांत लिहिल्या गेल्या आहेत. या गोष्टीनेंहि वरच्या विधानास आणखी बळकटी येते. तेव्हां संस्कृत ही सामान्य प्रकाराची भाषा म्हणून उपयोगांत येऊं लागल्यानंतर, कनिष्क गादीवर आला असावा असें अनुमान काढण्यास बिलकूल हरकत नाहीं. सारांश, कनिष्काच्या सालाबद्दल दोन मतें

आहेत. एक इ. स. पू. ५८ व दुसरें इ. स. १२५ यांपैकीं निश्चित कोणतें ह्याचा निर्णय अद्यापि व्हावयाचा आहे.

[ संदर्भग्रंथः—चिनी बखरी; इं. अँ. १९०६; व्हिं. स्मिथ व्हिंस डेव्हिड्स; ज. रॉ. ए. सो. १९०३; कनिंगहॅम इत्यादि]

**कॅनि**—इटलीमध्यें कॅनी नांवाचें अॅपुलीआचें प्राचीन खेडें. हें फिडस नदीच्या मुखाच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर असणाऱ्या एका टेंकडीवर आहे. इसवीसनापूर्वी २१६ सालीं हॅनीबालनें रोमन लोकांचा येथें पराभव केला. पुढें येथें म्युनिसिपालिटी स्थापण्यांत आली. मध्ययुगांत हे बिशपचें राहण्याचें ठिकाण होतें परंतु १२७ सालीं तें नाश पावलें.

**कनेत**—पंजाबमधील एक जात. लोकसंख्या (१९११) ४०३८१५. हें पंजाबमधील डोंगराळ मुलखांतले मूळचे रहिवाशी होत. ते स्वतंत्र व शूर असत. ते एकमेकांचीं खेडीं लुटीत असत. त्यांचीं घरें म्हणजे लहान लहान झोंपड्या व दऱ्या हीं होत. ते दिवसभर बहुतकरून झोंप घेत असत. ते शेतकीकडे दुर्लक्ष करीत व रात्रीं दरवडे घालीत असत. प्रत्येक खेड्यांतील प्रत्येक तटाचा मोवन्ना नांवाचा एक मुख्य असे. तो लुटींतील हिस्सा घेत असे व शिवाय हक्क-इ-सरदारी म्हणून थोडा कर घेत असे. प्रत्येक ठिकाणीं उत्तम जमीन देवास दिलेली असून त्याहून जरा कमी प्रतीची जमीन मोवन्ना लोकांस दिलेली असे. यांच्या पडक्या घरांचे अवशेष अद्याप दृष्टीस पडतात.ते किल्ल्याप्रमाणें दिसतात.यांच्या नंतर सपाट प्रदेशांमधून क्षत्रिय व ब्राम्हण येथें आले.त्यांनीं मोवन्नांच्या जमीनी घेतल्या, सर्व प्रांताचे ते मालक बनले.ब्राह्मणांसहि या लोकांनीं जमीनी दिल्या. या कालाबद्दल अशी दंतकथा आहे कीं बलरामजी बलराम यानें क्षत्रियांची कत्तल केली त्यावेळीं ते डोंगरांत पळाले. कांहीं आपली जात सोडून ब्राह्मण झाले; कांहीं बनिया झाले. यांच्या कांहीं बायका ब्राह्मणाजवळ राहिल्या त्यांजपासून खत्री उत्पन्न झाले. ज्यांनीं प्राण वाचविण्याकरितां जात बदलली त्यांस रजपूत अथवा खत्री म्हणूं लागले.

ब्राह्मण लोक येथील मूळ रहिवाश्यांस कुनीत म्हणूं लागले अशी दंतकथा आहे.हे कनेत मूळ रहिवाश्यांपैकीं उच्च जातीचे होत. याशिवाय नीच जातीहि आहेत. आर्यधर्मात न येणारे मूळचे हिंदुस्थानांतील रहिवासी यांना कदाचित आर्य कुनीत म्हणत असावेत असा एक तर्क निघतो.

सर अलेक्झांडर कनिंगहॅम हा (काइन्स ऑफ एन्शंट इंडिया, पा. ७०–७१) हे बृहत्संहितेंत उल्लेखिलेले कुनिंद किंवा कुलिंद असावेत असें म्हणतो.

कनेत लोक हे आपणास ब्राह्मण व रजपूत यांच्या मिश्र विवाहापासून उत्पन्न झालेले समजतात. हे आपलीं प्रेतें जाळतात.यांच्या प्रत्येक जातीचें वेगळें स्मशान असतें. यांचें थडगें वगैरे कांहीं सांपडत नाहीं. प्रत्येक जातीची पाण्याची विहीर निराळी असते. सोनार किंवा न्हावी वगैरे यांच्या मुलीशीं लग्नें करितात परंतु ते कनेत यांच्या घरीं आपल्या मुली देत नाहींत तसेंच कनेत यांचा खश व कारून या जातीशीं परस्पर विवाह होतो. पुरुषास वाटेल तितक्या बायकांशीं लग्न करतां येतें. काडीमोड व पुनर्विवाहहि आहेत.

यांच्यामध्यें अशी चाल आहे कीं चार पांच भावांपैकीं वडील भाऊ रीतीप्रमाणें एका मुलीशीं लग्न करतो. चालीप्रमाणें तिला सांगण्यांत येतें कीं तुला सर्व भावांची बायको म्हणून वागविण्यांत येईल व तीहि त्या गोष्टीस कबूल होते व ती प्रत्येक भावाबरोबर नवऱ्याप्रमाणें वागते. मात्र हे सर्व सख्खे भाऊ असले पाहिजेत.

या लोकांचा भूत पिशाच्चांवर विश्वास आहे. ब्राह्मणाकडून परीक्षा करून बाधा झाल्याचें समजल्यास अनेक उपाय योजतात. मृतांच्या आत्म्याबद्दल प्रार्थना व पूजा वगैरे करितात. यांचा शकुनांवर विश्वास आहे.

**कनोजचें राज्य, म ध्य दे श.**—आजच्या संयुक्त प्रांताला प्राचीनकाळीं मध्यदेश म्हणत. हा प्रदेश म्हणजे गंगायमुनांचें खोरें. हें प्राचीन भारतीय आर्य सुधारणेचें केन्द्र होतें. प्राचीन भारतीयांचा सांस्कृतिक विकास येथेंच झाला आणि येथूनच त्यांनीं भरतखंडाच्या उत्तरभागावर आपलें राज्य स्थापिलें. येथेंच पूर्वी यादवांचें राज्य होतें; पुढें त्यांनां जरासंधानें हांकून दिलें. महाभारतांत (आ. १९१) कान्यकुब्जाचा उल्लेख येतो. पतंजलीहि त्यांस उल्लेखतो व कनोज असें स्पष्ट नांव फा-हिआन याच्या ग्रंथांत प्रथम आढळतें. हा येथें (इ. स. ४०५) आला, तेव्हां तेथें २ हीनयानी १ मठ व १ स्तूप होता. म्हणजे यावेळीं कनोज साधारण गांव होतें.

ह्युएनत्संग यानेंहि याला मध्यदेशच म्हटलें आहे. वराहमिहिरहि तेंच नांव देतो. या प्रदेशाचें हवामान निरोगी असे. हा प्रांत फार सुपीक असल्यानें या लहान प्रदेशांत पूर्वीपासून अनेक राज्यें स्थापन होत होतीं. याच प्रांतांत कनोज हें शहर आहे.

मौखरीः—गुप्तांचें साम्राज्य चालू असतां कनोज येथें पहिलें राज्य मौखरीं या वंशानें स्थापन केलें.गुप्तांचें साम्राज्य दुसऱ्या कुमारगुप्ताच्या मृत्यूमुळें नाहींसें झाल्यानंतर हे मौखरी प्रबळ झाले (इ. स. ५३८). मौखरीवंश कनोजेस होता हें हर्षचरित्रावरून समजतें. यांची वंशावळ, अशीरगडमुद्रा व अफसड शिलालेख आणि देवबर्नाक लेख यांच्यावरून दिसते ती अशीः—

महाराज हरिवर्मा
|
महाराज आदित्यवर्मा × हर्षगुप्ता
|
महाराज ईश्वरवर्मा × उपगुप्ता
|
महाराजाधिराज ईशानवर्मा
|
परममाहेश्वर महाराजाधिराज शर्ववर्मा (इ. स. ५५३)

( शर्ववर्मा पुढें चालू )
|
परमेश्वर सुस्थितवर्मा
|
परमेश्वर अवन्तिवर्मा ( स. ५६९ )
गृहवर्मा ( इ. स. ६०६ )

यांपैकीं ईशान, शर्व व सुस्थित यांनीं कुमार, दामोदर व महासेन या गुप्त राजांशीं लढाया दिल्या होत्या. आदित्याची स्त्री हर्षगुप्ता ही त्याचा समकालीन हर्षगुप्त याची बहीण असावी. शेवटचा गृहवर्मा हा प्रख्यात हर्षवर्धन सम्राट याचा समकालीन होता. ईशानच्या कारकीर्दीत हें घराणें प्रबल झालें. यानें व शर्वानें हूणांशींहि टक्कर देऊन आपलें राज्य बरेंच वाढविलें. पूर्वेकडे लौहित्य ( ब्रह्मपुत्रा ) नदापर्यंत व दक्षिणेस असीरगडा( वऱ्हाणपुरा )पर्यंत तें होतें. शेवटचा गृहवर्मा याच्यावर देवगुप्त मालवराजानें स्वारी केली या सुमारास मौखरी दुर्बल झाले होते. मौखरी वंशाचीं वरींचशीं नाणीं सांपडलीं आहेत त्यांवरुन त्यांचा काल वर दिला आहे.

हर्षाचें पालकत्वः—ठाणेश्वर येथें सातव्या शतकाच्या सुरवातीस प्रभाकरवर्धन हा राजा होता हा त्यावेळीं उत्तर हिंदुस्थानांतील राजमंडळांत प्रमुख होता. यानें हूणराज, मालवराज, सिंधुराज व गुर्जरराज यांचा पराभव केला होता. यानें आपली मुलगी राज्यश्री ही गृहवर्मा मौखरी याला दिली. प्रभाकरवर्धनास महाराजाधिराज परमभट्टारक अशी पदवी होती हूणांनीं अवचित त्याच्यावर स्वारी केली, तेव्हां त्यानें आपला वडील पुत्र राज्यवर्धन याला त्यांचेवर पाठविलें. त्यानें त्यांचा पराभव केला. इतक्यांत इकडे एका एकीं प्रभाकर मेला ( स. ६०५ ). याच सुमारास गुप्त व मौखरी यांची लढाई सुरू झाली. माळव्यांतील गुप्तांचें व कनोजच्या मौखरींचें पूर्वापार वैर होतें. या लढाईंत गृहवर्मा ( राज्यवर्धनाचा मेहुणा ) पडला व राज्यश्रीला मालवराजानें कैदेंत ठेविलें आणि कनोज घेऊन तो ठाणेश्वरावर आला. मौखरींच्यावद्दल बंगालच्या गुप्तांनांहि मत्सर वाटत असल्यानें ( कारण मौखरींनीं त्यांना मांडलिक बनविलें होतें. ) बंगालचा शशांकगुप्त यानें माळवी देवगुप्तास साहाय्य केलें होतें. राज्यवर्धनानें या दोन्हींहि गुप्तांचा पराभव केला, त्यावेळीं मालवराजानें राज्यश्रीस सोडून दिलें. इकडे शशांकानें आपली मुलगी देण्याच्या निमित्तानें राज्यवर्धनाला बोलावून त्याचा विश्वासघातानें खून केला. यानंतर राज्यवर्धनाचा भाऊ हर्ष हा ठाणेश्वरास गादीवर बसला ( स. ६०६ ). नंतर तो लगेच दिग्विजयास निघाला व प्रथम कनोजेसच गेला. त्यावेळीं त्याची बहीण राज्यश्री तेथें नसून शेजारच्या एका अरण्यांत लपून बसली होती. ती पुढें अग्निकाष्ठें भक्षण करीत असतां बहिणभावांची भेट झाली. दोघे कनोजेस आले. राज्याची व्यवस्था कशी करावी यावद्दल वादविवाद होऊन अखेर शहरावाहेरील बोधिसत्व अवलोकितेश्वराच्या कौलावर निकाल ठरला गेला. निकाल असा झाला कीं, राज्यश्रीच्या नांवानें हर्षानें कारभार चालवावा आणि स्वतः सिंहासनारुढ न होतां व कनोजाधिपति असें उपपद न लावितां राजपुत्र शिलादित्य हें नांव घ्यावें. याप्रमाणें हर्ष हा यापुढें ठाणेश्वर सोडून कनोज येथेंच अखेरपर्यंत राहिला व तेथूनच दोन्ही राज्यांचा कारभार पाहूं लागला. येथून त्यानें उत्तर हिंदुस्थानांत आपलें साम्राज्य सर्वत्र पसरविलें ( हर्ष पहा. ) सारांश, यावेळीं कनोज ही हिंदुस्थानची राजधानी होती. पाटलीपुत्र यावेळीं मागें पडलें. कनोजचें हें राजकीय महत्व हिंदुस्थानच्या ऐतिहासिक मध्ययुगीन कालापर्यंत ( स. १२०० ) टिकून राहिलें. पृथ्वीराजानें जयचंदाचा पराभव केल्यावर कनोज नामशेष होऊन दिल्ली पुढें आली. हर्षानें कनोजेस बुद्धाच्या उत्सवाकरितां ( स. ६४३ ) एक फार मोठी परिषद भरविली होती. तिला ह्युएनत्संग स्वतः हजर होता. त्याच वेळीं हर्षाच्या खुनाचा प्रयत्न झाला होता. ह्युएन येथें ( स. ६३६ व ६४३ ) राहिला होता. त्याच्यावेळीं तेथें १०० वर बौद्धमठ व १० हजार भिक्षु असत. हिंदूंचीं देवळें २०० होतीं; हिंदु व बौद्ध दोन्हीहि धर्म तेथें प्रचारांत होते. थोडक्यांत सांगतां येईल कीं, भरतखंडांतील राजकारणांतील गुरुत्वाचा मध्य गंगाकांठाहून, पूर्वेकडून पश्चिमेकडे पाटलीपुत्राकडून कनोजमार्गें दिल्लीपर्यंत येऊन पोहोंचला. स. ६०० –१२०० पर्यंत कनोज हें हिंदुस्थानाचें राजकीय केन्द्र होतें. अरब इतिहासकार हि हें कबूल करितात. हिंदुस्थानच्या राजधानीचें नांव सदासर्वदा कनोज असेंच ते देतात. हर्षानंतर प्रत्येक सार्वभौमाला तीच राजधानी करावीशी वाटे. या कालांत या शहराचें ऐश्वर्य व संपत्तीहि वर्धिष्णु होती. गझनवी महंमुदचे वेळीं तिचा व कलाकौशल्याचा कळस झाला. त्यानें तेथील स्फटिक राजप्रासादांचा अद्वितीयपणा कबूल केला होता. ह्युएनत्संगाचे वेळीं तर तें गर्भश्रीमंत व ५ मैल लांब आणि १ मैल रुंद असें तटबंदीचें शहर होतें. लोक रेशमी वस्त्रें वापरणारे श्रीमंत होते. कारागीर व विद्वान लोकांचा भरणा शहरांत बराच होता. त्यांत रम्य उपवनें, हौद, पदार्थसंग्रहालयें होतीं; तें आठव्या शतकांत इतकें वैभवसंपन्न व दुर्भेद्य होतें कीं, अशक्य गोष्ट साध्य करणारास "तुला कनोज पाहिजे वाटतें" असें विचारीत ( चचनामा ).

वर्म घराणेंः—हर्ष मेल्यानंतर ( स. ६४७ ) त्याला पुत्र नसल्यानें राज्यांत बंडाळी झाली. स्मिथ म्हणतो, हर्षानंतर त्याचा प्रधान अर्जुन ( अर्जुनाश्व ) यानें कनोजचें साम्राज्य बळकाविलें व त्याचें पारिपत्य चिनी दरबारांतील वकिलानें केलें पण ही हकीकत त्यानें चिनी बखरीवरुन सजविली असून, चिनी लेखकांची इच्छा हिंदुस्थानांत स्वमहत्त्व दाखविण्याची असल्यामुळें तिच्यावर सर्वस्वीं विश्वास ठेवतां येत नाहीं. हर्षानंतर जुन्या मौखरी अथवा वर्म घराण्यांतील कोणी वैदिकधर्माभिमानी पुरुष गादीवर आला

असावा. सातव्या शतकाच्या अखेरीस कनोजेस यशोवर्मा म्हणून राजा होता हें प्रसिद्ध आहे. हा विद्वानांचा चहाता असून, याचे पदरीं भवभूति, वाक्पति वगैरे कवी होते. यानें दिग्विजय हि केला. परंतु काश्मीरचा राजा मुक्तापीड व चालुक्य राजा विनयादित्य यांनीं त्याचा मोड केला (इ.स. ७४०). यशोवर्म्यानें गौडराज्य जिंकलें (इ. स.६८०-९०.). याचें साग्र वर्णन गौडवहो या काव्यग्रंथांत सांपडतें. यानें चीन देशीं आपला वकील पाठविला होता (७३१). यशोवर्मा गादीवर बसण्यापूर्वी दोन राजे (यांचीं नांवें आढळत नाहींत) कनोजेस (हर्षानंतर) गादीवर होते. यशोवर्म्याच्या कारकीर्दीत वैदिकधर्माचा पुनरुद्धार झाला व कनोज शहर हें वैदिक धर्माचें केन्द्र बनलें, तें मुसुलमानी विजयापर्यंत तसेंच राहिलें. यशोवर्म्याच्या नंतर झालेले राजे दुर्बल होते. पैकीं त्याचा नातू वज्रायुध याचा पराभव कश्मीराधिपतीनें केला (इ. स. ७५०-७०). यानंतर चक्रायुधाचा उल्लेख आढळतो (स. ८००). याचे बापाचें नांव इन्द्रायुध असून त्याच्या वेळीं (७८३) कनोजचें राज्य बरेंच विस्तृत होतें. प्रयागच्या पश्चिमेकडील उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक भाग या राज्यांत येई. यानंतर बंगालच्या पालराजांनीं वर्मराजांचा पराभव केला. त्याच्या मांडलिकांनींहि बंडें उभारलीं. अखेर (स. ८१६) राजपुतान्यांतील भीलपालचा गुर्जरप्रतिहार राजा जो नागभट्ट त्यानें वर्म घराण्याचा नाश केला. याच वेळीं कनोजची पुन्हां भरभराट झाली. या गुर्जरांचें व राष्ट्रकुटांचें वैर होतें. पैकीं राष्ट्रकूट गोविंद तिसरा यानें या नागभट्टाचा पराभव केला (८२०). त्याच्या नंतर रामभद्र यानें ८२५--८४० पर्यंत राज्य केलें. त्याचा मुलगा मिहिर होय. हे वर्म घराणें स. ५००--८०० पर्यंत राज्य करीत होतें. यांच्याच कारकीर्दीत बौद्धधर्माचें उच्चाटन झालें.

मिहिर भोज.---हा रामभद्राचा मुलगा असून भोज याच पदवीनें प्रसिद्ध आहे. यानें जवळजवळ अर्धशतक (८४०-८९०) पर्यंत राज्य केलें. हा फार शूर होता. यानें राज्यविस्तार केला व स्वतः सम्राट बनला. पंजाब, राजपुताना, संयुक्तप्रांत, ग्वाल्हेर इतक्या प्रदेशांवर त्याचें साम्राज्य होतें. याच्यानंतरच्या दोन राजांनीं सुराष्ट्र (व कदाचित् गुजराथ व माळवा) जिंकलें. मिहिरनें बंगाली देवपालावर स्वारी केली व त्याचा पराभव केला. भोजानें स्वतःला आदिवराह हें विरुद धारण केलें. वराहाचें चित्र काढलेलीं यांचीं नाणीं उत्तरहिंदुस्थानांत पुष्कळ सांपडतात. मेगॅस्थिनीस किंवा बाण हे याच्या राज्यकारभाराचें कांहींच वर्णन देत नाहींत. याचा पुत्र महेंद्रपाल (महेंद्रायुध) यानें मात्र बापानें मिळविलेल्या राज्याचें योग्य पालन केलें. फक्त पंजाब याच्या हातून गेला, तर उलट यानें मगध जिंकला. याचा गुरु प्रसिद्ध कवि राजशेखर होय. याच्या मागून याचा मुलगा दुसरा भोज गादीवर आला, परंतु तो लवकर मेला; तेव्हां त्याचा सावत्रभाऊ महिपाल (९१०-९४०) राजा झाला. याच्या कारकीर्दींत कनोजच्या साम्राज्यास पुन्हां उतरती कळा लागली. राष्ट्रकूट तिसऱ्या इंद्रानें (९१६) याच्यावर स्वारी करून सुराष्ट्र जिंकला व कनोजहि घेतलें; परंतु पुन्हां तें महिपालाकडेच ठेविलें याच्यानंतर देवपाल राजा झाला (९४०-५५). या सुमारास जेजकभुक्तीचा राजा यशोवर्मा चंदेल यानें देवपालाचें मांडलिकत्व झुगारून दिलें व कालंजरगड काबीज केला. महिपाल दुर्बळ झाला होता. देवपालानंतर, त्याचा भाऊ विजयपाल (९५५-९० ) राजा झाला. याच्या वेळीं कच्छवाहृ वज्रदामन् यानें देवपालाचा ग्वाल्हेर प्रांत घेतला. या सुमारास मुसुलमानांचा धुमाकूळ सुरू झाला. सबक्तगीननें हिंदुस्थानावर ९८६-८७ मध्यें पहिली स्वारी केली. त्यानंतर त्यानें आणखी स्वाऱ्या केल्या तेव्हां, तत्कालीन मोठा हिंदु राजा जो भटिंड्याचा जयपाल, त्यानें सर्व हिंदु राजांची एकी करून सबक्तगिनाशीं लढाई दिली. परंतु तींत त्याचा पराभव झाला (९९१). या वेळीं विजयपाल मरून त्याचा मुलगा राज्यपाल हा कनोजचा राजा झाला होता. त्यानेंहि या लढाईत भाग घेतला होता. सबक्तगिन नंतर त्याच्या मुला( सुलतान महंमुद )नें हिंदुस्थानावर सुमारें १७ स्वाऱ्या केल्या. त्यानें १०१९ च्या जानेवारीमध्यें खुद्द कनोजवरहि स्वारी केली. त्यावेळीं राज्यपालाची तयारी चांगली नसल्यानें महंमदनें एका दिवसांतच कनोज शहर व तेथील सात किल्ले काबीज केले, तेथील देवळें फोडलीं व लूट घेऊन तो गझनीस परत गेला. राज्यपालानें कनोज सोडून महंमदाचें मांडलिकत्व पत्करिलें. त्यामुळें राजांतील सारे हिंदु चिडले व त्याच्याविरुद्ध त्यांनीं बंड केलें. त्यांचा पुढारी चंदेल राजा विद्याधर हा होता. त्यांनीं १०१९ त कनोज घेऊन, राज्यपालाचा वध केला व तेथील त्रिलोचनपालास थोडासा प्रदेश दिला. या प्रकारानें महंमूद रागावला व त्यानें १०२० मध्यें चंदेल राजावर स्वारी करून त्याचा पराभव केला. उलट त्रिलोचनपालानें महंमदाला परत जातांना थोडासा अडथळा केला, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. यानें आपली राजधानी बारी (गंगाकांठ) केली होती. याचा मुलगा यशपाल. येथें या भोज घराण्याचा शेवट झाला.

गहरवार घराणें.---मुसुलमानांनीं कनोज घेतल्यानंतर (१०२०) साठ सत्तर वर्षें कोणी रजपूत राजे कनोजप्रांतावर राज्य करीत होते; परंतु त्यांचा इतिहास बरोबर समजत नाहीं. ते मुसुलमानांचे मांडलिक होते व ११९४ (घोरीच्या स्वारी)च्या पुढेंहि राज्य करीत होते. त्यांची राजधानी जाफराबाद येथें होती. यांचा व गुर्जर प्रतिहारांचा कांहीं संबंध नव्हता. यांपैकीं चंद्रदेव गहरवार यानें १०९० मध्यें कनोज घेऊन आपला वंश तेथें स्थापिला. या गहरवारास पुढें राठोडवंश असें नांव मिळालें. चंद्रदेवाचा मुलगा मदनपाल व नातू गोविंदचंद्र यानें (११०४-११५५) फार वर्षें राज्य केलें. याच्या बायकोचें नांव नयनकेली देवी. त्याचा मुलगा विजयचंद्र व नातू जयचंद यांचें नांव हिंदी काव्य व दंतकथा यांत प्रख्यात आहे. याचीच मुलगी (संयोगिता) अजमेर

येथील पिथोररायाा( पृथ्वीराजा )नें हरण केली ११७५. मुसुलमान इतिहासकार जयचंदाला काशीचा राजा म्हणतात. बहुधा काशी ही त्याची राजधानी असावी. हा फार शूर असून यानें चीन ते माळवा व पंजावपर्यंत राज्याचा विस्तार केला. पुढें ( ११९४ ) शिहाबुद्दीन यानें त्याच्यावर स्वारी करून त्याचा भराभव केला व राज्य काबीज केलें. लढाईंत जयचंद मेला. शिहानें १४०० उंट लूट केली. येथें कनोजेचें साम्राज्य अथवा स्वतंत्र राज्य संपलें. या गहरवालां पैकीं कांहींनीं राजपुतान्यांत जाऊन तेथें राज्यें स्थापिलीं. तिकडे त्यांना राठोड हें नांव मिळालें. जोधपूरचें घराणें हें यापैकींच होय. कनोज यावेळेपासून नामशेष झालें. मुसुलमानी अमलांत त्याचें महत्व पार गेलें. पुढें शेरशहा ( सूर ) यानें हुमायूनवर जय मिळविल्यानंतर ( १५४० ) कनोजेशेजारीं शेरसूर नांवाचें गांव विजयाभिनंदनार्थ वसवून कनोज अगदींच नामशेष केलें.

कनोजी ब्राह्मणः—वर्मे राजवटींत ( कनोजचे ) कनोजे ब्राह्मण हे सर्व उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मणांत अग्रेसर गणले गेले. यावेळीं पंचगौड व पंचद्राविड असा ब्राह्मणभेद निश्चित झाला नसावा. कनोज्यांचें वर्चस्व यशोवर्म्याच्या वेळीं सुरु झालें तेव्हां कनोज येथील पांच ब्राह्मण व पांच कायस्थ यांनां बंगाल्यांत बोलावून नेऊन तेथील आदिसूर नांवाच्या प्राचीन धर्माभिमानी राजानें त्यांची तेथें वसाहत करविली. हर्षाच्या वेळीं हे कनोजे निवृत्तमांस होते; परंतु यावेळीं ते पूर्वीप्रमाणें फिरून मांसाहारी झाले.

[ संदर्भग्रंथः—स्मिथ-हिं. प्रा. इ. वैद्य-म. यु. भा; बील-ह्युएनत्संग;-वाण- हर्षचरित्र; स्मिथ-कनोजचा इतिहास; राजतरंगिणी. ]

त ह शी ल.--संयुक्तप्रांत. फरुक्काबाद जिल्ह्याची आग्नेयीकडील तहशील. उ. अ. २६° ५६' ते २७° १२' व पू. रे. ७९° ४३' ते ८०° १'. क्षेत्रफळ १८० चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १,१६,४२६. एकंदर खेडीं २११ आणि एक मोठें गांव. जमीनमहसूल ( १९०३–४ )१,९५,०००रुपये व इतर कर ३१,००० रुपये. इ. स. १९०३–४ सालीं १२४ चौरस मैल जमीन लागवडीखालीं असून पैकीं ४३ चौरस मैल जमीन बागाइती होती.

गां व.—संयुक्तप्रांत. फरुक्काबाद जिल्ह्यांतील एक प्राचीन गांव. उ. अ. २७° ३' व पू. रे. ७९° '५६'. कुशस्थल, कौश, गाधिपुर आणि महोदय हीं कनोजचीं दुसरीं नांवें होत. या गांवाच्या तटाखालून एके काळीं गंगा नदी वहात होती; परंतु हल्लीं तिचा ओघ दूर कांहीं मैल अंतरावरून वहात आहे. लोकसंख्या ( १९११ ) १८,१०५. या गांवाचा उल्लेख महाभारतांत येत नाहीं, तथापि रामायणांत (बा. कां. स. ३२ हें) वसलें त्यावेळची दंतकथा आहे. कुशनाभानें हें गांव वसाविलें. त्यास शंभर मुली होत्या. त्यांच्यापैकीं सर्वांत जी धाकटी होती तिच्याशिवाय सर्वांनीं वायुनामक ऋषीचा तिरस्कार केला. त्यानें त्या सर्वांस पोंक येईल असा शाप दिला. त्याप्रमाणें त्या सर्व मुलींच्या पाठीस पोंक आलें. त्यावरून या शहरास कान्य-कुब्ज असें नांव पडलें. ख्रिस्ती शकारंभीं टॉलेमी, या गांवाचा कनोगिझ असा उल्लेख करतो. पांचव्या शतकांत हें गांव गुप्तांच्या राज्यांत मोडत होतें. गुप्तांचा नाश झाल्यावर मौखरीनामक छोटया राज्याच्या राजधानीचें हें शहर होतें. सातव्या शतकांत उत्तरहिंदुस्थानांतील हर्षवर्धनाच्या साम्राज्यांत हें मोडत असे. हर्षवर्धनाच्या दरबाराचें वैभव चिनी प्रवासी ह्युएनत्संग यानें वर्णिलें आहे; व बाणाच्या हर्षचरित्रांतहि तें आढळतें. नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत रघुवंशी राजांची राजधानी ही होती. या राजांपैकीं एकाचा पराजय इ. स. ९१७ सालीं गुजराथच्या राजानें केला, परंतु महोबाच्या चंदेल राजानें त्यास पुन्हां गादीवर बसाविलें. इ. स. १०१९ सालीं गझनीच्या महमुदानें कनोज लुटलें. या वेळीं हें शहर राठोडाकडे होतें. इ. स. ११९४ सालीं महंमद घोरीनें शेवटचा राठोड राजा जयचंद याचा पराजय केला व त्या वेळीं कनोजचें राज्यहि लयास गेलें।

मुसुलमानी अमलांत याचें पूर्वीचें महत्व नष्ट झालें. कनोजच्या जवळच शीरशहानें हुमायूनाचा पराजय केला. अकबराच्या कारकीर्दींत जेव्हां शांतता नांदूं लागली तेव्हा कनोज एका सरकाराचें मुख्य ठिकाण होतें असें, ऐनी-इ-अकबरीवरून दिसतें. अठराव्या शतकांत तें कधीं फरुक्काबादच्या नवाबाकडे, कधीं अयोध्येच्या नवाबाकडे तर कधीं मराठयांकडे असे. या ठिकाणीं पूर्वीच्या हिंदू इमारतींपैकीं कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं. इ. स. १४०६ सालीं बांधलेली जामा मशीद येथें आहे. हिला हिंदु देवळांचें सामान वापरलें असून ही अद्यापि सीता-की-रसोइ ' सीतेचें स्वयंपाक गृह ' या नांवानें ओळखली जाते. येथें बाळपीर आणि त्याचा पुत्र शेख महदी याचे दरगे आहेत. हे दोन प्रसिद्ध फकीर असून शहाजहान व औरंगझेब यांच्या कारकीर्दींत होऊन गेले. नदीकाठीं पुष्कळ पडक्या इमारती दिसतात. येथील अत्तराचे कारखाने प्रसिद्ध आहेत.

**कनोरा**—रेवाकांठांमधील एक लहान संस्थान. पांडु मेहवाच्या बारियासंघांत हें आहे. एके बाजूस मही नदी व दुसरीकडे गायकवाडी मुलूख यांमध्यें हें वसलेलें असून यांत आठ हिस्से आहेत. यांत गांवें सात असून क्षेत्रफळ ३$\frac{3}{4}$ चौ. मै. आहे. या संस्थानकडून गायकवाड सरकारास खंडणी मिळते. कापूस, तांदूळ, चणे वगैरे पीक या भागांत होतें.

**कॅनोव्हास**- डेलकस्टोलो अन्टोनिओ (१८२८–१८९७). हा एक स्पॅनिश मुत्सद्दी असून याचा जन्म ता. ८ फेब्रुवारी १८२८ रोजी मॅलागा येथें झाला. यानें आपलें प्राथमिक शिक्षण संपविल्यावर वाङ्मय व तत्वज्ञान यांचा अभ्यास करण्याकरितां १८४५ सालीं तो मॅड्रीड येथें आला. पुढें यानें संपादकत्व स्वीकारून व वाङ्मयीक लेख लिहून

आपला कायद्याचा अभ्यास पूर्ण केला. याच कालांत यानें आपले ऐतिहासिक कांदवरी व स्पेनचा ३ ऱ्या फिलिपपासून २ ऱ्या चार्लसपर्यंतचा उतरत्या काळाचा इतिहास असे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. १८५४ त यानें टोपणनांवाखालीं कांहीं पत्रें प्रसिद्ध केलीं व एक जाहीरपत्रक काढलें. यामुळें ह्याची राजनीतिज्ञांत गणना होऊं लागली. याच वर्षी हा स्पेन देशाच्या प्रतिनिधिसभेचा सभासद झाला. १८५७ त केडीझचा गव्हरनर, १८५८ त सरकारी खात्याचा दुय्यम चालक, १८६० त गृहमंत्र्याचा मदतगार चिटणीस, १८६४ त अंतर्गत कारभाराचा प्रधान, १८६५ त वसाहतींचा प्रधान, १८६६ त फडणीस वगैरे जागांवर यानें काम केलें. पुढें १८६६ ते ६८ पर्यंत याला हद्दपार केलें होतें. १८६८ च्या राज्यक्रांतीनंतर नवीन राज्यपद्धतीची घटना करण्याकरितां बोलावलेल्या प्रतिनिधिसभेचा हा सभासद असून तेथें यानें हुजूर पक्ष उचलून बोरवोन घराण्याचा कैवार घेतला व लोकसत्ताक पक्षाला विरोध केला. १८७४ त १२ व्या अल्फांझोनें प्रसिद्ध केलेला जाहीरनामा यानेंच तयार केला होता. याचें मत, बोरवोन घराण्याची स्थापना केवळ लष्करी सामर्थ्याच्या जोरावर न करितां, अनुकूल परिस्थिति घडवून आणून नंतर करावी असें होतें. पुढें १२ वा अल्फांझो गादीवर आल्यावर १८७४ पासून १८७९ पर्यंत हा मुख्यप्रधान होता. १८७६ त यानें हुजूरपक्ष स्थापन करून राजसत्ताक पद्धतीचे नियम घालून दिले. यानें प्रतिनिधिसभेच्या मतदारीच्या हक्कास आळा घातला; मतस्वतंत्रता व मुद्रणस्वतंत्रता कमी केली. यानें प्रजासत्ताक राज्यवाद्यांवर कडक नजर ठेवली. व्यापारांत हा संरक्षकपद्धतीचा पुरस्कर्ता असून याचें परराष्ट्रीय धोरण, जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्याशीं मैत्री ठेवण्याचें होतें. १८८१ त याला प्रधानकी सोडावी लागली; परंतु पुन्हां १८८३ पासून १८८५ पर्यंत हा मुख्यप्रधान होता. अशा प्रकारें पुन्हां दोन तीन वेळा हा मुख्यप्रधान झाल्यावर १८९७ त एका अराजकानें याला गोळी घालून ठार केलें! हा मुत्सद्दी, विद्वान, लेखक व वक्ता होता.

**कर्नौंग**—खालचा ब्रह्मदेश. हेनझाडा जिल्ह्यांतील उत्तरेकडील ( तालुका ) टाऊनशिप. उत्तर अक्षांश १७° ५४′ ते १८° १९′ व पूर्व रेखांश. ९८° ४८′ ते ९५° ३१′. क्षेत्रफळ ८७१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १,०६,९४३ यांत एक मोठें गांव व ९९ खेडीं आहेत. जमीनमहसूल (१९०३ ०४) २,२५,००० रुपये होता. ब्रह्मी लोक शेकडा ९२ आहेत.

**कन्नड**—हैद्राबाद संस्थानांतील औरंगाबाद जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ६८७ चौरस मैल. जाहागिरी धरून लोकसंख्या (१९११) ८१७३१७. ह्या तालुक्यांतील १९४ खेड्यांपैकीं ६८ खेडीं जाहागिरींत आहेत. खुद्द कन्नडची लोकसंख्या ३६०९ असून हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. याच्या उत्तरेच्या बाजूला घाटांतून खानदेशांत जाण्यास रस्ता आहे.

**कन्फ्यूशिअस** ( इ. स. पू. ५५० किंवा ५५१ते४७८)—चीन देशांतील एक प्राचीन ऋषि. याचा संप्रदाय मोठा आहे. कुंग हें त्याचें कुलनाम असून कन्फ्यूशिअस हें 'कुंग--फु-त्झे' ( आचार्य कुंग ) याचें लॅटिन अपभ्रष्ट रूप आहे. हा लु संस्थानचा रहिवासी होता, पण त्याचें घराणें फार प्राचीन व सुंग जहागिरीचें होतें. कनफ्यूशिअसचा बाप शुहलिआंगहीह हा एक जिल्हाधिकारी असून धाडस व बल यांबद्दल प्रसिद्ध असे. हीहनें सत्तराव्या वर्षी पहिल्या बायकोपासून त्याला नऊ मुली व एक लंगडा लुळा मुलगा असतांहि नवीन लग्न केलें. त्या बायकोचा मुलगा तो हा ऋषि होय. हा तीन वर्षांचा असतांना बाप वारल्यामुळें याला लहानपणींच कांहीं उद्योग करून कुटुंबाला मदत करावी लागे. त्यामुळें त्याला विद्या व सर्व कला प्राप्त करून घेण्याची अनायासें संधि मिळाली. याचें लग्न १९व्या वर्षी झाल्यानंतर की घराण्याच्या राजाच्या पदरीं त्याला हलकी नोकरी लागली. २२ व्या वर्षी कन्फ्यूशिअसनें शिक्षकाचा पेशा पत्करिला. त्याचे विद्यार्थी मुळाक्षरें, बाराखडया वगैरे शिकण्याकरितां येत नसून शुद्ध आचरण व राज्यकारभार यांचीं तत्त्वें जाणण्यासाठीं येत. तो संगीत विद्येंत प्रवीण असे. त्याची मानमान्यता लवकरच फार वाढली. वयाच्या ५२ व्या वर्षी त्याला चुंगटु शहराचा मॅजिस्ट्रेट करण्यांत आलें. त्यापूर्वी तो राजकारणांत फारसा पडत नसे. त्याचा कारभार लोकांनां फार पसंत पडला. पुढें तो वराच वाढला. त्यानें सरदारांनां दडपून राजसत्ता प्रबल केली. कन्फ्यूशिअसच्या कर्तबगारीनें लु संस्थानची भरभराट होत आहे असें त्सीच्या अधिकाऱ्यांनीं पाहून त्यानीं गाणें व नाचणें यांत प्रवीण अशा सुंदर स्त्रियांचा मोठा तांडा लूमध्यें धाडून दिला, तेव्हां राजा व लोक वेहोष होऊन या ऋषीचे कोणी ऐकेनात, तेव्हां तो दुसरीकडे निघून गेला.

५६ व्या वर्षी कन्फ्यूशिअस लूच्या बाहेर पडला व तेरा वर्षांनीं तो पुन्हां परत आला. या मधल्या काळांत तो अनेक निरनिराळ्या संस्थानांतून हिंडला. त्याला आशा होती कीं, आपल्या ताब्यांत राज्य देणारा एखादा तरी संस्थानिक भेटेल व मग आपण जगाला उदाहरण घालून देणारें असें सर्वोत्कृष्ट राज्य बनवून दाखवूं. पण सर्व लोक त्याचा आदरसत्कार करीत असले, तरी त्याच्या मताप्रमाणें सर्वस्वी चालण्यास कोणी तयार होईना. इ. स. ४८३मध्यें तो लूला परत आल्यावर त्याच्या शिष्यांच्या वजनानें त्याला संस्थानांतील सर्वांत मोठी मानाची जागा मिळत होती, पण त्यानें ती स्वीकारली नाहीं. आपल्या शिष्यांनां उपदेश देत व वाङ्मयाईन कार्य करीत त्यानें आपलें राहिलेलें आयुष्य कांठिलें. मरण्यापूर्वी दोन सत्शिष्य आणि पुत्र व पत्नी यांचा त्याला वियोग झाला होता.

कनफ्यूशिअसच्या संप्रदायाचीं तत्वें व त्यांतील बरेवाईट-पणा यांचें विवेचन 'बुद्धपूर्व जग'या विभागांत (उत्तरार्ध पान ५८—५९ ) येऊन गेलेंच आहे. त्याचा संप्रदाय धार्मिक नसून केवळ नीतिधर्म व राजधर्मविवेचक होता, हें त्या ठिकाणीं दाखविलें आहे. खुद्द कन्फ्यूशिअसनें लिहिलेला असा ग्रंथ नाहीं. त्याच्या पूर्वी चीनमध्यें बरेंच वाङ्मय प्रचलित होतें.

प्राचीन सर्वमान्य ग्रंथांच्या संपादकाचें काम त्यानें अंगावर घेतलें. प्राचीन काव्यभांडारात त्याला वेन्वँगचें उदात्त उदाहरण आढळून आलें. राजे व सामान्य जनसमूह यांनीं अनुकरण करण्याजोगा हा मनुष्य होता व ह्यानें उच्च प्रकारचें नैतिक ज्ञान शब्दांत गुंफिलें आहे. त्याचप्रमाणें "याउ व शन्, यू व टँग हे लोक मनुष्यें, राज्यकर्ते व विद्वान् या तिन्हीं नात्यांनीं आतिशय उच्च कोटींत पडतात. या लोकांचे शब्द, ग्रंथ व ऐतिहासिक महत्व ह्यांचें भविष्यकालीन लोकांच्या कल्याणासाठीं रक्षण करणें हा आपला जीवितोद्देश आहे" असें कन्फ्यूशिअसच्या मनांत विंबलें होतें. गतकालावर त्याची दृष्टि विराम पावली. स्वभावतःच तो रूढमार्गवादी होता. नैतिक दुर्वर्तन, जुलूम, अपराध व सुसंप्रदायाच्या अनुरोधानें न वागणें ह्या गोष्टींचा त्याला अतिशय तिटकारा होता. ह्या उद्देशानें त्यानें प्राचीन सर्वमान्य ग्रंथांच्या संपादकाचें काम पतकारिलें. प्राक्कालीन थोर मनुष्यांचें उत्तम उदाहरण व शिक्षण जपून ठेवणें हा त्याचा मुख्य उद्देश होता.

त्याला असें आढळून आलें कीं, पांच विषयांचा त्याला ह्या कार्यांत उहापोह केला पाहिजे. ते विषय ( १ ) इतिहास, (२) काव्य,(३) विधि, (४) गायन, व(५)शकुनविद्या हे होत.

(१) इतिहासः—रक्षण करण्याचा इतिहास खालीलप्रमाणें होताः—( अ ) याउ व शन् यांच्या कालचें राजकीय दिनवृत्त; काल इ. स. पूर्वी २३५६ ते २२०५. ( आ ) हिआ वंशाचें दिनवृत्त; काल इ. स. पूर्वी २२०५ ते १७६६. ( इ ) शंग वंशाचें दिनवृत्त; काल इ. स. पूर्वी १७६६ ते ११२२. ( ई ) चौवंशाचें दिनवृत्त; काल इ. स. पूर्वी ११२२ ते कन्फ्यूशिअसचा काल.

( २ ) काव्यः—राजकीय अथवा दरबारी, आणि लौकिक अशा प्रकारांची कविता त्याला आढळून आली. चौकुंगनें कांहीं स्थानिक गीतें लिहिलीं. ही कविता म्हणजे पूर्वकालीन चालीरीतींचीं उत्तम उदाहरणें होत.

( ३ ) विधिपालनः—राजे, कामगार-लोक व सामान्य मनुष्यें यांकरितां नियम, तीन प्राचीन सर्वमान्य ग्रंथांत दिले आहेत. देशांतील सर्व प्राचीन संस्था व देशाचार हे यांमध्यें वर्णिले आहेत.

(४)गायनः—वर निर्दिष्ट केलेल्या तीन सर्वमान्य ग्रंथांपैकीं एकांत यज्ञगीतें दिलीं आहेत. ह्यांवरून त्या वेळचें गायन सावकाश व गंभीर होत होतें व तें चार अथवा पांच सुरांत होत होतें असें दिसतें. गायनावरोबरच नर्तन होत असे व धार्मिक सेवेला योग्य असे आदरयुक्त विकारतरंग उत्पन्न करणें हा गायननर्तनाचा उद्देश होता.

(५) शकुनविद्याः—ह्या विषयावरील ग्रंथापैकीं एक ग्रंथ फार प्राचीन आहे. त्यांत कांहीं उत्तम नैतिक विधानें आहेत. ह्या ग्रंथांत सृष्टिविज्ञान विवेचिलें आहे. सर्व अस्तित्व समूह रूपांत आणावें, सृष्टीच्या सर्व स्वरूपांचें एका व्यापक ऐक्यांत आकलन करावें आणि दृढ व गहन विचाराच्या योगानें विद्वानाच्या ताब्यांत सर्व विश्वाला आणावें हा त्या सृष्टितत्त्वशास्त्राचा उद्देश होता. चंगयंगमधील तत्वशास्त्र यासारखेंच होतें. कन्फ्यूशिअसचीं तत्वशास्त्रविषयक मतें ज्यांत ग्रथित केलीं आहेत त्या ग्रंथामधील तत्वशास्त्र यासारखेंच होतें.

कन्फ्यूशिअसचें थडगें पेकिंग व शांघाय ह्यांच्या मध्यभूमीवर असून प्रत्येक शहरापासून सुमारें ४०० मैलांच्या अंतरावर आहे. ही चीन देशांतली अतिशय पवित्र जागा आहे. येथें कन्फ्यूशिअसचा वंशज रहातो, व तेथें असलेल्या प्राचीन वस्तूंचें तो संरक्षण करितो.

कन्फ्यूशिअसच्या म्हणून मानल्या जाणाऱ्या म्हणी पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें दिल्यास त्याचा स्वभाव व मतें यांची थोडीशी ओळख होणार आहे.

" श्रेष्ठ मनुष्य जें शोधतो तें त्याच्यांतच असतें; क्षुल्लक माणूस जें शोधतो तें दुसऱ्यांत असतें; " " श्रेष्ठ मनुष्य मानाचा असतो, पण तो भांडत बसत नाहीं; तो चारचौघांतला असूनहि एक पक्षीय नसतो. तो एखाद्याला केवळ त्याच्या शब्दावरून वर चढवीत नाहीं किंवा त्याच्याकरितां चांगले शब्द बाजूला सारीत नाहीं. "

" स्तुतिपाठक नसणारा गरीब मनुष्य व निगर्वी श्रीमंत मनुष्य यांचा स्वभाव बऱ्यापैकीं म्हणतां येईल. पण गरीब असूनहि आनंदी आणि श्रीमंत असूनहि शिष्टाचाराचे नियम मानणारा यांची बरोबरी त्याच्यानें होणार नाहीं. "

"विचारानें न पचविलेली विद्या व्यर्थ श्रमाप्रमाणें होय; विद्येच्या मदतीशिवाय होणारा विचार संकटप्रद होय." "उधळेपणामुळें अविनय उत्पन्न होतो व चिक्कूपणामुळें क्षुद्रवृत्ति येते. अविनयी होण्यापेक्षां क्षुद्र होणें बरें." "मनुष्याला आपलीं मतें व्यापक करितां येतात; मतांना मात्र मनुष्य मोठा करितां येत नाहीं. "

" सावधगिरी बाळगणाऱ्याच्या हातून क्वचितच चूक होते ".

[संदर्भग्रंथ—कन्फ्यूशिअस व त्याचा संप्रयास यांवर बरेच ग्रंथ आहेत त्यांपैकीं कांहीं असेः—अलेक्झांडर—कन्फ्यूशिअस लंडन, १८९०; डगलस—कन्फ्यूशिआनिझम् अँड ताओइझम; फेबर—डायजेस्ट ऑफ दि डाक्ट्रिन्स ऑफ कनफ्यू; ओल्ड—क्लासिक्स ऑफ कनफ्यू.

**कन्याकुमारी १** (कामोरिन)–मद्रास, त्रावणकोर संस्थान. अगस्तीस्वरम तालुक्यांतील एक खेडेगांव, देवस्थान व भूशिर. उ. अ. ८०° ५' व पू. रे. ७७° ३३'. हें हिंदुस्थान द्वीपकल्पाच्या दक्षिणेकडील अगदीं अखेरचें टोंक आहे व यापासून पश्चिम घाटांची रांग उत्तरेकडे गेली आहे. १९०१ सालीं याची लोकसंख्या २३६८ होती. समुद्रकांठीं कन्नियाम्बालेचें प्रसिद्ध देवालय आहे. पेरिप्लसमध्यें येथील एका बंदराचा उल्लेख आहे, पण हल्लीं तें नाहीं. साधारण जहाजें शहरापर्यंत येऊं शकतात.

( २ ) दुर्गेचें एक नांव. दक्षिणहिंदुस्थानांत हिची उपासना रूढ आहे.

**कन्यागत**–कन्या राशीस गुरु आला असतां त्या कालास कन्यागत असें म्हणतात. गुरु प्रत्येक राशींत तेरा महिने असतो. त्यामुळें कन्यागताचा काल तेरा महिने असतो व तेरा वर्षांनीं येतो. या कालांत भागीरथी नदी कृष्णा नदीस भेटावयास येते असा पुराणमतवाद्यांचा समज आहे. या कालांत कृष्णा व भागीरथी यांच्यांमधील स्थलांत विवाह, उपनयन इत्यादि मंगलकार्यें करीत नाहींत. तसेंच काशीक्षेत्र वगैरे ठिकाणीं गेल्यावर ज्याप्रमाणें क्षौर, श्राद्ध, गंगापूजन वगैरे कृत्यें करतात त्याप्रमाणें कृष्णा नदीच्या कांठीं कन्यागतांत करण्याचा परिपाठ आहे. कन्यागतासंबंधीं अधिक माहिती " सिंहस्थ "या शब्दाखालीं पहावयास मिळेल.

**कन्सस**, संस्थान.—अमेरिका. संयुक्त संस्थानांतील एक संस्थान. क्षेत्रफळ ८२१५८. लोकसंख्या. ( १९१८ ) १८७--४१९५. याचा इ. स. १८६१ यूनियनमध्यें प्रवेश झाला. सेनेट ४०, व हाउस ऑफ रिप्रेझेन्टेटिव्हज १२५ सभासदांचें असतें. दोन सेनेटर्स व आठ रिप्रेझेंटेटिव्हज काँग्रेकरितां निवडतात. टोपेका हें राजधानीचें शहर आहे. उच्च व प्राथमिक शिक्षण देणाऱ्या संस्था बऱ्याच आहेत. मका, गहूं व गवत हीं मुख्य पिकें होत. कोळशाच्या व तेलाच्या खाणी चांगल्या चालतात. कत्तलखाने व गिरण्या फार मोठ्या व किफायतशीर आहेत. १९१६ त ९३४४ मैलांची रेल्वे होती. [ स्टेट्समन्स ईयर बुक; कन्सस— एन्सायक्लोपीडिया ऑफ स्टेट हिस्टरी, पु. ३. शिकागो १९१२; स्प्रिंग—कन्सस, बोस्टन १९०७.]

शहर.—अमेरिका. मिसोरी, संस्थानांतील जॅक्सन तालुक्यांतील एक शहर व बंदर. कॅन्सस व मिसोरी या दोन नद्यांच्या संगमावर हें वसलेलें आहे. आकार व व्यापरी महत्व या दृष्टीनें संस्थानांतील हें शहर दुसऱ्या नंबरचें ठरेल. शहराची एकंदर लोकसंख्या (१९१७) ३०५८१६ असून इंग्लिश जर्मन, इटालियन, स्वीडिश वगैरे लोकांची वस्ती आहे. इ. स. १९०० सालाच्या खानेसुमारीप्रमाणें नीग्रो लोकांची संख्या १७,५६७ होती. हें शहर नैर्ऋत्येकडील द्वार समजलें जात असून बहुतेक सर्व महत्वाच्या रेल्वेचें हें मुख्य ठिकाण आहे. शहर उंच अशा पठारावर वसलेलें आहे. रस्ते रुंद व व्यवस्थित आहेत. येथील " सिटी हॉल " कोर्ट हाउस, फीडरल बिल्डिंग्ज, सार्वजनिक वाचनालय व कांहीं ख्रिस्त देवालयें वगैरे भव्य इमारती नमूद करण्यासारख्या आहेत. येथें " स्वोप पार्क " " पासो पार्क वे " ह्या दोन बागा प्रसिद्ध अशा आहेत. येथील सार्वजनिक शिक्षणसंस्था संघटित स्वरूपांत आहेत. धर्मसंस्था, धंदे विषयक शाळा, मेडिकल कॉलेजें अनाथगृहें, वगैरे संस्था नांवाजलेल्या आहेत. हें शहर व्यापाराचें महत्वाचें ठिकाण असून येथील, पाळीव जनावरें, धान्य व शेतकीचीं अवजारें या संबंधीचा व्यापार मोठा व महत्वाचा आहे.

अमेरिकेंत ज्या कांहीं थोड्या शहरांना कायदे करण्याचा हक्क देण्यांत आला आहे त्यांपैकीं कॅन्सस शहर हें एक आहे.

**कन्हरगांव जमीनदारी**—जिल्हा भंडारा. साकोली तहशिलीच्या दक्षिणेस सरहद्दीवर साकोलीपासून २६ मैलांवर ही एक फारच लहान जमीनदारी आहे. जमीनदारींत एकच खेडेगांव आहे. इ. स. १८१९ सालीं ही इस्टेट भिकई नांवाच्या रजपुतास दोन वाघ मारल्यावद्दल बक्षीस मिळाली.

**कन्होली**—नागपूरच्या नैर्ऋत्येस अन्नपूर्णा नदीतीरीं २१३३ लोकवस्तीचा हा शेतीचा गांव आहे. येथें तेली लोकांची वस्ती एकंदर लोकसंख्येच्या तीनचतुर्थांश आहे. येथें घारपुरे आडनांवाचे मालगुझार आहेत. दुसरे बाजीराव यांच्या कारकीर्दींत हा गांव या घराण्याकडे आला. येथें प्राथमिक शाळा, पोष्टऑफीस व गुरांचा कोंडवाडा वगैरे आहेत.

**कपडवंज**, तालुका–मुंबई. खेडा जिल्ह्यांतील एक तालुका व शहर. क्षे. फ. २७९ चौरस मैल व लो. सं. ( १९११ ) ७६७३०.

शहर—हें बरेंच प्राचीन काळचें आहे. ५०० ते ८०० वर्षांचीं जुनाट घरें अद्याप येथें पहावयास मिळतात. जवळच एका अधिक प्राचीन शहराचे अवशेष आहेत. याचें जुनें नांव कपटपूर होतें असें म्हणतात. येथें एकंदर इ.स.१४५४, १७२५ व १७३६ सालीं तीन लढाया झाल्या. शेवटच्या लढाईंत हें मराठ्यांच्या ताब्यांत आलें व त्यांच्याकडे तें १८१६-१७ पर्यंत होतें. १९ व्या शतकांत या शहराची बरीच भरभराट होती. येथें साबण, कांच व लोणी ठेवण्याच्या कातड्याच्या पिशव्या करीत असत. लोखंडाच्या वस्तूहि थोड्या बहुत प्रमाणांत येथें तयार होत. धान्य, अफू व तंबाखू या व्यापाराच्या मुख्य वस्तू असून येथून पंचमहाल व मध्यहिंदुस्थानांत मालाची निर्गत होत असे. कपडवंज बी. बी. सी. आय. रेल्वेच्या नडियाद कपडवंज फांटयावर आहे. येथें एक सिद्धराज जयसिंहानें बांधलेला तलाव, चालुक्यांच्या धर्तीवर बांधलेली कमान, विष्णु व महादेव यांचीं देवालयें, एक जैनमंदिर व बऱ्याच मशिदी व कबरी हीं पाहण्यासारखीं स्थलें आहेत. शहरांत मुलकी व पोलीस कचेरी, टपालघर,

रुग्णालय असून शिवाय सरकारी शाळा आहेत. लोकसंख्या ( १९११ ). १३,१२६.

**कंपनी.**—कंपनी हा शब्द इकडे सर्वत्र रूढ झाल्यामुळें तो तसाच कायम ठेवून त्याच्या संबंधाची माहिती संक्षिप्त रीतीनें खालीं देण्यांत येत आहे. कोणत्याहि प्रकारचा व्यापार अगर धंदा करून पैसा मिळवावयाचा असा हेतु मनांत धरून एकापेक्षां अधिक अशी मंडळी कायदेशीर उद्यमासाठीं एकत्र झाली म्हणजे ती मंडळी कायद्याप्रमाणें कंपनी होऊं शकते.

हिंदुधर्मशास्त्रांत कंपनीचा कायदा आजच्या स्वरूपांत पहावयास मिळत नाहीं. आज ज्याप्रमाणें सामायिक भांडवलावर व नियमित जवाबदारीवर व्यापार करतां येतो तसा व्यापार करण्याची कल्पना तेव्हां नव्हती, तथापि भागीदारीनें व अर्थात अनियमित जवाबदारीवर व्यापार करण्याची पद्धत फार प्राचीन असून याज्ञवल्क्य स्मृतीमध्यें व्यवहाराध्यायांत 'संभूय समुत्थान' या वाविसाव्या प्रकरणांत भागीदारीसंबंधीचे नियम दिले आहेत. त्यांत भागीरांनीं ज्या प्रमाणांत व्यापारांत भांडवल घातलें असेल त्या प्रमाणांत किंवा जसा मूळ करार असेल त्या प्रमाणांत होणारा नफा वांटून घ्यावा असें सांगितलें आहे. नारद, कात्यायन यांनींहि अशा तऱ्हेचेच नियम दिले आहेत; त्यांत बृहस्पतीनें अशक्त, आळशी, रोगी वगैरेबरोबर भागीदारानें व्यापार करूं नये असें सांगितलें आहे. भागीदारीनें व्यापार करितांना ज्या भागीदारानें प्रतिषिद्ध व्यवहार केल्यामुळें किंवा त्याच्या चुकीमुळें तोटा आला असेल त्यानेंच तो भरून द्यावा. ज्यानें एखाद्या नाशापासून मालाचें रक्षण केलें असेल त्यानें त्याचा १०वा हिस्सा घ्यावा.राजानें मालाचे किंमतीचा २०वा भाग शुल्क म्हणून घ्यावा व राजाच्या योग्य ज्या वस्तू असतील, व राजानें ज्या विकण्याचा निषेध केला असेल त्या वस्तू विकल्या असल्यास राजानें त्यांची सर्व किंमत घ्यावी. एखादा भागीदार देशांतरास व्यापार करण्याकरितां गेला असतां मरण पावला तर त्याचें द्रव्य त्याच्या दायादांनीं नाहींतर बांधवांनीं, नाहींतर जातीनें किंवा त्यांच्या अभावी त्याच्या इतर भागीदारांनीं घ्यावें. जो भागीदार लबाडी करील त्याला भागीदारींतून काढून टाकावें. जो अशक्त असल्यामुळें काम करण्यास असमर्थ असेल त्याचें काम दुसऱ्याकडून करवून घ्यावें अशा प्रकारचेहि नियम सांगितले आहेत. वरील शेवटचा नियम व्यापाऱ्याप्रमाणें ऋत्विजांसहि लागू आहे.

चाणक्याच्या काळीं देखील श्रमजीवींचें समवाय होते. त्याशिवाय इतर संघांना खेड्यांतून राहूं देत नसत. त्याप्रमाणेंच सामायिक मेहनतीनें अथवा द्रव्यानें बांधलीं जाणारीं कामें असत ( संभूय, सेतुबंध वगैरे ). या कामावर जर कोणी स्वतः गेला नाहीं तर त्यानें आपले नोकर व बैल पाठवावे व खर्चाचा हिस्सा द्यावा परंतु त्याला नफा मिळणार नाहीं असा नियम असे. कौटिल्यानेंहि भागीदारां ( संभूय समुत्थातारः )नीं आपलें वेतन सर्वांनीं सारखें अगर पूर्वी ठरलेल्या कराराप्रमाणें वांटून घ्यावें असाच नियम दिला आहे. शेतकऱ्यांनीं किंवा व्यापाऱ्यांनीं काम संपल्यावर किंवा मध्यंतरीं आपल्या नोकरांनां त्यांच्या झालेल्या कामाच्या प्रमाणानें मजुरी द्यावी. मजूर जर मध्येंच सोडून गेले व त्यांनीं बदली दिले तर त्यांस पूर्ण मजुरी द्यावी. जो मनुष्य आपल्या वाट्याचें काम करण्याचें टाळील त्याला पहिल्या वेळीं अभय देऊन दुसरें काम द्यावें व दुसऱ्या वेळीं टाळल्यास त्याला संघांतून काढून टाकावें इत्यादि नियम दिले आहेत. ऋत्विजांसहि जवळ जवळ असेच नियम सांगितले आहेत.

**कंपनी घटनेचा इंग्लंडांतील इतिहास.**—इंग्रजींतील कंपनी हा शब्द प्रथम सहभोजन करणाऱ्या व्यक्तींस लावण्यास सुरुवात झाली. परंतु सध्यां इंग्लंडमध्यें कंपनी हा शब्द विशिष्ट प्रकारच्या मोठमोठ्या नोंदलेल्या संघांनीं पूर्णपणें आपलासा करून टाकला आहे. व्यापार, विमा, माल बनवणें इत्यादि धंदे करणाऱ्या कंपन्या व सार्वजनिक हितासाठीं उदाह. रेल्वे, गोद्या, विजेचे दिवे, पाण्याचा पुरवठा इत्यादींकरतां उभारलेल्या कंपन्या असे त्यांत प्रकार आहेत.

**समाईक भांडवलाच्या कंपन्या.**—समाइक भांडवलानें उभारलेल्या द्रव्यनिधीच्या बळावर कांहीं व्यापारी धाडस करण्याकरितां जेव्हां कांहीं लोक संघ निर्माण करतात, तेव्हां त्यास समाईक भांडवल कंपनी असें म्हणतात. ज्या संघाचा उद्देश द्रव्योत्पादनाचा अथवा नफा मिळविण्याचा नसून निव्वळ विद्या, शास्त्र, धर्म, भूतदया किंवा इतर सत्कार्यें यांचा प्रसार करावा असा असतो ते संघ बहुधा आपणास कंपनी असें न म्हणतां, इंग्लंडमध्यें सोसायटी युनिव्हरसिटी इन्स्टिट्यूशन इत्यादि नांवांनीं आणि आपल्याकडे समाज, मंडळ संस्था, विद्यापीठ इत्यादि विशिष्ट प्रकारच्या नांवांनीं संबोधितात. पूर्वीची समाईक भांडवलाची जुनी कंपनी सनद मिळवीत असे. कंपन्यांनां सनदा देणें हा राजांचा पुरातन काळापासून आलेला हक्क असून त्याप्रमाणें ते व्यापारवृद्धीसाठीं व्यापारी कंपन्यांस सनदा देतहि असत. उदाह. इलिझाबेथ राणीनें ईस्ट इंडिया कंपनीस दिलेली सनद ( इ. स. १६०० ). परंतु असल्या सनदी कंपनीस पुष्कळ तोटेहि होते. कारण ही सनद लौकर मिळत नसे. शिवाय तत्प्रीत्यर्थ फार पैसा खर्च करावा लागत असे. कंपनीचे भागीदार कंपनीच्या कर्जाबद्दल जबाबदार नसत, व अशी कंपनी एकदा निर्माण झाली म्हणजे मग एकदा ज्या उद्देशानें ती अस्तित्वांत आली त्याच उद्देशास चिकटून राहण्याचें तिला प्रयोजन नसे. कारण परवानगी मिळण्याच्या प्रसंगीं सांगितलेल्या विशिष्ट उद्देशापुरतेंच कंपनीस काम करूं देणें म्हणजे एक प्रकारचें पारतंत्र्यच तीवर लादणें होय. व अशा प्रकारचें पारतंत्र्य चालूं देणें हें

समाजदृष्ट्या गैरकायदा असल्यामुळें कंपनीस आपल्या विशेष उद्देशास चिकटून राहण्याची सक्ति न करतां त्यांस इतर उद्देश सिद्ध करण्यास मुभा देण्यांत आली. म्हणून यासाठीं हे सर्व दोष नसलेली अशी व्यापारीकंपनीची नवीन पद्धति उत्पन्न होणें अगदीं अवश्य होतें, व त्याप्रमाणें ' कॉमन लॉ कंपनी ' निर्माण झालीहि. सामान्य कायद्यानुसार निर्माण झालेली ही कंपनी सांप्रतच्या व्यापारी कंपनीची मूळ जनक होय. ती कांहीं आजच्या प्रमाणें नव्हती. ती म्हणजे भाग दुसऱ्यास वदलतां येईल अशा अटीवर निर्माण केलेल्या भागीदारांचा प्रचंड संघ होता. सतराव्या शतकाच्या शेवटीं व १८व्या शतकाच्या आरंभीं असल्या कंपन्यांची झपाट्यानें वाढ झाली. परंतु त्यांवर कायद्याची फार इतराजी झाली. याचें कारण काय तर या कंपन्यांनीं कॉरपोरेट मंडळाप्रमाणें वागण्याचें ठरविलें! दुसऱ्यास देतां येणारे किंवा अदलावदल करतां येण्याजोगें यांनीं भांडवल उभारिलें. विशिष्ट कार्याकरितां दिलेल्या सनदांचा दुरुपयोग करूं लागल्या. शिवाय कांहीं कंपन्या भयंकर स्वरूपाच्या (?)व खोडसाळ होत्या किंवा असण्याचा संशय होता, व त्यामुळें राजाच्या प्रजेचें व व्यापार उदीम आणि इतर कायदेशीर रोजगार करणारांचें फार नुकसान गैरसोय आणि अहित होणार होतें अशा मतलबाचे शब्द ' ववल ' म्हणजे ' बुडबुडा ' नांवाच्या कायद्याच्या उपोद्घातांत आले आहेत. परंतु ह्या कारणांचा अर्थ निदान आधुनिक काळीं तरी अगदीं दुर्बोध झाला आहे. एवढी मात्र गोष्ट खरी कीं वरेच वेळ असल्या कंपन्या वेजवाबदार, स्वार्थसाधु आणि वेताल वर्तन करणाऱ्या लोकांच्या विचित्र आणि फसवेगिरीच्या कृत्यांना वळी पडल्यामुळें त्यांविरुद्ध मात्र वराच गैरसमज उत्पन्न झाला होता. याचा परिणाम असा झाला कीं, इ. स. १७१९ च्या कायद्यानें असल्या कंपन्या त्रासदायक आणि खोडसाळ ठरविण्यांत आल्या. परंतु हा कायदा १८२५ पर्यंत चालूं होता तरी यानें असल्या प्रकारच्या समाईक भांडवलांवर उभारलेल्या कंपन्या बंद पडेनात, तेव्हां कायदेकारी मंडळास त्यांच्याकडे डोळेझांक करणें भाग पडलें, व असल्या कंपन्यांच्या नियंत्रणार्थ अन्य प्रकारचे कायदे निर्माण करणें अवश्य झालें.

असल्या कंपन्या सदैव वदलणाऱ्या व्यक्तिसमूहांच्या वनल्या असल्यामुळें,इतर लोकांस आपण कोणाशीं करार करीत आहोंत आणि प्रसंगीं आपणांस कोणावर फिर्याद करतां येईल हें धड कळेना. हा दोष घालविण्यासाठीं कायदेकानूमंडळानें असल्या कंपन्या संघ म्हणून नोंदून त्यांच्यावर फिर्याद करण्यास किंवा त्यांनां फिर्यादी आणण्यास सोईचें व्हावें म्हणून राजाला असल्या कंपन्यांस लेटर्स पेटंट देण्याचा अधिकार दिला. इ. स. १८४४ मध्यें कंपनी नोंदण्याचें एक फार महत्त्वाचें तत्व अमलांत आणण्यांत आलें. यामुळें सर्व कंपन्यांस सनद किंवा विशिष्ट कायदा मागितल्याशिवाय संघत्व म्हणजे इनकार्पोरेशनचा दाखला देण्यांत आला. अर्थात यावेळीं कांहीं थोड्या कंपन्या वगळण्यांत आल्या होत्या. १८६२ सालीं या नवीन तत्वानें आणखी एक पाऊल पुढें टाकलें. यामुळें २० हून जास्त लोकांच्या सर्व कंपन्यांस रजिस्टर केल्याशिवाय कारभार चालूं ठेवण्यास बंदी करण्यांत आली. हे सर्व कायदे उपयुक्त होते. परंतु ते पूर्वीच्या कायद्याच्या बाह्य स्वरूपांतच फरक करणारे होते. परंतु त्यांच्या उद्देशांत फरक घडवून आणण्याच्या कामीं ते अगदीं निरुपयोगी होते. होतें. वास्तविक पाहिलें असतां सामायिक भांडवलाच्या कंपनीचें खरें जीवित म्हटलें म्हणजे त्यांतील सहकारितेचें तत्व, आणि त्याची नैसर्गिक वाढ हेंच असतें. आणि ह्या तत्वास अमर्यादित जवाबदारीमुळें १८ व्या शतकाच्या अर्धापर्यंत पुढें सरसावण्यास वावच मिळाली नाहीं. सामान्य हिस्सेदारींत प्रत्येक भागीदाराची जवाबदारी जरी अमर्यादित असली तरी सामान्यतः त्यांनां आपणावर किती जबाबदारी आहे हें सांगतां येतें. आणि त्यामुळें मर्यादित जवाबदारीची कल्पना कायद्यांत शिरली. हा फारच महत्वाची सुधरणा होय. आणि आज " प्रायव्हेट कंपन्या " देखील नियमित जवाबदारीच्या झाल्या आहेत.

हिंदुस्थानांतलि कंपन्यांचा कायदा इंग्लंडांतील कंपन्यांच्या कायद्यावर रचला गेला आहे एवढेंच नव्हे तर त्यांत वदल होत गेले तेहि इंग्लंडमध्यें वदल झाल्यानंतर त्यांचेच अनुकरण झाल्यानें होत गेले आहेत. १९०८ सालीं इंग्लंडांत जो कायदा झाला त्याचेंच अनुकरण १९१३ सालीं इकडे झालें.

सध्यां कंपन्यांना लागू असलेला कायदा १९१३ सालचा होय. त्या कायद्याप्रमाणें पुढील माहिती दिली आहे:--कंपनी नोंदावयाची म्हणजे तिला सनद पाहिजे. आज तिची सनद तिनेंच वनवावी असें ठरलें आहे. तिची सनद म्हणजे " मेमोरँडम ऑफ असोशिएशन" उर्फ " प्रतिज्ञालेख " होय. या लेखांत कायद्याप्रमाणें खालीं लिहिलेला मजकूर असलाच पाहिजे. (१) कंपनीचें नांव व शेवटीं लिमिटेड हीं अक्षरें, (२) कंपनीच्या ऑफिसाचा प्रांत, (३) ज्या कामाकरितां कंपनी काढली असेल त्या कामाचें दिग्दर्शन. (४) कंपनीच्या भागीदाराची जोखीम नियमित आहे अशी कबुली, (५) कंपनीच्या कामाकरितां उभारण्यांत येणाऱ्या भांडवलाची रकम व भांडवलाची रकम किती रुपयांच्या हिश्शांनीं म्हणजे शेअर्सनीं जमा करावयाची याची फोड.

वरील पांच वावींत महत्त्वाची वाव म्हटली म्हणजे तिसरी होय. या तिसऱ्या वावीनें कंपनीचे हातपाय जखडले जातात. लेखी जाहीर केलेल्या कामाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि कामांत कंपनीचें भांडवल लावतां येणार नाहीं. त्या कामाव्यतिरिक्त कंपनीनें व्यापार केला व त्यांत बूड आली तर त्याची जोखीम कंपनीच्या भागीदारांवर येत नाहीं अशी बड कंपनीचे जे कोणी चालक असतात त्यांच्यावर पडते.

कंपनीच्या अंतर्व्यवस्थेकरितां म्हणून एक लेख होत असतो. त्यास "आर्टिकल्स ऑफ असोशिएशन" म्हणतात. इंडियन कंपन्यांच्या १९१३ च्या कायद्याप्रमाणें कंपन्यांचे व्यवहार चालतात. त्या आक्टामध्यें टेबल ए म्हणून एक पुरवणी आहे. ज्या कंपन्यांस स्वतःचीं स्वतंत्र आर्टिकल्स नसतील त्यांस टेबल ए हीं आर्टिकल्स आहेत असें समजण्यांत येतें.

कंपनी: उभारण्याचा किंवा सुरू करण्याचा नेहमींचा प्रकार असा आहे कीं, एखादा मनुष्य किंवा कांहीं मनुष्यें एखादा फायदेशीर धंदा किंवा व्यापार काढावयाचा असें आपापसांत ठरवितात. असें ठरविल्यावर तो अगर ते मेमोरँडम व आर्टिकल्स तयार करून कांहीं त्यावर शेअर घेणाऱ्यांच्या सह्या मिळवून कंपनी नोंदावयास पाठवितात. अशा मनुष्यास अगर मंडळीस कंपनीचे प्रवर्तक ऊर्फ "प्रमोटर" समजतात. या प्रमोटरनें आपला फायदा लपवून न ठेवितां स्पष्ट करावा ही गोष्ट आज कायद्यानें अवश्य केली आहे.

कंपन्यांचे अनेक प्रकार असतात. मुख्य दोन प्रकार, एक पाब्लिक अगर सार्वजनिक कंपनी दुसरा व प्रकार म्हणजे खाजगी कंपन्या. प्रचलित कायद्याप्रमाणें खाजगी कंपनी अशा मंडळीला म्हणावें कीं जी कंपनी आपल्या भांडवलाचे भाग आपल्या मंडळींतच ठेवलेलें बाहेर जाऊं देत नाहीं व भांडवल उभारण्यास लोकांस प्रॉस्पेक्टस काढून आमंत्रण करीत नाहीं, व जी पन्नासपेक्षां जास्त भागीदार करीत नाहीं ती खाजगी लिमिटेड कंपनी होय.

भा गी दा रां ची सं ख्या व कं प नी चें स्व रू प.—कंपनींत भागीदार किती असावे यासंबंधानें नियम एवढाच कीं वीस किंवा अधिक भागीदारांस धंदा करावयाचा झाला तर त्यांनीं कंपनी नोंदवून धंदा केला पाहिजे. नोंदल्याशिवाय धंदा करणें बेकायदेशीर आहे. कंपनी नोंदावयाची झाली तर ती खासगी म्हणून नोंदतां येते किंवा सार्वजनिक म्हणून नोंदतां येते. सार्वजनिक म्हणून नोंदावयाची झाली तर कमींत कमी सात भागीदार नोंदतेवेळेस असले पाहिजेत. सातांपेक्षां कमी झाले तर तिला खासगी कंपनी बनलें पाहिजे किंवा गाशा गुंडाळला पाहिजे. जास्तींत जास्त किती चालतील याविषयीं निर्बंध कांहींच नाहीं. खासगी लिमिटेड म्हणून नोंदावयाची झाली तर कमींत कमी दोन भागीदार पाहिजेत व जास्तींत जास्त म्हणजे ५० पर्यंत होऊं शकतील. यांपेक्षां जास्त करावयाचे झाले म्हणजे सार्वजनिक कंपन्यांचे नियम लागू करून घ्यावे लागतील. सात माणसांची एखादी कंपनी न नोंदली असूं शकेल, प्रायव्हेट लिमिटेड म्हणून नोंदली असूं शकेल किंवा 'पब्लिक लिमिटेड' म्हणून नोंदली असूं शकेल. वीस मंडळींची कंपनी खासगी लिमिटेड किंवा सार्वजनिक लिमिटेडहि असेल. एकावन भागीदारांची कंपनी सार्वजनिक लिमिटेडच असली पाहिजे.

कंपनी रजिस्टर करतेवेळेस कंपनीचा मेमोरँडम, आर्टिकल्स असल्यास आर्टिकल्स, आणि प्रॉस्पेक्टस आणि प्रॉस्पेक्टस काढला नसेल तर प्रास्पेक्टसऐवजीं विशिष्ट माहिती भरणारें कोष्टक व डायरेक्टराची 'आम्ही डायरेक्टर होण्यास तयार आहोंत' अशी प्रतिज्ञापत्रकें हें साहित्य कंपनीच्या रजिस्ट्रारकडे पाठवावें लागतें. रजिस्टर करावयाला स्टांप लागतो व शिवाय रजिस्ट्रेशनची फी भांडवलानुसार भरावी लागते. प्रत्येक प्रांतास एक एक रजिस्ट्रार असतो. तो इतकें साहित्य घेऊन तपासून कंपनी रजिस्टर करतो व त्याचें एक साक्षीपत्रक आपल्या शिक्यानिशी देतो. प्रॉस्पेक्टस तयार करणें हें मोठ्या काळजी पूर्वक केलें पाहिजे आणि त्यांत कायद्यानें अवश्य असलेल्या सर्व बाबी अंतर्भूत झाल्या आहेत कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे

कं प नी चा ल वि णें.—कंपनी चालविण्याची जबाबदारी कायद्यानें डायरेक्टरांकडे सोंपविली आहे. डायरेक्टरचे अधिकार म्हणजे ट्रस्टीचे अधिकार केवळ नव्हेत. डायरेक्टरांचें काम कंपनीचा मुख्य हेतु जो पैसा मिळविणें तो साध्य करावयाचा असतो. डायरेक्टरांची जबाबदारी कांहीं तरी जास्त असावी म्हणून प्रयत्न चालले आहेत; पण त्यास जितकें म्हणावें तितकें यश आलें नाहीं. प्रॉस्पेक्टसमध्यें जर एखादें लबाडीचें विधान असेल तर त्याबद्दल डायरेक्टर जबाबदार आहेत.

१९१३ च्या कायद्यामध्यें "मिनिमम सब्स्क्रिप्शन" चें तत्व घालण्यांत आलें. "मिनिमम सब्स्क्रिप्शन" म्हणजे कमींत कमी जितक्या किमतीचे शेअर खपले असतां कंपनीचें काम सुरू करावयाचें ती रक्कम. ही रक्कम कंपनीच्या प्रवर्तकांस अगोदर ठरवावी लागते. आणि तितक्या रकमेचे शेअर खपल्याशिवाय कंपनीचें काम चालूं करतां येत नाहीं. समजा कंपनीचें संकल्पित भांडवल एक लाख असलें तरी एक लाखाचे शेअर एकदम खपतील असें नाहीं. व अगदींच थोडक्या रकमेचे शेअर खपले असतां कंपनीनें काम सुरू करणेंहि धोक्याचेंच होईल. यासाठीं प्रवर्तकांनां अमुक रक्कम जमली म्हणजे कंपनीच्या कामास सुरवात करूं असें ठरवावें लागतें; आणि तें आर्टिकल्समध्यें घालून प्रॉस्पेक्टसमध्येंहि जाहीर करावें लागतें. ही कमींत कमी हमी ऊर्फ मिनिमम सब्स्क्रिप्शन १२० दिवसांत भरली नाहीं म्हणजे तितक्या रकमेचे शेअर खपले नाहींत तर कंपनी आपोआप मोडते; व जमलेली रक्कम लोकांस परत करावी लागते. यासाठीं त्या रकमेपुरते शेअर खपविण्याची धडपड त्या १२० दिवसांत असते. या १२० दिवसांत मिनिमम सब्स्क्रिप्शन भरली म्हणजे शेअर देतां येतात व पुढचे कॉल करतां येतात. शेअरसाठीं मागणी करणारा या काळापर्यंत फक्त अर्जदार व अर्जाबरोबर द्यावी लागणारी रक्कम भरणारा असतो. अर्जाबरोबर भरावी लागणारी रक्कम शेकडा ५ पेक्षां कमी नसते. म्हणजे कल्पना करा कीं

एक लाखाची कंपनी आहे व तिची मिनिमम सब्स्क्रिप्शन १० हजार आहे. शेअर शंभर शंभर रुपयांचे आहेत व अर्जाबरोबर भरावयाची रक्कम शेकडा ५ म्हणजे ५ रुपये आहे. म्हणजे ५०० रुपये जमा झाले म्हणजे शेअर देण्याला ( अलॉटमेंटला ) सुरुवात होईल. अलॉटमेंट केलें व अलॉटमेंटनंतरचा हप्ता जो लोकांकडून मागण्यांत येतो तो डायरेक्टरांनीं भरला म्हणजे त्या प्रकारची प्रतिज्ञा करून तो प्रतिज्ञालेख कंपन्यांच्या रजिस्टरांकडे नोंदावयाचा असतो. व तो नोंदल्यानंतर रजिस्ट्रार कंपनीच्या कार्यारंभास परवाना देतो परवाना दिल्यानंतर सहा महिन्यांच्या आंत एक सर्व शेअरहोल्डरांची सभा भरवावी लागते; आणि त्या सभेच्या अगोदर कांहीं दिवस एका ठराविक मसुद्याप्रमाणें रिपोर्ट लिहून तो शेअरहोल्डराकडे व रजिस्टराकडे पाठवावा लागतो. या रिपोर्टास " स्टॅच्युटरी रिपोर्ट " म्हणतात व त्यानंतर भरणाऱ्या सभेस स्टॅच्युटरी सभा म्हणतात. ही स्टॅच्युटरी सभा झाल्यानंतर एका वर्षानें कंपनीची ऑर्डिनरी जनरल मीटींग म्हणजे ' सामान्य साधारण सभा ' भरते. स्टॅच्युटरी मीटिंगचा उद्देश असा कीं कंपनीचें सर्व इतिवृत्त शेअरहोल्डरांच्या ताब्यांत द्यावयाचें. सर्वसामान्य शेअरहोल्डरांचे अधिकार जे आहेत ते डायरेक्टर निवडणें, दरसालचा जमाखर्चाचा आढावा पास करणें इतकेच असतात. डायरेक्टर आपल्या बैठकींत कंपनीचें सर्व कामकाज पाहतात व पहावें अशी त्यांची अपेक्षा असते व त्याप्रमाणें त्यांस अधिकारहि दिलेले असतात. परंतु सामान्यतः बहुतेक काम डायरेक्टरांतला कोणीतरी एक मनुष्य पाहतो आणि त्यास मॅनेजर, मॅनेजिंग डिरेक्टर, किंवा सेक्रेटरी असें पद देण्यांत येतें. कधींकधीं मॅनेजर व सेक्रेटरी हे निराळे असतात. अशा वेळेस सेक्रेटरीचें काम मुख्यतः हें कीं कंपनीचे सर्व व्यवहार कायद्याप्रमाणें चालले आहेत कीं नाहीं हें पाहणें, डायरेक्टरांच्या सभांचे अहवाल लिहून ठेवणें इत्यादि असतें.

कं प नी चे नि य म.—कंपनीचे जे सर्वांत पक्के नियम म्हणजे मेमोरँडममधील कलमें होत, त्यांपेक्षां कमी योग्यतेचे नियम म्हणजे आर्टिकल्समधील नियम. हे दोन्ही प्रकारचे नियम बदलावयाचे झाले म्हणजे ते स्पेशल रेझोल्यूशननें बदलतां येतात. फक्त भांडवल वाढविण्यासंबंधींचा जो ठराव असतो तो बदलण्यास स्पेशल रेझोल्यूशन लागत नसून एक्स्ट्रा ऑर्डिनरी रेझोल्यूशन चालतो. एक्स्ट्रा ऑर्डिनरी रेझोल्यूशन म्हणजे तो एक्स्ट्राआर्डिनरी म्हणून आमंत्रण पत्रिकेंत उल्लेख करून सभेपुढें आणणें व तीनचतुर्थांशापेक्षां अधिक बहुमतानें तो पास करणें. स्पेशल रेझोल्यूशन म्हणजे तो स्पेशल रेझोल्यूशन म्हणून आमंत्रणपत्रिकेंत लिहिणें व प्रथमतः एका सभेंत तीनचतुर्थांश बहुमतानें पास करून घेतल्यानंतर दुसऱ्या सभेंत तो बहुमतानें पास करून घेणें. स्पेशल रेझोल्यूशननें आर्टिकलें बदलतात. परंतु मेमोरँडममधील कलमें बदलण्यास स्पेशल रेझोल्यूशन पुरा होत नाहीं. त्याला कोर्टाची परवानगी लागते. म्हणजे कंपनीचें नांव, हेतु व मुख्य ऑफीसचा प्रांत हे बदलावयाचे झाल्यास त्यास ही सर्व यातयात पाहिजे. वर जें बहुमत सांगितलें तें केवळ जमलेल्या सभासदांपैकीं बहुमत नाहीं. तर शेअरांचें बहुमत लागतें. एखाद्या मनुष्यानें शंभर शेअर घेतले असले व दुसरी पंचवीस मंडळी एक एक शेअर घेतलेलीं असलीं तर तो शंभर शेअर घेणारा एकटा वाटेल तें पास करील किंवा नापास करील. या वेळेस जमलेल्या मंडळींच्या मताशिवाय प्रॉक्झींनीं मिळविलेलीं मतें सुद्धां मोजावीं लागतात. जो शेअरहोल्डर सभेंत स्वतः हजर राहूं शकत नाहीं तो दुसऱ्या शेअरहोल्डरास आपल्याकरितां मत देण्यासाठीं प्राक्झीपत्रक भरून प्रतिनिधित्व देतो.

का म क र ण्या ची शि स्त.—कंपनीस कोठें तरी एखादें रजिस्टर केलेलें ऑफिस असावें लागतें आणि त्याचा पत्ता रजिस्ट्रारापाशीं नोंदावा लागतो. आणि ऑफिस बदललें तर बदललेली जागाहि पुनः नोंदावी लागते. व कंपनी रजिस्टर झाल्यापासून नांवाची पाटी लावावी लागतें. कंपनीचें नांव इंग्रजी व प्रांतिक भाषेंत असें दुहेरी लिहावें लागतें. मुंबई, मद्रास व कलकत्ता येथें मात्र देशी भाषेंत नांव नसलें तरी चालेल. कंपनीचें नांव तिच्या सर्व मुख्य जाहीरपत्रकांवर इंग्रजींत असलें पाहिजे. सर्व बिलांवर, पत्रांच्या कागदांवर, जाहिरातीवर आणि सर्व प्रकारच्या ऑफिशियल प्रसिद्धीपत्रकांवर, हुंड्यांवर, प्रॉमिसरी नोटांवर हें नांव इंग्रजी अक्षरांत असलें पाहिजे. ज्या वेळेस कंपनी आपलें संकल्पित भांडवल जाहीर करील त्यावेळेस प्रत्यक्ष जमा झालेलें भांडवलहि जाहीर केलें पाहिजे. कंपनीनें दरसाल एक बॅलन्सशीट म्हणजेः ( अ ) कंपनीचें भांडवल व कर्ज यांचा तक्ता, ( आ ) मत्तेचा तक्ता, ( इ ) शिलकेचा तपशील व ( ई ) नफ्यातोट्याचा अहवाल प्रसिद्ध केला पाहिजे व तो शेअरहोल्डरांकडे पाठविला पाहिजे व तो पाठविण्यापूर्वी सरकारी सर्टिफिकिटाच्या ऑडिटरकडून तपासून घेतला पाहिजे. बॅलन्स शीट व ऑडिटरचा रिपोर्ट हे रजिस्टरकडेहि पाठविले पाहिजेत. कंपनीनें ज्या लिहिण्याच्या वह्या ठेविल्या पाहिजेत. त्यांतील मुख्य येणेंप्रमाणें:—हिशोबाची वही, हींत कंपनीचा सर्व व्यवहार आला पाहिजे. शेअरहोल्डरांचें रजिस्टर डायरेक्टरांच्या बैठकीच्या अहवालाचें पुस्तक, डायरेक्टरांच्या हजीरीचें पुस्तक कंपनीनें रजिस्ट्रारकडे पाठविण्याचे तक्ते इ. रजिस्ट्राकडे पाठविण्याचे कागद मुख्यतः येणेंप्रमाणें:—(१) डायरेक्टर, मॅनेजर, व सेक्रेटरी इत्यादिकांची यादी,(२) शेअरहोल्डराकडे पाठविलेल्या बॅलन्सशीट व ऑडिटरचा अहवाल, (३) डायरेक्टरांत फरक झाला असेल तर त्याचा निर्देश,(४) शेअर अलॉट केले( म्हणजे लोकांनां दिले) म्हणजे त्या शेअर होल्डरांचीं नांवें;(५) आर्टिकल्समध्यें जर फरक केला तर तो फरक,(६) कंपनीच्या वस्तुस्थितीसंबंधाचा दरसालचा गोषवारा

(७) कंपनीची मालमत्ता जर गहाण ठेविली गेली तर गहाणपत्राची नक्कल इत्यादि. कंपनीनें शेअर होल्डरांचें एक रजिस्टर ठेविलें पाहिजे; व तें वाटेल त्या शेअरहोल्डराच्या अवलोकनासाठीं खुलें पाहिजे.

कंपनीचा व्यवहार घोंटाळ्याचा होऊं लागला तर शेअर होल्डरांनां इन्स्पेक्टर नेमण्यासाठीं योग्य तारण देऊन सरकारी इन्स्पेक्टर चौकशीसाठीं मागण्याचा अधिकार आहे. त्याप्रमाणेंच कंपनीच्या रजिस्ट्रारला कंपनीनें केलेलें एखादें स्पष्टीकरण अपुरें वाटल्यास तें मागण्याचा देखील अधिकार आहे.

कं प नी चे अ धि का र.—कंपनी कशाकरितां निघते, हें सर्व मेमोरँडममध्यें लिहिलेलेंच असतें. तथापि कंपनी ही व्यक्ति या नात्यानेंहि कंपनीस कांहीं अधिकार असतातच. ज्याप्रमाणें एखाद्या व्यक्तीस कंपनीचा शेअरहोल्डर होतां येतें त्याप्रमाणें कंपनीसहि दुसऱ्या कंपनीचे शेअरहोल्डर होतां येतें. आणि यामुळें अनेक कंपन्या एका सूत्राखालीं आणून एक मोठा महासंघ बनविण्यास संधि उत्पन्न होते. व्यक्तीस असे कोणते अधिकार आहेत कीं, जे कंपनीस नाहींत? अशा संबंधानें इंग्लंडांत एकदां वादविवाद सुरू झाला असतां कंपनीस लग्न करतां येत नाहीं असें एका ब्रिटिश कायदेपंडितानें उत्तर दिलें. सामान्यतः असें मानण्यांत येतें कीं, कंपनीस व्यक्तीचे बहुतेक सर्व अधिकार आहेत एवढेंच नव्हे तर असे अनेक हक्क आहेत कीं, जे व्यक्तीस नाहींत पण कंपनीस आहेत. उदाहरणार्थ एखाद्यानें बेकायदेशीर गोष्टी केल्या तर त्यास तुरुंगांत जावें लागतें. पण कंपनीनें जर कांहीं बेकायदेशीर गोष्टी केल्या तर कंपनीला फार तर दंड होईल किंवा कंपनीच्या ज्या अधिकाऱ्यांवर तो दोष लावतां येईल त्याला शिक्षा करण्यांत येईल.

कं प न्यां चे प्र का र.—कंपनी खाजगी लिमिटेड असो किंवा सार्वजनिक लिमिटेड असो त्यांतहि भांडवलाच्या रोखीवर किंवा जबाबदारीवर अवलंबून असणाऱ्या असेहि प्रकार करतां येतील. आपण "कंपनी लिमिटेड बाय शेअर्स" आणि "कंपनी लिमिटेड बाय गॅरंटी" असे दोन प्रकार विचारांत घेऊं. प्रत्येक शेअरबद्दल जेव्हां कांहीं तरी ठराविक रक्कम द्यावी लागते ती शेअरवाली कंपनी होय. परंतु प्रत्येक शेअरहोल्डरनें नियमित रक्कम न देतां नुकसानी आल्यास नियमित रकमेपुरतें अभिवचन मात्र द्यावयाचें असतें अशाहि कंपन्या असतात. जेव्हां भांडवल खर्च करण्यास एखादी व्यक्ती तयार असेल परंतु नफानुकसानीची जबाबदारी घ्यावयास तयार नसेल अशा वेळेस नियमित तारणाची उर्फ "कंपनी लिमिटेड बाय गॅरंटी" अशी कंपनी उपयोगी पडते. उदाहरणार्थ एखादा क्लब काढावयाचा आहे. क्लबच्या स्थापनेकरितां लागणारें भांडवल खर्च करण्यास एखादा हॉटेलवाला तयार आहे. परंतु क्लब स्थापन केल्यामुळें होणारी नफानुकसानी घ्यावयास तो तयार नाहीं. त्यावेळेस पंचवीस तीस मंडळींनीं तयार होऊन नफानुकसानीची जबाबदारी आम्ही घेऊं असें तारण दिलें तर ती तारण देणारी मंडळी कंपनीच्या कायद्याखालीं नोंदतां येतें. तसेंच धंद्यास कर्ज पाहिजे आहे, ज्यांका जर दुसरें कोणी तारण राहील तर आम्ही कर्ज देऊं असें म्हणत आहेत. तारण म्हणून उभी राहणारी मंडळी मालमत्तावाली आहे पण रोकडवाली नाहीं. तर ही तारणमंडळी कंपनी म्हणून नोंदून ती बँकेच्या रिणकोस तारण राहूं शकेल. म्हणजे ही विनभांडवली कंपनी झाली. असल्या कंपन्या अमेरिकेंतल्या कांहीं शहरांत आहेत. हीं शहरें आपल्या क्षेत्रांत नवीन नवीन धंदे व उद्योग यांस असल्या कंपन्या काढून उत्तेजन देतात. किंवा जेथें सहकारी पद्धतीनें विमा उतरावयाचा असतो तेव्हां असल्या प्रकारच्या कंपन्यांचें अस्तित्व संभवतें. दहा गलबतवाले एकत्र होतात आणि ते आपल्या गलबतांचा विमा उतरण्याकरितां असली एखादी कंपनी काढतात. नुकसान झालें तर तें ठरलेल्या हिश्शांप्रमाणें वाटून द्यावयाचें. तसेंच ज्या संस्था परीक्षा घेण्याचा व पदव्या देण्याचा धंदा करतात व या धंद्याच्या नियमित व्यापामुळें त्यांना फारशा भांडवलाचीहि जरूर नाहीं त्यांनां स्वतःला संस्थास्वरूप मिळविण्यासाठीं "कंपनी लिमिटेड बाय गॅरंटी" हा प्रकार अवलंबावा लागतो. समजा दहा हिशोबनीस एकत्र गोळा झाले व त्यांना नवीन हिशोबनीस होऊं पहाणाराची परीक्षा घेऊन त्यांस शिफारसपत्र द्यावयाचें असलें तर तें स्वतः संस्थास्वरूपानें संघटित होण्यासाठीं कंपनी लिमिटेड बाय गॅरंटी अशीच कंपनी स्थापन करतात. कारण त्यांनां त्यावेळीं खर्चाचा प्रसंग कांहींच नसतो फक्त संस्थास्वरूप पाहिजे असतें असो.

कं प नी व रो क ड बा जा र.—कंपनीचा उद्देश पैसे मिळविण्याचा असतो व भांडवलवाल्याचा उद्देशहि पैशावर नफा मिळविण्याचा असतो. त्यामुळें असा एक वर्ग समाजांत आहे कीं जो आपली रक्कम तयार ठेवतो. कंपनीला मुनाफा चांगला सुटेल तर त्या कंपनीचे शेअर घेतो, मुनाफा वसूल करून शेअर विकून टाकतो. यामुळें पुष्कळ कंपन्यांचे शेअर शेअरबाजारांत विक्रीस असतात सर्वचेच असतात असें नाहीं. [शेअर बाजार पहा]. तथापि शेअरबाजारांत कंपनीचे शेअर असल्यामुळें दुसरे अनेक धंदे करणारांना आपल्या शिलका कंपन्यांच्या शेअरमध्यें गुंतवावयास सांपडतात. व ज्या कंपनीचे हिस्से शेअरबाजारांत विकले जाऊं शकतील तिचें भांडवल तावडतोब जमतें. शेअरबाजारांत नफ्याच्या आशेवर शेअरच्या किंमतींत तेजीमंदी होते. आणि त्यांमुळें कित्येक सट्टेबाज लोकहि कंपन्यांच्या शेअर खरेदीविक्रीचा व्यवहार करतात. आणि पुष्कळदां बाहेरच्या सट्टेबाजीकडे लक्ष देऊन कंपनीच्या अधिकाऱ्यांनां किंवा विशेषतः "आंतल्या" मंडळीस कांहीं विशेष खटपटी करतां येतात.

कंपन्यांच्या व्यवहारांतील लटपटी.—प्रत्येक कंपनींत कांहीं गर्भगृहांतील मंडळी असतात. त्यांनां आंतील माहिती असते. निदान असते असा ते वहाणा वाळगतात. तसा वहाणा केल्यांने त्यांच्या बोलण्यास शेअरबाजारांत किंमत येते. त्यांनां कंपनी चांगली चालली आहे कीं वाईट चालली आहे याच्या: ज्ञानासंबधानें अधिकारी समजतात. यांचा मुख्य धंदा असा असतो कीं कंपनीचा मुनाफा जाहीर होण्यापूर्वी कंपनीस मुनाफा कितपत झाला आहे याची माहिती मिळविणें, आणि कंपनीस जर बराच मुनाफा सुटणार असेल तर शेअरचा भाव वाढेल अशा बुद्धीनें शेअर खरेदी करणें किंवा मुनाफा कमी सुटणार असला तर शेअर असतील ते विकून टाकणें. कां कीं पुढें भाव उतरेल आणि त्यामुळें शेअरची किंमत कमी होईल. अर्थात्, त्यांच्या हालचालीकडे इतर लोकांची नजर असणारच. आपल्या हालचालीवर नजर आहे तर आपण लोकांस चकवावें कसें याच्या युक्त्या हे लोक (शेअर बाजारांतील व्यापारी) योजून ठेवतातच. यांतील सामान्य युक्ति म्हटली म्हणजे आपणांस शेअर खरेदी करावयाचे असतील त्यावेळेस शेअर कमी किमतीला विकावयास काढणें आणि शेअरचा भाव उतरविणें आणि शेअरचा भाव उतरत आहे असें पाहून लोकांनीं शेअर विकावयास काढले म्हणजे दुसऱ्या दलालांमार्फत तेच शेअर विकत घेऊन ठेवणें. शेअरच्या चढउतारीचा फायदा पुष्कळ कंपन्यांच्या गर्भगृहांतील लोक घेतात तो येणेंप्रमाणें:—ज्यावेळेस कंपनी खरोखर चांगल्या स्थितींत असेल त्यावेळेस हिशेबामध्यें थोडी बहुत हुशारी करून कंपनीस फारच थोडका फायदा झाला असें दाखवावयाचें, शेअरचा भाव कमी करावयाचा आणि लोकांनीं शेअर विकले आणि आपण विकत घेतले म्हणजे दुसऱ्या वर्षी पुष्कळ मुनाफा दाखवून बऱ्याचशा वाढलेल्या किमतीस शेअर विकून टाकावयाचे. हिंदुस्थानांत 'बऱ्याच प्रसिद्ध प्रागतिक आणि देशाभिमानी म्हणविणाऱ्या व्यापारी कंपन्यांनीं अशी हुशारी दाखविली आहे.

कंपन्यांच्या व्यवहारांत लटपटी पुष्कळ होतात यावरून कंपनी हा प्रकार अनिष्ट आहे असें समजूं नये.

भांडवलाचें संघीकरण ही एक महत्वाची गोष्ट असून मोठालीं कार्यें त्यावांचून होणार नाहींत. याशिवाय हीहि गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, जेव्हां एखादा धंदा प्रायोगिक स्वरूपांत करावयाचा असतो तेव्हां त्या धंद्यापासून होणारें नुकसान व्यक्तीस टाळावयाचें असतें. पण नुकसान व्हावयाचें हेंहि बहुतांशीं ठरलेलेंच असतें. तेव्हां तें नुकसान अनेकांवर वांटून देण्यास हातीं घेतलेल्या धंद्यास कंपनीचें स्वरूप देणें अत्यंत योग्य असतें. आपल्याकडे नवीन नवीन असे अनेक धंदे अद्याप व्हावयाचेच आहेत व प्रथमतः ते धंदे करणाऱ्या ज्या कंपन्या निघतील त्यांपैकीं कांहीं अर्थातच नुकसान पावतील, आणि मोडतील हेंहि खरें आहे. त्यामुळें ज्यांनीं काढलेली कंपनी बुडाली त्या लोकांनीं लबाडी केली असें धरून चालणें योग्य होणार नाहीं. मोठ्या भांडवलाचें एकीकरण, प्रायोगिक नुकसानीची वांटणी, यांखेरीज कंपन्यांपासून होणारे फायदे अनेक आहेत. मोठ्या मालमत्तेची वांटणी करतेवेळीं स्थावर किंवा जंगम वस्तुरूप जिनगीची वाटणी करण्यापेक्षां शेअरची वांटणी करणें सोपें होतें. शिवाय जे लोक आपली रक्कम शेअरमध्यें गुंतवितात, त्यांस शेअर तारण ठेवून वेळेवर रक्कम उभी करतां येते आणि जिनगी गहाण ठेवून रक्कम करण्यापेक्षां, शेअरच्या तारणावर रक्कम उभी करण्यास यातयात कमी पडते म्हणजे एकच रक्कम दोनदां वापरणें अधिक सुलभ होतें.

यापेक्षां सर्वांत मोठा फायदा देशाला होतो तो हा कीं. जेव्हां परकीय संघ हिंदुस्थानांत धंदा करीत आहे व त्या संघाच्या पाठीमागें मोठ्या रकमांचा जोर आहे, तेव्हां त्यांजबरोबर टक्कर देण्यास आपल्यां इकडे महासंघ उभारिले पाहिजेत. कंपन्यांचें भांडवल मोठें करणें, कंपन्यांनीं संयुक्त होणें, किंवा एखादी 'होल्डिंग कॉर्पोरेशन' काढून महासंघ बनविणें इत्यादि उपायांनीं मोठ्या भांडवलाचें एकीकरण होऊं शकतें आणि हें आपणांस अवश्य आहे.

बाहेरदेशांचें भांडवल आपल्याकडे ओढण्यास कंपनीचें साधन बरेंच उपयुक्त आहे. पुण्यांतल्या स्थावर इस्टेटीवर लंडनहून रक्कम आणतां येणार नाहीं. परंतु पुण्यांतील स्थावर इस्टेटीची मालकी बाळगणारी जी कंपनी असेल त्या कंपनीला आपले कांहीं शेअर्स परदेशांत खपविणें अशक्य नाहीं. ज्यावेळेस आपला व्यापार वाढेल त्यावेळेस या प्रकारची रक्कम उभारण्याची पद्धति बरीच अनुसरली जाईल असें वाटतें; असो.

[वाङ्मय.—कंपनी या विषयावर कायद्याचें वाङ्मय आहे. त्याप्रमाणें भांडवल या दृष्टीनेंहि वाङ्मय आहे. कायद्याच्या वाङ्मयामध्यें १९१३ चा कायदा व त्यास झालेल्या पुरवण्या व त्यांवर झालेले टीकाग्रंथ हे पहावेत. हिंदुस्थानांतील कंपन्या यांवर पद्धतशीर ग्रंथ तयार नाहीं. तथापि प्रत्येक प्रांत व अनेक संस्थानें यांत नोंदल्या गेलेल्या कंपन्यांचे अहवाल प्रसिद्ध होत आहेत. व्यापार व धंदे यांचा जो एक मतसंघ प्रत्येक प्रांतांत आहे, त्या प्रत्येक प्रांतांत कंपन्यांनां निवडणुकीचे विशिष्ट अधिकार दिले आहेत. शेअरबाजारांत कोणत्या कंपन्यांचे शेअर येतात वगैरे माहिती प्रत्येक शेअरबाजाराकडून मिळण्याजोगी आहे. शेअरबाजारांत येणाऱ्या कंपन्यांकडे म्हणजे भांडवलबाजारांत उभ्या राहिलेल्या कंपन्यांकडे वर्तमानपत्रांचें लक्ष अधिक असतें. व तशा कंपन्यांचे अहवाल वर्तमानपत्रांतून वारंवार प्रसिद्ध होतात. यासंबंधाचें मुख्य पत्र म्हणजे कलकत्त्याचें 'क्यापिटल' होय.

यूरोपांत व विशेषेंकरून अमेरिकेंत कंपन्यांचा विकास अधिक झाला आहे आणि भांडवलाचें एकीकरण केल्यानें

काय परिणाम होतात व ते लोकांवर अनन्यगतिकत्व कसें लादतात यावद्दल विवेचन त्या त्या देशाच्या अर्थशास्त्रीय वाङ्मयांत सांपडेल. ट्रस्ट उर्फ " महासंघ " याचें " ट्रस्ट " सदराखाली त्या संबंधचिं तात्त्विक विवेचन आम्ही देऊं. त्याचें स्थूलस्वरूप पहिल्या भागाच्या ' इतिकर्तव्यता ' प्रकरणांत येऊन गेलेंच आहे. कोआपरेटिव्ह सोसायट्या व व्यांका या निराळ्या कायद्याखालीं जिस्टर केल्या जातात. 'कोआपरेटिव्ह व्यांक ': " प्रवर्तक " " डायरेक्टर " " दिवाळें " " ट्रस्ट कंपनी " ' व्यवस्थापक ' इत्यादि सदरें पहा].

**कॅपरनेअम**—हें बहुतेक नाहुम गांव असावें. हें गॅलिलीतील एक प्राचीन शहर होतें. ख्रिस्तानें धर्मोपदेश सुरू केल्यापासून ह्याच शहरीं वास्तव्य केलें. येथील लोकांनीं ख्रिस्ताच्या उपदेशाकडे दुर्लक्ष केल्यामुळें ख्रिस्तानें त्यांनां शाप दिला होता. या शहराच्या जागेसंबंधीं दोन मतें आहेत. पहिलें, डॉ. रॉबिन्सनच्या मतें हें गांव व गॅलीली समुद्राच्या वायव्य कोनावर असलेलें खान मिन्टो हीं दोन्ही एक होत. दुसरें सर सी. एब्ल्यु विल्सनच्या मतें जार्डन नदी व खानमिन यांच्या मधोमध असलेलें टेलहुम हें शहर होय. या दोन्ही शहरांपैकीं कोणतें शहर जुनें कॅपरनेअम होतें हें सांगणें कठिण आहे.

**कंपली**—मद्रास इलाखा. बल्लारी जिल्हा. होसपेट तालुक्यांतील एक गांव. उत्तर अक्षांश १५° २५ ' व पूर्व रेखांश ७६° ३६'. लोकसंख्या ( १९११ ) ७६३६. हल्लीं या गांवाचें महत्व कमी होत चाललें आहे. अकराव्या शतकांत ही चालुक्यांची राजधानी होती. येथें तुंगभद्रा नदीच्या कांठावर एक किल्ला असून तो पूर्वी भक्कम असावा असें दिसतें.

**कॅपाडोशिआ**—हें प्राचीन भूगोलांत आशियामायनरमधील एका मोठ्या जिल्ह्याला नांव दिलें होतें. या जिल्ह्यांत माऊंट टॅारसपासून युक्झिनपर्यंतचा प्रदेश येत असे. कॅपाडोशियन हें नांव इराणी लोकांनीं दिलें होतें व त्याचप्रमाणें ग्रीक लोकांचें सीरियन अथवा पांढरें सीरियन हें नांव असे. शेवटच्या इराणी सम्राटांच्या अंमलाखालीं कॅपाडोशिआचे दोन विभाग झाले व इराणी सत्तेचा ऱ्हास झाल्यानंतर देखील हे विभाग तसेच राहिले. कंपाडोशिआ हें नांव अंतर्विभागाला आहे. व त्यासंबंधींची माहिती येथें दिली आहे. कॅपाडोशिआच्या दक्षिणेस माऊंट टॅारसची ओळ, पूर्वेस युफ्रेटिस, उत्तरेस पॅान्टस, व पश्चिमेस मोठें ओसाड मैदान आहे. या प्रांताच्या पूर्वेस पर्वतांची ओळ असून याला ग्रीकांनीं अँटी टारस असें नांव दिलें होतें.

स्ट्रेबोच्या वेळेस कॅपाडोशिआ हें स्वतंत्र राज्य होतें. व याचे दहा जिल्हे केलेले असत. भूगोलशास्त्र्याच्या मताप्रमाणें या देशांत मझाका व टायाना हींच कायतीं दोन शहरें होतीं. व शेवटचा राजा आर्चेलीस यानें वसविलेलें आर्चेलीस शहर रोमन वसाहतीचें मुख्य ठिकाण झालें. या देशांत पूर्वी पुष्कळ ठिकाणीं देवालयें होतीं. यांत मोरीमिनीमधील कोमाना व व्हेनासा हीं देवळें प्रसिद्ध होत. हा देश घोडे व मेंढयांचे कळप या बाबतींत प्रसिद्ध होता.

इतिहास.—इराणी सत्तेपूर्वी या देशांत हिटाइट सत्तेचा अंमल वोघाझ कुई येथें होता, एवढीच माहिती लागते. सायरो-कॅपाडोशियन सत्तेचा ऱ्हास झाल्यानंतर येथें जुलमी महासत्ता सुरू झाली. डरायसनें केलेल्या तिसऱ्या इराणी संत्रपींत हा प्रांत होता.तरी याचें स्वातंत्र्य कमी अधिक प्रमाणांत राहिलें अरिआराथेसनें याचें स्वातंत्र्य पुन्हां मिळविलें. हा राजा, अलेक्झांडर बादशहाचा समकालीन होता. अलेक्झांडरचें मांडलिकत्व पत्करल्यामुळें या देशाला कांहीं त्रास झाला नाहीं. परंतु याच्या मरणानंतर युमेनिसच्या वांटयास हा देश आला. युमेनिसचा प्रतिनिधि पारडिकासनें ३२२त अरिआराथेसला क्रूसावर चढविलें. परंतु युमेनिसच्या मरणानंतर अरिआराथेसच्या मुलानें राज्य परत मिळविलें.यानंतरचे सर्व राजे अरिआराथेस नांवानें प्रसिद्ध आहेत.याच नांवाच्या चवथ्या राजानें, अँटीयोकस ( दि ग्रेट ) व मॅसिडोनचा परस्युस यांची बाजू रोमन लोकांविरुद्ध घेतली. नंतर सेल्युलिड सत्तेच्या विरुद्ध हा राजा प्रजासत्ताक पक्षाकडचा झाला. रोमन यादवीच्या वेळेस कॅपाडोशियानें कधीं पांपे, कधीं सीझर, कधीं अँटनी व कधीं त्यांच्याविरुद्ध असे पक्ष घेतले. आर्केलास मेल्यावर टायबेरिअसनें कॅपाडोशिया साम्राज्यास जोडिलें ( इ. स. १७ ).११ व्या शतकापर्यंत हा देश पूर्वसाम्राज्याचा भाग म्हणून राहिला. सेल्जुक ( १०७४ ) व उस्मानअली यांच्या हातांत जाण्यापूर्वी येथें आर्मेनियन भाषा व धर्म यांचा विशेष प्रसार झाला.

कॅपाडोशियन लोक.—हे लोक मूळचे सेमेटिक वंशातले आहेत. त्यांच्या धार्मिक संप्रदायाला विशेष महत्व आहे. हे लोक मोठे शूर व लढवय्ये होते. त्यांची युद्धदेवता चंद्र ही होय. या चंद्रदेवतेचा जो मुख्य विशेष अविश्वासूपणा तोच कॅपाडोशियन लोकांतला मुख्य दोष होय. मा किंवा मेने ही त्या लोकांची दुसरी देवता होती. तिच्या देवालयांत पुष्कळ पुजारी आणि सेवक असत. त्यांत पुष्कळ कुमारिकाहि लष्करी पोषाख केलेल्या व शस्त्रास्त्रें धारण केलेल्या असत. या विशेष गोष्टीवरूनच हें राष्ट्र स्त्रीयोद्ध्यांचें आहे अशाबद्दल दंतकथा प्रचलित झाली. या देवतेचा " एक्झोडस " म्हणून मुख्य उत्सव होत असे. त्यावेळीं अनेक जवळचे व लांबचे यात्रेकरू जमत असत. देवतेच्या पूजेकरितां जमलेले लोक स्वतःच्याच अंगाला जखमा करून घेत, आणि इंद्रियभोगविषयक सुखांत अतिशय चैन करीत असत. ह्या धार्मिक विधीवरून कॅपाडोशियन लोकांच्या सेमेटिक वंशांतील उत्पत्तीविषयक पुराव्याला अधिक पुष्टि मिळते.

**कपालक्रिया**—एखाद्या तापसी पंथांतील मनुष्याच्या समाधीच्या प्रसंगीं कवटी फोडण्याच्या ( हिंदू ) विधीला ' कपालक्रिया ' हें नांव आहे. गरुडपुराणांत असें सांगितलें आहे कीं, जेव्हां मनुष्य मृत्यु पावतो तेव्हां त्याचा आत्मा मलाप्रमाणें आंतड्यांतून खालून निघून जातो, पण चांगल्या मनुष्याचा आत्मा शरीराच्या दहाव्या रंध्रांतून

म्हणजे ज्याला ब्रह्मरंध्र म्हणतात त्यांतून वर निघून जातो. हें जें रंध्र त्याला सुषुम्नानाडी असेंहि नांव आहे. शिवाय असें मानतात कीं संन्याशी किंवा योग्यांचे आत्मे कपालशिखरांतून सरळ स्वर्गाला जातात. अशा माणसाला त्याच्या तपःप्रभावामुळें आपला आत्मा शिरोभागीं आणून ठेवता येतो व हवें तेव्हां त्याला मरण येतें. त्याच्या मरणाच्या वेळीं आत्मा सहाजीकच ब्रह्मरंध्राच्या द्वारें निघून जातो. अशा महात्म्याचें प्रेत समाधींत असलेल्या अवस्थेंतच पुरतात व त्याच्या मागून पीठावर आरूढ होणारा शिष्य आपल्या गुरूच्या आत्म्याच्या मुक्ततेसाठीं त्याच्या कंवटीवर एखादा नारळ किंवा शंख आपटतो व त्यामुळें पडलेल्या खळग्यांत शाळिग्राम घालून ठेवितो. पूर्व रशियांतील चुवशे लोक आत्मा डोक्याच्या मागील भागांतून निघून जातो असें मानतात. नवपाषाणयुगांत आणि आधुनिक रानटी लोकांत फेंफरें किंवा अशाच तऱ्हेचे रोग दुष्ट भुतांमुळें उत्पन्न होतात असें मानून रोग्याची कंवटी त्या दुष्ट भुतांनां बाहेर निघण्याला मार्ग देण्यासाठीं करवतून काढीत ( ए. डब्ल्यू बकलंड, जे. ए. आय. ११, १८८२; डब्ल्यू जॉन्सन—वाय वेज इन् ब्रिटिश आर्किऑलॉजी, केंब्रिज १९१२). सिक्किम येथील लोकांत, आत्म्याला देह सोडण्याचा उपदेश करून लामा आपल्या बोटांनीं मृताच्या डोक्यावरील केंस धरतो व ते जोरानें ओढून त्यांच्या मुळांतून आत्म्याला मार्ग करून देतो असें म्हणातात. व असाहि सर्वसाधारण समज आहे कीं, जर तो लमा अत्यंत सदाचारी असेल तर क्वचित् खरोखरीची चीर पडते ( एल्. ए. वाडेल—गॅझेटीयर ऑफ सिक्कीम. बुद्धिझम ऑफ तिबेट.) त्यावरून आत्म्याला मार्ग करून देण्याकरितां डोक्यावरचे केस कापण्याचा प्रघात पडला.

हिंदुस्थानांत कवटी फोडण्याचा विधि, प्रेत अर्धवट जळल्यावर करण्यात येतो. यावेळीं जवळचा आप्त लांकूड किंवा बांबू घेऊन कंवटी फोडतो. (सायक्लो. रिलि. अँड एथिक्स).

**कपिल**—कर्दमप्रजापतिपासून देवहूतीस झालेला पुत्र. यास महामुनि असें म्हटलेलें असून, याची सिद्ध नामक देवांत गणना आहे. हा सांख्य शास्त्राचा प्रणेता होता असें मानतात. यानें आपली माता देवहूति हिला ब्रह्मज्ञानाचा बोध केला होता. ( भाग स्कं. ३ अ २५-३३ ). सगरपुत्र याच्याच कोपाग्नीनें भस्म झाले होते (सगर पहा). याचें चक्रधनु असें नामांतर ग्रंथांत आढळतें. (भार. उद्योग. १०९ ).

सांख्य शास्त्राचा कर्ता कपिल ( जर अशी एखादी व्यक्ति असेल तर ) बुद्धाच्या पूर्वी होऊन गेला असला पाहिजे; कारण बौद्ध धर्म याच्याच मतांवर आधारलेला आहे. या कपिलाचें खरें चरित्र ब्राह्मणी वाङ्मयांत सांपडणार नाहीं. कारण त्यांत बऱ्याच विसंगत कथा असून त्यांचा इतिहासाशीं मेळ बसत नाहीं. बौद्ध ग्रंथातून कपिलाविषयीं आढळणारी माहिती वरीच मननीय आहे. कारण ते कपिलवस्तु शहराचा कपिलाशीं संबंध जोडून त्यांच्या चळवळीला क्षेत्र करून देतात. बौद्धसंप्रदाय व सांख्य मत यांच्यांमधील अंतस्थ संबंधांशीं हा भौगोलिक प्रदेश बरोबर जमतो. या कपिलाचे कोणतेहि ग्रंथ उपलब्ध नाहींत. सांख्य सूत्रें तर अतिशय अर्वाचीन आहेत, [प्रा. को.]

**कपिलमुनि**-बंगाल्यांतील खुलना जिल्ह्याच्या विभागाचें मुख्य स्थान. उ. अ. २२° ४२' पूर्व रे. ८९° १९'. लो. सं. ( १९११ ) ३६२. येथून जिंजिरगाच्या स्टेशनपर्यंत जहाजें जातात. येथें आठवड्यांत दोनदा बाजार भरतो. कपिलेश्वरी देवीच्या नांवानें येथें मार्चमध्यें मोठी जत्रा भरते.

**कपिलर**—(इ. स. ९०-१३०) हा तामिळ ब्राह्मण कवि प्रख्यात कवयित्री अव्वैयार ( पहा, ) हिचा भाऊ. कारिकल चोलाचा जांवई जो चेरराजा अथन त्याच्या दरबारी हा कांहीं दिवस होता. चेरराजा याच्यावर इतका खूप झाला कीं याला अनेक गांवें त्यानें इनाम दिलीं. कवींचा दाता म्हणून त्यावेळीं सर्वश्रुत असलेल्या पारि राजाची कीर्ति ऐकून कपिलर तिकडे गेला व लवकरच त्या राजाचा जिवलग व आवडता भाट बनला. कोणाची स्तुति करण्यांत कपिलर हातखंडा असल्यानें तो ज्या ज्या ठिकाणीं जाई तेथें तो सर्वप्रिय होत असे. ज्यांत त्याच्या आश्रयदात्यांची प्रशंसा केलेली आहे अशीं पद्यें पाहातां असें दिसून येतें का, त्याच्या ठिकाणीं उद्बोधनशक्ति व सूक्ष्म विचार आश्चर्यकारक असे होते व या गुणांमध्यें आपल्या आश्रयदात्यांचें शौर्य व औदार्य यांचें अगदीं सत्य पण जास्त फुगवून सांगितलेलें वर्णन गोड कवितांतून त्याला चांगलें करितां आलें. पारीच्या मृत्यूनंतर त्याच्या दोघी मुलींनां लग्नाकरितां तो विच्छिककोन आणि इरुंको-वेल ( हा अग्निकुलांतील होता असें कपिलर म्हणतो, तेव्हां परमार रजपुतांच्या अग्निकुलापैकीं दुसऱ्या शतकांत अग्निकुल होतेसें दिसतें. ) यांच्याकडे घेऊन गेला. पण तेथें यश न आल्यामुळें त्यानें त्यांचीं ब्राह्मणाशीं लग्नें लावून दिलीं व आपला उदार आश्रयदाता जो पारी याच्यामागें जगण्याला विटून त्यानें अन्न वर्ज केलें व आपला लवकर अंत करून घेतला. " पेरुंकुरिची " या त्याच्या काव्यांत डोंगरी लोकांतील एक प्रेमकथा रेखाटली आहे. " इन्ननारपट्टु ' या दुसऱ्या काव्यांत ४० पद्यखंडें असून प्रत्येकांत चार चार वाईट गोष्टी सांगितल्या आहेत.

' ऐंकुरु-नुरु ' मध्यें त्याच्या शंभर कविता आहेत. व ' पथिरुप-पट्ट ' मध्यें चेरल अथनच्या प्रशंसनार्थ दहा आहेत. मदुरेस उग्र पांड्याच्या दरबारी कविसंमलेन भरल्या वेळीं कपिलर हजर होता.

उत्तम कवि, गोड मित्र आणि तंतोतंत दरबारी असा कपिलर असल्यामुळें तो आपल्या आश्रयदात्यांनां व बरोबरीच्या कविमित्रांनां सारखाच प्रिय होता. तिरुवल्लुवर कवि सोडून दिल्यास कपिलरा इतका त्याकाळीं लोकप्रिय कोणीहि

नव्हता. तत्कालीन काव्यांतून याची प्रशंसा केलेली आढळून येते [ कनकसभे].

**कपिलवस्तु**-बुद्ध (गौतम शाक्यमुनि) यांचे पिढीजाद ठिकाण म्हणून हें बौद्धपुराणांतून प्रसिद्ध आहे. कपिलवस्तु-नगराच्या स्थापनेसंबंधीं निरनिराळ्या कथा आढळतात. ( वाटर्सचा कपिलवस्तु इन् दि बुद्धिस्ट बुक्स हा जे आर.ए. एस्.१८९८ मधील लेख पहा ). या नगराचें बुद्धाच्या वेळचें वैभव व शुद्धोदन राजाचा येथला अलौकिक दरबार यांचें वर्णन ललितविस्तरादि ग्रंथांत दिलें आहे. पण या कथा खऱ्या दिसत नाहींत. कारण बुद्ध किंवा त्याचा बाप राजा होता कीं, नाहीं व त्याचें अद्भुतरम्य चरित्र कितपत विश्वसनीय आहे याबद्दल अद्याप निर्णय लागलेला नाहीं. अशोकानंतर कपिलवस्तूला तेथील स्तूप व मठ यांमुळें मोठें धार्मिक महत्व प्राप्त झालें असावें. त्यापूर्वी हें शहर लहान व भिकारडें असल्याबद्दल वार्टर्सनें आधाराला घेतलेल्या कांहीं बौद्धग्रंथांत पुरावे मिळतात.

बौद्धचरित्रांत कपिलवस्तूला फारसें महत्व नसून त्याच्या पूर्वेस कांहीं मैलांवर असणाऱ्या लुंबिनी वनराईला आहे. या राईतल्या एका झाडाखालीं गौतमाची आई उभी असतां तो तिच्या उजव्या कुशीतून बाहेर पडला. गौतम विरक्त होऊन राजवाड्याबाहेर पडला तेव्हां कपिलवस्तूची नगरदेवता त्याच्या जाण्याबद्दल दुःख करूं लागली. बोधि वृक्षाखालीं गौतमाला ज्ञान प्राप्त झाल्यानंतर दोनदां तो कपिवस्तूंत आपल्या आप्तेष्टांनां भेटण्यास आला होता. विडूडभ ( उर्फ विरूढक ) राजानें या नगरांच्या लोकांनां मारून बाहेर घालवून दिल्यावर गौतमाला फार वाईट वाटलें व पुन्हां या नगरीचें तोंड पहाणार नाहीं अशी त्यानें प्रतिज्ञा केली, यासारख्या अनेक खऱ्याखोट्या गोष्टी पुराणांतून आढळतात. बुद्धानंतर कपिलवस्तूला कधींच उर्जितावस्था आली नाहीं इ. स. ५ व्या शतकांत हें गांव व आसपासचा प्रदेश ओसाड व निर्जन असल्याची माहिती मिळते. १८९८ त टिलौराकोटच्या उत्तरेस दोन मैलांवर असलेल्या सागरवा गांवीं सतरा लहान स्तूपांचा समुदाय ए. फूहररेला आढळला. विडूडभ राजानें शाक्यांची जेथें कत्तल केली तें हें ठिकाण असावें. शाक्यांच्या काळीं कपिलवस्तूचा मुलूख कोसल ( अर्वाचीन अयोध्या ) राज्यांत गणला जात असावा. ग्रंथातून कपिलवस्तूच्या मुलुखांत अनेक शहरें व खेडीं निर्देशिलेलीं आहेत, पण तीं सर्व कधींच नष्ट झाल्यानें त्यांचा मागमूसहि आज नाहीं. इ. स. पू. २४९ च्या सुमारास अशोकानें बुद्धसहवासानें पवित्र झालेल्या ठिकाणांची यात्रा केली. प्रथम तो बुद्ध जन्मस्थान जें लुंबिनी तेथें गेला. तेथून तो कपिलवस्तूला गेला. याची खूण हल्लीं निगाली तळ्याजवळ पडलेला लेखांकित स्तंभ होय. अशोकाची ही यात्रा सविस्तर वर्णन करणाऱ्या अशोकावदानांत या स्थळासंबंधीं बऱ्याच कथा आहेत. यानंतर ६५० वर्षांनीं पहिला चिनी प्रवासी फा-हियान येथें येऊन गेला. त्यानें दिलेलें या शहराचें वर्णन पहिलेंच विश्वसनीय वर्णन म्हणतां येईल. त्याला ही जागा अत्यंत ओसाड दिसून आली. हाच अनुभव त्याच्या मागूनगेलेल्या ह्युएनत्संगाला आला.इ. स. ६३६ च्या सुमारास ह्युएनत्संगानें या स्थळाचें मोठ्या बारकाईनें अवलोकन केलें. फा-हियान व ह्युएनत्संग यांनीं या भागांतील दोन निरनिराळीं स्थळें कपिलवस्तु या कल्पनेनें पाहिल्यामुळें त्यांचीं वर्णनें जमत नाहींत हें साहजिकच होय. व्हिन्सेंट स्मिथच्या मतें फा-हियानचें कपिलवस्तु म्हणजे सध्याचा पिप्रावा येथील अवशेष समूह; व टिलौराकोट आणि आसपासचे अवशेष हें ह्युएनत्संगाचें कपिलवस्तु होय. या दोन स्थळांमध्यें अजमासें १० मैलांचें अंतर आहे.

कपिलवस्तु नक्की कोठें होतें हें सांगणें कठिण आहे. पण हल्लीं लुंबिनीचा शोध लागल्यानें त्याच्या आसपास असणाऱ्या या शहराचा साधारण शोध लागला असें म्हणण्यास हरकत नाहीं रुम्मिन ( लुंबिनी ) देवीचें ठिकाण ब्रिटिश हद्दींतल्या बस्ती जिल्ह्यांतील दुल्हा गांवापासून सहा मैलांवर असलेल्या नेपाळी तराईंत आहे. बी. अँड एन्. डब्ल्यू. रेल्वेच्या एका फांट्यावरील उस्का स्टेशन लुंबिनीला जवळचें आहे. अजमासें उ. अ. २७°२९' व पू. रे. ८३°२०' यांवर हें स्थान आहे. [संदर्भग्रंथ-लेग्गे-ट्रॅव्हल्स ऑफ फा-हियान; ए रेकॉर्ड ऑफ बुद्धिस्टिक किंगडम्स, ऑक्सफोर्ड १८८६; पी. सी. मुकर्जी आणि व्ही. ए. स्मिथ-अँटिक्विटीज इन् दि तराई; नेपाल, दि रीजन ऑफ कपिलवस्तु. जे.आर. ए. एस. १८९८, १८९९, १९०५, १९०६ इ. ]

**कपिलाषष्ठी**.—भाद्रपद महिन्यांतील वद्य पंचमीच्या दिवशीं मंगळवार, व्यतीपात योग, रोहिणी नक्षत्र इत्यादि योग जुळून आल्यास त्या षष्ठीला कपिलाषष्ठी असें म्हणतात. या पंचरवञ्यांत सूर्य हस्त नक्षत्रीं असेल म्हणजे हस्त हें महानक्षत्र असेल तर तो योग विशेष श्रेष्ठ मानिला जातो. हें सूर्यपर्व असल्यामुळें याचा पर्वकाल दिवसाच मानितात. या पर्वाच्या दिवशीं हवन, दान वगैरे कृत्यें करावयाचीं असतात. कपिलाषष्ठीस श्राद्ध करावें असें स्पष्ट मत नाहीं. परंतु इतर महान योग आले असतां श्राद्ध केलें जातें त्याप्रमाणें या दिवशींहि करावें असें धर्मसिंधुकार म्हणतात. कपिलाषष्ठी हें पर्व फार क्वचित येतें यासुळें एखादी न घडणारी गोष्ट अवचित घडून आल्यास तिला ' कपिलाषष्ठीचा योग' असें म्हणण्याची रूढी पडली आहे.

**कपिली नदी**—ही आसाममधील नदी जंटिया टेकड्यांच्या उत्तर उतारावरून निघून १६३ मैल लांब जाऊन कलांगमध्यें जागी येथें येऊन मिळते. डोयांग, जमना, बारपानी व उमियाम या इच्या शाखा होत. पावसाळ्यांत पानीपूरपर्यंत इच्या पात्रांतून जहाजें चालतात. उन्हाळ्यांत मोठ्या जहाजांनां कामपूरच्या पुढें जातां येत नाहीं. टेंकड्या

मधील लाख, रेशीम यांचा व्यापार कपिलीमधून चालतो. चपरसुखाहून या वस्तू गौहत्ती येथें पाठविण्यांत येतात. इच्या किनाऱ्यावरील मुख्य शहरें चपरसुख, जमनासुख, खारिखन, धरमतूल या होत. इच्या पुरांनीं नुकसान होऊं नये म्हणून देवनारीकोटणीपासून गगुरगांवपर्यंत भिंत बांधलेली आहे.

**कॅंपुआ**—( प्राचीन कॅसिलिनम ) इटली. हें शहर कॅंपनियाच्या धर्माध्यक्षाचें राहण्याचें ठिकाण असून कॅसेर्टो प्रांतांत कॅसेर्टो शहराच्या पश्चिमेस रेल्वेनें ७ मैल आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या १४२८५ होती. ८४० सालीं मरासेन लोकांनीं प्राचीन कॅंपुआचा नाश केल्यावर बिशप अल उल्फनें हें ८५६ सालीं वसविलें.

८५६ सालीं वसविलेल्या सेन्टस्टीफॅनो नांवाच्या मुख्य मंदिराशिवाय त्याच सालीं बांधलें गेलेलें सेन्ट मार्सेली नांवाचें प्रार्थनामंदिर येथें आहे. दुसरा फ्रेडरिक यानें व्हलटरनो नदीवरील पुलाच्या संरक्षणार्थ बांधलेल्या किल्ल्यावर एक विजयाप्रीत्यर्थ उभारलेली कमान आणि २ मनोरे आहेत. इसवी सन १५५७ सालीं हा किल्ला जमीनदोस्त करण्यांत आला. या किल्ल्यांत असलेले प्राचीन खोदीव कामाचे पुतळे येथील कॅंपॅनिओ नांवाच्या पदार्थसंग्रहालयांत आहेत. प्राचीन कॅंपुआचे अवशेष याच संग्रहालयांत आहेत. मध्ययुगांत कॅंपुआ एकामागून एक वऱ्याच जणांच्या हातांतून गेलें. त्याच्या इतिहासांतील एक अत्यंत संस्मरणीय गोष्ट म्हणजे १५०१ सालीं सीझर बोर्जिआनें त्यावर केलेला भयंकर हल्ला होय. १८६० पर्यंत नेपल्सच्या राज्यांतील एक प्रदेश म्हणून हें होतें. त्यानंतर इटलीकडे हें गेलें.

**कॅंपुआ**—( अर्वाचीन मेरिया डि कॅंपुआ व्हेटेरे) इटली. कॅंपुआ हें प्राचीन कॅंपेनिआचें मुख्य शहर असून कॅंपेनियन मैदानाच्या ईशान्य सरहद्दीवर निओपोलीसच्या उत्तरेस १६ मैलांवर आहे. केटोच्या मताप्रमाणें हें इ. स. पूर्वी २६० सालीं इट्रुस्कन लोकांनीं वसविलें असावें. इ. स. पूर्वी ५ व्या शतकांतील उत्तरार्धांत झालेल्या सॅमेनाइट लोकांच्या स्वारीमुळें येथील इट्रुस्कन सत्तेचा नाश झाला. पहाडी सॅमेनाइट लोकांपासून बचाव व्हावा म्हणून त्यांनीं रोमशीं सख्य केल्यामुळें कॅंपेनिआ येथें रोमची सत्ता प्रस्थापित झाली. सॅमेनाइटबरोबरच्या दुसऱ्या युद्धांत यांच्यापासूनच एगर फॅलेरनस घेण्यांत आलें. इ. सनापूर्वी ३१८ सालीं प्रिफेक्टच्या नेमणुकीमुळें एतद्देशीय अधिकाऱ्यांची सत्ता संकुचित झाली. व्हाया ऑपिआना नांवाची लष्करी मोठी सडक तयार झाल्यामुळें कॅंपुआ शहर इ. सनापूर्वी ३१२ सालीं रोम शहराशीं जोडलें गेलें.

दुसऱ्या प्युनिक युद्धाच्या वेळेस कॅंपुआ शहर बरेंच भरभराटीस आलें होतें. त्या वेळेस येथें ३०,००० पायदळ आणि ४००० घोडेस्वार सैन्य होतें. कॅनीच्या पराभवानंतर एक कॉन्सल कॅंपुआमधील असला पाहिजे एवढ्याकरितां रोमचें सार्वभौमत्व झुगारून देऊन हॅनिबॉलचें आधिपत्य कॅंपुआनें कबूल केलें. इ. सनापूर्वी २११ सालीं तें पुन्हां रोमन लोकांच्या ताब्यांत आलें. या वेळेस जुनी राज्यव्यवस्था बदलून लोकांच्या सामाजिक हक्कांची पायमल्ली झाली.

मसाला, दारु आणि गुलाब ह्यांकरितां हें शहर फार प्रसिद्ध आहे. येथें ब्रॉंझ धातूचें सामान तयार होतें. येथील लोक फार चैनी आहेत. येथील लोकांनां कुस्त्या खेळण्याचा फार शोक आहे. कॉन्स्टनटाइनच्या कारकीर्दींत येथें एक प्रार्थनामंदीर बांधलें गेलें. कॅंपुआ येथें एक ज्युपिटरचें मंदिर असून अर्धचंद्राकृति नाटकगृह येथें आहे.

**कपुरथळा संस्थान**—पंजाबांतील एक संस्थान. हें जालंदर विभागाच्या कमिशनरच्या देखरेखीखालील आहे. उ. अ. ३१° ९' ते ३१° ४४' व पू. रे. ७५° ३' ते ७५° ६९' एकंदर क्षेत्रफळ ६३० चौरस मैल. लो. सं. १९११ २६८१३३. वं १९०१ सालीं ३१४३४१ होती. हवा बहुतेक चांगली आहे.

सतलजपलीकडील अल्हू नांवाच्या खेड्यांतून येथील राजाच्या पूर्वजांची वस्ती होती व म्हणून या घराण्यास अल्हुवालिया म्हणतात. १७८० मध्यें बारी दोआबमधील वराच विस्कळित झालेला मुलूख तरवारीच्या जोरावर मिळविणें. हीच सरदार जससिंग याची पहिली कामगिरी होती. हा या घराण्याचा संस्थापक होय. सतलजच्या अलीकडील कांहीं मुलुख सरदार जससिंग यानें घेतला व कांहीं रणजितसिंगानें त्याला दिला. १८०९ मधील तहाप्रमाणें कपुरथळ्याच्या सरदारानें ब्रिटिशांस मदत करावी असें ठरलें होतें. १८२६ त सरदार फत्तेसिंग महाराजा रणजितसिंगाच्या धाकानें सतलजच्या अलीकडील मुलुखांत ब्रिटिशांकडे पळून आला. पण पहिल्या शीख युद्धांत कपुरथळ्याचा सरदार ब्रिटिशांविरुद्ध लढला. व त्यानें ब्रिटिशांनां मदत केली नाहीं म्हणून सतलजच्या दक्षिणेकडील भाग ब्रिटिशांनीं घेतला. जालंदर दोआब ब्रिटिशांनीं घेतल्यावरही सतलजच्या उत्तरेकडील भाग कपुरथळ्याकडे तसाच राहूं देऊन ब्रिटिश त्याच्याकडून राजा रणजितसिंगाप्रमाणें खंडणी घेऊं लागले. बारी दोआबची जहागीरसुद्धां त्या जहागिरीच्या मालकास देण्यांत आली आहे. १८४९ त निहालसिंगास राजा करण्यांत आलें. १८५२ त हा मरून याचा मुलगा रणधीरसिंग गादीवर बसला. १८५७ व ५८ मध्यें याच्या सैन्यानें ब्रिटिशांस फार मदत केली व याचें बक्षीस म्हणून बौंडी, इकौना व भिटौलीच्या जहागिऱ्या त्यास देण्यांत आल्या. यांचें उत्पन्न बरेंच आहे. याच्या मुलाचा मुलगा म्हणजे सध्यांचा जगतुसिंग होय हा १८७७ त वयाच्या ५ व्या वर्षी गादीवर बसला. हें घराणें आपला वंश राणा कपूर या जैसलमीर घराण्याच्या रजपूत सरदारापासून निघाल्याचें सांगतात. राजाला दत्तक घेण्याचा अधिकार असून १३ तोफांची सलामी आहे. पण सध्याच्या महाराजाला १५ तोफांची सलामी मिळते. सुलतानपूरमधील

दोन पूल व सराई प्रेक्षणीय आहे. दारा व औरंगझेब कांहीं दिवस येथें राहिल्याचें सांगतात.

संस्थानांत ६३० खेडीं व ३ मोठीं गांवें आहेत. कपुरथळा सुलतानपूर व पगवरा. यांत ५ तहसिली आहेत. लो. सं. (१९११) २६८१३३. यांपैकीं शेकडा ६० मुसलमान, २२ हिंदू व २० सीख आहेत. येथें फक्त १०७ ख्रिश्चन आहेत, गहूं, चणा, कापूस, ऊंस, मका हें येथील मुख्य पीक होय. सुलतानपूर येथें हातांनीं रंगविलेले कपडे उत्तम होतात. येथील जाजमें, पडदे व टेबलावर घालण्याचें कापड यूरोपांत पाठविण्यांत येतात. गहूं, कापूस, तंबाखू व साखर येथून बाहेर पाठविण्यांत येते. १८०६ व ६५ मध्यें येथें मोठे दुष्काळ पडले होते. येथें पडणारा पाऊस शेतीस पुरेसा नसल्यामुळें विहिरींच्या पाण्यावरहि शेती चालवितात. शेतकऱ्यांनां तकवी देण्याची चाल येथील सुपरिंटेंडेंट मि. रिव्हाज यानें १८७६ त सुरू केली. शेतकऱ्यांकरितां सहकारी पतपेढया निघत आहेत. जनावरांची सुधारणा करण्याचे कांहीं प्रयत्न सुरू आहेत. संस्थानानें मुद्दाम राखून ठेवलेलीं अशीं पांच जंगलें आहेत. पगवारा येथें सरकारी कर मालावर नसल्यामुळें व्यापार बराच भरभराटींत आहे. संस्थानांत सुमारें २५ मैल पक्का व ३५ मैल कच्चा रस्ता आहे.

येथील राजास पूर्ण सत्ता आहे. तो १३१००० रुपये खंडणी ब्रिटिश सरकारास दरवर्षी देतो. १९२१ सालीं स्टेट कौन्सिल ( मंत्रिमंडळ ) स्थापण्यांत आलें. टिक्कासाहेब (युवराज) त्याचा अध्यक्ष असून दोन राजपुत्र जादा सभासद म्हणून काम करतात. मुख्य प्रधान उपाध्यक्ष असतो. या मडळांत सरकारी व बिनसरकारी असे दोन्हीहि पक्ष आहेत.

कायदे ब्रिटिश हद्दींतीलच इंडियन पीनलकोड व प्रोसिजर कोड वगैरेंमध्यें थोडाफार फरक करून वापरतात. पंजाबच्या करावद्दलचा कायदाच येथें साधारण फरक करून वापरण्यांत येतो. तहशीलदारांच्या कोर्टांतून कलेक्टरकडे अपील करण्यांत येतें. पण स्टेट कौन्सिलवर अपील येथें होऊं शकत नाहीं. खुनाच्या खटल्यांत राजा निकाल देतो.

संस्थानच्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी म्हटल्या म्हणजे स्टँप्स(तिकिटें)' सारा व अमृतसर आणि लाहोर येथील जहागिरी होत. खर्चाच्या बाबी म्हणजे नोकरांचे पगार, राजघराणें अयोध्येच्या इस्टेटी, पब्लिक वर्क्स, सैन्य व ब्रिटिश सरकारास देण्याची खंडणी या होत. अफू, व दुसरे मादक पदार्थ परवानगीशिवाय विकणें बंद आहे. कपुरथळा व पगवारा येथें म्युनिसिपालिटया आहेत. यांतील मेंबर राजाच्या संमतीनें निवडण्यांत येतात.

शेंकडा ५ पुरुष व ०.३ बायका शिकलेल्या आढळतात. १९२३ च्या मार्च महिन्यांत महाराजानें असें जाहीर केलें कीं, संस्थानच्या सबंध उत्पन्नाच्या अर्धे म्हणजे सुमारें २ लाख शिक्षणाच्या कामीं खर्चण्यांत येतील व वैद्यक संस्थांवरहि मोठा खर्च करण्यांत येईल. येथें तीन रुग्णालयें व चार दवाखाने आहेत. देवी काढून घेण्याची व्यवस्था संस्थानानें केली आहे. पण देवी काढून घेण्याविषयीं कोणावर जबरदस्ती नाहीं.

**तहसील.**—ही कपुरथळा संस्थानांतील तहशील आहे. उ.अ. ३१°२२' ते ३१°३५' व पू. रे. ७५°१७' ते ७५°३५' क्षेत्रफळ १२१ चौ. मैल. लो. सं. ( १९११ ) ५१३१८. कपुरथळा हें मोठें गांव आहे. तेथील साऱ्याचें उत्पन्न १.७ लाख होतें. ही तहशील सुपीक नाहीं. बराच भाग रेताड असून बाकीचा नदीजवळ नसल्यानें साधारण सुपीक आहे.

**गांव.**—ही कपुरथळा संस्थानाची राजधानी आहे. उ. अ. ३१°२३' व पू. रे. ७५°२५, लो. सं. १९११ सालीं १६३६७ होती. हें सध्याच्या राजाच्या पूर्वजानें म्हणजे राणा कपूर यानें वसविलें. १७८० त सरदार जससिंग यानें हें मुसलमान सरदाराकडून घेतल्यापासून या संस्थानाचें मुख्य स्थान आहे. राजवाडा, सरकारी बागा व दुसऱ्याहि कांहीं चांगल्या इमारती येथें प्रेक्षणीय आहेत. फेब्रुवारी महिन्यांत चौकीपीर म्हणून मुसुलमानांत मोठा उरूस भरतो. येथें म्युनिसिपालिटी, रणधीर कॉलेज, कांहीं शाळा, व्हिक्टोरिया ज्युबिली हॉस्पिटल यांसारख्या संस्था आहेत.

**कँपो**—( १७७६–१८३१ ) काउंट. हा रशियन मुत्सद्दी व ग्रीक रिपब्लिकचा प्रेसिडेंट कार्फ्यु येथें १७७६ फेब्रुवारी ११ रोजीं जन्मला. हा जुन्या कॉर्फियट घराण्यापैकीं असून तें घराणें इस्ट्रियामधून १३७३ मध्यें तिकडे रहावयास गेलें होतें व त्या घराण्याला काउंट ही पदवी सॅव्हॉयचा ड्यूक चार्लस इमॅन्युअल यानें दिली होती. त्याचा बाप त्या बेटांतील एक मोठा वजनदार सनातनवादी गृहस्थ होता. त्यानें १७९८ मध्यें कँपो फोर्मिओच्या तहानंतर आयोनियन बेटें फ्रेंच सरकारच्या हातीं दिलीं; नंतर नव्या अमलाला विरोध केल्याबद्दल त्याला कैदेंत टाकण्यांत आलें; पण पुढल्या वर्षीच त्याची मुक्तता झाली. याचें श्रेय त्याच्या पुत्राच्या कारस्थानकुशलतेस आहे. १८०० मध्यें टर्किश बादशाही सत्तेखालीं तेथें रिपब्लिक स्थापन झालें त्यावेळीं कँपोनें कायदे कौन्सिलच्या सेक्रेटरीची सरकारी नोकरी पत्करिली. तत्पूर्वी पदुआ येथें त्यानें वैद्यकीचा अभ्यास केला होता. नोकरींत शिरल्यापासून पुढें सात वर्षे त्यानें रिपब्लिकच्या कामकाजांत बराच भाग घेतला. १८०७ मध्यें त्याची 'जादा लष्करी गव्हर्नर' च्या जागीं नेमणूक होऊन आयोनियाच्या अल्लीपाशाच्या सांटा मौराबरील हल्ल्यापासून बचाव करण्याची कामगिरी त्याच्यावर सोंपविण्यांत आली. त्याचवेळीं भावी ग्रीक स्वातंत्र्ययुद्धांतील कोलोकोट्रोन्स वगैरे प्रमुख पुढाऱ्यांशीं ओळख होऊन त्यांच्या सहवासानें त्याच्या मनांत हेलेनिक देशभक्ति उद्दीपित झाली व त्याचा त्याच्या पुढील चरित्रावर मोठा परिणाम झाला. तथापि आयोनियन सरकारच्या नोकरींत असतां त्या बेटांवर रशियाची सत्ता असावी असाच त्याचा प्रयत्न असे. पुढें १८०७ टिल्सिटच्या तहानें ती बेटें नेपोलियनच्या ताब्यांत गेलीं, तरी ग्रीसच्या स्वातंत्र्य-

प्राप्तीच्या कार्यांत रशियाचीच मदत होईल असा त्याला भरंवसा असे. यामुळें फ्रेंच सरकारनें देऊं केलेलीहि नोकरी न पत्करतां तो रशियन झारच्या नोकरींत शिरला. सेंट पीटर्सबर्ग येथें कांहीं दिवस परराष्ट्रखात्यांत नोकरी केल्यावर १८११ मध्यें रशियन वकीलाचा मदतनीस म्हणून त्याची व्हिएन्नाला नेमणूक झाली. पूर्वेकडील देशांची त्याला माहिती उत्तम असल्यामुळें नेपोलियनविरुद्ध चाललेल्या दोस्तांच्या कारस्थानांत त्याचा फार उपयोग झाला. १८१३ मध्यें ड्रेसडेन व लीपझिग वगैरे लढाईंत तो हजर होता. पहिल्या पॅरिस तहांत व नंतर व्हिएन्नाच्या कॉंग्रेसमध्यें त्यानें रशियाचा प्रतिनिधी ह्मणून काम केलें. जर्मन राष्ट्र निर्बल राखून रशियाचें वर्चस्व अबाधित ठेवण्याची त्याची नेहमीं खटपट असे व याला पोषक म्हणून फ्रान्सचे तुकडे न पाडतां कायम ठेवण्याचा त्याचा प्रयत्न होता तो सिद्धीस जाऊन १८१५ मधील तह त्याच्याच सूचनांनुरूप होऊन यूरोपमध्यें बलाढ्य राष्ट्रांचा एकोपा बरींच वर्षे टिकला. त्याच सालीं 'होली अलायन्स' ची स्थापना झाली, व नंतर स्टेटसेक्रेटरीची जागा मिळून तो पीटर्सबर्ग येथें परराष्ट्रमंत्रिमंडळांत शिरला. इ. स. १८१८ मध्यें अलेक्झांडर झारबरोबर एलाचापेल येथें कॉंग्रेसमध्यें तो हजर होता. तेथून आपल्या गांवीं परत जात असतां मार्गांत प्रत्येक ठिकाणीं त्याचा गौरव झाला. परंतु मेटरनिकसारख्या मुत्सद्याच्या डोळ्यांत त्याचें डोईजड होत असलेलें प्रस्थ खुपूं लागलें होतें. शिवाय अलेक्झांडर झारसारख्या विलक्षण महत्वाकांक्षी बादशहाचा हा परराष्ट्रमंत्री व ग्रीकचें आणि इटलीचें स्वातंत्र्य व कार्बोनरी संस्था यांच्यावद्दल त्याची सहानुभुती, अशा कारणामुळें कॅपोला यूरोपच्या राजकारणांतून अजीबात दूर करण्याची मेटर्निकला तळमळ लागून राहिली होती. योग्य संधि मिळावी म्हणून आपल्या गुप्त हेरांच्यामार्फत कॅपोच्या तोंडून निघणाऱ्या सर्व गोष्टींची माहिती त्यानें जमविण्याचा उद्योग चालविला होता. असो. कॅपो आयोनियन बेटांत येतांच तेथील रहिवाशांनीं आपल्या या देशबंधूचें मोठें स्वागत करून स्नेहभावानें थामस मेटलंड नांवाच्या ब्रिटिश गव्हर्नराविरुद्ध असलेल्या आपल्या सर्व तक्रारी त्याला सांगितल्या. व्हिएन्नाच्या कॉंग्रेसनें ठरविल्यावरून आयोनियन बेटांवर ब्रिटिशांची 'संरक्षक सत्ता' चालू होती. पण त्यांनीं आपला अम्मल फार कडकपणें चालविल्यामुळें वरील तक्रारी उत्पन्न झाल्या. त्या तक्रारी ऐकून या देशभक्ताच्या मनाला फार संताप आला व तत्संबंधीं एक खासगी रिपोर्ट त्यानें झारकडे पाठविला व शिवाय स्वतः पॅरिस मार्गानें इंग्लंडला जाऊन त्यानें ब्रिटिश सरकारपुढें आयोनियन द्वीपवासीयांच्या सर्व तक्रारी मांडल्या. परंतु तेथें त्याच्या तक्रारीकडे इंग्लंडनें विशेष लक्ष दिलें नाहीं.

१८१९ मध्यें कॅपो पीटर्सबर्गला परत येऊन झारच्या नोकरीवर रुजू झाला. १८२० मध्यें स्पेन व नेपल्स येथें राज्यक्रांत्या झाल्या. तेव्हां मेटर्निकनें झारला क्रांतिकारकांचा पक्षपाती कॅपो यास सोडून आपल्या बाजूला ओढण्याचा प्रयत्न सुरू केला. इतक्यांत १८२१ मध्यें ग्रीक देशभक्त इप्सीलँटी यानें डान्यूब नदीकांठच्या प्रांतांवर हल्ला केला. त्याचा फायदा घेऊन मेटर्निकनें झारचें मन कॅपोच्या विरुद्ध पूर्ण कलुषित केलें. तेव्हां झारनें काढून टाकण्यापूर्वीं कॅपोनें राजीनामा दिला व तो जेनेवा येथें १८२२ मध्यें जाऊन राहिला.

पुढें ग्रीक लोकांनीं तुर्कांशीं युद्ध करून आपलें स्वातंत्र्य मिळविलें व रिपब्लिक स्थापन करून १८२७ एप्रिल ११ रोजीं प्रेसिडेंटच्या जागीं कॅपोची निवड केली. ग्रीसमध्यें त्यावेळीं रशियन पक्ष प्रबल होता. कॅपोनें ती जागा पत्करली. नंतर पहिल्या निकोलस झारची त्यानें भेट घेऊन राज्यकारभारांतील धोरणावद्दल त्याची सल्ला घेतली. नंतर इतर यूरोपीय दरबारांनां भेटी देऊन त्यांची सहानुभूति संपादन करून तो इंग्लंडला गेला. तो परत आला त्यावेळीं देशांत भयंकर अडचणी उत्पन्न झाल्या. खजिन्यांत पैसा नव्हता; बहुतेक लोक रानटी, अडाणी आणि त्यांत नूतन विजयमदानें शेफारलेले होते. शिवाय ग्रीसचा शत्रु इब्राहिमपाशा हा मोरियामध्यें ससैन्य तळ देऊन बसलेला होताच. कॅपोची सर्व मदार स्वतःच्या बुद्धिमत्तेवर व रशियाच्या मदतीवर होती; पण तो पिढीजाद अरेराव पडला. शिवाय तो 'हम करेसो कायदा' अशा अधिकारावर वाढला असल्यामुळें सर्वसामान्य प्रजाजनांबद्दलची वत्सलता त्याच्या अंगीं नव्हती.

त्यामुळें त्या अडदांड परंतु स्वराज्योन्मुख ग्रीक लोकांवर राज्य करण्यास तो फारसा लायक नव्हता. तरीहि त्यांनीं त्याचा योग्य असाच सन्मान ठेवला. त्यामुळें प्रथमारंभीं कॅपोची कारकीर्द उत्तम यशस्वी झाली. त्यानेंहि चिमुकल्या पण स्वतंत्र अशा या ग्रीक राज्याच्या इभ्रतीस धक्का न पोंचेल अशा बाण्यानेंच परराष्ट्रांशीं वागणूक ठेविली. व ग्रीसच्या राज्याची मर्यादा आकुंचित करण्याचे इतरांचे सर्व डाव हाणून पाडले. परंतु अंतस्थ बंडाळ्या मोडून शांतता राखण्याचें काम त्यानें रशियाच्या मदतीनें चालविलें होतें, तें धोरणच अखेर त्याच्या सत्तानाशास कारण झालें. राज्यक्रांतीच्या काळीं ज्या आशिक्षित पण रणमस्त सरदारांनीं तरवार गाजविली होती त्यांनां पारितोषिक म्हणून कॅपोनें, प्रथम त्यांचा राज्यकारभारी मंडळांत समावेश करून त्यांत मानाच्या जागा दिल्या होत्या. परंतु लवकरच त्यांच्या जागीं त्यानें सुशिक्षित व लायक ग्रीक लोकांच्या नेमणुका केल्या. अर्थात या कृत्यानें ते लोक बिथरले. शिवाय कॅपोच्या यूरोपीय थाटाच्या वागणुकीनें, त्याच्या रशियन युनिफॉर्मामुळें, व व त्यानें आपल्या भाऊबंदास मोठाल्या वढत्या दिल्यामुळें त्यांचा क्रोधाग्नी भडकला. त्यांनीं त्याच्या विरुद्ध जाहीर बंड उभारलें. तेव्हां बंड मोडण्याकरितां त्यानें रशियाची मदत

बोलावली. त्यामुळें प्रकरण ज्यास्तच चिडीस गेलें. माइर्नी येथें पेट्रोवी नांवाच्या प्रसिद्ध वीरानें बंडाळी माजविली; परंतु लवकरच रशियन सरकारनें त्याला कैद केलें; तेव्हां तो समेटासहि राजी झाला. पण कॅपोनें चिडून रागानें त्याची मुलाखत घेण्याचेंच नाकारलें! खरोखर पाहिलें तर कॅपोनें मागील स्वातंत्र्ययुद्धांत पळभरहि हातांत शस्त्र धरलें नव्हतें. पण प्रेसिडेंटचा उच्च अधिकार मात्र त्याखऱ्या देशभक्तांवर व आपल्या जुन्या दोस्तांवर तो गाजवूं लागला. त्यामुळें अपमानानें त्या वृद्ध व अभिमानी सरदारा (पेट्रोवीज)चें डोकें क्रोधानें फिरून गेलें; व परत कैदेंत जातां जातां आपला पुत्र जार्ज व बंधू कांस्टंटाइन यांनां त्यानें इशारा दिला. त्याबरोबर दुसऱ्याच दिवशीं ( १८३१ आक्टोबर ता. ९ ) नित्याप्रमाणें कॅपो चर्चमध्यें जात असतां त्यावर कॉन्स्टंटाइननें गोळी झाडली व तो खालीं पडतांच जॉर्जनें उरांत खंजीर खुपसून त्याचा प्राण घेतला.

**कपोक**—ह्यास लॅटिनमध्यें एरिओडेनड्रॉन, इंग्रजींत सिल्क कॉटन, संस्कृतमध्यें शाल्मलि, मराठींत पांढरी सावरी इत्यादि नांवें आहेत. हें मध्यम आकाराचें झाड असतें. परंतु कधीं कधीं फार उंच झालेलीं झाडेंहि पश्चिम व दक्षिण हिंदुस्थानचा कांहीं भाग व ब्रह्मदेश या ठिकाणीं आढळतात. खेड्यांच्या व देवळांच्या सभोंवती हीं झाडें वरींच लावलेलीं आढळतात.

कांटेसांवरीहून हें झाड निराळ्या जातीचें आहे. परंतु जसा सावरीच्या झाडापासून मऊ कापूस निघतो तसाच या झाडाच्या फळांतूनहि निघतो.

यांचीं फुलें मळकट पांढऱ्या रंगाचीं असून सांवरीच्या फुलांपेक्षां लहान असतात. हें झाड एतद्देशीय नसलें तरी निदान फार प्राचीनकालीं याची लागवड येथें झाली असावी असें दिसतें. हीं झाडें मलबारमध्यें सर्व ठिकाणीं आढळतात. जानेवारी व फेब्रुवारी महिन्यांत यांनां फळें येतात. सिलोन, दक्षिणअमेरिका, वेस्ट इंडीज आणि आफ्रिकेचा उष्ण कटिबंधांतील प्रदेश इतक्या ठिकाणीं हीं झाडें होतात.

**कपोकचे गुणधर्म**—या झाडाच्या सालींतून निघणारा गोंद औषधी असतो. याच्या बियांपासून शेंकडा २८ या प्रमाणांत सरकीच्या तेलासारखें तेल निघतें; व ढेप गुरांनां खावयास फार चांगली असते. हालंडमध्यें हें तेल खातात व सावण करण्याकरितां उपयोगांत आणतात. खेळणीं करण्याकरितां या झाडाच्या लांकडाचा उपयोग होतो. या झाडाच्या फळांतून निघणाऱ्या रेशमासारख्या मऊ पांढऱ्या कापसामुळें ह्या झाडास महत्व आलें आहे.

या कापसाचा उपयोग गिरद्या, कोच वगैरे भरण्याकडे करतात. याचे तंतू आखूड असल्यामुळें कापडाकडे याचा उपयोग होऊं शकत नाहीं. हल्लीं हा कापूस स्थितिस्थापक असल्यामुळें मुख्यत्वेंकरून गाद्या, गिरद्या वगैरे सरंजामी मालाकडे याचा यूरोपमध्यें उपयोग होतो. जावा बेटांतून याची बरीच निर्गत होते. इ. स. १९०१ मध्यें ७४,१२३ गांठी बाहेर गेल्या. इ.स.१९१४–१५ सालीं कलकत्ता व मुंबई बंदरांतून २५,००० पौंड किमतीचा १६,००० हंड्रेडवेट कापूस परदेशीं गेला. इंग्लंड व इटलीकडे मुख्यत्वेंकरून या कापसाची निर्गत होते.

फ्रान्समधील बोर्डो येथें उष्णताविरोधक वुरणुस ( फेल्ट ) करण्याकडे या कापसाचा उपयोग करतात. "कपोक सप्लाय" नांवाची लंडन येथील कंपनी या कापसापासून गलबतांतील पाण्यांत तरंगणारे पट्टे तयार करते. हा कापूस दाबून त्याचे गट्ठे परदेशीं जातात.

**उपयोग**.—ह्या झाडाच्या लाकडाचा रंग चामडें रंगविण्यास उपयोगीं पडतो. ह्या झाडाच्या सालीचे तांबूस रंगाचे हलक्या प्रतीचे तंतू काढतात. व त्यांचे दोर व कागद तयार करतात. या झाडाच्या बियांभोंवती असणारे तंतू जास्त महत्वाचे आहेत म्हणून त्यांस मागणीहि बरीच आहे. बियांपासून तेल निघतें तें लालभडक किंवा गडद उदी रंगाचें असून स्वच्छ असतें. कपोकाचें लांकूड पोंखरून होडगींहि करितात.

**कॅप्रीव्ही**(१८३१-१८९९)–ह्याचें सबंध नांव काउंट् व्हॉन् कॅप्रीव्ही डी कॅप्रेराडी मॉंटेक्युकोली जॉर्ज लिओ. हा जर्मनीतील प्रसिद्ध वीर व मुत्सद्दी होता. ह्याचा जन्म १८३१ च्या फेब्रुआरीच्या २४ व्या तारखेस शार्लोटेन्बर्ग येथें झाला. ह्याचें शिक्षण बर्लिन येथें झालें व इ. स. १८४९ सालीं त्यानें आपलें नांव लष्करांत दाखल केलें. एक दोन प्रसंगीं यानें आपली लष्करी कुशलता प्रकट केल्यावर इ. स. १८८३ सालीं हा आरमाराचा मुख्य झाला. इ. स. १८८८ सालीं ह्यानें त्या जागेचा राजीनामा दिला. आपल्या मागें मुख्य मंत्री याची जागा कॅप्रीव्ही यास त्याच्या मुत्सद्दीपणामुळें मिळेल असें बिस्मार्कला वाटत होतें. इ. स. १८९० सालीं हा मुख्य मंत्री झाला. त्यावेळीं हा फारसा लोकप्रसिद्ध नसल्यानें लोकांनां जरा चमत्कारिक वाटलें. तथापि यानें आपल्या बुद्धिमत्तेनें सर्व कामाची माहिती तावडतोब करून घेतली. आफ्रिकेंतील वसाहतीसंबंधीं इंग्रज व जर्मन यांच्यामध्यें जेव्हां तंटा उत्पन्न झाला त्यावेळीं कॅप्रीव्ही यानें तो सामोपचारानें ( बिस्मार्कच्या विरुद्ध ) मिटविला. इ. सन १८९० च्या मेमध्यें आस्ट्रिया व रुमानिया यांच्याशीं तह करून यानें बादशहाची शाबासकी मिळविली खरी, तथापि त्यामुळेंच शेतकरी वर्गाचीं मनें त्याच्या विरुद्ध झालीं. इ. स. १८९४ सालीं युलेन्बर्ग व कॅप्रीव्ही यांच्यामध्यें कायद्यांच्या सुधारणेसंबंधीं वितुष्ट आलें व त्यामुळें बादशहानें दोघांसहि बडतर्फ केलें. कॅप्रीव्ही पदच्युत होण्यास विशेषतः शेतकरीवर्गच कारणीभूत झाला. यानें परदेशी राजकारण व व्यापारी धोरण चांगलें सांभाळलें व देशाचा फायदा केला. हा आजन्म अविवाहित असून यानें

आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस एकांतवासांत काढले व तो इ. स. १८९९ त ६८ वर्षांचा होऊन मरण पावला.

कफ—हा शरीरांतील तीन दोषांपैकीं एक दोष आहे (दोषांसंबंधीं विशेष माहितीकरितां 'त्रिदोष' शब्द पहा). पृथ्वी व आप या महाभूतांपासून जिवन्त शरीरांत जें द्रव्य उत्पन्न झालें आहे तो सर्व कफच आहे असा वैद्यशास्त्राचा सिद्धांत आहे. मनुष्याच्या शरीरांत तें पार्थिव असल्यामुळें पृथ्वी व आप हीं तत्वें इतर तत्वांपेक्षां जास्त आहेत म्हणून कफरूप द्रव्य इतर दोषांच्या द्रव्यांपेक्षां जास्त आहे. पृथ्वी व आप यांचें बाह्यजगांत जें कार्य दृष्टीस पडतें तेंच कार्य कफाचें आहे. शरीरास स्थैर्य आणणें, तें स्निग्ध राखणें, शरीराचे सांधे एकमेकांपासून वेगळे न होऊं देणें, शरीर थंड राखणें (पित्ताच्या उष्णतेमुळें जी उष्णता त्रासदायक होते ती कफामुळें कमी होते) क्षमा, व इत्यादि मनाचे गुण असणें या सर्व गोष्टी कफामुळें होऊन शरीराचें रक्षण होतें. स्निग्ध, थंड, जड, मंद, गुळगुळीत व बुळबुळीत या गुणांचें कफरूप द्रव्य आहे (म्हणजे कफाचे हे गुण आहेत). कफ हा सर्व शरीरभर पसरलेला असला तरी आमाशय, ऊर, कंठ, डोकें, क्लोम, शरीराचीं पर्वें (लहानमोठे सांधे), रसधातू, मेद, घ्राण व जिव्हा या ठिकाणीं तो जास्त प्रमाणांत असतो. ऊर, जिव्हा, डोकें, आमाशय व सांधे याठिकाणीं असलेल्या कफाच्या विशिष्ट कार्यावरून त्याचे मुख्य पांच प्रकार मानतात.

पोटांतील (आमाशयांतील) कफ उदकगुणाचा असल्यानें गोड व थंड असतो. पोटांत जें अन्न जातें त्यांत कफ मिसळला ह्मणजे त्याच्या द्रवपणामुळें तें अन्न मऊ होऊन विरघळतें. कफाच्या द्रवानें अन्नाचे घन भाग वेगवेगळे होतात व तसे झाले ह्मणजे अन्नाचा रस होण्यास (अन्नपचनास) मदत होते. अन्नामध्यें आमाशयांत मिसळणारा हा कफ अन्नरसाबरोबर शरीराच्या सर्व भागांत जाऊन वरसांगितलेल्या कफाच्या त्या त्या स्थानांत जातो. त्यामुळें त्या त्या स्थानांतील कफाचें प्रमाण कमी होत नाहीं (शरीर हें अंतरग्नीच्या दाहक शक्तीमुळें नेहमीं जळत आहे त्यामुळें तें प्रतिक्षणीं झिजत आहे. ती झीज अन्नरसानें भरून निघते अर्थात कफाची झीज अन्नरसांतील कफ भरून काढतो). या आमाशयांतील कफास (अन्नाचें क्लेदन करतो म्हणून) क्लेदक कफ म्हणतात.

उरांत असलेल्या कफानें मानेच्या खालील भागाचे मणके व दोन बाहू हे एकमेकांस जोडल्यामुळें जें त्रिक(तीन हाडांचा सांधा) होतें; त्यास हालचाल करण्याचें सामर्थ्य येतें. व त्या कफामुळेंच ते सांधे एकमेकांस जुळून रहातात. उरांतील कफाचें दुसरें कार्य हृदयास शक्ती देण्याचें आहे. स्वच्छ अन्नरसाबरोबर उरांतील कफ हृदयांत जाऊन हृदयाला आपलें काम करण्यास समर्थ करितो. हृदयाचें जागच्याजागीं रहाणें हेंहि उरःस्थ कफावरच अवलंबून आहे. ह्या कफास अवलंबक कफ असें म्हणतात.

जीभ व कंठ यांत असलेल्या कफामुळेंच चव समजते. यास बोधक (रसबोधनात्) कफ म्हणतात.

डोक्यांत (कवचीचे आंत) जो कफ आहे त्याचें काम इंद्रियानां (घ्राण, रसन, नेत्र,) स्निग्ध ठेवण्याचें व त्यांस प्रसन्न राखण्याचें आहे व यामुळेंच त्यास तर्पक (तर्पणात्) कफ म्हणतात.

शरीराच्या लहानमोठ्या सांध्यांत जो कफ आहे त्याचाहि उपयोग आहे. वंगणामुळें गाडीचीं चाकें व कणा न झिजतां सुरक्षित रहातात त्याप्रमाणें सांध्यांतील कफ सांध्यांना एकमेकांवर घासून झिजूं देत नाहीं व आपल्या चिकट गुणामुळें सांधे एकमेकांपासून वेगळे होऊं देत नाहीं. या जोडण्याच्या गुणामुळें त्यास श्लेष्मक कफ म्हणतात.

वर लिहिल्याप्रमाणें कफाचीं कार्यें जेव्हां तो अविकृत (समप्रमाणांत) असतो त्यावेळीं होतात. परंतु तो विकार पावला म्हणजे तीं कार्यें व्यवस्थित होत नाहींत. विकृत कफाचे दोन प्रकार आहेत. एक वाढलेला व दुसरा कमी झालेला. वाढलेला कफ दुसऱ्या दोषाच्या स्थानांत जाऊन तेथें त्रास देऊं लागला म्हणजेच कफाचे व्याधी होतात. ते असेः—तृप्ति म्हणजे जेवण नकोसें वाटणें, झांपड, निद्राधिक्य, स्तैमित्य (आंगाला ओलें फडकें गुंडाळल्यासारखें वाटणें), अंग जड होणें. आळस, तोंडाची चव गोड असणें, तोंडाला पाणी सुटणें, तोंडांतून चिकट पदार्थ बाहेर येणें, मळ (मलाशयांत) सांचणें, शक्ति कमी वाटणें, हृदय जड वाटणें, घशांत चिकटा येणें. सर्व शिरांनां कफाचा लेप होणें, गालगुंडें, अतिस्थूलपणा, अग्निमांद्य, शरीर पांढरें दिसणें, लघवी मळ, डोळे, हीं पांढरी होणें, हे विकार होतात पांढरेपणा, जडपणा, स्निग्धता, थंडपणा, स्तंभ (ताठणें), स्पर्श न समजणें, मंदपणा, बुळबुळीतपणा हीं लक्षणें जेथें दिसतात तो विकार कफाचा समजावा. शरीराचे ज्या ज्या ठिकाणीं कफाचा विकार झाला असेल त्या त्या ठिकाणी वरील सामान्य लक्षणें होतात. ताप, अतिसार, इत्यादि विकारांत वरील लक्षणें झालीं म्हणजे त्या विकारास कफज्वर, कफातिसार इत्यादि नांवें देतात.

बहुतकरून सर्व कफाचे विकारांवर ओकारीचें औषध हें श्रेष्ठ समजलें जातें, कारण वर लिहिल्याप्रमाणें आमाशयांतील कफ सर्व कफस्थानांत जाऊन त्यांस वाढवितोः म्हणून आमाशयांतील कफ ओकारीच्या औषधानें बाहेर काढून टाकला म्हणजे इतर ठिकाणचा कफ पुरवठ्याच्या अभावीं आपोआप कमी होतो. शेकणें, रेचन, व्यायाम, तिखट, कडू, व तुरट रसांचें सेवन, तीक्ष्ण, उष्ण, व रूक्ष, गुणांचे पदार्थ खाणें इत्यादिकांनीं कफविकार बरे होतात [चरक, वाग्भट वगैरे].

**कबंध.**—दंडकारण्यांतील एक असुर. विश्वावसु गंधर्वास स्थूलशिरा ऋषीचा अपमान केल्यामुळें ही योनी प्राप्त झाली होती. याचें मुख इंद्राच्या वज्रप्रहारानें उदरांत गेलें होतें, म्हणून याचें चक्षुरिंद्रिय स्पष्ट नव्हतें. तथापि याचा निर्वाह झाला पाहिजे म्हणून क्षुधानिवारणार्थ भक्ष्य मिळविण्यासाठीं यास तुझे योजनप्रमाण लांबीचे हात होतील, व त्यांत सांपडेल तें तुझें भक्ष्य होईल असा इंद्रानें वर दिला होता. एकदां दंडकारण्यांतून रामलक्ष्मण सीतेचा शोध करीत चालले असतां याच्या कवेंत सांपडले, तेव्हां रामचंद्र याचे हात छेदण्यास उद्युक्त झाला. त्यावरून उभयतांचें बरेंच भाषण होऊन रामानें याचे बाहू छेदिले व यास गतप्राण केलें, इतक्यांत त्या कलेवरांतून एक दिव्य पुरुष निघाला व त्यानें रामाची स्तुति केली व सीताशुद्धीचा मार्ग सांगितल्यावर स्वर्गास गमन केलें ( भार० वन० अ० २७९, वा० रा० अर० स० ६९–७३ ).

**कंबर,ता लु का.**—मुंबई इलाखा. सिंधप्रांत लारखाना जिल्ह्यांतील एक तालुका. उत्तर अक्षांश २७° १९' ते २७°५२ व पूर्व रेखांश ६७° १४' ते ६८° १०'. क्षेत्रफळ ६२६ चौरस मैल. यांपैकीं सुमारें ⅘ जहागीर आहे. लोकसंख्या (१९११) ९१७१९. कंबर हें मुख्य ठिकाण असून इतर ९४ खेडीं आहेत. जमीनमहसूल ( इ. स. १९०३ ) ३.६ लाख रुपये. घर नांवाच्या कालव्यावर हा तालुका अवलंबून आहे. भाताचें पीक येथें चांगलें येतें.

**गां व.**—मुंबई. सिंधप्रांत. लारखाना जिल्हा. कंबरतालुक्याचें हें मुख्य ठिकाण असून लारखाना गांवच्या उत्तरेस १२ मैलांवर आहे. उत्तर अक्षांश २७°३६' व पूर्व रेखांश ६८°३'. लोकसंख्या सुमारें ५००० इ. स. १८६२ सालीं तेथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. तिचें उत्पन्न १७,००० रुपये होतें. इ. स. १८४९ सालीं हा गांव बलुची लोकांनीं लुटला होता.

**कबीर.**—हिंदुस्थानांतील एक संत व धर्मसुधारक. याच्या जन्माविषयीं बऱ्याच विसंगत कथा आहेत. डॉ. भांडारकर कबिराविषयीं पुढील माहिती देतात ( वैष्णविझम्, शैविझम् अँन्ड मायनर रिलिजियस सिस्टिम्स ). हा एक ब्राह्मण विधवेचा मुलगा असून स्वतःच्या अब्रूचा बचाव करण्याकरितां तिनें त्यास जन्मताक्षणींच काशी येथील " लहर " तळ्याजवळ सोडून दिलें. निरु नांवाचा एक मुसुलमान साळी आपल्या नीमा नांवाच्या बायकोसह त्या रस्त्यानें चालला होता. त्यानें त्या अर्भकास पाहिलें व आपल्या घरीं नेलें. या दोघांनीं कबीराचें पालणपोषण करून त्यास वाढविलें. कबीर मोठा झाल्यावर तो साळ्याचा धंदा करूं लागला. त्याचा हिंदुधर्माकडे कल असल्यामुळें रामानंदास आपला गुरु करावा अशी त्याच्या मनांत कल्पना आली. पण आपण मुसुलमान असल्यामुळें तो आपणास शिष्य करणार नाहीं असें वाटल्यावरून त्यानें एक युक्ति लढविली. रामानंद दररोज पहांटे गंगास्नानास जात असे असें पाहून कबीर एके दिवशीं घांटावर निजला. रामानंदाचा चालतां चालतां त्याच्यावर पाय पडला तेव्हां " राम राम " असे उद्गार रामानंदाच्या तोंडांतून निघाले; तेव्हां हाच आपणास रामानंदानें गुरुमंत्र दिला व आपण त्याचे शिष्य झालों असें समजून कबीर उठला. दुसरी हकीकत अशी सांगतात कीं, रामानंदाचा पाय पडतांक्षणींच कबीर उठला व मोठ्यानें रडूं लागला तेव्हां रामानंदानें त्यास उगी राहावयास सांगून " राम राम " म्हणावयास सांगितलें. आपणांस रामानंदानें आपला शिष्य केलें असें समजून कबीरानें ईश्वरोपासनेचा आपला क्रम चालू ठेऊन आपण रामानंदाचे शिष्य आहोंत असें तो सर्वांनां सांगत सुटला. तेव्हां कांहीं हिंदू रामानंदाकडे गेले व कबीरास गुरुमंत्र दिला किंवा काय असें त्यांनीं त्यास विचारलें. तेव्हां कबीरास बोलावून "मी तुला केव्हां गुरुमंत्र दिला " असें रामानंदानें त्यास विचारिलें. कबीरानें घाटावर घडलेली हकीकत सांगितली तेव्हां रामानंदास सर्व आठवलें व त्यानें त्यास आलिंगन दिलें. त्या वेळेपासून कबीर नियमितपणें आपल्या गुरूच्या मठांत जाऊन पंडितांशीं होणाऱ्या वादविवादांत भाग घेत असे. कबीर कांहीं काळ माणिकपुर येथें राहिला असें त्याच्या " रमणी " त म्हटलें आहे. तेथें त्यास शेक तक्की व एकवीस पीर यांची कीर्ति ऐकूं आली. त्यांचीं रूभाषणें कबीरानें ऐकलीं व त्यांच्या उपदेशाचा निषेध करून तो त्यांस म्हणाला " शेखहो, तुम्ही माझें ऐका; नीट डोळे उघडून सर्व वस्तूंची उत्पत्ति व लय यांजकडे लक्ष द्या. " या पंथाच्या एका ग्रंथांत शेख तक्की हा कबीराचा शत्रु व शिकंदर लोदीचा पीर किंवा धर्मगुरु होता असें म्हटलें आहे. तक्कीच्या सांगण्यावरून शिकंदरानें कबीराचा छळ करून त्याचा नाश करण्याचे पुष्कळ उपाय योजले. परंतु दैवी चमत्कारामुळें कबीर मृत्यूच्या दाढेंतून वांचला व शेवटीं शिकंदराशीं त्याचा रूभेट होऊन शिकंदरानें त्यास आपल्या कृपाछत्राखालीं घेतलें.

कबीर मगहर येथें निधन पावला. त्याच्या शवाची पुढें कशी वाट लावावी ह्याबद्दल हिंदुमुसुलमानांत तंटा लागला. कबीराचें शव वस्त्रानें झांकलें होतें, त्यावरचें वस्त्रावरण काढून पाहतात तों शव नसून त्या ठिकाणीं फुलें होतीं. त्यांपैकीं मुसलमानांनीं अर्धीं फुलें घेऊन तीं मगहर येथें पुरलीं व त्यांच्यावर एक कबर बांधली; बाकीचीं अर्धीं फुलें हिंदूंनीं काशीस नेलीं व त्यांचें दहन केलें. कबीराच्या बायकोचें नांव "लोई" असून कमाल ( मुलगा ) व कमाली (कन्या) अशीं त्यास दोन अपत्यें होतीं; पण हीं त्यास कशीं झालीं याबद्दल अद्भुत गोष्टी सांगतात.

वरील हकीकतींत ऐतिहासिक सत्याचा भाग किती व काल्पनिक भाग किती हें ठरविणें कठिण आहे. तथापि तो प्रथम मुसुलमान साळी होता येवढी गोष्ट खरी समजून चालण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें शेखतक्की हा कबीराचा शत्रु

होता व शिकंदरलोदीच्या वेळीं कबीर होऊन गेला याहि गोष्टी खऱ्या मानण्यास हरकत नाहीं. कबीर हा रामानन्दाचा शिष्य होता किंवा नाहीं हा मात्र प्रश्न आहे. मि. वेस्टकॉट म्हणतो कीं, तो "सूफी" मुसुलमान पंथाचा असणें अशक्य नाहीं; पण त्याच्या ग्रंथांत हिंदूंच्या धार्मिक वाङ्मयांतील नांवें व त्यांच्या चालीरीति यांच्यांशीं इतका पूर्ण परिचय आढळून येतो कीं मुसुलमानी धर्मतत्त्वें त्यांच्या मुळाशीं आहेत असे कशावरूनहि दिसत नाहीं. तर उलट शुद्ध हिंदुधर्माचींच तत्त्वें मुळाशीं दिसतात. तथापि कबीर हा बाणेदार व न नमणारा असा ( धार्मिक ) सुधारक असून तो पंडित, आपल्या वर्णाचा टेंभा मिरवणारे ब्राह्मण व निरनिराळ्या पंथांचे आचार्य या सर्वांवर अभिशापांची लाखोली वाही यावरून मुसुलमानी धर्माचा त्याजवर पगडा बसला होता असें दिसतें.

निरनिराळ्या ग्रंथकारांनीं कबीराचा जन्मकाल व निधनकाल हे दोन्ही निरनिराळे दिले असून त्यांचा मेळ बसत नाहीं. वेस्टकॉट म्हणतो तो इ. स. १४४० ते १५१८ म्हणजे ७८ वर्षें जगला. मेकॉलिफ म्हणतो वि. सं. १४५५ म्हणजे इ. स. १३९८ पासून इ. स. १५१८ पर्यंत म्हणजे ११९ वर्षें ( पांच महिने, २७ दिवस ) तो जगला. एके ठिकाणीं टीपेंत शक १३७० म्हणजे इ. स. १४६८ हा त्याचा निधनकाळ असल्याबद्दल त्यानें मूळ ग्रंथाचा आधार दिला आहे. शिकंदरलोदी इ. स. १४८८ पासून इ. स. १५१७ पर्यंत दिल्लीच्या तख्तावर होता. याच्याशीं इं. स. १४४८ हा कबीराचा निधनकाल जुळत नाहीं; तेव्हां तो त्याज्य होय. रामानन्द इ. स. १२९८ सालीं जन्मला व इ. स. १४११ सालीं वारला असें सांगतात; तेव्हां वेस्टकॉटनें ठरविलेला काळ बरोबर आहे असें समजल्यास कबीर रामानंदाचा शिष्य असणें शक्य नाहीं. मेकॉलिफनें दिलेला काळ खरा धरून चाललें तर तो रामानंदाचा शिष्य असणें संभवनीय आहे. कारण यावरून रामानंदाच्या निधनकालीं कबीराचें वय १३ निघतें, व हें वर कबीराविषयीं ज्या दंतकथा सांगितल्या आहेत त्यांतील वर्णनाशीं जुळतें. दोघांहि ग्रंथकारांनीं इ. स. १५१८ हा जो कबीराचा निधनकाल ठरविला आहे. तो बरोबर समजून चालण्यास हरकत नाहीं. पण मेकॉलिफनें ठरविलेला जन्मकाल बरोबर समजण्यास कबीर ११९ वर्षें जगला असें समजावें लागतें !! रामानंदहि ११३ वर्षें जगला!! हे दोघेहि इतके दीर्घायुषी होते किंवा काय हा एक प्रश्नच आहे. तथापि अधिक सबळ पुराव्याच्या अभावीं मागें सांगितलेला रामानंदाचा काळ व मेकॉलिफनें ठरविलेला कबीराचा काळ हे तात्पुरते बरोबर समजण्यास हरकत नाहीं व कबीर रामानंदाचा शिष्य होता असेंहि मानण्यास हरकत नाहीं. तथापि केवळ १३ वर्षांचा असताना पंडिताशीं होणाऱ्या आपल्या गुरूच्या वादविवादांत तो भाग घेत असे हें शक्य नाहीं. कबीराच्या ग्रंथांत ( डॉ. भाण्डारकर यांनीं जेवढें पाहिलें आणि तेवढ्यांत तरी निदान) रामानंदाचें नांव कोठेंहि आढळत नाहीं. तथापि ईश्वरास राम या नांवानें संबोधणें, जीवात्मा व राम यांचा परस्परसंबंध, ईश्वर विदेही किंवा निर्गुण आहे या मताचें खंडन करणें वगैरे गोष्टी रामानंदाच्या मतांतूनच घेतल्या असल्या पाहिजेत.

कबीराचीं मतें व त्यांचा प्रभाव.—मुसुलमान व हिंदू या परस्परविरुद्ध अशा दोन वर्गांवर परिणाम करणारीं कबीराचीं मतें होतीं यांत शंका नाहीं. सबंध हिंदुस्थानांतच त्याचे अनुयायी दहा लाखांपर्यंत असतील. शीख धर्मसंस्थापक नानक यानेंहि आपला पंथ कबीराच्या शिकवणीवरून कांहींसा तयार केला ( आदिग्रंथ पहा ). दादूपंथी, लालदासी, सत्नामी, बावा लाली, साध, चरणदासी, शिवनारायणी, गरीबदासी व रामसनेही हे पंथ कबीराच्या उपदेशामुळें व त्यानें घालून दिलेल्या धड्यांतून निघाले आहेत. कबीर हा हिंदु कीं, मुसुलमान हेंच समजत नाहीं; कारण दोन्ही धर्मांविरुद्ध तो बोलतो. जातिभेद, संन्यास, उपासतापास, दानधर्म व वेदांत या हिंदू धर्मांतील प्रधान गोष्टींनां तो मानीत नाहीं. वेदांताला तो शिव्या देतो याचें कारण त्याची अशिक्षितता असावी. हिंदू देवकुलांच्या कल्पनेचा तो अत्यंत तिरस्कार करतो. तो भक्तिमार्गाचा पुरस्कार करी. ब्राह्मणी व इस्लामी धर्मांतील गहन विचार, मोठमोठे आचार व गूढ वाद यांविरुद्ध भोळ्याभाबड्या लोकांच्या बंडाचें कबीर हें एक उदाहरण म्हणतां येईल. तो म्हणत असे कीं, जर ईश्वराला सुंता करणें आवडत असतें तर त्यानें सुंता केलेली माणसेंच निर्माण केलीं असतीं. जर सुंता केल्यानें एखादा पुरुष मुसुलमान होऊं शकतो तर स्त्रियांच्या बाबतींत काय !! हृदय जर निष्कपट नाहीं तर माळा ओढणें, स्नान करणें, यात्रेला जाणें वगैरे गोष्टी काय कामाच्या ? जर जानवें घालून पुरुष ब्राह्मण बनतो तर स्त्रियांनीं काय घालावें ? सर्व धर्मांतील ईश्वर एकच आहे. अनेक देवांस भजणें चुकीचें आहे. धर्मग्रंथ महत्वाचे आहेत पण त्यांनां डोक्यावर चढविण्यांत अर्थ नाहीं.

कबीरानें सृष्ट्युत्पत्तीचें वर्णन दिलें आहे तें असें:— "रामतेजांत सर्व जीवांचें मिळून झालेलें एक सूक्ष्म स्वरूपांत असलेलें द्रव्य होतें. तें द्रव्य रामतेजानें प्रकाशित झालें. नंतर स्त्री स्वरूपांत वासना प्रगट झाली. तिला गायत्री व "शब्द" म्हणूं लागले व तिच्यापासून सृष्ट्युत्पत्तीस सुरुवात झाली" म्हणजे "ईश्वराच्या सूक्ष्म इच्छेनें स्वरूपांत असलेल्या जीवाची उत्पत्ति झाली अगर त्याचा विकास झाला व ही ईश्वरी इच्छा शब्दस्वरूपांत प्रगट झाली" अशी कबीराची कल्पना आहे. याचा अर्थ असा कीं ईश्वर हा जगताचें उपादान कारण नसून तो एक अगदीं निराळा सूक्ष्म पदार्थ आहे. उपनिषदांत एकाचींच अनेक रूपें झालीं असें जें म्हटलें आहे तें एक 'सत्व' होय; साक्षात् ईश्वर नव्हे

यावरून कबीराचें मत अद्वैतपर नसून द्वैतपर आहे. एकाच कारणापासून सर्व जीव निर्माण झाले, तेव्हां जातिभेद अगर वर्णभेद ह्या मागाहून रचलेल्या काल्पनिक अगर खोटया गोष्टी होत असें कबीराचें मत होतें. तेव्हां याविरुद्ध कबीर होता. कबीराच्या शिकवणींत ख्रिस्तीधर्माची छटाहि कांहींनां दिसते. (उदा. सर जॉर्ज ग्रिअर्सन, जे. आर. ए. एस. १९१८).

कबीराचा सर्व उपदेश तोंडीच असे. तथापि त्यानें कांहीं ग्रंथ रचल्याचे त्याचे भक्त सांगतात. कबीर व त्याचे भक्त यांच्या नांवावर मोडणारे ग्रंथ पुढील होतः—

सुखनिधान, गोरखनाथाच्या गोष्टी, कबीरपाजी, बालखकी रामायणी, रामानंदाच्या गोष्टी, आनंदसागर, शब्दावली, मंगल, वसंत, होळी, रेखना, झूलना, कहरा, हिंदोला, बारामास, चांचरस, चौतीसा, अलेफनामा, रमैणी, बीजक, आगमवाणी, ज्ञानसागर, कबीरगीता, व कबीरभानुप्रकाश. याशिवाय कांहीं हस्तलिखित ग्रंथहि आहेत.

**कबीराची पद्यरचना.**— कबीराचे दोहोरे प्रख्यात आहेत. तशींच त्यानें केलेलीं पदेंहि पुष्कळांच्या परिचयाचीं आहेत. पण ही सर्व रचना स्फुट आहे. भाषा हिंदी असून सरळ व सोपी आहे. त्याची कवित्वशक्ति चांगली स्फूर्तिदायक व हृदयंगम आहे. तुकारामाच्या अभंगांप्रमाणें कबीराचे दोहोरेहि म्हणींसारखे सर्वांच्या तोंडीं असतात. तुकारामाच्या नांवावर ज्याप्रमाणें 'तुका म्हणे' असें शेवटीं घालून पुष्कळसे अभंग मागाहून दडपून दिले आहेत त्याचप्रमाणें 'कहत कबीरा' असें म्हणून दोहोरे रचण्यांत आले आहेत. तेव्हां खरें व खोटें ओळखणें कठिण पडतें. 'कबीराचीं पदें' म्हणून जें पुस्तक मिळतें त्यांतील भाषा बरीच मराठी वळणाची दिसते.

**कबीरपंथी.**—इतर पंथांतल्याप्रमाणें या पंथांतहि बरेच पोटवर्ग आहेत. कबीराच्या मुसुलमान अनुयायांचें मुख्य स्थान गोरखपुराजवळील मगहर गांवीं आहे. हे आपल्या हिंदु गुरुबंधूपासून तुटक राहतात. हिंदु अनुयायांत दोन मुख्य वर्ग आहेत. मगहर येथील हिंदुपीठ काशींतील मुख्य पीठाची केवळ एक शाखा आहे. मगहर येथील पहिला हिंदु महंत १७६४ त नेमला अशी एक माहिती मिळते. दुसरें पीठ मध्य प्रांतांत छत्तीसगड येथें आहे. धर्मदास नांवाच्या एका वाण्यानें तें स्थापिलें. हिंदु धर्मांतील इतर अनेक पंथांत जशा सुधारणा होत आहेत. तसा यांतहि विभक्तपणा व संस्कारविधि या दृष्टीनें फेरबदल होतोसा दिसतो. कबीर जरी जातिभेदाविरुद्ध होता तरी अर्वाचीन कबीरपंथ्यांनां हीन वर्णाचे लोक आपल्यांत येऊं नयेत, त्यांनीं आपल्याप्रमाणें गळ्यांत तुळशीच्या माळा घालूं नयेत असें वाटतें. ब्राह्मण कबीरपंथी माळा घालून शिवाय जानवें घालितात. स्त्रींनें सुद्धां गळ्यांत माळ घालावी पण ती लग्नापूर्वी घालूं नये; व नवऱ्याचा जो गुरु असेल तोच आपला गुरु करूं नये; कारण एकाच गुरूचे शिष्य बंधुभगिनी म्हणून समजतात. यांचा दीक्षाविधि मोठा असतो. त्यावेळीं मुख्य महंताच्या पायाचें तीर्थ व एक विड्याचें पान ग्रहण करावें लागतें. पानावर ईश्वराचें गुप्त नांव लिहिलेलें असून, त्याला 'पर्वाण' किंवा परवाना म्हणतात व तो कबीराचा देह असतो असें मानितात. दीक्षाविधींत मुख्य गोष्ट म्हणजे गुप्त मंत्र देण्याची होय. धर्मदास पोटपंथांत अनेक मंत्र असतात व दीक्षाविधीहि पुष्कळ निराळा असतो. प्रत्येक रविवारीं व चांद्रमासाच्या शेवटच्या तिथीला दिवसा उपवास करून, संध्याकाळीं धार्मिक भोजनाचा समारंभ करितात. त्यावेळीं ईशस्तवन, महंताचें प्रवचन व सूक्तपाट होतो. नंतर परमेश्वराशीं एकरूप होण्याचा विधि मोठ्या गंभीरपणें उरकण्यांत येतो. मृत्युशय्येवर पडलेल्या मनुष्याला तीर्थ व विड्याचें पान अंतकाळीं देण्यांत येतें. पंथांतील लोकांना वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याविषयीं उपदेश करण्यांत येतो. दोन वर्षांनीं परीक्षा घेऊन कसोटीस उतरल्यानंतर स्त्रियानांहि या आश्रमांत घेण्यांत येतें. बहुतेक अशा स्त्रिया विधवा किंवा हा आश्रमधर्म स्वीकारलेल्यांच्या धर्मपत्नी असतात. या पंथाच्या शाखांचें काम मुख्य महंतानें नेमलेले महंत पाहतात. हे महंत फारसे शिकलेले नसतात; कांहींनीं तुळशीदासाचें रामायण व भगवद्गीता म्हटलेली असते. सर्व कबीरपंथी बीजक या ग्रंथाला फार महत्त्व देतात व तो नित्य पठण करितात. तो भागोदास नांवाच्या कबीरशिष्यानें कबीराचीं पदें व दोहोरे एकत्र करून रचिला. याशिवाय गुरुबोध, मानसविचार, स्तमेष्टीसार, पंचकोश व निर्णयसार या ग्रंथांनां कबीरपंथी लोकांनीं फार महत्त्व दिलेलें आढळतें.

**दीक्षाविधि.**—सरण जिल्ह्यांत पुष्कळ मठ असून, तेथील अधिपति जे महंत ते "कबिराहा"—कबिराचे अनुयायीअसतात. या महंतांचे दोन वर्ग आहेत, एक संन्यासी व दुसरा घरवासी किंवा गृहवासी. संन्यासी महंतांना "पर्वत" अशी पदवी असून ते जगापासून अलिप्त राहतात; घरवासी यांनां "गीर" "आतिथ", "पुरी" किंवा "भारथी" म्हणतात; ते आपल्या मठांत सहकुटुंब राहातात. घरवासी हे संन्याशांपेक्षां हलक्या दर्जाचे असें मानण्यात येतें. संन्यासी हे घरवाशांनीं विटाळलेलें अन्न खात नाहींत; पण घरवासीवर्गांतील लोक मात्र संन्याशी वर्गांतील लोकांचें बिनदिक्कत उष्टें खातात.

कबिराहा किंवा कबिरपंथी महंत कोणत्याहि जातींतून चेले निवडतात; तसेंच सर्व जातींशीं रोटी व्यवहार करितात, असें कांहीं म्हणतात. चेला होण्याच्या वेळचा विधि येणेंप्रमाणें:—प्रथम भावी चेल्याचें न्हाव्याकडून मुंडन करण्यांत येतें; डोक्याच्या मध्यभागीं जी एक केसाची बट त्यावेळीं राखतात ती गुरु कापतो व त्याचें यज्ञोपवीत काढून घेतो. ही बट व यज्ञोपवीत जमीनींत पुरतात. नंतर होम होतो. चेल्याला गेरूचें वस्त्र अर्पण करण्यांत येतें.

या प्रसंगीं एक भोजन घालीत असतात. चेला वनल्यावर घरदार सोडून मठांत येऊन राहावें लागतें व अखंड गुरूची सेवा करावयाची असते.

जेव्हां महंत मृत्यु पावतो तेव्हां चार दिवसांनीं त्याचें शव जमीनींत पुरतात व त्यावर समाधि बांधतात. मृत्यूच्या चवथ्या दिवशीं म्हणजे दफनाच्या दिवशीं दूधरोटीचा विधि होतो. त्यावेळीं हजर असलेल्या महंतांनां दूध व रोटी घालण्यांत येते. मृत महंत आपल्या हयातींत आपल्या चेल्यांपैकीं जो विशेष लायक असेल त्याला आपल्या मागें महंतपदाकरितां निवडतो. हा निवडलेला महंत ( चेला ) आपल्या गुरूच्या वर्षश्राद्धाच्या वेळीं भंडारा भरवितो व त्यावेळीं शेजारच्या मठांतील महंतांनां प्रसंग साजरा करण्यास आमंत्रण देतो. हे निमंत्रित महंत भंडारासमारंभाच्या वेळीं मृत महंतानें निवडलेल्या चेल्याला चादर अर्पण करून त्याच्या निवडणुकीला दुजोरा देतात. जर मृत महंतानें आपल्या मागें कोण गादीवर बसावा हें ठरविलें नसेल तर भंडाऱ्याच्या दिवशीं हजर असलेले दुसरे महंत त्यांच्या त्यांच्या चेल्यांतून चांगल्या लायक इसमाला निवडून त्याला महंताच्या गादीवर बसवितात. तेव्हां भांडाऱ्याच्या प्रसंगीं महंतसमुदायानें जी निवडणुकीला संमति द्यावयाची असते किंवा निवड करावयाची असते ती अत्यावश्य होय.

कबीर संप्रदायाची आधुनिक स्थिति बरी नाहीं. ती सुधारण्याकरितां इ. स. १९०३ मध्यें एक बैठक झाली. तींत अशी सभा दर तीन वर्षांनीं भरवावी, पंथांतील लोकांच्या शिक्षणाकडे नीट लक्ष द्यावें व संप्रदायाचें एक मासिक काढावें इत्यादि ठराव पास झाले. पुढें ही सभा कितपत टिकून राहिली याची माहिती नाहीं.

[ संदर्भग्रंथः— विल्यम—रिलिजिअस सेक्ट्स ऑफ दि हिंदूज; माल्कम—एशिया, रिसर्चेस. ११; वेस्टकॉट—कबीर अँड कबीर पंथ ( हें पुस्तक फार महत्त्वाचें असून यांत संदर्भग्रंथांची यादी आहे ) पंडित वालजी वेचर—कबीरचरित्र ( गुजराथी ). भांडारकर—वैष्णविझम, शैविझम इ. फर्कुहर. रिलिजस लिटरेचर ऑफ इंडिया; वि. विस्तार पु. ३९ ].

**कबीर–वट.**—भडोच शहरापासून सुमारें बारा मैलांवर शुक्लतीर्थाजवळ हा एक अति पुरातन वृक्ष आहे. याची कथा अशी सांगतात कीं, जीवा व तत्त्वा नांवाचे दोघे भाऊ भडोच येथें रहात. ज्याच्या चरणतीर्थानें एका सुकलेल्या वटवृक्षास पालवी फुटेल त्याला गुरु करावयाचा असें त्यांनीं ठरवून अनेक साधूंची परीक्षा पाहिली. कबीर त्या ठिकाणीं एकदां आला असतां त्याच्या पायाचें तीर्थ जीवातत्वांनीं या वृक्षास घातलें तेव्हां त्याला पालवी फुटली ( वि. विस्तार पु. ३९) पान ६४ ). कोणी म्हणतात कीं, कबीरानें तोंड धुतांना चावून टाकलेल्या एका फांदीपासून हा वृक्ष झाला म्हणून त्याला कबीरवट असें नांव पडलें. (उदा. मोनियर विल्यम्स—ब्रॅह्मॅनिझम पान ३३७ ). कसेंहि असो हा वृक्ष फार पुरातन व अवाढव्य आहे यांत शंका नाहीं. नर्मदेच्या पुरांनीं याचे मोठाले भाग वाहून गेले आहेत. १७७६–८३ या काळांत फोर्ब्सनें पाहिलेल्या याच्या मोठाल्या बुंध्यांनीं सुमारें २००० फूट परीघाइतका प्रदेश व्यापिला होता. जमिनीला टेंकलेल्या फांद्यांच्या व्याप अतिशय मोठा होता. या फांद्यांखालीं शिताफळें व इतर फळझाडें अनेक वाढलीं होतीं. या वडाचीं ३५० मोठीं व ३००० वर लहान खोडें दिसत होतीं. लष्कराचा तळ जेव्हां या झाडाखालीं पडत असे तेव्हां ७००० वर माणसें याच्या आश्रयास रहात. १८१९ सालच्या वर्णनांत ( ट्रॅन्झॅक्शन. बाँबे लिट. सोसायटी, ३८१९, २९० ) लेखक म्हणतो कीं, हें झाड तीनचार एकर जागा व्यापी, व उंच डोंगरासारखें दिसे. या सालापुढें याची फारच दशा झाली. मधलें खोड तर जवळजवळ नाहींसेंच झालें. फक्त कबीराच्या देवळावरून त्याची जागा ओळखतां येतें ( सर्व्हे रिपोर्ट, भडोच सब्डिव्हिजन्, १८७१ ). दि पाप्युलर रिलिजन अँड फोकलोर ऑफ नॉर्दर्न इंडिया' या क्रूकच्या ग्रंथांत या वृक्षाची माहिती आहे.

**कबीरवाल.**—त ह शी ल-पंजाब इलाखा. मुलतान जिल्ह्यांतील अगदीं उत्तरेकडील तहशील. उत्तर अक्षांश ३०° ५' ते ४०° ४६' व पू. रे. ७१° ३५' ते ७२° ३६'. क्षेत्रफळ १६०५ चौरस मैल. लोकसंख्या इ. स. ( १९११ ) १५६६१३. यांत एक गांव व३२० खेडीं आहेत. इ. स. १९०३–४ सालीं ५ २ लाख रुपये एकंदर उत्पन्न होतें. रावी व चिनाव या नद्या तहशिलीच्या वायव्य कोंपऱ्यांत एकमेकांस मिळतात. तहशिलीचा उत्तरेकडील व पश्चिमेकडील भाग सिद्धनाइ कालव्याच्या पाण्यानें भिजतो.

**कंबोडिया.**—कँम्बोडिया हा देश आशियाच्या आग्नेय दिशेस आहे. हा देश फ्रान्सच्या अमलाखालीं असून फ्रेंच इन्डो-चीनचा भाग आहे. याला शुद्ध उच्चार करणारे "कांबोज" म्हणतात.

भू व र्ण न.—उत्तरेस सयाम व लाओस, पूर्वेस अनाम, दक्षिण व आग्नेयदिशेस कोचिन चीन, नैऋत्येस सयामचें आखात व पश्चिमेस सयाम.

क्षेत्रफळ सरासरी ४५००० चौरस मैल असून लोकसंख्या ( १९१४ ) १६३४२५२ आहे. पैकीं तीन-चतुर्थांश लोक कॅम्बोडियन असून बाकीचे चिनी, अनामी, चाम, मलायी आणि मूळचे रहिवासी आहेत.

सर्वांत मोठी नदी मेकाँग ही आहे. तुलेसाप नांवाचें एक मोठें सरोवर आहे. त्याची लांबी ६८ मैल व रुंदी १५ मैल आहे. हें सरोवर व मेकाँग नदी यांनां जोडणारी एक ७० मैल लांबीची खाडी आहे. त्यामुळें नदीला पूर आला कीं, सरोवर तुडुंब भरून चोहोंबाजूंनीं वाहूं लागतें. ह्या सरोवरांत मासे अतिशय सांपडतात. उत्तर व पश्चिम ह्या दिशांनांच लहान पर्वत दिसतात. सर्वांत उंच पर्वताची उंची ५०००

फूट आहे. पश्चिम किनाऱ्यावर लहान लहान बेटें बरींच आहेत.

ह्या देशाची आणि कोचिनचीन प्रांताची हवा सारखीच आहे. आक्टोबर ते एप्रिलपर्यंत हवा कोरडी असून उष्णमान ७७° ते ८०° अंश असतें. एप्रिल ते आक्टोबर उष्णमान ८५° ते ९५° अंश असतें.

हत्ती, गेंडा, रेडे आणि जंगली बैल, वाघ, चित्ता, अस्वल डुकर, वानर इत्यादि प्राणी सांपडतात. त्याचप्रमाणें मेकाँग नदींत मगर पुष्कळ आहेत. विषारी सर्पहि आढळतात. घोडा व रेडे हीं वाहतुकीचीं जनावरें होत.

लो क व स्ती.—कँबोडियन लोक बरेच अंशीं सयामी लोकांसारखे दिसतात. यांची उत्पत्ति बहुतकरून इन्डो-चीन-मधील मलाया रहिवाशी व आर्यन आणि मंगोलियन ह्यांच्या पासून असावी असें वाटतें. पुरुष उंच व सशक्त असून स्त्रिया ठेंगण्या असतात. चेहरा बसका किंवा चापट व रुंद असतो. लघुनासिका, रुंद मुख, पिंगट कातडीचे,काळ्या केंसाचे व शेंडी असलेले असे हे लोक असतात. पेहराव, लेंगा व ओढणी हे आहेत. हे लोक धर्मभोळे, दारूबाज व जुवेबाज आहेत. काडी मोडण्याची पद्धति ह्यांच्यांत आहे. श्रीमंत लोकांनांच फक्त पुष्कळ बायका करण्याचा अधिकार आहे. हे लोक बुद्धाचे अनुयायी आहेत. भूतपिशाच्च ह्यांवर ह्या लोकांची श्रद्धा आहे. ब्राह्मण संस्कृति अद्याप देखील दरबारांत चालू आहे. लग्नकार्यें व इतर धार्मिक बाबतींत ब्राह्मणांचें वर्चस्व बरेंच आहे. राजवंशज आणि सरदार ह्यांच्याकडून विगार व कर-वसूली करीत नाहींत. १८९७ सालीं गुलामगिरी नाहींशी झाली.

तेथील भाषा पालिभाषेसारखी आहे. प्राचीन हस्तलिखित ग्रंथ ताडपत्रांवर लिहिलेले आहेत.

उ द्यो ग धं दे व व्या पा र.—लोखंड, सोनें व चांदी ह्यांचीं कामें चांगलीं होतात. मातीचीं भांडीं, विटा, चटया, पंखे, रेशीम व सुत हीं कामें लहान प्रमाणावर करतात. परंतु मुख्य उत्पन्न मासे, तांदूळ, तंबाखु, कॉफी, कापूस, मिरीं नीळ, मका, चहा आणि साखर हीं होत. कँबोडियन मनुष्य फारसा दुसऱ्या देशाच्या उत्पन्नावर अवलंबून राहत नाहीं. बाहेर जाणारा माल तांदूळ, वाळलेले मासे,मिरीं, बैल इत्यादि. निर्गत व्यापार चिनी लोकांच्या हातांत आहे.

वाहनाकरितां मार्ग चांगले नसल्यामुळें बहुतेक व्यापार सायगान नदींतून होतो.

रा ज्य व्य व स्था—राज्याचा अधिकारी राजा आहे. वारस नेमावयाचा तो राजा किंवा पांच मुख्य सरदार हे नेमतात. परंतु राजा ज्यावेळीं वारस नेमतो त्यावेळीं तो कधीं कधीं राज्याचा त्याग करून वारसाच्या स्वाधीन करितो. राजाचें मंत्रिमंडळ पांच सरदारांचें बनलेलें असतें. ह्या देशाचे ५० प्रांत करून प्रत्येक प्रांतावर एक सरदार नेमलेला असतो. परंतु फ्रान्सतर्फे प्रत्येक प्रांतावर व राजदरबारीं एक रेसिडेंट असतो. बहुतेक हे रेसिडेन्टच खरे राजे असतात. प्रत्येक प्रांतांत त्याची व्यवस्था ठेवण्याकरितां एक एक मंडळ असतें. त्या मंडळाचा मुख्याधिकारी रेसिडेन्ट हा असतो. परराष्ट्रीय संबंध, सार्वजनिक कार्यें, जकाती आणि खजिना फ्रेंच लोकांच्या हातीं असतो. व पोलिस, प्रत्यक्ष करवसुली, न्याय हीं तेथील लोकांच्या ताब्यांत असतात. परंतु वादी किंवा प्रतिवादी ह्यांमधील एक जर तेथील रहिवाशी नसेल तर त्या वादाचा निकाल देण्याचा अधिकार फक्त फ्रेंच न्यायाधि-शांनांच आहे. जमीनसारा, प्रत्यक्ष कर आणि डोईपट्टी हीं वसुलीचीं साधनें होत.

इ ति हा स.—कँबोडियाचे मूळ रहिवाशी ख्मेर लोक असावे असा अंदाज आहे. ह्या देशाचा इतिहास म्हणजे चीनी लोकांनीं केलेलीं टिपणें होत. त्यांवरून असें कळतें कीं, ख्रिस्ती शकापूर्वी १२ व्या शतकापासून इसवीसनाच्या ५ व्या शतकापर्यंत ह्या देशाचा विस्तार मेनाम नदीपासून मेकांग नदीपर्यंत होता. ख्रिस्तापूर्वी कांहीं शतकें पूर्वकिनाऱ्यावरील हिंदुलोकांनीं तेथें जाऊन आपलें वर्चस्व तेथें प्रस्थापित केलें व ब्राह्मण संस्कृति आणि संस्कृतभाषा ह्यांचा प्रचार सुरू केला. ही स्थिति इ. स.५ पर्यंत होती. त्यावेळीं तेथील राजा श्रुतवर्मा हा होता. परंतु. इ. स. ७ व्या सुमारास श्रुतवर्मा ह्याचा वंश चालू असतांना त्या देशाचे दोन भाग झाले. परंतु ९व्या शतकांत तिसरा जयवर्मा यानें एक देश करून पुन्हां ब्राह्मण संस्कृतीस आश्रय दिला. १०व्या शतकांत ब्राह्मण धर्माचा प्रति-स्पर्धि बुद्ध धर्म ह्याचा प्रसार होऊं लागला. मोठमोठीं देवळेंहि त्यावेळीं बांधण्यांत आलीं. आठव्या जयवर्म्याच्या कारकीर्दींत चम्पाचें राज्य कँबोडियास जोडण्यांत आलें. पश्चिमे-कडील देशांवरहि स्वारी करण्यांत आली. परंतु ह्याच स्वाऱ्या त्या देशाच्या नाशाला कारणीभूत झाल्या असें म्हणतात. १३व्या शतकाच्या सुमारास सयाम प्रांत स्वतंत्र झाला. नंतर १५ व्या शतकापर्यंत सयाम कँबोडियावर स्वाऱ्या करीत होता. ह्यास्तव व अंतस्थ दुहीमुळें राजधानी अँकोरथोम सोडून देणें भाग पडलें. नंतर लोवेक ही राजधानी झाली. परंतु ही राजधानीदेखील १६ व्या शतकांत सोडून देणें भाग पडलें. ह्याच सुमारास यूरोपीय लोक ह्या देशावर आपआपलें वर्चस्व प्रस्थापित करण्याचा उपक्रम करूं लागले. शेवटीं फ्रेंच लोकांचेंच प्राबल्य जास्त झालें. १७व्या शतकाच्या आरंभीं दक्षिण अनामचे राजे कोचिन चिन ह्या प्रांतांत शिरकाव करूं लागले. त्यामुळें तो प्रांत सयाम व अनाम ह्या राज्यांची रणभूमि बनला. १८४६ च्या तहा-मुळें ह्या दोन देशांचें शत्रुत्व नाहींसें होऊन अनामी लोकांनीं देश सोडून दिला व सयामचा अंगडुंग हस्तक तेथें नेम-ण्यांत आला. परंतु सयामचें तेथिल वर्चस्व कमी कर-ण्याकरितां १८६३ मध्यें अंगडुंग ह्यांचा वंशज नोरोडोम हा राज्य करीत असतां एक फ्रेंच अधिकारी तेथें पाठवि-ण्यांत आला व कँबोडिया हा देश फ्रान्सचा संरक्षित

संस्थान झाला. १८६६ सालीं नोरोडोन ह्यानें नोपेन येथें राजधानी नेली. १८६७ सालीं फ्रान्स व सयाम ह्यांमध्यें तह होऊन सयामनें खंडणी वगैरेचा हक्क सोडून देऊन त्याबद्दल वत्तमबंग, अंकोर आणि मेकांग नदीपर्यंतचा लाओरा प्रांत हे मिळविले. १८८४ मध्यें कँबोडियाच्या राजानें तह करून सर्व प्रांत फ्रान्सच्या अधिकाराखालीं दिला. परंतु वरीच वर्षें ह्या अटींची अंमलबजावणी करण्यांत आली नाहीं. १९०४ सालीं मेलप्रे वसक आणि क्रत हे सयामचे प्रदेश कँबोडियाला जोडण्यांत आले. त्याच वेळीं मेकांगच्या दक्षिण तीरावरील देशांचा अधिकार फ्रान्सनें सोडून दिला. १९०४ सालीं नोरोडोनचा भाऊ सिसोवथ हा गादीवर बसला. येथील लोकांविषयीं वरीचशी माहिती पहिल्या विभागांत ( हिंदुस्थान आणि जग पृ. १८९ व पुढें ) आढळेल.

[ सं. ग्रं.-आयमेनिएर—ला कांवोज (३भाग,पॅरिस१९००—१९०४) अँटाँइनें कॅवॅटॉन—कँबोडिया (ए.रि.ए.मधील लेख)]

**कव्वालदुर्ग**—म्हैसूर संस्थान. म्हैसूर जिल्हा. मलवल्ली तालुक्यांतील एक किल्ला. उत्तर अक्षांश १२° ३०′ व पूर्व रेखांश ७७°१८′. वर जाण्यास फक्त एकच मार्ग आहे. हिंदु व मुसुलमानी राज्य असतांना राजकीय कैदी येथें कैदेंत ठेवीत असत. येथील विषारी पाणी, घाणेरडी हवा व वाईट अन्न कैद्यांची जीवितयात्रा लवकरच संपवीत. इ. स. १७३४ साली दलवायी देवराज यानें चामराजा व त्याची राणी यांस येथें वंदींत टाकलें होतें. त्याचप्रमाणें हैदरअल्लीनें गुत्तीचा राजा मुरारराव यास येथेंच आणून ठेविलें होतें. इ. स. १८६४ सालीं येथील तोफा निकामी करण्यांत आल्या व शिवंदी उठविण्यांत आली.

**कव्वालिगर**.—( कव्वेर, कव्लिगेर ) एकंदर लो. सं. ( १९११ ) ७९९१६. यांची वस्ती मुंबई व मद्रास इलाख्यांत आहे. मुंबई इलाख्यांतच सुमारें ६० हजार कव्वालिगर आहेत. कर्नाटक, कानडा जिल्हा, भीमा, कृष्णा व गंगावली ह्या नद्यांच्या कांठचा प्रदेश यांत हे आढळतात. हे तेलगु भाषा वोलतात व यांमध्यें लग्नसमारंभीं द्रविडांप्रमाणें हालागाम व धारे हे संस्कार करितात. यावरून ते मूळचे मद्रासमधील वेलारी जिल्ह्याचे रहिवाशी असावे असें दिसतें. कानडामधील अव्वी ( कव्वालिगर ) यांमध्यें देवकें आहेत. कोठें कोठें या जातीचे लोक ब्राह्मणाप्रमाणें गोत्रेंहि लावूं लागले आहेत. या जातींत पुष्कळ मुली अविवाहित राहून वेश्यांचा धंदा करितात, त्याचप्रमाणें काडी मोडलेल्या बायकाहि हाच धंदा करितात.

लिंगायत, जैन, मराठे इत्यादि उच्च जातीचे लोक ते आपल्या जातींत घेतात. मासे धरणें, होडया चालविणें व पालख्या वाहणें हे त्यांचे परंपरागत धंदे होत. रहाण्याच्या ठिकाणावरून यांत कर्नाटकी व कानडे असे दोन भाग झालेले आहेत.

क र्ना ट की क व्वा लि ग र.—यांमध्यें अकरा पोटभाग असून त्यांच्यांत बेटीव्यवहार होत नाहींत. यांची वेडग नांवाचीं १०१ कुळें आहेत. आतेवहीण व मामेवहीण यांच्याशीं विवाहसंबंध हे करतात. मुलींचीं लग्नें बालपणीं व प्रौढपणीं होतात. मुलाचा बाप मुलीबद्दल १२ ते १०० रु. पर्यंत तेरु ( शुल्क ) देतो. नवराबायकोचे हात मुलीचा मामा जुळवितो व त्यांवर पाणी घालतो. या संस्कारास "धारे" संस्कार हें नांव आहे. पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्ही चाली यांच्यामध्यें रूढ आहेत. हे लोक मांस खातात व दारूहि पितात. भरमाप्पा, बसवन्ना, ओपली, परमानंद, वीरभद्र, भवानी इत्यादि यांच्या कुलदेवता आहेत. विवाहसंस्कार ब्राह्मण चालवितात व क्रियासंस्कार जंगम अथवा जातपुढारी चालवितात. मनुष्य मृत झाल्यापासून ५ व्या किंवा इतर विषम महिन्यांत सोनाराकडून मेलेल्या माणसाचा मुखवटा अगर ( स्त्री असल्यास) शंक्वाकृति पात्र तयार करून आणतात व तें देवांमध्यें ठेवतात.

परसगड तालुक्यांतील कव्वालिगर लोकांच्या खेड्यांचे वर्ग केले असून त्या प्रत्येकांवर "कट्टीमानी" हा अधिकारी नेमलेला असतो. या लोकांचा गुरु आनेगुंडी येथें रहात असून त्याला जातीसंबंधीं प्रश्नांचे निकाल क्वचितच द्यावे लागतात.

वेळगांव तालुक्यांत १०—१२ खेड्यांवर कव्वालिगर लोकांचा एक पटेल असून त्याचे प्रतिनिधी प्रत्येक खेड्यांत असतात. अपराधाबद्दल बहुधा दोन रुपयांवर दंड होत नाहीं. पटेल व इतर सभासदांनीं एकमतानें निकाल दिला नाहीं तर संकेश्वर स्वामींचा प्रतिनिधि "वेळगांव येथील मराठा पटेल" हा निकाल देतो.

का न डे अ व्वी.—यांमध्यें देवकानुसार आनेवली व गंगावली असे दोन वर्ग आहेत. आनेवाला लोकांचें देवक हत्ती हें असून तें हस्तिदंती दागिने घालीत नाहींत. गंगावली लोक गंगावली नदीची पूजा करतात. वसव व गंगावली देवी यांचीच मुख्यत्वेंकरून ते पूजा करतात. हे लोक सर्व लिंगायत सण पाळतात. यांचे उपाध्ये जोशी व हविक ब्राह्मण हे होत. विवाहित माणसांच्या प्रेतांनां अग्नि देण्यांत येतो इतरांनां पुरण्यांत येतें.

कानडा जिल्ह्यांतील अंबिग लोकांच्या प्रत्येक खेड्यांत एक 'बुधवंत' नांवाचा अधिकारी नेमलेला असून तो खेड्यांतील पुढाऱ्यांच्या संमतीनें बारीकसारीक प्रश्नांचे निकाल देतो. बुधवंताच्या हाताखालीं "कोलकर" हा अधिकारी असतो व त्याचें काम सभा बोलावण्याचें असतें.

मुख्य बुधवंत "म्हेत्री" याचा अधिकार जातीच्या सर्व लोकांवर असतो. म्हेत्री व बुधवंत यांच्या जागा परंपरागत असतात. परंतु या अधिकाऱ्यांची वर्तणूक चांगली नसल्यास गोकर्ण येथील श्रृंगेरी मठाचा प्रतिनिधि "पारपत्यागर"

याच्या संमतीनें लोकांनां या अधिकाऱ्यांनां काढून टाकतां येंत. गंगावली देवळानिमित्त प्रत्येक कुटुंबाला १॥ आणा प्रमाणें वार्षिक वर्गणी द्यावी लागते.

**कंब्राय**—हें शहर उत्तर फ्रान्सच्या नॉर्ड विभागांतील मुख्य शहर आहे. येथील लोकसंख्या ( १९०६ ) २१७९१ आहे. ह्या शहराची तटबंदी जमीनदोस्त केली गेल्यामुळें बराच भाग मोडकळीस आलेला होता तो सुधारण्यांत आला आहे. वरील नासार्डांतून पूर्वेकडे असणारा उंच चौकोनी अंतरदुर्ग व १३ व्या शतकांतील सेली वंगला यांचा बचाव झाला असल्यामुळें लष्करी शिल्पाचें चांगलें काम पहाण्यास सांपडतें.

कँब्राय् हें सब् प्रिफेक्ट व आर्चबिशप ह्यांचें रहाण्याचें स्थान आहे व येथें पहिल्या प्रतीचें न्यायकोर्ट आहे. व्यापारी न्यायकोर्ट व फान्सच्या व्यांकेची शाखा आहे. शिक्षण-संस्थांमध्यें कम्युनल कॉलेज, धर्मविषयक शाळा, चित्रशाळा व गायनशाळा आहेत. येथील वाचनालयांत ४०,००० ग्रंथ आहेत. येथील पदार्थसंग्रहालयांत जुन्या वस्तू व कलाकुसरीच्या वस्तूंचा संग्रह केला आहे. येथें मलमलीचें कापड विणण्याचा उद्योग मुख्य आहे व त्याचप्रमाणें दुसऱ्या बारीक सुताचेंहि कापड विणतात. ह्याशिवाय लोकरीचें सूत काढणें व विणण्याचें काम, सूत रंगविण्याचें काम व चिकोरी तयार करण्याचें कामहि होतें. याशिवाय येथें आणखी बीट मुळांपासून साखर करण्याचे कारखाने, कलाली भट्ट्या व यंत्रानें दारू काढण्याच्या भट्ट्याहि आहेत. कँब्राय् हें जुन्या काळचें नर्व्हियन शहर आहे. ५ व्या शतकांत फ्रेंच राजा रग्वार्चिअस ह्याची येथें राजधानी होती. शार्लमेननें या शहराची तटबंदी केल्यावर नॉर्मन लोकांनीं (८७०) व नंतर हंगेरीच्या लोकांनीं ( ९५३ ) वेढा दिला होता पण त्यांस घेतां आलें नाहीं. १०, ११ व १२ व्या शतकांत बिशप, त्याचे अनुयायी व तेथील लोक यांच्यांत तंटा सुरू झाला. पण शेवटीं लोकांनीं आपणास स्वतंत्र केलें. १४७८ मध्यें अकराव्या लुईनें बर्गंडीच्या ड्यूकच्या मरणानंतर हें शहर काबीज केलें व बादशहास दिलें. १६ व्या शतकांत पांचव्या चार्लसनें अंतरदुर्ग बांधून शहरास मजबुती आणली. १७९३ मध्यें आस्ट्रियन लोकांनीं शहरास वेढा दिला पण कांहीं उपयोग झाला नाहीं. येथें १५०८ मध्यें व्हेनिसविरुद्ध संघ स्थापन झाला व कँब्रायचा तह १५५९ मध्यें झाला.

येथील धर्माधिकाऱ्याची जागा ५ व्या शतकापासून चालत आली असून १५५९ सालीं मोठ्या धर्माधिकाऱ्याची ( आर्चबिशप ) जागा झाली. बादशहा पहिल्या हेनरी ९१९–९३६ ) पासून येथील धर्माधिकाऱ्यास 'काउंट'ची पदवी देण्यांत आली होती. पुढें १५१० मध्यें त्याला ड्यूक-इतका मान दिला जात असे; त्याच्या ताब्यांत शहर व आसपासचा भाग असून ह्या भागास कँब्रेसिस् म्हणतात.

**कमधिया**—मुंबई इलाखा. काठेवाडांतील छोटें संस्थान. गोंडलच्या आग्नेयीस ११ मैलांवर भादर नदीच्या कांठीं ह्या प्रांत ठाण्यांतील स्वतंत्र खंडणी देणारा तालुका आहे. यांत फक्त एकच गांव आहे. हें पूर्वी सांथली परगण्यांत असे, पण इ. स. १८१७ त नवानगरच्या जामनें सर्फराजअल्ली नांवाच्या बडोदे दरबारांतील एका सरदाराला हें देऊन टाकिलें.

**कमरुद्दीनखान**—दिल्लीकर महंमदशहाचा वजीर हुसेन अल्ली ( सय्यद बंधूंपैकी एक ) याचा खून झाल्यानंतर, शहानें जो महंमद अमीनखान वजीर केला होता त्याचा कमरुद्दीन हा पुत्र. कमरुद्दीन व निजामउल्मुल्क हे चुलत-भाऊ. बाप वजीर असतां याला सरदारी मिळाली. बाप १७२१ त मेला. निजाम वजीर झाला व कमरुद्दीन याची सरदारींत बढती झाली. निजाम व अलमअल्ली यांमधील बाळा-पुरच्या लढाईत हा निजामाकडे होता. थोरल्या बाजीराव-साहेबांची स्वारी थेट दिल्लीवर झाली, त्यावेळीं हा त्यांच्यावर अनेक सरदारांसह आला होता; परंतु प्रथम त्यांची परस्परांची गांठ पडली नाहीं; पुढें झील तलावावर दोघांची भेट झाली, तरीहि बाजीरावानें त्याला झुकांडी देऊन दिल्लीचीं उपनगरें लुटलीं ( १७३७ ) ! यानंतर मराठ्यांचा धुमाकूळ उत्तरेंत चालू असतां त्यांच्यावर खान चालून आला तेव्हां वोडसें येथें त्याचा मराठ्यांनीं पुरा पराभव केला ( १७३९ ). पुढें नादीरशहाची स्वारी झाली. तींत वजीर खानडौरान मारला गेला; तेव्हां कमरुद्दीन यास वजीरी मिळाली. निजाम व कमरुद्दीन हे भाऊभाऊ असल्यानें दोघेहि शेवटपर्यंत मराठ्यांचे शत्रू राहिले व यांच्यामुळेंच दिल्ली आणि भागानगर अखेरपर्यंत मराठ्यांस कायम काबीज करतां आलें नाहीं. अवदालीनें पंजाबवर स्वारी केली ( १७४८ ) व लाहोर घेतलें; तेव्हां कमरुद्दीन त्याचेवर गेला व त्याचा सरहिंद येथें यानें पराभव केला. परंतु पुढें दोन-तीन दिवसांतच कमरुद्दीन हा तंबूंत निमाज पढत असतां तोफेचा गोळा लागून मेला ( १० मार्च ) [ म. रि. म. वि].

**कमल**—सरोवरांत किंवा तळ्यांत उगवणारें व कंदापासून उत्पन्न होणारें हें एक फूल आहे. यास संस्कृतमध्यें पद्म, कमल, अरविंद, पंकज, मराठींत कमळ व इंग्रजींत वॉटरलिलि, लाटिनमध्यें निंफिया लोटस इत्यादि नांवें आहेत. संस्कृत कवींकडून कमल हिंदुस्थानांतील सर्व पुष्पामध्यें श्रेष्ठ समजलें जात असे. याच्या मुख्य तीन जाती आहेत. त्या श्वेत, रक्त व नील या होत. यांची फुलें फार शोभिवंत असून कांहीं सुवासिकहि आहेत. या झाडाचें बीज व मूळ हीं औषधीकामाकडे लावतात. व खाण्याकडेहि त्यांचा उपयोग होतो. याचे कांदे पाण्यांत लावल्यानंतर त्यांस लांब देठ येऊन त्यांवर फूल येतें. देठांस आंतून जाळी असून ते अगदीं पोकळ असतात. कमळाचें पान वाटोळें असतें. फुलांस अनेक लांबट पाकळ्या असून त्या सूर्यफुलासारख्या एकमेकांस अगदीं लागलेल्या असतात.

कांहीं जातींच्या कमळास सुवास असतो. व कांहींस मुळींच वास येत नाहीं. कल्हार जातीचें कमळ लहान व सुकुमार असून त्यास सुवास फार असतो. यास पावसाळयांत फार फुलें येतात. कुमुद म्हणून कमळाची जात आहे, तिचीं पानेंहि कमळाप्रमाणेंच असतात. या कमळांच्या फुलांचा भर थंडीच्या दिवसांत असतो. पांढऱ्या कमळास पुंडरीक म्हणतात. रक्त कमळास कोकनद व नील कमलास इंदीवर अशीं नांवें आहेत. कमळाच्या वेलास कमलिनी असें म्हणतात. कमलाक्ष म्हणून एक कमळाची जात आहे. त्या जातींच्या कमळाचे देंठ पांढरे असून कोठें कोठें पायाच्या आंगठयाएवढे जाड असतात. जे देठ चिखलांत रुतलेले असतात त्यांस स्वाद अधिक असतो. या देठास भिसें असें म्हणतात. या कमळाचीं पानें मोठया छत्रीएवढीं असून तीं जेवावयास ताटाऐवजीं उपयोगी पडतात. या कमळाचीं पुष्पें तांबडया रंगाचीं असतात व यास लहान असें चपटें फळ येतें. त्यांत ५।६ लहान करवंदाएवढया बिया निघतात. त्यास कमळक्ष किंवा कमळकांकडी असें म्हणतात. बिया फोडून आंतील मगज काढितात. त्याच्या कित्येक ठिकाणीं लाह्या करतात. त्या दुधांत घालून खातात किंवा त्यांचें पीठ करून त्यांत तूपसाखर घालून लाडू बनवितात. कमलाक्ष फार पौष्टिक आहे.

वनस्पतिशास्त्रज्ञांच्या मतें कमल हें वाटाण्याच्या वर्गांतील ( लेग्यूमिनोझे ) एक जात असून त्याच्या अनेक उपजाती आहेत. या उपजातींत मोडणाऱ्या वनस्पती पूर्व गोलार्धांतील समशीतोष्ण प्रदेशांत मोठया प्रमाणांत सर्वत्र उगवतात. लेग्यूमिनोझे ही एक इंडिगोफेरा( "नील पद्म") ची पोटजात आहे.

क म ल व सं स्कृ त वां ङ्म य.—सर्व फुलांत कमल हें भारतीयांनां अत्यंत प्रिय आहे. अतिप्राचीन काळापासून तों आजतागाईत हिंदुस्थानच्या सर्व भागांत कमलाला जी मान्यता लाभली आहे ती इतर कोणत्याहि फुलाला नाहीं, हें वाङ्मय व कला यांतील त्याच्या वर्चस्वावरून कळून येणार आहे. ऋग्वेदांत कमलाच्या दोन जाती आढळतात. एक पुंडरीक व दुसरी पुष्कर. पुंडरीक हें श्वेत कमल, एकदां पाणवनस्पति म्हणून उल्लेखिलें आहे. ( १०. १४२, ८ ). अथर्ववेदांत ( १०. ८, ४३ ) मनुष्याच्या हृदयाला पुंडरीक म्हटलें आहे. पंचविंशब्राह्मणांत ( १८. ९, ६ ) तारकापुंजांच्या प्रकाशापासून जन्मलेलें असें विशेषण पुंडरीक पुष्पाला दिलें आहे. तैतिरीय शाखेच्या कृष्णयजुर्वेदांत ( १. ८, २, १ ) अशा फुलांच्या माळेला 'पुंडरिस्रजा म्हटलें आहे. पुष्कर या नील कमळाचा ऋग्वेदांत अनेक जागीं उल्लेख आहे. ( ६. १६, ३; ७. ३३, ११; ८. ७२, ११ ) व पुढील वैदिक ग्रंथांतून तर त्याहिपेक्षां ज्यास्त वेळां उल्लेख सांपडतील. कांहीं वेळां कमलाकार यज्ञिय पात्राला पुष्कर म्हटलें आहे. हीं फुलें शरीरमंडनार्थ धारण करीत हें अश्विनौच्या उदाहरणावरून समजतें ( ऋग्वेद १०. १८४, २ ). कमलाची तिसरी जात कुमुद व त्याचे खाण्यायोग्य असे निरनिराळे भाग अथर्ववेदांत उल्लेखिले आहेत (४.३४,३ ). ब्राह्मणग्रंथांत विश्वोत्पत्तिकथांतून प्रजापतिसंबंधांत कमलाचा प्रथम उल्लेख येतो. उदाहरणार्थ, तैत्तिरीय ब्राह्मणांत ( १. १, ३, ५ पासून पुढें ). "प्रथम द्रवावस्थेंत असलेल्या विश्वाचा विकास करण्याच्या इच्छेनें जेव्हां प्रजापती इकडे तिकडे पाहूं लागला तेव्हां पाण्यावर ताठ उभें असलेलें एक कमलाचें पान ( पुष्करपर्ण ) त्याला दिसलें; तें कशावर तरी उभें असलें पाहिजे असें वाटून डुकराच्या रूपानें त्यानें खालीं बुडी मारली; तेव्हां त्याला खालीं पृथ्वी आढळली. तिचा एक तुकडा काढून त्यानें वर आणला व त्या पानावर ठेवला" अशा तऱ्हेची गोष्ट आढळते. तैत्तिरीय आरण्यकांत असें सांगितलें आहे कीं जेव्हां विश्व द्रवावस्थेंत होतें तेव्हां एकटया प्रजापतीचा पुष्करपर्णावर जन्म झाला (१. २३,१). पुढील काळच्या महाभारतासारख्या इतिहासपुराणांतून ब्रह्मा विष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाल्याचें वर्णिलें आहे. विष्णूला पद्मनाभ, लक्ष्मीला पद्मा अशा तऱ्हेचीं विशेषणें लाविलीं आहेत.

अर्वाचीन संस्कृत वाङ्मयांत तर मुख, चरण, हस्त, नेत्र वगैरे अवयवांनां कमलाची उपमा दिलेली आढळते. कोठल्याहि प्रेमाच्या वर्णनांत कमल हें यावयाचेंच. बौद्ध धर्मांत कमलाला काय महत्त्व दिलें आहे तें पाहूं. बौद्धांमधील कमलचिन्ह ब्राह्मणीधर्मांतून घेतलेलें आहे यांत शंका नाहीं. सुखावी या महायानीय स्वर्गांत बायका नसून प्रत्येकजण देव म्हणून कमलपुष्पावर जन्म पावतो, आणि त्याठिकाणीं मण्यांचीं कमलें असतात. कमल हें सूर्यरूप आहे. बुद्धाचीं पाऊलें कमलासारखीं उमटतात, तसेंच हें पुष्प दैवी जन्माचें दर्शक आहे इतकेंच नव्हे तर अमरत्वाचेंहि दर्शक आहे यासारख्या कल्पना बौद्धग्रंथांतून आढळतात, व त्या शिल्पांत उतरविल्या आहेत. तिबेटी साधुपंथांत लामाधर्माचा संस्थापक जो पद्माकर त्याचें हें विशिष्ट चिन्ह मानतात व गेलुग पंथांत त्साँग–ख–पा या पंथस्थापकाच्या दोहों बाजूंला दोन कमलें ठेवितात. पाली कथांतून पदुम व पदुमुत्तर हे दोन मागील बुद्ध; पद्म, पद्मोत्तर आणि पुंडरीक हे नाग; पदुम, महापदुम, व पुंडरीक हे बौद्ध नरक; अशीं कमलावरून दिलेलीं नांवें आढळतात. बौद्धांनां अवगत असणाऱ्या, १ पुढें ११९ शून्यें देऊन होणाऱ्या अति मोठया संख्येला पद्म असें नांव आहे. १ पुढें ११२ शून्यें देऊन होणाऱ्या संख्येला पुंडरीक म्हणतात. महायान पंथाच्या एका महत्वाच्या धार्मिक ग्रंथाला 'सद्धर्मपुंडरीक' असें नांव आहे.

क ला.—भारतीयांच्या लालित्याच्या कल्पनांत कमल हें प्रामुख्यानें वावरत असल्यामुळें ते कवितेंत व त्याप्रमाणें कलेंतहि प्रामुख्य पावलें. धार्मिक कलाकौशल्याच्या उदयापासून कमलाची त्याला महती आहे. कांची, भरहुत, अमरावती,

बुद्धगया तसेंच पश्चिम हिंदुस्थानांतलि बौद्धलेणीं यांवरील शिल्पांतून उमललेलें कमल गोल नक्षीकरितां योजलेलें नेहमी दिसून येतें. जिन्याच्या तळाशीं असणाऱ्या अर्धवर्तुळ दगडावर अर्धकमल कोरलेलें सिंहलद्वीपांत पहावयास मिळेल. गांधार व मथुरा शिल्पांत दैंठांसकट कमलें काढलेलीं आहेत. आसनाप्रमाणें कमलाचा उपयोग केलेला दिसतो; उदा. उदयगिरि, भरहूत व सांची या ठिकाणच्या शिल्पांत लक्ष्मी कमलासनावर दाखविली आहे. राजगृह, कान्हेरी वगैरे शिल्पांतून बुद्ध कमलावर बसलेला किंवा उभा असलेला दिसतो. बोधिसत्वांनांहि कमलासन असलेलें सारनाथच्या मंजुश्रीकडे पाहतां दिसून येईल. अवलोकितेश्वराला पद्मपाणि असें नांव असून 'ओम् मणि पद्मे हुम्' हा मंत्र त्याच्याच संबंधीं आहे. बहुतेक हिंदुदेवता कमलासनस्थ असतात; कोणी हातांत कमल धरितात.

[ संदर्भग्रंथः--मॅकडोनेल आणि कीथ-वेदिक इंडेक्स; स्मिथ-ए हिस्टरी ऑफ फाईन आर्टस इन् इंडिया अँड सीलोन; ग्रुनवेडेल--बुद्धिस्ट आर्ट इन् इंडिया; बुशेल--चायनीज आर्ट. कर्न-- बुद्धिझम इन् ट्रान्सलेशन्स; हॅवेल-आयडीयल्स ऑफ इंडियन आर्ट; गोपीनाथराव--एलेमेंट्स ऑफ हिंदु आयकोनोग्राफी; सद्धर्मपुंडरीक ( एस्. बी. ई. ). चाइल्डर्स डिक्शनरी ऑफ दि पाली लँग्वेजः संहिता, ब्राह्मण, संस्कृत-काव्य नाटकें इत्यादि ].

**कमलगड.**—पंजाब. ह्या मंडी संस्थानांतील एक प्राचीन किल्ला असून तो बिआस नदीच्या दक्षिण तीरावर वसलेला आहे. उत्तर अ. ३१ ४८' व पू. रेखांश ७६° ४३'. मंडी संस्थानच्या पूर्व इतिहासांत या किल्ल्यानें बराच महत्वाचा भाग घेतला आहे.

**कमलगडकिल्ला**—हीं टेंकडी वाईच्या पश्चिमेस १० मैलांवर असून समुद्रसपाटीहून ४५११ फूट उंच आहे.इच्या उत्तरेस वाळकी आणि दक्षिणेस कृष्णानदी वहाते. वर जाण्यास पूर्वेस आंसगांव,उत्तरेस वासोली आणि दक्षिणेस परतवाडी या ठिकाणांहून आडवळणी पायवाटा आहेत. टेकडीवरील मांथा सपाट असून त्याचें क्षेत्रफळ ३-४ एकर आहे. पूर्वीं वर जाण्यास पायथ्यापासून वर पर्यंत एक विवर होतें. विवराच्या तोंडांत एक मोठी शिळा पडून तो रस्ता आतां बुजलेला आहे टेंकडीवर एक खोल विहीर आणि गोरखनाथाचें देऊळ आहे. ही टेंकडी आसगांव खेड्यांत आहे. हिच्यावरील किल्ला कोणी बांधिला याबद्दलची माहिती उपलब्ध नाहीं. या किल्ल्यावर थोडीशी झटापट होऊन १८१८ त हा ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. [ मुं. गॅ.—सातारा. गोगटेकृत महाराष्ट्रीय किल्ल्याचें वर्णन; यांत वरील गॅझीटियर मधील लेखाचेंच निव्वळ भाषांतर आहे. ]

**कमलाकर**—मुलहेरचे उद्धव यांच्या चरित्रांत एका कमलकराचा उल्लेख आहे. त्याचा काल १६४० सुमारचा आहे. शिवकल्याणचे पणजे कमलाकर नांवाचे होते. त्यांचा काल व बालबोधकर त्र्यंबकराव योगी ( निरंजन माधव ज्यांच्या परंपरेंतील होते ते ) यांचे गुरु यांचा काल एकच. शिवकल्याणचे पणजे पयोष्णतरीं—( खानदेश ) तापी नदीच्या उत्तर भागीं होते. भक्ति वि. अध्याय ५७ यांत एका कमलाकराचा उल्लेख आहे. ते महिपतीपूर्वीचे होत. यांचे ग्रंथ-पदें. ( सं. क. का. सू.)

**कमलाकरभट्ट**—प्रसिद्ध ज्योतिषी. या ज्योतिष्याचा 'सिद्धांततत्त्वविवेक' म्हणून जो ग्रंथ काशी येथें रचला त्याच्या शेवटीं त्यानें आपणांविषयीं थोडीशी माहिती दिली आहे. तिजवरून त्याच्या पूर्वजांचें राहण्याचें गांव 'गोलग्राम' होतें असें समजतें. त्या गांवाविषयीं त्याचा लेख संस्कृतमध्यें असून त्याचा सारांश असा आहेः—

"दक्षिणेस साडेवीस अक्षांशावर गोदेच्या उत्तरेच्या बाजूस देवगिरी ( दौलताबाद ) म्हणून प्रसिद्ध किल्ला आहे. त्या देवगिरीपासून सोळा योजनांवर म्हणजे चौसष्ट कोसांवर आग्नेय दिशेस वऱ्हाड प्रांतांत पाथरी म्हणून एक राजांची नगरी आहे. तिच्या किंचित पश्चिमेस, म्हणजे अडीच योजनांवर ( म्हणजे दहा कोसांवर ) गौतमाच्या प्रार्थनेवरून प्रकट झालेली गोदा नांवाची पवित्र गंगा नदी आहे. त्या नदीच्या उत्तरतीरीं गोलग्राम म्हणून गांव आहे व दक्षिणेस पुरुषोत्तमपुरी म्हणून क्षेत्र आहे. सारांश ती गंगा गोलग्राम व पुरी यांच्यामध्यें आहे.

गोदावरीच्या उत्तरतीरावरील गोलग्राम या नांवाच्या गांवीं भरद्वाजगोत्री राम नांवाचा महाराष्ट्रीय ब्राह्मण रहात होता. सात शास्त्रांत निपुण, पवित्र, सर्वांस मान्य अशी भट्टाचार्य पदवी धारण करणारा, ज्यानें शिवपुत्राचें निरंतर आनंदानें सेवन केलें असा. दिवाकर नांवाचा त्या रामचंद्राचा पुत्र होता. ज्यानें पुण्याची केवळ रासच अशी जी काशी, तेथें वेदांतशास्त्राचा अभ्यास करून तेथेंच देहविसर्जन केलें असा कृष्णदैवज्ञ ( दैवज्ञ = ज्योतिषी = जोशी )नांवाचा त्या दिवाकराचा पुत्र होता. अत्यंत पवित्र, तीर्थयात्रा करणारा, सर्व शास्त्रें जाणणारा, उत्तम गोलज्ञांमध्यें श्रेष्ठ,व उत्तम ज्योतिषांस वंद्य असा नृसिंह नांवाचा त्या कृष्णदैवज्ञाचा पुत्र होता. सूर्यसिद्धांतभाष्य, सिद्धांतशिरोमणीवर वार्तिक नांवाची उत्तम टीका, ज्यांत अपूर्व अशा युक्त्या आहेत असा ग्रहगोलतत्त्व नांवाचा ग्रंथ, असे तीन ग्रंथ त्या नृसिंहानें आपल्या व इतरांच्या उपयोगाकरितां केले. ज्यास उत्तम ज्योतिषी ज्येष्ठ बंधु दिवाकर याजपासून त्या नृसिंहाच्या कृपालेशानेंच शास्त्राचें ज्ञान प्राप्त झालें, अशा कमलाकर नांवाच्या ज्योतिषानें उत्तम ज्योतिषांच्या संतोषार्थ नवीन युक्ति ज्यांत आहेत व ज्यांत सूर्यसिद्धांताचें तत्त्व आहे असा सिद्धांततत्त्वविवेक नांवाचा ग्रंथ केला.

या माहितीवरुन कमलाकर भट्टाचा निपणजा राम, पणजा दिवाकर, आजा कृष्ण, बाप नृसिंह, ज्येष्ठ बंधु दिवाकर होता असें समजतें. ग्रंथरचनेचा काल व स्थळ त्यानें आपल्या

ग्रंथाच्या शेवटीं दिले आहेत. भागीरथी नदीच्या उत्तर तीरीं असणाऱ्या काशीपुरींत कमलाकरभट्टानें शके १५८० व १५८१ या कालाच्या दरम्यान सर्व श्रेष्ठांस मान्य असा हा सिद्धांत रचला.

यावरून हा ग्रंथ २६६ वर्षांपूर्वी म्हणजे दिल्ली येथील शहाजहान बादशहाच्या राज्याच्या अखेरीच्या सुमारास ( शक १५८०+७८ = इ. स. १६५८ ) झाला. असें उघड दिसून येतें.

या सिद्धांततत्वविवेक ग्रंथाचे एकंदर तेरा भाग केलेले आहेत व त्या प्रत्येक भागास 'अधिकार' असें नांव दिलें आहे. पहिल्या भागांत ग्रहांच्या मध्यम गतीचा विचार आहे. दुसऱ्यांत ग्रहांच्या स्पष्ट गतीचा विचार आहे. तिसऱ्यांत दिशासाधन, स्थलांचे अक्षांशरेखांश, व कालसाधन या तीन गोष्टींचा विचार आहे. चवथ्यांत बिंबांचा विचार आहे. पांचव्यांत छायेचा विचार आहे. सहाव्यांत चंद्रकोरेच्या अग्रांच्या उंचीचा विचार आहे. सातव्यांत सूर्याजवळ आल्यामुळें पंचताराग्रह कांहीं दिवस रात्रीस दिसत नाहींत. ह्म. त्यांचें अस्त होतें व त्याच्यापासून दूर गेले म्हणजे ते दिसूं लागतात ह्म. त्यांचा उदय होतो, या गोष्टींचा विचार आहे. आठव्यांत ग्रहणसंभवाचा विचार आहे. नवव्यांत चंद्रग्रहणाचा विचार व दहाव्यात सूर्यग्रहणाचा विचार आहे. अकराव्यांत ग्रहांच्या ताऱ्यांशीं होणाऱ्या युतींचा विचार आहे. बाराव्यांत महापात म्हणजे चंद्र व सूर्य यांच्या क्रांतीचें साम्य होण्याच्या प्रसंगाचा विचार आहे. तेराव्यांत ज्योतिष विषयांवरील अनेक प्रश्नांचा संग्रह आहे. हा ग्रंथ ' बनारस सीरीज 'मध्यें प्रसिद्ध झाला आहे.

कमलाकर सर्वस्वी सूर्यसिद्धांतानुसारी होता. कमलाकराच्या वरील ग्रंथांतील तत्पूर्वी नाहींत अशा नवीन गोष्टी रा. दीक्षित यांनीं आपल्या भारतीय ज्योतिःशास्त्रांत (पा. २८७-८८) दिल्या आहेत. अपूर्व भावनोपपत्ति, जातकतिलक, ज्योत्पत्तिविचार, मनोरमा ग्रहलाघव टीका, शेषांकगणना वगैरे दुसरे यानें केलेले ग्रंथ आफ्रेक्टसूचींत नमूद केले आहेत.

याचें उपनांव भट्ट असून गोत्र विश्वामित्र होतें. हा महाराष्ट्र ब्राह्मण काशींत रहात असून याच्या आजाचें नांव नारायण व बापाचें नांव रामकृष्ण होतें असें एका पद्यावरून दिसतें. यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर 'काव्यप्रकाशटीका नांवाची टीका लिहिली आहे. या टीकेंत चंडीदास, मधुमतीकार ( रविभट्टाचार्य), सरस्वतीतीर्थ, पद्मनाथ, सोमेश्वर, परमानंद चक्रवर्ती, देवनाथ, श्रीवत्सलांछन, प्रदीपकार गोविंद ठक्कुर, इत्यादि पूर्वीच्या पुष्कळ टीकाकारांचीं नांवें येतात. अलंकारशास्त्रावरील मूलग्रंथकार; भोजराजा व अप्पय्या दीक्षित या दोघांचीं नांवें मात्र आढळतात. यानें निर्णयसिंधु, शूद्रकमलाकर, दानकमलाकर, पूर्तकमलाकर, मीमांसाकमलाकर, शांतिरत्न, प्रायश्चित्तरत्न, आन्हिक प्रयोग, षोडशसंस्कारप्रयोग, हिरण्यकेशीय ज्योतिष्टोमप्रयोग, गोत्रप्रवरदर्पण, विवाहतांडव, पूर्वमीमांसावार्तिक टीका, वेदांत कुतूहल, इत्यादि बहुत ग्रंथ केले. या ग्रंथांपैकीं निर्णयसिंधूंत त्या ग्रंथाच्या रचनेचा काल विक्रम संवत १६६८ होता असें एका पत्रांत लिहिलें आहे. ( आफ्रेक्ट हा काळ इ. स. १६१६ असा देतो ).

स्मृत्यर्थसागरांत नृसिंहानें, द्रव्यशुद्धिदीपिकेंत पुरुषोत्तमानें व ऋग्वेददेवताक्रमांत बाळकृष्णानें कमलाकर भट्टाचा उल्लेख केला आहे.

**कमा**—ब्रह्मदेश. थ्येतम्यो जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील टाऊनशिप. उत्तर अक्षांश १८° ५२' ते १९° १८' व पू. रे. ९४° ३९' ते ९५° १३', पूर्वेस इरावती नदीपर्यंत व पश्चिमेकडे आराकानयोमा पर्वतापर्यंत ही वसली असून हिचें क्षे. फ. ५०३ चौरस मैल आहे. हींत १०१ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९११) ३४१०३. इ. स. १९०३-४ सालीं जमिनीपासून उत्पन्न ५३०००रु. होतें.

**कमातापूर**—बंगाल. कुचविहार संस्थानांतील एक मोडकळीस आलेलें गांव. उ. अ. २६° २३' व पू. रे. ८९° २१'. खेन राजांपैकीं पहिला राजा नीलध्वज यानें हें गांव वसविलें असें म्हणतात. आसपास सांपडणाऱ्या अवशेषांवरून या गांवाचा विस्तार पूर्वी फार असावा असें स्पष्ट दिसतें. याचा परिघ १९ मैल होता व त्यापैकीं पांच मैल सभोंवार 'धरला' असून बाकीच्या भागाभोंवतीं तट व खंदक होता असें इ. स. १८०९ सालीं डॉ. बुकॅनन हॅमिल्टन यानें लिहून ठेवलें आहे. पंधराव्या शतकाच्या अखेरीस बंगालचा बादशहा अल्लाउद्दीन हुसेन यानें राजा नीलांबराचा पराजय केला. यावेळेपासून या शहरास उतरती कळा लागली.

**कमार**—हा संस्कृत कर्मार शब्दाचा अपभ्रंश असावा. कर्मार शब्दाचा ऋग्वेदांत उल्लेख असून तो बाण करीत असे असा उल्लेख आढळतो. ( ज्ञानकोश. वि. तिसरा प. ४६६ पहा ). कमारांत हिंदु, शीख, जैन, वन्यधर्मीय लोकहि आहेत. यांची एकंदर संख्या ( १९११ ) ३१४१०५ आहे. आसाम, बंगाल वऱ्हाड व मध्यप्रांत यांतून यांची विशेष वस्ती आहे. खुद्द बंगाल्यांत अडीच लाखांवर वस्ती आहे. तेथें त्यांनां कर्मकार असें म्हणतात. विहार, छोटानागपूर व त्याच्या आसपासचा प्रदेश यांतील कर्मार बंगाल्यांतील कर्मारांपेक्षां निराळे आहेत. यांच्यांत पोटजाता आहेत. सोनार, कासार, लोहार, यासारखे धंदे हे करितात. लोहारांपेक्षां हे आपणाला श्रेष्ठ समजतात. यांच्या हातचें पाणी ब्राह्मण घेतात.

आसामांत सुमारें २५ हजार कमार चहाच्या मळ्यांत मजूरी करितात. मध्यप्रांतातील कमारांची माहिती रसेल आणि हिरालाल यांनीं दिलेली आहे. ( कास्ट अँड ट्रांइब्स इन् सेंट्रल इंडिया ) तिचा गोषवारा असा:—रायपूर जिल्हा व त्याच्या भोंवतालच्या संस्थानांत हे द्रविड वर्गाचे लोक राहतात. यांची संख्या ७००० आहे. यांचें मुख्यस्थान बिंद्रानवागड आहे. व हे लोखंडाचें काम

करीत अशी कथा आहे. ही बहुतेक गोंड लोकांची शाखा असावी असें वाटतें. हे स्वतःविषयीं अशी कथा सांगतात कीं पूर्वी कमारलोक विंद्रानवागड येथील राजे होते. एका कमारानें दिल्लीच्या एका वस्तादाचा भिमराज पक्षी मारला. त्यावद्दल दिल्लीवाल्यानें कांहीं पैसे मागितले; पण कमारानें दिले नाहींत. म्हणून दिल्लीहून त्यानें माणूस खाणारे शिपाई आणवून एका गर्भार बाईखेरीज त्यांकडून सर्व कमार खावविले. या बाईनें एका ब्राह्मणाच्या घरीं आश्रय घेतला व बाळंत होऊन तिला मुलगा झाला. त्या मुलानें पुढें सर्व नरभक्षक शिपायांचा वध केला. यांचे वंधाजिया व माकडिया असे दोन वर्ग आहेत. कांहीं लोकांत गोत्रें आहेत पण वरेचसे गोत्रें विसरले आहेत. एकाच गोत्रांत विवाह निषिद्ध आहेत. सधन लोक मुलीचा विवाह वालपणींच करतात. पण बहुतेक प्रौढविवाहाचीच चाल आहे. पुष्कळदां वधूवरांस स्वतः निवड करूं देतात. वाग्निश्चय करतेवेळीं पंचाइतीसमोर वधुवरांस जोडीनें उभे करतात व त्यांच्यावर थोडीशी दारु शिंपडतात. लग्नस्तंभ मुलाच्या घरीं उभारतात. मुलीला मंडपांत आणण्यास जातात; तेथें रात्रभर गाणें, वजावणें व नृत्य होतें. सकाळीं मुलीला आणतात व वधूवर लग्नस्तंभास ७ प्रदक्षिणा घालतात व एकमेकांवर सातदां अक्षता फेंकतात. सर्व प्रेक्षक त्यांच्या आंगावर अक्षता फेंकतात. वधू नवऱ्याकडे ४ दिवस राहते. मग माहेरीं येऊन लग्नांतले हळदीचे कपडे धुतात. यानंतर पुन्हां सासरी जाते व राहूं लागते. वहुपत्नीत्व व विधवाविवाहाची पूर्ण मोकळीक यांच्यांत आहे. विधवाविवाह फक्त बांगड्या भरून होतो. कमारलोक कधीं काडी मोडीत नाहींत. वायको केली म्हणजे तिच्याविषयीं संशयास जागाच नसते असें हे म्हणतात, व तिनें व्यभिचार केलेला चालतो. अविवाहित मुलीनें गोंडखेरीज करून कोणत्याहि माणसावरोवर व्यभिचार केला तरी हरकत नाहीं. वहिणीचीं मुलें या लोकांत फार आवडतीं असतात, व त्यांचा व आपल्या मुलांचा लग्नसंवंध फार शुभ समजतात.

वायका रजस्वला असतां ८ दिवस अस्पर्श असून अगदीं दूर वसतात. स्वयंपाक करणें, पाणी आणणें देवीची पूजा करणें हीं कामें तिला वंद असतात. पण घराची झाडझूड करण्यास हरकत नसते. तिला कोणी शिवला तर देव त्याला मारतो असें समजतात व रजस्वला घरांत असली तर रानांत जाण्यापूर्वी पुरुष स्नान करून बाहेर निघतात. नाहीं तर वनदेवतांचा कोप होईल अशी त्यांस भीति वाटते. बाळंत झाल्यावर बाळंतीण व मुलाचा बाप ६ दिवस अस्पर्श असतो. आईचें दूध आटलें तर तिला मीठ व मासे खाऊं घालतात. प्रेताचें डोकें उत्तरेकडे करून त्यांस पुरतात व ३ दिवस अशौच मानतात. मुलगा असल्यास मुलींनां वारसा मिळत नाहीं. सर्व मुलांचा हक्क सारखाच असतो. मुलगा नसला तर अविवाहित मुलगी. तिच्या अभावीं घरांतील लग्नसंनास वायकोच्या हयातींत वारसाचा हक्क मिळतो. त्यानंतर ती संपत्ति वापाच्या घरांत येते. कोणी पुरुष वारस नसला तर विधवा वारस होते.

हे दूल्हा देवाची पूजा करतात व देवीलाहि मानतात. यांच्यांत जलप्रलयाची कथा आहे. जरी पुनर्जन्मावद्दल फारशा कल्पना नाहींत तरी चोरी करणाराला चोरी केलेल्या माणसाच्या घरीं वैलाचा जन्म प्राप्त होतो असें समजतात. चंद्र व सूर्य हे जिवंत माणसासारखेच आहेत व रात्र ही सूर्यास झोंप आल्यामुळें होते असा समज आहे. आगगाडीला जिवंत प्राणी समजतात. शिकारीस जातांना शुभशकुन पाहतात. शकुन शुभ नसला तर कोंवडा किंवा वोकड देवास बळी देतात. शिकार घरीं आणल्यावर त्याचें डोकें कापून हळदीच्या पाण्यानें धुवून वनदेवतांस अर्पण करतात. मासे मारण्याचाहि एक समारंभ असतो. गांवांतले स्त्रीपुरुष त्यांत सामील होतात. जलदेवतेस ५ कोंवडीचीं पिलें, शेंदूर, काजळ व बांगड्या अर्पण करतात. शिकारीस जाणाच्या किंवा मासे मारण्याच्या समारंभाच्या आधल्या रात्रीं स्त्रीसंग करीत नाहींत. हे लोखंडाची पूजा करतात. व तें दुर्गा देवीचें चिन्ह आहे असें म्हणतात. दसऱ्याच्या किंवा दूल्हा देवीच्या पूजेच्या दिवशीं कोणासहि घरांतून अग्नि देत नाहींत. हे लोक अत्यंत नीच लोकांस सोडून सर्वांवरोवर खातात. वंधाजिया लोक मगर, सर्प व माकडाचें मांस खात नाहींत. त्यामुळें ते उच्च समजले जातात. साधारण गुन्ह्याकरितां थोडासा वहिष्कार असतो. नीच स्त्रियेचा संग व तिच्या हातचें अन्नग्रहण हे मोठे गुन्हे समजले जातात. त्यावद्दल शिक्षाहि वरीच असते. लग्नापूर्वी व नंतरहि वायका गोंदवून घेतात व मेल्यावर प्रसंग पडल्यास हीं गोंदविलेलीं चिन्हें विकून पोट भरतां येईल अशी त्यांची समजूत असते. पुरुष फक्त कोणी घरांतलें मोठें माणूस मेलें तरच क्षौर करतात. नाहीं तर सर्व केंस वाढवितात व त्याचे वुचडे वांधतात. पण दाढी मिशीचे केंस उपटून काढतात. डोक्यावरचे केंस फार पवित्र समजतात. हे फारच आंखूड पंचा नेसतात. 'दह्याया' पद्धतीनें शेती करतात. आतां हे टोपल्या करूं लागले आहेत. यांच्या एकंदर संवयी फार घाणेरड्या आहेत. हे फारच क्वचित स्नान करतात. हे फारच ठेंगणे आहेत. हे तीरकमठयानें शिकार करतात. [ रसेल व हिरालालः से. रि. ]

**कमाल**—हा प्रख्यात साधु कवीर याचा मुलगा म्हणून समजतात. पण पुष्कळ कवीरसंप्रदायी तसें मानीत नाहींत. कमाल नदींत वहात असतांना कवीरास दिसला व तो त्यानें सांभाळिला म्हणून कमाल स्वतःला 'कवीरसुत' म्हणवितो. शिवाय सुत म्हणजे मुलगा असेंच कांहीं नाहीं. ज्ञानदेव कधीं कधीं स्वतःला 'निवृत्तिसुत' म्हणवितो. तव्हां सुत म्हणजे शिष्य असा अर्थ या ठिकाणीं घेतला पाहिजे. कवीर हा आमरण ब्रह्मचारी होता असें समजणारा एक पक्ष आहे. त्याचें म्हणणें असें आहे कीं, लोई ( जिला कवीराची वायको समजतात ) ही कवीराची एक शिष्या असून ती

अक्षय त्याच्या जवळ रहात असे. तेव्हां लौकिकांत ती त्याची बायको असा ग्रह झाला ( वि. विस्तार, पु. ३९ पा. ६०–६१ ). कमाल व कमाली यांच्या जन्माचा प्रकार विलक्षण आहे, असें बहुतेक कबीराचे चरित्रकार व अनुयायी म्हणतात. तेव्हां कमाल हा कबीरपुत्र नसावा हें म्हणणें पुष्कळ अंशीं खरें वाटतें. कमालाचीं पदें बरींच आहेत.

**कमालपुर.**—मुंबई इलाखा. काठेवाडांतील एक छोटें संस्थान. मोइक ठाण्यांतील हा एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका आहे. यांत एकच मोठें गांव आहे. तालुकदार झाला रजपूत व लिमडीचे भायाद आहेत.

**कमासिन**—संयुक्त प्रांत. बांदा जिल्ह्यांतील एक तहशील. उत्तर अक्षांश २५° १७′ ते २५° ३८′ व पूर्व रेखांश. ८०°४७′ ते ८१° १२′. क्षेत्रफळ ३५८ चौरस मैल. खेडीं १७३. लोकसंख्या (इ. स १९११ ) ८१४२१ जमीनमहसूल ( इ. स. १९०३—४ )–११८००० रुपये.

**कमुदी**—मद्रास. मदुरा जिल्हा. मुदकुलत्तूर तहशील. रामनाद जमीनदारींतील एक गांव. उत्तर अक्षांश ९° २४′ व पूर्व रेखांश. ७८° २३′. लोकसंख्या (१९११) ७९६७. येथें एक मोठें शिवाचें देवालय आहे. शानान नामक ज्ञातीनें या देवळांत आपणांस जाण्याचा हक्क आहे असा हट्ट धरिला असतां त्या गांवांतील इतर ज्ञातींचे लोक बहुतेक विरुद्ध होते. या भांडणाचा दावा कोर्टांत पुष्कळ दिवस चालला होता. शानान लोक ताडी काढणारे व व्यापारी आहेत. याच भांडणामुळें इ. स. १८९९ सालीं येथें एक दंगा झाला होता.

**कॅमेरिनो.**—इटली. हें शहर मॅकेराटा प्रांतांत आहे. याच ठिकाणीं पुरातन कॅमेरिनम शहर होतें. येथील लोक इ. स. पूर्वी ३१० मध्यें रोमचे दोस्त बनले. कॉटालाईनचा कट या शहरास फार भोंवला. याचा अंतर्गत यादवींतील युद्धांत फार उल्लेख येतो. रोमन बादशाहीमध्यें येथें म्युनिसिपालिटी होती. आतां येथें पुरातन इमारतींचा मागमूसहि उरला नाहीं.

**कमैंग.**—उत्तर ब्रह्मदेश. अपर बर्मा मिटक्यिना जिल्ह्यांतील वायव्येकडील टाऊनशिप. उत्तर अक्षांश २५° ३०′ ते २६°. पूर्व रेखांश ९६° ते ९७°. क्षेत्रफळ २६५० चौरस मैल आहे. लोकसंख्या ( इ. स. १९११ )९६६६. खेडीं १०६ व जमीनमहसूल ( इ. स. १९०३–४ ) ५००० रुपये.

**कम्मा.**—एकंदर लोकसंख्या ( १९११ ) ११२६५३१ आहे. बहुतेक लोक मद्रास इलाख्यांतच असतात. ही मूळची लष्करी जात असून सध्यां शेतकरी बनली आहे. वारंगळच्या राजाचें एका कानांतलें मूल्यवान् रत्न शत्रूच्या हातीं लागलें तें ज्या लोकांनीं युद्ध करून परत आणून दिलें त्यांस कम्मा नांव मिळालें. जे लोक युद्धांतून पळाले त्यांस वेलम (पळपुटे) नांव मिळालें. मध्यप्रांतांत कम्मांच्या तीन जाती आहेत. हे वेलानी हे घरांतून बाहेर जात नाहींत. तडकचाटू हे चंटयांच्या घरांत राहतात. पोळुमतीर हे शेतांत काम करतात. हीं नांवें यांच्यांतील बायकांच्या गोषा किंवा पडदा पद्धतीच्या प्रमाणांची दर्शक आहेत. त्रावणकोर संस्थानांत गंपा, गोदजाती, कवली व दुगा वगैरे पोटजाती आहेत. विधवाविवाह निषिद्ध मानला जातो. सगोत्र विवाह यांस संमत नाहीं; पण मातुलगोत्राबरोबर विवाह केला तर चांगला समजला जातो. मामाच्या मुलीवर तर आतेभावाचा पूर्ण हक्क असतो. आपल्या बहिणीच्या मुलीबरोबर लग्न करण्याची यांच्यांत मोकळीक आहे. तामिल देशांतील कम्मा लोकांत नवऱ्यापेक्षां बायको मोठी असते. कधीं कधीं आपल्या तान्हेल्या नवऱ्याला कडेवरून नेतांना बावीस वर्षांची तरुणी दृष्टीस पडते ! नवऱ्यासमक्ष जर बायको मेली तर तिच्या मुली, सुना, नाती तिची पूजा करतात. ही कोणी मंडळी नसली तर तिचा नवरा व त्याची दुसरी बायको असली तर ती तिची पूजा करते. दसरा व मकरसंक्रांतीला एका ब्राम्हणसुवासिनीस बोलावून अभ्यंगस्नान घालतात. केस उदवून तिची खणानारळांनीं ओटी भरतात. घरांतले सर्व लोक तिच्या पाया पडून तिचा आशीर्वाद घेतात. [ थर्स्टन; से. रि. ]

**कम्माल**—कारागिरांचा वर्ग. कूर्ग, मद्रास, कोचीन व त्रावणकोर या भागांतून कम्माल आढळतात. यांची एकंदर संख्या ( १९११ ) १०४७७५२ आहे. मल्याळम व तामिळ असे यांचे दोन वर्ग पडतात. मल्याळम कम्मालांत पुष्कळ पोटजाती असून त्यांमध्यें परस्परविवाह रूढ आहेत. त्यांच्यांतील पोटजाती येणेंप्रमाणेः—मरासारी ( सुतार ), कल्लासारी ( गवंडी ), मुसारी ( कासार ), कोल्लन ( लोहार ), तट्टान ( सोनार ) आणि टोलकोलन ( चांभार ). यांच्या कामाची जास्त जरूर असल्यामुळें आणि अकुशल कारागिरांपेक्षां त्यांस जास्त वेतन मिळत असल्यामुळें ते अजून परंपरागत धंदाच करीत आहेत. पहिल्या पांच पोटजाती सारख्याच योग्यतेच्या आहेत. त्यांच्यांत रोटीव्यवहार होतो; पण बेटीव्यवहार होत नाहीं. परंतु टोलकोलन हे थोड्या कमी योग्यतेचे समजले जातात आणि त्यांचा श्रेष्ठ वर्णांतील लोक विटाळ मानतात. याचें कारण बहुतकरून ते कातड्याचें काम करतात हें असावें; कारण कमावलें जाण्यापूर्वी कातड्याचें काम अपवित्र समजलें जातें. त्यांच्यांत बहुभर्तृत्वाची चाल होती. पुष्कळ बंधूंची एकच बायको असून तिच्यापासून झालेली प्रजा सर्वांची समजली जाई. अद्यापि जरी ही चाल पूर्णपणें नाहींशी झाली नसली तरी हल्लीं ती झपाट्यानें नाहींशी होत आहे. त्यांच्यांतील कुरुप नांवाची पोटजात यांच्या उपाध्यायाचें आणि न्हाव्याचें काम करते. नायर आदिकरून श्रेष्ठ जाती यांचा २४ फूटांच्या आंत विटाळ मानतात. तामिळ, कम्माल, मलयाळम कम्मालांपेक्षां श्रेष्ठ होत. तामिळ कम्माल लोक यज्ञोपवीत घालतात व ब्राह्मणांप्रमाणें त्यांचे गोत्रेंहि आहेत. विवाहपद्धतींत ते ब्राह्मणांचें

फार वारकाईनें अनुकरण करितात. सुतक १६ दिवस पाळतात. हे शैव आहेत. १९११ च्या खानेसुमारीचे वेळीं त्यांनीं असें जाहीर केलें कीं, आमच्यामध्यें धंद्याला अनुसरून वेगवेगळ्या जाती नाहींत. आमच्या पांच पोटजातींमध्यें बेटीव्यवहार अगदीं खुला आहे व आमचा समाजांतील दर्जा आमच्या धंद्यावर कोणत्याहि प्रकारें अवलंबून नाहीं. सबब आमच्यांत कोणताहि भेदाभेद न ठेवतां आम्हांस विश्वब्राह्मण या सदरांत घालावें.

**कय्यट**—संस्कृत ग्रंथकार. चंद्रादित्याचा मुलगा आणि वल्लभदेवाचा नातू. यानें आनंदवर्धनाच्या देवीशतकावर टीका लिहिली ( इ. स. ९७७ ). [ मावेल डफ. आफ्रेट कोश ].

**कर, कर म्हणजे काय?**—" कर म्हणजे खासगी व्यक्तींनीं किंवा संस्थांनीं सरकारमार्फत होणाऱ्या लोकोपयोगी कामाबद्दल मोबदला म्हणून सरकाराला द्यावयाचें आवश्यक देणें." सरकार किंवा राजेलोक स्वतः धनोत्पादनासाठीं खासगी धंदा आज करीत नाहींत. त्यांची सर्व जमा प्रजेनें कराच्या रूपानें दिलेला पैसा ही होय. अर्थशास्त्राच्या व्याख्येप्रमाणें कर म्हणजे सरकारच्या श्रमाचा मोबदला किंवा मजुरी. परंतु अमक्या कामाबद्दल अमकी मजुरी असा कार्यकारणसंबंध दाखवून करवसुली सरकार करीत नाहीं. त्यामुळें करवसुली म्हणजे नाहक जुलुम असा प्रजेचा वराचसा समज होतो. अनियंत्रित राजसत्ताकपद्धतींत हा समज पुष्कळ अंशीं खराहि असतो. कारण राजेलोक कररूपानें मिळणारा पैसा खासगी मालकीचा म्हणून मानून स्वतःच्या खासगी खर्चाकडेच बहुतेक लावतात. याशिवाय नजराणे, देणग्या वगैरेहि उपटतात. कांहीं कारभारांत व न्यायांत विशेष व्यक्तींस पसंती देऊन पैसेहि काढतात. तथापि शत्रूपासून देशाचें व प्रजेचें संरक्षण करणें, देशांत दंगेधोपे न होऊं देतां शांतता राखणें, प्रजेच्या जीविताच्या व वित्ताच्या संरक्षणाकरितां कायदे करून त्यांची अम्मलबजावणी करणें, प्रजेच्या शिक्षणाकरितां व सार्वजनिक आरोग्याकरितां खर्च करणें हीं सरकारचीं कामें असून तीं करण्याबद्दल मोबदला म्हणून प्रजेनें कर द्यावयाचा असतो; आणि ज्या राज्यकारभारपद्धतींत सरकारवर प्रजेचा ताबा चालतो तेथें सरकारकडून सदरहू कामें बरीचशीं योग्य रीतीनें बजावलीहि जातात.

**करपद्धतीचा इतिहास, धर्मनियमः**—प्रजेच्या खासगी उत्पन्नांतून कराच्या रूपानें विविक्षित वाटा घेण्याचा राजाला हक्क आहे, ही भावना हिंदुस्थानांत पूर्वापार चालत आलेली आहे. पण हा कर बेताचा, प्रजेला डोईजड न होईल असा असावा. प्राचीन स्मृतिकारांनीं राजानें उत्पन्नाचा $\frac{1}{6}$ भाग कर म्हणून घ्यावा असा नियम दिला आहे. मनु म्हणतो, " योग्य विचार करून राजानें स्वतःला व प्रजेला फायदेशीर होईल इतक्या बेतानें कर घ्यावे. ज्याप्रमाणें वासरू, किंवा मधमाशी आपले घांस थोडे थोडे घेते त्याप्रमाणें राजानें दरसाल बेताबेतानें करवसुली करावी. अधाशीपणानें मुळासकट प्रजेला पिळून काढूं नये; तसें केल्यास राजा व प्रजा या दोघांवरहि अनर्थ ओढवतो."

प्राचीन कालामध्यें कर निरनिराळ्या वर्गांतील लोकांपासून निरनिराळ्या प्रमाणांत व प्रत्यक्ष ऐनजिनशी किंवा चाकरीच्या रूपानें घेत असत. महाभारतांत जमीनबाबीखेरीज उत्पन्नाच्या पुढील बाबी दिल्या आहेतः— " आकरे लवणे शुल्के तरे, नागवले तथा " म्हणजे, खाणी, मीठ, व्यापारी माल, नांवातून जाण्याचा कर, हत्तींचे कळप यांचें उत्पन्न राजाचें असे. राजानें कर वसवूं नये अशा बाबीः—

अटवी पर्वताश्चैव नद्यस्तीर्थानि यानिच ।
सर्वाण्यस्वामिकान्याहुर्नास्ति तत्र परिग्रहः ॥

म्हणजे, अरण्य, नद्या, पर्वत व तीर्थें यांवर कोणाचेंहि स्वामित्व नाहीं; त्यांवर कर राजानें घेऊं नये. यावरून पूर्वी जंगलांतील लांकूड फांटा, दगडमाती, चारागवत सर्व रयतेला फुकट मिळत असे असें दिसतें. गुरांच्या वाढीपैकी $\frac{1}{50}$ भाग घ्यावा व पिकाचा $\frac{1}{8}$, $\frac{1}{6}$ भाग किंवा $\frac{1}{12}$ घ्यावा असें मनूचें वचन आहे. लागवड, जमीन व जंगल या कराच्या मुख्य बाबी पुरातन आहेत. कौटिल्यानें मात्र जकातीच्या व करांच्या बाबींची मोठी यादी दिलेली आहे. परदेशीं जाणारा ( निष्क्रम्य ) व परदेशांतून येणारा ( प्रवेश्य ) सर्व प्रकारचा माल, स्वदेशांत होऊन विकणारा भाजीपाला ( शाक ), कंदमूल, फुलेंफळें, धान्यें, लांकूड, वांबू, लोंकर, कापूस, रेशीम, हिरे, मोती वगैरे मौल्यवान वस्तू, जनावरें यांवर जकात घ्यावी. परंतु लग्नमुंज वगैरे संस्कार व धार्मिक विधी यांवर कर नसावा असें कौटिल्याचें 'अर्थशास्त्र' म्हणतें.

**दक्षिण हिंदुस्थानची पुरातन जमाबंदी.**—अकरा व तेरा या शतकांत सध्यांच्या मद्रास इलाख्यांतील बऱ्याच मोठ्या प्रदेशांत चोलराजे राज्य करीत. ते आपल्या प्रजेपासून सर्व उत्पन्नाचा $\frac{1}{3}$ ते $\frac{1}{5}$ भाग सरकारचा भाग म्हणून घेत. हा भाग सध्यां ब्रिटिशसरकार सर्व उत्पन्नाचा $\frac{1}{3}$ अथवा शेंकडा ६ हून कमी घेतें या प्रमाणापेक्षां चार ते सातपट जास्त आहे. चोलांनीं घेतलेला भाग ब्रिटिशांनीं घेतलेल्या भागापेक्षां बराच मोठा होईल. कारण सध्यांपेक्षां त्यावेळीं पैशाची किंमत ( खरेदी ) जास्त होती. प्रत्येक उद्योगधंद्यावर बसणारे व ज्यामुळें व्यापारास अडथळा होत असे असे कित्येक लहान कर या त्यांच्या उत्पन्नाच्या बाबी होत्या. त्यांच्यापैकीं एका राजानें इ. स. १०६३–१०७० राज्य केलें. यानें सरकारी भागाच्या कांहीं विभागांची रोख किंमत ठरविली, दुसऱ्या एकानें सर्व जुलमी कर बंद करून जमिनीची फिरून पाहणी केली; पहिली पाहणी निदान एका शतकापूर्वी इ. स. १०८६ च्या सुमारास झाली होती. व झालेलें नुकसान जमीनधाऱ्याची दुरुस्ती करून भरून काढलें. तात्पुरत्या म्हणजे कायमच्या नव्हे अशा जमीनधारा पद्धतीचें तत्व पूर्वीच्या चोल राजांनीं योजिलें होतें, व ज्यांनीं

या सुधारणा घडवून आणल्या त्या राजांची झालेली स्तुति हिचा विचार करतां जुलमी कराऐवजीं जमीनधारा थोडा वाढला तरी लोकांनां पसंत असे असें दिसतें. वसुली व सूट या बाबतींत चोल राजे ब्रिटिश लोकांपेक्षां कडक होते असें दिसतें. कारण दैवी कारणांमुळें जेव्हां पिकाची सरसकट नासाडी होई तेव्हां देखील ते सूट देत नसत असें एक लेखक म्हणतो ( इंडियन ॲन्टिक्वरी पु. ४० ).

चोलांचा लय झाल्यावर विजयानगरचे राजे झाले. चौदाव्या शतकाच्या मध्यापासून १५६५ पर्यंत दक्षिणहिंदुस्थान व म्हैसूर यांमध्यें त्यांची सत्ता अबाधित होती. यांचा पहिला मुख्य प्रधान माधव यानें सर्व उत्पन्नाचा ⅙ भाग जमीनमहसूल ठरविला. हा नगद द्यावा लागे व यांत गांवकरी, कामगार वगैरेंच्या खर्चाचा समावेश होत नसे. हा शेतकऱ्यांनां निराळा द्यावा लागत असे. यानंतरच्या राजांनीं हा मोडून जवळ जवळ अर्धा भाग जमीनमहसूल ठरविला.

विजयानगरच्या राज्याचा तालिकोटच्या लढाईत मोड झाल्यावर त्याच्या पूर्वीचे सुभेदार स्वतंत्र बनले. मदुरेचे नायक यांपैकीं होते; हे सध्यांच्या मदुरा, तिनेवेल्ली, त्रिचनापल्ली व सालेमचा कांहीं भाग या जिल्ह्यांवर राज्य करीत असत. जमिनीच्या एकंदर उत्पन्नाचा अर्धा भाग हे लोक घेत. प्रत्येक धंद्यावरील जबर कर, जमीनीवरील पटट्या, मासे, नांगर यांवरील कर, या इतर नायक लोकांच्या उत्पन्नाच्या बाबी होत्या. शिवाय ते मोफत काम मजुरांजवळून घेत असत. मराठे लोकांच्या ताब्यांतील तंजावरची स्थिति चांगली नव्हती. व्यंकोजी उत्पन्नाचा चारपंचमांश भाग घेत असे व स्वतः ठरविलेल्या दराप्रमाणें याची नगद किंमत घेत असे. येणेंप्रमाणें एकंदर उत्पन्नाचा शेंकडा ८०वा भाग तो घेत असे व हे देतांना सबंध पिकाची विक्री पुरत नसे अशीं विधानें केलीं गेलीं आहेत, पण त्यांवर विश्वास बसत नाहीं.

दक्षिणेंत नायक लोकांची सत्ता ऱ्हास पावल्यावर मोंगल व मराठे यांच्या स्वाऱ्या शेतकऱ्यांना १७ व १८ व्या शतकांत लुटत असत.

अर्काटच्या नवाबाची सत्ता व्यवस्थित राज्यव्यवस्था स्थापीत होती, परंतु त्यांच्या वारसासंबंधीं तंटे उपस्थित झाले. परंतु १७६३ मध्यें महंमद अल्ली नबाब ठरला व यामुळें दक्षिणेंत व्यवस्था व सुरक्षितता स्थापित झाली. परंतु याचा कारभार जुलमी मक्तेवाले यांच्या मार्फत चालल्यामुळें फार अन्याय होत असे. व्यवहारांत जमीनमहसूल उत्पन्नाचा अर्धा भाग होता. परंतु हे मक्तेवाले बाकीचा अर्धा भाग उरू देत नसत. हे मक्तेवाले शेतकऱ्यांनां तुरुंगांत टाकणें व इतर शिक्षा वगैरे जुलूम करीत असत.

**मराठी अंमल.**— मराठेशाहींतील करपद्धतीसंबंधानें मल्हार रामरावकृत ' राजनीति ग्रंथांत पुढील मजकूर आहे. "वणिक वर्गापासून क्रयविक्रय कसा झाला, त्यांच्या योगक्षेमास काय पाहिजे, याचा विचार करून तदनुरूप करभार त्यांजपासून घ्यावा. याप्रमाणें आयव्यय पाहून शिल्पकारादिक म्हणजे कारागीर लोक यांपासून [ घ्यावा ]. " यावरून सर्व प्रकारच्या व्यापारी मालावर व स्थानिक तयार होणाऱ्या कारागिरीच्या जिनसावर कर असत. भोरसंस्थानांत नुकत्याच चालू असलेल्या ज्या करांबद्दल टीकेचा भडिमार झाला होता ते कर मलिकंबरी अमलापासून चालत आलेले आहेत असें म्हणतात. तेव्हां मराठी अमलाखालीं या सर्व करांच्या बाबी अस्तित्वांत असाव्या असें वाटतें.

मराठयांच्या अमदानींत जमिनीवरील साऱ्याशिवाय अनेक प्रकारचे कर बसवीत असत. त्यांपैकीं मुख्य म्हणजे घरपट्टी व दुकानपट्टी ( मोहतर्फा ) हे असत. कोंकणामध्यें येणाऱ्या तंबाखूवर रेवदंडा व इतर बंदरांत जकात घेत असत. मिठागरावर नागोठाणें व भायंदर या ठिकाणीं अनुक्रमें दोन रुपये दहा आणे, व एक रुपया सहा आणे, दर खंडीमागें कर असे. नारळाच्या झाडांवर व ताडांवर माडी अथवा ताडी काढण्याबद्दल वसई व इतर प्रांतांत कर असत. भंडारी वगैरे जातींचा, फिरंगी वगैरे लोकांस दारू विकून आपला निर्वाह चालत असे म्हणून कर देऊन दारू काढण्याची परवानगी दिली ( अबकारी पहा ). अबकारीचें उत्पन्न कोंकण व खुद्द पुणें शहर या खेरीज इतर भागांत होत नसे. याखेरीज तूप तयार करणें, गुरें चारणें, लग्नपट्टी, म्हैसपट्टी, मच्छीमारी, कर्जपट्टी, सरंजामपट्टी, वेतनपट्टी, सावकारपट्टी, उंबरेपट्टी, भाडेंपट्टी, संतोषपट्टी, हवशीपट्टी, शिबंदीवरपट्टी, वगैरे किरकोळ कर असत. उतारावरील तरी बहुतकरून सरकारी खर्चानें चालवीत असत व तींवर कर नसत. तथापि ज्याठिकाणीं रहदारी फार असे तेथें नावेवरील कराचा मक्ता देत असत. तथापि ही पद्धत बरीच उशिरा सुरू झाली. जोंपर्यंत कमाविशीपद्धत सुरू होती तोंपर्यंत लोकांस जकातवसुलीचा फारसा त्रास होत नसे. व या कामावर सुभा व सरसुभा यांची नजर असे. असे सुभे कोंकण, कर्नाटक, खानदेश, गुजराथ आणि बागलाण या मिळून पांच असत. परंतु पुढें दुसऱ्या बाजीरावानें इजारदार पद्धत सुरू केल्यामुळें लोकांस पुष्कळ त्रास होऊं लागला. समुद्रावरील व्यापारावर जकात वसूल करण्यास निराळें खातें नसे. पण ही जकात सुभ्याच्या आरमाराकडे लावून दिलेली असे. जमिनीवरील मालाच्या वाहतुकीवर मात्र जकात वसूल करणारे स्वतंत्र सुभे असत. यांपैकीं कल्याण व भिवंडी आणि पुणें व जुन्नर यांचें उत्पन्न बरेंच असे. बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दींत कल्याण आणि भिवंडी या सुभ्यांचें उत्पन्न पंचावन हजार रुपये होतें तें त्याच शतकाच्या अखेरीस तीन लाख रुपये झालें व पुण्याच्या सुभ्याचें उत्पन्न त्याच काळांत पस्तीसहजार रुपयांपासून एक लाख रुपयांपर्यंत वाढलें. पुण्यांतील स्थानिक करांचा मक्ता देत असत व त्यापासूनहि बरेंच उत्पन्न येत असे. हे विशेषतः पुणें शहरांत येणाऱ्या व जाणाऱ्या मालांवर कापड, तंबाखू,

व शहरांतील लोकांस लागणाऱ्या इतर जिनसावर वसूल होत असे. अशाच तऱ्हेचे कर अहमदाबादेस पूर्वी मोंगलांनीं घालून दिलेल्या पद्धतीवरच वसूल केले जात असत. निरनिराळ्या प्रकारचे धंदे करणाऱ्यांवर स्वतंत्र कर असत. डोली वाहणाऱ्या कोळ्यांस दोन पासून आठ रुपयापर्यंत कर असे. दुकानदारावर दर दुकानास सालीना पांच, सहा व सात प्रमाणें कर असे. लोहारास सालीना चार रुपये; चांभारास चार, पांच व सहा रुपये, तेल्यास घाण्यापाठीमागें पांच, सहा व सात रुपये; सोनार, कुंभार, वुरूड, गोंधळी, ठाकरीकार यांस सालीना तीन रुपये प्रमाणें कर असे. खाडींत गलबतें नांगरल्यास चार पासून आठ आण्यापर्यंत सुटवा असे. लग्नपट्टी दहा आण्यापासून एक रुपयापर्यंत असे. गवंडी, पाथरवट वगैरे लोकांकडून महिन्यांतून एक दिवसाची मजुरी घेत असत. जकातीखेरीज पानसुपारीचाहि शिरस्ता आहे. मुसुलमानांना हिंदूंच्या निम्मे हांसील असे. व आर्मीनियन वलंदेज, फराशी, वगैरेस हिंदु व मुसुलमान यांच्या दरम्यान असे. तमाखू विकण्याचा शिरस्ता असे. ती फक्त सावकार व उदमी लोकास विकीत, एकंदर रयतेसहि विकीत नसत. ज्या गांवी दुकान नसेल त्या रयतेस मात्र तंवाखू मण दोन मण पावेतों विकीत. तंवाखूची वाणगी व जकात घेत व जकातीचे होताकडे वसूल होत असे. वतन घरें यांच्या विक्रीची नोंद करून त्यावर सरकारची शेरणी अथवा नजर वसूल करीत.

मुसुलमानी अमदानी.—मुसुलमानी अमलाच्या वेळीं रयत जमीनमहसूल देण्यासहि नाखूष असे. कारण एक तर हे राजे प्रजेच्या हितांचीं कामें फार क्वचित् करीत असत, व परशत्रूपासून रक्षण करण्याचें कामहि त्यांच्या हातून नीट होत नसे. शिवाय राजधराणीं वारंवार बदलत; आणि तख्तनशीन राजा मरण पावतांच वारसामध्यें गादीसंबंधानें तंटे लागत. त्यामुळें कर नक्की कोणत्या राजास द्यावयाचा हें निश्चित नसल्यानें व एकाच वर्षांत अनेकदा राज्यक्रांति झाल्यास कर अनेकदां द्यावा लागेल अशी भीति त्यांनां वाटे. सरकाकडूनहि साऱ्याची बाकी ठेवण्यास परवानगी मिळे, बाकीबद्दल लगेच जमीन जप्त करण्यांत येत नसे. या काळांत जमीनधाऱ्याशिवाय इतर अनेक कर असत, त्या बाबी येणें प्रमाणें:—( १ ) कित्येक धंदे करण्याबाबत परवानगी, ( २ ) हिंदूवर जिझियासारखे वसविलेले विशिष्ट कर, ( ३ ) मासे, तेल, तूप, गोवऱ्या, दूध, दहीं, रानांतील गवत, जळाऊ लांकूड, तमाखू, अफू, मातीचीं भांडीं, भाड्याच्या गाड्या, उंट इत्यादि मालावरील कर. अशा प्रकारें अनेक कर असत.

ब्रिटिश करपद्धतीचीं सामान्य तत्वें.—ब्रिटिश अंमल सुरू झाल्यावर पाश्चात्य पद्धतीवर करव्यवस्था हळूहळू सुरू करण्यांत आली. यूरोपांत प्रचलित असलेलीं अडाम स्मिथचीं कराचीं तत्वें येथेंहि मान्य झालेलीं आहेत. तीं तत्वें येणेंप्रमाणें:—

( १ ) कराची समताः— प्रत्येक देशांतील प्रजाजनांनीं आपल्या सरकारच्या योगक्षेमाकरितां होतां होईल तों ऐपतीप्रमाणें कर दिला पाहिजे; अर्थात् सरकारच्या सुरक्षित छत्राखालीं आपल्याला ज्या उत्पन्नाचा उपभोग घेण्यास सांपडतो त्या उत्पन्नाच्या मानानें प्रत्येकानें कर दिला पाहिजे.

( २ ) कराची निश्चितताः— कर भरण्याची वेळ, कर भरण्याची तऱ्हा व कराची रक्कम, या सर्व गोष्टी कर भरणारास व दुसऱ्या प्रत्येक माणसास स्पष्टपणें व मुक्रपणें ठाऊक पाहिजेत.

( ३ ) कराचा सोईस्करपणा— कर भरण्यास सोईचें होईल अशा वेळीं व अशा रीतीनें कराची वसुली करावी.

( ४ ) कराची काटकसरः— प्रत्येक कराची अशी योजना पाहिजे कीं, त्यापासून लोकांच्या खिशांतून बाहेर जाणारी रक्कम व सरकारच्या तिजोरींत येणारी रक्कम यांमध्यें होतां होईल तितकें कमी अंतर असावें; म्हणजे कर वसूल करण्याचा खर्च शक्य तितका कमी लागावा व सरकारच्या तिजोरींत कराची बहुतेक रक्कम पडावी.

वरील चार तत्वें आतां सर्वमान्य झालेलीं असून समजण्यासहि सोपी आहेत. फक्त पहिल्या तत्वापैकीं ' ऐपतीप्रमाणें ' या शब्दासंबंधानें मतभेद आहे. कर कोणत्या प्रमाणांत घ्यावा यासंबंधानें तीन मीमांसा आहेत.

(१)कराची त्यागमीमांसाः—प्रत्येक मनुष्य सरकारला कर देतो त्यांत कांहीं आत्मत्याग करीत असतो; तेव्हां हा त्याग सर्वांचा सारखा असला पाहिजे, म्हणजे करांत समता आली असें म्हणतां येईल. श्रीमंत माणसानें कांहीं एक रक्कम सरकारला देण्यामध्यें त्याचा जितका आत्मत्याग होतो त्यापेक्षां किती तरी पटीनें जास्त त्याग गरीव मनुष्यास तितकीच रक्कम द्यावी लागल्यास करावा लागतो. म्हणून कर हा उत्पन्नाच्या मानानें वाढता पाहिजे. इतकेंच नाहीं तर मनुष्याच्या आवश्यकांनां लागणारें उत्पन्न कराच्या मर्यादेंतून काढून टाकलें पाहिजे. याच मुद्यावर बहुतेक सर्व ठिकाणीं प्राप्तीवरील कर वसविण्याची मर्यादा असते. म्हणजे त्या मर्यादेखालील प्राप्तीवर कर ठेवीत नाहींत. तसेंच हा प्राप्तीचा कर वाढता असतो. म्हणजे कांहीं एका विशिष्ट प्राप्तीच्या वरच्या प्राप्तीवर कराचा दर जास्त ठेवलेला असतो. याच मुद्यावर सुधारलेल्या देशांत आयुष्यांतील आवश्यकांवर कर वसविणें गैर मानतात. कारण आयुष्याचीं आवश्यकें हीं गरीबांनां व श्रीमंतांनां सारखींच लागतात. परंतु यामुळें गरीब व श्रीमंत हे कर सारखाच देतात. अर्थात अशा कराच्या पद्धतींत गरीबश्रीमंतांचा आत्मत्याग सारखा रहात नाहीं. परंतु कोणत्या करानें कोणत्या व्यक्तीचा किती

आत्मत्याग होतो हें समजणें फार कठिण आहे. कारण आत्मत्याग ही मानसिक गोष्ट आहे. यामुळें जरी या मीमांसेमध्यें तथ्यांश असला तरी तिचा पूर्णावलंब शक्य नसतो.

(२) कराची सामर्थ्यमीमांसाः—यामध्यें मनुष्याच्या उत्पन्नावरून त्याची ऐपत ठरविली जाते. अॅडाम स्मिथनें समतातत्वाचा हाच स्वाभाविक अर्थ घेतला आहे. या तत्वानुरूपहि प्राप्तीवरील कराच्या मर्यादा त्यागमीमांसेप्रमाणेंच ठरतात. ज्याचें उत्पन्न जास्त त्याची कर देण्याची ऐपत जास्त हें उघड आहे. म्हणून प्राप्तीवरील कर वाढता पाहिजे व कांहीं प्राप्ती करापासून मुक्त पाहिजे, असें या मीमांसेवरून ठरतें. त्यागमीमांसा व सामार्थ्यमीमांसा या परस्पर संलग्न आहेत. पहिली मनुष्याच्या अन्तःस्थितीकडे म्हणजे मनाकडे पहाते व दुसरी त्याच्या बहिःस्थितीकडे अगर उत्पन्नाकडे पहाते. पहिली कर भरण्यापासून मनुष्याला किती त्रास,किती स्वार्थत्याग व किती घस सोसावी लागते या मानसिक गोष्टीकडे पहाते तर दुसरी मनुष्याजवळ कर भरण्यास किती पैसा किंवा किती उत्पन्न आहे याकडे पहाते. दोन्ही मीमांसांमध्यें सत्याचा अंश आहे. तरी पण सामर्थ्य–मीमांसा ही जास्त व्यवहार्य आहे. कारण मनुष्याचा आत्मत्याग शोधून काढण्यापेक्षां मनुष्याचें वार्षिक उत्पन्न किती आहे हें शोधून काढणें सोपें आहे. तरी ही मीमांसा सर्वतोपरी लागू केल्यानें पूर्ण समता साधेल असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ दोन माणसांचें उत्पन्न अगदीं सारखें असेल, परंतु एक जर ब्रह्मचारी असला व दुसरा कुटुंबवत्सल असला तर कर देण्याचें दोघांचें सामर्थ्य सारखें नाहीं हें उघड होतें.

(३)कराची लाभमीमांसाः—सामान्यतः सरकारचा मनुष्याला जितका जितका फायदा होतो त्या त्या मानानें त्यानें सरकारला कर दिला पाहिजे असें या मीमांसेचें म्हणणें आहे. या दृष्टीनें ज्याअर्थी श्रीमंतापेक्षां गरीबाला सरकारचा जास्त फायदा होतो त्याअर्थी त्यानें श्रीमंतापेक्षां जास्त कर दिला पाहिजे असें होतें. परंतु कांहीं लोक या तत्वापासून उलटच अनुमान काढतात. त्यांचें म्हणणें असें कीं, खरोखरी श्रीमंताला सरकारचा उपयोग जास्त होतो. कारण त्याची मालमत्ता मोठी असते. शिवाय त्यांचें जीवितहि जास्त महत्वाचें असतें. व या दोहोंची सुरक्षितता जर सरकार घडवून आणतें तर श्रीमंतांनाच सरकारपासून जास्त लाभ होतो. म्हणून श्रीमंतांनीं गरीबांपेक्षां जास्त कर दिला पाहिजे. वर सरकारच्या कर्तव्य कर्मांचा विचार करतांना या प्रजेच्या लाभाचेंच तत्व वर्गीकरणास घेतलें होतें. यावरून या तत्वांतहि तथ्यांश आहे असें म्हणणें प्राप्त आहे. याच मुद्दयावर सरकार आपल्या कांहीं कर्तव्यकर्मांबद्दल फी घेतें. कारण या कर्तव्यकर्मांचा प्रत्यक्ष कांहीं लाभ विशिष्ट व्यक्तींनांच होतो. ज्या कर्तव्यकर्मांचा लाभ सर्वसाधारण प्रजाजनांस होतो त्यासंबंधींच्या खर्चाकरितां सरसहा कर सरकार घेतें. परंतु प्रत्येक मनुष्याला सरकारच्या कर्तव्यकर्मापासून किती लाभ होतो हें शोजणें हें प्रत्येक करांत मनुष्याचा स्वार्थत्याग किती होतो हें मोजण्याइतकें अवघड आहे. व यामुळें ही मीमांसा सर्वस्वी व्यवहार्य नाहीं.

याप्रमाणें समतेच्या कसोटीसंबंधानें वरील तीन मीमांसा प्रतिपादन करण्यांत आलेल्या आहेत. यांपैकीं अमुकच सर्वस्वी खरी असें म्हणणें रास्त होणार नाहीं. प्रत्येकीमध्यें थोडाफार सत्याचा अंश आहे. व्यवहार्यतेच्या दृष्टीनें कराची सामर्थ्य--मीमांसा हीच सर्वांत चांगली आहे यांत शंका नाहीं. कारण सामर्थ्याची कसोटी पुष्कळ अंशानें दृश्य व सहज लागू करतां येण्यासारखी आहे व यामुळें सुधारलेल्या देशांत या तत्वाचा अवलंब थोड्याफार अंशानें केला जातो.

वरील कराचीं चार तत्वें हीं अॅडाम स्मिथचीं कराचीं तत्वें या नांवानें प्रसिद्ध आहेत. पुढील अर्थशास्त्रकारांनीं आणखी कांहीं किरकोळ तत्वें सांगितलीं आहेत. त्यांचाहि संग्रह येथें करणें वाजवी आहे. यांपैकीं कांहीं तत्वें हीं वरच्या तत्वांपासून निष्पन्न होतात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सरकाराला लागणाऱ्या एकंदर उत्पन्नाची रक्कम भाराभर अनुत्पादक बारीकसारीक करांपासून काढण्यापेक्षां थोड्याशा उत्पादक मोठ्या करापासून काढणें चांगलें हें तत्व काटकसरीच्या तत्वाचेंच पर्यायभूत तत्व आहे. कारण या योगानें करवसुलीचा खर्च पुष्कळच कमी होतो. १८४६ सालापूर्वी इंग्लंडांतील आयात जकाती किती तरी भानगडीच्या व किती तरी पदार्थांवर होत्या. परंतु कराच्या व जकातीच्या पद्धतींतील हा गोंधळ, घोंटाळा व विविधता सर रावर्ट पील व ग्लॅड्स्टन या दोन मुत्सद्द्यांनीं काढून टाकली व इंग्लंडच्या कराच्या पद्धतीस सोपें व साधें स्वरूप आणलें.

तसेंच देशांतील कराची पद्धति अशी असावी कीं, वेळप्रसंग आल्यास फार खर्च न वाढवितां कराचें उत्पन्न वाढवितां यावें. प्राप्तीवरील कर अशा तऱ्हेचा असतो. तो दर पौंडाला अमुक पेन्स या दरानें ठरविलेला असतो. आतां वेळप्रसंगीं हा दर वाढविला म्हणजे झालें. हिंदुस्थानांतील मिठावरील कर अशा तऱ्हेचाच आहे. अधिक खर्च न वाढवितां या कराचें उत्पन्न लेखणीच्या फटकाऱ्यासरसें वाढवितां येतें.

शेवटीं कराची एकंदर पद्धति अशी असावी कीं सरकारच्या वाढत्या गरजांबरहुकूम कराचें उत्पन्न आपोआप वाढतें असावें. अप्रत्यक्ष करामध्यें हा गुण असतो. लोकांच्या भरभराटीबरोबर या कराचें उत्पन्न आपोआप वाढत जातें व अन्तर्जकातींची वाढ हें एक देशाच्या भरभराटीचें चिन्ह समजलें जातें.

आतां निरनिराळ्या प्रकारच्या करांचा लोकांवर बोजा कशा रीतीनें पडतो हें पहावयाचें.

**प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर.**—वर करांच्या प्रसिद्ध तत्वांचा विचार झाला. एखाद्या देशांतील प्रजाजनांवर

कराचा बोजा त्यांच्या ऐपतीप्रमाणें पडावा हे समतातत्वाचें रहस्य आहे आतां ही समता कोणत्या गुणांत समजावयाची याबद्दल वाद असेल. परंतु कराचा बोजा अगर संपात देशांतील एका वर्गावर अत्यंत तर एका वर्गावर कमी अगर मुळींच नाहीं, असा नसावा हें उघडच आहे. कारण संपात अशा तऱ्हेचा असला तर तो अगदीं अन्यायाचा होईल; तो समतेच्या तत्वाविरुद्ध होईल–मग त्या समतातत्वाचा अर्थ कांहींहि करा–हेंहि उघड आहे. फ्रान्सच्या प्रसिद्ध राज्यक्रांतीपूर्वी तेथील कराच्या पद्धतींत ह्याच मोठा दोष होता. कराचा बहुतेक सर्व भार शेतकरीवर्गावर पडे. हा वर्ग आधींच गरीब होता व त्याच्यावरच कराचा संपात विशेष होता व सरकारी अंमलदार, सरदार लोक, वडे वडे धर्मोपदेशक वगैरे श्रीमंत वर्ग करापासून बहुतेक मुक्त होते. ही अन्यायाची कराची पद्धति व त्यानें उत्पन्न झालेला असंतोष हें एक फ्रान्समधील राज्यक्रांतीचें महत्वाचें कारण होतें असें इतिहासकार सांगतात, यावरून या कराची संपातमीमांसा किती महत्वाची होती हें दिसून येईल. परंतु ही मीमांसा जितकी महत्वाची आहे तितकीच ती कठिण, भानगडीची व घोंटाळ्याची व म्हणून दुर्ज्ञेय आहे. कारण या मीमांसेमध्यें प्रत्येक कर शेवटीं समाजांतील कोणत्या व्यक्तीवर किंवा व्यक्तिसमूहावर पडतो हें पहावयाचें आहे. परंतु समाजांतील व्यवहार व त्याचे परस्परांवर होणारे परिणाम इतके विविध असतात कीं, एका कराचा परिणाम काय होतो व शेवटीं तो कोण भरतो हें सांगणें कठिण होतें. " एका पाण्याच्या थेंबांचा प्रवास " या गोष्टीप्रमाणेंच " कराच्या एका रुपयाचा प्रवास " याचीहि गोष्ट मजेदार होईल. परंतु ठोकळ तऱ्हेनें तरी कराचा हा संपात शोधून काढणें आवश्यक आहे. कारण या योगानेंच कराचीं तत्वें पाळलीं जात आहेत किंवा नाहींत हें समजून येणार आहे.

परंतु येथें अशी एक शंका निघण्याचा संभव आहे कीं, कराच्या संपाताची मीमांसा मुळींच कठिण नाहीं. कारण ज्या करांचे वर्गीकरणच मुळीं या तत्वावर केलेलें आहे त्या अर्थी कर कोणत्या वर्गांतील आहे हें ठरविलें कीं काम झालें. कारण ज्या करांमध्यें कर देणारा व कर सोसणारा या व्यक्ती एकच असतात तो प्रत्यक्ष कर होय, अशी मागें प्रत्यक्ष कराची व्याख्या केली आहे. तेव्हां प्रत्यक्ष करामध्यें कर देणारावरच कराचा संपात आहे. अर्थात प्रत्यक्ष कराचा बोजा कर देणारावरच पडतो हें उघड झालें. याच विचारसरणीप्रमाणें अप्रत्यक्ष कराचा संपात कर देणारावर न पडणां दुसऱ्या व्यक्तीवर पडतो हेंहि उघड होतें. सकृद्दर्शनीं हा कोटिक्रम खरा वाटतो परंतु तो बरोबर नाहीं. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर हें वर्गीकरण कराच्या संपाताच्या तत्वाला अनुसरून केलेलें आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु या कराच्या वर्गीकरणामध्यें सरकारचा हेतु विशेष तऱ्हेनें दिसून येतो. मात्र वस्तुस्थिति तशीच बनते असें मात्र नाहीं. प्रत्यक्ष कराचा बोजा कर देणारावर पडावा अशी सरकारची इच्छा असते व याच हेतूनें तो कर बसविलेला असतो खरा. तरी अर्वाचीन काळच्या व्यवहाराच्या संकीर्ण स्वरूपामुळें तसें सदोदित होतेंच असें नाहीं. उलटपक्षीं अप्रत्यक्ष कर, कर देणारावर पडूं नये अशी सरकारची इच्छा असते खरी; परंतु ती इच्छा सदा सर्वदा परिपूर्ण होते असें मात्र नाहीं. सारांश प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष हें वर्गीकरण सामान्यतः खरें असलें व तें जमाखर्चाच्या दृष्टीनें सोईचें असलें तरी त्यावरून कराची संपातमीमांसा पुरी होते असें कांहीं नाहीं. कर शेवटीं कोणत्या व्यक्तीवर किंवा व्यक्तिसमूहावर पडतो याची स्वतंत्र मीमांसा करणें जरूर असतें. कारण प्रत्यक्ष करांचें ओझेंहि कांहीं परिस्थितींत दुसऱ्यावर टाकतां येतें, तर अप्रत्यक्षकरांचें ओझें केव्हां केव्हां कर देणारावरच पडतें. तेव्हां प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर हे वर्ग जरी सामान्यतः बरोबर असले तरी त्यावरून कराच्या प्रत्यक्ष संपाताची बरोबर कल्पना होणार नाहीं. याकरितां अर्थशास्त्री सुधारलेल्या देशांतील प्रमुख करांची उदाहरणें घेऊन कराच्या संपाताचा विचार करितात. तोच मार्ग येथें स्वीकारणें रास्त होईल. परंतु निरनिराळ्या करांच्या या विशिष्ट विचारास लागण्यापूर्वी एक सामान्य गोष्ट येथें सांगितली पाहिजे. ती ही कीं, ज्या देशांत संपत्तीची वांटणी रूढीनें व कायद्यानें ठरलेली असते त्या देशांत कराचा संपात फारसा बदलत नाहीं. तो बहुधा कर देणारावर पडतो. परंतु जेथें संपत्तीची वांटणी पूर्ण चढाओढीनें ठरते तेथें कराच्या संपाताचा प्रश्न बिकट होतो. कारण कर बसवितांना कायद्याचा उद्देश कांहींहि असला तरी चढाओढीच्या अंमलांत तो हेतु बाजूस राहून प्रत्यक्ष कराला अप्रत्यक्ष करांचें रूप येतें तर अप्रत्यक्ष कराला प्रत्यक्ष करांचें रूप येतें व ज्याप्रमाणें अर्वाचीनकाळीं मजुरी, नफा, व्याज व पदार्थांच्या किंमती यांच्या भावाच्या मुळाशीं कोणत्यांना कोणत्या रूपांत मागणी व पुरवठा यांच्या नियमांचा संबंध येतो व या नियमांनुरूप हे भाव ठरतात, त्याचप्रमाणें कराच्या संपाताची गोष्ट आहे. ती ही कीं संपात कांहीं एका विशिष्ट स्वरूपाच्या मागणी व पुरवठा यांच्या नियमांवर अवलंबून असतो, हें पुढील उदाहरणांवरून सहज ध्यानांत येईल.

जमिनीवरील कर हे प्रत्यक्ष करांपैकीं आहेत व सामान्यतः हे कर जमीनदारांवर पडतात. परंतु केव्हां केव्हां हे करहि दुसऱ्यावर टाकले जातात. जमीनीवरील करांचे दोन भेद होतात. एक शेतकीच्या कामाला लावलेल्या जमीनीवरील कर व एक घरें बांधावयाच्या कामांत लाविलेल्या जमीनीवरील कर. याच्याच जातीचा तिसरा कर म्हणजे

घरपट्टी होय. आतां हे तिन्ही कर सामान्यतः जमीनीच्या व घराच्या मालकावर पडावे अशी कायदे करणारांची इच्छा असते. परंतु सर्वत्र असाच या कराचा संपात होईल असें मात्र नाहीं. समजा एका ठिकाणीं जमीनीवर एक नवा कर बसविला किंवा पूर्वीचा कर वाढविला तर तो कर जमीनदार लोक देतील. परंतु ज्या ठिकाणीं जमीनधाऱ्याची पद्धति कायमची ठरलेली नाहीं तेथें जमीनदार लोक आपल्या उपऱ्या कुळांकडून जास्त भाडें घेण्याचा प्रयत्न करतील व तेथील कुळें आयरिश कुळांप्रमाणें अनन्यगतिक असली व त्यांची जमीन लागवडीस मिळविण्याबद्दल फार चढाओढ असली तर हा जादा कर उपऱ्या कुळांवरच पडेल. परंतु जमीन कसणारे शेतकरी बऱ्या स्थितींत असले व जमीदारवर्गाहि मोठा असला तर त्यांनां आपलीं भाडीं वाढवितां येणार नाहींत. कारण भाडीं वाढविल्यास शेतकरी शेतें कसण्यास खंडानें घेणार नाहींत. अशा परिस्थितींत जमीनीवरील कर जमीनदारांवरच कायद्याच्या उद्देशाप्रमाणें पडेल व तो खरोखरी प्रत्यक्ष करच राहील परंतु जमीनदार थोडे एकवटलेले, व कुळें अनन्यगतिक, गरीब व एकमेकांशीं चढाओढ करणारीं अशीं असलीं म्हणजे या जमीनीवरील कराचा संपात कुळांवर पडेल. अर्थात या कराला अप्रत्यक्ष करांचें स्वरूप प्राप्त होईल. तसेंच घरावरील घरपट्टी व जमीनवरील पट्टी हेहि प्रत्यक्ष कर आहेत व ते मालकांवर पडतील. परतु घरें थोडीं व गरजवंत बिऱ्हाडकरू पुष्कळ अशी स्थिति असल्यास हा कर बिऱ्हाडकरूंवर ढकलला जाईल व बिऱ्हाडकरूंनां जास्त भाडें देण्याचें सामर्थ्य नसल्यास त्यांनां पूर्वीपेक्षां कमी सोयीचें घर घ्यावें लागेल. परंतु घरवाले पुष्कळ असले व त्यांनां भाडेकऱ्यांची गरज असली म्हणजे हा कर घरवाल्यांवरच पडेल. अर्थात त्याचा संपात कायद्याच्या हेतूप्रमाणें राहील. वरील दोन्ही तिन्ही उदाहरणांवरून कराच्या संपाताची मीमांसा घ्यानांत येईल. जेथें जेथें कर देणाराची मक्तेवाल्यासारखी स्थिति असेल तेथें तेथें त्याला कर दुसऱ्यावर टाकतां येईल. परंतु हा कर दुसऱ्यावर टाकण्यानें जर त्या वस्तूच्या मागणींत फरक होईल तर मग तो सर्वांशीं दुसऱ्यावर टाकतां येणार नाहीं.

प्रा प्ती व री ल क र.—हा कर सर्वप्रकारें सरसहा असला म्हणजे तो कर, कर देणारावरच पडतो; तो दुसऱ्यावर ढकलणें शक्य नसतें. यामुळें हा कर प्रत्यक्ष करापैकींच राहतो. या कराच्या या स्थिरसंपातामुळे सर्व सुधारलेल्या देशांत हा कर कायम ठेवण्याकडे प्रवृत्ति आहे. हा कर समतेच्या दृष्टीनें चांगला आहे व जरी तो कराच्या इतर तत्वांच्या दृष्टीनें तितका चांगला नाहीं तरी पण तो सर्वांवर त्यांच्या ऐपतीच्या मानानें पडत असल्यामुळें हा कर एक चांगल्या करापैकीं समजला जातो. बाकी हा निश्चित नसतो. या कराची आकारणी करण्यांत सरकारी अंमलदरांस लाचलुचपतीला अवसर सांपडतो. आपल्यावर पुढल्या वर्षी किती कर बसेल याचा मनुष्यास अंदाज करतां येत नाहीं. तसेंच हा कर अप्रत्यक्ष करापेक्षां वसूल करण्यास व लोकांस देण्यास जास्त अवघड आहे असे या करावर वरेच आक्षेप आहेत. तरी समतेच्या दृष्टीनें हा कर पुष्कळ वरच्या पायरीचा आहे.

जुन्या जुलमी पद्धतींत सुरू असलेले डोईपट्टीसारखे कर हे प्रत्यक्ष करांपैकींच आहेत व कराच्या संपाताच्या दृष्टीनें त्याचा संपात निश्चित असतो, तो दुसऱ्यावर ढकलतां येत नाहीं. परंतु हे कर कराच्या बाकीच्या तत्वाविरुद्ध आहेत. हे कर प्रजेला फार त्रासदायक आहेत. शिवाय हे कर वसूल करण्यास खर्चहि जास्त लागतो. यामुळें सुधारलेल्या देशांतून असे कर हद्योत्पत्तीस येत नाहींत.

अप्रत्यक्ष करांपैकीं विचार करण्यासारखे प्रकार म्हणजे आयातजकात, निर्गतजकात व अन्तर्जकात. हे तिन्ही कर व्यापारी लोक प्रथमतः देतात खरे, तरी पण ते शेवटीं तो माल खरेदी करणारावरच पडण्याच्या हेतूनें बसविलेले असतात व सामान्यतः हें खरेंहि आहे. परंतु केव्हां केव्हां त्याचा दुसराच अनपेक्षित परिणाम घडतो. उदाहरणार्थ एका आयात मालावर नवा कर बसविला; तर व्यापारी तितक्या मानानें त्या मालाची किंमत वाढवितील व जर तो माल आयुष्याच्या आवश्यकांपैकीं असेल व त्याची मागणी कमी होण्यासारखी नसेल तर हा कर हा माल वापरणारांवर पडेल हें उघड आहे; व सामान्यतः आयात जकाती या देशांतील माल वापरणारांवरच पडतात. परंतु मालाची किंमत वाढली म्हणजे त्याची मागणी कमी होते व यामुळें अशा करानें देशांत माल कमी येऊं लागेल किंवा परदेशांतील कारखानदारांनां तो स्वस्त करावा लागेल. परंतु परदेशचे व्यापारी प्रथमतः ज्या ठिकाणीं अशी आयात जकात नसेल तेथें आपला माल पाठवूं लागतील व त्यांनां असा खुला बाजार मोकळा नसल्यास आपल्या नफ्यांत कमी करून माल थोडा स्वस्त करतील. अशा वेळीं कराचा थोडा अंश परकी व्यापारी देईल; परंतु मुख्यत्वेंकरून आयात जकातीचा संपात देशांतील गिऱ्हाइकांवरच पडतो असें म्हणण्यास हरकत नाहीं व सुधारलेल्या देशांत कराचा महत्वाचा भाग अशा जकातीपासूनच उत्पन्न केला जातो. आतां निर्गत जकाती घ्या. एखाद्या बाहेरदेशीं जाणाऱ्या मालावर जकात बसविली आहे असें समजा. आतां ज्याप्रमाणें आयात जकात देशांतील माल वापरणारांवर पडते, त्याप्रमाणें निर्गत जकात परदेशीं तो माल वापरणारांवर पडते असें सामान्यतः समजलें जातें. परंतु असा परिणाम खात्रीनेंच होईल असें मात्र म्हणतां येत नाहीं व्यापाराकडून ही जकात घेतली म्हणजे ते लोक त्या मालाची किंमत त्या मानानें वाढवतील. दुसऱ्या देशांतील लोक या देशाचा माल न घेतां तसला माल दुसऱ्या देशांतून घेऊं लागतील व असें झालें म्हणजे या देशाच्या मालाचें गिऱ्हाईक कमी होईल. म्हणजे हा माल स्वस्त होईल. अर्थात हा कर देशांतल्या

कारखानदारांनां द्यावा लागेल किंवा हे कारखाने देशांतून अजीबात नाहींसे होतील. परंतु निर्गत मालाचा त्या देशाला पूर्ण मक्ता असला व हा माल आयात करणाऱ्या देशाची मागणी लवचिक नसून ती दुसऱ्या तऱ्हेनें भागविण्यासारखी नसली तर ही मालाची वाढलेली किंमत परदेशाच्या माल वापरणारांवरच पडेल. परंतु निर्गत जकातीच्या योगानें देशांतील धंद्याला धक्का बसण्याचा पुष्कळ संभव आहे. यामुळें निर्गत जकाती परकी देशांवर पडतात असें समजणें चुकीचें आहे.

वरील उदाहरणावरून कराचा संपात शोधून काढणें हें वरेंच कठिण असतें हें दिसून येईल. अमुक कराचा संपात काय आहे या प्रश्नाचें उत्तर तात्विक तऱ्हेनें देतां येणार नाहीं. हें देण्याकरितां त्या करावद्दल व त्या देशावद्दल विशिष्ट माहिती अवगत पाहिजे तरच अशा प्रश्नाला उत्तर देतां येईल.

हिं दु स्था नां ती ल ब्रि टि श क र प द्ध ति—ब्रिटिश अंमलाखालीं हिंदुस्थानसरकारच्या उत्पन्नाच्या वाबी येणें-प्रमाणें आहेतः—( १ ) सरकारी मालमत्ता, सरकारी जमिनी, सरकारी जंगल, कंपन्यांनां चालविण्याकरितां भाडेपट्टयानें दिलेल्या रेल्वे, इत्यादि. ( २ ) सरकारनें स्वतः चालविलेले उद्योगधंदे, उदा. सरकारी रेल्वे, कालवे, पोस्ट ऑफिसें विक्रीच्या हक्काचे परवाने, अफू वगैरेंचे. ( ३ ) लोकांवर वसविलेले कर, यांत ( अ ) प्रत्यक्ष कर, उदा. जमीनमहसूल व प्राप्तीवरील कर, आणि ( ब ) अप्रत्यक्ष कर, उदा. व्यापारी जिनसांवरील कर, मादक पदार्थांवरील कर, कोर्ट स्टँप व रजिस्टर स्टँप. हिंदुस्थानांत कर वसविण्याचा अधिकार तीन संस्थांना आहे. ( १ ) हिंदुस्थानसरकार, ( २ ) प्रांतिक सरकारें, व ( ३ ) स्थानिक संस्था म्हणजे म्युनिसिपालिटया व लोकलवोर्डें. हिंदुस्थानांमधील ब्रिटिश सरकारच्या कर-पद्धतींतील महत्वाच्या गोष्टी पुढील प्रमाणें:—

( १ )पहिली महत्वाची गोष्ट अशी आहे कीं, सरकारच्या उत्पन्नांपैकीं बराचसा मोठा भाग म्हणजे जमीनमहसूल. पूर्वी एकदां एकंदर उत्पन्नांपैकीं निम्मे उत्पन्न जमीनीवरील साऱ्याचें असे. वीस वर्षांपूर्वी शेंकडा ३१ होतें; व १९२०च्या सुमारास १७ टक्के होतें. उद्योगधंदे व व्यापार वाढत चालला, त्या मानानें उत्पन्नाच्या इतर बाबी वाढत आहेत. जमीनमहसूल म्हणजे एकप्रकारचा प्राप्तीवरील करच आहे; कारण हिंदुस्थानांत जमीनीवरच सरकारची मालकी नाहीं; म्हणून सरकारला द्यावयाच्या शेतसाऱ्यास खंड किंवा मक्ता असें स्वरूप नाहीं. हिंदुस्थानांत सरकार जमीनीचें मालक आहे अशी कित्येकांची समजूत आहे. प्रत्यक्ष लँड रेव्हेन्यू कोडांत तसे शब्द आहेत; पण ही समजूत चुकीची आहे, असें 'जमीनदार व कुळें' या लेखामध्यें ( सदरहू लेख पहा ) दाखविलें आहे. पूर्वी जमीन हीच खासगी व्यक्तींची उत्पन्नाची मुख्य बाब असल्यामुळें सरकारच्या उत्पन्नाचा मुख्य आधार तोच होता. परंतु हल्लीं जी औद्योगिक व व्यापार-विषयक क्रांति हिंदुस्थानांत घडून येत आहे तिच्यामुळें सरकारी उत्पन्नाच्याहि अनेक बाबी वाढत असून एकंदर सरकारी उत्पन्नांत जमीनमहसुलाचें प्रमाण कमी होत जात आहे.

(२)करपद्धतींतील दुसरी महत्वाची गोष्ट ही कीं, परदेशा-बरोबरचा वाढता व्यापार, वाढते देशी उद्योगधंदे, विस्तार पावत असलेलीं दळणवळणाचीं साधनें, वँकांची वाढती संख्या या अनेक कारणांमुळें प्राप्तीवरील कर, आयात–निर्गत माला-वरील कर आणि देशी मालावरील कर, या करांनां विशेष महत्व येणार आहे, व त्यामुळें एकंदर करपद्धतींत लवकरच आमूलाग्र फरक करावा लागणार आहे.

(३) तिसरी गोष्ट म्हणजे ब्रिटिश सरकारनें अनियंत्रित व्यापारपद्धतीचें धोरण हिंदुस्थानावर लादल्यामुळें आयात व निर्गत मालावरील जकातीचें उत्पन्न फारच थोडें होतें. सदरहू धोरणामुळें हिंदुस्थानचें दुहेरी नुकसान झालें आहे. एकतर ही एक उत्पन्नाची मोठी बाब असूनहि हिंदुस्थान--सरकारला या बाबींचें उत्पन्न फारसें मिळत नाहीं आणि दुसरा तोटा म्हणजे या धोरणामुळें देशी उद्योगधंदे नाहींसे होऊन परदेशी विशे-षतः इंग्लंडमधील व्यापारी व कारखानदार हिंदुस्थानच्या पैशावर गबर होऊन बसले आहेत. ही परिस्थिति लक्षांत घेऊन आयातीवर जकाती वाढविण्याकडे सरकारचें लक्ष लागलें आहे.

(४) करपद्धतींतील सर्वांत महत्वाचा मुद्दा म्हणजे हिंदु-स्थानच्या सरकारी तिजोरीवर म्हणजे उत्पन्नाच्या बाबी व खर्चाच्या बाबी या गोष्टींवर हिंदी लोकांचा ताबा नाहीं. या गोष्टी परकी ब्रिटिश सरकार इंग्लंडच्या फायद्याच्या दृष्टीनें करीत असतें; त्यामुळें ज्या बाबींवर कर बसवावयास पाहिजेत त्यांवर हें परकी सरकार कर बसवीत नाहीं, आणि कर भर-णारे हिंदी लोक ज्या लोकोपयोगी कामांवर खर्च व्हावा अशी इच्छा करतात तिकडे खर्च करीत नाहीं. १९०९ च्या गव्ह-र्नमेंट ऑफ इंडिया ॲक्ट ( हिंदुस्थानच्या राज्यकारभारा-विषयींचा कायदा )नें प्रांतिक कारभारांतील कांहीं खातीं हिंदी दिवाणांच्या हातीं दिलीं आहेत, परंतु ही सत्ता फार अल्प व फार मर्यादित आहे. येथील करपद्धतीला योग्य वळण लागण्याकरतां प्रथम सर्व हिंदुस्थानच्या जमाखर्चावर हिंदी लोकांनां ताबा मिळाला पाहिजे. अशी मागणी होत आहे.

ब्रि टि श अ म दा नीं ती ल क रां च्या बा बीः—गेल्या पन्नास वर्षांत हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या आंकड्यांत फार फरक पडत आला आहे, शिवाय गेल्या महायुद्धानेंहि हिंदु-स्थानच्या बजेटांत महत्वाचे फेरफार घडवून आणले आहेत. म्हणून उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींसंबंधींचें कोष्टक येथें देतों.

हिंदुस्थान सरकारचा जमाखर्च पुढीलप्रमाणें आहे. यांतील आंकडे लक्षाचे आहेत.

जमेचा तपशील.

| खात्याचें नांव | पक्का हिशेब | दुरुस्त अंदाज | कच्चा अंदाज |
|---|---|---|---|
| | १९२२–२३ | १९२३–२४ | १९२४–२५ |
| जकात | ४१३४ | ४०४१ | ४५०१ |
| प्राप्तीपट्टी | १७९९ | १९०७ | १८२१ |
| मीठ | ६८२ | ८७० | १०५४ |
| अफू | ३७९ | ४३१ | ४३४ |
| प्रां. खंडणी | ९२२ | ९२२ | ७७२ |
| लष्कर | ५७४ | ४२० | २७५ |
| टांकसाळ | ३६२ | ३०७ | ३६४ |
| रेल्वे | १२२ | ६२८ | ४२७ |
| पोस्ट व तार खातें | १२२ | ८५ | १०६ |
| व्याज | ११६ | ३२४ | ३१७ |
| सं. खंडणी | ८७ | ८७ | ८७ |
| अबकारी | ५२ | ४९ | ४६ |
| शेतसारा | ४३ | ४५ | ४० |
| मु. खातीं | ४४ | ६७ | ७३ |
| स्टँप | २५ | २८ | २७ |
| जंगल | २५ | २४ | २२ |
| कालवे | ११ | ११ | १२ |
| प. वर्क्स | १४ | १३ | १२ |
| किरकोळ | ६७ | ३२७ | ७० |
| एकूण जमा | ९५८० | १०५८६ | १०४६० |

खर्चाचा तपशील.

| खात्याचें नांव | पक्का खर्च | दुरुस्त अंदाज | कच्चा अंदाज |
|---|---|---|---|
| | १९२२–२३ | १९२३–२४ | १९२४–२५ |
| लष्कर | ७१०० | ६३९४ | ६३०० |
| व्याज | १६१६ | १६७५ | १८१५ |
| मु. कारभार | ९९४ | ९५७ | ९८० |
| अफू | १८७ | २५८ | २०९ |
| मीठ | १५१ | १४३ | १४५ |
| जकात | ७० | ७२ | ८४ |
| पोस्ट व तार खातें | ५९ | ६४ | ७१ |
| टांकसाळ | १०३ | १०५ | ७७ |
| सि. वर्क्स | १३५ | १६१ | २०६ |
| प्राप्तीपट्टी | ४२ | ६५ | ६५ |
| जंगल | ३९ | ४० | ३४ |
| कालवे | १३ | १४ | २३ |
| संमिश्र | ५७३ | ४३२ | ४४८ |
| एकूण खर्च | ११०८२ | १०३८० | १०४५७ |

हिंदुस्थान व इंग्लंड या दोन्ही देशांत हिंदुस्थान सरकारच्या तिजोरीला लागणाऱ्या जमाखर्चांचा तक्ता.

| साल | उत्पन्न पौंड | खर्च पौंड |
|---|---|---|
| १८७५–७६ | ५,१०,१९,१४० | ४,९०,१३,८७१ |
| १८८०–८१ | ५,०२,२८,०३८ | ५,२६,४८,९६८ |
| १८८५–८६ | ४,८१,०५,३५६ | ४,९९,७३,१७४ |
| १८९०–९१ | ५,४४,४४,६६८ | ५,१९,८५,८८७ |
| १८९५–९६ | ५,९३,९५,३२६ | ५,८३,७२,६६० |
| १९००–०१ | ६,६८,०६,५७९ | ६,५१,३६,३७५ |
| १९०५–०६ | ७,०८,४६,५६५ | ६,८७,५४,३३७ |
| १९१०–११ | ८,०६,८२,४७३ | ७,६७,४६,१८६ |
| १९१५–१६ | ८,४४,१३,५३७ | ८,५६,०२,१९८ |
| १९१८–१९ | १२,३२,५७,७४४ | १२,७०,७८,१५३ |

**ज मी नी व री ल क र उ र्फ ज मी न म ह सू ल.**— जमीनदार व शेतकरी यांनीं आपल्या ऐपतीप्रमाणें सरकारला कर दिलाच पाहिजे. आणि त्यांनां कांहीं एक खर्च न पडतां जो अधिकाधिक फायदा मिळतो त्यावर सरकारला जबर कर बसविण्यास हरकत नाहीं. जमीनीवरील कराची वाढ पुनःपुन्हां ठराविक मुदतीनंतर करण्यांत आलेली आहे. १९२० च्या सुधारणेच्या कायद्याप्रमाणें जमीनमहसुलांत वाढ करण्या न करण्यासंबंधाचा अधिकार प्रांतिक सरकारांनां देण्यांत आलेला आहे. जमीनमहसूल हा सरकाराला जमीनीच्या सरकारी मालकीबद्दल मिळणारें भाडें आहे, अशी जी समजूत कित्येकांची आहे ती चूक आहे, व हा केवळ प्राप्तीवरील कर आहे. म्हणून प्राप्तीवरील व इतर करांना जीं अर्थशास्त्रीय तत्वें लागू केलीं जातात तींच जमीनमहसुलाला लावलीं पाहिजेत. म्हणजे जर जमीनीवरील कर हा जमीनीच्या उत्पन्नाचा भाग होय तर प्राप्तीवरील कराप्रमाणें या उत्पन्नासंबंधानेंहि कर न घेण्याची किमान मर्यादा पाहिजे. उदाहरणार्थ पगार मिळवणारा नोकर किंवा दुकानदार यांचें वार्षिक उत्पन्न दोन हजारांच्या आंत असल्यास त्यांस प्राप्तीवरील कर माफ असतो; या तत्त्वानुसार शेतकऱ्यांच्या बाबतींतहि उत्पन्न ठराविक किमान मर्यादेच्या आंत असल्यास त्यावर शेतसारा द्यावा लागतां कामा नये.

सर्व देशांत जमीनमहसूल हा सरकारी उत्पन्नाचा एक मोठा आधार असतो, पुष्कळ देशांत त्याला प्राप्तीवरील कराचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. हिंदुस्थानातलें ब्रिटिश सरकार मात्र जुन्या चुकीच्या कल्पनांना चिकटून आहे. उदाहरणार्थ, मनुष्याच्या ऐपतीप्रमाणें कर घेतला पाहिजे, हा नियम येथें शेतसाऱ्यांच्या बाबतींत पाळला जात नाहीं. मद्रास व मुबई इलाख्यांत जमीनीचा सुपीकपणा व क्षेत्र पाहून त्यावर दर एकरीं ४ ते ६ रुपये सारा घेतला लागतो. शेतसारा हरसाल वसूल करतांना मालकाचें वास्तविक उत्पन्न

किती झालें इकडे सरकार पाहात नाहीं. शेत पिको न पिको, लागवड होवो न होवो जितकी जमीन नांवावर असेल तितक्या एकरांचा सारा भरलाच पाहिजे, असा ब्रिटिश सरकारचा नियम आहे. त्यामुळें या नियमाचा परिणाम असा होतो कीं, शेतसारा द्यावयाचा तो शेताच्या उत्पन्नांतून न दिला जातां नोकरी, मोलमजुरी करून मिळविलेल्या पैशांतून देण्याचा प्रसंग येतो. हजार दीड हजार वार्षिक उत्पन्न असणारे कारागीर, धंदेवाले, दुकानदार किंवा सावकार यांच्यावर कर नसतो; आणि याहूनहि कमी वार्षिक उत्पन्न असणाऱ्या जमीनीच्या मालकाला किंवा शेतकऱ्याला मात्र कर द्यावा लागतो हा भयंकर अन्याय नव्हे काय! रयतवारीपद्धति असलेल्या सर्व प्रांतांत पुष्कळशा जमीनवाल्यांनां वार्षिक कुटुंब-खर्च भागण्याइतकेंहि शेतकीचें उत्पन्न नसतें व त्यामुळें त्यांनां इतर नोकरीधंदा किंवा मोलमजुरी करून उत्पन्नांत भर घालावी लागते. असें असूनहि त्यांनां शेतसारा मात्र भरपूर द्यावा लागतो. त्यामुळें पुष्कळवेळां कर्ज काढून शेतसारा भरावा लागतो आणि या कारणानें पुष्कळसे शेतकरी कर्जबाजारी होऊन त्यांच्या जमिनी सावकाराच्या घरांत जाऊन ते देशोधडीला लागतात. हा जमिनीवरील ब्रिटिश करपद्धतींतला महत्त्वाचा दोष आहे. उलटपक्षीं, हिंदुस्थान हा पूर्वापार शेतकीप्रधान देश आहे, येथें हजार दोन हजाराहून अधिक शेतकीचें उत्पन्न आहे असे जमीनदार फार थोडे आहेत; आणि अगदीं प्राचीन काळापासून सर्व जमीनवाल्यांनां सरकारला शेतसारा देण्याची संवय पूर्ण अंगवळणी पडलेली असल्यामुळें जमीनमहसूल वसूल करणें मुळींच जड जात नाहीं. या गोष्टी लक्षांत घेऊन ब्रिटिश सरकारनें जमीनबाबीवरच विशेष भिस्त ठेविली होती. त्यामुळें रयतवारी प्रांतांत वर वर्णिल्याप्रमाणें जमीनवाल्यांवर हा कर जुलमी प्रमाणांत वाढत आहे, तर उलट कायम धारापद्धतीच्या बंगाल प्रांतांत मात्र जमीनदारांनां फारच सवलती व फायदा झाला आहे. बंगाल्यांत गेल्या शंभरवर्षांत शेतसारा मुळींच वाढला नाहीं; जमीनींचें उत्पन्न तिप्पटी चौपटीहूनहि अधिक वाढलें आहे. त्यामुळें ओरड होऊन जमीनदारावर प्राप्तीवरील कर बसविण्यांत आला आहे. त्याची किमानमर्यादा रु. ६०० आहे; म्हणजे अर्थशास्त्रांतलें प्राप्तीवरील कराचें तत्व तिकडे अमलांत आलें आहे. तात्पर्य जमीनमहसूल हा जंगल, अफू, रेल्वे, पोस्ट व तारखातें वगैरे सरकारी मालकीच्या बाबीवरील उत्पन्न म्हणून गणला जात आहे ती चूक असून ती दुरुस्त झाली पाहिजे, व त्याला खाजगी प्राप्तीवरील कराचें स्वरूप प्राप्त झालें पाहिजे.

प्रा प्ती व री ल कं र—अलीकडे प्राप्तीवरील कराला फार महत्त्व प्राप्त झालें आहे. कारण हा एकटाच काय तो कर असा आहे कीं ज्याच्या योगानें सरकारला आपलें उत्पन्न वाटेल तेव्हां व वाटेल तितकें कमजास्त प्रमाणांत वाढवितां येतें. इतर देशांत याला "संपत्तीवरील व प्राप्तीवरील कर" असें नांव असून घरपट्टी व जमीनीवरील कर यांचा याच्यांतच समावेश करतात. या कराचा खरा अर्थ प्राप्ती किंवा फायदा यावरील कर असा आहे; मग ही प्राप्ती जमीन, घर वगैरे स्थावर किंवा जंगम मिळकतीपासून होणारी असो, नोकरीबद्दल पगाराच्या रूपानें होणारी असो, किंवा वार्षिक नेमणुकीपासून होणारी असो. प्राप्ती हा शब्द अत्यंत व्यापक अर्थानें वापरलेला आहे. हिंदुस्थानांत हीच व्याख्या लागू आहे; पण जमीनमहसूल मात्र यांत गणला जात नाहीं. येथें प्राप्तीवरील कराचें उत्पन्न सरकारला फारसें होत नसे; १९१६ पर्यंत या कराचें उत्पन्न तीन कोटि रुपयेच कायतें होत असे. याचीं कारणें अनेक आहेत. एकतर हिंदुस्थान देश एकंदरीनें दरिद्री असून दोन हजाराहून अधिक वार्षिक उत्पन्न असलेले लोक फारच कमी आहेत. शिवाय जमीनमहसुलाचा या करांत अन्तर्भाव सरकार करीत नाहीं. आणि तिसरें कारण म्हणजे प्राप्तीवरील कर देणारे लोक श्रीमंत, व्यापारी, व मोठाले धंदेवाले असल्यामुळें ते आपल्या वजनाचा अवास्तव उपयोग करून कोणत्यानां कोणत्या तरी सबबीवर या करांच्या बाबतींत सवलत किंवा सूट मिळवितात. येथें हा कर प्रथम १८८६ मध्यें सुरू करण्यांत आला. १९१६ सालीं पांच हजार व त्याहून अधिक वार्षिक उत्पन्नावरील कराचा दर वाढविण्यांत आला. त्यामुळें ९,००,००० पौंड उत्पन्न होऊं लागलें. शिवाय जादा कर म्हणून १९१७पासून महायुद्धानिमित्त ५०,००० रुपयांवरील उत्पन्नावर बसविण्यांत आला. तथापि हें जादा कराचें तत्व कायमचेंच लागू करण्यास हरकत नाहीं. मात्र त्याबरोबर जमीनमहसुलाची प्राप्तीवरील कराप्रमाणें आकारणी करून ठराविक किमान मर्यादेच्या खालील जमीनीच्या उत्पन्नावरील शेतसारा अजीबात माफ करण्यांत आला पाहिजे. ज्यांचें उत्पन्न ठराविक मर्यादेच्या अधिक—मग तें उत्पन्न जमीनीचें असो, धंद्यांतलें असो किंवा व्यापारांतलें असा—असेल, त्या सर्वांवर योग्य प्रमाणांत कर बसविला गेला पाहिजे.

आ या त नि र्ग त ज का ती.—जमीनमहसूल व प्राप्तीवरील कर या बाबी प्रत्यक्ष कराच्या वर्गांतील (डायरेक्ट टॅक्सेस) होत. आयात निर्गत जकाती या अप्रत्यक्ष करांपैकीं आहेत. इतर देशांत सरकार या जकातींनीं बरेंच उत्पन्न मिळवूं शकतें. परंतु येथें ब्रिटिश सरकार खुल्या व्यापाराचें तत्व अंगीकारून आयात मालावर किंमतीप्रमाणें सामान्यतः ५ टक्के जकात ठेऊन कापसाच्या कापडावर त्याहूनहि कमी म्हणजे फक्त साडेतीन टक्के जकात बसवीत असे. शिवाय विलायती कापड व्यापाराच्या सवलतीकरितां देशी कापडावर जकात बसवी. त्यामुळें या बाबींचें उत्पन्न फार कमी होत असे. परंतु आयात व निर्गत मालावर देशी उद्योगधंद्यांनां उत्तेजन देण्याच्या उद्देशानें जबर जकाती बसविल्या तरी अप्रत्यक्षपणें त्यांचें ओझें सर्वांवर सारखें वाटलें जाऊन सरकारला उत्पन्नहि पुष्कळ होईल ('व्यापार' हा लेख पहा).

उत्तरोत्तर हिंदुस्थानची उन्नति झपाट्यानें होण्याकरितां हिंदुस्थानसरकारनें आयात व निर्गत जकातींसारख्या अप्रत्यक्ष करांनींच आपलें उत्पन्न वाढविलें पाहिजे. महायुद्धामुळें १९१६-१७ पासून हिंदुस्थानसरकारनें धोरण बदलून साखर, ताग, कापसाचें कापड, या जिनसांवर जकात बसवून आपलें उत्पन्न २१,५०,००० पौंडांनीं वाढविलें. पुढील सालांत जकातीचे दर आणखी वाढल्यामुळें, १९१५-१६ सालीं जकातीचें उत्पन्न ५० लाख पौंड होतें तें १९१८-१९ सालीं १२० लाख पौंड झालें व १९२०-२१ सालीं १७० लाख पौंड अंदाजी झालें. विलायती कापडावर साडेसात टक्के जकात केल्याबद्दल लँकाशायरच्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं स्टेट सेक्रेटरीकडे ओरड केली. परंतु १९२० च्या सुधारणेच्या कायद्यानें हिंदुस्थानला जकातींचा अधिकार मिळाला असल्याचें उत्तर देऊन त्यांनां गप्प करण्यांत आलें. आतां आयात जकाती बसविल्यानें हिंदी गिऱ्हाइकांनां माल महाग पडेल असा अक्षेप निघतो. पण हा आक्षेप उच्च प्रतीचा माल वापरणाऱ्या श्रीमंत गिऱ्हाईकांपुरता आहे. व ते महाग किंमती देण्यास समर्थ असतात. सामान्य रयतेला जाडाभरडा देशी कपडा, देशांत पिकणारें धान्य व मीठ यांवर जबर जकात बसली म्हणजे, जेंवर आयात जकातींबद्दल तक्रार करण्यास फारसा प्रसंगच नसतो. शिवाय देशी उद्योगधंद्यांना उत्तेजन देणें हा आयात जकाती बसविण्याचा उद्देश असल्यावर कोणीहि देशाभिमानी श्रीमंत किंवा गरीब त्याबद्दल तक्रार करणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हेतर, हिंदुस्थानच्या हिताच्या आड येत असेल तर जकातींचें साम्राज्यपक्षपाती धोरणहि हिंदुस्थाननें मान्य करतां कामा नये.

दे शी जि न सां व री ल ज का त व मि ठा व री ल क र.— आणखी एक अप्रत्यक्ष कराचा प्रकार म्हणजे देशी जिनसावरील जकाती. यांत विशेषतः मादक दारू, अफू, भांग, तंबाखू वगैरे जिनसा येतात. अलीकडे दारूचें उत्पन्न तर विलक्षण वाढलें असून दारूबंदीच्या सत्कार्यास उत्पन्नांतील तुटीचा प्रश्नच सरकारच्या कांहीं अंशीं आड येत आहे. तथापि सरकारच्या उत्पन्नाचा प्रश्न लोकांच्या आरोग्याच्या व नीतिमत्तेच्या मानानें कमी महत्त्वाचाच मानला पाहिजे, व उत्पन्नाच्या या बाबीवर पाणी सोडण्यास सरकारनें तयार झालें पाहिजे. सर्वच मादक पदार्थांसंबंधानें हें म्हणतां येईल कीं, लोकांच्या दुर्व्यसनास जरूर तो आळा पडून मग शक्य असल्यास या बाबींपासून सरकारनें उत्पन्न कमवावें. अफूच्या उत्पन्नाचा प्रश्न दारूच्या उत्पन्नासारखाच बिकट वाटत होता, पण अखेर स्वार्थावर लाथ मारून आपला शेजारी चीनदेश याचा दुवा संपादल्याबद्दल हिंदुस्थानचे कोणीहि गोडवेच गाईल.

मिठावरील कराचा प्रश्न निराळ्या दृष्टीनें पण तितकाच महत्त्वाचा आहे. मीठ हा सर्व लोकांच्या खाण्यांतील आवश्यक जिन्नस आहे. पण मिठावरील करामुळें सरकारला मोठें उत्पन्न होत असतें. शिवाय हा कर पूर्वापार चालत आलेला असून हा एकच कर असा आहे कीं, तो सर्व रयतेला अप्रत्यक्षपणें द्यावा लागतो. शिवाय अधिक नोकर ठेवावे न लागतां नुसती दरांत वाढ केल्यानें मिठावरील कराचें उत्पन्न सरकारला पाहिजे तितकें वाढवितां येतें. १८८२ मध्यें हा कर मणी २ रुपये होता, १८८८ मध्यें तो मणी २॥ करण्यांत आला. पुढें ना. गोखले यांच्या प्रयत्नानें १९०३ मध्यें तो कमी म्हणजे मणी १ रुपया करण्यांत आला.

इ. स. १९१६ सालीं महायुद्धामुळें हा कर मणी १। रुपया केला. चार आणेच वाढ केली पण तेवढ्यानें उत्पन्नांत पाचलक्ष पौंड वाढ झाली. १९२३ सालीं व्हाईसरायनें आपली शक्ती वापरून कर दरमणी २ रु. केला पण तो लोकमत क्षुब्ध झाल्यामुळें कमी केला उत्पन्न वाढविण्यास हा कर सोईचा आहे खरा, पण उलट या कराचा दर थोडा कमी केला तरी मीठ स्वस्त होऊन लगेच खप वाढतो असा अनुभव आहे; करितां अशा आवश्यक जिनसावरील कर फार अल्प असला पाहिजे. अगदीं गरीबांना सुद्धा हा कर द्यावा लागत आहे तरी अगदीं गरीबांनीं सुद्धां सरकारचा खर्च अल्पांशानें तरी सोसणें न्याय्य आहे.

सरकारी उत्पन्नाच्या रेल्वे, कालवे, वगैरे बाबी कर या स्वरूपाच्या नसल्यामुळें त्यांचें विवेचन निराळ्या लेखांत ('राष्ट्रीय जमाखर्च' हा लेख पहा) केलें आहे.

क र सो स ण्या ची क मा ल म र्या दा.—सर जॉन स्ट्रॅची म्हणतो, " हिंदुस्थानांत सरकारनें उत्पन्नाच्या बऱ्याच बाबी सरकारमालकीच्या करून टाकल्या आहेत. यांपैकीं पुष्कळशा बाबी इतर देशांत खाजगी व्यक्तींच्या मालकीच्या असतात. सदरहू कारणामुळें हिंदुस्थानांत प्रजेवर कराचा बोजा फार नसतो; फार काय पण जगांतील दुसऱ्या कोणत्याहि सुधारलेल्या देशांत प्रजेवरील करांचें ओझें इतकें हलकें नाहीं. इंग्लंडमध्यें सरकारी उत्पन्नापैकीं ⅞ उत्पन्न लोकांवरील करांच्याद्वारें होत असतें, तर हिंदुस्थानांत फक्त ⅜ प्रजेकडून करांच्या रूपानें मिळतें." हिंदुस्थानांत प्रजेवर करांचें ओझें फार हलकें आहे हें सिद्ध करण्याकरतां येथील लोकसंख्या व करांचे उत्पन्न यांविषयींचे आंकडे घेऊन हिंदुस्थानांत माणशीं कर किती पडतो, व त्याच मानानें इतर देशांत माणशीं किती पडतो, याचें तुलनात्मक कोष्टक देतात व त्यावरून हिंदुस्थान करांच्या बाबबींत सुखी असल्याचें ब्रिटिश अधिकारी सिद्ध करूं पाहतात. पण हा पुरावा भ्रामक आहे. कारण या प्रश्नाचा विचार इतर अनेक दृष्टींनीं करावयास पाहिजे. त्यांत मुख्य गोष्ट म्हणजे, माणशीं कर किती, हा विचार करतांना, माणशीं उत्पन्न किती, ही गोष्ट महत्त्वाची प्रथम लक्षांत घेतली पाहिजे. माणशी उत्पन्न व माणशी कर हिंदुस्थानांत व इतर देशांत किती आहे, हें दर्शविणाऱ्या कोष्टकावरून हिंदुस्थानांत कराचा बोजा भारी

आहे असें स्पष्ट होतें. शिवाय हिंदुस्थानांत जमीनमहसूल ही उत्पन्नाची मोठी बाब आहे, पण तिचा करांत अन्तर्भाव ब्रिटिश सरकार करीत नाहीं. त्यामुळें माणशीं कर अल्प असल्यासारखा दिसतो. शिवाय हिंदुस्थान हा पृथ्वीच्या पाठीवर एक अत्यंत दरिद्री देश आहे; तरी पण येथील राज्यकारभार चालविण्यास लागणारा खर्च म्हणजे सरकारी नोकर व वडे अधिकारी यांचे पगार, पेन्शनें वगैरेंच्या रूपानें होणारा खर्च इतर देशांच्या मानानें अधिक आहे. आणि कर बसविणें व जमणारा पैसा खर्च करणें या बाबतींत ब्रिटिश अमदानींत हिंदी लोकांनां सत्ता बहुतेक मुळींच नाहीं. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे ब्रिटिश करव्यवस्था किती असमाधानकारक आहे हें सहज लक्षांत येईल.

अशा स्थितींतहि हिंदुस्थानेंन महायुद्धाच्या वेळीं जादा खर्चाचा बोजा सहन केला ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे स्वराज्याचे अधिकार हातीं घेतल्यावर लागणाऱ्या वाढत्या खर्चाकरितां करांचा अधिक बोजा शिरावर घेण्यास हिंदी लोक कांकू करणार नाहींत असें दिसून येईल. पण प्रथम दोन गोष्टी घडल्या पाहिजेत. एक राज्यकारभाराचा खर्च शक्य तितका कमी झाला पाहिजे; आणि दुसरी राष्ट्राच्या जमाखर्चाची सर्व व्यवस्था कर देणाऱ्या रयतेनें निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या पूर्णपणें ताब्यांत पाहिजे. 'हिंदी स्वराज्या'च्या अमलाखालीं देशी उद्योगधंद्यांच्या सर्वांगी उन्नतीकडे स्वदेशी सरकारनें लक्ष दिल्यावर राष्ट्रीय संपत्तीची व त्यावरोबरच व्यक्तिशः माणशीं उत्पन्नाची वाढ होऊन एकंदर प्रजा करांचा अधिकाधिक बोजा सहन करण्यास सहजच तयार होईल.

**कि र को ळ क र, अफूः**—चीनमध्यें पाठविण्याकरितां व येथील खपाकरितां खसखसीची लागवड केली जाते. चीनमध्यें पाठविलेल्या अफूवर जो कर येतो त्याचें विवेचन 'अफू' ह्या सदराखालीं केलें आहे. व येथें जो खप होतो त्याच्या उत्पन्नाचें विवेचन 'अवकारी' ह्या सदराखालीं केलें आहे. पहिल्या प्रकारचा कर दुसऱ्या प्रकारापेक्षां जास्त येत असल्यामुळें महत्त्वाचा आहे.

बहार आणि गंगा नदीच्या उत्तरेकडील कांहीं संयुक्त प्रांतांतील जिल्हे आणि मध्यहिंदुस्थानांतील व राजपुतान्यांतील संस्थानें येथें अफू उत्पन्न होते. पहिल्या प्रकारच्या अफूला बंगाल व दुसऱ्या प्रकाराला माळवा अफू असें म्हणतात.

येथें पहिल्या प्रकारच्या अफूचा विचार करावयाचा आहे. (अ. पृ. २६० पहा) मुसुलमान राजे पहिल्या प्रकारच्या अफूची लागवड करीत व तीच कल्पना १७७३ मध्यें वॉरन हेस्टिंग्ज यानें अमलांत आणली. परंतु ह्या पद्धतीनें अफूचें उत्पन्न कमी होऊन ठेकेदार लोक लागवड करणाऱ्या लोकांनां बराच त्रास देऊं लागले. १७९७ मध्यें बंगाल सरकारनें अफूच्या लागवडीचा सर्व मक्ता आपल्याकडे घेतला व ह्याकरितां एक निराळेंच खातें उत्पन्न केलें. त्या खात्याचे दोन भाग असून एक पाटणा व दुसरा गाझीपूर येथें असून त्यांच्यावर बंगाल सरकारची देखरेख असते. खसखशीच्या झाडांची लागवड सरकारी हुकुमानें होऊं लागली व ज्या शेतकऱ्याला तगाई मिळाली असेल त्यानें सर्व उत्पन्न ठरीव दरानें सरकारला विकलें पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आला. त्याप्रमाणें शेतकरी अफू स्थानिक दुकानांत अथवा पेढींत देतो व तेथून ती मुख्य पेढींत पाठविली जाते. अशा शेतकऱ्याकडून १८५० मध्यें शेराला ३॥≈ देऊन व १८९४ मध्यें ६ रुपये देऊन अफू घेतली जात असे. निर्गतीकरितां जी अफू असते तिला 'प्रोव्हिजन ओपिअम' व येथील खपाकरितां जी असते तिला 'एक्साईज ओपिअम' असें म्हणतात. ज्या अफूची निर्गत होते तिची १४० पौंडांची एक पेटी तयार करतात व ती पेटी कलकत्त्याला पाठवून तेथें तिचा लिलाव होतो. अशी एक पेटी अफू उत्पन्न करावयाला १८५० सालीं २८० रुपये खर्च लागत होता, तोच १९०२ सालीं ४९९ रुपये लागूं लागला. ह्यांतील सरकारचें उत्पन्न म्हणजे लिलावानें विकून जी किंमत येईल त्यांतून उत्पन्न करण्याकरितां लागलेला खर्च वजा करून राहिलेली शिल्लक.

बंगाल प्रांतांतून जी निर्गत होते, त्या निर्गतीपासून होणारें उत्पन्न दिवसेंदिवस कमी होत चाललें आहे. याला दोन तीन कारणें आहेत. हंगामाचा अनियमितपणा, एखाद्या वर्षी उत्तम पीक तर एखाद्या वर्षी कमी पीक अशी स्थिति. कारण हंगामांत जर थोडासा फरक झाला तर त्याचा परिणाम अफूच्या उत्पन्नावर फारच लवकर होतो. दुसरें कारण चीनमध्येंच अफूची लागवड होऊं लागली आहे. तिसरें कारण म्हणजे येथील नाण्यांत फरक. पहिल्या कारणानें नुकसान होऊं नये म्हणून अफू शिलकेंत ठेवण्यांत येते. ज्या वर्षी चांगलें पीक असेल त्या वर्षी ठराविक माल विकून राहिलेला वाईट हंगामाकरितां राखून ठेवण्यांत येतो. दुसऱ्या व तिसऱ्या कारणाकरितां उपाय नाहींच असें म्हटल्यास चालेल; कारण तो प्रश्न राजकीय आहे.

पूर्वी माळवा अफू पूर्वेकडच्या प्रांतांत जात असे. परंतु हा व्यापार पोर्तुगीज लोकांच्या हातांत गेला. नंतर ईस्ट इंडिया कंपनीनें पोर्तुगीज लोकांच्या हातांतून हा व्यापार काढून घेण्याचा अतिशय प्रयत्न केला परंतु व्यर्थ; शेवटीं १८३० त हिंदुस्थान सरकारनें ह्या अफूच्या निर्गतीवर कर बसविला. हा कर इंदूरसारख्या विवक्षित ठिकाणीं वसूल केला जातो. नंतर ही अफू मुंबईला येते. ही अफू संस्थानांत होत असल्यामुळें तिचें पीक वगैरेबद्दल सरकार मुळींच काळजी करीत नाहीं. फक्त संस्थानाच्या बाहेर जी अफू येईल तीवरच्या करावद्दल तें काळजी वहात असतें. बंगाली अफूसंबंधीं जीं कारणें दिलीं आहेत तींच कारणें ह्याहि अफूपासून उत्पन्न कमी होण्याला लागू पडतात. १८८० मध्यें चीनमध्यें ह्या अफूच्या ३७,७०० पेट्या गेल्या. त्याच १९०२ मध्यें १८,००० गेल्या. प्रत्येक पेटीमागें कर १८३० मध्यें १७५ रुपये

१८६१ मध्यें ७०० रु., १८९७ त ६०० व शेवटीं ५०० वर आला. नंतर १९०४ मध्यें पुनः ६०० झाला. १८८० मध्यें निवळ उत्पन्न २॥ कोट रुपये होतें तेंच १९०२-०३ मध्यें ९९ लक्षांवर आलें.

बहुतेक सर्व प्रांतांत अफूचा खप आहे. प्रत्येक देशांतील हजार मनुष्यांच्या लोकसंख्येचें प्रमाण धरल्यास आसाम ८.८ शेर, मुंबई २.४, संयुक्तप्रांत आणि बंगाल १.३, मद्रास १.१ शेर असें प्रमाण पडतें.

चीनमध्यें खास अफू होऊं लागल्यामुळें येथील निर्गत बरीच कमी झाली. ह्यामुळें येथें तो माल तुंबून राहिल्यामुळें त्याचा येथें जास्त खप होण्याचा संभव आहे. ह्याची चवकशी करण्याकरितां १८९३ त एक कमिशन बसविण्यांत आलें. त्याच्या रिपोर्टावरून विवक्षित ठिकाणीं अफू उत्पन्न करून जबर जकात बसवावी म्हणजे ह्या खप कमी होईल असें ठरलें.

पाटणा व गाझीपूर येथील अफूचा पुढील प्रदेशांत पुरवठा होतोः—पंजाब, संयुक्तप्रांत, मध्यप्रांत, पंजाब व सरहद्दीवरील कांहीं प्रदेश. तसेंच माळवा अफू, मद्रास, पंजाब व सरहद्दीवरील बऱ्याच भागांत जाते.

वर लिहिलेंच आहे कीं येथें जो खप होतो त्यावर कर किंवा जकात बसविली जाते. सर्व अफूचा ताबा सरकारकडे असल्यामुळें तें फक्त ज्या लोकांनां सरकारी हुकूम मिळतात. त्यांनांच फक्त विकतें. ह्या लोकांपासून किंवा प्रत्यक्ष सरकारी खजिन्यांतून बाकीच्या लोकांनीं अफू विकत घ्यावी. सरकार जें अफू विकतें तें अर्थातच आपला सर्व खर्चवेंच व त्यावर जो ठरविलेला कर असेल तो घेऊन ठरीव दरानें विकतें. किरकोळ अफू विकण्याचीं जीं दुकानें असतात त्यांनां सरकारी परवानगी लागते व त्या दुकानांचा मक्त वार्षिक लिलावानें विकला जातो.

हें उत्पन्न दोन प्रकारचें असतें. कर व विकण्याबद्दल द्यावी लागणारी फी. निरनिराळ्या देशांत तेथील परिस्थिती-प्रमाणें ह्या कर बसविलेला असतो. आसामांत एका शेराला ३४.९ रु. तर पंजाबमध्यें ११.५ रु. आहे.

वरील हकीकत ब्रह्मदेशाला लागू नाहीं. कारण तेथें ब्रह्मी लोकांनां अफू सेवन करण्याची मनाई आहे. तेथेंजे ब्रह्मीतर आहेत तेच अफूचें सेवन करतात व थोडे ब्रह्मी लोकहि करतात. तेथें दुकानें थोडीं असून कमाल अफू किती विकावी हें ठरलें आहे. तेथें जकात अतिशय द्यावी लागते. १९००-१ मध्यें एका शेराला ७२ रु. होती ती १९०२-०३ मध्यें ५१ रु. करण्यांत आली.

मीठ.—इ. स. १९०२-३त हिंदुस्थानला चार कोट मण मीठ लागलें. पैकीं शेंकडा ७० येथेंच उत्पन्न होतें व बाकीचें बाहेरून येतें. साल्ट रेन्ज व कोहाटखाणी (पंजाब) साम्बर सरोवर, कच्छचें रण, मुंबई, मद्रास व सिंधु नदीचें मुख हीं मिठाचीं मुख्य ठिकाणें आहेत. कांहीं ठिकाणीं खणून व कांहीं ठिकाणीं बाष्पीभवनाच्या योगानें मीठ तयार करतात. कांहीं मीठ सरकार स्वतः तयार करतें व कांहीं खासगी लोकांच्याकडे मक्ते दिलेले आहेत. ज्या लोकांनां परवाने नाहींत अशा लोकांनीं मीठ तयार करूं नये म्हणून सक्त पाहणी करण्याकरितां व सार्वत्रिक देखरेख ठेवण्याकरितां एक स्वतंत्र खातें निर्माण करण्यांत आलें असून तें हिंदुस्थानसरकारच्या जमाखर्चखात्याच्या देखरेखीखालीं आहे.

जकातीचा इतिहासः—हिंदु राजे राज्य करीत होते त्यावेळीं देखील मीठ व इतर जिन्नस यांच्यावर जकाती होत्या. तीच पद्धति कंपनीनें सुरू केली. परंतु मीठ, कापूस व साखर खेरीज करून १८४३ मध्यें सर्व जिनसांवरील जकाती काढून टाकण्यांत आल्या. नंतर १८५५ मध्यें कापसावरील जकात काढून ह्या नुकसानीची भरपाई करण्याकरितां मिठावरील कर वाढविण्यांत आला. तो १८६९ ते १८७७ पर्यंत बंगालमध्यें मणामागें ३। रु., उत्तरेकडे ३ रु. मद्रास व मुंबई १॥ – ह्या दरानें होता राजपुतान्यांतील मिठाचें उत्पन्न संस्थानांच्या ताब्यांत होतें, व संस्थानांतून तेथील मीठ बाहेर आल्यावरोबर त्याला जकात द्यावी लागे. परंतु अशा पद्धतीमुळें निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळे मिठाचे दर होते. म्हणून १८७० सालीं सरकारनें साम्बर सरोवराचा मक्ता घेतला. नंतर राजपुतान्यांतील सर्व मिठागर सरकारनें आपल्या ताब्यांत घेतले व संस्थानिकांबरोबर करारनामे करून सर्व कारभार आपल्या ताब्यांत घेतला. ह्या पद्धतीनुसार १८७८ सालीं बंगालमध्यें मणामागें २॥।=, उत्तर हिंदुस्थानांत २॥ रुपये. मद्रास व मुंबई इलाख्यांत २॥ रु. इतका कर द्यावा लागत असे.

१८८२ मध्यें आर्थिक सुस्थिति असल्यामुळें हा दर सरसकट २ रु. करण्यांत आला. परंतु १८८८ सालीं सांपत्तिक अडचणीमुळें २॥ रु. ठेवण्यांत आला तो १९०३ पर्यंत कायम होता. नंतर तो दर २ रु. होऊन १९०५ मध्यें १॥ रु. झाला. १८७९-८० सालीं सरकारचें निव्वळ उत्पन्न ६.९ कोट होतें. प्रत्येक मनुष्याला साधारण ३.६ पासून ५ शेर मीठ लागतें आणि प्रत्येकाला ४.९ आणे कर द्यावा लागे. सध्यां हा कर दरमणी १। रुपया आहे.

जकातीचें सामान्य स्वरूपः—जलमार्गानें हिंदुस्थानांत जे जिन्नस येतात त्यांवर सर्वसाधारण जकात शेंकडा ५ आहे. ह्यामध्यें एखाद्या जिनसावर कमी, एखाद्यावर जास्ती किंवा कांहींवर मुळींच नाहीं अशी गोष्ट होऊं शकते. ही जी जकात बसविली आहे तिचा येथील धंद्यांनां उत्तेजन किंवा त्यांचें संरक्षण करणें हा उद्देश नसून उत्पन्नाची किंवा कराची दृष्टि आहे. असें तत्त्वच आहे कीं, ज्या जकातीमुळें येथील धंदे ऊर्जितावस्थेला येतील, व विलायतेंतील धंद्यांचें नुकसान होईल अशी जकात बसवावयाची नाहीं.

इ.स. १८७६ पर्यंतच्या आयात जकातीः—यांचा दर काय ठेवावयाचा व ती कोणत्या जिनसावर लादावयाची हें ठोरण सरकारला पैशाची जशी गरज असेल त्याप्रमाणें किंवा

सरकारच्या इच्छेप्रमाणें बदलत असतें. 'सरकारच्या इच्छेप्रमाणें' म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, भारतमंत्र्याचें विलायतेंत वास्तव्य व हिंदुस्थानचा बहुतेक व्यापार विलायतवरोबर, ह्यामुळें तेथील व्यापारी जसें सांगतील त्याप्रमाणें भारतमंत्र्याला वागणें भाग पडतें. त्यांत हिंदुस्थानच्या तिजोरीचें नुकसान झालें तरी बेहेत्तर. हें नुकसान भरून काढावयाचें म्हणजे इंग्लंडांतील लोकांच्या फायद्याकरितां येथील गरीबदुबळ्या प्रजेवर कर जास्त लादावयाचे ही युक्ती आहे. बंडाच्या पूर्वी शेंकडा पांच ही सर्वसामान्य जकात होती. १८५९ साली कांहीं पदार्थांवर १० व कांहींवर शेंकडा २० करण्यांत आली. १८६४ मध्यें ही जकात शेंकडा ७॥ ठरविली गेली. परंतु १८७५ साली हा दर सरसकट शेंकडा ५ करण्यांत आला व त्याचें उत्पन्न १.७ कोट रुपये झालें.

इ. स. १८७८–८२ ह्या वेळपर्यंत यंत्रसामुग्री वगैरे हिंदुस्थानला वरीच मिळाली. एतदर्थ येथें बऱ्याच गिरण्या अस्तित्वांत आल्या. परंतु येथील कापसाचा लांब धागा निघेना व कपडाहि जाडाभरडा निघे. येथेंच हा कपडा उत्पन्न झाल्यानें विलायती कपडा खपेनासा झाला. त्यामुळें विलायती व्यापाऱ्यांचें नुकसान होई. त्यांनीं भारतमंत्र्याकडे तक्रार केली व यश संपादन केलें. वर सांगितलेंच आहे कीं, शेंकडा५ ही सरसकट जकात झाली. परंतु ही जकात देखील विलायती कपड्यावर सोसेना. ह्यास्तव १८७८ मध्यें हिंदुस्थानमध्यें ज्या प्रकारचा कपडा निघत असेल त्या प्रकारच्या विलायतेहून येणाऱ्या कपड्यावरील जकात काढून टाकण्यांत आली. आणि असें धोरण ठरविलें कीं जेणेंकरून देशी धंद्यांनां उत्तेजन मिळेल अशी जकात बसवावयाची नाहीं. ह्या धोरणाप्रमाणें जवळजवळ २५।३० जिनसांवरील जकाती, नुकसान सोसूनहि काढून टाकण्यांत आल्या. तरीहि पण तेथील व्यापाऱ्यांचें समाधान होईना. ही गोष्ट सरकारच्या लक्षांत आल्यावर १८८२ साली सर्व प्रकारच्या आयात मालावरील जकाती नाहींशा केल्या. फक्त १८८८ साली राकेल तेलावर गॅलनमागें अर्धा आणा जकात ठेवण्यांत आली व ही स्थिति १८९४ पर्यंत कायम होती.

इ. स.१८९४–९६ ह्या वर्षी वटवड्याचा दर कमी झाल्यामुळें सरकारला वरेंच नुकसान आलें. हें नुकसान कोणच्या तऱ्हेनें भरून काढावें हा विचार पडला. नंतर लॉर्ड हर्शेल ह्यांच्या मंडळानें सूचना केल्याप्रमाणें आयात मालावर जकात बसविण्याचें ठरलें. त्याप्रमाणें कापूस खेरीजकरून सर्व जिन्नसांवर शेंकडा ५ आणि मातीच्या तेलावर दुप्पट जकात ठेवण्यांत आली. परंतु कापसावर जकात ठेवली नसल्यानें साहाजिकच येथील व्यापाऱ्यांनीं तक्रार केली, पण ऐकतो कोण? ह्या तक्रारीचा परिणाम इतका झाला कीं, ह्यापुढें सांपत्तिक स्थिति न सुधारल्यास पुनः शिष्टाई करावी असें आभिवचन भारतमंत्र्यांनीं दिलें. त्याप्रमाणें १८९४ साली सांपत्तिक स्थिति अतिशय वाईट झाली व परदेशी कापडावर शेंकडा ५ ह्या दरानें जकात ठेवणें भाग पडलें. ह्याचा फायदा येथील कारखानदारांनां मिळूं द्यावयाचा नाहीं, अतएव त्याच दरानें येथील कपड्यावर देखील जकात ठेवण्यांत आली. तरीहि विलायती व्यापाऱ्यांचें नुकसानच आहे असें दृष्टोत्पत्तीस आणून दिल्यावर १८९६ मध्यें सूत किंवा कपड्याशिवाय इतर कापसाचे जिन्नस ह्यांवरील जकात बंद करून परदेशी, त्याचप्रमाणें स्वदेशी कपड्यांवर शेंकडा ३॥ प्रमाणें जकात बसविण्यांत आली. परंतु ह्यामुळें सरकारचें वरेंच नुकसान झालें. कारण १८९५ साली कापसावरील जकातीचें उत्पन्न ११६ लक्ष रुपये होतें. तें १९०० पर्यंत सरासरी ८७ लक्षांपर्यंत खालीं उतरलें.

इतर जिन्नस.–१८९४ साली पुनः एकदा जकातीचे दर बदलण्यांत आले. त्यावेळीं धान्यें यंत्रसामुग्री, रेल्वेचें सामान आणि कोळसा ह्यांवरील जकात अजिबात काढून टाकण्यांत आली व पोलाद आणि लोखंड ह्यांवर शेंकडा १ प्रमाणें जकात ठेवण्यांत आली.

ह्या जकाती काढून टाकल्यामुळें होणारें नुकसान भरून काढण्याकरितां इंग्रजी साम्राज्याच्या खेरीज परदेशांतून जी साखर येत होती तिच्यावर जकात बसविण्यांत आली. ही साखर प्रायः जर्मनी, आस्ट्रिया वगैरे देशांतून येत असे. त्या देशांत धंदे ऊर्जितावस्थेस आणण्याकरितां व व्यापार वाढविण्याकरितां सरकार धंदेवाल्यांनां देणगी देत असे. त्यामुळें त्यांची साखर येथें येऊन स्वस्त पडे. तरी पण वरील जकातीनें त्याचें कांहीं नुकसान होत नसे. ह्याकरितां १९०२ साली आणखी जकात वाढविण्यांत आली. अशामुळें ही साखर येथें कमी होऊन मॉरिशस, जावा, चीन वगैरेंमधील साखरेची आयात शेकडा ४० नें वाढली. परंतु येथील साखरेचे धंदे ऊर्जितावस्थेला आणण्याकरितां सरकारनें ह्या परदेशी साखरेवरील जकात वाढविली नाहीं. यापुढें देणगी देणें ज्यावेळीं बंद करण्यांत आलें, त्यावेळीं जर्मनी वगैरेंच्या साखरेवरील जकात काढून टाकण्यांत आली.

हल्लीं कापूस, मद्यें, धातू, इतर कारखान्यांतील माल, मातीचें तेल व साखर ह्या जिन्नसांवर फक्त जकात असून त्यांपासून १८९२ मध्यें ८२ लक्ष, १८९४ त २८२ लक्ष आणि १९०२ मध्यें ४२६ लक्ष रुपये या वाढत्या प्रमाणांत उत्पन्न होत आलेलें आहे.

निर्गत जिन्नस.—१८६० पासून निर्गत मालावरील जकातीचा दर शेंकडा ३ होता. त्यावेळीं कापसाचा माल, धान्यें, कातडीं, नीळ, लाख, तेलें, बी–बियाणें आणि मसाला इतक्याच जिनसांवर जकात होती. नंतर १८७५ मध्यें फक्त तेलें, तांदूळ, नीळ आणि लाख ह्यांवरच ठेवण्यांत आली. पुनः १८८० मध्यें लाख व नीळ ह्यांवरील जकात काढून टाकण्यांत आली. आणि तेव्हांपासून तांदुळावरच फक्त जकात ठेवण्यांत आली आहे. व त्याचा दर मणापाठीमागें तीन आणे आहे.

उ त्प न्ना व री ल क र.—ह्या शब्दाची सामान्य व्याख्या अशी आहे कीं, शेतीशिवाय इतर सर्व निर्वाहाच्या साधनांनीं जें उत्पन्न होईल त्यावरील कर. उत्पन्नावरील सध्याचा कर प्रथमतः १८८६ मध्यें सुरू झाला व ह्या कर १९०२–०३ सालीं १०७ लक्ष होता.

इंग्रजी अमलापूर्वी वरील प्रकारचे प्रत्यक्ष कर पुष्कळ होते. घरावरील, उत्पन्नावरील कर इत्यादि. परंतु ह्यांतील बहुतेक हिस्सा सरकारनें म्युनिसिपालिटीच्या हातांत दिल्यामुळें फक्त उत्पन्नावरील कर व इतर कर आपल्या स्वाधीन ठेवले आहेत. ह्या करांपैकीं पंडारी नांवाचा कर मध्यप्रांतांत १९०२ पर्यंत होता. परंतु तेव्हांपासून तो रद्द करण्यांत आला आहे.

येथें उत्पन्नावरील कराचा इतिहास देणें जरूर असल्यामुळें पुढील कोष्टक दिलें आहे.

| वर्ष | किमान रक्कम | शेंकडा दर रु. | कराचें उत्पन्न लक्ष रु. | कोणच्या प्रकारच्या उत्पन्नावर कर |
|---|---|---|---|---|
| १८६० | २००–<br>५००<br>५००वर | <br>२<br>४ | | सर्व प्रकारच्या उत्पन्नावर |
| १८६२ | ५०० | ३ | १५४ | „ „ „ |
| १८६७ | २०० | २ | ६५ | शेतकीशिवाय सर्व प्रकारच्या उत्पन्नावर |
| १८६८ | ५०० | १ ३/४ | ५१ | „ |
| १८६९ | „ | १ | ...... | सर्व प्रकारच्या उत्पन्नावर |
| १८६९ | „ | ५० | १११ | „ |
| १८७० | „ | ३ १/८ | २०७ | „ |
| १८७१ | ७५० | १ | ८२ | „ |
| १८७२ | १००० | १ | ५८ | „ |
| १८७८ | १०० | १ | ९० | „ |
| १८८० | ५०० | २ × | ५२ | शेतकी व सरकारी नोकरी सारखे धंदे वगळून. |
| १८८६ | १०० | | | „ |
| १८८६ | ५०० ते<br>२०००<br>२०००<br>वर | <br>२<br><br>२ १/२ | | शेतकी, धार्मिक बावी व सोल्जरांचे पगार ह्यांशिवाय सर्व प्रकारच्या उत्पन्नावर. |
| १९०३ | १००० | ... | ... | ... ... ... |

×कमाल कर ५०० रु. मुंबईत २०० रुपये.

वरील कोष्टकावरून कांहीं वर्षें कमी कर व कांहीं वर्षें जास्त कर अशी जरी वस्तुस्थिति दिसते तरी सरासरीनें पाहतां कराच्या उत्पन्नांत शेंकडा ६० ह्याप्रमाणें १८८६ ते १९०२ पर्यंत वाढ झाली असून कर देणारांची संख्या मात्र शेंकडा ३२ नें जास्त झाली आहे. १९०० मध्यें सर्व प्रकारच्या उत्पन्नाची रक्कम—ज्या रकमेवर कर दिला जातो—७८ कोटि रुपये होती. ही रक्कम जितकी मनुष्यें मिळवितात—लहान मुलें, म्हातारी मनुष्यें अशासारखीं निरुद्योगी वगळल्यास—त्यांत जर वाटून दिली तर असें दिसून येईल कीं, मुंबईत ४८ रुपये मिळविणाऱ्या मनुष्याला उत्पन्नावरील कर द्यावा लागतो. त्याचप्रमाणें बंगाल ४१ रु., मध्यप्रांत ३९ रु. आसाम ३५ रु., संयुक्तप्रांत ३४ रु., मद्रास ३० रु., आणि पंजाब २९ रु. ह्याप्रमाणें सरासरी पडते.

गमतीची गोष्ट ही आहे कीं, विलायतेंतील मनुष्य १ पौंडामागें १ पेन्स कर देतो व हिंदुस्थानांतील मनुष्य तो ६ पेन्स देतो. तरी विलायतचें उत्पन्न २५०००००० पौंड आणि हिंदुस्थानचें १८०००००० पौंड आहे. ह्याचें कारण दुसरा देशभिकारी आहे. वाळलेल्या ऊंसाला कितीहि वेळ चरकांत घातलें तरी त्यापासून रस मुळींच निघावयाचा नाहीं.

डो ई प ट्टी व 'थ था मे ड'.—दक्षिण-ब्रह्मदेश व मण्डाले ह्यांमधील सर्व धंदेवाले व इतर ठिकाणचे सरकारी व रेल्वेचे नोकर ह्यांपासून उत्पन्नावरील कर घेतला जातो. दक्षिण-ब्रह्मदेशांत जो मनुष्य उत्पन्नावरील कर देत नाहीं अशा १८ ते ६० वर्षे वयाच्या प्रत्येक विवाहित मनुष्याला ५ आणि अविवाहित अथवा विधुराला २॥ रुपये ह्याप्रमाणें डोईपट्टी द्यावी लागते. उत्तर ब्रह्मदेशांत शेतकरी असो वा नसो, अशा प्रत्येक मनुष्याकडून किंवा प्रत्येक घरामागें वार्षिक १० रु. ह्याप्रमाणें 'थथामेड' ह्या नांवाचा कर द्यावा लागतो. ह्या करापासून १९०२–३ मध्यें ५० लक्ष रुपये उत्पन्न होतें.

स्था नि क क र.—रस्ते दुरुस्त करणें किंवा नवे बांधणें शाळा आणि दवाखानें ह्यांच्या दुरुस्तीचा खर्च, खेड्यांतील आरोग्य आणि इतर स्थानिक कामांकरितां जे कर वसूल करतात त्यांनां स्थानिक कर असें म्हणतात. ह्या करांमध्यें म्युनिसिपालिटीचे करांचा समावेश होत नाहीं. ज्या वेळीं जमिनीच्या साऱ्याची वसूली करितात, त्यावेळीं त्या साऱ्याच्या मानानें ह्या करांचीहि वसूली केली जाते. १९०४–५ सालीं ह्या करांचें उत्पन्न ४१८ लक्ष रुपये होतें. हे कर वसूल करण्याची सुरुवात प्रथमतः १८६५ मध्यें मुंबई व १८६९ मध्यें मद्रास येथें झाली. त्यानंतर बंगाल, संयुक्तप्रांत आणि पंजाब ह्या प्रांतांत १८७१ व नंतर सर्वत्र सरसकट ही वसूली करण्यांत येऊं लागली.

ह्याशिवाय १८७७–७८ सालीं कित्येक प्रांतांत दुष्काळाकरितां कर बसविण्यांत आला. बंगालमध्यें सार्वजनिक कामांकरितां निराळा कर आणि इतरत्र पूर्वीच्या कराचे दर वाढविण्यांत आले. नंतर १९०५ मध्यें सरकारची सांपत्तिक स्थिति चांगली सुधारल्यामुळें १८७७–७८ सालीं दुष्काळाकरितां म्हणून जो कर बसविला होता तो संयुक्तप्रांत, पंजाब आणि मध्यप्रांत येथें रद्द करण्यांत आला व बहुतेक सर्व स्थानिक मंडळांनां (लोकलबोर्ड) राजकीय करांचा (इंपीरियल रेव्हिन्यू) हिस्सा देण्यांत आला.

ह्या करांचे दर आणि त्यांची वसूली ही स्थानिक सरकारनें ठरविलेल्या नियमांप्रमाणें केली जाते. सर्व

हिंदुस्थानांत जमीनीचा कर वसूल करण्याची पद्धति एकच नसल्यामुळें स्थानिक करांचे दरहि अर्थात सारखे नाहींत. रयतवारी प्रांतांत शेतकरी सरकारला तो कर देतो जमीनीची किंमत वाढली असतां फरक पावतो जमीनदारी प्रांतांत जमीनदार सरकारला जो कर देतो त्याची दुप्पट केली जाते व त्याप्रमाणें जमीनीची किंमत केली जाते. कायमची धारेबंदी ज्या प्रांतांत आहे तेथें एकर एक जमीनीची किंमत काढून त्यावर ह्या करांचे दर ठरविले जातात. आणि हे सर्व जमीनीच्या करांच्या वसूलीबरोबरच घेतात.

हे जे कर वसूल होतात ते कांहीं प्रांतांत लोकलबोर्ड व कांहीं ठिकाणीं डिस्ट्रिक्ट बोर्डें ह्यांच्या स्वाधीन करण्यांत येतात. ह्यांशिवाय कांहीं ठिकाणीं खेड्यांतील रामोशी, कोतवाल, किंवा गांवांतील कामें करणारें इतर मनुष्यें ह्यांच्या करितां म्हणून एक कर घेत असतात. शिवाय पोष्टांची व्यवस्था व्हावी एतदर्थ कराच्या रूपानें आणखी थोडी वसूली होते.

करपद्धति व शासनसंस्थाः—शासनसंस्थेच्या स्वरूपाप्रमाणें करपद्धतींतहि फरक असणार. जेथें मुख्य सरकारला लोक देतील तेवढेच अधिकार आहेत, आणि उरलेलें सर्व अधिकार स्थानिक संस्थांस आहेत अशा लोकसत्तात्मक राष्ट्रांत जी करपद्धति चालू आहे ती करपद्धति इंग्लंडसारख्या देशांत पूर्णपणें प्रचारांत येणार नाहीं; कां कीं, तेथें पार्लमेंट देईल तेवढेच अधिकार म्युनिसिपालिटयांना असणार, ह्मणजे एकेठिकाणी मुख्य जबाबदारी स्थानिक सरकारावर आहे तर दुसरीकडे तशी नाहीं. ब्रिटिश राज्यांत स्थानिक संस्थांत बहुतेक गोष्टींत केंद्रवर्ती सत्तेची मंजुरी अगर कायम परवानगी पाहिजे. याचा परिणाम करपद्धतीवर झालाच. असें आहे तरी निरनिराळ्या देशांतील करपद्धती पाहिल्या म्हणजे त्यांत कांहीं सारखेपणा दिसून आल्यावांचून रहाणार नाहीं. अमेरिका व हिंदुस्थान हे दोन्ही देश मोठे आहेत आणि दोन्ही देशांत राष्ट्रीय, प्रांतिक आणि स्थानिक अशा शासनसंस्था आहेत. अमेरिकेंत या तिन्ही शासनसंस्थांचें शासनद्रव्य भिन्न बाबींपासून उत्पन्न होतें. हिंदुस्थानांत ती परिस्थिति आज उत्पन्न झाली नाहीं. प्रांतिक सरकारच्या कराच्या बाबी आणि हिंदुस्थानसरकारच्या कराच्या बाबी यांचें संपूर्ण पृथक्करण नाहीं, आणि प्रांतिक सरकार आणि स्थानिक शासनसंस्था यांस स्वतःच्या जबाबदारीवर कर्जे उभारण्याची सवलत नाहीं. शासनसंस्थेमध्यें जसजसा लोकानुवर्ती फरक होत जाईल ( कलेक्टर केवळ डिस्ट्रिक्ट बोर्डाचा सेक्रेटरी होईल ) तसतसा करपद्धतीच्या स्वरूपांतहि फरक होत जाईल. उलट पक्षीं हिंदुस्थानचें किंवा प्रांतिक सरकारचें जीवन जमीन महसुलावर अवलंबून रहाणार नाहीं, तेव्हां कलेक्टरला दिलेले दांडगे अधिकार अनवश्य होतील व स्वराज्य लोकांस अधिकाधिक प्राप्त होईल, व तसें झालें म्हणजे जिल्ह्यांमध्यें आणि शहरांमध्यें विकासविषयक स्पर्धा सुरू होईल जिल्हे, तालुके व शहरें यांनीं स्वतःच्या विकासासाठीं नवे कर बसविणें व कर्जें काढणें या क्रिया अजून होत नाहींत. तथापि लोकसत्ता वाढल्यानंतर लोकांची करविषयक निर्भयबुद्धि अधिकाधिक दृष्टीस पडूं लागेल.

सर्व देशांत गुंतागुंतीचे कर कमी होऊन अधिक स्पष्ट व थोडके कर असावेत अशी इच्छा दृष्टीस पडूं लागली आहे. व एककरपद्धतीहि लोक आतां पुढें मांडू लागले आहेत.

हेनरी जार्ज (१८३९-१८९७) नांवाच्या अमेरिकन अर्थशास्त्रज्ञानें या करपद्धतीचा प्रथम जोरानें पुरस्कार केला. या पद्धतीचें थोडक्यांत विवेचन असेंः—"प्रत्येक देशांतील जमीनांवर तेथील सर्व लोकांचा मालकी हक्क असतो. हा हक्क एखाद्या पिढीला उडवून टांकतां येत नाहीं; तो अबाधित चालला पाहिजे. जमीनीची खाजगी मालकी कोणाला शाबीत करितां येत नसून, फक्त तिचा खासगी उपयोग घेण्याचा हक्क व्यक्तीस राहील. अशा खाजगी वापरण्यांत येणाऱ्या जमीनीचें वार्षिक भाडें हल्लीं जें कांहीं व्यक्तींना मिळतें, ते सर्व समाजाच्या हिताकरितां खर्च केलें तर सर्वांना सारखा न्याय दिल्यासारखें होईल. या भाड्यावर कर बसवून त्यांत सरकारचा सर्व खर्च भागवितां येणार आहे. तेव्हां इतर सर्व कर बंद करण्यांत येऊन हाच एक चालू ठेवल्यास देशांत आपोआप सर्व सुधारणा होतील; मनुष्यानें तयार केलेल्या कोणत्याहि वस्तूवर कर असणार नाहीं." सर्व करांचे जमीनीच्या भाड्यावर याप्रमाणें एकीकरण करण्याचें जार्जचें हें तत्व ग्रेटब्रिटन, उत्तरअमेरिका, आस्ट्रेलिया व न्यूझीलंड या देशांतील कांहीं अर्थशास्त्रज्ञांना व मुत्सद्यांना पटलें. आहे, व त्याची विवेचन पद्धति विचार करण्याजोगी आहे.

हिंदुस्थानांत जरी बहुतेक जमीन सरकारची धरली गेली आहे तरी जमीनीवर सार्वजनिक मालकीचें तत्व पूर्ण प्रचारांत आलें असें होत नाहीं. तथापि हेंहि म्हणतां येईल कीं, ज्या अर्थी जमीनीच्या करावर अवलंबून राहण्याची क्रिया कमी कमी होत आहे व ज्याअर्थी येथील शेतकरीवर्ग जमीन करा. अत्यंत दरिद्री स्थितींत आहे त्याअर्थी एककरपद्धतीच्या शक्य यशस्वितेविरुद्ध हिंदुस्थानची परिस्थिति हा अत्यंत महत्वाचा पुरावा होतो. हिंदुस्थानसरकारनें नुकतोच करांविषयीं चौकशी करण्याकरितां सर चार्लस टॉड हंटर यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली आहे. सवलतीच्या जकाती देऊन हिंदी उद्योगधंद्यांचें संरक्षण करण्याकरितां गुदस्ता टॅरिफ बोर्ड स्थापन झालेंच आहे.

[ संदर्भ ग्रंथ— गॅझेट ऑफ इंडिया १८९०; १९०४. इं. गॅ. पु. ४; स्ट्रॅची—फायनॅन्सेस अॅंड पब्लिक वर्क्स ऑफ इंडिया; भाटे—अर्थशास्त्राचीं मूलतत्वें; ॲल्स्टन-एलेमेंटस ऑफ इंडियन टॅक्सेशन रिपोर्ट, लंडन १८७०, न्यू टॅक्सेशन इन् इंडिया, लंडन १८७८; रिटर्न्स ऑफ टॅक्सेस लेव्हीड इन् डिफरंट स्टेट्स ऑफ यूरोप; सेलिग्मन—एसेज ऑन टॅक्सेशन. बास्टाबेल.—पब्लिक फिनान्स ]

**करकंब**—मुंबई इलाखा. सोलापूर जिल्हा. करकंब हें पंढरपूरच्या उत्तरेस १४ मैलांवर सुमारें सहा हजार लोकवस्तीचें मोठें गांव आहे. येथें सूत रंगविण्याचा व लुगडीं विणण्याचा धंदा चांगला चालत असून सुमारें ८०० माग चालू असतात. येथें पानाचे मळे आहेत. या ठिकाणीं सोमवारीं बाजार भरतो. येथें पोष्ट ऑफिस व मुलामुलींच्या शाळा आहेत.

**करकुंब**—पुणें-मुंबई सोलापूर रस्त्यावर बारामतीच्या उत्तरेस २० मैलांवर हें खेडें आहे. येथें फिरंगादेवीचीं दोन देवालयें आहेत. यांपैकीं एक गांवांत असून दुसरें जवळील टेंकडीवर आहे. टेंकडीवरचें देवालय फलटणचा देशमुख, संभाजी नाईक निम्बाळकर यानें १७५९ मध्यें बांधलें असें देवाळांत असलेल्या लेखावरूनच समजतें.

**करछना**—संयुक्त प्रांतांत अलाहाबाद जिल्ह्यामध्यें यमुनेच्या पलीकडील तीन तहशिलींपैकीं मध्य तहशील. क्षेत्रफळ २६२ चौ. मै. लोकसंख्या (१९११) १२७६६७. यांत ३३८२ खेडीं व एक लहानसें गांव आहे. या तहशिलीच्या ईशान्येस गंगानदी, वायव्येस यमुना व दक्षिणेस आणि पूर्वेस टोन्स नदी आहे. नद्यांकांठचा प्रदेश वालुकामय असून गंगेखेरीज इतर नद्यांच्या बाजूला दऱ्या, खोरीं पुष्कळ आहेत. मध्यप्रदेशांत जमीन चिकणमातीची असून सुपीक आहे.

**करंज**—मुंबई इलाख्यांत, कुलाबा जिल्ह्यामध्यें पनवेल तालुक्यांतील पेटा व खेडेगांव व द्वीपकल्प: हें मुंबईच्या कॉरनॅक बंदराच्या आग्नेयीस सुमारें ६ मैलांवर आहे. येथून मीठ व दारू हे जिन्नस बाहेरगांवीं रवाना होतात.

इतिहास—करंज हें बेट अनेक प्रकारच्या राज्यपद्धतीखालून गेलें असून त्यावर निरनिराळीं संकटें आलीं होतीं. बाराव्या शतकांत, शिलाहारांच्या कारकीर्दीत तें भरभराटींत होतें. १५३० ते १७४० पर्यंत तें पोर्तुगीजांच्या ताब्यांत होतें. हें वसई प्रांताचा एक भाग असून, त्याला तटबंदी केलेली होती. १७३७ त तें मराठ्यांच्या ताब्यांत गेलें व त्यांच्याकडून १७७४ त इंग्रजांनीं हें घेतलें.

या बेटावरील मुख्य जुने अवशेष म्हणजे द्रोणागिरीवरील पोर्तुगीज किल्ला, गार्ड हाऊस, ख्रिस्ती प्रार्थनामंदिर, व पाण्याचा खजिना, खारवलीच्या पूर्वबाजूवरील बौद्ध लेणें, व उरण गांवांतील पोर्तुगीज किल्ला व प्रार्थनामंदिर हे होत.

**करंज**—या झाडास लाटिनमध्यें पोंगामिआ ग्लाब्रा किंवा गॅलेडुपा इंडिका, संस्कृतमध्यें करंज, मराठींत करंज इत्यादि नांवें आहेत. हें एक मध्यम आकाराचें रानझाड आहे. हीं झाडें छायेसाठीं रस्त्याच्या बाजूस किंवा शेताच्या बांधावर लावितात. याची छाया फार गार असून दाट व आनंदकारक असते. याच्या झाडास ज्या शेंगा येतात, त्यांत चपटें बीं सांपडतें. त्यापासून तेल काढतात. तें जाळावयास चांगलें उपयोगी पडतें व त्याचे औषधिगुणहि बरेच आहेत. उंदराच्या विषावर—करंजाची साल व बी उगाळून त्याचा लेप करावा: खरजेस करंजाचे तेल व कापूर अथवा कडूनिंबाचा रस एकत्र खलून लावावें. अंडवृद्धीवर व गंडमाळेवर—तांदुळाच्या धुणींत करंजाचें मूळ उगाळून लेप करावा. (पदे)

**करंजगांव**—वऱ्हाड. जिल्हा. उमरावती, तालुका एलिचपूर. एलिचपूरच्या ईशान्येस आठ मैलांवर व परतवाड्याहून सहा मैलांवर हें गांव आहे. हें पूर्वी जमादारखानाच्या जहागिरीपैकीं एक असून तालुकदाराचें मुख्य ठाणें होतें. विठ्ठल भागदेव नांवाच्या एका तालुकदारानें इ.स. १८०६ सालीं २५००० रुपये खर्चून एक चांगला दगडी किल्ला येथें बांधलेला होता. परंतु हल्लीं तो फारच मोडकळीस आलेला आहे. गांवाच्या आसपास विहिरींच्या पाण्यावर बागाईत पुष्कळ होते. येथें तांबें पितळेचीं भांडीं चांगलीं होतात. येथें शाळा व पोष्ट ऑफिस असून आठवड्याचा बाजार दर सोमवारीं भरतो. गांवाचे दोन 'खेल' आहेत, त्यांचीं नांवें 'चौधरी' आणि 'मोहल'.

**करजगी**, तालुका—मुंबई इलाखा धारवाड जिल्ह्याचा पूर्व तालुका. क्षे. फ. ४४१ चौ. मै. यांत हावेरी हें मुख्य गांव व १२६ खेडीं आहेत. एकंदर लो. सं. (१९११) ९५८९८. नैर्ऋत्येचा डोंगराळ भाग खेरीजकरून इतर प्रदेश सपाट आहे. यांतून पूर्व पश्चिम तुंगभद्रेला मिळणारी वरदा नदी गेलेली आहे. वार्षिक पाऊस सरासरी ३० इंच पडतो.

गांव.—हें धारवाडच्या आग्नेयीस ५० मैलांवर असून लोकसंख्या सुमारें चार हजार आहे. हरिहर आणि हुबळी यांच्या दरम्यानचें सदर्नमराठा रेल्वेवरचें हें एक स्टेशन आहे.

**करटोली**.—करटोलीचे वेल रानांत पर्जन्यकाळीं येतात. ह्यांस संस्कृतमध्यें कर्टोली; कर्कोटकी, गुजराथींत कंटोळो, मराठींत करटोली; अशीं नांवें आहेत. हा वेल पांच दहा हात पसरतो. या वेलास आषाढाच्या सुमारास फळें येतात. हीं फळें रंगानें हिरवीं असून त्यांवर सुरेख कांटे असतात. याची भाजी स्वादिष्ट असून पथ्यकर असते. वांझ करटोल म्हणून एक या वेलीची जात आहे. तीस फुलेंच येतात, पण फळ लागत नाहीं. पालीच्या विषास करटोलीचा कांदा पाण्यांत उगाळून सात दिवस द्यावा. खर व मूत्रकृच्छ्रावर वांझ कर्टोलीचा कांदा एक तोळा मधाबरोबर देतात. रक्ती मूळव्याधीवर करटोलीच्या कंदाचें चूर्ण साखरेंत देतात.

**करण**—ही लेखकांची एक जात आहे. १९११ सालीं हिंदुस्थानांत एकंदर करण २५५६०९ होते, पैकीं बिहार-ओरिसामध्यें १४७५११, बंगालमध्यें ५३१८६, मद्रासमध्यें ५४१०९ व वऱ्हाड-मध्यप्रांतांत ९६३ होते. कांहीं जुन्या ग्रंथकारांनीं यांची उत्पत्ति वैश्य बाप व शूद्र आईपासून झाल्याचें लिहिलें

आहे. ययातिकेसरी नांवाच्या ओरिसाच्या राजानें ( इ. स. ४४७–५२६ ) यांस कारकुनी करण्याकरिनां उत्तर हिंदुस्थानांतून आणिलें. कराणी शब्दाचा उपयोग वरेच दिवस इंग्रजी राज्यांत दुय्यम-कारकुनांस करीत असत. हे लोक कायस्थाप्रमाणें चित्रगुप्तास आपला पूर्वज समजतात. यांचीं गोत्रें ऋषींच्या नांवापासूनच. पडलीं आहेत. कांहीं कांहीं प्राणी देखील यांचीं देवकें झाले आहेत.

उच्च जातींत असलेले लग्नसंबंधीं सर्व प्रतिबंध व नियम यांच्या जातीस लागू आहेत. मुलींचें लग्न १० व्या वर्षी होतें, पण यापेक्षां उशीरा झालें तरी त्यास प्रत्यवाय नसतो. ' हस्तग्रंथनविधि ' झाला म्हणजे लग्न होतें. वधुवरांचे हात दर्भांनीं बांधतात. वधू लग्न झाल्यावर सासरीं कांहीं दिवस जाते पण लौकर परत येते व ऋतुमती होईपर्यंत माहेरींच असते. हे स्वतःस स्मार्त म्हणवितात. हिंदु देवतांची पूजा करतात. यांच्यांत परमार्थ व कुंभीपतिया असे दोन पंथ आहेत. पहिल्या पंथाचे लोक फार अश्लील विधी करतात. हे लोक प्रेतांचें दहन करून त्यांचीं श्राद्धें करतात. कांहीं ब्राह्मण यांच्या हातची पक्की रसोई खातात. यांचा धंदा कारकून, शाळामास्तर, पटवारी व जमाखर्च लिहिण्याचा आहे. या लोकांच्या सवयी उधळपट्टीच्या आहेत. इतर अज्ञानी लोकांचा गैरवाजवी फायदा घेण्याच्या यांच्या संवयीमुळें हे कायस्थाप्रमाणेंच अप्रिय झाले आहेत.

ओरिसामध्यें क्षत्रिय, करण, खांडाईत व उडिया अशा चार जाती आहेत. त्यांमध्यें वैवाहिक सोपानपरंपरा आढळून येते. करण खांडाइतांच्या मुली करतात व क्षत्रियांस मुली देतात, आणि खांडाईत करणांस मुली देतात व उडियांच्या मुली करतात. ( से. रि. )

**करणकमलमार्तंड**—हा करणग्रंथ असून वल्लभ वंशातील दशवल नांवाच्या राजानें हा ग्रंथ केला. याचा काल शके ९८० हा होय. यांत हा अमुक सिद्धांताला अनुसरून केला असें म्हटलेलें नाहीं. तरी यांत अष्टप आणि तिथिशुद्धि यांची वर्षगति दिली आहे ती राजमृगांकोक्त बीजसंस्कृतब्रह्मसिद्धांतमताशीं मिळते.

**करणगड**—बंगाल. भागलपूर जिल्ह्याच्या मुख्य पोटविभागांतील एक लहानसा डोंगर अथवा पठार. त्या डोंगराला किल्ला म्हणतात. व तेथें बुद्धकालापूर्वीचा किल्ला असावा असा समज आहे. डोंगरावर शिवालयें असून, तेथें कार्तिकी अमावास्येला पुष्कळ लोक जातात.

**करणपाली**—सारंगगड संस्थानच्या दक्षिणेस असलेल्या सरिया परगण्यांतील डोंगरी प्रदेशाजवळील जमीनदारी. हीं १२ गांवें असून क्षेत्रफळ ३६४५ एकर आहे. जमीनदार गोंड जातीचा असून डोंगरपाली जमीनदाराप्रमाणेंच यास स्वतःच्या ताब्यांतील गांवांचा सारा गोळा करावा लागतो, व संस्थानिकास ' टाकोळी ' द्यावी लागते. यांतील जंगलांवर जमीनदाराचे कांहींच मालकी हक्क नाहींत.

**करणप्रकाश**— हा एक करणग्रंथ आहे. याचा आरंभकाल शके २०१४ असून करणप्रकाशाचा कर्ता ब्रम्हदेव नांवाचा ज्योतिषी होता. त्यानें आर्यभट ग्रंथास अनुसरून हा ग्रंथ केलेला आहे. चंद्र हा ब्रम्हदेवाचा बाप होता. करणप्रकाश हा ग्रंथ आर्य पक्षाचा आहे. करणप्रकाशावरून सर्व तिथी केलेल्या असें पंचांग सांप्रत कोठें चालत असेल असें दिसत नाहीं.

**करणवाघेला**.—अनहिलवाड्याचा राजा करण वाघेल ( १२९६—१३०४ ) हा वाघेलवंशांतील होता. याचा पूर्वज अरुणराज हा कुमारपाल सोळंखी याचा मावसभाऊ; याला वाघेल परगणा कुमारपालानें जहागीर दिला होता. अरुणाचा मुलगा लवणप्रसाद व त्याचा मुलगा वीरधवल, या पितापुत्रांनीं गुजराथ व सोरठ ( सुराष्ट्र ) प्रांतांत लुटालूट करून आपली जहागीर वाढविली. वीरधवल फार शूर व धाडशी होता. एकदां देवगिरीकर यादव व उत्तरेकडील रजपूत राजे यांनीं एकदम त्याच्यावर चढाई केली असतां त्यानें मोठ्या युक्तीनें बचाव केला. त्याच्या वाघेल जहागिरीवरून त्याच्या वंशास वाघेल हें अडनांव मिळालें. त्यानें आपली राजधानी अनहिलवाड्यास केली. त्यानें दिल्लीच्या पातशहासहि थकविलें. त्यानें प्रजेस सुख दिलें. तो मेला तेव्हां त्याच्या १८० सेवक व आप्तांनीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं ! यानें अनेक कलाकौशल्याच्या इमारती व देवळें बांधलीं. वीरधवलाचा पुत्र वीसलदेव, त्याचा अर्जुनदेव, त्याचा लवणदेव, त्याचा सारंगदेव व त्याचा पुत्र करणदेव होय. करणदेव हा फारसा मुत्सद्दी किंवा पराक्रमी नव्हता; उलट थोडासा दुर्गुणी मात्र होता. तो ' घेलो ' (वेडा ) या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें आपला नागर ब्राह्मण प्रधान माधव याच्या पत्नीवर ( राणा देवी ? ) बलात्कार केला. त्यामुळें माधवानें अल्लाउद्दीन खिलजीला राष्ट्रद्रोह करून गुजराथेवर आणलें व अनहिल पट्टणचें राज्य त्याच्या हातांत दिलें. करणराजानें युद्ध केलें परंतु, फितुरीमुळें त्याचा नाइलाज झाला. पट्टण सोडून देवगिरीस रामदेवाच्या आश्रयास तो गेला. त्याची राणी कमला ( कौला ) देवी ही पकडली जाऊन अल्लाउद्दिनानें तिला आपली बेगम केली. मलीकफकापूर हा करणराजावर चालून गेला. दोन महिने कर्णानें त्याला दाद दिली नाहीं. रामदेवरायाचा आप्त शंकरदेव यानें पूर्वी, कर्णाच्या देवलदेवी नांवाच्या मुलीस मागणी घातली होती, परंतु प्रथम त्यानें ती नाकारली. या संकटकालीं शंकरदेवानें त्याला सहाय्य केलें, तेव्हां त्यानें मागणी कबूल करून तिला शंकरदेवाकडे पाठविलें. वाटेंतच दुदैवानें ती मलिक काफूरच्या हातीं लागली. देवलच्या आईनें बादशहाकडून काफूरला हुकुम पाठविला कीं, देवलला हस्तगत करून दिल्लीस पाठवावें. म्हणून काफूर तिच्या शोधांतच होता.

पुढें तिला दिल्लीस पाठविलें तेथें अल्लाउद्दीनानें कौला-देवीच्या संमतीनें शहाजादा खिजरखान याच्याशीं तिचा निका लाविला. दोघी मायलेकींचे विवाह जबरदस्तीनें झालेले होते. आपण बाटले गेलों हें त्या मानी स्त्रियांस सहन होत नसे. अशी एक दंतकथा सांगतात कीं, संधी सांपडतांच दोघी मायलेकींनीं परस्परांनां खंजीर खुपसून ठार मारिलें ! पण रासमालेंत असें लिहिलें आहे कीं, बादशहा कौलादेवीच्या सर्वस्वी आधीन असून तिच्या आग्रहावरूनच देवलला दिल्लीस आणवून शहाजाद्याशीं त्यानें तिचें लग्न लाविलें होतें.

इकडे राजा कर्ण हाहि अज्ञातवासांत मृत्यु पावला. या गुजराथच्या ( करण ) राजावर भाटांनीं अनेक कवित्तें रचिलेलीं आहेत. [ रासमाला. मु. रि. ]

**करणोत्तम**—करणोत्तम ग्रंथाचा काल शके १०३८ हा आहे. महादेवकृत श्रीपतिरत्नमाला टीकेंत करणोत्तम ग्रंथाचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे. सूर्यतुल्य करणोत्तम, किंवा राजमृगांक यावरून स्पष्टग्रह करावे अशा अर्थाचें ताजकसारग्रंथांतील एक वाक्य आहे. त्यांत सूर्यतुल्य-ग्रंथ सौरपक्षाचा, करणोत्तम आर्यपक्षाचा, व राजमृगांक ब्रम्हपक्षाचा असावा असें दिसतें.

**करतोया**—बंगाल प्रांतांतील एक नदी. ही जलपैगुरी जिल्ह्याच्या अगदीं वायव्येस वैकुंठपूर जंगलांत उगम पावून २१४ मैल वहात गेल्यावर बोग्रा जिल्ह्यांत हल्हालिया नदीला मिळते. या दोन्ही नद्या मिळून होणाऱ्या प्रवाहाला फुलझूर नदी म्हणतात व ती यमुनेला मिळते.

प्राचीन काळीं ही नदी फार पवित्र मानली जात असे, असें पुराणांवरून समजतें. हिचा महाभारतांत उल्लेख आहे. प्राचीन कामरूपच्या राज्याच्या सरहद्दीवर ही नदी असून पलीकडे पोड लोकांचा पौंड्रवर्धन हा देश होता, असा जोगिनीतंत्रांत उल्लेख आहे. ह्याच नदीच्या उजव्या तीरानें महंमद–इ–बख्तयार खिलजीनें १२०५ मध्यें तिबेटवरील अयशस्वी स्वारी केली. सातव्या शतकांत, ह्युएनत्संग यानें कामरूपाकडे जातांनां ओलांडलेली मोठी नदी हीच होय यांत संशय नाहीं.

करतोया नदींत हल्लीं गाळ सांचलेला असून तींतून नांवाहि चालत नाहींत, यामुळें तिला फारसें महत्व उरलेलें नाहीं.

**करनाली**—मुंबई. बडोद्याच्या सिनोर पोटभागांतील एक खेडें. ओर व नर्मदा नदीचा संगम येथें झाल्यामुळे हें स्थल पवित्र मानतात. फार पुरातन काळीं देव एकदां नर्मदेच्या कांठीं जमले होते, व तेथें देवळें उभारण्यांत आलीं. असें म्हणतात. अशीं देवळें करनालीला पुष्कळ आहेत, त्यांत सोमेश्वर, कुबेर व पावकेश्वर यांचीं देवळें महत्वाचीं असून कार्तिक व चैत्री पोर्णिमेला येथें जत्रा भरतात.

**करबला**—करबला हें शहर तुर्कस्तानांत ( आशियांतील ) असून बगदाद प्रांतांतील एका भागाची राजधानी आहे. ह्या शहराच्या भोंवतालचा भाग अत्यंत सुपीक असून त्यांत फळझाडें खजुरांचीं झाडें वरीच आहेत. शहराचा नवीन भाग पाश्चात्य पद्धतीवर वसला असून शहराचा मधला भाग जुन्या पद्धतीचा आहे व त्यांतील रस्ते अरुंद व घाणेरडे आहेत. चवथा खलीफा अली याचा मुलगा हुसेन याची त्याचा प्रतिस्पर्धी जो यझीद त्याच्या सैन्यानें ह्या गांवीं ता. १० आक्टोबर ६८० रोजीं कत्तल केली. ह्या ठिकाणीं पहाण्यासारखी अशी हुसेनची कबर असून तिचा घुमट सोन्याचा आहे. शिया पंथाचे मुसुलमान येथें यात्रेला येतात. मक्केच्या खालोखाल या ठिकाणीं यात्रेकरूंचा भरणा असतो. पूर्वीं येथें स्वयंशासित धर्मसत्ता होती. परंतु इ. स. १८४३ सालीं तुर्क सरकारनें हें शहर तोफा डागून घेतलें. त्यावेळेपासून तुर्कसाम्राज्याचें हें शहर एक महत्त्वाचें ठिकाण होतें. सध्यां मेसापोटेमियावर ब्रिटिशांची सत्ता आहे. येथील लोकसंख्या सुमारें ६५,००० आहे. त्यांपैकीं बहुतेक लोक शियापंथाचे इराणी आहेत. यहुदी व ख्रिस्ती लोकांनां येथें राहण्यास मनाई आहे. (“ मोहरम ” पहा ).

**करमगड**—पंजाबांतील पतियाळ संस्थानांतील एक निजामत. क्षेत्रफळ १८३४ चौरस मैल. लो. सं. ( १९०१ ) ५००६३५. या निजामतींत पतियाळा, भवानगिड, सुनाम व नरवान अशा चार तहशिली असून पतियाळा, समान, सुनाम, व सनौर हीं मोठीं गावें व ६६५ खेडीं आहेत. निजामतीचें मुख्य ठिकाण भवानीगड अथवा धोदान हें आहे.

**करमाळें**, तालुका—मुंबई. सोलापूर जिल्ह्यामधील तालुका. क्षेत्रफळांतील ७७२ चौ. मै. यांत करमाळें ( मुख्य ठिकाण ) व दुसरीं १२२ गावें आहेत. लो. सं. ( १९११ ) ९३७४६. या तालुक्यांत वस्ती बरीच विरळ आहे. याच्या पश्चिमेस भीमा व पूर्वेस सिना या नद्या असून, या केमजवळचा डोंगर व दोन्ही नद्यांमधील पाणलोट सोडल्यास इतर सर्व भाग सपाट आहे. तालुक्यांतील सुमारें अर्धी जमीन काळी व बाकीची वालुकामय व तांबडी आहे. पाऊस सरासरी २३ इंच पडतो. सोनारी येथें दरवर्षी एप्रिल महिन्यांत मोठी जत्रा भरते.

गांव.—करमाळें हें जी. आय. पी. रेल्वेवरील जेऊरस्टेशनापासून उत्तरेस सुमारें १२ मैलांवर आहे. हें तालुक्याचें ठिकाण असून लोकसंख्या सुमारें ७००१ आहे. गांवापासून जेऊर स्टेशनापर्यंत चांगली पक्की सडक आहे. येथें पूर्वी निंबाळकर घराण्याची एक शाखा असून त्यांच्याकडे सभोंवतालच्या मुलुखाची जहागीर असे. या गांवाचा संस्थापक रंभाजी बावाजी यानें आरंभ केलेला व त्याचा मुलगा जानोजीराव यानें पूर्ण केलेला असा एक किल्ला येथें असून त्यामध्यें तालुकाकचेरी आहे. हा किल्ला दक्षिणेंतील मोठया किल्ल्यांपैकीं एक असून त्यामध्यें १०० घरें आहेत. येथें गुरें, धान्य, तेल व कापड यांचा

वराच व्यापार चालतो. येथें कांहीं विणकरी लोक असून पागोट्याचा कुसुंबी रंगहि चांगला होतो व उत्तम टिकाऊ कापड निघतें. येथें तालुकाकचेरी, म्युनिसिपालिटी, दवाखाना, पोष्ट ऑफीस, शाळा, वाचनालय इत्यादि इमारती असून एक भवानीचें देऊळहि आहे. येथील म्युनिसिपालिटी १८६७ सालीं स्थापन झाली असून तिचें उत्पन्न व खर्च सरासरी ९००० रुपये असतो.

येथील भवानीचें देऊळ निंबाळकरांनीं रु. १७,५०,००० खर्चून बांधलें. त्याला रु. १७०० चें वर्षासन आहे. येथें कार्तिक शु. १५ पासून ४ दिवस प्रतिवर्षी जत्रा भरते. हें इ. स. १७२५ पासून निझाम उल्मुल्कच्या ताब्यांत होतें, तें त्यानें १७२७ मध्यें रंभाजीराव निंबाळकर यांस त्यांच्या कांहीं पुण्यांतील प्रदेशांबद्दल मोबदला म्हणून दिलें.

**करवंद.**—( करिसा करन्डम ) हें एक कांटेरी झुडुप आहे. आयोध्या, बंगाल, दक्षिणहिंदुस्थान, कोंकण व कानडा येथील जंगलांतून हीं झाडें आपोआप उगवतात. यास लॅटिन मध्यें कॅरिसा करन्डस, मराठींत करवंद, बंगालींत करौन्दा, हिंदींत तिमुखिया, कानडींत कारेकइ वगैरे नावें आहेत. पंजाबांत याच्यापासून लाख उत्पन्न करितात. तिकडे हीं फळें जुलई व ऑगष्ट या महिन्यांत पिकतात. दक्षिणेंत मे ते जून महिन्यांत पिकतात. ऐने-इ-अकबरींत ( १५९० ) हीं फळें एका रुपयाला ७० शेर मिळत असल्याचा उल्लेख केला आहे.

उ प यो ग.—कातडीं कमाविण्यास व रंग बनविण्यांस यांचा उपयोग करितात. हीं फळें हिरवीं असतांनां आंबट व कांहींशीं तुरट लागतात. पिकलेलीं फळें काळीं असून जरा अंबूत गोड लागतात. हीं फळें पित्त व दाहशामक आहेत. याच्या झुडपाचें मूळ कडवट असून खरूज झाली असतांना तें कापूर व लिंबाच्या रसांत उगाळून लावितात. पिकण्यापूर्वी कांहीं दिवस या फळांचें लोणचें घालतात. हिंदुस्थानांत कच्चीं फळें शिजवून त्यांचें रायतें किंवा मुरंबा करितात. याचें लाकूड कठिण व गुळगुळीत असतें. त्याच्यापासून चमचे, फण्या वगैरे तयार करितात. याच्या झुडपांचें दाट कुंपण होतें व तें कांटेरी असल्यामुळें त्याच्यामधून मार्ग मिळणें कठिण जातें.

औ ष धी उ प यो ग—करवंदीचें मूळ पाण्यांत उगाळून थोडेंसें पोटांत घावें, विषबाधा झाली असल्यास वमन होणार नाहीं. खरजेस- कडव्या करवंदीचें मूळ पाण्यांत किंवा गोड्या तेलांत उगाळून लावावें. क्षतांतील कृमि मरण्यास— कडव्या करवंदीचें मूळ मद्यामध्यें उगाळून लेप द्यावा व थोडें पाणी क्षतांत सोडावें.

क रि सा स्पि ना र म्—याचीच दुसरी जात. हें नेहमीं हिरवें असणारें कांटेरी झुडुप आहे. रुक्ष कटिबंधांतून हीं आपोआप उगवतात. ह्यांचीं फळें व लांकूड यांचा उपयोग करिसाकरवंदीच्या फळांप्रमाणें व लांकडाप्रमाणेंच करितात. खडकाळ, नापीक जमीनीवर मेंढयांनीं व बकऱ्यांनीं खाल्लें तरी हें झुडुप जीव धरून राहतें.

**करवली,** सं स्था न.—करवली अथवा करौली हें राजपुतान्याच्या पूर्वेकडील संस्थान आहे. क्षेत्रफळ १२४२ चौरस मैल. याच्या उत्तरेस भरतपूर; वायव्येस व पश्चिमेस जयपूर; दक्षिणेस व आग्नेयीस ग्वाल्हेर; व पूर्वेस धोलपूर. बहुतेक सर्व प्रदेश तुटक व डोंगराळ असून विशेष मनोहर नाहीं; परंतु लष्करीदृष्ट्या हा सोयीचा असल्यामुळें यादव राजांच्या कारकीर्दीत तहनगड ( समुद्रसपाटीपासून उंची १३०९ फूट ) येथें राज्यकारभाराची जागा होती. दक्षिणेकडे भैरव व उटगीर हीं सर्वांत मोठीं शिखरें आहेत. त्यांची समुद्रसपाटीपासून उंची अनुक्रमें १५६५फूट व १४७९फूट आहे. चंबळा, बनास, मोरेल व पंचनद ह्या संस्थानांतील मुख्य नद्या होत. गांवठी प्राण्यांखेरीज, चंबळा नदीजवळच्या जंगलांत वाघ, चित्ता अस्वल, नील, गाय, सांबर वगैरे प्राणी पुष्कळ आढळतात. हवा एकंदरींत बरी आहे. वार्षिक पाऊस राजधानीच्या शहरीं सरासरी २९ इंच पडतो. ईशान्य भागांत मांचिलपूर येथें व आग्नेयीस मंड्रेल येथें सामान्यतः पाऊस सर्वांत जास्त होतो.

इतिहास.—करवलीचा महाराज यादव ( ? ) वंशीय रजपुतांचा मुख्य असून श्रीकृष्णाचा वंशज आहे असें म्हणतात. यादव लोक हे मथुरेभोंवतालच्या व्रजभागाजवळ रहात होते आणि एके काळीं त्यांच्या ताब्यांत अर्धा अलवार व सर्व भरतपूर, करवली, व धोलपूर, यांखेरीज गुरगांव व मथुरा हे ब्रिटिश जिल्हे, यमुनेच्या पश्चिमेकडील आग्र्याचा बराच भाग व चंबळा नदीच्या कांठचा ग्वाल्हेर संस्थानचा कांहीं भाग एवढा मुलुख होता असें म्हणतात. अकराव्या शतकांत कृष्णापासून अठ्यांशीवा पुरुष विजयपाल यानें बयाना येथें आपली सत्ता स्थापन करून एक किल्ला बांधला. त्याचा वडील मुलगा तहनपाल यानें १०५८च्या सुमारास तहनगड नांवाचा प्रख्यात किल्ला बांधला. हा अद्यापि करवली संस्थानांत आहे. कुंवरपालाच्या कारकीर्दीत ११९६ या वर्षी महंमद घोरी व त्याचा सेनापति कुतुबुद्दीन यांनीं प्रथम बयाना व नंतर तहनगड हीं सर केलीं. सर्व मुलूख शत्रूच्या ताब्यांत गेल्यानंतर कुंवरपाल रेवासस्थानांत पळून गेला त्याच्या वंशजांपैकीं अर्जुनपाल नांवाच्या एका पुरुषानें आपल्या पूर्वजांस मुलुख परत मिळण्याचें मनांत आणून १३२७ त मंड्रेलवर हल्ला केला; व हळू हळू तहनपालाच्या ताब्यांत असलेला सर्व मुलुख परत मिळविला. व १३४८ त हल्लींची राजधानी जे करवली गांव त्याची स्थापना केली. यास "करौली" असेंहि म्हणतात.

अकबराच्या वेळीं ( १५५६—१६०५ ) हें संस्थान दिल्लीच्या साम्राज्यांत अंतर्भूत झालें. करवली संस्थानचा सर्वांत प्रसिद्ध संस्थानिक गोपाळदास याजवर अकबराची बरीच मर्जी असून त्याच्याच सांगण्यावरून गोपाळदासानें

आग्र्याच्या किल्ल्याचा पाया घातला. मोंगल सत्तेच्या ऱ्हासानंतर हें संस्थान मराठ्यांनीं आपल्या ताब्यांत आणिलें; व या संस्थानापासून ते २५००० रु. खंडणी घेत असत.

करवलकर हे जाधव वंशांतील राजे होते. यांच्याच शाखेंतील प्रसिद्ध पिलाजीजाधव वाघोलीकर होत. पिलाजीच्याच विनंतीवरून १७२९ मध्यें बाजीराव साहेबांनीं संस्थानिकास अभयपत्र देऊन संस्थान खालसा केलें नाहीं. ते तेथें आपला कमावीसदार ठेऊन खंडणी घेत असत. पानिपतापर्यंत खंडणी सुरळीत आली. नंतर तिकडे जाटांचा अंमल झाल्यानें खंडणीस अडथळा झाला. पुढें कानडे व विनिवाले यांनीं जाटांनां पराभूत करून आपला अंमल बसविला. मध्यंतरीं नजीबाचा अंमल थोडा वेळ होता. परंतु शिंदे-होळकरांनीं तो उठविला व साऱ्या हिंदुस्थानांत आपला अंमल बसविला. त्यावेळीं पुन्हां करवलची खंडणी येऊं लागली. पुढें पुढें ती शिंदेच परभारां वसूल करीत. शिंद्यानंतर पेशवाईअखेर इंग्रजांनीं तो प्रांत हस्तगत केला (रा. खं. १० ४८९—९०). मराठ्यांचा अखेरचा कमावीसदार नारोत्र्यंबक भावे हा होता. यानें फिरंग्याकडे संस्थान जाऊं नये म्हणून १८१० च्या सुमारास फार खटपट केली. तो म्हणतो 'साठ पासष्ट वर्षांचा अंमल कसा सोडावा ? परंतु पेशवे, शिंदे व इतर सरदार यांच्यामध्यें तंटे लागल्यामुळें अखेर करवली फिरंग्यांच्या हातीं गेली' (कित्ता ४९४–९६).

याप्रमाणें इ. स. १८१७ त इंग्रजांनीं करवली संस्थान आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. येथील संस्थानिकाला खंडणी द्यावी लागत नाहीं; परंतु जरूर लागेल तेव्हां ब्रिटिशांनां फौजेची शक्य ती मदत द्यावी लागते. संस्थानिकाला महाराजा असें म्हणतात व १७ तोफांची सलामी मिळते. त्याला दत्तक घेण्याचा अधिकार आहे. मागले सात संस्थानिक दत्तकच होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तहनगड व राजधानीच्या दक्षिणेकडे आठ मैलांवर असलेलें बहादुरपूर हीं गांवें जुनीं असून तेथें पुराणवस्तूंचे अवशेष आहेत.

लोकसंख्याः—संस्थानांत लहान व मोठीं मिळून ४३७ गांवें असून एकंदर लो. सं. (१९२१) १३३७३० आहे. संस्थानांत करवली ( किंवा सदर), जिरोत, माचिलपुर, मंड्रेल व उटगीर असे पांच तालुके आहेत. जिरोत व उटगीर या तालुक्यांचीं मुख्य ठिकाणें अनुक्रमें सपोत्र, व कर्णपूर हीं असून बाकीच्या तालुक्यांचीं मुख्य ठिकाणें त्यांच्या ( तालुक्यांच्या ) नांवाच्याः गांवीं आहेत. करवली हें एकच मोठें व म्युनिसिपालिटीचें गांव आहे.

शें. ९४ लोक हिंदुधर्मी असून मुख्यतः कृष्णभक्त आहेत व शें. ५ पेक्षां जास्त मुसुलमान आहेत. येथें पश्चिमहिंदी लोक डांगी, डांगभाग, वगैरे पोटभाषा बोलतात.

शेतकीः—बाजरी, हरभरा, उडीद गहूं, ज्वारी, थोड्या प्रमाणावर कापूस, खसखस व ऊंस हीं पिकें संस्थानांत होतात. शेतीला पाणी विहिरींचें किंवा तळ्यांचें दिलें जातें. संस्थानांत जंगल म्हणण्यासारखें नसून चांगलें इमारती लांकूड थोडें आहे. वालुकामय तांबडा दगड संस्थानभर सांपडतो. करवलीच्या ईशान्येकडील डोंगरांत अशुद्ध लोखंड सांपडतें. परंतु त्यापासून शुद्ध लोखंड तयार करणें फायदेशीर पडत नाहीं.

व्यापार व दळणवळणः—संस्थानांत महत्वाचे असे कारखाने नाहींत. कापड विणण्याचा व रंगविण्याचा धंदा थोडासा चालतो. लांकडी खेळणीं, पेट्या व पितळी दागिने वगैरे जिन्नस थोड्या प्रमाणांत तयार होतात. करवली येथें होणारीं तागाचीं पोतीं आसपासच्या बाजारांत प्रसिद्ध आहेत.

मुख्य निर्गत मालः—कापूस, तूप, अफू, जिरें, तांदूळ व इतर धान्य.

मुख्य आयात मालः—कापड, साखर, गूळ, मीठ व नीळ; बहुतेक व्यापार शेजारच्या जयपूर व ग्वाल्हेर संस्थानशीं आणि आग्रा जिल्ह्याशीं चालतो.

या संस्थानांत आगगाड्या नाहींत. बी. बी. सी. आय. रेल्वेवर हिंदौन रोड ( राजधानीच्या उत्तरेस ५२ मैल ) व ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वेवरून धोलपूर ( पूर्वेकडे सुमारें ६५ मैलांवर ) हीं जवळचीं रेल्वे स्टेशनें आहेत. राजधानीपासून हिंदौन रोडच्या दिशेनें जाणाऱ्या ९ मैल सडकेखेरीज इतर सडका संस्थानांत नाहींत. या संस्थानांत पांच ब्रिटिश पोस्ट ऑफिसें व करवली येथें तार ऑफिस हीं आहेत.

राज्यकारभारः—या संस्थानचा कारभार महाराजा पहातो. त्याला मदत करण्याकरितां पांच सभासदांचें एक मंडळ असतें. करवली हा त्या मंडळाचा अध्यक्ष असतो. करवली ( किंवा सदर ), जिरोत, माचिलपूर, मंड्रेल व उटगीर या तहसिलींपैकीं प्रत्येकीवर तहसिलदार असून त्यांवर डेप्युटीकलेक्टर नांवाचा एक मुलकी अधिकारी असतो. प्रत्येक गांवांत तहसिलिया नांवाचा एक संस्थानचा नोकर असतो व तो विभागाच्या पटवाऱ्याच्या हाताखालीं काम करतो. संस्थानांत सामान्यतः ब्रिटिश कायदेच चालतात; परंतु तेथील पीनलकोडांत गाय व मोर मारणें हे गुन्हे मानलेले आहेत. महाराजाला देहांत शिक्षा देण्याचा अधिकार आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें ६ लक्ष रुपये आहे.

अगदीं अलीकडील काळापर्यंत करवली संस्थानचीं स्वतःचीं नाणीं असत. १८७० त संस्थानच्या रुपयाची किंमत ब्रिटिश रुपयापेक्षां अर्ध्या आण्यांनीं जास्त होती; परंतु पुढें ती कमी झाली. म्हणून अलीकडे दरबारनें संस्थानांत फक्त ब्रिटिश नाणेंच चालू ठेवलें आहे.

१९११ मध्यें, संस्थानांत शें. ४ पुरुषांनां व शें. ०.२ स्त्रियांनां लिहितां येत होतें. राजधानीच्या शहरीं असलेलें हायस्कूल व मुलींची शाळा यांखेरीज संस्थानांत कांहीं सरकारी व कित्येक खासगी शाळा आहेत. सरकारी शाळांत शिक्षण मोफत असतें.

गां व.—राज त्यांत याच नांवाच्या संस्थानच्या राजधानीचें ठिकाण. हें मथुरा, ग्वालेर, आग्रा, अलवार, जयपूर व टोंक या शहरांपासून सारख्याच (सुमारें ७५ मैल) अंतरावर आहे. हें सदर तहसिलीचें मुख्य ठिकाण आहे. हें गांव इ. स. १३४८ त राजा अर्जुनपाल यानें वसविलें व त्याच वेळीं येथें बांधलेल्या कल्याणजीच्या देवळावरून याचें मूळचें नांव कल्याणपुरी असें होतेंसें दिसतें. येथून बी. बी. सी. आय रेल्वेच्या हिंदौन रोड स्टेशनकडे जाण्याकरितां ५२ मैल लांबीचा पक्का रस्ता आहे. लो. सं. (१९११) १९८०३. पैकीं शेंकडा ७६ हिंदू व शेंकडा २२ मुसुलमान आहेत. कांहीं ठिकाणाहून गांवाकडे नजर टाकल्यास गांवचा देखावा फार चांगला दिसतो. गांवाभोंवती तांबड्या दगडाचा तट असून उत्तरेकडे व पूर्वेकडे असलेल्या दऱ्यांच्या जाळ्यामुळेंहि त्याला सुरक्षितता प्राप्त झाली आहे. दक्षिणेस व पश्चिमेस त्या मानानें जमीन सपाट आहे. परंतु त्या बाजूनें वहाणाऱ्या नैसर्गिक जलप्रवाहानें तटाभोंवती खंदकाचेंच काम केलें आहे, व प्रवाहाच्या दुसऱ्या बाजूला बाहेरची तटबंदी व चर असल्यानें गांवाची सुरक्षितता दुप्पट झाली आहे. तथापि खऱ्या फौजेपुढें गांवची तटबंदी विशेष टिकाव धरील असें वाटत नाहीं; कारण तट दिसावयास सुंदर असला तरी त्याचें बांधकाम मजबूत झालेलें नाहीं. गांवचा घेर २। मैल असून त्याला ६ वेशी व ११ लहान दरवाजे आहेत. रस्ते अरुंद व वांकडे तिकडे आहेत. परंतु त्यांवर दगडी फरसबंदी केलेली असल्यामुळें ते धुवून स्वच्छ करतां येतात. गांवांत कांहीं मोठीं घरें व सुंदर देवालयें आहेत: पैकीं महाराजा प्रतापलाल यानें (१८३७–५०) बांधलेलें अर्वाचीन मथुरापद्धतीचें प्रताप सरोमान देवालय हें सर्वांत सुंदर आहे. राजवाडा पूर्वतटापासून सुमारें २०० यार्डांवर आहे. मूळचा राजवाडा १४ व्या शतकांत अर्जुनपालानें बांधला होता परंतु त्याचा आतां मागमूसहि नाहीं. हल्लींचा राजवाडा अठराव्या शतकाच्या मध्यांत राजा गोपालसिंहानें बांधला असून त्याचें बांधकाम दिल्लीच्या इमारतींच्या धर्तीवर आहे. या गांवांत १८८४ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली असून तिनें शहरसफाईचें एकंदर काम फार चांगलें केलें असल्यामुळें करवली गांव राजपुतान्यांतील अत्यंत स्वच्छ गांवांत मोडतें. येथील म्युनिसिपालिटीचें वार्षिक उत्पन्न ७००० ते ९००० रु. पर्यंत असतें.

गांवांत कांहीं प्राथमिक शाळा व एक मुलींची शाळा असून शिवाय एक हायस्कूलहि आहे. येथें एक सर्वसामान्य व एक स्त्रियांकरितां अशीं दोन रुग्णालयें आहेत.

**करहल**, त ह शी ल—संयुक्त प्रांतांतील मैनपुरी जिल्ह्यांतलि दक्षिणेकडची मध्य तहशील. हिजमध्यें करहल व वर्नाहल हे परगणे मोडतात. क्षे. फ. २१८ चौ. मै. लो. सं. (१९११) १००३७४. या तहसिलींत १८९ खेडीं व करहल (तहसिलीचें मुख्य ठिकाण) हें एक मोठें गांव आहे. वायव्येकडून आग्नेयीकडे वहात जाणाऱ्या सेनगर नदीनें या तहसिलीचे दोन भाग होतात. पैकीं पूर्वभाग अधिक सुपीक आहे.

गां व.—संयुक्त प्रांतात. मैनपुरी जिल्ह्यांतील याच नांवाच्या तहसिलीचें मुख्य ठिकाण. हें गांव मैनपुरीपासून इटावाकडे जाणाऱ्या रस्त्यावर आहे. लो. सं. (१९११) ६९१२. स्थानिक कारभार १८५६ च्या १० व्या कायद्याप्रमाणें चालविला जातो.

**कॅराकस**—कॅराकस हें व्हेनेझुएलाची राजधानी असून उ. अक्षांश १०°–३०' व पू. रेखांश ६७°–४' यांच्यावर आहे. या शहरांतून ग्वायना व तिला मिळणाऱ्या कॅटूचे, कॅरोटा व ॲनॉको या नद्या वाहतात. येथील हवा निरंतर वसंतऋतूंतील हवेप्रमाणें असते. हिंवताप, पडसें, ताप, पित्तविकार व संधिवात हे रोग येथें होतात. शहराच्या मध्यभागीं परस्परास छेदून जाणारे दोन रस्ते आहेत. रस्त्यांनां नांवें व नंबर दिलेले आहेत. त्यापैकीं उत्तरेचे नंबर ३, ४, ७ इ०. रस्ते अरुंद परंतु स्वच्छ व विद्युत्प्रकाशित आहेत. कित्येक शोभिवंत चौक, पुतळे व वृक्षलता यांनीं युक्त असे सार्वजनिक बगीचे येथें आहेत. प्लाझा दबोलिव्हार हा मुख्य चौक आहे. येथें बोलिव्हाचा अश्वारूढ ब्राँझ धातूचा पुतळा आहे. या चौकाच्या समोर कॅथेड्रल, आर्च बिशपचा वाडा, कासा ॲमेरिला, राष्ट्रीय पुस्तकालय, पोष्ट ऑफीस व इतर सार्वजनिक इमारती आहेत. इंडिपेन्सिया पार्क ही सर्वांत मोठी व मनोवेधक बाग आहे. या शहरांत टेलिफोन, विद्युत्प्रकाश, पाणीपुरवठा वगैरे आधुनिक सर्व सोयी केलेल्या आहेत. येथून लाग्वायरा बंदराला एक, व्हॅलेन्सियाला दुसरा व पिटारे व सँटा लुशिया या दोन खेड्यांना (आंखूड लाईन) असे रेल्वेरस्ते गेले आहेत. येथें कोणताच पक्का माल तयार होत नाहीं.

डिगो डि लोसाडा यानें १५६७ मध्यें हें शहर वसविलें. येथेंच सायमन बोलिव्हार जन्मला व स्पॅनिश लोकांची सत्ता याच शहरानें प्रथम झुगारून दिली. १८१२ च्या भूकंपानें या शहराचा बहुतेक पूर्ण नाश झाला होता. स्वातंत्र्ययुद्धांत दोन्ही पक्षांनीं येथें लूट मार व कत्तल केली. पुष्कळ वर्षेंपर्यंत हें शहर पुन्हां भरभराटीस चढलें नाहीं. १९०४ मध्यें येथील लोकसंख्या ९०,००० होती.

**कराची**, जि ल्हाः—मुंबई. सिंध प्रांतांतील जिल्हा. क्षे. फं. ११९७० चौ. मै. मर्यादाः—उत्तरेस लारखाना; पूर्वेस सिंधू नदी व हैद्राबाद जिल्हा; दक्षिणेस अरबी समुद्र व कोरी नदी; आणि पश्चिमेस समुद्र व लासबेला (बलुचिस्तान) संस्थान. पश्चिम सरहद्दीवर बऱ्याच मर्यादेपर्यंत हाब नदी गेलेली आहे. सिंध प्रांताच्या सामान्य सपाट स्वरूपापेक्षां या जिल्ह्याचें स्वरूप बरेंच निराळें असून कोहिस्तानच्या महालांत व कराची तालुक्यांत मुलुख डोंगराळ आहे. येथून जसजसें आग्नेयीकडे जावें तसतसा मुलुख

सपाट होत जाऊन अगदीं दक्षिणेकडे सिंधू नदीच्या मुख-प्रदेशांतील प्रदेश विस्तीर्ण, सखल व सपाट पसरलेला असून त्यांत फक्त समुद्राला जाऊन मिळणाऱ्या लहान लहान खाड्या तेवढ्या आहेत.

या जिल्ह्यांत सिंधू व हाब नद्यांखेरीज दुसरे प्रवाह फार थोडे असून ते वर्षांतून बरेच दिवस कोरडे असतात. हजाम्रो व बघर ह्या सिंधु नदीच्या शाखा आहेत. पीरमंघो येथें डोंगरांत ऊन पाण्याचे झरे असून येथील पाणी औषधी गुणाबद्दल प्रख्यात आहे. कोत्री तालुक्यांत लखी येथेंहि ऊन पाण्याचे झरे आहेत. व तेथें दरवर्षी बरीच यात्रा जमत असते.

या जिल्ह्यांत फळझाडें फारशी नाहींत. व आहेत त्यांपैकीं आंबा, बोर, खजुर, अंजीर, केळें व डाळिंब हीं मुख्य होत.

डोंगराळ भागांत चित्ता, तरस, लांडगा, कोल्हा, नीलगाय गांवठी किंवा रान शेळी, हेहि प्राणी आढळतात. मागर तलाव, हाब व सिंधु नद्या आणि मोठमोठे कालवे यांत सुसरी पुष्कळ आहेत.

कराची शहर व त्याच्या आसपासचा प्रदेश खुला असून तेथें समुद्रावरील वारे वाहतात. त्यामुळें सिंध प्रांताच्या इतर भागापेक्षां तेथील हवा फार चांगली आहे. कोहिस्तानच्या डोंगराळ प्रदेशांतील हवा सपाट भागांतील हवेपेक्षां उन्हाळ्यांत थंड व हिवाळ्यांत उष्ण असते. उलटपक्षीं, उत्तरेकडे लखी डोंगराजवळ कधीं कधीं उष्णता असह्य होते. वार्षिक उष्णमान सरासरी ७९ ° असतें. खुद्द कराची येथें पाऊस थोडा व अनियमित पडतो. जिल्ह्यांतील सरासरी वार्षिक पाऊस ७.५ इंच आहे.

इ ति हा सः—आपल्या हिंदुस्थानावरील स्वारीच्या अखेरीस आलेक्झांडर दि ग्रेट यानें या जिल्ह्यांतील कोणत्यातरी एकाद्या ठिकाणाहून ( कदाचित् ठठ्ठा ) इराणाचें आखात शोधून काढण्याकरतां निआर्कस याला पाठविलें. या जिल्ह्यावर आरब लोकांची पहिली स्वारी ७१२ या वर्षी झाली. इ. स. १०१९ व १०२६ यांच्या दरम्यान गझनीच्या महंमुदानें या जिल्ह्यावर स्वाऱ्या करून सुम्रा घराण्याला राज्य स्थापन करण्याकरितां रस्ता मोकळा करून दिला; व १३३३ त कच्छमधील सम्मा टोळीनें लारखाना जिल्ह्यांत सेहवान येथें व नंतर ठठ्ठा येथें आपलें ठाणें दिलें. सम्मा राजे मूळचे हिंदू किंवा बाद्ध असून त्यांची राजधानी मकली डोंगरांत समुई येथें होती. चौदाव्या शतकाच्या अखेरीस त्यांनीं मुसुलमानी धर्माची दीक्षा घेतल्यामुळें, दिल्लीच्या फेरोजशहाचे ते नामधारी मांडलिक असले तरी बहुतेक स्वतंत्रच होते; व त्यांचें रहाण्याचें ठिकाण जें ठठ्ठा तें कांहीं वर्षांनीं सर्व सिंधप्रांतांत लोकसंख्येच्या व व्यापाराच्या दृष्टीनें मुख्य ठिकाण बनलें.

अर्घुन घराण्याचा संस्थापक शहाबेग यानें १५२१ साली शेवटल्या सम्मा राजाचा पूर्णपणें पराभव करून खालच्या सिंध खोऱ्यांत आपली सत्ता स्थापन केली; परंतु ३४ वर्षांनंतर १५५४ त त्याचा मुलगा निपुत्रिक वारल्यानंतर अर्घुन घराणें मोडलें गेलें. १५९२ त अकबराच्या सैन्यानें ठठ्ठाच्या राजाचा पराभव करून सर्व सिंधबरोबर हा जिल्हा मुलतानच्या सुभ्यांत सामील केला. देशी घराण्यांच्या किंवा मोंगलांच्या कारकीर्दींत कराची शहराला फारसें महत्व आलेलें नव्हतें. मोंगल पातशाही मोडल्यानंतर कोल्हार राजांच्या मागून आलेल्या तालपूर मीरांनीं कराची बंदराचें व्यापारदृष्ट्या महत्त्व ओळखून १७९२ त कलातच्या खानापासून तें परत मिळविलें. ब्रिटिशांनीं मीर लोकांबरोबर दोस्तीचे तह करण्याचे प्रयत्न केले परंतु ते व्यर्थ गेले; व दोघांमध्यें वितुष्ट येऊन ब्रिटिशांनीं सर्व सिंधप्रांत १८४३ त आपल्या राज्यास जोडला.

जिल्ह्यांतील प्राचीन अवशेषांपैकीं ठठ्ठा ह्या जुन्या गांवांतील मशिदी, शिलालेख, थडगीं व किल्ला; व चार्लो चकर आणि रणजी येथील मोडकळीस आलेले किल्ले हे मुख्य आहेत.

या जिल्ह्यांत कराची, कोटी, कोत्री, मानझंद व ठठ्ठा हीं मोठीं गांवें व ६२८ लहान गांवें असून एकंदर लोकसंख्या ( १९२१ ) ५४२०६५ आहे. पैकीं शेंकडा ७७ मुसुलमान, शें. २१ हिंदू व शें. १ ख्रिस्ती आहेत. शे. ७६ लोक सिंधी भाषा बोलतात. शें. ४५ शेतीवर व शें. २४, शें. २ व शें. २ लोक अनुक्रमें उद्योगधंदे, व्यापार व निरानिराळे धंदे करून पोट भरतात.

ज्वारी, बाजरी, तांदूळ व गहूं हीं या जिल्ह्यांतील मुख्य पिकें आहेत. कराची जिल्ह्यांतील म्हशींचें तूप प्रख्यात आहे. त्याचप्रमाणें येथील गाईंचीहि दूध देण्याबद्दल ख्याति असून त्या मुंबईस विक्रीकरितां पाठविण्यांत येतात.

मुसुलमान लोकांपैकीं मुहान जातीचे लोक समुद्रकांठीं मासे मारण्याचा धंदा करतात. मीर लोक कित्येक ठिकाणीं मोत्यें काढण्याचा धंदा करीत असत. पण तीं मोत्यें आकारानें लहान असून उंची नसल्याकारणानें हा धंदा अलिकडे बहुतेक बसला आहे.

सुती कापड, रेशमी ओढण्या, गालिचे, रग व सामान्य धातूचीं भांडीं वगैरे जिन्नस येथें तयार होतात. कराची शहरांत कांहीं गिरण्यांखेरीज दुसरे महत्त्वाचे कारखाने नाहींत. ठठ्ठा शहर बायकांच्या लहंग्याकरितां प्रसिद्ध आहे. शहा बंदर तालुक्यांत मिठाच्या मोठ्या खाणी आहेत व कराचीपासून कांहीं मैलांवर मौर्यपूर येथें मिठागरें आहेत.

बहुतेक व्यापार कराची शहर व बंदर येथें एकवटलेला असून गहूं, कापूस, लोंकर, कचीं व कमावलेलीं कातडीं हे निर्गत जिन्नस आणि साखर, राकेल, कापड, मद्यें व धातूचे जिन्नस हा मुख्य आयात माल होय. कराची जिल्ह्यांत कराची, कटी व सिरगंद अशीं तीन बंदरें आहेत.

कराची बंदराला कित्येक बोटी लागतात व शिवाय हें शहर महत्त्वाचे दोन रेल्वेरस्ते व अफगाणिस्तान, कलात आणि मध्यआशिया ह्यांशीं चालणारे व्यापारी मार्ग यांजबरोबर जोडलेलें आहे. नॉर्थवेस्टर्न रेल्वेनें ह्या जिल्हा पंजाब व संयुक्त प्रांताबरोबर जोडला गेला असून जोधपूर-बिकानेर रेल्वेच्या योगानें थर आणि पार्कर जिल्हा व मुंबइ ह्यांजबरोबर दळणवळण सुरू करण्यांत आलें आहे. सिंधचा अंतर्भाग, लासबेला व कलात ह्यांशीं दळणवळण होण्याकरितां कराचीपासून गाडी रस्ते गेलेले आहेत.

राज्यव्यवस्था.—जिल्ह्याचे तीन पोटभाग असून त्यांत, कोट्री, कराची, ठठ्ठा, मीरपूरसक्रो, घोराबारी, मीरपूर बोटोरो, सुजावल, जाटी व शहाबंदर हे ९ तालुके आणि काटी बंदर मांझंद व कोहिस्तान हे ३ महाल आहेत. प्रत्येक तालुक्यावर मामलेदारासारखे मुखत्यार आहेत. ह्या जिल्हा एका डेप्युटी कलेक्टरच्या ताब्यांत असतो. कराची, कोत्री, मांझंद ठठ्ठा व काटी बंदर या गांवीं म्युनिसिपालिटया असून इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हा व तालुका बोर्डाकडे आहे.

जिल्ह्याच्या लोकसंख्येपैकीं शें. ५.६ पुरुष व शें. ०.५ स्त्रिया साक्षर आहेत. इलाख्याच्या इतर भागाच्या मानानें या जिल्ह्यांत शिक्षण बरेंच मागासलेलें असून १९०३–४ मध्यें खासगी व सरकारी मिळून एकंदर २९७ शिक्षणसंस्था होत्या. पैकीं १ एक आर्ट कॉलेज, ६ हायस्कुलें ८ मध्यम शाळा, २ ट्रेनिंग स्कूल्स. २ विशिष्ट शाळा, व १:६ प्राथमिक शाळा होत्या. विद्यार्थ्यांची एकंदर संख्या १३,६०५ असून त्यांपैकीं ३०२८ मुली होत्या.

ता लु का.—मुंबई इलाख्यांत, सिंध प्रांतांत, कराची जिल्ह्याचा नैर्ऋत्येकडील तालुका. क्षे. फ. १६७७ चौ. मै. यांत कराची हें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण व इतर १४ लहान गांवें आहेत. लोकसंख्या ( १९११ ) १८६७७२. समुद्रकिनाऱ्याचा प्रदेश सोडला तर ह्या सर्व तालुका डोंगराळ आहे. ह्या तालुक्यांत कालवे नाहींत; परंतु त्यांतून कित्येक नैसर्गिक जलप्रवाह वाहतात. पैकीं मलिर व लयारी हे मुख्य होत.

श ह र.—मुंबई इलाख्यांतील, सिंध प्रांताची राजधानी व याच नांवाच्या जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें शहर सिंधुनदीच्या मुखप्रदेशाच्या अगदीं उत्तरटोंकाला पाब डोंगराच्या दक्षिणपायथ्याशीं व बलुचिस्तानच्या सरहद्दीजवळ आहे. तें मुंबईपासून रेल्वेनें ९९३ मैल व जलमार्गानें ४८३ ( समुद्रांतील ) मैल आहे. हें शहर लाहोरशीं दोन मार्गांनीं जोडलेलें असून; एकमार्ग सक्करवरून व दुसरा कोट्रा–रोहरी रेल्वेनें जातो. दोन्ही मार्गांनीं अंतर सारखेंच म्हणजे सुमारें ८०० मैल आहे. लोकसंख्या ( १९२१ ) २१६८८३. १९११ सालीं एकंदर लो. सं. १५१९०३ पैकीं ७४०७५ मुसलमान, ६६०३८ हिंदू, ७९.३६ ख्रिस्ती, व २१६५ पारशी होते.

मनोरा हेडच्या पुढें आलेल्या भागानें कराची बंदराला बांकणाचें ( आखाताचें ) स्वरूप आलेलें असून किनाऱ्यावरून १० मैल लांबीच्या खडकाच्या रांगेनें नैसर्गिक धक्का बनलेला आहे. मनोरा व त्याच्या समोरील क्लिफ्टनचें आरोग्य स्थान ह्यांच्या दरम्यान ३½ मैलांचें अंतर आहे. मनोरा हेडच्या उत्तरेस पांच मैल लयारी नदीपर्यंत व जुन्या कराचीपासून पूर्वकिनाऱ्यानें पश्चिमटोंकापर्यंत कराची बंदर पसरलेलें आहे. परंतु यापैकीं फारच थोड्या भागांत मोठमोठीं जहाजें लागूं शकतात. कराची बंदराकडे येणाऱ्या मनुष्याला दृग्गोचर होणारी पहिली गोष्ट मनोरा हेड ही होय. त्यावर समुद्रसपाटीपासून १४८ फुटांवर असलेला दिवा हवा स्वच्छ असतांनां २० मैलांवरून दिसतो; पूर्वी त्याचें संरक्षण करण्याकरितां एक किल्ला होता. परंतु हल्लीं त्याऐवजीं अर्वाचीन तऱ्हेची तटबंदी केलेली असून तेथें बंदराच्या व्यवस्थेकरितां लागणाऱ्या कामगारांच्या इमारती, एक ख्रिस्ती देवालय व इंडोयूरोपियन तारखातें हीं आहेत.

मुखाच्या दुसऱ्या बाजूला किआमारी येथें कराचीस येणारे उतारू व माल उतरतो. व येथें उतरण्याचे तीन धक्के आहेत. नेपियर धक्यापासून ३ मैलपर्यंत जाणाऱ्या रस्त्यानें बेट शहराला व मुख्य जमीनीला जोडलें गेलें असून त्यावरून ईस्टइंडियन ट्रामवे जाते. नार्थवेस्टर्न रेल्वेसुद्धां किआमारीपर्यंत जाते; परंतु धक्क्याच्या बाजूनें न जातां ती एका मोठ्या खाजणाच्या बाजूनें वळसा घेऊन दक्षिणेकडे गेलेली आहे. खाजणांतील पाणी बंदरांत नेहमीं नेतां यावें म्हणून बंदरांतील धक्क्यावर १८६५ त १२ फूट लांबीचा पूल बांधलेला आहे. ह्या पलाच्या उत्तरटोंकाला, पूर्वपश्चिम असा एतद्देशीय लोकांनीं बांधलेला धक्का आहे. बंदरांतील धक्क्याच्या टोंकाला मुख्य जमीनीच्या बाजूला रस्त्यावर कस्टम–हाऊस आहे.

कस्टम–हाऊसपासून कराचीच्या छावणीपर्यंत बंदर व मॅकलिऑड नांवाचे दोन मुख्य रस्ते जातात. हे रस्ते ज्या ठिकाणीं मिळालेले आहेत तेथें सर विल्यम मेरीवेदर याच्या स्मरणार्थ घड्याळाचा मनोरा उभारलेला आहे. बंदररस्त्याच्या बाजूला जुना व अतिशय दाट वस्तीचा भाग आहे. ह्या भाग व लयारी भाग यांच्या दरम्यान लयारी नदी ( हिला वर्षांतून २–४ वेळच पाणी असते. ) वहातें. मॅकलिऑड रस्त्यावर, मुख्य कोर्ट, मुंबई बँक, नॅशनल बँक ऑफ इंडिया, रेल्वे स्टेशन, पोस्ट व तार ऑफिसें, लोखंडी कारखाना, कापसाचे दाब हीं आहेत. शिवाय ह्या भागांत दवाखाना, सिंध कॉलेज, नवें हिंदू देवालय व बहुतेक यूरोपियन व्यापाऱ्यांचीं ऑफिसें हि आहेत. कंदाहारहून येणाऱ्या तांड्यांच्या सोयीकरितां बांधलेली अफगाण सराई सुमारें ३ एकर मोठी आहे. गांवाच्या उत्तरेस व पूर्वेस लष्करी छावणी

असून तेथून सुमारें अर्ध्या मैलांवर सार्वजनिक बाग असून तींत वन्य प्राण्यांचा संग्रह केला आहे.

कराचींतील वास्तुसौंदर्य आंग्लो-इंडियन पद्धतीचें आहे. ह्या गांवातील मुख्य इमारती म्हणजे ख्रिस्ती प्रार्थनामंदिरें मुसलमानी कॉलेज, सिंधक्लब, एम्प्रेस मार्केट, पोस्टऑफिस व फ्रेअर हॉल ह्या होत.

वर्षांतून ८ महिने समुद्रावरील वारे येत असल्यामुळें कराचीची हवा सिंधमधील इतर भागाच्या हवेपेक्षां जास्त आरोग्यकारक आहे. शहर सखल जागेंत वसलें असून, आसपासचा भाग दलदलीचा असल्यामुळें वातावरण आर्द्र व गरमहि असतें. परंतु अगदीं उन्हाळ्याच्या दिवसांतहि येथील उष्णमान समुद्रापासून दूरच्या प्रदेशापेक्षां कमीच असतें.

इतिहासः—कराची शहर ब्रिटिशांच्या ताब्यांत १८४३ त आलें व त्यानंतरच येथील विस्तीर्ण व्यापार, सुंदर बंदर, व मोठमोठ्या संस्था अस्तित्वांत आल्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. १७२५ पूर्वी हल्लींच्या जागीं मुळींच गांव नव्हतें असें दिसतें. परंतु ज्या ठिकाणीं हाब नदी समुद्राला मिळते त्याच्या दुसऱ्या बाजूला खरक नांवाचें गांव असून तेथें व्यापार मोठा चालत असे असा उल्लेख आढळतो. खरक बंदराला जाण्याचा मार्ग वाळूनें बंद झाल्याकारणानें हल्लींच्या कराची बंदराच्या टोंकाकडे लोक जाऊं लागले व त्या स्थलाला कलाचीकून असें नांव मिळालें (१७२९). ही जागा सोयीची वाटल्यामुळें कालांतरानें तेथील व्यापार वाढत चालला व शेजारच्या वाढत्या गांवाला कराची असें कलाची-पासून अपभ्रष्ट नांव मिळालें. थोड्याच काळानें शहा बंदरचे बंदर बंद झाल्यामुळें तेथील लोकवस्ती व व्यापारहि कराचीकडे वळला.

कोल्हारा राजांच्या कारकीर्दीत कलातच्या खानानें हें गांव मिळवून तेथें शिबंदी ठेवली. १७९२ ते ९५ या अल्पावधींत तीन वेळां बलुची सैन्य या गांवावर आलें; परंतु फक्त तिसऱ्या वेळीं ( या वेळीं बलुची सैन्याचें आधिपत्य हैद्राबादच्या तालपूर सरदारांकडे होतें ) त्याला यश आलें. तालपूर सरदारांनीं कराचीचा व्यापार वाढविण्याची पुष्कळ खटपट केल्यामुळें गांवची वस्ती वाढूं लागली. १८३८ त कराचीची लो. सं. १४,००० असून तीपैकीं निम्मे हिंदू होते. मीर राजांच्या कारकीर्दीत या शहराची व आजूबाजूची व्यवस्था पहाण्याचें काम नबाबाकडे सोंपविलेलें होतें; व तो सर्व कारभार एकतंत्रीपणानेंच करीत असे.

व्यापारः—ब्रिटिशांच्या आगमनापूर्वी सुद्धां सिंधु नदीच्या योगानें दळणवळण करणें फार सोयीचें असल्यामुळें कराची शहराला व्यापारीदृष्ट्या बरेंच महत्त्व आलेलें होतें. तथापि आजूबाजूला लोकवस्ती थोडी असून राज्यकर्तेहि अदूरदर्शी असल्यामुळें व्यापाराची वाढ व्हावी तशी झाली नाहीं. तालपुर मीरांच्या वेळीं आयात मालावर शें. ४ व निर्गत मालावर दोनपूर्णांक एकद्वितीयांश जकात घेतली जात असे. १८०९ त कस्टमचें उत्पन्न ९९,००० रु. होतें. तें १८३७ त १,७४,००० रु. झालें. त्या वेळीं गुलाम, इंग्लिश रेशीम, कापड, चिटें, बंगाली व चिनी कच्चें रेशीम, खजूर, साखर, हस्तिदंत, तांबें, मसाले व कापूस हे मुख्य आयात जिन्नस आणि अफू, तूप, नीळ, गहूं, मंजिष्ठ, लोंकर, राळ व खारे मासे हे मुख्यनिर्गत जिन्नस असत.

१८४३ त, ब्रिटिशांच्या कारकीर्दीच्या आरंभीं कराची, काटी व सिरंगद या तिन्ही बंदरांचा मिळून व्यापार १२ लक्षांचा होता. तो १९०३-४ सालीं २४.९ कोटीपर्यंत वाढला. याचें कारण सिंध व पंजाबमधून गहूं व इतर धान्य येऊन येथून परदेशीं रवाना होतें; व या धान्याचें प्रमाण दरवर्षी सारखें वाढत आहे हें होय.

संयुक्त राज्यांतून कराची येथें सुती माल, रेल्वेचें सामान, मद्यें, दगडी कोळसा, यांत्रिक सामान व औषधें; मुंबईहून सुती कापड, वळीव सूत खनिज धातू रेशीम, साखर, चहा, ताग, मसाले, रंग, लोंकरीचे जिन्नस, नारळ, रेशमी कापड, मद्यें, फळें, धान्य व घोडे; मक्रानच्या किनाऱ्याहून लोंकर धान्य व डाळी; कलकत्याहून ताग व धान्य आणि रशियांतून खनिज तेल याप्रमाणें जिन्नस येतात.

कराचीहून गहूं, कापूस, कातडीं, हाडें, नीळ वगैरे जिन्नस बाहेर रवाना होतात.

कराचीस जमीनीवरून होणाऱ्या व्यापाराच्या जिन्नसांत पंजाब व संयुक्त प्रांतांतून गहूं; पंजाबांतून कापूस;आणि कंदाहार व कलात येथून लोंकर,सुकीं फळें व घोडे हे मुख्य जिन्नस येतात. तालपूर मीरांच्या वेळीं व ब्रिटिशांच्या अमदानींतील पहिल्या कांहीं वर्षांत कराची बंदरांत फक्त लहान जहाजें राहूं शकत. मोठमोठ्या बोटी मनोरा पॉइंटच्या बाहेर लागत व तेथून मनुष्यें व माल लहान होड्यांतून नदीनें कांहीं मर्यादेपर्यंत वर आणलीं जात, व तेथून पुन्हां होड्यांत घालून हल्लींच्या कस्टम हाऊसच्या जवळपास नेत. परंतु नंतर हळूहळू बोटी धक्क्यास लागूं लागल्या.

कराची येथील म्युनिसिपालिटी १८५२ त स्थापन झाली. तिचें १९०३-४ चें उत्पन्न १५ लक्ष होतें. छावणीची व्यवस्था एका कमिटीकडे आहे. कराचीच्या शिबंदीची संख्या सामान्यतः १३०० असते, व स्वयंसैनिक सैन्य ८०० असतें.

कराची शहरांतील विहिरींचें पाणी खारें असल्यामुळें शहरच्या पाणीपुरवठ्यासंबंधानें पुष्कळ दिवस अडचण भासत असे; हल्लीं मालिर नदीपासून आणलेल्या पाण्याच्या नळाच्या योगानें पाण्याची चांगली सोय झाली आहे.

सिंध कॉलेज, एंजिनिअरिंग कॉलेज, सरकारी व निमसरकारी हायस्कूलें, आंग्लोव्हर्न्याक्युलर शाळा, देशी शाळा, मुलींच्या शाळा व व्यापारी शाळा या ह्या शहरांतील शिक्षणसंस्था होत. या शहरांत सिंध ऑब्झर्व्हर, सिंध टाइम्स, फोडानिक्स,

प्रजामित्र, कराची क्रॉनिकल इत्यादि इंग्रजी, सिंधी, गुजराथी व फारसी भाषेंत मिळून सुमारें १४ वर्तमानपत्रें निघतात. कराची येथें एक सिव्हिल हॉस्पिटल, एक प्रसूतिगृह एक महारोग्याकरितां आश्रम व कांहीं दवाखाने आहेत.

**कराडी** — लो. सं. २५०७. हे लोक फक्त पनवेल तालुक्यांत आढळतात. ह्या जातींत उपजाती नाहींत. भाषा अशुद्ध मराठी असते. व्यवसाय शेतकी किंवा मोलमजुरी हा असतो. यांची रहाणी, खाणेंपिणें व पेहेराव मराठ्याप्रमाणें असतो.

**करार, करारांसंबंधीं कायदा.**—(कॉंट्रॅक्ट) हा कायद्यांतील पारिभाषिक शब्द, सौदा किंवा बोली ह्या अर्थी वापरतात. कराराच्या कायद्याप्रमाणें ("इंडियन कॉंट्रॅक्ट ॲक्ट") ह्याचा अर्थ, 'कायद्यानें अम्मलवजावणी करतां येईल अशी कबुलायत' असा होतो. सचोटीनें केलेल्या व्यवहाराची अम्मलवजावणी हें एक न्यायकोर्टाचें मुख्य काम आहे. शांतता राखणें आणि जुलूम व लबाडी ह्यांपासून मालमत्तेचें संरक्षण करणें ह्यांच्या खालोखाल महत्त्वाचें हें काम आहे. तरी देखील कायद्याच्या इतिहासांत कराराचें महत्त्व बरेंच उशीरां कळून आलेलें दिसतें. याज्ञवल्क्य स्मृतींत व्यवहाराध्यायांत सध्यां ज्याला आपण करार म्हणतों तशा तऱ्हेचा व्यवहार वर्णिला नाहीं. तथापि वेतनादान, ऋणादान वगैरे प्रकरणांत कराराचा कांहीं भाग येतो, पतीवर व्यवहार करण्याला लायक होण्याइतकें, राष्ट्र जर उद्योगधंद्यांत व सुधारणेंत पुढें आलें तर त्याला करारांसंबंधीं चांगल्या सुधारून केलेल्या नियमांची आवश्यकता असते. रोमन लोकांनीं ह्याविषयीं केलेला कायदा उत्कृष्ट असा होता. सध्यांच्या कायद्याचीं बीजें त्यांतूनच घेतलेलीं आहेत. पण पुढें जेव्हां रोमच्या राज्याचा ऱ्हास झाला तेव्हां पश्चिमेकडील ख्रिस्ती धर्मसमाज परत अस्ताव्यस्त असा पडून राहिला व लोकांच्या सुव्यवस्थित, न्यायाच्या व कायद्याच्या कल्पना इतक्या कोत्या बनून गेल्या कीं, आपल्याला फार जुने म्हणून माहित असलेले रोमन कायदेकानू त्यावेळीं अपरिचित व नवीन असे वाटूं लागले.

अशा स्थितींत ज्यावेळीं कायद्यासंबंधींच्या कल्पना विस्कळित स्वरूपाच्या असून न्यायतत्त्वशास्त्राची वाढ झाली नव्हती त्यावेळीं सर्वसामान्य कराराचें तत्त्व सामाजिक व धार्मिक बाबीखेरीज इतर ठिकाणीं पाळीत नसत. ज्यांस एखाद्या गोष्टीविषयीं खात्री करून घ्यावयाची असेल, त्यांस शपथ घ्यावयास लावणें किंवा जामीन घेणें हे मार्ग असत. त्यांतून, लोकांकरितां केलेलीं न्यायपीठें तर ह्याकडे मुळींच पहात नसत. द्वंद्वयुद्धानें दंड देण्याची व्यवस्था करून रक्तपातापर्यंत आलेलें भांडण मिटविणें ही बहुतकरून करारपद्धतीची प्राथमिक अवस्था दिसते. अशा तऱ्हेचीं कृत्यें हीं लोककल्याणाला आवश्यक असत म्हणून त्यावेळचे लोक कांहीं महत्त्वाच्या बाबतींत वचतांना लोकसंमतीचा शिक्का मारीत. प्राचीन लोकांनां प्रथम, खाजगी व्यवहाराच्या अंमलबजावणीला सरकारी कायद्याची गरज लागते ही कल्पनाच नव्हती. ह्या संबंधांत बुद्धिमान पक्षकार, वकील व कांहीं अंशीं न्यायाधीश हे हळू हळू सरकारचा हात शिरकवूं देण्याच्या कामीं कारणीभूत झाले; राजांनीं होऊन आपली सत्ता गाजविण्याचा उघड प्रयत्न केला नाहीं. कर्जाऊ दिलेले पैसे मात्र पूर्वीपासून कायदेशीर रीतीनें फेड करून घेतां येत असत. ह्याचें कारण ऋणकोनें उसनवार घेतलेली रक्कम परत देण्याचें वचन दिलेलें असतें म्हणून नव्हे तर, ती रक्कम अजूनहि धनकोच्या मालकीची असून जणूं काय त्यानें ती ऋणकोजवळ ठेवण्यास दिली आहे, असें मानण्यांत येई. जमीनीचा तावा मिळविण्यासाठीं याच पद्धतीनें नार्मन स्वारीनंतर इंग्लंडांत बरींच शतकेंपर्यंत धनको पैशाकरितां दावे मांडीत असत म्हणजे कर्जाऊ दिलेल्या पैशाबद्दलच्या फिर्यादी स्थावर इस्टेटीच्या फिर्यादीसारख्याच मानीत आणि त्यांच्याप्रमाणेंच, हिचाहि कोर्टाच्या देखरेखीखालीं होणाऱ्या द्वंद्वयुद्धावरून शेवटीं निकाल देत. ब्लॅकस्टोनच्या वेळेपर्यंत धनकोचा कर्जांत असलेल्या मालमत्तेवर हक्क आहे व तो हक्क त्याला ऋणकोनें मिळवून दिला आहे असें मानीत. ज्याप्रमाणें घराचा मालक तें भाड्यानें देऊन कांहींकाळपर्यंत वहिवाट करण्याचा आपला हक्क तहकूब ठेवतो त्याचप्रमाणें पैसा कर्जाऊ देणें म्हणजे त्या पैशावर आपला तावा असण्याचा प्रस्तुत हक्क केवळ तहकूब ठेवणें होय. करारांविषयींचें सध्यांचें तत्त्व याहून थोडें निराळें आहे.

**कर्जाऊ दिलेल्या रकमेबद्दल फिर्याद.**—या कर्जाऊ दिलेल्या पैशाबद्दलच्या फिर्यादीला करारशास्त्रांत अनायासें स्थान मिळालें. वास्तविक ती करारशास्त्रांत येत नाहीं. हिचें स्वरूप जंगम मालमत्ता परत मिळविण्याद्दल करावयाच्या फिर्यादीसारखें असे. जंगम मिळकत बेकायदेशीर रीतीनें ताब्यांतून गेलेल्या मालकांची फिर्याद चालविण्याची पद्धत ह्यासारखीच असे. जेव्हां जेव्हां कर्ज म्हणून दाखविलें जात असे, त्यावेळीं प्रतिवादीला तो कर्जाऊ पैसा किंवा माल नक्की मिळाला, हें वादीस सिद्ध करावें लागे. तथापि वादीच्या हक्कांची उभारणी सौद्यावर किंवा दिलेल्या वचनावर नसून प्रतिवादीनें वादीचा पैसा किंवा माल वाजवीपेक्षां जास्त दिवस ठेवला ह्या मुद्यावर असे.

**लेखी पुराव्याची पद्धत.**— पुराव्याच्या पूर्वीच्या अनेक पद्धतींत लेखी पुराव्याची एक पद्धत असे. एकदां लेख मोहोरबंद झाला कीं, ज्यानें तो लिहिला असेल, त्याला तो नाकबूल करतां येत नसे व अशा रीतीनें तो बांधला जाई. कारकुनांकडून त्यांच्या नोकरीसंबंधीं लेखी करार लिहून घेत. ही दस्तैवजाची पद्धत हल्लींहि निराळ्या स्वरूपांत रूढ आहे. ह्या पद्धतीनें पैशाची किंवा इतर कोणत्याहि तऱ्हेच्या कामाची बजावणी बरोबर करतां येत असे. चवदाव्या शतकापासून पुढें व्यापाराच्या व इतर

कामीं ही दस्तैवजाची पद्धत सुरू झाली. जुन्या व्यवहारपद्धती (कॉमन ला )वरून ठरलेल्या कायद्याच्या कामांत खतावरून मोठमोठीं कामें करतां येऊं लागलीं व एखाद्या व्यवहारांत खत नसलें तर काम अडूं लागलें.

**वचनावरील विश्वास.**—खत करण्याला आवश्यक गोष्टींत कितीहि सरळपणा व साधेपणा ठेवला तरी, पंधराव्या शतकांतील भिक्षुक वर्गातील लोकांखेरीज इतर लोकांनां ह्या पद्धतीचा क्वचितच फायदा होई. कारण त्यावेळीं फारच थोड्या लोकांनां चांगलें लिहितां वाचतां येत असे. तेव्हां साधें वचन देण्याघेण्याची चाल त्यावेळीं सर्व यूरोपियन राष्ट्रांत रूढ झाली होती. नुसत्या हस्तांदोलनानें सौदा पटवून टाकीत यावेळीं धार्मिक कोर्टांतून वचनभंगाबद्दल निकाल होत व बहिष्कार वगैरे शिक्षा सांगत. त्यामुळें धार्मिक कोर्टाचें काम वाढलें व त्यांस चांगलें उत्पन्न होऊं लागलें. राजानें नेमलेल्या न्यायाधिशांनां या बाबतींत स्वस्थ बसण्यावांचून गत्यंतर नव्हतें. बिशप व त्याचे अधिकारी यांनां, राजाच्या कोर्टांत ज्यांवर इलाज नाहीं अशा खटल्यांत त्यांनीं निकाल देऊं नये असा प्रतिबंध करतां येईना. इतर देशांतील कायदेपंडितांनीं ज्याप्रमाणें जस्टिनिअननें घालून दिलेली पद्धत बाजूस ठेवून त्या काळास साजेलशी पद्धत स्वीकारली तसें निदान १५ व्या शतकांत तरी इंग्लिश न्यायाधिशांनां करणें अशक्य होतें, तेव्हां जर राजानें नेमलेल्या न्यायाधिशांनां ही जवळजवळ भिक्षुकवर्गाच्या हातांत गेलेली कायद्याच्या कामाची महत्त्वाची शाखा आपल्या ताब्यांत यावी असें वाटलें तर तें करण्याला उपाय म्हणजे, वचन राखणें हें सर्वसामान्य कर्तव्य आहे असें मान्य करून त्यासंबंधीं खटला आणण्याचा अधिकार ठेवणें हा होता.

**वचनभंगाबद्दल दाव्याचा हक्क.**—नुसतें वचन पाळलें नाहीं हा मुद्दा मध्ययुगांतील वकिलांच्या मतें खटला आणण्यास पुरेसा नसे. परंतु दुसऱ्यावर अवलंबून बसण्यानें होणारें नुकसान हा मुद्दा मात्र तसा नव्हता त्यायोगें जेव्हां अंगावर एखादें काम घेतलें तेव्हां तें करण्याविषयींचें कर्तव्य उत्पन्न झालें असें होतें व तें लबाडीनें किंवा लायकी नसतां कामांत भलती ढवळाढवळ करण्यानें मोडलें हा दोष येतो. समजा, एखाद्यानें मी हुषार नालबंद आहे असें सांगून, एकाचा घोडा जायबंदी केला तर हें करणें कायद्याचें अतिक्रमण करणारें नाहीं. कारण मालकानें घोडा नालबंदाच्या स्वाधीन केला परंतु हें कांहींसें अतिक्रमणासारखें व बरेचसें फसवणुकीसारखें होईल. पुन्हां, एकानें मी चांगला घरें बांधण्याचें काम करणारा मनुष्य आहे असें म्हणून दुसऱ्यापाशीं बाहाणा केला व कांहीं तरी वेठ वळून घर राहण्याच्या अगदीं निरुपयोगी असें बांधून ठेवलें. अशा कृत्याबद्दल त्यावेळीं खटला करण्याची परवानगी असे. ह्यापुढील मोठी पायरी म्हणजे काम मुळींच न करण्याबद्दल कांहीं आसक ठेवणें. घरें बांधण्याचें काम करणारानें जर ठरलेल्या मुदतींत कामास मुळींच हात लावला नाहीं तर तो त्याचा गुन्हा होईल काय? पहिल्यानें न्यायाधिशांनां, हा गुन्हा असें ठरविणें अप्रस्तुत वाटलें, पण पुढें पक्षकारांची जास्त निकड लागल्यानें १५ व्या शतकांत काम मुळींच न केल्याबद्दल, तसेंच वाईट काम केल्याबद्दल 'ॲसंसिट्' च्या आधारें खटला आणण्यास नवीन अधिकार प्राप्त झाला. हा नुकसानभरपाईचा खटला असल्यानें ( कांहीं पैशाच्या रकमेबद्दल दावा नसे म्हणून ) कर्जवसुलीच्या खटल्याला लागणाऱ्या पुराव्यासंबंधीं कडक नियम ह्याला लागू नसत; त्याचप्रमाणें हा थोडाबहुत कायद्याचें अतिक्रमण करण्यासंबंधीं खटला असल्यानें राजाकडे शांतताभंग झाल्याबद्दल अपील करण्याला ह्यांत हक्क येत असे व त्यामुळें जुन्या सर्वमान्य शपथविधीचा अंगीकार करून प्रतिवादी निसटून जाईल, ही धास्ती अजिबात गेली. ह्या योगानें असें झालें कीं, पुढें पुढें फिर्यादी कर्जवसुलीकरितां, 'ॲसंसिट्चाच' उपयोग करूं लागले. खरें पाहिलें तर ह्याचा उपयोग निव्वळ ज्यावर दुसरा इलाजच नाहीं असे खटले कोर्टांत आणण्याच्या कामीं करावयाचा असे. १६ व्या शतकांत तर असेंच तत्त्व ठरून गेलें होतें कीं, देणें असलें म्हणजे कोर्टानें तें देवविण्याचें काम अंगावर घ्यावें. ह्या नवीन खटला आणण्याच्या अधिकारपद्धतींत सर्व प्रकारचे करार येऊं लागले, इतकेंच नव्हे तर स्वपक्षसमर्थनार्थ योजलेल्या युक्तिप्रयुक्तीमुळें ज्यांत वास्तविक मुळींच करार नाहीं असेहि पुष्कळ निरनिराळे दावे येऊं लागले.

ह्या नवीन पद्धतीनें मेहेरबानीखातर दिलेल्या वचनाची बजावणी करण्यास कांहीं मदत केली नाहीं. कारण त्यावेळीं असें न्यायतत्त्व गृहीत धरीत कीं, वादीनें प्रतिवादीच्या संमतीनें आणि प्रतिवादीच्या म्हणण्याला किंवा करण्याला भुलून जाऊन कोणच्या तरी बाबतींत आपली बाजू बिघडवून घेतली. त्यानें पैसे दिले असतील किंवा देण्याविषयीं आपल्याला बांधून घेतलें असेल, त्यानें आपला माल दिला असेल, कांहीं श्रम खर्च घातले असतील, किंवा कांहीं फायदा किंवा कायदेशीर हक्क सोडून दिला असेल, जर त्यानें प्रतिवादीच्या वचनावर विश्वासून एखादें कृत्य करण्याला स्वतःला बांधून घेतलें नसेल तर त्याचें प्रतिवादीकडून कांहीं नुकसान झालें नाहीं व म्हणून दावा आणण्याचा त्यास अधिकार येत नाहीं. इच्छित गोष्ट घडून न आल्यामुळें झालेली निराशा वाईट तर खरीच; पण कायद्याच्या दृष्टीनें तें नुकसान होत नाहीं. सध्यांच्या भाषेंत हें सांगावयाचें म्हणजे, प्रतिवादी जें काम अंगावर घेत आहे त्याबद्दल किंमत म्हणून वादीनें कांहीं तरी त्यास द्यावयास पाहिजे. हें जें कांहीं वचन घेणारानें वचन देणारास त्याच्या कामाबद्दल म्हणून देणें व वचन देणारानें तें घेणें त्यास हल्लीं वचनाचा मोबदला असें म्हणतात. ह्या

मोबदल्याचा अर्थ फार व्यापक आहे. कारण एखाद्या वचनाचा मोबदला देतां घेतां येण्याजोगा किंवा जवळ ठेवतां येण्याजोगाच असावा असें नाहीं. तो मोबदला रोकड पैसा असेल किंवा कांहीं माल असेल; तो एखादें कृत्य किंवा कृत्यपरंपराहि असूं शकेल; शिवाय ( व सध्यांच्या आपल्या कायद्याला अंती महत्वाचें असें म्हणजे ) तो पैसे देण्याबद्दलचें, किंवा माल हवालीं करण्याबद्दलचें, किंवा एखादें काम करण्याबद्दलचें, किंवा कांहीं विवक्षित तऱ्हेनें वागणें किंवा न वागणें ह्याबद्दचें वैयक्तिक वचनहि असूं शकेल. पुन्हां तो उघड वचन देणाऱ्याच्या फायद्याचा असलां पाहिजे असेंहि नाहीं. ज्याअर्थी त्यानें तो मोबदला स्वीकारला त्याअर्थी त्याला त्याची किंमत वाटली असली पाहिजे हें उघड आहे. तथापि वचन घेणाऱ्याच्या जोखमीकडे जितकें लक्ष ह्यांत ठेवलें आहे तितकें कांहीं वचन देणाऱ्याच्या फायद्याकडे नाहीं. जेव्हां दोन पक्षांत एकमेकांचीं वचनें दिलीं घेतलीं जातात तेव्हां एकाचें वचन दुसऱ्याच्या वचनाचा मोबदला होतें व तें बंधनकारक होतें, ही शेवटची सुधारणा १७ व्या शतकांत मान्य झाली. व ह्याचा परिणाम असा झाला कीं, बक्षीस, देणगी वगैरेंचीं वचनें पूर्वींसारखी अंमलबजावणी करण्यास सुलभ राहिलीं नाहींत; पण उलट कोणत्याहि तऱ्हेचा कायदेशीर सौदा न्यायकोर्टाला मान्य होऊन त्याची बजावणी होण्यास फारशी अडचण राहिली नाहीं. हें मोबदल्याचें तत्व बहुतेक सर्व ठिकाणीं सर्व देशांत मान्य आहे.

मोबदल्याचें तत्व अंमलांत येण्यपूर्वी, दस्तैवजी (डीड) बाबद्याची अंमलबजावणी होत असे, ती हल्लींहि सुरु आहे. जेव्हां अमुक एक गोष्ट करण्याविषयीं एखाद्यानें लिहून दिलें असेल, तेव्हां सौदा वगैरे करण्याची किंवा दुसऱ्या पक्षाची त्यास कबुली आहे कीं नाहीं अशी चौकशी करण्याची कांहीं एक जरूरी नाहीं. तरी सुद्धां मेहेरबानगीं दाखल दिलेलीं लेखी वचनें फार बारकाईनें व कसोशीनें तपासतात व जेवढे खंडखंड हक्क मिळण्यासारखे असतील तेवढेच देतात. ह्यांविषयीं खटला आणण्याचा अधिकार असला तरी करारनाम्यावरहुकुम करार पूर्ण करून घेण्याबद्दलचा हक्क प्राप्त होत नाहीं.

एखादें वचन कायदेशीर होण्यास तें कांहीं मोबदला घेऊन नंतर दिलें गेलें पाहिजे; ह्यावरून वचन व मोबदला देण्याच्या क्रिया एकाच वेळीं झाल्या पाहिजेत हें उघड होतें. मोबदल्यापूर्वीच वचनाचा उच्चार म्हणजे निवळ कांहीं देऊं करण्यासारखें होईल; त्याच्या उलट मोबदला घेतल्यावेळींचे वचनाचे उद्गार किंवा कृतीवरून आणि वागणुकीवरून त्याविषयीं काढलेलें अनुमान हीं त्याच वेळीं कायम झाल्यासारखीं असतातः पुढील गोष्टीवरून बदलत नाहींत. ठोकळ सिद्धांत असा कीं, देऊं केलेल्या गोष्टीचा ज्या वेळीं स्वीकार केला जातो त्याच वेळीं जो करार असेल तो बंधनकारक ठरतो. इंग्लिश कायद्याच्या सिद्धांताप्रमाणें असें आहे कीं, व्यवहार कितीहि मानगडीचा असो ज्यांत म्हणून एखादा करार केला गेला आहे त्या त्या प्रत्येक बाबींत, नेहेमीं अशी वरच्या सारखी एक वेळ म्हणून असतेच. त्याचप्रमाणें देऊं केलेल्या गोष्टीचा स्वीकार होण्याच्या अगोदर कांहींएक कर्तव्याचा बोजा येऊन पडत नाहीं. मात्र ज्या ठिकाणीं हा मोबदल्याची इंग्रजी पद्धत अमलांत नाहीं तेथें हा नियम लागू होईलच असें नाहीं. देऊं केलेली गोष्ट योग्य मुदतींच्या आंतच स्वीकारावी लागते; तिचा स्वीकार होण्यापूर्वीच ती ज्याला देऊं केली असेल त्याला तसें कळवून ती उघड परत घेतां येते. स्वीकार करतांना तो सूचना करणाऱ्याच्या अटींप्रमाणेंच केला पाहिजे. जर कांहीं अटींवर स्वीकार करावयाचा झाल्यास तो स्वीकार म्हणजे दुसरा नवीन करार होतो वगैरे नियम सर्व लोकांच्या सोयीकरतां असल्यामुळें बहुधा सर्व ठिकाणीं लागू पडतात.

एकमेकांपासून दूर राहणाऱ्या लोकांमधील करारांची पूर्णता करण्यास इंग्लिश व इतर कायद्यांनां फारच त्रास पडला आहे. अशा करारांनां नियम अवश्य पाहिजेत हें खरें पण कोणताहि नियम कांहीं बाबतींत जुलुमी हा वाटणारच. ह्या संबंधांत प्रचलित पद्धत एकंदरीनें खालीं दिल्याप्रमाणें आहेः---

सूचना करूं इच्छिणारानें ती स्वीकार करणारानें स्वीकार करण्याची कोणची तरी एखादी किंवा वाजवी अशी रीत नमूद करावी, आणि त्यानें तसें केलें नसल्यास एखादी प्रचारांत असलेली वाजवी रीत--आणि विशेषतः टपालाची पद्धत--त्याला संमत आहे असें मानण्यांत येतें. नेहमींच शब्दांनीं कबुली दिली पाहिजे असें नाहीं. एखाद्या सूचनेस त्याला पाहिजे ती कृति करून दाखवून ही कबूली देतां येते. जसें:---टपालमार्फत मागणी आली असतां, पाहिजे असलेला माल धाडून देणें; सांगितलेलें काम करणें, इ. अशा गोष्टींत, फक्त कायद्याच्या दृष्टीनें पाहिलें तर ह्यापेक्षां जास्त व्यवहाराची तसें उघडपणें नमूद केलें असल्याखेरीज मुळींच जरूरी नाहीं. जेथें कृति नको असून वचन पाहिजे असतें तेथें तें नमूद केलेल्या पद्धतीनें किंवा पत्रानें अगर तारेनें पाठविलें पाहिजे. जसें:---एखाद्या व्यापाऱ्यानें पत्र लिहून कळविलें कीं, मी उधारीनें माल विक्रीकरितां पाठविण्यास तयार आहे,तर येथें 'आपली सूचना मला मान्य आहे, आपण माल पाठवावा' अशा आशयाचें त्यास उत्तर पाठविलें पाहिजे. हें उत्तरादाखल लिहिलेलें पत्र एकदां पोष्टांत पडलें कीं, इंग्लिश कोर्ट असें मानतें कीं ह्याला पोष्टांत उशीर लागला किंवा गहाळ जाहलें तर त्यापासून होणारें नुकसान सूचना करणाराच्या पदरीं येतें. म्हणजे एखाद्याच्या सूचनेचें उत्तर जरी त्याच्या हातांत पडलें नसलें तरी आपल्या सूचनेप्रमाणें वागण्यास तो बांधला जातो. वर सांगितलेंच आहे कीं, सूचना किंवा स्वीकार बोलून किंवा लीहूनच

कळविला पाहिजे असें नाहीं. कृति किंवा खुणा बहुशः हें काम चांगल्या रीतीनें करतात. नदीच्या पलीकडे जाण्यास जेव्हां आपण नावेंत बसतों तेव्हां ती वल्हविणारास,आम्हाला पलीकडे नेतोस कां, काय घेशील वगैरे ठराव आपण त्याच्याशीं करीत बसत नाहीं; तर जेव्हां आपण नावेंत पाय टाकतों तेव्हांच जें कांहीं नेण्याबद्दलचें ठराविक भाडें असेल तें देण्याला मूकसंमति देतो व तो नाव वल्हवून आपणास घेऊन जाण्याचें त्याच्या मूकपद्धतीनें कबूल करतो. हें एक साधें उदाहरण झालें; पण सर्व गोष्टींत हेंच तत्त्व लागू आहे. कराराची मांडणी किंवा त्याचा स्वीकार व्यक्त करावयास शब्दाव्यतिरिक्त अमुक कृति पुरेशी आहे, असें ज्या कृती-संबंधानें समंजस माणसांचें मत असतें ती कृति कायद्यांत शब्दाइतकीच बंधनकारक समजली जाते. अशा करारांनां "ध्वनित करार" असें म्हणतां येईल.

करारांचें बंधन हें दोन्ही पक्षांच्या खुषीनें तयार होत असतें व ठरविलें जातें. ह्यांतच करारशास्त्राचा, कायद्याच्या इतर सर्व शाखांपेक्षां विशेष निराळेपणा आहे. ह्या शास्त्राचें काम म्हणजे दोन्ही पक्षांच्या हेतूंनां चालन देणें हें होय. आणि करारांच्या अर्थनिर्णयाविषयींचे सर्व नियम ह्याच मूळ तत्वावर बसविलेले आहेत. हें तत्त्व लागू करणें नेहमींच सोपें जातें असें नाहीं. कारण पुष्कळ वेळां, अस्पष्ट विधानें केलेलीं असतात. पुष्कळ वेळा असें होतें कीं, दोन्ही पक्षांच्या हेतूंमधील बराचसा भाग त्यांच्या मनांतच राहून जातो, किंवा अमुक अमुक प्रसंगीं काय करावयाचें ह्याविषयीं त्यांनीं कधीं विचारच केलेला नसतो. तेव्हां त्यांचा आशय काय हें कोठून कळणार ? पण जेथें म्हणून कायद्याला फार हुषारीनें अटकळ बांधून अशा तऱ्हेचे खड्डे भरून काढावयाचे असतात त्या ठिकाणीं त्याला निर्देशक तत्व म्हणजे दुसऱ्यापासून कांहीं अपेक्षा करण्यासारखें पहिल्या (कोणच्याहि एका) पक्षानें त्याकरितां काय केलें ह्याचा नीट विचार करणें, हें होय. कोर्टाचा उद्देश म्हणजे दोन्ही पक्षांवर कांहीं अटी लादाव्या हा नसून, शक्याशक्य गोष्टी त्यांच्या नीट लक्षांत येऊन त्यांनीं ज्या कांहीं वाजवी अटी ठरविल्या असतील त्याच अटी ठरवून कराराची पूर्णता करणें हा आहे. ह्याकरितां कोर्टाला पुष्कळ निरनिराळ्या गोष्टी पहाव्या लागतात; जसें:—दुसऱ्या तपशिलावर दिलेल्या गोष्टींत ह्या पक्षांनीं उघड रीतीनें काय योजना केली आहे ह्यांची तुलना करणें, ह्यासारख्या व्यवहारांत पडलेले लोक अशा प्रसंगीं बहुशः काय करतात हें पाहाणें, व वेळ पडली तर सरते शेवटीं कोर्टाच्या दृष्टीनें न्याय्य व प्रसंगोचित कोणतें हें ठरविणें. ह्या गोष्टी सुद्धां दोन्ही पक्षांच्या मनांतील आशय उघड नसेल तेव्हां त्यांची इच्छा काय, ह्याचा विचार करून करावयाच्या असतात. येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, कधीं कधीं कराराची पूर्तता दोन पक्षांमध्यें एक नातें जमवून देते; तें एकदांचें जमलें कीं, कायद्याच्या अदलीं नियमांनीं त्याचें नियंत्रण केलें जातें, तें पूर्वीच्या करारानें बदलूं शकत नाहीं. विवाह हें एक अशा प्रकारांतील ढळढळीत उदाहरण आहे व प्रचलित कायदेपद्धतींत ह्यासारखें दुसरें येथें पूर्णपणें लागू पडणारें उदाहरण सांपडणार नाहीं.

अर्थनिर्णयाला मर्यादित किंवा मदत करण्यासाठीं पुराव्यासंबंधीं कांहीं नियम केलेले असतात. लेखी करारांतील अटी तोंडी पुराव्यानें बदलतां येत नाहींत. अटी लिहून काढण्याचा हेतु त्यांनां कायमचें स्वरूप देण्याचा असतो, तेव्हां दूरवर विचार करून घातलेल्या अटी अशा कायमच्या स्वरूपांत असतांना, तोंडीं पुराव्यावरून त्यांचें उच्चाटन करणें वाजवी होणार नाहीं. ह्याला कांहीं अपवाद आहेत, त्यापैकीं प्रमुख म्हणजे विशिष्ट शब्द वादविषयींभूत ठिकाणीं व्यवहारांत रूढ असलेल्या एका विशिष्ट प्रकारच्या अर्थी वापरले आहेत हें दाखवावयाचें झाल्यास पुरावा दाखल करून घेतात. परंतु जीं सर्वसामान्य तत्वें या बाबतींत लागू करतां येतात तीं अशीं:—दस्तैवज कायदेशीर करण्यापूर्वी त्याचा जो उद्देश आहे (अमुक अमुक तऱ्हेचा असावा म्हणून) त्याप्रमाणें तो खरोखर आहे कीं नाहीं हें आपण पाहिलें पाहिजे आणि जेव्हां आपण त्यांतील अटी-प्रमाणें चालतों त्यावेळीं त्या अटी खरोखर काय आहेत त्या-विषयीं आपली खात्री करून घेतली पाहिजे. हे आतां सांगितलेले पुराव्याचे नियम सध्यां प्रचलित आहेत. दस्तैवजा-संबंधीं सांगितलेल्या जुनाट नियमांचा ह्यांच्याशीं कांहीं एक संबंध तेथें नाहीं.

करार करणाऱ्या प्रत्येक पक्षानें त्यांतील अटींवर-हुकूम वागलें पाहिजे आणि जेथें शंका उत्पन्न होईल अशा ठिकाणीं दुसऱ्या पक्षाला त्याविषयीं जें वाजवी रीतीनें वाटत असेल असें वागलें पाहिजे. जेव्हां एक किंवा दोन्ही पक्षां-कडून कराराची बजावणी एकसारखी किंवा हप्त्या-हप्त्यानें कांहीं काळपर्यंत चालू राहाते, तेव्हां एका पक्षाला दुसऱ्या पक्षाच्या चुकीमुळें पुढील बजावणी नाकारण्याचा किंवा तहकूब ठेवण्याचा हक्क येतो कीं काय असा प्रश्न उभा राहतो. ह्यासंबंधांत कोर्टाची कराराच्या आशयावर व तत्वार्थावर जास्त मदार असते. हल्लींच्या देवघेवींच्या व्यवहारासंबंधांत तर विचारपूर्वक संमति दिलेल्या अटींचा एक भाग दुसऱ्यापेक्षां जास्त आवश्यक व महत्वाचा आहे असें कोर्ट मानीत नाहीं. व्यापारी लोकांच्या करारांत वेळेलाच जास्त प्राधान्य दिलें जातें. करारांत नमूद केल्या नाहींत अशा अटी करार करणाऱ्या पक्षांच्या मनांत बंधनकारक व्हाव्यात असें होतें कीं नाहीं असा प्रश्न अर्थनिर्णयाच्या वेळीं पुष्कळ वेळां निघतो. करार करून घेणाराची कांहींएक चुकी नसतां, कांहीं बाह्य कारणांमुळें ज्यांत कराराची बजावणी अशक्य होते अशा खटल्यांत वरीलसारखा प्रश्न उद्भवतो. अशाच सारखा दुसऱ्या तऱ्हेचा खटला म्हणजे हा कीं, ज्यांत कराराची बजावणी शब्दशः झाली असली तरी

तीमुळें करार करून घेणाराला ज्याकरितां त्यानें हा सौदा ठरविला ती गोष्ट तर मुळींच मिळत नाहीं. जे करार पहिल्यापासूनच उघड उघड अप्रयोजक, अयुक्त किंवा अशक्य असतील त्यांची अंमलबजावणी करतां येत नाहीं. कारण दोन्ही पक्षांच्या मनांतून त्यावद्दल कोणाला तरी जबाबदार धरावें असें खरोखर नसतेंच. ह्याच कारणामुळें सर्वसामान्य चालीरीति व मनुष्य जातींतील एकमेकांविषयीं समज लक्षांत घेऊन साधारण समाजांतील बोली कायदेशीर करारासारख्या होत असल्या तरी त्या कायद्यानें बंधनकारक आहेत असें मानीत नाहींत.

कराराच्या सर्व बाबींत दोन्ही पक्षांचा जो निश्चित आशय असेल तो मानला जातो असें मागें सांगितलें आहे. तथापि तो आशय कायद्याला मान्य व अनियंत्रित असा पाहिजे. तेव्हां वरील सर्वसामान्य नियमाला दोन प्रकारचीं बंधनें आहेत. एक वैय्यक्तिक इच्छा व लाभ ह्यापेक्षां श्रेष्ठ अशा देशाच्या कायद्यानें घातलेलें; व दुसरें लबाडी किंवा दुष्कृत्य ह्यापासून दोन्ही पक्षांमधील न्यायबुद्धि व दृढविश्वास ह्यांचें संरक्षण करण्याच्या आवश्यकतेमुळें उत्पन्न झालेलें. जेव्हां करार बजावणींत कायद्याविरुद्ध गुन्हा केल्याचा आरोप येऊं शकतो तेव्हां असल्या करारांची अम्मलबजावणी करतां येत नाहीं. राजद्रोह, दुराचरण वगैरे कृत्यें केलीं असतांच कायद्यानें गुन्हा होतो असें नाहीं तर शासनसंस्थेनें किंवा कायदे करण्याचा अधिकार असलेल्या संस्थेनें केलेले विधायक नियम मोडले असतांहि होतो. ह्याशिवाय कांहीं अशा गोष्टी आढळतात कीं, ज्यांत कोणत्याहि प्रकारें कायद्याविरुद्ध न जातां, करार करून त्याची बजावणी करतां येते, पण सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें ( राजधोरणावरून ) पाहातां जरी कायदेशीर रीतीनें त्याची अम्मलबजावणी करतां येत असली तरी तसें करणें बरोबर होणार नाहीं. आपण वाटेल तर एकांतांत पैज लावावी व वेळ पडेल त्याप्रमाणें पैसे द्यावे किंवा घ्यावे; पण पैज जिंकणाराला पैज हरणाराविरुद्ध दावा आणितां येत नाहीं. सार्वजनिक व्यवहारविषयक धोरणांतील ह्यासंबंधांत प्रमुख तत्त्व म्हणजे "व्यापार नियंत्रक करारां"ना कांहीं विशिष्ट मर्यादा घालणें हें होय. मध्ययुगांत आणि अगदीं परवांपर्यंत कुलमक्तयाविरुद्ध लोकांची फार ओरड होती. पण हळू हळू ही कमी होऊन कांहीं कांहीं व्यवहारांत कुलमक्तेगिरी अन्यायमूलक स्पर्धा बंद ठेवण्यासाठीं आवश्यक अशी भासूं लागली. हे व्यवहार असेः—नांवासकट धंदा विकणें, चालू असलेल्या पेढींतून भागीदारांनीं अंग काढणें, व्यापारीरहस्य समजून येईल अशा कामावर विश्वासू नोकराची नेमणूक करणें इ. हल्लीं व्यापारनियंत्रक करार कायद्याला धरून आहेत पण त्यांबद्दल योग्य किंमतीचा मोबदला घेतलेला असला पाहिजे आणि लोकांचें नुकसान न होतां संबद्ध हिताचें संरक्षण करण्यास वाजवी तेवढेंच नियंत्रण त्यांत असलें पाहिजे. इ. स. १८७२ त पास झालेल्या इंडियन कॉंट्रक्ट अॅक्टमध्यें हल्लींच्या परिस्थितीस अनुचित अशीं जीं मतें ठोकून दिलीं आहेत त्यांत कांहीं सुधारणा अजून केलेली नाहीं. करारामध्यें त्याची अम्मलबजावणी न करतां येण्यासारखें कांहीं नसलें तरी सुद्धां करार करणाऱ्या एखाद्या पक्षाची संमति त्याला कदाचित बंधनकारक होऊं शकणार नाहीं. कारण वाजवी माहिती नसतांना त्यानें संमति दिली किंवा तो दुसऱ्या पक्षाचा पूर्ण अंकित असतांना त्याची संमति घेतली गेली असेल, जर एखाद्याला फसवून त्याच्याकडून करार करून घेतला तर जो फसला असेल त्याला खरी गोष्ट उघडकीस आल्यानंतर योग्य मुदतींत व तिसऱ्या मनुष्यानें किंमत देऊन करारांतील हक्क विकत घेण्यापूर्वी करारानें प्राप्त झालेलें बंधन झुगारून देण्याला सबळ कारण मिळतें. धमकी देऊन काम करून घेणें हें दगलबाजीसारखेंच समजलें जातें. नैतिक अधिकार गाजवून किंवा गैर वाजवी भीड घालून काम करून घेतलें आहे कीं काय हें कोर्ट फार दक्षतेनें पहात असतें व त्याचा नायनाट करण्याची त्याची फार खटपट आहे. पालक, विश्वासूक सल्लागार, अध्यात्मज्ञान देणारे गुरु, ह्यांसारख्या अधिकारी माणसांनीं स्वार्थासाठीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करतां कामा नये. त्यांनीं आपल्यावर अवलंबून असतील त्यांच्याकडून कांहीं फायदा करून घ्यावयाचा नाहीं असें नाहीं; तर फायदा करून देणारांनां जर तसें केल्याबद्दल पुढें पश्चाताप वाटला तर मात्र फायदा घेणारांवर देणगी पहिल्या प्रथम जाणून बुजून राजी खुषीनें दिलेली होती असें सप्रमाण सिद्ध करून देण्याची जबाबदारी येते.

स्वाभाविक प्रेमानें व नेहेमीच्या चालीरीतीप्रमाणें दिलेल्या मोठमोठ्या देणग्या किंवा नमूद केलेले करार तेवढे कायद्याला संमत आहेत. एरवीं अशा गोष्टीला कोणतेंहि सुधारलेलें कायदेशास्त्र पुष्टी देत नाहीं. दगलबाजी व गैरवाजवी भीड यासंबंधांत ज्याला करार न मानण्याचा हक्क येतो त्यानें वाटेल तर पुढें त्याला दुजोरा द्यावा. पण एकदां कां पूर्णपणें विचार करून राजीखुषीनें त्याला दुजोरा दिला, तर मग मात्र तो कधींहि परत घेतां येत नाहीं. निराशा किंवा मानसिक दौर्बल्य यामुळें जो एरवी समंजस असलेला मनुष्य मत देण्याला नालायक होतो, अशा मनुष्याशीं जाणून बुजून जर करार केला तर तो दगलबाजीनें करून घेतलेल्या कराराप्रमाणेंच अम्मलबजावणीस बेकायदेशीर ठरतो.

कधीं कधीं असेंहि होतें कीं, एक पक्ष दुसऱ्या पक्षाला एखाद्या गोष्टीविषयीं खरी म्हणून माहिती देतो; माहिती देणाराला तिच्या खरेपणाविषयीं बिलकूल शंका नसते, तरी पण ती खरोखरीची खोटी असते. अशा प्रसंगीं जर तो दुसरा पक्ष त्यावर अवलंबून असेल, तर तो करार त्याला टाळतां येतो. व्यवहारांतील नेहमीं घडणाऱ्या गोष्टींत असें आढळून येतें कीं, एका पक्षालाच जें खरें खोटें असेल तें

समजण्याला मार्ग असतो; व दुसऱ्या पक्षाला साहजिक रीतीनें ह्यासंबंधांत पहिल्यावर अवलंबून रहावें लागतें. कांहीं कांहीं बाबतींत तर एखाद्या गोष्टीविषयीं चुकून कांहीं खरी माहिती सांगावयाची राहिल्यास, अन्यथा निवेदनाचा आरोप येतो. विम्याचे करार ह्या सदरांत प्रमुख आहेत. कारण येथें विमाकंपनी वगैरे हमी घेणारांनां स्वतः खरी व पूर्णपणें चौकशी करण्यास फारच थोडीं साधनें असतात. विकाऊ स्थावर मालमत्तेसंबंधीं कांहीं एक कपट न बाळगतां केवळ चुकीचें वर्णन केल्यानें होणाऱ्या नुकसानाची भरपाई किंमतीप्रमाणें मिळते किंवा त्यासंबंधीं केलेला करार रद्द ठरतो. भलतीच समजूत करून देण्यानें–कपटानें नव्हे–प्रत्येक जातीचा करार रद्द ठरतो असा सर्वसाधारण नियम करतां येत नाहीं. कारण लग्न करण्याविषयींचा करार किंवा मालाची विक्री यासंबंधांत ह्या नियम लागू नाहीं. आतां दोन्ही पक्षांनां पाहिजे तर असाहि करार करतां येतो कीं, अशी अशी गोष्ट असली तरच ह्या करार कायदेशीर, एरवीं नाहीं. अशा तऱ्हेची अट घालून करार केला म्हणजे ती नमूद केलेली गोष्ट तशी नसली तर आपोआपच करार रद्द ठरतो व तो भलतीच समजूत करून दिल्यामुळें नव्हे तर ही अट घातल्यामुळें तसा ठरतो. तसेंच चुकीनें केलेले करार पुष्कळ वेळां बंधनकारक होत नाहींत; आणि ह्या (चुकीच्या) सदराखालीं कांहीं कांहीं दावे घालणें पुष्कळ सुलभ जातें. वचनाचा बाजवी मोबदला घेतला नसणें किंवा जशी सूचना असेल तसाच स्वीकार केला नसणें, अशा प्रकारचा मुद्दा येथें लावतात. अशा तऱ्हेच्या व्यवहारांत, मग तेथें दगलबाजी असो वा नसो, करार झाला असें मुळीं मानीतच नाहींत; तेव्हां तो मुक्रर करण्याची गोष्टच नको. जेव्हां मनांतील आशय बरोबर उघड करून दाखवयाचा राहिला असून करराला संमति दिली गेली असेल तेव्हां अशा चुकीची दाद घेण्यांत येते. अशा वेळीं मूळचा खरा आशय कोणता हें चांगल्या रीतीनें सिद्ध करून दाखविलें असतां त्या चुकीच्या दस्तैवजांत न्याय्य अशी सुधारणा करण्यांत येते.

विशेष आवश्यक जिनसांबद्दल केलेले करार अज्ञानांनां बंधनकारक होतात. करारांत त्यांनीं कबूल केलेली किंमत न देववितां, कोर्ट फक्त वाजवी ती किंमत अज्ञानांशीं करार करणारांनां देववितें. वस्तुतः जे अज्ञानांशीं उधारीचा व्यवहार ठेवतात त्यांच्यावर नुकसानीची सर्व जोखीम येते. जेव्हां ते अज्ञानी उघड उघड अडचणींत सांपडतील त्या वेळीं गरज केल्यास गोष्ट निराळीः पण एरवीं त्यांच्या सावकारांनां आपल्या नुकसानीबद्दल कुरकुर करण्यास जागा रहात नाहीं.

पूर्वी लग्न झालेल्या बायकांनां आपल्या नांवानें करार करतां येत नसे. पण सध्यां त्यांनां निराळी इस्टेट करतां येते व करार करून आपल्या इस्टेटेपुरतेंच त्या आपल्याला बांधून घेऊं शकतात. त्यांचा असा करार वैयक्तिक बंधन होऊं शकत नाहीं.

" कंपनीज् ॲक्ट " खालीं हल्लीं कंपन्यांनां शासन किंवा नियंत्रण करणारें जर कांहीं असेल तर ती त्यांच्या उद्देशांची व स्थापनेच्या नियमांची यादी. हल्लीं ही यादी पुष्कळ दिवसांच्या अनुभवानें, फार व्यापक व चांगल्या तऱ्हेनें तयार करतात. कंपनीच्या भागीदारांची अपात्रता तिला बाधूं शकत नाहीं; व तिला कायद्याची अपात्रता बहुधा कधीं येत नाहीं.

करारानें प्राप्त झालेले हक्क हे वचन देणारावर व त्यांच्या कायदेशीर प्रतिनिधींवर गाजवावयाचे वैयक्तिक हक्क आहेत. तेव्हां मालकीचे हक्क व त्यासारखे इतर हक्क कीं, जे सर्व जगाशीं भांडून आपणाला मिळवितां येतात अशांहून हे फार भिन्न आहेत. तथापि हे पैशांनीं सुद्धां मोजतां येतात व मनुष्याच्या मालमिळकतीचा एक भाग असें यांस मानतात. वहींत नोंदलेलें कर्ज हें एक याचें ढोबळ उदाहरण आहे. अशा प्रकारचे हक्क एका प्रकारानें आपली जिंदगीच आहे. हे विकतां येतात, दुसऱ्याला पैशासारखे देतांहि येतात. हुंडी वगैरे वेचनीय दस्तैवजावरून मिळालेले हक्क, हे संपत्तीची एक अनन्यसाधारण व फार महत्वाची जात आहे. ह्यांची देवघेव करतां येते इतकेंच नव्हे तर व्यापारी चलनी नाण्यांत ह्यांच्या इतकें दुसरें महत्वाचें नाणें नाहीं. करार आणि फरोक्त हीं पुन्हां निरनिराळीं आहेत. " कॉमन लॉ " प्रमाणें करारावरून फक्त जंगम मिळकत विक्रीनें दुसऱ्याला देतां येते, पण फ्रेंच व त्यासारख्याच कायदेपद्धतीप्रमाणें ह्या नियम स्थावर व जंगम अशा दोन्ही मिळकतींस लागू आहे. एखाद्याला करार मोडावयास लावणें म्हणजे, दुसऱ्या पक्षाचा दिवाणी अपराध करणें होय असें इंग्लिश कायद्यांत सांगितलें आहे.

[संदर्भग्रंथ—एन्सायक्लोपीडिया ऑफ दि लाज् ऑफ इंग्लंड. पोलॉक–इंडियन कॉन्ट्रॅक्ट ॲक्ट, प्रिन्सिपल्स ऑफ कॉन्ट्रॅक्ट. ॲन्सन–इंग्लिश ला ऑफ कॉन्ट्रॅक्ट. लीके–प्रिन्सिपल्स ऑफ दि लॉ ऑफ कॉन्ट्रॅक्ट. होलमेज–दि कॉमन ला.]

**करारी**—हिंदु शाक्तांचा एक पंथ. फारशी " करारी " ( = न चळणारा ), किंवा संस्कृत " कराल " ( = भयंकर) शब्दापासून हें नांव बनलें असावें. हे शक्तीचे उपासक असतात. काली, चामुंडा, छिन्नमस्तका वगैरे उग्र स्वरूपांत असणाऱ्या शिवशक्तीला मनुष्यबली देणाऱ्या जुन्या कापालिक अघोरपंथी लोकांप्रमाणेंच ही एक अर्वाचीन जात आहे असें विल्सन( रिलिजस सेक्ट्स ऑफ दि हिंदूज ) म्हणतो. शूल किंवा गळ यांनीं अंग भोसकणें, जीभ किंवा गाल यांतून बारीक टोंकांच्या सळया वगैरे घालणें, चाकूनीं स्वतःला मारून घेणें किंवा तीक्ष्ण टोंकांच्या सुळांवर निजणें यांसारखे प्रयोग करून आधुनिक करारी स्वतःला देहदंड करून घेतात.

हे या गोष्टी ईश्वरभक्तीकरितां करीत नसून लोकांकडून पैसे उकळण्यासाठीं मुद्दाम करतात.

**कराष्टमी**—आश्विन महिन्यांतील वद्य अष्टमी. या दिवशीं कुमारिका गंगोदकानें भरलेला करा हातांत घेऊन देवीची पूजा करतात. ही चाल काशीच्या बाजूस दृष्टीस पडते.

**कॅरिअन, लोकांचें वर्णन**:—ह्यांचा देश एजियन समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर लीडियाच्या दक्षिणेला आहे. डोरियन ग्रीकांनीं ख्रि. पू. एक हजाराच्या सुमास कॅरियाचा किनारा व्यापल्यावर तेथले मूळचे रहिवाशी आंतल्या बाजूच्या डोंगराळ प्रदेशांत रहावयास गेले. कॅरियन लोक मूळचे कॅरियांतलेच असा डोरियनांचा समज आहे. परंतु मूळचे ते एजियन बेटांतले आहेत अशी ग्रीकांची समजूत होती. क्रीटच्या मिनॉस राजाचे हे प्रजाजन होते. पुढें डोरियन ग्रीकांनीं हांकून दिल्यामुळें ते डोंगराळ प्रदेशांत राहूं लागले. तथापि कॅरियन लोक हे चांगले लढवय्ये होते. त्यांच्या युद्धविषयक बऱ्याच गोष्टींत ग्रीकांनीं त्यांचें अनुकरण केलें. शिरस्त्राणें घालण्याची आणि ढाली वापरण्याची पद्धत ग्रीकांनीं त्यांच्यापासूनच घेतली. ग्रीकांच्या सैन्यांत कॅरियन लोक द्रव्याच्या आशेनें नोकऱ्या करीत असत. ख्रि. पू. ८ व्या व ७ व्या शतकांत कॅरियन लोकांनीं समुद्रावर लुटालूट चालवून इतरांनां बरेंच भंडावून सोडलें होतें. झ्यूस ही त्यांची युद्धदेवता असून त्यांच्या नाण्यावर याच देवतेची मूर्ति असे.

**राष्ट्राचा इतिहास**.—डोंगराळ प्रदेशांत रहात असतांना कॅरिअन राष्ट्रावर एका राजाचा अमंल नसून, निरनिराळ्या राज्यकर्त्यांचा असे व त्या सर्वांचा मिळून एक संस्थानसंघ बनला होता. हीच राज्यपद्धति इराणी लोकांनीं त्यांनां जिंकल्यावरहि चालू होती. कॅरियामध्यें हालिकारनेसस हें शहर सर्वांत प्रसिद्ध होतें. येथें राज्य करणारे अनेक राजे इतिहासांत प्रसिद्ध आहेत. येथील आर्टेमिशिया नांवाची राणी सालामिस येथें क्सर्क्सीसबरोबर होती, व ती त्या इराणच्या बादशहाला उत्तम सल्लामसलत देत असे असें हिरोडोटसनें लिहिलें आहे. याच नांवाची दुसरी एक स्त्री ख्रि. पू. चौथ्या शतकांत हयात असलेल्या मॉसोलस याची पत्नी होती. हा मॉसोलस जरी इराणचा मांडलीक होता, तरी वास्तवीक स्वतंत्र राजाप्रमाणेंच होता. त्याच्या पश्चात त्याची राणी राज्यकारभार पहात असे. तिनें राजाच्या स्मरणार्थ 'मॉसोलेम' नांवाचें एक थडगें बांधलें असून त्याची जगांतील अत्यंत आश्चर्यकारक अशा स्मारकस्थलांत गणना होते. पुढें कॅरिया रोमन साम्राज्याला जोडण्यांत आलें.

**करिआन**—मुंबई. काठेवाडमधील एक लहानसें संस्थान. बात्र ठाण्यांतील या स्वतंत्र खंडणी देणाऱ्या तालुक्यांत करिआन धरून दहा गांवें आहेत. तालुकदार खाचर जातीचे काठी आहेत.

**कॅरिबी बेटें**—कॅरिबी बेटें हें नांव ऐतिहासिक दृष्टीनें महत्वाचें असून कधीं कधीं सर्व वेस्ट इंडीज बेटांनां लावतात. पोर्टोरिकोपासून दक्षिण अमेरिकेच्या किनाऱ्यापर्यंत पसरलेल्या बेटांचें हें नांव आहे. या बेटांनां लेसर अँटिल्स असेंहि नांव असून यांचे लीवर्ड व बुइंडवर्ड असे दोन भाग पाडले आहेत.

**कॅरिसब्रूक**—हें इंग्लंडमधील वाइट बेटांतील शहर न्यूपोर्टच्या दक्षिणेस १ मैलावर आहे. येथील लोकसंख्या (१९०१) ३९९३ होती. लुगले ओढ्यामुळें हें खेडें व उंच पर्वतावरील प्रसिद्ध किल्ला निराळा झाला आहेत. डूम्सडे सर्व्हे बुकांत कॅरिसब्रूकचें नांव सांपडत नाहीं. परंतु बाउकोम्ब नांवाचा उल्लेख आलेला आहे. यांत या किल्ल्याचा आलव्हिंगटन या नांवाखालीं उल्लेख केला आहे. हा किल्ला वाइट बेटाच्या अधिकाऱ्याच्या ताब्यांत असतो; म्हणून हा किल्ला त्या बेटाची राजधानी आहे. पहिल्या हेनरीनें या बेटाचें आधिपत्य रिचर्ड डी रेडव्हेर्स याजकडे दिलें. पुढें इसाबेला डी फॉर्टिवसनें हा पहिला एडवर्ड याला विकला. एलिझाबेथच्या अमलांत स्पॅनिश आर्माडाच्या वेळीं या शहरास पंचकोनाकृति तटबंदी केली होती. येथें पहिल्या चार्लसला फांसावर चढविण्यापूर्वी १४ महिनेपावेतों कैदेंत ठेवलें होतें. नंतर त्याच्या सर्वांत लहान दोन मुलांस याच किल्ल्यांत कोंडून ठेवलें होतें. १९०४ मध्यें येथें सेंट निकोलसचें प्रार्थनामंदिर पुनः बांधलें. येथें २०० फूट व त्यांहूनहि जास्त खोल अशा दोन विहिरी आहत. कॅरिसब्रूक येथें पूर्वी मोठा बाजार भरत असे व या ठिकाणीं बरेच कारखाने असून मासे धरण्याचें काम देखील फार चालत होतें. परंतु या शहरास प्रतिनिधि निवडण्याचा हक्क कधींच मिळाला नाहीं.

**करीमखान**—हा एक शिंदेशाहींतील पेंढारी असून यानें, खर्ड्यांच्या लढाईनंतर (इ. स. १७९५) निजामाच्या सैन्याची जी लूट झाली, तींत बराच पैसा मिळविला. कावेबाजपणा व धाडस या गुणांत हा सर्व पेंढाऱ्यांत श्रेष्ठ असल्यामुळें तो त्यांचा पुढारी बनला. अमीरखानानें करीमखानास शुजालपूर जिल्हा दिला. यांतच शिंद्यानें आणखी कांहीं मुलूख देऊन भर टाकली. १८०३ सालच्या शिंदे-इंग्रजामधील युद्धांत व त्यानंतरच्या बेबंदशाहीच्या काळांत करीमखाननें शिंद्याच्या जहागिरदारांचे माळव्यांतील कित्येक जिल्हे काबीज केले. एकदां तर त्याच्या मुलुखाचा वसूल १५ लाख रुपयांपर्यंत गेला होता असें म्हणतात। त्यानें भोपाळच्या नबाबाचाहि कांहीं मुलूख बळकावला. आपलीं बायकापोरें व लूट ठेवण्याकरितां त्यानें एक किल्ला बांधला होता. तो शिंदेशाहींतील पेंढारी होता तरी त्याला जेव्हां सोईस्कर पडे तेव्हां तो दुसऱ्या पक्षास जाऊन मिळत असे, किंवा आपल्या धन्यासहि लुटण्यास चुकत नसे. यामुळें शिंद्यानें एकदां कांहीं तोफा देण्याचें मिष करून त्याला आपल्या

भेटीस बोलाविलें व कैद करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत अटकेंत ठेवलें. पुढें करीमखानानें पैसे भरून आपली सुटका करून घेतली (१८१०). त्याच्या हाताखालीं यावेळीं २५,००० फौज व कांहीं पायदळ इतकें सैन्य होतें. नागपूरच्या भोंसल्याजवळ चांगलें सैन्य नसल्यामुळें वऱ्हाडांत स्वारी करण्याचा त्याचा विचार होता. परंतु त्याच्या हाताखालील छोटु नांवाचा एक पेंढारी त्यास सोडून गेला व ह्याच छोटूस आपल्या मदतीस घेऊन शिंद्यानें त्याजवर हल्ला केला. तेव्हां त्याला अमीरखानाच्या आश्रयास जाणें भाग पडलें. परंतु अमीरखानानें त्यास शिंद्याच्या सांगण्यावरून कैद केलें. इ.स.१८१६ पावेतों तो अमीरखानाच्या अटकेंतच होता. पुढें इ. स. १८१७ मध्यें पेंढाऱ्यांविरुद्ध इंग्रजांनीं मोहीम सुरू केली व त्यांनां माळव्यांतून हांकून दिलें. इ. स. १८१८ च्या जानेवारीपर्यंत बहुतेक पेंढारी मारले गेले व शिल्लक राहिलेले लुटालुट करण्याचें सोडून स्वस्थ राहिले. करीमखान शरण आल्यानें त्याला गणेशपूर येथील जहागिरी दिली. त्यानंतर कांहीं काल तेथें त्याचा वंश नांदत असे. परंतु १८५८ च्या बंडांत भाग घेतल्याच्या आरोपावरून ही जहागिरी खालसा झाली. हें गांव बस्ती जिल्ह्यांत आहे [ ग्रां. डफ; स्मिथ. ऑ. इ. ].

**करीमगंज,** पो ट वि भा ग.—आसामांतील सिलहट जिल्ह्याचा आग्नेय पोटविभाग. क्षे. फ.८२०चौ. मै. यांत करीम गंज हें मोठें गांव ( मुख्य ठिकाण ) व शिवाय १०८६ खेडीं आहेत. दक्षिणेचा भाग टेंकड्यांच्या योगानें वराच तुटलेला आहे. लो. सं. ( १९११ )३१८०५५. मागील दशकांत वाढ शें. ७. प्रमाणें. करीमगंज गांवांत वार्षिक पाऊस १६० इंच पर्यंत पडतो. परंतु लगई खोऱ्यांत पावसाचें मान यापेक्षां ५० इंच कमी असतें. या पोटविभागांत चहाची लागवड बरीच होते.

गां वः—आसामांत सिलहट जिल्ह्यामध्यें याच नांवाच्या पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें कुसियारा नदीच्या डाव्या तीराला आहे. गांव व्यापाराला फार सोईचें असून, नदींतून चालणारीं जहाजें येथें लागतात. शिवाय हें आसाम-बंगाल रेल्वेचें स्टेशन आहे. लो. सं ( १९११ ) ६५१२. येथून भात, मोहरी, जवस, चटया, व इमारती लांकूड वगैरे जिन्नस बाहेर पाठविले जातात.

**करीमनगर,** जि ल्हा.—हैद्राबाद (दक्षिण ) संस्थानांत वारंगळ विभागामधील एक जिल्हा. क्षे. फ. ५७३३ चौ. मै. याच्या उत्तरेस अदिलाबाद, पूर्वेस मध्यप्रांतांतील बस्तर संस्थान, दक्षिणेस वारंगळ व पश्चिमेस मेदक आणि निझामाबाद हीं आहेत. या जिल्ह्यांत डोंगराच्या तीन रांगा आहेत. गोदावरी ही जिल्ह्यांतील मुख्य नदी असून ती कांहीं मर्यादे पर्यंत उत्तर व पूर्व सरहद्दीवरून वहाते. शिवाय मानेर, पेद्दवागु व चेल्लवागु या तिला मिळणाऱ्या नद्याहि या जिल्ह्यांतून वहातात. करीम नगर जिल्ह्यांत अरण्य व झाडी हीं बरींच असून त्यांत वाघ, चित्ता, अस्वल, तरस, कोल्हे, रानडुकर रानकुत्रे, वगैरे वन्यपशु आढळतात. महादेवपुर व सिरसिला आणि जगतियाल यांचे कांहीं भाग सोडल्यास इतर ठिकाणाची हवा निरोगी आहे. करीमनगर व जमिकुंट येथील उष्णमान मे महिन्यांत ११०° पर्यंत जातें. वार्षिक पाऊस सरासरी ३३ इंच पडतो.

या जिल्ह्याची लो. सं. १९०१ मध्यें ८३५३२४ व १९११ मध्यें ११३१६३७ होती. यांत एकंदर सात तालुके आहेत. करीमनगर, जमिकुंट, सुलतानावाद, जगतियाल, सिरसिला, महादेवपूर व परकाल, जगतियाल मंथनी, कोरतल, करीमनगर व वेमलवाडा हीं जिल्ह्यांतील मोठीं गांवें होत. लोकसंख्येपैकीं सुमारें शें. ९६ हिंदु आहेत. व शें. ९० तेलगु आणि शें. ६ उर्दू भाषा बोलतात.

ता लु का.—हैद्राबाद संस्थानांत करीमनगर जिल्ह्यांतील तालुका. क्षे. फ. ९४९ चौ. मै. लो. सं.(१९११) २१०४२९. या तालुक्यांत करीमनगर ( जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. ) हें मोठें गांव व १८६ खेडीं आहेत. यांतून मानेर नदी पूर्वपश्चिम वहाते.

गां व.—हैद्राबाद संस्थानांतील करीमनगर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें गांव मानेर नदीच्या कांठीं एलगंडलपासून ६ मैलांवर आहे. लो. सं. ( १९११ ) ८२४३. हें गांव कलावतु व जरीच्या कामाकरितां प्रसिद्ध आहे.

**करुंगुळी**—मद्रास प्रांत. चिंगलपट जिल्ह्यामध्यें, मदुरांतकम् तालुक्यांतील गांव. हें साउथ इंडियन रेल्वेवर असून गाडीरस्त्यानें मद्रासपासून ४८ मैलांवर आहे. लो. सं. ( १९०१ ) ४०६५. इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान चालू असलेल्या युद्धाच्या वेळीं, येथील किल्ला लष्करीदृष्ट्या फायद्याचा असल्यामुळें इंग्रजांनीं काबीज केला होता. किल्ल्याचा घेर १५०० यार्ड आहे; या किल्ल्यांत मुसुलमानांनीं बांधलेलीं धान्याचीं कोठारें आहेत. परंतु तीं अगदीं मोडकळीस आलीं आहेत. मदुरांतकम् तळ्यांत जास्त झालेलें पाणी येथील तळ्यांत येतें. गांवांत आंवराईमध्यें एक धर्मशाळा आहे.

**करूर,** ता लु का.—मद्रास इलाख्यांतील त्रिचनापल्ली जिल्ह्यामधील आग्नेय तालुका. क्षे. फ. ६१२ चौ. मै. या तालुक्यांत डोंगर किंवा अरण्य मुळींच नसून, याच्या उत्तर मर्यादेवरून कावेरी नदी वहाते व अमरावती नदी तालुक्यांतून जाते. यांत करूर ( मुख्य ठिकाण ) शिवाय दुसरीं ९५ खेडीं आहेत. लो. सं. ( १९११ ) २४१२५२. या तालुक्यांत पाऊस बराच ( वार्षिक सरासरी २६ इं. ) पडतो व पिकेंहि साधारणतः चांगलीं येतात.

गां वः—मद्रास इलाख्यांत, त्रिचनापल्ली जिल्ह्यामध्यें याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें अमरावती नदीच्या कांठीं असून, साउथ इंडियन रेल्वेवर आहे. लो. सं. (१९११) १७६६४. सात पवित्र स्थलांपैकीं करूर हें एक आहे. देश्य भाषेंत गांवाला तिरुवाणिळै अथवा पशुपति असें म्हणतात. " करूर " याचा अर्थ गर्भ-पुर असा असून ब्रह्मदेवानें सृष्टि

उत्पन्न करण्यास येथूनच सुरुवात केल्यामुळें या गांवाला हें नांव मिळालें अशी समजूत आहे. व याच कारणामुळें, पौराणिक दंतकथांतून या गांवाचा उल्लेख ब्रह्मपुरी या नांवानें केलेला आढळतो. प्राचीनकाळीं हें गांव बरेंच महत्त्वाचें असावें; कारण येथें जवळच आगस्टस, टायबेरियस, व क्लाडियस या रोमन बादशहांचीं नाणीं सापडलीं होतीं. चेर, चोल व पांड्य या प्रतिस्पर्धी राजांचे मुलुख जेथें एके ठिकाणीं मिळतात त्याच्या जवळच हें गांव वसलें असल्यामुळें प्राचीन लढायांत या गांवाला बरेंच महत्त्व असलें पाहिजे. चेर राजांची अति प्राचीन राजधानी जीवंजी किंवा वंची शहर तें या करूर गांवाहून निराळें होय. तें कोचीन जवळील १४ कोसांवरचें हल्लींचें तिरु करूर नांवाचें खेडें होय. या दोन करूर नांवांचा घोटाळा अर्वाचीन लेखकांनीं केला आहे. चित्रनापल्लीच्या करूर गांवीं परमेश्वरवर्मा ( दुसरा ) पल्लव यानें पांड्य राजाचा पराभव केला. इ. स. १६६५ त विजयानगरचें साम्राज्य मोडल्यानंतर करूर मदुरेच्या नायकांकडे गेलें. परंतु त्यावर म्हैसूरच्या सैन्याचे वारंवार हल्ले होत; व शेवटीं सतराव्या शतकाच्या अखेरीस तें म्हैसूरच्या राज्याला कायमचें जोडलें गेलें. १७३९ त जेसुइट लोकांनीं आपलें मिशन येथें स्थापन केलें. पुढें हें गांव कित्येक लोकांच्या हातून गेलें. १७३६ त चंदासाहेबानें याला वेढा दिला होता परंतु त्याला यश आलें नाहीं. हैदरनें फ्रेंचांनां मदत केल्याबद्दल त्याचा सूड घेण्याच्या उद्देशानें इंग्रजांनीं १७६० त करूर काबीज केलें परंतु १७६८ त हैदरनें तें परत घेतलें. इंग्रजांनीं आणखी दोन वेळां हें गांव काबीज केलें होतें व १८०१ पर्यंत येथें कंपनीची शिबंदी होती. येथील जुन्या किल्ल्याचे कांहीं भाग अद्यापहि दिसतात.

हें गांव रेल्वेवर असून येथून गाडीरस्तेहि पुष्कळ ठिकाणीं जातात यामुळें येथें व्यापार बराच चालतो. परंतु पितळेचीं भांडीं करण्याच्या कारखान्याशिवाय येथें दुसरा कोणताहि महत्त्वाचा कारखाना नाहीं.

करूर येथील म्युनिसिपालिटीचें वार्षिक उत्पन्न सुमारें २८,००० रु. आहे. येथें वेस्लेयन मिशनचें ठाणें असून त्याच्या दोन औद्योगिक शाळा आहेत. हिंदूंचीं बरींच छत्रें गांवांत आहेत. पी. डब्ल्यू. डी. चा डाक बंगला स्टेशनपासून अर्ध्या मैलावर आहे.

[ इं. ग्या. भा. १५; व्हिन्सेंट. स्मिथ. प्रा. इ. आयंगार प्रा. हिं.]

**कॅरे, हेनरी चार्लस**-( १७९३-१८७९ ) एक अर्थशास्त्रज्ञ. त्याचा बाप मॅथ्यू कॅरे आयर्लंडांत जन्मलेला असून पुढें पुष्कळ वर्षें फिलाडेल्फियांत राहिला व तेथें वजनदार अर्थशास्त्रज्ञ, राजकीय सुधारणावादी, संपादक व प्रकाशक या अनेक नात्यांनीं त्यानें प्रसिद्धि मिळविली होती. हेनरी कॅरे आपल्या वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षीं बापाच्या मागून कॅरे आणि ली या प्रकाशक कंपनीचा सभासद झाला. ही कंपनी अमेरिकेंत बरींच वर्षें फार प्रसिद्धीस आलेली होती. हेनरी कॅरे फिलाडेल्फिया येथेंच १८७९ आक्टोबर १३ रोजीं मरण पावला.

मॅथ्यू कॅरेच्या अनेक पुस्तकांपैकीं 'अर्थशास्त्रावरील निबंध' हें एक पुस्तक होतें. त्यांत संरक्षकपद्धतीचें समर्थन असून हेनरी कॅरेनें आजन्म त्याच तत्त्वाचा पुरस्कार केला. १८३८ मध्यें हेनरीनें आपला धंदा सोडून दिला व त्याचवर्षीं आपलें 'अर्थशास्त्राचीं तत्त्वें' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याचें इटालियन व स्वीडिश भाषांत भाषांतर झालेलें असून तें युनायटेड स्टेट्समध्यें प्रमाणभूत पुस्तक म्हणून गणलें जातें. मजूरी, व्याज, पत-पद्धति, पुस्तकासंबंधीं मालकीहक्क वगैरे विषयांवर मध्यंतरीं निबंध लिहून १८५८-५९ मध्यें 'समाजशास्त्राचीं तत्त्वें' हा सुप्रसिद्ध ग्रंथ तीन भागांत त्यानें प्रसिद्ध केला. त्यांत त्यानें असें प्रतिपादन केलें आहे कीं, मानवेच्छानिरपेक्ष असे नैसर्गिक नियम अर्थशास्त्रांत असून त्यांच्या योगानें आपोआप समाजाची व विशेषतः मजूरवर्गाची उन्नत्ति होत असते. मनुष्याच्या अज्ञानामुळें किंवा दुराचरणामुळें मात्र या उन्नतीला अडथळा होत असतो. माल्थसचा लोकसंख्याविषयक सिद्धान्त व रिकार्डोचा उतरत्या पैदाशीचा सिद्धान्त ( लॉ ऑफ डिमिनिशिंग रिटर्न्स ) हे दोन्ही त्यानें अग्राह्य ठरविले आहेत. जमिनीची लागवड, उत्पादकशक्ति व भाड्याची अथवा खंडाची उपपत्ति याविषयीचें कॅरेचें विवेचन फार महत्त्वाचें असून तें अमेरिकेंतील शेतीच्या प्रत्यक्ष अवलोकनाच्या आधारानें केलेलें असल्यामुळें विशेष ग्राह्य मानलें जातें. अमेरिकेची औद्योगिक उन्नति ही संरक्षकपद्धतीमुळें झाल्याचें प्रत्यक्ष उदाहरण देऊन त्या पद्धतीचें समर्थन त्यानें केलेलें असल्यामुळें तेंहि आदरणीय होऊन बसलें आहे.

**करेण**—नैर्ऋत्य चीनच्या दिशेनें ब्रह्मदेशांत आलेल्या इंडोचिनी राष्ट्रजातीचा समुदाय. करेण ब्रह्मदेशांत बहुधा तै ( शान ) लोकांच्या पूर्वी आलेले असून ब्रह्मी ( बर्मन ) लोकांच्याहि पूर्वी आलेले असण्याचा संभव आहे. त्यांचे मुख्य तीन भाग आहेत; स्गॉ, प्वॉ व बघई. स्गॉ व प्वॉ यानांच सामान्यतः करेण असें म्हणतात. त्यांची वस्ती खालच्या ब्रह्मदेशाच्या पूर्व सरहद्दीवर टौंगू पासून मर्गुइ पर्यंत, इरावतीच्या मुख प्रदेशांत व पेगू योमा मध्यें आहे. थटोक म्यौंग म्या, व टौंग जिल्ह्यांत त्यांची वस्ती सर्वांत जास्त आहे. १९०१ मध्यें एकंदर करेणांची संख्या ११०२६९५ होती; त्यांत बहुधा स्गा-करेणांचें प्रमाण जास्त असावें.

करेण हे वन्हंशीं डोंगरी लोक असले तरी त्यांच्यापैकी पुष्कळ लोक मैदानी प्रदेशांत कायमचे राहूं लागले आहेत. मैदानांतील स्गा लोकांनां ब्रह्मी करेण व प्वॉ लोकांनां तलैंग करेण असें म्हणतात. खालच्या ब्रह्मदेशचे करेण व त्यांचे ब्रह्मी ( बर्मन ) व तलैंग मधील शेजारी यांच्यामध्यें शरीर

रचनेच्या बाबतींत फारसा फरक नाहीं. त्यांचे चेहरे विशेष बसकट नसतात व चिनी लोकांप्रमाणें त्यांचे डोळे तिरळे नसतात. ज्या ठिकाणीं राष्ट्रीय पोषाख अद्याप वापरला जातो तेथें त्यांचा नमुनेदार पेहराव म्हणजे अस्तन्यारहित लांब झगा अथवा थिंडें हा होय. विवाहित स्त्रियांचे झगे थोडे आंखूड असून त्यांवर कशिदा काढलेला असतो. निरनिराळ्या गोत्रांचे लोक ओळखतां यावेत म्हणून त्यांच्या पोषाखांत भिन्नता ठेवलेली असते. करेण हे मुख्यतः शेतकरी आहेत. त्यांचा भुताखेतांची पूजा हा मूळ धर्म होता. परंतु आतां त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं बौद्ध अथवा ख्रिस्ती धर्म स्वीकारले आहेत. करेणांच्या मुख्य दोन पोट जाती. त्यापैकीं प्रत्येकाची भाषा स्वतंत्र व परस्परांपासून अगदीं निराळी आहे; परंतु शिक्षणाच्या कामाकरितां तरी अखेर स्गा भाषा जास्त प्रचारांत येईल असें दिसतें.

करेणमहावंशाच्या वघई विभागांतील करेणांत तांवडे ( रक्त ) करेण हेच सर्वांत जास्त प्रसिद्ध आहेत. त्यांशिवाय पदौंग, ब्रे, सावंगतुंग करेण, लाय, लाँग करेण, व पांढरे करेण वगैरेंचाहि त्यांत समावेश होतो. वघई टोळ्या शान संस्थानच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत राहतात. निरनिराळ्या टोळ्यांची भाषा, चालीरीति व पोषाख यांत पुष्कळच फरक आहे ( ज्ञानकोश; वि. १ पा. १५३, ' करेण ' पहा ).

**करेण्णी**—ब्रह्मदेशांत, सालवीन नदीच्या दोन्ही तिरांवर असलेल्या तांवड्या करेण लोकांचा देश. याच्या उत्तरेस शान संस्थानें; दक्षिणेस सालवीन जिल्हा; पूर्वेस सयाम व पश्चिमेस टौंगू जिल्हा. या देशाचे पूर्व करेण्णी व पश्चिम करेण्णी असे दोन भाग आहेत. पैकीं पहिल्यांत गंतरवडी (२५०० चौ. मै ) हें एकच संस्थान असून दुसऱ्यांत क्येबोग्यी (३५०० चौ. मै. ), ववलेक (२०० चौ. मै.), नमोकोन ( ५० चौ. मै. ) व नौंगपले ( ३० चौ. मै. ) अशीं चार लहान संस्थानें आहेत. देशाच्या उत्तरेकडे लोइका येथें शान संस्थानचा असिस्टंट सुपरिंटेंडेंट राहतो; तो ब्रिटिश सरकारचा एजंट या नात्यानें येथील संस्थानिकांवर हुकमत चालवितो करेण्णीचा वायव्य भाग खुला व सपाट मैदानाचा असून त्यांत पाणीहि मुबलक आहे. या देशांतून सालवीन व तिला मिळणारी नमपॉन या दोन नद्या वहातात.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत करेण्णी संस्थानच्या इतिहासासंबंधीं निश्चित माहिती मिळत नाहीं. त्या शतकाच्या उत्तरार्धांत, शान संस्थानांतून येणाऱ्या स्वाऱ्या व अंतःकलह यामुळें देशांत एकसारखी अस्वस्थता पसरली होती. वरचा ब्रह्मदेश ब्रिटिशांनीं आपल्या राज्यास जोडल्यानंतर करेण्णींतील सर्व संस्थानें ब्रिटिशांचीं मांडलिक होऊन त्यांनां खंडणी देऊं लागलीं.

१९०१ त करेण्णींची एकंदर लोकसंख्या ४'१९७५ असून ती पुढील प्रमाणें निरनिराळ्या भागांत विभागलेली होती:—

गंतरवडीः—२६३३३. क्येबोग्यीः—२७०१, ववलेकः—५७०१, नम्मेकोनः—२६२९, नौंगपलेः—१२६५.

नमपिलू खोऱ्यांत पाणी दुर्मिळ झाल्यामुळें अलीकडे लोकसंख्या कमी झाली आहे असें म्हणतात. तांवड्या करेणपैकीं अर्धे अधिक लोक सुधारणेच्या अगदीं खालच्या पायरीवर असून त्यांचीं शरीरें व संवयी गलिच्छ असतात. करेण लोकांखेरीज संस्थानांत शान, तौंगथु, ब्रे, पदौंग व पांढर आणि इतर करेण हे लोक आहेत. ह्या देशाची मुख्य संपत्ति म्हणजे सागाचें लांकूड ही असून सालवीन नदीच्या डाव्या तीराला, नमपॉनच्या दोन्ही कांठांला व वायव्येकडील संस्थानात मोठमोठीं अरण्यें आहेत. १८९३–९४ त संस्थानांचें एकंदर वार्षिक उत्पन्न ६७००० रु. होतें.

करेण्णी लोक अथवा लाल करेण हे स्वतःला कया म्हणवितात. त्यांचें साहित्यग्रंथांतील नांव किरात असें आहे. ते लढाऊ लोक आहेत व छापा घालून मनुष्यस्तेय व पशुस्तेय करण्याचा त्यांचा प्रघात आहे. च्वे अथवा कुलक्रमगत हाडवैर चालू ठेवण्याच्या पद्धतीमुळें काचीन करेण्णी व ब्रह्मदेशांतील दुसऱ्या जंगली जाती यांमध्यें ऐक्य होत नाहीं. अधिपतीचा हुद्दा आनुवंशिक नसतो. तो कांहीं धार्मिक विशिष्ट गुणामुळें एखाद्याला मिळतो. त्यानें वर्तन शुद्ध ठेविलें पाहिजे व खाद्यपेयांत कांहीं निर्बंध पाळले पाहिजेत. त्याला नजर केलेल्या पक्ष्यांच्या पायांच्या हाडांतील छिद्ररचनेवरून शकुनविधीनें तो सुलक्षणी आहे किंवा नाहीं हें ठरवितात. प्रत्येक मनुष्य दुसऱ्यानें केलेल्या अपराधाकरितां सूड स्वतःच घेतो. फक्त महत्त्वाच्या तक्रारी अधिपति तोडतो.

करेण्णी लोक नियमित सारा आपल्या अधिपतींनां कधींहि देत नाहींत. फक्त कांहीं ठरलेल्या दिवशीं व सणाच्या दिवशीं अधिपतीला एक चांदीची देणगी त्यांनां द्यावी लागते. करेण्णी लोक शपथा फार इमानानें पाळतात. रेडे मारून त्यांचें मांस खाणें व हाडें स्मारक म्हणून ठेवणें, भुजांतील रक्ताचा थेंब पाण्यांत टाकून पिणें, फणस खाणें, भाल्यांचा बदल करणें, हे शपथांचे प्रकार आहेत.

बा य ब ल व क रे णी पु रा ण क थां चें सा म्य.—करेण लोकांच्या जुन्या दंतकथा व ख्रिस्ती धर्मग्रंथांची भाषा यांमध्यें इतकें साम्य आहे कीं प्राचीन पाद्री लोकांचें असें मत झालें होतें कीं करेण लोक हे ज्यू लोकांपैकीं असावेत. या लोकांची भाषा व हिब्रू भाषा यांमध्यें साम्य असून हे लोक नाहींसा झालेल्या दहा जातींपैकीं असले पाहिजेत असें कांहीं पाद्री समजतात.

ईश्वराला हे लोक ' यवा ' असें म्हणतात व हा शब्द थोडासा ' यहे ' शब्दासारखा आहे. ईश्वरानें हें सर्व विश्व उत्पन्न केलें असून तो अमर्त्य आहे असें हे मानतात. त्यांच्या ईश्वर व सृष्ट्युत्पत्तीच्या कल्पना पुढीलप्रमाणें आहेतः—

"ईश्वर निर्विकल्प व अनद्यानंत असून सर्वशक्तिमान, सर्वज्ञ व सर्वव्यापी आहे; तो स्वर्गांत रहातो व त्याला सर्व वस्तू दिसतात; त्यानें पृथ्वीपासून मनुष्य उत्पन्न केला व मनुष्याच्या बरगडीपासून स्त्री उत्पन्न केली. आपल्या प्राणाचा कांहीं अंश मनुष्य व स्त्री यांच्या नाकपुडींत घातला व अशा रीतीनें त्यांच्यांत प्राण उत्पन्न झाला, ईश्वरानें नंतर खाद्य,पेय, तांदूळ, अग्नि, जनावरें, हत्ती, पक्षी उत्पन्न केले."

दं त क था.--या पूर्णपणें समजण्यास ज्या सैतानानें ईश्वराची आज्ञा मनुष्याला मोडावयास लाविलें त्या सैतानाविषयीं करेण लोकांचें काय मत आहे हें समजून घेतलें पाहिजे. या सैतानाला 'नौकल्पौ' असें म्हणतात. "हा सैतान पहिल्यानें नीट वागत होता; परंतु त्यानें कांहीं काळानें ईश्वराच्या आज्ञेचें उल्लंघन केलें, ईश्वरानें त्याला हांकून दिलें; कारण त्यानें मनुष्याला मोह पाडून फसविलें." या सैतानानें मनुष्याचा नाश केला. "पा यवा (ईश्वर) म्हणाला 'मुलांनों, तुमच्यासाठीं एक बाग मी तयार करीन; तींत सात निरनिराळीं झाडें असून त्या प्रत्येकाला निरनिराळीं फळें येतील. परंतु त्या सात फळांपैकीं एक फळ तुम्हीं खातां कामां नये. खाल्लयास तुमचा नाश होईल. मी उत्पन्न केलेले इतर सर्व जिन्नस तुम्हाला देतों; आठवड्यांतून एकदां मीं तुमची भेट घेईन. मीं काय म्हणतो तें नीट लक्षांत ठेवून सकाळ संध्याकाळ माझी पूजा करीत जा." नंतर मुकाली (सैतानाचें दुसरें नांव) यानें त्या स्त्रीपुरुषांनां विचारिलें, 'तुम्ही येथें काय खातां' त्यांनीं सांगितलें, 'ईश्वरानें आमच्यासाठीं पुष्कळ अन्न उत्पन्न केलें आहे.' सैतानानें तें पहाण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून त्यांनीं तीं झाडें व फळें त्यास दाखविलीं; व एक फळ न खाण्याविषयींची आज्ञाहि त्यास कळविली. नंतर तो सैतान म्हणाला 'ईश्वर तुमची काळजी वहात नाहीं; जें फळ फार चांगलें आहे तें खाण्याची तुह्मांला त्यानें बंदी केली आहे. तें फळ तुम्हीं खाल्लें तर तुह्मांला स्वर्ग मिळेल. तुमचें कल्याण व्हावें अशी ईश्वराची इच्छा दिसत नाहीं; व तुम्हांवर त्याचें प्रेमहि नाहीं. परंतु तुमचें कल्याण व्हावें अशी माझी इच्छा आहे व तुमच्यावर माझें प्रेम आहे. म्हणून तें फळ तुम्हीं खाऊन टाका. परंतु मनुष्यानें हें ऐकिलें नाहीं; व तो तेथून निघून गेला. परंतु त्या स्त्रीला तें बोलणें खरें वाटल्यामुळें तिनें त्या फळाचा थोडा भाग खाल्ला. नंतर सैतानाच्या सांगण्यावरून स्त्रीनें आपल्या नवऱ्याचेंहि मन वळविलें; व त्यानेंहि तें फळ खाल्लें. इतकें झाल्यावर त्या सैतानानें समाधान प्रदर्शित केलें.

दुसऱ्या दिवशीं ईश्वर त्यांच्या भेटीस आला, त्या वेळीं मना केलेलें फळ कां खाल्लें, असा प्रश्न त्यानें त्या दोघांनां केला; परंतु त्यांनीं कांहीं एक उत्तर दिलें नाहीं त्यावर ईश्वर म्हणाला 'तुम्ही माझें ऐकिलें नाहीं, म्हणून तुमच्या लोकांत आजार, म्हातारपण व मृत्यु यांचा प्रवेश होईल; कांहीं लोक अंगदीं बाल्यावस्थेंत मरण पावतील; कांहीं लोक तारुण्यावस्थेंत मरतील व कांहीं लोक वृद्धावस्थेंत नाश पावतील' असा शाप देऊन ईश्वर निघून गेला.

पुढील उताऱ्यावरून असें समजतें कीं सैतानानें सर्पाचें रूप धारण केलें होतें. "सैतानानें लबाडीनें त्या स्त्रीपुरुषांस ईश्वराची आज्ञा मोडण्यास लाविलें. कारण तो सर्प त्यांचा द्वेष करीत असे, त्यानें पिंवळें फळ व पांढरें फळ त्या दोघांस खावयास दिलें; अशा प्रकारें त्यांची फसगत झाली; व त्यांनीं ईश्वराचें न ऐकिल्यामुळें त्यांचा नाश झाला."

ज ल प्र ल य क था.—"पूर्वी जलप्रलय झाला तेव्हां दोघा भावांनां मोठें संकट पडल्यामुळें ते एका तराफ्यांत बसले; परंतु पाणी इतकें वाढलें कीं तें आकाशापर्यंत जाऊन पोहचलें. धाकट्या भावाला एक आंब्याचें झाड आढळलें व तो त्यावर चढला. परंतु एकाएकीं पाणी कमी झाल्यामुळें तो मनुष्य झाडावरच राहिला." मनुष्यप्राणी निरनिराळ्या ठिकाणीं पृथ्वीवर कसा आला त्याविषयीं:—"एकाच आईबापांपासून सर्व मनुष्यें उत्पन्न झालीं; परंतु एकमेकांवर त्यांचें प्रेम नसल्यामुळें तीं सर्व वेगळीं झालीं; नंतर एकमेकांची ओळख नाहींशी झाली; व त्यांच्या भाषेंत फरक पडून, त्यांच्यांमध्यें वैरभाव उत्पन्न झाल्यामुळें तीं एकमेकांशीं भांडूं लागलीं. करेण लोकांनीं ईश्वराच्या आज्ञेचा भंग करून त्याच्यावर विश्वास ठेविला नाहीं यामुळें त्यांच्या निरनिराळ्या भाषा होऊन, त्यांच्यांत फाटाफुट झाली." दुसऱ्या एका दंतकथेंत असें आहे कीं धाकट्या भावानें थोरला भाऊ करेण यास, ज्या ठिकाणीं त्यानें ईश्वरास सोडिलें होतें, त्या ठिकाणीं परत येण्याविषयीं विनंति केली. परंतु करेण यानें तें ऐकिलें नाहीं. धाकटा भाऊ त्या ठिकाणीं गेला; त्याची व ईश्वराची भेट झाली. ईश्वरानें करेणाच्या देशांत राहूं नको असें त्यास सांगितलें. अशाप्रकारें ईश्वरानें पांढऱ्या लोकांस पश्चिमेकडील प्रदेशांत नेलें. जलप्रलयासंबंधीं दंतकथा व नंतर झालेली मनुष्यजातीची विभागणी या दोन गोष्टी चुकून एके ठिकाणीं केल्या गेल्या आहेत.

क रे ण लो कां चा ध र्म.—करेण लोकांमध्यें जेव्हां ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाला,त्यावेळीं यवाची पूजा करण्याचा फारसा प्रचार नव्हता. मंत्रतंत्र पिशाचविद्या वगैरे गोष्टींकडे या लोकांचें मन हळूहळू वळत चाललें असें एका दंथकथेवरून कळतें. ईश्वरापासून मनुष्याची ताटातूट झाल्यावर त्यांनीं सैतानाची मदत घेतली; कारण त्यांनां ईश्वरानें सांगितलेली मरणाची शिक्षा बदलणें शक्य नव्हतें. सैतानानें त्यांनां मरण येऊं नये म्हणून मंत्रतंत्र शिकविले. हल्लीं मूर्तिपूजक करेण लोकांमध्यें चालू असलेला भूतपूजेचा प्रकार अशा रीतीनें अस्तित्वांत आला. आत्मा अविनाशी आहे असा सर्वसाधारण यांचा समज आहे.पुनर्जन्माची कल्पना त्यांच्यांत नाहीं. मरण

आलें असतां प्राणवायु हवेंत मिसळून जातो असें हे समजतात.

पुराणकथा.—यांच्या पौराणिक कथा मनोरंजक आहेत. कित्येक देवांनां हे भजतात; व त्यांपैकीं बहुतेकांनां 'केल्हा' अशी संज्ञा आहे. या शब्दाचा मूळ अर्थ स्वच्छ किंवा शुद्ध असा आहे. प्रत्येक वस्तूचा निरनिराळा केल्हा असे. एखाद्या जमीनींतील पीक चांगलें पिकणार नाहीं असें वाटल्यास ते लोक धान्याच्या देवतेची प्रार्थना करून तिला बोलावितात. इतकें करूनहि ती देवता न आल्यास तें पीक बुडेल असें समजलें जातें. देवतेची प्रार्थना करण्याचा त्यांचा प्रकार विशिष्ट आहे "हे धान्यदेवते! शेतावर सत्वर ये; खो नदीपासून, कॉ नदीपासून किंवा या दोहोंच्या संगमापासून ये; पूर्वेकडून वा पश्चिमेकडून ये;पक्ष्याच्या किंवा हत्तीच्या कंठापासून ये; नद्यांच्या मुखापासून किंवा शान व ब्रह्मदेशापासून ये." प्रत्येक प्राण्याच्या वेगवेगळ्या देवता (आत्मा) आहेत. एखाद्या व्यक्तीच्या केल्हा( आत्म्या )ला एखाद्या शत्रूनें अडथळा केल्यास त्या व्यक्तीला मरण येतें.

केल्हा व आत्मा हे एक नाहींत;तथापि तो शरीरापेक्षां भिन्न आहे. अशक्त लोक व मुलें यांनां हा केल्हा सोडून जातो. प्रेत नेत असतांना मुलांच्या केल्यांनीं त्यांस सोडून जाऊं नये म्हणून मुलांनां एक विशिष्ट जागीं बांधून ठेवितात. ज्या घरांत मनुष्य मेला असेल तें घर सोडून देतात. नाहीं तर त्या घरांत रहाणाऱ्या मनुष्यांनां विशेषतः मुलांनां सोडून केल्हा जाईल अशी त्यांस भीति असते.

केल्ह्याचा अर्थ जीवित किंवा अस्तित्व असा आहे. शरीरांतील इंद्रियरचनेहून केल्ह्याची रचना निराळी आहे. तो आपल्या मनाप्रमाणें शरीरांत राहतो व वाटेल त्यावेळीं निघून जातो. सृष्टींतील अनेक चमत्कारांची भूमिका हा केल्हा घेतो. याला सात प्रकारच्या निरनिराळ्या स्थिती आहेत. व त्या मनुष्याचा नाश करूं पाहतात. पहिली स्थिति मनुष्याला वेडा बनविते, दुसरी मूर्ख व तिसरी निर्लज्ज बनविते. आणि चवथ्या अवस्थेंत मनुष्य रागीट व क्रूर होतो. वाईट गोष्टी करण्याकडे या केल्ह्यांची प्रवृत्ति असते.

मनुष्याच्या डोक्याच्या वरच्या भागीं 'त्सो' नांवाची एक देवता असते. ही देवता त्या ठिकाणीं असली म्हणजे केल्ह्यापासून मनुष्यास कांहीं एक त्रास होत नाहीं. ही त्सो अशक्त झाली म्हणजे मनुष्याला फार त्रास होतो. 'त्सो' स खूष ठेवण्यासाठीं डोक्याची फार काळजी घेतली जाते व डोक्याला चांगला चांगला पोशाख घालतात. 'त्सो' चा अर्थ सामर्थ्य असा आहे.व 'जीवितासंबंधींचा अगर मनोवृत्तीसंबंधी स्वभाव' असा 'केल्हा' या शब्दाचा अर्थ आहे. त्सो किंवा 'बुद्धि' केल्ह्याच्या वरच्या भागीं असते. मनुष्याची खरी शक्ती या या त्सो मध्येंच आहे. कोणत्याहि संकटापासून त्सोच्या योगानें मनुष्याचें संरक्षण होतें. त्सो किंवा विचारशक्तीच्या व्यंगांमुळें किंवा गैरहजीरीमुळें मनुष्याला अपयश येतें अशी कल्पना आहे.

थेरेट, थेक व केफू या नांवांत भूत, पिशाच यांचा समावेश होतो. केफू व थेरेट या रक्त पिणाऱ्या भूतांच्या जाती आहेत. या जाती केल्ह्यांचा संहार करितात.

'मुखाह' नांवाच्या भुतांपासून करेण लोकांची उत्पत्ति झाली असें म्हणतात. हीं दैविक भुतें असून यांच्या पासूनच हल्लींच्या लोकांची उत्पत्ति झाली. मुखाहच्या राजांपासून झालेली प्रजा पंगू, वेढब अशी होती. जन्म व विवाह यांवर मुखाहांची सत्ता असे. ज्यांचें लग्न व्हावयाचें असेल त्यांचें रक्त ते एकत्र करितात.

केलीफो नांवाचीं पिशाचें आपल्या पंखांच्या योगानें वारा उत्पन्न करितात; ताह्यूमु सूर्य व चंद्रग्रहणें घडवून आणितात. आणखी दोन प्रकारचीं भुतें आहेत त्यांनां कुडा व लाफो असें म्हणतात. पावसाळ्याचें व उन्हाळ्याचें अधिष्ठान यांच्याकडे असून तीं वीज व मेघनाद उत्पन्न करितात. लाफो पैकीं एका वर्गाकडे उन्हाळ्याचें अधिष्ठान असून तो सतत परिश्रमानें कंटाळून जातो; दुसरा वर्ग उन्हाळ्याच्या शेवटीं बाहेर निघून कंटाळलेल्या पहिल्या वर्गांतील पिशाचावर हल्ला करून त्यास परत जाण्यास लावितो व अशा प्रकारें सर्व सत्ता याच्या ताब्यांत येते; परंतु पुन्हां उन्हाळा सुरू होतांच पहिला वर्ग आपली सत्ता पुन्हां बळकावितो.

मुखाहांची पूजा केली जाते व यांच्यानिमित्त बळीहि देतात; हे जरी चांगले आहेत तरी हे मनुष्याचें रक्त अगदींच पीत नाहींत असें नाहीं. हीं सर्व काल्पनिक भुतें रक्त पिणारीं आहेत.

फीबी, यौ किंवा सिरेस हीं पिशाच्चें फार परोपकारी असतात; हीं निवांत जागीं बसून धान्याची वाट पहात असतात. काटकसरी व उद्योगी लोकांचीं धान्याचीं कोठारें धान्यानें भरून जावीं असा यांचा उद्देश असतो. हीं भुतें फार लोकप्रिय असतात.

[ संदर्भग्रंथ.—रेव्ह. ई. बी. क्रॉस–करेण्स (ज. ए. ओ. एस्. ४); इं. गॅ; इं. अँ. २१. ]

**करैया**—मध्यहिंदुस्थानांत ग्वाल्हेर संस्थानच्या ग्वाल्हेर गर्द जिल्ह्यांतील एक खेडें. लो. सं. (१९०१) ४९८९. हें खेडें पवार घराण्याकडे खंडानें आहे. इ. स. १८६८ पर्यंत हें भरभराटींत होतें. परंतु पवार लोकांच्या हल्ल्यांमुळें १८९३ त येथील लोकांनां घालवून द्यावें लागलें होतें. सांप्रत या गांवाची स्थिति पुन्हां सुधारत आहे.

**करोड**—मुंबई. भडोच पोटभागांतील नर्मदेच्या उजव्या तीरावरील हिंदु यात्रेचें ठिकाण. अधिक वैशाखांत कोटिलिंगेश्वर किंवा कोटेश्वर याच्या नांवानें येथें यात्रा भरते व ती एक महिना चालते. देवळाच्या मालकीची जमीन सरासरी अर्धा एकर असून सरकारांतून सालीना ६ रु. १२ आणे वतन मिळतें.

**करोर लाल इसा**—पंजाबांत मियानवाली जिल्ह्यामध्यें लिआ तहशिलींतील गांव. हें गांव मखदुम (मुकादम) लाल इसा यानें वसविलें असून येथें त्याचें थडगें अद्यापि कायम आहे. येथील म्युनिसिपालिटीचें वार्षिक उत्पन्न सुमारें ३॥ हजार आहे. गांवांत इंग्रजी शाळा, मुलींच्या शाळा व दवाखाना हीं आहेत.

**कर्कवॉल**—कर्कवॉल ही स्कॉटलंड देशामधील ऑर्कने बेटाची राजधानी असून येथें रॉयल म्युनिसिपल व पोलिस बरो आहेत. याची लोकसंख्या(१९११) ३७११ आहे. हें गांव अगदीं जुन्या पद्धतीवर वसलें आहे. शहराचा मुख्य रस्ता कांहीं ठिकाणीं फारच अरुंद आहे. येथें कारखाने मुळींच नाहींत म्हटलें तरी चालेल. दारू गाळणें, जहाजांवर माल चढविणें, व समुद्रावर मासे मारणें हे धंदे चांगले चालतात. येथें वरिष्ठ कोर्टें आहेत. सेंट मॅगनसचें प्रार्थनामंदिर इ. स. ११३७ त स्थापन झालें. येथें इ. स. १४०० त बांधलेल्या किल्ल्याचा सध्यां मागमूस देखील लागत नाहीं. प्रार्थनामंदिराजवळ बिशपचा राजवाडा होता. याच्याजवळ ऑर्कनेच्या अर्लच्या राजवाड्याचे अवशेष आहेत. येथें म्युनिसिपालिटी, शेरीफचें कोर्ट, बाल्फोर रुग्णालय वगैरे मुख्य इमारती आहेत.

**कर्कोट** (अथवा कर्कोटक )—कद्रुपुत्र एक नाग. हा नारदाच्या शापानें दावाग्नींत सांपडला असतां नल राजानें यास बाहेर काढून वांचविलें होतें. त्या उपकारामुळें त्यानें नलास दंश करून मुख्यत्वेंकरून कलीपासून यास पीडा न होईल असें केलें होतें. तसेंच वनवास संपेपर्यंत त्यास ओळखूं नये म्हणून विरूपाही केलें होतें (म. भा. मौसलपर्व अ. ४ ).

**कर्कोट**—भारतवर्षीय देश. भारतांत कर्कोटक लोकांस विधर्मीय म्हटलें आहे. ( कर्णपर्व अ. ४४ ). काश्मीरांत इ. स. ६०२–८५६ पर्यंत कर्कोटक वंश होऊन गेला. ( ‘ काश्मीर ’ पहा. ) कर्कोटक नाग या वंशाचें रक्षण करीत असे. अशा समजुतीवरून हें नांव पडलें. [ प्रा. को. ]

**कर्ज**.—**भारतीय कर्जपद्धति व व्याजपद्धति**.—याज्ञवल्क्यस्मृतींत व्यवहाराध्यायांत ऋणादान या शब्दाखालीं तत्कालीं रूढ असलेल्या दुसऱ्याकडून कर्ज काढण्याच्या पद्धतीचें विवेचन केलें आहे तें असेः— कर्ज काढण्याचे प्रकार सात आहेत. ते असे (१) कोणत्या प्रकारें कर्ज द्यावें, (२) कोणत्या प्रकारें देऊं नये (३) कोणत्या अधिकाऱ्यानें द्यावें; (४) कोणत्या वेळीं व (५) कोणत्या रीतीनें द्यावे. हे पांच प्रकार ऋणकोसंबंधी होत व (६) दानविधि व (७) अदानविधि हे दोन प्रकार धनकोसंबंधीं होत. व्याजीं लावलेलें द्रव्य गहाण ठेवून लावलें असेल तर त्यावर द्रव्याचा ८० वा भाग व्याज घ्यावें, पण गहाणावांचून द्रव्य व्याजीं लावल्यास ब्राह्मणादि चार वर्णीकडून क्रमानें दरमहा शेंकडा दोन, तीन, चार व पांच टक्के- प्रमाणें व्याज घ्यावें. व्याज घेण्याचे चार प्रकार बृहस्पतीनें सांगितले तेः—(१) व्याजाच्या व्याजास चक्रवृद्धि (२) दरमहाच्या व्याजास कालिकावृद्धि,(३) ऋणकोच्या इच्छेनुरूप (इच्छाकृत) ठरलेल्या कालाच्या व्याजास कारितावृद्धि व (४) व्याजीं लावलेल्या रकमेचें दररोज होणारें व्याज दररोज घेणें त्याला ऐकाहिकावृद्धि म्हणतात. याज्ञवल्क्यानें धनकोस धनी व ऋणकोस अधमर्णिक असे शब्द दिले आहेत.

याशिवाय ऋणकोच्या धंद्यानुरूप व्याजाचे आणखी दोन प्रकार आहेत. ते असेः—द्रव्य लाभाकरितां जीव धोक्यांत घालणारे शिकारी अथवा सैनिक अशा लोकांकडून दरमहा शेंकडा १० प्रमाणें व्याज घ्यावें. तसेंच जलमार्गानें व्यापार करणाऱ्यांकडून दरमहा दरशेंकडा वीसप्रमाणें व्याज घ्यावें. कारण त्यांचा जीव धोक्यांत असल्यामुळें मुद्दल बुडण्याचा संभव असतो.दाम दुपटीपेक्षां व्याज मुद्दलाची रकम जास्त देऊं नये असें मनूचें मत आहे. पोषणसामर्थ्याच्या अभावीं गाय, म्हैस इ. जनावरें दुसऱ्याच्या स्वाधीन केल्यास त्यांची संतति हेंच त्यांचें व्याज होय. तूप, तेल वगैरे पदार्थ उसने नेऊन पुष्कळ दिवस परत न केल्यास मालकानें ते जिन्नस परत घेतांनां जास्तींत जास्त आठपट घ्यावें. त्याचप्रमाणें वस्त्र, धान्य व सोनें यांची वाढ अनुक्रमें चौपट, तिप्पट, व दुप्पट ही जास्तीत जास्त होय.

धनकोनें ऋणकोस दिलेलें कर्ज वसूल करण्याचे प्रकार धर्म ( प्रीतियुक्त भाषणानें ), व्यवहार (साक्षीपुराव्यानें), छल ( ऋणकोच्या अंगावरील दागिने वगैरे हिसकावून घेऊन ), आचरित (ऋणकोच्या दारांत उपाशीं बसून) व बल ( ऋणकोस बांधून ठेवणें, मारणें इ. ) वगैरे पांच आहेत. ऋणको यास अनेक धनकोंचें ऋण द्यावयाचें असल्यास व धनको समान वर्णांचे असल्यास ज्या क्रमानें ऋणकोनें ऋण घेतलें असेल त्याच क्रमानें राजानें ऋणकोकडून फेड करवावी व धनको भिन्न वर्णांचे असल्यास वर्णक्रमानें ऋणाची फेड करवावी. ऋणकोला मान्य असलेलें धन परत करण्यास तो दुर्बल असल्यामुळें समर्थ नसेल तर तें द्रव्य राजानें धनकोस देववावें व त्याबद्दल ऋणकोकडून शेंकडा दहाप्रमाणें दंड घ्यावा व धनकोपासून शेंकडा पांचप्रमाणें वेतन घ्यावें. व्याजी दिलेली रक्कम ऋणको परत देऊं लागला असतां व्याजाच्या लोभानें धनको घेत नसेल तर ऋणकोनें ती एका मध्यस्थापाशीं ठेवावी. म्हणजे तेव्हांपासून व्याज बंद होतें. पण ऋणकोनें मध्यस्थापाशीं ठेवलेली रकम मध्यस्थानें वेळीं न दिल्यास त्या दिवसापासून धनकोनें पूर्वीप्रमाणें व्याज घ्यावें.

अविभक्त बंधूंनीं अथवा त्यांतील एकानें कुटुंबपोषणार्थ कर्ज काढलें असल्यास तें कुटुंबांतील मुख्यानें फेडावें. पतीनें केलेलें ऋण पत्नीनें, मुलानें केलेलें ऋण आईनें अथवा बापानें तसेंच पत्नीनें केलेलें पतीनें फेडूं नये. पण हें कुटुंबपोषणार्थ असेल तर कुटुंबांतील मुख्यानें फेडावें. बापानें केलेलें ऋण मुलानें फेडावें.

बापाचें कर्ज मुलानें अथवा नातवानें फेडावें. परंतु बापानें तें जर मद्यप्राशन, जुगार, बाहेरख्याली इत्यादि व्यसनांसाठीं केलेलें अथवा नट, भाट, मल्ल इत्यादिकांनां देऊं केलेल्या रकमेचा अवशेष असें असेल तर तें मुलानें फेडूं नये. कुटुंबपोषणासाठींच केलेलें कर्ज मुलानें अथवा नातवानें फेडावें. मुलानें तें व्याजासुद्धां फेडावें व नातवानें फक्त मुद्दलच फेडावें व्याज देऊं नये. पत्नीनें केलेलें कर्ज पत्नीनें फेडूं नये असें सांगितलें आहे. परंतु पति मरणोन्मुख असल्यास त्यानें कुटुंबपोषणार्थ केलेलें कर्ज त्याच्या पत्नीनें फेडावें. पतीनें दुर्व्यसनामुळें केलेलें कर्ज फेडण्याची जबाबदारी पत्नीवर नाहीं पतीच्या पश्चात कुटुंबपोषणाकरितां केलेलें कर्ज पुत्राच्या अभावीं पत्नीनेंच फेडावयाचें असे.

स ध्यां चा हिं दु का य दा, कर्ज देण्याची जबाबदारी.— मयत हिंदूचें कर्ज देण्यास जितकी मयताची इस्टेट वारसाच्या ताब्यांत येईल तितक्या रकमेची कर्जाची जबाबदारी वारसावर येते. मयताच्या कर्जाबद्दल वारसावर जातीची जबाबदारी नसते; वारस प्रत्यक्ष मुलगा अगर नातू कां असेना, इस्टेट वारसानें आली नसेल तर, मयताच्या कर्जाची जबाबदारी ही वारसावर नसते. हा नियम मयताची व वारसाची इस्टेट निरनिराळी असते तेव्हां लागू पडतो.

मयत हिंदु व त्याचा वारस हे दोघेहि जेव्हां एका अविभक्त कुटुंबांतील माणसें असतात तेव्हां कर्जाच्या बाबतींतील नियम वेगळे आहेत. अविभक्त कुटुंबांतील एखाद्या माणसानें कर्ज केल्यास त्याच्या सावकारानें ऋणकोच्या हयातींत कोर्टांतून हुकुमनामा मिळवून, त्याची वजावणीहि ऋणकोच्या हयातींत एकत्र असलेल्या मिळकतींतील त्याचा वाटा जप्त व लिलांव करून, केली पाहिजे. जर अविभक्त असलेला ऋणको, मिळकत जप्त होण्यापूर्वीच वारला तर त्याची इस्टेट इतर शेषाधिकारी असणाऱ्या अविभक्त मंडळीकडे जाईल; सावकारास एकत्र असलेली मिळकत विकून मिळणार नाहीं. त्या ऋणकोची स्वतंत्र वेगळी असलेली मिळकत मात्र जप्त व लिलांव करतां येईल.

या वरील नियमास एक अपवाद आहे. जेव्हां बाप अथवा बापाचा बाप हा ऋणको असतो तेव्हां त्याच्या कर्जाबद्दल मुलगा अगर नातू यांस, मयताच्या अविभक्त इस्टेटींतील वाटघाइतकें, जबाबदार धरतां येतें. परंतु बापाचें अथवा आजाचें तें कर्ज, अनीतिकारक व गैरकायदा वागणुकीनें झालेलें नसलें पाहिजे. कारण बापाचें व आजाचें अनीतिकारक व गैरकायदा नसलेलें कर्ज देण्याबद्दल धर्माचें बंधन आहे. परंतु बापाचें अगर आजाचें कर्ज अनीतिकारक अगर गैरकायदा वर्तणुकीनें झालें असल्यास, सावकारास, बापाच्या अगर आजाच्या अविभक्त इस्टेटींतील हिस्सा, त्याच्या मरणाच्यानंतर जप्त करतां येत नाहीं. शेषाधिकारी या नात्यानें तो हिस्सा मुलगा अगर नातू यांजकडे जातो.

बाप अगर आजा यांच्या कर्जाची जबाबदारी वैयक्तिक जातीवर कधींहि नसते. म्हणून सावकारास मुलाच्या अगर नातवाच्या जातीवर अगर त्याच्या संपादित इस्टेटीवर वजावणी करतां येत नाहीं. मुलावर, फक्त एकत्र असलेल्या हिश्शापुरती जबाबदारी असते. सारांश, मुलगा व बाप एकत्र असल्यास सावकारास, बापावर फिर्याद लावून बापाची व मुलाची एकत्र असलेली सर्व इस्टेट विक्रीस आणतां येते. तसेंच, बापास आपल्या हयातींत आपल्या कर्जाकरितां मुलाची व आपली एकत्र असलेली मिळकत विकतां अगर गहाण टाकतां येते. या कामास मुलाची संमति असण्याची जरुरी नाहीं.

न व रा व बा य को.—नवऱ्याच्या कर्जाबद्दल नवऱ्याच्या पश्चात बायको स्वतः जबाबदार नाहीं. तसेंच तिचें धनहि जबाबदार नाहीं. फक्त नवऱ्याची इस्टेट जबाबदार आहे. तसेंच बायकोच्या कर्जाबद्दल नवरा अगर त्याची इस्टेट जबाबदार नाहीं. पण ज्या वेळेस कर्ज काढण्याबद्दल नवऱ्यानें बायकोस परवानगी दिली असेल तेव्हां त्या कर्जाची जबाबदारी नवऱ्यावर येते.

क र्ता व व डी ल बं धु.—एकत्र कुटुंबांतील वडील भावानें अगर कर्त्या भावानें कायदेशीर कारणासाठीं कर्ज केलें असल्यास तें सर्व एकत्र कुटुंबाकरतां होतें कीं काय हें पाहिलें पाहिजे. एकत्र कुटुंबाकरतां कर्ज काढल्यास त्याची जबाबदारी सर्व भावांवर असते; एखाद्या भावास त्या कर्जाचा फायदा झाला नसल्यास त्या कर्जाची जबाबदारी त्या भावावर नसते.

का य दे शी र का र णें.—यांत सरकारी सारा, एकत्र कुटुंबांतील माणसांचें पोषण, मुलामुलींचीं लग्नें, मृतांच्या संस्काराबद्दल खर्च, इस्टेटीच्या संरक्षणार्थ केलेल्या फीर्यादींचा व अन्य खर्च, कुटुंबांतील कर्त्यापुरुषास फौजदारी आरोपांतून मुक्त करून घेण्यास लागणारा खर्च व कुटुंबाचा निर्वाह चालविण्यास काढलेलें कर्ज या सर्वांचा समावेश होतो. बापानें केलेल्या अनीतिकारक व गैरकायदा कर्जांत दारु, जुगार, बाहेरख्याली वैगेर अनीतिकारक वर्तनापासून झालेल्या कर्जाचा समावेश होतो (ले. ल. व. पेठकर).

हिंदुस्थानांतील इतर कर्जपद्धति इंग्लंडप्रमाणेंच असल्यामुळें प्रथम इंग्लंडातील कर्जाच्या कायद्याची सामान्य माहिती दिली पाहिजे.

कोणतीहि विवक्षित रक्कम एक मनुष्य दुसऱ्यास कर्जाऊ देण्यास जबाबदार असतो तीस कर्ज असें म्हणतात. तें व्यक्तिशः करार, कायदा किंवा कोर्टाचा ठराव या तीन प्रकारांनीं उत्पन्न होतें. त्याचें साधारणपणें तीन प्रकार आहेत. ( १ ) कोर्टाच्या ठरावानें होणारें, ( २ ) विशिष्ट प्रकारचें ( स्पेशल्टि ) व ( ३ ) खासगी करारानें होणारें.

पहिल्या प्रकारचें कर्ज अम्मलबजावणी करून किंवा नवीन फिर्याद लावून वसल करतां येतें. दुसऱ्या प्रकारचें

कर्ज कर्जरोखा करून उत्पन्न करतां येतें. हल्लीं त्याचा विशेष म्हटला म्हणजे हें कोणत्याहि प्रकारचा मोबदला न देतां उत्पन्न करतां येतें. आणि त्याला वीस वर्षांची मुदत असते. परंतु खासगी साध्या कर्जाच्या बाबतींत सहा वर्षांची मुदत असते. पहिल्या दोन प्रकारांव्यतिरिक्त कोणत्याहि ऋणास साधें किंवा खासगी कर्ज म्हणतात.

याशिवाय एकाच्या देण्याबद्दल दुसऱ्यानें हमी दिल्यास तें त्याचें कर्ज होऊं शकतें. आणि त्याबद्दल त्याच्यावर फिर्यादहि होऊं शकते. अथवा एकानें दुसऱ्याकडून निघत असलेल्या बाकीपेक्षां जास्त पैसे घेतल्यास तें परत देण्याबद्दल तो जबाबदार असतो.

सन १८७३ पूर्वी इंग्लंडमध्यें एकाच्या नांवाचें कर्ज दुसऱ्यास वेचन करून देतां येत नसे. परंतु आतां ऋणकोस कळविल्यानंतर तसें करतां येतें. साधारणपणें कर्जास व्याज नसतें. परंतु खासगी करार किंवा रूढी किंवा त्या बाबतींत एखादा कायदा असल्यास व्याज घेतां येतें.

फे ड क र णें:— जें देणें असेल तें पूर्ण देऊन किंवा तडजोडीनें देण्याच्या पोटीं दुसरें कांहीं घेऊन किंवा धनकोचें ऋणकोस दुसरें कांहीं देणें असल्यास त्याची वजावाट करून कर्ज वारतां येतें. या व्यतिरिक्त उपाय म्हणजे नादार होणें हा होय. ऋणकोनें धनकोकडून मागणीची वाट न पहातां तो असेल त्या ठिकाणीं कर्जाची रक्कम नेऊन देणें हें त्याचें कर्तव्य आहे; धनको जर समुद्रापलीकडे गेला असेल तर ऋणकोनें स्वस्थ बसण्यास हरकत नाहीं. ऋणकोनें देऊं केलें असतां जर धनकोनें घेण्याचें नाकारलें तर कर्जफेड झाली असें होत नाहीं. परंतु जर त्यानें फिर्याद केली तर ऋणकोला धनकोकडून खर्च मिळतो.

कधीं कधीं एकाच्या कर्जाच्या फेडीबद्दल दुसरा हमी घेतो तेव्हां ऋणकोबरोबर तोहि जबाबदार होतो. १०० पौंडांपेक्षां जास्त कर्ज ज्यावेळेस नसेल त्यावेळेस परगणा कोर्टांत फिर्याद आणतां येते. त्यापेक्षां जास्त असल्यास हायकोर्टांत आणावी लागते. कोर्टाचा हुकूम मिळाल्यावर तो त्याच्या जातीवर, किंवा त्याची मालमत्ता जप्त करून किंवा त्याचें येणें जप्त करून वजावतां येतो. जर ऋणकोनें कर्ज बुडविण्याचा प्रयत्न केला असेल आणि कर्जाची रक्कम ५० पौंडांपेक्षां जास्त असेल तर त्यावेळेस त्याच्या नादारीचा अर्ज कोर्टाकडे करतां येतो.

सन १८६९ पासून कर्जाबद्दल तुरुंगांत टाकण्याची पद्धत बंद केली आहे. परंतु दंडाची रक्कम, पंच व सॉलिसिटर यांनां तो नियम लागू नाहीं. त्याचप्रमाणें ऋणकोनें ऐपत असून हप्ते देण्याचें चुकाविलें तर ४८ दिवसपर्यंत त्यास तुरुंगांत ठेवण्याचा कोर्टास अधिकार आहे. या तुरुंगवासानें कर्ज देणें चुकत नाहीं पण त्याच देण्याबद्दल पुन्हां तुरुंगांत ठेवतां येत नाहीं.

ही तुरुंगाची शिक्षा आयर्लंडमध्यें सन १८७२; स्कॉटलंड १८८०, फ्रान्स १८६७, बेल्जम १८७१, स्वित्झरलंड आणि नार्वे १८७४, इटली १८७७, याप्रमाणें निरनिराळ्या वेळीं बंद करण्यांत आली. अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत ही पद्धति सर्व ठिकाणीं होती. परंतु अलीकडे ती बंद केली आहे. फक्त ज्या वेळेस ऋणको धनकोस फसविण्याकरितां देशाबाहेर जात असेल त्यावेळेस त्यास तुरुंगांत ठेवतात.

**कर्जत** (१)—मुंबई इलाख्यांत कुलाबा जिल्ह्यांतील ईशान्य-तालुका. क्षे. फ. ३५९ चौ. मै. या तालुक्यांत खालापूर हा लहान पेटा आहे. तालुक्यांतील गांवांची संख्या २७० असून कर्जत हें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ( १९११ ) ८६२२४. पश्चिम घाट व माथेरानचे डोंगर यांच्यामध्यें कर्जत तालुका हा डोंगराळ भाग आहे. सखल जमीनीवर भाताचीं शेतें असून उंचवटयावर साग, ऐन वगैरे झाडें आहेत. पश्चिम घाटांत उगम पावणारे उल्हास वगैरे ओढे या तालुक्यांतून वहातात. परंतु उन्हाळ्यांत त्यांनां पाणी नसतें. पाऊस मुबलक होतो व पिकें सहसा बुडत नाहींत. पिण्याचें पाणी दुर्मिळ आहे. ऋतुमानाप्रमाणें हवामान बदलतें. वार्षिक पाऊस सरासरीनें १३० इंच पडतो.

गां व.—कर्जत तालुक्याचें मुख्य ठिकाण. जी. आय. पी. रेल्वेचें स्टेशन होण्यापूर्वी हा फार लहान असे. उल्हास नदीच्या दक्षिण तीरावर हा वसला आहे. इ. स. १८६९ पासून मामलेदार कचेरी येथें आली. पूर्वी ती दहिवली गांवीं असे. येथून खोपोलीस आगगाडी जाते.

( २ ) मुंबई इलाख्यांत, अहमदनगर जिल्ह्यांतील दक्षिण तालुका. क्षे. फ. ५७१ चौ. मै. यांत कर्जतसुद्धां ८१ गांवें आहेत. लो. सं. ( १९११ ) ४५१२७. सर्व जिल्ह्यांतील इतर भागांपेक्षां येथील वस्ती विरळ आहे. वायव्येकडून आग्नेयीकडे जाणाऱ्या डोंगराच्या रांगेमुळें या तालुक्याचे दोन भाग होतात. पश्चिम उतारावरील प्रवाहांचें पाणी भीमेस व पूर्व उतारावरचें पाणी सीना नदीला मिळतें. पाऊस अनिश्चित असल्यानें पिकें बहुधा चांगलीं नसतात.

गां व.—कर्जत तालुक्याचें मुख्य ठिकाण. येथें मामलेदार व मुनसफ कचेऱ्या आहेत. येथें गोदडबाबा साधूची समाधि असून त्या ठिकाणीं आश्विनांत यात्रा भरते.

**कर्डी** ( करडई ).—कुसुंबा पहा.

**कर्डी**—मध्यप्रांत. जिल्हा भांडारा. तहशील टिरोरा. लोकसंख्या ( १९०१ ) २१००. येथें कोष्टी लोकांची बरीच वस्ती आहे. गांवास हल्लीं उतरती कळा लागली आहे. येथें कांचेच्या बांगडया तयार होतात. येथें प्राथमिक शिक्षणाची शाळा असून दर शुक्रवारीं बाजार भरतो. मालगुझार सर गंगाधरराव चिटणवीस आहेत.

**कर्डे**—सिरूरच्या दक्षिणेस एक बाजाराचा गांव आहे. लो. सं. सुमारें दोन हजार. येथें मोठा व्यापार चालतो.

मुख्यत्वेंकरून धान्याचा व्यापार चालतो. येथून पुणें, जुन्नर वगैरे ठिकाणीं माल पाठविला जातो.

**कर्ण**—वसुदेवाची भगिनी व पंडूची पत्नी कुंती हिला कौमारावस्थेंत सूर्यापासून झालेला मुलगा. कौमारावस्थेंत हा कुंतीला झाल्यामुळें तिनें याला जन्मतांच एका पेटींत घालून नदींत सोडून दिलें ( महा भा. आदि अ. १११ ). पुढें ती पेटी अधिरथ नांवाच्या एका राजाला सांपडली असतां तींत हा त्याला आढळल्यावर अधिरथानें यास घरीं नेऊन राधा नामक आपल्या स्त्रियेकडून त्याचें पालन केलें व त्याचें वसुषेण असें नांव ठेवलें. ( भा. आदि अ. ६१० ). वसुषेण मोठा झाल्यावर अधिरथानें त्यास धृतराष्ट्राच्या मुलांनां व पांडवांनां धनुर्विद्या शिकविण्यासाठीं द्रोणाचार्यांच्या नेतृत्वाखालीं चालत असलेल्या शाळेंत धनुर्विद्या शिकण्यास ठेवलें. तेथें तो पंडुपुत्र अर्जुन याच्यासारखा धनुर्विद्येंत निष्णात झाला. विद्येच्या चुरशीमुळें अर्जुनाचें व याचें वितुष्ट आलें व त्याचा फायदा घेऊन धृतराष्ट्रपुत्र दुर्योधनानें याला आपलासा करून पुढील कार्यासाठीं अंगदेशचें त्याला राज्य दिलें व अंगराज असें नांव ठेविलें. कर्ण हा सूर्यापासून झाला असल्यामुळें सूर्याचें याच्यावर प्रेम असे. त्यानें याला कवचकुंडलें दिलीं होतीं; इंद्र ब्राह्मण वेषानें येऊन हीं कवचकुंडलें तुजजवळ मागेल त्याला ती देऊं नको असें सांगितलें असतां ब्राह्मणानें मागितलेली वस्तु नाकारणें माझ्याच्यानें घडणार नाहीं असें यानें सांगितलें. त्यावर तूं कवचकुंडलें त्याला दे, पण त्याच्यापासून अमोघशक्ति मागून घे असें सूर्यानें त्यास सांगितलें. कालांतरानें इंद्रानें मागितल्यावरून यानें इंद्रास कवचकुंडलें दिलीं व तेव्हांपासून यास कर्ण असें नांव पडलें ( भा. वन. अ. ३१० ). पुढें आपण ब्राह्मणपुत्र आहों असें खोटेंच सांगून हा परशुरामाजवळ धनुर्विद्या शिकण्यास राहिला. एकदां परशुराम याच्या मांडीवर डोकें ठेवून निजला असतां कर्णाच्या मांडीस एका किड्यानें दंश केला व तेथून रक्त वाहूं लागलें व त्यामुळें त्यास वेदनाहि होऊं लागल्या. परंतु गुरूच्या निद्रेचा भंग होईल यासाठीं कर्णानें मांडी हालविली नाहीं. जागें होऊन गुरुनें रक्तस्राव पाहिल्यावर परशुरामानें कर्णास विचारिलें असतां कर्णानें झालेली हकीकत सांगितली. तेव्हां ब्राह्मणाच्या मुलाच्यानें इतका दम धरवणार नाहीं म्हणून तूं क्षत्रिय आहेस व खोटें सांगून मजपासून विद्या शिकलास म्हणून ती निष्फळ होईल असा परशुरामानें कर्णास शाप दिला.

कर्ण एकदां मृगयेस गेला असतां, त्याचा बाण चुकून एका ब्राह्मणाच्या गाईस लागल्यानें ती गाय गतप्राण झाली. ब्राह्मणाच्या समजुतीसाठीं कर्णानें त्यास अनेक गायी देऊं केल्या. परंतु त्या न घेतां युद्धाच्या ऐनवेळीं तुझें रथचक्र जमीनींत रुतून बसेल असा ब्राह्मणानें कर्णास शाप दिला.

भारतीयुद्धारंभीं कृष्ण शिष्टाईस गेला असतां त्यानें "तूं कुंतीपुत्र व धर्माचा ज्येष्ठ बंधु आहेस यासाठीं तूं पांडवांकडे जा धर्म तुला 'आपला ज्येष्ठभ्राता' म्हणून बहुमान देईल" असें कर्णास सांगून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु "आजपर्यंत ज्या पक्षाचा अभिमान बाळगला तो पक्ष ऐनप्रसंगीं सोडणें ठीक नव्हे" असें सांगून कृष्णास त्यानें निरुत्तर केलें. युद्धाच्या सुरुवातीपूर्वी स्वतः कुंतीहि कर्णाकडे गेली होती. परंतु त्याचें मत बदललें नाहीं. शेवटीं 'अर्जुनाशिवाय इतर कोणाहि पांडवावर बाण टाकूं नको' असें तिनें त्यास सांगितलें व तें त्यानें मान्य केलें.

भारतीयुद्धाचे १५ दिवस झाल्यावर सोळाव्या दिवशीं सैन्याचें आधिपत्य कर्णाकडे आलें. 'उत्तम सारथी मिळेल तर मी युद्ध करीन' असें कर्णानें सांगितल्यावरून दुर्योधनानें सारथ्याबद्दल शल्यास विनविलें. "मी बोलेन तें कर्णानें निमूटपणें सहन करावें" या अटीवर शल्यानें त्याचें सारथ्य करण्याचें पत्करिलें. सारथ्य करतांना शल्यानें त्याच्या वर्तनाबद्दल त्याची वरीच निर्भर्त्सना केली. परंतु वचन दिल्याप्रमाणें कर्णाला ती सोसावी लागली.

कर्णानें एकच दिवस युद्ध केलें. ब्राह्मणाच्या शापामुळें पृथ्वीनें कर्णाचें रथचक्र ऐनवेळीं गिळिलें व तें वर काढण्यासाठीं कर्ण रथाखालीं उतरला असतां अर्जुन त्यावर बाण सोडूं लागला. तेव्हां 'हें धर्मयुद्ध नव्हे' असें कर्ण म्हणाला असतां अर्जुनानें त्यास अभिमन्युवधाची आठवण करून देऊन त्याची वरीच निर्भत्सना केली. शेवटीं अर्जुनाच्या निर्वाणीच्या बाणानें कर्णाचा शिरच्छेद झाला.

कर्णाला अनेक पुत्र होते. परंतु ते सर्व भारतीयुद्धांत कामास आले. भारतीयुद्धानंतर वृषकेतु नांवाचा कर्णाचा एकच मुलगा जिवंत होता.

**कर्ण**—राजाराममहाराज यांचा लेकवळा राजा कर्ण. हा मराठ्यांच्या तत्कालीन राजकारणांत भाग घेत असे. जेधे शकावलींत इ. स. १६९७ मध्यें राजाराम यांनीं कर्ण याला मोंगलाईत पाठविल्याचा उल्लेख आहे. पुढें कर्नाटकांतहि यानें कामगिरी केली. हा शूर होता.

**कर्णक**—ईजिप्तमधील नाइल नदीच्या कांठीं थीबीज नांवाचें एक गांव आहे. त्याच्या उत्तर भागाला कर्णक हें नांव आहे. कर्णक हें खेडें हल्लीं काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलेलें आहे. तरी पण या खेड्यांतील नष्टावशेष महत्त्वाचे आहेत. या अवशेषांपैकीं मुख्य अवशेष म्हणजे तीन आवारें विटांनीं बांधलेलीं आहेत. यांपैकीं अगदीं उत्तर टोंकाकडे जें सर्वांत लहान आवार आहे त्यामध्यें मॉंट देवाचें देवालय आहे. हें देवालय तिसऱ्या अमेनोफीसनें बांधलें व पुढें तें मोडकळीस आलें असतां दुसऱ्या रामेसीस राजानें व टालेमीनें तें देवालय दुरुस्त केलें. हल्लीं या देवळाच्या प्रवेशद्वाराशिवाय कांहींच शिल्लक नाहीं. दक्षिणेकडील आवारांत मूत देवतेचें

देवालय असून तेंहि अगदींच मोडकळीस आलेलें आहे. हें देवालयहि तिसऱ्या अमेनोफीसनेंच बांधलें. या देवालयाच्या मागच्या बाजूस घोड्याच्या नालाच्या आकाराचें एक सरोवर आहे. हें सरोवर फार पवित्र मानण्यांत येतें. मध्य आवार हें जवळजवळ १५०० फुटांचें चौकोनी आवार असून या आवारांत ॲमॉन देवतेचें एक प्रचंड देवालय आहे. या देवालयाला कर्णकचें ॲमॉन देवालय असें म्हणतात. याशिवाय या निरनिराळ्या आवारांच्या आंत व बाहेर लहान लहान देवळें दृष्टीस पडतात.

प्राचीन राजांच्या अमदानींत येथें ॲमॉनचें एक छोटें देवालय होतें असें ॲमॉनच्या मुख्य व प्रचंड देवालयाच्या मागच्या बाजूस सांपडलेल्या अवशेषांवरून भावतां येतें. पहिल्या ॲमेनोफीस राजानें हें मुख्य देवालय बांधविलें. थीबीज हें त्यावेळीं राजधानीचें शहर होतें, व त्यावेळच्या राजांचें ॲमॉन हें दैवत होतें अर्थात अशा देवतेच्या देवळाचा भव्यपणा प्राप्त होण्यासाठीं राजे लोकांनीं शक्य ती खटपट करावी हें साहजिकच होतें. टेथमॉसीस राजानें मध्यकालीन देवळाच्या भोंवतीं एक पटांगण बांधविलें. या मुख्य देवालयाच्या सभोंवतीं सात मजली प्रचंड सज्जे आहेत; व हे एकाच राजाच्या अमदानींतील नसून निरनिराळ्या राजघराण्यांतील राजांनीं बांधविले आहेत. या देवालयाच्या भिंतीवर इतर ईजिप्शियन देवालयांप्रमाणेंच निरनिराळ्या राजांच्या अमदानींतील ऐतिहासिक प्रसंगांचीं चित्रें कोरलेलीं आढळतात. तसेंच निरनिराळ्या काळचे लेखहि या भिंतीवर कोरलेले दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, तिसऱ्या टेथमॉसीस राजाच्या आयुष्यांतील कृत्यें, पहिल्या सेती राजाच्या कारकीर्दींतील सीरियामधील लढाई, दुसऱ्या रामेसीसचीं शौर्याचीं कृत्यें इत्यादि अनेक प्रसंगांचीं चित्रें आढळून येतात. लेग्रेन नांवाच्या प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधकानें या देवळाचा भाग खणण्याचें काम १९०३ मध्यें सुरू केलें व त्या कामांत त्याला पुष्कळच अवशेष सांपडले आहेत. या देवळाच्या आवारांतून त्यानें जवळजवळ ७५० पुतळ्यांचे अवशेष व २००० लहान लहान मूर्तींचे अवशेष शोधून काढले आहेत. त्यांपैकीं कांहीं मूर्ती व पुतळे पाहिले असतां प्राचीन ईजिप्तमधील शिल्पकला किती उच्च होती हें कळून येतें.

नाईल नदीला पूर आला असतां तिचें पाणी या देवळास येऊन भिडतें व तेथील खांबांच्या व भिंतींच्या खालच्या भागाची माती व वाळू वाहून जाते. सर्व देवालयच हल्लीं अगदीं मोडकळीला आलेलें आहे. तथाहि स्थितींत त्याची शक्य तितकी दुरुस्ती करण्यांत येते. १८९९ सालीं या देवालयांतील कांहीं खांब पडले, पण १९०८ सालीं ते पुन्हां बांधण्यांत आले.

या देवालयाच्या नैर्ऋत्येस खोन्सचें देवालय आहे. हें तिसऱ्या रामेसीसच्या कारकीर्दींत बांधावयाला सुरुवात होऊन त्याच्यानंतरच्या बऱ्याच राजांच्या कारकीर्दींपर्यंत हें काम चाललेंच होतें. तसेंच या ॲमॉन देवालयाच्या आग्नेय बाजूस खणण्याचें काम चालू असतां त्या ठिकाणीं फार प्राचीन काळचीं पोलादी हत्यारें व थडग्यांचे अवशेष सांपडलेले आहेत व त्यावरून थीबीजचें अस्तित्व फार पुरातन काळापासून असल्याचें सिद्ध झालें आहे [ बेडेकर—हँडबुक फॉर ईजिप्त. ]

**कर्णप्रयाग**—उत्तर हिंदुस्थानांत गव्हवाल प्रांतांत अलकनंदा आणि पिंडर ( कर्णगंगा ) नद्यांच्या संगमावर हें ठिकाण आहे. हें उत्तर अक्षांश ३०° १६′ आणि पूर्व रेखांश ७९° १५′ यांवर असून समुद्रसपाटीपासून २३०० फूट उंचावर आहे. गंगेच्या वरच्या उगमावर हें असल्यानें यात्रेचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे.

याच्या नांवावरूनच महाभारतांतील कर्णाशीं याचा असलेला संबंध व्यक्त होतो. गंगेला मिळणाऱ्या नद्या ज्या प्रदेशांत उत्पन्न झाल्या आहेत त्या प्रदेशाचा पांडवांच्या कथेशीं निकट संबंध आहे व कर्णप्रयागासारख्या बऱ्याच स्थळांना पांडव व त्यांचे आप्तेष्ट यांपासून पावित्र्य प्राप्त झालें आहे. येथील कर्णाचें देऊळ व इतर अवशेष कलेच्या दृष्टीनें फारसे महत्त्वाचे नाहींत.

**कर्णप्रावरण**—नैर्ऋत्य विभागांतील एक जात. कर्णप्रदेय व कर्णप्रावेय असेंहि या शब्दाचे भिन्न पाठ आहेत. कर्णप्रावरण हें रूप रामायणांतील किष्किंधाकांडांत आढळतें. मार्कंडेयपुराणांत ( ५८ ३१ ) कर्णप्रावेय असें रूप आहे. महाभारतांतहि कर्णप्रावरण असेंच रूप आढळतें. यांचा सहदेवदिग्विजयांत, द्यूतपर्वांत व भीष्मवधपर्वांत उल्लेख आढळतो. हे भारतीयुद्धांत दुर्योधनपक्षीं होते. कर्णप्रावरण याचा अर्थ ‘ जे आपल्या कानांनीं स्वतःला झांकून घेतात ते असा होतो. तेव्हां या लोकांनां असें नांव पडण्याला कोणतें कारण झालें याचा शोध लागत नाहीं. [ आशियाटिक रिसर्चेस, पु. १७, पा. ४५६ ( टीप ); ईलियट—हिस्टॉरियन्स ऑफ महामेडन इंडिया, पु. १ पा. ३४ ( टीप ); बृहत्संहिता १४. १८; ४०. २६; पुराणें. ]

**कर्णफुली**—पूर्वबंगाल व आसामांतील नदी. चितागांवच्या डोंगरी प्रदेशापलीकडे उगम पावून, सामान्यतः नैर्ऋत्य दिशेनें १२१ मैल वहात गेल्यावर ही बंगालच्या उपसागरास मिळते. ह्या नदींतून चितागांवपर्यंत समुद्रांत चालणारीं जहाजें व रांगामाती ( चितागांवच्या डोंगरी प्रदेशाचें मुख्य ठिकाण ) पर्यंत लहान जहाजें जाऊं शकतात. कासालंग, चिंग्री, कापतै, रखियंम व हाल्डा या नद्या तिला मिळतात. वर दिलेल्या गांवांशिवाय कासालंग, चंद्रघोणा व रंगोनिया हीं गांवें या नदीच्या कांठीं आहेत.

**कर्णभूषणें**—कर्णाभरणाची चाल फार प्राचीन आहे. वैदिक वाङ्मयांत ( ऋग्वेद मं. १०. ७२, २; अथर्व. ३. ५, ६; काठक सं. १७. १३; मैत्रायणी सं. २. ९, ५; वाज. सं. १६. २७, व ३०. ७ ) कर्णशोभन हा शब्द कानांतील

दागिन्याबद्दल आलेला आहे. नंतरच्या संस्कृत वाङ्मयांत कोणकोणतीं कर्णाभरणें दिसतात हें 'अलंकार' ( ज्ञानकोश विभाग ७, पा. ४८७ ) या लेखांत सांगितलें आहे. भारतीय पाषाणशिल्पांतील मूर्तींच्या कानांतून कुंडलें वगैरे दृष्टीस पडतात. हल्लीं कर्णभूषणें बहुधां बायका वापरतात; पण मारवाडी, कानडी, तामिळी पुरुष देखील कानांत दागिने घालतात. नाना फडणीस, सवाई माधवराव यांसारख्या ऐतिहासिक पुरुषांच्या तसविरी पाहिल्यास त्यांच्या कानांत मोठाले चौकडे दिसतील. दक्षिणी बायका काप, बाळ्या, बुगड्या, कुड्या, लवंगा, कुरडु वगैरे दागीने कानांत घालतात. बाळ्यांचे ३२ प्रकार आढळतात. वेलबाळ्या, पानबाळ्या, मासबाळ्या, नालबाळ्या, अवदागीरबाळ्या, खुंटबाळ्या, मोतीबाळ्या, दाळिंबीबाळ्या, बोंडबाळ्या, कोथिंबिरीबाळ्या, चंद्रबाळ्या, चिंचबाळ्या, पडींच्याबाळ्या, मखमालीबाळ्या, हौदीबाळ्या, पतंगीबाळ्या, वगैरे ( अनंतफंदीची चंद्रावळ लावणी पहा ). कानडी बायकाहि बुगड्या, झामकी, घंटी, कर्णफुलें, तनविदा हीं घालतात. मुसुलमानी बायका पातबाळिया, करणफूल, झुमका, बुगडी बिजली-की बाळी यासारखे कानांतील दागिने पसंत करितात. मद्रासेकडील कादन, कल्लण वगैरे जातींतील बायका आपाल्या कानाच्या पाळयांत भलीं मोठीं कडीं अडकवितात. भारतीयेतर लोकांतहि कर्णभूषणांची चाल आहे. आपल्याकडील अर्वाचीन ईरिंग इंग्रजी ईअररिंग ( कर्णवलय ) शब्दाचा अपभ्रंश आहे.

रानटी जातींतून सुद्धां कर्णवलयें घालून कान सुशोभित करण्याकडे प्रवृत्ति दिसून येते. त्यांच्यांत बहुधां हा दागिना फार मोठ्या आकाराचा असतो. बोर्निओंतील बेरावान लोक ३॥। इंच व्यासाचा चोंदा कानाच्या पाळयांत कोंवतात. याहि पेक्षां विलक्षण तऱ्हा म्हणजे मसाई लोक ४॥ इंच व्यासाचा व २ पौंड १४ औंस वजनाचा दगडी चोंदा ( खुंटी ) कानांत घालतात ( मॅन १९०५, पा. २२ ). या मसाई फॅशनचें उद्दिष्ट कानाचीं पाळीं डोक्यावर मिळलीं पाहिजेत असें आहे. सुधारलेल्या समाजांत असे अवाढव्य व वेढब कर्णालंकार वापरले जात नसले तरी सुबक व मौल्यवान कर्णभूषणें अतिशय प्रिय वाटतात यांत शंका नाहीं.

सारख्या घडणीची व आकाराची कर्णवलयाची जोडी नेहेमीं वापरण्यांत दिसते. तरी पौरस्त्य देशांतून कांहीं ठिकाणीं एकाच कानांत वलय घालण्यांत येतें. उदा. बिगवाळी. ख्रिस्ती धर्मग्रंथाच्या उत्पत्तिप्रकरणांत कर्णवलयें उल्लेखिलीं आहेत. हिब्रू व ईजिप्शियन बायकाच मात्र अशीं भूषणें वापरीत पण इतर पौरस्त्य लोकांत पुरुष व बायका या दोघांनांहि ही सवलत असे. पश्चिमेकडे ग्रीक व रोमन लोकांत हा बायकांचा दागिना असे व कोणा पुरुषाच्या कानांत तो असेल तर तो पौरस्त्य म्हणून ओळखिला जाई. यूरोपांत प्राचीन काळच्या संशोधित अवशेषांत कर्णवलयें आढळतात. इ. स. पू. ४ थ्या शतकांतील क्रिमियांतील ग्रीक वसाहतकारांच्या थडग्यांतून अति सुंदर व विलक्षण कारागिरीचीं कर्णवलयें सांपडलीं आहेत. आंग्लो-सॅक्सनांच्या वलयांवरून तें सांस्कृतिक कलाकौशल्यांत फारसे पुढारलेले होतेसें दिसत नाहीं.

अर्वाचीनकाळीं पाश्चात्यांत कर्णवलयें घालण्याची चाल कमी होत नसून वाढतच आहे. तथापि त्यांची घाटणी विशिष्ट प्रकारची किंवा पुरातन काळाला धरून असलेली दिसत नाहीं. कोणत्या तरी जातींतील किंवा काळांतील एखादी घडण घेऊन तींत आजच्या आवडीप्रमाणें फरक करितात; तेव्हां तिचें सातत्य दाखविणें कठिण आहे.

**कर्णराज** ( इ. स. १०७२-१०९४ )—अहिनलपट्टणच्या चालुक्य वंशांतील भीमदेव व उदयामति यांचा कर्णराज हा पुत्र होय. यानें बावीस वर्षें शांततेनें राज्य केलें. याला लढाई वगैरे करण्याचा प्रसंग आला नाहीं. लोकोपयोगी अनेक कृत्यें करून त्यानें रयतेची प्रीति संपादली. कर्णसागर नांवाचा एक अतिविस्तृत तलाव यानें बांधला. वऱ्हाडांतील चंद्रपूर ( चांदा ) शहरचा राजा जयकेशी याची कन्या मैनलदेवी इच्यांशीं कर्णराजानें लग्न लावलें. तिच्या पोटीं त्यास पुत्र झाला. त्याचें नांव सिद्धराज जयसिंग असें ठेवण्यांत आलें. हा मुलगा अल्पवयी असतांच कर्णराज मरण पावला.

**कर्णसुवर्ण**—बंगाल्यांत भागीरथीच्या पश्चिमेकडे असलेलें एक प्राचीन राज्य. यांत हल्लींच्या बरद्वान, बांकुरा, पश्चिममुर्शिदाबाद व हुगळी या जिल्ह्यांचा समावेश होत असे. मुर्शिदाबाद जिल्ह्यांतील रांगामाती ही त्याची राजधानी असावी. ( जे. ए. एस्. बी. ६२. १८९३ ) पण मनमोहनदास चक्रवर्तींच्या मतें लक्ष्मणावती ही कर्णसुवर्णाची राजधानी असावी ( कित्ता पु. ४, १९०८ ). ह्युएनत्संगचें कर्णसुवर्ण मध्यबंगाल असावें असें व्हि. स्मिथ म्हणतो (अर्ली हिस्टरी). भारतवर्षीय भूवर्णनकारांनीं या प्रदेशाला किरणसुवर्ण म्हटलें आहे, व त्याची राजधानी ताम्रलिप्तीच्या वायव्येस ११७ मैलांवर असून राज्याचा घेर सुमारें ७५० मैल होता. या प्रदेशांतील लोकांस कोल म्हणतात. सातव्या शतकांत या देशावर शशांक राजा राज्य करीत होता.

**कर्णाटक**(कर्नाटक)व्युत्पत्ति-दक्षिणहिंदुस्थानांतील देश. मनुस्मृतींत ( १०.२२ ) म्हटलें आहे कीं, "झल्लो मल्लश्च राजन्यात् व्रात्यान् निच्छिविरेव च । नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च ॥ " यावर कुल्लूकाची व्याख्या " क्षत्रियाद् व्रात्यात् सवर्णायां झल्ल...... नटकरण......द्रविडाख्या जायन्ते ॥ एतानि अपि एकस्य एव नामानि. ॥ :सारांश व्रात्य क्षत्रियांपासून सवर्ण स्त्रीचे ठायीं जी प्रजा होते तिला देशपरत्वें झल्ल, मल्ल, निच्छिवि, नट, करण, खस, द्रविड अशीं नांवें आहेत. हीं एकाच संकर जातीचीं निरनिराळीं नांवें आहेत. ज्या प्रदेशांत हे व्रात्य क्षत्रिय रहावयास गेले त्या प्रदेशांना त्यांचीं नांवें मिळालीं. करण व नट हे जेथें रहात तो करणनट=

करणणट = कर्णाटक. यास कन्नड असेंहि दुसरें नांव आहे. तें करणणट करणट = कन्नड असें साधतें. असें रा. वि. का. राजवाडे म्हणतात. ( भा. इ. सं. मं. अहवाल १८३२ ) ह्या देशाला कानडा, कर्नाट किंवा कर्नाटकदेश हीं हि दुसरीं नांवें आहेत.

इ ति हा स.—या देशांत वेगवेगळ्या वंशांचे राजे होऊन गेले. आंध्र किंवा सातवाहन, कदम्ब, पल्लव, गंग, चालुक्य, राष्ट्रकूट, चोल, होयसल, व विजयानगरचे राजे, ह्या वंशांनीं येथें वेगवेगळ्या वेळीं पूर्णत्वानें किंवा अंशतवानें राज्य केलें. विजयानगरचे राजे १३३६ पासून येथें राज्य करूं लागले व त्यांनीं तुंगभद्रा नदीच्या खालचा सर्व प्रदेश जिंकिला. परंतु १५६५ सालीं मुसुलमानांनीं त्यांचा पुरा मोड केला तेव्हां ते पेनुकोंड्याहून चंद्रगिरी येथें गेले व कांहीं अनगुंडी येथें राहिले. जेव्हां मुसुलमान राजांनीं विजयानगरच्या वंशास हांकून लावून आपली सत्ता स्थापिली तेव्हां कर्नाटकचे, कर्नाटक, हैदराबाद किंवा गोवळकोंडा व कर्नाटक विजापूर असे दोन भाग केले. ह्यावेळीं विल्कस साहेब म्हणतात 'तुंगभद्रा नदी ही कर्नाकटची उत्तरसीमा होती.'

सध्यां कारोमांडल किनाऱ्यावरच्या घांटाखालच्या प्रदेशास कर्नाटक अशी संज्ञा आहे. इंग्लिश व फ्रेंच ह्या लोकांमध्यें १८ व्या शतकांत जीं स्वसत्तास्थापनार्थ भांडणें व लढाया झाल्या त्या याच देशांत होत. बेळगांव, धारवाड, विजापूर हे जिल्हे व उत्तर कानड्याचा भाग ह्या प्रदेशास कर्नाटक ही संज्ञा आहे.

स्थूल मानानें पाहिलें तर पूर्वेस ज्या ठिकाणीं कृष्णानदी पूर्व घाटांतून बाहेर पडते त्या जागेपासून उत्तरेस मंजिरा-नदीपावेतों एक रेषा काढून या दुसऱ्या विंदूपासून गोंव्या-पावेतों पुन्हां दुसरी रेषा काढली असतां त्यांच्या दक्षिणेकडील पूर्व व पश्चिम घांटांमधील जो दक्षिण हिंदुस्तानाचा भाग तो प्राचीन काळीं कर्नाटक या नांवाखालीं मोडला जात होता. सतराव्या शतकाच्या अखेरीस मोंगलांनीं दक्षिण हिंदुस्थानांत स्वारी करून विजापूर व गोवळकोंडा हीं राज्यें खालसा केलीं तेव्हां ते या भागावरोबर उत्तरेस गंतूरपासून दक्षिणेस कावेरी नदीपावेतों पूर्वघाट व समुद्रकिनारा यांच्यामधील जो द्रविड देशाचा भाग त्यासहि विशेष भेदाभेद न बाळगतां कर्नाटक हेंच नांव देऊं लागले. या वेळेपासून पठारावरील, म्हणजे वास्तविक कर्नाटकास 'कर्नाटक बालेघांट' व द्रविडांतील कर्नाटकास 'कर्नाटक पैनघांट' अशीं नांवें प्रचारांत आलीं.

चो ल दे श.—प्रस्तुतच्या कर्नाटकाचा पूर्वी चोलदेशामध्यें समावेश होत असे. चोलमंडलम् असेंहि दुसरें नांव त्या प्रांतास असे. या प्रांताचें हवापाणी उत्तम आहे. या प्रांतावर फार प्राचीन कालापासून चोल राजे राज्य करीत होते. यांचा खात्रीलायक असा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. अशोकाच्या शिलाशासनांत व रामायण, महाभारत या प्राचीन ग्रंथांतहि चोलांचा उल्लेख येतो. पाणिनी हें नांव उल्लेखीत नाहीं, कात्यायन मात्र उल्लेखितो. पेरिप्लुस व टालेमी यांचीहि साक्ष या कामीं मिळते.इ. स. २१४–९०८ पर्यंत या प्रांतावर चोलांचें स्वतंत्र राज्य होतें अशी माहिती मिळते. परंतु त्यांचा खरा इतिहास (इ. स. ९८५) राजराज चोलाच्या कारकीर्दीपर्यंत उपलब्ध नाहीं. "स्थलपुराणा "वरून चोल हे प्राचीन होते एवढेंच समजतें. त्यांची पहिली राजधानी (२ रें शतक ) त्रिचनापल्लीजवळील कावेरीकांठचें उरईयुर होय. सातव्या शतकांत मल्लीकुरम् व १० । ११ व्या शतकांत तंजाउर या राजधान्या होत्या. कर्नाटक प्रांताला मालकूट असेंहि एक नांव असे. चोल राजांचें ध्वजचित्र वाघाचें असून तें त्यांनीं कांचीच्या पल्लव राजांच्या ध्वजावरून घेतल्याचें समजतें. ह्युएनत्संग याचें चोलमंडल हा फार लहान प्रदेश होता. पल्लवांचें राज्य असतांना चोलमंडलाला यात्रेकरू लोक द्रविड देश असें म्हणत. चोल राजे शिवोपासक होते. प्राचीन चोलराजे दर्यावर्दीहि होते. मलायापर्यंत त्यांचीं जहाजें व्यापारास जात.

चो ल रा जे.—पहिला ऐतिहासिक राजा करिकाल यानें उरईयुर सोडून कावेरीपट्टन ही राजधानी करून कावेरी नदीस मोठमोठे बंधारे घातले. यानें पुष्कळ वर्षे राज्य केलें; पांड्य व चेर यांच्याशीं लढाया मारल्या. याचा काल इ. स. चें दुसरें शतक होय. याचा नातु नेदुमुदी किल्ली हा याच्यानंतर राजा झाला. हा दुर्बळ होता. यापुढें २ । ३ शतकें चोलांची सत्ता नाममात्र होती. यावेळीं पल्लव चेर वगैरे इतर राजवंश प्रबळ झाले. सातव्या शतकापर्यंत चोलांचें मुळींच नांव ऐकूं येत नाहीं. पल्लवांनां ( इ. स. ७४० )चालुक्यांनीं निर्जीव केल्यानें पुन्हां चोलांनीं उचल केली. चालुक्यांच्या सैन्याला "कर्नाटकाचें अमर्यादित्त सैन्य" म्हटलें आहे ( सामानगड-ताम्रपट.) नवव्या शतकांत विजयालय चोलाचें नांव ऐकू येतें. यानें ३० वर्षें राज्य केलें. याचा पुत्र आदित्य (इ.स. ८८०–९०७ ) यानें अपराजित पल्लवास जिंकून त्यांचा नाश केला. परांतक (इ. स. ९०८–४९ ) यानें पल्लवांनां नामशेष करून पांड्यांनां ( त्यांच्या मदुरा राजधानीसह ) जिंकून लंकेवर स्वारी केली. यानें आपल्या राज्यांत सर्वत्र ग्रामपंचायती स्थापन करून प्रजेला फार सुख दिलें. याचा पुत्र राजादित्य. याच्यावर राष्ट्रकूट कृष्ण ( तिसरा ) यानें स्वारी केली, तींत तो मेला. याच्या मागून तीन अल्पजीवि राजे गादीवर आले. शेवटीं ( ९८५ ) राजराजदेव हा राजा आला. हा फार शूर होता. यानें २८ वर्षे राज्य केलें. प्रथम चेरांचें आरमार जिंकून त्यांनां मांडलिक बनविलें. नंतर कूर्ग, पांड्य, पल्लव, कोलम, कलिंग, सिलोन हे देश जिंकले. १००६ मध्यें त्यानें मुलुखगिरी बंद केली. त्यानें आपल्या आरमारानें लखदिव व मालदिव बेटें घेतलीं होतीं. याची राजधानी तंजावुर [ तंजावर ) येथें यानें बांधलेल्या देवळांत याच्या इतिहासाचा एक शिलालेख आहे. हा स्वतः शैव होता तरी पण बौद्ध

वगैरे इतर धर्मीनां सहाय्य करीत असे याचा पुत्र राजेंद्र गंगाईकोंडा हा बापापेक्षां शूर होता. यानें अंदमान, निकोबार व पेगु ( ब्रह्मदेश ) हे प्रांत काबीज केले (१०२५-२७) व बंगाल बहारच्या महिपालावर स्वाऱ्या केल्या. यानें गंगाई कोंडाचोलपुर राजधानी वसविली व आठ कोस विस्ताराचें एक मोठें तळें बांधलें. ३०फूट उंची असलेल्या पिंडीच्या महादेवाचें उत्तम कलाकुसरीचें देऊळीहि बांधलें. याचा मुलगा राजाधिराज हा १०३५ त गादीवर आला. याची व चालुक्यांची लढाई १०५२ त होऊन दोघांची राज्यमर्यादा तुंगभद्रा नदी ठरली. या लढाईंत हा मेला. याच्या मागून याचा भाऊ राजेंद्र परकेसरीवर्मा गादीवर आला. याच्या मागून तीन नामधारी राजे झाले. हे सर्व शेजारच्या राजांशीं भांडत असत. चालुक्यांच्या यादवीचा फायदा घेऊन वीरराजेंद्र चोलानें सोमेश्वर ( दुसरा ) चालुक्यास आपली मुलगी देऊन सहाय्य केलें. वीर राजेंद्र ( १०७० ) मेल्यावर त्याचा मुलगा आधिराजेंद्र हा आपल्या मेव्हण्याच्या मदतीनें गादीवर आला. परंतु तो प्रजेस नावडता होऊन त्याचा ( इ. स.१०७४ ) खून झाला. येथें चोलांची औरस वंशपरंपरा खुंटली. याला पुत्र नव्हता म्हणून भाऊबंदांपैकीं राजेंद्र हा गादीवर आला. याला कुलोत्तुंगहि म्हणत. ह्याची आई गंगाई कोंडा चोलाची मुलगी होती: व बाप वेंगीकर चालुक्य होता. म्हणजे हा चोलांच्या मुलीचा वंश होता; अर्थात यानें चालुक्य-चोल वंश सुरू केला. हा फार शूर व मुत्सद्दी असून यानें ४९ वर्षें राज्य केलें. कलिंग, गंग, हे राजे त्यानें जिंकले. त्यानें जमीनीची धारापद्धति उत्तम प्रकारें बसविली ( १०८६ ). याचा मुलगा विक्रम यानेंहि राज्य वाढविलें. याच्यानंतरचे तिन राजे नाममात्र होते. शेवटचा नांवाजण्यासारखा राजा कुलोत्तुंग ( तिसरा ) हा होय. हा ११८७ त गादीवर आला. यानें ४० वर्षें राज्य केलें. याच्यामागून चोलांचें नांव ऐकूं येत नाहीं. नंतर पांड्य पुढें आले व पुढें मलिक काफरनें हिंदूंचा पराभव केला. ( १३१० ).

पुढें वारंगळ, विजयानगर व द्वारसमुद्र येथील हिंदु राजांनीं एकत्र होऊन मुसुलमानांनां हांकलून लाविलें ( १३४४ ). नंतर विजयानगरचें साम्राज्य कर्नाटकावर झालें. तेथील सम्राटातर्फे नायक राजे तंजावरवर राज्य करीत होते.त्यांची वंशावळ अशी:—( १ ) शिवाप्पा ( १५४९-७२ ), ( २ ) अच्युतप्पा (१५७२-१६१४), ( ३ ) रघुनाथ (१६१४-६०) ( ४ ) विजयराघव ( १६६०-७३ ) या राजांनीं इमारती, कालवे, देवळें वगैरे बांधिलीं; विद्येला उत्तेजन दिलें; ग्रंथसंग्रह केला. विजयराघवाचें राज्य चोलनाथ नायक यानें घेतलें. तेव्हां त्याच्या मुलानें ( चेगमलनें ) व्यंकोजीराजे भोंसले यांच्या सहाय्यानें आपलें राज्य परत मिळविलें. परंतु पुढें तो नामधारी राहून भोंसले हेच तंजावरचे राजे झाले; ते १९ व्या शतकापर्यंत होते ( तंजावर पहा ).

शिवाजी महाराजांनीं कर्नाटक बहुतेक पादाक्रांत केलें होतेंच.इ. स. १७५६ त कर्नाटकांत पर्जन्य फार पडून खराबी झाली होती. असें असतांहि पेशव्यांनीं फत्तेसिंग भोसले व रघूजी भोसले यांनां पाठवून सिरटी व कोपल परगणे काबीज केले ( रा. खं. १. १०१). पुढें विसाजीपंत विनीवाले यांनां ( १७६० मार्च ) कर्नाटकांत फौजेसह रवाना केलें होतें. (कित्ता२७०).स. १७५२ मध्यें पेशवे कर्नाटकामध्यें गेले होते. त्या स्वारींत " नफा किमपि न झाला. ते प्रांतीचे नवाब वगैरे सर्व संस्थानिक निरंतर चाहातात कीं आमचा ( पेशव्यांचा) जबरदस्त पाय कर्नाटकांत न पडावा. " त्यावेळीं त्यांची फौज थोडी होती. त्यामुळें "पैका कसा उगवतो ? " याप्रमाणें श्री. नानासाहेब पेशवे म्हणत होते ( रा. खं. ६.३४७ ). बाबूजी नाइकास कर्नाटकाचा सुभा देण्याची मसलत यावेळीं चालू होती ( कित्ता ३६५ ). राजारामाच्या वेळीं आवाजी सोनदेव हे कर्नाटकांत मोंगलाशीं लढत होते ( रा. खं. ८.५१ ). स. १७७१ मध्यें त्रिंबकराव मामा कर्नाटकावर स्वारीस गेले होते. ( रा. खं. १०.४० )इ. स. १७७३ व १७७४ मध्यें कर्नाटकांत माधवराव नीळकंठ पुरंदरे हे दोन हजार स्वारांनिशीं बंदोबस्तास होते ( कित्ता८० ).स.१७७८त हरिपंत फडके कर्नाटकांत स्वारीस गेले( कित्ता १३५ ). स. १७८० त हैदर व पेशवे यांच्या कटकटी कर्नाटकांत होत होत्या ( कित्ता १८४ ). स. १७८६ त टिपूवर हरिपंत फडक्यांनीं जाऊन गजेंद्रगड घेतला ( कित्ता ३३० ).

**कर्नाटक ( अर्काट ) चे नवाब**:—औरंगजेबानें राजारामावर स्वारी केली, तेव्हां महाराज जिंजीस गेले. त्यांच्यावर त्यानें सैन्य धाडून प्रथम कर्नाटक प्रांत हस्तगत केला. औरंगाबाद हा मुख्य सुभा होता. त्याच्या खालीं कर्नाटकाचा एक स्वतंत्र छोटा सुभा केला. त्याची अर्काट ही राजधानी होती. त्यामुळें तेथील सुभेदारास अर्काटचे नवाब असें नांव पडलें. अर्काटचा पहिला नवाब झुलफिकारखान हा होय. दक्षिणेची मोहीम चालू असतांना त्याची इ.स.१६८७मध्यें रवानगी झाली; व१६९२सालीं त्यास कर्नाटकचा नवाब करून दक्षिणच्या सुभेदाराच्या हाताखालीं नेमण्यांत आलें. याच्याकडे कर्नाटकचा कारभार१७०३ पर्यंत होता. यानंतर दाऊदखान पन्नी नामक सरदाराची कर्नाटकच्या कारभारावर नेमणूक झाली. दाऊदखान हा खिजरखानाचा पुत्र असून त्यानें १७०८ पर्यंत कर्नाटकचा कारभार केला. यानंतर तो दिल्लीचा मुख्य सेनापति नेमला जाऊन त्याच्या जागीं सादतउल्लाखान हा कर्नाटकचा नवाब होऊन आला.

यापूर्वी कर्नाटकची नवाबी कोणत्याहि एका घराण्याकडे चालत आली नव्हती. परंतु यापुढें दिल्लीच्या कारभारांतील बखेड्यामुळें कर्नाटकसारख्या दूरच्या प्रांतावर नियंत्रण ठेवणें कठिण होऊन तेथील नवाबांस आपली सत्ता वंशपरंपरागत करून घेण्यास सवड मिळाली. सादतउल्लाखानास व त्याच्या वंशजांस

त्यांच्या वंशनामावरून नेवायेतेह नवाव असें नांव पडलें असून या नेवायेतेह लोकांची आठव्या शतकांतच अरवस्थानांतून हकालपट्टी होऊन ते हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर येऊन राहिले होते असें म्हणतात.

सा द तं उ ल्ला खा न.—सादतउल्लाखान हा अगीत्ती महंमदखान नामक इसमाचा मुलगा असून यास महमद सय्यद असेंहि म्हणत. यानें आपला भाऊ गुलाम अल्लीखान याला वेलोरचा जहागीरदार केलें; हा स्वतः निपुत्रिक होता म्हणून यानें आपल्या भावाचे पुत्र दोस्तअल्ली, वाकरअल्ली, सादतअल्ली व अकवर महम्मद यांस दत्तक घेऊन त्यांपैकीं पहिल्यास त्यानें आपला वारस केलें, दुसऱ्यास वेलोरचा कारभार सांगितला व आपल्या भावाची खासगी संपत्ति या चाराहि जणांस सारखी वांटून दिली.

दो स्त अ ल्ली.—सादतउल्लाखानाच्या मृत्यूनंतर ( इ. स. १७३२ ) दोस्तअल्ली हा कर्नाटकचा नवाव होऊन सादतउल्लाखान खानाच्या बायकोचा भाचा गुलाम हुसेन हा त्याचा कारभारी झाला. दोस्तअल्लीच्या कारकीर्दींत त्रिचनापल्ली कर्नाटकच्या राज्यास जोडली. या गोष्टीचा सूड घेण्याकरितां तेथील नायकांनीं मराठ्यांची मदत मागितल्यावरून इ. स. १७४० मध्यें मराठ्यांनीं कर्नाटकांत स्वारी करून पावसाळ्यापूर्वीं चंद्रगिरी तालुक्यांत दामलच्या रुवु घाटांत दोस्तअल्लीवर हल्ला केला, व त्याचा पराभव करून त्यास ठार मारलें व तो व त्याचा दिवाण मीर आसद यांस कैद केलें.

स फ द र अ ल्ली.—वरील लढाईनंतर दोस्त अल्लीचा पुत्र व वारस सफदर अल्ली हा वेलोरला पळाला व त्याचा जांवई चंदासाहेब हा त्रिचनापल्लीस जाऊन वेढ्यासाठीं किल्ल्यांत धान्यसामुग्रीची वेगमी करून वसला. इकडे मराठे ठिकठिकाणाहून खंडण्या वसूल करीत हिंडूं लागले.सफदरअल्ली यास धाक पडून त्यानें मराठ्यांस खंडणी देऊन त्यांस स्वदेशीं परत लावलें.तथापि मराठे परत फिरण्यापूर्वीं सफदरअल्लीनें त्यांच्या या नवीन ओळखीचा आपल्या शत्रूचा पाडाव करण्याच्या कामीं उपयोग करून घेतला. दोस्त अल्लीला सफदरअल्लीशिवाय आणखी तीन मुली असून यांपैकीं एक दोस्तअल्लीचा भाऊ वांकिरअल्ली, याच्या गुलाम मुर्तझाअल्ली या पुत्रास व दुसरी वांदीवाशच्या तकी साहेवास व तिसरी चंदासाहेब नांवाच्या दूरच्या एका नातेवाइकास दिली होती. परंतु सदरहू चंदासाहेव याची पहिल्या वायकोची मुलगी दोस्तअल्लीचा पहिला दिवाण गुलाम हुसेन यास दिली असल्यामुळें त्याचा नेवायेतेह नवावाशीं दोस्तअल्लीकडून व त्याच्या वायकोकडून असा दुहेरी संबंध जडून तो प्रवळ झाला. मराठ्यांच्या स्वारीच्या वेळीं त्रिचनापल्लीचा किल्ला या चंदासाहेबाच्याच ताब्यांत होता. १७३६ सालीं त्रिचनापल्लीची गादी रिकामी पडली तेव्हां माजी नाइकाच्या विधवा पत्नीनें स्वतः राज्यकारभार पाहण्याचें ठरवून चंदासाहेवाची मदत मागितली असतां चंदासाहेवानें किल्ल्यांत प्रवेश होतांच राणीस अटकेंत ठेवून किल्ला स्वतःच पटकाविला होता. चंदासाहेव हा प्रवळ असून शिवाय लोकप्रियहि असल्यामुळें सफदरअल्ली व दिवाण मीर आसद यांस त्याचा हेवा वाटूं लागला होता. म्हणून सफदर अल्ली यानें मराठ्यांशीं गुप्त तह करून त्यांना चंदासाहेवाचा पाडाव करण्याविषयीं विनंति केली.मराठ्यांचा त्रिचनापल्लीवर अगोदर पासूनच डोळा असल्यामुळें त्यांनीं ही गोष्ट तावडतोव कवूल केली. त्यांनीं स्वदेशीं परत जाण्याचें मीष करून आपलें सैन्य थोडेंसें मागें नेलें. मराठे गेले अशा समजुतीवर चंदासाहेवानें किल्ल्यांतील धान्यसामुग्रीची विल्हेवाट लावतांच पुढील वर्षीं ते पूर्वसंकेतानुरूप पुन्हां कर्नाटकांत आले व त्यांनीं २६ मार्च १७४१ रोजीं त्रिचनापल्ली काबीज करून चंदासाहेवास कैद करून साताऱ्यास नेलें. येणेंप्रमाणें सफदरअल्लीचा एक शत्रु नाहींसा झाला तरी त्यास आपली सत्ता फार दिवस उपभोगतां आली नाहीं. वेलोरचा सुभा, त्याचा चुलतभाऊ व मेहुणा गुलाम मुर्तझाअल्ली, हा त्यास निराळाच शत्रु उद्भवून त्यानें त्याचा पुढच्या वर्षीं वध केला.

घ रा ण्या चा शे व ट.—मुर्तझा अल्लीनें थोडे दिवस राज्यकारभार केला. पण त्याच्या दुष्कृत्यामुळें लोकांस इतका त्वेष आला होता कीं त्यामुळें तो भिऊन वेलोरला पळून गेला. तेव्हां सफदरअल्लीचा पुत्र महंमद सय्यद उर्फ सादत उल्लाखान अर्काटचा नवाव झाला. पण तोहि इ. स. १७४४ सालीं अर्काट येथें मारला गेला. महंमद सय्यदाशिवाय सफदरअल्लीस आणखी एक मुलगा होता. वास्तविक कर्नाटकचे नवाव हे दक्षिणच्या सुभेदाराचे अंकित असतां तेथें वाटेल तो उठतो व आपली परवानगी न घेतां नवाब होतो हें पाहून दक्षिणचा सुभेदार निजामअल्ली यास चीड आली होती. त्यानें इ. स. १७४३ सालीं कर्नाटकांत स्वारी करून तेथील अल्पवयी नवावाच्या वतीनें कारभार पहाण्यासाठीं महंमद अनवरुद्दीन याची नेमणूक केली. पण या वालनवावाचा पुढें लवकरच खून होऊन अनवरुद्दीन हा स्वतंत्रपणें कर्नाटकचा कारभार करूं लागला.

अ न व रु द्दी न.— कर्नाटकांत अर्काटचे नवाव ही पदवी आज ज्या घराण्यांत चालत आहे त्या घराण्याचा मूळ पुरुष हा महंमद अनवरुद्दीनच होय. याच्या कारकीर्दींत झालेल्या एका लढाईंत यूरोपीय लहानशा कवायती सैन्यापुढें जुन्या तऱ्हेच्या कवाइत न शिकलेल्या प्रचंड हिंदी सैन्याचें कांहीं चालत नाहीं असें निदर्शनास येऊन यूरोपीय लोकांस हिंदी राजकारणांत हात घालण्यास उत्तेजन मिळालें. इ. स. १७४६ मध्यें फ्रेंचांनीं इंग्रजांपासून मद्रास काबीज करून तें तुमच्या स्वाधीन करतों अशा थापांनीं अनवरुद्दिनांची संमति मिळवून आपल्याच ताब्यांत ठेविलें. तेव्हां फ्रेंचांपासून ती जागा कावीज करण्यासाठीं अनवरुद्दिनानें आपल्या थोरल्या पुत्राच्या हाताखालीं एक मोठें सैन्य रवाना केलें. या सैन्याची

मद्रासजवळ मैलापूर येथें फ्रेंचांच्या एका लहान सैन्याशीं लढाई होऊन तींत तें नामोहरम होऊन परत फिरलें. यानंतर अनवरुद्दीन यास माजी नवाब घराण्यांतील वारस चंदासाहेब याच्याशीं तोंड देण्याची पाळी आली. सात वर्षें मराठ्यांच्या कैदेंत काढल्यावर इ. स. १७४८ सालीं फ्रेंचांनीं याच्या प्रीत्यर्थ दंड भरल्यामुळें चंदासाहेबाची सुटका झाली, व तो मुजफरजंग व फ्रेंच यांची कुमक मिळवून १७४९ मध्यें अनवरुद्दिनावर चाल करून आला. अनवरुद्दीन व चंदासाहेब यांची अंबूर येथें लढाई होऊन तींत अनवरुद्दीन पराभूत होऊन मारला गेला.

महंमद अली व चंदा साहेब.—अनवरुद्दीनाच्या मागून कर्नाटकच्या नवाबाच्या जागेवर दोन पुरुष आपला हक्क सांगूं लागले. एक अनवरुद्दीन याचा दासीपुत्र महंमद-अली व दुसरा चंदासाहेब. अनवरुद्दीन यास माफुजखान म्हणून महंमदअलीहून एक वडील मुलगा होता. पण अंबूरच्या लढाईत तो कैद होऊन शत्रूच्या हातीं पडला. पुढें जरी त्याची लवकरच सुटका झाली तरी तो महंमदअली-विरुद्ध कधींच गेला नाहीं. (यास मदुरेच्या सुभ्याचें काम सांगण्यांत आलें होतें). अनवरुद्दीन या मरणानंतर महंमद-अलीनें त्रिचनापल्लीच्या किल्ल्याचा आश्रय घेतला. त्याचा पक्ष इंग्रजांनीं घेतला असून त्याचा प्रतिस्पर्धी जो चंदासाहेब त्याची बाजू फ्रेंचांनीं उचलून धरली होती. चंदासाहेबानें फ्रेंचांच्या मदतीनें त्रिनचापल्लीखेरीज सर्व कर्नाटक प्रांताचा तावा मिळविला.

इंग्रज फ्रेंचांची स्पर्धा.—येणेंप्रमाणें अर्काटच्या नवाबाच्या जागेवरील दोन हक्कदार महंमदअली व चंदासाहेब यांच्यामधील भांडण हें वस्तुतः इंग्रज व फ्रेंच यांच्यामधील भांडण होऊन बसलें. वस्तुतः १७४९ मध्यें यूरोपमध्यें एक्स-लाचापेल येथें इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान तह होऊन त्याच्या एका कलमाअन्वयें फ्रेंचांनीं घेतलेलें मद्रास इंग्रजांस परतहि करण्यांत आलें होतें. तथापि हिंदुस्थानांतील इंग्लिश व फ्रेंच कंपन्यांनीं आपल्या सरकारच्या संमतीवांचूनहि हिंदुस्थानांत भांडण चालू ठेविलें. इ. स. १७५० मध्यें नासिरजंग मारला गेल्यावर त्याच्या जागीं डुप्लीनें मुजफर-जंग यास हैदर बादच्या गादीवर बसवून मुजफरजंगाकडून कृष्णेपासून कन्याकुमारीपर्यंत सर्व दक्षिण हिंदुस्थानाचें नाम-धारी आधिपत्य संपादन केलें. मुजफरजंग हा याच्या पुढील सालींच मारला गेला. तथापि त्याच्या मागून आस-फजाचा तृतीय पुत्र सलाबतजंग यासहि फ्रेंचांनींच मदत करून गादीवर बसाविल्यामुळें दक्षिणेंतील राजकारणांत त्यांचें वर्चस्व स्थापन झालें. इकडे महंमदअलीचा समूळ पाडाव झाला तर आपल्या हातचें एक बाहुलें नष्ट होऊन कर्नाटकच्या राजकारणांत हात घालण्यास आपणास सवड राहणार नाहीं अशा समजुतीनें इंग्रजांनीं हरप्रयत्न करून त्रिचनापल्ली तेवढी हातची जाऊं दिली नाहीं.

अर्काटचा वेढाः—इतक्यांत क्लाइव्हनें चंदासाहेबाची राजधानी जें अर्काट शहर त्यावर हल्ला करून त्रिचनापल्लीचा बचाव करण्याची घाडशी मसलत पुढें मांडली. त्यानें फोर्ट सेंट डेव्हिडमध्यें १०० व मद्रासमध्यें ५० हून कमी लोक ठेवून बाकीचें सर्व सैन्य म्हणजे २०० सोल्जर व ३०० शिपाई घेऊन अर्काटवर चाल केली. अर्काटचा किल्ला गोळीबार न करतां इंग्रजांच्या कबज्यांत आला. पण हा किल्ला इतका मोडकळीस आलेला होता कीं प्रथम दर्शनीं तो लढविणें अशक्यच वाटलें. तथापि क्लाइव्हनें व त्याच्या माणसांनीं मोठ्या झपाट्यानें काम-चलाऊ तटबंदी उभी करून शत्रूस आश्चर्यचकित करून सोडलें. अर्काट काबीज करण्याचा परिणाम क्लाइव्हच्या अपेक्षेप्रमाणें झाला. शत्रूचें बरेंचसें सैन्य त्रिचनापल्लीचा वेढा सोडून अर्काटला आलें, व त्यानें ५३ दिवसपर्यंत (१७५१, सप्टें. २३–१४ नोव्हें.) एकसारखा अर्काटच्या किल्ल्यावर तोफांचा भडिमार चालू ठेविला, व हल्ला चढवून किल्ला काबीज करण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण त्यांत अपयश येऊन बरीच हानि झाल्यामुळें चंदासाहेबाचें सैन्य निराश होऊन वेढा उठवून चालतें झालें. यानंतर लवकरच इंग्रजांस व त्यांच्या दोस्तांस अर्काटच्या पुर्वेस कावेरीपाक येथें व इतर ठिकाणीं आणखी विजय मिळाले. तेव्हां इ. स. १७५२ मध्यें फ्रेंचांनीं त्रिचनापल्लीचा नाद सोडून दिला. इकडे चंदासाहेब हा तंजावरच्या राजास शरण गेला असतां महंमदअलीच्या चिथवणीवरून त्याचा तेथें वध करण्यांत आला. येणेंप्रमाणें महमदअलीचा प्रतिस्पर्धी चंदासाहेब हा स्पर्धाक्षेत्रांतून नष्ट झाला, तरी इंग्रज व फ्रेंच यांच्यामधील लढा थांबला नाहीं. वस्तुतः चंदासाहेब व महंमदअली हे या लढ्यांत नाममात्रच होते. खरा लढा त्या दोघांमधला नसून त्यांच्या नांवावर चाललेल्या लढाया ही इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान हिंदुस्थानांत वर्चस्व स्थापण्याकरितां चाललेली स्पर्धा होती. बुशीनें निजामाच्या दरबारीं आपलें चांगलें बस्तान बसविलें असून १७५३ मध्यें त्यानें निजामा-कडून आपल्या सैन्याच्या खर्चासाठीं उत्तर सरकाराचा वसूल तोडून घेतला. तथापि बुशीच्या या कृत्याचा डुप्लेला मधून मधून पैशाचा पुरवठा होण्यापलीकडे कांहीं उपयोग झाला नाहीं. इ. स. १७५३ मध्यें बुशीचे आपले सर्व बेत फसले अशी पूर्ण खात्री झाली. त्यानें एक बनावट बाद-शाही सनद पुढें करून आपली कर्नाटकच्या नवाबाच्या जागीं नेमणूक झाली असल्याचें मद्रासकर इंग्रजांनां भास-विण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान यूरोपमध्यें या वेळीं सलोखा असल्यामुळें हिंदुस्थानांतलि या भांडणांस त्यांच्या मायराष्ट्रांचा बिलकुल पाठिंबा नव्हता. शेवटीं फ्रेंच सरकारनें डुप्लीस स्वदेशीं परत बोलावून हा लढा थांबविला. पण लवकरच इ. स. १७५५ मध्यें (मे १७) सप्तवार्षिक युद्ध सुरू होऊन हिंदुस्थानांतील इंग्रज व फ्रेंच वसाहतकारांत

राजरोसपणें झगडा सुरु झाला. इ. स. १७५७ मध्यें अर्काट पुन्हां फ्रेंचांनीं घेतलें. परंतु हिंदुस्थानांतून इंग्रजांस हांकून लावण्यासाठीं फ्रेंच सरकारनें रवाना केलेला सेनापति लाली हा १७५८ च्या एप्रिलपर्यंत पांदीचरी येथें दाखल झाला नाहीं. तोंपर्यंत इंग्रजांनीं बंगालमध्यें आपलें वस्तान चांगलेंच बसवून घेतलें होतें. त्यांतच पुन्हां पांदीचरी येथील फ्रेंच अधिकाऱ्यांच्या मत्सराची भर पडल्यामुळें लालीचें काम अतिशय कठीण होऊन बसलें. तथापि लालीनें पहिल्या धडाक्यासरशी फोर्ट सेंट डेव्हिड व दुसरीं कित्येक किरकोळ स्थळें हस्तगत करून घेतलीं व (स. १७५८) मद्रासवर हल्ला चढविला. पण पांदीचरीच्या अधिकाऱ्याकडून त्यास मदत न मिळाल्यामुळें त्याच्या सैन्याची उपासमार होऊं लागून तें वेलगामी बनलें. अशा सैन्याकडून इंग्रजांचीं ठाणीं काबीज करणें अशक्यप्राय होतें. त्यांतहि पुढें ब्रिटिश आरमार येऊन दाखल झालें. तेव्हां लालीला मद्रास घेण्याचा नाद सोडून देणें भाग पडलें. अशा स्थितींत सर आयर कूट यानें १७६० सालीं मोठें सैन्य जमवून त्यास वांदीवाश येथें लढाई देण्यास भाग पाडून त्याचा पूर्ण पराजय केला. यानंतर लाली पांदीचरी येथें गेला, व तें ठिकाण त्यानें मे १७६० पासून ता. १६ जानेवारी १७६१ पर्यंत लढविलें. पण अखेरीस अन्नाच्या अभावीं त्यास शत्रूस शरण जाण्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. वेढ्याच्या अखेरीस किल्ल्यांत इतकें दुर्भिक्ष झालें होतें कीं, बाजारांत कुत्रें २४ रुपयांस विकलें जाऊं लागलें! लालीनें फोर्टसेंट डेव्हिड घेतलें तेव्हां रहिवाशांस निघून जाण्यास तीन दिवसांची मुदत देऊन तें स्थळ जमीनदोस्त करून टाकलें होतें. त्याचा सर्व वचपा इंग्रजांनीं आतां पांदीचरीवर काढला. त्यांनीं तेथील रहिवाशांस निघून जाण्यासाठीं तीन महिन्यांची मुदत देऊन त्या शहराची तटबंदी आंतील बहुतेक इमारतीसुद्धां जमीनदोस्त करून टाकली.

यानंतर इंग्रजांनीं फ्रेंचांपासून जिंजी, थिआगुर, माही वगैरें स्थळें भराभर काबीज करून १७६१ च्या आरंभास त्यांच्याकडे कालिकत व सुरत येथील वखारींशिवाय कांहीं राहूं दिलें नाहीं.

बंगालमधील फ्रेंचांची वसाहत चंद्रनगर ही क्लाइव्ह व वॅटसन यांनीं १७५७ सालींच हस्तगत करून घेतली होती; व इ. स. १७५८–५९ मध्यें राजमहेंद्रीच्या हिंदु राजाच्या विनवणीवरून कर्नल फोर्ड याच्या सैन्यानें राजमहेंद्रीपासून ४० मैलांवर कुंडूर येथें फ्रेंच सैन्याचा पराभव करून व मच्छलीपट्टण घेऊन निजामाकडून ज्यांचा वसूल बुशीला मिळाला होता ते उत्तरसरकारामधील (गंतूरखेरीज) वरेच जिल्हेहि आपल्या कबजांत घेतले होते.

अशा रीतीनें फ्रेंचांचा हिंदुस्थानांत सर्व बाजूंनीं पाडाव झाला असतां १७६३ सालीं पारिसचा तह होऊन सप्तवार्षिक युद्धाचा शेवट झाला. या तहानें जरी पांदीचरी फ्रेंचांना परत करण्यांत आली तरी अतःपर त्यांची हिंदुस्थानांत कांहीं किंमत उरली नाहीं.

**कर्नाटकांत इंग्रज म्हैसूरकरांचें युद्ध.**— कर्नाटकच्या नवावांस एकट्या इंग्रज फ्रेंचांच्या स्पर्धेचाच परिणाम भोगावा लागला असें नाहीं. इंग्रजांनीं या नवावांस आपल्या स्वतःच्या राजकारणांत याहूनहि अधिक गुरफटून घेतलें. इ. स. १७६५ सालीं इंग्रज, निजाम व मराठे या तिघांनीं मिळून हैदराच्या मुलुखावर स्वारी करण्याचा आपसांत ठराव केला; पण निजाम व मराठे या दोघांनीं पुढें अंग काढून घेतल्यामुळें इ. स. १७६७ सालीं इंग्रजांस हैदराशीं एकटें लढण्याची पाळी येऊन जिला "पहिलें म्हैसूर युद्ध" म्हणून म्हणतात तें उपस्थित झालें. या युद्धांत आरंभींच हैदरानें अंबूरला वेढा घातला. पण इंग्रजांचें सैन्य येतांच तो वेढा उठवून कावेरीपाकला गेला. त्याच वर्षी इंग्रजांनीं चंगम व त्रिनोमाली येथें हैदरावर दोन जय मिळविले. पण या युद्धाच्या वेळीं इंग्रजांची अवस्था एकंदरींत शोचनीयच होती व शेवटीं जेव्हां १७६९ सालीं हैदर ६००० स्वार घेऊन मद्रासच्या वेशीशीं अचानक येऊन ठेपला तेव्हां तेथील इंग्रज अधिकारी गर्भगळित होऊन त्यांनीं हैदराशीं परस्परांनीं परस्परांचीं ठिकाणें व कैदी परत करावे व परस्परांच्या शत्रूंविरुद्ध परस्परांस मदत करावी या अटीवर तह केला. या तहांतील अटीप्रमाणें, हैदरावर थोरल्या माधवराव पेशव्यांनीं स्वारी केली असतां इंग्रज त्याच्या मदतीस जाण्यास कचरल्यामुळेंच हैदराचा इंग्रजांवर दांत राहून "दुसरें म्हैसूर युद्ध" उपस्थित झालें.

तात्पर्य चंदासाहेबाच्या मरणापूर्वी जरी इंग्रज व फ्रेंच यांमधील युद्ध महंमदअल्लीकरितां झालें असें म्हणतां आलें तरी १७५२ नंतर त्यास तसें कांहीं कारण दिसत नाहीं. पहिलें म्हैसूर युद्ध हें तर शुद्ध इंग्रजांच्या राजकारणाचाच परिणाम होता. या युद्धाबद्दल इंग्रज महंमदअल्लीपासून कसा काय मोबदला घेत गेले तें स्पष्ट कळत नाहीं. यावेळीं कर्नाटकांत दोनहाती कारभार चालू होता असें सांगण्यांत येतें: पण तो दोन-हाती कारभार बंगालप्रमाणें नव्हता. महंमदअल्लीला इंग्रजांनीं राजा म्हणून मान्य केलें असून त्याच्या राज्याचा वसूल त्याचेच अधिकारी गोळा करीत होते. इंग्रज हे आपणांस त्याचे केवळ दोस्त किंवा त्याच्या वतीनें व त्याच्या नांवावर काम करणारे फौजबंद नोकर म्हणवीत असत. यावेळीं मद्रास कौन्सिलच्या असें ध्यानांत आलें कीं, निजाम, हैदर व मराठे या प्रबळ शेजाऱ्यांपासून आपण कर्नाटकचें रक्षण करण्यास पुढें आल्याशिवाय कर्नाटक शत्रूच्या स्वाऱ्यांपासून मुक्त होणार नाहीं. नबाबाच्या नोकरींतील बाजारबुणग्यांवर इंग्रजांचा विश्वास नसल्यामुळें त्यांनीं आपलें सैन्य वाढविलें व त्याचा खर्च मात्र (वरील कारण दाखवून) महंमदअल्लीकडून भागविला जाण्याची ते अपेक्षा करूं लागले. तेव्हां त्यासाठीं नवाबानें इंग्रजांस मद्रासच्या

नजीक कांहीं जहागीर दिली, पण तिचा वसूल अद्याप नवाबाचे अधिकारीच करीत होते. महंमदअल्ली याच्याकडे नेहमीं इंग्रजांची बाकी राही तर उलटपक्षीं मद्रास सरकारास पैशाची नेहमीं गरज असे. महंमदअल्ली नेमस्तपणानें राहिला असता व आपला कारभार त्यानें स्वतः पाहिला असता तर हें कर्ज फेडणें फारसें कठिण नव्हतें. पण त्या दाहोंपैकीं एकहि गोष्ट त्यास करतां आली नाहीं. रकमेकरितां त्याच्या मार्गे टुमणें लावलें कीं त्यानें कोणाजवळून तरी पैसे उसने घेऊन ती भरावी. एखाद्या जिल्ह्याचा वसूल स्वतःकडे लावून घेऊन कर्ज देणाऱ्या लोकांची महमदअल्लीजवळ मुळींच वाण नव्हती. महंमदअल्लीच्या या सावकारांमध्यें पॉल बेनफील्ड नांवाच्या कंपनीच्याच एका नोकराचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. हा या सावकारीवर इतका गबर झाला होता कीं, त्याची रहाण्याची ऐट खास गव्हर्नराहूनहि अधिक होती. त्याची बायको लंडनच्या उद्यानांतुन आपल्या ऐटबाज गाडींतून हिंडू फिरूं लागली कीं सर्व लोक तिच्याकडे टकमक पहात रहात.

या सावकरांची मिजास मोठी लक्षांत ठेवण्यासारखी आहे. इ. स. १७७३ मध्यें इंग्लिशांनीं नवाबाच्या सांगण्यावरून तंजावर घेऊन तेथील राजाला पदच्युत केलें. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनां या गोष्टीचा फार राग आला. कारण तंजावरचा राजा हा तहानें आपला आश्रित झाला आहे असें ते समजत होते. लॉर्ड पिगॉट नांवाचा कंपनीचा एक वृद्ध नोकर हा मद्रासचा माजी गव्हर्नर होता. त्यास तंजावरच्या राजास पुन्हां त्याच्या गादीवर बसविण्याचा हुकूम करून त्यांनीं रवाना केलें. पण पॉल बेनफील्ड हा मी अर्काटच्या नवाबास तंजावरच्या वसुलाच्या तारणावर मोठी रक्कम कर्जाऊ दिली आहे अशी सबब सांगून हरकत घेऊं लागला. तेव्हां गव्हर्नर आदिकरून राजाचे पक्षपाती व अर्काटच्या नवाबाचे पक्षपाती यांच्या दरम्यान कौन्सिलमध्यें रणें माजलीं. अखेर लॉर्ड पिगॉटला त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं पकडून तुरुंगांत टाकलें व तेथें तो पुढें आठ महिन्यांनीं मरण पावला (१७७७). तेव्हां दोन्हीहि पक्ष शांत झाले. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं याची चौकशी करण्याचा हुकूम केला; पण त्यापासून कांहीं निष्पन्न झालें नाहीं.

इं ग्र ज म्है सु र क रां चें पु न्हां यु द्ध.—इंग्रजांनीं हैदरचा विश्वासघात करून म्हैसुरच्या दुसऱ्या युद्धाचें बीज कसें पेरून ठेविलें होतें हें मागें दाखविलेंच आहे. या युद्धास इ. स. १७८० मध्यें तोंड लागून हैदरानें कर्नाटकावर स्वारी केली. ज्या कारणामुळें युद्धाला प्रत्यक्ष सुरुवात झाली त्याचा कर्नाटकच्या नवाबाशीं अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नव्हता. यूरोपमध्यें इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान युद्ध सुरु झाल्याचें ऐकून इकडे हिंदुस्थानांत इंग्रजांनीं फ्रेंचांची पांदीचरी हस्तगत करून ते त्यांची पश्चिम किनाऱ्यावरील माही कावीज करण्यास निघाले. माहीवर स्वारी करण्यांत आपण हैदराशीं भांडण उकरून काढीत आहों हें इंग्रज जाणून होते. कारण मराठ्यांनीं स्वारी केली तेव्हां इंग्रजांकडून मदत मिळण्याची निराशा झाल्यावर हैदरानें फ्रेंचांशीं संधान बांधिलें होतें. व त्यांच्याकडून त्यास मदत मिळण्याची अशा होती. फ्रेंचांच्या शिपायांनां गलबतांतून उतरून हैदराच्या मदतीस येण्यास पश्चिम किनाऱ्यावर माही हे एकटेंच बंदर होतें. असें हें बंदर फ्रेंचांच्या ताब्यांतून जावें हें हैदरास न आवडल्यामुळें त्यानें इंग्रजांस निर्वाणीचा खलिता पाठविला होता.

या युद्धांत इंग्रजांस प्रथमपासूनच अपयश येण्यास सुरुवात झाली. आरंभींच १७८० च्या सप्टंबर महिन्यांत पोलिलूर येथें कर्नल बेलीच्या ४००० लोकांच्या तुकडीचा फन्ना उडविण्यांत आला. अशा रीतीनें मद्रासकर इंग्रज पेंचांत आले; तेव्हां त्यांनीं महंमद अल्लीशीं बोलणें लावून त्याच्या कडून युद्ध चालू असेंपर्यंत त्याच्या राज्याच्या एकंदर वसुलाची व्यवस्था आपल्याकडे घेतली. इंग्रजांनीं नवाबास त्याच्या खाजगी खर्चासाठीं एकंदर वसुलीचा फक्त षष्ठांश द्यावा असें ठरलें होतें. बेलीच्या पराभवानंतर एक वर्षानें बरोबर त्याच दिवशीं व त्याच ठिकाणीं इंग्रजांनीं हैदरावर विजय संपादन केला व पुन्हां शोलिंघर येथेंहि त्यावर दुसरा जय मिळविला; पण एकंदरींत हैदराच्या चपल रिसाल्यापुढें त्यांनां टिकाव धरणें कठिणच जाऊं लागलें. १७८२ सालीं टिपूनें कर्नल ब्रेथवेटच्या २००० शिपायांच्या सैन्याचा तंजावर जिल्ह्यांत धुव्वा उडवून इंग्रजांवर दुसरा मोठा विजय मिळविला. अशा अडचणीच्या स्थितींत इंग्रज असतांना यूरोपमध्यें इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान तह झाल्याची वार्ता त्यांनां कळली. तेव्हां त्यांचा जीव खालीं पडला. फ्रेंचांनीं युद्धांतून अंग काढल्यामुळें १७८४ च्या मार्च महिन्यांत शेवटीं टिपूनें इंग्रजांशीं परस्परांनीं परस्परांचा कावीज केलेला मुलूख व कैदी परत करावे या अटीवर तह केला.

क र्ना ट क चें रा ज्य खा ल सा.—वरीलप्रमाणें इंग्रजांनीं आतांपर्यंत कर्नाटकच्या नवाबाची बहुतेक सत्ता तत्वतः आटोपली असून नवाब हे त्यांनां अजागलस्तनाप्रमाणें भारभूत वाटूं लागले होते. म्हणून नवाबाचें राज्य रीतसरपणें खालसा करण्यास संधि केव्हां मिळेल याची ते वाट पहात बसले. इ. स. १८०१ च्या जुलै महिन्यांत कर्नाटकचा नवाब उमदत–उल–उमरा मरण पावला. तेव्हां त्यांनां ही संधि मिळाली. त्याच महिन्याच्या २७ व्या तारखेस गव्हर्नर जनरलनें असें जाहीर केलें कीं, श्रीरंगपट्टण येथें जे कागदपत्र सांपडले त्यांत १७९५ सालीं दिवंगत झालेल्या महंमद अल्लीचा व त्याच्या नंतर गादीवर बसलेला त्याचा पुत्र उमदत–उल–उमरा याचा गुप्त पत्रव्यवहार आढळून आला असल्यामुळें ते ब्रिटिश सरकारचे शत्रू ठरतात. अतएव त्यांचें राज्य खालसा करण्यांत येत आहे. तथापि बरेच वाटाघाट झाल्यावर

महंमद अलीचा नातू अझम—उद्दौला याच्याकडे नवाब ही नामधारी पदवी कायम ठेवण्यांत आली.

न वा ब प द वी ची फा र क त.—वर सांगितल्याप्रमाणें कर्नाटकचें राज्य खालसा करूनच इंग्रजांचें समाधान झालें नाहीं तर नवाब या नामधारी पदवीनें लोकांच्या मनावर नवाबाच्या सत्तेविषयीं होणारा परिणामहि त्यांनां दिवसानुदिवस जाचक होऊं लागला.

इ स. १८५५ मध्यें कर्नाटकचा नामधारी नवाब गुलाम घोसखान हा मरण पावला, तेव्हां इंग्रजांनां त्या जागेच्या अधिकारासंबंधीं व नेमणुकीसंबंधीं फेरविचार करण्यास चांगली संधि मिळाली. इंग्लंडमध्यें व हिंदुस्थानांत चौकशी करतां जबाबदार अधिकाऱ्यांची अशी खात्री झाली कीं, नवाब ही पदवी अर्ध्यामुर्ध्या राजसत्तेची उद्बोधक असली तरी १८०१ सालापासून अर्काटचे नवाब ती केवळ वैयक्तिक बहुमानाचा हुद्दा म्हणूनच धारण करीत आले आहेत; म्हणून प्रस्तुत नवाबाच्या मरणानंतर सरकार तो हुद्दा तसाच पुढें चालविण्यास विलकुल बांधलेलें नाहीं. तेव्हां मद्राससरकार व लॉर्ड डलहौसी यांनीं एकमतानें नवाबाचा हुद्दा रद्द करण्याचें ठरविलें! हल्लीं नवाबांच्या वंशजास अर्काटचा राजा हा हुद्दा असून मद्रास इलाख्यांतील तो पहिल्या प्रतीचा सरदार गणला जातो. यांची वंशावळ पुढें दिली आहेः—




[ सं द र्भ ग्रं थः—डफ; स्मिथ; आयंगारः विल्की; इं. ग्या. मनुस्मति; रा. खं. इ. ].

**कर्तारपूर**–पंजाबांतील जिल्हा व जालंदर तहसिलीमधील गांव. हें नार्थ वेस्टर्न रेल्वेवर असून जालंदरपासून ९ मैलांवर आहे. लो. सं. ( १९११ ) ८६३१. पांचवा शीख गुरु अर्जुन यानें हें शहर वसविलें असून त्याचे वंशज व त्याचा आदिग्रंथ येथें असल्यामुळें हें फार पवित्र मानलें जातें. अहंमदशहानें १७५६त हें शहर जाळून टाकलें होतें. येथें धान्याचा मोठा व्यापार चालतो. येथील म्युनिसिपालीटीचें वार्षिक उत्पन्न सुमारें ७॥ हजार रु. असतें. गांवांत म्युनिसिपालिटाची इंग्रजी शाळा व सरकारी दवाखाना आहे.

**कर्दम**—एक प्रजापति. हा ब्रह्ममानसपुत्र स्वायंभु मन्वंतरांत होऊन गेला. स्वायंभु मनूनें यास आपली देवहूति नामक कन्या दिली होती. कला, अनसूया, श्रद्धा, हविर्भुवा, गति, क्रिया, ख्याति, अरुंधती आणि शांती अशा कर्दमदेवहूतीच्या नऊ कन्या अनुक्रमें आत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलहा, ऋतु, भृगु, वसिष्ठ आणि अथर्वण यांनां दिल्या होत्या. याचा पुत्र कपिल महामुनी या नांवानें प्रसिद्धीस आला. ( भाग. ३ स्कं. ३ अ. २१–२४).

**कर्नलगंज**—संयुक्त प्रांतामधील गोंडा जिल्ह्यांतील तारबगंज तहसिलींतील हें गांव असून बंगाल नॉर्थवेस्टर्न रेल्वेवर आहे. १९११ सालीं येथील लोकसंख्या ५११९ होती. १७८० मध्यें अयोध्येच्या नवाबानें गोग्रानदीच्या उत्तरेकडील राजांवर वचक बसविण्याकरितां एका इंग्रज अधिकाऱ्याच्या हाताखालीं सिक्रोरा येथें कांहीं फौज ठेविली. १८०२ मध्यें येथें आणखी फौज पाठविण्यांत येऊन त्याचें नांव कर्नलगंज ठेवण्यांत आलें. पुढें इंग्रजांनीं हें घेतल्यावर हें सैन्याचें मुख्य ठिकाण केलें. पुढें बंडानंतर येथील छावणी मोडली गेली. या शहराची राज्यव्यवस्था १८५६ सालच्या २० व्या नियमान्वयें चालते. येथील तांदूळ, मका वगैरे जिन्नस बाहेरगांवीं जातात. येथें एक दवाखाना, शाळा वगैरे संस्था आहेत.

**कर्नाळ**, जि ल्हा.—पंजाब प्रांतांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ३१५३ चौ. मैल. मर्यादाः—उत्तरेस पतियाळा संस्थान व अंबाला जिल्हा; पूर्वेस यमुनानदी व पलीकडे संयुक्त प्रांतांतील साहारणपूर, मुझफरपूर व मिरत जिल्हे, दिल्ली व रोहटक जिल्हा आणि पश्चिमेस पतियाळा व झिंद संस्थानें. एका डोंगराच्या योगानें या जिल्ह्याचे दोन भाग होतात. यमुनानदी पूर्व सरहद्दीवरून ८१ मैल वहात जाते. तिच्या पात्राची रुंदी निरनिराळ्या ठिकाणीं अर्ध्यापासून एक मैलपर्यंत आहे. जिल्ह्याच्या उत्तर भागांत पुष्कळ नद्या आहेत. पैकीं घग्गर व तिला मिळणाऱ्या उमला आणि सरस्वती; चौतंग व मार्कंडा; आणि नै, बुऱ्ही व राक्षी या मुख्य नद्या होत. १८२७ पर्यंत कर्नाळपासून २० मैलांच्या आंत कधीं कधीं सिंह आढळत असत असें म्हणतात. वाघहि पुष्कळ होते. परंतु अलीकडे चित्तेसुद्धां क्वचितच दृष्टीस पडतात. कोल्हे मात्र पुष्कळ आहेत. सरस्वतीच्या कांठच्या नैली प्रदेशांत

व कालवे झालेल्या भागांत तापाची सांथ फार असते. या जिल्ह्यांत वार्षिक पाऊस सरासरी ३० इंच पडतो. व पश्चिमेकडे व दक्षिणेकडे पावसाचें मान कमी कमी होत जातें.

इतिहास.—ज्या ठिकाणीं कौरव पांडवांचें भारतीय युद्ध झालें तें या जिल्ह्याच्या वायव्य भागांत असून, या जिल्ह्याचा प्राचीन इतिहास 'कुरुक्षेत्र' लेखावरून समजेल. खिस्ती शकाच्या आरंभीं ह्या जिल्हा इंडोसिथियन लोकांच्या समाजांत असावा असें सरस्वती नदीच्या कांठीं पोलर येथें सांपडलेल्या नाण्यांवरून समजतें. इ. स. ६३९ त चिनी प्रवासी ह्युएनत्संग येथें आला त्यावेळीं ठाणेश्वर ही एका राज्याची राजधानी असून तें राज्य भरभराटींत आहे असें त्यास आढळलें, इ. स.१०१४ त गझनीच्या महंमदानें ठाणेश्वर लुटलें. तथापि ११९२ त पृथ्वीराजाचा पराभव होईपर्यंत ह्या प्रदेश हिंदू राजांच्या अंमलाखालीं होता. दिल्लीवर चालून जातांना तैमूर या प्रदेशांतून गेला होता. पुढें येथें कांहीं सामन्त व त्यांच्या मागून लोदी राजांनीं राज्य केलें. तैमूर व अकबर यांच्या दरम्यानच्या १५० वर्षांच्या अवधींत या प्रदेशांत एकसारखें रण माजलें असून पानिपत येथें दोन महत्वाच्या लढाया झाल्या,ह्या जिल्हा मोंगलांच्या ताब्यांत गेल्यानंतर २०० वर्षे येथील शांततेचा विशेष भंग झाला नाहीं. या काळांत यमुनेचा कालवा तयार करण्यांत आला. १७३८ त कर्नाळजवळ नादिरशहानें महंमदशहाचा पराभव केला. इ. स. १७६१ मध्यें मराठे व अहमदशहा अबदाली यांच्यामधील पानिपतची तिसरी मोठी लढाई झाली. यापुढें १८०३ पर्यंत ( म्हणजे इंग्रजांनीं तो आपल्या राज्यास जोडीपर्यंत ) ह्या जिल्ह्यांत निश्चितपणें कोणाचीच सत्ता नव्हती. ह्या जिल्ह्यांतील मुख्य प्राचीन अवशेष कर्नाळ, पानिपत, ठाणेश्वर व पेहोव येथें आहेत.

लोकवस्ती—जिल्ह्यांत ७ मोठीं गांवें व १३८३ खेडीं असून एकंदर लो. सं. १९०१ त ८८३२२५, १९११ त ८०१०१३ व १९२१मध्यें८२८७२६ होती. लोकवस्तीपैकीं सुमारें७०हिंदु व शें. २७ मुसुलमान आहेत.शें.५८ शेतकीवर व शें. १९ औद्योगिक धंदे करून पोट भरतात. शें. ९६ लोक हिंदी भाषा बोलतात. पतियाळासभोंवतालच्या गांवांत पंजाबी भाषा चालते.

शेतकीः—गहूं व हरभरा हीं जिल्ह्यांतील मुख्य पिकें असून त्यांखेरीज तांदूळ, ज्वारी, मका, कापूस, ऊंस वगैरेहि पिकें होतात.

व्यापार व दळणवळण वगैरे.—कैथल तहसिलींतील कुंभार प्राचीन काळापासून नवसागर तयार करीत. या जिल्ह्यांत सोरा शुद्ध करण्याचे ४ कारखाने आहेत.

कर्नाळ येथील जोडे पूर्वी प्रसिद्ध असत. पानिपत येथें कांचेचे पोकळ गोळे, पितळेचीं व इतर धातूंचीं भांडीं आणि चांदीचें मणी होतात. शहाबाद येथें चांदीचें काम, वाद्यें व लाखेचें रोगण दिलेलें लांकडी काम होतें.

गहूं, हरभरा, चांगले तांदूळ, पितळेचीं भांडीं, कांचसामान, नवसागर व सोरा हे जिन्नस जिल्ह्यांतून बाहेर पाठविले जातात; व मीठ, तेल, लोखंड व कापड हे जिन्नस बाहेरून येतात.

या जिल्ह्यांतून दिल्ली–अंबाला–काल्का ही रेल्वे जाते व सदर्नपंजाब रेल्वेची एक शाखा कैठलपर्यंत आलेली आहे. यमुनेंतून व पश्चिम यमुना कालव्याच्या दिल्ली व हांसि या शाखांतून नावा चालतात.

राज्यकारभारः—कर्नाल, कैथल, पानिपत व ठाणेश्वर अशा या जिल्ह्यांत ४ तहसिली असून कैथल तहसिलींत गुल्ह ही पोटतहशील आहे. डेप्युटी कमिशनर ह्या जिल्ह्याचा मुख्य अधिकारी असून तो कर्नाळ येथें रहातो. कर्नाळ, पानिपत, कैथल, शहाबाद, ठाणेश्वर व लाद्व येथील म्युनिसिपालिटयांखेरीज इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हाबोर्डाकडे आहे. शिक्षणाच्या बाबतींत पंजाब प्रांतांत, कर्नाळ जिल्हा सर्वांत मागसलेला असून १९०१ मध्यें साक्षर लोकांचें प्रमाण केवळ शें. २.४ होतें.

ता लु का.—पंजाबांत कर्नाळ जिल्ह्यांतील मध्यतहशील. ही यमुनेच्या पश्चिम तीरावर आहे. क्षे. फ. ८३८ चौ. मै. लो. सं. (१९११) २२५७१७. या तहसिलींत कर्नाळ शहर ( जिल्ह्याचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण ) व दुसरीं ३८३ खेडीं आहेत.

श ह र.—पंजाबांतील कर्नाळ जिल्ह्याचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण. हें शहर यमुनेच्या हल्लींच्या प्रवाहापासून ७ मैलांवर जुन्या प्रवाहाकांठीं दिल्ली–अंबाला–काल्का रेल्वेवर आहे. हें आगगाडीनें मुंबईपासून १०५६ मैल, व कलकत्यापासून १०३० मैलांवर आहे. हें शहर अर्जुनाचा प्रतिस्पर्धी कर्ण यानें वसविलें असून त्याच्याच नांवावरून यास कर्नाळ हें नांव पडलें असावें असें म्हणतात. प्राचीन इतिहासांत या गांवाचा उल्लेख आढळत नाहीं. यावरून तें पूर्वी फार महत्वाचें नसावें असें दिसतें. इब्राहिम हुसेन मिर्झा यानें अकबराविरुद्ध बंड करून हें शहर लुटलें (१५७३). इ. स. १७०९ त बंड वैराग्यानें याच्या आसपासचा मुलुख उद्ध्वस्त केला; व १७३९ त, नादिरशाहानें येथें महमदशहाचा पराभव केला. सरहिंदच्या ऱ्हासानंतर (१७६३) झिंदचा राजा गजपतसिंग यानें हें शहर बळकाविलें. १७८७ त गजपतसिंगचा मुलगा भागसिंग याजकडून तें मराठयांनीं घेतलें व अखेर १८०५ त इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. गांवची हवा रोगट आहे. येथें घियासुद्दिनानें बुअली कलंदर नांवच्या साधूच्या स्मारकार्थ बांधलेलें सुंदर संगमरवरी दगडाचें थडगें आहे. म्युनिसिपालिटीचें वार्षिक उत्पन्न सरासरी ३२५०० असतें. येथें जाडेंभरडें कापड व चांगले जोडे तयार होतात. गांवांत दोन हायस्कुलें व इतर प्राथमिक शाळा व

एक सरकारी आणि एक ख्रिस्ती मिशनऱ्यांचें (स्त्रियाकरितां) अशीं दोन रुग्णालयें आहेत.

**कर्नाळा किल्ला**—मुंबई इलाख्यांत कुलाबा जिल्ह्यामध्यें पनवेल तालुक्यांतील एक डोंगर व किल्ला. हा पनवेलच्या दक्षिणेस ८ मैलांवर आहे. समुद्रसपाटीपासून उंची १५६० फूट. डोंगरावर एक वरचा व एक खालचा असे दोन किल्ले असून वरच्या किल्ल्यांत सुमारें १२५ फूट उंचीचा पांडूचा बुरुज नांवाचा स्तंभ आहे. डोंगराच्या नैर्ऋत्यभागाकडून मुंबई बंदर दिसतें.

देवगिरीचे यादव (१२४८–१३१८) व दौलताबादचें मुसलमानी घराणें (१३१८–३४७) यांच्या कारकीर्दींत उत्तर कोंकणांतलि मुख्य ठाणें म्हणून कर्नाळ्याला महत्व होतें. पुढें हा किल्ला निरनिराळ्या वेळीं मुसुलमान, पोर्तुगीज मराठे वगैरे लोकांनीं घेतला होता. १६७० त शिवाजीनें मोंगलांनां घालवून लवून हा किल्ला सर केला. परंतु त्याच्या मृत्यूनंतर तो औरंगजेबाच्या सैन्यानें काबीज केला. १७४० त तो पुन्हां मराठ्यांकडे आला व १८१८ त पेशव्यांच्या सर्व प्रदेशावरोबर इंग्रजी मुलुखास जोडण्यांत आला. हल्लीं तो अगदीं मोडकळीस आला आहे. किल्ल्यांत एक मराठी व एक फारशी असे दोन शिलालेख आहेत. मराठी लेखांत मालुजी गंभीरराव ठाणदार हें नांव आढळतें व फारशींत 'सय्यद नुरुद्दिन महंमदखान हिजरी ११४६ '(इ. स. १७३५) असें नांव आहे.

**कर्नाळी**—बडोदें संस्थानांत बडोदें प्रांतांतील खेडें हें नर्मदा व ओरसंग नद्यांच्या संगमावर नर्मदेच्या उजव्या तीराला आहे. लो. सं. (१९०१) ११२६. येथें दरवर्षी पुष्कळ यात्रेकरू येत असतात.

**कर्नूल, जिल्हा.**—मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ७५८० चौ. मैल आहे. याच्या उत्तरेस तुंगभद्रा व कृष्णा या नद्या, ईशान्येस गंतूर जिल्हा, पूर्वेस नेलोर जिल्हा, दक्षिणेस कडाप्पा व अनंतपूर जिल्हे, पश्चिमेस बल्लारी जिल्हा. तुंगभद्रा व कृष्णा या मुख्य नद्या जिल्ह्यांत असून यांनां मिळणाऱ्या लहान नद्या पुष्कळ आहेत. यांतील मुख्य गुंदलकम्मा ही असून गुंदला ब्रह्मेश्वरम् येथें तिचा उगम होऊन ती कंबम् जवळून वहात जाते. या ठिकाणीं तिला धरण बांधून एक तलाव १५ चौ. मैलाचा केलेला आहे. पश्चिमेकडे हिंदरी नांवाची नदी पट्टीकोंड तालुक्यांत उगम पावून कर्नूल शहराजवळ तुंगभद्रेला मिळते.

नल्लमलाय जंगल २००० चौ. मैल क्षेत्रफळाचें आहे. एकंदर इलाख्यांत या जंगलासारखें रम्य जंगल दुसरीकडे क्वचित आढळेल. यांत झाडें अनेक प्रकारचीं आहेत. कित्येक झाडांपासून तंतू निघतात, कित्येकांच्या तळाशीं मोठें कंद लागतात. साग, बिवळा वगैरे इमारतींचें लांकूड मुबलक सांपडतें. त्याचप्रमाणें वन्यपशू वाघ, चित्ते, लांडगे वगैरे शिकारीस योग्य अशीं रानटी श्वापदें इतस्ततः भ्रमण करीत असतात. तुंगभद्रा व कृष्णा नदींत वरेच जलचर प्राणी व मासे आहेत.

कर्नूलची हवा निरोगी म्हणतां येत नाहीं. एप्रिल, मे महिन्यांत पारा ११२° अंशापर्यंत असतो. नववर महिन्यांत उष्णमान ६७° अंशापर्यंत उतरतें. पावसाची सुरवात जून महिन्यांत होऊन सप्टेंबर महिन्यांत अखेर होते. हिंवतापाची सांथ बहुधा सर्वत्र असून नारू व पानथरीची वाढ यांच्यामुळें पुष्कळ लोक आजारी असतात. पाऊस थोडा व अनियमितपणें पडतो. यामुळें दुष्काळ वारंवार पडतो. एकंदर दरसाल पावसाचें मान २६ इंच असतें. नद्यांनां पूर, तुफान व वादळें हीं अर्थात कमी प्रमाणांवर असतात. १८५१ सालीं तुंगभद्रेला मोठा पूर येऊन फार नुकसानी झाली होती. त्यावेळीं कर्नूल शहराचा थोडा भाग वाहून गेला होता.

**इतिहास.**—विजयानगरच्या राजानें कर्नूल आपल्या अमलांत आणण्यापूर्वीचा याचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं असें म्हटलें तरी चालेल. परंतु कर्नूलवर चालुक्यांचें, चोलांचें व वारंगळच्या गणपतींचें आधिपत्य असावें. १६ व्या शतकांत विजयनगरच्या कृष्णदेवरायानें कर्नूल आपल्या राज्यास जोडिलें. १५६५ सालीं तालिकोटच्या लढाईनंतर विजयानगरचा ऱ्हास झाल्यावर कर्नूल गोवळकोंड्याच्या कुतुबशाही सुलतानाकडे गेलें. १६८७ मध्यें अवरंगझेब दक्षिणेंत मराठ्यांच्या समाचाराकरितां आला होता. त्याचा पठाण सरदार ग्यासुद्दीन यानें कर्नूल हस्तगत केलें. पुढें दाऊदखानला कर्नूल जहागीर मिळली. १७४१ मध्यें मराठ्यांनीं कर्नूलवर फार धुंडगिरी चालविली. १७५५ सालीं हैदरअल्लीनें कर्नूलवर निशाण लाविलें व १७९९ च्या सुमारास टिपूच्या मरणानंतर कर्नूल जिल्हा निझामसरकाराकडे गेला व १८०० मध्यें निझामानें तो इंग्रजांनां दिला. परंतु त्यांनीं कर्नूलच्या नवाबापासून १ लक्ष रुपये खंडणी घेऊन तो जिल्हा नवाबाकडे ठेविला. पुढें १८१६ मध्यें पेंढाऱ्यांनीं तो लुटला. १८३८ मध्यें शेवटचा नवाब गुलाम रसूलखान नांवाचा होता. त्याजवर 'कांहीं तोहमत येऊन त्याला त्रिचनापल्लीस तुरुंगांत ठेविलें. त्याच्या नोकरानें त्याला तुरुंगांत ठार मारिलें. तेव्हां नवाबाला कांहीं पेनशन ठरवून देऊन सर्व प्रांत इंग्रज राज्याला जोडला गेला. १८४६ त पदच्युत पाळेगाराच्या वंशांतील एका पुरुषानें थोडीशी चळवळ केली परंतु त्याला लवकरच पकडून सार्वजनिक रीत्या फांशीं देण्यांत आलें.

**लोकवस्ती.**—कर्नूल जिल्ह्यांत तीन शहरें व ७५१ खेडीं आहेत. त्याचे ८ तालुके आहेत. त्यांचीं नांवें मार्कापूर, कंबम्, नंदीकोटूर, रामल्लकोट, पट्टीकोंड, नंदयाल, सिरव्हेल, व कोइलकुंटल हीं होत. जिल्ह्याची लोकसंख्या १९२१ सालीं ९१४८९० होती.

**शेतकी.**—सबंध जिल्ह्याची जमीन लाल अथवा काळसर आहे व जमीनीचा मगदूर सामान्यच आहे. नदीच्या कांठीं

विहिरी खणून बागाईत करतात. सबंध जिल्ह्यांत रयतवारी पद्धत आहे. जमीनदारी कर्नूल जिल्ह्यांत फारशी नाहीं. कर्नूल कडाप्पा कालवा जरी थेट जिल्ह्यांतून सरसहा आहे तरी पिकामध्यें अद्यापि सुधारणा दिसून येत नाहीं. लोकांची प्रवृत्ति जुन्या पद्धतीला नेहमीं धरून असते याकरितां इंग्रजी यंत्रें व अवजारें शेतकऱ्यांनीं उपयोगांत आणावीं म्हणून ठिकठिकाणीं ठेवलीं आहेत. तथापि त्यांचा उपयोग शेतकरी लोक अद्यापि फारसा करून घेत नाहींत व सरकारकडून कर्जेहि घेत नाहींत. एकंदर क्षेत्रफळांत शेंकडा ३४ जंगल असून, कोरा व चोलम् हीं मुख्य धान्यें होत.

घोड्याकरितां हरबरा पुष्कळ पेरतात. तांदूळ फारसा पेरीत नाहींत. गळिताचीं धान्यें २१७ चौ. मै. च्या क्षेत्रांत असून १२८ चौ. मै. त तांदूळ पेरतात. कापसाकडे ४३० चौ. मैलांचें क्षेत्र असतें. बागाइत फारसें नाहीं. या जिल्ह्यांत गुरें चांगलीं नसतात.

जंगलः—या जिल्ह्यांतील जंगल मात्र विस्ताराच्या मानानें महत्त्वाचें आहे. १९०३–४ सालीं २६४९ चौ. मै. क्षेत्रफळाचें जंगल असून फक्त नल्लमलायमध्यें २००० क्षेत्रफळ होतें. मद्रास सदर्नमराठा रेल्वेला सरपणाचा पुरवठा याच जंगलांतून विशेषतः होतो. साग वगैरे इमारतीचें लांकूड पुष्कळ निघतें व तें बाहेर गांवीं पाठवितात. चंदनहि उत्पन्न होतें. पण कोइमतूर व मद्रासच्या इतकें तें सुवासिक नसतें. वांबू विपुल होतात. खानिज पदार्थांत लोखंड मुख्य आहे.. गनी जंगलांत सांपडणारें लोखंड उत्तम प्रकारचें समजलें जातें. रुद्रावरम् येथें लोखंड वितळण्याच्या भट्ट्यांचें मुख्य ठिकाण आहे. येथील लोखंडाचीं नांगर आदिकरून शेतकीचीं हत्यारें मुख्यत्वेंकरून करतात. गनी जंगलांत पूर्वीं तांबें निघत असे. गाझलंपल्ली येथें शिसें सांपडतें. रामल्लकोट व बंगमपल्लीला पूर्वी हिरे सांपडत होते. सध्यां कर्नूल जिल्ह्यांत मोठा महत्त्वाचा उद्योग म्हटला तर कापूस हा होय. हातमागांवर कापसाचें जाडेभरडें कापड निघतें व गिरणींत बारीक कापड काढतात. कर्नूल व कंबम् येथें सतरंज्या उत्तम प्रकारच्या तयार होतात. नंदियाल व कर्नूल येथें कापूस दाबण्याचे प्रेस असून रबर उत्पन्न करण्याचीं झाडें नुकतीच यूरोपियनांच्या देखरेखीखालीं कर्नूलास लावण्यांत आलीं आहेत. चामड्याला रंग देण्याचे कारखाने अलीकडे निघालेले आहेत.

व्यापारदृष्ट्या कर्नूल फारसें महत्वाचें नाहीं. बाहेर जाणाऱ्या मुख्य जिन्नसांत, कापूस, तंबाखू, तूप, गोंद, मध, कलिंगडें, गळिताचीं धान्यें, नील, कांदे, साग, घोंगड्या, सुती कापड आणि सतरंज्या यांचा समावेश होतो. बाहेरून येणारे पदार्थ विलायती कापड, मीठ, सुपारी, नारळ, साखर, तांब्यापितळेचीं भांडीं, गुरें, मसाले हे होत.

मद्राससदर्नमराठा रेल्वे पत्तिकोंड तालुक्याच्या पश्चिमेस, कर्नूल जिल्ह्यांत येत असून पश्चिमेपासून पूर्वेस कंबमला जाऊन नंतर उत्तरेस वळली आहे. १८८७ सालीं वरील रेल्वे सुरू होऊन नंदपाल स्टेशन व्यापाराला मोकळें झालें. कर्नूल जिल्ह्यांत पक्क्या सडकांची लांबी ५४७ मैल असून कच्च्या सडका १७१ मैल आहेत.

राज्यव्यवस्थाः—कर्नूल जिल्ह्याचे चार पोटविभाग केलेले असून प्रत्येक पोटविभागावर अ. कलेक्टर अधिकारी असतो. याशिवाय मामुली जिल्ह्याकरितां जितके कामदार असतात तितके आहेत. जंगल कान्सरव्हेटरचें ऑफीस येथें असून कर्नूल कडाप्पा कालव्याचा मुख्य देखरेख करणारा अंमलदार कर्नुलास राहतो.

मद्रास इलाख्यातील २२ जिल्ह्यांमध्यें कर्नूलाचा शिक्षणाच्या बाबतींत १९ वा नंबर लागतो. कर्नूल व नंदपाल येथें इंग्रजी शाळा असून सरकारला शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च इ. स. १९०३–४ सालीं ९२,५०० आला होता.

पो ट वि भा ग.—मद्रास. कर्नूल जिल्ह्यांतील एक पोटविभाग. क्षे. फ. ६४०. चौ. मै. लो. सं.( १९११) १११२२७.

गां व.—मद्रास इलाखा. कर्नूल जिल्हा व पोटविभागाचें मुख्य शहर. हें तुंगभद्रा व हिंदरी या दोन नद्यांच्या संगमावर कर्नूलरोड स्टेशनापासून ३३ मैल लांब असून येथून मद्रास ३५० मैल दूर आहे. १९२१ सालीं लो. सं. २७९०८ होती. टिपूवरील स्वारींत हरिपंत फडक्यांचा मुक्काम येथें होता ( रा. खं. १०. २८७ ). येथील किल्ला विजयानगरच्या कृष्णदेव राजाचा मुलगा अच्युतराय यानें बांधलेला होता. त्याचा बराच भाग पडला असून शेष असलेल्या भागांत पोलिस खात्याचा कांहीं दारु गोळा असतो. हिंदरी नदीच्या तीरावर अबदुल वाहाब नांवाच्या सुभेदाराचें थडगें आहे. कर्नूल हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून येथें जिल्हाकामगारांच्या सर्व कचेऱ्या आहेत. पाण्याचा पुरवठा झाल्यानंतर कर्नूलची हवा कांहींशी सुधारली आहे. १८६६ सालीं कर्नूल येथें म्यु. कमिटी स्थापन झाली. तिचें १९०३-०४ सालीं उत्पन्न व खर्च हीं अनुक्रमें १७,००० व ५१,५००रु.होतें. १८९७ सालीं २॥ लक्ष रु. खर्च करून शहराला पाण्याचा पुरवठा केला. येथें कापूस दाबण्याचे प्रेस असून सतरंज्या व हातमागांवर सुती कापड तयार होतें. एका मुसुलमानानें चामड्याचा कारखाना सुरू केला आहे. सरकी काढण्याचे कारखाने चार पांच आहेत. प्राथमिक शाळांखेरीज दोन हायस्कुलें व ट्रेनिंग शाळा आहेत.

**कर्नूळ–कडाप्पा कालवा**—मद्रास इलाख्यांतील हा मोठा कालवा असून कर्नूल शहरापासून वर १७ मैलांवर तुंगभद्रा नदीवर आहे. हा कालवा कर्नूल व कडाप्पा जिल्ह्यांतून १९० मैल वहात जाऊन कडाप्पा शहरापर्यंत गेलेला आहे. 'मद्रास इरिगेशन कॅनाल कंपनी' मद्रास येथें स्थापन झालेली होती. तिनें या कालव्याचें काम पूर्ण केलें. कालव्याचें काम व्हावें तसें न होतां खर्च मात्र पुष्कळ झाला. भांडवल सर्व संपून गेलें; तरी कालव्याचें काम

पूर्ण झालें नाहीं. पुन्हां सरकारची मदत घ्यावी लागली. कंपनीनें ती घेऊन कालव्याचें काम चालविलें. रकम सर्व खर्च होऊन गेली तरी कालवा अपूर्ण राहिला. अखेरीस कालवा कसा तरी आटोपून उत्पन्नाची वाव सुरू केली. परंतु मुळांत सर्व दोष असल्यामुळें उत्पन्नांतहि कालव्याची बाजू लंगडी पडली. ही चूक दुरुस्त करून पोटकालवा करण्याबद्दल प्रयत्न सुरू आहेत. दुष्काळांत पाऊस कमी पडला म्हणजे या कालव्याचा उपयोग बराच होतो.

कर्ब—कर्ब हें एक अधातुरूप द्रव्य आहे (परमाणु भारांक १२). तें स्वाभाविकरीत्या, हिरा, ग्राफाईट, प्राणी व वनस्पती यांचे पेशीजाल, दगडी कोळसा आणि पेट्रोलियम यांचा घटक या रूपानें आढळतें. खडू, संगमरवरी दगड, डेलोमाइट, खटकर्बित, (कॅल्साइट), चुनखडी, विदराइट, जशदकर्बित वस्पाथिक आयर्न वगैरे खनिज पदार्थांतहि कर्ब हा घटक असतो. हवेंतहि कर्बद्विप्राणिदाच्या रूपानें (कार्बन डायॉक्साइड) याचें अस्तित्व असतें. कर्ब हा घनरूप पदार्थ असून तो भिन्न भिन्न भौतिक गुणधर्म असलेल्या निरनिराळ्या स्वरूपांत आढळतो. अस्फटिक स्वरूपांत कर्ब हा कर्बसंयुक्त पदार्थांचा विध्वंसक आभिषव केला असतां मिळतो. त्याचे मुख्य प्रकार म्हणजे दिव्याची काजळी, दिव्याचा धूर, लांकडाचा कोळसा, हाडांचा कोळसा व कोक हे होत. अपुऱ्या हवेंत डांबर, राळ, टरपेंटाईन व दुसरे कर्बयुक्त पदार्थ जाळले असतां काजळी तयार होते; ज्वलनानंतर उत्पन्न झालेले पदार्थ एका खोलींत टांगून ठेवलेल्या कापडावर जाऊन बसतात. काजळी आणखी शुद्ध करण्याकरितां बंद भांड्यांत तापविली जाते. छापण्याची शाई व काळा रंग तयार करण्याकरितां आणि चित्रें करण्याकरितां काजळीचा उपयोग होतो. दिवे लावण्याचा धूर (ग्यास) उत्पन्न करण्याच्या कारखान्यांत दगडी कोळशाच्या विध्वंसक अभिषवापासून दिव्याचा धूर मिळतो. तो चांगला उष्णता व विद्युद्वाहक असून विजेच्या तीव्र प्रकाशाच्या दिव्याला लागणाऱ्या कर्बशलाका व बन्सनच्या विद्युद्घटांतील ऋणद्रव्य तयार करण्याकरितां त्याचा उपयोग केला जातो.

कोळसा हा कर्बचा एक सछिद्र प्रकार असून त्याचे पुष्कळ प्रकार आहेत. साखरेच्या कर्बनीकरणापासून साखरेचा कोळसा मिळतो. त्यांतील खनिज द्रव्यें काढून तो शुद्ध करण्याकरितां प्रथम अम्लांबरोबर उकळतात व नंतर त्यांतील उज्ज काढण्याकरितां हरच्या प्रवाहांत तापवितात. लोखंडी तोटीच्या भांड्यांत-ऊर्ध्वपातनयंत्रांत-(रिटॉर्ट)हाडांस उष्णता दिली असतां हाडांचा कोळसा बनतो. तो फार अशुद्ध असून त्यांत खटस्फुरिताचें प्रमाण सरासरी शेंकडा ८० असतें. लांकडी कोळशापेक्षां ह्या कोळशाच्या अंगीं विवर्ण करण्याची शक्ति व शोधनशक्ति जास्त असते. लांकडी कोळसा हा कठिण व ठिसूळ असा काळा पदार्थ आहे. तो तयार करण्याकरितां लांकडाचा ढीग करून त्यावर माती किंवा गवत घालून तो ढीग हळू हळू जळूं देतात. जळतांना हवा पुरेशी देत नाहींत व जळण्याची क्रिया वरून खालीं आणि बाहेरून आंत अशी चालते. ह्या कृतींत असा एक दोष आहे कीं दारिन काष्ठकें (पायरोलिग्निअस), अम्ल या सारखे आड उत्पन्नाचे पदार्थ फुकट जातात; याकरितां कधीं कधीं लांकूड ऊर्ध्वपातन यंत्रांत घालून उष्ण करितात व त्यांतून निघणारे बाष्पमय पदार्थ थंड होऊन थिजल्यानंतर उपयोगांत आणतात.

लांकडाचा प्रकार व तयार करण्याची कृती यांवर कोळशाचे गुणधर्म अवलंबून असतात. ३००° श उष्णमान ठेवून तयार केलेला असल्यास तो मऊ व ठिसूळ असून लवकर पेट घेतो व जास्त उष्णमान ठेवून कोळसा तयार केलेला असल्यास तो घट्ट असून लवकर पेट घेत नाहीं. कोळसा हवेंत जळतांना त्याला सहसा ज्वाला नसते. त्याच्या अंगीं वायु शोषण करण्याची विलक्षण शक्ति आहे. त्याच्या घनफळाच्या १७१.७ पट अम्न (अमोनिया), ८६.३ पट नत्रसप्राणिद ६७.७ पट कर्बएकप्राणिद, २१.२ पट कर्ब द्विप्राणिद १७.९ पट प्राण, १५.२ पट नत्र व ४.४ पट उज्ज याप्रमाणें निरनिराळे वायू शोषण केले जातात. उज्ज, प्लव प्राण, नत्रस पदार्थ, सिकितें: (सिलिकॉन) वगैरेशीं कर्बचा संयोग होऊन निरनिराळे संयुक्त पदार्थ बनतात. कर्बची विशिष्ट उष्णता उष्णमानाप्रमाणें बदलते.

संयुक्त पदार्थ.—कर्बचीं तीन प्राणिदें, प्रसिद्ध आहेत. ती कर्बअधिप्राणिद (कार्बन सब ऑक्साइड) कर्बएकप्राणिद (कार्बन मानॉक्साइड)व कर्ब द्विप्राणिद हीं होत. त्यांपैकीं पहिलें वर्णहीन व वायुरूप असून त्याच्या वासानें गुदमरल्यासारखें होतें. हा चांगला क्रियाकारक पदार्थ असून त्याचा पाणी, उदहराम्ल व अम्न यांशीं संयोग झाला असतां अनुक्रमें मेलॉनिकाम्ल, मेलॉनिल हरिद व मेलॉनमाइड हे पदार्थ बनतात.

कर्बएकप्राणिदः—हें थोड्या प्रमाणांत ज्वालामुखीपासून निघालेल्या वायूमध्यें आढळतें.तांबड्या लाल कर्बांवरून किंवा लोखंडावरून कर्बद्विप्राणिद नेलें असता, जस्ताची भुकटी किंवा लोह याबरोबर कर्बित तापविले असतां किंवा कित्येक धातूंचीं प्राणिदें कर्बांबरोबर तापविलीं असतां हा वायु मिळतो. तो वर्णहीन व :वासरहित असून त्याचें विशिष्ट गुरुत्व ०.९६७ (हवा = १) आहे. हा वायु द्रवरूप करण्यास फार कठिण असतो. तो पाण्यांत फारच अल्प प्रमाणांत द्रवतो. तो जळला असतां कर्बद्विप्राणिद बनतें. त्याच्या ज्वालेचा रंग फिकट निळा असतो. तो अत्यंत विषारी व बलवान क्रियाकारक आहे.

कर्बद्विप्राणिदः—चुनखडी व दुसऱ्या कित्येक खनिज पदार्थांत कर्बद्विप्राणिद हा एक घटक असतो. मुबलक हवेंत किंवा प्राणवायूंत कर्ब जाळला असतां व उष्णतेनें अगर खनिज अम्लांच्या योगानें कर्बितांचें पृथक्करण केल्यास हें प्राणिद

मिळतें. कुजण्याची जळण्याची व श्वासोच्छ्वासाची क्रिया सुरू असतांहि तें होतें.

कर्बद्विप्राणिद हा वर्णहीन वायु आहे. त्याला थोडासा तिखट वास व आंबट चव असते. तो स्वतः अदाह्य असून त्यांत इतर पदार्थहि जळत नाहींत. परंतु पुष्कळ तापविलेले अल्क धातू व मग्न हे मात्र त्यांत जळतात; व त्या योगानें प्राणिद तयार होऊन कर्ब हा स्वतंत्र होतो. त्याचे विशिष्ट गुरुत्व १. ५२९ आहे. ( हवा = १ ) ०° अंशावर ३५ वातावरणांचा दाव लाविला असतां तो द्रवरूप होतो. त्या स्थितींत तें–७८. २° ला उकळतें व पुढें–६५° सेंटिग्रेडला घन होतें.

हा वायु पाण्यांत कांहीं प्रमाणांत द्रवतो. दाहक अल्कलीच्या द्रावणांत त्याचें लवकर शोषण होऊन अल्कलीकर्बित तयार होतात. चुन्याच्या निवळींत हा वायु मिळविल्यास पांढरा सांका रहातो. त्यावरून या वायूचें अस्तित्व कळून येतें. पुष्कळ तापविल्यानें याचें पृथक्करण होऊन कर्बएकप्राणिद व प्राण हे वायू मिळतात. सोडा, साखर, सोडावॉटर, लेमोनेड वगैरे पेयें व कृत्रिम बर्फ तयार करण्याच्या कारखान्यांत हा वायु उपयोगांत आणिला जातो.

उत्कर्व.—उत्कर्व म्हणजे कर्ब व उज्ज यांच्या रासायनिक संयोगानें झालेले संयुक्त पदार्थ. हे सृष्टीमध्यें असंयुक्त स्थितींत पुष्कळ आढळतात; उदाहरणार्थ अनूपवायु ( मार्शगॅस ), राकेल, राकेल तेलाचें मेण ( पॅराफिन ) वगैरे पदार्थ हे फक्त कर्ब व उज्ज यांचेच संयुक्त पदार्थ होत. याशिवाय रबर, तर्पिन्तिन, ( टर्पेंटाइन ) व दुसरीं कांहीं सुगंधी तेलें या सृष्ट पदार्थांपासून उत्कर्व उत्पन्न होतात. विच्छिन्नकिरणदर्शक यंत्राच्या योगानें या उत्कर्वांचें अस्तित्व, तारे, शेंडेनक्षत्र व सूर्य यांवरहि असल्याचें आढळून आलें आहे.

हे उत्कर्व कृत्रिम रीतीनें तयार करण्याचा सोपा व यशस्वी मार्ग म्हटला म्हणजे पुष्कळ उद्भिज सेंद्रिय पदार्थांचें शुष्कपातन करणें हा होय. अगदीं नेहमींच्या प्रचारांतलें उदाहरण म्हणजे दगडी कोळशाचें शुष्कपातन ( ड्रायडिस्टिलेशन ) हें होय. यापासून धुराच्या दिव्याचा धूर ( लायटिंग गॅस ) तयार होतो; त्यांत वायुरूप उत्कर्व असून शिवाय कोळशाचें डामर असतें. या डामराचें आंशिक पातन ( फ्रॅक्शनल डिस्टिलेशन ) केलें म्हणजे त्यापासून रसरूप व घनरूप असे पुष्कळ प्रकारचे उत्कर्व तयार होतात. हे सर्व औद्योगिकदृष्ट्या अत्यंत महत्वाचे पदार्थ असतात. रसायनशास्त्राच्या दृष्टीनें उत्कर्व हे मूलभूत महत्वाचे पदार्थ आहेत.

उत्कर्व हे उज्ज व कर्ब यांचे संयुक्त पदार्थ आहेत. यामुळें त्यांच्या घटनेंत या मूलद्रव्यांशिवाय अन्य मूलद्रव्यें नसतात. उत्कर्वांशिवाय इतर सेंद्रिय संयुक्त पदार्थ उत्कर्वांपासूनच निघालेले आहेत असें तात्विकदृष्ट्या समजतात.

कर्बचे परमाणू ज्या रीतीनें संयोग पावलेले असतात त्यावरून मुख्यत्वें कर्बच्या संयुक्त पदार्थांचे वर्ग पाडतात. उत्कर्वांचे मुख्य दोन वर्ग कल्पिले आहेत. ( १ ) चर्बी वर्ग ( पॅराफिन वर्ग ) व ( २ ) ऊदीन वर्ग ( बेंझीन वर्ग ).

( १ ) चर्बीवर्गांतील उत्कर्वः—प्राणि व वनस्पति यांच्या चर्बीमध्यें व चर्बीच्या अम्लांत या वर्गांतील बरेच पदार्थ आढळतात. नत्राम्ल व हराम्ल यांसारख्या तीव्र प्राणिदीकरण ( ऑक्सिडेशन ) करणाऱ्या पदार्थांचें या वर्गांतील उत्कर्वांवर कांहीं रासायनिक कार्य होत नाहीं. म्हणजे त्यांच्या अंगीं रासायनिक स्नेह–स्निग्धता नाहीं. म्हणून यास अ-स्निग्ध असें नांव दिलें आहे. या वर्गास इंग्रजी नांव पॅराफिन असें आहे. व याचा अर्थ "रसायनाकर्षणापलीकडचा" असा होतो. या वर्गाचे पोटवर्ग कर्बपरमाणूंच्या संख्येवरून करतात. शिवाय संतृप्त व असंतृप्त असेहि दोन मुख्य पोटवर्ग कल्पितातः—

संतृप्त उत्कर्व साधारण लक्षणें-कर्ब चतुमूर्ल्य असल्यानें कर्बचा एक परमाणु उज्जच्या जास्तींत जास्त म्हणजे चार परमाणूंशीं संयोग पावूं शकतो. यामुळें या वर्गांतील अगदीं पहिला व साधा उत्कर्व $कउ_{४}$ हा होय. यास अनूपवायु ( मार्शगॅस पहा ) असें नांव आहे. सेंद्रिय रसायनशास्त्रांत यास मिथुन ( इंग्रजी मिथेन ) असें नांव आहे.

या वर्गांतील सर्व उत्कर्व मिथुनपासूनच निघाले आहेत. त्यांची घटनासारणी $क_{सं} उ_{२सं+२}$ अशी आहे.

या वर्गांतील उत्कर्वांचीं नांवें खालीं दिलीं आहेतः—

| मराठी | इंग्रजी | सारणी |
|---|---|---|
| मिथुन | मिथेन | $कउ_{४}$ |
| इथुन | इथेन | $क_{२}उ_{६}$ |
| मेदुन | प्रोपेन | $क_{३}उ_{८}$ |
| वैधेयिदधुन | नॉर्मल बुटेन | $क_{४}उ_{१०}$ |
| तुल्य दधुन | इसो बुटेन | |
| वैधेयिक पंचुन | नार्मल पिन्टेन | $क_{५}उ_{१२}$ |
| द्विमिथिल इथिल मिथुन किंवा तुल्य पंचुन | डायमेथिल एथिल मिथेन किंवा इसोपिन्टेन | ,, |
| चतुर्मिथिल नवपंचुन | टेट्रामेथिल मिथेन निओ पिन्टेन | ,, ,, |

सदरहु उत्कर्वांचे रसांक ( मेल्टिंग पॉइंट ) उत्क्वथनांक ( बायलिंग पॉइंट ) व विशिष्ट गुरुत्व माहीत असणें अत्यावश्यक असल्यानें खालीं दिले आहेतः—

| म. नांव | रसांक | उत्क्वथनांक | वि. गु. |
|---|---|---|---|
| मथुन | –१८६° श | –१६४° श | .४१५ उ.अ. वर |
| इथुन | –१७२° श | – ९०° श | .४४६ ०° शवर |
| मेदुन | ... ... | – ३८° श | .५३६ ०° शवर |
| वैधेयिक दधुन | ... ... | + १° श | .६०० ०° शवर |

| म. नांव | रसांक | उत्क्वथनांक | वि. गु |
|---|---|---|---|
| तुल्य दथुन | ... ... | −१७° श | ... ... |
| वैधेयिक पंचुन | ... ... | ×३६°श. | .६३३ १५°शवर |
| द्विमथिल इथिल मथन वा तुल्य पंचुन | ... ... | +२८°श | .६२७ „ |
| चतुर्मथिल मथन वा नव पंचुन | ... ... ... | ... +१०°श ... | ... „ ... |
| वैधेथिक षड्डुन | ... ... | ६९°श | .६७७ ०°शवर |

या श्रेढींतील प्रत्येक पद कउ$_{२}$ यासारख्या अंतरानें वाढत गेलें आहे; म्हणून यास समपदांतर श्रेढी असें म्हणतात. यांतील पदें केवळ घटनेनें मात्र सारखीं आहेत असें नसून त्यांच्या रासायनिक क्रियांत व भौतिक धर्मांतहि कांहीं साम्य आहे. हे सर्व पाण्यांत बहुतेक अविद्राव्य आहेत. पहिले चार दथुनपर्यंत वायुरूप असून अल्कहल व इथ्र यांत विद्राव्य आहेत. पंचुन व त्यापुढील उत्कर्ब रंगहीन रसरूप असतात. हे पाण्यांत अविद्राव्य परंतु अल्कहल व इथ्र यांत मिसळतात. यांचे उत्क्वथनांक व वि. गुरुत्व कर्बच्या परमाणू संख्येप्रमाणें वाढत जातात. कर्बच्या परमाणूंची संख्या १६ पर्यंत वाढली म्हणजे उत्कर्ब साधारण उष्णमानावर घन असतात. हे अल्कहलांत व इथ्रांत विद्राव्य असून पृथग्भवन न पावतां कढतात. उत्क्वथनांक अणुगुरुत्वाप्रमाणें वाढतात, तसेंच रसांकहि क्रमानें वाढतात.

हे उत्कर्ब पाण्यापेक्षां हलके असल्यानें त्यावर तरतात. हलक्या प्रतीचे व वाष्पभावी जे उत्कर्ब असतात त्यांस एक प्रकारचा वास असतो. त्यांस असह्य असा वाईट वास नसतो.

या मथुन वर्गाच्या उत्कर्बांस अस्निग्ध ( पॅराफिन ) असें नांव दिलें आहे. हें नांव देण्याचीं दोन कारणें आहेत. बाजारी "पॅराफिन" नांवाचा जो पदार्थ आहे तो या वर्गांतील वरच्या उत्कर्बांच्या मिश्रणापासून झालेला आहे. शिवाय या उत्कर्बांच्या अंगीं रासायनिक स्नेह-स्निग्धता नसल्यानें त्यांच्या अंगी अतृप्तमूल्यत्व शक्ति नसते. यामुळें दुसऱ्या पदार्थांचे अणू या उत्कर्बांच्या अणूंशीं संयुक्त होऊं शकत नाहींत. या धर्मावरून या वर्गांतील उत्कर्बांस "संतृप्त" असें म्हणतात. उत्कर्बांवर केलेल्या प्रयोगांवरून असा अनुभव आला आहे कीं कोणत्याहि उत्कर्बापासून त्यांतील उज्जचें निःसारण झाल्याशिवाय नवा पदार्थ तयार होणें अगदीं अशक्य आहे. उदाहरणार्थ, कर्बएकप्राणिदा (कप्र) वर हरची ( क्लोरिनची ) क्रिया केली म्हणजे त्यापासून कर्बिलहरिद या नांवाचा पदार्थ तयार होतो तो असा:—



कर्बएकप्राणिद (कप्र) + हर (ह$_{२}$) = कर्बिलहरिद (कप्र. ह$_{२}$)

या स्थळीं कर्बएकप्राणिदाचा एक अणु हरच्या एका अणूशीं संयुक्त होतो व ही संयुक्त होण्याची क्रिया होत असतांना दोन्ही पदार्थांच्या अणूंतील कोणताहि भाग निराळा होत नाहीं. दोन्ही अणू अविभक्त स्थितींत एकमेकांशीं रासायनिक दृष्ट्या संयुक्त होतात. अशा रीतीनें अणु-अविभक्त स्थितींत-संयुक्त होऊन जे पदार्थ तयार होतात त्यांस आसक्त पदार्थ असें म्हणतात. परंतु हरची क्रिया उत्कर्बांवर केली असतां त्याप्रमाणें घडत नाहीं. हरचा व उत्कर्बाचा अणु असे दोन्ही विभक्त होऊन नंतर संयुक्त होतात. यामुळें उत्कर्बांतील असंयुक्त झालेला उज्ज परमाणु व हरमधील असंयुक्त झालेला परमाणु हे संयुक्त होऊन उद्हराम्ल उद्भूत होतें. उदाहरणार्थ मथुन ( मिथेन ) वर हरची क्रिया केली असतां जी क्रिया होते ती खालीं दाखविली आहे:—



मथुन (कउ$_{४}$) + हर (ह$_{२}$) = एकहरमथुन (मथिलहरिद) (कउ$_{३}$ह) + उद्धराम्ल (उह)

याची कर्बएकप्राणिदाप्रमाणें अविभक्त क्रिया होत नाहीं. जसें:—कउ$_{४}$ +ह$_{२}$ = कउ$_{४}$. ह$_{२}$.

यावरून ध्यानांत येईल कीं, उत्कर्ब-जशाचें तसें-अविभक्त स्थितींत हरशीं संयुक्त होत नाहीं. व तें संयोग होतांना उद्धराम्ल उद्भूत होतें व नवा पदार्थ कउ$_{३}$ह हा आदिष्ट पदार्थ बनतो.

स्तंभ ( ब्रोमिन ) किंवा गंधकाम्ल यांचेंहि उत्कर्बांवर हरसमानच रासायनिक कार्य होतें. तीव्र नत्राम्लाचें साधारण उष्णमानांत यावर कार्य घडत नाहीं. तसेंच तीव्र नत्राम्ल व गंधकाम्ल यांच्या मिश्रणाचेंहि कार्य घडत नाहीं. पालाश-द्विक्रमित (पोटॅशिअम ब्रायक्रोमेट) व पालाश परिमंगलित ( पोटॅशिअम परम्यांगनेट ) या शक्तिमान प्राणिदीकरण ( ऑक्सिडाइज ) करणाऱ्या पदार्थांचेंहि यावर थंडपणीं कार्य होत नाहीं. मात्र यांबरोबर उकळल्यास कर्बद्विप्राणिद व पाणी हे पदार्थ बनतात. स्तंभ याचें यावर कार्य घडल्यास उत्कर्बांमधील उज्जच्या जागीं स्तंभचा परमाणू जाऊन हरप्रमाणें आदिष्ट पदार्थ बनतात. यामुळें यास संतृप्त ( पॅराफिन ) उत्कर्ब असें म्हणतात.

नांवें:—संतृप्त वर्गांतील जे उत्कर्ब आहेत त्यांची घटनासारणी $क_{सं}उ_{२सं+२}$ अशी असून त्यांची मालिका वर दिलीच आहे. या वर्गांतील उत्कर्बांच्या नांवाच्या शेवटीं उन हा प्रत्यय लाविलेला आहे. सदर उत्कर्बांचीं जीं इंग्रजी नांवें आहेत त्यांच्या शेवटीं एन हा प्रत्यय आहे.

वर दिलेल्या श्रेढींतील कांहीं पदांचीं नांवें दोन किंवा अधिक पदार्थ दर्शवितात. यांची अणुघटकसारणी तीच आहे; परंतु त्यांच्या परमाणूंचे समूह मात्र वेगळे वेगळे आहेत. यामुळें हे पदार्थ एकमेकांशीं तुल्यपरिमाणी आहेत म्हणजे तुल्यरूपी आहेत. यावरून यांस तुल्यरूपी पदार्थ असें म्हणतात.

मूलकें:—वरील समपदांतर श्रेढींतील पदार्थांच्या धर्मांमध्यें जें साम्य असतें त्याचें सकारण स्पष्टीकरण करण्याकरितां अशी कल्पना रसायनशास्त्रवेत्त्यांनीं बसविली आहे कीं प्रत्येक श्रेढींत एक परमाणूसमूह वेगळा होण्याजोगा असतो व त्याचें कार्य थेट मूलद्रव्याप्रमाणें होतें. म्हणजे हे परमाणूसमूह परस्परांशीं व दुसऱ्या मूलद्रव्यांशीं संयुक्त होऊं शकतात. तसेंच ते एका संयुक्त पदार्थांतून दुसऱ्या पदार्थांत अविकृत म्हणजे जशाचे तसे पृथग्भवन न पावतां दुसऱ्यांतील मूलद्रव्यांच्या किंवा तुल्यपरमाणु समूहांच्या स्थानीं जातात. असे परमाणुसमूह केवळ संयुक्त मूलद्रव्येंच समजून त्यांस संयुक्तमूलक असें नांव दिलें आहे. सेंद्रिय रसायनशास्त्रास संयुक्तमूलकांचें रसायनशास्त्र असेंहि म्हणतात.

अशा संयुक्त मूलकांस कधीं वेगळें काढितां येत नाहीं; व त्यांस वेगळें काढण्याचा प्रयत्न केल्यास दोन मूलकांचा संयोग होऊन तिसराच नवा पदार्थ निर्माण होतो. यामुळें संयुक्त मूलक स्वतंत्र किंवा वेगळे राहूं शकतात ही कल्पना मागें पडली, आणि कित्येक पृथग्भवनांत जे परमाणुसमूह जशाचे तसेच अविकृत शेष राहतात त्यांसच संयुक्तमूलक म्हणूं लागले. सांप्रत तर जे परमाणुसमूह पुष्कळ संयुक्त पदार्थांत आढळतात व ज्यांचें कार्य मूलद्रव्याप्रमाणें घडतें, म्हणजे द्विगुण पृथक्करणांत ( डबल डिकॉंपोझिशन ) एका पदार्थांतून दुसऱ्या पदार्थांत जातात किंवा संयुक्त पदार्थांत मूलद्रव्यांच्या व दुसऱ्या परमाणुसमूहांच्या स्थानीं जातात त्यांसच संयुक्तमूलक हें नांव देतात. संतृप्तअणूंतील एक किंवा अधिक परमाणू काढून टाकल्यावर जे शेष राहतात व ज्यांचें वर्तन मूलद्रव्यासारखें बरेंच होतें, म्हणजे जे जशाचे तसेच—अविकृत न होतां—एकांतून दुसऱ्यांत किंवा दुसऱ्याच्या जागीं जातात त्यांस संयुक्तमूलक ही संज्ञा देतात.

सेंद्रिय रसायनशास्त्रांत कर्बचे परमाणू असलेल्या अशा तऱ्हेच्या परमाणुसमूहांस संयुक्तमूलक हें नांव साधारणपणें देतात, आणि उप्र, उग, नउ$_{३}$, नप्र$_{२}$ इत्यादि कर्ब परमाणूविरहित यांस शेष किंवा परमाणुसमूह म्हणतात. $कउ_{३}$; $क_{२} उ_{५}$ वगैरे कर्बपरमाणुसमूहांस संयुक्त मूलक असें म्हणतात.

$क_{सं} उ_{२सं+२}$ या सारणीच्या भिन्न भिन्न संतृप्त उत्कर्वांतून उज्जचे एक, दोन, तीन असे परमाणू काढून घेतल्यानें एकमूल्य, द्विमूल्य, त्रिमूल्य इत्यादि संयुक्त मूलक निर्माण होतात. हे मूलक दुसऱ्या मूलद्रव्याशीं किंवा त्याच्या परमाणुसमूहांशीं त्यांचे रूप $क_{सं} उ_{२सं+२}$ या सारणीबरोबर होईपर्यंत संयोग पावूं शकतात. उज्जचा एकच परमाणु काढला असल्यास त्यांचा एक अवयव असंतृप्त राहतील व त्यास एकमूल्य म्हणतां येईल. दोन परमाणु काढल्यास दोन अवयव असंतृप्त राहतील व त्यांस द्विमूल्य म्हणतां येईल.

$क_{सं}. उ_{२ सं+२}$ या सारणीचे जे उत्कर्व वर दिलेले आहेत. त्यांच्या सारणींतून एकच उज्जचा परमाणु काढला म्हणजे $क_{सं} उ_{२सं+१}$ या सारणीचे उत्कर्व संयुक्तमूलक राहतात. त्या मूलकांचीं नांवें मूळ उत्कर्वांच्या नांवांतील उन प्रत्यया एवेजीं इल प्रत्यय लावून दर्शवितात जसे:—

| मूळउत्कर्व | याचा संयुक्तमूलक |
|---|---|
| मथन—$कउ_{४}$ | मथिल—$कउ_{३}$ |
| इथन—$क_{२}उ_{६}$ | इथिल—$क_{२}उ_{५}$ |
| मेथुन—$क_{३}उ_{८}$ | मेथिल—$क_{३}उ_{७}$ |
| दथन—$क_{४}उ_{१०}$ | दाथिल—$क_{४}उ_{९}$ |
| पंचुन—$क_{५}उ_{१२}$ | पंचिल—$क_{५}उ_{११}$ |
| षड्डुन—$क_{६}उ_{१४}$ | षडिल—$क_{६}उ_{१३}$ |
| पंचत्रिंशतुन $क_{३५}उ_{७२}$ | पंचत्रिंशतिल $क_{३५}उ_{७१}$ |

हे उत्कर्व ( संयुक्तमूलक ) एकमूल्य आहेत कारण उत्कर्वांच्या घटनेंतून एकमूल्य उज्जचा एकच परमाणु काढून टाकल्यानें हे उत्कर्वमूलक बनतात. या उत्कर्व मूलकांस स्वतंत्र अस्तित्व नाहीं. हे काल्पनिक आहेत. या उत्कर्वसंयुक्तमूलकांची घटना पाहिली असतां असें दिसून येईल कीं यांच्या घटनेंत जे उज्जचे परमाणू आहेत ते विषम आहेत जसें:—मथिल=$कउ_{३}$, इथिल = $क_{२}उ_{५}$, मेथिल = $क_{३} उ_{७}$इ. यावरून असाहि नियम बांधला आहे कीं उज्जचा विषम परमाणु असलेला संयुक्तमूलक स्वतंत्र म्हणजे असंयुक्त स्थितींत असूं शकत नाहीं. या संयुक्तमूलकांचें अस्तित्व जरी काल्पनिक आहे तरी तसें मानणें अवश्य आहे. कारण यायोगें सेंद्रिय पदार्थांची घटना, संयोग वियोग व रासायनिक क्रियाप्रतिक्रिया कशा होतात ते सुलभ रीतीनें समजतें व सारणीरूपानें सुगम दर्शवितां येतें; कोणत्या रासायनिक क्रिया कारकाचें ( एजंट ) काय कार्य होईल, कोणता पदार्थ नवा तयार होईल यांचेंहि भविष्य वर्तवितां येतें व यामुळें पुष्कळ नवीन शोध लागून कलाकौशल्याच्या कामांत अतर्क्य प्रगति झाली आहे. यावरून या काल्पनिक संयुक्त मूलकांचें महत्व सेंद्रिय रसायनशास्त्रांत किती आहे हें उघड आहे.

वर दिलेले उत्कर्व संयुक्तमूलक एकमूल्य असल्यानें ते एकमूल्य मूलतत्वाच्या एकाच परमाणूशीं किंवा एकमूल्य एकाच परमाणुसमूहाशीं संयोग पावतात. यावरून या संयुक्तमूलकांचा संयोग एकमूल्यउज्ज या मूलतत्वाशीं केल्यास ते उज्जच्या एकाच परमाणूशीं संयोग पावतात व त्यांच्या संयोगापासून उत्कर्व तयार होतात.

कर्बनत्र.—कर्बनत्र ( सायनोजेन ) वायूचें व उज्ज वायूचें मिश्रण करून तें मिश्रण शतभागोष्णमानाच्या ५०० ते ५५० अंशापर्यंत तापविलें असतां ते दोन वायू संयोग पावतात.

व अशा रीतीनें तयार झालेल्या अम्लास उत्कर्बनत्राम्ल (हायड्रोसायनिक असिड) असें नांव आहे. या अम्लाचा निरनिराळ्या धातूंशीं संबंध आला असतां त्या त्या धातूंचीं कर्बनत्रिदें बनतात. या सर्वांत व्यावहारिक दृष्ट्या पालाश कर्बनत्रिद (पोटॅशम सायनाइड) हें फार उपयोगी आहे. याचा उपयोग सोनें शुद्ध करण्याकडे होतो.

तयार करण्याच्या रीती.—(१) कर्बनत्र वायू किंवा वायुरूप उत्कर्बनत्राम्ल यांशीं कित्येक धातू संयोग पावून त्या धातूंचें कर्बनत्रिद तयार होतें. (२) सिंधु व पालाश या धातूंचे कर्बितक्षार (कार्बोनेट) व उत्प्राणिद (हायड्रोऑक्साइड) उत्कर्बनत्राम्लाच्या प्रवाहांत तापविले असतां सिंधु व पालाश या धातूंचीं कर्बनत्रिदें तयार होतात. (३) खट (कॅलशिअम), भार (बेरिअम) व स्रांत (स्ट्रॉन्शिअम) या धातूंचे कर्बितक्षार कोळशाबरोबर मिसळून, नत्र वायूच्या प्रवाहांत तापविले असतां वरील तीन धातूंचीं कर्बनत्रिदें तयार होतात.

गुणधर्मः—सिंधु, पालाश, खट, भार व स्रांत या धातूंचीं कर्बनत्रिदें पाण्यांत विरघळतात. खुल्या हवेंत तीं तापविलीं असतां त्यांत प्राणवायु मिसळून तीं कांहींशीं कर्बनत्रितें होतात.

इतर धातूंच्या कर्बनत्रिदांचें उष्णतेनें पृथक्करण होतें व त्यांतून कर्बनत्रिल वायु बाहेर पडतो. जड धातूंचीं कर्बनत्रिदें पाण्यांत न विरघळतां पालाशकर्बनत्रिदांत विरघळून त्यांचे द्विभस्मिक क्षार तयार होतात. उदाहरणार्थः— पार (कन)$_3$; पा स्व (कन)$_2$.

सार्धी कर्बनत्रिदें व उत्कर्बनत्राम्ल हीं भयंकर विषारी आहेत. तीं पेशीजालांचा तत्काल नाश करितात. परंतु द्विभस्मिक क्षार हीं अगदीं निरुपद्रवी आहेत. वरील अम्ल हें इतकें विषारी आहे कीं एकदां जोरानें हुंगल्यास मनुष्य बेशुद्ध होईल व कदाचित मरेलहि. तें किडे व जंतू यांस मारणारें आहे. उलट याचा औषध म्हणून उपयोग करितात. एक औंस पाणी व ग्लिसरीन यांच्या मिश्रणांत या अम्लाचा एक थेंब टाकल्यास कसलीहि खरूज बरी होते. परंतु कातडी खरचटलेली असल्यास हें लावतां कामा नये. सुका खोकला झाल्यास व कफ पडत नसला तर खोकल्याच्या औषधांत हा अम्ल थोड्या प्रमाणांत मिसळतात.

शुद्ध अम्लाचा उपयोग केल्यास (पोटांत घेतल्यास) तत्काल मृत्यु येईल. पाण्याशीं मिश्रण करून घेतला तरी थोड्या वेळांतच तो आपला अम्मल गाजवितो, मनुष्य बेशुद्ध पडतो, डोळे ताठतात व निश्चल राहतात, कातडी थंडावते, अवयव ढिले पडतात, नाडी व श्वासोच्छ्वास मंदावतो. अशा वेळेस अॅट्रोपिन् हें औषध उत्तम. त्याचा एकपन्नासांश ग्रेन त्वचेच्या खालीं पिचकारीनें सोडला पाहिजे. वांतिकारक औषधेंहि द्यावीं. अम्न वायु हुंगण्यास द्यावा व कृत्रिम श्वासोच्छ्वास क्रिया करावी. त्यानें मंदावलेला श्वासोच्छ्वास जोरानें सुरु होईल व तो मनुष्य वांचेल.

कॅर्बॉलिकाम्ल किंवा फेनॉल.—(हायड्रोबेन्झ क$_6$उ$_5$ प्रउ) हें अम्ल शाकतृणजीवि प्राण्यांच्या मूत्रांत सांपडतें. परंतु बाजारांत विकलें जाणारें अम्ल डांबराचें आंशिक पातन केलें असतां १५०° व २००° च्या उष्णमानाच्या दरम्यान मिळणाऱ्या अर्कांत सांपडतें. ह्या अर्कापासून फेनॉल तयार करण्याकरितां त्यांत दाहक सोडा (कॉस्टिक सोडा) मिळवितात. अर्कांतील फेनॉल व त्याचे तुल्यजातीय पदार्थ होमोलोग्ज व थोडेंसें नाफ्थलिन आणि सोडा यांत द्रवतात. त्यां द्रावणांत पाणी मिसळून पातळ केल्यावर उत्कर्ब (हायड्रोकार्बन) पदार्थ सांकळ्याच्या रूपानें तळीं बसून वेगळे होतात. नंतर तें द्रावण अम्लीकृत केलें जातें, व फेनॉल निराळें होऊन तेलाप्रमाणें वर तरंगतें. हा तवंग काढून घेऊन त्याचें आंशिक पातन केल्यावर फेनॉल प्राप्त होतें. पोटयाशम, बेंझीन सल्फोनेट व दाहक अल्कली हीं एके ठिकाणीं वितळविल्यास, ॲनिलीनवर नत्रसाम्लाच्या क्रियेनें, अल्युमिनियम हरिदासह उकळणाऱ्या बेंझीनमध्यें प्राणवायूचा प्रवाह सोडल्यास बेंझीनच्या प्राणिदीकरणापासून फेनॉलचें संश्लेषणहि करितां येतें.

याचे स्फटिक समभुज चौकोनाकृति असून ते ४२.५–४३° उष्णमानावर वितळतात व तें १८२–१८३° सें. ला उकळतें. याचें विशिष्टगुरुत्व १.०९०६ (०° सेंटिग्रेड) आहे. त्याला एक प्रकारचा विशिष्ट वास व तीव्र चव असते. हें विषारी असून याचा कृमिनाशक सारखा उपयोग होतो. १६–१७° सें. ला १५ भाग पाण्यांत एक भाग फेनॉल द्रवतें. परंतु सुमारें ७०° श. ला तें वाटेल त्या प्रमाणांत द्रवतें. वाफेंत ठेवलें असतां तें उडून जातें व अलकोहल, इथर, बेंझीन, कर्बद्विगंधकिद, क्लोरोफार्म, व हैमसिरकिताम्लांत तें लवकर द्रवतें, दाहक अल्कलींच्या द्रावणांतहि तें लवकर द्रवतें पण सिंधुकर्बिताच्या द्रावणांत तें बहुतेक अद्रवणीय आहे. ओलसर असून तें हवेंत ठेवलें असतां त्याला तांबूस रंग येतो. तें लोह हरिदाबरोबर मिळविलें असतां जांभळा रंग व ब्रोमीनमिश्रित पाण्याबरोबर मिळविलें असतां पांढरा सांका मिळतो.

औषधिविज्ञान व भेषजप्रकरण.—परोपजीवि अशा कीटकांचा नाश करण्यांत कॅर्बॉलिकाम्ल हें वस्ताद असून गजकर्णाच्या कृमींचा नाश करण्याकरितां त्याचा उपयोग करितात. वीस भाग पाण्यांत एक भाग अम्ल मिळवून केलेलें द्रावण अंगास लाविलें असतां कित्येक तास पर्यंत अंग बधिर होतें. तीव्र द्रावण दाहक परिणाम करितें. तरी त्यामुळें कधी फोड येत नाहींत. ह्या अम्लांत भिजविलेला कापसाचा बोळा दातांत धरिला असतां, दातांतील कुजक्या पदार्थांमुळें होणारें दुःख कमी होतें; परंतु दातांसंबंधीं इतर दुःखावर त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. एकपासून तीन ग्रेनपर्यंत

कॅर्बॉलिक अम्ल पोटांत घेतल्यास वांत्या बंद होतात; त्याचा कृमिनाशक म्हणूनहि उपयोग होतो.

विषविज्ञान.—कॅर्बालिक अम्लानें विषप्रयोग झाला असतां मज्जातंतूवर परिणाम होतो. ऑक्झेलिकाम्ल व उत्क-बॅनत्राम्ल (हायड्रोसायनिकाम्ल) या दोन अम्लांखेरीज इतरांचे परिणाम असे होत नाहींत. शस्त्रक्रियेनंतर लावलेल्या मलम पट्टीतून कॅरबॉलिकाम्ल आंत शोषलें गेलें असल्यास क्षोभकारक चिन्हें दृष्टीस पडत नाहींत. परंतु निविष्ट द्रावण पोटांत गेल्यास, पोटांतील आंतडीं सुजल्याचीं चिन्हें दिसूं लागतात. रोग्याची शक्ति एकदम गळून जाते, त्याचें अंग थंड होऊन त्याला घाम सुटतो; व त्याचा श्वासोच्छ्वास अगदीं सावकाश होऊं लागून, झांपड आलेल्या स्थितींत त्याला मरण येतें. याचें मूत्रावरून निदान करतां येण्यासारखें असल्यामुळें मूत्रपरीक्षा ही फार महत्वाची होय. अम्लानें विषप्रयोग झालेल्या मनुष्याची लघवी काळसर हिरवी होते. साधारण वजनाच्या मोठ्या पुरुषास १५ ग्रेन अम्लाचे परिणाम घातक होतात. हें अम्ल जास्त प्रमाणांत अंगांत भिनल्याचे दुसरे परिणाम म्हणजे भोंवळ, वधिरपणा, कानांतील आवाज, अंगाचा थंडपणा, मळमळ, वांती, व नाडीचा मंदपणा हे होत.

कोणत्याहि द्रवणीय गंधकितानें या विषाला उतार पडतो. कॅर्बालिकाम्ल व गंधकित यांच्या संयोगानें तयार होणारे गंधाकर्बित निरुपद्रवी असतात. याकरितां एक औंस सिंधुगंधकित पाण्यांत घालून तें पाणी प्यावयास द्यावें किंवा अंग टोंचून हें द्रावण आंत घालावें. मग्नगंधकिताचेंहि द्रावण पिण्यास देण्याला कांहीं हरकत नाहीं. पण तें टोंचून घातलें असतां त्याचे परिणाम विषारी होतात. अम्ल पोटांत गेलें असतां पोट आंतून धुवून काढून चुन्याची निवळी प्यावयास द्यावी. कारण खटकर्बित अद्रावणीय आहे. ज्या अल्कलीपासून द्रवणीय कर्बित होतात ते अल्कली देण्यास निरुपयोगी होत. ईथर व दारू हीं प्यावयास द्यावीं व रोग्याची शक्ति गळून गेली असल्यास गरम पाण्याच्या वाटल्यांनीं अंग शेकून अंगावर उवदार कपडे घालावेत.

**कर्मद**—मुंबई इलाख्यांतील काठेवाडमधील एक छोटें संस्थान. हा स्वतंत्र खंडणी देणारा तालुका भोइका ठाण्यांत असून कर्मद हें एकच गांव त्यांत आहे. तालुकदार हे चूडाचे भायाद व झाल रजपूत आहेत.

**कर्मनाशा**—पुराणांत त्याज्य मानलेली ही नदी बंगालमधील कैमूर डोंगरांत उगम पावते. उत्तर अक्षांश २४° ३२' व पूर्व रेखांश ८३° २६'. हिचा प्रवाह बंगाल व संयुक्त प्रांत यांच्या हद्दीवरून जातो व पुढें गंगेला मिळतो. हिची लांबी १४६ मैल आहे. मेगॅस्थिनीजनें उल्लेखिलेली "कोमेनासीस" हीच असावी असें म्हणतात (जे. डब्ल्यू. मॅक्‌क्रिंडल—एन्शंट इंडिया, ॲज डिस्क्राइब्ड बाय मेगॅस्थिनीज ॲंड एरियन कलकत्ता, १८८७). मिर्झापूरच्या सरहद्दीवर हिचा "छानपत्थर" नांवाचा धबधबा आहे.

हिचा महाभारतांत उल्लेख आढळत नाहीं. परंतु हरिवंशांत व इतर पुराणांत सत्यव्रत किंवा त्रिशंकु याच्या कथेंत हिला गोंविलें आहे. अयोध्येचा राजा सत्यव्रत हा चांडालत्व पावला होता. याच्या माथीं तीन पापरूपी शंकू बसले होते म्हणून त्याला त्रिशंकु असें नांव पडलें. यानें मोठें तपाचरण केलें व सदेह स्वर्गी जाण्याची अपेक्षा धरिली. विश्वामित्र ऋषींनें याच्याकडून मोठा यज्ञ करवून याला स्वर्गी चढविलें. पण देवांनीं त्याला वरून खालीं ढकललें. पण विश्वामित्रानें आपल्या सामर्थ्यानें त्याला पृथ्वीवर पडूं दिलें नाहीं. तेव्हां तो 'खालीं डोकें वर पाय' अशा अवस्थेंत अंतराळीं लोंबत राहिला. दक्षिण गोलार्धांतील एक नक्षत्रपुंज याच्या नांवाचा आहे. दुसरी एक अर्वाचीन कथा म्हणजे हा अंतराळीं लोंबत असतां त्याच्या खालीं पडणाऱ्या लाळेपासून ही नदी तयार झाली अशी आहे. वसिष्ठ व विश्वामित्र यांच्या संप्रदायांचीं भांडणें या नदीला लावण्याचें कारण ही एखादी मानव वंशाची किंवा गोत्रांतर्गत विवाह्य प्रदेशाची हद्द असावी. कदाचित् आर्यांच्या वसाहतीची ती पूर्वेकडील मर्यादा असेल.

या कथेची उत्पत्ति कांहींहि असली तरी, आजतागाईत या नदीस दोषयुक्त मानतात हें खरें. हिचें पाणी स्फटिकासारखें स्वच्छ आहे तरी कोणीहि हिंदु हिच्यांत स्नान करीत नाहीं. पूर्वी हिचा स्पर्श होऊं नये म्हणून हीन लोकांच्या पाठीवर बसून ही नदी ओलांडीत; हिचें पाणी अंगावर उडेल म्हणून नावाड्यांनां हळू वल्हीं मारण्यास सांगत. हें संकट टाळण्याकरितां अहल्याबाई होळकरणीनें हिला पूल बांधण्याचा प्रयत्न केला होता पण तो फसला. नानाफडणवीसांनीं कर्मनाशीवर पूल बांधण्यास बैल खरेदी केले होते, ते बाजीरावानें पुण्यास बोलाविले (१८०१–०२ दुसरा बाजी. रोज. पा. १०८). पुढें काशी येथील प्रसिद्ध व्यापारी राजा पटणीमल यानें तो बांधून काढला. या पुलावरून व ईस्ट इंडियन रेल्वेवरील दुसऱ्या एका पुलावरून धार्मिक हिंदूनां कर्मनाशेला न शिवतां पलीकडे जातां येते.

**कर्ममार्ग**—कर्ममार्ग म्हणजे श्रौतकर्में करणें. याचें विवेचन (ज्ञा. वि. २) "वेदविद्येंत" सविस्तर केलें आहे. मंत्रब्राह्मणें मिळून जो वेदभाग होता त्यास कर्मकांड म्हणतात आणि उपनिषदांस ज्ञानकांड म्हणतात. ज्ञानकांड वेदग्रंथांच्या शेवटीं आहे किंवा सामान्य ज्ञानाचें अंतिम फल आहे म्हणून त्यास वेदांत म्हणतात. भारतीय तत्वज्ञानांत मोक्षाचे तीन मार्ग सांगितले आहेत. ते कर्ममार्ग, ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग हे होत. या तिहींचा उदय याच अनुक्रमानें झाला आहे. संगति दाखवूं लागणाऱ्या वर्गाच्या मतें हे तीन मार्ग एकमेकांशीं विसंगत नाहींत, तरी अनेक ठिकाणीं

आपणांस त्यांची तुलना करून तिहींमध्यें पूर्वोत्तरता व स्पर्धा म्हणजे श्रेष्ठ कोणता हें ठरविण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. विशेषतः कर्म आणि ज्ञानमार्ग यांमध्यें विरोध आहे असें दाखविण्यांत येतें. आणि खरी लढाई या दोहोंतच होती. भक्तिमार्गाचा उदय वराच उत्तरकालीन आहे. कर्ममार्गाला निरनिराळ्या कालीं निरनिराळ्या ग्रंथांतून कोणतें स्थान दिलें आहे तें पाहिलें असतां कर्ममार्गाचें महत्त्व आपल्या लक्षांत येईल.

ऋग्वेदकालीं मनुष्याचा जणूं काय देवतांशीं प्रत्यक्ष संबंध असावा अशा तऱ्हेचीं वर्णनें आढळतात. ऋग्वेदकालीन लोकांची देवतांविषयींची कल्पना म्हणजे उत्तरकालीन कल्पनेप्रमाणें देवता या केवळ बुद्धिगम्य अथवा एखाद्या गूढ शक्तीनें ज्ञात होणाऱ्या अशा नसून त्या जणूं काय त्यांच्यापुढें प्रत्यक्ष त्यांच्या विशिष्ट क्रियारूपानें प्रत्ययास येत अशी होती. त्यामुळें त्यांनां संतुष्ट करण्याकरितांहि कांहीं प्रत्यक्ष क्रिया केल्या पाहिजेत अशी त्यांची समजूत असे. यामुळें ते यज्ञ वगैरे कृत्यें करूं लागले. या ऋग्वेद-कालीं श्रौतसंस्थाप्रारंभ दिसून येतो; पण त्यावरोवरच यज्ञापासूनच केवळ आपणाला स्वर्गप्राप्ती होईल असें न वाटून देवांविषयीं व पितरांविषयीं आदरबुद्धि बाळगणें, पुरोहितांस संतुष्ट करणें, शूर व सत्यवचनी असणें व तप करणें इत्यादि गोष्टी आवश्यक मानणारा वर्ग होताच.

ब्राह्मणांमध्यें आपणांस या विचारांत वराच फरक पडलेला आढळतो. यज्ञाला यावेळीं कर्म ही संज्ञा प्राप्त होऊन त्यास अतिशय महत्व आलें. आयुष्यांतील प्रत्येक गोष्ट यज्ञकर्माला अनुसरूनच केली पाहिजे व कर्मांशिवाय कोणतीहि वस्तु प्राप्त व्हावयाची नाहीं अशी समजूत दृष्टीस पडते. कर्मामुळेंच मनुष्याला मोक्ष अथवा स्वर्ग प्राप्त होतो व कर्मामुळेंच देवांनाहि सध्याचें स्थान प्राप्त झालें आहे अशी समजूत व्यक्त केलेली आढळते (श. ब्रा. ३.१,४,३ ऐ. ब्रा. २.१,१). यापुढें कर्म म्हणजे यज्ञयागादिक कृत्यें असाच अर्थ रूढ दिसतो व तोच मोक्षाचा मार्ग अशी समजूत आढळते. ब्राह्मणांतच आपणाला मनुष्याचीं तीन ऋणें—देव, ऋषी व पितर यांचीं—अनुक्रमें यज्ञ, स्वाध्याय व पुत्रप्राप्ती करून फेडावयाचीं हें तत्व आढळतें.

ऋग्वेदकालीं यज्ञाशिवाय इतर गोष्टींकडे लक्ष देणारा वर्ग होताच. आणि त्याचें अस्तित्व चालूच राहिलें. याच वेळीं सूतसंस्कृतींतहि विचाराची वाढ होऊन सूतसंस्कृतीचा अभिमानी आणि मांत्रसंस्कृतींतील विचारीवर्ग यांची एकी होऊन औपनिषद् तत्वज्ञानाची वाढ होत असलेली व ज्ञानमार्गास प्रामुख्य येत असलेलें आढळतें. मनुष्याचें अंतिम ध्येय जन्म-मृत्यूच्या फेऱ्यांतून सुटून मोक्ष प्राप्त करून घेणें हें असल्यामुळें ज्या कर्माचें चांगलें अगर वाईट फल भोगण्यास पुन्हां जन्म घ्यावा लागतो असें कर्म करण्यापेक्षां ज्ञानप्राप्ति करून घेणें हेंच अधिक चांगलें आहे असें ज्ञानमार्गी प्रतिपादन करीत. तथापि ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग यांची तडजोडहि चाले. कर्म हें साधन आणि ज्ञान हे साध्य असें मांडलें जाऊन वेदांतांतहि 'एकदम ज्ञानप्राप्ति होणें शक्य नसून कांहीं कर्में केल्यानंतरच ज्ञान प्राप्त करून घेण्यास मनुष्याची तयारी होते व कर्ममार्गामार्फतच मनुष्य ज्ञानमार्गाकडे जातो' असेंहि प्रतिपादीत. आणि ज्ञानोत्तर कर्मांचें समर्थन सुरेश्वराचार्य ( मंडनमिश्र ) 'ज्ञानवानास कर्में अयत्नतः होतीलच, पण तीं साधनरूप नाहींत' असें सांगून कर्माची निरवद्यता नियमित करीत. कर्म हें ज्ञानास साधन म्हणावें तर ज्ञान प्राप्त होण्यास कोणतीं विशिष्ट कर्में करावीं हें आपणांस कशावरून कळावयाचें ? याला उत्तर वेदविहित कर्में करावीं हें होय. तथापि एवढ्यानें सर्व गोष्टींचा उलगडा होत नाहीं. वेदांत सांगितलेलें कर्म म्हणजे मुख्यतः यज्ञ हें होय. कांहीं ठिकाणीं यज्ञांतील विशिष्ट क्रियेसंबंधीं वेदांत आढळणारे मंत्र व ब्राह्मणांत सांगितलेली क्रिया यांमध्यें असंगति आढळून येते. अशा वेळीं कोणत्या विधानास प्रामुख्य द्यावें व असेच इतर कांहीं संशय आल्यास त्या ठिकाणीं काय करावें हें जैमिनीनें पूर्वमीमांसेंत सांगितलें आहे. पूर्वमीमांसेसंबंधीं विवेचन पूर्वी ( ज्ञा. वि. ५ ) केलेंच आहे. नंतर धर्मसूत्रांमध्यें ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांची संगति लावून मनुष्यानें व्यवहारांत कसें आचरण ठेवावें हें सांगितलें आहे धर्मसूत्रांमध्यें फक्त त्रैवर्णिकांचाच विचार केलेला आहे. शूद्रांचा ज्ञान अथवा कर्ममार्गाशीं प्रत्यक्ष कांहीं संबंध नाहीं असें म्हटलें आहे. त्रैवर्णिकांस ब्रह्मचर्य व त्यांत स्वाध्याय, गृहस्थाश्रम व त्यांत यज्ञकर्में, वानप्रस्थाश्रम व त्यांत ज्ञानप्राप्ति आणि अखेरीस संन्यास अशी आश्रमधर्मांची व त्या त्या आश्रमांतील कर्मांची व्यवस्था सांगितली आहे.

आतांपर्यंत कर्म म्हणजे यज्ञयागादि कृत्यें असाच अर्थ रूढ होता व तीं कर्त्याला त्यांपासून कांहीं तरी फल मिळावें या इच्छेनेंच करावयाचीं असत. परंतु भगवद्गीतेमध्यें आपणांस निराळीच कल्पना आढळते. मोक्षप्राप्ति केवळ ज्ञानानेंच होते असें नसून, भक्तीनेंहि किंवा कर्म करूनहि मोक्ष मिळतो असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे. मात्र कर्मानें मोक्ष प्राप्त करून घ्यावयाचा असल्यास तें कर्म निष्काम पाहिजे. निष्काम कर्माबद्दल गीतारहस्यांत वरेंच विवेचन केलें आहे. त्याचा सारांश असा:—

आयुष्यक्रमणाच्या मार्गापैकीं जैमिन्यादि मीमांसकांनीं ज्ञानाला महत्व न देतां केवळ यज्ञयागादि कर्में केल्यानेंच मोक्ष मिळतो असें प्रतिपादन केलें आहे ( जै. सू. ५.२,२३ वरील शावरभाष्य पहा ); आणि उपनिषत्कार व बादरायणाचार्य यांनीं सर्व यज्ञयागादि कर्में गौण ठरवून केवळ ज्ञानानें मोक्षप्राप्ति होते ज्ञानाखेरीज दुसऱ्या कशानेंहि मोक्ष मिळणें शक्य नाहीं, असा सिद्धांत केला आहे ( वे. सू. ३.४. १,२ ). पण या दोन्ही निष्ठा सोडून देऊन आसक्तिविरहित कर्में करण्याची तिसरीच निष्ठा पंचशिखानें ( स्वतः सांख्य-मार्गी असतांहि ) आपणांस सांगितली आहे, असें जनकाचें

म्हणणें आहे. " दोन्ही निष्ठा सोडून " या शब्दांवरून ही तिसरी निष्ठा पूर्वींच्या दोन निष्ठांपैकीं कोणत्याहि निष्ठेचें अंग नसून स्वतंत्र रीत्या वर्णिलेली आहे हें उघड होतें. वेदांतसूत्रांतहि ( वे. सू. ३.४,३२ते३५ ) जनकाच्या या तिसऱ्या निष्ठेचा अखेर उल्लेख केलेला असून भगवद्गीतेंत जनकाचीं हीं तिसरीं निष्ठाच तींत भक्तीची नवी भर घालून प्रतिपादिली आहे. पण मीमांसकांचा केवळ म्हणजे ज्ञानविरहित कर्ममार्ग मोक्षप्रद नसून नुसता स्वर्गप्रदच आहे असा गीतेचा सिद्धांत आहे ( गी. २.४३–४४; ९.२१ ). आणि जो मार्ग मोक्षप्रद नाहीं त्याला निष्ठा हें नांवहि देतां येत नाहीं. कारण ज्यानें अखेर मोक्ष मिळतो त्या मार्गास निष्ठा म्हणावें ही व्याख्या सर्वांसच कबूल आहे. म्हणून सर्वांच्या मतांचा सामान्य अनुवाद करतांना जनकानें जरी तीन निष्ठा सांगितल्या असल्या तरी मीमांसकांचा केवळ म्हणजे ज्ञानविरहित कर्ममार्ग 'निष्ठा' या वर्गांतून काढून टाकून सिद्धांतपक्षी कायम रहाणाऱ्या दोनच निष्ठा गीतेच्या तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं वर्णिल्या आहेत ( गी. ३.३ ). केवळ ज्ञान ( सांख्य ) व ज्ञानयुक्त निष्काम कर्म (योग) या त्या दोन निष्ठा होत; आणि सिद्धांतपक्षीय या दोन निष्ठांपैकीं दुसऱ्या ( म्हणजे जनकाप्रमाणें तिसऱ्या ) निष्ठेच्या समर्थनार्थ " कर्मणैवहि संसिद्धिमास्थिता जनकादयः " ( गी. ३.२० )–जनकादिक याप्रमाणें कर्म करूनच सिद्धि पावले असा जुना दाखला दिला आहे.

शुकानें " वेद कर्में सोडण्यास सांगतो आणि कर्में करण्यासहि सांगतो; तर विद्येनें म्हणजे कर्मांशिवाय ज्ञानानें आणि नुसत्या कर्मानें कोणती गति मिळते, हें मला सांगा " ( शां. २४०.१ ) असा व्यासास प्रश्न केल्यावर त्याचें उत्तर देतांना व्यासांनीं " कर्मानें प्राणी बांधला जातो व विद्येनें मुक्त होतो; म्हणून जे पारदर्शी यती किंवा संन्यासी आहेत ते कर्म करीत नाहींत " ( शां. २४०.४७ )असें सांगितलें आहे. " कर्मणा बध्यते जंतुर्विद्यया तु प्रमुच्यते " या सिद्धांताबद्दल कांहीं वाद नाहीं पण "कर्मणा बध्यते " म्हणजे काय याचा विचार केला तर जड किंवा अचेतन कर्म कोणास बांधीत नाहीं आणि सोडीतहि नाहीं. मनुष्य फलाशेनें किंवा आपल्या आसक्तीमुळें कर्मांत बद्ध झालेला आहे. ही आसक्ति सुटली म्हणजे त्यानें नुसत्या बाह्येंद्रियांनीं कर्में केलीं तरीहि तो मुक्तच होय, असें निष्पन्न होतें हें तेथें दाखविलें आहे. हाच अर्थ मनांत आणून अध्यात्मरामायणांत ( २.४,४२ ) रामचंद्र लक्ष्मणास असें सांगतात कीं, " कर्ममय संसाराच्या प्रवाहांत पडलेला मनुष्य बाह्यतः सर्व प्रकारचीं कर्तव्यकर्में करूनहि पुन्हां अलिप्त असतो. " अध्यात्मशास्त्राचा हा सिद्धांत लक्षांत घेतला म्हणजे कर्म दुःखमय म्हणून तें सोडण्याची अवश्यकता न रहातां, मन शुद्ध व सम करून फलाशा सोडिल्यानें सर्व काम होतें असें दिसून येतें. तात्पर्य ज्ञानाचा व काम्यकर्मांचा जरी विरोध असला तरी निष्काम कर्म आणि ज्ञान यांमध्यें कोणताच विरोध येऊं शकत नाहीं. म्हणून अनुगीतेंत " तस्मात्कर्म न कुर्वंति " म्हणून कर्म करीत नाहींत. या वाक्याऐवजीं, तस्मात्कर्मसु निःस्नेहा ये केचित् पारदर्शिनः ॥ " म्हणून पारदर्शी पुरुष कर्मांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवीत नाहींत " ( अश्व ५१ ३३ ) असें वाक्य आलें असून तत्पूर्वी जे ज्ञानी पुरुष श्रद्धेनें फलाशा न ठेवतां ( कर्म ) योगमार्गाचा अवलंब करून कर्म करितात तेच साधुदर्शी होत " ( अश्व. ५०.६,७ ), असें कर्मयोगमार्गाचें स्पष्ट प्रतिपादन केलें आहे. त्याचप्रमाणें " वेद कर्म कर आणि कर्म सोड म्हणून दोन्ही प्रकारें सांगतो; म्हणून ( कर्तृत्वाचा ) अभिमान न धरतां आपण आपलीं सर्व कर्में करावीं, " असा वनपर्वांत ( वन. २.७३ ) शौनकाचा युधिष्ठिरास उपदेश असून, शुकानुप्रश्नांतहि " ज्ञानवान होऊन सर्व कर्में करूनच सिद्धि मिळविणें, ही ब्राह्मणाची पूर्वीची जुनी ( पूर्वतर ) वृत्ति होय " ( म. भा. शां. २३७. १; २३४.२९ ), असें व्यासांनीं शुकास दोनदा स्पष्ट सांगितलें आहे. " ज्ञानवानेव " या पदानें ज्ञानोत्तर व ज्ञानयुक्त कर्मच या ठिकाणीं विवक्षित आहे हें उघड होतें. असो. दोन्ही बाजूंच्या या वचनांचा निराग्रहबुद्धीनें शांत विचार केला म्हणजे "कर्मणा बध्यते जंतुः" या कोटिक्रमानें "तस्मात्कर्म न कुर्वंति" म्हणून कर्में करीत नाहींत हें कर्मत्यागपर एकच अनुमान निष्पन्न न होतां, त्याच कारणास्तव "तस्मात्कर्मसु निःस्नेहाः" म्हणून कर्मांच्या ठायीं आसक्ति ठेवीत नाहींत हें निष्काम बुद्धीनें कर्में करण्याचें दुसरें अनुमानहि तितक्याच योग्यतेचें आहे असें सिद्ध होतें.

ब्रह्मात्मैक्याचा अनुभव घेणारे ज्ञानी पुरुष मायासृष्टींतील व्यवहार केवळ शरीरानें अगर केवळ इंद्रियांनींच करीत असतात असें जें गीतेंत वर्णन आहे ( गी. ४.२१; ५.१२ ) त्यांतील तात्पर्य हेंच असून, याच हेतूनें अठराव्या अध्यायांत " निःसंग बुद्धीनें फलाशा सोडून केवळ कर्तव्य म्हणून कर्म करणें हाच खरा 'सात्विक' कर्मत्याग होय, " " कर्म सोडणें हा खरा कर्मत्याग नव्हे, असा सिद्धांत केला आहे ( गी. १८.९ ). कर्म मायासृष्टींतील असलें तरी तें परमेश्वरानें कांहीं अगम्य कारणास्तव निर्माण केलें असून तें बंद पाडणें ही गोष्ट मनुष्याच्या ताब्यांतली नव्हे, परमेश्वराधीन आहे. आणि बुद्धि निःसंग ठेवून केवळ शारीरकर्म केल्यानें तें मोक्षाच्या आड येत नाहीं हें निर्विवाद आहे. मग चित्तांत वैराग्य ठेवून केवळ इंद्रियद्वारां शास्त्रतः प्राप्त होणारीं कर्में करण्यास हरकत कोणती ? ' न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् "( गी. ३.५; १८.११ ) या जगांत एक क्षणभर देखील कोणी कर्माखेरीज राहूं शकत नाहीं. असें गीतेंत, तर " नैष्कर्म्यं नच लोकेस्मिन् मुहूर्तमपि लभ्यते " ( अश्व. २०.७ ) या लोकीं ( कोणासहि ) घटकाभर देखील कर्म सुटत नाहीं, असें अनुगीतेंत म्हटलें आहे. मनुष्यच काय पण सूर्यचंद्रादि देखील एकसारखें कर्मच करीत आहेत.

किंबहुना कर्म म्हणजेच सृष्टि आणि सृष्टि म्हणजेच कर्म हें निश्चित असल्यामुळें सृष्टीच्या घडामोडीस किंवा कर्मास क्षणभर देखील विसावा नाहीं हें आपण प्रत्यक्ष पहातों " कर्म. सोडिलें तर खावयाला देखील मिळणार नाहीं " असें भगवंतांनीं गीतेंत ( गी. ३,८ ) तर " अकर्मणां वै भूतानां वृत्तिः स्यान्नहि काचन" ( वन. ३२.८ ), कर्माखेरीज प्राणिमात्राचा निर्वाह नाहीं असें वनपर्वांत द्रौपदीनें युधिष्ठिरास सांगितलें असून त्याचप्रमाणें दासबोधांतहि पूर्वी ब्रह्मज्ञान सांगून नंतर " प्रपंच सांडून परमार्थ केला तरी अन्न मिळेना खायाला ।" ( दा. १३.१२.३ ) असें श्रीसमर्थ रामदासस्वामीहि म्हणत आहेत.

या जगांत कर्म कोणासहि सुटणें शक्य नसल्यामुळें कर्माची बाधा न लागण्यास नेहमीं आपल्या धर्माप्रमाणें प्राप्त झालेलं कर्तव्य फलाशा सोडून म्हणजे विरक्त बुद्धीनें करणें, एवढाच काय तो एक मार्ग ( योग ) मनुष्याच्या ताब्यांतला असून उत्तम आहे. प्रकृति आपले व्यवहार नेहमींच करीत रहाणार. पण त्यांतील कर्तृत्वाच्या अभिमानची बुद्धि तुम्ही सोडलीत म्हणजे तुम्ही मुक्तच आहां ( गी३. .२७; १३. २९; .१४.१९; १८.१६ ) मुक्तीसाठीं कर्म सोडण्याची किंवा सांख्य म्हणतात त्याप्रमाणें कर्मसंन्यासरूप वैराग्याची जरुरी नाहीं. इतकेंच नव्हे, तर या कर्मभूमींत कर्मांचा पूर्ण त्याग करणें शक्यहि नाहीं ( लो. टिळक कृत गीतारहस्य ).

बौद्ध संप्रदायाची कर्ममार्गासंबंधीं शिकवणहि बहुतेक भगवद्गीतेसारखीच आहे. स्वतःला फल मिळावें या इच्छेनें केलेलीं कर्में मनुष्याला बंधनकारक होतात. परंतु निष्काम बुद्धीनें केलेलीं कर्में मनुष्याला निर्वाणपदाचा मार्ग सुकर करतात.

जैनांची कर्ममार्गाविषयीं काय वृत्ति होती हें वेदविद्येच्या पहिल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे.

**कर्मयोग**—व्यापार, चळवळ किंवा कार्य करण्याचें तत्व. कर्म या शब्दांत सर्व प्रकारचे व्यापार येतात; व योग याचा साधा अर्थ उपाय, युक्ति असा घेण्यांत येतो. " एकच कर्म करण्याचे जे अनेक योग, साधनें, किंवा मार्ग असतात, त्यांपैकीं पराकाष्ठेचा चांगला व शुद्ध मार्ग कोणता, तो नेहेमीं आचरितां येईल कीं नाहीं, नसल्यास त्याला अपवाद कोणते व कां उत्पन्न होतात, जो मार्ग आपण चांगला समजतों तो चांगला कां, किंवा ज्यास वाईट म्हणतों तो कां, आणि हा चांगले वाईटपणा कोणीं व कोणत्या धोरणानें ठरवावा किंवा त्यांतील बीज काय, इत्यादि गोष्टी ज्या शास्त्राच्या आधारें निश्चित करतां येतात त्यास ' कर्मयोग शास्त्र ' किंवा गीतेंतल्या संक्षिप्त रूपाप्रमाणें ' योगशास्त्र ' असें म्हणतात. " ( गीतारहस्य, चवथी आवृत्ति, पा. ६१ ) वरील व्याख्येवरून ' योग ' याचा ( सांख्यांच्या विरुद्ध असणारा ) रूढार्थ येथें घेतला नाहीं हें दिसून येईल. भगवद्गीता ही आरंभापासून अखेरपर्यंत कर्मयोगपर आहे असें कांहीं विद्वान् समजतात; व त्यांतील लो. टिळक हे अग्रणी होत. त्यांनीं गीतेवर ' श्रीमद्भगवद्गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र ' नांवाची जी टीका लिहिली आहे तींत गीतेची कर्मयोगशिक्षा सविस्तर विवेचिली आहे. " गीता म्हणजे कर्म, भक्ति व ज्ञान या तीन स्वतंत्र निष्ठांची खिचडी किंवा कापूस, रेशीम व जर यांच्या चिंध्या शिवून तयार केलेली गोधडी नसून, कापूस, रेशीम व जर यांचे निरनिराळे धागे यथास्थानीं योग्य रीतीनें जमवून दिल्यावर कर्मयोग नांवाचें मौल्यवान् व मनोहर असें गीतारूपी सनंग अव्वलपासून अखेरपर्यंत ' अत्यंत योगयुक्त चित्तानें ' सलग विणलेलें आहे. " ( गीतारहस्य पा. ४६२ ). गीतेंत ' संन्यास ' आणि ' कर्मयोग , या दोनच निष्ठांचा विचार असून ( गी. ५. १ ), त्यांपैकीं ' कर्मयोग ' हा अधिक श्रेयस्कर असाच स्पष्ट निकाल केला आहे. ( गी. ५. २ ) असें टिळक आपल्या या टीकेंत प्रतिपादितात.

फलाकडे लक्ष न देतां या जगांतील आपलें कर्तव्य शुद्ध म्हणजे निष्काम बुद्धीनें नेहमीं यथाशक्ति करीत राहिलें पाहिजे, किंबहुना त्यांत मरण आलें तरीहि मोठया आनंदानें पत्करिलें पाहिजे ( गी. ३. ३५. ) यालाच लोकसंग्रह किंवा खरा कर्मयोग असें नांव देण्यांत येतें. या कर्मयोगाचें भगवद्गीतेंतच प्रथम सविस्तर निरूपण आहे. सांख्य म्हणजे संन्यास हाच एक मोक्षमार्ग नसून योग म्हणजे कर्मयोग हाहि एक दुसरा मार्ग आहे. वैदिक धर्मपुरुषाचें ब्रह्मविद्या हें डोकें व सांख्य आणि योग हे उजवेडावे हात असें कल्पिल्यानें या दोहोंत विरोध नसून उलट बंधुभक्तीच आहे असें दिसेल. या दोन मार्गांतील साम्य व वैषम्य पुढील तुलनेवरून समजेल.

ब्रह्मविद्या किंवा आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर मोक्षप्राप्तीस कर्मसंन्यास ( सांख्य ) व कर्मयोग ( योग ) असे दोन मार्ग आहेत यांचीं तत्वें तुलनेसाठीं पुढें दिलीं आहेत. कर्मसंन्यासाचीं तत्वें येणें प्रमाणेंः—

( १ ) मोक्ष आत्मज्ञानानेंच मिळतो, कर्मानें नाहीं. ज्ञानविरहित पण श्रद्धेनें केलेल्या यज्ञयागादि कर्मांनीं मिळणारें स्वर्गसुख अनित्य होय.

( २ ) आत्मज्ञान होण्यास इंद्रियनिग्रहानें बुद्धि स्थिर, निष्काम, विरक्त व सम झाली पाहिजे.

( ३ ) म्हणून इंद्रियांच्या विषयांचा पाश तोडून मोकळें व्हावें.

( ४ ) तृष्णामूलक कर्में दुःखमय व बंधक आहेत.

( ५ ) म्हणून चित्तशुद्धि होईपर्यंत कर्में केलीं तरी अखेर तीं सोडून दिलीं पाहिजेत.

( ६ ) यज्ञार्थ केलेलीं कर्में बंधक नसल्यामुळें गृहस्थाश्रमांत तीं केल्यास हरकत नाहीं.

( ७ ) देहाचे धर्म सुटत नसल्यामुळें संन्यास घेतल्यावर पोटासाठीं भिक्षा मागणें गैर नाहीं.

( ८ ) ज्ञानप्राप्तीनंतर स्वतःचें कर्तव्य शिल्लक रहात नाहीं व लोकसंग्रह करण्याची जरूर नाहीं.

( ९ ) तथापि अपवाद म्हणून अधिकारी पुरुषांनीं ज्ञानोत्तरहि आपले व्यावहारिक अधिकार जनकादिकांप्रमाणें आमरणांत चालू ठेवण्यास हरकत नाहीं.

( १० ) परंतु कांहीं झालें तरी कर्मत्यागरूपी संन्यासच श्रेष्ठ. इतर आश्रमांचीं कर्में चित्तशुद्धीचीं साधनें किंवा पूर्वतयारी असून, ज्ञानाचा व कर्मांचा स्वभावतःच विरोध आहे. म्हणून पूर्वाश्रमांत होईल तितक्या लवकर चित्तशुद्धि करून घेऊन ज्ञानोत्तर अखेर कर्मत्यागरूपी संन्यास घेणें. चित्तशुद्धि जन्मतः किंवा पूर्ववयांत झाली असेल, तर गृहस्थाश्रमाचीं कर्में करीत बसण्याचीहि जरूर नाहीं. कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें हाच खरा संन्यासाश्रम होय.

( ११ ) कर्मसंन्यास घेतल्यावरहि शमदमादिक धर्म पाळिले पाहिजेत.

( १२ ) हा मार्ग अनादि असून श्रुतिस्मृतिप्रतिपादित आहे.

( १३ ) शुक, याज्ञवल्क्यादि या मार्गानें गेले.

कर्मयोगाचीं तत्त्वें येणेंप्रमाणें आहेतः—

( १ ) मोक्ष आत्मज्ञानानेंच मिळतो, कर्मानें नाहीं. ज्ञानविरहित पण श्रद्धेनें केलेल्या यज्ञयागादि कर्मांनीं मिळणारें स्वर्गसुख अनित्य होय.

( २ ) आत्मज्ञान होण्यास इंद्रियनिग्रहानें बुद्धि स्थिर, निष्काम, विरक्त व सम झाली पाहिजे.

( ३ ) म्हणून इंद्रियांचे विषय न सोडितां यांतच वैराग्यानें म्हणजे निष्कामबुद्धीनें वागून इंद्रियनिग्रह कसोटीस लावणें निष्काम म्हणजे निष्क्रिय नव्हे.

( ४ ) दुःख व बंध कशांत आहे याचा नीट विचार केला तर असें दिसून येईल कीं, अचेतन कर्में कोणासहि बांधीत किंवा सोडीत नसून त्यांच्या ठायीं असणारा कर्त्यांच्या मनांतील काम किंवा फलाशा हेंच बंधाचें व दुःखाचें मूळ आहे.

( ५ ) म्हणून चित्तशुद्धीनंतरहि फलाशा सोडून सर्व कर्में धैर्यानें व उत्साहानें करणें. कर्में सोडूं म्हटल्यासहि सुटत नाहींत. सृष्टि म्हणजेच कर्म, त्याला विसावा नाहीं.

( ६ ) निष्कामबुद्धीनें किंवा ब्रह्मार्पणविधीनें केलेलीं सर्व कर्में हा एक मोठा 'यज्ञ' च आहे. यासाठीं स्वधर्मविहित सर्व कर्में निष्कामबुद्धीनें केवळ कर्तव्य म्हणून नेहमींच केलीं पाहिजेत.

( ७ ) पोटासाठीं भिक्षा मागणें तरी कर्मच, व तेंहि 'लाजिरवाणें.' हें कर्म जर करावयाचें तर इतर कर्मेंहि निष्कामबुद्धीनें कां करूं नयेत ? शिवाय गृहस्थाश्रमीयाखेरीज भिक्षा तरी कोण घालणार.

( ८ ) ज्ञानप्राप्तीनंतर स्वतःसाठीं कांहीं प्राप्त करून घेणें राहिलें नसलें तरी कर्म सुटत नाहीं. यासाठीं जें कांहीं शास्त्रतः प्राप्त होईल तें 'मला नको' अशा निर्मम बुद्धीनें लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊन करीत जाणें. लोकसंग्रह कोणासहि सुटत नाहीं. उदाहरणार्थ भगवंताचें चरित्र पहा.

( ९ ) गुणविभागरूप चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणें लहानमोठे अधिकार सर्वांसच जन्मतः प्राप्त होतात; आणि स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेले हे अधिकार लोकसंग्रहार्थ सर्वांनींच निःसंग बुद्धीनें आमरणांत निरपवाद चालविले पाहिजेत. कारण हें चक्र जगाच्या धारणार्थ परमेश्वरानेंच निर्माण केलेलें आहे.

( १० ) सांसारिक कर्में शास्त्रोक्तरीत्या केल्यानें चित्तशुद्धि होते हें खरें आहे तरी पण चित्तशुद्धि हा कर्मांचा एकच उपयोग असें नाहीं. जगाचा व्यवहार चालण्यासहि कर्मांची जरूर आहे. तसेंच काम्य कर्म व ज्ञान यांचा जरी विरोध असला, तरी निष्काम कर्म व ज्ञान यांमध्यें बिलकुल विरोध नाहीं. म्हणून चित्तशुद्धीनंतरहि फलाशेचा त्याग करून चातुर्वर्ण्याचीं सर्व कर्में आमरणांत निष्कामबुद्धीनें जगाच्या संग्रहार्थ चालू ठेवणें हाच खरा संन्यास होय. कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें केव्हांच उचित व शक्यहि नाहीं.

( ११ ) ज्ञानप्राप्तीनंतर फलाशात्यागरूप संन्यास घेऊन शमदमादिक धर्मांखेरीज आत्मौपम्यदृष्टीनें प्राप्त होणारे सर्व धर्म पाळणें आणि या शमानें म्हणजे शांत वृत्तीनेंच शास्त्रतः प्राप्त झालेलीं सर्व कर्में लोकसंग्रहार्थ आमरणांत करीत जाणें. निष्कामकर्महि सोडूं नये.

( १२ ) हा मार्ग अनादि असून श्रुतिस्मृतिप्रतिपादित आहे.

( १३ ) व्यास–वसिष्ठ–जैगीषव्यादि आणि जनक–श्रीकृष्णादि या मार्गानें गेले.

दोनहि मार्गांचें अंतिम साध्य मोक्षप्राप्ति हेंच आहे. [गी. र.]

**कर्मवाद**—या जगामध्यें मानवाला जी भिन्न भिन्न स्थिति प्राप्त होते व त्याला जीं निरनिराळीं दुःखें प्राप्त होतात त्यांच्या मूळ कारणाचा उलगडा भारतीय तत्त्वज्ञानपद्धति कर्मवादानें करते. भरतखंडांत कर्मवाद हा शब्द फार प्राचीन काळापासून माहीत आहे. परंतु यूरोपीयांस तो नवीन निघालेल्या थिऑसफी या संप्रदायामार्फत माहीत झालेला आहे. भारतीयांची अशी समजूत आहे कीं जीवात्म्यास अनेक जन्मांच्या फेऱ्यांतून जावें लागतें व त्याला विशिष्ट जन्मांत जें सुख अथवा दुःख मिळतें तें त्याच्या पूर्वजन्मांतील कर्माचें फल होय. ही उपपत्ति सर्वथैव समाधानकारक नाहीं. कारण हिच्यामुळें अगदीं प्रारंभीच्या जन्मासंबंधीचा कांहींच उलगडा होत नाहीं. तथापि हिच्या मुळें बऱ्याच लोकांस समाधान वाटतें. पुष्कळांची नैतिक आचरणाकडे प्रवृत्ति होते व कांहीं अंशीं ती सत्यहि आहे. कर्मवाद अथवा कर्माचें फळ भोगावेंच लागतें ही कल्पना भरतखंडांत वैदिक काळापासून चालत आली आहे. कर्मांची

कल्पना ब्राह्मणग्रंथांत आढळते. बृहदारण्यक उपनिषदांत ( ३.२,३ ) व इतर उपनिषदांत कर्मवाद वाढीस लागल्याचें दिसतें. नैतिक कल्पनांमध्यें या तत्त्वास बरेंच प्रामुख्य दिलेलें आढळतें. एखादा मनुष्य जर कुरूप अथवा रोगी स्थितींत जन्मास आला तर त्याचें कारण त्यानें पूर्वजन्मीं केलेलें पाप होय असें मानीत.

महाभारतांत अनेक ठिकाणीं कर्माचें प्राबल्य वर्णिलें आहे. उदाहरणार्थ शांतिपर्वामध्यें १८१ व्या अध्यायांत असें म्हटलें आहे कीं, मनुष्य कितीहि वेगानें धांवूं लागला तरीहि पूर्वजन्मींचें कर्म त्याचा पाठलाग करीत असतें. तो निजला तरीहि तें त्याजबरोबर निजलेलें राहतें. तो उभा राहिला तर त्याच्या समीप उभें रहातें; तो चालूं लागला तर त्याच्या मागून चालूं लागतें आणि तो कर्म करूं लागला तर तेंहि कर्म करूं लागतें. सारांश प्राण्याच्या मागें त्याचें प्राक्तन-कर्म छायेसारखें जडलेलें असतें. ज्या ज्या पुरुषानें पूर्वी आपल्या इच्छेप्रमाणें जें जें कर्म केलें असेल तें तें सदैव त्याला एकट्यालाच भोगावें लागतें. स्वकर्मफल हा ज्याचा ठेवा आहे व दैव ज्याचें संरक्षण करीत आहे अशा या प्राणिसमुदायाला जिकडूनतिकडून काळ खेंचीत असतो. तसेंच २११ व्या अध्यायांत वासनेच्या योगानें कर्म घडतें व कर्माच्या योगानें वासनेची उत्पत्ति होते अशा रीतीनें हें अनादि आणि अनंत चक्र चालू आहे असें सांगितलें आहे. तसेंच अनुशासनपर्वांत ५७ व्या अध्यायामध्यें कोणतें कर्म केलें असतां कोणतें फल मिळतें याची एक लांबलचक यादी दिली आहे. पण त्यांत कोणतें दान दिलें असतां त्यापासून पुढें काय मिळतें हेंच विशेषतः सांगितलें आहे. अशा प्रकारचीं कर्में व त्यांचीं फलें यांची यादी २२ व्या अध्यायांतहि आढळते.

भगवद्गीतेंतहि कर्मवादाचें विवेचन आढळतें. लोकमान्यांनीं आपल्या गीतारहस्यांत कर्मविपाकाचें सुंदर विवेचन केलें आहे. त्याचा सारांश असा:—

मनुष्यानें केलेल्या अशुभ कर्माचे मनूनें कायिक, वाचिक व मानसिक असे तीन भेद करून त्या त्या कर्मापैकीं शिंदळकी, हिंसा व चोरी हीं तीन कायिक; कडू, खोटें, उणें आणि विसंगत बोलणें हीं चार वाचिक; आणि परद्रव्याभिलाष, दुसऱ्याचें वाईट चिंतणें आणि खोटा आग्रह हीं तीन मानसिक, मिळून दहा प्रकारचीं अशुभ किंवा पापकर्में सांगितल्यावर ( मनु. १२. ५–७; म. भा. अनु.१३ ) पुढें त्यांचीं फलें दिलीं आहेत. तथापि हे भेद कांहीं कायमचे नाहींत. कारण याच अध्यायांत पुढें एकंदर कर्माचे सात्विक, राजस आणि तामस असे तीन भेद केले असून प्रायः भगवद्गीतेंत वर्णन केल्याप्रमाणेंच या तीन प्रकारच्या गुणांचीं किंवा कर्माचीं लक्षणें दिलेलीं आहेत ( गी. १४. ११–१५; १८. २३–२५: मनु. १२. ३१–३४ ). परंतु कर्मविपाकप्रकरणांत कर्माचा जो विभाग सामान्यतः आढळून येतो तो या दोहोंहून निराळा असून त्यांत कर्माचे संचित, प्रारब्ध व क्रियमाण असे तीन भेद केलेले असतात. कोणाहि मनुष्यानें आजच्या क्षणापर्यंत केलेलें जें कर्म–मग तें या जन्मांत केलेलें असो वा पूर्वीच्या जन्मांत केलेलें असो तें सर्व–यास ' संचित ' म्हणजे ' सांठविलेलें ' कर्म असें म्हणतात. या संचितास ' अदृष्ट ' किंवा मीमांसकांच्या परिभाषेंत ' अपूर्व ' अशीं दुसरीं नांवें आहेत. हीं नांवें पडण्याचें कारण असें कीं, कर्म किंवा क्रिया ज्यावेळीं करावी त्या वेळेपुरतीच ती दृश्य असते; आणि ती वेळ गेल्यावर पुढें तें कर्म स्वरूपतः शिल्लक न रहातां त्याचे सूक्ष्म अतएव अदृश्य असे अपूर्व किंवा विलक्षण परिणाम मात्र शिल्लक रहातात ( वे. सू. शां. भा. ३. २. ३९—४० ). कांहीं म्हटलें तरी ' संचित ' ' अदृष्ट ' किंवा ' अपूर्व ' याचा अर्थ या क्षणापर्यंत जीं जीं कर्में केलीं असतील त्या सर्वांच्या परिणामांचा ' सांठा ' हें निर्विवाद आहे. हीं संचित कर्में सर्व एकदम भोगणें शक्य नसतें. कारण या संचित कर्मपरिणामांपैकीं कांहीं चांगलें तर कांहीं वाईट म्हणजे परस्परविरोधी फलें देणारे असूं शकतात. उदाहरणार्थ, कांहीं संचित स्वर्गप्रद तर कांहीं नरकप्रद असल्यामुळें त्या सर्वांचीं फळें एके काळीं उपभोगणें शक्य होत नाहीं; एकामागून एक भोगिलीं पाहिजेत. म्हणून ' संचिता ' पैकीं जेवढ्या कर्मांचीं फलें भोगण्यास प्रथम सुरुवात झाली तेवढ्यांसच ' प्रारब्ध ' म्हणजे ' सुरू झालेलें संचित ' असें म्हणतात. वेदान्तसूत्रांत प्रारब्धासच ' प्रारब्धकार्य ' आणि जीं प्रारब्ध नाहींत त्यांस ' अनारब्धकार्य ' अशीं नांवें दिलीं आहेत ( वे. सू. ४. १, १५ ). संचितांपैकीं जीं कर्में प्रारब्ध झालीं तीं भोगल्याखेरीज सुटका नाहीं "प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः। " पण अनारब्धकार्यकर्माची गोष्ट तशी नाहीं. ज्ञानानें या सर्व कर्मांचा अजीबात नाश करितां येतो. प्रारब्धकार्य व अनारब्धकार्य यांमध्यें जो हा महत्वाचा भेद आहे त्यामुळें ज्ञानी पुरुषास ज्ञानोत्तरहि नैसर्गिकरीत्या मरण येईपर्यंत म्हणजे देहाच्या जन्माबरोबर प्रारब्ध झालेलीं कर्में संपेपर्यंत, शांतपणें वाट पहावी लागते. तसें न करितां हट्टानें देहत्याग करील तर ज्ञानानें त्याच्या अनारब्ध कर्मांचा जरी क्षय झाला असला तरी त्याच्या हट्टामुळें ज्या देहारंभक प्रारब्धकर्मांचा भोग अपुरा राहिला तीं भोगण्यास त्याला पुनः जन्म घ्यावा लागेल; व मग अर्थातच मोक्ष अंतरेल असें वेदान्त व सांख्य या दोन्ही शास्त्रांत सांगितलें आहे ( वे. सू. ४. १, १३–१५ व सां. का. ६७ ).

मीमांसकदृष्ट्या सर्व कर्मांचे नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध असे चार भेद होतात. पैकीं संध्यादिक नित्य कर्में न केल्यास पाप लागतें, आणि नैमित्तिकांचें निमित्त उपस्थित झाल्यास तीं करावीं लागतात. म्हणून हीं दोन्हीं कर्में केलीं पाहिजेत असें या मीमांसकांचें म्हणणें आहे. बाकी राहिलेलीं काम्य आणि निषिद्ध. पैकीं निषिद्ध कर्में केल्यानें

पाप लागतें म्हणून तीं करूं नयेत; व काम्य कर्में केल्यानें त्यांचीं फलें भोगण्यास पुनः जन्म घ्यावा लागतो म्हणून तींहि करूं नयेत. अशा रीतीनें म्हणजे निरनिराळ्या कर्मांच्या परिणामांचा तारतम्य विचार पाहून मनुष्य कांहीं कर्में सोडून देईल व कांहीं यथाशास्त्र करीत राहील तर तो आपो-आपच मुक्त झाला पाहिजे. कारण, प्रारब्ध कर्में या जन्मांतील उपभोगानें संपलीं आणि या जन्मांत सर्व नित्य नैमित्तिक कर्में केल्यामुळें व निषिद्ध वर्जिल्यामुळें नरकगति घडत नाहीं व काम्य कर्में सोडिल्यामुळें स्वर्गादिकांतील सुखें भोगण्याचीहि अवश्यकता उरत नाहीं. इहलोक, नरक आणि स्वर्ग या तिन्ही गती याप्रमाणें सुटल्यावर मोक्षांखेरीज आत्म्याला दुसरी गतीच रहात नाहीं. या वादास 'कर्ममुक्ति' किंवा 'नैष्कर्म्यसिद्धि' असें म्हणतात. पण मीमांसकांच्या वरील युक्तींत हें नैष्कर्म्य पूर्णपणें साधत नाहीं, असें वेदान्त शास्त्रानें ठरविलें आहे (वे. सू. शां. भा. ४. ३, १४); आणि गीतेंतहि याच अभिप्रायानें ".कर्म न केल्यानें नैष्कर्म्य होत नाहीं व सोडल्यानें सिद्धीहि मिळत नाहीं" असें म्हटलें आहे (गी. ३. ४).

अध्यात्मशास्त्राप्रमाणें या जगांतील सर्व पदार्थांचें कर्म (माया) आणि ब्रह्म हे दोनच वर्ग होतात; म्हणून ज्या कोणाला यांपैकीं एका वर्गांतून म्हणजे कर्मांतून सुटण्याची इच्छा आहे त्यानें दुसऱ्या वर्गांत म्हणजे ब्रह्मस्वरूपांत शिरावें एवढाच काय तो एक मार्ग त्यास खुला रहातो. "माझी कर्मांच्या ठायीं आसक्ति नसल्यामुळें मला कर्मांचा लेप लागत नाहीं हें ज्यानें जाणिलें तो कर्मपाशापासून मुक्त होतो" असें जें गीतेंत भगवंतांनीं म्हटलें आहे (गी. ४. १४ व १३. २३) त्यांतील तात्पर्य हेंच आहे. या ठिकाणीं 'ज्ञान' म्हणजे नुसतें शाब्दिक ज्ञान किंवा नुसती मानसिक क्रिया असा अर्थ नसून वेदान्तसूत्रांवरील शांकरभाष्यांत आरंभींच सांगितल्याप्रमाणें 'ज्ञान' म्हणजे "मानसिक ज्ञान प्रथम होऊन इंद्रियांचा जय केल्यावर ब्रह्मीभूत होण्याची अवस्था किंवा ब्राह्मी स्थिति" एवढा सर्व अर्थ दर वेळीं विवक्षित आहे हें विसरतां कामा नये.

तथापि बौद्ध संप्रदायांत कर्मवादाची वाढ पराकाष्ठेची झाली. इतर ठिकाणीं कर्मवादाचा, फक्त नीतितत्वें उल्लंघन केल्यास अनिष्ट फळ मिळतें एवढेंच दाखविण्यास पुरेसा उपयोग केलेला आढळतो. परंतु बौद्ध ग्रंथामध्यें सर्वच गोष्टींच्या मुळाशीं कर्म आहे व कर्मानें सर्व प्रश्नांचा उलगडा होतो असें दाखविलें आहे. म्हणून बौद्धांच्या कर्मवादाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे.

भारतीय तत्वज्ञानपद्धतींत सामान्यतः आत्म्याचें अस्तित्व ग्रहीत धरलें आहे. परंतु बौद्ध तत्वज्ञानांत जीव म्हणजे कर्मांच्या योगानें अनेक द्रव्यांचा एकत्र झालेला क्षणोक्षणीं बदलणारा समुच्चय असें म्हटलें आहे. यामुळें बौद्ध पुनर्जन्म मानीत नाहींत. जेव्हां पुष्कळ मनुष्य मृत होतो तेव्हां एक नवीन मनुष्य जन्मास येऊन मृत जीवाचें कर्म ग्रहण करितो अशी त्यांची उपपत्ति आहे. किंवा मनुष्याचा विशिष्ट जन्म हा त्यानें आपल्या कर्माबद्दल भोगावयाचा जन्मपरंपरेंतील एक विशिष्ट काल असून पूर्वसंचितापैकीं राहिलेलें कर्मफळ भोगण्यास त्याला त्या विशिष्ट जन्मानंतर आणखीहि जन्म घ्यावे लागतात.

ब्राम्हणी तत्वज्ञानाप्रमाणें दैव हें कर्मापेक्षां श्रेष्ठ आहे व ही सृष्टि ब्रह्मदेवानें निर्माण केलेली आहे. परंतु बौद्ध तत्वज्ञानाप्रमाणें पूर्वार्जित कर्म हेंच दैव, व सर्व जीवांचें एकवटलेलें कर्म हेंच सृष्टीचें कारण होय. धार्मिक कृत्यें, तप व त्यांपासून मिळणारें पुण्य यांस पूर्वीं बरेंच महत्त्व होतें. कर्माला प्रथम मानसिक चेतना आणि नंतर शारीरिक क्रिया या दोन गोष्टी अवश्य असतात. कांहीं क्रिया केवळ मानसिकच असतात परंतु मानसिक क्रियेपेक्षां प्रत्यक्ष शारीरिक क्रियेचें महत्त्व अधिक आहे. शत्रूला प्रत्यक्ष मारणें हें हें केवळ मारण्याची इच्छा करण्यापेक्षां अधिक महत्वाचें आहे.

कर्म दोन प्रकारचें असतें. शुद्ध अथवा अशुद्ध. शुद्ध कर्म वासना, अज्ञान इत्यादिकांपासून अलिप्त असतें म्हणून त्याचें फल भोगावें लागत नाहीं; अशा कर्मापासून संसाराचा उच्छेद होऊन निर्वाणप्राप्तीचा मार्ग सुकर होतो. इतर सर्व कर्में अशुद्ध होत व त्यांचे पुन्हां चांगले व वाईट, पुण्यकारक व पापदायक असे फलांवरून भेद करतां येतात. या जगांत सुख मिळावें म्हणून केलेलीं कर्में वाईट व परलोकांत सुख मिळावें म्हणून केलेलीं कर्में चांगलीं असें समजतात. त्याच प्रमाणें दुसऱ्याचें बरें किंवा वाईट करण्याच्या उद्देशानें केलेलीं कर्में सुचरित्रें किंवा दुश्चरित्रें मानिलीं जातात.

सुचरित्रांचें मूळ अलोभ, अद्वेष, आणि अमोह, या तीन गोष्टींत असतें. सत्कृत्याच्या विरुद्ध केलेलीं सर्व दुष्कृत्यें होत, तसेंच मिथ्यादृष्टीनें केलेलीं सत्कृत्येंहि मिथ्या होतात. सत्कृत्यांचें फल मनुष्यानें जाणून बुजून (दृष्टिचरित) इतर पाप केलें असल्यास मिथ्या होतें. अर्थात पशु, षंढ इत्यादिकांचीं दुष्कृत्यें सत्कृत्यांचें फल नाहींसें करूं शकत नाहींत.

कर्मांचे तीन विभाग करितात; कुशल, अकुशल आणि अव्याकृत; म्हणजे चांगलें फल देणारें, वाईट फल देणारें व चांगलें आणि वाईट असें कोणतेंच फल न देणारें. पुण्य, अपुण्य व अनिंद्य अशीहि कर्मांची एक विभागणी केलेली आढळते. वासनायुक्त केलेलें सत्कृत्य पुण्यकारक समजलें जातें. जेव्हां हें कर्म पारलौकिक असेल तेव्हां त्याला स्थिर असें म्हणतात, व त्याचें फल परलोकांत मिळतें. कोणतेंहि वाईट कृत्य अपुण्य होय. जें कृत्य दुःखाचा अंत करितें व निर्वाण जवळ करितें त्यास कुशल म्हणतात. पण त्यास पुण्यकर्म म्हणत नाहींत.

कर्मफलास विपाक असें म्हणतात. वरीलें तीन प्रकारचीं कर्में, सुखवेदनीय, असुखवेदनीय, किंवा सुखासुख-वेदनीय या नांवानेंहि संबोधितात. कर्माचे नियत व अनियत म्हणजे निश्चित फलदायी व अनिश्चित फलदायी असेहि भेद करितात.

पांच प्रकारच्या कर्मांनां आनंतर्य ( ज्यांचें फल दुसऱ्या कोणत्याहि चांगल्या कर्मानें चुकवितां येत नाहीं असें ) म्हणतात. यांत मातृवध, पितृवध वगैरे कर्में येतात. इतर सर्व कर्मांचें फल क्षांति, अनागामी ( पुनर्जन्मरहित ) वृत्ति अथवा अर्हत्पद प्राप्त केलें असतां चुकवितां येतें. मनुष्याला त्याच्या कर्मामुळें जन्म प्राप्त होतो परंतु विशिष्ट जन्म प्राप्त होणें हें अनेक कर्मांचें सामुच्चयिक फल असतें आणि त्यामुळें निरनिराळीं मनुष्यें भिन्न भिन्न परिस्थितींत जन्मास येतात. सत्कृत्यें व दुष्कृत्यें यांमध्यें दहा कर्मांस कर्मपथ असें नांव देऊन त्यांचा प्रामुख्यानें निर्देश केला आहे. त्यांत हिंसा, चौर्य, व्यभिचार हे कायिक; असत्य, निंदा, गर्व, व मिथ्याभाषण हे वाचिक आणि लोभ असूया व मिथ्यादृष्टि हे मानसिक कर्मपथ असून पहिले दोन वर्ग चेतनायुक्त कायिक कर्मांत मोडतात व तिसरा वर्ग फक्त मानसिक किंवा चेतनायुक्त आहे. प्रत्येक कर्माचे पुन्हां पूर्व तयारी प्रत्यक्ष कर्म व पश्चातकृत्य (पृष्ठ) असें पृथक्करण करतां येतें, उदाहरणार्थ.—एखाद्या खाटिकानें एखादा पशु विकत आणून त्याच्या वधाची तयारी करणें,त्याचा प्रत्यक्ष वध करणें व त्याच्या मांसाचा विक्रय करणें हीं तीन त्या कर्याचीं अंगें होत. यापैकीं प्रत्यक्ष वध करणें यासच कर्मपथ म्हणतात. व त्याचेंच विशेषतः त्यास फल भोगावें लागतें. कोणतेंहि कृत्य कर्मपथ या संज्ञेस प्राप्त होण्यास त्या कृत्याचें पूर्ण ज्ञान कर्त्यास अवश्य असावें लागतें. चुकीनें केलेलें कृत्य या संज्ञेंत येत नाहीं. जो मनुष्य अजाणतः एखाद्या मनुष्याचा घात करितो तो घात करण्याचें पातक करितो, परंतु मनुष्यवधाचें पातक करीत नाहीं. जैनांच्या मतें ज्याप्रमाणें अग्नि जाणत्यास व अजाणत्यास दोघांसहि सारखाच दग्ध करतो त्याप्रमाणें जाणता व अजाणता मनुष्यवध करणारा सारखाच दोषी असतो. तथापि यामुळें बराच घोंटाळा होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थः—एखाद्या माणसाला तप करावयास सांगून शारीरिक क्लेश देणें हेंहि पाप होईल. गर्भ व गर्भवती स्त्री हीं दोन्हीहि एकमेकांस क्लेश देत असल्यामुळें दोषी होतील. खून झालेला मनुष्यहि खुनी मनुष्यास पुढें होणाऱ्या त्रासामुळें दोषी ठरेल व एखाद्या मनुष्यानें दुसऱ्याच्या हातून खून केल्यास तो मुळींच दोषी ठरणार नाहीं, कारण आपण दुसऱ्याच्या हातानें अग्नि घेतल्यास आपला हात भाजत नाहीं.

वरील जैन विचारसरणी बरीच पटण्यासारखी आहे. पण दुसऱ्या एका ठिकाणीं मोठ्या मौजेचे विचार दृष्टीस पडतात. जर एखाद्या मनुष्यानें दुसऱ्याच्या स्त्रीबरोबर ती आपली स्त्री आहे असें समजून संभोग केला तर त्यास व्यभिचाराचा दोष लागत नाहीं. जर एखाद्या पुरुषानें दुसऱ्याच्या स्त्रीबरोबर तिसऱ्याच एका मनुष्याची स्त्री आहे असें समजून संभोग केला तर तो दोषी आहे किंवा नाहीं याबद्दल मतभेद आहे. कांहींच्या मतें उद्दिष्ट स्त्री ही परस्त्री असल्यामुळें तो दोषी होतो तर कांहींच्या मतें उद्दिष्ट स्त्री व उपभुक्त स्त्री या भिन्न असल्यामुळें त्यास दोष येत नाहीं, असो.

निरनिराळ्या कर्मांचें फल निरनिराळें असतें व त्याप्रमाणें फलानुसार निरनिराळ्या कर्मांची योग्यताहि ठरवितां येते. मनुष्याची भावी उन्नति अगर अधोगति ही त्याच्या शीलावरून ठरते. दान देणें हें सत्कृत्य असलें तरी त्याचें फल स्वतंत्रतेनें मनुष्यास संपत्ति अगर भोग या रूपानें प्राप्त होतें. [ वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, पू. मीमांसा, महाभा. तिपिटक इ. ]

**कर्माकर्मविचार**—कर्माकर्मविचार म्हणजे विवक्षित कृत्य नैतिक दृष्ट्या योग्य आहे किंवा अयोग्य आहे यासंबंधीं विचार अथवा व्यावहारिक नीति. परंतु नीतिविषयक कल्पना वरचेवर बदलत असतात. नीति म्हणजे एक तऱ्हेचा बाह्य वस्तूंवर अवलंबून असणारा धर्म अथवा कायदा अशी कल्पना एके वेळीं होती. तर एका वेळीं नीति ही एक तऱ्हेची अंतःप्रेरणा किंवा मनःप्रवृत्ति होय, अशीहि कल्पना पुढें आलेली आहे व या दोन कल्पनांस अनुसरून कर्माकर्मविचाराची वाढ दोन दिशांनीं झाली आहे. पहिल्या कल्पनेचे अभिमानी तर्कशास्त्र व शासन यांवर जोर देतात तर दुसऱ्या कल्पनेचे अभिमानी अंतःकरणप्रवृत्ति, सदसद्विवेकबुद्धि, युक्ति, भावना इत्यादिकांस महत्व देतात.

प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यांच्या नीतिकल्पना धर्मापेक्षां वेगळ्या नव्हत्या. व त्यांचा धर्म व उपासनासंप्रदाय यांतहि फारसा भेद नव्हता. जी गोष्ट त्यांच्या उपास्यांस अप्रिय वाटेल अशी त्यांची कल्पना असे ती करणें ते पाप अथवा अकर्म समजतात. पुढें ईश्वराच्या कांहीं विशिष्ट आज्ञा (उदाहरणार्थ वेद, यहुद्यांच्या दहा आज्ञा ) असून त्यांच्याविरुद्ध वागणें म्हणजे अकर्म अशी कल्पना झाली. व आर्यांमध्यें 'वेदोऽखिलो धर्ममूलम्' हें तत्व प्रस्थापित झालें. पुढें तर्कशास्त्रानुरोधानें या आज्ञांचा अर्थ करण्याचा प्रयत्न करीत असतां नीतिशास्त्रें व धर्मशास्त्रें उत्पन्न झालीं व निरनिराळे आचारनियम ( उदाहरणार्थ अमुक पदार्थ अमुक दिवशीं खाऊं नये किंवा कमरपट्टा घालूं नये ) तयार झाले. याच्या उलट ग्रीसमध्यें धर्मग्रंथच नसल्यामुळें नीतीच्या कल्पना अगदीं निराळ्या तऱ्हेनें वाढीस लागल्या. तेथें कर्तव्यकर्मास प्राधान्य देण्यांत आलें व तेथें नीतिविदांच्या पुढें, केव्हांहि खोटें बोलूं नये काय, वकिलानें दोषी म्हणून ठाऊक असलेल्या पक्षकाराची तरफदारी करावी किंवा नाहीं, यासारखे प्रश्न येऊं लागले. अशा वेळीं सिसरो, सेनेका यांसारखे तत्ववेत्ते युक्तिवादास अनुसरूं लागले. सिसरोनें आपल्या मुलास 'ऐकावें जनाचें व करावें मनाचें' या तत्वाचा बोध केला

आहे. परंतु त्यावेळच्या तत्ववेत्यांस हें पटेना. ते अशा वेळीं एका कर्तव्यापुढें दुसरें कर्तव्य उभें करून किंवा कर्तव्याविरुद्ध आत्महित ठेवून संशय उत्पन्न झालेल्या मनुष्यांस विशिष्ट गोष्ट केली असतां एक कर्तव्यभंग अथवा मूर्खपणा पदरांत येतो असें दाखवीत. अर्थात अशा कोड्याकडे लोक फारसें लक्ष देत नसत. रोमन लोकांत तर तात्विक विचार करणें म्हणजे कांहीं तरी गडबडगुंडा करणें अशी म्हणच पडली होती.

ख्रिस्ती तत्वज्ञानांत उद्देशास प्रामुख्य देण्यांत आलें. चांगल्या बुद्धीनें केलेलें कोणतेंहि कर्म चांगलेंच अशी कांहीं ख्रिस्ती तत्ववेत्यांची विचारसरणी होती. परंतु कांहीं कोत्या विचारांच्या मंडळीला केवळ मनःप्रवृत्ति अथवा उदात्त विचार हे निश्चित मार्गदर्शक होत असें वाटेना व याकरितां ते आचारनियमांकडेच जास्त लक्ष देत, व यामुळें नवे नवे आचारनियम अस्तित्वांत येऊं लागले. व दोष व प्रायश्चित्तें यांच्या मोठमोठ्या लांबलचक याद्या बनल्या. तसेंच पातकोच्चार करणें ही गोष्ट जी पूर्वी केवळ ऐच्छिक व क्षुल्लक समजली जात असे तीच पुढें फार महत्वाची बनली. याविरुद्ध सुधारणाचळवळीनें खटपट करून पुन्हां वैयक्तिक सदसद्विवेक बुद्धीस महत्व दिलें. रोमन कॅथोलिक लोकांनीं याविरुद्ध खटपट करून आपल्या बाजूस लोक मिळविण्याकरितां असें तत्व पुढें आणलें कीं, पापी मनुष्यानें पातकोच्चार केल्यावर उपाध्यायानें त्यास त्यापासून मुक्त केलेंच पाहिजे. परंतु यामुळें कोणतेंहि पातक केलें असतां उपाध्यायापुढें त्याचा उच्चार केला असतां मोकळें होण्याचा सोपा उपाय सांपडल्यामुळें पातकी लोकांची आयतीच सोय झाली व प्रत्यक्ष समाजसुधारणा दूरच राहिली. यानंतर अठराव्या शतकांत युक्तिवादास प्राधान्य मिळालें व जें मला चांगलें वाटतें तें चांगलें व वाईट वाटतें तें वाईट होय असल्या प्रकारची विचारसरणी प्रचलित झाली. यानंतर नीतिशास्त्राची व मानसशास्त्राची वाढ होऊन 'मला हें बरोबर वाटतें'; 'मला तें असें वाटतें' अशा प्रकारच्या भाषेंत मनुष्याचे विचार प्रकट होऊं लागले आहेत व आप्तवाक्य व दृढ नियम यांस फांटा मिळत चालला आहे. [ वेद इ. बायबल; ग्रीक तत्ववेत्यांचे ग्रंथ ]

**कर्मान**—इराण. कर्मान हें याच नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर असून उ. अ. ३०°१७' व पू. रे. ५६°५९' यांच्या दरम्यान ६१०० फूट उंचीवर आहे. याची लोकसंख्या ६०,००० आहे. यांपैकीं २००० पारशी, १०० यहुदी, व कांहीं शिकारपुरी हिंदू लोक आहेत. येथें टपाल व तारऑफिसें आहेत. येथें ब्रिटिश व रशियन वकिलाती असून "इंपीरियल बँक ऑफ पर्शिया" ची एक शाखाहि येथें आहे. या भागांत धान्य फारच थोडें पिकतें. एका प्रवाशानें असें लिहून ठेवलें आहे कीं, घोड्याकरितां १ मण जवांऐवजीं एक मण केशर कर्मान येथें सहज मिळूं शकेल. येथें गालिचे व बुरणूस पुष्कळ होतात. येथील गालिच्याची विणकामाबद्दल व टिकाऊपणाबद्दल फार ख्याती आहे या शहराचें जुनें नांव गवाशीर असें होतें. या शहराच्या लगत टेंकड्यावर दगडी चबुत्र्यावर कच्च्या विटांनीं बांधलेले जुनाट किल्ले आतां मोडकळीस आले असून ते प्रेक्षणीय आहेत. शहरांतील मशिदींपैकीं दोन मशीदी प्रेक्षणीय आहेत, पैकीं मस्जिद-इ-जामा ही १३४९ मध्यें मुजफरीद राजा मुबारिझ-एद्-दिन महंमद यानें बांधली व दुसरी मस्जिद-इ-मलिक ही मलिक कव्हेर्द सेल्जुक यानें ( १०४१-१०७२ ) बांधली होती.

**करवट**—भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा पांडवांच्या वेळेस पूर्वेकडे वंग देशाच्या पुढें असून, त्या काळीं तेथें ताम्रलिप्त नांवाचा राजा होता. ( महा. सभा. अ. ३. )

**कऱ्हाड, तालुका.**—मुंबई इलाखा. सातारा जिल्ह्यांतील तालुका. क्षे. फ. ३७८ चौ. मै. यांत कऱ्हाड हें मुख्य ठिकाण व दुसरीं ९८ लहान गांवें आहेत. एकंदर लो. सं. (१९११) १३२५३१. हा तालुका कृष्णा खोऱ्याचा एक भाग असून याच्या दोन्हीं बाजूला दक्षिणोत्तर डोंगरांच्या रांगा आहेत. आगाशी, वहिरोबा, कमलेश्वर, मंडकेश्वर, नाइकबा, चंद्रोबा, चोरोबा व थोरोबा हे डोंगर मुख्य आहेत. आगाशीच्या डोंगरांत कोरींव लेणीं आहेत. पश्चिम डोंगरांतून कोयना नदी येऊन कऱ्हाड येथें कृष्णेस मिळते. प्रदेश सामान्यतः सपाट व खुला असून डोंगराच्या बाजूस मात्र चढउतार आहेत. बागा व मळे यांच्या योगानें या तालुक्यांतील प्रदेशाला मनोरमता आली आहे. येथील जमीन चांगली सुपीक आहे. हिंवाळ्यांत दिवसा थंडी फारशी नसते परंतु रात्रीं बरीच असते व उन्हाळ्यांत कऱ्हाड येथें उष्मा बराच होतो. वार्षिक पाऊस सरासरी ३० इंच पडतो.

**कऱ्हाडचा आसमंत प्रदेश.**—कऱ्हाड येथें सांपडलेल्या ताम्रपटांत त्याला करहाट म्हटलें आहे. येथील शिलालेखांत असलेल्या कल्लिआदि बारा गांवांचीं हल्लींचीं नांवें खालील प्रमाणें आहेतः—

(१) कल्ली, (२) कंकी, (३) आजूर, (४) सिजूर, (५) आठी, (६) सल्गन, (७) बेकोंकी, (८) तितूर, (९) खटाव, (१०) निग्गूर, (११) पांद्रेगांव, (१२) तावशी. शिलालेखांत हीं गांवें अग्रणी नदीच्या आसपास आहेत असें दिलें आहे. ही नदी हल्लीं अगुर्णी या नावानें प्रसिद्ध आहे. या गावांपैकीं सल्गर हें पूर्वी सेलगार या नांवानें प्रसिद्ध होतें. आजूर याला हल्लीं अजुर म्हणतात. व अग्रणीच्या पूर्वेस व कांगानोलीपासून तें सात मैल आहे. सिजुर हें चुकीनें सिपुरबद्दल पडलेलें नांव आहे व हें सिपुर कांगानोलीच्या दक्षिणेस सात मैलांवर आहे.

**करहाट चार हजार प्रांत.**—या प्रांतांत चार हजार शहरें असावीं म्हणून याला करहाट चार हजार प्रांत म्हणत. हल्लींच्या कऱ्हाड गावांवरून या प्रांताला हें नांव पडलेलें असावें. हा प्रांत कृष्णा नदीच्या पूर्वे व दक्षिण किनाऱ्यांवर कऱ्हाड व विट्टी यांच्यामध्यें होता. या प्रांताची

सीमा निश्चित करण्यासारखी माहिती अद्याप उपलब्ध झाली नाहीं( इं. अँ. ३० पा. ३७४–८२ ).

श ह र—सदर्न मराठा रेलवेवर साताऱ्याच्या दक्षिणेस एकतीस मैलांवर असून कृष्णा व कोयना या नद्यांच्या संगमावर आहे. कोयना उत्तरेकडून आणि कृष्णा नैर्ऋत्येकडून वहाते. नद्यांचा संगम पूर्वेकडे सरासरी १॥ मैल वहात जाऊन दक्षिणेकडे वळतो; व त्या काटकोनांत हें शहर आहे. याची वायव्येकडील जमीन कोयना नदीच्या तीरापेक्षां ८० ते १०० फूट उंच आहे व उत्तरेकडील जमीन जरा खालवट असून नदीच्या बाजूस घाट आहेत. वायव्येस ६ मैलांवर वसंतगडकिल्ला, ईशान्येस ४ मैलांवर सदाशिवगड टेकडी आणि आग्नेयेस ४ मैलांवर अगाशिव नांवाचें पर्वताचें शिखर आहे.

या ठिकाणीं पुणें-बेळगांव, कऱ्हाड–चिपळूण, कऱ्हाड-तासगांव, कऱ्हाड-विजापूर आणि कऱ्हाड--मसूर या पांच रस्त्यांचा संगम आहे. याचें क्षेत्रफळ सरासरी औरसचौरस अर्धामैल असून यांतील जमीन काळी ( सुपीक ) आहे. याच्या वायव्येस असलेला (मातीचा) किल्ला पहिल्यानें मुसुलमानांच्या ताब्यांत होता. नंतर पंतप्रतिनिधींकडे होता आणि त्यांच्यापासून१८०७ सालांत पेशव्यांनीं जिंकला. त्या किल्याजवळ व नद्यांच्या संगमाजवळ देवळें आहेत. पाण्याच्या उलटया ओघानें वाळू वगैरे आंत येऊं नये म्हणून पूर्वी त्या ठिकाणीं पक्के बांध घातलेले होते; परंतु ते आतां कोसळून पडले आहेत. शहरांतून दक्षिणोत्तर जाणाऱ्या रस्त्याच्या बाजूनें मुख्य व्यापारी रहातात व तेथें दर रविवारीं बाजार भरतो. बाजाराजवळ मुसुलमानांची वस्ती पुष्कळ आहे व जवळच एक मशीद आहे. विजापूरच्या राजानें यांत पूर्वी नेमलेल्या काजीचा वंशज अद्याप आहे. यांतील मुख्य मुख्य रस्ते रुंद असून स्वच्छ आहेत. यांतील कांहीं भागांत नळानें पाणी देण्याची सोय केली आहे.

देवळें—यांत एकंदर ५२ देवळें आहेत. त्यांपैकीं कृष्णावाई देवी, काशीविश्वेश्वर आणि कमलेश्वर महादेव यांचीं देवळें मुख्य आहेत, व तीं सर्व कृष्णानदीच्या घाटावर आहेत.

किल्ला:—ईशान्येच्या बाजूस पंतप्रतिनिधींचा ( मातीनें बांधिलेला ) किल्ला असून त्यांत त्यांचा एक दुमजली वाडा आहे. वाड्यांतील दिवाणखाना ८३ फूट लांब, ३१ फूट रुंद व १५ फूट ऊंच आहे व त्याच्या पूर्वेकडील भागांत भवानी देवीची छत्री आहे. हा किल्ला परशुराम श्रीनिवास प्रतिनिधींच्या मातुश्री काशीबाई यांनीं १८०० त बांधिला. किल्याच्या पश्चिमेकडील भागाच्या शेवटीं पायऱ्यांची एक विहीर आहे. ती कोयना नदीच्या पात्रापेक्षांहि खोल असून नदीचें पाणी नळानें विहीरींत घेतलें आहे. विहीरीचें तोंड १३६ फूट लांब आहे. विहीरींतल्या पायऱ्या, कमानी व चुनेगच्चीचें काम यावरून असें दिसतें कीं ती मुसुलमानांनीं बांधिली असावी. विहीरीच्या आंतल्या बाजूस चुनेगच्चींतच तीन ठिकाणीं खोल्या आहेत. किल्ल्यावर एकंदर बारा बुरुज आहेत, व भोंवतालची तटबंदीची भिंत ६ फूट उंच असून तिच्यांत जंग्या आहेत. १८७५ त जो पूर आला होता त्यानें किल्ल्याचें बरेंच नुकसान केलें. हल्लीं किल्ल्याची स्थिति फारच खराब झाली आहे.

म शी द व म नो रे—विजापूरचा पांचवा राजा, पहिला अल्ली अदील शहाच्या वेळेस इब्राहिमखान नांवाच्या इसमानें ही मशीद बांधिली असें तिच्यावरील लेखांवरून दिसून येतें. मशीदींतील खांबावर आरबी भाषेत एकंदर नऊ लेख आहेत. मनोरे १०६ फूट ऊंच आहेत. त्यांच्या डाव्या बाजूस मुशाफरखाना व हमामखाना ( स्नानगृह ) आहे व उजव्या बाजूस मशीद आहे.

येथें पैशाच्या देवघेवीचा व्यापार फार आहे. कऱ्हाड-चिपळून रस्त्यावरून व्यापार बराच चालतो. बाजारांत धान्य, कापड आणि मातीचीं व धातूचीं भांडीं विकावयास येतात. येथें महत्वाचे धंदे नाहींत. स्वदेशी आगकाड्यांच्या पेट्यांचा कारखाना येथें नवीन सुरु झाला आहे.

इ. स. १८४४ त कृष्णानदीस पूर येऊन याचें फार नुकसान झालें. किल्याची वायव्येकडील भिंत शहरांतील कांहीं घरें पुरांत वाहून गेलीं.

येथील लोकसंख्या ( १९११ ) ११२२८ आहे. म्युनिसिपालिटीची स्थापना १८५५ त झाली. गांवांत एक हायस्कूल व कांहीं मराठी शाळा आहेत.त्यांपैकीं एक हिंदी व एक मुलींकरितां शाळा आहे. तालुक्याचें मुख्य ठिकाण असल्यामुळें मामलेदार, मुनसफ वगैरे अधिकाऱ्यांच्या कचेऱ्या आहेत.

को रीं व ले णीं—याच्या नैऋत्येकडील टेंकड्यांत बुद्ध लोकांचीं कोरीव लेणीं आहेत. त्यांचें वर्णन पहिल्यानें सर बार्टेल फ्रिअर यानें १८४९ त केलें. लेण्यांच्या तीन ओळी आहेत.पहिली ओळ दक्षिणेकडे जखनवाडी खेड्याजवळ असून त्यांत २३ गुहा आहेत. दुसरी ओळ आग्नेयेस असून तींत १९ गुहा आहेत आणि तिसरी ओळ कोयना दरीच्या समोर असून तींत २२ गुहा आहेत. वरील ६४ गुहांशिवाय दुसऱ्या पुष्कळ लहान गुहा आणि एक पाण्याचें कुंड आहे. मोठ्या गुहेंतील खोलींत खांब नसणें, लहान लहान गुहा, निजण्याकरितां दगडाचें अंथरुण, चैत्यांच्या मूळच्या आकृती आणि नकसकामाचा अभाव या सर्वांवरून हीं लेणीं फार जुनीं आहेत असें दिसतें. ओवडधोबड व ठिसूळ दगडांत गुहा खोदलेल्या असल्यामुळें जरी त्यांच्यावर कांहीं लेख लिहिलेले असले, तरी इतका काळपर्यंत तीं अक्षरें रहाणें शक्य नाहीं. एका लेखाचा कांहीं भाग उपलब्ध झाला आहे व त्यांतलि अक्षरें ओवडधोबड कोरलेलीं असून तो लेख काल्यांतलि लेखाइतका जुना, म्हणजे खिस्ती शकाच्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांतला आहे. यावरून तीं लेणीं पुण्यांतल्या

शेलारवाडी अथवा गारोडी आणि कुलाब्यांतील कुडा आणि पाल या लेण्यांच्या वेळचीं असावींत. जुन्नर आणि नाशिक येथील गुहा व या गुहा यांच्या काळामध्यें फारसें अंतर नाहीं. जो लेखाचा कांहीं भाग उपलब्ध आहे म्हणून वर सांगितलें आहे तो असा:—

गोपाळाचा मुलगा संगमित्र याजकडून या गुहेची पुण्यकारक देणगी. ( फर्ग्युसन आणि बर्जेस-केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया, पा. २१३-२१७ ).

इतिहास.—ख्रिस्ती शकापूर्वी २०० सालापासून व ख्रिस्ती शकांनंतर १०० सालापावेतोंच्या लेखांत कन्हाडचा प्रथम उल्लेख केलेला आढळतो, आणि त्यांत असें लिहिलेलें आहे कीं, कन्हाडच्या यात्रेकरूंनीं मध्यप्रांताच्या जवळपूरजवळील भारहुतस्तूप येथें व कुलाब्यांतील अलिबागेच्या दक्षिणेस तीस मैल अंतरावर असलेल्या कुडा येथें देणग्या दिल्या होत्या. त्या लेखावरून असें दिसतें कीं, कन्हाडास, करहाटक म्हणत असत. शालिवाहन शकाच्या ११ व्या शतकांत येथें शेलारांचें राज्य होतें ( वि. विस्तार पु. २२ पा. १०१ ). विजापूरच्या सातव्या राजानें, महंमद अदिलशहानें, सन १६३७ सालीं शिवाजीच्या बापास ( शहाजीस ) कन्हाड जिल्ह्यांतल्या २२खेड्यांवरची देशमुखी इनाम दिली होती. १६५३ त ती देशमुखी मुधोळच्या बाजी घोरपड्याकडे आली. १६५९ त जेव्हां अफझुलखानाचा वध झाला तेव्हां शिवाजीच्या एका अधिकाऱ्यानें, (खंडुजी काकडे यानें ) लांच घेऊन खानाच्या बायकोस व मुलांस सुरक्षितपणें कन्हाडांत आणून पोहोंचविलें. शिवाजीस चिरडण्याची निराशा होऊन विजापूरच्या आठव्या राजानें-दुसऱ्या अली अदिलशहानें-स्वतः सैन्यानिशीं १६६१ च्या जानेवारींत या ठिकाणीं तळ दिला होता.

रामराजे यांचें संरक्षण शिवरामपंत अमात्य यांची स्त्री दुर्गाबाई "इनें फार फार जपून केलें; त्यास दुर्गाबाइच्या साडीचोळीबद्दल प्रांत कन्हाड येथील सरदेशमुखीचें वतन स्वामी ( छत्रपतींचें ) आहे, तें तिजला इनाम करून देऊन चालविलें जाईल" असें शाहुछत्रपति स. १७४५ त म्हणतात ( रा. खं. ८. २०१ ). इ. स. १७६३ मध्यें कन्हाडास गमाजी यमाजी यांची व नरसिंगराव पागे यांची लढाई होऊन तींत गमाजीचा पराभव होऊन तो दांतेगडास पळाला ( रा. खं. १०५ ). इ. स. १७८८ त प्रतिनिधींचें लग्न येथें झालें ( कित्ता २२३ ). कन्हाड परगण्याच्या देशमुखीबद्दल जगदळे व जाधव यांच्यांत फार पूर्वीपासून भांडणें लागलीं होतीं. शेवटीं भोसल्यांनींच ती जप्त करून स्वतःकडे घेतली ( रा. खं. १५ ). कन्हाड येथें मराठशाहींत व मुसुलमानशाहींत वाद व तंटे वगैरे तोडीत असत. कन्हाडच्या मनोऱ्यांत कैदी ठेवण्याची चाल मुसुलमानशाहींत होती. ( रा. खं. १५. ११३ ). येथें शाहु व संभाजी छत्रपती यांच्या भेटी झाल्या ( का. १७३१ ).

१७९० सुमारच्या जमावंदींत हा रायबागांतील मुख्य परगणा असून याचें साऱ्याचें उत्पन्न ३,६२,५५० रु. होतें. १८०५ मध्यें बाजीराव पेशवा व शिंदे यांनीं प्रतिनिधी परशुराम श्रीनिवास यांस धरण्याचा मनसुबा केला तेव्हां पुण्यांतून तो आपल्या जहागिरीच्या गांवीं कन्हाडास पळाला. बाजीराव पळत असतांनां या ठिकाणीं १८१८ च्या जानेवारीच्या २३ तारखेस थांबला होता.

कराड हें पंतप्रतिनिधींचें मुख्य शहर व रहाण्याचें ठिकाण होतें. त्यांत २५०० घरें असून त्यांत २०० कोष्टी, १०० तेली, २५ कांबळे विणणारे आणि ३० कागद तयार करणारे होते," असें १८२७ त क्यापटन् क्ल्यून यानें म्हटलें आहे.

**कन्हेपठार**—कन्हा नदीकांठचा प्रदेश. मुसुलमानी व मराठी अंमलांत हा एक तालुका ( तर्फ ) होता. शिवाजीच्या कारकीर्दीत या प्रदेशांतील बऱ्याच लोकांनीं सैन्यांत व राज्यकारभारांत नांव मिळविलें होतें. पेशव्यांच्या वेळीं नानासाहेबांनीं ( १७३८ ) या प्रांतांतील सर्व पाटलांनां शिरपाव देऊन त्यांनां सुरळीत केलें ( रा. खं. ६. ७ ). हा तालुका १७५२ त पेशव्यांचा खाजगीकडे होता ( कित्ता ). बिसाजीपंत विनीवाल्यास या तालुक्यांत इनाम जमीन होती ( रा. खं. १०. १२१ ). स. १६७८ मध्यें या तालुक्यांत ४१ गांवें होतीं ( खं. १८.४३ ).

**कलइत**—पंजाब. पतिआळा संस्थान. करमगड निजामत. नरवाणा तहशिलींतील एक खेडें. उत्तरअक्षांश २९° ४९' पूर्वरेखांश ७६°. १९', लोकसंख्या ( इ. स. १९०१ ) ३४९०.

येथें राजा सालवाहन (शालीवाहन) चीं चार प्राचीन देवळें व कपालमणि नांवाचें तीर्थ असून हिंदु लोकांचें हें पवित्र स्थान आहे. देवळें अकराव्या शतकांतील आहेत असें मानण्यांत येतें.

**कलकत्ता**—बंगाल इलाख्याची राजधानी. १९१२ पूर्वी हें हिंदुस्थानच्या राज्याची राजधानी असून व्हाईसरायसाहेबांचें वसतिस्थान होतें. उत्तरअक्षांश २२° ३४' व पूर्वरेखांश ८८° २२'. हें हुगळी नदीच्या पूर्वकिनाऱ्यावर वसलेलें असून बंगालमधील २४ परगण्यांच्या जिल्ह्यांत आहे. समुद्रापासून ८६ मैल दूर असून समुद्रसपाटीपासून फक्त १८ ते २१ फूट उंच आहे. नदीच्या किनाऱ्यानें उत्तरेस ६ मैल लांबी असून पूर्वेस सर्क्युलर कॅनाल व 'सॉल्ट लेक्स' मिठागारें आहेत. क्षेत्रफळ २०५४७ चौ.मैल. कालीदेवीच्या उपासनेशीं ह्या शहराच्या नांवाचा कांहीं संबंध आहे असें म्हणतात. मुख्य शहराचा भाग सोडून भोंवतालीं नगरोपान्त लहान मोठ्या वस्तीचे विभाग आहेत. ह्या भागांनां वेगळ्या म्युनिसिपालिटया असून कलकत्त्यास मुख्य एक म्युनिसिपालिटी आहे. कोसीपूर-चित्तपूर उत्तरेस असून पूर्वेस माणिकतोळा विभाग आहे. नैर्ऋत्येस 'गार्डनरीच' हा

विभाग असून पश्चिमेस हुगळी नदीवर हावरा हा विभाग आहे. सर्व विभागांचा व्यापार वगैरेमुळें एकजीव झालेला आहे.

हे सर्व विभाग धरून कलकत्ता शहराची लोकसंख्या १३,२७,५४७ आहे. साऱ्या आशिया खंडांत टोकीओ ( लो. सं. २१,७३००० ) शिवाय इतकी लोकसंख्या दुसऱ्या कोणत्याहि शहराची नाहीं. ब्रिटिश राज्यांत लोकसंख्येच्या बाबतींत लंडन शहराच्या खालोखाल ह्या शहराचाच नंबर आहे.

नगरोपान्त विभाग जर सोडून दिले तर खुद्द कलकत्याची लोकसंख्या ९,०७,८५१ आहे. ह्यांत १८९९ सालीं झालेल्या 'बंगाल ॲक्ट तिसरा' प्रमाणें 'कलकत्ता म्युनिसिपल टाउन,' फोर्ट विल्यम व इतर थोड्या भागाचा समावेश होतो.

१९१२ पर्यंत राजधानीचें ठिकाण त्याचप्रमाणें बंदर, रेल्वे लाइन्सचें मुख्य ठिकाण, गंगा व ब्रह्मपुत्रा ज्या प्रदेशांतून वहातात त्या सुपीक प्रदेशांतून माल आणण्याचें मुख्य ठिकाण, व त्याचप्रमाणें परदेशांतून आलेला माल उतरवून घेण्याचें मुख्य स्थान, किंबहुना व्यापाराचें व उद्योगधंद्यांचें केंद्रस्थान या दृष्टीनें कलकत्ता शहरास फार महत्व आलें आहे.

शहराच्या मध्यभागीं फोर्ट विल्यम असून भोंवताली मैदान नांवाचा भव्य बाग आहे. ह्याच्या उत्तरेस यूरोपियन लोकांचीं मोठमोठीं दुकानें आहेत. दक्षिणेस व आग्नेयेस बालीगंज व अलीपूर हे यूरोपियनांचे राहण्याचे पुरे आहेत व बंगालच्या गव्हर्नरचें ठिकाणहि येथेंच आहे. ह्याच्या भोंवतीं सर्व लोकवस्ती आहे. शहरांत लोकवस्ती दाट असून अस्वच्छ आहे.

कलकत्ता शहराचें क्षेत्रफळ १२८३ एकर आहे. मैदान फोर्ट विल्यम व खुद्द कलकत्ता व बंदर व कालवे जर धरले तर एकंदर ७३१० एकर आहे. खुद्द कलकत्ता शहराचे 'जुनें शहर' व जादा भाग असे दोन आहेत. हवामान उष्ण व सर्द आहे. मे महिन्यांत पारा १०२° पर्यंत चढतो. वार्षिक पाऊसाची सरासरी अहवाल ६१ इंच आहे. पावसाळयाच्या सुरवातीस व शेवटीं येथें जोराचे वारे सुटतात. त्यांत प्राणहानि व इतर नुकसानी होते. १८९७ सालीं बसलेला भूकंपाचा धक्का फार जोराचा होता. मुंबईप्रमाणें कलकत्यास प्लेग होत नाहीं. त्यामुळें हें शहर राहण्यास जास्त पसंत करितात.

१५३० सालीं जेव्हां व्यापार पोर्तुगीज लोकांच्या हातीं होता त्यावेळीं सरस्वती नदीवरील 'सातगांव' हें व्यापाराचें मुख्य ठाणें होतें. नंतर पुढें हुगळी हें व्यापाराचें ठाणें झालें व लवकरच गोविंदपूर नांवाचें गांव वसविण्यांत आलें. त्याच ठिकाणीं सध्यां फोर्ट विल्यम आहे. नंतर कांहीं दिवसांनीं 'सुतानाटी' हें व्यापाराचें मुख्य स्थान झालें. चितागांव हें व्यापाराचें ठाणें करण्याचा मानस सिद्धीस न गेल्यामुळें १५९० सालीं कारनॅकच्या प्रामुख्याखालीं इंग्रजांनीं पुन्हां सुतानाटी हें व्यापाराचें ठाणें कायम केलें.

कलकत्ता हें व्यापाराचें अशा रीतीनें मुख्य शहर करण्यास बरींच कारणें झालीं. एक तर गंगानदीच्या प्रदेशांत होणारा सर्व तऱ्हेचा उत्तमोत्तम माल हुगळी नदींतून येथें येत असे. दुसरें कलकत्ता अशा ठिकाणीं वसलेलें आहे कीं, तेथपर्यंत व्यापारी जहाजें जाऊं शकतात. तिसरें पश्चिमेस नदी व पूर्वेस पाणथळ जागा असल्यामुळें शहराचें संरक्षण करणें सोपें होत असे, व नदींतील जहाजांतून त्याचें रक्षण करतां येणें शक्य असे.

सन १६९६ सालीं जेव्हां सुभासिंग नांवाच्या वरद्वानच्या जमीनदारानें धुमाकूळ आरंभिला तेव्हां इंग्रजांनीं या शहरास तटबंदी करण्याची परवानगी नवाबाजवळ मागितली व ती दिलीहि गेली. दोन वर्षांनीं गोविंदपूर, सुतानाटी व कलकत्ता हीं हुगळीच्या गव्हर्नराजवळून विकत घेतलीं. अशा रीतीनें १७०२ मध्यें तटबंदी घातलेलें हें एक मोठें शहर तयार झालें. १७०७ सालीं ह्या शहराचा अधिकार लंडनच्या डायरेक्टरांच्या हातीं गेला. १७१७ सालीं त्यांनीं दिल्लीहून बादशहाकडून हुगळीस कांहीं मिळकत विकत घेण्याची परवानगी मिळविली.

१७४२ सालीं त्यांनीं मराठ्यांच्या स्वारीच्या भीतीनें आपल्या ठाण्याभोंवतीं संरक्षणार्थ एक मोठा खदंक खोदला. ह्यास 'मराठा खदंक' असें म्हणतात.

१७५६ सालीं बंगालचा नवाब सिराज उद्दौला ह्यानें हें शहर घेतलें. गव्हर्नर व कांहीं रहिवाशी जहाजांवर पळून गेले व हॉलवेल व त्याचे लोक ह्यांस शरण जाणें भाग पडलें. कलकत्याच्या कुप्रसिद्ध 'ब्लॅकहोल( अंधारकोठडी )चा इतिहास 'सिराज उद्दौला' या लेखांत येईलच. १७५७ सालीं क्लाईव्हनें पुन्हां हें शहर आपल्या ताब्यांत घेतलें व प्लासीच्या लढाईनंतर मिरजाफरनें इंग्रजांस २४ परगण्यांची जमीनदारी दिली व त्याबरोबरच शहर व इतर लहान खेडीं इनाम दिलीं. नवाबाजवळून मिळालेल्या पैशानें गोविंदपूर निर्जन करून त्या ठिकाणीं फोर्ट विल्यम उभारण्यांत आला. १७७३ सालीं बंगालच्या गव्हर्नरला व त्याच्या कौन्सिलला हिंदुस्थानांतील सर्व वसाहतींवर ताबा चालविण्याचा हक्क मिळाला. वॉरन हेस्तिंग्जनें लवकरच मुर्शिदाबादहून सरकारी खजिना कलकत्ता येथें आणिला.

१७९४ सालीं येथें 'जस्टिसेस ऑफ धी पीस' नेमण्यांत आले. सन १८७४ सालीं 'न्यू मार्केट' उघडण्यांत आलें. खुद्द कलकत्याची लोकसंख्या ९०७८५१ नर दिलीच आहे. कोलुतोला भागाची लोकसंख्या पुष्कळ आहे. व सर्वांत कमी लोकसंख्येचें मान अलीपूर व बालीगंज येथें आहे.

बंगाली, हिंदी, उडिया, इंग्रजी व उर्दू वगैरे एकंदर ५७ भाषा ह्या शहरामध्यें चालतात. शेंकडा ६५ लोक हिंदू आहेत.

मुसुलमान, ख्रिश्चन, बौद्ध, ज्यू, ब्राह्मी इत्यादि जातींचे लोकहि आहेत. पुरुषांचें बायकांशीं प्रमाण २:१ पडतें. त्यामुळें २० ते ५० वयाच्या ४३ पुरुषांनां १ वेश्या असें वेश्यांचें प्रमाण दिसून येतें. पूर्वी हें प्रमाण याहूनहि अधिक होतें.

हिंदूंत ब्राह्मण, कैवर्त, सुवर्णवाणिक इ. लोकांचा भरणा अधिक आहे. सुमारें एकतृतीयांश लोक कारखान्यांतून काम करीत असून सुमारें एकचतुर्थांश लोक व्यापारांत आहेत. शहराच्या उत्तरेस बरतोलामध्यें व त्याचप्रमाणें दक्षिणेस भवानीपुरामध्यें धंदेवाईक लोक रहातात. बिहारमध्यें होणाऱ्या सोऱ्याला पूर्वी बंदुकीच्या दारूकरितां इंग्लंडांतून फार मागणी होती.

तांदूळ, तीळ, कापड, ताग, साखर इत्यादि माल बाहेर जातो व मीठ खनिज द्रव्यें बाहेरून येतात. धातू, तेल, साखर व यांत्रिक सामान, गरम कापड, मीठ, दारू व रेल्वेकरितां सामान, इत्यादि माल बाहेरून आणविला जातो. एकंदर येणाऱ्या मालापैकीं सात अष्टमांश माल यूरोपांतून येतो. कच्चा ताग, चहा, अफू, चामडें, कडधान्य, नीळ, कापूस, कोळसा, कच्चें रेशीम, सोरा वगैरे माल बाहेरून येथें येतो. येथून रंगून, मौलमेन, अकियाब, मुंबई, मद्रास इत्यादि बंदरांशीं व्यापार चालतो.

कलकत्यास 'रॉयल एक्स्चेंज'; बॅंगाल चेंबर ऑफ कामर्स 'बेंगाल बॅंडेड वेअरहौस असोसिएशन,' 'कलकत्ता ट्रेड्स असोसिएशन' आणि 'बंगाल नॅशनल चेम्बर ऑफ कामर्स' वगैरे व्यापारी संस्था आहेत. पूर्वी येथील बंदर सरकारच्या व्यवस्थेखालीं होतें. पण १८७० सालीं 'पोर्टट्रस्ट' निर्माण करण्यांत आलें. १९१९-२० सालीं ट्रस्टचें उत्पन्न २६६०८०३२ रु. होतें.

बजबजे येथें असलेला "पेट्रोलियम धक्का १८८६ सालीं बांधला व 'चहाची वखार' १८८७ सालीं स्थापिली.

लाल बझार व बौ बाजार हे शहराच्या मध्यभागीं आहेत. कलकत्ता शहर हावऱ्याशीं एका तरत्या पुलानें जोडलेलें आहे. येथें विजेच्या ट्रामगाड्या आहेत. जुन्या शहरांत हाय-कोर्ट आहे व एक स्मालकॉज कोर्ट आहे.

सन १८८१ पावेतों उत्पन्नावर कर घेत नसत. जुन्या शहरांत जमीनीस सारा नाहींच म्हटलें तरी चालेल. इ. स. १९०३-०४ सालीं जकात व जमीन महसूल उत्पन्न ३८८लाख रु. होतें. बाहेर जाणाऱ्या तांदुळावरच्या जकातीचें उत्पन्न सवा-पंधरालाख होतें.

म्युनिसिपल व्यवस्था कॉर्पोरेशन संघ, जनरल कमिटी व अध्यक्ष यांच्या स्वाधीन आहे. पिण्याकरितां पाणी हुगळी नदीचेंच वापरतात. सुमारें अर्ध शतकापूर्वी जमिनी खालून गटारें करण्यांत आलीं आहेत. शहराच्या पूर्वभागांत खाऱ्या पाण्याचीं तळीं आहेत यांत शहरांतील सर्व घाण वाहून जाते. दर माणसी १५ शि.४ पे. म्युनिसिपल कर पडतो.

कार्पोरेशनचें उत्पन्न सुमारें एक कोट रुपयांचें आहे. इंप्रुव्हमेंट ट्रस्टची स्थापना १९१२ त झाली. १९१९-२० सालाच्या अखेरीपर्यंत ५.१४ मैलाचा १,५९,५२१ चौ. फुटाचा रस्ता ट्रस्टनें कॉर्पोरेशनच्या हवालीं केला.

खासगी व सार्वजनीक अशा पुष्कळ चांगल्या इमारती कलकत्यास आहेत. कलकत्याचा गव्हर्नरचा बंगला डर्बीशायर-मधील केडलस्टन हॉलच्या धर्तीवर बांधलेला आहे. चौरिंगी येथें 'अजबखाना' व जवळच एक अर्थशास्त्रीय म्यूझियम व कलाशिक्षणाची शाळा आहे.

डलहौसी चौकांत १८७० सालीं उघडलेलें जनरल पोस्ट ऑफीस आहे. बहुतेक सर्व मोठीं मोठीं ऑफिसें येथेंच आहेत. स्ट्रँडच्या जवळ मेटकॉफ हॉलमध्यें एक मोठें पुस्तकालय आहे; त्यास इम्पीरियल लायब्ररी म्हणतात. टिपू सुलतानचा मुलगा गुलाम महमद ह्यानें उभार-लेली एक मोठी मशीद धरमतोळा रस्त्यावर आहे. शहराच्या दक्षिणेस कालीघाट आहे. मैदान येथें उघड्या जागीं जनरल अक्टरलोनी ह्यांचे थडगें आहे. तसेंच 'न्यूयार्क' रस्त्यावर सर जेम्स औट्रम ह्याचा पुतळा आहे.

१८७६ सालीं उघडलेलें अलिपूर येथें एक प्राणिसंग्रहा-लय आहे. सिवपूर येथें हुगळीच्या पलिकडील तीरावर एक बाग व इंजिनिअरिंग कॉलेज आहे.

अलीपूर येथें एक कैदेंत ठेवलेल्या मुलांकरितां शाळा आहे व दुलुंदा येथें अपराधी वेड्यांचें रुग्णालय आहे. कलकत्ता विश्वविद्यालय १८५७त स्थापन झालें; त्याला जोड-लेलीं व इतर पुष्कळ कालेजें येथें आहेत. प्रेसिडेन्सी कालेज, दि डोव्हटन कालेज, ला मारटीनिर कालेज, फ्रीचर्च इन्स्टि-ट्यूशन, डफ कॉलेज लंडन मिशनरी सोसायटीज इनस्टि-ट्यूशन, संस्कृत कॉलेज, बिशप कॉलेज, सेंट झेवियर कॉलेज, जनरल असेम्बली इन्स्टिट्यूशन, मेट्रोपोलिटन कॉलेज, सिटी कॉलेज, रिपन कॉलेज, सेन्ट्रल कॉलेज, पुरुषांकरितां बंगवासी कॉलेज व स्त्रियाकरितां बेथुन कॉलेज, कलकत्ता मेडिकल कॉलेज इ. १९११ सालीं कलकत्यास असलेल्या ८९६०६७ लोकांपैकीं २८७८६७ साक्षर व १२७२३४ इंग्रजी जाणणारे होते. २८८३९३ स्त्रियांपैकीं ४७४३५ साक्षर व १६,१०३ इंग्रजी जाणणाऱ्या होत्या. यावरून शिकलेल्या बायका कलकत्यास फार आहेत असें दिसतें.

इंग्रजी वर्तमानपत्रें कलकत्यास खालीलप्रमाणें निघतात. इंग्लिशमन, इन्डियन डेलीन्यूज, स्टेट्समन, एम्पायर, बंगाली, अमृतबझार पत्रिका, इन्डियन मिरर, हिंदु पेट्रियट, आणि फारवर्ड वगैरे. त्याचप्रमाणें इतर भाषेंत हितवादी, बसुमती, बंगवार्ता व भारतमित्र. मॉडर्न रिव्ह्यू बिझिनेस वर्ल्ड, कॉलेजि-यन, इंडियन एक्स्प्रेस, इंडस्ट्री यासारखीं इंग्रजी मासिकें आहेत. पांच सहा सामान्य रुग्णालयांखेरीज स्त्रियांकरितां डफ-रिन व्हिक्टोरिया हॉस्पिटल व एडन हास्पिटल हीं आहेत.

कॅम्पबेल हास्पिटल हें हिंदुस्थानांत सर्वांत मोठें हास्पिटल आहे. दोन वेड्यांचीं हास्पिटलें असून एक कुष्टरोग्याकरितां आहे.

नगरोपांत विभाग.—कासीपूर चितपूर; माणिकतोळा व गार्डनरिच नांवाच्या तीन म्युनिसिपालिटयांस मिळून हें नांव दिलें गेलें आहे. बंगालमधील चोवीस परगण्यांच्या मिळून होणाऱ्या जिल्ह्यांचा हा एक पोटविभाग आहे.ह्याचें क्षेत्रफळ१० चौरस मैल असून१९२१ सालीं लोकसंख्या १६१४१३ होती. कासीपूर चितपूर हें खुद्द कलकत्ता शहराच्या उत्तरेस आहे. माणिकतोळा ईशान्येस असून, गार्डनरिच नैर्ऋत्येस आहे.

दक्षिण नगरोपांत विभाग.—बंगालमधील चोवीस परगण्यांच्या जिल्ह्यामधील मुख्य विभागांत हें एक गांव असून कलकत्त्याच्या दक्षिण नगरोपांत विभागाचा ह्यांत समावेश होतो. यांची१९११ सालीं लोकसंख्या १३५३३ होती. हिंदूंची वस्ती जास्त आहे. पंचनगरसुच्या सीमेच्या आंतील सर्व जमीनीला 'नगरोपांत विभाग' ही संज्ञा १८५७ सालच्या २१ साव्या अॅक्टाप्रमाणें दिली गेली आहे. १८७६ सालच्या बंगाल म्युनिसिपल अॅक्टानें ही सीमा आणखी वाढवून ह्यांत 'दक्षिण नगरोपांत विभाग' ,'टोलीगंज' व 'कलकत्त्याचा थोडासा भाग' ह्यांचा समावेश केला. मुख्य गांवांचीं नांवें वरीसा व बेहाला हीं आहेत.

कलकत्यानजीकचे कालवे.—हे कालवे चोवीस परगणे, खुलना, बकरगंज व फरीदपूर ह्या बंगालमधील व कांहीं आसाममधील जिल्ह्यांतून होडकीं जाण्यायेण्यायेवढे मोठे कालवे काढण्यांत आले आहेत. हे सर्व हुगळीच्या पूर्वेस पसरविलेले असल्यामुळें दळणवळणाच्या दृष्टीनें फार सोईचे झाले आहेत. ह्या कालव्यांतून साधारणपणें दरवर्षीं एक लाखाहून अधिक टन माल वर खालीं जातो येतो. पूर्वबंगाल व उत्तरबंगालमधून तांदूळ, ताग, व बीं, आसाम व काचारमधून चहा, त्याचप्रमाणें सुंदरवनमधील उत्पन्न वगैरे माल ह्याच मार्गांनीं कलकत्ता शहरीं आणिला जातो. त्याचप्रमाणें मीठ, मातीचें तेल वगैरे माल कलकत्त्याहून त्या त्या जिल्ह्यांस पुरविला जातो. कालव्याच्या वेगवेगळ्या पाटांना वेगळीं वेगळीं नांवें आहेत. बेलिया घाट कालवा, टोली नाला, सरक्यूलर कालवा,न्यूकट, भान्गर, बोट कालवा, भादरीपूर बील इत्यादि.

बकरगंज जिल्ह्यांतील बारिसाल येथून तांदूळ आणितां यावा हा हे कालवे काढण्याचा मुख्य उद्देश होता. १९०२–०३ सालीं ह्या कालव्यापासून दीड लाख रुपये उत्पन्न झालें व साधारणपणें ५ कोट रु. मालाची नेआण करण्यांत आली.

[संदर्भग्रंथ—ई. गॅ; सेन्सस रिपोर्ट;बस्टीड–एकोज फ्रॉम ओल्ड कलकत्ता; अॅनल्स ऑफ बेंगाल; हिस्टरी ऑफ कलकत्ता; हिल—बेंगाल इन् १७५६–५७; फॉरेस्ट—सिटीज ऑफ इंडिया.]

**कलंकी**—कलीच्या अंतीं संभलग्रामामध्यें रहाणाऱ्या विष्णुयशा नामक ब्राह्मणाच्या कुळांत जन्मास येणारा विष्णूचा अवतार (भारत वनपर्व अ. १९७). हा विष्णूचा १० वा अवतार होय. (भा. शां. अ. ३४०). श्रावण शु॥ ६ हा कल्कीजयंतीचा दिवस मानतात. व कलियुगाच्या शेवटीं या दिवशीं कलंकी अवतार होणार असें पुराणग्रंथ म्हणतात. या अवताराला निष्कलंकावतार असें म्हणतात. कारण कलियुगांत मानवांची जी अवनति झाली आहे ती या अवतारांत सुधारेल व लोक सत्ययुगांतल्याप्रमाणें वर्तन करतील असें पुराणग्रंथ उल्लेखितात.

**कलंगा**—जात. यांची वस्ती मुख्यतः बिहार ओरिसांत आहे. एकंदर लोकसंख्या (१९११) ५८२५. हे कवारांचेच संबंधी तेलगू देशांतील मूळ रहिवाशी दिसतात. यांची मध्यप्रांतांतील संख्या १८०० आहे.

हे आपली मूळ तेलगू भाषा विसरले आहेत. पण हे पूर्णपणें द्रविड वर्गातले लोक आहेत. मूल झालें म्हणजे दोन्ही हातांत कोंबडा दाबून मारावयाचा व त्याच्या रक्ताचा टिळा मुलास लावावयाचा ही द्रविड चाल यांच्या मूळ उत्पत्तीची साक्ष देत आहे. यांचे परस्परविवाहनिषिद्ध कांहीं वर्ग बनले आहेत. कांहीं कांहीं देवकांवरूनहि वर्ग बनले आहेत.

लग्नें बहुधा प्रौढपणींच होतात; व तीं आईबापच ठरवितात. वधूच्या बापास ५ रु. शुल्क द्यावें लागतें. मोहाच्या झाडाचा खांब लग्नाच्या मंडपांत रोंवतात. लग्नापूर्वी १ गोंड जातीचा माणूस ग्रामदेवतेची थाटानें पूजा करावयास जातो. व तीन दिवस रोज वधूवर मोहाच्या खांबास सात प्रदक्षिणा घालतात. लग्नाच्या चार दिवसांत वधुवरांचे आइबाप प्रत्येकीं एकच गांवभोजन घालतात. इतर सर्व भोजनें गांवच्या लोकांस घालावीं लागतात. विधवेनें लग्न करण्यापूर्वी जातीची परवानगी मिळवावी लागते. विधवेला कोणीच वारस नसला तर ती मेल्यावर तिची सर्व संपत्ति जातीला भोजन घालण्यांत खर्च करतात. जातिसमोर स्त्रीच्या बांगड्या फोडून काडी मोडतात. अलीकडे हे बाहेरच्या लोकांस जातींत घेत नाहींत. पण कलंगानें कोणत्याहि जातीच्या स्त्रीच्या ठिकाणीं प्रजोत्पादन केलें तरी तीं मुलें जातींत घेतात. व परजातीयांशीं व्यभिचार करणारीस अजीवात बहिष्कार घालतात. हे लोक बांध्यानें उंच असतात. यांचा पोषाख व दागिने अगदींच छत्तीसगडी आहेत. [रसेल आणि हिरालाल. सेन्सस रिपोर्ट.]

**कलंगा डोंगर**—संयुक्त प्रांत. डेहराडून जिल्ह्यांतील डोंगर. उ.अ.३०° २८′ व पू.रे.७८° ५′.इ.स.१८१४सालीं गुरख्यांशीं लढाई सुरू झाली त्यावेळीं गुरख्यांनीं येथें एक घाईघाईनें किल्ला बांधला. इ. स. १८१५ सालीं किल्ल्यावर हल्ला चढवीत असतां जनरल जिलिस्पी हा कामास आला. किल्ला प्रथम मोठ्या शौर्यानें लढविण्यांत आला. परंतु गुरख्यांनीं लवकरच तो खालीं करून दिला. ब्रिटिशांनीं किल्ला ताब्यांत आल्यावर लवकरच जमीनदोस्त करून टाकला. डोंगराच्या उतारावर नालापाणी नांवाचें खेडें आहे.

**कलगीतुरा.**—महाराष्ट्रांत अडाणी लोकांत फडावर जें गाणें रात्रंदिवस ठिकठिकाणीं होत असलेलें दृष्टीस पडतें त्यांत कलगी तुऱ्याच्या गाण्याच्या बैठकी बहुतकरून असतात. महाराष्ट्रांत खेडेगांव असो किंवा शहर असो तेथें कलगी तुरेवाली मंडळी ही असावयाचीच, इतकी याची व्याप्ति मोठी आहे. या गाणारांत दोन पक्ष आहेत. त्यांत एक आपल्याला कलगीवाले व दुसरे तुरेवाले म्हणवून घेतात. कलगीवाल्यांनां 'नागेश' व तुरेवाल्यांनां 'हरदास' म्हणतात.

शिमगा, नागपंचमी, दिवाळी या सणांनां या गाण्याच्या बैठकी बहुतकरून होतात. त्याचा प्रकार असा आहे कीं प्रत्येक पक्षवाला डफ, तुणतुणें, धिमडी व मंजरी असें घेऊन गाण्यास तयार राहतो. नंतर गणपतीचें स्तवन झाल्यानंतर पाहिल्यानें कलगीवाले सवाल करितात व त्याचें उत्तर तुरेवाले देतात. याप्रमाणें प्रश्नोत्तररुपी हें गाणें आहे. तुरेवालेहि कधीं कधीं मधून मधून कलगीवाल्यांनां सवाल करितात. याप्रमाणें एकदां हा सामना सुरु झाला म्हणजे कोणता तरी एक पक्ष निरुत्तर होईपर्यंत हें गाणें चालतें. ही बैठक एकसारखी पांच पांच सहा सहा दिवस रात्रंदिवसहि चालतें निरुत्तर होऊन कोणता तरी पक्ष हरला म्हणजे बैठक संपते. ही कविता भेदक असते.

यानंतर कलगीवाले आणि तुरेवाले मिळून अथवा वेगवेगळे मिरवणुकी काढतात. त्यांत कलगीवाल्यांचें निशाण भगवें असून तुरेवाल्यांचें निशाण हिरवें असतें.

या कलगी-तुऱ्याच्या कवितेचा विस्तार अफाट आहे. तुळजापुराकडे याचीं पांच पांच हजार पदें आहेत असें सांगतात. ही कविता सयमक अशी असून ती कटाव व पदें यांनीं युक्त अशी आहे. तरी कटाव फारच थोडे आहेत.

या कवितेंत महाभारत, रामायण, अठरा पुराणें, वेदांत, कृष्णलीला, मुसुलमानी धर्मशास्त्र इत्यादि भरलेलें आहे. प्रत्येक ठिकाणचे शाहीर वेगळे असून त्यांची वेगवेगळी कविता आहे. ती सर्व महाराष्ट्रभर पसरलेली आहे. या कलगी तुरेवाल्यांत जातिभेद नाहीं. यांच्यांत सर्व जातीचे, सर्व पक्षांचे हिंदु आणि मुसुलमान वगैरे लोक आहेत. कलगी आणि तुऱ्यांचीं पदें यांचीं मोठमोठीं बाडें गाणाऱ्यांच्या घरीं असतात. कलगी म्हणजे माया व तुरा म्हणजे ब्रह्म अथवा प्रकृति-पुरुष किंवा पत्नी-पति होत असा समज आहे. [ विविधज्ञानविस्तार जुलै १९१४ ].

**कलघटगी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका. उत्तर अक्षांश १५° २' ते १५° २२' व पूर्व रेखांश ७४° ५६' ते ७५° ८'. क्षेत्रफळ २७५ चौरस मैल. एकंदर खेडीं ९७. लोकसंख्या ( १९११ ) ४६४५४ होती. इ. स. १९०३-४ सालीं जमीनमहसूल १.३ लाख व इतर कर ९००० रुपये. बहुतेक प्रदेश डोंगराळ असून जंगलमय आहे. हा गांव मराठयांच्या अमदानींत एक संमत होता. गांव लहान असून महत्वाचा नाहीं. ... ... ...

**कलचुरी**—या राजघराण्याचीं नांवें कलचुरी, कलचुर्य, कटचुरी अशीं भिन्न भिन्न आढळतात. हें क्षत्रिय घराणें वास्तविक हैहय या अत्यंत प्राचीन घराण्याचीच एक शाखा आहे. हें चेदि देशावर राज्य करीत होते. महाभारतांत या चेदि देशाचें नांव येतें ( स चेदिविषयं रम्यं० म. भा. आदिपर्व ). यांचें राज्य यमुनेच्या दक्षिणतीरीं होतें. या चेदि ( हैहय ) वंशांतच सहस्रार्जुन व शिशुपाल जन्मले. हैहयांचीं अनेक कुलें होतीं ( हैहय पहा ). कलचुरी यांची राजधानी त्रिपुर होती. हें गांव हल्लीं जवलपूरजवळ आहे. कलचुरीच्या जवळच जेजकभुक्तीचें राज्य असून तेथील राजे चंदेल व कलचुरी याच्यांत पुष्कळदां लग्नव्यवहार झाला होता. अकराव्या शतकापासून या चेदि देशाचे पूर्वचेदि ( महाकोसल, राजधानी रतनपूर ) व पश्चिमचेदि (डाहल, राजधानी त्रिपुर) असे दोन भाग झाले. पैकीं त्रिपुरकर कलचुरी यांनीं आपला स्वतःचा एक शक सुरू केला. त्याला चेदि शक असें नांव असून त्याचा आरंभ इ. स. २४८ सप्टेंबर ५ रोजीं झाला. याचें वर्ष आश्विनादि व महिने पौर्णिमान्त असत. यावरून या कालीं चेदी राजांचा फार उत्कर्ष झाला असावा. त्रिपुरकर हैहय ( कलचुरी ) यांचा कांहीं कालपर्यंत गुजराथ व कोंकण या भागांत अंमल असल्यानें, दक्षिण गुजराथेंतील त्रैकूटक देशांत त्यांचा शक चालू होता. या चेदी शकाला कलचुरी शक हें नांव मात्र इ. स. च्या ८ व्या शतकांत मिळालें. या शकाचा संस्थापक महाक्षत्रप ईश्वरदत्त होता असें भगवानलाल इंद्राजी यांचें मत आहे. या ईश्वरदत्तानें क्षत्रपांची सत्ता अर्धवट नाहींशी केली. याच्या नाण्यांवर चेदि शकाचें १ लें व २ रें वर्ष कोरलेलें आहे. यानेंच कोंकणांत आपली सत्ता स्थापून त्रिकूट (तिकोटा?) ही राजधानी केली. पुढें रुद्रसेन क्षत्रपानें त्रिकूटांचा पराभव केला. तेव्हां ते कलचुरी हें नांव धारण करून मध्यहिंदुस्थानांत गेले. नंतर जेव्हां क्षत्रपांचा समूळ नाश झाला, तेव्हां त्यांच्यापैकीं दर्हसेन राजानें आपली राजधानी त्रैकूट ही परत घेऊन पुन्हां राज्य स्थापिलें (इ. स. ४५६). बारोल ( बुंदेल ) खंडांतील उच्छकल्प ( ओर्छा? ) येथील राजघराणेंहि या चेदि ( कलचुरी ) घराण्याचीच एक शाखा होय असें म्हणतात, पर्दि ताम्रपटावरून वरील दर्हसेनाचा काल ठरतो. मंगलीश चालुक्य ( ५६७-७१० ) याच्या एका शिलालेखांत या कट(ल)चुरी घराण्याचा उल्लेख येतो. मंगलीशानें या घराण्यांतील शंकरगणाचा पुत्र बुद्ध यास जिंकलें असें वरील लेखांत म्हटलें आहे. फ्लीटच्या मतें ही कलचुरी शाखा निराळी आहे. पुढें ९ व्या शतकांत कोक्कलदेव पहिला नांवाच्या एका कलचुरी राजाचा उल्लेख आढळतो. त्यानें राष्ट्रकूट दुसरा कृष्ण याच्या मुलीशीं लग्न केलें ( ८७७ ). याचा मुलगा शंकरगण यानें चंदेल राजकन्या नट्टा इच्याशीं विवाह केला. दुसरा पुत्र मुग्धतुंग ( प्रसिद्धधवल ) यानें ( ...९०० ) "पूर्वसमुद्राच्या किनाऱ्यालगतच्या देशाच्या

रांगाच्या रांगा जिंकून कोसलाधिपतीपासून पाली घेतलें" ( बिल्हरी शिलालेख ). पुढें बालहर्ष व त्याचा भाऊ केयूरवर्ष ( युवराजदेव ) हे राज्यावर आले. केयूरानें अवन्तिवर्मा ( चालुक्य ) याची मुलगी नोहला हिच्याशीं लग्न केलें ( खजुराहो शिलालेख स. ९२५ ). याचा पुत्र लक्ष्मणराजदेव यानें राज्यावर बसल्यानंतर कोसलाधिपतीचा पराभव करून " अत्यंत सुखकर अशा पश्चिमदेशावर " ( कोंकण ? ) स्वारी केली ( ९५० ). नंतर गुजराथवर जाऊन सोमेश्वराची आराधना केली ( वि. शि. ). याची मुलगी बोंथादेवी ही पश्चिम चालुक्य दुसरा तैलप याची आई होय. याच्या मागून याचा मुलगा शंकरगणदेव राजा झाला (९७०). त्याच्या नंतर त्याचा धाकटा भाऊ दुसरा युवराजदेव हा गादीवर आला; त्याचा मुंज वाक्पति मालवराज यानें पराभव केल्याचें उदेपूर प्रशस्तीवरून समजतें ( ९७५ ). नंतर त्याचा पुत्र दुसरा कोक्कल ( १००० )व त्याचा गांगेयदेव( विक्रमादित्य ) हे राजे झाले. याचा उल्लेख अल्बेरूनी यानें " डाहालचा राजा " असा केला आहे ( १०३८ ). याचा मुलगा कर्णदेव; यानें हूण राजकन्या आवल्लदेवीशीं लग्न केलें. हा मोठा शूर होता. यानें कर्णावती शहर वसवून काशीस " कर्णाचा मेरू " या नांवाचें एक देऊळ बांधलें ( जबलपूर ताम्रपट ). यानें १०३५ त मगधच्या पाल राजांचा पराभव करून नंतर पांड्य, मुरल, कुंग, वंग, कलिंग व हूण यांचाहि पराभव करून ( भेडाघाट शिला. ), चोड, कुंग, हूण, गौड, गुर्जर व कीर या राजांनां आपल्या सेवेस लाविलें (१०४२ ). यानें १०६० त भीम गुर्जर राजाच्या मदतीनें मालवराज प्रख्यात विद्वान भोजाचा पराभव केला. पुढें याचा काळ फिरला. उदयादित्य मालवराजानें ( नागपूर प्रशस्ती ), चंदेल कीर्तिवर्म्यानें ( प्र. चंद्रो. ), दुसऱ्या भीमदेव गुर्जरानें ( हेमचंद्र ), पश्चिम चालुक्य पहिल्या सोमेश्वरानें ( बिल्हण, वि. दे. च. ), इतक्या राजांनीं याचा वेळोवेळीं पराभव केला ( १०७० ). याच्या दरबारीं गंगाधर म्हणून एक कवि होता ( बिल्हण, वि. दे. च. ). कर्णाचा मुलगा यशःकर्णदेव ( ११२२ ) याचे कांहीं प्रांत कनौजच्या गोविंदचंद्रानें घेतले ( जबलपुर ताम्र. ) व लक्ष्मणदेव परमारानें खुद्द त्रिपुरीवर मोहीम केली ( नागपुर प्र. ) यशःकर्णानेंहि आंध्रराजांचा पराभव करून चंपारण उध्वस्त केलें ( भेडाघाट शि. ) होतें. याचा मुलगा गयाकर्णदेव ( ११५१ ) यानें मेवाडचा राणा विजयसिंह याची मुलगी अल्हणदेवी इला आपली राणी केली होती. तिचाच भेडाघाट येथील शिलालेख आहे. तिचा मुलगा नरसिंहदेव याच्या कारकीर्दींत हा शिलालेख तयार झाला ( ११५५ ). यानें लालपहाड किंवा भर्हुत येथें एक शिलालेख कोरला असून ( ११५८ ); अलहघाट येथेंहि दुसरा कोरला आहे ( ११५९ ). याच्या मागून राजा झालेला याचा भाऊ जयसिंहदेव ( रेव ताम्र० ११७१ ) यानें गोसलदेवीशीं लग्न लाविलें ( तेवर शिला० ११७७ ). त्याचा पुत्र विजयसिंहदेव (कुंभी. ताम्र० १८८० ) याचा उल्लेख इ. स. ११९५ पर्यंतचा आढळतो. त्यानंतर या त्रिपुरकर चेदि कलचुरी वंशाचा पत्ता लागत नाहीं. बहुधा त्यांचा नाश रेवा येथील वाघेल यांनीं केला असावा. वर गांगेयदेवाचा उल्लेख आला आहे. यानें सुमारें (१०५०-४० ) २५ वर्षें राज्य करून आपल्या घराण्याचें नांव पुढें आणलें. यानें उत्तरहिंदुस्थानांत सार्वभौमसत्ता स्थापण्याचा प्रयत्न केला व तो बराच सिद्धीसहि गेला होता. स. १०१९ मध्यें तिरहुत पर्यंतचे राजे त्याचे मांडलीक बनले होते.

मध्यहिंदुस्थानांतील रतनपुरचे राजे— हेहि आपणास चेदि अगर हैहय ( कलचुरी ) वंशीय म्हणवितात. त्यांची माहिती रतनपुर या नांवाखालीं पहावी.

दक्षिणेंतील कलचुरी घराणें—याचा आरंभीचा उल्लेख इ. स. ११८८ च्या सुमारचा आढळतो. या वेळीं तिसरा सोमेश्वर चालुक्य हा सार्वभौम असून त्याचा मांडलिक म्हणून एक ( जोगमाचा पुत्र ) पर्मार्दि कलचुरी हा तर्दवाडी प्रांताचा राजा होता ( ११२८ ). हे कलचुरी राजे पश्चिम चालुक्यांच्या सार्वभौमसत्तेखालीं वैभवास चढले. परमार्दीचा मुलगा जो बिज्जल त्याच्या वेळीं तर त्यांनीं सार्वभौमसत्तेसहि हात घातला होता. परंतु चवथ्या सोमेश्वर चालुक्यानें ( ११८३ ) पुन्हां आपली सत्ता स्थापिली आणि त्यानंतर मात्र या कलचुरींचा मागमूस लागत नाहीं. कारण पुढें होयसल वल्लाळ यादव यानें कल्याणीचें सर्व राज्यच पादाक्रांत केलें ( ११८४ ).

बिज्जल कलचुरी.—तैल तिसरा ( चालुक्य ) याचा बिज्जल हा सेनापति होता. बिज्जल असेंहि त्याचें नांव आढळतें. यानें बंड करून व तैलाला एकीकडे ठेऊन आपण राज्य घेतलें ( ११५६ ). तें त्याच्या वंशाकडे ११८३ पर्यंत चालत होतें. हा शूर होता. यानें म्हैसूरपैकीं कांहीं प्रदेश जिंकला होता. याची राजधानी कल्याणी होती. बिज्जलाचे विरुद्ध लागलींच एक बंड उभें केलें गेलें व तें सफळ होण्यास मुख्यतः धार्मिक क्रांति कारण झाली. बिज्जल हा जैन होता, आणि या वेळीं कर्नाटकांत बौद्ध व जैन धर्माविरुद्ध वीरशैवधर्माची एक लाट उसळली होती. त्याचा फायदा घेऊन बसव नांवाच्या बिज्जलाच्या ब्राम्हण प्रधानानें प्रथम त्याला पदच्युत करून व त्यानें आपल्या लिंगायत पंथांतील ( बसव हा वीरशैव अथवा लिंगायत या पंथाचा संस्थापक होता ) दोघा साधूंचे डोळे काढल्याचा आरोप त्याच्यावर ठेऊन त्याचा वध केला ( ११६७ ). बसवाची बहीण पद्मावती ही बिज्जलाची बायको होती. बिज्जलाच्या वंशजांनीं ११८३ पर्यंत कल्याणीस राज्य केलें. बनवासी, अण्णिगिरी, बेळगोल वगैरे ठिकाणींहि या बिज्जलाच्या आप्त घराण्यांपैकीं कांहीं घराणीं कारभार करीत असत. पश्चिम चालुक्य, पूर्वचालुक्य राष्ट्रकूट व यांनीं या कलचुरी घराण्याशीं अनेकदां लग्नव्यवहार केलेले होते. बिज्जलाचा मुलगा सोविदेव ( सोमेश्वर

अगर रायमुरारी ) याच्यासाठीं त्यानें राज्यत्याग केला अशी एक गोष्ट आढळते ( बेळगांव शिला० ) व ती बहुधा खरी असावी. तसें असल्यास त्याच्या वधाची मागील गोष्ट खोटी ठरते. बिज्जलाला सोमेश्वर, संकम, आहवमल्ल, सिंघण अशीं ४ मुलें होती. सोविदेवाचा अलीकडील उल्लेख ११७७ चा होय. सिरीया देवी परमार्डीची मुलगी व बिज्जलाची बहीण कलचुरी राजकन्या ही चाउंड घराण्यांत दिली होती व तिच्या मुलांना कलचुरी राज्यांत मोठमोठ्या जहागिरी होत्या ( ऐहोळ शिला० ११६९) सोविदेव याच्या नंतर त्याचा भाऊ संकम ( दुसरा निश्शंकमल्ल ) गादीवर आला ( ११७८ ). तत्पूर्वी हा सोविदेवाच्या कारकीर्दीत त्याला राज्यकारभाराच्या कामीं मदत करीत असे. याचा भाऊ आहवमल्ल हा त्याला तो राजा असतांना मदत करी. संकमाचा अर्वाचीन काल ११८० हा आहे. याच्या मंत्र्यांची नांवें बेळगांव येथील ११७९ च्या शिलालेखांत आलीं आहेत. पुढें आहवमल्ल गादीवर आला (११८०). यानें चोल, होयसल व विजयादित्य यांच्याशीं लढाया दिल्या होत्या. यानें बहुधा ११८२ पर्यंत राज्य केलें असावें. याच्या नंतर याचा भाऊ सिंघण हा राजा झाला. हा दुर्बल असल्यानें चालुक्य चवथा सोमेश्वर यानें आपला मांडलिक व सेनापति बोम्म (ब्रह्म) याच्या साहाय्यानें सिंघणाचा पराभव करून आपलें राज्य घेऊन अण्णिगिरीस गादी स्थापिली ( ११८३ ). परंतु थोडक्याच दिवसांत होयसल यादव वीर बल्लाळ [ दुसरा ] यानें त्याचा पराभव करून [ व चालुक्य आणि कलचुरी या दोन्ही घराण्याचा नाश करून ] आपली सत्ता स्थापिली [ ११८४ ]. [ स्मिथ, फ्लीट, वैद्य, भांडारकर. आयंगार यांचे इतिहास व शिलालेख संग्रह वगैरे ].

**कलथ-थलइ** ( इ. स. ३०-६० )—तामिळी कवि. हा चेर राजाच्या दरबारीं भाट होता. ज्या लढाईंत चेरल-अथन व चोलकिल्ली हे एकमेकाशीं लढणारे राजे अगदीं घायाळ होऊन पडले, त्या प्रसंगीं हा भाट हजर होता. याच्या पुढच्या लढाईतहि म्हणजे जेव्हां दुसऱ्या एका चेरल-अथन नांवाच्या राजाचा करिकाल चोलानें पराभव केला, तेव्हां हा होता. कपिलर कवि याचा जुना कवि म्हणून उल्लेख करितो व त्यासंबंधी अशी माहिती सांगतो कीं, इरुंको-वेलची राजधानी अरैयम् तेथील राजानें कलथ-थलईचा मान ठेवला नाहीं म्हणून नष्ट झाली. या कवीनें रचलेलीं सहा पदें पुरनानुरुमध्यें आहेत. [ कनकसभे—तामील्स एटीन हंड्रेड इयर्स ॲगो. ]

**कलदन**—ब्रह्मदेशांतील शिव पर्वतांत उगम पावलेली एक नदी. ही अकियावजवळ बंगालच्या उपसागरास मिळते. हिची एकंदर लांबी ३०० मैल आहे. हिला मिळणाऱ्या मुख्य नद्या—डलेट, पलेट, मी, आणि पी. या होत.

**कलवगूर**—हैद्राबाद संस्थान. मेदक जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ३९० चौरस मैल आहे. लोकसंख्या ( १९११ ) १२६९१७. यांतील कांहीं खेडीं इतर तालुक्यांत घातल्यामुळें लोकसंख्येवर परिमाण झालेला आहे. या तालुक्यांत २ गांवें व १७२ खेडीं आहेत. पैकीं ६० जहागिर आहेत. जमीनमहसूल ( इ. स. १९०१ ) २.४ लाख रुपये. या तालुक्यांत तळीं पुष्कळ असल्यामुळें भात व ऊंस पुष्कळ होतो. निजाम-स्टेट-रेल्वे येथून जाते.

**कलबुर्गे**—' गुलवर्गा ' पहा.

**कलम**—वऱ्हाड जिल्हा. यवतमाळ तालुका. उ. अ. २०°,२७ पू. रे. ७७° ४६'. यवतमाळच्या ईशान्येस चवदा मैलांवर हें खेडेंगांव आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ३५९५. पूर्वी हा महत्वाचा किल्ला होता. इ. स. १४२५ सालीं बहामनी राजा अहमदशहा वली यानें हा चांदाच्या अथवा खेर्लाच्या गोंडाकडून घेतला. त्यावेळीं वऱ्हाडच्या आग्नेय कोंपऱ्यांतील कलम आणि माहूर हे अत्यंत महत्वाचे किल्ले होते. असा हा प्रसिद्ध जुना किल्ला हल्लीं अगदीं नामशेष होऊन गेला आहे. या ठिकाणीं भुयारांत एक चिंतामणीचें देवालय असून देवालयाचा घुमट फक्त वर दिसतो. एकंदर सर्व देऊळ जमीनींत आहे. यात्रेकरू देवाचें दर्शन घेऊन येथें असलेल्या विहिरीचें पाणी पितात. येथें माळी लोकांची वरीच वस्ती आहे.

**कलमदाने**, यां चा जा व ता.-कलमदानें यानीं प्रातः-कालीं स्नान करून गंध अक्षत लावून वस्त्रपात्र जें असेल तें निर्मळपणें स्वच्छतेनें गळाठा न दिसतां ( लेऊन व घेऊन ) सरकारचाकरी हुषारीनें करावी. सरकारी कलमदान घेऊन हजर नेहेमीं असावें. कलमदानांत शाई चांगली व डींक, रेती व लेखण्या शावूद व चाकू, कात्री, कागदांचीं पानें खाशी, खर्ची नेहेमीं असावीं; व कागद कलमदानांत वहुत जहाले म्हणजे सरकारास विनंति करून आज्ञा होईल त्या रुमालांत काढून ठेवीत जावे, कलमदानाचा रुमाल स्वच्छ राखीत जावा. सदरहू लिहिल्याप्रमाणें जलदीनें हुषारी राखून चाकरी करून दाखवील, त्याजवरून सरकार मेहेरवान होईल. ज्याच्याकडून हें न घडे, त्यास इजा पोहोंचून पुन्हां त्या कामावर चाकरीवर रहाणें होणार नाहीं. हें स्पष्ट समजोन लिहिल्याप्रमाणें वागावें.

सरकारांतून कायदे चालावयाचे ते येणेंप्रमाणें:—

(१) सरकारावरून ( कडून ) सत्कार होईल तो कलमदाने यांनीं शिरस्त्याप्रमाणें वांटून घ्यावा.

(१) नवीन कोणी सरकारभेटीस आल्यास इनाम घ्यावयाचा शिरस्ता आहे म्हणोन कलम लिहिलें. त्यास योग्यता पाहून घेत जाणें.

(१) दसऱ्यास कलमदाने ( यास )पूजेचा नारळ व दक्षणा पावते म्हणोन कलम. त्यास पावत आल्याप्रमाणें चालविली जाईल.

(१) दसऱ्यास शेलापागोटें सरकार कृपा करून देईल, त्या वेळेस सर्वांबरोबर पावत जाईल.

(१) श्रावणमासीं राखी पौर्णिमेस राखी व पोत व गोकुळ अष्टमीचें निशाण व खिरापत व संक्रांतीस तिळगूळ व वैशाखी पौर्णिमेस कुंभ व वटसावित्रीबद्दल वायन व दिपवाळीबद्दल तेल, अर्गजा व फराळास व गौरीचे हळदकुंकवाचा खण व आषाढी कार्तिकीस फराळास सालावादी सर्वांबरोबर चालत आल्याप्रमाणें चालविलें जाईल.

(१) श्राद्धपक्षाबद्दल पितरांस गंध लावावयाचें व पानें कापण्याचीं व द्रोण लावून मांडण्याचें म्हणोन कलम लिहिलें आहे त्याप्रमाणें करीत जाणें.

याप्रमाणें सातारकर छत्रपतींच्या दरबारीं या कलमदानें (कलमदान राखणारा) याच्या कामाचा शिरस्ता होता. प्रतापसिंह महाराज यांनीं आपल्या खासगी खात्याच्या निरनिराळ्या कचेऱ्यांनां जे नियम घालून दिले होते त्यांची एक यादी "हुकुम जावता सरकार हुजूर खासगी" म्हणून प्रसिद्ध झाली आहे. तींत अनेक खात्यांपैकीं हें कचेरीखातें असून त्याच्या पोटीं हा कलमदाने अधिकारी होता. त्यानें पाळावयाचे नियम या जावत्यांत आले आहेत. [इतिहास सं. पु. ६, अं. ७ ते ९].

**कलमाडु**—मुंबई. पूर्व-खानदेश. सावदे तालुक्यांतील न्हावी गांवच्या ईशान्येस २ मैलांवर हें गांव असून या सभोंवती पडका तट आहे. हा तट गवळी राजांनीं बांधला असें सांगतात. इ. स. १८२० च्या सुमारास येथील तटाचे दगड निंबाळकरानें यावल येथील तट दुरुस्त करण्याकरितां नेले असें सांगतात.

**कलमेश्वर**—मध्यप्रांत. नागपूर जिल्हा व तहशिलींतील एक ५७१ लोकसंख्येचें (इ. स. १९११) गांव. उत्तर अक्षांश २१° १४' व पूर्वरेखांश ७८° २६'. हें गांव अहीर लोकांनीं वसविलें असा समज आहे व कलम हें त्यांच्या देवाचें नांव आहे. वख्त बुलंदच्याबेळीं आलेल्या एका हिंदु घराण्यानें येथें एक किल्ला बांधलेला आहे. इ. स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें ५००० रुपये उत्पन्न होतें. यास कळमेश्वर असेंहि म्हणतात.

ज्यावेळीं अकबरखान हा पुण्यास आला होता त्यावेळीं जयसिंग राण्याबरोबर त्यानें एक लहानसें सैन्य दिलें. त्यानें पारसेनी येथें गोंडांचा पराभव करून कलमेश्वर हें आपलें मुख्य ठिकाण केलें. त्याच्या वंशजांनीं देशमूख या नांवाखालीं बरेच दिवस राज्य केलें आणि हल्लीं काटोल कलमेश्वराचे देशमूख आपणांस रजपूतवंशीय म्हणवितात.

**कलरायण डोंगर**—मद्रास. दक्षिण अर्काट जिल्हा व सालेम जिल्ह्याच्या अतूर व उत्तंगरि तालुक्यांत हे डोंगर आहेत. उत्तर अक्षांश ११° ३८' ते १२° ४' व पूर्व रेखांश ७८° २८' ते ७८° ४९'. या डोंगरांत करि रामन नांवाचें एक देऊळ असून डोंगरांत राहणाऱ्या मल्याळी लोकांचें तें एक क्षेत्र आहे. हे लोक पूर्वीचे तामीळच आहेत परंतु त्या भागांत क्रांति होत असतांना आपणास उपसर्ग न व्हावा म्हणून जे पुष्कळ लोक डोंगरांत येऊन राहिले त्यांपैकीं हे होत. या डोंगरांच्या ओळीस ठिकठिकाणीं निरनिराळीं नांवें असून त्यांची पांच जहागिरींत विभागणी झालेली आहे.

**कलले**—म्हैसूर संस्थान. म्हैसूर जिल्हा. नंजंगुड तालुक्यांतलि एक खेडें. उत्तर अक्षांश १२° ४' व पूर्व रेखांश ७६° ४०'. हें नंजगुडच्या नैर्ऋत्येस ३ मैलांवर २५०० लोकसंख्येचें (इ. स. १९०१) खेडें आहे. म्हैसूरच्या दलवायांचें हें प्राचीनकाळीं राहण्याचें ठिकाण होतें. विजयानगरच्या घराण्यांतील एका पुरुषानें हें इ. स. १५०४ सालीं वसविलें असें म्हणतात. पुढें म्हैसूरच्या राजांनीं इ. स. १६१० सालीं श्रीरंगपट्टण मिळविल्यानंतर त्यांनीं कललेच्या घराण्याशीं संबंध केला व त्या घराण्याचा पुरुष दलवायी अथवा वंशपरंपरेनें प्रधान झाला व म्हैसूर घराण्याचा पुरुष राजा झाला. पुढें या दलवायांनीं म्हैसूरच्या राजांस आपल्या मुठींत आणून ठेवलें. परंतु हैदरअल्लीचें प्रस्थ वाढल्यामुळें या दलवायांचा अधिकार नष्ट झाला. इ. स. १८९९ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. परंतु तिला इ. स. १९०४ सालीं पंचायतीचें स्वरूप देण्यांत आलें.

**कलश**—काश्मीर देशांतील पांचवा राजवंश जो लोहर त्या घराण्यांतलि अनंतराज व सूर्यमती या राजाराणीचा मुलगा. वायकोच्या आग्रहावरून म्हातारपणीं अनंतराजानें कलशास गादी देऊन आपण वानप्रस्थाश्रम घेतला पुढें कलश दुर्व्यसनी निघाला; त्याबद्दल बापानें त्याची कानउघाडणी केली असतां त्यानें बापाला ठार करण्याचा प्रयत्न केला. अरण्यांतील त्याच्या झोंपडीला त्यानें गराडा देऊन आग लाविली. मोठ्या कष्टानें वृद्ध नवराबायको कशी तरी आगींतून बाहेर पडलीं व देशत्याग करूं लागलीं. परंतु तीं दोघे प्रजेची फार आवडतीं असल्यानें प्रजेनें त्यांचा बेत मोडून काढला, तेव्हां तीं तेथें राहिलीं. त्यांनी आपला नातु हर्ष याला आपल्याजवळ आणवून ठेवला. तो म्हाताऱ्यांची सेवा करी; परंतु कलशानें पुन्हां त्यांचा छळ सतत सुरूच ठेवला. शेवटीं कंटाळून अनंतराजानें आत्महत्त्या केली. मुलगा आईच्या भेटीस गेला नाहीं तेव्हां तीहि सती गेली. कलशानें बापाची सारी संपत्ति आपल्या मुलाच्या—हर्षाच्या—नांवानें केली. यानंतर मात्र कलश सन्मार्गानें चालूं लागला. परंतु दरबारांतील मुत्सद्यांनीं बापलेकांत द्वेष पेरला. अखेर हर्षानें बंड केलें तेव्हां कलशानें तें मोडून मुलाला कैदेंत ठेवलें. हाहि शेवटीं अनंतराजाप्रमाणेंच पुत्राच्या दुर्वर्तनाबद्दल दुःख करीत राहिला कलश. हा स. १०७३ त मरण पावला. तो १०५९ मध्यें गादीवर बसला होता. यानें कल्याणी (दक्षिणदेश) च्या परमादीदेव (कलचुरि ?) राजाकडे, (त्यानें मागणी केल्यावरून) प्रख्यात बिल्हणकवि यास पाठविलें होतें. [स्मिथ; वैद्य; अ. कोश].

**कलसिया**—पंजाबांतील एक संस्थान. या संस्थानाचे अंबाला आणि फेरोझपूर जिल्ह्यांत निरनिराळे वीस तुकडे आहेत. उत्तर अक्षांश ३०° १२' ते ३०° २५' व पूर्व रेखांश ७७° २१' ते ७७° ३५'. क्षेत्रफळ १८८ चौरस मैल. लोकसंख्या ( इ. स. १९२१ ) ५७३७१. या संस्थानांत दोन गांवें व १८१ खेडीं आहेत. उत्पन्न सुमारें ४ लाख रुपये. राजा रविशेर सिंह शीखधर्मीय आहे.

**कलहंडी**, संस्थान.—विहार. ओरिसा प्रांतांतील एक संस्थान. याला पूर्वी करोंड असें नांव होतें. १९०५ सालीं दुसऱ्या कांहीं संस्थानांबरोबर हेंहि मध्यप्रांतातून काढून ओरिसा विभागाला जोडण्यांत आलें. पूर्वघाटाची एक रांग या संस्थानांतून ईशान्येकडून नैर्ऋत्येला जाते. क्षे. फ. ३७४५ चौ. मै. व लो. सं. ( १९११ ) ४१८९५३. यांत १ शहर व २१५१ खेडीं आहेत. लोकसंख्येपैकीं २५५२०५ हिंदू व १६२९६३ वन्यधर्मीय आहेत. संस्थानचें उत्पन्न सुमारें लाख रुपये आहे. खंडणी १० हजार आहे. वस्ती बहुतेक खोंड जातीच्या लोकांचीच आहे. १८८२ त हिंदू लोकांविरुद्ध दंगा उसळला होता. येथील राजा रघुकिशोर देव एका शिपायाकडून १८९७ त मारला गेला. याचा मुलगा लहान असल्यानें कांहीं काळ हें संस्थान ब्रिटिश पोलिटिकल एजंटच्या व्यवस्थेखालीं होतें. संस्थानची राजधानी भवानी पाटणा आहे. संस्थानांत शिक्षण फारसें दिसत नाहीं. कारण २० हून अधिक वय असलेले सुमारें तीन हजार पुरुष व शंभर बायकाच काय त्या शिकलेल्या आहेत.

**कलहारि**, वाळवंट.—हें दक्षिण आफ्रिकेंत असून २०° व २८° दक्षिण अक्षांश व १९° व २४° पूर्व रेखांश यामध्यें आहे. हें १२०००० चौरस मैल आहे. याचा दक्षिणेकडील भाग बेंचुआना प्रोटेक्टोरेटच्या हद्दींत असून पश्चिमेकडील भाग जर्मन आफ्रिकेंत होता. याच्या दक्षिणेस ऑरेंज नदी पश्चिमेस नामा व दमारा टेंकड्या, पूर्वेस बचुआनालँडचा कांहीं शेतीचा भाग व उत्तरेस ओका व्हँगोचें खोरें व गामी तलावाचा भाग आहे. याची सर्वसाधारण उंची ३००० फूट असून पश्चिमेकडे ह्याचा उतार आहे. येथील वाळू तांबडी आहे. उत्तरेकडील व दक्षिणेकडील बऱ्याच भागांवर झाडी असून मधून मधून जंगलहि आहे. ह्या ठिकाणीं शिकार बरीच सांपडते. येथें कलिंगडें बरींच होतात. आणि ह्यांतील पाण्याचा मनुष्यांस व पशूंस बराच उपयोग होतो. ह्या ठिकाणीं सिंह, चित्ते, पाणघोडे ( हिपॅपोमटेस ), गेंडा, म्हैस, झिब्रा, क्वागा व बऱ्याच जातींचीं हरणें, बबून नांवाचीं माकडें व शहामृग हे प्राणी आढळतात.

येथील हवा उष्ण आहे, पण दलदलीचा भाग सोडून ती रोगट नाहीं. मोलोपो ही नदी नकाशावर फार मोठी दिसते पण ती खालीं सुकत गेलेली आहे. वार्षिक पाऊस १० इंचांपेक्षां जास्त नसतो. पाऊस उन्हाळ्यांत पडतो. ज्या कांहीं भागावर कालव्यांची शेती आहे ते भाग बरेच सुपीक आहेत. येथील मुख्य व्यापाराची वस्तू म्हणजे जनावरांचीं कातडीं ही होय.

ह्या वाळवंटांत बुशमेन रहातात. हे धनुष्यानें शिकार करून आपला निर्वाह करितात. कलाहरी हे जनावरांचे कळप पाळून कांहीं ठिकाणीं शेतीहि करितात. हे सिंहाची पूजा करणारे लोक आहेत.

या वाळवंटातून १८७८ मध्यें लिव्हिंग्स्टननें पहिल्यानें प्रवास केला.

**कला**—या शब्दाचा धात्वर्थ आज अनिश्चित आहे.

शब्दाचा व्यापक अर्थ.—प्राचीन काळीं हिंदुस्थानांत ज्या ज्या कांहीं गोष्टींत कौशल्य दिसून येत असे त्या गोष्टी कलाविषयक समजत आणि त्या वस्तूंतलें कौशल्य व्यक्त करणें ती त्या वस्तूची कला होय असें समजत. चित्रांमध्यें कौशल्य ती चित्रकला, गाण्यामध्यें कौशल्य ती गायनकला आणि नृत्यविषयक कौशल्य ती नृत्यकला. फुलांचे गालिचे करणें ही पुष्पास्तरणकला; अंगास उटया वगैरे लावावयास येणें ही कौतुमारकला व अशा तऱ्हेनें व्यवहारांतल्या प्रत्येक गोष्टी करण्यामध्यें कौशल्य आहे अशा तऱ्हेची कल्पना त्यांस येऊन अनेक गोष्टींस त्यांनीं कला म्हटलें आहे. व्यवहाराच्या प्रत्येक गोष्टीमध्यें कौशल्य लागतेंच. त्यामुळें प्रत्येक गोष्ट त्या दृष्टीनें कलाविषय होय. आणि या दृष्टीनें जर आपण कलेचें व्यापक स्वरूप लिहावयास लागलों तर जगांतील सर्व श्रमविभागाचा साकल्यानें इतिहासच दिला पाहिजे. आणि त्यामध्यें कौशल्य कसें आलें व आणतां येतें हें दाखविलें पाहिजे. परंतु असल्या तऱ्हेच्या सर्वव्यापी विषयास प्रस्तुत लेखांत जागा नाहीं. कां कीं, अनेक क्रिया निरनिराळया धंद्यांच्या व कृतीच्या विवेचनासाठीं स्वतंत्र लेखांचा विषय झाल्या आहेत. मुद्रणकला, संगीत, काव्य, नृत्य, नाटय वगैरे विषयांवर स्वतंत्र लेख असल्यामुळें त्यांचे विवेचन येथें नको. प्रस्तुत लेखामध्यें कांहीं क्रियासमुच्चयबोधक माहिती व कलाविषयक तात्विक विवेचन केलें म्हणजे झालें.

कलेचें तात्विक विवेचन करावयाचें म्हणजे प्रत्येक बाबतींत लालित्य कसें उत्पन्न करतां येतें हें सांगावयाचें नव्हे; कां कीं प्रत्येक धंद्यांत लालित्य उत्पन्न करण्याचीं त्या त्या धंद्याचीं विशिष्ट तत्वें असतात. तर वस्तु मोहक करतांना ज्या मानसिक किंवा इंद्रियाविषयक गुणधर्मांची जाणीव कलावेत्ता दाखवितो त्या गुणधर्मांचें विवेचन करणें. यालाच सौंदर्यशास्त्राचेंहि विवेचन म्हणतां येईल.

तात्विक विवेचन समजण्यासाठीं ज्या भावांच्या अस्तित्वाची जाणीव ठेवून आपण विवेचन करतों त्यांचेंहि विहंगमावलोकन अवश्य होतें. विशिष्टावरून सामान्याकडे जाण्याच्या पद्धतीचा अवलंब करून आपण कलेची विषयव्यापकता व कालव्यापकत्व आणि प्रदेशव्यापकत्व हीं व्यापकत्वें लक्षांत घेऊन विशिष्ट कलांवरून भावरूप ज्ञात

होणारी कला म्हणजे काय या तात्विक चर्चेकडे वळूं.

कला या शब्दाचें विषयव्यापकत्व प्राचीन भारतीयांच्या मतें वरेंच होतें. हें दाखविण्यासाठीं नेहेमीं चौसष्ट कला असे शब्द वापरीत होते. त्या चौसष्ट कला म्हणजे कोणत्या यविषयीं निश्चित मत असलेलें दिसत नाहीं. शुक्रनीतींत एक यादी आहे तर भागवतांत दुसरीच आहे. शिवाय कलांची संख्या नेहेमीं चौसष्टच समजली जाई असेंहि नाहीं. तिसऱ्या विभागांत प्रास्तरसंस्कृतीचा विकास होण्यापूर्वीचें मनुष्यप्राण्याचें देशोदेशीं भ्रमण झालें हें सांगितलें आहे. आणि प्राचीन भारतीयांच्या वैदिक शब्दांवरून व्यक्त होणारा संस्कृतिविकास दिला आहे. जरा नंतरचा काल घेऊन संस्कृतिविकास देण्यासाठीं वेदविद्या ग्रंथांत ( पृ. ११९ व पुढें ) श्रौतकर्माशीं संवद्ध असलेला कलाविकास वर्णन केलाच आहे अग्निमंथन, कृषि, खाटकाचें काम, हजामत करणें, दारू तयार करणें, स्वयंपाक करणें, सोनारकाम, सुतारकाम, कुंभारकाम, चांभारकाम, कोष्टीकाम, लोहारकाम, शिवणकाम, पशुपालन, सोमक्रय, सोम कुटणें, गवंडीकाम, दळण, कांडण, दोऱ्या वळणें, गवत कापणें, लांकडें तोडणें, रथ वापरणें, खड्डे करणें, संगीत, वाद्यें तयार करणें व वापरणें, नृत्य व इतर करमणुकीच्या गोष्टी या श्रौत कर्माशीं कशा संवद्ध असतात, हें दिलें आहे. चाणक्याच्या अर्थशास्त्राचा काल घेतला तर तेव्हां राज्यव्यवहारशास्त्र वरेंच वाढलेलें दिसतें; आणि इतर लौकिक क्रियाहि पुष्कळच विकास पावलेल्या दिसतात. अग्निपुराण आणि शुक्रनीती यांसारखे ग्रंथ बऱ्याच उत्तरकालाचे वोधक आहेत. आपण या कालांतील कलासमुच्चय घेऊं. शुक्रनीतींतलि कलांची यादी दिली पुढें आहे. तींत १ ते ७ हें गांधर्व कलासप्तक, ८ ते १७ हें आयुर्वेद कलादशक व १८ ते २२ हें धनुर्वेद कलापंचक आहे.

१ साभिनय नर्तन.
२ वाद्यकरण व वादन.
३ वस्त्रालंकारसंधान.
४ अनेकरूपाविर्भाव कृतिज्ञान.
५ शय्यास्तरणसंयोगपुष्पादिग्रथन.
६ द्यूतादि क्रीडानुरंजन.
७ अनेकासनसंधानयुक्त रति.
८ मकरंदासव मद्यकृति.
९ शल्यगूढाहृति शिराव्रणव्यथ.
१० हिंग्वादि संयोगादन्नपचन.
११ वृक्षादि प्रसवारोपपालनकृति.
१२ पाषाण धात्वादिदृति भस्मीकरण.
१३ इक्षुविकारादि कृतिज्ञान.
१४ धात्वौषधिसंयोगक्रियाज्ञान.
१५ धातुसांकर्यपार्थक्यकरण.
१६ धात्वादिसंयोगापूर्वविज्ञान.
१७ क्षारनिष्कासनज्ञान.
१८ पदन्यासपूर्वक शस्त्रसंधानविक्षेप.
१९ संध्याघाताकृष्टि भेदयुक्त मल्लयुद्ध.
२० बाहुयुद्धनिपीडन व प्रतिक्रिया.
२१ यंत्राद्यस्त्रनिपातन व्यूहरचना.
२२ गजाश्वरथगत्या युद्धसंयोजन.
२३ विधासनमुद्रा देवतातोषण.
२४ सारथ्य गजाश्वादिशिक्षा.
२५ मृत्तिकाभाण्डक्रिया.
२६ काष्ठभांडक्रिया.
२७ पाषाणभाण्डक्रिया.
२८ धातुभांडक्रिया.
२९ चित्राद्यालेखन.
३० तडागवापीप्रासाद समरभूमिरचन.
३१ घटीयंत्रवाद्यादिक्रिया.
३२ वस्त्ररंजन.
३३ जलवाय्वग्निसंयोगनिरोधक्रिया.
३४ नौकारथादि यानकृतिज्ञान.
३५ सूत्रादि रज्जुकरणविज्ञान.
३६ अनेकतंतुसंयोगपटबंध.
३७ रत्नवेधादिज्ञान.
३८ स्वर्णादियाथात्म्यविज्ञान.
३९ कृत्रिम स्वर्णरत्नादिक्रियाज्ञान.
४० स्वर्णाद्यलंकारकृति.
४१ लेपादि सत्कृति.
४२ चर्मणार्दवादि क्रिया.
४३ दुग्धदोहादि घृतांतविज्ञान.
४४ कंचुकसीवन.
४५ वाह्वादि जलतरण.
४६ गृहभाण्डादिमार्जन.
४७ वस्त्रसम्मार्जन.
४८ क्षुरकर्म.
४९ तिलमांसादि स्नेहनिष्कासन.
५० पशुचर्माङ्ग निर्हारक्रिया.
५१ सीराद्यादिकर्षण.
५२ वृक्षाद्यारोहण.
५३ मनोनुकूलसेवाकृतिज्ञान.
५४ वेणुतृणादिपात्रकृतिज्ञान.
५५ काचपात्रादिकरण विज्ञान.
५६ जलसेचन संहरणादि.
५७ लोहशस्त्रास्त्रकृतिज्ञान.
५८ गजाश्ववृषभोष्ट्रपल्याणक्रिया.
५९ शिशुसंरक्षणधारणक्रीडनज्ञान.
६० अपराधी सुयुक्त ताडनज्ञान.
६१ नानादेशीय वर्णसुलेखन.
६२ तांबूलरक्षादि कृतिज्ञान.

६३ आदान.
६४ प्रतिदान.

हावभावसहित नृत्य करणें ही कला आहे; त्याचप्रमाणें अनेक प्रकारचीं वाद्यें तयार करणें व तीं वाजविणें ह्या ज्ञानाचा कलेंतच अंतर्भाव होतो

स्त्रीपुरुषादिकांनीं सुशोभित दिसेल अशा रीतीनें वस्त्रें परिधान करणें व अलंकार घालणें ही देखील कलाच आहे; व निरनिराळ्या प्रकारचीं हुबेहूब सोंगें आणणें ह्या गोष्टीला कलाच म्हणतात.

उत्तम बिछाना घालणें, त्यावर चांगल्या रीतीनें आस्तरणें पसरणें, फुलाच्या माळा गुंफणें ह्या कलाच होत. आणि द्यूतादि खेळांनीं मनोरंजन करण्याची कलाच आहे.

निरनिराळ्या प्रकारचीं आसनें व संधानें ह्यांसह रतिक्रिडेचें ज्ञान असणें ही कलाच असून ह्यावर दिलेल्या कलासप्रकास गांधर्ववेदामध्यें स्थान मिळालें आहे.

फुलांतून मध गोळा करणें; मद्यें, आसवें इत्यादि तयार करण्याची कलाच असून क्लेश न होतील अशा रीतीनें शल्योद्धार व शिरांवरच्या व्रणांचा नाश करणें ह्या गोष्टी कलाच आहेत.

हिंग वगैरेसारख्या पदार्थांनीं अन्न पचविण्याची कलाच असून वृक्षलतादिकांनां फलपुष्पांचा बहार आणण्याच्या कृतीस कलाच म्हणतात.

पाषाण, निरनिराळ्या धातू यांचें चूर्ण व त्यांपासून भस्म तयार करणें, त्याचप्रमाणें उंसापासून गूळ ( साखर ) इत्यादि तयार करणें ह्या ज्ञानास कलाच म्हणतात.

विविध धातु व औषधी यांचें बेमालुम मिश्रण तयार करणें,त्याचप्रमाणें मिश्रधातूंचें पूर्ण पृथक्करण करणें ह्या कलाच आहेत.

विविध धातूंचें मिश्रण करणें, त्याचप्रमाणें द्रव्यातून क्षार निराळे काढणें ह्या कलाच असून एकंदर हें कलादशक आयुर्वेदशास्त्रांत अंतर्भूत होतें.

पायांच्या चालीनुरूप शस्त्रसंधान व फेक करणें ही कलाच असून सांध्यावर अघात करणें किंवा आकर्षण करणें ह्या योगानें केलेलें मल्लयुद्ध कलाच आहे.

मल्लांनीं शस्त्ररहित बाहुयुद्ध करावयाचें तें मुष्टिप्रहारांनीं. परंतु अशा युद्धांत मृत झालेल्यास त्या जगांत यश नाहीं व स्वर्गप्राप्तीहि नाहीं.

शत्रूच्या बलाचा व गर्वाचा अंत करणारें युद्ध कोणास कीर्तिकर होणार नाहीं ? म्हणून बाहुयुद्ध हें प्राणांचा नाश होईपर्यंत करावें.

स्वतः होऊन केलेलें, प्रतिकाराकरितां केलेलें. निरनिराळ्या प्रकारचे अतिभयंकर बाहुप्रहार, त्याचप्रमाणें शत्रूला उत्तम प्रकारें खालीं पाडणें व त्याजवर आघात करणें, त्याचप्रमाणें निरवधानपणांत शत्रूला लोळविणें इत्यादि गोष्टींनीं त्रास देणें व त्यांचा प्रतिकार करणें ह्या कलाच आहेत.

रोखलेल्या प्रदेशांत निरनिराळीं युद्धयंत्रें, अस्त्रें पाडणें त्याचप्रमाणें रणवाद्यांच्या विशिष्ट आवाजावरून विशिष्ट प्रकारची व्यूहरचना करणें ही कलाच आहे.

हत्ती, घोडे, रथ इत्यादिकांच्या गत्यनुरूप युद्धाची योजना करणें ही कलाच असून, एकंदर हें कलापंचक धनुर्वेद शास्त्रांत अंतर्भूत झालें आहे.

विविध आसनें, मुद्रा इत्यादींनीं देवता संतुष्ट करणें, त्याचप्रमाणें सारथ्यकर्म, हत्ती घोड्यांनां चालो शिकविणें ह्या कलाच आहेत.

मातीचीं, लाकडाचीं, दगडाचीं व धातूंचीं उत्तम भांडीं तयार करणें, त्याचप्रमाणें चित्रें काढणें ह्या कलाच होत. ह्या चार कला मुद्दाम निराळ्या सांगितल्या.

तळीं, विहिरी, राजवाडे बांधणें, सपाट प्रदेश करणें या कलाच असून, घटीयंत्रें व वाद्यें तयार करणें यांनां कलाच म्हणतात.

कमीजास्त प्रमाणांत रंगांचें मिश्रण तयार करून कपडे रंगविणें, त्याचप्रमाणें जल, वायु, अग्नि, ह्यांचा संयोग व विरोध म्हणजे वाफेचीं यंत्रें करणें ह्या कलाच आहेत.

जहाजें, रथ, वाहनें बांधणें त्याचप्रमाणें बारीक सूत व मोठे दोर करणें ह्या कलाच होत.

अनेक धाग्यांचें वस्त्र विणणें, त्याचप्रमाणें रत्नास चांगलीं भोकें पाडणें ह्या कलाच आहेत.

सोनें वगैरेंची योग्य परीक्षा होणें, बनावट सोनें, रत्नें इत्यादि तयार करणें ह्या कलाच आहेत.

सुवर्णालंकार घडविणें, व ते अलंकार निरनिराळ्या लेपांनीं तेजस्वी करणें, त्याचप्रमाणें कातडीस मऊपणा आणणें ह्या कलाच होत.

पशूंचीं कातडीं काढणें व त्यांच्या दुधाची धारेपासून ते तुपापर्यंत क्रिया करणें ह्या कलाच होत.

कपडे शिवणें, जलामध्यें बाहुबलावर तरून पोहणें ही कलाच आहे.

घरांतील भांडीं स्वच्छ घासणें, त्याचप्रमाणें वस्त्रें स्वच्छ धुणें, स्मश्रू करणें ह्या कलाच होत.

तीळ वगैरेंतून तेल व मांसातून चरबी गाळणें, नांगराचा फाळ ओढून धरणें, झाडावर चढणें ह्या कलाच होत.

एखाद्याची मर्जीनुरूप सेवा करण्याचें ज्ञान, त्याचप्रमाणें वेळू, गवत, वेत इत्यादिकांचीं भांडीं तयार करण्याची विद्या कलाच होय.

कांचेचीं भांडीं तयार करण्याचें ज्ञान कलाच आहे. त्याचप्रमाणें पाणी शिंपडणें व पाण्याला वळण देणें ह्या कलाच होत.

लोखंड, पोलाद यांचीं शस्त्रास्त्रें तयार करणें, हत्ती, घोडे, बैल इत्यादिकांवर झुली चढविणें ह्या कलाच होत.

शिशुसंरक्षण, धारण क्रीडन ह्या कलाच असून अपराध्यास योग्य ताडन करणें ही कलाच आहे.

निरनिराळ्या देशांतील भाषा उत्तम रीतीनें लिहिणें, त्याचप्रमाणें तांबूल भक्षण करणें ह्या कलाच होत.

तावडतोब क्रिया करणें यास 'आदान' व सावकास क्रिया करणें यास 'प्रतिपादन' म्हणतात. कलांमध्यें हे दोन गुण आहेत, त्यावरून ह्या दोन कला होतात.

ह्या चौसष्ट कला संक्षेपानें सांगितल्या. प्रत्येक मनुष्य ज्या ज्या कलेंत निष्णात असेल त्यानें त्या त्या कलेंतच आपलें कौशल्य खर्चावें.

या कलांमध्यें कांहीं कला म्हणजे धंदेच होत व त्या कलेचे वाहक म्हणजे विशिष्ट धंद्यांतील लोक. सद्गृहस्थ व सुगृहिणी यांस भूषण म्हणून शोभणाऱ्या अशा कित्येक कला वरच्या यादींत दिसून येतील. आतां दुसऱ्या एका यादीकडे पाहूं.

चौसष्ट कला.—१गीतं (गायन ), २ वाद्यं (वादनकला), ३ नृत्यं ( नाच ), ४ नाट्यं (सोंग घेणें ), ५ आलेख्यं (लिहिणें वगैरे), ६ विशेषकच्छेद्यं ( निशाण मारणें ), ७ तंडुलकुसुमवलिप्रकारः (तांदूळ व फुलें ह्यांच्या तऱ्हतऱ्हेच्या आकृती करणें ), ८ पुष्पास्तरणं ( फुलांचे गालीचे घालणें ), ९ दशनवसनांगरागाः ( दांत निरनिराळ्या रंगांनीं सुशोभित करणें, वस्त्रावर वेलबुट्टी काढणें व अंग गोंदणें वगैरे ), १० मणिभूमिकाकर्म ( त्रिकोण, चतुष्कोण इत्यादि आकृतींनीं जमिनीवर मण्यांची रचना करणें ), ११ शयनरचनं ( नाना प्रकारच्या शय्या जेथल्या तेथें ठेवणें ), १२ उदकवाद्यं ( जलतरंगासारखीं वाद्यें तयार करणें, वाजविणें वगैरे ), १३ चित्रयोगः ( मातीचीं चित्रें तयार करणें), १४ माल्यग्रथनविकल्पाः ( फुलांचे हार, तुरे गजरे इत्यादि तयार करणें), १५ शेखरकपीडयोजनं ( मुकुट वगैरे शोभिवंत करणें ), १६ नेपथ्यप्रयोगाः (पडद्याच्या आंत सोंग देणें), १७ कर्णपत्रभंगः ( कानांवर कोंवळ्या कोंवळ्या पाकळ्या ठेवणें ), १८ सुगंधयुक्तिः (सुवासिक पदार्थ तयार करणें ), १९ भूषणयोजनं ( सुवर्णादिकांचे दागिने करणें ), २० ऐंद्रजालं ( जादुगिरी ) २१ कौचुमारयोगः (अंगास उटया वगैरे लावणें ), २२ हस्तलाघवं (हातचलाखी), २३ चित्रशाकापूपभक्ष्यविकारक्रिया ( नाना तऱ्हेच्या भाज्या व पक्वान्नें तयार करणें ), २४ पानकरसरागासवयोजनं ( नाना तऱ्हेचीं पेयें करणें, तऱ्हतऱ्हेच्या रसांचीं पुटें देणें, पदार्थांवर निरनिराळे रंग देणें व मद्य तयार करणें), २५ सूचिवायकर्म (शिवणें ), २६ सूत्रक्रीडा ( बाहुल्या नाचवणें, भोंवरे फिरविणें वगैरे ), २७ वीणाडमरुकवाद्यानि ( वीणा वगैरे वाद्यें वाजविणें), २८ प्रहेलिका ( उखाणे जिंकणें ), २९ प्रतिमाला ( भेंड्या लावणें ३० दुर्वाचकयोगः ( कठोरवर्णमिश्रित श्लोक पठण ) ३१ वाचनं ( पुस्तक वाचणें ), ३२ नाटकाख्यायिकादर्शनं ( नाटकें, प्रहसनें करून दाखविणें ), ३३ काव्यसमस्यापूरणं ( दुसऱ्यांनीं दिलेला अपूर्ण श्लोक पुरा करणें ), ३४ पट्टिकावेत्रवानविकल्पः ( वेताच्या वस्तू करणें ३५ तक्षकर्माणि ( कातर काम, जाळ्या वगैरे ), ३६ तक्षणं ( सुतारकाम ), ३७ वास्तुविद्या ( घर बांधणें ), ३८ रौप्यरत्नपरीक्षा ( रुपें व रत्नें ह्यांची परीक्षा करणें ), ३९ धातुवादः (अशोधित धातु शुद्ध करणें ), ४० मणिरागज्ञानं ( रत्नांनां रंग देणें ) ४१ आकरज्ञानं ( खाणी कशा व कोठें सांपडतील तें सांगणें ), ४२ वृक्षायुर्योगवेदः ( वृक्षांचें आयुष्य वाढविण्याचा योग ), ४३ मेषकुक्कुटलावकयुद्धविधिः ( बकरें, कुकुटकुंभे व लावी पक्षी यांच्या झोंझ्या लावणें ), ४४ शुकसारिकाप्रलापनं ( शुक, मैना इत्यादिकांनां बोलण्यास शिकविणें ), ४५ उत्सादनं ( पतंग उडविणें ), ४७ केशमार्जनकौशलं ( वेणी घालणें ), ४७ अक्षरमुष्टिकाकथनं ( मनांतील अक्षरें सांगणें, मुठीमध्यें कोणता पदार्थ आहे हें सांगणें ), ४८ म्लेछितकुतर्कविकल्पाः ( करपल्लवी, नेत्रपल्लवी वगैरे भाषांची योजना करणें ), ४९ देशभाषाज्ञानं ( देशभाषा जाणणें ), ५० पुष्पशकटिकानिर्मितिज्ञानं ( बागबगीचे वगैरे करणें ), ५१ यंत्रमातृका धारणमातृका ( रहाट, ओझीं उचलून नेण्याकरितां केलेलीं यंत्रें वगैरे ), ५२ संवाच्यं ( वक्तृत्व ), ५३ मानसीकाव्यक्रिया ( न बोलतां मनांतल्या मनांत काव्यें रचणें ), ५४ अभिधानकोशः ( अनेक कोशांचें ज्ञान ), ५५ छंदोज्ञानं ( छंदःशास्त्राची माहिती ), ५६ क्रियविकल्पः ( चमत्कार करून दाखविणें ), ५७ छलितक योगः ( खुपमस्करीपणा), ५८ वस्त्रगोपनानि ( वस्त्रें नेहमीं नवी राहतील अशा युक्तीनें ठेवणें ), ५९ द्यूतविशेषः ( जुगार ), ६० आकर्षक्रीडा ( मल्लयुद्ध ), ६१ बालक्रीडनकानि (लहान मुलांचीं खेळणीं), ६२ वैनायिकी विद्याज्ञानं ( विघ्नें नाहींशीं करण्याची युक्ति ) आणि ६४ वैतालिकी विद्याज्ञानं ( भूतपिशाच्चादिकांचें ज्ञान ). [ वात्स्यायन कामसूत्र व टीका ]

वर दिलेल्या यादीवरून प्राचीन काळचा कलाविषयक झालेला व्यवहारसमुच्चय लक्षांत येईल. या उपर्युक्त कलांपैकीं कोणकोणत्या कलांवर आज वाङ्मय उपलब्ध आहे याची पद्धतशीर चौकशी करण्याचे प्रयत्न अलीकडे बरेचसे झाले आहेत. तथापि याविषयीं चांगलेसें वाङ्मय आज जमलें आहे असें म्हणतां येत नाहीं. संगीत, नृत्य व नाट्य या विषयांवर वाङ्मय पुष्कळच आहे; पण चित्रकलेवर संस्कृत वाङ्मय अस्तित्वांत नाहीं म्हटल्यास चालेल. घरें बांधणें, शहरें वसविणें इत्यादि वास्तुशिल्पावर वाङ्मय आहे. परंतु ज्या शिल्पांचा विकास केवळ वैयक्तिक शिक्षणानेंच होतो तीं शिल्पें फारशी वाङ्मय प्रवर्तू शकत नाहींत. आणि यामुळें अनेक कलांविषयीं वाङ्मय सांपडणें शक्य नाहीं अशी आमची समजूत आहे.

प्राचीन कलेचें विवेचन ग्रांथिक उताऱ्यांचा उपयोग केल्यानेंच संपत नाहीं. प्राचीन कलाविषयक वाङ्मय जरी अपुरें

असलें तरी प्राचीन कलेच्या आश्रयभूत झालेल्या वस्तूंचा अभ्यास करून आज कलाविषयक वाङ्मय पुष्कळच वाढलें आहे.

शब्दाचा नियमित अर्थ.—कलाविषयक विवेचन अलीकडे यूरोपीय वाङ्मयानुसारी झालें आहे. आणि 'आर्ट' या शब्दांत यूरोपीय जो अर्थ घालीत असतील त्याप्रमाणें कलेचें म्हणजे आर्टचें विवेचन करूं लागले आहेत. त्या संप्रदायानुसार आजचे लेखक कलाविषयक प्रश्नांचा विचार करतांना मंडनविषयक कला, चित्रकलाविषयक कला व नृत्यसंगीतादि मनास उत्तेजक कला यांसच कला या शब्दानें सुचवितात.आणि कलेचें विवेचन करतांना या गोष्टींचें विवेचन करतात किंवा जें त्यांस कांहीं तत्विक लिहावयाचें असेल तें विशेषेंकरून या कलांस उद्देशून लिहितात. निरनिराळ्या राष्ट्रांत निरनिराळ्या मंडनपद्धती विकासल्या आहेत. आणि नृत्यसंगीतादि कामें एकमेकांपासून भिन्न दिसूं लागतात असें पाहून कलेचें देशवार किंवा संस्कृतिवार वर्गीकरण करूं लागतात. पुष्कळदां कला विशिष्ट कामांचा आश्रय पहाते. उदा. बौद्धसंप्रदाय हा कलेस अनेक कारणांमुळें उत्तेजक झाला तसा ख्रिस्ती संप्रदायहि कलेस उत्तेजक झाला. त्यामुळें कलेचें वर्गीकरण करतांना कधीं कधीं ख्रिस्ती कला व बौद्ध कला अशा तऱ्हेचें वर्गीकरण केलेलें दिसतें.

कलेच्या इतिहासांत साधारणतः "वास्तुसौंदर्यशास्त्र", "मूर्तिकर्म" "खोदनकौशल्य" "चित्रकला" "संगीत" "नृत्य" यांचा समावेश करतातच, पण सोनाराच्या कला, मूल्यवान रत्नांवर नकशी काढणें, त्याप्रमाणें मातीचीं व धातूचीं भांडीं वगैरे करण्यांतील कारागिरी इत्यादि गोष्टींचा कलेची पहाणी करतांना उल्लेख करण्याचा परिपाठ आहे. त्याप्रमाणें कशिदा उर्फ "सूचिशिल्प", "भित्तिभूषणार्थ" पडद्यावरील कामें उर्फ ट्यापेस्ट्री, गालिचे, टेबलाचीं कव्हरें व पुस्तकांचीं कव्हरें यांत दिसून येणारी कला ही कलेच्या पहाणीच्या कक्षेंत किंवा इतिहासकक्षेंत घेण्याची पद्धति आहे. कलेचा अत्यंत व्यापक अर्थ घेतला तर त्यांत वाङ्मयविषयक कौशल्यहि अंतर्भूत होईल.

विषयव्यापकत्व प्रथमतः अधिक मोठें धरलें जाऊन नंतर तें अधिक नियमित झालें.आणि चित्रसंगीतनृत्यांदीशीं समक्षेत्री झालें. या क्रियेचें कारण पहावयास आपणांस यूरोपच्या वैचारिक इतिहासाकडे पाहिलें पाहिजे. पण आपणांस त्या भानगडींत पडण्याचें कारण नाहीं. कां कीं, आपली जिज्ञासा सध्यां शब्देतिहासविषयक नसून वस्तुविषयक आहे.

कलेचें प्रदेशव्यापकत्व.—कलेच्या नियमित अर्थानें तिचें प्रदेशव्यापकत्व आणि कालव्यापकत्व आतां लक्षांत घेऊं. असें करावयाचें म्हणजे प्रत्येक संस्कृतींतील कलाविषयक प्रगति द्यावयाची. सर्व देशांचे कलाविकास मिळून आजची जागतिक कला झालेली आहे. आणि सर्व कला मिळून एक जागतिक कलासंप्रदाय निर्माण होणेंहि आज अशक्य नाहीं.

कलांचे जे अनेकविध प्रकार आहेत त्यांच्या विकासाकडे लक्ष दिलें असतां असें दिसून येतें कीं ते विकास धार्मिक कल्पना, ऐतिहासिक वृत्तें आणि आर्थिक स्थिति यांच्या विकासाशीं बरेच संलग्न आहेत. प्रत्येक संस्कृतीनें जागतिक कलेवर आपली छाप ठेवलेलीच आहे. आणि निरनिराळ्या देशांच्या आणि कालांच्या कलांमध्यें कालस्थलदर्शक भिन्न रेषा स्पष्टपणें उमटलेल्या दिसून येत नाहींत. जेतें राष्ट्र जितराष्ट्राच्या कलेचे व कौशल्याचे अवशेष आत्मगौरवासाठीं उपयोजितें. जेता आपले कलाविषयक नवे प्रकार जित राष्ट्रांत आणण्याचें सोडून देतो असेंहि नाहीं.तो आपलें वैशिष्ट्य राखतोच आणि त्यामुळें एखाद्या देशांतील राजकीय परिवर्तनाबरोबर त्या देशाच्या कलेंत भिन्नता व सातत्य हीं दोन्हीं दिसून येतात. कलेमध्यें देवघेव आणि मिश्रण हीं उत्पन्न होण्यास राज्यक्रांतीच कारण असते असें नाहीं तर दळणवळणाच्या पद्धतींत सुधारणा झाली म्हणजेहि कलेमध्यें वैविध्य येतें. शिवाय सुसंस्कृत राष्ट्रें जेव्हां विहंगमदृष्टीनें सर्व जग अवलोकूं लागतात तेव्हां त्यांनां स्वतःचीच विविधत्वाची आवड तृप्त करण्यासाठीं इतरांच्या कलेकडे अवलोकन करून तींतील इष्टभाग घेणें प्राप्त होतें. अलीकडे पाश्चात्य जगांत पौरस्त्य देशांच्या कलेकडे विशेष लक्ष लागूं लागलें आहे आणि आफ्रिका व पोलनिशिआसारख्या प्रदेशांतील लोकांच्या वन्य संस्कृतींतहि आढळून येणारी कला पाश्चात्यांस विचारविषय झाली आहे.

वास्तुशिल्प, ईजिप्तः—सुमारें इ. स. पूर्वी ३००० पासून ईजिप्तमध्यें हें शिल्प अति उच्च दर्जाला पोंहोंचलें होतें. पिरॅमिड म्हणजे राजाचें शव ठेवण्याकरितां घडीव दगडांच्या केलेल्या कृत्रिम टेंकड्या अलौकिक म्हणतां येतील. केरो शहराजवळ गीझे येथें सर्वांत मोठे तीन पिरॅमिड आहेत. ईजिप्तच्या कलोत्कर्षाचा दुसरा काळ ( सुमारें इ. स. पू.२००० ) "ओबोलिस्क"नांवानें प्रसिद्ध अशा मनोऱ्याच्या जातीच्या स्मारकांचा होय. हेलीओपोलीस येथें अशा तऱ्हेचा एक मोठा निमुळता अत्यंत प्रसिद्ध स्तंभ आहे. इ. स. पूर्वी १६ ते १३ वें शतक या काळांत थीबीज येथें विशेषतः ( लुक्झॉर आणि कर्णक येथील भव्य ) देवळांतून अत्युच्च अशी शिल्पाची प्रगति दिसून येते. देवळांचे खांब कमल, पापयिरस किंवा ताडपत्र यांसारख्या आकाराचे असत.

बाबिलोनिया व असुरियाः—बाबिलोनियांतील चौथरे असलेलें बेलचें देऊळ मोठमोठ्या पिरॅमिडांनांहि मागें टाकीत असलें पाहिजे. पण आज त्यांचा थोडासाच अवशेष उरला आहे. असुरियांत नेबूचाडनेझर ( सुमारें इ. स. पू. ६०० ) याच्या राजवाड्याचे अवशेष आहेत. या शिल्पाची परंपरा मीड ( मेदा ) आणि इराणी या लोकांनीं रंगीत व चकचकीत विटांच्या गालिच्यासारख्या नक्षीची भर घालून कायम

ठेविली. आपल्या वास्तुशिल्पांत ज्यू लोकांनीं ईजिप्त आणि मेसापोटेमिया येथील शिल्पांची मदत घेतली होती असें वाटतें.

ग्रीक वास्तुशिल्पः—ग्रीकांच्या वास्तुशिल्पांत संगमरवरी दगडांचा वराच उपयोग केला जात असून, खांबाचे दोन मुख्य प्रकार विशेष प्रचारांत आले. एक डॉरिक—साधी घडण, आणि दुसरा आयोनिक—जास्त मेहनतीची घडण. पुढें कॉरिंथियन स्तंभ तसेंच कॅरियाटिड म्हणजे स्तंभाऐवजीं योजिलेली स्त्रीमूर्ति यांचा प्रचार सुरू झाला. पेरिक्लिसच्या कार्ळी ( इ. स. पू. ४९५ ते ४२९ ) अथेन्स शहरीं वास्तुशिल्प कळसास पोहोंचलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. उदा० ॲक्रोपोलीस टेंकडीवरील देवळें, प्रसिद्ध ऑलिंपिक खेळांच्या जागेवरच्या इमारती होत. ख्रि. पू. ४ थ्या शतकांत मॅसिडोनियाच्या वर्चस्वावरोवर पौरस्त्य वळणाचा प्रादुर्भाव झाला. देवळांवरोवरच राजवाडे व नाटकगृहें यांकडे लक्ष पुरविण्यांत आलें.

रोमन वास्तुशिल्पः—हें अंशतः ग्रीक शिल्पावर अवलंबून होतें. प्रत्येक वस्तूमध्यें तिच्या उपयुक्ततेकडे अधिक लक्ष देणाऱ्या लोकांनां ग्रीक शिल्प जेव्हां अवगत झालें तेव्हां रोमनांनीं उपयुक्ततेवर भर दिला. रिपब्लिकच्या शेवटीं शेवटीं मात्र मूळचा साधेपणा जाऊन उधळेपणाचा डामडौल त्यांत दिसूं लागला. ख्रि. पू. पहिल्या शतकांत मोठमोठीं नाटकगृहें व अर्धवर्तुलाकार रंगशाला वांधल्या गेल्या. इतर विशेष प्रकार म्हणजे 'विजयाची कमान' ( ट्राइंफल आर्च —अलीकडे पुष्कळ यूरोपीय शहरांतून अशीं वांधतात ), व्यापारी दिवाणखाने (वॅसिलिका), रोमन स्नानगृहें (थर्मेस) आणि विस्तृत अशीं रहाण्याचीं घरें. प्राचीन ख्रिस्ती वास्तुशिल्पानें वॅसिलिकाचा चर्चच्या कामीं उपयोग केला.

वायझंटाइन वास्तुशिल्प.—जस्टिनिअन ( इसवी सन १५२७–१५६५ ) आणि कॉन्स्टंटाईन यांच्या अमदानींत या शिल्पांचा उत्कर्ष झाला. वर घुमट असलेली मध्यें चौक ठेवलेली इमारत ही या शिल्पाची लोकप्रिय पद्धत म्हणतां येईल. खांबांच्या वरचा नक्षीदार व वांकदार भाग हा कॉरिंथियन धाटणीचा पुढला प्रकार होय. वेस्टमिन्स्टर येथील रोमन कॅथोलिक कॅथिड्रल वांधतांना (चालू शतकाच्या आरंभीं ) वायझंटाइन पद्धत अनुकारण्यांत आली.

मुसुलमानी वास्तुशिल्पः—यामध्यें मशिदींना घुमट, उंच व वारीक मनोरे आणि खांब आढळतात. बाहेरून या मशिदी साध्या दाखविण्यांत येतात. तरी अंतर्भाग फार मेहनतीनें व खर्चानें सजविण्याकडे नेहमीं मुसुलमानांचा कल दिसून येतो. उदा. मक्केंतील कावा, येरुशलेम येथील उमरची मशीद, दमास्कस येथील खलीफ वालीदची मशीद आणि केरो येथील मशिदी. यांचें वैशिष्ट्य म्हणजे नालाच्या आकाराच्या अणकुचीदार कमानी. १३ व्या शतकांत यूरोपवर सुद्धां या इस्लामी वास्तुशिल्पाचा परिणाम झाला आणि स्पेनमधील मूर लोकांच्या इमारती, विशेषतः ग्रानाडा येथील आल्हाम्ब्रा ( विलासमहाल ) हा परिणाम अत्युत्कृष्ट दर्शवितात.

ग्रीक आणि रोमन देवस्थानें हें ख्रिस्ती चर्चचे पाये बनले व पुढें याच चर्चांच्या मशिदी झाल्या हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

रोमान्सः—ही संज्ञा ११ व्या व १२ व्या शतकांतील कलेला लावितात. सुंदर दर्शनी भागांचीं देवळें या कालांत निर्माण झालीं. संक्रमणकालांत कमानींच्या निरनिराळ्या तऱ्हा प्रचारांत आल्या आणि क्रुसेड मोहिमांनीं पौरस्त्य वळणांचा शिरकाव करून दिला. इटलींत सुद्धां वायझंटाईन वळण दिसतें. उदाहरणार्थ व्हेनीस येथील सेंटमार्कचा घुमट व कमान घ्या. यांत पौरस्त्य वळण नाहीं असें कोण म्हणेल ?

गॉथिक वास्तुशिल्पः—१२ व्या शतकांत उत्तरफ्रान्सांत याची उत्पत्ति होऊन इंग्लंड व जर्मनी या देशांत तें पसरलें. याचीं वैशिष्ट्यें:—अणकुचीदार कमानी, कमानींच्या कोपऱ्यांतून साधुसंतांच्या मूर्ती आणि प्रवेशद्वारावर गुलावपुष्पाकृति खिडक्या, उदा०—कोलोन येथील देवळें. पॅरिसचें " नात्र दाम" व ऱ्हीम्स येथील कॅथीड्रल हीं होत. यूरोपांतील श्रीमंत व्यापारी शहरांनीं या धाटणीचे टाऊनहॉल, गिल्डहॉल वांधिले आहेत(व्रूजेस, व्रन्स्विक, डँझिग, लुवेक इ.). पुढील कालांतील गॉथिक वळण मिलान कॅथिड्रलमध्यें दिसून येतें.

रेनेसन्स वास्तुशिल्पः—१५ व्या शतकांत क्लासिकल ( अभिजात ) शिल्पाच्या पुनरुज्जीवनास हें नांव देतात. या कालांत रोम व फ्लॉरेन्स येथें सुंदर राजवाडे व इमारती वांधण्यांत आल्या. १६ व्या शतकांत जर्मन किल्ले वांधले. जेसुइट लोकांच्या धार्मिक उत्साहाप्रमाणें एक चमत्कारिक वळण पडून ( १६००–१८०० ) अतिशयोक्तिप्रचुर असे परिणाम दिसून आले. उदा. व्हर्सेलिस राजवाड्यांतील अतिशयित स्वरूपी नक्षीकाम. फूल, पक्षी आणि शिंपले यांच्या नक्षीनें अंतर्भाग मढविण्याची १८ व्या शतकांतील फ्रेंच फॅशन " रोकोको " वळण म्हणून प्रसिद्ध आहे.

आधुनिक वास्तुशिल्पः—१९ व्या शतकांत खेड्यांतील वंगले, पदार्थसंग्रहालयें आणि पूल यासारख्या सार्वजनिक उपयुक्ततेच्या इमारतींच्या वावतींत इंग्लंडचा वर नंबर लागेल. आणि चालू शतकांत पोस्ट ऑफिसें व रेल्वेचीं स्टेशनें शोभिवंत करण्याकडे वराचसा कल दिसून येतो.

मू र्ति शि ल्प.—शिल्पकार ज्या पदार्थांची मूर्ति घडवितो तो पदार्थ स्थानिक खनिज संपत्तीप्रमाणें व हवामानाप्रमाणें निरनिराळा असूं शकतो. कारण या कलेचीं सर्व कामें शाश्वत रहावीं या दृष्टीनें केलेलीं असतात. संगमरवरी दगड आणि ब्रॉंझ हे शिल्पकारांचे सर्वांत जास्त आवडीचे पदार्थ व त्यांच्या खालोखाल लांकूड आणि हस्तिदंत म्हणतां येईल. ग्रीक आणि रोमन लोक संगमरवरी दगड वापरीत आणि दगडी पुतळ्यांनां मेण फांसून त्यांवर सोनें व रंग चढवीत.

हल्लींचे पुतळे पाहिले तर फटफटीत पांढरे असतात. उत्तर-प्रदेशांतून उघड्या जागेंत ठेवावयाच्या पुतळ्यांनां ब्राँझ अधिक पसंत करितात. कारण हवेनें संगमरवरी दगड लवकर विघडतो. पण धातूवर थोड्याच दिवसांत चढणारा गंज, त्याचा दृष्टीस दिसणारा कठिणपणा कमी करून अधिक आल्हादकारक परिणाम घडवून आणितो. बहुधा संगमरवरी दगड स्त्रीमूर्तीकरितां व ब्राँझ काटक पुरुषी आकृतीकरितां योजीत. हल्लींच्या काळीं ब्राँझ ठोकून तयार करण्यापेक्षां ओतून तयार करण्याची जास्त उपयुक्त पद्धत निघाली आहे. लोखंड आणि जस्त हीं जास्त महागाईच्या ब्राँझच्या ऐवजीं आज उपयोजिण्यांत येतात. पदार्थसंग्रहालयांत सुप्रसिद्ध शिल्पकारांच्या कृतींचे नमुने ठेवण्यासाठीं प्लॅस्टरच्या मूर्ती करतात.

शिल्पाचे विषय मुख्यतः एकाकी किंवा सामुदायिक मानवाकृती आणि उच्च प्राणी होत. पण निसर्ग हा विषय कधींच नसतो. कारण तो चित्रकाराला काढतां येण्याइतका स्थिर नसतो. मूर्तीचें ध्यान व मुद्रेवरील भावदिग्दर्शन शिल्पकाराचें कौशल्य दाखवितात. मूर्ति, सबंध आकृति किंवा नुसता उठाव ( रिलिफ ) दिग्दर्शित करते. ज्या शिल्पांत योग्य प्रमाणाच्या निम्म्यापेक्षां कमी भाग वर आलेला असतो त्यास ‘ बासुरिलीफ ’ किंवा बाह्यगोलशिल्प व ज्यांत निम्म्यापेक्षां जास्त आलेला असतो त्यास ‘ हॉटरिलीफ ’ म्हणतात.

ईजिप्शियन मूर्तिशिल्पः—पुतळ्याखेरीज ज्यांत आकृतीचा कांहीं भाग पृष्ठभागांत गेलेला दिसतो पण ज्यांनां आकारक्षमता आलेली असते असे खोल गेलेले बासुरिलीफ(कोइलानाग्लिफ ) करण्यांत ईजिप्तमधील लोक फार पटाईत होते. अशा तऱ्हेच्या यथार्थदर्शक रिलीफमध्यें प्रतिष्ठित मुद्रा धारण करणारे प्राचीन राजे त्या देशांतील कारागिरांनीं दाखविले आहेत. या प्रकारचें प्राचीन शिल्पकाम शेतांतील व घरगुती देखावे दाखविण्यासाठींहि उपयोजिलें आहे.

बाबिलोनियन व असुरियन मूर्तिशिल्पः—यांत राज्यकर्त्यांच्या आयुष्यांतील प्रसंग, तसेंच सिंह आणि बैल यांच्या विलक्षण मूर्ती व पंख असून डोकीं जनावरांचीं पण धडें माणसांचीं असे प्राणी दाखविणारे चित्रसमुदाय सांपडलेले आहेत.

ग्रीक मूर्तिशिल्पः—या शिल्पांत प्राचीन ग्रीक लोक इतर सर्व राष्ट्रांपेक्षां जास्त पुढें होते. शिल्पशास्त्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचे असे ग्रीकमूर्तिशिल्पांत दोन मुद्दे आहेत. ग्रीक कलेवर झालेला मूळ पौरस्त्य परिणाम हा एक व आजतागाईत आधुनिक यूरोपखंडावर या कलेला ठेवतां आलेलें वर्चस्व हा दुसरा. ग्रीसपासून आजच्या जगानें आनुवंशिक पद्धतीनें मिळविलेलीं सौंदर्यशास्त्रध्येयें व प्राचीन जागा खणण्यांत आजचें सरकार खर्च करीत असलेला पैसा हीं ग्रीक शिल्पानें यूरोपला किती जबरदस्त मिठी मारली आहे याचें प्रत्यंतर आणून देण्यास पुरेशीं आहेत.

ग्रीक समाजांत समतेचें तत्व खेळत होतें. व्यक्तीचा दर्जा कायतो सर्व जमातींतील एक सभासद एवढाच होता, त्यामुळें व्यक्तींचे देव्हारे माजण्याची शक्यता कमी असे. या गोष्टीचा परिणाम कलेवर झालाच. ग्रीकांच्या मूर्तिशिल्पांत मानवी व्यक्तींपेक्षां देव आणि वीरपुरुष यांनांच प्रतिमेय बनविण्यांत आलें आहे. देव हा एक पूर्णावस्थेस पोहोंचलेला मनुष्य म्हणून दाखविण्यांत येई. म्हणून या एकांगी ( प्रोफाईल ) ग्रीक चित्राला बहुतेक मान्यता मिळत गेलेली आहे. क्वचित एखाद्या प्रसंगीं लोकोपयोगी गुणांबद्दल बक्षीस म्हणून व्यक्तींचे पुतळे घडविले जात.

ख्रि. पू. ६ व्या व ७ व्या शतकांतील शिल्पांचे अवशेष अद्याप आहेत. मायरॉननें तयार केलेला “ चक्र फेकणारा ” हा ब्राँझ पुतळा व पायांतील कांटा काढणारा मुलगा हे ख्रि. पू. ५ व्या शतकांतील आहेत. जेव्हां ग्रीकांनीं इराणी लोकांवर विजय मिळविला तो या कलेचा दुसरा काळ म्हणतां येईल. या काळांतील फिडियस हा एक प्रसिद्ध शिल्पकार होता. या काळांतील पार्थिनॉन शिल्पाचा बराच मोठा भाग १९ व्या शतकाच्या आरंभीं लॉर्ड एल्जीननें लंडनला आणला आहे मृत मनुष्याची प्रतिमा एका स्तंभावर ( स्टेला ) कोरून तो बसवून साधें थडगें बांधावयाची पद्धत या वेळीं प्रचलित होती. ख्रि. पू. ४ थ्या शतकापासून अलेक्झांडरच्या मृत्यूपर्यंत या शिल्पकलेचा तिसरा काळ धरितात. या काळीं तिचा शुद्धपणा व स्वातंत्र्य नाहींसें झालें. ४ थ्या काळांत ( अलेक्झांडरच्या मृत्यूपासून ग्रीस रोमन लोकांच्या ताब्यांत जाईपर्यंत ) कला ही राजदरबारची बटीक बनून नटवेपणा जास्त करूं लागली. यावेळच्या सुप्रसिद्ध ग्रीक पुतळ्यांतील कांहीं पुढें दिलेले आहेतः—रोम येथील व्हॅटिकनमधील लाओकून गट, लाओकूनवर अपोलो देवाचा कोप होऊन देवानें पाठविलेले दोन सर्प लाओकून व त्याचे दोन मुलगे यांनां जबर मिठी मारून बसले आहेत. या मूर्तिसंघांत दुःख व निराशा उत्तम प्रकारें प्रतिबिंबित झाली आहे. मिलोची व्हिनस ही एक दुसरी प्रसिद्ध मूर्ति आहे. १८२० मध्यें एका शेतकऱ्यानें मिलोज बेटांत हा पुतळा खणून काढल्यावरून तिला हें नांव मिळालें आहे.

रोमन मूर्तिशिल्प.—ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांत हें भरभराटीस येऊन जास्त वैय्यक्तिक बनलें. यांत बादशहांच्या त्यांनां पुष्कळ वेळां देवताविशेषणें दिलेल्या मूर्ती आहेत. ऐतिहासिक प्रसंगहि यांत कोरले आहेत. यावेळीं पूर्वजांचे पुतळे घरांत बाळगण्याची चाल असे. एका चित्रांत अनेक मूर्ती गर्दी करून राहिलेल्याहि दिसतात. प्रेताच्या दगडी पेटीवर मृत्यु, संयोग व वियोग यांचीं कथानकें काढून दाखविलेलीं असतात.

कामेओ.—कामेओ म्हणजे रंगीत पृष्ठावर उठावदार लघुचित्रें. हीं व हस्तिदंतावर इतर खोदकाम करण्यांत रोमन लोकांचा हातखंडा असे. दोन प्रसिद्ध कामिओ आज उपलब्ध

आहेत. एकांत ( ९×८ इंच ) रोमाशेजारी आपण ज्युपिटर म्हणून आगस्टस सिंहासनाधिष्ठित आहे आणि दुसरा कामेओ ( १०×१२ इंच ) जर्मानिकसचा विजय दर्शवितो.

मध्ययुगांतील मूर्तिशिल्पः—ख्रिस्ती मूर्तीशिल्पाच्या प्रथमावस्थेंत ( इसवी सनाचीं पहिलीं कांहीं शतकें ) शवपेटिकांवर कांहीं आकृती काढलेल्या व बायबलमधील कांहीं प्रसंग उठविलेले दिसतात. रोमन लोकांचे लहान हस्तिदंती फलक पवित्र लेखनाकरितां पुस्तकाचें मलपृष्ठ म्हणून ख्रिस्ती अमदानींत उपयोग केले जात. त्यापुढें ख्रिस्ताच्या आयुष्यांतील प्रसंग दिग्दर्शित करूं लागले. बायझन्टाईन कारागीर सुद्धा हस्तिदंतावर खोदकाम करण्यांत फार कुशल असत. मध्ययुगाच्या अंतिम काळांत उत्तर यूरोपमध्यें चर्चच्या सेवेसच केवळ मूर्तिशिल्प वाहिलेलें होतें असें म्हणतां येईल. फ्रान्समधील क्लुनिच्या मठाधिकाऱ्यांच्या वर्तनांत दिसून येणारी ११ व्या शतकांतील सन्यस्त वृत्ति किंवा सोवळेपणा हा प्राचीन पुराणांतील चित्रांनां दुराचारी व अपवित्र म्हणून नांवें ठेऊं लागला. सद्गुण आणि दुर्गुण, देवळें, प्रेषित व्यक्ती इत्यादिकांच्यां प्रतिमा करण्याचा कल त्या वेळीं दिसून येत होता. बाप्तिस्याचीं पात्रें आणि देवळांतील कोनाडे, मूर्तींनीं शोभिवंत केलेले असत. व समाधीवरहि उठावदार ब्राँझचे पत्रे बसविण्यांत येत. १३ व्या शतकांत जर्मनी आणि बर्गंडी हे देश या कलेचीं मोठीं केंद्रें म्हणून प्रसिद्ध असत. इंग्लंडमधील समाधीवरचीं पितळी खोदकामें, मध्यें त्याचप्रमाणें पितळी स्मारकें फार अप्रतिम आहेत. उदाहरणार्थ वेस्टमिन्स्टर ॲबेमधील तिसरा हेन्री आणि राणी एलिनॉर यांचीं स्मारकें पहा.

रेनेसन्स उर्फ उद्धारकालीन मूर्तिशिल्पः—( १ ) इटालीः—यावेळीं संसारांतील वास्तविक दृश्यें व वैयक्तिक प्रतिमा यांकडे कल असे. लॉरेन्झ घि बर्टी यानें तेवीस वर्षें खपून केलेलीं लॉरेन्झमधील बाप्तिस्माशालेच्या पूर्व दरवाजावरील बायबलमधील दृश्यें मिचेल आन्जलोच्या मतें नंदनवनाच्या दरवाजावर शोभतील अशीच आहेत. टस्कनींतील देवळें हेराकोटा मूर्तींनीं मंडित आहेत. कुमारी मेरी येशूच्या शवावर शोकाश्रू ढाळीत आहे हा प्रसंग फार लोकप्रिय असे. मिचेल आंजेलोनें तयार केलेला मोझेसचा भव्य पुतळा विशेष प्रसिद्ध आहे. या वेळचा बेन व्हेन्युटो सेलिनी ( १५०० ते ७२) सोनारकामांत अत्यंत निष्णात असे. ( २ ) यूरोपांतील इतर देशः— लांकडावरील खोदकामांत जर्मनीचा पहिला नंबर असे. मऊ व लवचिक असें लिंबाचें लाकूड या कामीं उपयोगी पडे. वेदी, त्यावरील पडदे, शहराच्या चौकांतील कारंजें अशीं या लांकडाचीं कामें होत. न्यूर्नबर्ग हें या कलेचें प्रसिद्ध केंद्र होतें.

आधुनिक यूरोपीय मूर्तिशिल्प.—सतराव्या व अठराव्या शतकांत देखील आकृती व वस्त्रें भूषणें या बाबी वास्तविक आयुष्याला अनुरूप अशाच करण्याचा उद्देश दिसून येतो. याचीं उत्तम उदाहरणें म्हणजे पॅरिसमधील रिचेल्यूची समाधी ( आडवी पडलेली मूर्ति व शोक करणाऱ्या स्त्रीमूर्ती ), बर्लिनमधील घोड्यावर बसलेला ग्रेट एलेक्टरचा पुतळा. १९ साव्या शतकांत इटालीचा मूर्तिकार क्यानोव्हान ( १७५७-१८५२ ) यानें मूर्तिशिल्पाला शुद्ध वळण लाविलें. त्यानें केलेल्या पुतळ्यांपैकीं जॉर्जवाशिंग्टनचा पुतळा होय ( हा पुतळा वाशिंग्टन येथें आगीनें खराब झाला ). जॉन फ्लॅक्समन ( १७५५-१८२६ ) याची नेल्सनची समाधी, पिट वगैरेंचे पुतळे हीं कामें आहेत. थोरवाल्डसेन ( १७७०-१८४४ ) हा डेनमार्कचा मूर्तिकार होता. यानें पुतळ्यांतून व लहान लहान उठावदार चित्रांतून ग्रीक पौराणिक कथा पुढें मांडल्या आहेत. याबेळीं सुप्रसिद्ध कारागिरांसाठीं फ्रान्स व जर्मनी हे देशहि नांवाजलेले होते. जर्मनीचा—शॅडो (१७६४—१८६०) व राऊच ( १७७७— १८५७) यांचीं कामें बर्लिनजवळच्या मशिदींतील राणी ल्युइसे हिंचे संगमरवरी दगडी थडगें, बर्लिनमधील, भोंवतीं सरदार जमा झाले आहेत असा फ्रेडरिक दि ग्रेटचा मोठा पुतळा; आणि बेगस याचे ( जन्म १८३१ )—बर्लिन येथील मोठ्या मेहेनतीनें केलेले पुतळे हे शिल्पकार व शिल्पकामें नांवाजण्यासारखीं होऊन गेलीं. १९ साव्या शतकाच्यां अखेरीस पहिल्या वुइल्यम बादशहाचें स्मारक म्हणून अनेक पुतळे उभारले गेले. फ्रान्समध्यें रॉडिन हा शिल्पकार व बार्थोलोमो( जन्म १८४८), चें पॅरिसजवळील पेरे लाज स्मशानभूमींतील मृत्यूचें सामर्थ्य दर्शविणारें स्मारक प्रसिद्ध आहे. ग्रेटब्रिटनमध्यें जर्मन स्मारकाप्रमाणें अति मोठ्या प्रमाणावर असलेलीं स्मारकें फार नाहींत. नेल्सन कॉलम (लंडन) हा पॅरिस येथील स्तंभाप्रमाणें एक मोठा कॉरिन्थियन् स्तंभ आहे. १९ व्या शतकांतील लंडनच्या पुतळ्यांत नांवाजण्यासारखे कांहीं नाहीं. पण पुढील शतकांत थोडा सुधारणा झालेली दिसते (उदाहरणार्थ ' पिटरपॅन, आर्थर सुलिव्हानचें स्मारक इत्यादि लहान लहान पुतळे ). १९१८ पासून युद्धस्मारकांची जरूरी भासल्यामुळें ब्रिटिश मूर्तिशिल्पाला मोठें उत्तेजन मिळाल्यासारखें दिसत आहे. इंग्लंडमध्यें आश्रयार्थ आलेल्या बेलजियन् लोकांनीं नजर केलेला स्मारकसमुदाय फार कौशल्ययुक्त आहे. दुसरें असेंच ह्रदयंगम युद्धस्मारक म्हणजे रिकाम्या खोगिराचें होय ( १९२४ ). हर्बर्ट हेसेलटाईन आणि सर एडवर्ड ल्युटिन्स यांनीं कॅव्हिलरि ( घोडदळ ) क्लबकरितां तयार केलेला हा अनारोहित अश्व आहे.

चित्रकला साधनें, पद्धती व संबद्ध कला.—जरी चित्रकला फक्त दोन प्रमाणांनीं नियमित आहे तरी शिल्पकलेपेक्षां तींत विषयांची बरीच विविधता आहे. रेषाविषयक यथार्थदर्शन चित्रलेखनाचे नियम पाळले असतां मागच्या अंतराची उणीव भरून येते. प्रकाश आणि छाया यांच्या परिणामांवरून शरीराकृति दिसते व शेवटीं रंग दिल्यानें चित्राला पूर्णता येते.

तांबडा, पिवळा आणि निळा या मूल रंगांखेरीज काळा ( प्रकाशाभाव ) व पांढरा ( प्रकाशाची पूर्ण चकाकी ) या गोष्टी प्राचीन लोक जमेंत धरीत.

चित्रकलेंत ( १ ) आकृतिलेखन, ( २ ) एक पृष्ठावरील किंवा साधी चित्रकला आणि ( ३ ) म्यूरल किंवा भिंतीवरची चित्रकला यांचा समावेश होतो.

सा ध नें. ( १ ) आकृतिलेखनः—पेन्सिल आणि कोळसा ही रूपरेषांकरितां योजितात. शेवटचें चित्र काढण्यापूर्वी मोठ्या कामांत अनेकदां रूपरेषा काढिल्या जातात. रंगीत खडूंनीं कोरड्या रंगाचीं चित्रें काढून त्यांवर पुढें गोंदाचें पाणी देतात. याला पेस्टल 'ड्राइंग' म्हणतात. वॉटरकलर ( पाणरंग ) आकृतिलेखनः—यांत प्रथम मध किंवा डिंक यांत रंग तयार करून नंतर त्यांत पाणी ओततात. मध्ययुगांत हस्तलिखितग्रंथांमध्यें अशा तऱ्हेचीं बरींच लहानलहान रंगीत चित्रें आहेत.

(२) साधी चित्रकलाः—सोळाव्या शतकापासून मध्ययुगांत योजिल्या जाणाऱ्या लांकडी फलकांऐवजीं(कॅन्व्हस)कापड आलें. कॅन्व्हस हें जास्त टिकाऊ व मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या कामाला उपयोगी असतें. प्रथम वॉर्निश रंग लावण्यांत येतात. त्यानंतर खास रंग वर देतात. पाहिले रंग व मागाहूनचे रंग एकमेकांत मिसळून चांगले दिसतात व शेवटीं हे रंग वाळल्यानंतर वाहेरचें वॉर्निश देतात. त्यामुळें मूळ चित्र उठावदार दिसतें व त्याचें संरक्षणहि होतें. इटालियन चित्रकार टॅंपेरा ( राळेसारख्या पदार्थाशीं मिसळलेले ) रंग उपयोगांत आणीत. सोनेरी व निळ्या रंगाचा पृष्ठभाग त्यांना फार आवडे. यथार्थदर्शक चित्रांचीं जेव्हां आवड उत्पन्न झाली तेव्हां वरील पृष्ठभागाऐवजीं दृष्टिपातांतल्या प्रदेशांसारखे रंग देण्यांत येऊं लागले. १५ व्या शतकांत नेदर्लंडमध्यें जे तेलाचे रंग करण्यांत येत त्यांच्यांत सुधारणा झाल्यानंतर त्यांचा सर्वत्र उपयोग होऊं लागला.

( ३ ) म्यूरल चित्रकलाः—प्राचीनकाळीं निरनिराळ्या रंगांचे दगड, कांचा वगैरे एकत्र जोडून ( मोसाइक तऱ्हा ) जमीन सुशोभित करीत ( पॉंपि आणि हरक्युलेनीयन यांचें अवशेष पहा ). म्यूरल चित्रकलेचे दोन प्रकार असत. एक अल्सेको ( कोरड्या जागेवर ) आणि दुसरा अल्फ्रेस्को (ओल्या जागेवर). इटलींत १४ व्या शतकापासून दुसरा प्रकार जास्त रूढ झाला; तथापि त्यांत एक अडचण अशी होती कीं, हें काम थोडें थोडें करावें लागे. यावर उपाय म्हणून १९ साव्या शतकाच्या मध्यांत 'स्टिरिओक्रोमची' पद्धत निघाली. हींत कोरड्या जागेवर रंग द्यावयाचे पण नंतर विरघळणारी विवर्ण कांच त्यांच्यांत मुरवून त्यांचें संरक्षण करावयाचे असा प्रकार असतो. एनॅमल ( कांचमिना ) चित्रकलाः—बायझान्टाईन कलेंत सोन्याच्या पातळ पट्ट्या सभोंवताली बसवून त्यांमधील फटी रंगीत एनॅमलनें भरून काढीत. नंतर उष्णता लावून तें एनॅमल वितळवीत. पाश्चात्य सोनार तांब्याचीं तारें सोन्यानें मढवून त्यांच्या खवदडींतून एनॅमल भरीत. चिनीमातीच्या भांड्यावरील चित्रकलाः—अठराव्या शतकांत ही कला चीन जपानमधून यूरोपांत गेली. हीं भांडीं वरचेवर तापवून त्यांवर चकचकीत रंग चढवीत. कांच-चित्रकलाः—मध्ययुगांत अशा प्रकारची 'मोसाइक' तऱ्हा होती. पण पंधराव्या सोळाव्या शतकांत फ्रान्स आणि स्वित्झर्लंड आणि १९ व्या शतकांत जर्मनीमध्यें या कलेची प्रगति झाली. आजकाल सारवलेल्या कांचेची पद्धत ( रंगी व बेरंगी कांचेच्या थरांचें मिश्रण करण्याची ) सर्वत्र आहे. सर्व यूरोपभर अद्यापि शाळा, कॉलेजें, देवळें इत्यादि इमारतींच्या खिडक्या चित्रित कांचेच्या असतात.

चि त्र क ले शीं सं ब द्ध अ शा क ला.—( १ ) या कला कोरींवकाम, ( २ ) लांकडाचे साचे व ( ३ ) शिलालेखन या होत.

( १ ) कोरीवकामः—१४५० च्या सुमारास जर्मनीमध्यें तांब्याच्या पत्र्यावर खोदकाम करण्याची कला निघाली. ही पद्धत १६०० च्या सुमारास हेन्डरिक गॉल्डझिअस नांवाच्या एका जर्मन कारागिरानें पूर्णत्वास आणली. पत्र्यावर रेघा पाडण्यास खोदण्याचें किंवा खुणा पाडण्याचें हत्यार योजितात. नंतर सल्फ्युरिक किंवा नैट्रिक ॲसिडनें या खुणा स्पष्ट करितात. या खोदकामाचे बरेच प्रकार आहेत. एका प्रकारांत ( स्टिपल ) रेघांऐवजीं टिंबें कोरतात. दुसऱ्यांत पत्र्याचा कांहीं भाग खडबडीत करून एका विशिष्ट हत्यारानें उच्चभाग गुळगुळीत करितात. व याप्रमाणें प्रकाश व छाया साधतात.

( २ ) लांकडी ठसेः—ही एक जर्मन कला आहे. १४ व्या शतकापासून साधुसंतांचीं चित्रें व खेळण्याचे पत्ते याच्या करितां ही कला उपयोगी पडे. खोदकाम पुढें आल्यापासून ही पाठीमागें पडली; पण नुकताच हिचा पुनरुदय होऊं लागला आहे.

( ३ ) शिलालेखनः—अलॉइस सेनेफेल्डर ( मृत्यु इ. स. १८३४ ) यानें म्यूनिच येथें ही कला शोधून काढिली. प्रकाश आणि छाया यांचें सम्मेलन यांत दिसत असलें तरी रेखाकलेंतील उठाव यांत नाहीं म्हटल्यास चालेल.

प्रा ची न यू रो पी य न चि त्र क लाः—निरनिराळ्या विषयांवरचीं मोठीं चित्रें आणि चित्रित भांडीं यांमध्यें प्राचीन ग्रीक अति प्रवीण असत. एट्रुस्कन लोकांनीं काढलेल्या म्युरल (भित्ति)चित्रांतून रोजच्या रहाणींतील गोष्टी असतात. रोमनांचीं ओल्या गिलाव्यावर काढलेलीं चित्रें ( फ्रेस्को ) जुन्या ग्रीक चित्रावरहुकुम दिसतात. नेपल्सच्या पदार्थसंग्रहालयांत याचीं अनेक उदाहरणें सांपडतील. तिसऱ्या आणि चवथ्या शतकांतील स्मशानभूमींत दिसणाऱ्या प्राचीन ख्रिस्ती म्यूरल चित्रकलेंत 'गुराख्याच्या वेशांतील ख्रिस्त' यांसारखीं चित्रें आहेत; पण जेव्हां ख्रिस्ती धर्माला राजमान्यता मिळाली तेव्हां चित्रकलेलाहि अधिक वाव मिळाला. पांचव्या शतकांत शुभवर्तमानोपदेशकांना देवदूत, गरुड, बैल किंवा

सिद्ध या स्वरूपांत वसाविलेलें आढळतें. पुढील शतकांत इटली मार्गानें वायंझनशिअमहून पौरस्त्य वळण या कलेंत शिरलें. खिस्ती देवळांतील पूर्वींचा सणावाराचा पांढरा झगा जाऊन त्याऐवजीं वायझनटाईन पद्धतीचा रंगीत व भपकेदार पेहराव आला.

लघुप्रमाण चित्रकलाः—नवव्या व दहाव्या शतकांतल्या वायझन्टाईन कलेंत, त्याचप्रमाणें आयरिश, अँग्लोसॅक्सन आणि फ्रँकिश कलेंत हीं पोटकला विशेष सुधारलेली होती. यूरोपांतील मठांतून पवित्र ग्रंथ सचित्र लिहिण्याची पद्धत होती. बाराव्या शतकापासून पुढें काव्य, तत्वज्ञान या विषयांवरील क्लासिकल( अभिजात ) हस्तलिखित ग्रंथहि तसेच होऊं लागले. पॅरिसचे चित्रकार या कलेंत निष्णात होते. तरी कल्पकता व तजेला जर्मन कारागिरांत जास्त असे. चित्रित कांचेच्या खिडक्यांचीं कामें करण्यांत फ्रान्स देशहि वाकवगार असे.

उत्तरमध्ययुगीन चित्रकलाः—इसवीसन तेराव्या शतकापासून इटलीमध्यें चित्रकला फारच जोमावली. गायोटो ( १२७६–१३३६ ) चित्रकारानें वायझन्टाइन परंपरा मोडण्याचें श्रेय मिळविलें. पंधराव्या शतकांतील इटालियन चित्रकला पाहिल्यास फ्रेस्को चित्रकलेची अधिकाधिक मागणी उत्तर प्रदेशांतल्यापेक्षां इटलींत विशेष असल्यानें या देशामध्यें चित्रकलेची वरीच प्रगति झाली. तसेंच केवळ हातानें चित्रें काढण्याची पद्धत पडली, यथार्थदर्शनचित्रलेखनाचा काळजीपूर्वक अभ्यास सुरू झाला, आणि सृष्टीची प्रतिमा यथार्थ व उत्तम काढतां येऊं लागली. मोठ्या लोकांच्या आश्रयामुळें फ्लॉरेन्स शहरांत या कलेला अनुकूल वातावरण मिळालें. बायवलमधील विषय चितारी सुंदर सृष्टिप्रदेशांत चितारूं लागले. यांपैकी कांहीं चितारी फ्रा अँजेलिको आणि फ्रा फिलीप्पो लिप्पी ( दोघेहि भिक्षू ), बोटीसेली, अँड्रिआ मँटेग्ना आणि गिओव्हनी बेलेनी ( हा शेवटला चितारी तेलाच्या रंगाचें नवीन काम हातीं घेणारा पहिलाच होय ) हे होत.

सोळाव्या शतकांतील इटालियन चित्रकला—पहिल्या प्रतीचे अनेक चित्रकार इटलीला लाभले होते. उ. लिओनार्डो डा व्हिन्सी (१४५२–१५१९.)हा बहुकलाकोविद असून याचीं मिलान येथील सेंट मेरिआ मठामधील 'दि लास्ट सपर' हें फ्रेस्को चित्र; शिवाय 'मोना लिसा' हें प्रतिमाचित्र हीं अप्रतिम आहेत. मिचल एन्जेलो यानें रोमसधील सिक्स्टाईन चॅपेलची आंतील बाजू पौराणिक फ्रेस्को चित्रांनीं सुशोभित केली. अँड्रीया डेल सार्टो हा रंगाचा उत्तम मिलाफ करण्यांत प्रसिद्ध आहे. राफेल सांती ( १४८३–१५२० ) याला पोपनें व्हॅटिकनच्या दिवाणखान्यांत फ्रेस्को रंगविण्याच्या कामावर नेमलें होतें. ईश्वरज्ञान, काव्य, तत्वज्ञान, न्यायशास्त्र, हीं ध्वनित करणारीं चित्रें व या विषयावरील जगाच्या इतिहासांतील प्रसंग राफेलला काढावयाचे होते. त्याचें 'सिक्सटाईन मॅडोना' ( जीजस् आणि मेरी मेघसंचार करीत आहेत असा देखावा ) हा फारच लोकप्रिय आहे. कॉरेजिओ ( १४९४–१५३४ ) यानें वैषयिक चैन आणि ब्रह्मानंद यांतील भावना दर्शविल्या आहेत. स्पष्टास्पष्ट प्रकाशाचा यानें विशेषतः 'होलीनाईट 'मध्यें उपयोग केला आहे. व्हेनेशियन चितारी रंगामधील सौंदर्य व मार्दव उठविण्याच्या कामीं कुशल असत. टिझिअन,गिओर्जिओने आणि पामा वेच्छिओ ( १५ वें शतक ), व टिंटेरेटो आणि पाओलो व्हेरोनेसे ( १६ वें शतक ) हे तत्कालीन सुप्रसिद्ध चिताऱ्यांपैकीं होत.

१५ व १६ व्या शतकांतील उत्तरेकडील चित्रकलाः—जर्मन आणि फ्लेमिश चिताऱ्यांनीं बायबलमधील देखावे आपल्या नजरेंतील प्रदेशांत व पोषाखांत आणून ठेवले. उत्तरदेशांतील स्वातंत्र्यविन्मुख रूढिप्रियतेमुळें इटालियनांनीं चित्रकलेंतील आकृतिलेखनांत जें प्राविण्य मिळविलें तें यांनां मिळवितां आलें नाहीं. औदीच्य चित्रकला जोरदार दिसते. तरी यथार्थदर्शनांत वांकडी व वेडौल आहे. उंची साटिन आणि किनखाब चित्रित करण्याकडे यांचा ओढा दिसून येतो. ड्यूरर एकदां म्हणाला कीं, व्हेनिसमध्यें मी आपला धनी असतों. पण स्वदेशीं येऊनहि खुशामत्या बनतों.तथापि औदीच्य कला दक्षिणेपेक्षां जास्त वैयक्तिक व लोकानुवर्ती असते. ज्याप्रमाणें तेलाच्या रंगाच्या फ्लेमिश शोधामुळें चित्रकलेला उत्तेजन मिळालें त्याप्रमाणेंच नेदर्लंडमधील बर्गंडीअन राजसत्ता व उत्कर्ष यामुळें मिळालें. आल्ब्रेट ड्यूरर (१४७१–१५२८) याच्या लांकडी ठशाच्या चित्रांत चांगली कल्पना व विनोद दिसून येतो. मॅक्सिमिलिअन बादशहानें ड्यूररला चांगला आश्रय दिला. मोठा व धाकटा हालबेअन यांनीं मॅडोनचीं चित्रें रंगविलीं. यांपैकीं धाकटा आठव्या हेन्रीच्या दरबारीं चित्रकार म्हणून राहिला होता.

आधुनिक यूरोपीय चित्रकलाः—सोळाव्या शतकांत केवळ इटली व नेदर्लंड्स यांतच नव्हे तर स्पेन, फ्रान्स, आणि इंग्लंड या देशांतहि चित्रकलेचा बराच उत्कर्ष झाला. रेफर्मेशनचा द्विविध परिणाम झाला. ( १ ) जुन्या परंपरेपासून सुटून चित्रकलेचा ऐतिहासिक चित्रें, दृष्टिपथांतील देखावे, प्राणी व वनस्पतिसृष्टि यांसारख्या विषयांकडे लक्ष पोहोंचवितां आलें. या सर्व चित्रांत यथार्थतेवर मुख्य भर दिसून येतो. ( २ ) लोकांच्या मनावरील आपलें जुनें वर्चस्व पुनः मिळविण्याच्या कामीं कलेचा उपयोग करण्यास कॅथोलिक संप्रदाय उत्सुक झाला.

सोळाव्या शतकाच्या शेवटीं इटालियन चित्रकलेचा ऱ्हास होऊं लागला पण पुढील शतकांत बोलोना येथें तिचें गुईडो रेनी ( १५७५–१६४२ ) आणि सॉल्व्हेटोररोसा यांच्या हांतून पुनरुज्जीवन झालें. सतराव्या शतकांत स्पॅनिश चित्रकला ही स्वतंत्र कला बनली. सेविले हें तिचें केंद्र होतें. संन्यस्तवृत्ति आणि ज्वलतभक्ति यांवर हिची उभारणी असून प्रकाश आणि छाया यांचा परिणाम उदासीनतादर्शक असाच होई. व्हेलस-

क्वेज डी सिल्व्हा (१५९९–१६६०), याचीं हलक्या राहणीचीं दृश्यें, ) म्युरिलो ( १६१७–१६८२) याचीं हलक्या राहणीचीं दृश्य, व नंतर कुमारी मेरीसारखीं धार्मिक कल्पनेचीं चित्रें या कालांतील प्रमुख होत.

सतराव्या आणि आठराव्या शतकामध्यें नेदर्लंड्समध्यें उत्तम नैसर्गिक चित्रें काढलीं जात. ब्राबंट ( फ्लेमिश ) संप्रदायाचे प्रचारक म्हणजे पिटर पॉल रूबेन्स हा एक नैसर्गिक व धार्मिक अशी बरींचशीं चित्रें काढणारा चितारी आणि इंग्लंडच्या पहिल्या चार्लसच्या दरबारीं चित्रकार म्हणून राहिलेला त्याचा शिष्य व्हॅन डिक हे होत. याबेळीं हॉलंड प्रॉटेस्टंट राष्ट्र बनल्यामुळें मॅडोना आणि साधुसंत हे चित्रकारविषय नाहींसे झाले; आणि कलेचा सृष्टिसौंदर्य व प्रतिमालेखन यांकडे ओढा वाढत गेला. फ्रान्स हॉल, रेंब्रॉन्ट रुइस, डेल क्रुइप इत्यादि या वर्गांतील चित्रकार होत.

जर्मनींत १८ व्या शतकाच्या अखेरीला ग्रीकसौंदर्यकल्पनेचें पुनरुज्जीवन झालें, १९ व्या शतकाच्या आरंभीं झालेल्या युद्धामुळें धार्मिक भावना बळावून 'क्लासिकल' चित्रसंप्रदायाविरुद्ध लोकांचा कल बनला. 'नाझारीन' नांवाचा एक चित्रकार संघ चौदाव्या शतकांतील चित्रकलेचा अभ्यास करण्याकरितां मुद्दाम रोमला गेला. बव्हेरियाच्या पहिल्या लुडविक राजानें कलेला उत्तेजन दिलें व म्युनिच हें एक कलाकेंद्र होऊन राहिलें. काव्यें, जर्मन पुराणकथा आणि फेरीदेवतांच्या गोष्टी हे चित्रकलेचे विषय बनले. इतिहास आणि काव्यांतील वीरगीतें यांना प्राधान्य देणारे ड्युसेलडॉर्फ हें आणखी एक केंद्र बनलें. आजकालच्या विषयांनां फांटा देणाऱ्या या गोष्टींचा प्रतिकार म्हणून कीं काय यथार्थता पुढें सरली. लेनबॅच, वर्नर आणि अडोल्फ मेन्झेल हे चित्रकार लढायांचीं चित्रें व तसबिरा काढूं लागले. सूर्यप्रकाशामुळें सृष्टीला आलेलें सौंदर्य दाखविण्याचा मॅक्स लेबरमेन यानें प्रयत्न केला. आधुनिक परमध्येयासक्तीचा उद्देश पूर्वीची परंपरा बाजूला सारून नवी सृष्टी उत्पन्न करण्याचा आहे. हल्लींच्या आयुष्यांतील भावना दिग्दर्शित करावयाच्या व जुन्या पौराणिक कथा सुद्धां नवीन रूपांत मांडावयाच्या. आर्नाल्ड बॉक्लिन ( १८२७–९१ ), हॅन्स थोमा, उहदे वगैरे या संप्रदायांतील चित्रकार होत.

दृष्टीच्या टापूंतला प्रदेश रंगविण्यांत फ्रान्सचा हातखंडा आहे. चौदाव्या लुईच्या अमदानींत चार्लस लीब्रन हा दरबारी चितारी होता. ग्र्यूझे ( १७२५–१८०५ ) यानें नैतिक चित्रांशिवाय मुलींच्या सुंदर प्रतिमा काढल्या. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं 'क्लासिकल' पद्धत प्रचारांत होती. रोमन प्रजासत्ताक राज्य याबेळीं फ्रान्सचें परमध्येय बनलें असल्याकारणानें प्रजासत्ताक कारभारांतील सद्गुण प्रशंसापूर्वक पुढें मांडण्याचें कलेचें काम असे. यानंतर रोमँटिक प्रकाराकडे कलेचा कल वळला व इतिहासांतील करुणाजनक प्रसंग रंगविण्यांत येऊं लागले. अर्नेस्ट मिसोनियर ( १८१५–१८९१ ) यानें लष्करी विषय घेतले व शेतकऱ्यांचीं चित्रें जीन फ्रँकॉइस मिलेट ( १८१४–७५ ) काढूं लागला. पण यामुळें वस्तुस्थितींतील अगदीं उघडे नागडे व निष्ठुर असे प्रसंगहि काढण्यांत येऊं लागले. कोर्बेट ( १८१९–७७ ) याचीं चित्रें अशा धर्तीचीं आहेत. सृष्टिविषयक इंग्लिश चित्रकलेचा फ्रेंच लोकांवर परिणाम झाला.

रोसा बानव्हूर ( १८२२-९९ ) हा प्राण्यांचीं चित्रें काढूं लागला. वस्तूंवर प्रकाश, वातावरण इत्यादिकांचे परिणाम उठावदार करण्याकडे आजची प्रवृत्ति दिसते. या संप्रदायाचे चित्रकार मानेट मोनेट, लिपेज हे होत. भ्रष्ट आयुष्याचे वाईट परिणाम दाखविणारीं हॉगार्थचीं नैतिक चित्रें १८ व्या शतकांत पुढें आल्यापासून इंग्लंडांतील आधुनिक चित्रकलेचा स्वतंत्र मनु सुरू झाला. तसबिरीमध्यें यथार्थता हा गुण असल्यामुळें ब्रिटिश कला या बाबतींत बरीच सरसावली. या वर्गांतील प्रसिद्ध चित्रकार जोशुआ रेनाल्ड (१७२३–९२)व त्याचें विशेषतः 'हेड्स ऑफ एन्जल्स ( देवदूतांचीं शिरें ) हें, थॉमस गेन्स बरो ( १७२७–८८ ) यांचीं, 'दि ब्ल्यू बॉय' ( नील बालक ) आणि 'सरा सिडॉन्स' या नटीची तसवीर, त्याचप्रमाणें त्याचीं नैसर्गिक दृश्यांचीं चित्रें व थॉमस लॉरेन्स ( १७६९–१८३० ), तसेच अलीकडील शानॉन, हरकोमर इत्यादि कवी ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. इतर विशिष्ट विषय म्हटले म्हणजे प्राणिविषयक चित्रें ( एडविन लँड सीर १८०२–७३ ), रोजच्या राहणींतील देखावे आणि ऐतिहासिक प्रसंग ( बेंजामिन वेस्ट १७३८-१८२०)इत्यादि होत. जमिनीवरील आणि समुद्रावरील देखाव्यांचीं चित्रें काढण्याला प्रथम याबेळीं इंग्लंडांत सुरवात झाली. विल्यम टर्नर ( १७७५–१८५१ ) हा पाण्यावरील धुक्याचा देखावा सुंदर रीतीनें दाखवितो. त्याचीं चित्रें कांहीं थोडीशी अस्पष्ट पण एकंदरींत फारच परिणामकारक आहेत. स्पष्ट रूपरेषेंपेक्षां नैसर्गिक देखाव्यांत प्रकाश आणि छाया यांचे परिणाम विशेष दाखविण्याकडे जॉन कॉन्स्टेबल ( १७७६--१८३७ ) याचें लक्ष्य असे.

पूर्वीची परंपरा सर्व बाजूला सारून पंधराव्या शतकांतल्या प्रमाणें निसर्गसत्यतेकडे परत वळण्याकरितां १८४८ त रॉसेटी ( १८२८–८२ ), होलमंड हंट ( जन्म १८२७ ) आणि जॉन एव्हेरेट मिलाइस ( १८२९–९६ ) यांनीं राफेल पूर्वभ्रातृसंघ (प्री-राफेलाइट ब्रदरहुड) स्थापिला. राफेल रोमला गेल्याबेळेपासून या निसर्गसत्यतेचा लोप झाला अशी त्यांची समजूत होती. केवळ पृथक्भावाची सौंदर्यमूर्ति त्यांनां पाहिजे होती असें नव्हें तर काव्यमय भावना व कल्पना सुंदर रीतीनें त्यांनां पुढें मांडावयाच्या होत्या. हंटनें आपले विषय बायबल आणि कीटच्या कविता; यांमधून, रॉसेटीनें डॉन्टेच्या ग्रंथांतून आणि मिलाईसनें बायबल आणि मध्ययुगीन 'शिव्हलरींतून' निवडले. बर्न जोन्स (१८३३–९८) यानें हाच मार्ग अनुसरून सोनेरी

केसांनीं मंडित अशा कायमच्या ठशाचा स्त्रीमुखवटा काढला. अद्यापिहि सर फ्रेडरिक लेटन आणि त्याचा शिष्य पॉयटर आल्मा टाडेमा आणि अल्बर्ट मूर यासारखे चित्रकार प्राचीन क्लासिकल विषय पसंत करितात. कांहीं श्रेष्ठ कल्पना (आशा, प्रेम आणि जीवित, प्रेम आणि मृत्यु या सारखी ) दाखविणाऱ्या रूपकात्मक प्रतिमा वॉट्स ( १८१८–१९०४ ) नें काढल्या होत्या.

विसाव्या शतकांत व्हिस्लरनें नवीन पद्धति सुरू करण्याचा धडा घातला. तो व मेलव्हिले, जॉन लॅव्हेरी, गुर्थी यासारखे ग्लासगोचे चितारी यांनीं यथार्थतेविरुद्ध रंगसंयोगांची मोहीम काढली. वाईली आणि फ्रँक ब्रांगावन यांची नौकानयन व व्यापार यासंबंधीं देखाव्यांचीं चित्रें, लॉ थँग्यूचे नयनगोचर देखावे हीं लक्ष्यांत घेण्यासारखीं कामें आहेत. ब्रिटन रिव्हिएरी आणि क्लॉसेन हीं सर्व विसाव्या शतकाचीं गमकें आहेत. कांहीं चित्रें तर थोड्याशा रेघा किंवा रंगाचे लपेटे यांनींच भरलेलीं असतात. लोकांच्या रोजच्या रहाणींत कलेचा प्रवेश करून देण्याचा इंग्लंडचा प्रयत्न आहे. मॉरीस, ग्रेफन हॅगेन व इतर चित्रकार हे रेल्वे कंपन्याकरितां मोठया जाहिराती काढून देण्यांत गर्क आहेत. या गोष्टीमुळें हळूहळू शहरांतलि रस्ते सुंदर दिसूं लागतील. जपानी चित्रकलेसंबंधींहि आवड उत्पन्न होऊं लागली आहे व आजचें साम्राज्यप्रदर्शन ( १९२० ) हिंदी कलेविषयीं आवड उत्पन्न केल्याशिवाय रहाणार नाहीं असा भरंवसा वाटतो.

संगीत कला.—वारा किंवा तारा या साधनांनीं काढलेल्या ध्वनींमुळें जें सौंदर्याविष्करण होतें त्यास संगीतकला असें म्हणावें. ही कला कांहीं अंशीं स्वतंत्र कला म्हणून व कांहीं अंशीं नाट्य आणि काव्य या भगिनीला संबद्ध अशी उदयास आली आहे. पाश्चात्य देशांत आर्केस्ट्रा किंवा कोरस यांतील एकतानतेमुळें उत्पन्न होणारी सौंदर्यभावना एकामागून एक निघणाऱ्या सुखदायक अशा शुद्ध आलापाबरोबरच वृद्धिंगत झाली.

प्राचीन संगीतः—हिब्रू लोकांत तुतारी, सतार व झिथर हीं वाद्यें असत. धार्मिक उपासनेचें पावित्र्य प्रवृद्ध करण्याचें संगीताचें काम आहे असें ते समजत. प्राचीन ग्रीकांचा उद्देश आत्म्याची एकतानता करण्याकडे व उच्च व सुंदर गोष्टींकडे माणसांचा ओढा लावण्याकडे असे. काव्य आणि संगीत या कलांना बहिणीबहिणी समजतात. एकतानतेपेक्षां आलाप व लय जास्त महत्वाचे मानीत; आणि अर्वाचीन स्वराष्टकप्रमाणपद्धति ग्रीक पद्धतीवरच बसविली आहे. नाट्यांतील भावनाप्रधान भागाच्या जोडीला पावा आणि सिथारा हीं वाद्यें योजीत. जेव्हां पात्रांनां नाट्यभाग शोकपूर्ण वठवावयाचा असे तेव्हां कोरस योजीत. खि. पू. पांचव्या शतकांत अलेक्झांड्रिया हें एक संगीत कलेचें केंद्र बनलें, त्यानंतर रोम; पण रोममध्यें वैषयिक सुखाकरितांच संगीताचें संवर्धन करण्यांत आलें. प्रत्यक्ष गुलाम किंवा स्वतंत्र झालेले गुलाम, हेच फक्त हिची आराधना करीत.

मध्ययुगीन संगीतः—मिलानच्या बिशप ॲम्ब्रोशिअसचीं गीतें ( इ. स. ५ वें शतक ) व सहाव्या शतकांतील ग्रेगरी गीतें या पासूनच पुढें चर्चमधील स्तोत्रें निघालीं. आजच्या यूरोपियन नोटेशनचें मूळ अकराव्या शतकांतल्या इटलींत सांपडतें. १२०० च्या सुमारास जर्मनींत त्याला पूर्णता लाभली. प्रॉव्हेन्स आणि जर्मनी येथील ट्रूवाडूर हे फिरते कवी आणि पुढील काळांतील मीस्टर ( शहरव्यापारीसंघाचे ) गायक यांनीं संगीताला काव्यापेक्षां कमी प्रतीचा दर्जा आणून दिला. पण लौकिक गीतांमुळें आलापांना जास्त स्वतंत्र स्वरूप आलें.

आधुनिक संगीतः—प्रॉटेस्टँटिझम हाणून पाडण्याकरितां रोमन कॅथोलिक चर्चनें मोठ्या आनंदानें संगीताची मदत घेतली. इटलीनें अतिशय सुंदर असें धार्मिक संगीत निर्माण केलें. उलट सतराव्या व अठराव्या शतकांत प्रॉटेस्टँटिझमनें स्तोत्रें आणि संगीत संतकथानकें पुढें आणलीं. फ्लॉरेन्समध्यें द्वंद्वगीतरूपासहित संगीत नाट्य निर्माण झालें. जर्मन संगीतांत रोमँटिक भावना कायम ठेवून पौराणिक ' क्लासिकल ' (अभिजात) कथांऐवजीं लौकिक कथानकें घातल्यामुळें त्याचा फ्रान्स आणि इटली या देशांवरहि परिणाम झाला. ऑपेरा, मोझार्टचे स्वरमेळ आणि बिथोव्हेनचे ग्रंथ यानंतर शूबर्ट, शूमन आणि मेंडेलसोहन यांचीं पदें, वेबरचें ऑपेरा आणि चॉपिनचीं पद्यरचना पुढें सरसावली. गायनकलेंतील परिभाषा इटालियनांनीं पूर्ण केली. सोळाव्या शतकांत जर्मनीनें आजचें व्हायोलीन शोधून काढलें; आणि अठराव्या शतकांत इटली आणि जर्मनी यांनीं स्वतंत्रपणें पियानो वाद्य तयार केलें.

व्हेनिसमधील सेंट मार्कच्या वादकांनीं वाजा रूढ केला. नवीन रोमँटिक संगीताचा उद्देश केवळ विकार प्रदर्शित करण्याचाच नसून कृति, शब्द व विचार हींहि दिग्दर्शित करण्याचा आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील रिचर्ड वाग्नरचे ऑपेरा जर्मन पुराणकथासंबंधीं असून ऑपेरा मध्यें शब्द आणि संगीत यांची अतिनिकट एकतानता त्यांनीं करून दिली आहे. लिस्ट आणि ब्राह्म्स हे आपल्या असंबद्ध काव्यामुळें प्रसिद्ध आहेत. गौनाड आणि बिझेट यांचे इटालियन ऑपेरा व फ्रेंच ऑपेरा यूरोपखंडभर लोकप्रिय असून अत्युत्कृष्ट पोषाख, देखावे यांनी सजवून ते रंगभूमीवर करण्यांत येतात. स्लाव संगीत मोठें गमतीचें असतें. आधुनिक इंग्लिश संगीत, बाल्फे, एल्गार आणि अर्थर सुलिव्हॅन यांचें होय. संगीत नाटकाचें अलीकडचें स्वरूप म्हणजे संगीत प्रहसन होय; अशा नाटकांत ( कथानक प्लॉट ) महत्वाचा नसून गाणी आणि कोरस या योगानें तें उठावदार करितात. इंग्लंडमधील लौकिक गीतांचा विषय बहुधा समुद्रासंबंधीं असतो. स्कॉटलंड आणि आयर्लंडच्या लौकिक गीतांत

त्यांचें वैशिष्ट्य कायम असतें. अशा प्रकारचीं आयरिश गीतें सुस्वर व बहुतेक उदासीनतेचीं असतात.

नाटयकला:—प्राचीन ग्रीक आणि रोमन लोकांनीं उपयोजिलेली ही कला अर्वाचीन यूरोपखंडांत ईस्टर व नाताळ यासारख्या सणांतून दाखविल्या जाणाऱ्या धार्मिक किंवा अद्भुत नाटकांच्या उत्पत्तीपासून सुरू झाली. या कलेंत इटली, फ्रान्स आणि जर्मनी यांनीं प्रावीण्य मिळविलें आहे व एकोणिसाव्या, विसाव्या शतकांत ज्यू लोकांनीं आपल्यांतील प्रसिद्ध नट आणि नटी यांनां या कलेला वाहून तीत भर घातली आहे. शेक्सपियरच्या नाटकानें नाटयकलेवर अतिशय वर्चस्व बसविलें आहे असें दिसतें; कारण बहुतेक प्रसिद्ध नाटयकुशलांनीं अपल्या आयुष्यांत केव्हांतरी शेक्सपियरच्या पात्रांनां आपल्या स्वतंत्र पद्धतीनें रंगविलें आहे. यूरोपखंडांतील फ्रान्स खेरीजकरून बहुतेक सर्व देशांत इंग्लंडांतल्यापेक्षांहि जास्त उत्साहानें शेक्सपीयरचीं नाटकें करितात. फ्रान्स मात्र मोलिअर व रासाईन या सारख्यांचीं आनंद-शोक पर्यवसायीं नाटकें पसंत करतो. आजकाल मूळ नाटक ( मिरॅकल—अद्भुत धार्मिक नाटय ) याकडे लोकांची प्रवृत्ति दिसते. त्याहूनहि अलीकडची प्रवृत्ति म्हणजे कायनोमॅटोग्राफची होय. पहिल्या प्रतीचे नट देखील या पडद्यावरील नाटकांतून कामें करतात.

भारतीय कलेवर अभ्यास आज बराच झाला आहे. आणि त्यावरील बरेंच विवेचन ज्ञानकोशांत द्यावयाचें आहे आणि यासाठीं विषयप्रशस्तिपरच कांहीं वाक्यें लिहितों. भारतीय नाट्य, भारतीय नृत्य, भारतीय मूर्तिशिल्प, भारतीय शिलाशिल्प उर्फ खोदकाम, भारतीय धातुशिल्प, भारतीय गृहमंडनशास्त्र, भारतीय चित्रकला, भारतीय संगीत, भारतीय वास्तुशिल्प, हीं सर्व गृहमंडनशिल्प, चित्रकला, धातुशिल्प, नाट्यनृत्य, मूर्तिशिल्प, शिलाशिल्प, इत्यादि सदरांत येतील.

भारतीय कलेमध्यें अनेक शाखा आहेत. निरनिराळे शासकवर्ग अपापली भिन्न कला प्रचारांत आणूं लागले. त्याचप्रमाणें भारतीय हिंदु कला जावा, सुमात्रा, इकडे पसरली. या सर्वांचा परामर्ष त्या त्या देशावरील लेखांत घेतला जाईलच. कलेविषयीं तात्त्विक विवेचन मात्र जितकें व्यापक, सूक्ष्म व पृथक्करणशक्तीनें मिश्रित असलें पाहिजे तितकें झालेलें दिसत नाहीं. अस्तित्वांत असलेल्या विविध कलांतून कलातत्व शोधावें व तें पुढें मांडावें अशा तऱ्हेची ओरड पुष्कळ झाली आहे. परंतु एकाच देशांतील सौंदर्यविषय झालेल्या अनेक वस्तू व अनेक देशांतील व अनेक संस्कृतींतील कलाविषय झालेल्या सर्व वस्तू लक्षांत घेतल्या म्हणजे कलातत्व शोधणाऱ्याची बुद्धि थोडीबहुत गुंग होते.

उ प यो ग सा हि त्य व क ला.—कलातत्वसंशोधकांनीं आद्य म्हणजे प्राकृतिक कलेची व्याख्या अशी केली आहे कीं, कला म्हणजे उपयुक्तता या गुणाखेरीज इतर असलेला गुण. याचा अर्थ असा नाहीं कीं कला उपयोगी नाहीं त्याचें म्हणणें असें कीं एखाद्या वस्तूचा विशिष्ट किंवा प्राकृतिक उपयोग आहे. तो उपयोग साध्य करण्याशिवाय त्या वस्तूस अधिक आकर्षक बनविणें हें कलेचें ध्येय आहे. उदा. पंख्याचा प्राकृतिक उपयोग वारा घेणें; पण नुसता कामचलाऊ पंखा न वापरतां अनेक तऱ्हांनीं शोभिवंत असा पंखा केला कीं जो सुंदर स्त्रीच्या हातांत शोभेल, तर तो पंखा कलायुक्त होय. व त्या पंख्यांत पंखेपणा खेरीज ज्या इतर गोष्टी आकर्षणार्थ घातल्या असतील त्या कला होत; व पंखेपणा व त्या गोष्टी मिळून पंखा तयार करणें ही कला होते.

परंतु संगीताविषयीं ही विचारपद्धति कशी लागू पडेल? प्रसंगानुरूप संगीत निरनिराळें होईल, त्याप्रमाणें प्रसंगानुरूप पंखे निरनिराळे होतील. तर वस्तूचा उपयोग ही कलेची निकषशिला नव्हे असें म्हणतां येणार नाहीं. तथापि उपयोग आणि शोभा हीं दोन तत्वें कलाविषयक विचारांत उपयोगीं पडणार नाहींत असें नाहीं.

ज्या कलांचा मानवी गरजा किंवा सोयी भागविण्याच्या कामीं मुख्य उपयोग होत नसून ज्या केवळ मनुष्याच्या मनांतील सौंदर्यप्रेमास काय त्या पोषक असतात अशा कलांनां ललितकला म्हणण्याचा प्रघात आहे. आतां कांहीं कला दोन्हीहि कार्यें करूं शकतात; तरी त्यांची ललितकलांतच गणना केली जाते. उदाहरणार्थ शिल्पकला. या कलेच्या योगानें आश्रयनिवासादि गरजा भागत असल्यामुळें तिची उपयुक्त अथवा यांत्रिक कलांमध्यें मोजदाद करावयास पाहिजे. तथापि शिल्पकलेचीं भव्य कामें, इमारती वगैरे व त्यांची मजबुती, निरनिराळ्या भागांतील सुव्यवस्थित, एकजीवि व प्रमाणशीर मांडणी, त्यांची भपकेदार रंगसफेती, चित्रविचित्र नकशीकाम या सर्वांच्या योगानें मनावर होणारा परिणाम व आनंद लक्षांत घेऊन या कलेला ललितकला म्हणण्याचीच विशेष प्रवृत्ति आहे. उलटपक्षीं, सौंदर्यप्रियता या शब्दाचा कितीहि व्यापक अर्थ केला तरी त्यांत हास्यजनक चित्रें व विद्रुप आकृती यांच्या आवडीचा समावेश होणें शक्य नाहीं. तरीहि तसल्या कुरूप, भयानक, बीभत्स अशा आकृती काढणें या कलेचा ललितकलांत अन्तर्भाव करतात. तेव्हां सामान्यतः ललितकला या नांवामध्यें सुखदायक अशा सर्व कलांचा समावेश करण्यास हरकत नाहीं; मग त्यांत उपयुक्तता असो वा नसो.

कृ त्रि म ता व क ला.—व्यावहारिक भाषेमध्यें कृत्रिम गोष्टी व नैसर्गिक गोष्टी असा जो आपण भेद करतों तदनुसार कृत्रिम गोष्टी किंवा कला यांत फक्त मनुष्यकृत वस्तूंचा समावेश होतो. आणि नैसर्गिक गोष्टींमध्यें मनुष्यप्राण्यांतील व जगांतील जीं जीं कार्यें मनुष्ययत्नांवांचून आपोआप उर्फ सृष्टिनियमानें होत असतात त्यांचा समावेश होतो. तेव्हां कला म्हणजे आपण मानवी प्राणी पूर्वविचारानें विशिष्ट उद्देश मनांत धरून जी कृति किंवा करामत करतों ती होय. अर्थात् हीच कलेची सामान्य व्याख्या ललितकलांनाहि लागू

आहे. यावरून कला म्हटली म्हणजे तेथें पूर्वविचार हा असलाच पाहिजे हें स्पष्ट होतें. शेले कवीनें आपल्या कवितेंत एके ठिकाणीं स्कायलार्कच्या गाण्याला 'पूर्वविचाररहित असलेली करामत'.असें म्हटलें असलें तरी त्याच कवितेंत पुढें त्यानें स्कायलार्कच्या व कवीच्या गाण्यांतील नैसर्गिक व कृत्रिम हा फरक स्पष्टपणें कबूल केलेला आहे. आपणहि नैसर्गिक वक्तृत्वाला, वागणुकींतील भारदस्तपणाला किंवा मोहकपणाला आणि स्वभावांतील व वर्तनांतील अशाच कित्येक गोड गोष्टींनां ललितकलांमध्यें गणीत नाहीं. कारण यांपैकीं पुष्कळ गोष्टी जरी बालपणांतील संवयीनें किंवा आनुवंशिक संस्कारानें प्राप्त होणाऱ्या असल्या तरी त्या अंगामध्यें पूर्ण मुरून नैसर्गिक स्फूर्तीनें होऊं लागल्यावाचून त्यांत खरी व पुरी मजा येत नाहीं. ललितकलाभिज्ञ पंडितांनीं मनुष्याच्या वागणुकींतील मोहक गुणांचा जरी तत्वाखातर ललितकलांत समावेश केला असला तरी मनुष्याच्या संवयींतील अनेक गोष्टी पूर्ण परिणतीअंतीं नैसर्गिक अशाच भासूं लागतात हें नाकबूल करतां येत नाहीं. उलटपक्षीं उत्तम पोषाख करणें ही गोष्ट पूर्वविचाराशिवाय कदापीहि होऊं शकणार नाहीं. म्हणून तिला कलाच म्हटलें पाहिजे.

क र्तृ भो क्तृ सौ ख्य.-तेव्हां एकंदर कलांचीं अर्थात ललितकलांचीं कार्ये पूर्वविचारानें होत असतात,आणि प्रत्यक्ष ललित कलाकुशलाला तिच्या प्रक्रिये( उपयोगा )पासून विशेष प्रकारचें सुख प्रत्यक्ष अनुभवावयास सांपडतें, आणि इतर प्रेक्षक किंवा श्रोतृजनांनां सुख मिळतें. वरील विधानावरून हें स्पष्ट दिसतें कीं, मानवी समाजामध्यें ललितकलाकुशलांचा एक स्वतंत्र वर्ग असून त्यांपासून सुख मिळविणारांचा दुसरा निराळा वर्ग असतो. आपली ही भाषा आधुनिक सुधारलेल्या समजांस बरोबर लागू पडण्यासारखी आहे. त्यांत अर्थशास्त्रांतील भाषेंत बोलावयाचें म्हणजे उत्पादक व ग्राहक असे दोन वर्ग असतात. पण प्रथमावस्थेंतील समाजांनां मात्र हा नियम लागू पडत नाहीं. तसेंच कोणत्याहि कलेची प्राथमिक अवस्था पाहिली तर तेथेंहि उत्पादक व ग्राहक उर्फ कलाकर्ता व भोक्ता असे निरनिराळे इसम नसतात. उदाहरणार्थ नाट्यकला घ्या; या कलेचा मूळ आरंभ लहान मुलांच्या अनुकरणचेष्टांत आढळतो आणि मुलें असले नाटकी हावभाव किंवा उच्चार करतांना प्रेक्षकांची अपेक्षा केव्हांहि करीत नाहींत. खोदकामांतील आद्यप्रवर्तक हा इतिहासपूर्व कालांतील कोणी गुहावासी इसम असला पाहिजे व त्यानें प्रथम शिकारींत सांपडलेल्या प्राण्यांचीं चित्रें केवळ स्वतःच्या करमणुकीखातर खोदून ठेवण्याचा उद्योग केला असला पाहिजे. मूळ शिल्पकारहि प्राचीन काळीं राहुटींत किंवा झोंपडींत राहणाऱ्या रानटी लोकांतील असून त्यानें प्रथम आपली राहुटी किंवा झोंपडी स्वतःच्या दृष्टीला रुचेल अशा तऱ्हेनें उभारण्यांत आपलें कौशल्य प्रगट केलें असलें पाहिजे. या आद्यजनकांच्या मनांत स्वतःशिवाय इतर जनांनां संतोषित करण्याची इच्छा असेल असें म्हणवत नाहीं. नृत्य व गायनाच्या आद्यप्रेमी इसमानें प्रथम एकट्यानेंच आनंदाच्या भरांत आपल्या पूज्य देवतेला आळवितांना किंवा एखादा विजयोत्सव साजरा करतांना किंवा केवळ तालस्वरविषयक अन्तःस्फूर्तीनें टाळ्या वाजविण्यास आणि पाय नाचविण्यास किंवा नियमित सूर काढण्यास आरंभ केला असला पाहिजे. पुढें त्याच्या टोळींतील कित्येक इसम केवळ प्रेक्षक म्हणून जमूं लागले असावेत. पोषाख व शृंगार यांच्या बाबतींतहि प्रथम आरंभ कवड्या व पिसें यांनीं स्वशरीर विभूषित करणाऱ्या रानटी इसमानें केलेला असून त्याच्या मनांत मात्र आत्मसुखाच्या इच्छेबरोबर स्वतःच्या स्त्रीला मोहविण्याचा व तसेंच स्वजातिबांधवांनां दिपविण्याचा किंवा खिजविण्याचाहि उद्देश असला पाहिजे. ललितकलांवरील अलीकडील लेखकांची प्रवृत्ति निराळी असून सदरहू कलांचा उगम आत्म व स्वयंस्फूर्ति यांत नसून स्वसमाजबांधवांस सुखविण्याच्या मानवी इच्छेंत आहे असें ते प्रस्थापित करूं पहात आहेत. या वादाचा निर्णय कसाहि लागला तरी एक गोष्ट अगदीं स्पष्ट आहे कीं, वरील सर्व ललितकलांच्या बाबतींत ज्या कृतीनें प्रत्यक्ष कलाकारास आनंद होतो, तिनेंच इतरांनांहि होतो. यामुळें समाजाच्या वाढीबरोबर त्यांत ललितकलाभिज्ञ लोक व त्यांचे प्रेक्षक असे दोन स्वतंत्र वर्ग निर्माण होऊं लागतात. त्यांत ज्या इसमांनां विवक्षित कलेपासून सुतरांसुखप्राप्ति होतेसें वाटतें ते लोक तिचे अभ्यासक व प्रवर्तक बनतात. व स्वतःच्या नैपुण्यानें ते इतरांनां सुखवीत असतात. शिवाय असले चित्रकार, शिल्पकार किंवा खोदकाम करणारे स्वतःच्या कृतींनीं स्वतःचेंहि मनरंजन करूं शकतात. गायक किंवा वादक स्वतःच्या मधुरालापांत स्वतःच तल्लीन होत असतात; कवीहि स्वयंविरचित कवनें मोठ्या प्रेमानें किंवा मार्मिकपणानें वाचीत असतात. शिवाय प्रेक्षकांपैकीं कित्येक सतत प्रेक्षणानें किंवा श्रवणानें स्वतःच कलाकुशल बनूं शकतात; ही गोष्ट महत्वाची आहे.

नि र पे क्ष आ नं द.—ललितकलांमध्यें जे विशेष गुण आहेत त्यांपैकीं एक महत्वाचा गुण असा आहे कीं, त्याचा प्रत्यक्ष उपयोग किंवा आवश्यकता कांहींएक नसतांहि त्या अस्तित्वांत असूं शकतात. म्हणजे पूर्वी अरिस्टॉटलनें म्हटलें आहे त्याप्रमाणें या कलांपासून होणारें सुख हितनिरपेक्ष असतें. त्याचा अर्थ असा कीं, या सुखापासून मनुष्याच्या शरीरपोषणाला मदत होत नाहीं किंवा त्याच्या संपत्तींत भर पडत नाहीं. हें सुख अनुभवणाऱ्या मनुष्याला इतरांपेक्षां कोणताहि अधिक फायदा होत नाहीं, किंवा त्याची योग्यता अधिक वाढत नाहीं; तसेंच हें कोणा एकट्या व्यक्तीलाच घेतां येतें इतरांनां घेतां येत नाहीं असेंहि नाहीं. उदाहरणार्थ, एखाद्या सुंदर इमारतीचें दर्शनसुख कोणा विशिष्ट व्यक्तीलाच अनुभवितां येतें असें नाहीं. त्या शहरांतील सर्व रहिवाशांनां व भविष्यकालीन सर्व पिढ्यांतील प्रेक्षकांनां तें

मिळूं शकण्यासारखें असतें. तीच गोष्ट कोणत्याहि सुंदर चित्राची किंवा पुतळ्याची आहे. त्याचें दर्शनसुख सर्वांनां सारखें लाभूं शकतें. फार तर त्याचा कबजा मालकीच्या नात्यानें एखाद्याच व्यक्तीला मिळून त्याबद्दल त्याला प्रौढी मिरवितां येईल. संगीत पद्यांचा किंवा कवीच्या काव्याचा प्रकारहि तसाच आहे. सार्वकालीन सर्व वाचकांनां त्यांतील कल्पनांचा व भावनांचा आस्वाद सारखाच घ्यावयास सांपडतो. ललितकलांशीं सादृश्य असलेल्या इतर कलांमध्यें वरील गुण नसतात. उदाहरणार्थ, जिव्हा व घ्राण यांनां सुखविणाऱ्या गोष्टींची ललितकलांत गणती करीत नाहींत. याचें कारण नेत्र व कर्ण हीं अखिल ज्ञानग्राही अतएव उच्च दर्जाचीं इंद्रियें असून घ्राण व जिव्हा हलक्या प्रतीचीं आहेत, असें कित्येक सांगतात. पण वास्तविक कारण असें दिसतें कीं, रुचिगंधविषयक सुखें वैय्यक्तिक स्वरूपाचीं असून तद्विषयक पदार्थांचा सर्वांनां सर्वकाळ सारखाच उपभोग घेतां येईल अशी व्यवस्था करणें शक्य नसतें. शिवाय रुचिगंधयुक्त अशा सर्व खाद्यपेयपदार्थांचा मनुष्याच्या शरीरपोषणाकडे प्रत्यक्ष उपयोग होत असल्याकारणानें तज्जन्य सुखाला ललितकलाजन्य सुख असें म्हणतां येणार नाहीं. व तद्विषयक कौशल्याला ललितकला म्हणतां येत नाहीं. आतां ह्या कनिष्ठ सुखापासून अत्युच्च सुखाकडे म्हणजे प्रेमाचे हाव भाव व चेष्टा यांपासून प्रेमविषयीभूत व्यक्तीला होणाऱ्या सुखाकडे वळूं. प्रेमविषयक सुखाचा अनुभव सौंदर्यजन्यच आहे यांत शंका नाहीं. तरी पण या सुखाला कलाजन्य म्हणतां येत नाहीं. प्रेमप्रेरित कृतींचें कलाजन्य सुख अनुभविणें असल्यास आपणास नाट्यगृहांत जाऊन तेथें अगदीं तिऱ्हाईत व्यक्तींनीं केलेले प्रेमाचे केवळ कृत्रिम हावभाव पहावे लागतात. याचें कारण उघडच आहे कीं येथेंहि कृत्रिम व स्वाभाविक गोष्टींतील भेदाचाच प्रश्न आहे. कारण प्रेमाचा खरा अनुभव ही गोष्ट कृत्रिम कलासाध्य नसून तिचा मानवी जीवितार्शी व स्वभावाशीं प्रत्यक्ष संबंध आहे. त्यांत मानवी आशा, निराशा, मनोविकार इत्यादि अनेक गोष्टी येतात. उलटपक्षीं खरें प्रेम नसतां केवळ प्रेमभावाचें प्रदर्शन करणें हा कृत्रिम कलेचा विषय बनतो. तेथें प्रेक्षकाच्या वैयक्तिक भावनांचा अगर मनोविकारांचा संबंध नसल्यामुळें त्याला होणाऱ्या निरपेक्ष सुखाचा ललितकलाजन्य सुखांत अन्तर्भाव होतो. तात्पर्य जेथें प्रेमीजनाला 'माझें' म्हणून वैयक्तिक मालकी गाजविण्याला, आत्मप्रौढीला, स्वाभिमानाला वाव असतो तेथें त्याच्या सुखाला ललितकलाजन्य म्हणतां येत नाहीं. येणेंप्रमाणें अगदीं नीच दर्जापासून उच्च दर्जाच्या सुखापर्यंत जेथें जेथें वैयक्तिक फायद्याचा किंवा मालकीचा संबंध पोहचूं शकतो येथें तत्सुखदायी कलेचा ललितकलांत अन्तर्भाव करणें शक्य नाहीं. ललितकलाजन्य सुख हें केवळ मनोमय व पूर्णपणें अन्यहितनिरपेक्ष असतें. सदरहू व्याख्येवर अलीकडील लेखक असा एक आक्षेप घेत असतात कीं कोणत्याहि प्रेक्षकाचें किंवा श्रोत्याचें ललितकलाजन्य सुख अगदींच स्वहितशून्य असतें असें नाहीं. उदाहरणार्थ, एखादा नाट्यप्रयोग पहात असतांना नायकाच्या अंगच्या गुणावलोकनानें प्रेक्षकाच्या आत्मीय गुणविकासास मदत होत असते. या आक्षेपाला उत्तर येवढेंच कीं, वरील फायदा वैयक्तिक नसून सर्व प्रेक्षकांनां सारखाच मिळत असतो.

**कला व ती स नियमबद्ध करण्याची शक्यता.**- आतां प्रत्यक्ष ललितकलावान इसमाच्या मनाची स्थिति व रचना कशी असते या मुद्द्याचा विचार करूं. ललितकलेतर उपयुक्त कलांतील कुशलता संपादण्याकरितां त्या कलांचे नियम शिकून ते अंगवळणी पडण्याकरितां जरूर तितका अभ्यास केला म्हणजे भागतें; परंतु ललितकलांचें तसें नाहीं. ललितकलांतील प्रवीणता नुसत्या नियमज्ञानानें व अभ्यासानें फारच अल्प प्राप्त होऊं शकते. ललितकलाभ्यासकाला सदरहू गोष्टींशिवाय आणखी खुद्द स्वतःच्या अंगच्या मनोरचनेवर व बुद्धिसामर्थ्यावर अथवा कल्पनाचातुर्यावर विशेष अवलंबून राहावें लागतें. हें बुद्धिसामर्थ्य म्हणजे उपजत ज्ञान, पूर्वस्मृति, आवड, भावना, स्वयंस्फूर्ति वगैरे मानवी देहांतील अनेक जन्मसिद्ध गोष्टी होत. ललितकलानैपुण्यप्राप्तीच्या मार्गांतील ही जी अडचण आहे ती त्या कलांच्या उपयुक्ततारहित्याचाच एक परिणाम आहे. कोणतीहि उपयुक्त गोष्ट म्हटली म्हणजे तिला निश्चित स्वरूप असतें व तें प्राप्त करण्याचा उत्तम मार्गहि निश्चित असाच असतो. कोणत्याहि उपयुक्त कलेंतील कौशल्य म्हणजे विवक्षित कार्यनिष्पत्तीकरितां लागणाऱ्या नियमकृतींचें उत्तम ज्ञान संपादणें हें होय. उदा० शेतकरी, यांत्रिक, सुतार, गवंडी किंवा विणकरी कोणीहि घ्या; या लोकांनां ठराविक गोष्टी ठराविक मार्गानें करण्याचें कौशल्य प्राप्त करावयाचें असतें. कित्येकवेळां पूर्वापार चालत आलेल्या पद्धतींत सुधारणा करण्याकरितां अक्कल खर्च करावी लागते. पण एखाद्यानें ती सुधारणा केली कीं, इतरांनां तिचें ज्ञान सहज करून देतां येतें. ललितकलांचें मात्र तसें नाहीं. बीथॉव्हेननें संगीतशास्त्राच्या अनेक अज्ञात प्रदेशांवर जे विजय मिळविले, किंवा रेंब्रँटनें औदासिन्याचे, क्लेशाचे किंवा हिडिसपणाचे प्रसंग चित्रांत हुबेहूब जे रेखाटले त्या त्यांच्या कौशल्याबद्दलचे नियम ठरविणें कोणाला शक्य नाहीं; किंवा तसल्या कांहीं नियमांचा नुसता अभ्यास करून मूळ कलावंतांतील ( त्यांचें ) नैपुण्य संपादन करणें शक्य नाहीं. ललितकलाकारांच्या व सामान्य कारागिरांच्या कर्तृत्वांत हा जो मोठा फरक आहे त्याचें कारण हेंच कीं, सामान्य कारागिरांच्या सर्व कृती उपयुक्त अतएव निश्चित व नियमबद्ध असतात. उलट ललितकलाकुशलांच्या कृतींत निश्चित उपयुक्तता नसते व म्हणून ती साध्य करण्याचे नियमबद्ध

मार्गेहि नसतात. त्यांनां आपलें कसब दाखविण्यास फार मोठें क्षेत्र मोकळें असतें. स्वतःच्या कलेंतील अनेक चमत्कार व ते दाखविण्याचे नानाविध मार्ग त्यांच्या पुढें असतात; व ही सर्व करामत त्यांच्या उपजत अक्कलहुपारीवर अवलंबून असते. संगीत कवनें करणाराला तर सर्वांहून अधिक स्वातंत्र्य मिळतें. संगीताच्या अवघड चाली शिकून नंतर कोणत्या प्रकारचा ग्रंथ करावयाचा तें एकदां ठरविल्यावरहि मनोविकार जागृत करणाऱ्या हजारों प्रकारच्या सुरांचें एकीकरण व अनुसंधान ठरविण्यास त्याला सर्व नादब्रह्म मोकळेंच असतें; व त्याच्या काव्यकृतीची किंमत कर्त्याच्या नैसर्गिक गुणसमुच्चयावर अवलंबून असते. ही अभिजात देणगी आहे; शिक्षणानें संपादन करण्यांतली ही गोष्ट नाहीं, किंवा एकानें दुसऱ्याला सांगण्यांतलीहि नाहीं. संगीत कलेचा व्यावहारिक उपयोग नाहीं व तिला कोणतेंहि मूर्त स्वरूप देतां येत नाहीं, या दोन कारणामुळें तिला सर्वश्रेष्ठ ललितकला किंवा कलांची कला असें म्हणतात. शिल्पकलेला वरच्यापेक्षां निम्मी स्वतंत्रता मिळते. नैसर्गिक पदार्थांची प्रतिकृति करणें इतकेंच शिल्पकलेचें ध्येय नव्हे; तें काम खोदकला करते. रेषा, रंग, प्रकाश व छाया साधे किंवा सुशोभित पृष्ठभाग वगैरे बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असतें पण जरूरीप्रमाणें जागेची बांधणी करणें शिवाय जड पदार्थांचें वजन, आधार, आकर्षण, प्रतिरोध वगैरे अनेक गुणधर्म विचारांत घेऊन त्याप्रमाणें काम करणारा कारागीर निम्मा परतंत्र बनतो. शिवाय शिल्पकाराला, चित्रकाराला व कवीला आपापल्या कलेंतील जरूर त्या वस्तुस्थितींची व सामान्य नियमांची माहिती लागत असते. उदाहरणार्थ खोदकाम करणारास मनुष्यदेहाच्या बाह्य रचनेची व त्याचप्रमाणें चल व अचल स्थितींत होणाऱ्या अन्तर्गत रचनेची माहिती असावयास पाहिजे व घन पदार्थाला तसला आकार देण्याच्या बाबतींतील सर्व नियममार्ग अवगत पाहिजेत. चित्रकाराला नैसर्गिक गोष्टींची व देखाव्यांची माहिती अधिक विस्तृत असावयास पाहिजे व सपाट पृष्ठभागावर त्या गोष्टी चित्रित करण्यासंबंधाचे नियम परिचित पाहिजेत. कवीला तर सर्व गोष्टी ( नैसर्गिक, शारीरिक व मानसिक व्यापार ) केवळ शब्दचित्रांत उतरवावयाच्या असल्यामुळें त्याला अनेक गोष्टींचें फार व्यापक ज्ञान असावयास पाहिजे. कोणत्याहि कलावानाला त्याच्या कलेंतील नियम, पद्धती, प्रमाणें आणि इतर अपरिस्फुटित गोष्टी यांचें जें ज्ञान मिळवावयाचें असतें तितक्या सर्व बाबतींत प्रेक्षकालाहि ज्ञान मिळवून कलावंताच्या कृतीवर मत देतां येण्यासारखें असतें. परंतु कलावानाच्या कृतींतील अत्यंत महत्वाचा भाग, मुख्य गुण किंवा खरी बहार ज्यांत असते त्या गोष्टी, नियमाच्या पलीकडल्या असतात व त्या प्रेक्षकाच्या परीक्षणाच्याहि बाहेरच्या असतात. या बहारीच्या प्रदेशांत कलावंत कल्पनेच्या भराऱ्या जितक्या उंच मारील व त्या प्रत्यक्ष कृतींत उतरवील तितका त्याचा गुण अधिक समजला जातो व त्याची वहा अधिक होते.

यां त्रि क वा ढ आ णि क ला.—यासंबंधानें दुसरा एक साहजिक असा प्रश्न उद्भवतो कीं, यांत्रिक कलेच्या वाढीचा व प्रगतीचा ललितकलांवर कितपत परिणाम होईल. हल्लींच्या चालू युगांत जगाची महत्वाची व्यवहारोपयोगी खटपट यांत्रिक शोधांची वाढ करून यंत्रसहाय्यानें बनणाऱ्या पदार्थांची अधिकाधिक भरती करण्याकरतां चालू आहे. या शोधांपैकीं ज्यांचा केवळ उपयुक्त गोष्टी निर्माण करण्याकडे किंवा कोणत्याहि प्रकारें मनाला आनंद न देणारे पदार्थ करण्याकडे उपयोग होतो, त्या शोधांशीं प्रस्तुत आपणास कांहींहि कर्तव्य नाहीं. परंतु मनाला सुख देणारे गुणधर्म ज्यांच्यामध्यें आहेत असे पुष्कळ पदार्थ आहेत व त्या पदार्थांतील सुखदायी गुणधर्म यंत्रांच्या सहाय्यानें उत्पन्न झालेले असतात. आतां या बाबतींत ज्या प्रयत्नानें किंवा बुद्धिकौशल्यानें तें यंत्र निर्माण करण्यांत आलें त्याला ललितकला हें नांव देतां येत नाहीं, कारण त्या यंत्राचा केवळ एक जातीचे अनेक पदार्थ निर्माण करण्याकडे उपयोग व्हावयाचा असतो. उदाहरणार्थ, ठशावरून छापील प्रती काढण्याचा साधा प्रेस घ्या, किंवा सतरंज्या, पडदे वगैरे कपडे विणण्याचे अत्यंत गुंतागुंतीचे माग घ्या. या दोन्ही बाबतींत यांत्रिक कार्याव्यतिरिक्त जो एक कार्यभाग असतो त्यांत ललितकलेचा कांहीं अंश येतो. ठशावरून यंत्रानें छापील प्रती काढण्याची क्रिया वगळल्यास मूळ ठसा तयार करणाऱ्या शिल्पकाराच्या कामाचा ललितकलेंतच अन्तर्भाव होतो. तसेंच मागावर कपडा विणण्याची कृति वगळल्यास प्रत्यक्ष कपड्याचा नमुना तयार करणाराच्या किंवा त्यांत सुधारणा करणाराच्या करामतीला ललितकला असेंच म्हटलें पाहिजे. ठशावरील खोदून केलेला मूळ नमुना किंवा डिझाईन व सतरंजीवरील वेलबुट्टी वगैरे देखावे नयनानंददायी होतील असें करणें हा केवळ ललितकलेचा भाग आहे. कपड्यांत किंवा कोणत्याहि पदार्थांत उपयुक्ततेव्यतिरिक्त नुसती शोभा म्हणून कांहीं असतेच. सर्व यांत्रिक व उपयुक्त कलांच्या पदार्थांत सौंदर्य आणण्याचा जो भाग ती ललितकलाच होय.

दुसरा प्रश्न असा कीं, निरनिराळीं अत्यंत गुंतागुंतीचीं पण अत्यंत उत्तम काम पार पाडणारीं यंत्रें मूळ शोधून काढणाराच्या कसबाला ललितकला म्हणतां येईल कीं नाहीं? हा शोधकहि एखाद्या शिल्पकाराप्रमाणें किंवा संगीतज्ञाप्रमाणें आपला सर्व विचार, प्रयत्न व बुद्धि आपलें यंत्र शक्य तितकें उत्कृष्ट करण्याकडे खर्च करीत असतो. तथापि त्याला ललितकलाभिज्ञ असें म्हणतां येत नाहीं. कारण या शोधकापुढें कांहीं विशिष्ट व व्यवहारोपयोगी कार्य करावयाचें असतें. त्याच्या कल्पनाशक्तीला पूर्ण स्वातंत्र्य नसतें. विशिष्ट कार्य करणारें अगदीं उत्तम यंत्र केल्याबद्दल तो

स्तुतीस पात्र असला तरी त्याच्या कसवाला ललितकला म्हणतां येत नाहीं. तथापि यंत्राचे निरनिराळे भाग प्रमाणशीर, व्यवस्थित करण्यांत व एकंदर यंत्र सुंदर बनविण्यांत लागणाऱ्या कौशल्याचा ललितकलेंत समावेश करावयास हरकत नाहीं.

**कला ही खेळकल्पना होय.**—वरील विषयांतर बंद करून पुन्हां मूळ विवेचनांतील आणखी एका मुद्द्याकडे वळूं. तो मुद्दा ललितकलांच्या स्वरूपासंबंधाचाच असून तो असा कीं, ललितकलांतील कामें आवश्यक म्हणून कोणी करीत नसून केवळ आवड म्हणून करतात. मनुष्यांतील उर्वरित कार्यप्रवृत्तीला कांहीं क्षेत्र लागत असतें आणि ललितकलांतर्गत व्यवसाय आनंददायी असल्यामुळें तो ते करीत सुटतो. तेव्हां ललितकला म्हणजे मानवजातीचा केवळ खेळ आहे. जीवोत्पत्तिस्थित्यादि कार्यें चालवूनहि अवशेष राहणारी मनुष्यमात्रांतील जी शक्ति तिला बाहेर पडण्यास मोकळा मार्ग लागत असतो. या शक्तीचेंच ललितकला हें कार्य होय. याप्रमाणें ललितकलांना वैकल्पिक व अनवश्यक कार्यें ठरविणें, त्यांना मनुष्यप्राण्याची लीला किंवा खेळ म्हणणें म्हणजे प्रथमारंभीं प्रतिपादिलेल्या त्यांच्यांतील अनुपयुक्ततेच्या किंवा अनावश्यकतेच्या मुद्द्याचाच अनुवाद करण्यासारखें आहे. ललितकलांचें हें स्वरूप जरी खरें असलें तरी तें व्यक्त करण्याची रीत व त्यावरून प्रस्थापित केले गेलेले अगणित सिद्धांत यांचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे.

**खेळकल्पनेचें इंग्लंडांत प्राधान्य.**—इंग्लंडमध्यें मानसशास्त्रज्ञांनीं ललितकलांविषयींची ही खेळाची कल्पना आधारास घेऊन मनुष्यप्राण्यांतील उर्वरित शक्तीच्या कार्याचें मूळ स्वरूप म्हणून लहान मुलांची नैसर्गिक आरडाओरड व धांवपळ विचारांत घेतली आहे; व नंतर मानवी देहाला उपयुक्तारहित अशीं जीं सुखें अनुभवितां येतात, त्यांची मोजदाद केली आहे. त्यांत दृगिंद्रिय व श्रोत्रेंद्रिय यांच्या द्वारां मिळणारीं सुखें प्रमुख असून शिवाय त्यांत विचारसंगतिन्यायानें कल्पनानुमानजन्यादि सुखांची भर पडते. विदूषकी नकला व वस्तुस्थितीची हुबेहुब नक्कल यांमुळें होणारीं सुखें वरील प्रकारचींच होत. वरील बालचेष्टितानांच पुढें प्रौढपणीं व विशेषतः सुधारलेल्या समाजांत कसें सुसंस्कृत स्वरूप मिळत जातें, याचें वर्णन वरील शास्त्रज्ञांनीं केलें आहे. त्यांत हर्बर्ट स्पेन्सर हा प्रमुख आहे.

ततेंच प्राचीन तत्ववेत्ता प्लेटो हा अर्वाचीन कवि शिलर या दोघांच्याहि मतें ललितकलान्तर्गत कृती या लीलाप्राय आहेत; पण या समानमतापासून त्यांनीं काढलेले निष्कर्ष फार भिन्नभिन्न आहेत. प्लेटोची विचारसरणी अशी कीं, इहलोकांतील नित्य अनुभवाच्या गोष्टी खऱ्या, सत्य नसून तो मूल सत्तत्वांचा छायारूप मायिक देखावा आहे. मूळ सत्तत्वें केवळ मनोगम्य आहेत. तेव्हां ललितकलांच्या कृती म्हणजे ऐहिक देखाव्यांचें प्रतिबिंब किंवा छायेची पडछाया होय व यामुळें त्यांच्यांत सत्याचा अंश फारच अल्प असतो; या विशिष्ट मतामुळें प्लेटोला वैद्यक, शेतकी किंवा चांभारकी या धंद्यांचेंहि, त्यांत व्यावहारिक उपयुक्तता असल्यामुळें ललितकलापेक्षां अधिक महत्व वाटतें. तो म्हणतो, ललितकला अगदीं कुचकामाच्या, त्यांत उपयुक्तता नाहीं व सत्यहि नाहीं; त्यांच्यापेक्षां यांत्रिक कलांची किंमत, (त्यांच्यांत उपयुक्तता असल्यामुळें ) अधिक आहे.

**खेळकल्पनेविरुद्ध मत.**—उलटपक्षीं शिलरनें निराळ्या युगांत निराळ्या विचारपद्धतींचा अवलंब करून प्लेटोच्या अगदीं तंतोतंत विरुद्ध असें अनुमान काढलें;तें असें कीं, मानवी लीलेच्या या ललितकलांच्या प्रांतांत मानवानें मिळविलेलें प्रभुत्व हें अत्यंत उदात्त स्वरूपाचें असून तें मानवास भूषणास्पद आहे. शिलरची विचारपद्धति कँटच्या धर्तीचीच आहे. तो म्हणतो, मनुष्याचा आत्मा दोन जगतांमध्यें सांपडलेला असतो.एक शारीरिक किंवा इंद्रियवासनात्मक जग व दुसरें नैतिक किंवा संकल्पात्मक जग होय. पैकीं इंद्रियवासनात्मक जगांत आत्म्यावर बाह्य दडपण पडून तो वासनांकित होत असतो; व नैतिक जगांत अन्तर्गत दडपण पडत असतें. मनुष्य इंद्रियविकारांना बळी पडतो त्यावेळीं अगदीं हतबुद्ध, मूढ बनतो. परंतु ज्यावेळीं तो आपलें इच्छास्वातंत्र्य गाजवून नैतिक नियम पाळतो, त्यावेळीं तो खरा प्रवृत्तिपर योगी बनतो. याप्रमाणें मनुष्यांतील पाशवी वृत्तीचें व नैतिक प्रवृत्तींचें द्वंद्वयुद्ध सतत सुरू असतें. तेव्हां प्रश्न असा कीं या दोन्ही वृत्तींना सामोपचारानें एकत्र नांदतां कसें येईल, किंवा असें ठिकाण किंवा विषय नाहींच काय ? याचें उत्तर असें कीं तशी जागा आहे. वरील दोन जगांच्या मध्यें तिसरें जग असून, त्या मध्यवर्ती प्रदेशाशीं नित्य जीवनक्रमांतील आवश्यक गोष्टींचा संबंध नसतो किंवा नैतिक विचारहि तेथें उद्भवत नाहींत. हें कार्यक्षेत्र म्हणजे मनुष्यमात्रांतील लीलाप्रवृत्तीचें क्षेत्र होय. नित्यव्यवहारांतील आवश्यक गोष्टींच्या मानानें ह्या लीला निरुपद्रवी असून मानवाच्या खुषीवर त्या अवलंबून असतात, आणि त्या आवश्यकता व कर्तव्य या दोहोंच्याहि पलीकडल्या असतात. या प्रकारच्या कार्यक्षेत्रांत मनुष्याला आपलें सामर्थ्यसर्वस्व खर्च करण्यास सवड असूनहि त्यापासून अनिष्टनिष्पत्ति होण्याचा संभव बिलकुल नसतो.या कार्यक्षेत्रांत इंद्रियात्मक व संकल्पात्मक अशा दोन्ही प्रकारच्या शक्तींना परिपूर्ण व आत्यंतिक समाधान मिळविण्यास एकत्र जागा असते. बाह्यवस्तूंचा उपभोग घेण्याची प्रवृत्ति व त्यांच्यावर प्रभुत्व चालविण्याची प्रवृत्ति या दोहोंचा या ठिकाणीं मिलाफ झालेला असतो. सहजलीला म्हणून प्रकृतिद्रव्याला तुम्हीं कोणतेंहि रूप दिलें तरी त्यांत दोघांचा विरोध होण्यास जागा नसते. याप्रमाणें जडात्मक जग व स्वरूपात्मक जग यांचें ऐक्य जेथें होतें तेंच सौंदर्यात्मक जग होय !

स्वतःमधील लीलाप्रवृत्यनुसार कृति करावयास लागलें कीं, सौंदर्यविषयक क्षेत्रांत प्रवेश होत असतो, व त्यांतून ललितकलांचा उगम होतो. या बाबतींत शिलरचे स्वतःचे शब्द पुढीलप्रमाणें आहेत; "एकीकडे नैसर्गिक शक्तींचें बलाढ्य साम्राज्य व दुसरीकडे नैतिक शक्तींचें पवित्र साम्राज्य; यांच्या मध्यभागीं सौंदर्यप्रवृत्तिनिर्मित तिसरें एक साम्राज्य असतें, हेंच लीलामय गोष्टींचें आनंददायी साम्राज्य होय. या साम्राज्यांत मनुष्य शारीरिक व नैतिक या दोन्हींहि बंधनांपासून मुक्त होत्साता स्वैर संचार करूं शकतो." याप्रमाणें शिलर कवीनें कँटच्या तत्वज्ञानविषयक मतांच्या आधारेंच आपली स्वतःची सौंदर्यशास्त्रविषयक उपपत्ति लावून ललितकलेला त्यानें मानवजातीची अत्यन्त उच्च व नमुनेदार कृति ठरविली आहे, कारण त्यांतच मानवाला आपलें सर्वस्व प्रकट करता येतें. "मनुष्य लीलामय बनतो तेव्हांच तो खरा खरा मनुष्य या नांवाला पात्र होतो." "सौंदर्यमय असेल त्याच्याशींच मनुष्यानें फक्त लीला करावी व मनुष्यानें लीला करणें ती सौंदर्यमयाशींच फक्त करावी" "सदभिरुचि व सौंदर्यप्रेम यांविषयींचें शिक्षण देण्याचा मुख्य हेतु हा आहे कीं, इंद्रियांची प्रवृत्ति व आत्म्याची प्रवृत्ति यांच्यामध्यें विरोध उत्पन्न न होतां अत्यंत ऐक्य उत्पन्न व्हावें." नंतर शिलरनें ललितकलांचा इतर कलांवर कसा परिणाम होतो, ललितकलांच्या व्यवसायामुळें मनुष्यमात्राला इंद्रियवासना व नैतिक भावना यांचें द्वंद्व कसें कमी करतां किंवा सर्वस्वीं टाळतां येतें, व स्वसमाजाच्या उपयोगी पडून स्वतःचें आयुष्य सुखासमाधानानें कसें घालवितां येतें याचें विवेचन केलें आहे.

शिलरच्या या ललितकलाविषयक व्यापक व उत्साहजनक उपपत्तीसंबंधानें विशेष विस्तारपूर्वक लिहिण्याचें कारण असें कीं, यूरोपमध्यें बहुतेक गेल्या शतकभर ही उपपत्ति अत्यंत उच्च दर्जाची म्हणून विद्वन्मान्य झाली होती, व अद्यापहि तिचें महत्त्व बरेंच कायम आहे. मानवी आत्म्याला नैसर्गिक व नैतिक बंधनविरहित स्वच्छंद संचार करण्याचें क्षेत्र, किंवा वस्तुमात्राच्या व्यावहारिक उपयुक्ततेचा विचार काडीमात्र न करतां चाहील तें स्वरूप देण्याचें क्षेत्र, अशी ललितकलांची त्यानें जी अत्यंत व्यापक व्याख्या केली आहे, ती कोणत्याहि उन्नत व सुसंस्कृत समाजाला ग्राह्य होण्यासारखी आहे. उपयुक्ताराहित्य व कर्तव्यातीतत्व हे ललितकलांतील दोन्हीहि मुख्य मुद्दे त्यानें स्पष्टपणें पुढें मांडले आहेत. या जगामध्यें मानवी प्राण्यांनां फायद्याचा प्रश्न सर्वस्वीं बाजूला ठेवून केवळ आपसांत यत्किंचितहि कलह न होतां सुखानुभव घेण्याची जागा, ही ललितकलांविषयींचा दृष्टीहि त्यानें योग्य रीतीनें विचारांत घेतली आहे, ललितकलाजन्य देखाव्यांना व करमणुकींना योग्य तेंच उच्च स्थान त्यानें दिलें आहे; कारण या ललितकलांच्या साहाय्यानें आयुष्यांतील व सृष्टिक्रमांतील क्षणभंगुर आनंदाचे विषय चिरकाल टिकणारे बनविले आहेत; कारण प्रत्यक्ष अस्तित्वांत असलेल्या गोष्टींतील अपूर्णता व अस्पष्टता या दोषांमुळें मनाला वाटणारें असमाधान दूर करण्याकरतां कल्पना व प्रतिभासामर्थ्यानें स्पष्ट व अव्यंग वस्तूंच्या प्रतिमा मनुष्यप्राण्याला आपल्या आवडी व हेतुप्रमाणें ललितकलांच्या क्षेत्रांतच निर्माण करता येतात. पण शिलरच्या उपपत्तींत जो मोठा दोष राहून गेला आहे तो हा कीं, मानवी लीलेल्या प्रकारांपैकीं ललितकला कोणत्या व त्यानां कला कां म्हणावें हें त्यानें दाखविलें नाहीं. उदाहरणार्थ, दृगिंद्रियांनां संतोषविणाऱ्या चित्रकला व नृत्यकला, श्रोत्रेंद्रियाला संतोषविणारी संगीतकला व मनाला अनेकांगांनीं रंजविणारी काव्यकला यांमध्यें आणि खेळाच्या किंवा करमणुकीच्या इतर प्रकारांमध्यें फरक काय तो त्यानें स्पष्ट करून सांगितला नाहीं. शिकारीची गोष्ट घ्या. या करमणुकीच्या प्रकारांतहि पूर्वचिंतित कौशल्य बरेंच लागत असतें व शिकार करणारांनांहि कलाभिज्ञांप्रमाणें सुखप्राप्ति होत असते. आतां कोणी म्हणेल कीं, शिकार ही आज जरी केवळ करमणुकीचें साधन बनली आहे तरी प्राचीन रानटी समाजाला ती उपजीविकासाधन या नात्यानें अत्यंत आवश्यक होती. व त्याकरितां तिला ललितकला म्हणतां येत नाहीं. पण ही विचारसरणी लागू केल्यास प्रत्येक ललितकला प्राथमिक समाजावस्थेंतील उपयुक्त क्रियेचें परिणत व उन्नत स्वरूप होय असें दाखवितां येईल. तथापि शिकारीला ललितकला न लेखण्याचीं कारणें अशीं कीं, शिकारीपासून शिकाऱ्यालाच फक्त सुख होतें; उलट त्याच्या व्यवसायामुळें त्याच्या सावजावर तर प्राणसंकटच ओढवून आत्यंतिक दुःख होतें व शिकाऱ्याबरोबरच्या प्रेक्षकांनां त्याचें कौशल्य पाहून एकपक्षीं सुख, तर त्या सावजांची प्राणांतिक अवस्था पाहून दुसऱ्या पक्षीं दुःख वाटण्याचा संभव असतो. म्हणून तिला ललितकला म्हणतां येत नाहीं. आतां ज्या शारीरिक शक्तीच्या खेळांपासून व प्रयोगांपासून कोणालाहि इजा न होतां हजारों प्रेक्षकांनां आनंद होतो त्या खेळांची ललितकलांत गणना होईल कीं नाहीं ? ह्या ठिकाणीं फरक असा आहे कीं, सदरहू प्रकारच्या खेळांत व सामन्यांत कृत्रिमपणा मुळींच नसून खरी सत्यता फार आहे. प्रत्येक सामनेवाल्याला खरे श्रम करावे लागतात व निकालाबद्दल अनिश्चितता असते; त्यामुळें जयापजयाबद्दल खेळगड्यांत व प्रेक्षकांतहि आतुरता व चिंता उत्पन्न होत असते. उदाहरणार्थ एखाद्या इनाम लावून होत असलेल्या दोन मल्लांच्या कुस्तीचा प्रसंग व हॅम्लेटनाटकांतील द्वंद्वयुद्धाचा देखावा पहात असतां प्रेक्षकांची चित्तवृत्ति अगदीं भिन्न असते. एक खरा लौकिकाचा व द्रव्यलाभाचा प्रश्न आहे व दुसरा केवळ नाटकी प्रकार आहे. हा भेद प्रेक्षक जाणत असतो व त्यामुळें दोहोंतील सुखदुःखानुभवांत फरक पडतो. दुसरें असें कीं, शारीरिक खेळांत

अंतिम साध्य हें निश्चित व उपयुक्त असतें. शिवाय शरीर-सामर्थ्यवाढीचा प्रत्यक्ष व्यावहारिक उपयोग असतो. तथापि सँडोप्रमाणें किंवा प्राचीन रोमन लोकांप्रमाणें पीळदार, सुंदर शरीर बनविणें एवढाच हेतु असल्यास त्या केलेला ललितकला म्हणावें असा कांहींचा आग्रह आहे.

शिलरच्या मीमांसेवरील उपरिनिर्दिष्ट आक्षेप सोडून दिले तरी इंद्रियवासना व विवेकबुद्धि यांमधील विरोधाचें कैटत्वें तत्वाहि अलीकडे पुष्कळांना पटत नाहींसें झालें असल्यामुळें शिलरच्या उपपत्तीचा पायाच ढांसळूं लागला आहे. मानवी प्राण्यांत लीलाप्रवृत्ति असते असें कबूल केलें तरी तिच्यापासूनच सर्व ललितकलांचा उगम झाला आहे हें मत अलीकडील ऐतिहासिक व मानुष्यक शास्त्रीय शोधांमुळें अग्राह्य ठरत चाललें आहे. त्या पुराव्यावरून ललितकलोत्पत्तीचीं कारणें अनेक आहेत व त्यांपैकीं लीला-प्रवृत्ति हें एक आहे व दुसरें अनुकरणप्रवृत्ति हें आहे असें ठरत आहे. या दोन प्रवृत्ती मनुष्यांत व इतर प्राण्यांत मूळारंभापासून असून त्या स्वसंरक्षणाला उपयुक्त व आवश्यक अशा आहेत ( प्रो. कार्लग्रूस यांचे शोध या बाबतींत निर्णयात्मक आहेत ). मानवांतील तिसरी उपजत प्रवृत्ति म्हणजे घडलेल्या गोष्टींची स्मृति शब्दद्वारें किंवा इतर हस्त-क्रियाद्वारें चिरकाल जागृत ठेवण्याची इच्छा होय. अनुकरण-प्रवृत्ति व स्मारकेच्छा या दोहोंचा संबंध निकट असून ललितकलांचा मूळ उगम स्मारकेच्छेंत असून अनुकरणप्रवृत्ति हें केवळ साधन आहे असें म्हटलें तरी चालेल. तात्पर्य, लीला, नक्कल व स्मृति या तीन प्रवृत्तींपासून सर्व ललितकलांची उत्पत्ति असून त्या तिन्ही मूळ उपयुक्ततापोषकच आहेत. उदाहरणार्थ प्राचीन काळांतलि रानटी मनुष्याचें शरीरविभूषण हें स्त्रीजातीला आकर्षिण्याकरतां, गुहेवरील पशुपक्ष्यांचें चित्रलेखन माहिती पुरविण्याकरतां किंवा मूर्ती, देवालयें इत्यादि शिल्पकाम मृत पितरांचें स्मारक करण्याकरितां असे. वरील व्यवसायांनां विक्षित उन्नति-पथ आक्रमिल्यानंतर ललितकलांचें स्वरूप येत असतें. तें स्वरूप येण्यापूर्वी मानवांतील आणखी एक प्रवृत्ति कार्य-कारी व्हावी लागते. ती प्रवृत्ति भावनाप्रदर्शनाची होय. या प्रवृत्तीचा जोर आहारनिद्रादि प्रवृत्तींच्या खालोखाल आहे. त्या योगानें मनांतील विकार नाचून, ओरडून व टाळ्या वाजवून व्यक्त करण्यास मनुष्य प्रवृत्त होत असतो. याप्रमाणें हृदयांत उद्भवलेली प्रबल भावना तालसुरावर नाचून, गाऊन व्यक्त करण्यास मानव समर्थ झाला कीं तो रानटी अवस्थेंतून निघून नर्तक, गायक इत्यादि कलावंतांच्या उन्नत वर्गांत मोडूं लागतो. तसेंच विविध प्रकारच्या रंगीत आकृती काढणारा चित्रकार म्हणून गणला जाऊं लागतो.

वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, उपयुक्ततेची दृष्टि बाजूला ठेऊन केवळ मनोरंजनाखातर कित्येक गोष्टी करण्याची मनुष्याची उन्नतावस्थेंतील मूळ प्रवृत्ति स्नायु, नेत्र, कर्ण, मेंदु इत्यादि इंद्रियांच्या स्वाभाविक व्यापारांपासून परिणत झालेली आहे. हृदयांतील भावना इंद्रियव्यापारांच्या द्वारें व्यक्त करून त्यांपासून आनंदानुभव घेण्याइतकी मानव जातीची प्रगति झाली कीं, ललितकलांनां आरंभ होतो. येणेंप्रमाणें मानुष्यकशास्त्रीय शोधांवरून लागत असलेली ललितकलांची उपपत्ति इतर कोणत्याहि उपपत्तीपेक्षां अधिक ग्राह्य होण्यासारखी असल्यामुळें तदनुसार ‘ ललितकला ’ या शब्दाची व्याख्या अधिक विस्तृत करून दिली पाहिजे, ती पुढें दिल्याप्रमाणें:—

ललितकला म्हणजे भावना व्यक्त व उद्दीपित करण्याकरतां स्वतंत्रपणें व विचारपूर्वक, तालबद्ध गति किंवा ध्वनि किंवा नियमबद्ध आकृती काढण्याचे नियम पाळून केलेली, आणि प्रत्यक्ष उपयोगाची दृष्टि न ठेवतां केवळ चिरकालिक व निरपेक्ष आनंद पुष्कळांना प्राप्त करून देण्याकरितां अधिकाधिक उत्तम केलेली मनुष्याची प्रत्येक कृति होय.

कला आणि मानसशास्त्र याविषयांवरील विचार म्हणजे याविषयांवरचा शेवटचा शब्द नव्हे. दिलेलें विवेचन आमच्या मतें याविषयांवर अत्यंत अव्यवस्थित व अनमान धपक्याचें आणि अशास्त्रीय आहे. तथापि तें दिलें याचें कारण मोटमोठीं विचारी माणसें या विषयावर विचार करून कोणत्या मर्यादेप्रत पोंचलीं हें या विवेचनावरून बोधलें जाईल. ज्याप्रमाणें मनोधर्माचें सूक्ष्म पृथक्करण करून भारतीय आचार्यांनीं केलेलें साहित्य शास्त्रामागें आहे त्याप्रमाणेंच सौंदर्यशास्त्राचें आणि कला विषयतत्वाचें पृथक्करण करून जेव्हां नियम उत्पन्न होईल तेव्हां कलाविवेचन शास्त्रीय मार्गास लागलें असें आम्हांस वाटेल. कलाशास्त्राचा विकास करणें हें भावी जगाचें काम आहे. याचा आजपर्यंतचा विचार अत्यंत अपूर्ण आहे. त्याच्या केवल दिग्दर्शनापलीकडे आम्हांस जास्त जातां येत नाहीं.

[ संदर्भ ग्रंथ.—कलेंतील वास्तुशिल्प, संगीत यांसारख्या पोटविषयावरील संदर्भग्रंथ त्या त्या लेखांत सांपडतील. कांहीं सामान्य ग्रंथ पुढीलप्रमाणें:—बुचर—आरिस्टॉटल्स थिअरी ऑफ पोएट्री अँड फाईन आर्ट्स. ब्राऊन—फाईन आर्ट्स. क्ले—दि ऑरिजिन ऑफ दि सेन्स ऑफ ब्यूटी. रीनाच—दि स्टोरी ऑफ आर्ट थ्रू दि एजेस. बाल्फोर—दि एव्होल्यूशन ऑफ डेकोरेटिव्ह आर्ट. हाडॉन—एव्होल्यूशन इन् आर्ट. ए. रि. ए. मधील ‘ आर्ट ’ हा लेख ].

**कलात संस्थान**—बलुचिस्तानांतलि एक संस्थान. उ. अक्षांश २५° १' ते ३०° ८' व पूर्व रेखांश ६१° ३७' ते ६९° २२'. क्षेत्रफळ ७१५९३. चौरस मैल. याच्या सीमाः—पश्चिमेस इराण; पूर्वेस बोलन खिंड, मरी आणि बुगती पर्वत व सिंध प्रांत; उत्तरेस चागइ आणि क्वेटा—पिशिन जिल्हे;

दक्षिणेस लासवेला आणि अरबी समुद्र. खारान, कच्ची आणि दष्त हे भाग सोडून दिले तर सर्व प्रदेश डोंगराळ आहे. या भागांत पर्वतांची सर्वांत जास्त उंची १०००० फूट आहे व कमी उंची १००० फूट आहे. दक्षिण दिशेकडे उतार असून बहुतेक सर्व नद्या याच दिशेनें वाहतात. मुख्य नद्यांची नांवें नारि, मूळा, हब, पोराळी, हिंगोळ, दष्त हीं होत. रखशान नांवाची नदी उत्तरेकडे वाहत जाते. येथील हवा निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळी आहे.

इतिहासः—( 'बलुचिस्तान' पहा ) याची राजधानी कलात गांव असून यांत भाग, गंडावा, मास्तुंग, पसनी आणि ग्वाहर हीं दुसरीं महत्वाचीं गांवें आहेत. या संस्थानांत १३४८ खेडीं आहेत. येथील लोकसंख्या (१९११) ३५९०८६ आहे. आठ वर्षांपूर्वी ती ४७०३३६ इतकी होती. जमीन पुष्कळ ठिकाणीं रेताड आहे. गहूं आणि ज्वारी या संस्थानांत पिकते. पावसाच्या टंचाईमुळें बहुतेक सर्व पिकांस पाण्याची जरूरी भासते. येथील गुरांची अवलाद चांगली असून बकरीं व मेंढ्या पुष्कळ आहेत. त्यांची लोंकर बाहेर पाठविली जाते.

या संस्थानांत पैशाची देवघेव फार कमी आहे. बहुतेक सर्व व्यवहार धान्यांत चालतात. येथील रयत फार गरीब आहे. कोणताहि भाग संरक्षित जंगल म्हणून या संस्थानांत ठेवलेला नाही. जंगली औषधी, वनस्पती, हिंग, डिंक वगैरे पदार्थ जंगलांतून काढतात.

येथें सुती ओबड धोबड कापड विणतात. लोकरी वस्त्रें देखील येथें तयार करतात. नॉर्थ वेस्टर्न रेल्वे या संस्थानच्या पूर्वेकडून व आग्नेय दिशेकडून जाते. येथून लांकूड, तूप, कापूस, खजूर, औषधी, वनस्पती, रेशीम इत्यादि माल बाहेर रवाना होतो. लोकवस्ती अत्यंत विरल आहे. या संस्थानांत वारंवार दुष्काळ पडतो. कलातच्या खानाचा अधिकार येथें चालतो. मास्तुंग येथें पोलिटिकल एजंट राहतो. एकंदर उत्पन्न सुमारें १३लाख आहे. ब्रिटिश सरकारास खंडणी-दाखल १,५१,००० रुपये द्यावे लागतात. जमीन महसूल पिकांच्या रूपानें वसूल केला जातो. शिक्षणांत हें संस्थान अगदींच मागसलेलें आहे.

गां व.—बलुचिस्तानांतील कलात संस्थानची राजधानी. उत्तर अक्षांश २९° २' व पूर्व रेखांश ६६° ३५'. लोकसंख्या सुमारें २०००. गांवाभोंवतीं तट आहे. पंधराव्या शतकाच्या सुमारास मीरवारी लोकांच्या ताब्यांत हा गांव गेला. त्या वेळेपासून अहमदझइ खानांच्या राजधानीचें हें गांव आहे. इ. स. १७५८ सालीं अहमदशहा दुराणीच्या तिन्ही हल्ल्यांस या गांवानें दाद दिली नाहीं. इ. स. १८३९ सालीं हा गांव ब्रिटिशांनीं सर केला. वाले किल्ल्याखालीं कालीचें हिंदु देऊळ असून तें मुसुलमानी अमलाच्या पूर्वीचें असावें. देवीची मूर्ति संगमरवरी दगडाची आहे.

**कलात-इ-घिलझई**—अफगाणिस्तान. कंदाहार प्रांतांतील एक किल्ला. उत्तर अक्षांश३०°७'व पूर्व रेखांश ६६°५०'. समुद्रसपाटीपासून उंची ५५४३ फूट आहे. हा किल्ला इ. सं. १८४२ आणि १८७९-८० सालीं ब्रिटिशांनीं आपल्या ताब्यांत घेतला होता. येथें हिंवाळ्यांत थंडी फार कडक असते. परंतु उन्हाळ्यांत हवा चांगली असते.

**कलादगी**—मुंबई इलाखा. विजापूर जिल्हा. बागलकोट तालुक्यांतील एक खेडें. उत्तर अक्षांश १६° १२' व पू. रे. ७५° ३०'. हें विजापूरच्या नैर्ऋत्येस ४५ मैलांवर घटप्रभेच्या तीरावर आहे. याची समुद्रसपाटीपासून उंची ७७४४ फूट आहे. घटप्रभेजवळील जमीन सुपीक आहे. लोकसंख्या ( इ. स. १९०१ ). ४९४६. येथें इ. स. १८६६ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली होती. हें पूर्वी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. परंतु तें बदलण्यांत आल्यामुळें इ. स. १८८५ सालीं म्युनिसिपालिटी बंद झाली.

**कॅलामेटा**—समुद्रापासून एक मैलाच्या अंतरावर असलेलें नेडनच्या डाव्या तीरावर मोरीआ प्रांतांतील एक ग्रीक शहर. हें मेसेनीआच्या राजधानीचें शहर आहे. या ठिकाणीं न्यायकचेरी असून येथें धर्माध्यक्ष(बिशप) राहतो.इ.स.१६८५ त हें व्हेनेशिअनांनीं घेतलें. १८२५ त इब्राहिमपाशानें हें लुटलें. कॅलामेटा हें फार सुपीक प्रांतांत वसलेलें आहे. या ठिकाणीं रेशमी कपडा विणण्याचा धंदा चालत असून त्यावर सुमारें ३०० बायका व मुली आपली उपजीविका चालवितात. ऑलिव्ह तेल व रेशीम या निर्गत व्यापाराच्या मुख्य वस्तू होत.

**कलाल**—कलाल यांस संस्कृत कल्यपाल, कलवार, कलार, कलान अशीं नांवें आढळतात. ही कलालांची जात हिंदुस्थानांतील सर्व भागांत विशेषतः बहार ओरिसा, संयुक्तप्रांत व मध्यप्रांत यांतून आढळते. १९११च्या खानेसुमारींत यांची संख्या ९५४२४१ भरली. पैकीं ८७६०९५ हिंदु, ६४२८३ मुसुलमान, १२६९५ शीख, व ९६३ जैन होते. इतर व्यापारी जातींप्रमाणें हिंदू कलवारहि समाजांत आपला दर्जा वाढावा म्हणून ते आपण जुन्या चालीचे हिंदू आहोंत असें भासवितात व वैष्णवपंथांत इतर व्यापारी जातींप्रमाणेंच शिरूं पाहतात.बंगाल्यांत हे जरी आपले संस्कार ब्राह्मणांकडून करवितात तरी चांगले ब्राह्मण त्यांच्याकडे जात नाहींत. बंगालमधील कलवार पुरातन देवांच्या मालिकेंत पुष्कळसे बारीकसारीक देवहि घुसडून त्यांची पूजा करतात.उदाहरणार्थ यांच्यांतील एक पोटजात श्रावण शुद्ध पक्षांतील सोमवारीं सोखा देवतेला दूध व तांदूळ अर्पण करते. बुधवारीं आणि गुरुवारीं काली व बंदे यांनां बकरी आणि मिठाई देते. मंगळवारीं डुकराचीं पिलें आणि मद्य गौराईला नैवेद्य म्हणून नेतात.याच दिवसांत दुसरी एक पोटजात पांचाण पीर याला भाकरी व मिठाई अर्पण करते. आणखी दुसरी एक जात भाद्रपद व माघ महिन्यांत ब्रह्म् देवाला अशाच तऱ्हेचा

नैवेद्य दाखवितें. हे सर्व नैवेद्याचे पदार्थ यजमानाच्या घरांतील मंडळी खातात. फक्त डुकराचीं पिलें मात्र बळी दिल्यानंतर जमीनींत पुरून टाकतात. कारण तें केवळ हलक्या जातीचें अन्न म्हणून समजतात. संयुक्त प्रांतांतील कलवारांचा दर्जा बंगाल्यांतल्यापेक्षां थोडा वरचा आहे. कारण त्यांच्याकडे येणारे ब्राह्मण इतर ब्राह्मणापेक्षां कमी लेखण्यांत येत नाहींत. या ठिकाणीं ते कालिका पूजा, इतर पांचाण पीर, फूलमाती व कॉलऱ्याचा देव, हरदौर लाला या झुंग्याझुंग्या देवतांच्या पूजेप्रमाणेंच मानतात. दारूची भट्टी चालू असतां कलवार मदन या मद्य देवतेची पूजा करतात. कलवार प्रामुख्यानें आवळ्याच्या झाडाविषयीं (त्याच्याखालीं होम करून व ब्राह्मणभोजन घालून) भक्ति बाळगतात. त्याचप्रमाणें लिंबाचें व पिंपळाचें झाड पूज्य मानतात. आदितवारीं सूर्यनारायणाप्रीत्यर्थ उपास करतात व पृथ्वीदेवता जी सायरी तिला मद्यार्पण करतात. प्रत्येक घरांत एक देवघर असून त्यांत सर्व देव वसवितात. प्रसूतीनंतर गाझी मियांची भाल्याच्या रूपांत पूजा करतात. मध्यप्रांतांत कलवारसदृश कलार म्हणून जी जात आहे ती दुल्हा देवाची भक्ति करते. दुल्हा देव हा एक नवरदेव असून लग्नप्रसंगीं त्याला मृत्यु आला असें मानतात (दुल्हा देव पहा). कांहीं लोक एकेश्वरी पंथाच्या दिशेनें इतके पुढें गेले आहेत कीं, ते एका भगवानालाच काय ते ओळखतात. तथापि ते सुद्धां पूर्वजांचीं श्राद्धें वगैरे करतात. बहादूर कलरिया आणि त्याचा पुत्र सुसन चावारी हे पूर्वीचे मोठे कलाल असून त्यांचे उत्साह करतात; त्यांच्या कारखान्यांचे अवशेष अद्यापहि दाखविण्यांत येतात.

पं जा बां ती ल क ला ल.—या जातीचे सुमारें हजार लोक आहेत. या जातींत, हिंदु, शीख, मुसलमान, या धर्माचे लोक आहेत. त्यांचा पिढीजात धंदा दारू गाळण्याचा होता. परंतु त्यांनीं आंता तो सोडला आहे. ते आतां शेतकी, सरकारी नोकरी, व्यापार वगैरे करितात. आपला पिढीजात धंदा दारू काढण्याचा आहे. असें हे कबूल करीत नाहींत व आपण जाट, रजपूत लोकांचे वंशज आहोत असें सिद्ध करण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. त्यांच्यापैकीं आहलुवाला वर्गास आपणास रजपूत म्हणवून घेण्यांत यश आलें आहे. [ सेन्सर रिपोर्ट १९११ पंजाब. ]

म ध्य प्रां त व व ऱ्हा ड.—या भागांत यांची संख्या सुमारें २,००,००० आहे. त्यांनां कलार म्हणतात. यांच्या पुष्कळ उपजाती असून त्या बऱ्याच स्थानिक भेदामुळें झाल्या आहेत. मालवी, लाड, उद्धारिया, जेसवार कनोजिया इत्यादि वर्गांचीं नांवें स्थानिक आहेत. यांपैकीं राय कलार हे उच्च समजले जातात. पण त्यांतहि व्याहूत कलार मात्र फारच निवडक आहेत व खरोखरच उच्च आहेत. हे लोक आपल्या वर्गांतील विधवांस विवाह करूं देत नाहींत व बंगाल्यांत तर हे मद्य देखील विकीत नाहींत. चौसके कलार एका पूर्वजाच्या चार पिढ्यांनंतर लग्नसंबंध करतात. शिवहारे अगरवाल्यास एकाच पूर्वजाच्या दोन मुलांची संतति समजतात. जैसवार, शिवहारे, कनोजिया हे उत्तर हिंदुस्थानांत आहेत. व व्याहूत मध्यप्रांतांत आढळतात. छत्तीसगडांत दंडसेन कलार नांवाचा एक वर्ग आहे. याच्याबद्दल एक अशी आख्यायिका सांगतात कीं, बालोदच्या राजाच्या मुलाचा अत्यंत जिवलग मित्र हा एका कलाराचा मुलगा होता. पण कलाराच्या मुलाची बहीण राजपुत्राच्या मनांत भरली. तिची गांठ हा राजपुत्र नेहमीं घेऊं लागला. कलारानें राजास विचारलें कीं माझ्या घरीं एक कुत्रा येऊन सर्वत्र विटाळ करतो त्याला काय करावें ? राजा म्हणाला त्याला जिवें मारावें. कलार पुन्हा म्हणाला कीं मीं त्यास मारलें असतां शिक्षा तर होणार नाहीं ? राजा म्हणाला मुळींच शिक्षा होणार नाहीं. इतकें अभय घेऊन राजपुत्र कलार कन्येची एक दिवस भेट घेण्यास आला असतां तिच्या भावानें त्यास ठार मारलें. यामुळें रजपुतांचें व कलारांचें युद्ध झालें. त्यांत कलारांचा विजय झाला. पण त्यानंतर त्यांनीं बालोद राज्य सोडलें व अजून तो नियम कलारांनीं पाळला आहे.

यांच्या लग्नाच्या चाली इतर स्थानिक हिंदू रीतीप्रमाणेंच असतात. पण कलारांची वरात निघण्यापूर्वीं वराची आई किंवा आत विहिरींत पाय सोडून कांठावर बसते व वर हातांत कुश घेऊन विहीरीस सात प्रदक्षिणा घालतो व प्रत्येक प्रदक्षिणेस एक एक काडी विहीरींत टाकतो व कांठावर बसलेल्या आतेस चांगली देणगी देण्याचें वचन देऊन परत येतो. यांपैकीं सधन लोक मुलींचीं लग्नें बाळपणांतच करतात. पण प्रौढ मुलींचीं लग्नें केलीं असतां त्यांत कमीपणा आहे. असें समजत नाहींत. लग्नें बहुधा जातिभोजनांतच ठरवितात, व ब्राह्मणाकडूनच लाविलीं जातात. वधूशुल्काची चाल रुढ नाहीं पण वधूपक्ष फारच निर्धन असला तर वरपक्ष त्यास मदत करतो. यांच्यांत काडी मोडण्याची चाल रुढ आहे व व्याहूताखेरीज इतर वर्ग विधवांच्या विवाहास परवानगी देतात. हे लोक हिंदु दैवतांचें पूजन करतात. पण यांच्यापैकीं कांहीं लोक जैन आहेत. तरी पण यांचा दर्जा कुणब्यांच्याहि खालचा आहे. मंडला जिल्ह्यांतील कलार पुष्कळ सधन आहेत. त्यांचे पुरोहित सरवरिया ब्राम्हण असून यांपैकीं कांहींनीं त्यांची जात उच्च करण्याकरितां त्यांच्या हातचें पाणी पिण्यास सुरुवात केली म्हणून सरवरिया ब्राम्हणांत दोन तट झाले आहेत.

यांच्या दारू काढावयाच्या धंद्यामुळें गोंड लोक यांच्या हातांत बरेचसे आले आहेत. व गोंड लोकांस दारू पाजून त्यांच्यापासून बऱ्याच ठिकाणीं यांनीं जमीनी मिळविल्या आहेत असें रसेल व हिरालाल आपल्या कास्ट्स अँड ट्राइब्स इन सी. पी. या पुस्तकांत लिहितात.

म ठि या क ला र.—वऱ्हाडांत मठिया कलार म्हणून एक जात आहे. ते आपणास क्षत्रिय म्हणवितात; त्यांच्यात

जातिपंचायतपद्धति फार व्यवस्थेशीर चाललेली दिसते. अखिलभारतीय मठियाकलारपरिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे व उमरावतीच्या मठियासमाजाचे अध्यक्ष रा. महाजन यांच्याकडून त्यांच्या समाजांत आजहि दिसून येणाऱ्या पंचायतीची माहिती आली आहे ती पुढें देत आहों.

"गुन्हेगारास वठणीस आणण्याकरितां त्याचे न्हावी, धोबि बंद करावे असें पंचायतींत ठरलें कीं, ताबडतोब गांवांतील सर्व न्हावी, धोबी यांनां जातीपुढाऱ्याकडून तोंडी सूचना दिली जाते. जो न्हावी अगर धोबी पंचांच्या सूचनेस धाब्यावर बसवून गुन्हेगाराचें काम करतो त्यानें अखिल मठियासमाजाचा भयंकर अपमान केला असें मानलें जातें. सर्व प्रकारच्या व्यावहारिक बाबींत अशा न्हाव्यास अगर धोब्यास मठिया समाजाकडून एकजुटीनें तीव्र बहिष्कार घालण्यांत येतो. अशा तऱ्हेनें एका गुन्हेगारास साह्य केल्याच्या आरोपावरून सबंध मठिया समाजाचा तो हाडवैरी बनतो आणि मठिया समाजाकडून होणारें त्याचें उत्पन्न तत्काल बंद होतें. अर्थात एका व्यक्तीच्या उत्पन्नाकरितां सर्व मठिया समाजाच्या उत्पन्नास आंचवून सबंध मठिया समाजाच्या रोषास पात्र होण्यापेक्षां एका व्यक्तीचा त्याग करणें व्यावहारिक दृष्ट्या हितावह होतें म्हणून प्रत्येक गांवचे न्हावी धोबी मठिया समाजांतील पंचांचे निकालावरहुकूम चालतात.

समाजांतील एखाद्या व्यक्तीकडून किंवा कुटुंबाकडून एखादी निषिद्ध, धर्मबाह्य अगर 'अपराध' या सदराखालीं येणारी गोष्ट क्वचित्प्रसंगीं घडली तर समाजांतील नियोजित पंचाकडून त्या व्यक्तीचे किंवा कुटुंबाचे न्हावी, धोबी, व सार्वजनिक विहिरीचें पाणी बंद करण्यांत येतें. समाजांतील रूढीविरुद्ध वर्तन करणाऱ्या इसमाला वठणीवर आणण्यास वरील सारखा बहिष्कार हें फार चांगलें साधन आहे. हल्लींच्या सुधारलेल्या काळांत मोठमोठ्या शहरांत अशा प्रकारच्या बहिष्कारानें जेरीस आलेल्या व्यक्तीचें अगर कुटुंबाचें उदाहरण फारसें दिसून येत नाहीं; तथापि परंपरागत धर्मसमजुती, व रूढी यांवर श्रद्धा ठेवून समाजांतील नियोजित ज्ञातिपंचांस मान देणाऱ्या किंवा भिऊन वागणाऱ्या खेड्यांपाड्यांतील समाजामध्यें हीं उदाहरणें आजच्या काळांतहि दृष्टोत्पत्तीस येतात. समाजाकडून वर्ष सहा महिने बहिष्कार घातल्या गेलेल्या व्यक्तीची किंवा कुटुंबाची केविलवाणी स्थिति नजरेस आली म्हणजे आजच्या दृष्टिकोनानें 'व सुधारलेल्या' अशा पूर्वींच्या काळांतहि ज्ञातिपंचांच्या नियंत्रणाखालीं समाजकार्यें कशीं निर्वेध चालत होतीं व 'अपराध' या सदराखालीं येणारें वर्तन करणाऱ्या व्यक्तीला हल्लींच्या पद्धतशीर कायद्याइतकाच 'पाणी, गुडगुडी' बंदीच्या कायद्याची कशी कदर वाटत होती याविषयीं खात्री पटते. आजच्या मठिया समाजांतहि वरील प्रकारच्या बहिष्काराचा अवलंब ज्ञातिपंचांकडून केव्हां केव्हां करण्यांत येतो व इतर कायदेशीर उपायांपेक्षां धर्मबाह्य वर्तन करणाऱ्या व्यक्तीवर या बहिष्काराच्या अस्त्राचा उपाय विशेष परिणामकारक होतो."

मुंबई इलाखा.—संख्या ( १९११ ) ७८६०. मुंबई इलाख्याचा मध्यभाग व गुजराथ यांतून कलालांची वस्ती आहे. ठाणें जिल्ह्यांत कांहीं कलार अथवा कलाल आढळतात. देवी कालिकेच्या अनुज्ञेवरून आम्हीं दारू गाळण्याचा व विकण्याचा धंदा पत्करला आहे असें हे लोक म्हणतात. उत्तरहिंदुस्थानांतून हे इकडे आले असावेत. यांची भाषा मराठी असते. धंद्यांत चलती नसल्यामुळें बरेचसे मोलमजुरी करूं लागले आहेत. यांची रहाणी गलिच्छ असते. परन्तु स्वभावतः हे इमानी व विचारशील असतात. यांचीं घरें बहुधा गवती झोंपड्याच होत. हे गुरेंढोरें पाळतात; मद्य व मांस खातात. यांचा पेहेराव म्हणजे—धोतर, जाकीट व मराठी थाटणीचें पागोटें—हा असतो. यांच्यांत विधवाविवाह संमत आहे. हें हिंदु देव मानतात. विशेषतः खंडोबा भैरोबा, देवी हीं यांचीं उपास्य दैवतें असतात. जातिप्रमुख हा जातींतील लोकांच्या विचारानें तंटे मिटवितो. मुलांनां शिक्षण देत नाहींत. [ क्रूक, रसेल व हिरालाल; सेन्सस रिपोर्ट, मुं. गॅ.; मठियासमाज उमरावती याकडून मठिया कलारांची माहिती मिळेल. ]

**कलावंत**, जात.—मुंबई इलाख्यांत कानडा आणि रत्नागिरी जिल्ह्यांतून या जातीची पुष्कळ वस्ती आहे. १९०१ च्या खानेसुमारींत २०१२ कलावंतांपैकीं ६९३ पुरुष व १३१९ बायका होत्या. पुरुषसंततीला 'गान' असें म्हणतात. अप्सरा आणि गंधर्व यांचे आपण वंशज आहोंत असें सांगून पुष्कळशा देवळांशीं हे आपला पिढीजाद सेवासंबंध पुराव्यादाखल पुढें आणतात. प्राचीन विजयानगरांत राजाजवळ अनेक कलावंतिणी असत. मुसुलमानांनीं विजयानगर काबीज केल्यानंतर त्या सोंडा आणि कॅनरा या भागांत राहिल्या 'ए फरगॉटन् एम्पायर' या ग्रंथांत सेव्हेलनें यांचा उल्लेख करून यांनां केवढा मानमरातब होता याचें वर्णन दिलें आहे ( पान २४१–४२ ).

कलावंतांत जे सहा वर्ग आहेत त्यांचा एकमेकांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. कोंकणी, मराठा, कर्नाटकी, लिंगायत, तेलंगी आणि मुसुलमान हे त्यांचे सहा वर्ग होत. कोंकणी कलावंतांत बांदोडकर, चोरीकर, जेतकर, ककोदकर, नावेकर पर्वतावैले, फातरफेकर आणि शिरोदकर हीं आडनांवें आहेत. एकाच आडनांवाचे लोक एकमेकांत रोटीबेटी व्यवहार करीत नाहींत.

पूर्वीं आठव्या नवव्या वर्षीं मुलींचा शेज नांवाचा एक लग्नसोहळा होई. त्यांत मुलीनें पुरुषासारखा पोषाख करून हातांत नवरा म्हणून कटयार घ्यावयाची असे. या प्रसंगीं नाचगाण्याच्या वेळेप्रमाणें मुली पायांत चाळ व ओढणी घालीत असत. हा समारंभ मोठा खर्च करून चांगला साजरा करीत.

पण हायकोर्टानें अशा पद्धतीचीं लग्नें फौजदारी गुन्ह्यादाखल ठरविल्याकारणानें हल्लीं फारसा गाजावाजा न करितां मुलगी वयांत आल्यावर हा समारंभ उरकून घेतात.

सर्व कलावंतिणी वेश्येचा धंदाच पत्करीत असल्याकारणानें गानांनां (कलावंतांतील पुरुषांनां) दुसऱ्या जातीच्या लोकांतील मुली शंभरपासून तीनशें रुपयांपर्यंत पैसे देऊन वायका म्हणून विकत घ्याव्या लागतात. पण पुष्कळांनां नवरीबद्दल इतका हुंडा देण्याची ऐपत नसल्यानें ते अविवाहित राहतात.

पूर्वी श्रीवारसाची पद्धत असे. पण सध्या हायकोर्टानें असें ठरविलें आहे कीं, पुरुषवायकांमध्यें मालमत्ता सारखी वांटून द्यावी. ज्यांनां संतति नसेल ते अस्पृश्यांच्या मुली विकत घेतात व त्यांचा 'शेज' समारंभ करतात. ऋतु प्राप्त झालेल्या मुलीला दत्तक घेतां येत नाहीं.

ब्राह्मण आणि ग्रामदेवता यांची हे लोक पूजा करितात. म्हाळसा, कांत्र, शांतादुर्गा, आणि शांतेरीकामाक्षी या कुलदेवता होत. कार्तिकस्वामी ही त्यांची यजमानदेवता आहे. जादूटोणा, भुताटकी वगैरेंवर यांचा विश्वास असतो. कऱ्हाडे, चित्पावन किंवा हविक् ब्राह्मण यांचे उपाध्ये असतात. गोकर्ण, रामेश्वर, काशी, धर्मस्थळ, पंढरपूर इत्यादि क्षेत्रांचीं हे यात्रा करितात. अम्मा किंवा शक्ति यांनां रक्ताचा नैवेद्य दाखवितात. सणावाराच्या दिवशीं, विशेषतः दसऱ्याला संगीत वाद्यांची पूजा करितात. मृतांनां जाळतात व कोंकणी मराठ्यांप्रमाणें त्यांची उत्तरक्रिया करितात.

कलावंतांचा पिढीजात धंदा म्हटला म्हणजे गाण्यानाचण्याचा. लग्नमुंजी व इतर मोठ्या प्रसंगीं सुखवस्तू लोक यांचें गाणें करितात. कांहीं देवळांतून सेवेकरितां यांनां इनामी जमीन असते. मृदुंग, ढाल, सारंगी आणि तवला हीं इत्यादि घेऊन गान कलावंतिणींवरोवर असतात. एक ते चार कलावंतिणी व तीन ते चार गान मिळून एक ताफा होतो. गाण्यानाचण्याखेरीज कलावंतिणी कसविणीचा धंदा करितात. पुष्कळशा आपलें घरदार सोडून मुंबई, कोल्हापूर, वंगळूर यांसारख्या ठिकाणीं जातात. देवळी, वांडी, आडवटकी, पडिआर या जातींतील वेश्या, कलावंत समाजांतील एखाद्यानें त्यांनां दीक्षा दिल्याखेरीज नाचण्याला जात नाहींत. दीक्षा घेतल्यानंतरहि त्यांनां कलावंतिणीचा दर्जा प्राप्त होत नाहीं. देवापुढें नाचण्याचा आपल्यालाच काय तो हक्क आहे अशा समजुतीवर भाविणींनां कलावंत या कामांत विरोध करितात. मासे, मांस, आणि मद्य हीं निषिद्ध नाहींत.

म रा ठा क ला वं त.—मराठा कलावंत वर्ग सर्व वावतींत वरील कोंकणी वर्गासारखाच आहे.

क र्ना ट की क ला वं त.—कर्नाटकी कलावंत यांनां पात्र दवरू किंवा शाल विणणारे म्हणतात. या आपण रंभा व उर्वशी यांच्या प्रतिनिधी आहोंत असें सांगतात. कोंकणी कलावंतिणींप्रमाणें यांच्यांतहि मुलींनां सातव्या वर्षी चाळ व ओढणी देऊन दीक्षा देतात व वाराव्या वर्षी यांचा पुढी नांवाचा लग्नसमारंभ करितात. कोंकणी कलावंतांतल्या 'शेज' समारंभाप्रमाणेंच हा असतो. फरक इतकाच कीं त्यांच्यांतील नवरा मुलगा कट्यार असते तर यांच्यांत मडली ( मृदंग ) असतो. धारवाड जिल्ह्यांतील राणीविन्नूर तालुक्यांत गुडगुड्डापूर येथें जो मैलार देव आहे तो कुलदेव, व गुत्तेम्मा आणि फुलगेम्मा या त्यांच्या कुलदेवी आहेत. क्षत्रीय जातीचा आयप्पा यांचा गुरु होय. जर एखादीनें पात्रदा ( शेल्या )ला जोड्यानें मारलें तर तिची जात जाते व पुन्हा जातींत येण्याकरितां प्रायश्चित्त व दंड भरावा लागतो.

लिं गा य त क ला वं त.—साइव किंवा लिंगायत कसविणी, यांच्यांत व लिंगायत कलावंतिणींत विशेष फरक नाहीं ( 'लिंगायत' पहा ). [ एंथोव्हेन—ट्राइव्स अँड कास्ट्स ऑफ वॉंबे ].

**कलावंतखातें,** जा व ता.—नाइकीण कलावंत इणें सरकारचे देवघरापुढें गाण्याचा शिरस्ता प्राचीन आहे. त्याप्रमाणें प्रातःकाळीं सहा घटका दिवसास वस्त्रपात्र रंगीत गुलवदनी तऱ्हेतऱ्हेचे व दागिने असतील ते घालून सरकारवाड्यांत यावें. गाण्याची चाकरी नित्य नेमानें करावयाची ती करीत जावी. सदरहू लिहिलेप्रमाणें हुशारीनें चाकरी केल्यास त्या माणसावर सरकारमेहेरवानी होईल. हें समजोन हुशारीनें वागावें. यांत अंतर पडूं नये. सरकारांतून कायदे चालवयाचे ते पुढीलप्रमाणें:—

( १ ) देवघरापुढें गाणें अगोदर आमचें म्हणोन कलम. त्याप्रमाणें येऊन गात जावें.

( १ ) पोषाख दसऱ्याचा येतो म्हणोन कलम. त्यास सर्वांवरोबर पावेल.

( १ ) दसऱ्यास वकरें व देवाचा नैवेद्य पावतो म्हणोन कलम. त्यास शिरस्तेप्रमाणें पावत जाईल.

( १ ) दसऱ्यास देवावरील कडकणें व खोवऱ्याची वाटी पावते म्हणोन कलम लिहिलें. त्यास शिरस्तेप्रमाणें पावेल.

( १ ) नागपंचमीस नाडे व तेल पावत जाईल.

( १ ) मेसकू मायराणीच्या चुगऱ्या पावत आल्याप्रमाणें पावतील.

( १ ) दिपवाळीवद्दल तेल अर्गजा पावत जाईल.

( १ ) भर कचेरीस प्रथम नाच आमचा म्हणोन कलम. त्यास शिरस्तेप्रमाणें करीत जाणें.

( १ ) मेजवानी कोणाची जहाल्यास इनाम येतो म्हणोन कलम लिहिलें आहे. त्यास सर्वांवरोवर मागून घ्यावा.

[ या खात्यावद्दल "जावता कलमदानें" या लेखांत माहिती दिली आहे ती पहा. खासगीच्या अनेक खात्यांपैकीं हेंहि एक खातें आहे. इतिहाससंग्रह पु. ६. अं. १०, ११ व १२ .]

**कलि**—( १ ) चार युगांपैकीं चवथें युग व युगवाचक व्यक्ति. कलियुगांत कोणत्या प्रकारचे आचार राहतील यावद्दल विवेचन महाभारतांत ( शांतिपर्व अध्याय. ६९ )

केलें आहे. शिवाय स्मृतिग्रंथांतून वगैरे कलियुगांतील आचार वर्णिले आहेत. भारतांत कलियुगांत धर्माचा एक चरण म्हणजे धर्म चौथा हिस्सा शिल्लक राहील असा उल्लेख आहे. (वनपर्व अ. १५१). नैषधकन्या दमयंती हिनें लोकपालांनां सोडन मानव नलाला वरिल्यावद्दल कलीनें नलाचा दायाद पुष्कर याच्याकडून द्यूतांत नलाचें राज्य जिंकविलें व त्यास दमयंतीसह वनवास भोगावयास लावला इत्यादि हकीकत भारतांत आली आहे (नल पहा) (भा. वनपर्व अ. ५१)

(२) कश्यपऋषीपासून मुनी नामक त्याच्या स्त्रीच्या ठिकाणीं झालेला एक गंधर्व.

**कलिंग**—कलिंग राज्य हें हिंदुस्थानांतील फार प्राचीन राज्यांपैकीं पूर्वेकडील एक राज्य होतें. ऋग्वेदामध्यें जरी कलिंगाचा स्पष्ट उल्लेख नाहीं तरी त्यांत कक्षीवान ऋषीचा उल्लेख आढळतो. हा कक्षीवान कलिंग देशच्या राणीच्या दासीचा मुलगा होता (ऋ. १.१२५ सा. भा.). सर्व जुन्या वखरी व इतिहासामधून या देशाचें नांव आढळतें. महाभारतांत या देशाचें नांव आर्यावर्ताच्या ईशान्येस येतें. त्यावेळीं याची राजधानी राजपुर व राजे चित्रांगद व भनुमंत होते. इंद्रप्रस्थाच्या नैर्ऋत्येस हा देश होता. यांत अमरकंटक पर्वत येतो असा रामायणांत उल्लेख आहे. बृहत्संहितेंत याचा देशवाचक, लोकवाचक, राजवाचक असा उल्लेख असून येथें हिरे सांपडत असें म्हटलें आहे. अर्जुन कलिंगांतील तीर्थयात्रेस गेला होता. सहदेवानें दिग्विजयांत येथें प्रवेश केला होता. येथील राजानें धर्मास कारभार दिला होता. कर्णानेंहि येथें स्वारी केली होती व श्रीकृष्णानेंहि येथें स्वारी केली होती. दुर्योधनाच्या सैन्यांत येथील राजा ससैन्य होता. हें सैन्य म्हणजे गजदल असे व सारें गजदल भीमानें (त्याचा राजा श्रुतायु व भगदत्त) यांच्यासह ठार केल्याचा उल्लेख भारतात आला आहे. कलिंगांध्र असा आंध्रांचाहि उल्लेख येतो. परशुरामानें कलिंग जिंकला होता. येथील क्षत्रिय पुढें शूद्र बनून दुर्धर्मी झाले. द्रौपदीस्वयंवरांत कलिंगराज होता.

बुद्धाच्या शरीरस्थ वस्तूंची वांटणी झाल्यावेळीं कलिंग देशाचा राजा ब्रह्मदत्त याच्या वांटणीस एक डाव्या बाजूचा दांत आला अशी एक बौद्ध दंतकथा आहे. वेस्संतर जातक वगैरे जातकांमध्यें कलिंग देशाचा उल्लेख आहे. अशोकानें आपला एक शिलालेख या देशामध्यें तेथील रहिवाश्यांच्या सुधारणेकरतां खोदला आहे. यावरून अशोकाच्या काळीं (ख्रि. पू. २५०) हा देश बऱ्याच महत्वाचा होता असें स्पष्ट होतें. प्लिनि यानें या देशाचे कलिंग, मध्यकलिंग व महाकलिंग असे (त्रिकलिंग=तिलिंगण) तीन भाग दिले आहेत. हैहय घराण्यांच्या शिलालेखांत त्रिकलिंगाचा उल्लेख येतो, तसाच ऐर राजाच्या खंडगिरीच्या शिलालेखांतहि येतो. परंतु या देशाच्या राजांचीं नांवें तेथील वखरी वगैरे ग्रंथाशिवाय कोठेंच आढळत नाहींत. त्यामुळें त्यांवर फारसा विश्वास ठेवतां येत नाहीं.

डॉ. राजेन्द्रलाल मित्र यांनीं ओरिसामधील गुहेंत सांपडलेले पाली भाषेंतील लाट लिपींत लिहिलेले कांहीं शिलालेख प्रसिद्ध केले आहेत. त्यांमध्यें वीर राजा, विधुकराजा, ऐरराजा अशीं नांवें आढळतात. पैकीं, ऐरराजा यानें कलिंग देशचा राजा नन्द यास जिंकून त्याचें राज्य घेतलें असावें. मित्र म्हणत त कीं, हा नन्दराजा म्हणजे काशी राजाच्या नंतर गादीवर बसलेला त्याचा पुत्र आणि ब्रह्मगुप्त याचा नातू सुनन्द हा असावा; किंवा तो मगध देशांतील नऊ नंदांपैकीं एक असावा. ऐर याचा काल ख्रि. पू. चवथें शतक हा आहे.

मि. डब्ल्यू टेलर यांनीं किंगेदि येथें सांपडलेला कलिंग देशचा राजा इन्द्रवर्मा याचा एक ताम्रपट प्रसिद्ध केला आहे. तो आठव्या किंवा नवव्या शतकांतील असावा. या राजाचे दुसरे दोन शिलालेख प्रसिद्ध आहेत. यांचे काल या घराण्याचें वर्ष १२८ व १४६ हे आहेत. वरील ताम्रपटाचें वर्ष ९१ असून त्यावरून इन्द्रवर्मा यानें फार वर्षें राज्य केलें असावें अथवा या नांवाचे दोन राजे असावे असें दिसतें. कलिंग लोक हे जलमार्गानें दूर देशांशीं व्यापार करीत. कलिंगचे गंगराजे हे म्हैसूरच्या गंगराजाचेच भाऊबंद आहेत असें म्हणतात. गंगाचीं राजधानी गंजम जिल्ह्यांतील मुखलिंगम् ही होती. दंतपुर, सिंहपुर, कोरिंगा, राजमहेंद्री, श्रीकालोल हींहि राजधानींचीं नांवें असावीं असें म्हणतात.

**अशोककालीन कलिंग**—कलिंग देश हा महानदी व गोदावरी आणि पूर्वघाट व समुद्र यांमधील देश होय. हा ओरिसाच्या दक्षिणेस येतो. अशोकानें दिग्विजय करितांना हा कलिंग देश ख्रि. पू. २६१ या वर्षी काबीज केला. आणि तोसली या गांवीं कलिंग प्रांताचा त्याचा सुभेदार राहिला. या प्रांतांत त्यानें दोन शिलाशासनें कोरलीं आहेत. त्यावरून या प्रांताचा राज्यकारभार चालविण्यास त्याला फार त्रास झाला असें वाटतें. अधिकारी हुकुमाची तामिली करीत नसत. या कलिंग युद्धामुळेंच अशोकाचें मन धर्माकडे फार वळलें. कांहींचें म्हणणें आहे कीं ही मोहीम म्हणजे जगाच्या इतिहासांतील एक महत्वाची गोष्ट होय. या मोहीमींतील दुःखें, दीड लक्ष कैद्यांचे हाल व एक लक्ष मेलेल्या लोकांच्या आप्तांचा शोक याचा जबरदस्त परिणाम अशोकाच्या मनावर झाला व त्याची साक्ष या वरील शिलालेखांत दिसते. या मोहिमेमुळें अशोक बौद्धधर्मानुयायी झाला (ज्ञा. को. भा. ४. ५. पृ. २२४ पहा)

अशोकाच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत कलिंग देश स्वतंत्र झाला. एक तर मुख्य राजधानीपासून तो फार लांब होता व दुसरें तिकडील सुभेदार हे स्वतंत्र होण्याची हांव धरूं लागले. अशा वेळीं म्हणजे ख्रि. पू. २५६ च्या सुमारास कलिंग तेथील चेत या राजवंशाच्या ताब्यांत आला. त्या

वंशांतील प्रख्यात राजा खारवेल महामेघवाहन होता. हा जैनधर्मी होता. याचा एक शिलालेख उदयगिरी येथें आहे. त्यांत नन्दराजाचा उल्लेख आला आहे. याच नन्दवंशाचा उच्छेद करून मौर्य घराणें पुढें आलें. वरील शिलालेखांत या खारवेलाच्या वंशाची व त्याची स्वतःची हकीकत आहे. परंतु शिलालेख खराब झाल्यानें ती दुर्बोध आहे. यानें आपल्या राजशकाच्या २ ऱ्या वर्षी शातकर्णी ( आंध्र ) राजावर स्वारी केली होती. पांचव्या वर्षी नंदराजानें बांधलेला व १०३ वर्षे नादुरुस्त असलेला एक बंधारा दुरुस्त केला. नंदान्त जर ख्रि. पू. ३२२ धरला तर खारवेलाचा काल ३२२–१०३ म्हणजे ख्रि. पू. २१९ येतो. या वेळीं शातकर्णी राजा होता. यावरून शातकर्णीचा पराभव ख्रि. पू. २१८ त येतो. खारवेल याचा वंश चेत नांवाचा असून त्यांतील हा तिसरा राजा होय. हा ९ वर्षे युवराज असून २४ व्या वर्षी महाराज झाला. बंधारा बांधणें व मगधराजाचा पराभव करणें या गोष्टी यानें ख्रि. पू. २१५ मध्यें केल्या. पुढें ( ख्रि. पू. २१२ ) त्यानें मगधराजाला मांडलिकच बनवलें. याचें नांव बहुधा शालिशुक पाश्चिममौर्य ( २२३–२११ ख्रि. पू. ) असावें. त्यानें अनेक जयस्तंभ(२०६ ख्रि. पू.)उभारले असावे. यानंतर, याची अगर याच्या पुढील वंशाची माहिती आढळत नाहीं. पुढें बहुधा वेंगीकर चालुक्यांच्या ताब्यांत हा प्रदेश गेला असावा ( ७५०). ह्यूएनत्संगाच्यावेळीं याची फार दैना झाली होती. लोकसंख्या कमी झाली असून सर्वत्र जंगल माजलें होतें. पूर्वी लोकवस्ती इतकी दाट होती कीं, चालतांना लोकांचे एकमेकांस खांदे घासले जात व त्यांच्या रथाचे आंख एकमेकांत गुंतत असें म्हणतात. हा देश साधूंच्या शापानें उध्वस्त झाला अशी एक दंतकथा आहे. यानंतर इ. स. ९९० मध्यें प्रख्यात राजराज चोल यानें कलिंग जिंकल्याचा उल्लेख आढळतो. याबद्दल महेंद्रगिरीवर एक जयस्तंभ उभारलेला आढळतो. या चोलाकडे एक शतक राहून, पुढें चालुक्य–चोल–वंशी पहिला कुलोत्तुंग यानें कलिंग जिंकून घेतला (इ. स.१०८० ). पुढें तो बहामनी व कुतुबशाही, मोंगल, निजाम व इंग्रज यांच्या हातीं क्रमाक्रमानें आला असावा. [ द. हिं. प्रा. घ; अँ. ओ; म. भा; अय्यर–प्रा. हिं; वैद्य; स्मिथ; इं. ग्यॅ. .४; वा. रामायण अ. कां; बृ. सं. अ. ५, ९, १०, १६, १७, ३२ वगैरे; इं. अँ. भा. २०; प्रा. भू. व. ]

**कलिंगड**—या फळास इंग्रजींत 'वॉटरमेलन;' व इतर भाषांत टरबुज, कलिंडा, कलंगरी इत्यादि नांवें आहेत. सर्व हिंदुस्थानभर व उष्ण देशांतून याची लागवड करतात. जानेवारी व फेब्रुवारी महिन्यांत हे वेल नदीच्या वाळवंटांत लावितात व त्यांचीं फळें उन्हाळ्याच्या आरंभीं तयार होतात. संयुक्त प्रांतांत कलिंडा नांवाची एक जात असून तिची लागण जूनमध्यें करतात व फळें आक्टोबरमध्यें पिकतात. पश्चिम हिंदुस्थानांत व मुख्यत्वेंकरून सिंधमध्यें कलिंगड म्हणजे खरिपाचें पीक समजतात. नदीच्या वाळवंटातून मुबलक पाणी व जागा असल्यामुळें कलिंगडाचे वेल तेथें चांगले वाढतात. विकानेरमधील एक कलिंगडाची जात निव्वळ वाळूंत वाढते. तिचीं फळें वाळूच्या पृष्ठभागाच्याखालीं लागतात. लागवडीची वेळ व जमीन यांवर फळांचा रंग व रुचि अवलंबून असते. कडू व गोड कलिंगडांत बाहेरून कांहीं फरक दिसून येत नाहीं. सिंधमध्यें कडू कलिंगडाला किरवट म्हणतात; आणि त्याचा रेचकासारखा उपयोग करतात.

उत्तरहिंदुस्थान व मध्यप्रांत यांमधील कलिंगडें उत्तम असतात. त्यांच्यापासून सरबत तयार करितात. याच्या बियांपासून तयार होणारें स्वच्छ तेल जाळण्याकरितां व खाण्याकरितां उपयोगांत आणितात. दुष्काळांत बियांचें पीठ करून लोक त्याच्या भाकरी करतात. बिया दाहनाशक व मूत्ररेचक आहेत.

कलिंगडाची लागण पौषांत मकरसंक्रांतीच्या सुमारास पाणी असलेल्या नदीच्या किंवा ओढ्याच्या वाळवंटांत करतात. कोंकणांत व मावळांत भातखाचरांत भात काढल्यानंतर, पाण्याचा पुरवठा असल्यास कलिंगडें लावतात. बागाईत जमिनींतहि पुष्कळ ठिकाणीं कलिंगडें करितात. कलिंगडाचे वेल जमिनीवरच पसरतात. कलिंगडें पिकल्यानंतर खातात परंतु कोंवळेपणीं सर्व फळाची अगर पिकल्यावर फळाच्या सालीची भाजी करितात; भोंपळ्याच्या सालीच्या भाजीसारखी ही भाजी होते.

औ ष धी उ प यो ग, पुष्टतेसः—कलिंगडाच्या बियांतील मगज अर्धा तोळा व खडीसाखर अर्धा तोळा एकत्र वाटून घेणें. पोटांत दाह झाल्यास कलिंगड खावें. उन्हावर कलिंगडाच्या गिराचें पाणी पावशेर काढून त्यांत जिरें व खडीसाखरेचें चूर्ण टाकून घ्यावें.

दि ल प सं त.—ही कलिंगडाचीच दुसरी जात आहे. याला तेंडु, टिंडा, मेहो व टिटक हीं निरनिराळीं नांवें आहेत. याची उत्पत्ति मुख्यत्वेंकरून संयुक्तप्रांत, पंजाब व सिंधप्रांतांत होते. टरबुजाबरोबरच याची लागवड करतात व त्यांची भाजी करतात. या फळांची मागणी हिंदु व मुसलमान लोकांत आहे. यूरोपियन लोकांनां याची फारशी माहिती नाहीं. यांच्या बियांचा औषधांत उपयोग करितात व कधीं कधीं लोक त्या वाळवून व भाजून खातात. [ वाट: पदे. ].

**कलिंगपट्टम्**—मद्रास, गंजम जिल्ह्यांतील चिककोल तालुक्याच्या गांवापासून १७ मैलांवर असलेलें बंदर. हें तेलगू प्रदेशांतील मुसुलमानी राज्याच्या राजधानीचें गांव होतें. येथें मशिदी वगैरे जुन्या इमारतींचे अवशेष असून त्यांत जुनीं नाणीं सांपडतात. हें जहाजांनां सुरक्षित ठिकाण असल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत व्यापारी बंदर होतें; पण मद्रास इलाख्यांतील पूर्व किनाऱ्यावर रेल्वे झाल्यापासून या बंदराचें व्यापारी महत्व कमी झालें आहे. येथें समुद्रांत एका मैलावर एक ४३ फूट उंचीचें व समुद्रांतून १४ मैल

पर्यंत दिसणारें दीपगृह बांधिलें आहे. येथें कांहीं मिठागरें आहेत.

**कलित**-आसामांतील या जातीची लोकसंख्या. २२१९४२ आहे. ह्यांच्या उत्पत्तीची माहिती बरोबर मिळत नाहीं. परशुरामाच्या रागाला भिऊन पळालेल्या क्षत्रियांपैकीं आसामच्या जंगलांत लपून बसलेले हे लोक आहेत असें कांहींचें मत आहे. त्यांनां आरंभीं कुलुप्त म्हणत असत. कांहींचें म्हणणें कायस्थांपैकीं शेती करणारे हे लोक आहेत व कांहींचें म्हणणें हे लोक मूळच्या आर्य लोकांपैकीं असावेत असें आहे. बंगाल्यांत धंद्याप्रमाणें जातिभेद होण्यापूर्वीं 'कालित' हें नांव ब्राह्मणेतर सर्व आर्यांनां लावीत होते. [ सेन्सस रिपोर्ट १९११ आसाम ].

**कलियुग**—चार युगांतील चवथें युग व त्याची मूर्ति. कलियुगकल्पना ब्राह्मण ग्रंथांतून (तै. ब्रा. १.५) आढळते. तै. संहितेंत युगकल्पना आहे. परंतु त्या ठिकाणीं ( ४.३,३ ) कृत, त्रेता व द्वापर हीं तीनच नांवें आढळतात. ब्राह्मण ग्रंथांत मात्र चारहि युगांचीं नांवें आलीं आहेत. पुराण ग्रंथांत कृत, त्रेता, द्वापर व कलि असा युगांचा अनुक्रम आहे. परंतु ऐ. ब्राह्मणांत ( ७. १५ ) कलि, द्वापर, त्रेता व कृत असा अनुक्रम आहे.

याची वर्षसंख्या देवमानानें चार लक्ष बत्तीस हजार वर्षांची असते. याचा संध्या, व संध्यांशकाल देवमानानें दोनशें संवत्सरांचा गणलेला आहे. ( मत्स्य. अ. १६४ ). मघा नक्षत्रीं सप्तर्षी आले म्हणजे कलियुगास आरंभ होतो ( भाग. १२ स्कं. अ. ३ ).

सांप्रत कलियुगाचीं चार हजार नऊशें सत्याहत्तर वर्षें गत झालीं आहेत व हें युग चालू मन्वंतरांतलें २८ वें आहे.

**कलियुगवर्ष**—कलियुग संवत् ( वर्ष ) व भारतीयुद्ध संवत् हीं दोन्हीं एकच आहेत अशी एक समजूत आहे. परंतु ती बरोबर दिसत नाहीं. कारण भारतीयुद्धानंतर धर्माचें राज्यारोहण झालें त्यावेळीं कलियुगसंवत् सुरू झालें असलें पाहिजे. कांहींच्या मतें कलियुगास प्रारंभ झाल्यानंतर युद्ध झालें असें आहे. युद्धानंतर ५१ वर्षांनीं कृष्ण निजधामास गेले व त्यावेळीं कलियुगास प्रारंभ झाला असेंहि एके ठिकाणीं सांपडतें. सारांश अगदीं नक्की काल असा अद्यापि निश्चित झाला नाहीं. तरी पण या बाबतींत ऐहोळचा शिलालेख प्रमाण धरण्यास हरकत नसावी. तेथें शालिवाहनशकाचें व भारतीय युद्धसंवताचें अशीं दोन्हीहि वर्षे दिलीं आहेत. त्यावरून शालिवाहन शकापूर्वी ३१७९ या वर्षी ( ख्रि. पू. ३१०२ ता. १८ फेब्रुवारी ) भारतीय युद्ध झालें व तदनंतर थोडक्याच दिवसांनीं कलियुग संवत् सुरू झालें. सामान्य हिंदुजनसमूह भारतीयुद्ध, कलियुगारंभ, व परीक्षित जन्म जवळ जवळ मानून त्यांचा काल वरील ( शकपूर्व ३१७९ ) धरितात. याबद्दल जास्त माहिती ज्ञा. को. प्र. खं. वि. ५ वा पृ. १०६–७ वर पहा. [ इं. अँ. पु. ४०; वैद्य–म. भा. ३ ].

**कलुगुमलइ**—(कलुगु–गरुडपक्षी, आणि मलइ–डोंगर.) मद्रास इलाखा. तिनवेल्ली जिल्हा. ओत्तपिडारम् तालुका, इत्तैयापुरम् जमीनदारींतील एक खेडें, उत्तर अक्षांश ९°८' व पूर्वरेखांश ७७° ४२'. तिनवेल्ली गांवाच्या उत्तरेस १२ मैलांवर हें ४८२७ लोकवस्तीचें एक गांव आहे. येथें सुब्रह्मण्याचें दगडांत खोदलेलें देऊळ असून इतर जैन देवळें वरींच आहेत. वरील देऊळ दहाव्या शतकांतील असावें असा समज आहे. दर वर्षी फेब्रुवारी महिन्यांत येथें मोठी जत्रा भरते. चिंगलपुट जिल्ह्यांत असलेल्या सात देवळांच्या धर्तीवरच या देवळाची बांधणी आहे.

**कलुशा**—हा काश्मिरी ब्राह्मण असून याचें मूळचें नांव 'कव कलस' असें होतें. हा शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर व संभाजीच्या राज्यारोहणापूर्वी थोडे दिवस दक्षिणेंत आला. हा साधारण योग्यतेचा होता. याला मंत्र, तंत्र, जादू, टोणे करण्याची कला अवगत असून हा वाममार्गीहि होता. असल्या प्रकारच्या लोकांस दुसऱ्यावर छाप बसविण्याची कला नैसर्गिकच असते. विशेषतः एखादा मनुष्य संकटांत सांपडलेला पहातांच हीं वाममार्गी माणसें आपल्या 'शाक्त' शक्तीचा परिणाम त्याच्यावर तेव्हांच करूं शकतात. देव्युपासक भोसल्यांच्या कुळांतील संभाजीच्या धर्मनिष्ठ भोळ्या मनावर, राज्यारोहणप्रसंगीं जे अनेक शकुनापशकुनांचे अनिष्ट परिणाम झाले, त्यावेळीं संभाजीच्या उग्र प्रकृतीला त्याच्या राज्य चालविण्याच्या कामास अर्थातच याचा उग्रस्वरूपी सल्ला अधिकच मानवला. या प्रकारें संभाजी हा या 'आदिशक्ति' उपासक 'शाक्ताच्या' शक्तीच्या गवसणींत सांपडला. जर कोणी माणूस त्यावेळीं त्याला महाराष्ट्रांत हितकर असा वाटला असेल तर तो हा कलुशा होय. संभाजीनें याला कांहीं महिने जवळ बाळगिलें होतें. कारण ज्यावेळीं फितुरी व फूट यांचाच अंमल राज्यांत ( पहिल्या १०–१२ महिन्यांत ) बसला होता, त्यावेळीं संभाजीला कोणावर विश्वास ठेवावा हेंच समजेनासें झालें होतें. अर्थातच प्रत्येक मनुष्याचा कोणावर ना कोणावर तरी विश्वास असावयाचा या न्यायानें त्याचा विश्वास या परदेशीय व वयस्क कलुशावर बसला. कलुशावर जरी संभाजीचा विश्वास बसला होता, तरी तो त्याची किंमत जाणून होताच. त्यानें त्याला कधींहि 'पेशवे' किंवा 'पंडितराव' किंवा अष्टप्रधानांतील कोणतेंहि एखादें प्रधानपद दिलें नाहीं. फक्त त्याला कांहीं तरी अधिकार देणें प्राप्त होतें म्हणून 'छंदोगामात्य ( म्हणजे सामवेदाध्यायी अर्थातच सामवेदी म्हणजे मंत्रप्रयोजक ब्राह्मणांची व्यवस्था करणारा अधिकारी ) असें एक नवेंच पद दिलें. मात्र कलुशाचा संभाजीशीं निकट सहवास असल्यामुळें व त्यानें स्वतःच आपल्या राजाजवळील वजनाचा स्वार्थपरायणतेनें जास्त

गवगवा केल्या कारणानें लोकांनां त्याचें भय व वचक वाटूं लागला. तसेंच संभाजीच्या विरुद्ध ( सोयराबाईच्या ) बाजूंतील लोकांनां व तटस्थ वृत्ति ठेवून राहिलेल्या सर्व कर्त्या मंडळींनां आपल्या कृतकर्माबद्दल संकोच वाटल्यामुळें तीं आपलीं सर्व कामकाजें या त्रयस्थ कवजीबावा कडूनच करून घेऊं लागलीं. त्यामुळें या बावाचें प्राबल्य जसें लोकांत निष्कारण अधिकाधिक वाढूं लागलें, तसेंच संभाजीजवळहि कोणीच मनमोकळेपणानें बोलेनासा झाल्यामुळें संभाजीलाहि कवजीशिवाय विश्वासार्ह असा कोणीहि दिसेनासा झाला. शिवाय संभाजीची कारकीर्द सुरू होतांच मराठ्यांच्या राज्यास मूठमाती देण्याची प्रतिज्ञा करून औरंगझेब मराठी राज्यासभोंवतीं धरणें धरून बसला होता. त्यामुळें जीं कांहीं थोडीं माणसें कर्तृत्ववान होतीं तींहि या परचक्राच्या निवारणार्थ चार दिशेला पांगलीं गेलीं होतीं. त्यामुळें कलुशाला या सर्व परिस्थितीचा चांगलाच फायदा मिळाला, व त्यानें भिक्षुकी मामला सोडून देऊन तो राजकारणी पुरुष बनला.

महाडचे दादजी प्रभु यांनीं आपलें जंजिऱ्याचें कारस्थान कवजीच्या मार्फत संभाजीस समजाविलें व आपली जंजिऱ्याच्या स्वारीवर योजना करून घेतली. परंतु कलुशाकडून वेळेवर मदत न पोहोंचल्यामुळें दादजीची फजीती होऊन तो परतला. यापुढें ते दोघे एकमतानें कारस्थानें करूं लागले. अशा प्रकारें संभाजीच्या सान्निध्यांत कलुशाचे सहा सात महिने जातात न जातात तोंच, औरंगझेबाचा लाडका मुलगा अकबर आपल्या बापावर बागी ( रुसून ) होऊन उत्तर हिंदुस्थानांतून संभाजीच्या आश्रयार्थ इ. स. १६८१ च्या मे महिन्यांत आला. इतक्यांत संभाजीची बायको येसूबाई कलुशाचा द्वेष करूं लागली होती. म्हणून अकबराचा बंदोबस्त आणि विशेषतः त्याच्या हालचालीवर करडी नजर ठेवण्याकरितां म्हणून संभाजीनें कवजीबावास रायगडाहून दूर करून अकबराजवळ पालीस पाठविलें. तेथें बावास अण्णाजी दत्तो व अकबर यांच्यामध्यें चाललेलें ( अकबरास दिल्लीच्या तख्तावर व राजारामास मराठ्यांच्या राज्यावर बसविण्याचें ) कारस्थान समजलें. तेव्हां त्याची वर्दी त्यानें संभाजीस पोहोंचविली. बावाला विशेषतः आपला जम बसवून वाढत चाललेली महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्यास शिवाजी महाराजांच्या वेळचीं जुनीं व कर्तीं खोडें दूर करावयाचीं होतीं. म्हणून त्यानें या गुप्त कटाची उग्रता अधिकच तीव्रतर भासविली. शिवाय अकबरानेंहि भीतीनें त्या कारस्थानाबद्दल कबुली दिली. तेव्हां संभाजीचें चित्त अधिकच खवळलें. या कटाच्या स्फोटांत कलुशानें अण्णाजी दत्तो, महादजी अनंत, सोमाजी दत्तो व हिराजी फर्जंद यांस परळीखालीं मारविलें. तसेंच ओल्याबरोबर सुकेंहि जळतें या न्यायानें दादजी व कवजीनें बाळ प्रभु यासहि मारविलें व शामजी नाईक यांस कैद करविलें. याचा परिणाम असा झाला कीं, राज्यांतील कर्तीं वडील माणसें नाहींशी झालीं. मुख्यतः चिटणीसी दरख आपल्या ताब्यांत आल्याविना आपला बोज बसणार नाहीं हें बावा व दादजी पूर्णपणें जाणून होते. म्हणून ते दोघेहि या खटपटींत होते. त्यांनीं या प्रसंगीं जेव्हां संभाजीस खोटेंच भासवून चिटणीसांच्या घराण्याचाच नाश करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां चिटणीसी व शिक्केकट्यार येसूबाईनें आपल्या ताब्यांत घेतली व खंडो बल्लाळाच्या करवीं ती स्वतःच काम पाहूं लागली. त्यामुळें बावांच्या 'शाक्त' चक्रीचा परिणाम संभाजीपर्यंतच थांबून राज्यांतील इतर व्यवस्थेवर होण्याचा बंद झाला.

पुढें इंग्रजांशीं जो इ. स. १६८३ त तह झाला त्यावेळीं कवजी एकटाच वडील, सैनिध, बोलका व व्यवहारचतुर असल्याकारणानें त्यासच इंग्रजांकडे पाठविलें. नंतर ज्या वेळीं इ. स. १६८३ च्या सप्टेंबरच्या अखेरीस संभाजी अकबरास घेऊन फोंड्याच्या लढाईस गेला व त्यानें गोवेकर रगेल पोर्तुगीजांची चांगलीच रग जिरविली त्यावेळीं बावा अकबराबरोबरच होते. अकबरास व त्याच्या बरोबर बावासहि संभाजीनें शत्रूच्या सैनिध येऊं दिलें न हतें. पुढें शहा अलमचा रामसेजेचे वाटाच्या बाजूनें संभाजीस शह बसतांच संभाजीस आपल्या सैन्यानिशीं निकडीनें निघावें लागलें पण गोवेकरांचें तहाचें बोलणं तर चालूच होतें. तेव्हां गोवेकरांशीं सल्ला करण्यासाठीं संभाजीनें 'बावाला कुल येखत्यार देऊन तेथेंच ठेविलें' व आपण मात्र रायगडास गेला. बावा व अकबर यांनीं भीमगडच्या झाडींत इ. स. १६८४ च्या जानेवारींत जाऊन गोवेकरांशीं सल्ला केला व १८ मे १६८४ रोजीं बावा रायगडास येऊन दाखल झाला. पुढें ७ नवंबरला कोथळागड मोंगलांनीं घेतला व शाहादि खानाहि पुण्याहून दौड करून बोरघांट उतरों लागला. तेव्हां संभाजीनें बावास त्याच्यावर पाठविलें; व बावानींहि गागोलीला शाहादिखानास गांठून त्यासीं १४ जानेवारी १६८५ रोजीं भांडण दिलें व शाहादिखानास कोंकणांतून पिटाळून लाऊन त्याला पुन्हां घांटावर परतविलें. नंतर कवजी रायगडास आला व दोन तीन महिने त्याचा मुक्काम तेथें होत आहे न होत आहे तोंच विजापुरास मोंगलांचा वेढा पडल्याची खबर आली. त्यामुळें संभाजीला विजापुरकरांच्या मदतीस कोणाला तरी पाठविणें जरुरीचें वाटलें; व इतक्यांत हंबीरराविहि स्वामी कार्यावरी पडलेला व इतर सर्व सरदार चारी दिशेस पांगलेले त्यामुळें इ. स. १६८५ च्या जून महिन्यांत बावासच विजापूरकरांच्या मदतीस पाठविलें. परंतु बावानें फौजा मात्र पुढें रवाना करून आपण खासा पन्हाळा येथें राहिला. अशा रीतीनें बावाजी तीन वर्षेपर्यंत आपला आयुष्यक्रम कधीं पन्हाळा तर कधीं संगमेश्वरीं घालवित असतां शिर्के व बावाजी यांच्यांत वैमनस्य आलें व त्यांनीं बावावर बंड उभारलें. तेव्हां बावा इ. स. १६८८ च्या नवंबरांत संगमेश्वराहून खेळण्यास पळून गेला. ह्या शिर्क्यांच्या पारखेपणाची बातमी संभाजीस लागतांच तो रायगडाहून

निघाला व संगमेश्वरीं येऊन " शिर्के व त्यांच्या साथीदारांशीं युद्ध करून त्यांना हांकलून लाविलें. तेव्हां शिर्के राजापुरीस पळून गेले " व संभाजी खेळण्यास गेला. बावानें या शिर्क्यांच्या कटाशीं प्रल्हादपंत व इतर कांहीं सरकारकुनांचा संबंध आहे असें भासविल्यावरून त्यांना संभाजीनें धरलें; विजापुरकडे पाठविलेल्या सैन्यांत धनाजी, संताजीसारखीं माणसें असल्यामुळें फौजेंत किंवा लढाईंत विशेष सा घोंटाळा उडाला नाहीं. मात्र मोंगली व मराठी सैन्याच्या हालचाली मराठी राज्याच्या अगदीं निकट असल्याकारणानें फितुरी करणें वगैरे मोंगली प्रयत्न जारीनें सारखे चालू होतेच. संभाजी खेळण्याहून बावासह निघाला व ही बातमी मोंगली सरदारांनां मराठ्यांकडील कोण्या फितुरी लोकांनीं पोहोंचविली. बातमी लागतांच सेक निजाम—ज्याला त्याच्या शौर्याबद्दल मुकरीबखान व संभाजीस ' युक्तीनें पकडलें ' म्हणून पुढें तकरीबखान असे किताब मिळाले होते तो—कोल्हापुरीहून दौड करीत निघाला. रायगडास जाण्याकरितां निघालेल्या संभाजीचा मुक्काम संगमेश्वरीं होताच. तारीख १ फेब्रुवारी १६८९ रोजीं संभाजी व बावा यांस वरकड लोकांनिशीं खानानें पकडलें.त्यावेळीं दोन्हीहि बाजूंच्या लोकांत मारामारी झाली व बावास तीर लागून तो जखमी झाला. संभाजी वगैरे मंडळी निःशस्त्र व बेसावध असल्यानें शेख निजामानें त्यांनां थोड्याच वेळांत धरून औरंगझेबाकडे पाठविलें.औरंगझेबानें तारीख ११ मार्च १६८९ रोजीं प्रथम बावास व नंतर संभाजीस " जिवंच मारून शिरच्छेद " केला.

बावाची योग्यता जरी लघु होती तरी त्याची आकांक्षा फार जबर होती. एखादें मोठें राजकाज करावें व नांव मिळवावें असें बावास वाटे. परंतु तसें त्याच्या हातून घडलें नाहीं. संभाजीच्या मर्जींतला हा बावा आहे एवढीच गोष्ट जरी प्रजेवर व सरदारांवर त्याचा पगडा बसविण्यास पुरेशी होती तरी त्याच्या हातून कांहीं महत्वाचें काम घडलें नाहीं व त्यामुळें संभाजीनें त्याला अधिकार दिल्याचें आढळत नाहीं. बावास कधीं कधीं लहान लहान खटले तोडणें व न्याय देणें वगैरे कामें करावीं लागत हें जरी खरें आहे तरी तीं केवळ सर्व प्रधान व कारकून मंडळी पांगली गेल्यामुळें करावीं लागत येवढेंच. तसेंच संभाजी कलुशाच्या पूर्णपणें आधीन झाला होता असेंहि दिसत नाहीं. उलट कलुशाचे इकडील जनतेच्या रीतीरीवाजांच्या व देशांतील परिस्थितीच्या आज्ञानामुळें घोंटाळे उडतात हें संभाजी जाणून असल्यानें त्यानें त्याला मोठे अधिकार दिले नाहींत. कलुशा व संभाजी यांचीं व्यसनें वगैरे वाईट आचरणाविषयींची बखरकारांनीं लाविलेली संगति व काढलेलीं अनुमानें संभाजीच्या झटपटींच्या हालचाली व विशेषतः या दोघांचें जें अगदीं थोडेंच सान्निध्य झालें त्याचा थोडाहि विचार केल्यास अगदींच निराधार व फोलकट वाटतात. तसेंच कलुशानें फितुरी केली हाहि आरोप अगदींच खोटा आहे. [ डफ; राजवाडे ८; जेधे; सरदेसाई; सरकार ]. [ वा.सी. बेंद्रे ]

[ रा. बेंद्रे यांनीं जी कलुशाबद्दल माहिती दिली आहे ती बरीच नवीन भासणारी आहे. परंतु परिचित माहितीपेक्षां तिला जास्त आधार सांपडले आहेत. काश्मीरच्या राजघराण्यांत ' कलस ' हें उपपद असणारे कांहीं राजे होऊन गेले ( कलस पहा ). कलुशाला संभाजीनें महत्वाचा अधिकार जरी दिला नव्हता तरी त्याचें वाटेल तें बोलणें संभाजी मानी. विशेषतः त्याच्या खोट्या चहाड्या खऱ्या मानून संभाजीनें पूर्ण विचार केल्याशिवाय बहुतेक सारी कर्तीं माणसें ( ज्यांनीं शिवाजीस राज्य उभारण्यांत मदत केली तीं ) जीवें मारिलीं; परस्परांचें सान्निध्य जरी थोडकेंच होतें तरी त्याचा हा परिणाम झाला! कलुशानें शेवटीं फितुरी केली असावी असें आम्हांस वाटतें. कारण तो हलक्या दर्जाचा व हांवरा माणूस होता व अशा माणसाला कसें फोडावें हें औरंगझेब उत्तम जाणत असे. संभाजी अमक्या दिवशीं अगदीं थोड्या लोकांनिशीं संगमेश्वरी येतो ही नक्की बातमी शेख निजामास कशी कळली? कवजीशिवाय संभाजीच्या भरंवशाचा ( कीं ज्याच्याजवळ तो आपला जाण्याच बेत फोडील असा ) त्या वेळीं दुसरा कोणीहि इसम नव्हता.तसेंच खेळण्याहून स्वतःच्या संरक्षणापुरती जास्त फौज संभाजीस सहज घेतां आली असती, पण ती त्यानें घेतली नाहीं; यांत कोणाचा तरी हात असला पाहिजे. ऑर्मेहि कवजीच्या फितुरीची साक्ष देतो. सारांश, कलुशा यानेंच फितुर होऊन संभाजीस औरंगझेबाच्या स्वाधीन केलें असें आमचें मत—वरील आधारांवरून—आहे [ संपादक ].

**कॅले**—हें फ्रान्सच्या उत्तरभागांत व ' पास-डी-कॅले ' विभागांतील एक प्रसिद्ध बंदर व कारखान्याचें शहर आहे. हें पारिसच्या उत्तरेस १८५ मैल व डोव्हरपासून १८ मैलांवर आहे. १९११ सालीं येथील लोकसंख्या ७२३२२ होती. कॅलेचा किल्ला पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे. याचें संरक्षण पुरातन कालीं बांधलेल्या ४ दुर्गांनीं केलेलें आहे. १५६० सालीं बांधलेल्या बालेकिल्ल्यानें व मोर्चेबंदीनें किल्ल्यास फार मजबुती आली आहे. येथील जुनें शहर एका बेटावर आहे.ह्या शहराचा तट अगदीं मोडकळीस आल्यामुळें किल्ल्याच्या आसपास नवीन बुरूज, भिंती वगैरे बांधण्यांत आल्या असून एका अति खोल खंदकानें त्यांस विशेष मजबुती आणली आहे. जुन्या शहराच्या मध्यभागीं ' डी आर्मेस ' ची जागा आहे. हिच्या आंत १७४० सालीं पुनः बांधलेली 'हॉटेल-डी-व्हिले' नांवाची इमारत आहे. येथील घंटाघुमट १६ व्या, १७ व्या शतकांत बांधले असावेत. जवळच 'टावर द ग्रेट' अथवा चौकी बुरूज आहे. हें १८४८ सालापर्यंत दीपगृह होतें. इंग्रजांकडे १७व्या शतकांत जेव्हां कॅले होतें तेव्हां नाटर-डेमचें ख्रिस्ती देवालय बांधण्यांत आलें. ह्या देवालयाचें भव्य शिखर नाविकांस उपयोगी पडतें. सेंट पेरी या भागांत कॅलेंतील बहुतेक कारखाने असून ह्या भागांतच १९ साव्या शतकांत बांधलेलें ख्रिस्ती देवालय व अलीकडे बांधलेलें सार्वजनिक

सभागृह आहे. कॅलेंत दलालांचें मंडळ, न्यायसभा, वणिक्-सभा, व्यापारी व औद्योगिक शिक्षणशाळा व कॉमन्सची शिक्षणाची मोठी शाळा या संस्था आहेत.

यूरोपमधून इंग्लंडांत जाण्यास किंवा तेथून यूरोपांत येण्यास फक्त कॅले हाच मार्ग आहे. येथील व्यापार विशेषें-करून संयुक्त राज्याशींच होत असतो. येथून बाहेर गांवीं जाणाऱ्या मालांत दारू (शाम्पेन), स्पिरिट, वाळलेलें गवत, लोंकर, बटाटे, लोंकरी माल वगैरे मुख्य वस्तू आहेत. व बाहेर देशांहून येणाऱ्या मालांत कापूस, रेशमी माल, कोळसा, लोखंड, पोलाद, पेट्रोलियम, इमारती लांकूड, कच्ची लोंकर, बुचाचें लांकूड वगैरे माल मुख्य आहे. येथील मुख्य उद्योग "टक्की" व जर, फीत वगैरे बनविणें हा होय. येथें जहाजें बांधण्याचें कामहि होतें. व कॉड, हेरिंग, व मेकरेल वगैरे मासे धरण्याचाहि उद्योग चालतो.

पूर्वी कॅले हें लहानसें मासे धरण्याचें बंदर होतें. स.९९७ सालीं चौथ्या बाल्डविननें ह्या गांवची स्थिति सुधारली व नंतर १२२४ सालीं फिलिप हरपेल नांवाच्या बोलोनच्या काउंटनें जय्यत तटबंदी केली. क्रेसीच्या युद्धानंतर १३४६ सालीं एडवर्ड (तिसरा) ह्याच्या फौजेचा वेढा पडला असतां तेथील गव्हर्नर जीन डी व्हीएने ह्यानें सतत एक वर्षपर्यंत कॅलेचें रक्षण केलें; पण पुढें अन्नसामुग्रीच्या अभावामुळें शेवटीं हा किल्ला शत्रूच्या हातीं द्यावा लागला. पुढें १५५८ पावेतों हा किल्ला इंग्रजांकडे राहून शेवटीं फ्रॅन्सिस ड्यूक आफ गॉइज्च्या ३०००० शिपायांपुढें ८०० माणसांचा टिकाव न लागल्या-मुळें सोडून द्यावा लागला. नंतर १५९५ पासून १५९८ पावेतों हा किल्ला स्पेनच्या ताब्यांत राहून व्हर्निनच्या तह-नाम्यांत फ्रान्सला परत मिळाला.

**कलेवल**—अथवा कालेवाला हें फ़िनलंड देशाचें ऐतिहासिक महाकाव्य आहे. ईलिअड, रामायण, महाभारत इत्यादि जीं कांहीं जगांतील नामांकित महाकाव्यें आहेत त्यांमध्यें याची गणना मॅक्समुल्लरसारख्या पंडितांनीं केली आहे.

फिनलंडमधील लोक जुन्या ऐतिहासिक पोवाड्यांचे फार हौशी असल्यानें त्यांच्या तोंडांत हे पोवाडे नेहमीं असतात. अशा प्रकारचे ऐतिहासिक पोवाडे एके ठिकाणीं जमविण्याची कल्पना एलियस लूनॉट नांवाच्या एका माणसाला सुचली; व त्याप्रमाणें त्यानें १८३५ सालीं असे पोवाडे व काव्यें एकत्र करून दोन भागांत प्रकाशित केले. या संग्रहाला त्यानें 'कलेवल' हें नांव दिलें. या संग्रहाचें त्यानें प्रथमतः २५ रूनो अगर सर्ग पाडले होते पण पुढें त्यानें तो काव्य-संग्रह वाढवून त्याचे ५० सर्ग पाडले. ही सुधारून वाढ-विलेली आवृत्ति त्यानें १८४९ मध्यें प्रकाशित केली. हा काव्यसंग्रह एकत्र करण्याकरितां लुन्रॉटला फारच परिश्रम करावे लागले. फिनलंडच्या सर्व भागांतील सर्व प्रकारच्या लोकांमध्यें जाऊन त्यांच्या तोंडून हीं काव्यें व गाणीं म्हणून घेऊन नंतर तीं त्यानें एकत्र केलीं. 'कलेवल' शिवाय त्यानें इतरहि काव्यसंग्रह अगर एकेक स्वतंत्र काव्य छापलें पण 'कलेवल' हें ऐतिहासिक असें प्रमुख काव्य होय. या संग्रहांत त्यानें फिनिस लोकांतील ऐतिहासिक काव्यें, दंतकथा, वीरांच्या स्तुतिपर काव्यें, कल्पित काव्यें, भावगीतें व चेटुकगीतें या सर्वांचा समावेश केला आहे व अशा प्रकारच्या निरनिराळ्या साधनांचा उपयोग करतांना या मोठ्या काव्यांत सूत्रबद्धता ठेवण्याची त्यानें शक्य ती खबरदारी घेतली आहे.

मूळ काव्य.—कलेवल याचा अर्थ 'वीरांची जन्मभूमी' असा आहे. फार प्राचीन काळीं फिनलंडमध्यें, कलेव नांवाचा एक सर्वगुणसंपन्न असा वीर होऊन गेला. त्यानंतरचे जे वीरपुरुष निर्माण झाले ते कलेवानेंच निर्माण केले अशी फिन लोकांची समजूत आहे. अर्थातच कलेवानें उत्पन्न केलेल्या अशा कांहीं वीर पुरुषांची—हकीकत यांत लून्रॉटनें गुंफिली आहे. या सर्व महाकाव्यांत खुद्द कलेवाचा असा एकदाहि उल्लेख आलेला नाहीं. कलेवाची मुलगी कले-वतर व कलेवाचा एक वंशज कलेवलैनेन यांचे मात्र उल्लेख आलेले आहेत.

स्वरूप.—'कलेवलां'त व्हाइनामोइनेन, इल्मारिनेन, लेम्मिन-कैनेन व कुल्लेर्व्हो या चार शूर पुरुषांचा वृत्तांत आलेला आहे. व्हइनामोइनेन हा वारा व त्याची मुलगी इल्टर यांच्यापासून झालेला असून तो विद्यासंपन्न कवि व वीर पुरुष असा दाख-विण्यांत आला आहे. इल्मरिनेन हा व्हाइनामोइनेनचा सावत्र भाऊ असून त्याची आई ही मानव जातींतली होती. तो मोठा कसबी असून फार सुस्वरूप होता असें या काव्यसंग्रहावरून दिसून येतें. लेम्मिनकैनेन हा रंगेल व अविचारी तरुण असून तो आपल्या अविचारी साहसानें अनेक वेळां विघ्नांच्या भोंवऱ्यांत सांपडतो. पण त्याला मंत्रविद्या अवगत असल्यानें तिच्या जोरावर अगर त्याच्या आईच्या सहा-य्यानें तो या विघ्नांच्या तडाक्यांतून सुटलेला आहे. जाज्वल्य मातृभक्ति हा त्याच्या अंगांतील मोठा गुण होता. व त्यामुळें त्याच्या इतर दुर्गुणांवर थोडेंसें पांघरूण पडलेलें आहे. त्याला कौकोमेली असें दुसरें एक नांव आहे. कुल्लेर्व्हो हा दुर्मुखलेला, दुष्ट पण राक्षसी शक्तीचा असा दाख-विला गेला आहे. आपल्या प्रचंड शक्तीचा तो नेहमीं दुरु-पयोग करतो. फिनिश लोकांतील एस्थोनियन जातीच्या लोकांत त्याच्यावर पुष्कळ काव्यें रचलेलीं आढळतात. त्या काव्यांत त्यास कलेवाचा मुलगा असें म्हटलें आहे. कलेवलमध्यें तो एका जातीचा मुख्य होता असें म्हटलें आहे. या चारी वीरांच्यासंबंधीं एक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे व ती म्हणजे या चारी वीरांनां मंत्रविद्येचें ज्ञान असे. आपल्या मंत्रसिद्धीच्या बळावर ते देवांनां देखील वश करूं शकत. एखाद्या विघ्नापासून आपलें रक्षण करून घ्यावयाचें झाल्यास त्या विघ्नाचें मूळ, त्याची वाढ इत्यादि सांगितलें कीं, तें विघ्न दूर होत असे अशा प्रकारचें वर्णन यांत आलेलें आहे.

या काव्यांतील प्रमुख नायिका म्हणजे इल्मटर, मर्जेट्टा, ऐनू, लौही व तिची मुलगी या होत. इल्मटर ही या जगाची जननी होय. ऐनू ही लॅप जातीची एक सुंदर तरुणी असून तिच्यावर आलेले दुःखाचे प्रसंग फारच हृदयस्पर्शी आहेत. हिच्यावर व्हाइनामोइनेनचें प्रेम असतें. लौही ही फिनलंडचा उत्तर भाग जो पोहोजोल त्याची स्वामिनी असते. तिच्या मुलीशीं इल्मरिनेन याचा विवाह होतो. या मुलीचा स्वभाव कांहीं वेळां फार सरळ व निष्कपटी तर कधीं दुष्ट व निर्दय व कांहीं प्रसंगीं भित्रा व भोळसर असा दाखविलेला आहे. या एकाच गोष्टीवरुन कलेवलांतील काव्यें एकाच्या हातचीं नसून अनेकांच्या हातचीं आहेत. हें निर्विवाद सिद्ध होतें.

क था न क.—इल्मटरनें व्हाइनामोइनेनला उत्पन्न केल्यानंतर तो आपल्या वयाला पुष्कळ वर्षे होईपर्यंत आपल्या जन्मभूमीची चांगली मशागत करून आपला देश संपन्न करतो. त्याचें ऐनू नांवाच्या एका मुलीवर प्रेम बसतें. पण असल्या वृद्ध मनुष्याशीं लग्न करण्याचें तिला वाईट वाटून ती एका सरोवरांत जीव देते. पण त्या सरोवरांत उडी मारतांच तिचें माशांत रुपांतर होतें. ही गोष्ट व्हाइनामोइनेनला कळतांच त्या सरोवरांत मासे धरण्याकरितां तो जातो पण ती त्याच्या जाळ्यांत न सांपडता 'तुझ्याशीं मी लग्न करणार नाहीं' असें सांगते. यामुळें तो वेडा होतो पण त्याच्या आईनें पोहजोल येथील सुंदर मुलींपैकीं एकीशीं विवाह करण्यास सांगितल्यामुळें तो तिकडे जातो. त्या प्रदेशाची स्वामिनी जी लौही ही त्याला एका अटीवर आपली सुंदर मुलगी द्यावयाचें कबूल करते. ती अट म्हणजे सँपो नांवाची एक गूढ वस्तु तिला मिळवून देणें ही होय. ही वस्तु प्राप्त करून देण्याचें काम त्यानें आपल्या भावाकडे सोंपविलें. इल्मरिनेन हा हरप्रयत्नानें ती गूढ वस्तु मिळवितो व लौहीपाशीं तिच्या कन्येची मागणी करतो; पण ती मुलगीच स्वतः त्याच्याबरोबर लग्न करण्याचें नाकारतें. नंतर लेमिनकैनेन हा लौहीच्या मुलीला मागणी घालतो. पण लौही त्याला कांहीं अवघड गोष्टी करावयास सांगते व त्यांतच तो मारला जातो. पण पुढें तो पुन्हां जिवंत होतो. पुढें व्हाइनामोइनेन व इल्मरिनेन हे दोघेहि पुन्हां लौहीच्या मुलीकडे येतात व आम्हां दोघांपैकीं तुझ्या पसंतीस येईल त्याला वर असें सांगतात. ती कांहीं अवघड अटी घालते, त्या इल्मरिनेन पार पाडतो. व ती त्याला वरते. पुढें त्यांचा विवाह मोठ्या थाटानें पार पडतो. या समारंभाला लेमिनकैनेन याला आमंत्रण नसल्यानें त्याला फार राग येतो. त्यामुळें तो त्या ठिकाणीं रागानें येतो, लौहीच्या नवऱ्याला ठार करतो व पुन्हां आपल्या देशाला पळून जातो. कांहीं काळानंतर तीरा नांवाच्या आपल्या मित्राच्या सहाय्यानें पुन्हां तो पोहोजलवर स्वारी करण्याकरितां जातो. पण त्यांत त्याचा पराभव होतो. कुल्लेर्वो नांवाचा एक गुलाम इल्मरिनेनजवळ असतो. इल्मरिनेनची बायको म्हणजे लौहीची मुलगी ही त्याला फार वाईट तऱ्हेनें वागविते व त्यामुळें तो तिला वाघ, लांडगे इत्यादिकांच्या भक्ष्यस्थानीं टाकून देतो व आपण जंगलांतून मार्ग काढीत आपल्या पूर्वीच्या घराकडे येतो. पुढें त्याच्या आईच्या उपदेशावरुन तो त्याचा बाप उंटामो याच्याकडे जाऊन त्याला व त्याच्या लोकांनां ठार मारतो व पुन्हां आपल्या गांवाकडे येतो. पण एवढ्या अवधींत त्याच्या गांवचे सर्व लोक मेलेले असतात. त्यामुळें तो वैतागून रानावनांत भटकतो व आपल्याच तरवारीला बळी पडतो. पुढें इल्मरिनेन हा लौहीच्या दुसऱ्या मुलीशीं लग्न करतो पण तिचें व त्याचें पटत नाहीं. शेवटीं व्हाइनामोइनेन, इल्मरिनेन व लेमिनकैनेन हे तिघे संगनमत करून पोहजोलवर स्वारी करण्यासाठीं—सँपो हस्तगत करण्यासाठीं—निघतात. पण लौही ही त्यांचा पाठलाग करीत असतां सँपो तिच्या हांतून पाण्यांत पडते. व्हाइनामोइनेनला ती सांपडते व तिच्या योगानें तो कलेवल देश समृद्ध व संपन्न बनवितो. लौही ही त्या देशावर अनेक आपत्ती आणते पण व्हाइनामोइनेनच्यापुढें तिचें कांहीं एक चालत नाहीं. पुढें मर्जेट्टा हिला मुलगा होऊन तो करेलियाचा राजा होतो. हें व्हाइनामोइनेनला न खपून तो कलेवल देश सोडून निघून जातो. पण भावी प्रजेसाठीं तो आपली वीणा व गाणीं शिल्लक ठेवतो.

गु ण दो ष वि वे च नः—या कथानकांतील मुख्य दोष म्हणजे त्यांत असावी तितकी सूत्रबद्धता नाहीं; पण त्यांत लक्रोंटकडे कांहींच दोष येत नाहीं. या कथानकांत अवांतर अशा इतर पुष्कळ गोष्टी आल्या आहेत व त्यांमध्यें फिनिश लोकांतील तत्कालीन चालीरीतींचें प्रतिबिम्ब पडलेलें दिसतें. या सर्व कथानकाच्या मुळाशीं 'चांगलें विरुद्ध वाईट' यांचा झगडा दिसून येत असून त्यांत शेवटीं सत्याचा अगर चांगल्याचा जय होतो असें दाखविलें आहे. मर्जेट्टासंबंधींचा मजकूर हा या कथानकाशीं असंबद्ध असा आहे व तो वगळला असतां काव्याची कोणत्याहि प्रकारें हानी होत नाहीं. हें कथानक रंगवितांना जे कांहीं प्रसंग निर्माण करण्यांत आले आहेत त्यांपैकीं कांहीं सुंदर व सहजमनोहर आहेत. उदाहरणार्थ, व्हाइनामोइनेनसारख्या वृद्धाशीं लग्न लावण्याचा तिच्या आईचा आग्रह असतां ऐनूच्या मनाची काय स्थिति झाली याचें वर्णन मनाला चटका लावतें. लौहीच्या मुलीचा इल्मरिनेनशीं विवाह झाल्यानंतर ती जेव्हां सासरीं जावयास निघते तेव्हां तिला सासरीं कसें वागावें यासंबंधीं करण्यांत आलेला उपदेश शाकुंतल नाटकांतील कण्वानें शकुंतलेला केलेल्या उपदेशाइतका उदात्त नसला तरी वाचनीय आहे यांत शंका नाहीं. याशिवाय आणखीहि कित्येक मनोहर प्रसंग या काव्यांत आढळतात. या काव्यांत तींच तींच वाक्यें पुन्हां पुन्हां पुष्कळ वेळां आलीं आहेत. इतर प्राचीन महाकाव्यांतहि अशाच प्रकारचे पुनरुक्तीचे दोष आढळून येतात. कांहीं ठिकाणीं ही पुनरुक्ति योग्य असते पण पुष्कळ ठिकाणीं ती कंटाळवाणीच होते असें

म्हणावयास हरकत नाहीं. [ डल्ब्यु एफ् कर्वी–कलेवल ( एव्हरी मॅन्स लायब्ररी ) ]

**कलेवा टाउनशिप.**—अपर बर्मा. अपर चिंदविन जिल्ह्याची दक्षिणेकडील टाउनशिप. उत्तर अक्षांश २३° १' ते २३° १७' व पूर्व रेखांश ९४° १४' ते ९४° ३०'. क्षेत्रफळ १७६ चौरस मैल. खेडीं ८. लोकसंख्या ( इ. स. १९११ ) ४०१३. एकंदर उत्पन्न ( इ. स. १९०३–४ ) १०००० रुपये.

**कल्प.**—एक कालमान व ब्रह्मदेवाच्या दिवसाचें साधारण नांव. मनुष्यांच्या एका महिन्यांत जसे साधारणतः तीस दिवस असतात, तसेच ब्रह्मदेवाच्या महिन्यांतहि तीस कल्प असतात. कल्पाचें मान केवढें असतें तें पुढें दिलें आहेः—कृत, त्रेता, द्वापार आणि कलि या चार युगांचा एक पर्याय ( चौकडी ). असे सहस्र पर्याय झाले म्हणजे ब्रह्मदेवाचा प्रातःकाळापासून सायंकाळपर्यंतचा केवळ दिवस होतो; व इतकीच पुढें रात्र; याप्रमाणें जें एक अहोरात्र त्यास कल्प असें नांव आहे. ब्रह्मदेवाच्या दिवसांत स्वर्गांत चौदा इंद्र आणि पृथ्वीवर चौदा मनू होतात. या मनूचा मनुष्यमानाचे एकाहत्तर पर्याय व वरती कांहीं अधिक इतका काळ मन्वंतर चालतो. ( भाग. स्कं. ३ अ. ११ ).

ब्रह्मदेवाचें वर लिहिलेल्या मानानें शतसंवत्सरपरिमित आयुष्य गणलेलें असून त्यांत पन्नास वर्षांचें प्रथम परार्ध गत झालें आहे; यांत कितीं वर्षें झालीं असून कोणत्या वर्षाचा कितवा मास चालला आहे तें कांहीं समजत नाहीं. परंतु जो मास चालू आहे त्यांत पंचवीस कल्प ( ब्राह्म दिवस ) होऊन गेले असून सांप्रत सव्विसावा कल्प चालला आहे व चार पुढें होणार आहेत. हें कालमान वेदांत नाहीं तसेंच ही कल्पव्यवस्था भारतादि ग्रंथांतहि नाहीं, पण मत्स्यपुराणांत मात्र आढळते ( अ. २९० ). त्यांतील कल्पांचीं नांवें येणेंप्रमाणेंः—श्वेत, नीललोहित, वामदेव, रथंतर, रौरव, देव, बृहत्, कंदर्प, सद्य, ईशान, तम, सारस्वत, उदान, गारुड, कौर्म, नारसिंह, समान, आग्नेय, सोम, मानव, तत्पुमान, वैकुंठ, लक्ष्मी, सावित्री, घोर, वाराह ( हें प्रस्तुत चालू आहे ), वैराज, गौरी, माहेश्वर आणि पितृकल्प. यांत कौर्मकल्प ही ब्रह्मदेवाची पौर्णिमा व पितृकल्प ही अमावास्या समजतात. कल्पारंभीं जो अवतार होतो तेंच नांव त्या कल्पास पडतें. जसें हल्लींच्या कल्पारंभीं वराहावतार झाला होता म्हणून यास वाराहकल्प असें नांव चालत आहे.

बौद्धांत सुद्धां कल्पांची कल्पना आहेच. जसेः–अंतरकल्प, असंख्येयकल्प, महाकल्प इ. ( 'युगें' पहा ).

**कल्पना.**—हा शब्द सामान्य व्यवहारांत व तत्वज्ञानांत उपयोगांत आणितात. याचा इंग्रजी प्रतिशब्द 'आयडिया' हा होय. आपणाला एखाद्या गोष्टीची कल्पना नसणें म्हणजे तत्संबंधीं आपल्या मनःपटलावर कोणत्याहि प्रकारचें चित्र नसणें होय. हें चित्र अस्पष्ट असल्यास आपण विशिष्ट गोष्टीची अन्धुक कल्पना आहे असें म्हणतों. 'आयडिया' हा शब्द सर्व यूरोपीय भाषांत व सर्वकालीं रूढ आहे व तो अनेक भिन्न अर्थी निरनिराळ्या वेळीं उपयोजिलेला आहे. प्लेटो या शब्दानें अविनाशी सत्य दर्शवीत असे व हें सर्व दृश्य पदार्थ या सत्याच्याच विकृती किंवा अपूर्ण प्रतिकृती आहेत असें प्रतिपादी. याच्या उलट इतर तत्ववेत्ते दृश्य वस्तू याच सत्य होत असें प्रतिपादांत. लॉक म्हणतो कीं, जेव्हां मनुष्य विचार करूं लागतो तेव्हां त्या विचाराचा जो विषय असेल ती कल्पना होय. ह्यूमनें कल्पना हा शब्द आपणास ज्या गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान अगर संवेदना होतें त्या गोष्टींचें आपण जें पुन्हां मानसिक क्रियेनें चित्र आपल्यापुढें उभें करतों त्यास लावला आहे. वुंट यानें हा शब्द थोड्या विस्तृत अर्थानें वापरला असून आपण एखाद्या भौतिक वस्तूचें किंवा क्रियेचें मुद्दाम मनश्चित्र आपल्यापुढें उभें करतों त्यास हा शब्द लावला आहे. याप्रमाणें निरनिराळ्या तत्ववेत्त्यांनीं हा शब्द निरनिराळ्या अर्थी योजिला आहे. कल्पना या शब्दानें आपणाला जो अर्थ ध्वनित होतो तो एका विशिष्ट गोष्टीसंबंधीं नसून बहुधा संमिश्र असतो. उदाहरणार्थ आपण खुर्चीची कल्पना केली असतां आपल्या मनश्चक्षूंपुढें अनेक प्रकारच्या निरनिराळ्या आकारांच्या व रंगांच्या खुर्च्या उभ्या राहतात. केव्हां केव्हां आपण ज्या गोष्टीची कल्पना करतो ती गोष्ट प्रत्यक्ष दाखवितां येण्यासारखीहि नसते. उदाहरणार्थ किन्नर किंवा नागकन्या यांची कल्पना केली असतां अश्व व मनुष्य व सर्प व स्त्री यांच्या संमिश्र कल्पना आपल्या मनश्चक्षूंपुढें येतात. [ हॅमिल्टन–डिक्सशन्स. लॉक—एसे ऑन दि ह्यूमन अंडरस्टँडिंग. बाल्ड्विन–डिक्शनरी ऑफ फिलॉसॉफी अँड सायकॉलॉजी. ]

**कल्पनासाहचर्य**—कल्पनासाहचर्य हें तत्व, तत्वज्ञान व मानसशास्त्र या दोहोंतहि आढळतें. तत्वज्ञानामध्यें इंद्रियांस ज्या निरनिराळ्या संवेदना होतात त्यांपासूनच सर्व ज्ञान प्राप्त होतें अशी जी एक उपपत्ति आहे तीमध्यें या तत्वाचा उपयोग केलेला आढळतो. मानसशास्त्रामध्यें एखाद्या वस्तूचें प्रत्यक्ष ज्ञान झालें असतां त्यामुळें जें मागील अनुभवाचें स्मरण होतें त्या क्रियेस हा शब्द लावतात. अशा तऱ्हेचे तीन साहचर्य नियम दिलेले आढळतात, ( १ ) सान्निध्य; प्रत्यक्ष पाहिलेली वस्तु ज्या वस्तूच्या सन्निध पूर्वी पाहिलेली असेल त्या वस्तूची आठवण करून देते. उदा० एखादा आपल्या गांवाकडील मनुष्य आला म्हणजे आपणांस आपल्या गांवाकडचें स्मरण होतें. (२) साम्य; प्रत्यक्ष दिसत असलेली वस्तु तिच्यासारख्याच दुसऱ्या वस्तूचें स्मरण करून देते. उदा० आपण एखाद्या मनुष्यास पाहिलें असतां त्याच्या सारख्याच चेहऱ्याच्या एखाद्या आपल्या ओळखीच्या माणसाची आठवण होते. ( ३ ) विरोध; प्रत्यक्ष दिसत असलेली वस्तु तिच्याविरुद्ध असलेल्या दुसऱ्या वस्तूचें स्मरण करून देते. उदा०

एखाद्या मुलींच मूल नसलेल्या घरांत आपण गेल्यास मुलांनीं गजबजलेल्या अशा एखाद्या घराची आठवण होते.

हे साहचर्याचे नियम सर. डब्ल्यू. हॅमिल्टन याच्या मतें ॲरिस्टॉटलमध्यें दिसून येतात. ॲरिस्टॉटलनें स्मरणशक्तीचें विवेचन करतांना आपणास विस्मृत गोष्टीची पुन्हां आठवण कशी होते यासंबधीं चर्चा केली आहे व तेथें या साहचर्याच्या नियमांचें मूळ सांपडतें असें हॅमिल्टनचें म्हणणें आहे. प्लेटोनेंहि एखादी वस्तु पाहिल्याबरोबर आपणांस तेथें नसलेल्या दुसऱ्या वस्तूची आठवण होते इत्यादि गोष्टींचें विवेचन केलें आहे. उदा. सतार पाहिल्यावरोवर ती वाजविणाऱ्या प्रियतमेची तिच्या प्रियकरास आठवण होते. यावरून त्यानें सदृश अथवा विसदृश गोष्टींवरून विशिष्ट गोष्टींचें स्मरण होतें असें विधान केलें आहे. परंतु यासंबंधीं नियम त्यानें सांगितले नाहींत. स्टोईक, एपिक्यूरियन व स्कूलमेन या तत्वज्ञानांतील संप्रदायांनीं कल्पनासाहचर्याचें तत्व मान्य केलें होतें पण त्यांनीं याविषयींच्या ज्ञानांत फारशी भर घातली नाहीं.

या तत्वासंबंधीं उपपत्ति लावण्याचा पहिला प्रयत्न थॉमस हॉब्ज यानें आपल्या मानवस्विभाव ( ह्यूमन नेचर ) या पुस्तकांत केला आहे. त्यानें एका कल्पनेवरून आपणांस दुसऱ्या कल्पना एकामागोमाग कशा सुचत जातात हें दाखविलें आहे. उदा. एखाद्या पांढऱ्या दगडापासून संगमरवरी दगडाची, त्यापासून ताजमहालाची, त्यापासून शहाजहानची इत्यादि कल्पना आपणांस सुचत जातात. हॉब्जनें मानसशास्त्रांतील जो कल्पनासाहचर्याचा सिद्धांत तोच तत्वज्ञानांतीलहि सिद्धांत होय असें म्हणून या दोहोंची सांगड घालून दिली आहे. तो म्हणतो अनुभव म्हणजे निरनिराळ्या गोष्टींचें स्मरण होय. अर्थात सर्व ज्ञान हें स्मरणात्मकच आहे. कारण तें प्रत्यक्ष इंद्रियांपासून मिळालेलें किंवा तेंच स्मरणांत राहिलेलें अशा स्वरूपाचें व अनुभवजन्य आहे. त्याप्रमाणेंच मनुष्य आणि पशु यांत अंतर हेंच कीं मनुष्य आपल्या कल्पनांना कांहीं तरी खुणा करून त्या निश्चित करतो व अशा अनेक कल्पनांचें साहचर्य वाढवितो. अशा तऱ्हेच्या निश्चित खुणा नसतील तर कल्पनेचा प्रवाह अखंड चालू रहाणार नाहीं असेंहि तो प्रतिपादितो.

कल्पनासाहचर्य यास अन्वर्थक शब्दयोजना 'असोसिएशन्स् ऑफ आयडियाज' ही होय. ही प्रथम जॉन लॉकयानें उपयोगांत आणिली. परंतु या शब्दांनीं तो फक्त 'ज्या कल्पना स्वतः एकमेकांशीं सारख्या नाहींत त्यांचा संबंध' येवढीच गोष्ट दर्शवितो. त्यानें याचा तात्विक किंवा मानसशास्त्रीय चर्चेत फारसा उपयोग केला नाहीं.

ह्यूमनें मात्र कल्पनासाहचर्याला तत्वज्ञानामध्यें वरेंच महत्व दिलें. त्यानें केवळ स्मरणांतील गोष्टींचाच संबंध कल्पनासाहचर्यानें दाखविला जातो असें नव्हे तर कल्पनेंतील गोष्टींचाहि संबंध या तत्वानें दाखविला जातो असें प्रतिपादन केलें, व याचीं कारणें कल्पनांतील साम्य, सान्निध्य व कार्यकारणभाव हीं दिलीं ( ट्रिटाइज ऑन ह्यूमन नेचर ).

ह्यूमनें लॉकप्रमाणेंच ज्ञानाचें शुद्ध व मिश्र असें पृथक्करण केलें; परंतु त्यानें साहचर्याला वरेंच महत्व दिलें व या कल्पनासाहचर्यामुळेंच शुद्ध कल्पनांचें मिश्र कल्पनांत रूपांतर होतें असें दाखविलें आहे. कार्यकारणभाव हाहि एक कल्पना साहचर्याचाच प्रकार आहे असें त्यानें प्रतिपादिलें. तथापि त्यानें कल्पनासाहचर्याची तात्विक उपपत्ति लावण्याचा प्रयत्न केला नाहीं. तो म्हणतो कीं " या कल्पनासाहचर्याचे परिणाम सर्वत्र दिसून येतात; परंतु त्याचीं कारणें अज्ञात असून तो एक मनुष्यास्वभावाचाच प्रकार असावा यापलीकडे मला त्याचें स्पष्टीकरण देतां येत नाहीं. "

कल्पनासाहचर्याची उपपत्ति आपणांस प्रथम हार्टलेच्या ग्रंथांत ( ऑब्झरव्हेशन्स् ऑन मॅन ) पहावयास सांपडते. यानें मानसिक क्रियांचें विवेचन करून साहचर्याच्यामुळें शुद्ध मानसिक क्रियांचें मिश्र क्रियांत कसें रूपांतर होतें व स्मरणशक्ति हा त्यांतीलच एक विशिष्ट प्रकार कसा आहे हें विशद करून दाखविलें आहे. यानें आपल्या मानसशास्त्रीय उपपत्तीचा इंद्रियविज्ञानशास्त्राशीं संबंध जोडिला आहे. परंतु त्यामुळें त्याच्या मानसशास्त्रीय उपपत्तीकडे बऱ्याच तत्ववेत्यांनीं दुर्लक्ष्य केलें. तथापि फ्रान्समध्यें कॉन्डिलॅक, स्कॉटलंड मध्यें थॉमस ब्राऊन, इंग्लंडमध्यें जे. एस्. मिल यांनीं या उपपत्तीचा पुरस्कार केला. मिल आपल्या ज्ञानाच्या उपपत्तीमध्यें असें म्हणतो कीं इंद्रियापासून प्रत्यक्ष प्राप्त होणाऱ्या ज्ञानाखेरीज इतर सर्व ज्ञान निगमनात्मक आहे. म्हणजे विशिष्ट उदाहरणांपासून सामान्य नियम काढण्याच्या स्वरूपाचें आहे. स्वतःसिद्ध असें सत्य कांहींच नाहीं. ज्याला आपण सत्य म्हणतों ते आपले विशिष्टापासून काढिलेले सामान्य सिद्धान्त असतात. गणितांतील स्वयंसिद्ध गोष्टींना जें आपण विशेष महत्व देतों त्याचें कारण त्या आपल्याला अतिशय परिचित अशा असतात हेंच होय. एखाद्या गोष्टीच्या विरुद्ध गोष्ट असण्याच्या कल्पनेची अशक्यता हें जें त्या गोष्टीच्या सत्यतेबद्दल गमक म्हणून नेहमीं समजलें जातें तेंच मुळीं त्या दोन कल्पनांतील 'निरंतर साहचर्य' अथवा समवायसंबंध दाखवितें. " त्यापैकीं एकाचें अस्तित्व असल्यास दुसरें त्यापासून विभक्त करण्याचा आपण कितीहि प्रयत्न केला तरी तें असणारच. " ( ॲनलिसिस् ऑफ ह्यूमन माइन्ड. )

अलेक्झांडर वेन यानें तर " बुद्धीचें विवेचन करतांना तिचे निरनिराळ्या क्रियांत किंवा शक्तींत विभाग करण्याची पद्धत टाकून देऊन तिचें कार्य साहचर्याच्या नियमानेंच विशद करून दाखविलें आहे. व त्याचीं निरनिराळीं उदाहरणें देऊन तें सुगम केलें आहे " ( सेन्सस् ॲन्ड इंटलेक्ट ). तथापि वेननें जरी साहचर्याची कल्पना घेऊनच मानसिक क्रियांचें विवेचन केलें आहे तरी त्यानें पुढें पुढें मानसशास्त्र हें

पदार्थविज्ञानशास्त्राप्रमाणें जडवस्तूंचें शास्त्र न समजतां त्याला जीवितशास्त्राचा एक भाग-मानसजीविताचें शास्त्र-म्हणून कल्पिलें आहे व विकासवादास अनुसरून त्याचें विवरण केलें आहे. अर्थात यावेळीं मानसशास्त्रास निराळीच दिशा मिळाली होती.

स्पेन्सर यानें आपल्या मानसशास्त्राचीं तत्वें ( प्रिन्सिपल्स ऑफ सायकॉलाजी ) या ग्रंथांत या सर्वांच्या मुळाशीं जीवितशास्त्राचींच तत्वें असून शरीर व मन यांच्या क्रिया हीं जीवनकार्यांचींच विशिष्ट रूपें असून एकंदर जीवनकार्यांची कल्पना आली म्हणजे मानसिक जीवन अथवा बुद्धि या विशिष्ट शक्तीच्या कार्यांचा उलगडा होईल. असें म्हटलें आहे. जीवित म्हणजे बाह्यपरिस्थितीशीं अंतःपरिस्थितीचें सारूप्य करून घेणें हेंच होय अशी स्पेन्सरनें जीविताची केली व्याख्या आहे. यांत सारूप्य हें मुख्य तत्व आहे. अर्थात पूर्ण ज्ञान म्हणजे विषय व विषयी यांचें सारूप्य होय. संवेदनांचें साहचर्य त्यांतील साम्यावर अवलंबून असतें. याप्रमाणें साहचर्यानें नवीन मिळालेलें ज्ञान त्यासारख्याच पूर्वीच्या ज्ञानाच्या अनुभवांत सामील होतें व जुन्या सर्व ज्ञानाचा संग्रह होऊन नवीन गोष्टींत साधर्म्य व वैधर्म्य शोधून काढण्यास साधन होतें.

जर्मन तत्ववेत्यांपैकीं हर्बर्ट, वुंट आणि कुल्प यांचीं मतें हार्टले व मिल यांच्या मतांशीं बरींच जुळतात.

सध्याच्या मानसशास्त्रीय उपपत्तींमध्यें कल्पनासाहचर्य हें तत्व सर्व गोष्टींचा उलगडा करण्यास पुरेसें मानीत नाहींत. तथापि प्रो. सली यांच्या ग्रंथांत जरी अर्वाचीन पद्धत व शोध यांचा स्वीकार केलेला दिसतो तरी मानसिक क्रियांमध्यें साधर्म्य-वैधर्म्य-निरीक्षण व सात्मीकरण यांच्याबरोबरच कल्पनासाहचर्याला स्थान दिलेलें आढळतें व या शेवटच्या क्रियेनें स्मरणांत राहण्याची व पुनर्दर्शनाची क्रिया होते, व त्यामुळें निरनिराळ्या वेळीं होणाऱ्या क्रिया एकत्र बद्ध केलेल्या आढळतात असें त्यानें प्रतिपादन केलें आहे.

वॉर्ड आणि स्टाउट यांनीं ही जुनी पद्धत अजीबात सोडून दिली आहे. वॉर्डच्या मतें आपणांस ज्या संवेदना होतात व आपण ज्या क्रियांचा अवलंब करतो त्यांमुळेंच निरनिराळ्या संवेदनांचें एकीकरण होतें. ज्या संवेदनापासून आपणाला सुख होतें त्याजकडे आपण जास्त लक्ष पुरवितों व दुःख होतें त्याजकडे कमी लक्ष पुरवितो व तदनुरूप आपण क्रिया करतों, व एकीचें ग्रहण करतो व दुसरी टाकून देण्याचा प्रयत्न करतो. याप्रमाणें आपण निवड करण्याची क्रिया प्रथम स्वाभाविकपणें करतों व पुढें त्या त्या विषयानुरूप करतों. याप्रमाणें ज्ञानसंचय होतो व कल्पनासाहचर्य हें फक्त या क्रियेचें एक उदाहरण आहे. सान्निध्यमूलक साहचर्याचें स्वतंत्रतेनें स्पष्टीकरण करणें अशक्य आहे. याप्रमाणें विशिष्ट संवेदनेकडे कमीजास्त लक्ष देणें हीच जाणीव होय व यामुळेंच कर्ता कोणतीहि क्रिया करतो.

स्टाउटच्या मानसशास्त्रांतहि आपणांस जाणीव, साधर्म्य-वैधर्म्य-निरीक्षण, व सात्मीकरण यांचें ऐक्य कल्पिलेलें दिसतें. याप्रमाणें वॉर्ड आणि स्टाउट या दोघांच्याहि ग्रंथांत कल्पनासाहचर्य ही एक मानसिक प्रगतीच्या नियमांस अनुसरून, असलेली विशिष्ट क्रिया असून, तिच्यामुळें सर्व ज्ञानाचें स्पष्टीकरण होण्याऐवजीं तिचेंच स्पष्टीकरण मानसशास्त्रीय नियमांनीं करितां येतें. असें प्रतिपादिलें आहे.

[ संदर्भग्रंथः—हॅमिल्टन-वर्क्स ऑफ रीड; हॉब्ज-ह्यूमन नेचर; लॉक-एसे कन्सर्निंग ह्यूमन अंडरस्टँडिंग; ह्यूम-ट्रिटाईज ऑन् ह्यूमन नेचर; हार्टले-आब्झर्व्हेशन्स ऑन् मॅन; ब्राऊन-लेक्चर्स ऑन् फिलासॉफी ऑफ ह्यूमन माईंड; मिल-ॲनॅलिसीस ऑफ दि ह्यूमन माइंड; वेन-सेन्सेस अँड इंटलेक्टः इमोशन्स अँड विल्; स्पेन्सर-प्रिन्सिपल्स ऑफ सायकॉलॉजी; वुंड, कुल्प व प्रो. सली यांचे ' आउटलाईन्स ऑफ सायकॉलॉजी ' या नांवाचे ग्रंथ. वॉर्ड-सायकॉलॉजी ( ए. ब्रि. ); स्टाउट-ए मॅन्युएल ऑफ सायकॉलॉजी ]

**कल्पसूत्रें, वै दि क**—वेदग्रंथांच्या षडंगांपैकीं एक अंग. यांचा तैत्तिरीय आरण्यकांत उल्लेख आढळतो.(१. ३१:२ १०) कल्पसूत्रें म्हणजे श्रौत व स्मार्त कर्मांचे प्रयोगग्रंथ होत. कल्प या शब्दावरून पूर्वी ब्राह्मण अथवा आरण्यक ग्रंथांचाच बोध होत असावा असें दिसतें. कारण तै. आरण्यकांत ( १.३१ ) पूर्वी कांहीं मंत्र असून त्यापुढें ' अतऊर्ध्वं कल्पः ' असा उल्लेख आहे. यावरून त्याकालीं कल्प व ब्राह्मणें हीं एकत्रच असून मंत्राशिवाय कल्परूपानें प्रयोगग्रंथ स्वतंत्र तयार होणें ही पुढील पायरी दिसते. तै. आरण्यकांत ब्रह्मयज्ञ प्रकरणांत कल्पाचा उल्लेख आहे. (२.१०) परंतु तेथें नुसता कल्प असाच शब्द आहे. यांनां कल्पसूत्रें हें नांव हे ग्रंथ प्रयोगरूप झाल्यानंतर मिळालें असावें. पाणिनीच्या शिक्षेंत ( ८, ४ ), कल्प हे वेदपुरुषाचे हात होत असें म्हटलें आहे. कल्पसूत्रें हीं वेदग्रंथांच्या प्रत्येक शाखेचीं श्रौत व स्मार्त अशीं वेगवेगळीं आहेत. त्यासंबंधीं माहिती त्या त्या सूत्रनामाखालीं सांपडेल.

**जै न क ल्प सू त्र.**— ज्याला सामान्यतः जैनांमध्यें कल्पसूत्र म्हणून समजतात तें स्थविरावली, जिनचरित व पज्जोसवणाकप्प असे तीन भाग मिळून झालेलें आहे. परंतु या तीन भागांनां मिळून कल्पसूत्र हें नांव देणें युक्त नव्हे. कारण यांपैकीं तिसऱ्यांतच फक्त संन्यासासंबंधीं वर्णन आलेलें आहे. कल्प म्हणजे आचरण असा अर्थ असल्यामुळें ज्यांत संन्याशांच्या आचरणाविषयीं नियम दिले आहेत त्यासच कल्पसूत्र म्हटलें पाहिजे. म्हणून पज्जोसवणाकप्प हेंच खरें कल्पसूत्र होय असें एक मत आहे. यांत जैन यती व जोगिनी यांनीं कोणत्या गोष्टी कराव्या व कोणत्या करूं नयेत याविषयीं नियम दिले आहेत. ज्याला कल्पसूत्र म्हणून म्हणतात तें भद्रबाहूनें केलें आहे अशी साधारणतः समजूत आहे.

पण हा समज चुकीचा आहे. भद्रबाहु फार झालें तर पज्जोसवणाकप्पाचा कर्ता, किंवा फार तर संपादक असूं शकेल. भद्रबाहूनेंच कल्पसूत्रावर नियुक्ति लिहिली. ख्रिस्ती शकाच्या सहाव्या शतकांत संघदासानें त्यावर भाष्य लिहिलें व त्यानंतरहि त्याच्यावर कित्येक टीका लिहिल्या गेल्या. कल्पसूत्राचा सारांश पुढें दिला आहे.

प्रथम परिच्छेदः—जोग्यांनीं किंवा जोगिणींनीं विन फोडलेल्या अपक्व ताडफळांची भिक्षा ग्रहण करूं नये. जोगिणींनीं न फोडलेल्या पक्व ताडफळांचीहि भिक्षा वर्ज्य करावी; फोडलेलीं पक्व फळें मात्र शास्त्राज्ञेप्रमाणें त्यांनां घेतां येतात. गांवाबाहेर वस्ती नसल्यास जोग्यांनीं त्या गांवांत एक महिना रहावें, पण वस्ती असल्यास एक महिना गांवांत व एक बाहेर असे दोन महिने तेथें रहावें. गांवांत असतांना गांवांत, व बाहेर असतांना बाहेर भिक्षा मागावी. जोगिणींकरितां मात्र या मुदती अनुक्रमें दोन व चार महिने अशा आहेत. हा नियम उन्हाळा व हिंवाळा या दोन ऋतूंकरितांच आहे. जाण्यायेण्यास एकच मार्ग असल्यास जोगी व जोगिणी यांनीं एकाच घरांत राहूं नये. जोगिणींनीं भररस्त्यावर किंवा दुकानासारख्या सार्वजनिक ठिकाणीं राहूं नये. जोग्यांनीं किंवा जोगिणींनीं जलाशयाच्या कांठीं उभें राहूं नये, बसूं नये, किंवा दुसरे कोणतेहि व्यवहार करूं नयेत. त्यांनीं कुटुंबवत्सल माणसाच्या घरांत राहूं नये. ज्या घरांत बायका नसतील त्या घरांत जोग्यांनीं रहावें व ज्या घरीं पुरुष नसतील त्या घरीं जोगिणींनीं रहावें. घरवाल्यांची संमति घेतल्याशिवाय देखील जोग्यांस एखाद्या घरीं राहतां येतें. एखाद्या जोग्याच्या हांतून एखादी चूक झाली असली तरी दुसऱ्या जोग्यानें शक्यतोंपावेतों त्याच्याशीं सामोपचारानेंच वागावें; आपल्या मनाची शांति ढळूं देऊं नये. जोग्यांनीं पावसाळ्यांत पर्यटण करूं नये.त्यांच्या पर्यटणाची मर्यादा पूर्वेस अंगमगध, दक्षिणेस कौशांबी, पश्चिमेस स्थूणा व उत्तरेस कुणाल ही आहे. या मर्यादेबाहेरहि जेथें जैनधर्माचा प्रचार असेल तेथें त्यांनीं जावें. त्यांनीं रात्रीच्या किंवा संध्याकाळच्या वेळीं भिक्षा ग्रहण करूं नये किंवा रस्त्यात भटकूं नये.

द्वितीय परिच्छेदः—ज्या घरांत धान्यादि वस्तू इकडे तिकडे पसरलेल्या असतील तेथें जोग्यांनीं किंवा जोगिणींनीं क्षणभरहि राहूं नये. धान्य चांगल्या रीतीनें सांठवून ठेवलें असल्यास मात्र रहावयास हरकत नाहीं. आपण ज्याच्या घरीं राहतों त्याच्या येथील भिक्षा त्यांनीं ग्रहण करूं नये. त्यांनीं कपडे वापरावयाचे ते उंटाचे केस, ताग, सण, लोंकर किंवा तिरीट यांचे केलेले असावेत.

तृतीय परिच्छेदः—जोग्यांनीं जोगिणींच्या किंवा जोगिणींनीं जोग्यांच्या घरांत पाऊल देखील ठेऊं नये.जोगी किंवा जोगिणी यांनीं उंची व भडकी अशीं वस्त्रें वापरूं नयेत. भिक्षा मागावयाच्या वेळीं कोणाच्या घरांत शिरूं नये; बाहेर उभें राहूनच भिक्षा मागावी. एखादा म्हातारा व अशक्त जोगी असला व तो मूर्च्छा येऊन पडण्याच्याच बेतांत असला तर त्यानें मात्र घरांत शिरावें. एका ठिकाणाहून भिक्षा घेऊन कांहीं जोगी निघाले व त्याच दिवशीं जर तेथें दुसरे जोगी आले, तर पहिल्या ठिकाणीं त्यांनां पुन्हा भिक्षा मागतां येत नाहीं. भिक्षा मागावयास निघाले असतां जर जोग्यांस सैन्याची छावणी लागली तर त्यांनीं रात्र पडण्यापूर्वीं तेथून निघालें पाहिजे.

चतुर्थ परिच्छेदः—जोग्यांनीं किंवा जोगिणींनीं पहिल्या प्रहरांत भिक्षा मागून आणलेलें अन्न चवथ्या प्रहरापर्यंत ठेऊं नये किंवा अर्ध्या योजनापेक्षां अधिक अंतरावर त्यांनीं आपल्याबरोबर अन्न नेऊं नये. वर सांगितलेल्या कारणांमुळें जर एखाद्या वेळीं अन्न निरुपयोगी झालें किंवा भिक्षा मागत असतांनाच जर अपवित्र अन्न मिळालें, तर तें स्वच्छ करून एका बाजूला चांगल्या जागीं ठेऊन द्यावें. जर एखाद्या जोग्याच्या हातून कांहीं चूक झाली तर त्यानें गुरुपाशीं जाऊन आपला आपराध कबूल करावा. प्रायश्चित्त घेणाऱ्या जोग्यानें स्वतः भिक्षा मागतां कामा नये. त्याच्या गुरूनें त्याला रोज एकाच घरची भिक्षा आणून द्यावी. जो प्रायश्चित्त घेणार नाहीं त्याला वाळींत टाकावें. कोणाहि जोग्यानें किंवा जोगिणीनें गंगा, यमुना, शरयू, कोषिका व माही या पांच नद्या एका महिन्यांत एकापेक्षां अधिक वेळां ओलांडूं नये. परंतु अजिरावती व कुणाला या सारख्या ठिकाणीं जेथें एक पाय पाण्यांत व एक पाय जमीनीवर ठेऊन नदी ओलांडतां येते तेथें मात्र ती अधिक वेळां ओलांडण्यास हरकत नाहीं.

पंचम परिच्छेदः—जर एखाद्या जोग्याच्या किंवा जोगिणीच्या तोंडांत सूर्योदयापूर्वीं किंवा सूर्यास्तानंतर न कळत घांस गेला, किंवा रात्रीच्या वेळीं घशाशीं अन्न आलें तर तें न गिळतां थुंकून तोंड धुवून टाकावें; म्हणजे पाप लागणार नाहीं. भिक्षापात्रांत जर एखादा जिवंत किडा किंवा मातीचा कण पडला व तो जर धुवून टाकतां आला तर तें अन्न जोग्यास किंवा जोगिणीस खाण्यास हरकत नाहीं. जोगिणीनें कधींहि एकटे राहूं नये किंवा कोठें एकटे जाऊं नये. तिनें आपलें अंग उघडें टाकूं नये किंवा कोणतेंहि अमर्याद वर्तन करूं नये. संध्याकाळीं किंवा रात्रीच्या वेळीं जर एखादी जोगीण मलमूत्रोत्सर्गास गेली; व त्या समयीं एखाद्या प्राण्याचा तिनें आपल्या इंद्रियास स्पर्श होऊं दिला, तर तिच्या पावित्र्याचा भंग झाला असें होऊन, तिला प्रायश्चित्त घ्यावें लागेल.

षष्ठ परिच्छेद.—जोग्यांनीं किंवा जोगिणींनीं खोटें बोलूं नये, कोणाला हांसूं नये, कोणाचा आपमान करूं नये, कोणाला कठोर बोलूं नये, किंवा ज्या गोष्टींबद्दल कोणी एकदां प्रायश्चित्त घेतलें असेल तिचा उल्लेख करूं नये. मोठ्या संकटसमयीं जर कोण्या जोग्यानें जोगिणीस आधार दिला तर त्यास पाप लागत नाहीं. जोगी व जोगिणी

यांनीं सद्वर्तनाच्या आड येणाऱ्या लोकांचा संगत टाळावी. [इं. अँ. पु. ३१].

**कल्माषपाद.**—सूर्यवंशी इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुदास राजाचा पुत्र मित्रसह, वीर्यसह किंवा सौदास राजा यासच हें नामांतर होतें. हें नांव यास पडण्याचें कारण निरनिराळ्या पुराणांत निरनिराळें आढळतें. विष्णुपुराणांत पुढील कथा आहे. एकदां हा अरण्यांत मृगयेस गेला असतां त्यानें तेथें दोन राक्षस पाहिले. त्यांतून एकास तर यानें मारिलें, पण दुसरा पळाला. पळालेल्या राक्षसानें राजाचा सूड मनांत धरून एकदां याच्या घरीं यज्ञनिमित्तानें वसिष्ठऋषी बराच कालपर्यंत राहिले असतां एके दिवशीं यानें कपटानें राजाकडून ऋषीस भोजनप्रसंगीं नरमांस वाढविलें. वसिष्ठानें नरमांस पाहून राजास तूं राक्षस होशील असा शाप दिला. राजानेंहि उदक अभिमंत्रित करून उलट वसिष्ठास शाप देण्याची तयारी केली. पण राणी मदयंती हिनें त्याचें मन वळवून गुरूस शाप देण्याचें थांबविलें. तेव्हां मित्रसह राजानें हातांतलें अभिमंत्रित जल खालीं जमिनीवर टाकिलें तर वसुंधरा रुक्ष होऊन जाईल म्हणून आपल्याच पायावर तें टाकिलें. तेव्हां त्याचे पाय जळून निघाले. त्या दिवसापासून त्याला कल्माषपाद असें नांव पडलें. राक्षस होण्याचा जो यास वसिष्ठाचा शाप होता तो द्वादशसंवत्सरांचा असून नंतर यानें पूर्ववत् राजा व्हावें असा होता. याप्रमाणें हा पुढें पूर्ववत् राजा झाला. परंतु राक्षसयोनींत हा असतां याच्या शरीरांत विश्वामित्रानें आणखी किंकर नामक राक्षसाची प्रेरणा करवून वसिष्ठाचे शक्ति आदिकरून शत पुत्र मारविले. तसेंच एक ब्राह्मणदंपत्य अरण्यांत संचार करीत असतां त्यांतील पुरुषासहि यानें भक्षिलें होतें; त्यामुळें त्याच्या स्त्रीनें तूं मदयंतीचा समागम होतांच मरशील असा शाप दिला होता. मदयंतीला वसिष्ठापासून जो पुत्र झाला तोच अश्मक नांवानें प्रसिद्ध होता ( 'अश्मक' पहा. ). [ म. भा. आदिपर्व अ. १२२.१७६.१७८. वा. रा. उत्तर. स. ६५ ]

**कल्याण, तालुका.**—मुंबई. ठाणें जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. उत्तर अक्षांश १९° ४' ते १९° २२' व पूर्वरेखांश ७३° १' ते ७३° २४'. क्षेत्रफळ २७६ चौरस मैल. यांत कल्याण हा गांव व २२३ खेडीं आहेत. या तालुक्याची लोकसंख्या ( १९११ ) ८२५४३. एकंदर उत्पन्न ( इ. स. १९०३–४ ) २.२ लाख रुपये. तालुका त्रिकोणाकृती असून पश्चिमेकडील प्रदेश सुपीक आहे. येथील जमीन काळसर व खडकाळ आहे. बहुतेक प्रदेश सपाटीचा आहे. भात, नागली, वरी, वाल, मूग, हरभरा यांचें पीक बरेंच होतें. हवा साधारण निरोगी आहे. पाऊस सरासरी ९१ इंच पडतो. यांत सुमारें ११० तळीं, १२०० विहिरी, १९० नद्या व ओढे आहेत. उल्हास नदीच्या खाडींतून व जी. आय. पी. रेल्वेवरून येथें बराच व्यापार चालतो. व्यापाराचा बाहेर जाणारा माल म्हणजे भात, तांदूळ, गवत, लांकूड व कोळसा होय.

या प्रांताची सरपाटिलकी ( स्वराज्यांत ) कुलवेकर आंग्र्यांची होती. ( रा. खं. ६-३४६ ). या प्रांतांत शके १५९७ मध्यें चांद्रसेनीय प्रभूंचें ग्रामण्य झालें होतें, त्याचें निवारण रघुनाथपंत अमात्य यांनीं केलें ( कित्ता. ५२३ ). शिवाजीमहाराजांची स. १५७१ च्या सुमारास जीं राज्यांतील अकरा खजिन्याचीं मुख्य ठिकाणें होतीं त्यांपैकीं हें एक होतें ( खं. ८.१७ ). शाहुछत्रपतींच्या वेळीं कल्याण प्रांतांत वीस तर्फा होत्या ( कित्ता. १०६ ). इंग्रज वर घाटीं येत असतां कल्याण ते परशिक या भागांत विसाजीपंत. विनीवाले हे फौजेसह त्यांचे पाठीवर होते ( स. १७७४. ). चासकर जोशांपैकीं रामचंद्र महादेव व कृष्णराव महादेव हे कल्याणचे सुभेदार होते ( रा. खं. ११.१४ ).

**गांव.**—मुंबई इलाखा ठाणें जिल्हा. कल्याण तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १९° १४' व पूर्व रेखांश ७३° १०'. मुंबईच्या ईशान्येस ३३ मैलांवर जी. आय. पी. रेल्वेचें स्टेशन आहे. लोकसंख्या ( १९११ ) १२६०० इ. स. १८५५ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न १९५७९ रुपये होतें. येथें भात भरडण्याचा धंदा बराच आहे. त्याचप्रमाणें इतर व्यापारहि मोठा आहे.

येथें एक जुना दुर्गाडी नांवाचा किल्ला आहे. शेनाळी तलाव इ. स. १५०५ सालीं बांधला असें म्हणतात. शहाजहान बादशहाचा प्रधान मोतबरखान याची मशीद व काळी मशीद प्रेक्षणीय आहे.

**इतिहास.**—पहिल्या, दुसऱ्या, पांचव्या व सहाव्या शतकांतील शिलालेखांत कल्याणचा उल्लेख सांपडतो. पेरीप्लुसच्या म्हणण्याप्रमाणें कल्याण दुसऱ्या शतकाच्या अखेरीस महत्वास चढलें. सहाव्या शतकांत पश्चिम हिंदुस्थानांतील प्रसिद्ध पांच व्यापारी पेठांपैकीं कल्याण एक असून येथें एक बलिष्ठ राजा राज्य करीत होता; व पितळ, शिसवाचें लाकूड व कापड यांचा मोठा व्यापार चालत होता असें कॉस्मस इंडिकोप्लुस्टस् म्हणतो. चवदाव्या शतकांत कल्याण हें एका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. मुसुलमानांच्या ताब्यांत हा गांव आल्यावर त्यांनीं या गांवाचें नांव इस्लामाबाद असें ठेवलें. इ. स. १५३६ सालीं हें गांव पोर्तुगीजांनीं जिंकलें. त्यांनीं येथें लष्कर ठेवलें नाहीं. परंतु इ. स. १५७० सालीं त्यांनीं या गांवावर पुन्हां एकदां स्वारी केली. त्यावेळीं जाळपोळ करून बरीच लूट त्यांनीं या गांवातून नेली. या वेळेपासून हें गांव अहमदनगरच्या पातशाहींत होतें असें दिसतें. इ. स. १६४८ सालीं शिवाजीचा सेनापति आबाजी सोनदेव यानें कल्याणवर आकस्मिक छापा घालून तेथील सुभेदारास कैद केलें. इ. स. १६६० सालीं मुसुलमानांनीं तें जिंकलें.परंतु लवकरच म्हणजे इ. स. १६६२ सालीं त्यांस हा गांव सोडावा

लागला. इ स. १६७४ सालीं इंग्लिशांस येथें फॅक्टरी काढण्याची शिवाजीनें परवानगी दिली.

मुंबई अगर कोंकण यांतून वर घाटीं माल जावयाचा असल्यास जकात (मराठी राज्यांत)द्यावी लागे (खं. १२. १३३). सरकारी निरुपयोगी मालाचें लिलाव करण्याचें हें एक मोठें ठिकाण होतें (कित्ता १३७).सन १७८० च्या इंग्रज मराठ्यांच्या लढाईंत मराठ्यांचे सेनापति बाजीपंत होते. कल्याणच्या बागेंत इंग्रज (गाडरचीं २ पलटणें व मुंबईकरांचीं इतर पलटणें) होता. ता. ८ जून रोजीं रात्रीं जोराची लढाई होऊन मराठ्यांनीं "बेतऱ्हा इंग्रजी लोकांस मार दिला...त्यांचे लोकांनां धीर धरवेना फौजा पाठीमागें गेल्या. कोंकणच्या दोन लढाईंत इंग्रज फारच नसीयत पावले." याच मोहिमेंत मराठ्यांकडील अंताजी नारायण ढवळे हे सरदार पडले, त्यामुळें पेशव्यांनीं त्यांच्या मुलास कल्याण प्रांतांत इनाम दिलें (खं. १०. १००, २१८; खं. १९. ९२). १८८७ त जें एकदा कल्याण इंग्रजांच्या ताब्यांत गेलें तें कायमचेंच [मुं. गॅ. इं. गॅ., राजवाडे खंड].

(२) पंजाब इलाखा. झिंद संस्थानच्या दाद्री तहशिलींतील एक गांव. उ. अ.२८°३३' व पू. रे. ७६°१६'. दाद्री गांवाच्या पूर्वेस पांच मैलांवर दोन तीन हजार लोकवस्तीचा गांव आहे. चल जातीच्या कल्याण नामक राजाची ही राजधानी होती. त्यानें इ. स. १३२५ सालीं घियासुद्दीन तघलखाचा पुत्र अलफखान याच्याविरुद्ध बंड केलें. त्यांत सय्यद हिदायतुल्ला खानानें त्याचा पराभव करून त्यास ठार मारलें; परंतु खानहि त्या लढाईंत मारला गेला. त्याचें थडगें अद्यापि अस्तित्वांत आहे.

**कल्याणगोसावी**—समर्थ रामदास स्वामींचे पट्टशिष्य. गोदावरीच्या तीरीं असणाऱ्या बाभूळगांवचे कुळकर्णी कृष्णाजीपंत म्हणून कौशिक गोत्री, देशस्थ, आश्वलायन शाखी ब्राह्मण होते. त्यांचे कल्याणस्वामी हे वडील पुत्र होत. यांचा जन्म शके १५४० त झाला. यांचें मूळचें नांव अंबाजी होतें. यास एक दत्तात्रय नांवाचा धाकटा भाऊ होता. अंबाजी व दत्तात्रेय हे दोन पुत्र झाल्यावर कृष्णाजीपंत काशीस निघून गेले. नंतर अंबाजी, दत्तात्रेय व त्यांची मातोश्री यांस अंबाजीचे पाराजीपंत नांवाचे मामा यांनीं कोल्हापूर येथें आपल्या घरीं नेलें.

पाराजीपंतांनीं या उभयता भाच्यांस चांगल्या रीतीनें वाढविलें. पुढें कांहीं वर्षांनीं समर्थ फिरत फिरत कोल्हापुरास आले असतां, पाराजीपंतांच्या मनांत त्यांचा अनुग्रह घेण्याचें आलें. म्हणून त्यांनीं समर्थांस विनंति केली कीं, मला अनुग्रह देऊन पावन करावें. समर्थ बरें आहे असें म्हणाल्यावरून सर्व सिद्धता करून त्यांनीं समर्थांनां आपल्या घरीं आणलें व अनुग्रह घेतला.

पुढें भोजनाच्या वेळचा पाट रांगोळ्या वगैरेंचा सारा बेतवात पाहून समर्थांनीं पाराजीपंतास विचारलें कीं,हा सर्व बेत-ठेवणारा तुमच्या घरीं कोण मनुष्य आहे? पाराजीपंतांनीं सांगितलें हा अंबाजी माझा भाचा, यानें ही सर्व व्यवस्था केली. त्यावरून अंबाजीकडे समर्थांनीं पाहिलें, व भोजन झाल्यावर पाराजीपंतास म्हटलें कीं, हा तुमचा भाचा तुम्ही आमच्या सेवेकरितां द्यावा. पाराजीपंत म्हणाले आपल्या सेवेस मी स्वतः हजर आहे. पाहिजेतर मीच समागमें येतों. परंतु या भाच्यावर माझी सत्ता नाहीं; कारण यास आई आहे. समर्थ म्हणाले तिला विचारून द्या. त्यावरून पाराजीपंतानें बहिणीस विचारलें; तिचा रुकार मिळाल्यावर त्यानें तत्काळ अंबाजीस समर्थांच्या स्वाधीन केलें. याचें अक्षर पाहून समर्थांनीं त्याला स्वहस्तें कित्ता घालून दिला. या कित्याप्रमाणें पुढें त्यानें वळण वनविलें. या कित्यास देववाणी म्हणतात, तो अद्यापि कल्याणस्वामींच्या मठांत डोमगांवीं आहे.

एकदा समर्थ अंबाजीस बरोबर घेऊन निघाले ते सातारा जिल्ह्यांतील मसूर गांवीं आले. चैत्र महिना असल्यानें त्यांनीं तेथें रामनवमीच्या उत्सवास आरंभ केला. पालखीच्या वेळीं पिंपळाच्या एका झाडाची फांदी आड आली. त्यावेळीं समर्थांच्या मनांत आलें कीं, छबिन्याच्या वाटेवरील पिंपळाची ही फांदी तोडली असतां पालखीचा प्रतिबंध दूर होईल. म्हणून त्यांनीं ती तोडण्यास अधिकाऱ्याची परवानगी घेतली, आणि अंबाजीस झाडावर चढून ती फांदी तोडण्याची आज्ञा केली. अंबाजी तत्काळ उठला व कुऱ्हाड घेऊन समर्थांच्या आज्ञेप्रमाणें फांदी तोडूं लागला. समर्थांनीं सांगितलें कीं, फांदीच्या उलट बाजूस (झाडाकडील बाजूच्या विरुद्ध शेंड्याकडील) बसून झाड तोड. त्याप्रमाणें अंबाजीनें केलें. अर्थात फांदी तुटून खालीं पडली. तेव्हां तिच्याबरोबर अंबाजीहि खालीं पडला. फांदीच्या खालीं एक मोठी विहिर होती तींत फांदी व अंबाजी दोघेहि पडले. ही गोष्ट झाली त्यावेळेस समर्थ तेथें नव्हते. ते स्नानसंध्येस गेले होते. इतर मंडळी मात्र होती. परंतु विहिरींत उडी टाकून त्यास वर काढण्यास कोणाचेंच धैर्य होईना. शेवटीं ही बातमी समर्थांच्या कानांवर जाऊन स्नानसंध्या आटोपतांच ते विहिरीपाशीं आले; व अंबाजीस "अंबाजी" अशा २।३ हांका मारल्या. तेव्हां त्यानें आंतून ओ दिली. त्यावर समर्थांनीं "कल्याण आहेस कीं" म्हणून वरून पुसलें तेव्हां "समर्थांच्या कृपेनें कल्याण आहे" असें त्यानें आंतून उत्तर दिलें. नंतर त्यांनीं त्यास बाहेर काढविलें. आणि "आजपासून तुझें नांव कल्याण ठेवलें असें म्हणून तेव्हांपासून त्याला कल्याण या नांवानें हांक मारण्याचा पाठ ठेवला.

पुढें समर्थांनीं दासबोधास प्रारंभ केला असतां कल्याणांनीं त्याचें सर्व लेखन केलें. समर्थांनीं ओवी सांगावी व यांनीं लिहावी असा क्रम असे. समर्थांचे बहुतेक ग्रंथ कल्याणांनीं स्वहस्तें लिहिले आहेत. सारांश हे. समर्थांचे लेखक होते.

यांनीं दासबोध ग्रंथावर जी आरती लिहिली आहे तींत या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख केला आहे.

कल्याणस्वामी हे परम गुरुभक्त होते. मोरोपंतांनीं यांचें एका आर्येत हे भरताचे अवतार होत असें वर्णन केलें आहे. समर्थांच्या शिष्यमंडळींत जे पहिले शिष्य उद्धव गोसावी त्यांच्या बरोबरीचे हेच एक होते. यांची कविता व पदें पुष्कळ आहेत. डोमगांव येथें यांनीं मठ स्थापिला होता. तेथें यांच्या हातचा लिहिलेला दासबोध अजून आहे. यांची गुरुसेवा मोठी वर्णनीय होती. हे आजन्म ब्रह्मचारी होते. यांची शक्ति अचाट होती. यांच्या शरीरसंपत्तीचें अनुमान ज्यास करणें असेल त्यानें सज्जनगडावर जे तांब्याचे दोन मोठमोठे गुंडे (पाणी आणावयाचे) आहेत ते प्रत्यक्ष जाऊन पहावे म्हणजे तेव्हांच घ्यानांत येईल. ते दोन गुंडे गडाखालील उरमोडी नदीच्या पाण्यानें भरून एकेका हातीं एक एक घेऊन एका खेपेंतच गड चढून वर नेत असत. समर्थांकरितां पिण्यास हें पाणी लागे. डोमगांव सीना नदीच्या कांठीं आहे. तेथें यांचा मठ आहे. मठांत स्वामींची वनात, समर्थांची चंचीं, पादुका व त्यांनीं स्वामीस दिलेल्या राम, लक्ष्मण, सीता या मूर्ती आहेत. स्वामी डोमगांवापासून पावकोसावर सीना नदीच्या कांठच्या एका कड्यावर रहात. ते चार महिने परंड्यास, चार महिने डोमगांवास चार महिने डोणजे येथें देवीच्या देवळांत रहात. त्यांचें देहावसान परंड्यास झालें (शके १६३६ आषाढशुद्ध १३). तेथून वाजत गाजत त्यांच्या शिष्यांनीं त्यांचें शव डोमगांवीं आणिलें व हल्लीं त्यांची समाधी आहे तेथें तें दहन केलें. समाधिचें मंदीर भव्य व रम्य आहे. समर्थसमाधीच्या खालोखाल असें हेंच काम आहे. हें मंदिर स्वामींनीं समाधी घेतल्यानंतर ५९ वर्षांनीं बांधल्याबद्दलचा शिलालेख तेथें आहे. खुद्द समाधीवर पांचहि बाजूंवर पांच शिलालेख आहेत. कल्याण स्वामी हे आजन्म ब्रह्मचारी असल्यामुळें येथील गादीची शिष्यपरंररा ब्रह्मचाऱ्यांची शके १८२६ सालापर्यंत होती. शाहु महाराजांच्या महाराणी सकवारबाई यांनीं कल्याणांचे शिष्य मुद्गलस्वामी यांचा उपदेश घेऊन मठाला अडीच हजारांचें इनाम दिलें होतें. कल्याण स्वामींनीं बराच शिष्यसंप्रदाय केला असून त्या शिष्यांचे मठ या प्रांतांत बरेच आहेत. यांनीं सोलविमुख, शुकाख्यान व पदें, अभंग, आरत्या, भूपाळ्या वगैरे त्रुटित काव्य बरेंच केलें आहे.

यांचे भाऊ दत्तात्रय म्हणून जे वर सांगितले तेहि समर्थांचे शिष्य झाले होते. त्यांचा मठ सातारा तालुक्यांतील शिरगांव येथें आहे.

**कल्याणद्रुग, तालुका**—मद्रास. अनंतपुर जिल्ह्याच्या अगदीं पश्चिमेकडील तालुका. उत्तरअक्षांश १४° १४' त १४° ४४' व पूर्वरेखांश ७६° ५१' ते ७७° २३'. क्षेत्रफळ ८१७ चौरसमैल. लोकसंख्या (१९२१) ८०१६४. यांत कल्याणद्रुग गांव (लो. सं. ८८१५) व ७० खेडीं आहेत. एकंदर उत्पन्न सुमारें एक लाख रुपये आहे. पावसाची सरासरी २१ इंच. तालुका खडकाळ व ओसाड असून जमीन निकृष्ट दर्जाची आहे.

**गांव**—मद्रास इलाखा. अनंतपुर जिल्हा. कल्याणद्रुग तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तरअक्षांश १४° ३३' व पूर्वरेखांश ७७° ६'. लोकसंख्या (१९११) ६६५९. पूर्वी हें जरा महत्वाचें गांव होतें. परंतु आगगाडीच्या रस्त्यापासून फार दूर असल्यामुळें याचें महत्व बरेंच कमी होत चाललें आहे. गांवांभोंवतीं डोंगर असून त्यांपैकीं एकावर प्रागैतिहासिक कालीन शेकडों स्मारकें सांपडतात.

**कल्याणपुर**—मद्रास इलाखा; दक्षिण कानडा जिल्हा; उडिपि तालुक्यांतील एक खेडें. उत्तर अक्षांश १३° २४' व पूर्व रेखांश ७४° ४४'. कॉस्मस इंडिकोप्लुस्ट्स् यानें ज्या कल्याणाचा सहाव्या शतकांत 'हें बिशपचें ठिकाण होतें' असा उल्लेख केला आहे, तें हेंच होय असा तर्क आहे. वैष्णव मताचा उत्पादक मध्वाचार्य इ. स. ११९९ च्या सुमारास याच ठिकाणीं जन्मला. इ. स. १६७८ सालीं पोर्तुगीजांनीं येथें एक फॅक्टरी स्थापली होती.

**कल्याणमल्ल**-कलिंग देशाचा राजा अनंगभीम, ज्यास लाडदेव म्हणतात त्याच्या कारकिर्दीत हा कवि उदयास आला. या राजानें शालि. शक १०९४त जगन्नाथाचें देवालय बांधिलें असें त्या देवळांत दगडावर कोरलें आहे असें कविचरित्रकार सांगतात. पण आफ्रेक्ट कोशांत हा गुजराथेंतील इल्लदुर्गाचा राजा असून १७ व्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेलेला संक्षेपतिथि निर्णयसाराचा कर्ता गोकुलजित व मदन याचा आश्रयदाता होता असें म्हटलें आहे. कल्याणमल्लानें अनंगरंग नांवाचा एक कामशास्त्रविषयक ग्रंथ रचिला.

**कल्याणी**—हैद्राबाद संस्थान. बेदर जिल्ह्यांतील एक जहागिरीचें गांव. बेदरच्या पश्चिमेस ३६ मैलांवर हें आहे. उत्तरअक्षांश १७° ५३' व पूर्वरेखांश ' ७६° ५७'. लोकसंख्या (१९०१) ११११९. अकराव्या शतकांत पहिल्या सोमेश्वरानें कल्याणी हें गांव चालुक्याच्या राजधानीचें ठिकाण केलें. पुढें शंभर वर्षांनीं त्या राज्याचा सेनापति बिज्जल कलचुरी याच्या हातांत सर्व सत्ता जाऊन चालुक्यांचें राज्य लयास गेलें. तथापि कल्याणी गांवाचें पूर्वीचेंच महत्व कायम राहिलें. मिताक्षराचा कर्ता विज्ञानेश्वर व लिंगायत धर्माचा संस्थापक बसव हे येथेंच होऊन गेले. कलचुरीनंतर देवगिरी यादवांकडे या गांवाचें स्वामित्व गेलें व चौदाव्या शतकांत बहामनी राज्याची स्थापना झाल्यावर त्यांच्याकडे व नंतर विजापूरच्या मुलुखांत याचा समावेश झाला. इ. स. १६५३ सालीं हा गांव मोंगलांनीं लुटला. इ. स. १६५६ सालीं येथील किल्ला अवरंगझेबानें मोठी शिकस्त करून सर केला. १७९५

सुमारास मराठ्यांच्या स्वारीच्या भयामुळें हा किल्ला निजामानें जय्यत तयार ठेविला होता असा उल्लेख आढळतो ( रा. खं. ५. ११३ ). चालुक्यांची सत्ता नाहींशी झाल्यावर जौं रणकंदनें माजलीं त्यांमुळें एकेकाळीं येथें असलेल्या सुंदर देवळांचा नाश झाला.

**कल्लाकुर्चि**-मद्रास इलाखा, दक्षिण अर्काट जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका.उ. अ.११ ° ३४' ते १२ ° ४' व पूर्व. रे. ७८ ° ३८' ते ७९ ° १३'. क्षेत्रफळ ८७३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) ३०९१००.यांत एकंदर खेडीं ३६७. कल्लाकुर्ची गांव हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण होय. एकंदर उत्पन्न सुमारें ६ लाख रुपये आहे.

**कल्लादनार**-( इ. स. १००-१३० )—तामिळ कवि. हा बहुनेक वेंकडमचा रहिवाशी असून एका भयंकर दुष्काळांत कुटुंबासह त्याला तें शहर सोडावें लागलें. दक्षिणेकडे येऊन कावेरीच्या तीरावरील सुपीक प्रदेशांत तो राहिला. तेथें पोरैयुर व अंवर येथील राजांनीं त्याचा चांगला सत्कार करून त्याला दरबारीं ठेविलें. अलंकानमच्या लढाईंत पांड्य सैन्यांत हा होता व जेव्हां लढाई संपली तेव्हां त्यानें विजयी नेडुंज-चेलियनची स्तुति गायिली व लुटींतील एक हिस्सा मिळविला. तोल्काप्पियम या तामिळी व्याकरणावर यानें एक टीका लिहिली असें म्हणतात. पण ती सध्यां उपलब्ध नाहीं. मदुरेंतील शिवलीला ज्यांत वर्णिलेली आहे तो कल्लाडम नांवाचा काव्यग्रंथ यानेंच रचिला म्हणतात; पण त्याच्या भाषेवरून व पुढील काळांत घडलेल्या गोष्टींच्या उल्लेखांवरून तसें दिसत नाहीं. [ कनक सभे ].

**कल्लार**—कल्लण. वस्ती मद्रास इलाखा. लो. सं. (१९११) ५३६६२९.यांत पुरुषांपेक्षां बायकांचीं संख्या जास्त आहे. यांचें मूळ ठिकाण चोल देशांत किंवा तंजावरांत असावें असें फ्रॅन्सिस म्हणतो ( मद्रास सेन्सस रिपोर्ट,१९०१ ). तंजावरांत यांचे आचार ब्राह्मणांसारखे असतात. घरफोडी, दरवडे, गुरें चोरणें हे यांचे नेहमींचे गुन्हे होत. तामील भाषेंत 'कल्लण' या शब्दाचा अर्थ दरवडेखोर असा आहे. तथापि यावरून सर्वच कल्लार चोर आहेत असें अनुमानणें चुकीचें होईल. या जातीपैकीं बहुतेक लोक प्रामाणिक असून चांगल्या दर्जाचेहि कांहीं लोक आहेत व या जातींतला एक संस्थानिकहि आहे. कल्लार लोकांचे पूर्वज मोठे धाडशी असत व हा गुण त्यांच्या पुढील पिढ्यांतहि दिसून येतो असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. तंजावर व त्रिचनापल्ली तालुक्यांतील लोकांनां तसेंच मदुरा व रामनद जिल्ह्यांतील पिरमलाई जातीच्या कल्लार लोकांनां त्यांचा साहसीपणा कधीं कधीं भोंवतो हेंहि खरें आहे. गुन्हा करणें हें वाईट आहे याची पुष्कळ कल्लारांनां जाणीवच नसते. पटाईत गुन्हेगार हा मोठा वीर मानला जातो व खेड्यांतील मुलींनां तो पति होण्यास सर्वस्वी योग्य आहे असें वाटत असतें. कांहीं खेड्यांतील कल्लार तरुणांनां एखादा मोठा गुन्हा केला कीं शतकृत्य केलें असें वाटतें व त्यांचें अनुकरण करणाऱ्यांची संख्या बरीच वाढून पोलिसांनां बंदोबस्त करणें मोठें अवघड काम वाटतें. तीन चार वेळांपेक्षांहि जास्त वेळां शिक्षा झालेला कल्लार धर्मवीर म्हणून मानला जातो व तो तुरुंगांत असतांना त्याच्या कुटुंबास मदत केली जाते. पोलिसांच्या तावडींतून सुटणाऱ्या त्यांच्या पुढाऱ्यांचे बरेच अनुयायी असतात. गुन्हेगार कल्लार लोकांपैकीं बहुतेकांची स्वतःची मालमत्ता असते. वास्तविक त्यांनां गुन्हा करण्याची जरूरी नसूनहि या पांढरपेशा कल्लारांनां केवळ साहसाकरितां गुन्हे करावे असें वाटत असतें. इतर जातींच्या ग्रामस्थांनां या कल्लारांचा इतका वीट आला आहे कीं, गुन्हेगार सांपडला कीं ते त्यास चोप देतात व ठारहि करतात. तीस वर्षांपूर्वी मदुरा जिल्ह्यांत कल्लारांविरुद्ध मोठी चळवळ झाली व त्यांनां बाहेर घालवून देण्याचा मोठा प्रयत्न केला गेला. अंतस्थ बंडाळी माजेल या भीतीनें अधिकाऱ्यांनीं ही चळवळ बंद करून टाकली.

कल्लार हे लोकांकडून दोन तऱ्हेनें पैसे उकळतात. 'तपुकुली' ही एक तऱ्हा असून जनावरें चोरून न्यावयाचीं व कल्ला मध्यस्थानें तीं मालकाला अर्धी किंमत घेऊन परत करावयाचीं या प्रकाराला 'तपुकुली' म्हणतात. 'कावल' ही दुसरी तऱ्हा होय. या प्रकारांत ग्रामस्थ, कल्लारांनां चोरी होणार नाहीं या हमीकरितां कांहीं पैसे देतात. पैसे उकळण्याच्या या दोन्ही पद्धतींविरुद्ध कोणी वागूं लागला कीं, घरें फोडणें, चोऱ्या करणें वगैरे साथींचा प्रादुर्भाव तावडतोब सुरू होतो. कल्लारांत पुढारी व अनेक टोळ्या असतात. 'कल्ला कावल गारांनां' एखाद्या खेड्यानें मान्यता दिली कीं, तें खेडें टोळ्यांपासून सुरक्षित असतें; व जर एखादा गुन्हा घडला तथापि या 'कावल' गारांच्या मध्यस्तीनें मालमत्ता त्या टोळ्यांकडून परत मिळूं शकते. कधीं असेंहि घडून येतें कीं, कल्लारांचे दोन्ही वर्ग एकाच खेड्यावर 'कावल' कराचा हक्क सांगूं लागतात. अशा वेळीं त्या खेड्याची स्थिति कठिण होते. प्रत्येक वर्गाचा कावलगार विरुद्ध पक्षाच्या लोकांकडूनच प्रत्येक गुन्हा झाला असें म्हणूं लागतो व त्या खेड्यांतील लोकांनां कल्लारांच्या दोन्ही पक्षाला 'कावल' देणें प्राप्त होतें. कल्लार आपणांस जंगलाचे राजे समजून चोल राजांशीं संबंध लावतात.

१९०९ सालीं जिल्हा पोलीस सुपरिंटेंडेंटनें जनावरें डागण्याची पद्धत सुरू केली. मालकाला अक्षरें व आंकडे पाहून आपलीं जनावरें ओळखतां यावीं व कल्लारांनां मालकाशिवाय इतरांनां हीं जनावरें देतां येऊं नयेत असा जोड हेतु या पद्धतींत होता. दहा वर्षांपेक्षांहि जास्त काळ ही पद्धत अमलांत होती. डागण्यानें जनावरें खराब होतात असें मालकांनां वाटत असे. 'तपुकुली' वसूल होईपर्यंत कल्लार हीं जनावरें गुप्त ठिकाणीं ठेवीत व पुन्हां जास्त पैसे मागत. ग्रामस्थांनीं जनावरें डागूं नयेत म्हणून कल्लार त्यांची कत्तल

करून टाकीत व त्यामुळें मालकाला त्या जनावरांची अर्ध्या-ऐवजीं सर्वच किंमत गमावून बसावें लागत असे. डागण्याचें काम त्रासदायक असून ते डाग पुसून जात असत. खेडवळ लोक टाकाऊ जनावरेंच डागीत असत व कल्लारांनांहि हा टाकाऊ माल घेण्यांत फायदा नसे.

१९०९ सालापासून क्रिमिनल ट्राइब्ज कायदा अंमलांत आणून या स्थितीशीं तोंड देण्यास सुरुवात झाली. पुरुष गुन्हेगारांची हजेरी घेण्याच्या पद्धतीनें फारसा परिणाम झाला नाहीं. परिस्थितीचें निरीक्षण करून जिल्हाधिकाऱ्यांची खात्री झाली कीं गुन्हे कमी होण्याकरितां खालील उपाय योजिले पाहिजेत. ते असेः-(१) इतरांप्रमाणें स्वजातिकडूनहि गुन्हेगार हा बहिष्कृत व अप्रिय मानला जाणें. (२) कांहीं तरी दुसरा उद्योग योजून गुन्हेगाराला आर्थिक स्वातंत्र्य मिळवून देणें. (३) तरुण व साहसी कल्लारांच्या उत्साहास निराळें वळण लावणें. हे उपाय यशस्वी करण्याकरितां एका व्यक्तीबद्दल खेड्यांतील सर्व कल्लार जातीला जबाबदार धरूं अशी समज देणें इष्ट आहे असें आढळून आलें. कल्लार खेड्यांत ग्रामपंचायती स्थापन झाल्या. त्यामुळें गुन्ह्याची चौकशी कल्लारांतर्फे तेथें होऊं लागली; 'कावल' व 'तपुकुली' सोडून देऊन पोलिसांनां गुन्हेगार धरून देण्यास कल्लार प्रवृत्त झाले; पंचायत उत्तम चालल्यामुळें क्रिमिनल ट्राइब्ज कायदा खेड्यांतून योजावा लागला नाहीं. पंचायत जेथें जेथें सुरू झाली तेथें गुन्ह्यांचें प्रमाण कमी आहे. तिरुमंगलम् आसपास १९२० सालीं २१ घरें फोडलीं गेलीं पण १९२१ सालीं दोनच घरें फोडण्यांत आलीं. मदुरा वगैरे तालुक्यां-मध्यें अशीच प्रगति दिसून येते.

प्रामाणिकपणें चरितार्थ चालण्याबद्दल व मुलांच्या शिक्षणाबद्दल कल्लारांनां मदत करण्यासाठीं मुद्दाम नेमलेल्या अधिकाऱ्यांस थोडें बहुत यश आलें आहे. गुन्हेगारी ही धोक्याची व अप्रिय मानली गेल्यामुळें इतर धंद्यांकडे त्यांचें मन वेधूं लागलें आहे. दोर करण्यासारखे घरगुती उद्योगधंदे सुरू झाले आहेत. केवळ शेती करणाऱ्या खेड्यांपेक्षां कल्लारांच्या खेड्यांतून घरगुती उद्योगधंदे सुरू करणें सुलभ आहे. कारण कल्लारांनां तुरुंगांत थोडेंसें हस्तकौशल्य प्राप्त झालेलें असतेंच. तेल काढणें, चटया करणें, कापड विणणें हीं कामें त्यांनां देण्यांत आलीं आहेत. जिल्हाबोर्डानें त्यांनां कंत्राटेंहि दिलीं आहेत व मदुरा येथील गिरणींत दोनशें मजूर कामास लागले आहेत. पीरिमाडेव मूनर येथील चहाच्या व्यापाऱ्यांनीं ४।५शें मजुरांनां काम मिळेल अशी व्यवस्था केली आहे. जमीन विकणार नाहीं व गहाण ठेवणार नाहीं या करारावर कल्लारांनां पडीत जमिनीहि दिल्या आहेत. शिक्षणानें गुन्हा कमी होईल या हेतूनें कल्लारांचें मन वळवून त्यांच्या मुलांनां शाळेंत पाठविण्याची खटपट पंचायत करीत आहे. ह्याप्रमाणें तालुकाबोर्डें, अमेरिकन, स्वीडिश व कॅथोलिक मिशनरी, या संस्था शाळा स्थापून सरकारचें व पोलिसांचें काम हलकें करीत आहेत.

या जातींत अनेक पोटजाती आहेत. पुरमलई-नाडु-कल्लणांत सुंता करण्याची चाल आहे. मुलांच्या सुंतेचा खर्च त्याची आत्या सोसते; कारण तिची मुलगी त्याची बायको व्हावयाची असते. आतेबहिणीला मागणी घालण्याचा प्रत्येक कल्लणाचा जन्मसिद्ध हक्क आहे. याच हक्काला अनु-सरून मुलीचा मामा तिच्या नाहणाचा खर्च सोसतो. आते बहिणीचें वय मामेभावापेक्षां कितीहि मोठें असलें तरी त्या दोघांचें लग्न होतें. घटस्फोट सहज होतो. पुनर्विवाहाला मोकळीक आहे. कल्लार नांवाचे मात्र शैव धर्मी आहेत. पण वास्तविक त्यांनां भुताखेतांची उपासना करणारे म्हणावें असें स्टुअर्ट म्हणतो (मद्रास सेन्सस, १८९१). अलगरस्वामी हा त्यांचा मुख्य देव होय. [थर्स्टन. सेन्सस रिपोर्ट. कल्लारांवर मद्रासच्या पब्लिसिटी ब्यूरोनें प्रसिद्ध केलेली माहिती.]

**कल्लोळ.**—मुंबई. वेळगांव जिल्हा. चिकोडी तालुका. हा गांव कृष्णेच्या कांठीं असून हें प्रसिद्ध क्षेत्र आहे. येथें दर वर्षी पौषकृष्ण (विशाळी) अमावास्येस मोठी यात्रा भरते. त्याखेरीज कन्यागतांत पुष्कळ दूरदूरचे लोक तीर्थ-यात्रेकरितां येथें येतात. या गांवचें मूळचें नांव "कहोळ-क्षेत्र'. कहोळ महामुनींचा येथें आश्रम होता. त्या महर्षींनीं स्थापन केलेल्या कहोळेश्वराचें देऊळ अगदीं कृष्णातटाकीं आहे. या गांवाजवळ कृष्णा व वेदगंगेचा (सरकारी नकाशांत दूधगंगेचा) संगम आहे. संगमाजवळ संगम व रामगया हीं तीर्थें आहेत. तीर्थास 'रामगया' नांव पडण्याचें कारण कीं रामांनीं येथें यज्ञ केला व त्यामुळें या ठिकाणीं उत्तम सुवासिक भस्म निघतें असें सांगतात. संगमतीर्थापासून खालीं एका फर्लांगावर नागतीर्थ प्रसिद्ध आहे. याखालीं कांहीं अंतरावर बाणतीर्थ, कहोळतीर्थ, शिलातीर्थ, इत्यादि तीर्थें प्रसिद्ध आहेत. येथें नरसिंहाचें जागृत असें स्थान आहे. दरवर्षी वैशाख शुद्ध १४ रोजीं उत्सव होतो. या गांवीं सरकारी कानडी शाळा असून पोष्ट ऑफीस आहे. येथें को. ऑ. के. सोसायटी व कृष्णा बँक को. ऑ. ग्यारंटिंग यूनियन इत्यादि शेतकऱ्यांस उपयुक्त संस्था आहेत. हिंवाळ्याच्या दिवसांत कृष्णेच्या घांटावरून उत्तम वनश्री दिसते.

हा गांव कोल्हापूरकर महाराजांच्या पूर्वजांनीं विराड-सिद्धाच्या कवठें येथील ग्रामोपाध्यांनां अग्रहार दिलेला आहे. कै. विष्णु बाबाजी व रा. कृष्णाजी बाबाजी कुलकर्णी हे मराठी कवी येथलेच होत.

**कल्वकुर्ती.**—हैद्राबाद संस्थान. महबूब जिल्ह्याचा पूर्वे-कडील तालुका. क्षेत्रफळ ८७७ चौरस मैल. लोकसंख्या (इ. स. १९११) ९७१८१. या तालुक्यांत एकंदर १४३ खेडीं असून पैकीं ३१ जहागीर होतीं. कल्वकुर्ती हें तालु-क्याचें मुख्य ठिकाण होय. तालुक्याचें उत्पन्न ८५००० रुपये

इ. स. १९०५ सालीं गडचेरोली तालुक्यांतील कांहीं गांवांचा यांत समावेश करण्यांत आला.

**कॅल्व्हिन जॉन** (इ. स. १५०९–१५६४)—हा स्वित्सर्लंडमधील एक धर्मोपदेशक व सुधारक होता. याचा जन्म १० जुलई १५०९ रोजीं नॉयन येथें झाला. याच्या बापाचा उद्देश याला प्रथम धर्मखात्यांत घालण्याचा होता व त्याप्रमाणें त्यानें ' हॅंगेस्ट डी मॉटमर ' याच्याकडे त्याला ठेवून त्याच्या शिक्षणाची व्यवस्था केली.

१५२९ सालापर्यंत त्याचें हें गाडें सुरळीत चाललें; परंतु त्यानंतर त्याच्या भावी आयुष्याची दिशा बदलावी असें त्याच्या व त्याच्या बापाच्याहि मनांत आलें. धर्मखात्यांत त्याची प्रगति जलद होत गेल्यानें तो गर्वानें फुगून गेला व धर्मोपदेशक होण्याला नालायक ठरला. नंतर त्याच्या बापानें त्याला कायद्याचा अभ्यास करण्यास सांगितलें, व त्यांतहि तो अत्यंत प्रवीण झाला. वर्गाचे नेहमींचे प्रोफेसर हजर नसले म्हणजे हाच त्यांच्याबद्दल कित्येक वेळां व्याख्यानें देई. त्यानें कायद्याचा अभ्यास ऑर्लीन्स येथें केला, ऑर्लीन्सहून तो पुढें बर्जेस येथें गेला. तेथें त्यानें कायद्याचा अभ्यास एका नाणावलेल्या पंडितापाशीं चालविला. येथें वोल्मर नांवाच्या त्याच्या मित्रानें त्याला ग्रीक भाषा शिकविली. व नंतर त्याला ' नवा करार ' मूळ ग्रीक भाषेंतून वाचण्यास मिळाला. याबद्दलचा त्यानें एके ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक उल्लेख केलेला आहे. कॅल्व्हिननें स्वतःबद्दल लिहून ठेवलेली माहिती फारच थोडी आहे. त्यामुळें त्याचीं धार्मिक मतें कशीं बनत गेलीं हें सांगणें दुरापास्त झालें आहे. फ्रान्समध्यें जरी यावेळीं प्रत्यक्ष धर्माविरुद्ध चळवळ नव्हती तरी प्रार्थना, शिक्षण वगैरे बाबतींत पुष्कळच सुधारणा व्हाव्या या मताला अनुकूल असें वातावरण तेथें बनलें होतें.

१५३१ च्या मे महिन्यांत त्याचा बाप वारल्यामुळें त्याला बर्जेस सोडून पॅरिस येथें जावें लागलें. यापुढें त्यानें आपल्या मतांचा प्रसार केला. १५३४ सालापासून त्याच्या मतांनां मान्यता मिळूं लागली. हा पुरुष ५२ वर्षांचा होऊन १५५४ च्या २७ मे रोजीं मरण पावला.

**कॅल्व्हिनचीं धर्मसंबंधीं मतें:**—'परमेश्वर हेंच एक परमतत्व व मानवी प्राण्याच्या प्रयत्नांचें अंतिम साध्य म्हणजे या परमतत्वाचें ज्ञान करून घेणें हें होय. कल्याणकारक गोष्टींचें विधान म्हणजे एक परमेश्वरच होय. मानवी प्राणी जन्मतःच भ्रष्ट आणि पापी आहे. ॲडामनें केलेल्या चुकीचा परिणाम त्याच्या सर्व वंशजांनां भोगावा लागला व मनुष्यप्राण्यांत जें पाप व असंगल सांठलेलें आहे तें म्हणजे या ॲडामच्या चुकीचाच परिणाम होय.

या पापाचें परिमार्जन करण्यासाठींच परमेश्वराच्या पुत्रानें अवतार घेतला व ख्रिस्त व मनुष्यप्राणी यांचें तादात्म्य होण्यास पवित्र आत्म्याचा साक्षात्कार पाहिजे. पहिली गोष्ट श्रद्धा. ख्रिस्त आपणांस तारील अशी श्रद्धा ठेवली म्हणजे आपल्या पापाबद्दल पश्चात्ताप होतो. पश्चात्तापानंतर देहदंडन करण्याची बुद्धि उत्पन्न होते.

बायबल हा धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत अपौरुषेय आहे. अशी त्याची श्रद्धा होती. मनुष्य हा सर्वस्वी निरुपयोगी प्राणी होय, बायबलचें अपौरुषेयत्व, इत्यादि त्याच्या मतांवर लोकांचा विश्वास नव्हता. परंतु ख्रिश्चन विचारपद्धतीच्या इतिहासांत या मतांची किंमत बरीच मोठी आहे. स्कॉटलंडमधील व इंग्लंडमधील प्यूरिटन वगैरे लोकांवर याच्या मतांची बरीच छाप पडलेली आहे. परंतु ' कॅल्व्हिनिस्ट ' या नांवाखालीं न मोडणाऱ्या लोकांतच याच्या मतांचा प्रसार विशेष होता व आहे ही गोष्ट लक्ष्यांत घेण्यासारखी आहे.

**कल्हण**—एक ब्राह्मण कवी व राजतरंगिणी नांवाच्या काश्मिरी इतिहासाचा कर्ता [ काश्मीर, पहा ]. संस्कृत पद्यांत लिहिलेल्या काश्मीरच्या इतिहासाच्या चार बखरी आहेत. पैकीं पहिली कल्हणची. हींत सुमारें इ. स. ११४८ पर्यंतचा इतिहास आहे. दुसरी जऊआ–राजानें लिहिलेली असून त्यांत ११४८ ते १४१२ पर्यंतचा इतिहास सांपडतो. श्रीवरची तिसरी बखर १४७७ पर्यंत व चवथी प्रजाभट्टाची अकबरनें काश्मीरचा ताबा घेईपर्यंत काश्मीरचा इतिहास देते. पंडित कल्हण हा चंपकाचा मुलगा असून काश्मीरच्या जयसिंह राजाच्या कारकीर्दींत म्हणजे सुमारें १२ व्या शतकाच्या मध्यांत उदयास आला. राजतरंगिणी रचण्यापूर्वी कल्हणानें त्याच्या पूर्वीं लिहिलेले अकरा इतिहास व नील ऋषींनें लिहिलेला काश्मीरचा इतिहास अभ्यासिला होता असें तो स्वतःच राजतरंगिणीच्या प्रस्तावनेंत म्हणतो. त्या ग्रंथांत प्रथम काश्मीरचा दंतकथात्मक इतिहास कल्हणानें दिला आहे. राजतरंगिणीखेरीज कल्हणानें अर्धनारीश्वरस्तोत्र रचिलें आहे. [ बील; आफ्रेक्ट; वैद्य ].

**कवकरीक, पोट विभाग**.—ब्रह्मदेश. ॲम्हर्स्ट जिल्ह्याचा पोटविभाग. याचें क्षे.फ. १९६३ चौ मै. असून याच्या पश्चिमेस हौंगपरा व पूर्वेस थौंगीन व सयाम सरकारच्या ताब्यांतील मुलुख आहे. कवकरीक परगणा हा बहुतेक डोंगराळ आहे. १९११ सालच्या खानेसुमारींत या परगण्याची लोकसंख्या ४६९०२ होती. या परगण्यांत १६२ खेडीं असून, त्यांत कवकरीक हें मुख्य शहर आहे. या परगण्याचा सारा दर वर्षीं चाळीस हजार वसूल होतो.

**शहर**.—कवकरीक परगण्याचें मुख्य शहर. कवकरीक नांवाच्या एका छोट्या नदीच्या तीरावर हें वसलेलें आहे. मुलमीन व सयाम यांमध्यें जो उंटावरून व्यापार चालतो त्या मार्गांतील हें शहर व्यापारी केंद्र आहे. या शहराची लोकसंख्या १९०१ च्या खानेसुमारींत ३९१९ होती. शहरामध्यें एक धर्मार्थ दवाखाना आहे. शहराचा वार्षिक सारा सुमारें १० हजार आहे. या शहराची व्यवस्था शहरांतील प्रमुख गृहस्थांच्या मंडळामार्फत चालविली जाते.

**कवचधरवर्ग** सं घ-सं धि पा द.—या वर्गांतील साधारण प्राणी म्हणजे समुद्रकिनाऱ्यावर सांपडणारा शेंवडा (पालिन्युरस) अथवा खेंकडा हा होय. कांहीं अपवाद खेरीज करून या वर्गांतील प्राणी जलचर अथवा जलसंचारी आहेत. कल्ले अथवा जलश्वसनेंद्रियें यांच्या योगानें त्यांची श्वसनक्रिया चालते. त्यांच्या शीर्षाला शृंगांच्या दोन जोड्या असतात व त्यांशिवाय दुसरे शाखारूपी अवयव जोडले गेलेले असतात. वक्षाचा म्हणजे शरीराचा मध्य भाग हा कांहीं प्राण्यांत शीर्षाशीं संयुक्त झालेला असतो तर इतर प्राण्यांत निराळा स्वतंत्र राहतो, व या भागालाहि शाखारूपी अवयवांच्या जोड्या लागलेल्या असतात. उदर म्हणजे शरीराचा पश्चिम भाग. हा बहुधा वलयांकित असून त्यालाहि शाखारूपी अवयव जोडलेले असतात. प्रत्येक शाखारूपी अवयवाची घटना साधारणपणें अशी झालेली असते कीं त्याच्या तळाचा प्रथम एक भाग असून पुढें त्या तळाच्या भागाचे दोन फांटे फुटतात. या तळाच्या भागाला कांहीं अवयवांत जलश्वसनेंद्रियें जोडलेलीं असतात. बाह्यत्वचेवरील पूट म्हणजे त्वक्पापुद्रा हा 'चिटीन' द्रव्य मिश्रित असून त्यांत चुनखडीक्षाराची भेसळ होते.

या वर्गांतील शेंवडा हा प्राणी प्रतिरूप कल्पून त्याचें वर्णन खालीं दिल्याप्रमाणें आहे.

शें व डा—(पालिन्युरस अथवा पान्युलिरस(मुंबईंत आढळणारा खेंकडा. हा प्राणी बहुतेक मुंबईच्या समुद्रकांठीं नेहमीं सांपडतो. हातांत धरला असतां हा आपल्या शृंगांच्या योगानें एक प्रकारचा आवाज करतो. कित्येक वेळां आपलें शेंपूट उदराच्या खालच्या भागावर आपटून हा प्राणी धरणारास भिववितो आणि याच पद्धतीनें हा पाण्यांत पोहतोहि. याला शेंपूट सुकाणूप्रमाणें उपयोगी पडतें. समुद्राच्या तळाशीं असतांना हा अर्धवट चालतो व अर्धवट पाण्यांत पोहतो.

याच्या तोंडाला लागलेले जबड्याप्रमाणें अवयव आडवे हालतात. ते मनुष्य किंवा कुत्रा यांच्या तोंडाला लागलेल्या जबड्याप्रमाणें वर खालीं हालत नाहींत. शीर्षवक्षाच्या कवचाच्या पूर्वशेवटच्या कडेचें अवलोकन केलें असतां असें आढळून येईल कीं तेथें खांचणीच्या आंतल्या बाजूस एक पडद्याप्रमाणें असणारा व नावेच्या आकाराचा अवयव हालत आहे. या अवयवाला ओष्ठनौकाप्रसर (स्कॅफॅमाथाइट) म्हणतात व याच्या हालचालीनें जलश्वसनेंद्रियविवरामध्यें (गिलचेंबर) खालून व मागच्या बाजूनें पाणी आंत शिरून तें त्याच्या पूर्वशेपटीबाहेर उपसलें जातें. जलश्वसनेंद्रियांनां पाण्यांत विरलेला प्राणवायु शोषून घेतां यावा व कर्बाम्लवायु पाण्यांत टाकितां यावा म्हणून ह्या रीतीनें पाण्याचा प्रवाह जलश्वसनेंद्रियावर सतत सारखा चालू असतो.

शेंवड्याचें सर्व शरीर मनुष्य अथवा इतर उच्च प्राणी यांच्याप्रमाणें कातडीनें आच्छादित झालेलें असून ही कातडी त्यांच्या बाह्यत्वचेशीं सम्यक आहे व ती त्वक्पेशींची झालेली असते. या त्वक्पेशींतून स्रवणाऱ्या पदार्थांचें एक शरीराभोंवतीं अखंड पटल तयार होतें. त्याला त्वक्पापुद्रा (क्यूटिकल) म्हणतात व तो एकंदरींत "चिटीन" द्रव्य मिश्रित असतो. ह्या त्वक्पापुद्र्याचा भाग पुष्कळ ठिकाणीं चुनखडीक्षारयुक्त होतो व त्यामुळें टणक कवच रूपीं भाग बनतात व या सर्वांचें मिळून शेंवड्याचें बाह्यकवच झालेलें असतें. या चुनखडीक्षारयुक्त भागांवर जर एखादें अम्ल ओतलें तर त्यांतून वायूचे बुडबुडे निघूं लागतात. ह्यावरून हें चुनखडीक्षाराचें मिश्रण झालेलें आहे हें सिद्ध होतें. सापाच्या कांतीप्रमाणें हें कवच वेळोंवेळीं शेंवडा टाकतो. समुद्रकांठीं हिंडत असतां अशीं टाकलेलीं कवचें आढळून येतात.

शरीराचे साहजिक ओळखतां येण्याजोगे दोन भाग झालेले असतात. मागचा भाग उदर असून त्याचीं सहा वलयें असतात. हीं सहांहि वलयें जवळ जवळ सारखीं असून पहिलें सोडून बाकीच्या सर्वांस शाखा जोडलेल्या असतात. या सर्वांच्या पश्चिम टोंकास वलयाप्रमाणें एक सातवा भाग असतो. त्याला शेंपूट म्हणतात. याला कोणत्याहि प्रकारची शाखा नसून वास्तविक हें वलयहि नव्हे. अगदीं पूर्वशेवटीं शीर्ष असतें. या शीर्षाचे भाग साहजिकपणें ओळखूं येत नाहींत. शीर्ष व वक्ष यांच्या भागांचीं वलयें त्यांच्या शाखांच्या संख्येवरून व त्यांच्या उदरतलावरील आडव्या पट्टयावरून समजावयाचीं असतात. या रीतीनें पाहिलें असता शीर्षाला पांच व वक्षाला आठ वलयें असावींत असें दिसतें.

उदराच्या मध्यभागीं वलयाचा आडवा छेद केला असतां त्याची रचना अशी झालेली दिसते कीं वलयाच्या पृष्ठावरील बाह्यकवच त्याला सभोंवतीं सारखें वेष्टिलेलें असतें व ज्या ठिकाणीं शरीराच्या भागाला लवचिकपणा पाहिजे त्या ठिकाणीं तें मृदु राहून इतर ठिकाणीं चुनखडीक्षाराच्या मिश्रणानें घन व टणक बनतें. ह्या घन व टणक कवचाची पृष्ठभागीं कमान बनलेली असते तिला पृष्ठवलयार्ध (टर्गम) म्हणतात. ह्या कमानीच्या दोहों बाजूंवर अधोगामी व कंटकांत शेंवट पावणारे असे दोन भाग झालेले असतात. त्यांनां वलयबाहू (प्लूरॉन) म्हणतात. उदरतलाच्या भागीं एका आडव्या सरळ अरुंद पट्टयाच्या योगानें ही कमान वर्तुळाकार बनते.व त्यामुळें वलय पूर्ण होतें. ह्या आडव्या पट्टयाच्या दोन्ही शेवटीं शाखारूपी गात्रें जोडलेलीं असतात. व त्या गात्रांच्या मधील या पट्टयाच्या भागाला अधोवलयार्ध (स्टर्नम) म्हणतात. या आडव्या पट्टयाचा गात्रांच्या बाहेरील भाग जो प्रत्येक वलयबाहूच्या आंत असतो त्याला ऊरुगात्र (एपिमेरान) म्हणतात.

एकामागून एक असलेले या उदराच्या वलयांचे पृष्ठवलयार्ध हे त्यांच्या पश्चिम कांठांनीं घराच्या छपराच्या कौलाप्रमाणें एकावर एक असे चढलेले असतात व ते वलयबाहूजवळ दोहों बाजूंवर एकमेकांशीं अशा रीतीनें जोडले गेले

आहेत कीं त्यांची हालचाल वर खालीं म्हणजे ऊर्ध्वक्षेत्रांतच होऊं शकते.

उदरार्ची गात्रें वर म्हटल्याप्रमाणें ऊरुमात्र व अधोवलयार्ध यांच्या मध्यें चिकटलेलीं असून तीं मृदु अशा त्वक्पापुद्र्यानें किंवा संधित्वचेच्या योगेकरून ( अर्थ्रोडिल मेंब्रेन ) जोडलीं जातात. प्रत्येक गात्राच्या तळाच्या भागाला मूलसंधि म्हणतात. हा दोन भागांचा झालेला असून त्याच्या आदिम भागाला कटिसंधि ( कॉक्सोपोडाइट ) म्हणतात, व अंतिम भागाला तलसंधि ( बॅसिफोडाइट ) म्हणतात. ह्या तलसंधिभागाच्या अंतिम शेवटीं दोन चापटलेले पानासारखे फांटे जोडलेले असतात. त्यांपैकीं बाहेरच्या फांट्याला बहिःप्रसर ( एक्सोपोडाइट ) म्हणतात व आंतल्या फांट्याला अंतःप्रसर(एन्डोपोडाइट) म्हणतात. बहिःप्रसराचा आकार सशाच्या कानासारखा दिसतो व तो मूळाकडे थोडासा चुनखडी क्षारयुक्त असल्यानें टणक बनलेला आहे. मादीमध्यें वर सांगितलेले हे दोन्ही फांटे बनलेले असतात व अंतःप्रसराच्या कांठांनां केंस लागलेले असतात व त्यांनां अंडीं बाहेर टाकिलीं असतां तीं चिकटून राहतात. नरामध्यें हे गात्रांचे भाग लहान असून त्यांत सहाव्या गात्रांच्या जोडीखेरीज करून इतर गात्रांच्या जोड्यांनां अंतःप्रसर बनलेले नसतात. नर व मादी या दोहोंमध्येंहि उदराच्या पहिल्या वलयाला गात्रें बनलेलीं नसतात. नर व मादी या दोहोंमध्यें सहावी गात्रांची जोडी बरीच मोठी बनलेली असून "टेलसन" व तीं मिळून शेंवड्यांचें वल्कट पुच्छपर झालेलें असतें. टेलसनच्या उदरतलाच्या भागीं गुदद्वार झालेलें असतें.

शीर्षवक्ष—शीर्षवक्षाचा सर्व भाग एकाच अविच्छिन्न अथवा अखंड कवचानें आच्छादिलेला असतो. त्याला शीर्षवक्षपृष्ठकवच म्हणतात. ह्या कवचाच्या पृष्ठाच्या पूर्वशेवटीं चक्षुदेठांच्या पाठीमागें एक अर्धचंद्राकृति कात्रा दिसतो. त्याच्या दोन बाजूस त्याची मर्यादा दर्शविणारे पूर्वगामी दोन कांटे बनलेले आहेत. ते चक्षूच्या आंतल्या बाजूनें पसरलेले असतात. या कांट्यांमुळें शेंवड्यांच्या शत्रूला त्याच्यावर पुढून हल्ला करणें कठिण पडतें. तसेंच त्याला पुढून गिळणेंहि अवघड होतें.

पृष्ठभागाच्या निम्यावरून एक करकोचा झालेला असतो. हा शीर्षवक्ष पृष्ठकवचाच्या प्रत्येक बाजूस आधोगामी होऊन पुढें पूर्व दिशेस वळतो. या करकोच्यामुळें शीर्ष व वक्ष वेगळे केले जातात. याला ग्रीवाप्रणाली ( सर्व्हिकल ग्रूव्ह ) असें म्हणतात. या करकोच्याच्या मागील बाजूस एक चौकोनी भाग दिसतो. त्याला हृत्क्षेत्र ( कार्डिॲक एरिआ )म्हणतात. कारण या हृत्क्षेत्राखालींच हृदय बनलेलें असतें. या हृत्क्षेत्राच्या दोहोंकडच्या बाजू पूर्व दिशेस ग्रीवाप्रणालीमध्यें अंतर्भूत होतात; व त्या पश्चिम शेवटीं एका उभ्या करकोच्यामध्यें गति घेत जातात. याप्रमाणें पृष्ठभागीं प्रत्येक बाजूवर पूर्व पश्चिमरीत्या हा एक ऊर्ध्व करकोचा आंखला जातो. त्याला श्वसनेंद्रिय हृत्प्रणाली ( ब्रॅंचिओकार्डिअल ग्रूव्ह ) म्हणतात. कारण ह्या प्रणालीच्या खालच्या बाजूस असलेला कवचाचा सर्व भाग जलश्वसनेंद्रियानें आच्छादन करितो व तेवढ्या या कवचाच्या भागाला श्वसनेंद्रियकवच (ब्रांचिओस्टिगाइट)म्हणतात. शीर्ष व वक्ष मिळून त्यांनां १३ गात्रांच्या जोड्या झालेल्या असतात. वक्षाला पांच पायांच्या जोड्या एकामागून एक अशा जोडलेल्या असतात व त्यांचा उपयोग चालण्याच्या कामीं होतो. या पायांच्या जोड्यांमधील वक्षाच्या उदरतलावरील भाग त्रिकोनी झालेला दिसतो व त्याचें टोंक पूर्वशेवटीं गेलेलें असतें. या भागावर आडवे करकोचे पडलेले असून त्यांच्यामुळें ह्याचे पांच भाग झाल्यासारखे दिसतात व हे भाग वक्षाचें अधोवलयार्ध मिळून झालेले असावेत.

वर सांगितलेंच आहे कीं उदरावरील गात्रें चपटलेलीं झालेलीं असतात; त्यामुळें यास त्यांचा उपयोग वल्ह्याप्रमाणें पाण्यांत तरंगण्यास होतो. शीर्षवक्षावरील गात्रें निरनिराळ्या कामीं उपयोगी पडावीं म्हणून त्यांच्यांत बरेच फेरफार होऊन तीं बनलेलीं असतात. तरी त्यांची घटकरचना उदराच्या गात्रांसारखीच झालेली असते. तेव्हां शीर्षाचीं व वक्षावरील गात्रें पुढून पाठीमागें खालीं नमूद केल्याप्रमाणें आहेतः—

| नांव | उपयोग |
|---|---|
| १ लघुशृंगांची जोडी ( अँटन्यूल्स ) | स्पर्शेंद्रियाप्रमाणें |
| २ बृहत्शृंगांची जोडी. ( अँटनी ) | " |
| ३ वल्कट दंष्ट्रांची जोडी (मँडिबल्स) | जबडे व दांतांप्रमाणें |
| ४ पहिली पार्श्वोष्ठांची जोडी ( फर्स्ट-मॅक्सिली ) | जबड्याप्रमाणें |
| ५ दुसरी पार्श्वोष्ठांची जोडी ( सेकंड-मॅक्सिलि ) | " |
| ६ पहिली ओष्ठपादांची जोडी.(फ. मॅक्सि.पे. | " |
| ७ दुसरी ओष्ठपादांची जोडी ( से. मॅक्सि पे. ) | " |
| ८ तिसरी ओष्ठपादांची जोडी ( थर्डमॅक्सि.पे.) | जबड्याप्रमाणें व पायाप्रमाणें |

९, १०, ११, १२ व १३ ह्या वर म्हटलेल्या व एकामागून एक अशा जोडलेल्या पांच पायांच्या जोड्या किंवा चरणयुगुल होत.

जलश्वसनेंद्रियांवरील आच्छादन काढिलें तर निरनिराळ्या ठिकाणीं जोडलेलीं जलश्वसनेंद्रियें दृष्टीस पडतात. त्यांच्या या ठिकाणावरून त्यांचे तीन प्रकार पाडिलेले आहेत; ते असेः ( १ ) गात्रांना जोडलीं असल्याकारणानें त्यांना पादजलश्वसनेंद्रियें ( फूट गिल्स ) म्हणतात. ( २ ) गात्रांच्या संधित्वचेला जडलेलीं असतात त्यांना संधिजलश्वसनेंद्रियें ( अर्थ्रोब्रॅंटाइब ) म्हणतात. ( ३ ) व श्वसनेंद्रिय विवराच्या

अंतःपृष्ठाला लागलेली असतात त्यांना पृष्ठश्वसनेंद्रियें ( प्ल्यूरो ब्रँचिऑक ) म्हणतात.

वक्षाला लागलेल्या गात्रांपैकीं दुसरी ओष्ठपादांची जोडी अवलोकन केली असतां असें कळून येईल कीं त्या गात्राची रचना पूर्णत्वानें झालेली असून तें गात्र नमुना म्हणून समजण्यास हरकत नाहीं. याचा मूलसंधि दोन विभागांचा म्हणजे कटिसंधि व तलसंधि मिळून झालेला आहे. कटिसंधीला जोडून एक पापुद्र्यासारखा भाग वाढलेला असतो त्याला पर्णसंधि ( एपिपोडाइट ) म्हणतात. व तो कटिसंधि लागलेल्या पादजलश्वसनेंद्रियाला आधारभूत होतो. तलसंधि हा हालचाल होऊं शकेल अशा रीतीनें कटिसंधीला जोडलेला असतो. हा तलसंधि पुढें या गात्राच्या अंतःप्रसरामध्यें ( एंडोपोडाइट ) अंतर्भूत झालेला दिसतो. तरी त्याच्या आंतल्या कांठावर एका खांचणीच्या योगेंकरून ते दोन भाग निराळे आहेत हें ओळखतां येतें. अंतःप्रसर हा पांच भागांचा मिळून झालेला असतो. त्यांचीं नांवें अनुक्रमें येणेंप्रमाणें होत. ( १ ) अनुकटिसंधि ( इश्चिओपोडाइट ), ( २ ) जंघासंधि ( मेरोपाइट ), ( ३ ) मणिसंधि अथवा कूर्चसंधि (कार्पोपोडाइट),( ४ ) अनुकूर्चसंधि ( प्रोपोडाइट ) व ( ५ ) अंगुलिसंधि (डक्टिलोपोडाइट). हे सर्व अंतःप्रसराचे संधिभाग ( पोडोमिअर्स ) येथें चपटलेले असून त्यांच्या आंतल्या कांठाला रांठ केश लागलेले असतात. या गात्राचा वहिःप्रसर ( एक्सोपोडाइट ) हा पुष्कळ संधिभाग मिळून लांब झालेला आहे. व तो इंद्रियगोचर आहे. यावरून नमुनेदार गात्र म्हटलें म्हणजे त्याला मूलसंधि असून त्या मूलसंधीचे कटिसंधि व तलसंधि असे दोन भाग असतात. या कटिसंधीला जलश्वसनेंद्रिय व पर्णप्रसर असे दोन भाग लागलेले असतात. त्याच्या तलसंधीला दोन फांटे लागलेले असतात ते अंतःप्रसर व वहिःप्रसर होत व हा अंतःप्रसर वर नमूद केलेले पांच भाग एकापुढें एक जोडून झालेला असतो. आतां सर्व गात्रें याच घटकरचनेबरहुकूम बहुतेक बनलेलीं असतात. परंतु त्या सर्वांमध्यें हे सर्व भाग असतातच असें नाहीं. कारण यांपैकीं कांहीं भाग एकमेकांशीं जुळून जातात किंवा ते वाढतच नाहींत अथवा खुरटे बनून दिसेनासे होतात. तेव्हां त्यांच्यांत फरक आहेत म्हणून अनुक्रमें ते खालीं नमूद केले आहेत.

ओष्ठ व ओष्ठपाद हे मुखद्वाराच्या खालीं आडवे पूर्वपश्चिमरीत्या पसरून बनलेले आहेत व ते एकावर एक असे रचून झालेले असतात. पाय किंवा चरण बहुतेक सारखेच असतात. यांच्यांत तलसंधीचा बाहेरचा फांटा वहिःप्रसर बनलेला नसतो. पहिला पाय फार तोकडा असतो परंतु बळकट असतो. दुसरा त्याच्यापेक्षां थोडा जास्त लांब असून बारीक असतो पण पहिल्या सारखाच असतो. तिसरा पाय सर्वांत लांब असून त्याच्या मूलसंधीच्या उगमाजवळ मादीमध्यें प्रत्येक बाजूस एक लहान छिद्र असतें. तें स्त्रीजननेंद्रियाचें बाह्य छिद्र होय. ह्या छिद्राच्या अस्तित्वामुळें मादी बाह्यतः ओळखतां येते. चवथा दुसऱ्यासारखाच आहे. पांचवा पाय इतर सर्व पायांपेक्षां भिन्न आहे. कारण त्याच्या कटिसंधीला पर्णप्रसराचा भाग बनलेला नसतो व म्हणून त्याला जलश्वसनेंद्रिय झालेलें नसतें. नरामध्यें ह्या कटिसंधीच्या भागाच्या उदरतलावर एक मोठी चीर असते. तिच्या द्वारें शुक्रस्रोतस बाहेर उघडतें. हिच्या अस्तित्वामुळें बाह्यतः नर ओळखतां येतो. या चरणाचा अंगुलिसंधि नरामध्यें दुसऱ्या चरणांचा अंगुलिसंधीप्रमाणें निमुळता होऊन शेवट पावतो; तर मादीमध्यें या चरणाचा अंगुलिसंधि सुरवातीला दुभागून जातो व त्याचा चिमट्याप्रमाणें भाग झालेला असतो.

तिसरा ओष्ठपाद दुसऱ्या ओष्ठपादासारखाच परंतु थोडा जास्त लांब व बळकट असतो. तरी त्याचा वहिःप्रसर खुरटा बनून बहुतेक नाहींसा झालेला आहे. पहिल्या ओष्ठपादामध्यें बराच फरक झालेला आहे. त्याच्या मूलसंधीचे दोन भाग रुंद अशा चपटलेल्या तवकडीप्रमाणें बनून त्यांच्या आंतील कांठांना धार आलेली असते व त्यांना दाट केस लागलेले असतात. पर्णप्रसर अगदीं पापुद्र्याप्रमाणें बनून त्यांना जलश्वसनेंद्रियें मुळींच झालेलीं नसतात.

द्वितीयपार्श्वौष्ठ हें शीर्षाला लागलेलें गात्र होय. तें प्रथम ओष्ठपादाच्या खालीं दबून गेलेलें असतें म्हणून स्पष्ट दिसण्यांत येत नाहीं. ह्याचा उपयोग मुख्यतः श्वसनक्रियेला मदत करण्याकडे होतो. हे दोन चपट्या लहानशा भागांचें झालेलें असतें. त्यांतील आंतला भाग म्हणजे मूळसंधीचे दोन कटिसंधि व तलसंधि मिळून झालेला भाग व त्यांच्या पुढचा अंतःप्रसर ह्यांना दर्शवितो. बाहेरचा कठिण झालेला तवकडीसारखा भाग जो ग्रीवाप्रणालीखालीं जलश्वसनेंद्रिय विवराच्या पूर्वशेवटीं हालत असतो व ज्याच्यामुळें विवरांतलें पाणी उपसलें जातें तो पर्णप्रसर व वहिःप्रसर ह्यांच्या संयोगानें झालेला आहे. तो नौकाकार असल्यामुळें त्याला ओष्ठनौकाप्रसर म्हणतात.

प्रथमपार्श्वौष्ठ मुखाच्या मध्याला असल्याकारणानें थोडासा जास्त स्पष्ट रीतीनें दिसतो. ह्याचे तीन भाग असलेले दिसतात व मधला भाग सर्वांत जास्त मोठा असतो, तो तलसंधि होय व आंतला भाग कटिसंधि होय. ह्या दोन्हीं भागांना धार असून केश लागलेले आहेत. हे टणक असल्याकारणानें यांचा उपयोग चर्वण करण्यांत होतो. बाहेरचा भाग हा अंतःप्रसर दर्शवितो. याला वहिःप्रसर बनलेलें नाहीं

यांच्यांपुढें दंष्ट्रा येतात. प्रत्येक दंष्ट्रा मुखद्वाराच्या बाजूला लागलेली असून ती आडवी हालते. ती वाटोळी असून तिच्या आंतील कांठ दंतयुक्त असा दिसतो. हा वाटोळा दंष्ट्रेचा भाग कटिसंधि दर्शवितो व दंष्ट्रेला बाहेरून लागलेला काडीसारखा भाग हा दंष्ट्रेचे तलसंधी व अंतःप्रसर या भागांचा मिळून झालेला आहे. दंष्ट्रेचा काडीसारखा भाग

पुष्कळ संधियुक्त असून इंद्रियगोचर आहे. दंष्ट्रेला बहिः-प्रसर झालेलें नसतें.

शीर्षाच्या पृष्ठभागीं दोन शृंगांच्या जोड्या आहेत. लघुशृंगाचा मूलसंधि तीन भागांचा झालेला आहे व त्याच्या पुढें दोन फांटे अनेक संधिभाग मिळून बनलेले दिसतात. ते अंतःप्रसर व बहिःप्रसर दर्शवितात. मूलसंधीच्या आदिम भागाच्या पृष्ठावर एक छिद्र केशयुक्त असें दिसतें तें कर्णेंद्रियाचें बाहेरचें रंध्र होय.

बृहत्शृंगाला बहिःप्रसर बनलेलें नसतें व तें ज्या ठिकाणीं उगम पावतें त्या ठिकाणीं उदरतलावर शीर्षाच्या पूर्वशेवटीं वृक्कस्रोतस् बाहेर ज्या एका लहानशा उंचवट्यानें उघडतें तो छिद्रयुक्त उंचवटा दिसतो. शीर्षाला नेत्र देंठानें लागलेले आहेत. कांहींच्या मतें हे नेत्रांचे देंठ म्हणजे शीर्षाला लागलेलीं गात्रें होत.

रुधिराभिसरणव्यूहः—हृत्क्षेत्राच्या भागांतील त्वचेच्या खालीं व आंत्राच्या वर हृत्कलेच्या विवरांमध्यें हृदयाची स्थापना झालेली असते. हृदय स्नायूंचें बनलेलें असून त्याला हृच्छिद्रांच्या तीन जोड्या लागलेल्या असतात व ह्या छिद्रांना अशा तऱ्हेचे पडदे बसलेले असतात कीं त्यांच्यामुळें हृत्कलाविवरांतून रक्त हृदयांत येतें, परंतु तें हृदयांतून बाहेर हृत्कलाविवरांत जाऊं शकत नाहीं. हें हृदय षट्कोनी असून त्याच्यापासून कांहीं रुधिरवाहिन्या उगम पावतात. पूर्वशेवटीं मध्याला नेत्रधमनी उगम पावते व ती पुढें जठरावरून जाऊन दुभागली जाते व तिचा फांटा प्रत्येक नेत्राला व पूर्वशेवटीं रुधिर पुरवितो. नेत्रधमनीच्या प्रत्येक बाजूवर शृंगधमनी उगम पावते व ती तिच्या बाजूवरील लघु व बृहद्शृंगांना तसेंच वृक्काला रक्त पोंचविते. शृंगधमनीच्या थोडेसें खालीं व बाहेरच्या अंगापासून यकृतधमनीची जोडी उगम पावते व ती पचनपिंड अथवा यकृत याला रक्त पुरविते. हृदयाच्या पश्चिम शेवटापासून पृष्ठोदरधमनी उगम पावून आंत्राच्या पृष्ठावरून पश्चिम दिशेस गति घेत जाते. व तिच्या आडव्या शाखा होत होत ती शरीराच्या शेवटीं संपते तिच्यामुळें आंत्राच्या भागाला व त्याच्या सभोंवतीं असलेल्या स्नायूंनां रक्त पुरविलें जातें. पृष्ठोदरधमनीच्या उगमस्थानापासूनच सरळ अधोगामी जाणारी अधोधमनी निघते. ती उदरतलावरील ज्ञानकंदाच्या मधल्या मोठ्या रंध्रांतून बाहेर निघून उदरतलाच्या पृष्ठावर येते व तेथें तिचे दोन फांटे फुटतात. एक फांटा पूर्वगामी असून तो ज्ञानकंदाच्या सांखळीखालून पूर्वशेवटाकडे गति घेतो व फांटे फोडून चरण, ओष्ठपाद, ओष्ठ वगैरे या शेवटावरील सर्व आजूबाजूच्या भागांना रक्त पुरवितो. दुसरा फांटा ज्ञानकंदाच्या सांखळीखालून पश्चिम शेवटीं गति घेतो व शाखा फोडून उदराच्या गात्रांनां व उदरतलावरील स्नायूंना रुधिर पुरवितो.

या सर्व धमन्यांचे बारीक बारीक फांटे फुटतात, परंतु शेवटीं त्या (अंतिम) बारीक फांट्यांपासून शिरा उगम पावत नाहींत. पृष्ठवंशप्राण्यांमध्यें जसा शिरांचा उगम केशवाहिन्यांपासून होतो तसा या अपृष्ठवंशांतील प्राण्यांत शिरांचा उगम होत नाहीं. या प्राण्यांत धमन्यांचे अगदीं शेवटचे फांटे अंतरिंद्रियें व स्नायू यांच्या मध्यंतरांत शेवट पावतात. त्यामुळें या धमन्यांतील रुधिर शरीराच्या अंतरिंद्रियांच्या व स्नायूंच्या आजूबाजूस बाहेर सर्व ठिकाणीं जिकडे वाव मिळेल तिकडे सांठतें व अशा रीतीनें शिरामार्ग बनतात. हे सर्व शिरामार्ग म्हटले म्हणजे शेवड्याच्या शरीरांतील सर्व पोकळ्या होत व त्या एकमेकांना जोडल्या गेलेल्या असतात. म्हणून शेवड्याच्या शरीरांत खरी शरीरगुहा आढळून येत नाहीं. हे सर्व शिरामार्ग कवंधाच्या उदरतलावरील पूर्वपश्चिमरीत्या पसरलेल्या एका उभ्या शिरामार्गांत एकवटतात व रुधिर तेथें जमतें. ह्या उभ्या उदरतलावर शिरामार्गांतच ज्ञानकंदांची सांखळी व अधोधमनीचे पूर्वगामी व पश्चिमगामी फांटे स्थापित झालेले असतात. वक्षाच्या भागांत ह्या उभ्या शिरामार्गांतून प्रत्येक जलश्वसनेंद्रियाच्या बहिर्नलिकेमध्यें रुधिर वहात जातें व तींतून जलश्वसनेंद्रियाच्या आडव्या वाहिन्यांच्या द्वारें अंतर्नलिकेमध्यें येतें. या सर्व जलश्वसनेंद्रियांच्या अंतर्नलिका प्रत्येक बाजूवर ऊर्ध्वगामी असलेल्या सहा शिरामार्गांत उघडतात व हे ऊर्ध्व शिरामार्ग हृत्कलाविवरांत उघडतात. तेणेंकरून जलश्वसनेंद्रियांतून वाहून शुद्ध झालेलें रुधिर हृत्कलाविवरांत सांठतें व त्याच्यातून हृदयाच्या रंध्रामार्गें जेव्हां हृदय विकास पावतें तेव्हां तें हृदयांत येतें. हृदय जेव्हां संकोच पावतें तेव्हां तें त्याच्यांतील रुधिर धमन्यावाटे बाहेर काढून टाकितें व अशा रीतीनें रुधिराभिसरणाची क्रिया सतत चालू असते. जलश्वसनेंद्रियाच्या आडव्या वाहिन्या फार पातळ पापुद्र्याप्रमाणें असतात म्हणून त्यांतून अभिसरण पावत असतांना रुधिरांतील कर्बाम्ल वायु (कर्बॉलिक ॲसिड) प्रसरण क्रियेनें पाण्यांत निघून जातो व पाण्यांत विरलेला प्राणवायु त्याच कारणानें रुधिराशीं मिसळतो व अशा रीतीनें रुधिराची शुद्धता घडून येते.

पचनेंद्रियें:—मुखद्वार हें उभ्या चिरेप्रमाणें असून त्याच्या पूर्वशेवटीं एक मांसल ओंठासारखा लवचिक पडदा असतो त्याला ऊर्ध्वोष्ठ म्हणतात. हा संधियुक्त नाहीं. मुखद्वाराच्या बाजूवर एक बळकट दंष्ट्रांची जोडी लागलेली असते व तिच्या पश्चिम शेवटीं तसाच दुसरा मांसल ओंठासारखा लवचिक पडदा असतो त्याला अधरोष्ठ म्हणतात. मुखापासून लगेच रुंद व उभी अशी अन्ननलिका सुरू होऊन ती मोठ्या रुंद व आडव्या जठरामध्यें शेवट पावते. हें जठर शीर्षभागांत असून तें त्यांतील सर्व जागा अडवून टाकितें. जठराचे दोन भाग झालेले दिसतात. पूर्वभाग मोठा असून एका आडव्या करकोच्यामुळें लहानशा पश्चिम भागापासून तो निराळा दिसतो. जठराच्या अंतःकलेंत चुनखडक्षाराच्या दंतयुक्त आडव्या उभ्या पट्ट्या लागलेल्या असतात व त्यांची

स्नायूंच्या साह्यानें हालचाल होऊं शकते; त्यांच्या हालचालीनें आंतील अन्नाचें चर्वण होतें. तसेंच अंतःकलेला खालच्या बाजूनें पुष्कळ दाट केंस लागलेले असतात. त्यामुळें फक्त अगदीं बारीक अन्नाचे कण पुढें आंत्रांत जाऊं शकतात. जठराचा पश्चिम शेवट निमुळता होऊन आंत्राचा उगम होतो व त्याच्या अंतःकलेंत पिंडपेशी बनलेल्या असतात व त्यांच्यापासून पाचक रस तयार होतो. या मध्यांत्रांत वक्षाच्या भागीं पसरलेल्या पिवळ्या घन यकृताचीं दोहोंबाजूवरील यकृत स्रोतसें उघडतात व यकृतांतील पाचक रस तीं त्यांत ओततात व त्यामुळें अन्नाचें पचन होतें. शेंवड्याचें यकृत हें पृष्ठवंशप्राण्यांच्या यकृताप्रमाणें नसून वास्तविक पाहिलें असतां तें पृष्ठवंशीय प्राण्यांच्या यकृत व पक्वपिंड या दोहोंबरोबर आहे, म्हणजे तें एक संयुक्तपिंड आहे म्हणून त्यास यकृत-पक्वपिंड म्हणतात. त्याच्या घटकपेशींतील कांहीं पेशींत पिवळ्या रंगाच्या तेलाचे गोलाकार ठिपके असलेले दिसतात व कांहीं पेशी पाचक रस तयार करतात. हा पाचक रस किंचित अम्ल असून मांसल धातूंना पचवितो. तसेंच पिष्टमय पदार्थांना शर्करामय बनवूं शकतो व स्निग्ध पदार्थांनां दुग्धमय बनवूं शकतो. ह्या मध्यांत्राच्या पुढचा भाग पश्चिमांत्र होय. याच्या कलेला सुद्धां चुनखडीक्षाराचे उभे पट्टे झालेले असतात. ह्यांच्या शेवटीं गुदद्वार असतें. तें टेलसनच्या उदरतलाच्या भागीं उभ्या चिरेनें बाहेर उघडतें.

मलोत्सर्ग इंद्रियें:—नत्रयुक्त मल रुधिरांतून वृक्कांच्या द्वारें बाहेर टाकिला जातो. ही वृक्कांची जोडी शीर्षाच्या प्रत्येक बाजूस एक एक अशी असते. या वृक्काच्या स्रोतसाचें बाह्य छिद्र वर म्हटल्याप्रमाणें उदरतलावर बृहत्शृंगाच्या उगमस्थानाजवळ एका लहानशा उंचवट्याच्या शेवटीं असतें. वृक्क हें एका वेटोळें झालेल्या नलिकेचें बनलेलें असून तिच्या शेवटीं थोडासा फुगारा झालेला असतो. त्यांत नलिकेच्या भागांतून मूत्र तयार होऊन सांठतें व तें स्रोतसाच्या मार्गानें बाहेर निघून जातें.

ज्ञानेंद्रियव्यूहः—शेंवड्याच्या ज्ञानेंद्रियव्यूहाची रचना सर्वसाधारणपणें म्हणजे गांडूळ ( भूकृमि ) अथवा काडवाच्या ज्ञानेंद्रियव्यूहाच्या रचनेप्रमाणें आहे. तरी त्यांत थोडासा फरक आहे. भूकृमींमध्यें ज्ञानपेशी ह्या ज्ञानकंदांतच एकवटून न राहतां त्या ज्ञानरज्जूंच्यावरहि आढळून येतात. शेंवड्यामध्यें या ज्ञानपेशी फक्त ज्ञानकंदांतच एकवटलेल्या राहतात; त्या ज्ञानरज्जूवर पसरत नाहींत. पुन्हां शेंवड्यांत ज्ञानकंदाच्या जोड्या एका पाठीमागें एक अशा अलग न राहतां कांहीं संयोग पावतात.

शेंवड्यांत शीर्षाच्या पृष्ठभागांत नेत्रांच्या देठांपाठीमागें मेंदूसारखा असणारा शीर्षज्ञानकंदांचा द्वित्त गोळा असतो. त्याच्यापासून पूर्व शेवटीं तीन ज्ञानरज्जूंच्या जोड्या निघतात. त्या नेत्ररज्जु, लघुशृंगरज्जु व बृहतशृंगरज्जु ह्या होत. पश्चिम शेवटीं त्या गोळ्याच्या दोहोंबाजूवर ज्ञानरज्जूचे दोन फांटे निघून प्रत्येक फांटा अन्ननलिकेच्या बाजूवरून जाऊन वक्षाच्या उदरतलाच्या भागीं असलेल्या मोठ्या लांब ज्ञानकंदांच्या गोळ्याला मिळतो. या फांट्याला अन्ननलिकापार्श्वरज्जु म्हणतात. हा ज्ञानकंदाचा गोळा अकरा ज्ञानकंदांच्या जोड्या संयुक्त होऊन झालेला असतो परंतु त्याचे भाग स्पष्ट दिसत नसून त्याच्यापासून अकरा ज्ञानरज्जूंच्या जोड्या निघतात व त्या अकरा गात्रांच्या जोड्यांकडे जातात. ह्या लांब संयुक्त ज्ञानकंदांच्या गोळ्याला वक्षज्ञानकंद म्हणतात. ह्या संयुक्त ज्ञानकंदाच्या गोळ्याच्या मधोमध एक छिद्र असतें. त्यांतून अधोगामी धमनी निघून उदरतलावर येते व नंतर ती दुभागली जाते. उदरामध्यें प्रत्येक वलयाला किंवा भागाला एक अशा एका पाठीमागें एक सहा उदरज्ञानकंदांच्या जोड्या झालेल्या असतात व त्या एकमेकींशीं तसेंच वक्षज्ञानकंदाशीं उभ्या ज्ञानरज्जूंनीं जोडलेल्या असतात. शेवटल्या उदरज्ञानकंदापासून टेलसनकडे ज्ञानरज्जू जातात व त्यांपासूनच पश्चिमांत्राकडे अंतरिंद्रिय ज्ञानरज्जू जातात. जठराकडे सुद्धां अंतरिंद्रियज्ञानरज्जू शीर्षज्ञानकंदाच्या पश्चिम शेवटापासून व अन्ननलिकापार्श्वरज्जूपासून निघून जातात.

जननेंद्रियें.—नर व मादी हे निरनिराळे प्राणी असतात. जननेंद्रियें वक्षाच्या पोकळींत असतात.

नराच्या शरीरामध्यें लांबचलांब दोन मुष्क असतात व ते मध्यभागीं एका आडव्या भागानें जोडले जातात. साधारणतः मुष्काच्या मध्यभागांतून प्रत्येक बाजूवरील शुक्रस्रोतसाचा उगम होतो. हें शुक्रस्रोतस एका लांब नागमोडी, अरुंद नलिकेप्रमाणें सुरुवातीला असून तें पुढें बरेंच रुंदावतें. या रुंद भागाला शुक्राशय म्हणतात. याच्यांत शुक्रबीज एकवटतात. नंतर हें स्रोतस पंचमचरणाच्या मुळाशीं असलेल्या चिरेमध्यें उघडतें. शुक्रबीजाचा आकार ताऱ्याप्रमाणें असतो व त्याला हालणारे नेहमींचे केश नसतात.

मादीमध्यें अंडकोश नराच्या मुष्कासारखे लांबचलांब दोन असतात व ते मध्याला जोडले जातात. ते अपक्वदशेंत पांढरे असतात परंतु परिणतदशेंत वेळेवर लाल होतात व फारच लांब असतात. प्रत्येक बाजूवरून एक सरळ नलिका अंडकोशापासून निघते तिला अंडस्रोतस म्हणतात व हें स्रोतस तृतीयचरणाच्या मुळाशीं एका लहानशा छिद्रानें बाहेर उघडतें.

मादी अंडीं बाहेर पाण्यांत टाकिते व नंतर त्यावर नर शुक्राचा स्राव करितो. अंड्याशीं शुक्रबीजाचें संमीलन झालें असतां तें फलद्रूप होतें व पुढें विकास पावतें. शेंवड्याचीं अंडीं केशरी रंगाचीं असतात व तीं फलद्रुप झाल्यावर परिपूर्णतावस्थेंतून विकास पावत असतांना रूपांतरें पावतात व शेवटीं शेंवडा तयार होतो. ( लेखकः—व्ही. एन्. लिखिते, बी. ए., प्रो. टी. जी. येवलेकर व प्रो. व्ही. एन्. हाटे. )

**कवठ.**—कवठाचीं झाडें महाराष्ट्रांत व गुजराथेंत फार होतात. हा वृक्ष मोठा होतो. त्याच्या फळास कवठ म्हणतात. तें वाटोळें व आंब्याएवढें असतें. त्याचें कवच कठिण असतें. पिकलेलें कवठ नुसतें किंवा त्यांत गूळ अथवा साखर घालून खातात. हिरव्या कवठाच्या मगजाचें ( गिराचें ) सार किंवा कोशिंबीर होते. याची चटणीहि करितात. पिकलेल्या कवठाचा मुरंबाहि होतो.

औ ष धी उ प यो ग.—पित्ताचें शमन होण्यास कवठाचा गीर साखर घालून खावा किंवा कवठीच्या पाल्याचा रस दुधाशीं मिसळून खावा म्हणजे दुर्धर व प्रबल झालेलें पित्त शमन होतें. काळजाच्या रोगावर कवठीच्या पाल्याचा रस गाईचें दूध घालून पांच तोळेपर्यंत काढावा व प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें द्यावा. उंदराच्या विषावर कवठाच्या बियांचें तेल लावावें. अंगावर पित्ताच्या गांधी आल्यास कवठीचा पाला बारीक वांटून त्याचा रस गांधीवर लावावा किंवा वाटलेला पाला दह्यांत कालवून त्यांत खडीसाखर घालून तो खावा म्हणजे एका तासाच्या आंत गांधी मावळतात.

**कवध**—हें इराणी लोकांतील एक पदवीवजा नांव असून सस्सनिद घराण्यांतील दोन राजांनीं आपल्या मागें हें नांव धारण केलें होतें.

क व ध प हि ला.—हा इराणचा राजा पेरोझ याचा पुत्र होय. पेरोझच्या कारकीर्दींत एप्थलाइट अगर श्वेतहूण लोक यांनीं पेरोझच्या राज्यावर अनेकदां स्वारी करून त्याचा पराभव केला होता. पेरोझकडून त्यांनीं जबर खंडणी घ्यावयाचें ठरविलें होतें व ती देईतों त्याचा मुलगा कवध याला आपल्यापाशीं ओलीस ठेवलें होतें. इ.स. ४८४ मधील हूणांच्या स्वारींत पेरोझ हा मारला गेला. तेव्हां त्याच्या जागीं त्याचा भाऊ बालाश हा गादीवर आला. पण हा बालाश फार जुलुमी असल्यानें इराणच्या सरदारांनीं त्याला पदच्युत केलें व कवधला गादीवर बसविलें. कवध हा इराणचा राज्यशकट चांगल्या तऱ्हेनें हांकील असा त्यांनां विश्वास होता; पण कवधाच्या बाबतींत त्यांचा अंदाज चुकीचा ठरला. कवध गादीवर बसल्यानंतर त्यानें या सरदारांचें इराणांतील वजन कमी करण्याचे प्रयत्न चालविले. मझ्दक नांवाचा एक समाजसत्तावाद्यांचा पंथ होता. त्यांचें तत्व असें होतें कीं श्रीमंतांचें धन व त्यांच्या बायका यांची गरीब लोकांमध्यें समान वांटणी व्हावी. या तत्वाला व या पंथाला कवधनें आसरा दिला. (वि.४.पृ.२३) अशी स्थिति पहातांच सरदार लोकांनीं बंड करून कवधला कैदेंत टाकलें व त्याचा भाऊ जामास्प यास राज्यावर बसविलें. पण थोडक्याच दिवसांत कवधनें आपली सुटका करून घेतली; व एप्थलाइट लोकांचा आश्रय धरला. त्यांच्या राजानें कवधाला आपली मुलगी दिली. पुढें त्या राजाच्या मदतीनें कवधानें ४९९ मध्यें पुन्हां आपलें राज्यपद मिळविलें व आपल्या प्रतिपक्ष्यांचा चांगलाच समाचार घेतला. एप्थलाइट लोकांनां त्यानें खंडणी द्यावी असें ठरलें होतें. अर्थात ही खंडणी द्यावयासाठीं त्यानें एक युक्ति काढली. पूर्वी त्याच्या बापाच्या अमदानींत रोमन लोक त्याला खंडणी देत असत; ती आतां पुन्हां देण्यास सुरुवात करावी असें रोमन लोकांनां त्यानें कळविलें. पण त्या वेळचा रोमन बादशहा अनस्टसियस यानें खंडणी द्यावयाचें नाकारलें. एवढेंच नव्हे तर आर्मेनियाचा जो मुलूख इराणच्या सत्तेखालीं होता त्यांत ढवळाढवळ करण्यास सुरुवात केली. कवधनें एप्थलाइट लोकांच्या साहाय्यानें रोमन लोकांवर स्वारी केली व रोमन लोकांच्या ताब्यांत असलेल्या आर्मेनियाच्या प्रदेशांतील थिओडोसीयोपोलीस हें शहर व तैग्रीस नदीवरील आमिद हें शहर काबीज केलें. इतक्यांत पश्चिमेकडील हूणांनीं, आर्मेनियावर स्वारी केल्यामुळें रोमन लोकांनां इराणाशीं तह करणें व खंडणी देणें भाग पडलें. पुढें जस्टिन हा रोमचा बादशहा झाल्यावर पुन्हां भांडणाला सुरुवात झाली. तेव्हां इराणच्या एका मांडलिकानें मेसापोटेमियाचा प्रदेश जिंकून घेतला पण शेवटीं रोमनें त्याचा कलिनिकम येथें पराभव केला. याच सुमारास म्हणजे ५३१ मध्यें कवध हा मरण पावला. मरणसमयीं त्याचें वय ८२ वर्षांचें होतें. कवध हा दूरदर्शी राजा होता. त्याच्या म्हातारपणीं त्याच्यावर त्याच्या मुलांचें फार वजन होतें. या मुलानें मझ्दक पंथाचें अनुयायित्व टाकून देण्यासाठीं कवधचें मन वळवलें व त्यांत त्याला यशहि आलें. या पंथाचा संस्थापक जो मझ्दक याला फांसावर चढविण्यांत आलें. कवधनें आपल्या कारकीर्दींत पुष्कळ शहरें वसविलीं, करपद्धति सुरू केली व आपल्या राज्यांत शांतता प्रस्थापित केली.

क व ध दु स रा.—हा दुसऱ्या खुश्रूचा मुलगा. हा त्याचा बाप हयात असतांनाच ६२८ मध्यें गादीवर बसला. त्यानें आपल्या बापाला व अठरा भावांनां निर्दयपणें ठार मारिलें आपलें राजपद कायम रहावें यासाठीं त्यानें हेराक्लियस बादशहाशीं संधान बांधलें. पण थोडेच महिने राज्य केल्यावर हा मरण पावला.

**कवनाई किल्ला**—मुंबई. नाशिक जिल्हा. इगतपुरीच्या उत्तरेस १० मैलांवर आहे. हा किल्ला मोंगलांनीं बांधला असें म्हणतात. हा उदगीरच्या लढाईनंतर झालेल्या तहामध्यें निझामाकडून पेशव्यांस मिळाला ( १७६० ). इ. स. १८१८ मध्यें त्र्यंबकेश्वराबरोबर इंग्रजांस मिळालेल्या १७ किल्ल्यांमध्यें हा एक होता. याची चढण प्रथम सोपी आहे पण पुढें कडा लागला म्हणजे फार बिकट असून खडकांत खोदलेल्या पायऱ्यांवरून जावें लागतें. या पायऱ्या वाईट आहेत. एक दरवाजा साधारण बरा आहे. येथें पाणी विपुल असून चांगलें आहे. ( ब्रिग्ज रिपोर्ट २०-६-१८१८ ) पायथ्याशीं एक खेडें असून त्यांत मराठे, कोळी, वाणी वगैरेंची वस्ती आहे व एक कामाक्षीचें देऊळ आहे. ( मुं. गॅ. १६ )

**कवराई**—मदुरा, तंजावर व त्रावणकोर येथील व्यापारी वर्ग. कौरवर ( कुरूंचे वंशज ) याचें अपभ्रष्ट रूप कवराई हें आहे असें कांहीं मानतात. ही जात आपणाला तेलगू देशांतील बलिजा जातीचे वंशज म्हणविते. तेलगू जातींतील विवाहपद्धतीसारखी यांची विवाहपद्धति आहे. यांचा एक मोठा पोटवर्ग म्हणजे वळइयाल(तामिळी गब्बुल ) नांवाचा बंगड्या करणारांचा होय. हे बांगड्या तयार करितात व विकतात. यांचा मुख्य धंदा बांगड्यांचा आहे; परंतु अलीकडे यांच्यामध्यें कोष्टी, रंगारी वगैरे कामगार होऊं लागले आहेत. सुशिक्षित व सधन कवराई आपणाला नायक ही पदवी लावून घेतात. [ थर्स्टन; सेन्सस रिपोर्ट १९११ त्रावणकोर. ].

**कवर्धा**—हें मध्यप्रांतातील एक मांडलिक संस्थान आहे. सातपुडा पर्वताची जी पूर्वेकडे रांग गेली आहे तिच्या सरहद्दीवर व बालाघाट, द्रुग, बिलासपूर व मंडला या चार जिल्ह्यांच्या मध्यभागीं हें वसलेलें आहे. या संस्थानाचें क्षेत्रफळ ७९८ चौरस मैल आहे. या संस्थानचा पश्चिम भाग डोंगराळ व जंगलमय असून पूर्वभागीं मात्र सपाट मैदान आहे. संस्थानची राजधानी कवर्धा असून ती बंगाल नागपूर रेल्वेच्या टिला स्टेशनपासून ५४ मैलांवर आहे.

कवर्धा हें नांव ‘ कवीरधाम ’ या शब्दापासून बनलेलें आहे अशी समजूत आहे. हें शहर कबीरपंथी महंतांचें मुख्य ठिकाण आहे. या शहराच्या पश्चिमेस ११ मैलांवर छप्री नांवाचें एक खेडेंगांव असून त्या ठिकाणीं मोराम देवाचें एक सुंदर देवालय आहे. हें देवालय अकराव्या शतकांत बांधलें गेलें असावें असें त्या देवालयांतील नक्षीकाम व शिलालेख यांच्यावरुन दिसतें.

गोंड घराण्याचे वंशज कवर्धा संस्थानावर राज्य करतात, या घराण्याचा बिलासपूर जिल्ह्यांतील पंडरियाच्या जमीनदाराशीं निकट संबंध असून या घराण्यांत जर कोणी राज्याचा वारस नसेल तर पंडरियाच्या जमीनदाराच्या घराण्यांतील सर्वांत धाकटा मुलगा हा त्या राज्याचा वारस म्हणून गादीवर बसतो. रघोजी भोंसले यानें ही जहागीर या घराण्याला बक्षीस दिली. हल्लीं या संस्थानचा राजा जदूनाथसिंग हा असून तो आपल्या वयाच्या सहाव्या वर्षी गादीवर बसला. तो अज्ञान असेतोंपर्यंत या संस्थानचा राज्यकारभार छत्तीसगड संस्थानच्या पोलिटिकलएजंटमार्फत चालत असे. या संस्थानांत एकंदर ३७२ खेडीं असून संस्थानची लोकसंख्या १९११ सालीं ७७६५४ होती. गोंड, चांभार, कुर्मी व तेली या संस्थानांतील मुख्य जाती होत. छत्तीसगड संस्थानांत जी हिंदी भाषा वापरली जाते तीच या ठिकाणींहि प्रचलित आहे.

या संस्थानांतील जमीन काळी असून सुपीक आहे. संस्थानांत तीन दुय्यम जमीनदारी इस्टेटी असून त्यांचें क्षेत्रफळ ४०५ चौरस मैल आहे. या इस्टेटीचें क्षेत्रमापन झालेलें नाहीं. बाकी उरलेल्या संस्थानच्या भागाची मोजणी झाली आहे. त्यावरून असें दिसतें कीं, २४२ चौरस मैलांपैकीं २२२ चौरस मैल जमीन पिकाऊ आहे. कोदन, तांदूळ, गहूं व कापूस हीं मुख्य पिकें आहेत. १६५ एकर जमीनीला विहिरींच्या योगानें पाणीपुरवठा होतो. संस्थानचा अर्धा अधिक भाग जंगलवजा असून त्यांतून साल व सागवान लांकडाचें उत्पन्न होतें.

संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें दीड लाख रुपये आहे. त्यापैकीं ३२००० रुपये ब्रिटिश सरकारला खंडणी म्हणून जातें. शिक्षणाकडे सुमारें ३ हजार रुपये खर्च होतो. १९०४ मध्यें या संस्थानांत १२ शाळा असून त्यांत ९०० मुलें शिकत होतीं. या संस्थानांत ३६ मैल खडीचा रस्ता असून ७४ मैल साधा रस्ता आहे. संस्थानच्या राज्यकारभारावर छत्तीसगड संस्थानच्या कमीशनरची देखरेख असते [ छत्तीसगड फ्युडेटरी स्टेट्स ].

**कवलापूर**—मुंबई इलख्यांत सांगली संस्थानांतील एक गांव. लोकसंख्या ( १९०१ ) ५१२७ होती. या गांवास पूर्वी शिंगणापूर आणि कौंडिण्यपूर म्हणत असत. सांगलीपासून ५ मैलांवर दंडोबाच्या टेकडीपासून वहात जाऊन कृष्णेला मिळणाऱ्या ओढ्याच्या कांठावर हें गांव एका खडकावर वसलेलें आहे. येथील विहिरींचें पाणी खराब व पिण्यास अयोग्य असल्यामुळें लोक ओढ्याचेंच पाणी पितात.

येथें एक गांवठी शाळा, एक जैनांची “ वस्ती ”, एक मुसुलमानांचा दरगा व हिंदूंची देवळें १४ आहेत. या देवळांत सिद्धेश्वराचें देऊळ फार प्रसिद्ध आहे. [ मुं. गॅ; इं. गॅ.१४ ].

**कवालन**—ब्रह्मदेश. अपरबर्मामधील कठा जिल्ह्याच्या अगदीं दक्षिणभागामधील एक परगणा. याचें क्षेत्रफळ ५३६ चौरस मैल आहे. १८९१ मध्यें हा परगणा बुंधो संस्थानांत सामील करण्यांत आला. १९११ च्या खानेसुमारींत या परगण्याची लोकवस्ती ३३१३५ भरली. या परगण्यांत ८५ खेडीं आहेत. या परगण्याचें मुख्य ठिकाण कवलिन असून बुंधोच्या बंडांत या ठिकाणीं बरीच धामधूम माजली होती. या परगण्याचा वार्षिक महसूल एक लाख रुपये आहे.

**कवष, वैदिक**—ऋग्वेदांतील सूक्तांचा द्रष्टा. याच्या संबंधानें सविस्तर माहिती ज्ञानकोश विभाग ३ पूर्वार्ध पृष्ठ ४९१ व ५०६ येथें मिळेल.

पौराणिक ( १ ) युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील होता ना. ऋत्विज ( भाग. स्कं. १० अ. ७४. ).

( २ ) हा पश्चिम दिशेचा आश्रय करून रहाणारा एक ऋषि होता. ( म. भा. शा. २०९. ).

**कवार अथवा कंवर**—ही जात वऱ्हाड व मध्यप्रांतात आढळते. एकंदर २३३४२३ कवार लोकसंख्येपैकीं ( १९११ ) वरील भागांतून २२९४१२ होते. मद्रास इलाख्यांतील कवराई जात व ही एकच असावी ( कवराई पहा ). छत्तीसगडांत महानदीच्या उत्तरेस बिलासपूर

जिल्ह्यांतील जमीनदारी व जशपूर, उदयपूर, सुरगुजा, चांगभकार, व कोरिया संस्थानें हें या जातीचें स्थान होय. या लोकांचा कौरिया, रवत व धोबी जातींशीं पूर्वसंबंध असावा असें यांच्या चालीरीतींविरून वाटतें. यांनीं जरी नामसादृश्यामुळें कौरवांशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे तरी त्यास आधार दिसत नाहीं. हे आपली मूळ भाषा विसरले आहेत. आतां हिंदी भाषाच हे बोलतात. हे द्रविड वर्गांतील लोक असावे असें वाटतें. यांचे ८ भिन्नवर्गविवाही उपवर्ग आहेत. ते तंवर, कमलवंशी, पैकर, दूध कवर, मठिया, चांटी, चेरवा व रौतिया हे होत. यांपैकीं तंवर लोक स्वतःला तोमार रजपूत समजतात व जानवें घालतात. यांनीं विधवाविवाह बंद केला आहे. तंवर शब्द कंवर शब्दाचा अपभ्रंश असावा असें एक मत आहे. यांनीं ब्राम्हण गोत्रें देखील धारण केलीं आहेत. तेलासी वर्गाच्या चार जमीनदाऱ्या आहेत. पण यांनीं आतां आपलें नांव बदलून कैरव असें ठेवलें आहे. पैकर लोकांनीं आपलें नांव पाइक शब्दापासून घेतलें आहे असें म्हणतात. हे हैहयवंशी राजाच्या सैन्यांतील पायदळ होत असें समजतात व दसऱ्यास 'झगडा खांडाची' पूजा करतात. विलासपुरांत कमलवंशी हे तंवर लोकांच्या खालोखाल समजले जातात.

रावतिया जातीचे लोक बहुधा कंवरबाप व रावत आई यांची संतति असावी. रावत मुलगी कंवारानें केली तर तिला जातींत कंवारिणीप्रमाणेंच समजतात. तसेंच रावतांची कौरिया रावत म्हणून जी जात आहे ती अशाच मिश्र संबंधाची असली पाहिजे. कारण जर कौरिया रावतानें कंवरकुमारीबरोबर व्यभिचार केला तरी तिला जातींतून बाहेर काढीत नाहींत. तोच इतर विजातीयांबरोबर जर तिनें व्यभिचार केला तर तत्काल बहिष्कार होतो. यावरून या दोन जातींत पूर्वी लग्नसंबंध रूढ असावे व अलीकडेच ते बंद झाले असावे असें दिसतें. याप्रमाणेंच चेरवा लोक कंवर पुरुष व चेरो नांवाच्या छोटा नागपुरांतील जातीच्या स्त्रियांच्या मिश्र संबंधानें झालेले आहेत. यांचा दर्जा फार नीच समजतात.

यांची अवर्गविवाहीं अशीं ११७ कुळें आहेत. त्यांच्या कुळांचीं नांवें पशू, पक्षी, खाण्याचे व पोषाखाच्या पदार्थांवरून पडलीं आहेत. कांहीं लोकांस निर्जीव पदार्थ आपले पूर्वज होते असें म्हणविण्याची लाज वाटते. ज्यांचीं नावें झाडावरून पडलीं आहेत ते सहसा तीं झाडें कापीत नाहींत. पण कांहीं उपयोग असला तर कापतात. यावरून यांच्यांतील रूढ देवकें हळूहळू नाहींशीं होण्याच्या मार्गास लागलीं आहेत हें उघड आहे. सकुल विवाह व भाऊ बहिणींच्या मुलींचा विवाह निषिद्ध समजतात. मुलीला नेहमीं मुलाकडील लोक मागणी घालतात. लग्नें बहुधा प्रौढ वयांतच होतात; व कधीं कधीं तर चांगली मागणी आली नाहीं तर मुली बऱ्याच मोठ्या होईपर्यंत अविवाहित राहतात. मुलगी पसंत केली म्हणजे मुलाचा बाप आपल्या मित्रांनां तिच्या गांवीं पाठवितो. ते तिच्या बापास म्हणतात कीं अमुक अमुक गांवचा अमुक अमुक माणूस तुमच्या घरची पेलाभर पेज पिऊं चाहतो. जर त्यानें पेज करून त्यास पाजिली तर त्याची लग्नसंबंध जुळविण्यास संमति आहे असें समजतात, जर त्यानें पेज केली नाहीं तर त्याची संमति नाहीं असें समजतात. वाङ्‌निश्चय करण्याकरितां वरपक्षाची मंडळी मुलीच्या घरीं बांगड्या, लुगडें, पुऱ्या व उडीद कौराई रावताच्या डोक्यावर देऊन व मुलीचें सुक (शुल्क)हि बरोबर नेतात. तसेंच कांहीं रुपये, सडलेले व असडी तांदूळ, डाळ आणि तेल हींहि नेतात. याला सुमारें २५ रु. किंमत पडते. विधुराच्या लग्नांत शुल्क जास्त घेतात. वराच्या लोकांबरोबर वाद्यें असतातच. वाद्यें वाजलीं म्हणजे गांवचे लोक जमतात व तेथील सर्वांत जुन्या पोषाखाची वाखाणणी करतात. जितका जुन्या पद्धतीचा पोषाख तितका चांगला. त्या पोषाखाचा इतिहास वर्णन करून सांगतात. लग्नस्तंभाभोंवतीं पहिल्या दिवशीं ६ व दुसऱ्या दिवशीं एक प्रदक्षिणा घालून लग्न होतें. त्यानंतर वधुवरांचे पाय दुधानें धुवून वधूची आई तें तीर्थ घेते, मग वधूवर आपल्या घरीं येतात. नंतर दुसऱ्या दिवशीं वधूवर तळ्यांत स्नान करतात व प्रत्येकजण दुसऱ्यावर पांच गडवे पाणी टाकतो. वधूच्या खांद्यावरून वरानें गवताच्या हरिणास सात बाण मारावे लागतात. प्रत्येक बाण सोडतांना वधू वराच्या तोंडांत साखर घालते. चौथ्या दिवशीं वधू माहेरीं येते. आषाढानंतर तीन महिने वधू परत नवऱ्याकडे येते व लागलीच माहेरीं जाते व तेथें गौरीचा खेळ खेळते. संध्याकाळीं गांवांतलीं तरुण मुलें व मुली तिच्या भोंवतीं जमतात. मुलें ढोल वाजवितात व मुली गातात. गौरीची एक अश्लील मूर्ती करतात व ती कोणाच्या तरी अंगांत आल्याची बतावणी करून गवताच्या दोऱ्यांनीं मुलें मुलींनां मार देतात. तीन महिने आपल्या खेळगड्यांबरोबर अशी करमणूक करून तीन महिन्यांनंतर वधू अखेरची सासरीं जाते.

दोन कुटुंबें आपसांत मुलींचा अदला बदल अथवा साटेंलोटें करून घेतात. याचें नांव 'गुजरावत' असें आहे. अथवा भावी जावयानें शुल्क देण्याच्या ऐवजीं ३ वर्षें नोकरी केली तरी चालते. अशा लमसेना जावयास या लोकांत घरजियान म्हणतात. लग्नापूर्वी स्वजातीयांशीं किंवा कौराई रावताशीं संग करणाऱ्या मुलीस एका जातिभोजनानें गुन्हा माफ करतात. पण इतर विजातीयांबरोबर वांकडें पाऊल पडलें तर बहिष्कार घालतात. तंवर वर्ग खेरीज करून इतर लोकांत विधवाविवाह होतात. विधवेला बांगड्या व लुगडें देतात; आणि वळचणीच्या खालीं वधूवर उभे राहतात. वर आपल्या वधूच्या कानास स्पर्श करून त्यांत ओंव्याच्या पानाची सुरळी घालतो; व मग ती विधवा त्याची बायको होते. पुरुषाचें तिसरें लग्न कुमारिकेबरोबर करावयाचें असलें तर तिची मातीची प्रतिमा करून तीबरोबर प्रथम लग्न लावतात. मग वर ती प्रतिमा जमिनीवर आपटून फोडतो व तिचें उत्तरकार्य

करून मग त्या मुलीबरोबर खरा विवाह करतो. विधवेनें आपल्या दिराबरोबरच लग्न लाविलें तर तिच्या पहिल्या नवऱ्याचीं मुलें व दुसऱ्या नवऱ्याचीं मुलें यांचा दर्जा व हक्क अगदीं सारखा असतो. पण जर दुसऱ्या कोणाबरोबर लाविलें तर पहिल्या नवऱ्याचीं मुलें व त्याची संपत्ति कोणा तरी नातलगाकडे जाते.

सिरगुजाच्या कंवरांनीं सतीची चाल उचलली होती. सतीचा यांच्यांत फार मान असे; व सतींचीं स्थानें अद्यापि फार भक्तीनें व सन्मानानें राखितात. तंवर लोकांस इतर कवारांच्या मुलींशीं लग्न करतां येतें. पण ते आपल्या मुली मात्र त्यांस देत नाहींत. पण असा व्यवहार फारच चोरून करतात. जमीनदारानें आतां स्वतःच्या सहीचा दाखला नसलेल्यांस तंवर समजूं नये म्हणून कडक नियम केला आहे; व हे दाखला देण्याकरितां कधीं कधीं फारच पैसा घेतात. फारच वेबनाव झाला किंवा बायकोनें व्यभिचार केला तर लग्न मोडतात.

बाळंत होतांना बायका भिंतीला टेकून पाय लांब व एकमेकांपासून दूर करून बसतात. कोणी तरी दुसरी बाई त्यांनां मदत करण्यास असते. मुलगा बोलका व्हावा असें वाटलें तर पंचाइतीच्या घरांत नाळ पुरतात. व्यापारी व्हावा असें वाटलें तर बाजारांत, धर्मनिष्ठ व्हावा असें वाटलें तर कोणत्या तरी देवस्थानांत पुरतात. मुलगी असली तर तिची नाळ उकिरड्यावर पुरतात. उकिरडा ह्या पिकाला फार मदत करतो असें समजतात. छत्तीसगडांतील चालीप्रमाणें आईला तीन दिवस बाळंतपणांत कांहींच खावयास देत नाहींत. मुलास पाचव्या महिन्यांत अन्न देऊं लागतात. जुळें झालें तर एखादें धातुपात्र फोडतात व अशा रीतीनें त्यांचा संबंध तोडला असें समजून एका मुलाला कांहींहि झालें तरी दुसऱ्या मुलास कांहींच होणार नाहीं असें समजतात.

बहुधा सर्व लोक प्रेतें पुरतात. श्रीमंत लोक मात्र दहन करूं लागले आहेत. प्रेत पुरतांना त्याबरोबर स्वर्गांत पेरणी करण्यास तीळ व उडीद ठेवतात. थडग्यावर पाणी पिण्याचा तांब्या, ताट व गंज ठेवतात. हीं भांडीं नंतर धोबी उचलून नेतो. अर्धें प्रेत जळल्यावर त्यांतील कांहीं लांकडें काढून सुपांत घालून मृताच्या घरीं नेतात व घरच्या बायकांत्यांस स्पर्श केल्यावर पुन्हां तीं लांकडें चितेंत आणून टाकतात. नंतर सर्व लोक स्नानें करून परत येतात. वाटेंतल्या कोणत्या तरी चौरस्त्यावर पुढचा माणूस पायानें एक दगड उचलतो व मागच्यास देतो. तो आपल्या मागच्यास देतो व शेवटला माणूस तो दगड फेंकून देतो. व अशा रितीनें मृताच्या आत्म्याचा व घरच्या मंडळींचा संबंध तोडून टाकतात. तिसऱ्या दिवशीं अस्थी शुद्ध करतात.

वाघानें कोणास मारलें व खाल्लें तर त्या माणसाच्या रक्ताचा स्वाद मिळाल्यामुळें वाघाचा व त्याच्या कुटुंबाचा संबंध जुळला असें वाटून तो तोडण्याकरितां एक विधि करतात, व त्याला 'दोरी तोडणें' म्हणतात. एका बैगाला गेरु व काजळ फासून वाघाचें सोंग देतात. त्यास घेऊन वाघानें जेथें माणसास खाल्लें असेल तेथें जातात. बैगा रक्त सांडलेल्या जागची माती तोंडांत भरून रानांत पळतो. त्याला जवळचीं माणसें परत आणतात व तोंडांत भरलेली माती टाकावयास लावतात. अशा रितीनें वाघाच्या तोंडांतला घास हिसकतात. नंतर बैगा मयताच्या कुटुंबाच्या सर्व माणसांस दोरीनें बांधून एका कोंबडीजवळ दाणे ठेऊन म्हणतो जर माझी जादू सिद्ध असली तर हे दाणे खा. कोंबडीनें दाणे खाल्ले म्हणजे वाघाच्या व या कुटुंबाच्या माणसांचा संबंध तुटला. मग तो खरोखरच ती दोरी तोडून टाकतो. सर्प चावला तरी देखील ह्याच विधी करतात.

यांची 'भगवानम्हणजे सूर्य' याच्यासंबंधीं कांहीं तरी अंधुक कल्पना आहे. त्यांच्या जातीचे अनेक देव आहेत. वाघाची देवता वाघरा देव या नांवानें प्रसिद्ध आहे. लाल फलगीच्या सापाची यांस फार भीति वाटते. तो अरण्यांत शेषकुंडांत राहतो असें सांगतात. तो गेलेल्या वाटेला जर कोणी ओलांडलें तर तो माणूस काळा ठिक्कर पडतो अशी यांची समजूत आहे. यांच्या स्थानिक देवतांत मंडवा राणी म्हणून एक देवता आहे. रानांत वाट चुकली तर ही बरोबर वाट दाखवून मार्गास लावते असें हे समजतात. नदींत सात बहिणींचा वास असतो असें समजतात. धवधव्याजवळ खेळणें यांस फार आवडतें. हे शस्त्रांची एक स्वतंत्र देवता मानतात. एक कोळीण सती व 'सारंगन्हिणी' अशा दोन देवता दोन बायकांपासून बनल्याचें मानितात. पेंड्रा जमीनदाराची एक कोळीण राख गर्भारपणीं मेली व सारंगगडच्या राजाची एक धासिया स्त्री राख होती तिचा खून झाला होता म्हणून या दोघीस आतां यांनीं देवांत ओढिलें आहे. जादू करणाऱ्या स्त्रियांस टोन्ही म्हणतात व अशा तऱ्हेच्या संशयावरून सुद्धां टोन्ही मानल्या गेलेल्या स्त्रीस गांवांत राहणें अशक्य होतें.

सहानुभूतिक कृतीनें रोग बरे करण्याची यांची एक मनोरंजक कल्पना आहे. कुऱ्हाडीचा घाव लागला तर ती कुऱ्हाड तापवून थंड करतात. पहिल्या प्रयोगानें जखम वाळते व दुसऱ्यानें तिच्यांत थंडावा येतो असें समजतात. घरावर कावळा ओरडला तर कोणी पाहुणा येईल असें समजतात. पुरुषांच्या पोशाखांत विशेष असें कांहींच नाहीं. बायका पायांत कांशाचे वाळे घालतात. गळ्यांत कांशाच्या किंवा चांदीच्या सऱ्या घालतात कानांत चांदीचीं कर्णफुलें घालतात पण नथ घालीत नाहींत. स्त्रिया आपल्या स्तनांवर कृष्णाची मूर्ति गोंदवितात, हातावर हरणाचें चित्र गोंदवितात व पायावर निरनिराळ्या प्रकारचीं चित्रें गोंदवितात.

युद्ध करणें हा आपला खरा धंदा आहे असें हे लोक समजतात. पण आतां निरुपायामुळें पुष्कळ लोक शेतकी व मजूरी करतात.

बाप जिवंत असतांना जर मुलानें वाटा मागितला तर दोन बैलांशिवाय त्याला कांहीं मिळत नाहीं. पण बाप मेल्यावर वडील मुलास इतर वांट्यावरोवर जिठाई (ज्येष्ठत्व) म्हणून कांहीं खर्च मिळत असतो.

यांच्या पंचाइतीच्या मुख्यास परधान म्हणतात. बहिष्कारानंतर जातींत घेण्यास एक धोवी लागतो; व त्या धोव्यानें निरनिराळ्या ५ पात्रांतून पतितावरोबर जेवलें पाहिजे. जखमेंत किडे पडले तर बहिष्कार पडतो.

हे लोक गोमांस, मगर, माकडें, सर्प व पालीखेरीज करुन सर्व खातात. हे बाजारांतलें मांस मुसुलमानानें हलाल केलेलें म्हणून अपवित्र समजून खात नाहींत व रेच्छा मासेहि खात नाहींत. हे लोक गोंडांच्या हातचें व कौराई रावतांच्या हातचें जेवतात. हे वहुतेक गोंडांसारखेच दिसतात. यांच्या नृत्यांत स्त्रीपुरुष मिळून टिपऱ्या खेळत खेळत नाचतात व ताल फार चांगला धरतात. [ रसेल व हिरालाल ].

कवि —देवविशेष.

वै दि क.—ऋग्वेदांत उशनस् याला कविपुत्र ( काव्य ) असें म्हटलें आहे ( ५,२९, ९ ) परंतु प्रत्यक्ष कवीचा उल्लेख नाहीं.

पौ रा णि क.—पुराणांत कवि नांवाच्या वऱ्याच व्यक्तींचा उल्लेख आहे त्या पुढीलप्रमाणें:—

( १ ) स्वायंभू मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र भृगुऋषि; त्याच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ, याचा पुत्र उशना ऋषि. ( २ ) प्रियव्रत राजर्षीस बर्हिष्मतीपासून झालेल्या दहा पुत्रांतील कनिष्ठ. हा वाल्यावस्थेपासूनच विरक्त होता [ भाग. ५ स्कं. अ. १ ]. ( ३ ) तामस मन्वंतरांतल्या सप्तर्षींत झालेला एक ( ४ ) रैवत मनूच्या दाहा पुत्रांतील पांचवा. ( ५ ) ऋषभ देवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील ज्येष्ठ. ( ६ ) वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील कनिष्ठ. हा विरक्त होता म्हणून अरण्यांत गेला ( भाग. नवम. अ. २ ). ( ७ ) एक ब्रह्मर्षि ( ८ ) वैवस्वत मन्वंतरांतील ब्रम्हपुत्र; यास वारुणि कवि अशी संज्ञा होती. यास कवि, काव्य, धृष्णु, उशना, भृगु, विरजा, काशि आणि उग्र असे आठ पुत्र होते (भार. अनु. अ. ८६). ( ९ ) ब्रह्मपुत्र जो वारुणि कवि त्याच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ ( भार. अनु. अ. ८५ श्लोक १३२–३४ ).( १० )सो. वं. पुरुकुलोत्पन्न रौद्राश्ववंशीय भरत राजा. त्याच्या कुळांत जन्मलेल्या दुरितक्षय राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम. हा तपानें ब्राह्मण झाला होता. ( ११ ) कौशिक ऋषीच्या सात पुत्रांतील एक. ( १२ ) कृष्णास कालिंदीपासून झालेल्या पुत्रांतील एक. ( १३ ) कृष्णाचा एक प्रपौत्र; हा महारथी होता.

कवि—कवि म्हणजे काय याच्याविषयीं व तसेंच कवितेविषयीं व्याख्या अनेकांनीं अनेक प्रकारच्या केल्या आहेत; व त्या विविध व्याख्या अपूर्ण आहेत अशी विरुद्ध पक्षाकडून मांडणी होत जाऊन आतां कवितेची व्याख्या करणें हें चिकित्सक वर्गानें सोडून दिल्यासारखें आहे. कवि कशानें होईल ? कवि जन्मसिद्ध गुणांनीं बनतो किंवा कांहीं कृत्रिम उपायांनीं, याविषयींहि वारंवार चर्चा चालू असते व ज्या वेळेस पृथक्करणशक्ति पूर्णपणें विकास पावली नव्हती अशा कालापासून कवि स्वाभाविकपणानेंच बनतो अशा तऱ्हेची मांडणी करण्याची प्रवृत्ति आहे. कवीला शिक्षण नको आहे असें जन्मसिद्ध कवित्वाची तारीफ करणारे लोक आज म्हणत असतील असें वाटत नाहीं. कारण योग्यतेचा कवि म्हणून एखादी व्यक्ति पुढें येण्यास शिक्षणाची जरूरी नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. अडाणी वर्गातून बरेचसे कवी पुढें आले ही गोष्ट खरी आहे. तथापि जे कवी असे पुढें आले ते कवित्व करूं लागल्यानंतर स्वतःच्या मनोविकासाकरितां व बुद्धिविकासाकरितां कांहीं तरी शिक्षण पैदा करीत यांत शंका नाहीं. विद्वत्व आणि कवित्व या निबंधामध्यें मालाकारांनीं या दोन गोष्टी परस्परविरोधी आहेत आणि विद्वत्ता वाढली तर ती कवित्वास अपकर्षक आहे अशा प्रकारचीं मतें व्यक्त केलीं आहेत. तीं त्यांच्या पांगाकरांसारख्या अनुयायांकडूनहि त्यागिलीं गेलीं आहेत. मोरोपंत विद्वान नव्हता हें तर पांगारकरांनीं मोरोपंताची वाचनमर्यादा वरीच व्यापक होती असें दाखवून खोडून काढलें आहे (सरस्वती मंदिर).या विषयींचे महाराष्ट्रांतील वादविवाद म्हणजे अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत व एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत इंग्लडांत जे वादविवाद होत असत त्यांची छाया आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

क वि त्वा चा इ ति हा स.—लोकांचें चित्तरंजन करणें ही गोष्ट अत्यंत शैशवावस्थेंतील समाजामध्येंहि असल्यामुळें अत्यंत प्राचीन काव्य सांपडणें आज जवळ जवळ अशक्य आहे. प्राचीन भारतीयांपेक्षां देखील जुनी संस्कृति जी असुरोवाविलोनियनांची, तींत देखील महाकाव्यें या संज्ञेस पात्र झालेलीं गिलगामेशसारखीं काव्यें आढळून येतात. हिंदुस्थानांतील दोन जुन्या संस्कृती म्हणजे मांत्रसंस्कृति व सूतसंस्कृति. यापैकीं मांत्रसंस्कृतींतील लहान लहान खंडकाव्यें ऋग्वेदांत अंतर्भूत झालीं आहेत. सूतसंस्कृतींतील आख्यानवाङ्मय बरेंच जुनें असावें आणि त्यांत मोठमोठ्या पुरुषांच्या कथा आलेल्या असाव्या आणि तें आख्यानवाङ्मय अनेक वेळ संस्कारिलें जाऊन शेवटीं महाभारतांत संहितीकृत झालें असावें असें वाटतें.

अगदीं प्राचीन कविता केवळ आख्यानपर किंवा स्तोत्रपर असणें शक्य नाहीं. लोकरंजन स्तोत्रांनीं कितपत होणार ? आख्यानांनीं थोडेंबहुत होईल पण फार होणार नाहीं;

लोकरंजक अशीं अत्यंत जुनीं काव्यें लावणी व झगडे या स्वरूपाचींच असावींत व तीं संहितीकरणप्रसंगीं वरीचशीं वगळलीं गेलीं असावींत असें अनुमान करण्यास जागा आहे. लावणी-झगड्यांचें अस्तित्व मांत्रसंस्कृतींत असलेंच पाहिजे. कुंतापसुक्तें म्हणून जीं लावणीसारखीं काव्यें ऋग्वेदपरिशिष्टांत शिरलीं तीं एकाकी नसावींत तर तत्सदृश अनेक काव्यांच्या प्रणालीचीं तीं दर्शक असावींत.

स्तोत्रें, लावण्या, आख्यानें वगैरे साहित्य अस्तित्वांत असतां महाकाव्यरचनेसाठीं प्रयत्न झाला असावा व त्या काव्याच्या विस्तरणार्थ उत्तरकालीनांकडून प्रयत्न होऊन व त्यांत जुनें वाङ्मय शोषिलें जाऊन रामायण-महाभारतादि आर्ष महाकाव्यें निर्माण झालीं. त्यांचा इतिहास रामायण व महाभारत या विशेष लेखांखालीं येईलच. होमरच्या इलियडच्या कथेचाहि तोच इतिहास आहे. एवढेंच नव्हे तर जी ग्रंथ चिकित्सक पद्धति होमरसारख्या कवींच्या नांवावर खपल्या जाणाऱ्या कृतींचें परीक्षण करतां करतां उदयास आली तीच रामायण महाभारतादि ग्रंथांकडे लाविली गेली.

लघुकाव्यापासून महाकाव्याच्या अत्यंत मोठ्या स्वरूपापर्यंत रचनाक्षमतेचा जो इतिहास आहे त्यांत संहितीकरणाचा प्रयत्न जरी बराच झाला आहे तरी स्वाभाविक वाढहि झालीच आहे. तरी त्या आर्ष महाकाव्यांच्या मुळाशीं कांहीं तरी मोठेंसें काव्य असावें यांत शंका नाहीं. कारण तसें असल्याशिवाय नवीन क्षेप घालणेंहि सुलभ होणार नाहीं. क्षेप घालून मोठा विस्तार बनविण्यासाठीं क्षेप घालणारांनां मूळचें बरेंचसें मोठें काव्य त्यांच्या दृष्टीस पडलें पाहिजे. एकंदरींत लहानसें काव्य करण्यास जी शक्ति लागते त्या शक्तीची वाढ बरीच होत होत महाकाव्यरचनेची तयारी आली असली पाहिजे. कवींनां लहानसें काव्य निर्माण करणें अर्थातच कठिण नाहीं. तथापि मोठें काव्य तयार करणें म्हणजे संविधानक पाहणें, वर्णनीय प्रसंग शोधणें, त्यांचा चित्ताकर्षक अनुक्रम साधणें, अनेक रसांच्या उत्पादनास अनुकूल अशीं व्यक्तिचरित्रें बनविणें या सर्व गोष्टी मोठ्या परिश्रमाशिवाय व्हावयाच्या नाहींत; व ज्याप्रमाणें अत्यंत मोठा राजवाडा बांधण्यास किंवा मोठ्या सैन्यसमूहाची व्यवस्था ठेवण्यास जसा व्यापक बुद्धीचा मनुष्य लागतो, आणि तो मनुष्य देखील समाजांतर्गत उत्पादनसंकलनादि कार्यें मोठ्या प्रमाणावर होत असतांच उद्भवतो त्याप्रमाणेंच महाकाव्य रचणाऱ्याची गोष्ट आहे. अलीकडे महाकवी उत्पन्न होत नाहींत याचें कारण मनुष्याच्या शक्तीमध्यें कांहीं उणेपणा आला अशांतला भाग नाहीं. कवींचें किंवा लेखकांचें अस्तित्व आज छापखान्याच्या धंद्यावर अवलंबून आहे व छापखान्याच्या धंद्याचें अस्तित्व आज तावडतोबविक्रीवर आहे. व प्रत्येक व्यक्ति जागतिक जीवनकलहयुक्त व श्रमविभागित समुच्चयाची अवयव झाली आहे. यामुळें शांतपणें जगाचें निरीक्षण करण्यास ज्यांस अवसर सांपडलेला आहे व ज्यांस अनेक अनुभवांतूनहि जावयास सांपडलें आहे अशा प्रकारच्या व्यक्तींस आज अवकाश नाहीं. गद्यरूपी जर प्रचंड कांदबऱ्या लोक लिहितात व लहान लहान काव्यें लिहितांना शब्दयोजनेची व निर्दोष वृत्तरचनेची सफाई दाखवितात तर त्यांस महाकाव्यें करणें अशक्य आहे अशांतला भाग नाहीं. आजच्या सामाजिक परिस्थितींत महाकाव्य नको आहे. वाचनास पारखा, कथानकासाठीं आतुर असा मोठा समाज असला व तो एखाद्या भटक्या शाहीराला पोसावयास तयार असला तर एखादेंच कथानक रचून तेंच शाहीरामार्फत रस्त्यावर विक्रीस मांडणें शक्य होतें. व अशी ही परिस्थिति जेव्हां नाहींशी होते तेव्हां महाकाव्याचें अस्तित्व कठिण होत जातें.

या प्रकारची परिस्थिति लक्षांत न घेतल्यामुळें अलीकडे पूर्वींसारखी कविता होणें शक्य नाहीं. पूर्वींचे कवी फार मोठे होते अशा प्रकारचे विचार पाश्चात्य व भारतीय अशा दोन्ही प्रकारच्या लेखकांमध्यें दृष्टीस पडतात. आजची मराठीच नाटकें घेतलीं तर संस्कृत नाटकसमूहापेक्षां आजचा मराठींतील नाटकसमूह कमी योग्यतेचा आहे असें म्हणतां येत नाहीं व यूरोपांत पाहिलें तर उत्तमोत्तम नाटकांचा काल तर आजचाच आहे.

महाकवि होण्यास जी बुद्धि लागते ती कोणतेंहि फार वर्षें टिकणारें व व्यापक क्षेत्राचें मोठें काम करण्यास जी शक्ति लागते तीपेक्षां अधिक लागत नाहीं. कौपर, शेले, वर्डस्वर्थ, कीट्स यासारखे कवी घेतले तर या कवींमध्यें व गल्लोगल्लीच्या कवींमध्यें प्राकृतिक फरक कांहीं एक नाहीं. गल्लोगल्ली पडलेल्या कवींचा धंदा जर कांहीं वर्षें अधिक नेटानें चालला तर या उत्तरकालीन इंग्रज कवींच्या इतपत कवी आपणांस पुष्कळ दिसणें शक्य आहे. व सौदे, कौपर, वर्डस्वर्थ यांनां जर आपण कवी म्हणूं तर तितपत स्वाभाविक गुण किंवा जन्मसिद्ध गुण कांहीं दुर्मिळ नाहींत [ काव्य, महाकाव्य, नाटक, कादंबरी वगैरे लेख पहा.]

**कविजंग**—हा निजामाचा नौकर अहमदनगरचा किल्लेदार होता. नगरचा किल्ला हा प्राचीन निजामशाहीच्या वैभवाचें ठिकाण असल्यानें निजाम त्याचा बंदोबस्त उत्तम ठेवी. पेशव्यांनांहि हा किल्ला त्याच कारणाकरितां पाहिजे होता. दुसरें कारण तो पुण्याच्या नजीक असल्यानें लष्करीदृष्ट्या तो ताब्यांत असणें जरूरीचें होतें. तो हल्ल्यानें काबीज होण्याचें जुळेना. म्हणून दाम-प्रयोग करण्यांत आला. हा प्रयत्न बहुत दिवसापासून चालला होता. तेथील किल्लेदार कविजंग म्हणून मुसुलमान होता. त्याच्याकडे १७५७-५८ सालीं प्रेष पाठविला होता. एक वर्ष खटपट होऊन अखेर विसाजी कृष्ण बिनीवाले यांच्या हातून राजकारण शिजून ता. ९।११।१७५९रोजीं कविंजगानें किल्ला आंतील दारूगोळा व शस्त्रास्त्रांसहित पेशव्यांनां दिला. त्याबद्दल दरसाल पन्नास हजार उत्पन्नाची जहागीर वंशपरंपरेनें पेशव्यांनीं त्याला

दिली. " गोळी न वाजतां किल्ला हातांत आला." या किल्या-मुळें जुन्नर, शिवनेरी, त्र्यंबक, नगर व औरंगाबादपर्यंतचा प्रदेश मराठयांच्या ताब्यांत येऊन राजधानी तितकी सुरक्षितता राहिली. [ म. रि. म. वि. ].

कविजंग हें आडनांव आहे. याचें मूळ ठिकाण दिल्ली. मूळ पुरुष शागुलखां. निजाम उल्मुल्ककाकडे दक्षिणची सुभेदारी आली तेव्हां अहमदनगरच्या किल्लेदारीवर ख्वाजा शरीफ उर्फ एकताज कविजंग याची नेमणूक झाली.त्याच्या ताब्यांत औरंगाबाद ते बालेघाटपर्यंतचा मुलूख दिला होता.निजामाच्या मनांत बळजबरीनें किल्ला घ्यावयाचा होता. परंतु तें त्यावेळीं जुळलें नाहीं.ज्यानें किल्ला मराठयांनां दिला तोच हा ख्वाजा शरीफ. पन्नास हजाराच्या जहागिरीबरोबरच सरदेशमुखी व चौथाइहि त्याला माफ केली होती;तसेंच किल्ल्यावरील शिबंदीचा थकलेला पगार २५ हजार रु. पेशव्यांनीं दिला. श्री. नानासाहेब, भाऊसाहेब व विश्वासराव यांनीं राघोतुकदेव बरोबर वेलभंडार पाठविला होता. निजामाकडून कविजंगास उपसर्ग झाल्यास पेशवे त्याचा बंदोबस्त करीत. भिल्लांचें एक बंड अमानखानें मोडल्यामुळें त्याला पेशव्यांनीं कांहीं रक्कम दिली होती. शिवाय शेतें, बाग वगैरेहि इनामें दिलीं होतीं. पुढें दौलतराव शिंदे व त्रिंबकजी डेंगळे यांनीं याच्या जहागिरीपैकीं कांहीं गांवें जप्त केली. ख्वाजा शरीफ याचें थडगें नगर येथें डांगेगल्लीजवळ कमानी मशिदींत आहे. त्यावरील चार शिलालेखांवरून तो इ. स. १७७४-७५ त मेला असें ठरतें. कविजंग याचा अर्थ रणशूर असा आहे [ भा. इ. मं. अ. १८ ३७ ].

**कविरोंडो**—ब्रिटिश पूर्व अफ्रिकेंतील लोकांची एक जात. एलगन पर्वताच्या उतरणीवरील प्रदेशांत, व्हिक्टोरिया नियांझाच्या ईशान्य किनाऱ्यावर व झोइया नदीच्या दऱ्यांत या जातीचे लोक मुख्यत्वेंकरून रहातात. या जातीमध्यें बंटू व निलोटिक अशा दोन उपजाती आहेत. या दोन्ही जाती कविरोंडोच्या आखाताच्या सभोंवतालच्या टापूंत राहतात. या जाती येथील मूळच्या राहणाऱ्या नव्हत. बंटू जातीचे लोक दक्षिणेकडून व निलोटिक जातीचे लोक उत्तरेकडून या ठिकाणीं आले. या आखाताच्या उत्तरेस बंटू लोक राहतात.

या दोन्ही जाती शरीरानें सुंदर बांध्याच्या आहेत. निलोटिक हे अधिक तरतरीत आहेत बंटू लोकांचें अवरिमि, अववरे व व अवकिशी असे तीन वर्ग आहेत.निलोटिक लोक बंटू लोकांनां जम्व असें म्हणतात व स्वतःला जल्ल असें संबोधून घेतात. या दोन्ही जातींत पुष्कळच साधर्म्य दिसून येतें. या लोकांचा विशेष म्हणजे ते नग्न राहतात हा होय. निलोटिक जातींतील विवाहित लोक मूल झाल्यानंतर शेळीच्या कातड्याचा एक तुकडा अंगावर वापरतात. ही रूढी सुशिक्षित म्हणविणारे लोक देखील पाळतात. यूरोपीयन लोकांशीं संबंध आल्यामुळें या जातींतील बरेच लोक हल्लीं पाश्चात्य तऱ्हेचे पोषाख वापरूं लागले आहेत. तरी पण बायका जात्याच परंपरेच्या अभिमानी असल्याकारणानें शक्य तितकें कमी वस्त्र नेसणें हेंच त्यांनां पसंत पडतें. वक्षस्थलावर व पोटावर दागिन्यांच्या ऐवजीं निरनिराळीं चित्रें गोंदवून घेण्याची यांच्यांत चाल आहे. बंटू जातींतील कांहीं लोकांत सुंता करून घेण्याची पद्धत आहे. निलोटिक जातींत मात्र हा प्रकार आढळत नाहीं. बंटू जातींतील विवाहित स्त्रिया कमरेभोंवतीं, समोरून खालचा भाग झांकेतोंपर्यंत काळ्या दोऱ्याची झालर अगर दशा सोडतात व मागच्या बाजूस कर्दळीच्या अगर केळीच्या तंतूंचा गोंडा लोंबत सोडतात. या गोंड्यावरून त्याच्याविषयीं अनभिज्ञ असलेल्या प्राचीन यूरोपीय लोकांनीं त्यांनां 'शेपटीनें युक्त असलेलीं माणसें' असें नांव दिलें. निलोटिक जातीच्या बायकाहि कमरेच्या पाठीमागें गोंडा सोडतात. पण पुढच्या बाजूस काळ्या दोऱ्याची झालर सोडीत नाहींत.या गोंड्यांनां खुद्द नवऱ्यांना देखील शिवण्याची मनाई आहे.

कविरोंडो लोक भांडखोरपणा, स्वातंत्र्यप्रियता,प्रामाणिकपणा व नीतिमत्ता या गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत. त्यांतल्या-त्यांत बंटू लोकांत हे गुण प्रामुख्यानें नजरेस येतात. या कविरोंडो लोकांत पुरुषांपेक्षां स्त्रिया अधिक आहेत व त्यामुळें बहुपत्नीकत्वाची चाल यांच्यामध्यें असावी यांत नवल नाहीं. पुरुषाला आपल्या बायकोच्याहून लहान अशा तिच्या बहिणीशीं त्यांनां ऋतुप्राप्ति होण्यापूर्वी लग्न करतां येतें. या जातींतील बायका अविवाहित रहात नाहींत. एखाद्या बाईला कोणीच मागणी घातली नाहीं तर ती स्वतःच वरसंशोधन करते व कमी पैसे घेऊन ती एखाद्या पुरुषाशीं विवाह करते. निलोटिक जातीचे लोक, विजातीय लोकांतील मुलींशीं लग्न करूं इच्छितात. कविरोंडो लोकांत मुली सहा सात वर्षांच्या असतानांच त्यांचीं लग्नें ठरवून ठेवण्याची पद्धत आहे. लग्नाच्या प्रसंगीं, मुलगी ही अस्नाता असली पाहिजे; तिला जर ऋतु प्राप्त झाल्याचें उघडकीस आलें तर, तें लग्न मोडतें व मुलीच्या बापाला त्यानें घेतलेला हुंडा परत करावा लागतो व वर जादा दंड भरावा लागतो. व्यभिचारी बायको व व्यभिचार करण्याऱ्या मुली व मुलें यांनां पूर्वी देहांतशिक्षा दिली जात असे. बंटू लोकांत मुलीच्या बापाला हुंडा म्हणून निदान ४० कुदळी, २० शेळ्या व एक गाय द्यावी लागत असे. निलोटिक जातींत, २० मेंढ्या व दोन ते सहा गाई देण्याची पद्धत आहे. हा हुंडा हप्त्याहप्त्यानें दिला तरी चालतो व निम्मा हुंडा देतांच नियोजित वराला आपली वधू मागण्याचा पूर्ण हक्क आहे. एखादी बाई मूल झाल्याशिवाय मरेल तर तिच्या बापाला घेतलेला हुंडा परत द्यावा लागतो. पण मृत कन्येच्या नवऱ्यानें जर मृतकन्येची बहीण करून घेण्याचें कबूल केलें तर मग हा हुंडा परत करण्याचें कारण नाहीं. या जातींतील स्त्रिया बहुप्रसवशील आहेत व जुळीं मुलें होणें हीं त्यांची नित्याची गोष्ट आहे. जुळीं मुलें होणें मंगलदायक मानण्यांत येतें व

असा प्रसंग मोठ्या उत्साहानें व थाटानें साजरा करण्यांत येतो. जुळ्या मुलाच्या आईनें बाळंतपणानंतर सात दिवस पर्यंत झोपडी सोडून जातां कामा नये अशी वंदू लोकांत पद्धत आहे. पण निलोटिक लोकांत अशा स्त्रीनें एक महिनाभर झोंपडींतच राहिलें पाहिजे अशी चाल आहे. एखाद्या वंदू बाईची ओळीनें दोन मुलें मेलीं असतील तर तिला तिसरें मूल झालें कीं तें पहाटेच्या पूर्वी रस्त्यावर नेऊन ठेवतात व शेजारची एखादी बाई त्या मुलाला उचलून त्याच्या आईकडे नेऊन देते व त्याबद्दल तिला एक शेळी बक्षीस मिळते. अशाच प्रकारची चाल निलोटिक जातींतहि आहे. स्त्रियांनां व पुरुषांनां स्वतंत्र अशीं नांवें या कविरोंडो जातींत आढळत नाहींत. पुष्कळदां बापाचें व मुलीचें नांव सारखेंच असलेलें आढळतें. मृत मनुष्याबद्दल सुतक पाळण्याची खूण म्हणजे मानेभोंवतां व कमरेभोंवतीं, केळीच्या सोपटाचे तंतू बांधून घेणें ही होय.

कविरोंडो हे मुख्यतः शेतकीवर आपला उदरनिर्वाह करतात. बायका व पुरुष दोघेहि कुदळीनें शेतांत खणण्याचें काम करतात. यांचें खाद्य धान्य, मका, तंबाखू, भांग यांचें पिक या जाती काढतात. पुरुष व बायका दोघेंहि धूम्रपान करतात पण गांजा मात्र पुरुषच ओढतात. तिळाचें पीक काढून, त्याच्या तेलाचा दिव्यासाठीं उपयोग करण्यांत येतो. दिवे मातीचे केलेले असून त्यांच्या आकार बशीसारखा असतो.

कविरोंडो जातींतील कांहीं पोटजातीं झोपड्यांमधून रहातात. पण कांहीं जातींचीं घरें मातीच्या अगर क्वचित दगडाच्या भिंतीचीं बांधलेलीं असतात. ब्रिटिश लोकांशीं संबंध आल्यापासून खेडेगांवाभोंवतीं मातीचे तट बांधण्याची पूर्वीची पद्धत नाहींशी होत चाललेली आहे.

वंदू लोकांत बाप, भाऊ हे एकत्र जेवत नसून ते स्वतंत्र जेवतात. पुरुषांचें जेवण झाल्यानंतर बायका जेवण करतात. निलोटिक जातींत, बाप व मुलगा एकाच वेळीं पण पृथक् जागीं जेवतात. प्रत्येक मोठ्या पुरुषाला व स्त्रीला स्वतंत्र झोपडी असते. कविरोंडो जातींतील बायका शेळीचें मांस, अंडीं, इत्यादि खात नाहींत. दूध देखील दुसऱ्या पदार्थाबरोबर मिसळून सेवन करण्यांत येतें. रानटी मांजराचें अगर चित्याचें मांस फार आवडीनें खाण्यांत येतें. दारू पिण्याचाहि सर्रास प्रघात आहे.

कविरोंडो लोक शिकारीच्या कामांत फार पटाईत आहेत. दोऱ्यांच्या व जाळ्यांच्या साहाय्यानें ते तरस पकडतात. आपल्या भाल्यांच्या योगानें ते मोठमोठ्या हत्तीवरहि चाल करून जाण्यांत त्यांनां भय वाटत नाहीं. मासे पकडण्याच्याहि बाबतींत ते निपुण आहेत. मधमाशांचीं पोळीं ते जतन करून ठेवतात. शेळयामेंढ्यांना मारण्याची त्यांची पद्धत म्हणजे त्यांचें नाक व तोंड दाबून त्यांनां गुदमरावयास लावून मारावयाची होय. हे स्वतः शांत असले तरी मोठे शूर आहेत. त्यांचे भाले अणकुचीदार व लांब पल्ल्याचे असतात. त्यांच्या तरवारीहि अशाच लांब असतात. अंगावर चिलखतें घालण्याचीहि त्यांच्यांत पद्धत आहे. पण धनुष्य बाण वापरण्यांत येऊं लागल्यापासून तलवारी व भाले यांचा ते कमी उपयोग करूं लागले आहेत. यांची लढण्याची पद्धत चढाईची नसून, स्वतःचें संरक्षण करण्याची आहे. यांच्यांत जातीजातींमध्यें वैमनस्यें माजून आपापसांतच यादवी होऊन लढाया होतात. लढाई संपल्यानंतर मृतमनुष्यांच्या त्रासापासून आपलें संरक्षण करण्यासाठीं ते आपलीं डोकीं भादरून त्यांवर शेळीचें शेण फांसतात.

समुद्रकांठच्या लता अगर वनस्पती जाळून त्याच्या राखेपासून मीठ करणें, भांडीं तयार करणें, टोपल्या वनविणें, इत्यादि धंदे या जाती करतात. यांच्यामध्यें देवकपूजेचें माहात्म्य बरेंच आहे; व प्रत्येक देवकाला भजणाऱ्यांचा एकेक स्वतंत्र पंथ आहे. पितृपूजा हें त्यांच्या धर्माचें एक विशिष्ट अंग आहे. उत्तरेकडील जातींत, अवफवा व इशिशेमी हे दोनच देव मानतात. त्यांपैकीं पहिला पुण्याचा व दुसरा पापाचा देव मानण्यांत येतो. गुरें व बकरीं यांनां पुण्याचीं देवकें समजतात. बकऱ्याचीं आंतडीं हे लोक फार पवित्र मानतात. या लोकांत पौराणिक गोष्टींचा संग्रह फारच थोडा आहे. मंत्रतंत्रावर यांचा फार विश्वास असतो. दिव्याच्या द्वारें खऱ्याखोटयाचा निकाल करण्याची यांच्यांत वहिवाट आहे.

कविरोंडो जातीच्या बायका बहुप्रसवशील असल्याकारणानें त्यांच्यांत लोकसंख्येचें प्रमाण वाढतें आहे. सखल प्रदेशांत रहाणाऱ्या लोकांमध्यें हिंवतापाचा बराच प्रचार असतो. तसेंच उंच प्रदेशांत रहाणाऱ्या जातींत, आंकडी, व निमोनिया हे आजार कायमचे आहेत. यांच्यांत देवीची सांथहि वरचेवर येते. बायकांनांच वैद्यकीचें ज्ञान असतें. या लोकांत पुढचा दांत मुद्दाम पाडण्यांत येतो. तसें न केल्यास तो मनुष्य युद्धांत मारला जातो अशी समजूत आहे. कांहीं जातींत आपल्या नवऱ्यावर संकटें येऊं नयेत म्हणून स्त्रिया आपला पुढला दांत उपटून टाकतात, अगर कपाळावर अगर पोटावर घट्टे पाडून घेतात. एखाद्या बाईचा नवरा एखाद्या धाडसाच्या कामावर निघण्यापूर्वी आपल्याला यश यावें म्हणून तो आपल्या बायकोच्या अंगावर प्रहार करून घट्टा अगर वण पाडतो.

या लोकांत चार प्रकारचे नाच आहेत. जन्मकालचा नाच, मृत्यूनंतरचा नाच, संस्कारकालीं करण्यांत येणारा नाच व दुष्काळ पडला असतांना देवतांनां प्रसन्न करून घेण्यासाठीं करावयाचा नाच हे ते चार नाच होत. यांच्यांतील गाणीं करुणरसपरिपूर्ण व सुंदर असतात. गातांना विण्याच्या आकाराचें एक वाद्य वाजविण्यांत येतें. याशिवाय पुष्कळ प्रकारचीं वाद्यें त्यांच्यामध्यें आहेत.

निलोटिक जातींतील स्त्रिया कानामध्यें पितळेच्या तुकड्यांत वसविलेले मणी घालतात. हे मणी बहुतेक निळ्या रंगाचे असतात. ईजिप्तमध्यें ज्या प्रकारचे मणी आढळतात, तशाच प्रकारचे हे मणी असतात.

[ संदर्भग्रंथ—हॉव्ले-ईस्टर्न युगँडा, अॅन एथ्नालॉजिकल सर्व्हे; सर एच. एच जॉन्स्टन-युगँडा प्रोटेक्टोरेट:(१९०२); जे. एफ. कनिंगहॅम यूगँडा अँड इट्स पीपल्स (१९०५); पॉल कोल्ल्यम-दि व्हिक्टोरिया नायंझा (१८९९) ].

**कॅव्हेंडिश हेनरी**—हा इंग्रज पदार्थविज्ञान व रसायन शास्त्रज्ञ नाइस येथें आक्टोबर १७३१ त जन्मला. १७४२ त हॅक्नी येथें हा प्रथम शाळेंत गेला; व १७४९ त केंब्रिज विश्वविद्यालयांत गेला, पण त्यानें पदवी मिळविली नाहीं. तो चाळीस वर्षांचा होईपर्यंत त्याला बापाकडून थोडे पैसे मिळत असत, परंतु पुढें त्याला बापाची सर्व दौलत मिळून तो अति श्रीमंत मनुष्य झाला. तो क्लॅफॅम कॉमन येथें रहात असे. त्याचें पुस्तकालय सोहो येथें होतें. याची पुस्तकालयासंबंधीं इतकी टापटीप असे कीं तो नोंद केल्याशिवाय स्वतःहि वाचावयास पुस्तक घेत नसे. राजतंत्र्यांच्या (रॉयल सोसायटीच्या) सभांस तो नेहमीं हजर असे व १७६०त तो तिचा सभासद झाला. तो दर गुरुवारीं त्या सभासदांबरोबर भोजन करण्यास जात असे. तो विशेषतः आपल्या सोबत्यांची संगति टाळीत असे. तो आपल्या नात्यागोत्याच्या माणसांकडेहि फारसा जात नसे. त्याच्या जेवणाकरितां तो टेबलावर चिठ्ठी लिहून ठेवीत असे व नोकरांपैकीं स्त्रीवर्गाला त्याच्या समोर न येण्याची सक्त ताकीद असे. तो उंच व सडपातळ होता. तो बोलतांना फार अडखळत असे व त्याची भीति व संकोचयुक्त मुद्रा हास्यास्पद दिसे. तो जन्मभर अविवाहित राहिला. क्लॅफॅम येथें २४ फेब्रुवारी १८१० मध्यें त्याचें देहावसान झालें. त्यावेळीं त्याजवळ ८००० पौंड वर्षासनाची स्थावर इस्टेट, ७,००,००० पौंड रोकड व ५०,००० पौंड ठेव इतकी संपत्ति होती.

१७६४ त त्यानें शास्त्रीय शोध लावण्यास सुरुवात केली. प्रथम यानें ताल ( अर्सेनिक ) उपधातूवर प्रयोग केले. उज्ज वायू हें एक स्वतंत्र मूल द्रव्य आहे हें यानेंच प्रथम दाखविलें. १७६६ त यानें रॉयल सोसायटीस ही गोष्ट पत्रद्वारां कळविली. कर्बद्विप्राणिदाचेंहि यानें सूक्ष्म निरीक्षण केलें. हवा प्रमाण धरून ( हवा = १ ) या वायूचें त्यानें वि. गुरुत्व ठरविलें. निरनिराळ्या द्रवांत हे वायू किती द्रवतात हेंहि त्यानेंच ठरविलें. हवेंत एकनवमांश कर्बद्विप्राणिद झाला असतां ती जीवनास निरुपयोगी होते, व आंबलेल्या व सडलेल्या पदार्थांतून निघणारा वायु कर्बद्विप्राणिदच होय हें यानें दाखविलें. तसेंच यानें विद्युच्छास्त्रांतहि पुष्कळ शोध लावले. परंतु ते त्याच्या मरणानंतर जेम्स क्लार्क मॅक्सवेल यानें " ना. हेनरी कव्हेंडिश यांचे विद्युत्संबंधीं शोध" या नांवानें प्रसिद्ध केले.

१७७७ पासून त्यानें पुन्हां हवेसंबंधीं शोध चालू केले व १७८३ सालीं नवें वायुमापनयंत्र( यूडिओमीटर ) तयार केलें; व हवेची घटना नियमित असते हेंहि त्यानें दाखविलें. त्यानें ६० दिवस हवेचें पृथक्करण करून असें दाखविलें कीं, प्राण व नत्रवायू हे ठराविक प्रमाणांत हवेंत असतात. १७८४ त त्यानें लिहिलेल्या पत्रकांत पाण्याची संयुक्त घटना व नत्राम्लाची घटना हे दोन विषय आहेत. दोन भाग उज्ज व पांच भाग साधी हवा एका नळींत भरून त्यांत विद्युत्स्फुलिंग पाडला असतां त्यास असें आढळलें कीं, हवेचें स्थितिस्थापकत्व कमी होऊन नळीच्या आंत दंवासारखे तुषार लागलेले होते. दुसऱ्या वेळेस त्यानें उज्ज व प्राणवायू नळींत भरून स्फुलिंग पाडला. पण तेथेंहि नत्राम्ल तयार झाला. याचें कारण त्यानें असें ठरविलें कीं, नळींत नत्रवायु असला पाहिजे. याप्रमाणें त्यानें प्रयोग करून असें दाखविलें कीं $\frac{1}{120}$ भाग वगळून बाकीचा नत्रवायु व प्राणवायु यांचा संयोग होऊन नत्राम्ल तयार होऊं शकतो. हा $\frac{1}{120}$ हिस्सा अर्ग ( अर्गॉन ) नांवाचा निराळाच वायु आहे हें त्यानंतर १०० वर्षांनीं सिद्ध झालें.

त्याचें उष्णता या विषयाकडे प्रथमपासून लक्ष होतें व त्यानें आपले निबंध तावडतोब प्रसिद्ध केले असते तर त्याला अनुद्भूत व विशिष्ट उष्णता यांसंबंधीं शोध लावण्याचें श्रेय जोसेफ ब्लॅक याच्या ऐवजीं मिळालें असतें. १७८६ मध्यें त्यानें एक निबंध प्रसिद्ध केला. त्यांत तो म्हणतो कीं, उष्णता हा जड पदार्थ ( मटीरिअल सब्स्टन्स ) नसून ती पदार्थाच्या अंतस्थ गतीचें बाह्यद्योतक आहे.

पृथ्वीचें विशिष्टगुरुत्व ठरविणें हा त्याचा महत्वाचा शोध होय. पाण्याचें वि. गु. १ धरल्यास पृथ्वीचें वि. गु. ५.४४८ आहे असें त्यानें २९ प्रयोगांची सरासरी काढून दाखविलें. त्याला भूस्तरशास्त्राचाहि नाद असे व त्यानें त्याकरितां सर्व इंग्लंडभर कित्येक वेळां प्रवास केला होता. जार्ज विल्सन यानें कॅव्हिंडिशचें चरित्र लिहिलें आहे. त्याची यंत्रें लंडन येथील रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें ठेवलेलीं आहेत; व केंब्रीज विश्वविद्यालयाला जोडून त्याच्या नांवानें एक रसायनशाळा बांधली आहे.

**कश्यप, वैदिक.**—ऋग्वेदांतील एक सूक्तकार. सर्वानुक्रमणीप्रमाणें याच्या कुलांत ऋग्वेदांतील बरेच सूक्तकार होते (ज्ञान. विभाग ३ पृष्ठ ४८६ पहा). गोत्रप्रवर्तक ऋषींपैकीं हा एक आहे (ज्ञान. विभा. २ पृ. ५१). शतपथ ब्राह्मणांत कश्यपापासून सर्व प्रजा निर्माण झाल्या असा उल्लेख आहे ( शतपत ७. ५, १, ५).

**पौराणिक.**(१)—स्वायंभू मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र जो मरीचि ऋषि, त्यास कर्दमकन्या कला हिच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षींत होता.

(२) वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र मरीचि ऋषीचा पुत्र. यास प्राचेतस दक्षानें आपल्या ६० कन्यांतून तेरा कन्या भार्यार्थ दिल्या होत्या. त्यांच्या नांवांत कांहीं ठिकाणीं फरक आढळतो तरी तेरा संख्या मात्र निश्चित आहे. याच्या कुलांत अनेक मंत्रद्रष्टे झाले आहेत. त्याचप्रमाणें या कुलांतील बऱ्याच व्यक्तींचा गोत्रांत उल्लेख येतो. याचें मारीच असेंहि नांव आढळतें.

**कंस**—यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र जो अंधक, त्याच्या वंशांत जन्मलेल्या उग्रसेन राजाच्या नऊ पुत्रांतील ज्येष्ठ. हा कालनेमि नामक असुरांशानें जन्मला होता म्हणून स्वभावतःच दुष्टबुद्धीचा असे. जरासंधकन्या अस्ति आणि प्राप्ति या दोघी याच्या बायका होत्या. चुलता देवक राजा, याच्या देवकी कन्येचा विवाह वसुदेवाशीं यानें मोठ्या समारंभानें केलाः व त्या वधुवरांस रथारूढ करून आपण सारथी होऊन, नगरांतून मिरवीत निघाला असतां, मार्गांत देववाणीनें त्यास असें सांगितलें कीं या देवकीचा अष्टम गर्भ, तुला मारील. त्यावरून यानें तत्काल देवकीवर खड्ग उपसलें. तेव्हां वसुदेवानें हिला जें जें अपत्य होत जाईल तें तें मी तुला आणून देत जाईन असें कंसाला वचन दिलें. त्यावरून त्यानें देवकीस सोडून दिलें.

वसुदेव बोलल्याप्रमाणें झालेलें अपत्य देतो कीं न देतो अशा संशयावरून त्यास व देवकीस आपल्या समीप प्रतिबंधांत ठेवावें असें कंसाच्या मनांत आलें. परंतु उग्रसेन ही गोष्ट न ऐकेल म्हणून यानें प्रथम उग्रसेनास प्रतिबंधांत ठेविलें व आपण राज्य चालवूं लागला, व वसुदेवदेवकीस प्रतिबंधांत ठेविलें. प्रतिबंधांत असतां देवकीस पहिल्यानेंच पुत्र झाला, तो वसुदेवानें बोलल्याप्रमाणें कंसास देतांच याच्या मनांत त्यास मारूं नये कारण अष्टम गर्भापासूनच आपल्यास भय आहे असें प्रथम आलें; परंतु लागलाच विकल्प येऊन यानें तो बालक मारिला. याप्रमाणें त्यानें देवकीचे सहा पुत्र मारिले. पुढें देवकी सातव्यानें गर्भिणी झाली असतां, तो गर्भ देवमायेनें तिचा जिरून गोकुळांत नंदासमीप वसुदेवाची स्त्री रोहिणी होती तिच्या उदरीं जाऊन ती तिकडे एकाएकीं गर्भिणी झाली. अशा रीतीनें सातवा गर्भ जिरला हें वर्तमान कंसास कळताच त्यानें अष्टमगर्भाविषयीं अतिशय सावधपणा राखिलाः परंतु तो अष्टम बालक जन्मून वसुदेवानें त्यास गोकुलामध्यें नंदगृहीं सुरक्षित पोहोंचवून त्याच समयास त्यास तिकडे झालेली कन्या मथुरेस बंदिशाळेंत आणिली, तेव्हां कंसास देवकी प्रसुत झाली असें कळलें. मग तो लागलाच धावला व त्या कन्येस धरून मारूं लागला;तों ती त्याच्या हातून निसटून आकाशांत अदृश्य झाली. सातवा बलराम व आठवा कृष्ण अशा प्रकारें वांचून गोकुळांत वाढूं लागले.पुढें कंसास असें कळलें कीं,देवकीचे शेवटले दोन पुत्र गोकुळांत वाढत आहेत. म्हणून पूतना, अघासुर, केशी इत्यादि दैत्यांस यानें क्रमाक्रमानें गोकुळांत पाठविलें. त्यांचा वध झाला असतां, याचा निश्चय झाला कीं देवकीचे हे पुत्र होत यांत शंका नाहीं. मग यानें धनुर्यागाच्या निमित्तानें त्यांस गोकुलांतून मथुरेस आणण्याकरितां अक्रूरास पाठविलें त्याप्रमाणें अक्रूर त्यास घेऊन आला असतां चाणूर व मुष्टिक हे मल्ल यानें त्यांवर मल्लयुद्धाच्या मिषानें सोडले.त्यांस उभयतांनीं मारून कृष्णानें तत्काल कंसास धरिलें व त्याच्याच खड्गानें त्याचा शिरच्छेद केला ( भाग १० स्कं. अ. २६ ३६ ४४ ).

**कसबा**—बिहार–ओरिसा. पूर्णिया जिल्ह्यांतील सदर पोटविभागाचें मुख्य ठिकाण. लो. सं. ( १९०१ ) ७६००. हें गांव ईस्टर्नबंगालस्टेट रेल्वेवर असून पूर्णिया जिल्ह्यांतील तांदुळाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. येथून तांदूळ कलकत्यास रवाना होतो. येथें तागाचाहि बराच व्यापार चालतो.

**कसबी**—(कसबीण, कसवण). गाणाऱ्या व नाचणाऱ्या वेश्यांची ही एक जात बनली आहे. कलावंतांपेक्षां ही जात हलकी समजतात. कसब ( म्हणजे शरीरविक्रय करणें) या अरबी शब्दापासून कसबी शब्द तयार झाला आहे. या देशांत नृत्य करणाऱ्या व गाणाऱ्या स्त्रिया वेश्याच असतात. गरती स्त्रियांपेक्षां भाषणांत, गायनांत, नृत्यांत व पोशाखांत वेश्या जास्त कुशल असल्यामुळें हिंदुसमाजांत त्यांची जास्त चहा होत आहे. या बायका प्रवास करीत त्यामुळें निरनिराळ्या समाजांचा अनुभव यांस प्राप्त होई. यांच्याकडून विवाहि करवीत असत त्यामुळें समाजांत यांची विशेष चहा होई, व सभ्य लोकांच्या समाजांत देखील यांचा प्रवेश होत असे. दशकुमारचरितांत एका वेश्या मुलीच्या शिक्षणाचें वर्णन दिलें आहे. त्यावरून यांच्या शिक्षणाची किती काळजी बाळगीत याची कल्पना होईल. सध्यां सर्व लोकांत विख्यात अशा गौहरजान नांवाच्या गाणारिणीनें आपली मुलगी इमतियाजान हिचें शिक्षण, वाचन, लेखन, भाषण, गायन व नृत्य वगैरे बाबतींत किती काळजी घेतली याचें वर्णन एस. एम. एडवर्ड्स यानें बायवेज ऑफ बाँबे या पुस्तकांत केलें आहे. व अजूनहि सभ्य गृहस्थांनीं वेश्यांपासून उत्तम भाषण करण्याची कला शिकण्याकरितां तिच्या घरीं जावें अशी चाल कोठें कोठें दृष्टोत्पत्तीस येईल. यावरून ते वेश्यागमन करतातच असें नाहीं, व सुशिक्षित म्हणविणाऱ्या लोकांत तर ही चाल मुळींच नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

उत्तम प्रकारच्या कसबिणींत विशिष्टजातिबोधक कांहीं कांहीं अंगें दृष्टीस पडतात. मुलीस न्हाण आलें म्हणजे तिचा पहिला संग कोणा श्रीमंत माणसाबरोबर ठरवितात; व तिला विवाहांतील वधूप्रमाणें चार पांच दिवस वागवितात. तेल व हळद तिच्या आंगास ५ दिवस चोळतात. जातीला एक भोजन घालतात व एका कट्यारीबरोबर तिचें लग्न लावतात; व सात वेळ एका लग्नस्तंभाला कट्यारीसह्वर्तमान प्रदक्षिणा घालतात. नंतर तिचा ठरलेला

पुरुष तिला कुंकू लाऊन सातदां पदर घालतो. रात्रीं ती त्या पुरुषाकडे जाते व तो खाऊं घालील तितके दिवस त्याच्या कडे राहाते. हा पुरुष कसबी जातीपेक्षां भिन्न असला पाहिजे. त्या पुरुषाकडून निघाल्यावर तिला धंदा करण्यास मोकळीक मिळते. जात बनल्यामुळें त्यांच्यांत आपल्या धंद्याबद्दल आदर उत्पन्न झालेला दिसतो. व समाजांतहि तितका तिरस्कार दिसून येत नाहीं. व त्यांच्या तारुण्यांत तरी गरती स्त्रियांपेक्षां यांची राहणी जास्त मोहक दिसते. कसबीण आपल्या प्रथम गरोदरावस्थेंत सातव्या महिन्यांत १०८ करंज्या तयार करून स्वतः खाते व आपल्या मैत्रिणींस वाटते व मग तिच्या मैत्रिणी तशाच करंज्या करून तिच्याकडे पाठवितात. बाळंत होण्यापूर्वी गरोदर कसबीण हरबऱ्याच्या पिठानें न्हाते व उत्तम वस्त्रालंकार घालून मैत्रिणींस बोलावून दूध, भात, पुरी व मिठाई खाऊं घालते. यांच्यांत लग्न करण्याच्या चालीचा अभाव असल्यामुळें यांची जात चांगली जोमदार होणें शक्य नाहीं. यांच्या मुलांपैकीं कोणी लग्नें करून गृहस्थ बनतात व निरनिराळे धंदे करतात. कोणी भडवे बनतात; कोणी सारंगिये बनतात. यांच्यांपैकीं कसबिणी व नायकिणी म्हणविणाऱ्या हिंदु असतात, तवाइफ मुसुलमान असतात व बोगम तेलंगी असतात; गोंड जातीच्या आपणांस देवघरनी म्हणवितात. सारंगियांचीहि आतां एक निराळी जात बनत चालली आहे. उत्तरेकडील जिल्ह्यांत नाचणाऱ्या स्त्रिया बेडणी जातीच्या असतात व त्यांस बेडणी म्हणतात. तेथें कापणीच्या सुमारास रात्रीं ३।४ बेडणी जमवून त्यांस दारू पाजून नाचवितात. गांवची तरुण मुलें वाद्यें वाजवितात व कसबिणी थकून खालीं बसेपर्यंत त्यांस नाचवितात. शेतकरी प्रत्येकी एक दोन पैसे देतो व मालगुजार एक रुपया देतो. या नृत्यास राय असें म्हणतात.

बंगाल्यांत अशा प्रकारच्या बायका वैष्णव बनतात; व विधवांचा आणि आळशी बायकांचा यांत फार भरणा होतो. या भीक मागत आखाड्याआखाड्यांतून फिरतात व यांच्यापैकीं पुरुष वैष्णव जरी बंधुभगिनीच्या नात्यानें यांच्याजवळ राहण्याचें सोंग आणतात तरी स्वैर व्यभिचार करण्यांतच त्यांचें आयुष्य जातें. यांच्या संततीची कोठेंच नोंद होत नाहीं. त्यामुळें या बाया बाळंत झाल्यावर मुलांची कशी तरी विल्हेवाट लवीत असाव्या. प्रवास करतांना वाटेंत लागणाऱ्या गांवांतील विवाहित गरती स्त्रियांस व विधवांस यात्रेस नेण्याच्या मिषानें फसवून या आपल्या संप्रदायांत ओढतात. व यामुळें सभ्य लोक या वैष्णवी बायकांस नेहमीं गांवातून कोणत्या तरी निमित्तानें हांकून लावतात. मोठ्या शहरांतून सर्व जातीच्या वेश्या सांपडतात व या स्वतःचें तारुण्य उलटल्यावर आपलें पोट भरावें म्हणून कांहीं मुली पाळतात. निराश्रित झालेल्या मुली यांनां बळी पडतात. जर जातवाल्यांनीं मदत करून निराश्रित मुलींचें लग्न केलें तर बरें नाहींतर अशा बायकांच्या तावडींत सांपडल्यावर फार कठिण. पूर्वीं तर मुली विकण्याचा मोठा धंदा चाले व यूरोपांतील सर्व देशांत तो अजून चालतो.

मुंबई इलाख्यांत ठाणें, बेळगांव, विजापूर, कानडा व रत्नागिरी या जिल्ह्यांतून कसबिणी आढळतात. घरदार सोडलेल्या विवाहित व अविवाहित बायका, विधवा, नवऱ्यानें टाकलेल्या, काडी मोडून दिलेल्या यांसारख्या बायकांतून या जातींत भरती होत असते. अनेक जातींतील बायका कसबिणी होत असल्यानें त्यांच्या अर्थात निरनिराळ्या जाती पडतात. बेळगांव व विजापूर जिल्ह्यांत कसबण नांवाची मुसुलमानी वेश्यांची जात आहे. या बायकांची चालरीत हिंदू बायकांप्रमाणेंच असते. मुसुलमानांच्या कोणत्याहि सामान्य वर्गांत त्या आपणांस गणीत नाहींत. रमजानी किंवा कलावंत आणि टकाई किंवा कमाऊ अशा दोन पोट जाती कसबणांत आहेत. पहिली पोट जात कलावंतिणी सारखी उच्च दर्जाची असून सधन आहे. दुसरी सामान्य वेश्यांची बनलेली आहे. जेव्हां कलावंत कसबण स्त्री वयातीत होते तेव्हां एखादी चांगली मुलगी जवळ बाळगण्याचा तिचा प्रयत्न असतो. तिलाच पुढें आपला धंदा ती बहाल करिते. यांच्यांत मुलींचे दांत काळे करण्याचा मिस्सी नांवाचा समारंभ असतो. ज्ञातिभोजनानें मुलीचा ज्ञातींत प्रवेश होतो व ती तेव्हांपासून धंदेवाईक नायकीण बनते. कसबणांची पुरुषसंतति कांहीं तरी उद्योग करून पोट भरते. कसबण पुरुषांच्या बायका गरती बायकांप्रमाणें रहातात. कसबण हे मुसुलमानी विधी पाळीत नाहींत किंवा काझीलाहि मानीत नाहींत. त्यांचा समाज नायकीण किंवा बाई या नांवानें ओळखिल्या जाणाऱ्या स्त्री वरिष्ठाच्या देखरेखीखालीं सुघटित असा दिसतो. आजकाल ही जात जी खालावली आहे त्याचें कारण असें सांगतात कीं यांचे आश्रयदाते जे सधन मुसुलमान ते गरीब झाले आहेत व नवरे आपल्या बायकांनां पातिव्रत्यभंगाबद्दल टाकून वगैरे देण्यासारख्या कडक शिक्षा करीत नाहींत.

चांगल्या कसबिणी बाहेर निघतांना उंची डागदागिने व तुकतुकित चामड्याचे जोडे घालतात. यांचा पोशाख पुष्कळ नीटनेटका व जेथल्यातेथें असतो, व त्यामुळें या तावडतोब ओळखूं येतात [ रसेल व हिरालाल; एन्थोव्हेन; मुं. गॅ. पु. २१, २३. ]

**कॅसलबार**—हें आयर्लंडमधील मेयो परगण्यांतील बाजाराचें व परगण्याचें शहर, त्याच नांवाच्या नदीवर मिडलन्ड ग्रेट वेस्टर्न रेल्वेच्या मालुला व वेस्टपोर्ट या फांट्यावर वसलें आहे. या शहराची लोकसंख्या १९०१ सालीं ३५८५ होती. येथील न्यायकचेऱ्या व इतर कचेऱ्या एकाच भागांत असून वृक्षांनीं आच्छादित असा एक मोठा रस्ता येथें आहे. या शहरास डे बर्ग घराण्याच्या किल्ल्यावरून जरी हें सांप्रतचें नांव पडलें आहे तरी हें शहर पहिल्या जेम्सच्या वेळीं वसविण्यांत आलें होतें. १६१३ मध्यें या शहरास त्याच्याकडून सनद मिळाली. १६४१मध्यें सर हेनरी बिंघाम

यानें पार्लमेंटतर्फे किल्ला घेतला होता. परंतु लार्ड मेयोनें त्यास शरण यावयास लावलें. १६५३ मध्यें सर थिओबाल्ड-बर्क ( लॉर्ड मेयो ) यास फांसावर चढवून या कत्तलीचा सूड उगविण्यांत आला. १७९८ मध्यें ' कॅसलबार रेसेस ' च्या झटापटींत ल्यूक हचिसनच्या हाताखालीं असणाऱ्या इंग्रज लोकांस फ्रेंच जनरल जे. जे. हम्बर्ट यानें पराजित केल्यानंतर फ्रेंच लोक कांहीं आठवडे येथें होते. या शहरांतून आयरिश पार्लमेंट सभेकरितां यूनिअन पावेतों दोन प्रतिनीधी जात असत. या शहराच्या ईशान्येस ४ मैलांवर टरलॉफ शहर असून तेथें ७० फूट उंच व ५७ फूट परिघाचा एक वर्तुळाकार मनोरा व दुसरे अवशेष आहेत.

**कॅसलरॉक**—मुंबई. उत्तर कानडा जिल्ह्याच्या हल्ल्याळ तालुक्यांतील सुपें पेटयामध्यें ( सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन) असलेलें एक खेडें. येथून गोव्याची सरहद्द तीन मैल असल्यामुळें हें महत्वाचें सरहद्दीवरील ठाणें आहे. हें समुद्र-सपाटीपासून ३,००० फूट उंच असल्यामुळें येथून सभोंवारची निसर्गरमणीय शोभा चांगली दिसते. पोर्तुगीज सरहद्दीच्या पलीकडे कांहीं मैलांवर ' दुधसागर ' धवधवा पाहण्यासारखी आहे. येथें रेल्वेचा दवाखाना असून या गांवामार्फत पोर्तुगीज देशाशीं मोठा व्यापार चालतो. आयात माल भीठ ( सालिना १० लाखांवर ) व निर्गत माल धान्य कापूस वगैरे.

**कसाई**—१९११ च्या खानेसुमारींत एकंदर ३६३१२३ कसाई गणले गेले.त्यांपैकीं ३६०९०० मुसुलमान होते.सर्वांत जास्त वस्ती संयुक्त प्रांत व पंजाब यांमध्यें आहे. पंजाबांत यांनां कसाब असेंहि नांव आहे. यांची मध्यप्रांतांत संख्या सुमारें ४००० आहे. येथें गेल्या १० वर्षांत यांची संख्या फार वाढली. यांच्यांत दोन वर्ग आहेत. एकास गायकसाई व दुसऱ्यास बकरकसाई म्हणतात. ज्या हिंदू लोकांनां हा धंदा उचलला आहे त्यांस खाटिक म्हणतात. मुसुलमान कसायांचीहि एक जात बनली आहे. इतर मुसुलमान यांच्याशीं लग्नसंबंध करीत नाहींत. पण मुसुलमानांच्या चालीरीतींप्रमाणेंच हे लोक वागतात.

कसाई बायका मांसाहारामुळें फार सशक्त असतात. यांच्याविषयीं अशी म्हण आहे कीं कसाई मुलगी १० व्या वर्षीं सुद्धां बाळंत होईल. हे मुसुलमान पीरांची व अवलियाची भक्ति करतात. हे प्रेतांस पुरतात. तिसऱ्या दिवशीं कलमा म्हणून फुटाणे वांटतात. ९ व्या दिवशीं मुसुलमान फकीरांस अन्न देतात. २० व्या व ४० व्या दिवशीं जातीस भोजन घालतात. यांची जात यांच्या धंद्यामुळें फार तिरस्करणीय समजली जाते व त्यांनां ठगाची उपमा देतात

" न देखाहो बाघ तो देख बिलाई
न देखाहो ठग तो देख कसाई"

पशुवधाचा धंदा आजकाल पुष्कळ वाढल्यामुळें कसायांनां प्राप्ति चांगली होत आहे. बऱ्याच हिंदू लोकांस आपली निरुपयोगी गुरें विकून पैसा मिळविण्याचा लोभ वाढत चालला आहे. ब्राह्मण व वाणी खेरीज करून बहुतेक सर्व हिंदू लोक आपलीं म्हातारीं व रोगी गुरें कसायांस विकून पैसा मिळवितात.

मुसुलमान लोक प्राणी मारतांना पहिल्यानें मंत्र म्हणून गळा कापतात व मरण्यापूर्वी प्राण्याचें रक्त जमीनीवर वाहूं देतात. याचें नांव जिवह् किंवा 'हलाल' असें आहे. शिख लोक एका घावानें प्राण्याचें डोकें उडविल्यास तें खाण्याच्या उपयोगांत आणण्याकरितां शुद्ध होतो असें समजतात.

दक्षिणेंतील हिंदू कसायांत धनगर, मराठे, कुणबी या वर्गांचा बराच भरणा असतो. तथापि रीतीरिवाजांत मराठे कुणब्यांहून यांच्यांत फारसा फरक नाहीं ( खाटिक पहा ) [ सेन्सस रिपोर्ट. रिस्ले आणि हिरालाल. एन्थाव्हेन ]

**कसाईखाना**—वेदकालापासून, शस्त्र व गोघात असे खाटिकवर्गाचे वाचकशब्द आढळतात. शस्त्र हा शब्द ऋग्वेदांत एक वेळ व अथर्ववेदांत एक वेळ आलेला आहे;पण त्यावरून या धंद्याची विशेष माहिती मिळत नाहीं. गोघाताचा देखील उल्लेख पुरुषमेधांत आलेला आहे. त्यावरून ग्राम्य पशु मारणारा एक वर्ग होता यांत शंका नाहीं.तो शब्द धंदेवाचकच असला पाहिजे. कां कीं, सामान्यपणें पशू मारणें हें प्रत्येक गृहस्थाचें कर्तव्य होतें. गोघाताला पुरुषमेधांत बळी म्हणून उभा करण्याचा प्रसंग धंदेवाईकासच अनुलक्षून आलेला असला पाहिजे. अतिथी आला तर गाय वगैरे मारावी व मधून मधून शूलगव करावा असे विधी धर्म म्हणून आश्वलायनानें सांगितलेच आहेत. खाटकांचा हा वर्ग असावा व हा विशेषेंकरून गाई मारणाराच असावा. कां कीं, मासे मारणारे धीवर, शेळ्या मारणारे धनगर, वन्यपशू मारणाऱ्या अनेक शिकारी जाती यांचाहि उल्लेख स्वतंत्रपणें करण्यांत येतोच. शूलगव करावयाचा तो गांवाबाहेर जाऊन करावा असें सूत्र आश्वलायन स्मरतो. त्यावरून पशुवध गांवांबाहेर करण्यास प्रारंभ फार प्राचीन काळापासून झाला असावा असें दिसतें.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत उपदेशिलेले पशुवधविषयक नियम येणेंप्रमाणें आहेतः—सरकारी आश्रयाखालील अभयारण्यांत असलेल्या हरीण, गवा, पक्षी व मासे यांनां जो कोणी उपद्रव देईल, ठार मारील किंवा अडकवून ठेवील त्यास मोठा द्रव्यदंड होईल. सरकारी अरण्यांतून जाणाऱ्या गृहस्थास शिक्षा होईल. इतर प्राण्यांनां त्रास न देणाऱ्या पक्ष्यांनां व माशांनां जो त्रास देईल, ठार मारील व पकडील त्यास २६$\frac{3}{4}$ पण दंड होईल; व असें वर्तन हरिण व इतर पशूंच्या बाबतींत केल्यास दुप्पट दंड होईल.

पकडलेल्या पशूंपैकीं $\frac{1}{6}$ भाग अधिकारी घेईल. मासे व पक्षी या बाबतींत $\frac{1}{10}$ किंवा अधिक घेईल व हरिण व इतर मृगपशूंपैकीं $\frac{1}{6}$ किंवा अधिक भाग कर म्हणून अधिकारी घेईल. सरकारी अरण्यांतील

जिवंत पशुपक्षांचा ⅙ भाग सोडण्यांत येईल. समुद्रांत असणारे व मनुष्यकृतीसारखे हत्ती घोडे वगैरे प्राणी, त्याचप्रमाणें बैल व गाढवें वगैरे, तसेंच नदीमध्यें व सरोवरांत असणारे मासे, यांचें सर्व त्रासापासून रक्षण केलें जाईल. त्याचप्रमाणें क्रौंच, उत्क्रोशक, दत्यूह, हंस, चक्रवाक, जीवनजीवक, भृंगराज, चकोर, मत्तकोकिल, मोर, राघु, मैना व इतर शुभ पशुपक्षी यांनां सर्व त्रासापासून अभय आहे. वरील कायदे भंग करणाऱ्यास द्रव्यदंड होईल. खाटिकांनीं नुकत्याच मारलेल्या मृगपशूचें ताजें व अस्थिविरहित मांस विकावें. अस्थियुक्त मांस विकल्यास त्यांनां तितकीच नुकसानी ( प्रतिपाकम् ) द्यावी लागेल. खोटीं मापें योजिल्यास कमी पडणाऱ्या वजनाच्या आठपट हिस्सा त्यांनां द्यावा लागेल. वासरूं, बैल व दुभती गाय यांची कत्तल करूं नये. जो असें करील त्यास ५० पण दंड होईल.

कसाईखान्या( परिसूनम् )पलीकडे मारलेल्या प्राण्यांचें मांस; शीर्षविहीन, पादविहीन व अस्थिविहीन मांस; कुजकें मांस, व अकस्मात् मृत झालेल्या प्राण्याचें मांस विकूं नये. नाहीं तर गुन्हेगारास १२ पण दंड होईल. सरकारी रानांतील जनावरें, वन्यपशु व व्याळ जर मत्त झाले तर त्यांनां पकडावें किंवा अरण्याबाहेर ठार मारावे ( कौटिलीय अर्थशास्त्र, अध्याय २६ ).

मुसुलमानी काळापासून या धंद्यामध्यें एक नवीन रिवाज शिरला; तो म्हणजे हाल हाल करून मारणें हा होय. मुसुलमानांकडून समंत्रक हत्या करवून घेऊन आज हिंदू मांस खाऊं लागले आहेत. आर्वाचीन हिंदुस्थानामध्ये कसाईखान्यासंबंधाचे नियम यूरोपीय अनुभवावरून लावण्यांत येऊं लागले आहेत.

ग्रेटब्रिटन व आयर्लंडमध्यें कत्तलखाने दोन प्रकारचे आहेत. खाटिकांनीं चालविलेले खासगी कत्तलखाने व अधिकाऱ्यांनीं चालविलेले सार्वजनिक कत्तलखाने असे ते दोन प्रकार आहेत. इ. स. १८७५ चा सार्वजनिक आरोग्याचा कायदा पास होण्यापूर्वी खासगी कत्तलखाने विनपरवानगीनें उघडले जात असत. खुद्द लंडन शहरांत इ. स. १८५५ पासूनच पूर्ण मुभा ठेवलेली होती. खासगी कत्तलखाने दुकानाच्या पिछाडीस असून तेथेंच मांसाची विक्री करतात. प्राण्यांची कत्तल करण्याची तेथें स्वतंत्र दालनें असून कांहीं गुरें कोंडवाड्यांत राखून ठेवलेलीं असतात. हे कत्तलखाने कसे असावे याविषयीं सार्वजनिक आरोग्यविषयक कायद्याचीं कांहीं कलमें आहेत व त्यांअन्वयें तेथें सपाट फरशी असावी व कत्तलींत माती वगैरे उडूं नये अशी व्यवस्था केलेली असते. गुरांनां जातांना अडथळा होऊं नये म्हणून विस्तीर्ण दरवाजे असावे; कोंडवाड्यांतील फरशी चांगली असावी, व भिंतीला सिमेंट केलेलें असावें; पाणी भरपूर असावें, इत्यादि योजना वरील कायद्यानें काळजीपूर्वक केलेल्या आहेत. नांदत्या घरांजवळ असलेल्या खासगी कत्तलखान्यांमुळें लोकांनां बराच त्रास पोंचतो. गांवांतून गुरें नेणें धोक्याचें असून शिवाय मांसाची सरकारी पाहणीहि बरोबर होत नाहीं. यामुळें सार्वजनिक कत्तलखानेच दिवसेंदिवस लोकसंमत होऊं लागले आहेत.

सार्वजनिक कत्तलखाना ही एक पुरातन संस्था असून तिचें मूळ अगदीं रोमन सुधारणा व संस्कृतीपर्यंत जाऊन पोंचतें. ख्रिस्तीशकापूर्वी ३०० वर्षे रोममध्यें उघड्या बाजारांत प्राण्यांची कत्तल होत असे. पुढें खाटकांच्या सोयीकडे लक्ष देऊन त्यांनां हा धंदा करण्यास टायबर नदीच्या तीरावर जागा देण्यांत आली. तेथें मॅसेलस नांवाच्या रोमन नागरिकाचा कसाईखाना होता. लेव्हीच्या वेळीं वरील नागरिकाच्या स्मरणार्थ मॅसेलम–कसाईखाना होता; व हाच मॅसेलम शब्द थोड्या फरकानें, पण एकाच –कसाईखाना या–अर्थी इटालियन, जर्मन व इंग्रजी भाषेंत आढळतो.

मध्ययुगीन जर्मनींत कुटेलहोफ नांव धारण करणारे सार्वजनिक कसाईखाने अनेक होते व ते बहुधा नदीच्या तीरावर असत. त्यांची मालकी खाटिक–मंडळाकडे असे. परंतु सर्वच खाटिक त्या मंडळाचे सभासद नसत. १८६८ व १८८१ सालीं प्रशियांत व इतर जर्मन संस्थानांत कांहीं कायदे झाले व त्यामुळें शहरांत कत्तल केले जाणारे प्राणी सार्वजनिक कसाईखान्यांतच कत्तल केले गेले पाहिजेत असें ठरलें.

पंधराव्या व सोळाव्या शतकांत फ्रान्समध्यें प्रमुख शहरीं सार्वजनिक कसाईखाने असत. प्राण्यांची हत्या करणाऱ्या कोणत्याहि मनुष्यास तेथें मोकळीक असे. १८०७ व १८१० सालीं फ्रान्सच्या सर्व शहरांतून कसाईखाने उघडावे असा हुकूम झाला. १८३८ मध्यें नवीन कायद्यानें ही संख्या वाढविण्यांत आली व ते राहत्या वस्तीपासून दूर असावे असें ठरलें. १८६७ सालीं लाव्हिलेट हा प्रसिद्ध कसाईखाना पॅरिसकरितां सुरू करण्यांत आला. बेलजम, स्वित्झर्लंड ऑस्ट्रिया, नार्वे, स्वीडन, डेन्मार्क व रुमानिया येथें बरेच सार्वजनिक कसाइखाने आहेत. परंतु या बाबतींत सर्वांपेक्षां खरी प्रगति जर्मनीची झाली आहे. १८९७ सालीं जर्मनींत ३२१ सार्वजनिक कसाईखाने होते. १९०६ सालीं प्रसिद्ध केलेल्या एका पुस्तकांत जे. डी. लेव्हर्डो असें लिहितो कीं, जर्मनींत ८३९, इंग्लंडांत ८४, फ्रान्समध्यें ९१२ व आस्ट्रियांत सुमारें २०० असे एकंदर २०३५ कसाइखाने आहेत.

इ. स. १८४८ च्या व १८७५ च्या सार्वजनिक आरोग्य कायद्याप्रमाणें स्थानिक अधिकाऱ्यांनां सार्वजनिक कसाईखाने उघडण्याबद्दल पूर्ण मुभा असली तरी वर्षाचें नियंत्रण घालण्यापलीकडे, खासगी कसाईखान्यावर पूर्ण नियंत्रण घालणें त्यांनां जड होऊं लागलें आहे. मनुष्यभक्ष्य म्हणून मांसाची विक्री करण्यापूर्वी त्या मांसाची तपासणी करण्यास कडक कायदा अस्तित्वांत नसल्यामुळें फार गैरसोय होत असे. परंतु

आतां कत्तलीपूर्वी व नंतर जनावरांची व मांसाची अनुक्रमें तपासणी होते. ही पद्धत बेलजम, जर्मनी, नॉर्वे व स्वीडन, आस्ट्रियाहंगेरी येथें अमलांत आली आहे. न्यूझीलंडसारख्या ब्रिटिश कॉलनीमध्येंहि आता सार्वजनिक कसाईखान्यांतच जनावर मारावें व मांसाची तपासणी व्हावी अशी योजना सुरू झाली आहे.

सार्वजनिक कसाईखाने कसे असावे यासंबंधीं नकाशे व रचना मांडून भरपूर माहिती देण्यांत जर्मन ग्रंथकार मोठे वाकबगार आहेत. त्यांच्या वर्णनाप्रमाणें कसाईखाने वस्तीपासून फार दूर असावे व तेथें जाणारे रस्ते लांब रुंद असावे एखादा रेल्वेचा फाटाहि त्यांनां जोडलेला असावा. कसाईखान्याचा आकार समकोनाचा किंवा चौकोनी असा असावा; जवळच गुरांचा बाजार असावा व तेथून जनावरें रेल्वेनें कसाईखान्याकडे न्यावीं. डॉ. ऑकसर स्कवार्झ आणखी त्या इमारतीचें असें वर्णन करितो कीं, तेथें एक कारभाराचें स्वतंत्र दालन असतें, कत्तलीकरितां एक मोठा हॉल असतो, आजारी जनावरांकरितां जागा असते, इंजिनाकरितां जागा असते आणि कत्तल झालेल्या जनावरांचीं आंतडीं स्वच्छ करून व पुढील व्यवस्था करून त्यांचें पृथक्करण करण्याकरितांहि एक स्वतंत्र दालन असतें. मुबलक हवा, प्रकाश व पाणी यांचीहि तेंथें व्यवस्था असते. सर्व उपकरणें व फरशी स्वच्छ केलेली असते.

कत्तलीच्या धंद्याचें केन्द्रीकरण (समाकर्षण)केल्यामुळें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील कत्तलखाने यूरोपमधील कसाईखान्यावरहुकूम नाहींत. इ. स. १८९०–१८९१ व १८९५ सालच्या काँग्रेसच्या कायद्याप्रमाणें तपासणीचें नियंत्रण घालण्याचा येथें प्रयत्न करण्यांत आला. अध्यक्ष रूझवेल्ट यांनीं चौकशीकमिटी नेमली व तिच्या रिपोर्टाप्रमाणें १९०६ सालीं मांसतपासणीचा कायदा पास करण्यांत आला. प्रत्येक जनावर, मेंढी व डुकर यांची तपासणी करून मग त्यांनां कसाईखान्याकडे पाठविणें, व नतर मांसाची तपासणी करणें, असे दोन निर्बंध घालण्यांत आले.

शिकागो व इतर अमेरिकन कसाईखान्यांचा हा विशेष आहे कीं, प्राण्यांचे जीव तत्काल व सुटसुटीत रीतीनें तेंथें घेतले जातात. प्रत्येक प्राण्याला एका अरुंद गोठ्यांत कोंडून व त्याच्या डोक्यावर जबर प्रहार करून त्याची संवेदनाशक्ति कमी केली जाते. नंतर त्या अरुंद गोठ्याच्या फटींतून त्याचा विस्तीर्ण कसाईखान्यांत प्रवेश होतो, तोंच त्याचे पाय वेगळे होऊन धड तारेच्या दोरामुळें एकदम वर उचललें जातें. नंतर त्याच्या गळ्यांत सुरी भोसकून धड तारेवर लटकावितात व लाडसावरुन तें तावडतोब विशिष्ट स्थलीं नेलें जाऊन त्याची सर्व व्यवस्था लागते.तेथील कसाईखान्यांत४००च्या वर जनावरें फक्त एका तासांत कत्तल केलीं जातात. यावरून या धंद्यांतील व्याप व सुधारणा केवढी जबर झाली आहे याची कल्पना होईल. १९०४ सालीं एका ब्रिटिश डिपार्टमेंटल कमिटीनें प्राण्यांची कत्तल भूतदयार्द्र होऊन केली जावी असा अभिप्राय दिला व शिफारस केली कीं, कत्तलीपूर्वी प्राण्यांची संवेदनाच नष्ट होईल असें ठरावें व जनावरें वेगवेगळीं ठेवण्याची व्यवस्था तेथें करावी. वरील ब्रिटिश कमिटीनें दयायुक्त कत्तल कशी करावी यावद्दल अनेक प्रयोग केले व त्यांतच ग्रूनियू व बॅक्स्टर झांपड, दि ग्रीनर पेटंट किलर, विलटूश शस्त्र आणि बॅकेटपंच अशीं साधनें तत्काल प्राण घेण्याकरितां सुचविलीं आहेत. शिरच्छेदकारक कुऱ्हाड हेंच कमिटीच्या मतें उत्तम साधन असून वासरें मात्र डोक्यावर प्रहार करूनच मारावी असें दयायुक्त-कत्तलीबद्दल वरील ब्रिटिश कमिटीचें मत आहे.या सर्व सुधारलेल्या प्राणघातक साधनांची एवढी प्रगति झालेली आहे कीं प्रो. स्टार्लिंगच्या रिपोर्टाप्रमाणें पाहिलें तर ५ ते ३० सेकंदांत सुरी खुपसणें व प्राण घेणें किंवा पूर्ण अशी मूर्च्छा आणणें या गोष्टी सहज होतात.ज्यू लोकांची कत्तलीची पद्धत प्रो. स्टार्लिंग व सर मायकेल फॉस्टर व ब्रिटिश कमिटी यांनां मुळींच पसंत नाहीं. कां कीं, प्राण्यास ठोसा देऊन मूर्च्छा आणणें, त्यांच्या वेदना कमी करणें व त्यांच्या प्राणाची तत्काल मुक्तता करणें या भूतदयायुक्त योजना ज्यू लोकांच्या कत्तलीच्या पद्धतींत सांपडत नाहींत.

यूरोपियन राष्ट्रांत तपासणीची आवश्यकता सर्वांनांच भासूं लागली. जनावरें तपासणें, त्यांचें मांस भक्षणाकरितां तपासून पहाणें, अशी तपासणी करण्याकरितां सार्वजनिक कसाईखाने उघडणें, व धंद्याच्या दृष्टीनें या गोष्टींचा फायदा जाणणें या सर्व गोष्टी लक्षांत घेतां खासगी कसाईखान्यांच्या उणीवाच जास्त स्पष्ट होतात व साहजिकच सार्वजनिक कसाईखान्याकडे लोकप्रवृत्ति वळते. शिवाय मांसाच्या किंमतींतहि सार्वजनिक कसाईखान्यामुळें कोणतेहि अनिष्ट परिणाम घडून येत नाहींत असं दिसून आलें आहे.

**कॅसाब्लांका**— ( दार इलबैदा–शुभ्रगृह )हें बंदर मोरोक्को देशांत अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावर आहे. हें मध्यमोरोक्कोचें लोंकर व धान्याचें बंदर असून मुरीश किनाऱ्यावरील तिसऱ्या प्रतीचें शहर होय. १९०७ सालीं येथें बंदराची सुधारणा होण्यास सुरुवात झाली. १८९० ते १९०७ पर्यंत प्रतिवर्षी ७५०००० पौं. परकीय देशांशीं व्यापार झाला. १९०८ मध्यें बिर-रेशीदपर्यंत रेल्वे झाली. हीच मोरोक्कोंतील पहिली रेल्वे होय. येथील लोकसंख्या सुमारें २०,००० आहे. पोर्तुगीजांनीं अँफा शहराचा नाश करून ( इ. स. १४६८ ) तेथें कॅसाब्लांका शहर वसविलें. परंतु त्यांनां लवकर तें सोडून जावें लागलें. १९०७ मध्यें येथें फ्रेंच व स्पॅनिश कामकऱ्यांचे कांहीं खून झाले. त्यावरून फ्रेंचांनीं ह्या शहरावर तोफा डागल्या व कांहीं दिवस आपला ताबा बसविला.

**कसई.**—याला इंग्रजींत कॉइक्स, जॉब्स टिअर्स; संस्कृतमध्यें काश; हिंदी काश इत्यादि नांवें आहेत. यास कासें गवत असेंहि म्हणतात.

इ ति हा स.—याचें बीं माळेचे मणी करण्याकडे उपयोगांत आणीत असत. पौरस्त्य देशांत त्याचा अन्नाप्रमाणें उपयोग होत असे. ह्या झाडाचें बी रेषांकित असतें. आर्यवैद्यकांत व वैदिक वाङ्मयांत या खाद्य धान्याचा उल्लेख केला आहे व आर्यन् लोकांनीं हिमालयाच्या पायथ्याशीं त्याची लागवडहि केली होती " असें म्हणतात.

अरब लोकांनीं ह्या धान्याला " दामु दाउद " ( डेव्हिडचें अश्रू ) तसेंच " दामु अयूब " ( जॉबचे अश्रू ) अशीं नांवें दिलीं होतीं. कसेई हें एक प्रसिद्ध शक्तिवर्धक व मूत्ररेचक औषध आहे. अरब लोकांनीं ह्याचीं झाडें यूरोपांत नेलीं. स्पेन व पोर्तुगाल या देशांत तीं आतां स्थानिक झालीं आहेत. तेथें त्यांनां ' लॅगिमादे जॉव ' असें नांव आहे.

हल्लीं या खाद्य धान्याची लागवड फक्त मंगोलियन लोक करतात. त्यांच्याकडूनच या धान्याचा प्रसार प्रथम हिंदुस्थानांत झाला असावा.

ह्या झाडाच्या दोन रानटी जाती असून त्यांपैकीं लॅक्रिमा जॉवी ही जात सर्व उष्णकटिबंधांतील प्रदेशांत व समशीतोष्ण प्रदेशांत आढळते. जिगांटिआ हें झाड फक्त उष्णकटिबंधातील प्रदेशांतच मिळतें व तें हिंदुस्थान व ब्रम्हदेश यांमध्येंच आहे असें म्हटलें तरी चालेल. लॅक्रिमा, जॉवी या जातींच्या स्टेनोकार्पा, मॉलिनिफेर व माआन या तऱ्हांची लागवड करून त्या परिणत झालेल्या आढळतात. यांपैकीं पहिली ब्रह्मदेश, मलाया, चीन व जपान या देशांत लावतात. दुसऱ्या जातीचीं फळें माळेच्या मण्यांप्रमाणें असतात. तिसरी जात खाण्याच्या उपयोगाची असून तिची लागवड मध्यप्रांत, सिकिम, खासिया टेंकड्या, ब्रम्हदेश व शान संस्थान यांमध्यें करितात. कोचीन चीन व मलाया ह्यांमध्येंहि हीं झाडें लाविलीं जातात.

दुष्काळांत माधुआनचें पीक बुडालें तर ह्या झाडाच्या रानटी जातीच्या पिकांचाहि खाण्याकडे उपयोग केला जातो. या रानटी जातीच्या धान्याची कवची जशी कठिण असते तशी लागवड केलेल्या जातीच्या धान्याची नसते व हें धान्य सहज दळलें जातें.

खासिया टेंकड्यांमधील या धान्याच्या लागवडीसंबंधानें जे. डी. हुकरनें ' हिमालयन जर्नल ' मध्यें कांहीं माहिती लिहून ठेविली आहे. तो म्हणतो " प्रत्येक झाडाला ( वर्षांतून ) दोनदां किंवा तीनदां बुडाशीं फांद्या फुटतात व एक चौरस यार्डामध्यें ७ ते ९ झाडें होतात. याचें पीक फार थोडें होतें. पेरलेल्या धान्याच्या ३०–४० पटींपेक्षां जास्त पीक होत नाहीं. " " ब्रम्हदेश व तेथील लोक " ( १८६० ) या लेखांत मेसननें कांहीं उपयुक्त माहिती लिहून ठेविली आहे. तो म्हणतो " लागवडीमुळें या रानटी झाडाचें बी ढिसूळ होऊन गोड बनलें आहे " व त्याची चव गव्हाप्रमाणें आहे.

हिंदुस्थानांत या पिकाची लागवड वरीच विस्तृत प्रमाणांत होते. याच्या धान्याचे परिमाण, आकार, व रंग इत्यादि कारणांनीं त्याचें निरनिराळे वर्गीकरण झालें आहे. दार्जिलिंग, उत्तर व पूर्व आसाम, खासिया, गारो व नागा टेंकड्या, ब्रम्हदेश व शान संस्थान, येथें हें धान्य चांगलें पिकतें व हें ह्या प्रांतांतील मुख्य धान्य आहे.

कांहीं जातींचें कसेई धान्य भाजतात व नंतर त्याची कवची काढतात व कांहीं जातींचें धान्य न भाजतांच दळतात. या निरनिराळ्या धान्य तयार करण्याच्या व तें खाण्याच्या तऱ्हांवरून या धान्यांत रासायनिक व घटनात्मक असे पुष्कळ प्रकार असावेत असें दिसतें.

जपानच्या शेतकी मंडळानें जपानांतील उपयुक्त वनस्पति या पुस्तकांत या धान्याला टोमागी अथवा हटोमागी असें नांव दिलें आहे. हें धान्य कोरडवाहू जमीनींत होतें. चहाऐवजीं या धान्याचा काढा करून पितात. डु कैलांड यानें रोग्यांनां ह्या धान्याची पेंज द्यावी अशीहि शिफारस केली आहे. चिनी लोक या धान्याचा रस्सा करितात.

नागा टेंकड्यांवरील प्रदेशांत हें धान्य आंबवून त्यापासून दारू काढतात. ह्या दारूला " ज्जु " हें नांव आहे. चांगल्या धान्याची दारू पुष्कळ दिवस टिकते. या दारूची चव सफरचंदाची दारू व ताक यांप्रमाणें कांहींशी असते. कांहीं प्रकारचें कसेई धान्य सुवासिकहि असतें.

औ ष धी गु ण ध र्म.—हें रक्तशुद्धि करणारें तसेंच उत्तम मूत्ररेचकहि आहे. उन्हाळ्यांत थंडाईसारखा याचा उपयोग करतात. ह्यामध्यें रोगजनक हवा व पाणी शुद्ध करण्याचे गुणधर्म आहेत असा कांहीं लोकांचा समज आहे. हिंदुस्थानांत या धान्याचे औषधी गुणधर्म फारसे माहीत नाहींत. संताळ लोकांमध्यें मूत्रकृच्छ्र व आर्तव रोगावर कसेईच्या झाडाचें मूळ देतात, असें डॉ. कँवेल म्हणतो.

रा सा य नि क गु ण ध र्म.—या धान्यावरील प्रयोगांचे अनुभव वेगवेगळाले आले आहेत. त्यांमध्यें असणाऱ्या रासायनिक द्रव्याचें सर्वसाधारण मान पुढें दिलें आहे.

जंगलांतील धान्यांत पौष्टिक अंश १ः ३.८ असतो व शेतांतील धान्यांत १ः ४.४ असतो व त्याचें शेंकडा प्रमाण अनुक्रमें ८९ व९० असें आहे.

या धान्यांतील अल्ब्युमेनचें प्रमाण द्विदलधान्यामधील प्रमाणावरोबर असून त्यामधील स्नेहांश व चरवी हीं बहुतेक खाद्यधान्यापेक्षां जास्त असतात.

व्या पा री व घ र गु ती उ प यो ग.—ह्या धान्याच्या रानटी जातीचें धान्य हिंदुस्थानांत व यूरोपखंडांत माळेचे मणी करण्याकडे उपयोगांत आणिलें जात होतें. हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांमधील मूळच्या जंगली लोकांत याचा उपयोग दागिने करण्याकडे करीत. टोपल्या, पाकिटें, कपडे इत्यादि जिनसा सुशोभित करण्यांकडेहि याचा उपयोग करितात. नेपाळ, अयोध्या व हिंदुस्थानचा मध्यवर्ती डोंगरसपाटी

वरील प्रदेश यांमध्यें हें धान्य शेतीचें सामान व गुरें हीं सजविण्याकडे योजिलें जातें. ब्रम्हदेशांतील करेन लोकहि या धान्याचा असाच उपयोग करतात. अंगामी नागा हे लोक या धान्याच्या कानांतील बाळ्या करितात.

व्या पा र.—जपानमध्यें या धान्याचे दरवाज्यासमोर लावण्याचे चिकाच्या पडद्यांसारखे पडदे करितात. व्यापारी दृष्ट्या ह्या धान्यापैकी रानटी जातीचें धान्य विशेष उपयोगाचें आहे. कारण रानटी धान्याचें टरफल तुळतुळीत असून निनिराळ्या रंगाचें असतें. लागवडीनें हें टरफल मऊ पडून त्याचा तुळतुळीतपणाहि नाहींसा होतो. यूरोपखंडांतील व्यापाऱ्यांनां रानटी धान्याचा जास्त उपयोग करतां येतो. तुतारीवरील नक्षीदार काम, कृत्रिम कळ्या व फुलें, हीं तयार करण्याकडे मुख्यत्वेंकरून या धान्याचा यूरोपमध्यें उपयोग करतात [ वाट; पदे. ].

**कसौली**—पंजावांतील डोंगरी ठाणें व छावणी. उ. अ. ३०°५३' व पूर्व रेखांश ७६°५८'. काल्का–सिमला रेल्वेवरील काल्का स्टेशनापासून हें ९ मैल दूर आहे व सिमल्याहून २२ मैल आहे. याच्या भोंवतालचा सर्व मुलूख एतद्देशीय संस्थानिकांच्या ताब्यांत आहे; परंतु हें ठिकाण राज्यव्यवस्थेच्या कामाकरितां अंबाला जिल्ह्यांतील खरर तहशिलीला जोडलेलें आहे. काल्कापासून हें सुमारें ९ मैलांवर असून या ठिकाणची उंची समुद्रसपाटीपासून ६३३५ फूट आहे. लो. सं. (१९११) ३१९४. इ. स. १८४२ त कसौली हें लष्करी ठाणें म्हणून वसविलें होतें. परंतु हल्लीं तें आजारी माणसांकरितां हवा खाण्याचें ठिकाण झालें आहे. उन्हाळ्यांत येथें पुष्कळ लोक रहावयास येतात व त्यांच्या सोयीकरितां येथें उपहार गृहें अथवा खाणावळी उघडण्यांत आल्या आहेत. परंतु सपाटीच्या प्रदेशापासून हें अगदीं जवळ असल्यामुळें हवेच्या दृष्टीनें पंजावमधील हवाखाण्याच्या ठिकाणांत हें सर्वांत कमी प्रतीचें ठरतें. ह्या ठाण्याची व्यवस्था येथील छावणीच्या मॅजिस्ट्रेटकडे असते. यूरोपियन शिक्षकांकरितां एक शाळा, किंग जॉर्ज आंग्लो–व्हर्नाक्युलर हायस्कूल, लॉरेन्स मिलिटरी असायलम यांसारख्या शिक्षणसंस्था आहेत. तसेंच पिसाळलेल्या जनावरांचा दंश झालेल्या माणसांनां उपचार करण्याकरितां येथें १९०१ सालीं पाश्चूर संस्था स्थापन झाली असून तेथें उत्तर हिंदुस्थानच्या सर्व भागांतील रोगी उपचाराकरितां जातात. १९०६ सालीं येथें एक संशोधनशाळा स्थापण्यांत आली. या शाळेंत मनुष्याचे रोग बरे करणाऱ्या लसी तयार करण्यांत येऊन शिवाय हिंदुस्थानांतील रोगासंबंधानें शास्त्रीय शोध लावण्याचीं साधनेंहि ठेवलेलीं आहेत. कसौली हें पंजाव नर्सिंग असोसिएशनचें मुख्य ठिकाण आहे.

**कॅस्टेलर ई रिपोल एमिलिओ**–( १८३२–१८९९ ) हा एक स्पॅनिश मुत्सद्दी होता. याचा जन्म केडीज येथें ता. ८ सप्टेंबर १८३२ रोजीं झाला. प्रथम यानें १८४८ सालीं कायद्याचा अभ्यास सुरू केला. नंतर कांहीं दिवसांनीं त्यानें वाङ्मय व तत्वज्ञानाच्या शाळेंत प्रवेश होऊन तेथेंच १८५३ सालीं याला डॉक्टर ही पदवी मिळाली. १८५४ सालीं झालेल्या स्पेनच्या राज्यक्रांतीच्या वेळीं तो लोकसत्तावादी असून त्या सालीं भरलेल्या उदारमतवाद्यांच्या व लोकसत्तावाद्यांच्या सभेंत यानें आपलें पहिलें राजकीय भाषण केलें. हें भाषण इतकें उत्तम वठलें कीं त्यानंतर याची प्रमुख राजकारणी पुरुषांत गणना होऊं लागली. या वेळेपासूनच याला वाङ्मय, इतिहास व राजकारण या विषयांचा नाद लागला. १८६६ च्या राज्यक्रांतींत त्याला फांशीची शिक्षा झाली असतां तो पळून फ्रान्समध्यें गेला व १८६८ त जेव्हां राज्यक्रांति सफळ झाली. तेव्हां तो परत आला, तेव्हां याला माद्रीद विद्यापिठांत इतिहासशिक्षकाच्या जागीं नेमलें. याच वेळीं ह्या कोर्टेस प्रतिनिधिसभागृहाचा सारागोसा प्रांतातर्फे सभासद म्हणून निवडून आला. येथें यानें लोकसत्तावाद्यांचा पुढाकार घेऊन राज्यक्रांतीनंतर संयुक्त प्रजासत्ताक राज्य स्थापन करणें सयुक्तिक आहे असें प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. याचें मत असें होतें कीं, स्पेन देशांतील कांहीं भागांच्या इच्छेनुरूप तेथील स्विस संयुक्त राज्यपद्धतीचें स्थानिक व प्रांतिक स्वरूप कायम ठेवून तेथें अमेरिकन राज्यपद्धतीसारखी लोकसत्ताक राज्यपद्धति आणावी. मुत्सद्द्यांत मात्र राज्यपद्धतीबद्दल मुळींच एकवाक्यता नव्हती. हा १८७३ त लोकसत्ताक राज्याचा परराष्ट्रीय प्रधान झाला. यावेळीं देशांत अति विकट स्थिति उत्पन्न झाली होती. सैन्यांत, प्रतिनिधिसभेंत व साऱ्या राज्यकारभारांत गोंधळ माजला होता. तेव्हां सर्वांनीं याला कार्यकारी मंडळाचा मुख्य केलें. याप्रमाणें राज्यसूत्रें हातीं आल्यावर यानें लष्करांत सुधारणा करून सैन्य वाढविलें, धार्मिक छळ बंद केला व जमाबंदीची नीट व्यवस्था लाविली. परंतु लोकांनां याचीं कांहीं मतें पसंत न पडल्यानें ता. २ जानेवारी १८७४ रोजीं याला आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला. यानंतर १८७६ त हा पुन्हां प्रतिनिधि सभेचा सभासद झाला. त्या सभेंत यानें १८९१ पर्यंत सभासदाचें काम करून सर्वांस मत देण्याच्या हक्काचा कायदा पसार झाल्यावर आपल्या राजकीय आयुष्याची समाप्ति केली. पुढें पुढें याचीं मतांतरें होत होत हा अखेरीस उदारमतवादी बनला होता. यानें पुष्कळ ऐतिहासिक ग्रंथ व कादंबऱ्या लिहिल्या. हा ता. २५ मे १८९९ रोजीं मरण पावला.

**कस्तुरी व कस्तुरीमृग**–कस्तुरी ज्या हरिणाच्या शरीरापासून मिळते त्यास इंग्रजींत मस्क् डीअर व संस्कृतामध्यें कस्तुरीमृग हीं नांवें आहेत व कस्तुरीस लॅटिनमध्यें मोलस्कस मोश्चिफेमिस; इंग्रजीत मस्क, संस्कृतामध्यें मृगमद, कस्तूरिका, मृगांडजा, फारसी भाषेंत मुष्क; हिंदी, कानडी व मराठी भाषेंत कस्तुरी इत्यादि नांवें आहेत.

दोन कस्तुरीमृग एके ठिकाणीं क्वचितच आढळतात. हीं जनावरें डोंगराच्या उतारावर दाट झाडींत रहातात. हे फार

चपल असून उड्या मारीत जातात.हे निशाचर असून आकारानें ग्रे हाउंडपेक्षां फार मोठें नसतें. सर्व रंवथ करणाऱ्या जनावरांपेक्षां ह्याला खावयाला फार थोडें लागतें. नुसत्या खुल्या खडकाळ प्रदेशांतील मृगांपेक्षां डोंगरावरील अरण्यांत रहाणारे मृग चांगले असतात. यांनां जानेवारीमध्यें माज येतो. यांचा गर्भ १६० दिवसपर्यंत रहातो व प्रत्येक वेळीं यास एक पाडस होतें.

व स्तु क्षे त्र.—गिलगितच्या पश्चिमेस व सिक्किमच्या पूर्वेस हिमालयांत ८००० पासून १२००० फूट उंचीवर तिबेटमध्यें व मध्य आशियांत सैबेरियापर्यंत हे मृग आढळतात.

उ प यो ग.—कस्तुरीमृगाच्या वेंबींतील गांठींत असलेल्या पदार्थाला कस्तुरी म्हणतात.तो पदार्थ गोठलेल्या रक्तासारखा व स्निग्ध असून त्याला तीव्र सुवास असतो. कस्तुरीमृग मस्त झाले म्हणजे त्यांची वेंबी वाढत जाऊन हा पदार्थ तयार होतो. एका जनावरापासून सरासरी १ औंस कस्तुरी मिळते. एका गांठीची किंमत १० पासून १५ रुपयांपर्यंत येते. कस्तुरीमृगाचें मांस चवदार असतें पण त्याला कस्तुरीचा सुवास येत नाहीं.

व्यापारीदृष्ट्या कस्तुरीचे मुख्य तीन प्रकार आहेत. ( १ ) कबर्डियन अथवा रशियन, ( २ ) आसामी व ( ३ ) टँकिन अथवा चिनी. हिमालयांतील कस्तुरी फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. १५१९ त बाबरानें तिचा उल्लेख केला आहे. परंतु अलीकडे या कस्तुरीची मागणी कमी झाली आहे.

नि र्ग त—हीं १९०६–०७त ६६८ औंस, किंमत रु.१४५००. झाली. उत्तम दाणेदार कस्तुरीची इंग्लंडच्या बाजारांतील अलीकडील ( सुमारें १९०४ ) किंमत एक औंसाला ७२॥ ते ७५ शिलींग होती. अलीकडे रासायनिक पद्धतीनें कृत्रिम सुगंधी द्रव्यें तयार होऊं लागलीं आहेत. यामुळेंच कदाचित कस्तुरीची मागणी दिवसेंदिवस कमी होत असावी. बारीक ज्वर, अशक्तता, खोकला, अपस्मार, फेंफरें, नपुंसकत्व वगैरे विकारांवर निरनिराळ्या अनुपानानें कस्तुरी देतात. [ बाट; वैद्यक शब्दसिंधु;सेनगुप्त–आयुर्वेदिक सिस्टिम ऑफ मेडिसिन; मार्को पोलो; ट्रॅव्हल्स २. ३५; बाबर, मेमॉयर्स ३१३ वगैरे. ]

**कहरोर**—पंजाब इलाखा. मुलतान जिल्हा. लोध्रण तहसिलींतील एक गांव. उत्तर अक्षांश २९ ३७′ व पूर्व रेखांश ७१° ५६′. बिआस नदीच्या जुन्या पात्राजवळ हा गांव वसलेला असून सतलज नदीच्या हल्लीच्या दक्षिण ( उजव्या ) तीरापासून आठ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ५५५२. उंचसखल जागेवर हा गांव असल्यामुळें हा गांव पंजाबांतील इतर गांवांपेक्षां अधिक शोभिवंत दिसतो. चवदाव्या शतकाच्या अखेरीस हा गांव जेसलमीरचा संस्थानिक कैलुन यानें वसविला असें म्हणतात. करूर येथें राजा विक्रमादित्यानें श्वेतहूणांचा पराभव केला, तेंच हें गांव असावें असें म्हणतात. परंतु हा शोध संशयास्पद धरला जातो. अली सरवर याचा दरगा अत्यंत प्राचीन आहे. हा दिल्लीचा सय्यद असून तो इ. स. १२०४ सालीं येथें आला. इ. स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. तिचें इ. स. १९०३–४ सालीं उत्पन्न ४३०० रुपये व खर्च ४००० रुपये होता. मुलतान जिल्ह्याच्या सतलज नदीकांठीं ज्या तहशिली आहेत त्यांचें हें व्यापारी केंद्र असून लोंकर, गहूं व इतर माल यांचा व्यापार येथें होतो.

**कहलूर**—पंजाब इलाखा. सिमला डोंगरी संस्थानांतील एक डोंगरी संस्थान. 'विलासपूर' पहा.

**कहार**—( संस्कृतः–स्कंधकार = खांद्यावर ओझीं वाहणारे ). ही भोई, शेतकरी आणि मजूर यांची जात आहे. १९११ सालची लोकसंख्या १८,३८,६९८ होती. पैकीं १८३१३०५ हिंदू, व ६९६५ मुसुलमान होते. संयुक्त प्रांत, बिहार-ओरिसा, बंगाल, मध्यहिंदुस्थान, वऱ्हाड, मध्यप्रांत या अनुक्रमानें यांची संख्या उतरती आहे. बंगालमधील कहार बहुधा शिवशक्तीची उपासना करतात. यांतील वैष्णव फार थोडे आहेत. खानी पोटजातींतील लोक कार्तिक शुद्ध सप्तमीच्या दिवशीं एक सण पाळतात. त्या दिवशीं ब्राह्मणांनां घेऊन रानांत जातात व आंवळीच्या झाडाखालीं पानें, फळें व मिठाई वाहतात. ब्राह्मणांनां जेऊं घालून नंतर आपण मद्यमिश्रित भोजन करतात. डाक, कर्ता, बंदी, गोरैया, धर्मराज, सोखा, शंभुनाथ आणि रामठाकूर या देवतांव्यतिरिक्त हे लोक दामूवीर नांवाच्या देवरूप पावलेल्या एका कहार पुरुषाची आराधना करतात. त्याला बकरीं बळी देतात. सोमवार, बुधवार आणि शुक्रवार हे दामूवीर पूजेचे दिवस होत.

सं यु क्त प्रां त—सर्वांत जास्त वस्ती या प्रांतांत आहे. लो. सं. (१९११)११,१२,४२१. येथें कहारांनां महरा म्हणतात ( संस्कृत महिला ). कारण त्यांचा स्त्रियांच्या अंतःपुरांत प्रवेश असे. कहारांनां धीवर ( मासे धरणारे ) असेंहि म्हणतात. यावरूनहि त्यांच्या धंद्याची कल्पना होते. त्यांचें दुसरें नांव बेहार असें असून इंग्रजी शब्द 'बेअरर' याच्याशीं तें जुळतें.

ब्राह्मणवंशशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें कहार ही संमिश्र जात असून ती ब्राह्मण पिता व निषाद किंवा चांडाल जातीची माता यापासून झाली आहे. चर्येवरून ते अनार्य दिसतात. नोकर म्हणून उच्च वर्गांत त्यांचा समावेश झाला आहे; व बाह्यांनां स्वजातींत ते घेऊं शकतात. धुरीया कहारांची उत्पत्ति महादेवानें उत्पन्न केलेल्या धुळीपासून झाली अशी दंतकथा आहे. मगधाचा राजा जरासंध याच्यापासून बिहारचे कहार झाले अशी दंतकथा कनिंगहॅम देतो. रामाच्या सांगण्यावरून नारदानें कहार जातीचा गुरु केला म्हणून आपण ब्राह्मणांचे गुरू आहोंत असें कहार म्हणतात व कहारांच्या दंतकथांतून ही गोष्ट आढळते.

१८९१ च्या खानेसुमारीवरून कहारांच्या बऱ्याच पोटजाती नोंदल्या गेल्या आहेत. त्या घारूक, जइधर, खावार, महार,

मलहा, बथमा, बाट धीमर, राइकवार, रावानी, सिंघरिया व तुराई या होत. या जातींवरून सध्यांची जात कशी बनली असेल ही कल्पना होते. इमिलीय, अतेरीय, मुडेरी वगैरे त्यांचीं गोत्रें आहेत. या पोटजातींच्या नांवांवरून व गोत्रांवरून त्यांच्या अनेक धंद्यांचा बोध होतो. या खानेसुमारीवरून पाहतां यांत हिंदूंचे ८२३ विभाग व मुसुलमानी शाखेचे २४ विभाग दिसतात. यावरून सध्या या जातींत केवढी गुंतागुंत होऊन बसली आहे याची कल्पना करतां येईल.

या लोकांची पंचायत असून सर्व लोक हजर राहतात व पंच नेमतात. या पंचायतींचीं तीन कामें असतात. विधवाविवाह झाला म्हणजे नवऱ्यानें तिच्या मृत नवऱ्याच्या कुटुंबास काय द्यावयाचें हा प्रश्न पंचायत ठरविते. कोणी चोरी किंवा व्यभिचार केला तर गुन्हेगारास बहिष्कृत करण्याचें काम पंचायतीचें असतें. पंचायतीचें तिसरें महत्त्वाचें काम म्हटलें म्हणजे मालमत्तेसंबंधीं सर्व वादांचे निकाल लावणें हें होय.

कहार पुरुषाला आपल्या नात्याच्या कोणत्याहि कुटुंबाशीं लग्नसंबंध करतां येत नाहीं. पंचायतीस सबळ कारणें दाखवून नंतर बहुपत्नीत्व स्वीकारतां येतें. आठव्या वर्षापूर्वी मुलींची व पंधरा वर्षापूर्वी मुलांचीं लग्नें करतात. मुलींचं लग्न न झालेल्या कोणत्याहि स्त्रीबरोबर कोणासहि व्यभिचार करतां येत नाहीं. परंतु विधवेशीं किंवा परस्त्रीशीं कोणी संबंध ठेवला तर त्यास त्या विधवेच्या व त्या स्त्रीच्या नवऱ्याच्या कुटुंबास जेवण व पैसे द्यावे लागतात. कुमारिकेच्या लग्नाकरितां हुंडा द्यावा लागत नाहीं. सनदशीर लग्नानें झालेल्या सर्व मुलांस वारसाहक्क प्राप्त होतो. कहारांत विधवाविवाह आहे, परंतु तो पंचायतीच्या मान्यतेनें झाला पाहिजे. मृतपतीच्या धाकट्या भावाबरोबरहि विधवेला लग्न करतां येतें.

संयुक्त प्रांतांत हे लोक अद्यापि असंस्कृत स्थितींत आढळतात. तें भैरवाला एक बकरा, रोट व मद्य अर्पण करतात. महावीर किंवा हनुमान देवाला वस्त्र, जानवें आणि फुलांच्या माळा घालतात. पांचान पिराला मद्य व लहान करडूं नैवेद्यादाखल देतात. झांशीमध्यें हिंदू व मुसुलमान चालींचें एक चमत्कारिक मिश्रण झालें आहे. जेव्हां एखादा मनुष्य देवीची उपासना करावयास निघतो तेव्हां एक मुसुलमान व एक खाटिक त्याच्या बरोबर देवळात जातात. तो मुसुलमान 'कालिमा' चें आव्हान करून वध्य पशूच्या मानेंत सुरा खुपसतो व तो खाटिक पशूचें शव स्वच्छ करून यजमान व त्याची मंडळी यांच्या स्वाधीन करतो. हे लोक कलिंगडें व शिंगाडे पिकवितात. हे शिंगाडे लावतांना सिलोमनबाबा आणि त्याचा भाऊ माधोबाबा या स्थानिक देवतांनां भजतात. कलिंगडें लावतांना घटोरियाबाबा या आणखी एका तिसऱ्या देवतेला भजतात. नदीच्या व तळ्याच्या कांठीं यांच्याकरितां मांडव उभारतात. कारण यांचें वास्तव्य असतें त्या ठिकाणीं पीक चांगलें येतें असा समज आहे. जेव्हां हे लोक मासे मारण्याकरितां किंवा मेणे उचलण्याकरितां बाहेर पडतात तेव्हां या जातीचें आराध्यदैवत कालूकहार यांचें आव्हान करतात.

कहार जातींत मुलांचीं सात व मुलींचीं पांच नांवें ठेवतात. पण समारंभांत व नेहमींसुद्धां पहिल्याच नांवाचा उपयोग केला जातो. एखाद्या मनुष्याचीं मुलें मेलीं तर पुढें होणाऱ्या मुलास निंदास्पद नांव ठेवितात. तप्तमुद्रेसारखे दिव्याचे प्रकार त्यांच्यामध्यें थोडे बहुत आढळतात. किरकोळ शकुनांवर त्यांचा विश्वास नसून वैशाखांत होणाऱ्या 'अखटी' समारंभाच्या वेळीं देवीच्या देवळांत स्त्री-पुरुष जमून नूतन वधूवरांस एकमेकांचीं नांवें घेण्यास लावितात व त्या ठिकाणीं पिकांकरितां पाऊसपाण्यासंबंधींचे अनेक शकुन पहातात.

कहार जातीचे धंदे विविध आहेत. कहार हा ओझीं नेण्याचें व पाणी आणण्याचें काम करतो; व टोपल्या विणण्याचें बुरुडकामहि करितो. पालखी वाहणें व विहिरींत बुडीमारणें हीं कामें कहारच करितात. या जातीचे लोक, चांभार व धोबी खेरीजकरून सर्व जातींच्या लोकांचीं भांडीं घांसतात. उलट यांचा सामाजिक दर्जा एवढा आहे कीं, कनोजी ब्राह्मणांखेरीज सर्व जातीचे लोक त्यांच्या हातचें पाणी पितात व रसई खातात. ब्राह्मण व रजपुत यांच्या हातची कच्ची रसई खातात.

**मध्य प्रांतातील कहार.**—मध्यप्रांतांत हे पालखी वाहणारे भोई आहेत. यांची संख्या मध्यप्रांतांत २३,००० व वऱ्हाडांत २७,००० आहे. हे लोक पूर्वी डोल्या, पालख्या आणि मेणे उचलीत. सांप्रत यांचा हा धंदा बुडाला आहे.

यांची उत्पत्ति कोणी ब्राह्मण बाप व भंगी आई यांपासून झाली असावी असा शोध रिस्ले व हिरालाल यांनीं लाविला आहे. पण यांचा व ढीमर लोकांचा बराच संबंध असावा असें वाटतें. पालखी उचलण्याचा धंदा बंद पडल्यानें घरकाम करणारे हे नौकर बनले. यांच्या बायका राजे लोकांच्या जनानखान्याच्या आंतील भागांत राजे लोकांची पालखी नेण्याचें काम करीत; व जनानखान्याचें रक्षण करण्याकरितां या बायकांचें लहान पथक तयार करीत. हैदराबादेस अजून यांचें पथक हयात आहे. म्हैसूर संस्थानांतहि यांची थोडीशी संख्या असून तेथेंहि ते ओझीं वाहण्याचेंच काम करतात.

**मुंबई इलाखा.**—कहार अथवा बुंदेलखंडी भोई यांची संख्या येथें १९०१ सालीं ११८२ इतकी असून तींत ६४६ पुरुष व ५३६ बायकांचा समावेश झाला होता. दक्षिणेंत हे बहुतेक ठिकाणीं आढळून येतात. शिवाय अहमदाबाद, भडोच सुरत व सिंध येथेंहि यांची संख्या थोड्या प्रमाणांत आहे. आपण औरंगझेबाच्यावेळीं बुंदेलखंडांतून दक्षिणेंत आलों असें हे सांगतात, व ही गोष्ट संभवनीयहि वाटते. या जातीचे ज्ञातिविवाहात्मक भेद नसून गोत्रांत तर विवाहानें

झालेले पोटभेदहि नाहींत. भंडारे, गंगोळे, कचरे, लडके, लाचुरे, लिश्रे, मेहेरे, पाद्रे व जांत्रे अशीं यांचीं सर्वसाधारण आडनांवें असून एकाच आडनावांच्या लोकांचीं लग्नें होत नाहींत. आत, मावशी व मामा यांच्या मुलीशीं या ज्ञातींतील लोक लग्नें करीत नाहींत. इतरांना या जातींत प्रवेश मिळत नाहीं. दहा ते पंचवीस वर्षांपर्यंत मुलाचें लग्न करितात व वयांत येण्यापूर्वीच मुलींचीं लग्नें होतात. या लोकांत बहुपत्नीत्व रूढ आहे. परंतु बहुभर्तृत्व मात्र नाहीं. कहारांचें लग्नविधी मराठ्यांप्रमाणेंच आहेत. शमीचीं पानें घेऊन ते देवक ठेवितात. कुंभाराच्या घरांतून एक घट मिरवीत आणून तो देवकाजवळ ठेवितात व त्याची पूजा करितात. हळदी, कन्यादानविधि व सप्तपदी वगैरे प्रकार कहारांच्या लग्नांत असतात. या जातींत विधवाविवाह मान्य असून विधवेस नवीन वस्त्र धारण करावें लागतें व नंतर तिला कुंकू लावतात. हाच समारंभ या विवाहांत विशिष्ट असतो. नवऱ्याला दुर्वर्तनाबद्दल बायको सोडता येते व बायकोस विधवाविवाहाप्रमाणें अन्य पति करण्यासहि मुभा असते. ही जात हिंदु धर्मापैकीं एक असून वारसासंबंधीं हिंदु कायदा हे लोक पाळतात. ब्राह्मणांचे देव व खेड्यांतले देव या लोकांनां मान्य असून ते हिंदू सण पाळतात व त्यांचे उपाध्याय ब्राह्मणच असतात.

या लोकांत मृत मनुष्य विवाहित असेल तर त्यास जाळतात व अविवाहित मृत झाला तर त्यास पुरतात. कुणबी किंवा भोई लोकांप्रमाणेंच यांचे मृतासंबंधींचे सर्व विधी असतात. परंतु कुणब्यांप्रमाणें श्राद्धपक्ष भाद्रपद महिन्यांत न करतां, कहार लोक हे विधी दिवाळी किंवा माघी शिवरात्र या सुमारास करतात.

या लोकांचा पिढीजात धंदा म्हणजे पालखी वाहणें, मासे धरणें व विकणें हाच होय. कांहीं लोक भाज्या व तंबाखू पेरतात. मासे, बकरीं, मेंढया वगैरे प्राणी त्यांचें खाद्य असलें तरी हे लोक पक्षी खात नाहींत. ते दारू पितात. त्यांचा दर्जा भोई लोकांच्या वर असून ते कुणब्यांच्या हातचेहि खातात [ क्रूक. रिस्ले व हिरालाल. एन्थोव्हेन सेन्सस रिपोर्ट ]

**कहूत**—पंजाब इलाखा. रावळपिंडी जिल्ह्याची पूर्वेकडील तहशील. उत्तर अक्षांश ३३° १८' ते ३३° ४८' व पूर्व रेखांश ७३° १५' ते ७३° ३९'. क्षेत्रफळ ४५२ चौरस मैल. या तहशिलीच्या पूर्वेस झेलम नदी आहे. नैर्ऋत्येकडील भाग खेरीजकरून सर्व तहशील डोंगराळ आहे. लोकसंख्या ( १९११ ) ९२८४९. हींत २४६ खेडीं असून कहूत हें मुख्य ठिकाण होय. एकंदर उत्पन्न १.२ लाख रुपये ( इ. स. १९०३-४ ) आहे.

**कहोळ, वै दि क.**—शतपथ ब्राह्मण व आश्वलायन गृह्यसूत्र या ग्रंथांत उल्लेखिलेला एक ऋषि. विशेष माहिती ज्ञानकोश वि. ३ पृ. ४३१ येथें पहा.

**पौ रा णि क.**— एक ऋषि. आणि प्रसिद्ध अष्टावक्राचा बाप. यानें त्याचा गुरु उद्दालक याच्या गृहीं राहून गुरुसेवा उत्तम प्रकारें केल्यामुळें गुरूनें संतुष्ट होऊन आपली कन्या सुजाता याला दिली. एकदां हा अध्ययन करीत असतां तिच्या—सुजातेच्या—पोटांत असणाऱ्या भावी अष्टावक्राच्या गर्भानें याच्या चुकीच्या अध्ययनाचा निषेध केला. त्यावरून यास कोप येऊन यानें त्या गर्भांत तूं आठ स्थळीं वांकडा होशील असा शाप दिला. कांहीं काळानें हा द्रव्ययाचनेनिमित्त जनक राजाकडे गेला असतां तेथें वरुणपुत्र बंदीनें अनेक ऋषींस वादांत जिंकून उदकांत बुडविलें. त्यांत हाहि बुडाला. तेथून यास पुन्हां याच्या पुत्रानें बंदीशीं वाद करून जिंकून आणलें ( अष्टावक्र पहा. ) [ महा. भा. वन. १३२ ].

**कळंब**—मुंबई. पुणें–जुन्नर मार्गावर खेडच्या आग्नेयेस १३ मैलांवर हें खेडें आहे. येथील भोंवतालच्या टेंकड्यांत कांहीं लेणीं आहेत. एल्फिन्स्टन त्यांचा उल्लेख केला आहे ( कोलब्रूक—एल्फिन्स्टन १. २८३ ).

**कळंबेश्वर**— वऱ्हाड जिल्हा. बुलढाणा तालुका. मेहकरच्या उत्तरेस १२ मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या १४०७. गांवाच्या मध्यभागीं एक जुनें बांधलेलें कुंड असून तें अजून उपयोगांत आहे. चारी बाजूंस पायऱ्या असून मध्येंच अर्ध्या रस्त्यावर एक चौथरा आहे व एका बाजूस पद्मावती देवीचें देऊळ आहे.

**कळम**— हैद्राबाद संस्थान. उस्मानाबाद जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. इ. स. १९०५ सालीं वासी तालुक्याचा यांत अंतर्भाव केल्यामुळें आतां याचें क्षेत्रफळ ६०५ चौरस मैल व लोकसंख्या ( १९११ त ) १०५३४७ झाली आहे. यांत १४३ खेडीं असून जमीनमहसूल ३.७ लाख रुपये आहे. याच्या पश्चिमेस भूम आणि बालवड हे जहागिरी तालुके असून त्यांत अनुक्रमें ३१ आणि १३ खेडीं आहेत. त्यांची लोकसंख्या ( १९०१ ) अनुक्रमें ११४१६ आणि ६९९७ आहे. तसेंच त्यांचें क्षेत्रफळ अनुक्रमें १४३ आणि ६९ चौरस मैल आहे.

**कळमनूरी**—हैद्राबाद संस्थान. परभणी जिल्ह्याचा ईशान्येकडील तालुका. क्षेत्रफळ ५९४ चौरस मैल. जहागीर धरून लोकसंख्या (१९११ ) ८१२४०. इ. स. १९०० सालच्या दुष्काळामुळें येथील लोकसंख्येवर परिणाम झालेला दिसतो. इ. स. १९०५ सालापर्यंत या तालुक्यांत १८६ खेडीं असून पैकीं ११ जहागीरी होत्या. जमीनमहसूल १.९ लाख रुपये होता. इ. स. १९०५ सालीं कांहीं खेडीं नांदेड जिल्ह्यांत घालण्यांत आलीं. १९११ मध्यें २०१ खेडीं होतीं. वऱ्हाडचा वाशीम जिल्हा व हा तालुका यांच्या दरम्यान पेनगंगा नदी आहे.

**कळवण, ता लु का.**—मुंबई इलाखा. नाशिक जिल्ह्याचा वायव्येकडील तालुका. उत्तर अक्षांश २०° २१' ते २०° ४२'

व पूर्व रेखांश ७३° ४०' ते ७४° २०'. क्षेत्रफळ ५२१चौरस मैल. यांत एकंदर खेडीं १८७ आहेत. लोकसंख्या(१९११) ६५,६४६. कळवण हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. इ. स. १९०३–४ सालीं जमीनमहसूल ९१,००० रुपये होता. तालुक्याचा पश्चिमेकडील भाग डोंगराळ असून ओसाड आहे. पावसाची सरासरी २५ इंच आहे.

गां व.—मुंबई इलाखा. नाशिक जिल्हा. मालेगांवच्या पश्चिमेस ३५ मैलांवर कळवण तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. येथें ताल्लुकाकचेरी, पोलीसकचेरी व पोष्ट ऑफिस हीं आहेत. हवा रोगट आहे. याच्या पश्चिमेस जंगल असून वनश्रीची शोभा चांगली दिसते. येथें ऊंस वराच पिकतो. गांव खेडेंवजाच आहे.

**कळस**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. शिगांवच्या ईशान्येस १५ मैलांवरचा गांव. दर शनिवारीं येथें आठवड्याचा वाजार भरतो. येथील नारायणदेवाच्या देवळांत पांच शिलालेख असून त्यांपैकीं एक इ. स. ९३० सालचा आहे.

**कळसा**—म्हैसूर संस्थान. कडूर जिल्हा. मुदगेर ताल्लुक्यांतील हें खेडें मुदगेर गांवाच्या वायव्येस २४ मैलांवर आहे. उत्तर अक्षांस १३° १४' व पूर्व रेखांश ७५° २२'. या खेड्याभोंवतीं उंच उंच डोंगर आहेत. येथें कळसेश्वराचें देऊळ असून देवळांत तेराव्या शतकांतील जैन राण्यांनीं दिलेले ताम्रपट आहेत व त्यांसभोंवतीं पंधराव्या व सोळाव्या शतकांतील शिलालेख आहेत. पूर्वीचें हें जैनमंदीर असावें. खेड्याभोंवती सांपडणाऱ्या पडक्या अवशेषांवरून हें खेडें पूर्वी वरेंच मोठें नगर असावें असें दिसतें. सतराव्या शतकांत केलडी राज्यांत याचा समावेश झाला. भद्रा नदीच्या कांठीं हें खेडें असून तेथील अंवातीर्थावर एक चौकोनी दगड ठेवलेला असून त्यावर एक शिलालेख आहे. त्यांत तो दगड मध्वाचार्यांनीं एका हातानें आणला असा उल्लेख आहे. हे मध्वमताचे उत्पादक असून इ. स. १२३८ते१३१७ सालांत होऊन गेले. येथील सुपारी फार चांगली असते अशी सर्व म्हैसूर संस्थानांत ख्याति आहे.

**कळसूबाई**–मुंबई इलाखा. नाशिक जिल्हा. इगतपुरीच्या आग्नेयीस दक्षिणेमधील सर्वांत उंच शिखर(५४२७ फूट). या टेंकडीस हें नांव कळसु नांवाच्या एका कोळी मुलीवरून पडलें असें सांगतात. ती या शिखरावर जन्मभर रहात असे. अशी दंतकथा आहे. शिखरावर तिचें एक देऊळ असून दर मंगळवारीं त्या वाजूचे लोक दर्शनास जातात. तिचा पुजारी खालच्या खेड्यांत राहून रोज वर जातो. पुष्कळ कोळी लोक या देवीची कुलस्वामिनी म्हणून पूजा करितात.

या शिखरावर त्रिकोणमिती मोजणीचें एक स्थान आहे. शिखरावरुन फार दूरवरचे डोंगर, किल्ले वगैरे प्रदेश दिसतात.

**कळसूत्री वाहुल्या**—यांचा खेळ सर्व हिंदुस्थानभर प्रचलित आहे; एवढेंच नव्हे तर हा पाश्चात्य देशांतहि आहे. व दोन्ही ठिकाणीं या खेळाचें प्राचीन कालापासून अस्तित्व आहे. सध्यां हा खेळ केवळ अडाणी वर्गाच्या करमणुकीचें साधन म्हणून आहे. पण पाश्चात्य देशांत हा सध्यांच सुशिक्षित व संपन्न वर्गाचेंहि मनोरंजन करतो. या खेळास "मेरिओनेटस" असें म्हणतात व या खेळांतील अनेक प्रकारचे आवाज काढून वोलण्याच्या कलेला "व्हेंट्रीलोकिझम" म्हणतात. या खेळाचे आपलेकडील कांहीं ठराविक प्रकार म्हणजे रामचरित्र, कृष्णचरित्र व यमपुरी हीं दाखविणें होय. जत्रांतून या खेळाचीं नाटकगृहें दृष्टीस पडतात. या खेळाचा सामान्य नाटकगृहावर परिणाम झाला आहे, एवढेंच नव्हे तर अर्वाचीन नाटक हें जुनें नृत्यरूपी मूक नाटय आणि कळसूत्री वाहुलीचे खेळ यांच्या एकत्रीकरणामुळें झालें अशीहि कित्येक कल्पना करतात. संस्कृत नाटयकलेंतील "नटग्रामणी" शब्दाऐवजीं "सूत्रधार" हा शब्द नाटकगृहांत या वाहुलीच्या खेळापासूनच शिरला असावा असें स्पष्टीकरण अनेकांनीं केलें आहे. शांतिपर्व अ. २९५ वर टीका लिहिणांना नीलकंठानें या खेळाचा उल्लेख केला आहे. पिशेलनें "होम ऑफ दि पपेट प्ले" या नांवाच्या निबंधांत या खेळाच्या उद्भवाचें श्रेय हिंदुस्थानास मिळूं शकेल असें दाखविलें आहे.

पाश्चात्य देशामध्यें दोऱ्या किंवा तारा यांच्यायोगें हलविल्या जाणाऱ्या वाहुल्यांचा प्रचार इ. स. च्या १७ व्या शतकांत झाला. यापूर्वीहि प्राचीन रोम व ग्रीस या देशांनां त्यांची माहिती होती. चिमकुल्या रंगभूमीवर पात्रांची भूमिका या वाहुल्या घेतात व त्यांचे हावभाव चालले असतांना पडद्यामागें एकजण त्यांचीं भाषणें प्रत्येक भूमिकेला साजेल अशा कमी जास्त अवाजांत वोलत असतो. या चिमकुल्या रंगभूमीवर होणारीं नाटकें वहुधा हास्यकारक प्रहसनांसारखीं असतात. उदा. नवरावायकोमधील भांडणाचा प्रवेश. फ्रान्स, जर्मनी व इटली या देशांत अद्यापहि लहान मुलें व अशिक्षित लोक यांच्या करमणुकीचें एक चांगलें साधन म्हणून हे खेळ होत असतात. कळसूत्री वाहुल्यांचे खेळ करणारे लोक जत्रांच्या प्रसंगीं एका हातगाडींत आपलें साहित्य भरून आलेले दिसतात. 'पंच' आणि ज्युडि म्हणून जो खेळ इंग्लंडांत, विशेषतः त्यांतील खेड्यापाड्यांतून होत असतो तो याच प्रकारचा होय. पंचाचें नाक लांव असतें व तो चित्रविचित्र पोषाखांत असलेल्या ज्युडीशीं वादविवाद करतोसा वाटतो. या प्रवेशाच्या शेवटीं पंच आपल्या काठीनें ज्युडीला मारीत सुटतो असें दिसतें. केवळ हलक्या लोकांच्या करमणुकीकरितां या वाहुल्यांचा जन्म असला तरी त्या सर्वच वाईट नसतात. कांहीं कांहीं फारच सुंदर केलेल्या असून त्यांचें भाषण म्हणणाराहि उत्तम वक्ता असतो. १७ व्या शतकांत पॅरिसमध्यें एक कळसूत्री वाहुल्यांचा ऑपेरा झाला. आज सुद्धां इटलींतल्या मिलनसारख्या शहरांतून या खेळांकरितां वांधलेल्या

रणभूमी आढळतात व त्यांचे प्रेक्षकहि सुशिक्षित असतात. जर्मनींत हॅन्स सॅचसचीं प्रहसनें व गॉइटेच्या 'फास्ट' सारखीं नाटकेंहि या बाहुल्यांकडून करवितात. या बाहुल्यांनां जो पोषाख देत तो संविधानकाला अनुरूप असाच असे.

**कळानौर**—(१) पंजाब. रोहटक जिल्हा व तहशिलींतील एक गांव. उत्तर अक्षांश २८° ५०' व पूर्व रेखांश ७६° २४'. रोहटक गांवाच्या पश्चिमेस १२ मैलांवर ७६४० लोकवस्तीचा (इ. स. १९०१) हा एक गांव आहे. दिल्लीचा राजा अनंगपाल याचे जांवई कल्याणसिंग व भवानसिंग या पोंवार रजपुतांनीं हा गांव वसविला. येथील कातडीं व जिन फार प्रसिद्ध आहेत.

(२) पंजाब इलाखा. गुरुदासपुर जिल्हा व तहसिलींतील एक गांव. उत्तर अक्षांस ३२° ०' व पूर्व रेखांश ७५° १०'. गुरुदासपुर गांवाच्या पश्चिमेस सुमारें १५ मैलांवर हा ४६०६ लोकसंख्येचा (इ. स. १९११) एक गांव आहे. १४ व्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत आसपासच्या प्रदेशांत हा गांव फार महत्वाचा होता. याच ठिकाणीं अकबरास आपल्या बापाच्या मृत्यूची वार्ता कळली. त्यानें तावडतोब आपणांस तख्ताभिषेक येथेंच करून घेतला. तें तख्त अद्यापि गांवाबाहेर असलेलें पहावयास मिळतें. अठराव्या शतकाच्या प्रारंभीं शीख पुढारी बांदा यानें हा गांव लुटला होता. इ. स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न व खर्च ५४०० रुपये होता.

**कल्लिकोटा आणि अंतगड**—मद्रास इलाखा. गंजम जिल्ह्यांत या दोन जमीनदाऱ्या आहेत. उत्तर अक्षांश १९° २८' ते १९° ५२' व पूर्व रेखांश ८४° ४३' ते ८५° १२'. क्षेत्रफळ ५०७ चौरस मैल.

**लोकसंख्या**—(इ. स. १९०१) १,६९,६९३ पेशकाश व इतर कर मिळून एकंदर १११००० रुपये द्यावे लागले होते. कळीकोटा जमीदारीचा मूळपुरुष रामभूय नांवाचा असून ओरिसाचा गजपति राजा पुरुषोत्तम यानें त्यास जमीनदार बनविलें. पुढें मराठयांचा प्रतिकार करण्याच्या कामीं मदत दिल्याबद्दल त्यास मद्रराज देव हा किताब मिळाला होता. इ. स. १७६९ सालीं जमीनदारींत जरा बखेडा उत्पन्न झाला होता व ब्रिटिशांच्या सैन्यानें कांहीं काळ तिचा ताबाहि घेतला होता. त्याचप्रमाणें इ. स. १७७१—१७७५ पर्यंत जमीनदारींत शांतता राखण्याकरितां ब्रिटिश सैन्य ठेवलें होतें. येथील जमीन सुपीक असून पाण्याची सोय बरी आहे.

इ. स १८८७ सालीं जो राजा गादीवर बसला तो अज्ञान असल्यामुळें जमीनदारीची व्यवस्था कोर्ट ऑफ वॉर्डसकडे गेली. त्या काळांत ९३,००० रुपये पाटबंधाऱ्याची दुरुस्ती करण्याकरितां खर्च झाले व १३४,००० रुपये कर्जाची फेड केली. इ. स. १८९४ सालीं मालकाच्या हातांत जमीनदारी दिली, त्यावेळीं तिचें सालिना उत्पन्न ३१७००० रुपये असून शिल्लक रोख २,११,००० रुपये होती. परंतु पुढील दहाच वर्षांत राजानें शिल्लक खर्च करून इस्टेटीवर बरेंच कर्ज करून ठेवलें असून दोन्ही जमीनदाऱ्या सावकाराकडे गहाण पडल्या आहेत.

**कल्लूर**, तालुका हैद्राबाद संस्थान. वारंगळ जिल्ह्याच्या दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ९६६ चौरस मैल. लो. सं. (१९११) १२३९०१. यांत १८६ खेडीं असून पैकीं २५ जहागीर आहेत. जमीनमहसूल (इ. स. १९०१ सालीं) २५ लाख रुपये. निजाम-ग्यारंटीड रेल्वे या तालुक्यांतून जाते. पत्स्यलच्या हिऱ्यांच्या खाणी या तालुक्यांत आहेत.

**गांव**.—हैद्राबाद संस्थानामधील रायचूर जिल्ह्याच्या रायचूर तालुक्यांतील एक गांव. उत्तर अक्षांश १६° ९' व पूर्व रेखांश ७७° १३'. येथें तीन देवळें व दोन मशिदी आहेत. लोकसंख्या (इ. स. १९११) ४,८५४.

**काकडशिंगी**—या झाडास गांठी येतात. त्यांचा औषधांत उपयोग होतो. त्यास काकडशिंगी किंवा संस्कृतांत कर्कटशृंगी म्हणतात. याचें लॅटिन नांव 'पिस्टासिया खिंजुक' असें आहे. हीं झाडें सुलेमान पर्वतावर व मिठाच्या डोंगरावर सांपडतात. पूर्वेस कुमाऊनपर्यंत व पश्चिमहिमालयाच्या बाह्य प्रदेशांत ३५०० फूट उंचीपर्यंत हीं झाडें होतात. रुक्ष उतारावर व नद्यांच्या खोऱ्यांत हीं झाडें चांगलीं वाढतात. या झाडास आक्टोबर महिन्यांत कठिण सुरकुत्या पडलेल्या पोकळ अशा गांठी येतात. रंगविण्याकडे व कातडीं कमावण्याकडे यांचा फारच थोडा उपयोग होतो. आर्यवैद्यकांत काकडशिंगीला बरेच दिवसांपासून स्थान मिळालें आहे. यांत शेंकडा ७५ या प्रमाणांत टॅनिक अम्ल सांपडतें; व लोहहरिद व या गाठी यांच्या मिश्रणानें निळा-काळा रंग होतो. या झाडांचीं पानें कापून म्हशी, रेडे व उंट यांनां खावयास घालतात. लांकडाचें नक्षीचें सामान बनवितात. या झाडाच्या फळ्या किंवा तक्तेहि उपयोगी पडतात.

**औषधी गुण**.—लहान मुलांस खोकला, वांति व ज्वर यांवर काकडशिंगी, नागरमोथे व अतिविष यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. अतिसारावर काकडशिंगीचें चूर्ण मासा किंवा दीड मासाभर मधांतून द्यावें [वॅट; पदे.].

**कांकडी**—हें एक वेलीचें फळ आहे. यास लॅटिनमध्यें 'कुकुमि सॅटिव्हस' मराठींत कांकडी, संस्कृतमध्यें कर्कटी, चिर्भटिका इत्यादि नांवें आहेत. कांकडीच्या पुष्कळ जाती आहेत. मावळी कांकडी, खिरे, कांटेवाळूक, टरकांकडी इत्यादि.

कांकडीचें फळ हिरवें अगर हिरवट पांढरें असतें. तें वितीपासून दीड हातपर्यंत लांब होतें. कांकडी पिकली म्हणजे पिंवळी होते. पुण्या-साताऱ्याकडे कांकडीस "मावळी कांकडी" असेंहि म्हणतात. कोंकणांत याच

कांकडीस 'तंवसें' म्हणतात. कोंवळेपणीं हिरव्या अगर पढांच्या कांकडीवर दूरदूर मऊ कांटे असतात.आंतील वियां-जवळचा गर कधीं कधीं गुलाबी असतो व त्याची चवहि अधिक रुचकर असते. कांकडीचे वेल परसांत लहान झाडां-वर, कुंपणावर अगर मांडवावर चढवितात. भाद्रपद, आश्विन व कार्तिक महिन्यांत कांकडीला फळें लागतात. कांकड्या जून झाल्यानंतर पिकण्याच्या सुमारास काढल्या तर त्या पुढें ३।४ महिने टिकतात. पिकलेल्या कांकड्यांचे सांडगे वर्षभरहि टिकतात. खिरे अथवा वाळूक याप्रमाणें टिकूं शकत नाहीं. ' टरकांकडी ' ही एक खरबूजवाडींत 'वाळकां'बरोबर होणारी जात आहे. हें फळ कांकडीसारखें एक ते तीन फूट लांबीचें व ३ ते ६ इंच जाडीचें होतें. कच्चेपणीं रंग हिरवट अगर स्वच्छ पांढरा व पिकल्यावर पिंवळसर पांढरा असतो. फळावर लांबीच्या पातळीत कर्वे असतात. हें फळ कांकडी-सारखें टिकाऊ नसतें. तें पिकल्यावर खरबुजासारखें आंबूस लागतें. त्यावरून ती खरबुजाचीच जात असावी असें अनु-मान होतें. ती कोंवळेपणीं तिखटमिठाशीं हिरवीच खातात व जून झाल्यावर तिची भाजी करतात. हिचे वेल वाळवंटांत व मळ्यांतहि होतात. ते जमिनीवरच पसरतात व त्यांची वाढ ५।१० फूट असते.

वाळूक हें फळ कोंवळेपणीं काळसर हिरवें व पिकण्याच्या सुमारास तपकिरी पिंवळें होतें. तें सुमारें ४ ते ९ इंच लांब व २।३ इंच जाड असतें.तें जून झाल्यावर कापुसतें व नासतें. यांत कांकडीप्रमाणें टिकाऊपणा नाहीं. कांकडी व खिरा या दोहोंपेक्षां यांत पाण्याचा अंश जास्त असतो. हें कोंवळेपणीं कच्चें तिखटमिठाशीं खातात व जूनपणीं भाजी करतात. या जातीचे वेल खरबुजवाडींत वाळवंटांतच होतात; म्हणून यास ' वाळूक ' हें नांव पडलें असावें. जेथें खरबुजवाडी करण्या-जोगा ओढा अगर नदी नाहीं तेथें तें फळ होत नाहीं.

खिरा, कांकडी व वाळूक या तिन्ही फळांत पाण्याचा भाग फार असतो. म्हणून त्यांच्या वेलांस पाणी फार लागतें. खताचा मारा चांगला असला तर फळें पुष्कळ व मोठालीं लागतात. आगाप मोसम साधला तर फळास भाव चांगला येतो. हीं फळें नासणारीं असल्यामुळें व हंगाम एकच असल्यामुळें इतर भाज्यांपेक्षां हीं स्वस्त विकतात. खिरे, वाळकें व टरकाकड्यांच्या वेलास वळिवाच्या पावसानें झोडल्यास वेल व फळें दोन्ही झडून जातात.

कांकडीची पूर्ण वाढ झाल्यावर ती दोन फूट लांब व नऊ इंच जाड इतकी कधीं कधीं मोठी होते. साधारण फळें दीड फूट लांब व ४।५ इंच जाड होतात. पिकलेल्या कांकड्यांचे सांडगे अगर वडे करून वाळवून ठेवितात व ते तळून खातात. बिया सोलून नुसत्याच खातात अगर साखरेच्या पाकांत वड्या लाडू व वगैरे करून खातात.

मावळी जातीच्या कांकड्यांचें वेल बागाइतांत लावि-तात. अगर उसाच्या शेतांत मिश्र पीक म्हणून लावतात. यांचे वेल फार वाढत नाहींत. तसेंच सुमारें तीन महि-न्यांत यांचा हंगाम पुरा होतो; म्हणून ऊंस चांगला वाढीस लागण्याच्या अगोदर या संपतात व उंसास त्यांच्यापासून अपाय होत नाहीं. खिऱ्यांची स्वतंत्र लागवडहि कारतात. जमीन चांगली खतावून सऱ्यांच्या वाफ्यावरून २।३ हातांच्या अंतरानें २।३ बियांचे दाणे लावितात. खिरे उन्हाळ्याच्या आरंभास लावतात. खताचा जोर व पाण्याचा मारा असला तर फळें पुष्कळ लागतात. बाजारांत कोंवळ्या खिऱ्यांसच चांगला भाव येतो.फळें तोडून दोन दिवस ठेविलीं तर तांबडीं होऊं लागतात. हीं फळें वरचेवर तोडावीं लागतात. उत्तम कोंवळीं फळें कचीं तिखटमिठाशीं खातात, अगर त्यांची उत्तम कोशिंबीर होते. जून फळांची भाजी करतात. पुण्याच्या बाजूस "खमंग कांकडी" म्हणून एक चांगला पदार्थ बनवितात.

हि र वी कां क डी.—(वाळूक)या जातीची लागण नदीच्या अगर पाणी असलेल्या ओढ्याच्या वाळवंटांत खरबूजवाडींत कारतात. वाळूंत सऱ्या पाडून व खत टाकून नंतर सरीचे तळांत बिया लावितात. प्रथम वरून पाणी घालावें लागतें. वेलाचीं मुळें लवकरच वाळूंतून खालीं असलेल्या ओलसर थर पर्यंत पोंचतात व नंतर वरून पाणी घालण्याचें कारण पडत नाहीं. शिवाय नदींतील दमट हवेंतूनहि वेलास गारवा येतो. या जातीच्या कांकड्यांची वाढहि खिऱ्याप्रमाणेंच आहे. खताचा जोर असून पाण्याचा तुटवडा नसेल तर फळें पुष्कळ लागतात. कच्चेपणीं फळ हिरवें व गुळगुळीत असतें. तें पिक-ल्यावर पिंवळें होतें. याची लांबी ६ ते १० इंच व जाडी २।३ इंच असते. ह्याचा उपयोग खिऱ्यांप्रमाणेंच करतात. ही जात वाळवंटाशिवाय होत नाहीं.

ट र कां क डी.—ह्या जातीची लागणहि खरबूजवाडीं-तच होते. तिची लागण हिरव्या कांकडीप्रमाणेंच करतात. हिला फळें पुष्कळ येतात व तीं दुरून लांबट दुध्या भोंपळ्या-सारखीं दिसतात. हीं एक फुटापासून अडीच तीन फुटांपर्यंत लांब व तीन पासून ६ इंचांपर्यंत जाड होतात. तीं कोंवळें-पणीं कच्चींच खातात. जून फळांची भाजी करतात. [ वनौ-षधि गु. भा. २ ].

**काकतीय**—या घराण्याचा संस्थापक बेट्टमराज होय. याचा काल इ. स. ११०० च्या सुमारास असावा. या वेळीं चालुक्य व चोल यांत तंटा लागला होता. बेट्ट याचा तेलिं-गण प्रदेश या दोघांच्या मध्यें होता. त्याची प्राचीन राजधानी अनमकोंडा होती. यानें या भांडणांत आपला हात साधून घेतला. याचा मुलगा प्रोल यानें आपली राजधानी अनम-कोंडाहून बदलून वारंगळ येथें नेली व तैलंगणचें राज्य स्थापिलें. त्यानें तैलप चालुक्याचा पराभव केल्याचा ( इ. स. ११५५ ) उल्लेख आढळतो. वास्तविक हे काकतीय चालु-क्यांचे मांडलिक होते. परंतु त्यांच्या पडत्या काळांत होयसळ यादव यांच्याप्रमाणें यांनींहि पूर्वेकडील आपलें

पाय पसरून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न चालविला. यांनीं कांहीं दिवस कांची शहर हस्तगत करून ताब्यांत ठेविलें होतें. पुढें मलिक काफूरनें वरील त्रिवर्गांचा ( यादव, होयशल व काकतीय ) पराभव केला मार्कोपोलो याच्या वेळीं या घराण्याचा प्रतापरुद्र ( दुसरा ) हा राजा राज्य करीत होता. डॉ. हुल्ट्श यांनीं इंडियन ॲंटिक्वरी ( पु. २२ ) मध्यें एका शिलालेखाचें भाषांतर दिलें आहे. त्यांत वारंगळच्या काकतीयांची वंशावळ येणेंप्रमाणें दिली आहे. ( १ ) वेट्मराज , ( २ ) प्रोदराज, ( ३ ) रुद्रदेव, ( ४ ) महादेव, ( ५ ) गणपती (शके ११७२ म्हणजे इ. स. १२५०).गणपती अगोदर झाला असें गृहीत धरल्यास वंशावळ पुढीलप्रमाणें आहेः-(१) प्रोल, प्रोदराज (इ. स. ११९०-११६०), (२) रुद्र पहिला (११६०-११९५), ( ३ ) गणपती पहिला( ११९५-१२२०), ( ४ ) रुद्र दुसरा (१२२०-१२३७), (५ )महादेव ( दंतकथेंतलि ), ( १२३७-१२४० ), ( ६ ) गणपती दुसरा ( १२४०-१२५७,) [ अय्यंगार; इं. अँ. पु. २०. ]

**काकर( १ )**—मुंबई इलाखा. पालनपूर संस्थानांतील कांकेजची जुनी राजधानी. येथील एका जैन मंदिरांतील संगमरवरी खोदकामाचें ग्रीसमधील खोद कामाशीं बरेंच साम्य आहे. चित्रांतील स्त्रीपुरुषांचीं शिरोभूषणें चमत्कारिक असून पुरुषांच्या पायांत बूट आढळतात. (मुं. गॅ. ५ )

(२)मुंबई इलाखा. सिंध प्रांतांतील लारखाना जिल्ह्यांतील तालुका. उत्तर आक्षांश २६° ५३' ते २७° १४ व पूर्वरेखांश ६७° १२' ते ६७° ५७'. क्षे. फ. ४४८ चौ. मै. लोकसंख्या ( १९११) ४७२४४. या तालुक्यांत ८० खेडीं आहेत. एकंदर उत्पन्न ( इ. स. १९०३-४ ) २.१ लाख रुपये. वेस्टर्न नारा कालव्यावर हा तालुका अवलंबून आहे. परंतु कधीं कधीं कालव्याचें पाणी येथपर्यंत पोचत नसल्यामुळें तालुक्याचें फार नुकसान होतें. ज्वारी हें येथील मुख्य पीक आहे.

**काकासि आली**—मुंबई. काठेवाडमधील एक लहान संस्थान. यांत एकच तालुक्याचें मोठें गांव आहे. हा राजकोटच्या दक्षिणेस आठ मैलांवर आहे. येथलि तालुकदार कोठारियाचे भायाद व जाडेजा आहेत. राजकोट गोंडल रस्ता संस्थानच्या हद्दींतून जातो.

**कांकेर,** स स्था न.—मध्यप्रांत. छत्तीसगडांतील एक संस्थान. उत्तर अक्षांश २० ° ६' ते २० ° २४' व पूर्व रेखांश ८०° ४१' ते ८१ ° ४८'. क्षेत्रफळ १४२९ चौरस मैल. चतुःसीमाः—उत्तरेस द्रुग आणि रायपूर जिल्हे; पूर्वेस रायपूर जिल्हा; दक्षिणेस वस्तर संस्थान आणि पश्चिमेस चांदा जिल्हा. संस्थानचें मुख्य ठिकाण कांकेर असून हें ३९०६ लोकवस्तीचें गांव आहे. हें बंगाल नागपूर रेल्वेच्या धमतरी स्टेशनपासून सुमारें ३९ मैल आहे. संस्थानचा बहुतेक भाग डोंगराळ व जंगलमय आहे. जंगलांतील मुख्य उपयोगी झाडें साल, शिरसा, कुसुम पळस वगैरे आहेत गेल्या दहा वर्षांची पावसाची सरासरी ४९ इंच असून हवा साधारण बरी आहे.

इतिहासः—संस्थानिकाचें घराणें आपण सोमवंशीय रजपूत घराण्यापैकीं आहोंत असें म्हणवितें. याचा संस्थापक वीर कन्हर देव हा होय. याचे वंशज सिहिवा येथें राज्य करीत होते. असें शक १११४ ( इ. स. ११९२ ) च्या लेखावरून दिसतें. सिहिवा येथून कांकेर ३६ मैल आहे. या घराण्यांतील तिसऱ्या राजानें कांकेर परगणा आपल्या ताब्यांत घेतला व कांकेर हें राजधानीचें ठिकाण केलें. यामागून जो गादीवर आला त्यानें धमतरी तालुका आपल्या राज्यास जोडला. ज्यावेळीं छत्तीसगडच्या हैहयवंशी घराण्याची भरभराट होती त्यावेळीं कांकेरचा संस्थानिक यांचा मांडलिक असून त्याच्या ताब्यांत धमतरी मुलुख होता असें एका जुन्या लेखावरून दिसतें. मराठयांच्या वेळीं कांकेर संस्थाननें ज्यावेळीं जरूर असेल त्यावेळीं ५०० माणसांची लष्करी तुकडी मराठयांस द्यावी या अटीवर हें राज्य चाललें होतें. या राजांपैकीं कोणा एका रुद्रदेवानें महा नदीच्या तीरावर एका महादेवाचें देऊळ बांधलें असून त्यास रुद्रेश्वराचें देऊळ म्हणतात. जवळच त्यानें रुद्री नांवाचें एक खेडें वसाविलें आहे. यानेंच धमतरी येथें एक किल्ला बांधला असून किल्ल्याचा खंदक अजून दृष्टीस पडतो. याच्या नंतर हरपाल देव गादीवर आला. यानें आपली मुलगी बस्तरच्या संस्थानिकास दिली व हुंड्यानिमित्त सिहिवा परगणा बस्तरच्या संस्थानिकास दिला. पुढें भूपदेव नांवाचा संस्थानिक गादीवर असतांना मराठयांनीं वस्तरवर स्वारी केली होती. तेव्हां भूपदेवानें वस्तरला मदत केली होती. प्रथमतः त्यांनां जयहि मिळाला होता. परंतु पुढें भूपदेवास झेरिया येथें पळून जावें लागलें; येथेंच त्याच्या राणीस पदमसिंग नांवाचा पुत्र झाला. सन १८०९ ते १८१७ पर्यंत भूपदेव झेरिया येथेंच होता. परंतु सन १८१८ सालीं ब्रिटिश रेसिडेंटनें त्यास पुन्हां कांकेरच्या गादीवर वसविलें व ५०० रुपये खंडणी देण्याचें ठरलें इ. स. १८२३ सालीं ही खंडणी घेऊं नये असें ठरलें. हल्लींचे संस्थानिक लाल कोमलदेव नांवाचे असून त्यांनां वंशपरंपरेची महाराजाधिराज ही पदवी आहे.

पुराणवस्तुसंशोधनः—ज्या ठिकाणीं पूर्वी संस्थानिक रहात होते त्या डोंगराच्या पठारावर एक जुनाट दगडी महादेवाचें देऊळ असून जवळच दोन तलाव आहेत. तलावांशेजारीं दोन लेणीं असून त्यांत ५०० माणसें सहज वसूं शकतील. टेंकडीच्या पूर्वभागास एक तलाव असून जोगी गुंफा नांवाचें लेणें आहे. ' दिवाण ' तलावाशेजारीं असलेल्या देवळावर शके १२४२ ( सन १३२० ) चा लेख असून त्या वेळीं भानुदेव नांवाचा राजा तेथें राज्य करीत होता. त्या लेखांत भानुदेवापूर्वीच्या सहा पुरुषांचा उल्लेख सांपडतो. परतु राजघराण्यांच्या दप्तरी असलेल्या यादींत यांतील एकाहि पुरुषाचें

नांव सांपडत नाहीं. त्याप्रमाणें सन १२१३ आणि १२१४ सालचे दोन ताम्रपट ताहनकार नांवाच्या खेडेंगांवीं सांपडले असून ते एपि. इंडिकामध्यें प्रसिद्ध झाले आहेत. मुदापुर गांवांत कांहीं जुनाट देवळें व मूर्ती पहाण्यास मिळतात.

संस्थानांत एकंदर ५१० खेडीं आहेत. सन १९११ सालीं एकंदर लोकसंख्या १२७०१४ होती. पैकीं हिंदु ५७०६५, वन्यधर्मी ६९२३२, सत्नामी १२५७, कबीरपंथी २६६७, आणि मुसुलमान ६३६.

येथील भाषा छतीसगडी, हिंदी, हळवी, गोंडी व त्यांच्या उपभाषा. एकंदर क्षेत्रफळ १४२९ चौरस मैल. पैकीं जंगल व डोंगर ४६८ चौरस मैल; ओसाड ४७० चौरस मैल; लागवडी खालीं ४९१ चौ. मैल. भात, तीळ हीं मुख्य पिकें असून गहूं, हरभरा, कडधान्यें व इतर गळिताचीं धान्यें थोड्या प्रमाणावर होतात.

उद्योग धंदे:–ओबडधोबड कापड विणणें, तागाचीं पोतीं, काशाचीं भांडीं वगैरे. गेल्या पांच वर्षांतील जंगलाचें सरासरी उत्पन्न रु. ५७१५४ असून लाख, माहुवा, सागवान आणि वांबू या उत्पन्नाच्या मुख्य बाबी आहेत.

खनिज संपत्ति:—डोंगरांत लोखंडाच्या खाणी आहेत. येथील लोक लोखंडी फाळ वगैरे करण्याकरतां लोखंड काढतात.

दुष्काळ:—या संस्थानांत पूर्वी कधीं दुष्काळ पडले होते कीं काय हें समजण्यास लेखी पुरावा नाहीं. अलीकडे सन १८९७ व १९०० सालीं दोनदां दुष्काळ पडले.

संस्थानांत अवकारी, पोलिस, तुरुंग, दवाखाना, शिक्षण, देवी टोंचणें वगैरे खातीं असून संस्थानिकाच्या हातांत सर्व सत्ता आहे. दिवाणास कांहीं न्यायविषयीं अधिकार आहेत. उत्पन्न व खर्च १९०८ सालीं अनुक्रमें २१९ हजार रु. व २०८ हजार रु. होता.

शहर.—कांकेर संस्थानची राजधानी व तालुक्याचा गांव. येथें राजवाडा, कचेऱ्या, दवाखाना, शाळा, पोलीस कचेरी, ठाणें, पोष्ट आणि तार ऑफिस वगैरे असून आठवड्यास बाजार भरत असतो. हा गांव बंगाल नागपूर रेल्वेच्या रायपूर—धमतरी शाखेच्या धमतरी स्टेशनापासून ३९ मैल असून धमतरी—जगदलपूर सडक या गावांतून जाते. येथें एक सुंदर बगीचा असून त्याच्या मध्यभागीं एक गेस्ट हाऊस बांधलें आहे [छत्तीस. गॅ., इं. गॅ.]

**कॉकेशस पर्वत**— कर्चच्या सामुद्रधुनीपासून तों कास्पियन समुद्रापर्यंत, वायव्येकडून आग्नेयीकडे ९०० मैल लांबीवर पसरलेल्या ह्या आशियामधील रशियाच्या राज्यांतील पर्वतओळी असून आकार व इतर बऱ्याच बाबतींत ह्याचें पिरनिज पर्वतांशीं साम्य आहे असें साधारणपणें म्हणतां येईल. वर्णनाच्या सोयीकरितां याचे (१) पश्चिमभाग, (२) पश्चिमेकडील मध्य, (३) पूर्वेकडील मध्य (४) व पूर्वभाग असे चार भाग करतां येतील.

(१) पश्चिम भाग.—कॉकेशस पर्वताचा पश्चिमभाग. पूर्व रेखांश ४२°४०'. हा कर्चच्या सामुद्रधुनीपासून माउन्ट एलब्रुजेपर्यंत ४२० मैल लांबीवर पसरलेला असून काळ्या समुद्रालगत व समुद्राच्या ईशान्येकडील किनाऱ्यांशीं समान्तर रेषेंत आहे. फिश ( ८०४० फूट उंची ), ओशटेन (९२१० फूट ), शुगुश ( १०६४० फूट ) व सायश ( १२४२५ फूट ) हीं या भागांतील महत्वाचीं उंच शिखरें आहेत. या भागांत घाट फारच थोडे असून त्यांपैकीं बहुतेक उंचावर आहेत. यांतील ओशटेनच्या पूर्वेकडील शेटलिव, पश्चिमेकडील शेख ( ५४३५ फूट, ), सींशका, संचर वगैरे घाट महत्वाचे आहेत.

अतिशय पर्जन्यवृष्टि व इतर कांहीं कारणांमुळें या भागांत वनस्पतींची वाढ विपुल होते. मध्य यूरोपांत सांपडणाऱ्या झाडांच्या सर्व जाती येथें आढळतात. बहुतेक भाग दाट आरण्यांनीं व्यापलेला आहे. हा प्रदेश रशियाच्या ताब्यांत येण्यापूर्वी कबर्डियन, सिरकासियन, अबखासियन वगैरे जाती या भागांत असत. खिस्ती रशियाचा अंमल त्यांस आवडत नसल्यामुळें त्या सर्व जाती तुर्कांच्या राज्यांत निघून गेल्या; व त्यामुळें हा प्रदेश ओसाड पडला ( इ. स. १८६४–७८ ). अलीकडे रशियन, ग्रीक आर्मेनियन, रुमानियन वगैरे लोक या भागांत वस्ती करूं लागले आहेत.

(२) पश्चिमेकडील मध्य कॉकेशस.—हा भाग माउन्ट एलब्रुझपासून कसवेक व डेरियलच्या घाटापर्यंत सरासरी २०० मैल लांबवर पसरलेला आहे. या भागांत एकंदर शिखरें सुमारें १० आहेत. त्यांत कांहीं अतिशय उंच आहेत. त्यांपैकीं कांहीं महत्वाचीं आहेत. त्यांचीं नांवें व उंचीचें मान फुटांत पुढें दिलें आहे:—

| शिखराचें नांव | उंची फूट |
|---|---|
| एलब्रुर्ज पूर्वशिखर | १८३४५ |
| एलब्रुर्ज पश्चिम | १६४६५ |
| इकारा | १७०४० |
| डाइखताउ | १७०५० |

पर्वतमाथ्याची उंची १०,००० फुटांहून अधिक आहे. या भागाची उत्तरेकडील बोकोव्हाय खेबेट नांवाची एक ओळ याहीपेक्षां बरीच उंच आहे. बोकोव्हाय खेबेटप्रमाणें इतर बऱ्याच ओळी मुख्य भागाशीं जोडल्या गेल्यामुळें पुष्कळ खोरीं निर्माण झालीं आहेत. तथापि या खोऱ्यांत सरोवरें, धबधबे वगैरे आढळून येत नाहींत. या भागांत सरासरी १०० बर्फवाहिन्या नद्या असाव्यात असा तर्क आहे. त्यांपैकीं महत्वाच्या म्हटल्या म्हणजे बेझिंगी, जंगाटाऊ, सेया अथवा झी, लेकसायर, झानर या होत. बर्फवाहिन्या नद्यांनीं व्यापलेल्या एकंदर प्रदेशाचें क्षेत्रफळ ६२५ ते ६५० चौरस मैल असावें. या भागांत बरेच घाट आहेत.

मार्गानें दक्षिणोत्तर व त्याचप्रमाणें दक्षिणेकडील माळरानां-तून आशियामायनर व आर्मेनियाच्या पहाडी मुलुखापर्यंत जातां येतें. घाटांपैकीं, डेरियल व मॅमिसन हे दोन घाट फार महत्वाचे आहेत. दोन्हींहि घांटावर लष्कराची नेआण करण्याइतके विस्तृत मार्ग आहेत. डेरियल घाटावरील "जार्जियन लष्करी मार्गानें" व्हाडिकावकुझपासून टिफ्लिस-पर्यंत जातां येतें. त्याचप्रमाणें मॅमिसन घाटांत ऑस्सेटिक लष्करी मार्गानें, टेरेकपासून कटाईसपर्यंत जातां येतें. यांच्याखेरीज चिपर, वॅस्सा, डोगझ, ओरन वगैरे बरेच घाट आहेत. स्व्हॅनेशिया या भागांतील लाटपरी हा घाट बराच रहदारीचा आहे.

या भागांतील दक्षिण उतारावर, विशेषतः व्हेनेशियाच्या प्रदेशांत वनस्पतींची वाढ विपुल आहे. व झाडांच्या कांहीं विशिष्ट जातीहि आढळून येतात.

(३) मध्य कॉकेशस पूर्व भागः—

हा भाग "कसवेक" व "डेरियल" खिंडीपासून "बाबादघ" पर्यंत, २३० मैल लांबीवर पसर-लेला आहे. या भागांत कॉकेशसची रुंदी सर्वांत जास्त आहे. महत्वाचीं शिखरें म्हटलीं म्हणजे 'शान टाऊ,' 'किडेनाइस मागली,' मुरोव्ह, अनसली इत्यादि होत. या भागांतील दाघिस्तान पठार विशेष नमूद कर-ण्यासारखें आहे दाघिस्तानचें डॉ. जी. रँडे यांनीं लिहिलेलें वर्णन वाचनीय आहे.

(४) पूर्व भागः—या भागांतील शिखरें ९००० फुटां-पेक्षां जास्त उंच नाहींत. यांच्या माथ्यावर वर्फ नसतें. येथील रहदारीचा घाट अलटी-अगास हा ४३५५ फुटांपेक्षां जास्त उंचीवर नाहीं. हवा, सृष्टिसौंदर्य व पिकांच्या दृष्टीनें या भागाच्या दक्षिण व उत्तर बाजूंत बराच फरक दृष्टीस पडतो. कॉकेशिया प्रांतांतील बहुतेक सर्व नद्या याच पर्वतांतून उगम पावतात. त्यांपैकीं रीओन, इंगर, अरस, लायख्वा, अराग्वा वगैरे नद्या मोठया असून महत्त्वाच्या आहेत.

एलवुर्ज व कसवेक या विशिष्ट शिखरप्रदेशांत ज्वाला-मुखीचे स्फोट बहुधा होतात. इ. स. १८५९, ७२ व १९०२ सालीं स्फोट होऊन पर्वताच्या पूर्वबाजूस असणारें खेडें (शेमाखा) हें नाश पावलें. यालगतच्या द्वीपकल्पांत (ॲप्से-शन) याचप्रमाणें वारंवार स्फोट होत असतात.

**काकोरी**—संयुक्त प्रांत. लखनौ जिल्हा व तहशिलींतील एक गांव. उत्तरअक्षांश २६°५२' व पूर्व रेखांश ८०°४८'. औंध-रोहिलखंड रेल्वेच्या एका स्टेशनाजवळ ७९८७ लोक-संख्येचा (इ. स. १९११) हा गांव वसलेला आहे. येथें पुरातन काळीं भार लोकांची वस्ती होती असें म्हणतात. पुढें जोनपुरच्या हुसेन शहानें हा गांव मुसुलमानांस इनाम दिला. येथें फकीरांचे फार पुरातन काळचे दरगे आहेत. येथें राहणारीं कांहीं शेख कुटुंबें फार जुनीं असून त्यांपैकीं पुष्कळ वजन-दार आहेत.

**काकेझी**—पंजाबांतलि एक जात. लो. सं. १६४४५. हे मुसुलमान असून लाहोरप्रांत, फिरोजपूर, गुजराथ व झेलम या जिल्ह्यांत आढळतात. हे धाडशी व्यापारी असून समाजांत त्यांचें वजन बरेंच आहे. इ. स. १९०१ पर्यंत या लोकांचा खालसा लोकांत समावेश होत होता १९०१च्या खानेसुमारीच्या वेळेस ही एक निराळी जात असें दाखविण्यांत आलें.

इबट्सन म्हणतो कीं, "हे पूर्वी कलाल असून पुढें त्यांची सांपत्तिक स्थिति सुधारल्यावर कांहीं लोकांनीं कला-लांचा धंदा सोडून दिला, व त्यांपैकीं श्रीमंत व बाटलेल्या लोकांनीं आपण पठाणांचे वंशज आहोंत असें म्हणून घेण्यास सुरुवात केली." रोझहि याच विधानाचा अनुवाद करतो; व हे जरी पठाणवंशज म्हणवितात तरी यांच्यांत भुरसी, मलक, केथला इत्यादि नांवांवरून ते मूळचे कलाल असून पुढें बाट-लेले असावेत असें त्यांनीं केलेल्या आर्जांचा विचार केल्यावर ठरवितो; व काकेझी हें नांव त्यांनीं नंतर धारण केलें असावें असें म्हणतो [रोज-ग्लॉसरी २ पृ. ४३८. से. रि. १९११].

**कांकेज**—बनास नदीच्या दोन्ही तीरांवर सुमारें ३५ मैल पसरलेल्या या कांकेज संस्थानच्या मर्यादा, उत्तरेस पाल-नपूर, पूर्वेस बडोदे संस्थानांतील जिल्हे, दक्षिणेस राधनपूर आणि पश्चिमेस तेरवाड व दिओदर अशा आहेत. क्षेत्र-फळ ५०७ चौ. मै. असून लोकसंख्या सुमारें चाळीस हजार आहे. वार्षिक उत्पन्न ४०,००० रुपये आहे. येथील प्रदेश सपाट असून झाडी बरीच आहे. हवा पालनपुरप्रमाणेंच आहे. जमीन रेतीची व काळी असून पाणीहि मुबलक आहे.

या संस्थानांतील २६ जहागिऱ्या बहुतेक रजपुत अस-लेल्या कोळी ठाकरडा लोकांच्या मालकीच्या आहेत. त्यांनीं कोळी लोकांशीं लग्नें केलीं आहेत. तथापि त्यांच्या पैकीं कांहीं घराण्यांनां सोळंखी, चव्हाण, वाघेला व परमार अशीं नांवें आहेत. थर ही मोठी जहागिरी असून तिची मालकी एका वाघेला कोळ्याकडे आहे. रजपुत घराण्याशीं लग्नसंबंध करून व वाघेला कोळ्यांशीं रोटीव्यवहार बंद करून या वाघेल्यांनीं रजपूतवर्गांत आपला पुनः प्रवेश करून घेतला आहे.

या जहागिरीच्या इतिहासांत बराच सारखेपणा आढळून येतो. त्यांपैकीं खांबोईचा इतिहास पुढें दिला आहे. सुमारें इसवी सन १४०० मध्यें अहमदशहानें कलरिगडच्या सोळंखी सरदारावर चाल केली. तेजमलजी सारंगजी व वेजरोजी हे सोळंखी सरदार ठार झाले. कलरिगड सोळं-खीचे वंशज खेमत, धरमपुर, वीरपूर, सागवाड व रूपवती नगरी इत्यादि ठिकाणीं जाऊन राहिले. वेजरोजी पडल्या-नंतर त्याची बायको अनूपबाई ही गर्भवती असतांना कांहीं अनुयायांसह ओघर अरण्याकडे पळून गेली व त्या ठिकाणीं तिनें दुदोसन नांवाचें खेडें वसविलें. तिचा प्रधान शुक्रवीर-चंद यानें एक महादेवाचें देऊळ बांधलें. राणी अनूपबाईस

वेणीदास नांवाचा मुलगा झाला. तो मोठा झाल्यावर मोहोलोगी नांव धारण करून लुटालूट करूं लागला. त्यानें ४२ खेडीं उध्वस्त केलीं. तेव्हां तेथील लोक अहमदशहाकडे दाद मागण्यास गेले. तेव्हां बादशाही सैन्य दुदोसनवर येतांच हुकमीचंद, दुदो व अमा हे त्यास शरण गेले. तेव्हां त्यांनां वेणीदासास स्वाधीन करण्याबद्दल बादशहानें हुकूम केला. तेव्हां त्यांनीं त्यास त्याच्या स्वाधीन केलें पण त्याचें जन्मवृत्त लपवून ठेवून तो एक कोळी ठाकूर आहे असें त्यास सांगितलें. तेव्हां बादशहाच्या हुकुमाप्रमाणें तेरवाड्याच्या कोळी ठाकुराची मुलगी रतनबाई हिच्याशीं लग्न करणें वेणीदासास भाग पडलें. अहमदशहानें १२ खेडीं वेणीदासाला बक्षीस देऊन ताम्रपट दिला.

वेणीदासाला वजाजी, जेसोजी व नानाजी असे तीन मुलगे झाले. जेसोजीनें दुदोसन सोडलें व खांबोईस आला. त्याच्या वंशजास खांबोई म्हणतात. नानाजीनें अहमदशहाची नोकरी करून कांकेज व चुनवळ येथें स्थाईक वस्ती करण्यास बादशहास मदत केली. बादशहानें त्यास अनिवाड व १२ खेडीं जहागीर दिली. त्याच्या वंशास अनिवाड हें नांव आहे. याचे वंशज व नातलग अर्दुवाड वगैरे आसपासच्या ठिकाणीं स्थायिक झाले. १८१९-२० पासून कांकेजचा ब्रिटिश सरकारशीं संबंध आला व तेव्हांच महीकांठा एजन्सी स्थापन झाली. १८४४ पर्यंत महीकांठाशीं कांकेजचा संबंध होता; परंतु ह्याच सालीं कांकेज पालनपुर एजन्सीकडे देण्यांत आलें.

**कांक्रोली**—उदेपूर संस्थानांतील कांकोली जहागिरीचें मुख्य स्थान. उत्तरअक्षांश २५°४' व पू. रेखांश ७३°५३' मध्यें हें वसलें आहे. येथील लो. सं.(१९०१)३०५३ होती. हें वल्लभाचार्यांच्या वंशजांचें मुख्य स्थान होय. यास सुमारें २१ खेड्यांची जहागीर असून ती महाराण्यानें देणगी म्हणून दिलेली आहे. राजसमंद नांवाचा सुमारें ३ मैल लांब व दीड मैल रुंद तलाव येथें असून त्यावर संगमरवरी दगडाचा प्राकार आहे. तो सुमारें २०० यार्ड लांब व ७० यार्ड रुंद आहे. या प्राकाराच्या एका टोंकास द्वारकाधीशाचें देऊळ असून त्यांतील मूर्ति औरंगझेबाच्या भयानें वल्लभाचार्य येथें पळून आले तेव्हां त्यांनीं आपणाबरोबर आणलेली आहे असें म्हणतात. येथील एका टेकडीवर एका जैन देवालयाचा मोडलेला भाग अजून शिल्लक आहे.

**काखंडकी**—हें विजापूरच्या पश्चिमेस १६ मैलांवर एक जुनें खेडें आहे. येथें महिपति स्वामींची समाधि आहे. महिपति हा प्रथम ऐगली गांवचा कुळकर्णी असून वाढत वाढत तो औरंगझेबाचा प्रधान झाला होता. त्याला संतान नव्हतें म्हणून तो जवळच सारवड येथें असलेल्या भास्करस्वामीला शरण गेला. व त्याचा उपदेश घेतल्यावर आपली नोकरी सोडून दिली व काखंडकीला येऊन विरक्तासारखा राहिला. येथील लोकांनीं त्याला एक घर व थोडी जागा दिली. येथें त्याला जुळीं मुलें झालीं. महिपति कोल्हार येथें मरण पावला. परंतु त्याची समाधि येथें आहे. तिला इनाम असून तें त्याच्या वंशजाकडे चाललें. दरवर्षी मार्गशीर्ष शु॥ पौर्णिमेस आराधना होत असते. येथें एक काळीं मशीद म्हणून पहाण्यासारखी इमारत आहे.

**कागद, तयार करण्याचे पदार्थ.**—शिक्षणाच्या व विद्येच्या प्रसाराबरोबर कागदाचा खप सर्व जगांत इतक्या मोठ्या प्रमाणावर वाढत आहे कीं त्याचा पुरवठा होणेंच कठिण झालें आहे. ह्या उपयुक्त पदार्थांच्या उत्पत्तीच्या वाढीचा इतिहास फार मनोरंजक आहे. यूरोपीय देशांमध्यें अति प्राचीन काळीं पापीरस नांवाच्या ईजिप्तमधील झाडापासून निघणारा पदार्थ लेखनाकरितां उपयोगांत आणीत असत. हिंदुस्थानांत व मध्य आशियाखंडांत जुने संस्कृत ग्रंथकार भूर्जपत्रांवर लिहीत असत. हल्लीं देखील कागदासारखा त्यांचा उपयोग करतात. ज्या ठिकाणीं हवा दमट असते अशा हिंदुस्थानांतील मैदानांत हें भूर्जपत्र साधारणपणें ३०० वर्षांवर टिकत नाहीं. तथापि चिनी-तुर्कस्तानांत इसवी सनाच्या तिसऱ्या किंवा चवथ्या शतकांतील यावरील हस्तलेख सांपडले आहेत. बऱ्याच प्राचीन काळीं हिंदुस्थानांतील सपाटीच्या प्रदेशांत (तसेंच नेपाळांत) ताडपत्रांवर लिहीत असत. हीं ताडपत्रें मुद्दाम तयार करीत; व अणकुचीदार सळईनें (शलाकेनें) त्यांवर अक्षरें कोरून लिहीत व कधीं कधीं या अक्षरांवर काळा रंग येण्याकरितां काजळ फाशीत असत. आसामांतील मूळचे लोक अगरु झाडाच्या अंतर्सालीवर लिहीत. बांबूंच्या सुबक पट्ट्यांवर चीन देशाचा प्राचीन इतिहास लिहिला होता व त्याचा एका राजघराण्याच्या लढाईत नाश करण्यांत आला असें म्हणतात. ईजिप्तमध्यें पापीरसचा उपयोग होण्यापूर्वी फार प्राचीन काळापासून चिनी लोकांत लिहिण्याच्या कामीं बांबूंचा उपयोग प्रचलित होता असा समज आहे.

स्टीन साहेबाला खोतान राज्यांत सरकारी जुनीं हस्तलिखित कागदपत्रें सांपडलीं आहेत. त्यांतील कांहीं खोतान संस्थानांत व कांहीं चीन देशांत लिहिलेलीं आहेत. तीं लिहिण्यासाठीं लाकडाच्या फळ्या (यांपैकीं जुन्या फळ्या बांबूच्या पट्ट्यांप्रमाणें आहेत), चर्मपत्रें, निरनिराळ्या प्रकारचे कागद आणि भूर्जपत्रें हें साहित्य वापरलें आहे. कागद निघण्यापूर्वी (इ.स१०५.) चीन देशांत बांबूच्या पट्ट्यांवर लिहीत असत असें चव्हान्नेस म्हणतो. यावरून असें दिसतें कीं लांकडाचा उपयोग बांबूच्या नंतर करूं लागले. चीन देशांत कागद निघाल्यानंतर दीड शतकानें खोतान येथील लोकांनां तो मिळाला. परंतु तिसऱ्या शतकापर्यंत लिहिण्यासाठीं लोक लांकडाचाच उपयोग करीत असत. लांकडानंतर कागदावर पत्रें लिहिण्यास सुरुवात झाली. स्टीन यास आढळलेल्या कागदास वरून भाताची पेज लावलेली होती. अजून देखील काश्मिरी कागदाला भाताची पेज लावतात. हा कागद कांहीं शतकांपूर्वी कुराण

लिहिण्यासाठीं वापरीत असत. याच्यावर पाणी पडलें तर लिहिलेलें पुसतें हा यांतील दोष सर वाल्टर लॅरेन्स यानें निदर्शनास आणला.

दंडान युइलिक (८ वें शतक) येथें सांपडलेल्या हस्तलिखिताचा कागद खोतान येथें बनविलेला असावा. तसेंच कुच येथें सांपडलेला कागद (५ वें शतक) ब्रूसोनेशिया याच्या तंतूंचा केला असावा असा समज आहे. परंतु तुर्कस्तान, मंगोलिया, यारकंद वगैरे ठिकाणीं वनस्पतिशास्त्रज्ञांनीं बऱ्याच वनस्पतींची तपासणी केली. परंतु त्यांना ब्रूसोनेशिया हें झाड सांपडलें नाहीं. तेथें बनलेला कागद तेथल्याच वनस्पतीचा बनविला होता; याला उदाहरण म्हणजे तुतीच्या झाडाच्या वाखाचा ६ व्या शतकापासून जपानमध्यें कागद तयार करितात. परंतु प्रो. गाइल्स यांचें असें म्हणणें आहे कीं, चीन देशांतील पूर्वींचा कागद तागाचा भुसा, जुना ताग, मासे पकडण्याची जाळीं वगैरेंचा होत असे; पण हल्लीं वांबूचे तंतू, ब्रूसोनेशिया प्रापिरिफेरा याची साल, भाताचा कोंडा, ताग, तुतीच्या झाडाची साल, वेत, शेवाळ, धान्याचा भुसा व रेशीम यांच्यापासून कागद तयार करितात. स्टीन याला खोतान येथें सांपडलेल्या हस्तलिखितांवरून असें सिद्ध होतें कीं कागद तयार करण्याची कृति यूरोपमध्यें माहीत होण्यापूर्वींच इराण, मध्य आशिया, तिवेट आणि चीन देश यांठिकाणीं वहुतकरून ती माहीत असावी.

हिंदुस्थानांत कागद तयार करण्याची कला केव्हां माहीत झाली हें विज्ञानेतिहासांत पृ. ७६ वर दिलेंच आहे. त्यावरून अलेक्झांडरच्या काळापासून हिंदुस्थानांत ही कला माहीत होती असें दिसतें.

सध्यां हिंदुस्थानांत होणारा कागद खराव कागदाचांच पुन्हां केलेला असतो. येथें कागदासाठीं पुष्कळ पदार्थ किंवा कच्चें द्रव्य आहे पण त्यांतील कोणतें द्रव्य चांगलें हें अजून ठरलें नाहीं. तागापासून निघणाऱ्या वाखाचा कागद सर्वांत स्वस्त किंमतींत तयार करतां येईल. तसेंच भवर आणि मुंज नांवाचें कागदासाठीं उपयोगी पडणारें मुख्य दोन प्रकारचें गवत आहे. या गवताचा वाफेनें चालणाऱ्या कागदाच्या गिरण्यांत बराच उपयोग करितात; पण हा कागद फायदेशीर पडत नसल्यामुळें त्याचा पुढें उपयोग करणें कदाचित वंद पडेल. वांबूचा देखील चांगला कागद होऊं शकेल परंतु याला लागणारीं रासायनिक द्रव्यें फार महाग असतात. त्याचप्रमाणें वांबूचे कोंवळे अंकुर या कामासाठीं लागत असल्यामुळें बांबूंचा नाश होण्याचा संभव असतो. म्हणून हल्लीं एक तर भवर आणि मुंज किंवा इतर कांहीं जातींचें गवत, जुन्या चिंध्या, पोत्यांचे तुकडे, ताग आणि सण यांचे दोर, टाकाऊ कागदाचे तुकडे वगैरे द्रव्यें कागद करण्यासाठीं उपयोगांत आणतात.

कृ ति.—वरील द्रव्यांचा लगदा तयार करून तो धुवून स्वच्छ करावा लागतो. चिंध्या असल्या तर त्या पूर्वींच साफ कराव्या लागतात. नंतर त्यांत अलकली टाकून तो उकळतात (तो गवताचा असल्यास, ज्यावर वाफेचा १० ते ४० पौंडांचा दाब आहे अशा शे. १० प्रमाणांतील दाहक सोड्याच्या द्रावणांत तो उकळावा लागतो). याप्रमाणें लगदा तयार झाल्यावर त्यांतील राहिलेले अलकली धुवून काढतात व त्याचा पुन्हां यंत्रानें बारीक रांधा तयार करून त्यांत पाहिजे असेल तो रंग टाकतात. याला मग्म म्हणतात. कागद तयार करण्याकरितां बारीक तारेचा जाळीदार कपडा या लगद्यामधून काढतात. म्हणजे पाहिजे तेवढ्या जाडीचा पापुद्रा या कापडाला चिकटून येतो. हा पापुद्रा काढून घेतात व त्याला दोन रुळांमधून काढून दावून काढतात व पुन्हां तापलेल्या रुळामधून काढून चांगला सुकवितात. स्वीडन व जर्मनी इत्यादि पाश्चात्य देशांत लांकडाच्या भुशापासून फार मोठ्या प्रमाणावर रांधा करतात व त्याचा उपयोग कागद करण्याकडे होतो. ह्या तऱ्हेचा रांधा हिंदुस्थानांतील कांहीं जंगलांतील झाडांचा किंवा कांहीं जातींच्या गवताचा उपयोग केल्यास हिंदुस्थानांतहि कागद तयार करतां येईल असें कांहीं तज्ज्ञांचें म्हणणें आहे. परंतु अद्यापपावेतों त्यांत विशेष यश आलें नाहीं असें दिसतें.

का ग दा च्या गि र ण्या—इंग्लंडांत कागद तयार करण्याचे कारखाने पहिल्यानें १५८८ सालीं निघाले. हे कारखाने कैंटमधील डार्टफोर्ड गावीं जॉन स्पिंयेलमन नांवाच्या जर्मन रानपारख्यानें काढले. ह्याच्या अगोदर एक शतकापूर्वीं यासारखेच कारखाने स्पेन येथें निघाले होते. त्याच्या नंतर म्हणजे १६९० त देखील फक्त इंग्लंडांतच जाडा तपकिरी रंगाचा कागद होत असे व उत्तम पांढऱ्या कागदाचा पुरवठा फ्रान्स आणि हॉलंड या दोन देशांतून इंग्लंडांत होत असे. फ्रान्सशीं लढाई सुरू झाल्यामुळें जकात वाढली व त्यामुळें इंग्लंडमधील कारखान्यांत सुधारणा करण्यास उत्तेजन मिळालें. मेडस्टोन येथील मि. जेम्स व्हाटमन यानें पहिल्यानें पांढरा कागद तयार केला. त्यानंतर इंग्लंडांत कागद करण्याच्या धंद्यांत बरीच प्रगति झाली. परंतु १८०१ पर्यंत हातानेंच कागद तयार करीत असत.

कागद करण्यासाठीं कापसाचा व कधींकधीं तागाचा इंग्लंडांत पहिल्यानें उपयोग करीत असत. सध्यां फारकरून लांकडाच्या भुशाच्या लगद्याचा उपयोग करितात. बाहेरून कच्चा माल आणवून मग इंग्लिश कारखान्यांत हा लगदा बनवितात.

आज इंग्लंडांत २३१, स्कॉटलंडांत ६१ व आयर्लंडांत ७ कागदाच्या गिरण्या आहेत. लांकडाचा लगदा तयार करणाऱ्या गिरण्याहि आहेत. शिवाय कानडांत ३४, आस्ट्रेलियांत ७ व न्यूझीलंडांत ३ याप्रमाणें गिरण्यांची संख्या इतरत्र आहे. जगांत तयार होणाऱ्या कागदापैकीं शेंकडा ११ ग्रेटब्रिटनमध्यें

मध्यें तयार होतो. नार्वे, स्वीडन व जर्मनी या देशांतून इंग्लंडांत कागद फार येतो.

इ.स. १८४० पूर्वी हिंदुस्थानांतील कागदाचा चीन देशांत पुरवठा होत असे. यामुळें हिंदुमुसुलमानांत चळवळ होऊन हातानें कागद तयार करण्याचे कारखाने निघाले. सर चार्लस वूड हे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी असतांना त्यांनीं हिंदुस्थान-सरकारला लागणारा सर्व कागद ग्रेटब्रिटनमध्यें घ्यावा असा हुकूम सोडला. त्यामुळें हिंदुस्थानांतील वाढत चाललेल्या कारखान्यांनां उतरती कळा लागली.

हिंदुस्थानांत कागदाच्या गिरण्या केव्हां स्थापन झाल्या हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. मि. डि. एम. ट्रेल यानें कांहीं वर्षांपूर्वी कागदाच्या गिरण्यांसंबंधीं उपयुक्त अशी माहिती लिहून ठेवली आहे. तो म्हणतो कीं या धंद्यांत सरकारी ५ कोटी पौंड भांडवल गुंतलें होतें व त्यांपैकीं तीनचतुर्थांश भांडवलाचीं यंत्रें होतीं व एकचतुर्थांश भांडवल वरखर्चाकरितां राखून ठेवलें होतें. रामपूर येथील गिरणी ही पहिली होय. येथें होणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या पांढऱ्या कागदाला 'रामपुरी कागद' म्हणतात.

## आजचे हिंदुस्थानांतील कागदाचे कारखाने

| ठिकाण | गिरण्यांचीं नांवें | स्थापना सन | अधिकृत भांडवल | मजुरांची सरासरी | उत्पादन-टन | किंमत रु. | कागदाचें वर्णन. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| बंगाल.— | | | | | | | |
| टिटाघर (२४ परगणे) | टिटाघर कागद गिरणी नं. १ | १८८२ | २६ लक्ष | १७०० | ८२०१ | ६७७४२५१ | टिपकागद, मळई लावलेला, रंगीत. चिवट, पांढरा, बदामी, मोहरेचा, छापण्याचा व लिहिण्याचा. |
| कनकिनारा (२४ परगणे) | टिटाघर कागद गिरणी नं. २ | १९०३ | | १५०० | ९७४२ | ६९६१६३२ | |
| राणिगंज (वरद्वान) | बंगाल कागद गिरणी | १८९० | ८ लक्ष | ११०० | ७००० | ४५००००० | लिहिण्याचा, पांढरा, छपाईचा, बदामी, पिंगट टिपकागद. |
| | एकूण. | | ३४ लक्ष | ४३०० | २४९४३ | १८२३५८८३ | |
| संयुक्तप्रांतः— लखनौ. | उत्तर हिंदुस्थान कूपरकागद गि. | १८७९ | ८ लक्ष | ६२४ | २८९२ | १३८९४४० | पिंगट, बदामी, पांढरा छपाईचा मळई लावलेला रंगीत टिपण्याचा, युद्धछपाईचा. |
| मुंबई इलाखा मुंबई | गिरगांव कागद गिरणी | १८६२ | २ लक्ष | ६० | ६०० | ८०००० | केसिंग व पिंगट |
| ,, | डॉ पदमजी कागद गिरणी | १९१३ | | २२० | ११७१ | ४५८२२७ | पांढरा, छापण्याचा व लिहिण्याचा, रंगीत, पिंगट, |
| पुणें | रे कागद गिरणी | १८८५ | ५ लक्ष | २०१ | ४५३ | ३०२३९८ | लिहिण्याचा, छापण्याचा, टिपण्याचा व पिंगट. |
| | मुंबई इलाखा एकूण | | ७ लक्ष | ४८१ | २२२४ | ८४०६२५ | |
| | ब्रिटिश हिंदु. एकूण | | ४९ लक्ष | ५४०५ | ३००५९ | २०४६५९४८ | |
| हिंदी सं.:— त्रावणकोर सं. | ... | | ... | ... | ... | ... | ... |
| पुनालोर | मिनाक्षी कागद गिरणी. | १९१४ | १४लक्ष | १०० | ३०० | १६८००० | पिंगट. |
| ग्वालेर सं. मोरार | शिंदे कागद गिरणी. | १९०६ | २ लक्ष | २५४ | १००३ | ४८४००० | ... |
| | हिंदी संस्थानें एकूण | | ३४ लक्ष | ३५४ | १३०३ | ६५२००० | |
| | हिंदुस्थान एकूण | | ५२४०००० | ५७५९ | ३१३६२ | २१११७९४८ | |

**कागद करण्याची कृति.**— सुती कापडाच्या व तागाच्या चिंध्यांतून पांढऱ्या, काळ्या व इतर रंगांच्या चिंध्या वेगळाल्या काढून त्यांच्या गांठी व शिवणी तोडतात आणि यंत्रानें किंवा हातांनीं त्या वडवून त्यांतील धुरळा व माती काढून नंतर त्यांचे बारीक तुकडे करतात. रंगीत चिंध्यांस क्लोरीन वायूनें धुवून त्यांचा रंग घालवितात.

नंतर सर्व पांढऱ्या चिंध्यांस पापडखाराच्या पाण्यांत टाकून शिजवितात व त्यांतील मळ घालवितात. याप्रमाणें स्वच्छ केलेल्या चिंध्यांस डंगांत घालून कुटतात किंवा यंत्रानें त्यांचा वलक करितात. ह्या वलक पुन्हां एकदां शुभ्र करण्याच्या पुडीनें धुतला, म्हणजे तो कागद तयार करण्यालायक होतो. हा वलक पाण्यानें भरलेल्या एका मोठया हौदांत सोडून देतात. या रीतीनें हवा तेवढा पातळ थर घेऊन बारीक चौकोनी तारांची किंवा बारीक काड्यांची एक ताटी केलेली असते. ही ताटी एका लांकडी चौकटीवर बसवून ती चौकट हातांत घेऊन कागद करणारा मनुष्य हौदाजवळ बसतो व ही चौकट थोडी कलती करून हौदांत बुडवतो व तिजवर थोडा वलक घेऊन वर उचलून सरळ धरतो; व हालवून तो वलक सर्व ठिकाणीं सारखा पसरेल असें करतो. या योगें पाणी सर्व झिरपून ताटींतून खालीं जात असतें. याप्रमाणें एक दोन वेळां बुडवून वाटेल त्या जाडीचा कागद तयार होतो. नंतर जवळच कट्ट्यावर जाड कपड्याचा कोरडा तुकडा टाकलेला असतो. त्यावर ताटी पालथी घालून व हातानें झटका मारून कागदाचें पान त्या कपड्यावर पाडवितो. या रीतीनें २ माणसें व एक मुलगा दररोज ६ पासून ८ रिमें कागद तयार करूं शकतात.

हा कागद प्रथम मऊ, निःसत्व व शोषक असतो. त्यास वळकटी येऊन त्याचीं छिद्रें बुजविण्याकरितां खळींत टाकून दावांत घालून पुन्हां वाळवावा लागतो. शेवटीं त्यास कवडीनें किंवा गुळगुळीत गारेनें घासून मोहरा आणतात. वर लिहिलेली सर्व कृति कागदांच्या मोठया गिरण्यांत यंत्रांच्या साह्यानें आपोआप होऊन कापडाच्या ताग्याप्रमाणें कागदाच्या मोठाल्या आकाराच्या सुरळ्या तयार होतात. नंतर हव्या त्या आकाराच्या कापून त्यांचीं रिमें बांधतात.

टिपण्याचे कागद केवळ बिन खळलेले कागद असतात. कोल्हापुरी, जुन्नरी, दौलताबादी वगैरे कागद फार नामांकित होते. त्यांवर लिहिलेले लेख ३०० पासून ४०० वर्षांवर टिकलेले दृष्टीस पडतात. ब्राउन पेपर हे गोणपाट, ताग, कॅनव्हस वगैरे पदार्थांपासून करतात. पुठ्ठ्याचे व गंजिफांचे कागद गवतापासून किंवा ब्राऊनपेपर एकावर एक चिकटवून तयार करतात.

सुधारलेले कागद करण्याचें यंत्र म्हणजे एकटें दुकटें नसून अनेक लहान मोठीं सहाय्यक यंत्रें कागद करण्याच्या क्रियेला आवश्यक असतात. लाकडाचा लगदा छापण्याच्या किंवा लिहिण्याच्या स्थितींत आणावयाचा म्हणजे साधें काम नव्हे. प्रथम तो कुटून बारीक करून त्यास ब्लीचींग पावडरनें शुभ्र करावा लागतो; व पुन्हा भट्टींत घालून तो उकळून पुन्हां स्वच्छ करावा लागतो. प्रथम हा लगदा कुटण्याच्या यंत्रांत घालतात. तेथें त्याचे तंतू वेगवेगळे होतात. या यंत्रांतून दुसऱ्या एका यंत्रांत हा पिंजलेला लगदा येतो. तेथें सुमारें शंभरपट पाण्यांत तो मिसळला जातो. नंतर मुख्य यंत्राच्या 'ओल्या' टोंकाकडे हा जातो. या ठिकाणीं तारेच्या जाळीवर हा पातळ लगदा पडतो. यांतील पाणी पूर्णपणें निघून जावें म्हणून या जाळीला शोषक पेटया बसविलेल्या असतात; ह्या पेटया जाळींतून खालीं न पडणारें पाणी किंवा ओलावा वाफ्वाकर्षणानें शोषून घेतात. या जाळीच्या टोंकाजवळ कागदावर जलचिन्ह (वाटरमार्क) उठविणारा पितळी अक्षरांचा रूळ असतो; तो या मऊ लगदी कागदावर पाहिजे तीं अक्षरें उठवितो. तारेच्या टोंकाशीं स्पंजासारखा व मऊ झालेला हा लगदा आल्यावर तो फिरणाऱ्या बनात किंवा फेल्टवर कोरडा होऊन चढूं लागतो व या फेल्टच्या सहाय्यानें कोरड्या करणाऱ्या पहिल्या रुळावर व त्यावरून इतर रूळांवर जात जात व कोरडा आणि कणखर होत होत शेवटीं एका रूळावर गुंडाळला जातो. या रुळांपैकींच कांहीं रूळ अति गुळगुळीत असल्यामुळें व त्यांतूत प्रमाणशीर दावाखालीं कागद गेल्यामुळें त्यावर मोहरा येतो. या सर्व क्रिया इतक्या थोड्या वेळांत होतात कीं, पहाणाराला हा एक चमत्कार वाटतो. यापेक्षांहि आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे 'ओल्या' टोंकाशीं असणारा माणूस जसा पाहिजे तसा पातळ जाड कागद करण्याकरितां व लगदा कमीजास्त प्रमाणांत सोडण्याकरितां इकडचीं तिकडचीं अनेक यंत्रें ज्या कुशलतेनें फिरवीत असतो, तें त्याचें विशेष कसब होय. कारण यंत्रांत किंवा साधनांत अगदीं थोडा जरी फरक झाला तरी कागद पूर्वीसारखा निघत नाहीं.

कागदाचे व्यापारी आकार.—

| नांव | आकार इंचेस |
|---|---|
| पॉट | १२॥×१५ |
| फुलस्कॅप | १३।×१६॥ |
| डबलफुलस्कॅप | १६॥×२६॥ |
| फुलस्कॅप व थर्ड | १३।×२२ |
| „ व हॉफ | १३।×२४॥। |
| पिन्ड पोस्ट | १४॥×१८॥ |
| स्मॉल पोस्ट | १५।×१९ |
| लार्ज „ | १६॥×२१ |
| डबललार्ज „ | २१×३३ |
| मीडियम | १८×२३ |

चित्रकलेचे व पुस्तकांचे कागद

| | |
|---|---|
| डेमी | १५॥×२० |
| मिडियम् | १७॥।×२२॥ |
| रॉयल | १९×२४ |
| सुपररॉयल | १९॥×२७ |
| ईंपीरियल | २२×३० |
| एलिफन्ट | २३×२८ |
| डबल रायल | २०॥×४० |
| कोलंबीर | २३॥×३४॥ |

( व्यापारी आकार पुढें चालू )

| | |
|---|---|
| एटलॅस | २६×३४ |
| अँटिकेरियन | ३१×५३ |
| छापखान्याचा कागद | इंचेस |
| डेमी | १७॥×२२॥ |
| डवल डेमी | २२॥×३५ |
| काड डेमी | ३५×४५ |
| डवल फुल्सकॅप | १७×२७ |
| रॉयल | २०×२५ |
| डवल रॉयल | २५×४० |
| डवल क्राऊन | २०×३० |
| काड „ | ३०×४० |
| इंपीरियल | २२×३० |

इं डि या पे प र.—हा अति पातळ, हलका, परंतु चिंवट आणि प्रकाशाभेद्य असा कागद असतो. इ. स. १८४१ सालीं ऑक्सफोर्डच्या एका पदवीधरानें पूर्वेकडून ( चायना हिंदुस्थान ) अति पातळ प्रकारचा एक कागदाचा नमुना परत स्वदेशीं नेला. यावर पुष्कळ प्रयोग होऊन यासारखा कागद इ. स. १८७५ सालीं तयार झाला. या कागदाचें अंग शामॉयलेदरइतकें चिंवट असल्याचें दिसून येईल.

का ग दा सा ठीं ला ग णा रा क च्चा मा ल.—हिंदुस्थानांत कागद तयार करण्यासाठीं खालीं दिलेला कच्चा माल उपयोगांत आणितात.

अडनसोनिआ डिजिटाटा अगेव्ह स्पीसीज, ॲंटिआरिस टॉक्सिकारिआ, बांबूसी, ब्रौसोनेटिआ पापीरीफेरा, कॉर्चोरस, क्रोटालारिआ जुन्सिआ, डाफ्ने कॅनाबिना, एड्जवर्थिआ गार्डनेरी, हेलिक्टेरीच आयसोरा, हिबिस्कस कॅनाबिनस, इश्चिमुम ॲंगुस्टिफोलिअम, मुसा स्पीसीज, ऑपुन्शिआ डिलेनिआय, फोनिक्स पाल्डोसा, सॅकॅरम अरुंडिनासिअम, सान्सेव्हिएरिआ झेलानिका. कपाशीच्या धांड्यांचाही उपयोग अमेरिकेंत कागद बनविण्याकडे करतात; व त्या दिशेनें हिंदुस्थानांतहि प्रयत्न चालू आहेत.

तुरटी, कॉस्टिक सोडा, कळीचा चुना, जिलेटाईन, सोडा ॲश, रोझिन इतके पदार्थहि कागदाकरितां लागतात. यांखेरीज निरनिराळे रंग किंवा रंगाच्या मातीचाहि उपयोग कागद करण्याकडे होतो.

हिंदुस्थानांत कागदाची आयात निर्गतीच्या मानानें बरीच जास्त आहे व सुमारें ८०००० टन कागद हिंदुस्थानांत दरवर्षी लागतो. त्यातून हिंदुस्थानांत तयार झालेला माल वजा जातां ५०००० टन कागद अन्य देशांतून आपणास आणावा लागतो. हिंदुस्थानांत पूर्वी पुष्कळ ठिकाणीं फार मजबूत, सुबक व टिकाऊ कागद बनविण्याचे कारखाने होते. परंतु त्यांचा यांत्रिक कागदांपुढें टिकाव न लागल्यामुळें ते सध्यां नामशेष झाले आहेत. १९१३–१४ सालीं १ कोटी ५९ लक्ष किंमतीचा कागद बाहेरून आला,पण १९२०–२१ सालीं ७ कोटी ३० लक्षांचा कागद हिंदुस्थानांत आला.

हल्लींचे उतरलेले भाव लक्षांत घेतल्यास आयातीच्या रकमेवरून मालाच्या प्रमाणांत कांहीं फरक पडला असें दिसत नाहीं. उलट पक्षीं १९२१–२२ सालापेक्षां १९२२–२३ सालीं कागदाची आयात अधिकच झाली. १९२१–२२ सालापेक्षां १९२२–२३ सालीं कागदाच्या आयातींत सुमारें अर्धा कोट रुपयांची वाढ दिसते. कागद तयार करण्याच्या वस्तूंची आयात कमी झाली तरी या वस्तूंची आयात वाढून कागदाची आयात कमी झाली नाहीं. उत्तम कागद, छपाईचा कागद, वेस्टबोर्ड, मिलबोर्ड, कार्डबोर्ड वगैरे कागदांच्या अनेक जाती आहेत. यांपैकीं हिंदुस्थानांत मुख्यत्वेंकरून छपाईचा कागद पुष्कळ येतो. या प्रकारचा कागद १९२१–२२ सालीं ११००० टन आला होता; तो १९२२–२३ सालीं १९३०० टन आला आहे. यावरून या प्रकारच्या कागदाच्या आयातींत केवढी मोठी वाढ झाली आहे तें दिसून येईल. हा कागद बहुतेक नॉर्वे व इंग्लंड येथून येतो. जर्मनी व नेदरलंड्स यांचाहि हा व्यापार वाढूं लागला आहे.

कागदाच्या आयातीचें निरनिराळ्या देशांचें प्रमाणः—

| देश | १९१३–१४ | १९२०-२१ | १९२२–२३ |
|---|---|---|---|
| युनायटेड किंगडम् | ५६ | ४३ | ४८ |
| नॉर्वे | ५ | १७ | १५ |
| अमेरिका | १ | १२ | ४ |
| स्वीडन | ३ | ९ | ७ |
| जपान | १ | ६ | १ |
| जर्मनी | १७ | २ | ११ |
| इतर | १७ | ११ | १४ |
| एकंदर | १०० | १०० | १०० |

यावरून नॉर्वे व जर्मनी यांच्या व्यापाराची तेजी दिसून येते. जपाननें मध्यंतरीं आपला बराच माल इकडे आणला; परंतु तो आतां कमी कमी होत असल्याचें स्पष्ट दिसतें. ( ज्ञानप्रकाश ता.१७ जुलै १९२४ ).

[ सं द र्भ ग्रं थ.—यावर अनेक ग्रंथ आहेत. त्यांपैकीं कांहीं महत्वाचे—ए टेक्स्ट बुक् ऑफ पेपरमेकिंग ( लंडन, १८८८ ); डेव्हिस–दि मॅन्युफॅक्चर ऑफ पेपरः ग्रिफिन अँड लिटल–केमिस्ट्री ऑफ पेपरमेकिंग; हिंदुस्थानसरकारचा ' दि मॅन्युफॅक्चर ऑफ पेपर अँड पेपर पल्प इन् बर्मा ' वरील रिपोर्ट ( लंडन १९०६ ); सिंडाल—पेपर टेक्नॉलॉजी; वॅट; पेपर मेकर्स मंथली जर्नल ( लंडन ); पेपर ट्रेड जर्नल न्यूयार्क ].

**कागवाड.**—हें गांव बेळगांव जिल्ह्यांत अथणीपासून पश्चिमेस ११ कोसांवर आहे. येथें कापसाचा व्यापार बराच चालतो. येथें ब्रह्मनाथ व सटवाई यांचीं देवळें आहेत.

ब्रह्मनाथाला कग्गोडराम असें म्हणतात. या देवावरूनच कगवऊर (कागवाड) असें या गांवाचें नांव पडलें आहे. देऊळ जमीनींत सुयारांत असून तेथें एक शिलालेख आहे. सटवाई (षष्ठीची देवता) ही देवी इकडे फार प्रख्यात असून मूल जन्मल्यानंतर तीन महिनेपर्यंत मुलांच्या आया हिची रोज पूजा करीत असतात. माघांत हिची जत्रा भरते. येथें पूर्वी पटवर्धन जहागीरदार रहात होते. हें एक लहान संस्थान होतें. स. १८०० नंतर जेव्हां गंगाधरराव व चिंतामणराव पटवर्धन यांच्यांत भांडणें सुरू झालीं त्या वेळीं या पटवर्धन घराण्यांत इतरत्रहि भाऊबंदकी होऊन मिरज, सांगली, जमखंडी, कुरुंदवाड, तासगांव, चिंचणी, सोनी व कागवाड असे जहागिरीचे हिस्से झाले. स. १८२७ त कॅ. क्लून हा या गांवीं गेला होता व त्यानें तेथील त्या वेळचें वर्णन केलेलें आहे. पुढें नरगुंदकर भावे यांनीं जें युद्ध (इंग्रजाविरुद्ध) केलें त्यांत कागवाडकरांचा संबंध होता असें ठरवून इंग्रजांनीं सदर जहागीर खालसा केली. तासगांव सोनी, चिंचणी या जहागिरीहि पुढें खालसा केल्या. कागवाडास जहागीरदारांचा जुना वाडा आहे. [ वे. ग्या; खरे. ऐ. ले. सं. ].

**कागल.**—या नांवाचीं दोन संस्थानें आहेत. एक मोठी पाती व एक छोटी पाती. येथील जहागीरदार घाटगे आडनांवाचे मराठे आहेत. हा गांव कोल्हापुराहून दक्षिणेस सहा कोसांवर पुणें-बेळगांव रस्त्यावर आहे. ही जहागीर कोल्हापूर संस्थानची मांडलिक आहे. गांवाच्या उत्तरेस अर्ध्या कोसावर दुधगंगा नदी आहे. ही जहागीर सदर नदीच्या खोऱ्यांत वसलेली असल्यानें व जमीन सुपीक असल्यानें चांगल्या उत्पन्नाची आहे. बागबगाईत व आमराया सर्वत्र आहेत. सन १९०१ तील लोकसंख्या मोठ्या पातीची ४४२९० व छोट्या पातीची ६३३३ असून दोहोंतील गांवांची संख्या अनुक्रमें ४१ आणि ६ आहे. पेशवाईत रावबाजींच्या वेळीं अत्यंत क्रूरकर्मा म्हणून प्रख्यातीस आलेला दौलतराव शिंद्याचा सासरा (बायजाबाईचा बाप) जो सर्जेराव घाटगे तो याच कागलचा जहागीरदार होता. कोल्हापूरची साहसी राणी जिजाबाई हिनें एकदां कागलकरांनां त्रास दिला होता. "स. १७९८ जानेवारी ते जूनपर्यंत पुण्यावर जी अनर्थपरंपरा ओढवली, तिला कारण म्हणून बाजीराव (दुसरे) व दौलतराव शिंदे यांचेंच नांव जरी पुढें आलें तरी त्या दोघांच्या दुष्ट बुद्धीस प्रेरणा देणारा व त्यांच्या नांवावर वाटेल तें राक्षसी कृत्य करण्यास न भिणारा सर्जेराव घाटगे हाच त्या सर्व अनर्थांचें मूळ होय" (खरे खं. १०. ५३०३). पेशव्यांच्या राज्यांत यानें इतका धुमाकूळ घातला कीं "ब्राह्मण म्हणजे पदार्थ काय" (कित्ता. ५३१५). याप्रमाणें त्यानें ब्राह्मणांचा फार छळ केला [ सर्जेराव घाटगे पहा ]. कोल्हापूरचे माजी छत्रपति कै. शाहूराजे हे या कागल घराण्यांतीलच असून दत्तक गेले होते. स. १७७५ नंतर ५० वर्षांत कोल्हापूरकरांनीं कागलवर स्वाऱ्या करून कित्येक वेळां हा गांव जाळला होता. या भागांत खादी निघते. येथें एक इंग्रजी शाळा, एक मुलांची व मुलींची शाळा व एक दवाखानाहि आहे. येथील जहागीर मूळ विजापूरकर आदिलशहानें निर्माण केली. जुन्या मशिदींचे व देवळांचे कांहीं अवशेष येथें आहेत. सन १८०० मध्यें कोल्हापूरचे कारभारी यशवंतराव शिंदे यानें येथील किल्ला पाडला. त्याच्या जागीं स. १८१३ त बाबा घाटगे हिंदुराव यानें नवीन किल्ला बांधला. त्याचा तट १८५८ त इंग्रजांनीं पाडावयास लाविला. हिंदुरावानें डीगच्या प्रसिद्ध वाड्याच्या धर्तीवर बांधविलेला वाडा गांवांत आहे. नंतर जयसिंगराव घाटग्यांनीं नुक्ताच १ लाख किंमतीचा नवीन वाडा बांधला आहे. येथील गैबीपिराचा उरूस होतो त्या वेळीं देवघेव बरीच चालते. लोक आपली वर्षाची बेगमी बहुधा याच वेळीं करून ठेवतात [ को. ग्या; इं. ग्या. भा. १४; खरे. खंड. १०. डफ.]

**कागान अथवा खागान**—वायव्येकडील सरहद्दीचा प्रांत. हजारा जिल्ह्यांतील एक डोंगराळ खोरें. याच्या सभोंवार दक्षिण दिशेखेरीज काश्मीर संस्थानचा मुलख आहे. क्षेत्रफळ ८०० चौ. मैल. आसपासचे डोंगर १७००० फूट पर्यंत उंच आहेत. या भागांतील बराच भाग संरक्षित जंगल म्हणून ठेवलेला आहे. गवत कापून नेण्याकरितां व गुरें चारण्याकरितां दरवर्षी परवानगी घ्यावी लागते. जंगलखातें सागवान तोडून कुन्हार नदीच्या प्रवाहांत सोडून खालीं दक्षिणेस आणतें. ब्रिटिश हिंदुस्थानचा अगदीं उत्तरेकडील प्रदेश हा होय. या खोऱ्यांत मुसुलमान, स्वाति आणि गुजर लोकांची वस्ती आहे. कागान खेडें उ.अ.३४° ४६′ पू. रे. ७५° ३४′ यावर वसलेलें आहे. [ इं. गॅ. १४ ]

**कांगारू**—पोटाशीं असलेल्या पिशवींत पोरें ठेवणाऱ्या प्राण्यांनां हें नांव आहे. यांच्या सुमारें ४० जाती आहेत. ह्यांचा आकार लहान सशापासून शेळीएवढा लहानमोठा असतो. कांगारूच्या शरीराच्या मानानें त्याचें डोकें फारच लहान असतें. त्याचे खांदे व पुढील अवयव वाढलेले नसून मागील अवयव सशक्त व ओबडधोबड असल्यामुळें हा प्राणी चार पायांवर चालतांना फार कुरूप दिसतो. मागच्या पायांच्या जोरावर हा प्राणी जलद चालूं लागला व उड्या मारूं लागला कीं, त्याची शेपूट ताठ व सरळ बनते. तो बसला म्हणजे मागचे दोन पाय व शेपूट या तिवईवर बसतो; त्यावेळीं त्याचे पुढील दोन पाय उरावर लोंबकळूं लागतात. अशा बैठकीमुळें कांगारूस चांगलें पाहतां येतें, ऐकतां येतें व समीपवर्ति शत्रूचा वासहि त्यास येऊं शकतो. त्याच्या पुढच्या पायांस पंजा असून प्रत्येकास पांच बोटें असतात. मागचे पाय लांब, वळकट व आकुंचित असतात.

या प्राण्यास एकंदर ३४ दांत असतात. वरच्या जबड्याचे तीन छेदक दांत कमानीच्या आकारासारखे जबड्यांत

असून त्यांचीं टोंकें तीक्ष्ण असतात. मधला छेदक दांत दोहोंपेक्षां मोठा असतो. खालच्या जबड्यांत प्रत्येक बाजूला एकच दांत असून खालच्या दोन्ही छेदक दंतांचा कात्रीप्रमाणें कांगारूस उपयोग करतां येतो. पोरें पिशवींत ठेवणाऱ्या इतर प्राण्यांप्रमाणें कांगारूचा दुधाचा दांत प्रत्येक जबड्याच्या एकाच बाजूला असतो. त्याचे चर्वणाचे व इतर छेदक दांत केव्हांहि पडून दुसरे येत नाहींत.

मणक्यांसंबंधीं पाहिलें तर या प्राण्यास, मानेंत ७, पाठींत १३, कटिप्रदेशांत ६ व त्रिकास्थिगत २ मणक्या असतात. जंघास्थी लहान असून अन्तर्जंघास्थि व गुल्फास्थि पायाप्रमाणें बऱ्याच लांबीच्या असतात. कांगारूचें पोट मोठें असून त्याच्या बाजूस स्नायूंच्या पट्ट्यांची मुरड असते व त्यामुळें घड्या पडतात. त्याची पोषणनलिका लांब असून अधांत्रांची चांगली वाढ झालेली असते. अपूर्णावस्थेंत असतांनाच गर्भाशयांतून मुक्त झालेलीं यांचीं पोरें जन्मतःच पोटास जोडलेल्या पिशवींत येतात व तेथें त्यांचें पोषणहि होऊं शकतें.

कांगारू हे वनस्पतिभक्षक प्राणी असून ते गवत, विविध वनस्पती व मुळ्यांवर उपजीविका करतात. स्वभावतःच हे प्राणी भित्रे व निरुपद्रवी आहेत. तथापि प्रसंग आलाच तर आपल्या पंजांत धरून ते कुत्री ठार मारतात. ऑस्ट्रेलिया व टॅस्मानिया येथें कांगारूंची बरीच संख्या आहे. तेथील मूळ रहिवाशांचें भक्ष्य व वसाहतवाल्यांची शिकार या दोन्ही दृष्टींनीं कांगारू तेथें प्रसिद्ध आहेत. करमणुकीखातर किंवा शेताच्या रक्षणाकरितां कांगारूंची शिकार केली जाते. न्यूगिनीमध्येंहि कांगारू आढळून येतात.

**कांगिरी**, ता लु का.—मद्रास. नेलोर जिल्हा. क्षे. फ. १०१४. लोकसंख्या ( १९२१ ) १२५४७४. उत्पन्न सुमारें ६० हजार. यांत कांगिरी हें एक शहर व १८४ खेडीं वसलीं आहेत.

श ह र.—कांगिरी तालुक्याचें ( नेलोर-मद्रास ) मुख्य ठिकाण. उ. अ. १५° २५' व पू. रे. ७९° ३१. लोकसंख्या ( १९११ ) ६९७४. येथें कापड, लोखंडी वस्तू, मिरच्या व तंबाखू यांचा मोठा व्यापार चालतो.या वस्" बाहेरून येतात. शिवाय विणकामाचीं हत्यारें, वस्तरे व कातऱ्या येथें तयार होतात व त्यांचा बाहेर गांवीं पुष्कळ खप होतो.

**कांगो**—ही आफ्रिकेंत सर्वांत मोठी नदी असून जगांत अमेझॉनशिवाय दुसरी हिच्यापेक्षां मोठी नदी नाहीं. हिची लांबी ३००० मैल व दोन्ही बाजूंनीं हिचें खोरें २८०० मैल रुंद आहे. ही उत्तरेकडून पश्चिमेकडे वहात जाते. हिच्यांत नावा चालूं शकतात इतकेंच नव्हे तर हिच्या उपनद्यांत सुद्धां नावा चालूं शकतात. मुखापासून माराडीपर्यंत १०० मैल व पुढचे २०० मैल सोडून नंतर स्टॅन्लेपूलच्या वरच्या बाजूस १६०० मैल कांगो नदी नौकानयनाला सोयीस्कर आहे. हिला मिळणाऱ्या बहुतेक नद्या अशाच सोयीच्या आहेत. कांगो नदींत एकंदर ४०० बेटें असून यांतील कांहीं बरींच मोठीं आहेत.

हि ला मि ळ णा ऱ्या न द्याः—झांबेजी ( तिच्या उपनद्यांसुद्धां ), चोझी, लुआपुला व लुफिरा. या प्रत्येक नदीच्या उपनद्याहि फार मोठ्या आहेत. याशिवाय पुष्कळ लहान नद्या हिला मिळाल्या आहेत.

या नदीबद्दल वाङ्मयांत कोठेंच फारसा निर्देश नाहीं. डिओगो केऊ नांवाच्या पोर्तुगीजानें या नदीचें मुख शोधून तेथें एक स्तंभ उभारला. पुढें ब्रिटिशांनीं या नदीची सबंध माहिती मिळविण्याचा फार प्रयत्न केला. शेवटीं संशोधक स्टॅन्ले हा १८७६ च्या आक्टोबरांत झांझीबार येथून निघून नियांगवे येथें आला व येथून इसांगिलापर्यंत त्यानें १६०० मैलांवर या नदींतून प्रवास केला व जुलै १८७७ त तो तेथें पोहोंचला. आफ्रिकेच्या इतिहासांत स्टॅन्लेचा हा प्रवास चिरस्मरणीय होऊन रहाण्यासारखा आहे. [ स्टॅन्ले-थ्रू दि डार्क कॉंटिनेंट; ग्रेन्फेल—मॅप ऑफ दि रिव्हर काँगो; जॉन्स्टन—जॉर्ज ग्रेन्फेल अँड दि काँगो. ].

**कांगो फ्रीस्टेट**—कांगो नदीचें पात्र व्यापून असलेल्या भूमध्यरेषेवरील आफ्रिकेंतल्या एका संस्थानाचें हें नांव आहे. हें संस्थान इ. स. १९०८ मध्यें बेल्जमला जोडण्यांत आलें. या संस्थानच्या जन्माचा इतिहास खालीलप्रमाणें आहेः—इ. स. १८७६ सालीं बेल्जमचा राजा दुसरा लीओपोल्ड यानें ब्रूसेल्स येथें मुख्य मुख्य भूगोलवेत्यांची एक परिषद बोलावली. त्या परिषदेनें आफ्रिकेच्या भौगोलिक शोधांकरितां व सुधारणेकरितां एक सार्वराष्ट्रीय मंडळ स्थापन केलें. या मंडळाची व्याप्ति व कार्य कांहीं वेळानें केवळ बेल्जमपुरतेंच संकुचित करण्यांत आलें. कांगो नदीच्या खालील भागांत स्टॅन्ले नांवाच्या भौगोलिक शोधकानें प्रवास करून तो प्रदेश काबीज करण्याची इच्छा दुसऱ्या लिओपोल्डच्या मनांत भरवून दिली. त्याप्रमाणें लिओपोल्ड यानें 'कांगो येथील सार्वराष्ट्रीय मंडळ' म्हणून एक संस्था स्थापन केली. ही संस्था प्रथम यूरोपमधील मोठ्या राष्ट्रांनां मान्य नव्हती. परंतु १८८४-८५ च्या बर्लिन येथील सभेंत या संस्थेला मान्यता मिळाली. इ. स. १८८५ मध्यें फ्रान्स व बेल्जम यांचा करार होऊन या दोन राष्ट्रांच्या ताब्यांतील प्रदेशांच्या मर्यादा आंखण्यांत आल्या. त्याचप्रमाणें पोर्तुगालशीं तह होऊन कांगो नदीचा उत्तर भाग बेल्जमनें आपल्याकडे घेऊन दक्षिण भाग पोर्तुगालला दिला. याप्रमाणें इ. स. १८८५ मध्यें या संस्थानाचा जन्म होऊन बेल्जम येथें पास करण्यांत आलेल्या कायद्यानें दुसऱ्या लिओपोल्डला या नूतन संस्थानचा अध्यक्ष नेमलें.

इ.स.१८९५त कांगो संस्थान बेल्जमला जोडण्याचा विचार ठरला पण त्याचा त्यावेळीं उपयोग झाला नाहीं. पुन्हां १९०१ मध्यें तोच प्रश्न पुढें आला. पण त्यावेळींहि तो फेंटाळून लावण्यांत आला. कांगो संस्थानांतील राज्यपद्धति फार वाईट

आहे अशी १९०३ मध्यें जिकडून तिकडून ओरड होऊं लागल्यामुळें लिओपोल्ड यानें खरी स्थिति समजून घेण्याकरितां १९०४ मध्यें एक मंडळ नेमलें.

या मंडळाच्या निकालामुळें तर हें संस्थान बेल्जमला जोडण्याच्या प्रश्नाला फिरून जोराचें चलन मिळालें व याचा विचार करण्याकरितां बेल्जम येथील राजप्रतिनिधि सभेनें मुद्दाम एक मंडळ नेमलें. याप्रमाणें कांगोमधील जुलुमी व घातकी राज्यपद्धतीबद्दल जेव्हां अतिशयच जोराची ह्याकाटी होऊं लागली तेव्हां लिओपोल्डला कांगो संस्थान बेल्जमला जोडल्याबद्दलचा जाहीरनामा काढणें भाग पडलें. परंतु या जाहीरनाम्याच्या अटी फारच स्वार्थी असल्यामुळें ग्रेटब्रिटनसारखीं राष्ट्रें हा जाहीरनामा मान्य करीनात. तेव्हां लिओपोल्डला त्या अटी काढणें भाग पडलें.१९०८च्या एप्रिल महिन्यांत बेल्जम येथील राजप्रतिनिधि सभेंत कांगो संस्थान बेल्जमला जोडण्याचें ठरवून त्याच वर्षाच्या १४ नोव्हेंबरला स्वतंत्र कांगो संस्थान नाहींसें होऊन तें बेल्जमला जोडण्यांत आलें. बेल्जम कांगो प्रदेशाचा विशेष तेथील घनदाट झाडी हा होय. येथील जंगल इतकें किर्र आहे कीं, सूर्य मध्यावर असला तरी त्याचीं किरणें आंत प्रवेश करूं शकत नाहींत. या जंगलाचें क्षेत्रफळ २५००० चौरस मैल असून त्यांत टेंबुरणी, महागनी, साग इत्यादिकांचीं झाडें विपुल आहेत. रबराचीं झाडेंहि पुष्कळ आहेत. येथील साधारण वार्षिक उष्णमान ९०° फा. असून जुलैपासून आगस्टपर्यंत उष्णता थोडी वाढत्या प्रमाणांत असते. दक्षिणेंतील डोंगरसपाटीवरील प्रदेशांत रात्रीच्या वेळीं थंडी फारच कडक असते.

येथील लोकसंख्या १४० लक्ष ते ३०० लक्ष आहे. हे लोक बांटु-निग्रो वंशाचे आहेत. कित्येक जंगली भागांतून खुजे लोक आढळतात. ते मध्यआफ्रिकेंतल्या मूळच्या रानटी लोकांचे वंशज असावेत. 'बांटु' म्हणून ज्या जाती या ठिकाणीं आहेत. यांच्यांत पुष्कळ पोटजाती आहेत. त्यांपैकीं कांगो, बा-सुंडी, बा-लुबा या मुख्य होत. जंगलांत राहणाऱ्या जाती अतिशय रानटी असून सपाटीच्या प्रदेशांत राहणाऱ्या जाती सुधारलेल्या आहेत. बहुतेक सर्वच जाती आपलीं अंगें गोंदून घेतात. बा-लुबा ही जात हस्तिदंताचीं व निरनिराळ्या धातूंचीं कामें करण्यांत फार कुशल आहे. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं हे लोक गुलाम बाळगणें अनीतीचें समजतात. प्रत्येक जात ही आपल्या पुरती स्वतंत्र आहे. कांहींनीं स्वतःचीं राज्यें निर्माण केलीं आहेत.

१८८० त या ठिकाणीं फारच थोडे यूरोपिअन होते. १८८९ च्या अखेरीस त्यांची संख्या २५४ झाली. १९०८ च्या जानेवारींत ती २९४ इतकी वाढली.

या ठिकाणीं सोन्याच्या व लोखंडाच्या पुष्कळ खाणी असून जस्त, गंधक व पारा ह्या वस्तु पुष्कळ सांपडतात. हस्तिदंत. ताडाचें तेल, कॉफी,कोको,तांदूळ,भुईमूग,इमारतीचें लांकूड इत्यादि वस्तूंचा निर्गत व्यापार चालतो.

बेल्जमला जोडण्यापूर्वी कांगो संस्थानांत एकतंत्री राज्यपद्धति सुरू असे. ब्रूसेल्स येथून संस्थानचा राज्यकारभार पाहण्यांत येई व बेल्जम येथील कायद्यान्वयें दिवाणी व फौजदारी दाव्यांचा निकाल देण्यांत येई. राजाला राज्यकारभारांत मदत व्हावी म्हणून एक संस्थानमंत्री नेमलेला असे. कांगो बेल्जमला जोडण्यांत आल्यावर त्याची जागा वसाहतमंत्र्याला देण्यांत येऊन त्याला सल्ला देण्याकरितां एक सल्लागार मंडळ नेमण्यांत आलें. राज्यकारभाराच्या सोयीकरितां कांगो वसाहतीचे तेरा जिल्हे आहेत व प्रत्येक जिल्ह्यावर एक जिल्हाधिकारी असतो. प्रत्येक जिल्ह्यांतून न्यायकचेऱ्या स्थापल्या असून बोमा येथें अपीलकोर्ट आहे. त्यास खालील न्यायाधिशाचे निकाल रद्द करतां येतात.

ध र्म.—येथील मूळ रहिवाशांचा धर्म म्हटला म्हणजे जडवस्तूपूजा हा होय. सरकारनें शेतकी आणि औद्योगिक शिक्षणाच्या कांहीं संस्था येथें स्थापलेल्या आहेत. परंतु सरकारचा मुख्य उद्देश नागरिकांना लष्करी शिक्षण देऊन राज्यरक्षक सैन्यांत ओढण्याचा असल्यामुळें शिपाईगिरी करण्यास नालायक असलेल्या लोकांनांच तेवढें इतर धंद्यांचें शिक्षण दिलें जातें.

ल ग्न वि धि.—येथील लोकांत बालविवाहाची फार चाल आहे. कित्येक वेळां तर मुलें व मुली जन्मतांच आईबाप त्यांच्या लग्नासंबंधीं करार करून टाकितात, व तो त्यांनां मोडतां येत नाहीं. नवऱ्यानें बायकोला घरीं आणण्यापूर्वी तिच्या बापाला 'कोला' नांवाचीं दोनशें फळें, दोन लोखंडी गज व दोन गायी द्याव्या लागतात व ती घरीं आल्यावर वधूपक्षास एक मोठी मेजवानी द्यावी लागते. ह्या मेजवानीस पुष्कळ मंडळी आमंत्रणांवाचून येतात. वधूला वरगृहीं नेतेसमयीं एखाद्या मनुष्याच्या खांद्यावर बसवून नेतात. तिनें आपल्या तोंडावरून बुरखा घेतलेला असतो. तो ती पतीशीं तिचा समागम होईपर्यंत काढीत नाहीं. वधूवरांचा एकांत होईपावेतों जमलेली मंडळी नृत्य, गीत व हास्यविनोद करून आपलें मनोरंजन करून घेतात.

तद्देशीय सर्व लोकांत बहुपत्नीकत्वाची चाल आहे. बायकोस नवऱ्याला काडी मोडून देणें झाल्यास, नवऱ्यानें लग्नापूर्वी तिजबद्दल जो हुंडा उर्फ किंमत दिली असेल, ती तिच्या आईबापांनीं नवऱ्यास परत द्यावी लागते.

[ संदर्भग्रंथ—स्टॅन्ले-दि काँगो अँड फाउंडिंग ऑफ इट्स फ्रीस्टेट.; हिंडे-दि फॉल ऑफ दि काँगो आरब्स: बोल्गर-दि काँगो स्टेट बोर्न-सिव्हिलिझेशन इन काँगो लँड.]

**काम्रिआर्ड डी ला टोअर, चार्लस.**—चार्लस काम्रिआर्ड डीला टोअर हा एक फ्रेंच एंजिनिअर आणि पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता होता. याचा जन्म तारीख ३१ मार्च १७७७ रोजीं झाला. एकोल येथील विविधकलाशाळेंतील

(पालिटेक्निकल) याचें शिक्षण पुरें झाल्यानंतर याला भौगोलिक शिल्पी करण्यात आलें. सन १८१८ सालीं याला सरदार ( बॅरन ) करण्यांत आलें. तारीख ५ जुलै १८५९ रोजीं हा मृत्यु पावला. त्यानें अनेक यंत्रें शोधून काढली आहेत. त्यानें बुडबुड्याचें यंत्र शोधून काढलें; या यंत्रांत अर्किमिडीझचें मळसूत्र वापरलें होतें. त्याचें एक टोंक पाण्यांत पूर्णपणें बुडविलें होतें, आणि दुसरें टोंक अर्धें पाण्यांत आणि अर्धें पाण्याबाहेर असें होतें व हें यंत्र पाणी वर चढविण्याच्या उलट दिशेनें फिरवावें लागतें. तसेंच यानें सायरेन नांवाचें एक ध्वनिशास्त्रोपयोगी यंत्र इ. सन १८१९ सालीं शोधून काढलें; या यंत्राच्या सहाय्यानें कोणत्याहि सुराचीं किती कंपनें होतात हें काढतां येतें. आवाज उत्पन्न करण्याकरितां यंत्रें तयार करण्याचा यानें प्रयत्न केला होता. इ. सन १८२२–२३ सालीं त्यानें दाब आणि उष्णता यांच्यासंबंधानें कांहीं प्रयोग केले. या प्रयोगांवरून त्याला असें दिसून आलें कीं, कितीहि दाब असतांना विशिष्ट द्रवरूपी पदार्थास विशिष्ट उष्णमानापेक्षां जास्त उष्णता लावली तर त्यांच्या ठिकाणचें द्रवत्व नष्ट होऊन त्याला वायुरूप प्राप्त होतें. त्यानें असेंहि दाखवून दिलें कीं, पाण्यास ३६२° सेंटिग्रेडपेक्षां जास्त उष्णता लावली तर ( कितीहि दाब असला तरी ) ह्या पाण्यास वायुरूप प्राप्त होतें. किण्वाचे ( यीस्ट ) नैसर्गिक गुणधर्म व त्यांत असणाऱ्या सूक्ष्म जंतूंवर अतिशीततेपासून होणारे परिणाम या विषयींची माहिती त्यानें उपलब्ध केली.

**कांग्रा, जिल्हा.**—पंजाब. जलंदर भागाचा ईशान्येकडील जिल्हा. उत्तर अक्षांश ३१° २१' ते ३२°५९' व पूर्व रेखांश ७५° ३७' ते ७८° ४२'. क्षेत्रफळ ९९७८चौरस मैल.

सीमाः—वायव्येस चंबा संस्थान; उत्तरेस काश्मीर संस्थानचा प्रदेश; आग्नेयीस बशाहर संस्थान; दक्षिणेस सिमला जिल्ह्यांतील कोटगड खेडी व कुमारसेन, संग्री, सुकेट, मंडी आणि बिलासपुर हीं संस्थानें; नैर्ऋत्येस होशियारपुर जिल्हा; आणि पश्चिमेस गुरुदासपुर. याचा बहुतेक भाग हिमालय पर्वतांत आहे. येथील वनश्री फारच सुंदर आहे.

वन्य आणि हरतऱ्हेचे प्राणी या भागांत सांपडतात. उदा० वाघ, चित्ते, अस्वलें, लांडगे, इत्यादि.

या भागांतील सरासरी उष्णमान उन्हाळ्यांत ८० अंश व हिंवाळ्यांत ५३ अंश असतें. कांग्रा खोऱ्यांत भाताची लागवड सररहा होत असल्यामुळें जमीन पाणथळ झाली आहे व त्याचा आरोग्यावर अनिष्ट परिणाम होतो असें म्हणतात. पावसाळा स्थलमानानें बदलतो. पावसाची सरासरी ७० इंच आहे.

तारीख ४ एप्रिल इ. स. १९०५ रोजीं या भागांत धरणीकंपाचा एक मोठा धक्का जाणवला. त्यावेळीं सुमारें २०००० माणसें प्राणास मुकलीं. कांग्रा आणि पालमपूर तहशिलींत या धक्क्याचा परिणाम जास्त भोंवला. पुष्कळ जुन्या देवळांची बरीच मोडतोड झाली.

कांग्रा खोऱ्यांत आज कित्येक शतकेंपर्यंत लहान लहान राज्यें अस्तित्वांत आहेत व तेथील राजे आपणांस जलंदरचे प्राचीन कटोक ( रजपूत ) राजांचे वंशज म्हणवितात. महाभारतांत वर्णिल्याप्रमाणें खिस्ती शकापूर्वी १५०० वर्षें सतलज आणि बिआस या दोन नद्यांमधील प्रदेशावर त्यांचें राज्य होतें असें दिसतें. सातव्या शतकांत जलंदरच्या राज्याचे विभाग पडले नव्हते असें ह्युएनत्संगनें वर्णन करून ठेवलें आहे. पुढें कांहीं वर्षांनीं ( बहुधा मुसुलमानी स्वाऱ्या होऊं लागल्या तेव्हां ) या राजांस जलंदरच्या भागांतून हांकून दिल्यामुळें त्यांनीं कांग्रा खोऱ्याचा आश्रय घेतला. त्यांच्या पूर्वींच्या राज्यांत कांग्राचा किल्ला पूर्वीपासूनच फार महत्वाचा होता. याप्रमाणें पूर्वीचें विस्तृत राज्य बरेंच संकुचित झालें. पुढें त्या राज्याचेहि आपसांत बरेच विभाग होऊन लहान लहान राज्यें उत्पन्न झालीं. यांपैकीं नूरपुर, सिबा, गोलेर, बंगाहळ आणि कांग्रा हीं कांग्रा खोऱ्यांत आहेत. मुसुलमानांच्या स्वाऱ्या या प्रांतांवर जरी वारंवार होत असत तरी हीं छोटीं राज्यें हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांत असल्याकारणानें बरींच वर्षें टिकाव धरून होतीं. इ. स. १००९ मध्यें नगरकोटच्या देवालयांत असलेल्या अपार संपत्तीचा मोह पडून गझनीच्या महंमदानें या भागावर स्वारी केली व पेशावर येथें हिंदु राजांचा पराभव करून कांग्राचा किल्ला हस्तगत करून घेतला आणि नगरकोट देवळांतील सर्व बहुमोल चीजवस्त लुटून नेली. परंतु यानंतर ३५ वर्षांनीं या लोकांनीं पुन्हां उचल केली व किल्ला परत सर करून घेतला व नगरकोट येथें पुन्हां देवाची स्थापना केली. यावेळीं त्यांस दिल्लीच्या राजाचें सहाय्य मिळालें होतें. या वेळेपासून इ. स. १३६० पर्यंत कांग्राचा इतिहास फारसा महत्वाचा दिसत नाहीं. १३६० त फेरोजशहा तघलखानें या भागावर स्वारी केली. राजा शरण आल्यामुळें त्याचा मुलूख त्याजकडेच ठेवण्यांत आला. परंतु याहि वेळीं उपर्युक्त देऊळ मुसुलमानांनीं लुटलें व मूर्ति मक्केस नेण्यांत आली व ती भररस्त्यांत टाकून ती पायांखालीं तुडविण्यांत आली. यानंतर दोनशें वर्षांनीं म्हणजे इ. स. १५५६ सालीं अकबर बादशहानें या भागावर स्वतः स्वारी केली व या वेळेपासून कांग्राचा किल्ला मोंगलांच्या ताब्यांत कायमचा गेला. यावेळीं कांग्रामधील अतिशय सुपीक भाग मोंगलांनीं व्यापला व निकस डोंगराळ प्रदेश फक्त स्थानिक राजांकडे राहिले. तथापि येथून मोंगलांची राजधानी फार दूर असल्यामुळें व प्रदेश डोंगराळ असल्यामुळें येथील राजे वारंवार बंड करीत असत. इ. स. १६२० सालीं राजपुत्र खुरम यानें या राजांचा पूर्ण पराजय केला. त्यावेळीं २२ राजांनीं मोंगल सत्ता मानण्याचें, खंडणी देण्याचें व आग्रा येथें ओलीस पाठविण्याचें कबूल केलें. एके काळीं येथील वनश्रीस भुलून जहांगिरचा विचार आपलें

उन्हाळ्यांतील राहण्याचें ठिकाण येथें करावें असा होता. परंतु लवकरच काश्मीरचा प्रदेश जास्त रमणीय असा त्यास दिसल्यामुळें त्यानें आपला तो विचार बदलला असें दिसतें. ज्यावेळीं शहाजहान तख्तावर बसला त्यावेळीं येथील सर्व राजांनीं मोंगलांची सत्ता निमूटपणें मान्य केली होती व बादशहाकडून आलेले हुकूम व कामगिऱ्या ते विनबोभाट पाळीत असत. अकबर आणि औरंगझेब यांच्या दरम्यान वेळोवेळीं मिळालेल्या सनदा अद्यापि यांच्याजवळ सांपडतात व अद्यापिहि कांहीं वंशजांकडे मोगल बादशहांनीं दिलेले अधिकार चालत आहेत.

मुसुलमानांच्या भरभराटींत या डोंगरांतील राजांनां एकंदरींत चांगल्या तऱ्हेनें वागविण्यांत आलें असें दिसतें. त्यांच्या कारभारांत फारशी ढवळाढवळ केली जात नसे. त्यांच्या निस्सीम राजभक्तीमुळें धाडसाच्या परंतु अत्यंत महत्त्वाच्या कामगिरींवर यांचीच योजना करीत असत.

१७५२ च्या सुमारास काटोच येथील दुराणीची सत्ता बहुतेक नामशेष झाली होती व तेथील सरदारानें पूर्णपणें स्वातंत्र्य मिळविलें होतें. कांग्राचा रजपूत सरदार संसारचंद यानें काटोच भागांत आपली सत्ता स्थापन करून जवळपासच्या सर्व भागावर कर बसविला. त्याच्या वंशांत याच्या सारखा प्रख्यात पुरुष दुसरा कोणी झाला नाहीं. शीख लोकांपुढें मात्र त्याची मात्रा चालत नसे. गुरख्यांच्या विरुद्ध लढतांना त्याचा नाइलाज होऊन त्याला शीख लोकांची मदत मागणें भाग पडलें व त्याचा परिणाम असा झाला कीं त्याच्या मरणसमयीं (१८२४) लाहोरच्या राजाचा तो एक खंडणीदार बनला होता. १८२८ त त्याचा मुलगा आपल्या बहिणीचें शीखाशीं लग्न लावण्याचें टाळण्याकरितां राज्य सोडून पळून गेला तेव्हां रणजितसिंगानें तें राज्य कायमचें शीखांच्या राज्याला जोडून टाकलें.

शीखांशीं झालेल्या पहिल्या युद्धानंतर (१८४६) कांग्राचें स्वामित्व इंग्रजांकडे आलें. १८५७ च्या बंडांत कुलु पोटविभागांत थोडी फार बंडाळी झाली परंतु अधिकाऱ्यांच्या धूर्ततेमुळें पुन्हां लवकरच सर्व देशभर शांतता दिसूं लागली.

प्राचीन अवशेषांच्या बाबतींत कांग्राचा पहिला नंबर लागतो. दुसऱ्या शतकांतील सुद्धां कांहीं अवशेष येथें आढळतात.

या जिल्ह्यांत एकंदर ३ शहरें व ७१५ खेडीं असून १९२१ सालीं लोकसंख्या ७६६०६५ होती. सात तहशिली मिळून हा जिल्हा झाला आहे. या जिल्ह्याचा बराचसा भाग डोंगराळ असल्यामुळें दर चौरस मैलाला ७७ लोकसंख्या पडते. लोक अनेक भाषा बोलतात. एकंदर लोकसंख्येंत हिंदूंचें प्रमाण मुसुलमानांपेक्षां जास्त आहे. टेकड्यांतून वस्ती केलेले गोसावी पैशाची देवघेव व व्यापार करतात. या लोकांप्रमाणें खत्री व सुद लोकहि थोडाफार व्यापार करतात. एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ७१ लोक शेतकीवर आपली उपजीविका करतात.

सप्टेंबर तें डिसेंबर आणि एप्रिल ते जुलई असे दोन पिकांचे हंगाम असतात. ह्यांपैकीं एप्रिल ते जुलईपर्यंत निघणारें पीक महत्वाचें आहे.

गहूं, मका, सत्तू, तांदूळ, द्विदळ धान्यें हे उत्पन्नाचे मुख्य पदार्थ आहेत. यांशिवाय कापूस, चहा आणि बटाटे यांचेंहि पिक या जिल्ह्यांत निघतें.

स्थानिक गुरें ढोरें लहान परंतु मजबूत आहेत. गुजर लोकच फक्त दूध, तूप विकतात. शेळ्या व मेंढरें बरींच असून धनगरांचा चरितार्थ यांच्यापासून होणाऱ्या उत्पन्नावरच अवलंबून असतो. १९०३-०४ सालीं लागवड केलेल्या जमीनीपैकीं सुमारें एकपंचमांश जमीनीला पाटबंधाऱ्याचें पाणी दिलें होतें.

जंगल ही एक महत्वाची बाब आहे. लहान टेकड्यांवरून पुष्कळ जातींचे बांबू होतात. १९०३-०४ सालीं जंगल खात्याचें उत्पन्न २.८ लक्ष होतें.

कांग्रा व कुलूमध्यें मौल्यवान खनिज द्रव्यें आहेत परंतु जरूर लागणाऱ्या उपकरणांच्या अभावामुळें खाणींतून हीं द्रव्यें काढण्याचें काम व्हावें तसें होत नाहीं. कुलूमध्यें गरम पाण्याचे झरेहि पुष्कळ ठिकाणीं आढळतात.

चहाच्या कारखान्यांशिवाय या जिल्ह्यांत दुसरे कोणतेच कारखाने नाहींत. हातानें चालवितां येतात असे कांहीं थोडे कारखाने येथें आहेत. त्यांत तयार होणारें सुती कापड विलायती कापडाशीं होणाऱ्या चढाओढींत बराच टिकाव धरून आहे. परंतु कापसाचा स्थानिक पुरवठा कमी असल्यामुळें हा धंदा मागासल्यासारखा दिसतो. चांदीचीं भांडीं, टोपल्या व पांघरण्याचे रंग वगैरे कोठें कोठें तयार करतात. तांदूळ, चहा, बटाटे, मसाल्याचे पदार्थ, अफू, पांघरण्याचे रंग, लोंकर, तूप, मध व मेण यांची निर्गत आणि गहूं हरभरा, मका, द्विदल धान्यें, कापूस, तंबाखू, घासलेट व कापड यांची आयात होते. सपाटीवरील होशियारपूर, जालंदर, अमृतसर आणि पठाणकोट हीं कांग्राच्या व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. कुलूचा लडख व यार्केद यांच्याशीं सुलतानपूरमधून बराच व्यापार चालतो.

कांग्रा, पालनपूर, सुजानपूर, तिरा, आणि नूरपूर हीं या जिल्ह्यांतील व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. आगगाडीचा एकहि फांटा या जिल्ह्यांतून जात नाहीं. पाऊस विपुल पडत असल्यामुळें येथील लोकांनां दुष्काळ मुळींच माहीत नाहीं. इतर जिल्ह्यांप्रमाणें येथेंहि डेप्युटीकमिशनर व त्याचे मदतनीस असे मिळून राज्यकारभार पहातात. या जिल्ह्यांत तीन म्युनिसिपालिट्या, १५ पोलिसठाणीं व ९ रुग्णालयें आहेत. एकंदर लोकसंख्येपैकीं लिहितां वाचतां येणारांचें प्रमाण शेंकडा ४.५ आहे.

त ह शी ल.—कांग्रा तहसिलीचें ( कांग्रा जिल्हा, पंजाव ) एकंदर क्षेत्रफळ ४२९ चौरस मैल आहे. मुलूख डोंगराळ असून बाणगंगा आणि गज या नद्या यांमधून वाहतात. लोकसंख्या ( १९११ ) ११९,६२८. या तहसिलींत दोन शहरें व १३४ खेडीं आहेत.

श ह र :—कांग्रा तहसिलीचें ( कांग्रा जिल्हा, पंजाव ) मुख्य ठिकाण. उ. अ. ३०° ५' व पू. रे. ७६° १६', लोकसंख्या ( १९०१ ) ४७४६. शहराच्या दक्षिणेस एका उंच कड्यावर किल्ला आहे. याच्या सर्वांत उंच असलेल्या भागांत काटोच राजांची वस्ती व देवालयें होतीं. १९०५ च्या धरणीकंपानें हें शहर व किल्ला यांचा नाश झाला.

कांग्राचा प्राचीन इतिहास बराच सांपडतो, १००९ मध्यें गझनीच्या महंमुदानें येथील देऊळ लुटून अपार संपत्ति परदेशीं नेली. १३६० त फिरोझ तघलखानें पुन्हां येथील देऊळ लुटलें. मोंगल लोकांनीं येथें कायमचें ठाणें वसविलें. १७७४ नंतर कांग्राचा राजा संसारचंद यानें किल्ल्याला वेढा दिला. परंतु त्याला एकट्याला किल्ला घेणें शक्य नसल्यामुळें त्यानें शीख लोकांची मदत मागीतली व अशा रीतीनें किल्ला सर केला. येथें एक मिशनरी लोकांची शाळा व सरकारी रुग्णालय आहे.

**कॉंग्रीव्ह विल्यम**—( १६७०—१७२९ ) विल्यम कॉंग्रीव्ह या इंग्लिश नाटककाराचा जन्म वार्ड्से येथें झाला. त्याचें बहुतेक सर्व शिक्षण आयर्लंडमध्येंच झालें. विद्यालयांतील शिक्षण संपल्यावर तो इंग्लंडमध्यें आला व मिडल टेंपल येथें कायद्याचा अभ्यास करूं लागला. लवकरच ड्रायडन, वगैरे लोकांची व त्याची ओळख झाली. विल्यमनें इ.स. १६९१ च्या सुमाराला 'दि ओल्ड बॅचलर' हें आनंदपर्यवसायी नाटक प्रसिद्ध केलें. या नाटकाच्या प्रसिद्धीपासून कॉंग्रीव्हची गणना लोक तत्कालीन कवि व नाटककार यांच्यामध्यें करूं लागले. त्यानें लिहिलेल्या आनंदपर्यवसायी नाटकांत ' लव्ह फॉर लव्ह' व दि वे ऑफ् दि वर्ल्ड ' हीं दोन नाटकें फार प्रसिद्ध आहेत. वर दिलेल्या तीन नाटकांमुळें इंग्लिश वाङ्मयांत कॉंग्रीव्हचें नांव अजरामर झालें आहे. त्यानें लिहिलेल्या नाटकांपैकीं ' दि मोर्निंग ब्राइड ' हें एकच काय तें शोकपर्यवसायी नाटक आहे. त्याला संधिवाताची व्यथा होती. प्रवासाच्या वेळीं गाडी उलटून झालेल्या दुखापतीनें तो मरण पावला.

**कांच**—कांचेची सर्वांगसुंदर व्याख्या करणें जरा अवघड आहे. कारण कांचेच्या अनेक जाती असून प्रत्येक जातीचे गुण धर्म निरनिराळे आहेत. कांच या पदार्थाचा मुख्य गुण पारदर्शकता हा आहे. तसेंच त्यांत काठिण्य व ठिसूळपणा हे गुण पाहिजेत. आपल्या देशांतील ६४ कलांच्या यादींत कांचेचा समावेश केलेला दिसत नाहीं. आपल्या देशांत कांचेच्या जिनसांचा नामनिर्देश कोठें आढळत नाहीं असा साधारण समज आहे. पण डाव्ज यांनीं संयुक्त प्रांतांतील कांचकलेवर जो लेख लिहिला आहे त्यांत त्यांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं ख्रिस्ती शकाच्या पूर्वी ८०० वर्षें हिंदुस्थान देशांत कांचकला होती. कारण यजुर्वेदांत कांचेचे दागिने स्त्रिया घालीत असत असा उल्लेख आहे. तसेंच महाभारत व युक्तिकल्पतरु वगैरे ग्रंथांतहि कांचेसंबंधीं उल्लेख आलेले आहेत. हीं कांच आपले लोक पुरातनकाळीं स्फटिकापासून करीत असत असें अनुमान, बौधस्तूपांतून अत्यंत गुळगुळीत केलेलीं स्फटिकाचीं अस्थिपात्रें सांपडलीं आहेत यावरून निघतें. " काचमूल्येनविक्रीतो हंत चिंतामणिर्यथा ", " काचःकाचोमणि र्मणिः " इत्यादि अनेक वाक्यांवरून महाभारत, व रामायणकाळीं तसेंच योगवसिष्ठ वगैरे ग्रंथावरून कांचेची आर्य लोकांस माहिती होती असें निःसंशय दिसतें. प्राचीनकाळीं असुर लोकांस कांच करण्याची कला अवगत होती इतकेंच नव्हे तर ते रंगीत कांचा करीत होते.

कांहीं लोकांच्या मतें कांच करण्याची युक्ति प्रथमतः फिनीशियन लोकांनीं शोधून काढली. ईजिप्शियन लोक पूर्वी धातुसंशोधनक्रियेंत फार निपुण होते. लंडन वगैरे शहरीं मोठ्या पदार्थसंग्रहालयांत ठेवलेल्या नमुन्यावरून ईजिप्त देशांत फार प्राचीनकाळीं कांचेचे मणी वगैरे जिन्नस फार उत्तम दर्जाचे तयार होत असें मानण्यास आधार आहे व त्यांनीं या कलेस अगदीं उच्च दर्जावर नेलें होतें. सीझर आगस्टसनें ईजिप्तप्रांत काबीज केला त्यावेळेस खंडणीदाखल ईजिप्शियन लोकांनीं कांचेचे नमुने द्यावे असा हुकूम केला. रोमन लोक जात्याच कलेचे भोक्ते व बुद्धिमान असल्यामुळें त्यांनीं ही कला लवकरच हस्तगत करून परदेशांत कांचेचा माल पाठविण्याचा मक्ता आपल्याकडेसच ठेवला होता. ह्यामुळें इजिप्शियन लोक या कलेंत कांहीं दिवसांनीं मागें पडले. पुढें फ्रान्स देशांतील गॉल या प्रांतीं रोमन लोकांचें राज्य असल्यामुळें तिकडे या कलेची वाढ झाली. परंतु रोमन राज्यास उतरती कळा लागून तें बुडाल्यावर ह्या कलेचा कांहीं कालपर्यंत लोप झाला. त्यानंतर कान्स्टान्टिनोपल येथें राजाश्रय मिळून या कलेचा पुन्हां उदय झाला. तेथून व्हेनिस शहरीं ही कला पुन्हां उदयास आली. त्यानंतर इंग्लंड, जर्मनी, बेलजियम या देशांतील लोकांनीं आपआपल्या देशांत ही कला आणण्याबद्दल फार प्रयत्न केले. परंतु त्यांस त्यावेळीं फारसें यश आलें नाहीं. व्हेनिस येथील कॉन्सलनें असा हुकूम सोडला होता कीं, राज्यांतील कोणीहि इसमानें कांच करण्याचीं कच्चीं द्रव्यें किंवा फुटकी कांच परराष्ट्रीय लोकांस देऊं नये, दिल्यास त्याची सर्व मालमत्ता जप्त होऊन त्यास कडक शिक्षा होईल. १२८९ सालीं असाहि दुसरा कायदा करून त्यानें कांचकरी लोकांनां व्हेनिस शहर सोडावयास लाविलें व त्यांनीं एका तटबंदी असलेल्या जागीं राहावें असा हुकूम केला. इ. स. १२९५ च्या सुमारास व्हेनेशियन प्रवासी मार्कोपोलो ह्या तार्तरी, चीन, हिंदुस्थान, वगैरे देशांतील

प्रवास करून आपल्या देशीं परत गेला व खोटीं रत्नें, कांचेचे मणी वगैरे जिन्नस हिंदुस्थान देशांत फार खपतील असें त्यानें आपल्या देशांतील लोकांस कळविल्यावर व्हेनिशियन लोकांनीं तसले जिन्नस तयार करून फार संपत्ति मिळविली. व्हेनिसहून ही कला जर्मनींत गेली व तेथून बोहिमियांत तिचा प्रवेश झाला व तेथें अनुकूल परिस्थिति असल्यामुळें तेथील मालहि लवकरच हिंदुस्थान, जर्मनी, स्वित्झरलंड, रशिया, अमेरिका वगैरे ठिकाणीं जाऊं लागला. व्हेनिशियन लोकांनीं खिडक्यांच्या कांचेंत अत्युत्तम सुधारणा केल्यामुळें फ्रेंच सरकारनें सवलती देऊन आपल्या देशांतील लोकांस कांचकाम शिकण्यास उत्तेजन दिलें. इ. स. १६६५ मध्यें मि. कोलबर्ट नांवाच्या फ्रेंच गृहस्थानें आपल्यावरोवर २० व्हेनिशियन कांचकोविद पारिस शहरीं नेऊन कांचेचे जिन्नस बनविण्याचें काम, आरसे वगैरे परावर्तक कांच करण्याचें व कांचेस जिल्हई देण्याचें काम सुरू केलें. फ्रान्स व वेल्जम या देशांत या कलेचा एकाच वेळीं प्रादुर्भाव झाला. वेल्जम कारागिरांनीं डेसीं क्रिस्टल कांचेंत वरेंच नैपुण्य मिळविलें. त्यामुळें त्यांनां फ्रान्स, इंग्लंड वगैरेशीं टक्कर देतां येऊं लागली; व हल्लीं तर या कामीं इंग्लंड व वेल्जम यांच्यांत स्पर्धा सुरू आहे. इंग्लंड देशांत इलिझावेथच्या अमदानींत प्रथम कांचेचे कारखाने सुरू झाले. १८५५ त पॅरिस येथें भरलेल्या प्रदर्शनांत बर्मिंगहॅम येथील कारागिरांनीं २८ फूट व्यासाचें लेन्स ठेवलें होतें. इंग्लंडांत कांचकारखाने पुढें येण्याचें कारण ते भांडवल, कच्चीं द्रव्यें वगैरे बावतींत श्रमविभागाच्या तत्वावर चालविण्यांत आले. ६ व्या जेम्सच्या कारकीर्दींत स्कॉटलंडांत व १८ व्या शतकाच्या पूर्वार्धांत पोर्तुगॉलमध्यें कांचकारखाने निघाले. १७ व्या शतकांत अमेरिकेंत कांच तयार होऊं लागली. वाटल्या करण्यांत या देशानें वरीच आघाडी मारली आहे.

कांच करण्याच्या कृती.—वाळू, सोडा ( शुद्ध केलेला ), पोटयाश, चुना, अल्यूमिना व शिशाचा ऑक्साईड वगैरे पदार्थांपासून निरनिराळ्या जातीची कांच तयार होते. घटकद्रव्यें व विविध कामांत उपयोग या दोन तत्वांवर कांचेचें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्गीकरण करतां येईल.

( १ ) दृष्टिविषयक कांच किंवा नेत्रकांच; हींत दुर्बिणीला लागणारी कांच, चष्मे व सूक्ष्मदर्शक यंत्रांची कांच या जाती येतात. ( २ ) खिडकांच्या तावदानास लागणारी कांच. ( ३ ) चिमण्या वगैरे पदार्थ तयार करण्यास रस फुंकून केलेली कांच ( ४ ) मेजावर ठेवण्याकरितां लागणारे जिन्नस म्हणजे वजनें, प्याले, वशा वगैरे पदार्थ, वाटल्या तयार करण्याकरितां लागणारी कांच ( ५ ) विलोरी किंवा सपाट पत्रे करण्याची कांच व गारेची कांच.

कांचेच्या कारखान्यांत कांच फुंकणारे, भट्टीवर काम करणारे कांच थंड करून तिचा ठिसूळपणा घालविणारे, मूस तयार करणारे, कांच कापणारे व इतर मजूर वगैरे माणसांची जरूरी असते. तसेंच कांच कापल्यानंतर घांसण्याकरितां कुरुंदाचीं चाकें लागतात. रंगीत कांच करण्याकरितां निरनिराळ्या रासायनिक पदार्थांचा उपयोग करावा लागतो. हे बहुतेक खनिज पदार्थ असतात. कांचेला तांबडा रंग देणें फार अवघड जातें.

कांच दोन प्रकारची असते. एक विद्राव्य व दुसरी अविद्राव्य. विद्राव्य कांचेंत पोटयाशचा अंश थोडा असतो व सोड्याचें प्रमाण अधिक असतें. ही कांच लवकर द्रवते म्हणून तिला विद्राव्य कांच म्हणतात. अविद्राव्य कांचेंत सिलिकेट आफ पोटयाशचें प्रमाण जास्त असतें व दुसऱ्याहि वस्तूंचे सिलिकेट्स कांहीं विशेष प्रमाणानें एकत्र झालेले असतात. यामुळें कांचेच्या अंगीं वळकटपणा येऊन ती अविद्राव्य कांच बनते.

कांच जरी अशुद्ध अशा कच्च्या द्रव्यापासून तयार होते तरी ती उत्तम प्रकारची तयार करण्यास तिच्या मिश्रणांत निरनिराळ्या प्रकारच्या व शुद्ध पदार्थांचा उपयोग करावा लागतो. सोड्यापासून जी कांच तयार करतात ती रंगहीन असते. चुना घातल्यानें कांचेला कठिणपणा येऊन तिच्या अंगीं लवकर विरण्याचा गुण कमी असते. समुद्रावरील सफेत व वारीक रेती ३० भाग लीथार्ज किंवा मुरदाडशिंग २० भाग, मोत्याच्या शिंपल्याची राख ८ भाग, व सोरा २ भाग या प्रमाणें सामान घेऊन त्यांत सोन्याच्या रु॰ सोमल व मँगनीज घालावा.

खिडक्यावताावदानांची कांच.—सफेत व वारीक रेती १०१ भाग, कार्बोनेट आफ लाईम १२ भाग, पापडखार ५ भाग, कांचेचे तुकडे ११२ भाग हे सर्व पदार्थ मिश्र करावे:—दुसरी कृति, १०० भाग शुभ्र रेती, ४० भाग पापडखार, १०१ फुटकी कांच यांचा रस करावा.

प्लेट ग्लास.—शुभ्र रेती ३० पौंड, पापडखार १० पौंड, चुना ४ पौंड आणि ३० पौंड कांचेचें चूर्ण यांचें मिश्रण भट्टींत घालून मुशीत रस करावा. नंतर एकेक पत्रा ओतण्यास जितका लागेल तेवढा रस तांब्याच्या पळ्यानें घेऊन लोखंडी टेवलावर ओतावा. हें टेवल आयतेंच विडाचें ओतून तयार केलेलें असतें. प्लेटीची जेवढी जाडी पाहिजे तेवढी कड टेवलाच्या चोहोंकडून ठेवावी. रस सुकला म्हणजे प्लेट तयार झाली. याच कांचेचे आरसे होतात.

उत्तम प्रकारच्या आरशाची कांच:—पांढरी रेती ६० पौंड, पर्ल ॲश २५ पौंड, सोरा १५ पौंड, टांकणखार ७ पौंड. अर्धीं सर्व एकत्र

करून मुशींत रस करावा. ह्या मिश्रणाची कांच पिवळट रंगाची होऊं लागल्यास सोमल व म्यामेशिया समभाग थोड्या प्रमाणानें घेऊन त्यांचें मिश्रण करावें म्हणजे कांच स्वच्छ होते.

शिशाची कांच.—हिरव्या व काळ्या रंगाच्या बाटल्या आपण पाहतों त्यांच्या कांचेंतील पदार्थ शुद्ध नसल्यामुळें त्यांस अशा प्रकारचे रंग येतात; या कांचेच्या मिश्रणांत सोडा, लाइम, अल्युमिना, लोखंड, म्यामेशिया हे पदार्थ मिश्र केलेले असतात. ५० पौंड रेती, ४० पौंड पापडखार, ४० पौंड चुना, २॥ पौंड चिकणमाती व १॥ पौंड सैंधव, याप्रमाणें मिश्रण करून त्यांचा चांगला रस करून त्यांत लालभडक केलेल्या लोखंडी नळीचें टोंक बुडवून तें टोंक चक्राकार फिरवावें. बाटली किंवा चिमणी होण्यापुरता गोळा जमला म्हणजे नळी बाहेर काढून ओतीव लोखंडी पत्र्यावर फिरवावी व नळीच्या टोंकावर गोल गोळा जमवावा. आपणांस ज्या आकाराचा शिसा करावयाचा असेल त्या आकाराच्या साच्यांत नळीचें टोंक घालून नळी फुंकावी आणि साच्याचीं दोन्हीं शकलें काढून शिसा थंड करावा.

गारेची कांच.—३० पौंड गारेची पूड, २० पौंड शेंदूर, १० पौंड शुद्ध पर्लॲश आणि ३ पौंड सोडा, हे पदार्थ एकत्र आटवून केलेली कांच दूरदर्शक यंत्र, दुर्बिणी वगैरे कामास उपयोगी पडते.

रंगाची कांच.—कांचेंत निरनिराळा रंग आणणें हें फार महत्वाचें व कठिण काम आहे. रंगाची पूड न टाकतां रंग येण्याकरितां अनेक धातूंचीं भस्में घालावीं लागतात. निळ्या रंगाची कांच कोबाल्ट ऑक्साईडनें होते. हिरवा रंग आणणें झाल्यास लोखंडाचे ऑक्साईड, काळ्याकरितां म्यांगनीझचें ऑक्साईड, नारिंगी रंगाकरितां अँटिमनीचें ऑक्साईड व लोखंडाचें ऑक्साईड, व तांबडा रंग येण्यास सोडियम सिलेनाईट व तांब्याचा ऑक्साईड किंवा गोल्ड क्लोराइड वापरतात.

भट्टी बांधण्यास लागणारे पदार्थ.—भट्टी तयार करणें महत्वाचें काम आहे. चांगली कांच तयार करण्यांत यश येणें हें उत्तम भट्टीवर अवलंबून आहे. भट्टीचे प्रकारः प्रत्यक्ष आंच देणारी भट्टी, टांके भट्टी, गॅसची भट्टी, विजेची भट्टी हे होत. भट्टी टिकाऊ असून तींत रोजच्यारोज शक्य तितकी जास्त कांच तयार होऊन कामास मिळावी. तसेंच उष्णता पूर्ण मिळून इंधन ज्यास्त लागू नये अशी भट्टी असावी.

मुशी.—कांच तयार होण्यास १४००° श. अंशावर उष्णमान लागतें. इतकी उष्णता कोणत्याहि धातूच्या भांड्यास सहन करतां येणार नाहीं. यास्तव जी माती पुष्कळ वेळ तापविली असतांहि वितळू शकत नाहीं अशा फायरक्लेच्या मुशी बनवाव्या लागतात. आपल्या देशांत उघड्या तोंडाच्या म्हणजे वादलीच्या आकाराच्या मुशी बनतात व निमुळत्या तोंडाच्या मुशी तयार होतात. वादलीसारख्या मुशीचीं रुंदी व खोली सारखीच असते. निमुळत्या तोंडाचे रांजण ( मूस ) एकाच बाजूनें असतात. ज्या कांचेत शेंदूर असतो त्या कांचेला आवळत्या तोंडाच्या मुशीच योग्य असतात. कांचेचा रस करण्याच्या मुशी मजबूत लागतात. अभ्रकाची भुकटी व तितकीच चिकणमाती किंवा प्लॅस्टर ऑफ् पारिस मिसळून त्याची मूस करावी.

कांचेची पूड करणें.—कांचेचे तुकडे विस्तवांत टाकून तांबडे लाल करावे. नंतर ते काढून तसेंच थंड पाण्यांत बुडवावे म्हणजे विरघळून जातात. वरचें पाणी हलकेंच ओतून खालीं गाळ जमतो तो सुकवावा म्हणजे पूड होईल. ही पूड पॉलिश पेपरच्या फार उपयोगी आहे.

हिंदुस्थानांतील कांचेचे कारखाने.—हिंदुस्थानांतील कारखान्यांचे साधारणतः दोन वर्ग करतां येतात. (१) अगदीं जुन्या पद्धतीनें चाललेले कारखाने व ( २ ) सुधारलेल्या पद्धतीचे कारखाने.

जुन्या पद्धतीचे कारखाने सर्व हिंदुस्थानभर आहेत पण त्यांची स्थिति आज परदेशीय चढाओढीमुळें खालावलेली आहे. त्यांतून बांगड्या, बाटल्या, अत्तराचे फुगे, पेपरवेट्स व खेळण्याच्या गोट्या वगैरे जिन्नस तयार होतात. कपडवंज, नशिराबाद, चिंचणी तारापूर, फिरोझाबाद वगैरे ठिकाणीं बांगड्या वगैरे जिन्नस तयार होतात. हे कारखाने अतिशय लहान प्रमाणावर चालत असल्यामुळें कोष्टी लोकांच्या कारखान्यांप्रमाणें ते त्यांच्या घरांतच असतात. भट्टयाहि तेच स्वतः बांधतात व त्यांस बाहेरच्या मजुरांची जरूरी लागत नाहीं.

सुधारणेच्या पद्धतीवर पहिला कांचेचा कारखाना पंजाब प्रांतांत १८७० सालीं निघाला. तेव्हांपासून आजपर्यंत किती कारखाने निघाले व त्यांची सांप्रत स्थिति काय आहे हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून समजेल.

पुढील तक्त्याचें सार काढलें असतां कांचकोविद नालायक, माल हलक्या प्रतीचा, भट्टी बांधण्यांत चुका, कारागिरांची फंदफितुरी, अवाढव्य खर्च, अव्यवस्था, अपुरें भांडवल, कुशल कारागिरांचा अभाव, आपसांतील तंटेभांडणें, लोकस्थितीचें अज्ञान, राजाश्रयाचा अभाव, रेल्वे कंपन्यांचें प्रतिकूलत्व इत्यादि कारणांवरून पुष्कळ कारखाने बंद पडले.

हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर कांचेचे कारखाने निघालेले नाहींत. पाश्चात्य देशांतून आलेल्या मालाची स्वस्तता, भांडवलवाल्या लोकांत असलेला उदमी साहसाचा अभाव व हवामानाची प्रतिकूलता हींच त्याचीं कारणें आहेत. अलीकडे कांचेचे कारखाने वाढविण्याचे स्तुत्य प्रयत्न होत आहेत. द्रवीकरणास (रस करण्यास) योग्य अशी वाळू, लांकडें व दुसरीं आवश्यक द्रव्यें हीं व्यापारी ठिकाणाजवळ मिळू शकत नाहींत हीहि कांचेचे कारखाने काढण्याच्या बाबतींत मोठी अडचण आहे.

## कांचकाम.



हस्तकौशल्याचें काम.

चित्रामध्यें उभा राहिलेला मुलगा पेपरवेट्स करण्याकरितां कांच आणून देत आहे व बसलेला मुलगा हातांतील चिमट्यानें मध्यें हवेचे बुडबुडे ठेऊन पेपरवेट्स तयार करीत आहे.

[ ओगले ग्लास वर्क्स ]




पैसाफंड कांचशाळा.

## कांचकाम :

### कांच फुंकण्याचें काम.

कांच काढणें:–चित्राच्या उजव्या हाताच्या कोपऱ्यांतील मुलगा एका ४ते ५ फूट लांबीच्या लोखंडी बारीक नळीचें एक टोंक कांचेच्या रसानें रसरसत असलेल्या रांजणांत बुडवून त्यास लागून आलेली कांच स्टुलावर ठेवलेल्या लोखंडी प्लेटवर "लेव्हल" करीत आहे.

फुगा करणें:—पिपाजवळ उभा असलेला मुलगा नळीच्या दुसऱ्या टोंकांतून फुंक मारून कांचेचा लहान फुगा करीत आहे.

एकवटणें:–असा तयार केलेला फुगा पुन्हां कांचेच्या रसांत बुडवून जो जिन्नस तयार करणें असेल त्यास लागेल इतकी कांच घेतात व ही कांच एका भांड्यांत ठेवून फुंकतां येईल इतकी थंड करतात. अशा रीतीनें तयार झालेला फुगा जो एक मुलगा नळी वर करून उभा आहे त्याच्या हातांतील नळीच्या टोंकावर दिसत आहे.



फुंकणें:—नंतर ही कांच ओतीव लोखंडाच्या सांच्यांत घालून वरून नळीच्या दुसऱ्या टोंकांतून फुंकतात. चित्रामध्यें बसलेल्या मुलानें सांचा धरला असून त्या सांच्यांत दुसरा मुलगा फुंकीत आहे.

कापणें:—अशा रीतीनें तयार झालेला पोकळ जिन्नस नळीपासून सोडवावी लागतो. जिन्नसाच्या वरच्या व खालच्या भागास एक कंगोरा असतो. हा कंगोरा ऊन असतांना एका थंड लोखंडी पट्टीचें टोंक यास लागतांच तेथून तो निघून पडतो. [ ओगले ग्लास वर्क्स ].

## हिंदुस्थानांतील कांचकारखान्यांच्या माहितीचा तक्ता.

| गांव अगर स्टेशन | कारखान्याचें नांव | भांडवल | सुरुवात | बंद अगर चालू | निघणारा माल | कारखाना बुडण्यास कारण. |
|---|---|---|---|---|---|---|
| झेलम (पंजाव) | पंजाव ग्लासवर्क्स | ... ... | १८७० | बंद | वाटल्या | कांचकोविद नालायक. |
| अलीगड | ... ... | ... ... | १८७९ | बंद | „ | माल वाईट, कारागीर अज्ञ |
| भागलपूर (वंगाल) | ... ... | ... ... | १८८२ | बंद | मणी | भट्टी बांधण्यांत चूक. |
| टिटाघर (वंगाल) | पायोनिअर ग्लासवर्क्स | २॥ लाख | १८९०-९८ | बंद | वाटल्या, दिवे, चिमण्या, सोडावाटरच्या वाटल्या वगैरे | परकीय कामकरूंचा पगारावद्दल संप व मजूर लोकांना दुसऱ्या कारखानदारांनीं फितवून नेलें. |
| सोडेपूर (वंगाल) | ... ... | ८ लाख | १८९५-९८ | बंद | वाटल्या, चिम. | मालांत दोष. |
| अमदावाद | ... ... | | १८९७ | बंद | चिमण्या, दिवे. | ... ... |
| अंवाला (पंजावप्रांत) | १ पंजाव ग्लासवर्क्स | ... ... | १८९५ | चालू | वाटल्या, दौती, | भट्टी बांधण्यांत चूक. |
| | २ अपरइंडिया „ | ... ... | १९१४ | चालू आहे | कांच | ... ... ... |
| हैद्रावाद सिंध | ... ... | ... ... | १८९५ | बंद | वाटल्या | खर्च फार, कारागीर अडाणी. |
| राजपूर (डेऱ्हाडून) | हिमालय ग्लासवर्क्स | २ लाख | १८९८ | बंद | दौती, ग्लोव, चिमण्या, वगैरे | भट्टी बांधण्यांत चूक माल महाग. |
| शिकंदराराव जि. अलीगड | ओरिएंटल ग्लासवर्क्स | ६३ हजार | १९०५ | बंद | वरण्या चिमण्या इ. | प्रथम भट्टी बांधण्यांत चूक मालकाचें व तज्ज्ञांचें भांडण. |
| तळेगांव दाभाडे | पैसाफंड कांचशाळा | ३७ हजार आठशें साठ | १९०८ | चालू | वरण्या, हंड्या, चिमण्या वगैरे | |
| मोरार (ग्वाल्हेर) | सिंदिया ग्लासवर्क्स | ७५ हजार | १९०८-०९ | बंद | दौती वगैरे. | अव्यवस्था, कारागीर अज्ञ |
| पानिपत | पानिपत ग्लासवर्क्स | | १९०९ | बंद | वाटल्या | मालांत दोष, अपुरें भांडवल. |
| जवलपूर | जवलपूर ग्लासवर्क्स | ... ... | १९०९ | बंद | चिम. ग्लोव इ. | अव्यवस्था, कारागीर अज्ञ |
| एनूर (मद्रास) | एनूर ग्लासवर्क्स | | १९०७-०९ | बंद | ... ... | ... ... ... |
| मद्रास | मद्रास ग्लासवर्क्स | २ लाख | १९०९ | बंद | ... ... | उत्पन्नाच्या मानानें खर्च फार. |
| नैनी | १ ओरिएंटलग्लास व. | | १९०९-१० | चालू | दिवे, चिमण्या | |
| | २ अलेंविक „ | | | बंद | इत्यादि | |
| सितारामपूर (वंगा) | काशी ग्लासवर्क्स | २ लाख (८०-९० हजार) | १९०८ | | वाटल्या | उत्पन्नाच्या मानानें खर्च फार. |
| मुंबई (माटुंगा) | वांवे ग्लासवर्क्स | १ लाख | १९०९ | बंद | हंड्या, दिवे, इ. | अव्यवस्था, तंटे इ० |
| माटुंगा | इब्राहिम पीर महमद ग्लासवर्क्स | ... ... | १९१२ | चालू | हंड्या, दिवे, इ. | |
| वडोदे | वडोदा ग्लास वर्क्स | „ „ | १९११ | चालू | „ „ „ | |
| सोडेपूर (वंगाल) | वंगाल ग्लासवर्क्स | फारच थोडें ज. | १९१२ | बंद | | अव्यवस्था, भांडवलाची तूट |
| शिवरी (मुंबई) | १ क्रसेंट ग्लासवर्क्स | २०-३० हजार | १९१३ | बंद | हंड्या, दिवे, चिमण्या | अव्यवस्था, योग्य माणसाचा अभाव. |
| | २ गुडहोप | | | सु. हो. आ. | | |
| सुंथरोड (रतलाम) | वेस्टर्न इंडिया ग्लासवर्क्स | १॥ लाख | १९१२ | चालू | चिमण्या इ० | |
| अलवार | अलवार ग्लासवर्क्स | ... ... | १९१३ | ... | | माहिती मिळाली नाहीं. |
| लाहोर | पंजाव ग्लासवर्क्स | ... ... | १९१२ | ... | ... ... | माहिती मिळाली नाहीं. |
| अलाहावाद | सेंट्रलग्लासवर्क्स | ... ... | ... ... | ... | ... ... | माहिती मिळाली नाहीं. |
| कानपूर | गंगाग्लासवर्क्स | १॥ लाख | ... ... | | ... ... | माहिती मिळाली नाहीं. |
| कलकत्ता | इंडिअनग्लासवर्क्स | | | | | |
| ओगलेवाडी | ओगले ग्लासवर्क्स | १० लाख | १९१४ | चालू | चिमण्या कौलें वरण्या इलेक्ट्रिक शेड वगैरे | |

पैसाफंड कांचशाळा.—हा कारखाना पुणे जिल्ह्यांत तळेगांव दाभाडें येथें आहे. याची स्थापना सन १९०८ मध्यें झाली. त्यावेळीं भांडवल ३७॥ हजारांचें होतें. हल्लीं (१९२४) भांडवल वाढविलें आहे. पैसाफंडांतून औद्योगिक शिक्षण देऊन देशांत त्या शाखेचा प्रसार जास्त होऊन, लोकांनीं स्वावलंबी बनावें ह्या उद्देशानें ही संस्था निघाली. आजपर्यंत शिक्षणदानाचाच मुख्य हेतु संस्थेनें डोळ्यापुढें टेविला असून (व नफावाजीकडे दुर्लक्ष केलें असून), त्या मानानेंच तिचे सारे प्रयत्न चालू आहेत. कांचेच्या कामांत चिमण्या व इतर ग्लोब यांचीच पैदास जास्त आहे. हंड्या, दौती वगैरे कामेंहि होतात. आतां बांगड्यांचा धंदा त्यांनीं हातांत घेतला आहे व चिनीमातीचीं भांडीं तयार करण्याच्या कामींहि लक्ष घातलें आहे. विशेष महत्वाचा व हिंदुस्थानांत पहिलाच असा वरण्या व रांजण तयार करण्याचा धंदा यांनीं आज उत्तम तऱ्हेनें चालविला असून त्याप्रीत्यर्थ परदेशीं जाणारा बराच पैसा वाचविला आहे.

ओगले ग्लास वर्क्स लिमिटेड ओगलेवाडी (संस्थान औंध)—हा कारखाना समाईक भांडवलाच्या कंपनीनें चालविलेला आहे. कांचकारखाना व कारखान्याची वसाहत, यांची स्थापना सन १९१४ त झाली व याचें आज लिमिटेड कंपनींत रूपान्तर झालें आहे. अधिकृत भांडवल (१०,००,०००) रुपये दहा लाख आहे पैकीं सध्यां तीन लाख खपलेलें आहे.

कारखाना औंध संस्थानच्या हद्दींत आहे. कंपनीनें सन १९२१–२२ व २२–२३ या सालीं आपल्या भागीदारांस अनुक्रमें ६ व ९ टक्के डिव्हिडंड दिलें आहे.

डीट्झ व प्रचारांतील इतर सर्व प्रकारच्या दिव्यांवरील लहान मोठ्या चिमण्या व ग्लोब्ज, कांचेचीं कौलें, फ्लॉवर पॉट्स, पेपरवेट्स, वरण्या, वशा, चटणी सेट्स, इलेक्ट्रिक शेड्स् इत्यादि माल या कारखान्यांत होतो.

व्यापार.—हिंदुस्थानांत अयात होणाऱ्या कांचेच्या किंमतीचे आंकडे सालवारी पुढीलप्रमाणें:—

| साल | किंमत रुपये. |
|---|---|
| १८७६–७७ | २९४५०९१ |
| १८९६–९७ | ७२२५९१९ |
| १९०२–०३ | ९६१५६३४ |
| १९०६–०७ | १२२७५७२५ |
| १९१३–१४ | १९०००००० |
| १९१९–२० | १९९०००००० |
| १९२०–२१ | ३३८००००० |

महायुद्धापूर्वी आस्ट्रियाहंगेरी आणि जर्मनी या भागांतून ११६ लाख रुपये (१९१३–१४) किंमतीच्या बांगड्या, मणी, वाटल्या, चिमण्या वगैरे माल आला. युद्ध सुरु झाल्यापासून जपान हा माल पुरवूं लागला. त्याचें आयातीचें प्रमाण शेंकडा ८ पासून ७१ पर्यंत चढलें. तरीहि सर्व पुरवठा त्याला करतां येणें शक्य झालें नाहीं. युद्ध थांबल्यावरोबर पु॰नं आस्ट्रिया–हंगेरीचा माल येऊं लागला. १९२०–२१ सालीं ४३३००० पौंड किंमतीच्या कांचमालाची त्या देशांतून आयात झाली. १९१३–१४ त ही आयात ५८३००० पौंडांची होती.

१९०५–०६ सालीं ९८०२९ रु. किंमतीचा माल येथून परदेशांत गेला. पैकीं मुंबईहून ८९०२९ रु. किंमतीचा माल गेला. निर्गत मालाचे मुख्य गिऱ्हाईक इराण असून आशियांतील तुर्कस्तान, अरबस्तान, सिलोन व संयुक्तराज्य या ठिकाणींहि कांहीं माल जातो.

[ॲप्स्ले पेलाट–क्युरिऑसिटीज ऑफ ग्लासमेकिंग. ट्रन्झॅक्शन ऑप्टिकल सोसायटी. कॅटलॉग ऑफ दि ऑप्टिकल कन्व्हेन्शन्; फ्रॅक्स–गाईड टु ग्लास रूम इन् ब्रिटिश म्यूझियम. आर्ट हॅंड बुक (व्हिक्टोरिया ॲंड अल्बर्ट म्यूझियम्). मॅन्युफॅक्चर्स ऑफ ग्लास ॲंड पोर्सेलेन (कॅबिनेट सायक्लोपीडिया). सौझे–मार्व्हेल्स ऑफ ग्लास मेकिंग इन् आल एजेस. लोकशिक्षण वर्ष २–४, 'श्रीराम' चे कांचेवरील लेख].

कांचकागद.—(पॉलिश पेपर) जेथें जेथें कारखान्यांतील कामाकरितां यांत्रिक शक्तीचा उपयोग केला जातो तेथें तेथें यंत्रांवर चढलेला गंज काढून टाकण्याकरितां निरनिराळ्या प्रकारचे साफ करण्याचे कागद किंवा कपडा उपयोगांत आणावा लागतो. या कागदांस किंवा कपड्यांस कांचकागद, वाळूचा कागद, कुरुंदाचा कागद किंवा पॉलिशकपडा अशीं नांवें आहेत. पितळी किंवा इतर धातूंचे सामान तसेंच सुतारकाम यावर तजेला येण्याकरितां याच कागदाचा उपयोग होतो. चांदींसोन्याचीं भांडीं यांजवर कचरा बसून खराब झालीं असल्यास त्यांवर जिल्हई येण्याकरितां हेच कागद वापरतात. हिंदुस्थानांत हे जिन्नस परदेशाहून येतात. ते तयार करण्यास लागणारा कच्चा माल आपल्या देशांत विपुल आहे. व या धंद्यास भांडवलहि फार लागत नाहीं. असें असून तो कागद करण्याकडे कोणी लक्ष देत नाहीं.

पॉलिश पेपर करण्याची रीत—हे कागद करण्यास खालील सामान लागतें:—(१) लहानमोठया छिद्रांच्या तीन किंवा चार चाळण्या (२) जाडसर, चिंवट व १२ × १० इंच आकाराचे कागद, (३) हलक्या जातीच्या नैनसुख,किंवा लॉंगक्लाथ जातीच्या कापडाचे तुकडे, (४) बहुतेक सर्व ठिकाणीं मिळण्यासारखा बारीक वाळू, (५) हिरवट रंगाच्या कांचेचे तुकडे,(६)पातळ केलेला सरस किंवा कोणत्याहि जातीचा पातळ गोंद. इ. ह्या कामास लागणाऱ्या जिन्नसांपैकीं फक्त कागद किंवा कापड हे दोनच जिन्नस जरा किंमतीचे आहेत. बाकीच्या जिनसा महाग नाहींत. हा धंदा सुरु करण्यास ४० ते ५० रुपयांच्या भांडवलापेक्षां जास्त खर्च लागणार नाहीं.

समुद्रकांठची किंवा वाहत्या पाण्याखालची वाळू या कामास घेऊं नये. कारण वाहत्या पाण्याच्या योगानें वाळूचे

कण रात्रंदिवस घर्षण पाहून वाटोळे होतात व त्यांच्या मधील अणकुचीदारपणा नाहींसा झालेला असतो. दुसऱ्या प्रकारची वाळू मिळत नसल्यास हीच वाळू दळून किंवा कुटून तिचा गरगरीतपणा नाहींसा करावा व त्या वाळूचा उपयोग करण्यापूर्वी ती चांगली धुवून वाळवावी.

ज्या कांचेंत हिरवी झांक मारते ती कांच ह्या कामाला ज्यास्त उपयोगी अशी समजावी. खलवत्यांत घालून कांच कुटावी किंवा मोठ्या प्रमाणावर धंदा करणें असल्यास कांच दळण्याचें यंत्र आणवावें. कागद किंवा कापड चिवट असावें लागतें. कागदास किंवा कपड्यास गोंद अगर सरस लावून वाळल्यावर त्याच्या खपल्या पडूं नयेत म्हणून त्या मिश्रणांत थोडें ग्लिसरीन घालावें. गोंदांत किंवा सरसांत चिकटण्याचा धर्म राहील इतका तो पातळ असावा. यापेक्षां ज्यास्त पातळ असूं नये.

कांचकागद जरी लांकडी सामान साफ करण्याकडे वापरतात तरी त्यापेक्षां फ्यूमिस पेपर(फ्यूमिस नांवाच्या ज्वालामुखी पर्वताच्या आसपास सांपडणारा भुसभुसीत दगड असतो त्यापासून केलेला कागद ) ज्यास्त उपयुक्त आहे. वर सांगितल्याप्रमाणें सारख्या आकाराचे कागद किंवा कापडाचे तुकडे कापून त्यांवर डिंकाचा किंवा सरसाचा पातळसा हात ब्रशानें सारखा द्यावा आणि उत्तम, मध्यम व कनिष्ठ यांपैकीं पाहिजे असतील त्या प्रतीचे कागद तयार करण्याकरितां निरनिराळ्या जातीच्या चाळण्यांतून वाळू किंवा कांचेची भुकटी गोंद लावलेल्या कागदावर पसरावी. या कृतीप्रमाणें वाळू किंवा कांच कागदावर चिकटल्यानंतर राहिलेली वाळू किंवा कांच झाडून टाकावी. नंतर ते कागद किंवा कपड्याचे तुकडे तापलेल्या लोखंडी पत्र्यांवर किंवा गरम झालेल्या फरसबंदीवर ठेवून वाळवावे. हाच धंदा ज्यास्त मोठ्या प्रमाणावर करणें असल्यास त्याचीं यंत्रें मागवून करावा.

**कांचन**—या वृक्षास संस्कृतमध्यें कांचनार, गुजराथींत कंचनार, हिंदींत कचनार व मराठींत कांचन इत्यादि नांवें आहेत. हा वृक्ष बराच मोठा होतो. हा बहुतेक आपट्याप्रमाणेंच दिसतो. याचीं पानें आपट्याच्या पानासारखीं परंतु त्या पानांहून मोठीं व पातळ असतात. कांचनाच्या पांढरा, पिंवळा व तांबडा अशा तीन जाती आहेत. याच्या फुलांस साधारण सुवास असतो. यास शिकेकाईसारख्या चपट्या शेंगा येतात. याच्या लांकडाचा रंग तांबूस असतो. हें लांकूड रंगाच्या कामीं उपयोगी पडतें. हें फार चिवट असतें व यामुळें याच्या काठ्या करतात.

उ प यो ग.—गंडमाळेवर कांचनाची साल तांदुळाच्या धुण्यांत उगाळून २ पासून ४ तोळेपर्यंत द्यावी. अथवा कांचनाच्या सालीच्या काढ्यांत सुंठीचें चूर्ण घालून द्यावें. गंडमाळा फुटण्यास कांचनाचें मूळ, चित्रक, अडुळसा या औषधी पाण्यांत वाटून गंडमाळेवर लेप केला असतां सर्व दोषांपासून झालेल्या गंडमाळा फुटतात. हा लेप फोडावरहि लावावा. [ वनौषधि गु. भाग. २].

**कांचनगंगा**—जगांतील सर्वांत मोठें दुसरें पर्वतशिखर. हें हिमालयपर्वताच्या पूर्वेकडील भागाचें शिखर असून, सिक्कीम आणि नेपाळ या दोन संस्थानांच्या दरम्यानच्या हद्दीवर आहे. दार्जिलिंग स्टेशनावरून या प्रचंड पर्वताचा पायथ्यापासून तो नेहमीं वर्फाच्छादित असलेल्या शिखरापर्यंतचा सर्व भाग पहावयास मिळतो. कांचनगंगा पर्वताचें शिखर २८१४६ फूट उंच आहे. कांचनगंगा हें तिबेटियन नांव आहे व त्याचा अर्थ ' वर्फाच्या प्रचंड राशींचे पांच समूह ' असा आहे.

**कांचना किल्ला**—मुंबई. नाशिक जिल्हा. चांदोरच्या वायव्येस १० मैलांवर व कोळधैरच्या पश्चिमेस दोन मैलांवर हा किल्ला आहे. हा डोंगर कोळधैरपेक्षां जास्त उभा आहे याला उत्तरेच्या बाजूकडे रस्ता असून तेथून गंगथडीच्या बाजूनें बिकट चढण आहे. यावर तट असून यास दोन दरवाजे आहेत. वरतीं पाणी विपुल असून खडकांत खोदलेलीं पुष्कळ तळघरें आहेत. तेथें पेशव्यांची शिबंदी असे. हा किल्ला इंग्रजांनां त्रिंबकेश्वराबरोबर मिळलेल्या १७ किल्यांतील एक होय.

**काचार**—आसाममधील एक जिल्हा. ह्या जिल्ह्यांत काचारी लोक रहातात म्हणून ह्यास हें नांव मिळालें. येथील राजानें टिपरा येथील राजकन्येशीं विवाह केल्यामुळें सुर्मा खिंडीचा वरचा भाग यास आंदणादाखल मिळाला. उत्तर अ० २४° १२' ते २५° ५०' आणि पूर्व रे. ९२° २६' ते ९३° २९'. क्षेत्रफळ ३७६९ चौ. मै. उत्तरेस कपिली व दोईआंग नद्या; ह्यापलिकडे नौगांव जिल्हा आहे. याच्या पूर्वेस नागाटेंकड्या व मणीपूर संस्थान; दक्षिणेस लुशाई टेंकड्या; पश्चिमेस सिलहट जिल्हा व जयंत्या टेंकड्या. सपाट जमीन व उंचसखल जमीन ह्या दृष्टीनें जिल्ह्याचे दोन भाग पाडतां येतात. यांत बांबूंचीं झाडें पुष्कळ आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं पाणथळ जमीनहि आहे. लहान लहान टेंकड्यांवरून चहाचे मळे व तेथेंच मळेवाल्यांच्या रहाण्याच्या जागा दृष्टीस पडतात.

ह्या जिल्ह्यांतील मोठी नदी बराक किंवा सुर्मा ही आहे. ह्या नदीच्या दक्षिणेकडून सोनई, धाम्रा, धलेश्वरी ह्या नद्या येऊन मिळतात व उत्तरेकडून जीरी, चीरी, मधुरा व जाटिंगा ह्या नद्या मिळतात. बरेल टेंकड्यांच्या पलीकडे ब्रम्हपुत्रेस जाऊन मिळणारी कपिली नदी मोठी आहे; पावसाळ्यांत बराक नदीच्या महापुरामुळें व सभोंवतालच्या डोंगरावर पडलेल्या पावसामुळें रेंगटी पहाड व तिलेन टेंकड्यांची ओल ह्यांमधील प्रदेश ( ह्याला ' चाटला ' म्हणतात ) म्हणजे एक मोठें १२ मैल लांबीचें व २ मैल रुंदीचें तळें बनतें.

कांहीं कांहीं जंगली भागांत रानटी हत्ती, वाघ, हरिणें व इतर वन्य पशू सांपडतात. जून ते सप्टेंबरपर्यंत उन्हाळा असतो ( उष्णमान ८३ ° ). थंडीचा कडाका जानेवारींत असतो ( उष्णमान ६५ ° ). वार्षिक पाऊस १०० ते १६५ इंच आहे; पण नौगांव जिल्ह्याच्या बाजूस फक्त ५५ इंचच पडतो. १८६९ सालीं मोठा भूकंप झाला होता. त्यावेळीं सिलचर येथें फार नुकसानी झाली. १८८२ सालीं दुसरा मोठा भूकंपाचा धक्का बसला होता. १८९७ सालचा धक्का सर्वांत जबर होता. पण इलाख्यांत इतर ठिकाणीं झालेल्या नुकसानीच्या मानानें येथें फारशी नुकसानी झाली नाहीं.

काचारी लोकांचे नाईक पूर्वी असामच्या खिंडींत राज्य करीत असत. पण१३ व्या शतकाच्या सुरवातीस शिवसागरचा उत्तरभाग व नौगांव जिल्ह्यांत त्यांनीं ठाणें दिलें व धनसिरी नदीच्या कांठीं दिमापूर ही त्यांची राजधानी होती. १५३६ सालीं अहोम राजानें तें शहर लुटलें व तेथील राजास ठार मारलें व लोकांस तेथून मैबंग येथें राजधानी नेण्यास भाग पाडलें. पुढें १७०६ सालीं रुद्रसिंग नांवाच्या अहोम राजानें मैबंग लुटलें व तेथील राजास काचारकडे हांकून लावलें. येथें आल्यानंतर ह्यांची राजधानी खासपूर येथें होती व नौगांव जिल्ह्यांतील कपिली खिंड देखील ब्रिटिश सरकारच्या हातीं जाईपावेतों ह्या लोकांच्या ताब्यांत होती.

सन १७६२ सालीं ब्रिटिश लोकांनीं ह्या जिल्ह्यांत प्रथम पाय ठेवला. त्यावेळीं मणिपूरच्या राजास मदत करण्यास व्हेरलेल्ट्स, चित्तगांव येथून खासपूर येथें आला. १७९० सालीं येथील राजघराणें हिंदुधर्मीय झालें. नंतर थोड्या वर्षांनीं मणीपूरच्या मरजितसिंग राजानें गोविंदसिंगास हांकून लावलें. व पुढें लवकरच ब्रम्ही लोकांनीं ह्यांस सुर्मा नदीच्या खोऱ्यांत हांकून लावलें. ब्रम्ही लोकांनीं काचार घेण्याचा देखील घाट घातला होता. पण सिलहट येथें ब्रिटिश लोक होते, त्यांनीं त्यांस प्रतिबंध केला. तेव्हां काचारी राजानें ब्रम्ही लोकांस हांकून देऊन गोविंदसिंगास परत राज्य दिलें. १८३० सालीं हा राजा बेवारसी मेला. तेव्हां १८२६ सालीं झालेल्या तहाप्रमाणें ब्रिटिशांनीं हा जिल्हा आपल्या अंमलाखालीं घेतला. परंतु उत्तर काचार टेकड्यांचा बराचसा भाग कचदिन नांवाच्या एका मनुष्यानें आपल्या ताब्यांत घेतला होता. पण पुढें त्याला मारण्यांत आलें व १८५४ त ब्रिटिश सरकारनें हा प्रदेश पूर्णपणें आपल्या ताब्यांत घेतला.

१८५७ सालीं कांहीं बंडखोर लोकांनीं टिपरा व सिलहट प्रदेशांतून काचारांत प्रवेश केला. पण लाखीपूर येथें त्यांचा मोड करण्यांत आला; तरी पुढें बरींच वर्षेंपर्यंत ह्या लोकांनीं फार त्रास दिला. समबुधिन नांवाच्या कोणी एका काचारी बंडखोरानें फार धुमाकूळ केला व डेप्यूटीकमीशनरास मारिलें. अखेरीस कांहीं दिवसांनीं बंडखोरास मारण्यांत आलें. लोकसंख्या ( १९२१ ) ५२७२२८. ह्या जिल्ह्यांत मैबंग येथें कांही दगडांवर खोदीवकाम आहे. जिल्ह्याचे मुख्यतः तीन विभाग केले आहेत. एक सिलचर, दुसरा हेलाकांडी व तिसरा उत्तरकाचर.

लोकवस्ती बहुतेक हेलाकांडी ह्या भागांत फार आहे. कारण इतर प्रदेश डोंगराळ आहे. उत्तरकाचार भागांत सर्वत्र जंगल व बांबूंचे वन आहे. शेंकडा ६५ लोक हिंदु आहेत. बंगाली, हिंदुस्थानी, हिंदी, मणिपुरी, दिमासा किंवा काचारी ह्या भाषा प्रचारांत आहेत. हिंदु जातीचे सर्व लोक हीन जातींपैकीं आहेत. बहुतेक मळ्याच्या कामाकरितां आणलेले मजूर लोक आहेत.

येथें २९००० हिंदु धर्माचे मणिपुरी लोक आहेत. शेंकडा ८५ लोक आपली उपजीविका शेतकीवर करतात.

शे त की:—जमीनीची सुपीकता पाऊसपाण्यावर अवलंबून आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं जमीन फार सखल असून गवताशिवाय तेथें कांहीं उगवत नाहीं. अशा ठिकाणीं क्वचित कोठें तांदूळ पेरतात. पण इतर ठिकाणीं तांदूळाचेंच उत्पन्न मुख्य आहे. कोठें कोठें ऊंस कडधान्य वगैरे पीकहि काढलें जातें. चहाची निपज येथें खूप आहे. दिवाण येथें तारापूर नांवाची एक कंपनी आहे. स्कॉटपूर व बंगाल टी कंपनी अशा एकंदर तीन मोठ्या चहाच्या कंपन्या आहेत.

हा जिल्हा ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आल्यापासून पूर्वीपेक्षां दहापट जमीन सध्यां लागवडखालीं आहे शेतकीच्या संबंधीं कांहीं फारशी सुधारणा दृष्टोत्पत्तीस येत नाहीं.

उत्तरकाचार भागांत व इतर भागांत इमारती लांकूड पुष्कळ आहे. बऱ्याच ठिकाणीं राखीव जंगलें आहेत. तेथें थोड्या प्रमाणावर रबर तयार होतें. बदरर व मासिमपूर येथें मातीच्या तेलाचे ( रॉकेल ) झरे आहेत असें म्हणतात; पण अजून तेल काढण्यास सुरुवात झाली नाहीं. लांकडें कापण्याचा एक कारखाना ह्या जिल्ह्यांत आहे. मणिपुरी लोक कपडा वगैरे विणतात व पितळेचीं भांडीं तयार करतात.

काचारांतून चहा बाहेर जातो. १९०४ सालीं ९४ लाख रुपयांचा चहा बाहेर गेला असें म्हणतात. इमारती लांकूड व बांबू वगैरे माल सिलहटला पाठविले जातात. नित्य संसाराकरितां लागणारा सर्व माल बाहेरून आणिला जातो. राकेल, कोळसा, लोखंड व पोलाद बाहेरून आणतात.

लोकांनां व्यापाराची गोडी नाहीं. राजपुताना, सिलहट व बंगाल येथील रहिवासी लोक येथें येऊन व्यापारी बनले आहेत.

पावसाळ्याच्या दिवसांत रस्ते खराब असल्यामुळें दळणवळणाच्या कामीं नद्यांच्या पात्रांचा उपयोग करतात. थंडींत नद्यांवर तात्पुरते बांबूंचे पूल उभारतात.

जिल्ह्याच्या तीन विभागांपैकीं सिलचर विभागाकरितां डेप्युटी कमिशनराची नेमणूक आहे. आसाम कमिशनचा

मेंवर बहुतेक हेलाकांडी विभागांत असतो व उत्तरकाचार भाग एका पोलिसऑफीसराच्या ताब्यांत असतो. कलकत्याचें हायकोर्ट हें मुख्य अपील करण्याचें कोर्ट आहे.

काचारी राजाच्या वेळीं जमावंदी करण्यांत आली होती. पण ती प्रत्येक व्यक्तीशीं न करतां एकंदर संघाशीं करण्यांत आली होती. संस्थानांनीं मानलेल्या अत्यंत लहान संघाला 'खेल' म्हणत असत. पुष्कळ खेलांच्या एका मोठ्या संघाला 'रज' म्हणत. ज्याप्रमाणें प्रत्येक व्यक्ति सारावसुलीबद्दल 'खेल' ला जबाबदार असे, त्याचप्रमाणें प्रत्येक 'खेल' 'रज' ला जबाबदार असे. कार्तिकचंद एका एकरापाठीमागें १० आणे घेत असे. गोविंदचंद तर कधीं कधीं ह्याच्या दुप्पट घेत असे. शिवाय इतर पुष्कळ तऱ्हेच्या करांमुळें व जकातीमुळें व्यापारवाढीस फार अडथळा होत असे.

ब्रिटिश सरकारच्या सत्तेखालीं आल्यानंतर पहिली जमावंदी १८३८-३९ सालीं करण्यांत आली. व तिची मुदत फक्त ५ वर्षांकरितांच होती. तदनंतर १८४३-४४ सालीं १५ वर्षांकरितां पुन्हां धारेबंदी करण्यांत आली. नंतर १८५९ सालीं वीस वर्षांकरितां पुन्हां जमावंदी करण्यांत आली. ही मुदत संपल्यानंतर पुन्हां जी धारेबंदी करण्यांत आली तींत १ रु. ११ आ. पासून तों १२ आणे दर एकरप्रमाणें वसूली करीत असत. ह्यांत चहाच्या लागवडीच्या जमीनीचा समावेश होत नसे. १९०० सालीं झालेल्या जमाबंदींत तर दर एकरास २ रु. ७ आ. पासून १२ आ. पर्यंत सारा होता. १९०३-४ सालीं एकंदर सारावसुली ११७२ हजार रुपये होती. थोडासा सारा घेऊन पडीत जमीन चहा किंवा इतर धान्य उत्पन्न करण्याकरितां काचारमध्यें देत असत. पण सध्यां पडीत जमीन लागवडीस आणण्याकरितां सवलती देणें बंद केलें आहे.

फक्त सिलचर येथेंच म्युनिसिपालिटी आहे. शिक्षणाच्या बाबतींत काचारचा एकंदर इलाख्यांत बराच वर नंबर आहे. अशिक्षित मजुरांची चहाच्या मळ्याकरितां भर होत असल्यामुळें शिक्षणाचें शेकडा मान लोकसंख्येच्या वाढत्या प्रमाणांत कमी कमी होत आहे.

उ त्त र का चा र.—हा एक काचार जिल्ह्याचा विभाग आहे. उत्तरअक्षांश २४° ५८' ते २५° ५०' आणि पूर्वरेखांश ९२° ३२' ते ९३° २९'. क्षेत्रफळ १७०६ चौ. मैल. सुर्माखिंडीला ब्रह्मपुत्रेपासून वेगळा करणारा हा एक डोंगराळ प्रदेश आहे. ह्याच पहाडांतून काचारी राजानें आपली राजधानी दिमापूर येथून मैबंग येथें नेली. १९ साव्या शतकाच्या उदयसमयीं तुलाराम सेनापतीनें या विभागांत आपला ताबा बसविला व १८५४ पर्यंत तो व त्याचे पुत्रपौत्र ह्या विभागाचे खंडणी देणारे राजे म्हणून ब्रिटिशसरकाराकडून लेखले जात असत. सर्व प्रदेश डोंगराळ असून जंगल विपुल आहे. ह्या भागांत लोकसंख्या फारच कमी आहे. आसाम-बंगाल रेल्वे ह्या विभागांतून जाते. ह्या सर्वंध विभागाकरितां एक यूरोपियन पोलीस ऑफिसर आहे. याचें मुख्य ठिकाण हाफ्लांग येथें आहे. ह्यांत एकंदर २५४ खेड्यांचा समावेश होतो. खुद्द हाफ्लांग येथें ७७ इंच पाऊस पडतो व उत्तरेस मैबंग येथें ५५ इंच पडतो.

**काचिन.**—तिबेटो ब्रह्मी रक्तापासून झालेली एक जात. उत्तरब्रह्मदेशाच्या उत्तरेस आणि ईशान्येस आणि शानसंस्थानें यांत या जातीची वस्ती आहे. हिंदुस्थानांत १९११ त १६२८२२ काचिन होते. यांपैकीं ब्रह्मदेशांत १६२३६८ व आसामांत ४५८ होते. बहुतेक बौद्धधर्मीय आहेत. याखेरीज ब्रह्मदेशांत काचिन ब्रह्मी व लोलोवर्ग यांतील लोक ८० हजारापर्यंत आहेत. हीच जात पश्चिमेकडे आसामांत सांपडत असून त्यांस तेथें सिंगफोस या नांवानें ओळखतात. त्याचप्रमाणें इरावती नदीचें खोरें व कठा जिल्हा येथपर्यंत ही जाति सांपडते. परंतु यापलीकडे ही जाति पसरली नाहीं, याचें कारण याच्यापुढें दाट वस्तीचे भाग असल्यामुळें त्यांस तितका वाव मिळाला नसावा. तथापि दक्षिणेस ही जाति पसरत चालली आहे. तसेंच उत्तरेकडील शानसंस्थानांत प्रथमतः शान आणि पलौंग जातींची वस्ती होती. परंतु यांनीं आपला या भागांत बराच शिरकाव करून घेतला आहे. व चीनच्या बाजूस केंटुंगच्या ट्रॅन्ससालवीन संस्थानापर्यंत हे लोक जाऊन भिडले आहेत. पूर्वी या जातीनें सरहद्दीवरील प्रदेशास बराच त्रास दिला असून त्यांचा प्रतिकार करण्याकरितां ब्रिटिशांस त्यांवर बऱ्याच वेळा मोहीमा कराव्या लागली आहे. यांचा सविस्तर इतिहास ज्ञानकोश विभाग १ ला 'हिंदुस्थान आणि जग' या खंडांत (प्र. ४ पा. १५२-५३) सांपडेल.

या जातींत पांच पोटजाती असून सुमारें १०० घराण्यांचीं नांवें आहेत. एकच घराणें आपसांत लग्नव्यवहार करीत नाहीं. यांच्यांत मृतांस पुरण्यांत येतें. यांचा भुतांखेतांवर विश्वास आहे. हे उचली पद्धतीची शेती करतात. यांचें घर साधारणपणें ब्रह्मी किंवा शान लोकांच्या घरापेक्षां मोठें असतें. यांची चेहेरेपट्टी बहुतेक मंगोलियन वळणावर आहे व हे थोडे ठेंगणे आहेत. हे लोक ब्रह्मी भाषेची एक पोटभाषा बोलतात.

**काची**—अथवा काछी, काचिया. एक शेतकरी जात. कक्ष म्ह. कुंपण किंवा कर्ष म्हणजे तास या संस्कृत शब्दापासून या जातिनामाची उत्पत्ति सांगतात. यांची सर्वांत मोठी वस्ती उत्तरहिंदुस्थानांत आहे. १९११ च्या खानेसुमारींत गणती केलेल्या १३०४२९६ काची लोकांपैकीं संयुक्तप्रांतात ७२८८००, मध्यहिंदुस्थानांत ३७२४९६, व राजपुतान्यांत ६०६६६ होते. मध्यप्रांतांतहि लाख दीड लाख लोक आहेत. बहुतेक काची हिंदुधर्मीय आहेत. मुसलमान दोन हजारांपर्यंत सांपडतील.

उ त्त र हिं दु स्था नः—उत्तम शेतकऱ्यांमध्यें या लोकांची गणना होत असून फळें, ऊंस, अफू या जास्त किफायतीच्या लागवडींत हे मन घालतात. व रजपुतांच्या

कच्छवाहजातीशीं हे संबंध जोडूं पहातात. ही जात विशेषेंकरून शाक्तपंथाची दिसते; कारण दुर्गादेवी व तिचें दुसरें एक स्वरूप शीतळादेवी ( गोंवराची देवी ) हिची उपासना हे लोक करितात व हिंदूंतील जुन्या पुराण्या देवतांनां फारसे मानीत नाहींत. रोग निवारण करणाऱ्या व पीक वाढविणाऱ्या नागरसेन, चामर यांसारख्या स्थानिक देवतांनां हे पूज्य मानतात. धरित्रीमाता व तिचा पति भूमिया या यांच्या ग्रामदेवता होत. मदारसाहेब, सय्यदमर्द वगैरे किरकोळ मुसुलमान देवताहि यांच्यांत आहेत.

म ध्य प्रां त व व ऱ्हा ड.—लो. सं. (१९११) ११९५५३. भाज्या, फळें व इतर थोड्या जागेंत पुष्कळ उत्पन्न होणाऱ्या वस्तू पिकविण्याचा धंदा करणारी ही जात आहे. सागर, दमोह, जबलपूर व नरसिंगपूर जिल्ह्यांत ही आढळते. कोणी हा शब्द कछार ( पुळणवट किंवा मळीची जमीन ) शब्दापासून काढतात. कोणी काछानी ( अफूच्या बोंडावरील रस गोळा करणें ) शब्दापासून काढितात. नामसादृश्यामुळें ह्यांपैकीं कांहीं लोक स्वतःला कच्छवाह रजपूतांचे वंशज म्हणवितात पण त्यास कांहीं आधार नाहीं.

यांच्यांतील उपजाती निरनिराळ्या पदार्थांच्या लागवडीवरून झाल्या असाव्या असें यांच्या नांवावरून दिसतें. जसें:– हरदिया काछी, आलिया काछी, फूलिया काछी, जीरिया काछी, मुरई काछी, हीं नांवें हळद, आलें, फुलें, जिरें व मुळे यांच्या लागवडीनें मिळालीं असावीं.

यांच्या सामाजिक चालीरीती कुर्मी लोकांसारख्याच आहेत. एकाच आईबापापासून झालेले तीन पिढ्यांपर्यंत विवाह संबंध करीत नाहींत. दमोह जिल्ह्यांत वरात आली म्हणजे मुलीला फक्त एक फडकें नेसवून हातांत एक द्रोण देऊन उघडी उभी करतात. मुलींचीं लग्नें १० वर्षांच्या आंतच होतात. एकाच वेळीं दोन वहिणींबरोबर लग्नें करतां येतात. मुलीच्या आईबापास लग्नाचा खर्च सोसण्याचें सामर्थ्य नसलें तर जातभाई वर्गणी करतात. वर लग्नांत एक धोतर नेसतो व लांब अंगरखा घालतो. याला हळदीचा रंग देतात. व वधू लाल रंगाचें वस्त्र नेसतें. वधूचा बाप तिला गाय, रत्नें किंवा निदान २ रुपये तरी देतो. वराचा बाप लग्नाचा सर्व खर्च सोसतो, फक्त मेजवानी देत नाहीं. वराकडून वधूला ३ उत्तरीयें किंवा फरिया व तीन परकर किंवा लहंगे दिले जातात. हल्लीं विवाहित बायका परकर न नेसतां साडीच नेसतात. लग्नस्तंभाभोंवतीं वधूच्या पाठीवर वरानें हात ठेवून चार प्रदक्षिणा व मग वधूचें तिसरें बोट धरून ३ प्रदक्षिणा घालाव्या लागतात. हा विधि होत असतां घरांतील वडील मंडळी एका खोलींत कोंडून घेऊन रडत बसतात. प्रदक्षिणा झाल्यावर वधूस कोठें तरी लपवून ठेवतात व वरास ती न सांपडली तर एक दागिना तिला द्यावा लागतो. कधीं कधीं तिचा पोषाख तिच्या धाकट्या वहिणीला घालून वरास फसवितात. लग्न झाल्यावर वराचा मुकुट एका टोपलींत ठेवून घराच्या छतास टांगून ठेवतात व भाद्रपद शुद्ध ६ ला वर पुन्हां लग्नांतला पोषाक घालून नदीच्या कांठीं जातो व मुकुट पाण्यांत विसर्जन करतो आणि लग्नांतला झगा उसवून त्याची हळद धुवून त्याचे साधे कपडे करतो.

बाळंत झाल्यावर पहिल्या दिवशीं बाळंतिणीला कांहींच खाण्यास देत नाहींत. दुसऱ्या दिवशीं मुलास गोमूत्र पाजतात व आईस साखरखोबरें देतात, व संध्याकाळीं सर्व उष्ण औषधी आणून त्यांच्या वड्या करून खाऊं घालतात. मुलगा झाला तर ५ व मुलगी झाली तर ४ दिवस अस्पृश्य राहतात. मुलाचें नाळ बाळंतखोलींत गाडून त्यावर सोहेर असेपर्यंत विस्तव जळत ठेवतात. ६ व्या दिवशीं आईला भात खाऊं घालतात. १२ व्या दिवशीं न्हावीण मुलाचीं नखें कापिते. मुलें चार पांच वर्षांचीं झालीं म्हणजे त्यांचे कान टोंचतात मुलीचें नाक टोंचीत नाहींत. रजस्वला असतांना मुलींनां एका खोलींत कोंडतात व मासे आणि मांस खाऊं देत नाहींत. नंतर डोक्यांत माती घालून न्हाऊन व कपडे धुवून यावें लागतें. यांचा मुख्य देव महिपासुर आहे. होळींत त्याची पूजा करतात. हे सर्व प्रकारचा भाजीपाला पिकवितात व फार कष्टाळू असतात.

मुं ब ई इ ला खा.—लो. सं. ( १९११ ) १२७५७. गुजराथेंतील सर्व जिल्ह्यांत व संस्थानांत हे लोक आहेत. हे मूळचे कुणबी व कोळी असून त्यांनीं बागाईत करावयाला सुरुवात करून तें माळ्याचा धंदा करूं लागले असें म्हणतात. यांमध्यें ९ पोटजाती असून उत्तरगुजराथ व सिंधप्रांत यांत ( १ ) अजवालिया, ( २ ) अंधारिया व ( ३ ) कंभाटिया या तीन पोटजातींतील लोक आहेत. ( १ ) अहमदावादी, ( २ ) खामर, ( ३ ) खत्री, ( ४ ) कोळी, ( ५ ) माळी व ( ६ ) संगारिया या सहा पोटजातींतील लोक फक्त दक्षिणगुजराथेंत आहेत. पहिल्या तीन पोटजातींमध्यें अंधारिया लोक सर्वांत कनिष्ठ दर्जाचे आहेत.

दुसऱ्या सहा पोटजातींमध्यें अहमदावादी लोकांचा दर्जा सर्वांत श्रेष्ठ असून इतर भागांतील लोक फक्त त्यांच्याच हातचें खातात. इतर पोटभागांमध्यें रोटीव्यवहार नाहीं. कचिया लोकांमध्यें कुळें नाहींत. इतर गुजराथी जातीप्रमाणें कचिया लोकांचे गोल ठरलेले असून गोलाच्या बाहेर लग्न करण्याची मनाई आहे. गोलाच्या बाहेर लग्न केलें असतां दंड होतो. मामे, आते व मावसबहिणींशीं लग्न करतां येत नाहीं. लग्नें बाळपणीं होतात. मुलाच्या बापाला हुंडा म्हणून १२५ कचे किंवा यांहून अधिक रकमेचे दागिने व कपडे मुलीला द्यावे लागतात. पुनर्विवाह व घटस्फोट या चाली यांच्यामध्यें आहेत. विधवेला धाकट्या दिराशींहि लग्न लावितां येतें. अंधारिया व खत्री लोकांखेरीज इतर काचिया हिंदुधर्माचे आहेत. अंधारिया व खत्री लोक इमामशहाचे अनुयायी असून यांच्या संस्कारामध्यें हिंदु व मुसुलमान संस्कारांचें मिश्रण आहे. काचिया लोकांचे उपाध्याय ब्राह्मण आहेत.

भडोच जिल्ह्यांत जंबूसर येथें १२ सभासदांची एक मध्यवर्ती पंचायत असून तिचा अधिकार जंबूसर तालुक्याभर आहे. पंचायतीच्या सभेची निमंत्रणें देण्याचें काम गोर जातीच्या उपाध्यायाकडे असतें. इतर तालुक्यांमध्यें अशाच पंचायती आहेत अपराधाबद्दल दंड होतो व तो न दिल्यास जातीबाहेर टाकिलें जातें.

अहमदाबाद शहरांत काचिया लोकांची एक पंचायत असून तींत ४ सभासद आहेत. दंडाचें व प्रत्येक कुटुंबामागें असलेल्या (रु. १-१-९) कराचें उत्पन्न जातीच्या उपाध्यायाजवळ ठेविलें जातें व तें जातीच्या कामानिमित्त किंवा धर्माकडे खर्चिलें जातें.

खेडा जिल्ह्यांतील बोरसाद तालुक्यांत २२ खेड्यांचा एक असे वर्ग (एकाडा) पाडलेले असून त्या एकाड्यांची एक ४८ सभासदांची पंचायत आहे. याखेरीज प्रत्येक खेड्याची पंचायत असते. खेडेंपंचायतीच्या निकालावर एकाडा पंचायतीकडे अपील करतां येतें व सभा भरविण्याचा खर्च फिर्यादीला द्यावा लागतो. फिर्यादीनें खटला जिंकल्यास दुसऱ्या पक्षाला हा खर्च भरून द्यावा लागतो. खेडेंपंचायतीला ५०१ रुपये दंड करण्याचा अधिकार आहे व एकाडा पंचायतीला १५५१ रु. दंड करण्याचा अधिकार आहे. [ कूक; रिस्ले व हिरालाल; एंथ्रोव्हेन सेन्सस रिपोर्ट १९११ ( मुंबई ); ए. रि. ए. ( काच्छी ) वगैरे. ].

**कांचुलिया**—हिंदु शाक्तांची एक जात. कांचुलिया हें नांव संस्कृत शब्द कंचुली ( म्ह. कांचोळी ) यापासून बनलें आहे. हे लोक दक्षिण हिंदुस्थानांत आढळतात. तेथें त्यांनां कांचुलिया ( कंचुलीपासून तामिळी अपभ्रष्ट शब्द कंजुली ) म्हणतात. मुंबईंत सुद्धां हे लोक आढळतात. शाक्त पंथांतील अभिचारतत्वें हे पाळतात. यांचा मुख्य समारंभ जो 'घटकंचुली (की)' त्यांत स्त्रीपुरुषांमध्यें सरसहा कांहीं भेदाभेद न ठेवतां अंगसंग होतो. त्या समारंभांत भाग घेणारे जितके पुरुष तितक्याच स्त्रिया असतात. ज्या ठिकाणीं हा समारंभ होतो त्या जागेवर मध्यभागीं एक घट ठेवण्यांत येऊन प्रत्येक स्त्री अंगांतील चोळी काढून ती त्यांत टाकते. मांसाशन आणि मद्यप्राशन आटोपल्यावर प्रत्येक पुरुष घटांतील कोणती तरी चोळी सहजगत्या उचलतो व ती ज्या स्त्रीची असेल, मग ती त्याची जवळची नातेवाईक कां असेना, तिच्याबरोबर सर्व रात्र रममाण होतो. [ मद्रास मॅन्युअल ऑफ अॅडमिनिस्ट्रेशन; डुबाइस–हिंदु मॅनर्स, कस्टम्स अँड सेरिमनीज; विल्सन–रिलिजिअस सेक्ट्स ऑफ दि हिंदूज ].

**कांचोळा**—राजपुताना. उदेपूर संस्थानच्या इशान्येस असलेली ही एक जमिनदारी असून शहापूरचे राजाधिराज यांच्याकडे आहे. महाराण्यास २४०० रुपये खंडणी द्यावी लागते. याशिवाय राजाधिराजानें कांहीं सेवा करावी असें ठरलें आहे. महाराण्याची सेवा कोणत्या रीतीनें करावयाची याबद्दल बरींच वर्षें वाद चालला होता. त्यांत राजाधिराजानें आपलें सर्व सैन्य तीन महिने दरवर्षी उदेपूर येथें पाठवावें व एक वर्षाआड दसऱ्याच्या सणास उदेपूर येथें हजर रहावें असा निकाल लागला. यांत एकंदर ९० खेडीं असून लोकसंख्या ( १९११ ) १२५१५ आहे. कांचोळा हें मुख्य ठिकाण असून तें उदेपुरच्या ईशान्येस सुमारें १०० मैलांवर आहे. उत्तर अक्षांश २५° २४' व पू. रे. ८९° ५३'.

**काजवा**—हा काळसर रंगाचा सुप्रसिद्ध किडा लांबीला अर्ध्या इंचाहून फारसा मोठा नसतो. मादीला पंख नसतात, एरवीं ती नर–काजव्याप्रमाणेंच दिसते. चमकण्याचा गुण मादींत नरापेक्षां जास्त असतो. म्हणून काजवा हें नांव बहुधा मादीलाच योजण्यांत येतें. ओटीपोटाखालीं टोंकाशीं काजव्याचा प्रकाश दिसतो व तो त्याला इच्छेप्रमाणें कमीजास्त करतां येतो असें म्हणतात. नरांतील प्रकाश दोन लहान बिंदूंपासून येत असतो. हवेशिवाय व निरनिराळ्या वायूंतहि काजवा बराच काळ जगतो असें लॅट्रीले या शास्त्रज्ञानें प्रयोगांवरुन सिद्ध केलें आहे. काजव्याचा प्रकाशणारा भाग जर काढून घेतला तर तो भाग बराच वेळ प्रकाश देईल. मादी ही सुस्त व मंदगति असते तिचा प्रकाश नराला आकर्षक व तिच्या स्थानाचा माग लावून देण्याकरितां असतो असें कांहीं शास्त्रज्ञ समजतात.

**कांजिण्या**—हा एक बहुतकरून मुलांनां येणारा असा ज्वर आहे व याचें मुख्य लक्षण म्हणजे अंगावर येणाऱ्या पुळ्या. दोन ते सहा या वयाच्या मुलांनां हा ताप बहुतकरून येतो. पण यापेक्षां लहान अथवा मोठ्या माणसांनां अगदीं येतच नाहीं असें मात्र नाहीं. याची गर्भावस्था दहा ते पंधरा दिवसपर्यंत असते. नंतर एक दिवसभर साधारण मध्यम ज्वर येतो. त्याच्या अगोदर कांहीं तापाचीं पूर्वचिन्हें झालेली नसतात. त्यानंतर छाती, पोट, पाठ या ठिकाणीं कित्येक लाल पुळ्या उमटलेल्या दृष्टीस पडतात. बारा ते चोवीस तासांमध्यें त्या चांगल्या फुगून त्यांत पाण्यासारखी लस जमते, व पुढील ३६ तासांमध्यें या पुळ्या गढूळ रंगाच्या दिसतात. चवथ्या दिवसानंतर हे फोड सुके व्हावयास लागून वर खपली धरते व पुढें ती पडून जाऊन त्याचा कांहीं वण रहात नाहीं. प्रथम ज्या पुळ्या येतात त्यानंतर मागाहूनहि पुळ्या येतच असतात. म्हणजे तापाच्या आरंभापासून ५।६ दिवसांनीं कांहीं पुळ्याच्या खपल्या पडून गेलेल्या असतात तर कांहींच्या पडावयाच्या असतात व कित्येक तर नव्या येत असतात. सर्वांत छातीवरच्या पुळ्या स्पष्ट असतात. शिवाय हातापायांवर व तोंडावरहि पुळ्या येतात. गालफडाच्या आंत व टाळ्यांसहि फोड येतात. पुळ्या दिसूं लागल्यानंतर बहुतेक किंवा सर्व ज्वर नाहींसा होतो. तापाचें मान १०२° च्या वर बहुधा जात नाहीं. बहुतेक रोगी सौम्य प्रकारचेच असतात व या तापांत आगंतुक दोष व दुष्परिणाम सहसा उद्भवत

नाहींत. एकदां ताप येऊन गेल्यावर पुनः हा ताप येत नाहीं असें कांहीं विद्वान डाक्टरांचें मत आहे. पण हा पुनः पुनः दोन तीन वेळां झाल्याचीं उदाहरणेंहि आहेत.

उपचारः—खाण्यापिण्यास हलके पदार्थ द्यावेत. सौम्य रेचक द्यावें. रोग्यास पुळ्या खाजवूं देऊं नये. कारण त्या मग चिडून वाढूं लागतात व मागाहून वण रहाण्याचा संभव बराच असतो. पहिल्या दोन तीन दिवसांनंतर रोग्यानें अंथरुणांतच पडून राहिलें पाहिजे असें नाहीं. या तापाचें व पुळ्यांचें देवीच्या पुळ्यांशीं बरेंच साद्दश्य असतें म्हणून हे दोन्ही ताप ओळखणें कधीं कधीं अवघड असतें. त्या दोहोंमधील भेद येणेंप्रमाणें आहेत. ( १ ) कांजिण्याचे फोड बहुतेक छाती, पोट पाठ, येथें असतात; हातापायावर थोडे असतात. ( २ ) या तापांतील कांहीं पुळ्या किंवा बऱ्याच पुळ्या दीर्घवर्तुळाकार असतात परंतु देवीच्या पुळ्या उगवल्यावर अर्धचंद्राकृती आकाराच्या असतात. ( ३ ) या तापांतील पुळ्या त्वचेत वरच्या वरच उगवलेल्या असतात पण देवीच्या हातास शिशाच्या गोळीसारख्या टणक लागून त्वचेखालीं रुतलेल्या हातास लागतात. ( ४ ) यांची पूर्णावस्था १२ ते २४ तासांत पूर्ण होते. असें देवीच्या पुळ्यांचें होत नाहीं. ( ५ ) देवांच्या तापांत पूर्वचिन्हें होतात तशीं या तापांत होत नाहींत. ( ६ ) देवीच्या पुळ्यांस खळगा पडतो व नंतर ती पुळी अगदीं बारीकशा ज्वालामुखी-सारखी दिसते; पण कांजिण्याची पुळी फुटून तिला तसा खळगा पडत नाहीं. फारतर त्यांचा पृष्ठभाग कधीं कधीं काळा पडतो, एवढेंच.

**कांजीवरस्,** ता लु का:—हा मद्रास इलाख्याच्या चिंगलपट जिल्ह्यांतील पश्चिमेकडील एक तालुका असून याचें क्षेत्रफळ ४१२ चौरस मैल आहे. १९२१ सालीं याची लोकसंख्या २४०३९९ होती. या तालुक्यांत कांजीवरम व श्रीपेरुंबुदुर हीं दोन शहरें व ३६४ खेडीं आहेत. यांपैकीं पेरंबाकम नांवाचें खेडें इतिहासप्रसिद्ध आहे. येथील साऱ्याचें उत्पन्न सुमारें ५ लाख रुपये आहे. या तालुक्यांतील जमीन हलक्या दर्जाची आहे. एकंदर प्रदेश सपाट असून तो पालर नदीच्या उत्तरेस व पश्चिमेस उंच होत जातो. पालर नदीच्या तीरावर चिंच, नारळ व खजूर यांचीं झाडें आहेत. या तालुक्यांत पालर व कोर्तलईयार या नद्यांचे कालवे आहेत.

श ह र.—कांजीवरम तालुक्यांतील शहर. लो. सं. ( १९२१ ) ६१३७६. साऊथ इंडियन रेल्वेच्या चिंगलपट आर्कोनम फांट्यावर हें शहर आहे. मोक्षदायक सात पुऱ्यांपैकीं एक. पूर्वीचें नांव कांची, कांचीपुरम् असून हल्लींचें कांजीवरम आहे. हें मद्रास इलाख्यांत चिंगलपट जिल्ह्यांत आहे. पूर्वी ही पल्लवांची राजधानी होती. द्रविड देशाचें हें कांहीं दिवस मुख्य ठिकाण होतें. या प्रांताचा घेर५००कोसांचा होता असें ह्युएनत्संग म्हणतो. त्यानें या-या पूर्वपश्चिमेस इतर देश सांगितले नसल्यानें त्यावेळीं हा प्रदेश दोन्ही कांठच्या समुद्रापर्यंत पसरलेला असावा. उत्तरेस पलिकत सरोवर व पश्चिमेस कावेरीपर्यंत अशी ही सीमा असावी. भारतांत द्रविड देशाचा उल्लेख आहे. वराहमिहिरानें व भागवतानें (स्कंद पुराणानें व बृहत्संहितेनें) कांचीचा उल्लेख केला आहे. समुद्रगुप्तानें कांचीच्या पल्लवांवर स्वारी करून तेथील राजा विष्णुगोप याला मांडलिक बनविलें होतें. पल्लव व चालुक्य यांचीं नेहमीं भांडणें होत व त्यांत कांची हें शहरहि दोघांच्या ताब्यांत वेळप्रसंगीं जाई. विक्रमादित्य चालुक्यानें वीर राजेंद्र चोलाच्या तव्यांतील हें काबीज केल्याचें बिल्हण लिहितो. ह्युएननें पल्लव राजाचें नांव किंवा खास पल्लव हें नांवहि दिलें नाहीं. तो त्या राज्याला द्रविड राज्य असेंच म्हणे. तो म्हणतो येथें १०० संघाराम व दहा हजार भिक्षु आहेत. ते महायान पंथी आहेत. येथील जमीन सुपीक असून, लोक सद्गुणी, धाडशी; विश्वासु, पाहुणचारी व विद्वान् असे आहेत. ह्यांची लिपी व भाषा ह्या उत्तरेकडील लिपी व भाषेपेक्षां निराळ्या आहेत. या शहराच्या मांडणीचें कौतुक प्रो. गेड्डीज यानें फार केलें आहे. तो म्हणतो कीं येथें मोठमोठीं देवळें व अप्रतीम कलाकुसरीच्या इतर इमारती आहेतच, पण अतिशय पद्धतशीर व मोठ्या प्रमाणावर दोरीसूत व सर्व सुख-सांईची काळजी घेऊन, जी शहराची आंखीव मांडणी व शोभादायक रचना केली आहे, तशी शहररचना साऱ्या हिंदुस्थानांतच नव्हे तर जगांत कोठेंहि माझ्या दृष्टीस पडली नाहीं ” पल्लव राजांच्या वेळचें दगडावरील कोरीव कामहि पहाण्यासारखें आहे. गणेशरथ, कैलासनाथ मामलपुरम् मुक्तेश्वर कामाक्षी इत्यादींचीं देवळें व इमारती याची साक्ष पटवितात.येथील अनेक देवळें ८ व्या शतकांत राजसिंहाच्या वेळीं बांधलेलीं आहेत.

कांजीवरम् हें यूरोपियनांनीं दिलेलें अपभ्रष्ट नांव आहे. येथील सर्वांत जुनी इमारत इ.स. च्या ७ व्या शतकांतील आहे; परंतु त्याच्याहि पूर्वी ८०० वर्षे हें शहर प्रख्यात होतें. सारांश विद्येसाठीं काशीप्रमाणें हें शहरहि दोन हजार वर्षांपासून प्रसिद्ध आहे. शिल्पशास्त्रज्ञाला हें शहर फार महत्वाचें वाटेल. बौद्ध, हिंदु व द्रवीड या तिन्ही ( भव्य व नाजूक ) शिल्पकला येथें आढळतात. धर्मजिज्ञासूलाहि येथें बरेंच खाद्य मिळेल. आज दोन हजार वर्षांत ज्या कांहीं धार्मिक चळवळी खुद्द दक्षिणेंत निपजल्या अगर दुसरीकडे उत्पन्न झाल्या त्यांचा स्पर्श या गांवाला झालेला असून त्यांचा ठसा अद्यापीहि येथें पहावयास सांपडतो. अद्यापि पुष्कळ शोध व्हावयास पाहिजे. तसा झाल्यास या शहराच्या पोटांतील अनेक प्रकारचा गुप्त इतिहास उजेडांत येईल. पतंजलीच्या भाष्यांत कांचीचा उल्लेख येतो ( ख्रि. पू. ३ रें शतक ) त्यावरून या...हि आर्यांनीं येथें वसाहत केली असावी

असें दिसतें. बुद्ध पूर्वजन्मीं येथें राहिला होता असें ह्युएनत्संग म्हणतो. महावंशांत कांचीपर्यंत अशोकाचे धर्मोपदेशक आल्याचें नमूद केलें आहे. तामील महाकाव्य "मणिमेखलाई" यांत कांचीचा उल्लेख येतो. काव्याचा काल सर्वसाधारण २ रें शतक मानितात. याच सुमारास पल्लवांचें राज्य येथें प्रस्थापित झालें. तत्पूर्वी पूर्वचोलांचें साम्राज्य येथें होतें. चवथ्या शतकांत कांची हीं पल्लवांची राजधानी झाली, ती चारशें वर्षें टिकून राहिली. धर्मपाल नांवाचा प्रख्यात बौद्ध पंडित येथला रहिवासी होता. जैन लोकहि पल्लवांच्या वेळीं येथें बरेच होते.

एलफिन्स्टनच्या मतें येथील प्राचीन देवळांचा नमुना मूळच्या बौद्ध व चैत्य विहारांचा आहे. पुढील प्रख्यात आळवार व इतर तामीळ कवींपैकीं बरेच जण येथील रहिवासी होते. बौद्ध व जैन देवळांप्रमाणेंच शैव व वैष्णव देवळेंहि येथें बरींच आहेत. देवरम् वगैरे बौद्ध काव्यांत त्यांचें वर्णन येतें. आद्य शंकराचार्यांनीं या गांवास भेट दिली होती. त्यांनीं बौद्ध, जैन, शैव, वैष्णव या सर्व पंथांचें बंड मोडून तेथें अद्वैतमतस्थापना केली. याची साक्ष तेथील कामाक्षीच्या देवळांत पटते. नवव्या शतकांत पल्लवांकडून उत्तर चोलांनीं कांची हिसकावून घेतली ती त्यांच्याकडे १४ व्या शतकापर्यंत होती. या काळांत या चोलांनीं अनेक देवळें येथें बांधलीं. पुढें अकराव्या शतकांत तर रामानुजाचार्यांनीं विशिष्टाद्वैत वैष्णव धर्माची पताका येथें प्रामुख्यानें फडकाविली. त्यानें येथेंच आपलें मुख्य ठिकाण केलें होतें. १४ व्या शतकानंतर येथें विजयानगरकरांचा अंमल चालू झाला. तो ३०० वर्षेंपर्यंत (१७ वें शतक) होता. येथें त्यांचा सुभेदार राही. साधारण १६४६ पर्यंत विजयानगरकर व चंद्रगिरीकर यांच्या ताब्यांत हें शहर होतें. त्यानंतर कुत्बशहानें तें घेतलें. इ. स. १६७७त मराठ्यांनीं हें घेतलें. यादवांच्या कारकीर्दींत येथील जुन्या देवळांची दुरुस्ती झाली. कांहीं नवीन देवळेंहि त्यांनीं बांधिलीं. त्यांना मोठमोठीं इनामें तोडून दिलीं. मराठ्यापासून हें गांव पुढें औरंगझेब व त्यानंतर कर्नाटकचा नवाब यांच्या ताब्यांत होतें. म्हैसूर व कर्नाटकच्या लढायांत मोठ्या देवळांचा उपयोग किल्ल्यांसारखा करीत ( १७६८; १७८० ). त्यावेळीं बहुतेक देवळांतील मूर्ती हैदरच्या भीतीमुळें तंजावरास नेल्या होत्या. त्या इ. स. १८०० मध्यें परत आणल्या. हा जिल्हा १७५९ त कर्नाटकच्या नवाबानें ई. इं कंपनीस दिला. तेव्हांपासून आजपर्यंत तो इंग्रजांकडेच आहे. मुसलमानांनीं येथें मोठमोठ्या मशीदीहि बांधल्या आहेत. हल्लीं कांचीचा तीन कोसांचा विस्तार आहे. अद्यापिहि येथें प्राचीन आदिद्रविडांच्या क्रूर देवींची पूजा कांहीं कांहीं ठिकाणीं दृष्टीस पडते.. शिवकांची व विष्णुकांची असे याचे २ भाग आहेत परंतु या भागांत परस्पर भिन्न देवांचीं देवळेंहि आहेत. येथील एकांबरेश्वरा( शंकरा )चें देऊळ साऱ्या हिंदुस्थानांत मोठें आहे. तें पल्लवांच्यावेळीं बांधलेलें व पुढें अनेकवेळां दुरुस्त झालेलें आहे. त्याचा घेर २५ एकर व गोपुर १८८ फूट उंचीचें आहे. शिवकांचींत सात वारांचीं सात मोठीं व पवित्र तळीं आहेत. विष्णुकांचीतील सर्वांत मोठें देऊळ वरदराजा( विष्णु )चें आहे. यांत चोल व यादव घराण्यांचे अनेक शिलालेख आहेत. यांतच रामानुजाचार्य रहात असत व हल्लीं त्यांचा मठहि येथेंच आहे. याची लांबी१२०० व रुंदी ८०० फूट आहे. याचा १०० खांबी सभामंडप म्हणजे विजयनगरकालीन कलाकौशल्याचा एक उत्कृष्ट नमुना आहे. हैदरनें हें देऊळ लुटलें होतें. या देवाची वैशाखांत १२ दिवस यात्रा भरते, व शेवटीं रथोत्सव होतो. रामानुजाचार्यांच्या पंथांतच पुढें तेनकलई व वडकलई असे दोन पोटभेद झाले व हल्लीं त्यांच्यांत वेळप्रसंगीं तंटेहि होतात. या गांवीं सर्व हिंदुस्थानांतील लोक यात्रेसाठीं नेहमीं येतात. अद्यापिहि विद्येबद्दल हें स्थळ प्रसिद्ध आहे. विशिष्टाद्वैत मताची एक मोठी पाठशाळा येथें असून, इतर संस्कृत पाठशाळा व इंग्रजी हायस्कुलेंहि आहेत. येथें १८६६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें सुती व रेशमी कापड चांगलें तयार होतें. दागिने, व तांबेपितळेचीं भांडीं तयार करण्यांत येथील कारागीर प्रसिद्ध आहेत.

[सिवेल—लिस्ट-ॲंटि.; फर्गो-एम्पा; साऊ. इंडि इन्स्कि.; एपि. इंडि. १९०५-६; बील-बुधिस्ट रेक-वेस्ट. वर्ल्ड; कोल-म्यान. चिंग. डिस्ट्रि; कनकसभे—तामी. एटी. हंड्रे. ॲगो; फर्ग्युसन—हिस्ट इंडि. ईस्ट. आर्कि; वेंकय्या—पल्लव; रे —पल्लव आर्कि; सुब्र. अय्यर—एन्श. हिस्ट. कांजी; ओरि. बुधि. जैनि. सद. इंडि; न्हीस डेव्हिड्स—बुधि. इंडि; कृष्ण. अय्यंगार—एन्श. इंडि; गोविंदाचार्य—रामानुजाचार्य; कृष्णस्वा. अय्यर—शंकराचार्य; राजगोपाळाचार्य—वैष्ण. रिफा. इंडि; स्मिथ—एन्शंट इंडिया ].

**काजू**—या झाडाला लॅटिनमध्यें अनाकार्डिअम ऑक्सिडेंटेल, इंग्रजींत कॅश्चुनट, वगैरे नांवें आहेत. काजूचीं झाडें मूळचीं दक्षिण अमेरिकेंतील आहेत; परंतु अलीकडे हिंदुस्थानच्या किनाऱ्याच्या जंगलांतून व चितगांव, तेनासरिम, अंदमानबेटें या भागांत तसेंच रत्नागिरी, सांवतवाडा, गोंवा, कर्नाटक या भागांत हीं झाडें बरींच आढळतात. काजूस वर्षांतून एक वेळ फळें येतात. याच्या दोन जाती आहेत, पांढरी व तांबडी. फळापुढें जी बी येते तीस काजूची बी म्हणतात. ती खाण्यास फार रुचकर असतो.

या झाडापासून डिंक, तेल, औषध, इमारतीलांकूड व खाण्याचे पदार्थ तयार होतात. सालींपासून शंकाकृति पिंवळा किंवा तांबूस रंगाचा डिंक निघतो. त्याचा वास किड्यांनां आवडत नाहीं. झाडाच्या खांचेतून निघणाऱ्या रसाचा कपड्यांवर नांवें घालण्याच्या शाईसारखा उपयोग करतात. ही शाई कधींहि पुसली जात नाहीं. साल व बीच्या कवचीपासून निघणारें तेल व काजळ कधीं कधीं मासे पकडण्याच्या जाळ्याला रांपविण्याकरितां लावितात. या झाडाच्या

पासून दोन प्रकारचें तेल निघतें. १बियांपासून फिकट पिंवळ्या रंगाचें निघणारें तेल; हें बदामाच्या तेलाइतकेंच पौष्टिक व उत्तम असतें. (२) बीच्या कवचीपासून निघणाऱ्या तेलाला 'कारडोल' म्हणतात. हें तेल साधारण तुरट व तीव्र असून खोदीव लांकूड व पुस्तकें यांचा वाळवीपासून बचाव करण्याकरितां वापरतात. त्वचेवर लाली आणणाऱ्या औषधासारखा त्याचा उपयोग करतात. फळाच्या रसावर दोनदां ऊर्ध्वपातन क्रिया करून जो अर्क निघतो तो एका ग्यालनला १ $\frac{१}{२}$ रुपयाप्रमाणें विकला जातो. हा चांगला उत्तेजक असून खास फळ हें रक्तपित्तीवर औषध आहे. काजूच्या बिया भाजून खातात. व त्यांत साखर मिसळून त्याची मिठाई करतात. यापासून होणाऱ्या इमारती लांकडाचें एका घनफुटाचें वजन १५ ते १९ शेर असून त्याचा बोटी, वारदानें व लाकडी कोळसा तयार करण्यांत उपयोग करतात. काजूच्या बिया गोव्याहून मुंबईला फार येतात.

**कॉटन सर हेन्री**—एक अँग्लोइंडियन अधिकारी. याचा आजा व बाप ईस्ट इंडिया कंपनीचे डायरेक्टर होते. हेन्रीचा जन्म तंजावर जिल्ह्यांतील कुंभकोनम् गांवीं झाला (१८४५). शिक्षण लंडन येथें झाल्यावर १८६७ सालीं तो बंगाल सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरला. पुढें वाढतां वाढतां १८९१ मध्यें बंगालसरकारचा मुख्य चिटणीस व १८९६ त हिंदुस्थानसरकारचा गृहमंत्री झाला. त्याच सालांत कॉटनला आसामचा चीफ कमीशनर नेमण्यांत आलें. या जागेवर सहा वर्षें काम करून तो नोकरींतून मोकळा झाला. त्या वेळेपासून सर हेन्री (१९०२ सालीं के. सी. एस. आय. ही पदवी मिळाली) हिंदी राष्ट्राच्या स्वराज्यविषयक आकांक्षा तृप्त करून देण्याच्या कामीं खटपट करूं लागला. १९०४ सालीं मुंबई येथें भरलेल्या २० व्या राष्ट्रीय सभेचा तो अध्यक्ष होता. लॉर्ड रिपननें केलेल्या सुधारणांचा त्यानें पुरस्कार केला व तो कर्झनला दोष देत असे. १९०६ मध्यें तो लिबरल सभासद म्हणून पार्लमेंटांत निवडून आला. त्यावेळचे हिंदुस्थानचे सेक्रेटरी लॉर्ड मोर्ले यांनां बंगालची फाळणी रद्द करण्याविषयीं व हिंदी लोकांच्या दोषांकडे सहानुभूतिपूर्वक पहाण्याविषयीं कॉटन सांगत असे. मोर्ले-मिंटोच्या कारकीर्दींत जी दडपशाही सरकारनें चालविली होती तीविरुद्ध कॉटन सेक्रेटरीच्या कानींकपाळीं ओरडत असे. १९०९ सालीं पुन्हां जेव्हां पार्लमेंटची निवडणूक झाली तेव्हां कॉटन निवडून आला नाहीं. तरी शेवटपर्यंत हिंदुस्थानाकडे त्याचें लक्ष असे. त्याचें 'न्यू इंडिया' नांवाचें पुस्तक बरेंच लोकप्रिय होऊन त्याच्या बऱ्याच आवृत्ती निघाल्या. 'होम अँड इंडियन मेमरीज' (१९११) हा ग्रंथहि कॉटनच्या वेळचें हिंदुस्थान कसें होतें याची साक्ष देतो. कॉटनचा भाऊ जोसेफ जॉन कॉटन यानें 'रूलर्स ऑफ इंडिया' ग्रंथमालेंतील एलफिन्स्टनचें चरित्र लिहिलें आहे व इंपिरियल गॅझेटियरचा (१९०८ मधील आवृत्तीचा) तो मुख्य संपादक होता. जी. ए. नटेसनकंपनीच्या 'फ्रेंन्डस ऑफ इंडिया' ग्रंथमालेंत कॉटनचें चरित्र प्रसिद्ध झालें आहे.

**काटमांडू** (काष्ठमंडप).—नेपाळची राजधानी उ. अ. २७° ४२' व पू. रे. ८५° ३६'. हें शहर विष्णुमती नदीच्या पूर्व किनाऱ्यावर तिच्याशीं होणाऱ्या वाग (वाक्) मतीच्या संगमाजवळ वसलें असून बेंगाल अँड नार्थ-वेस्टर्न रेल्वेवरील रक्षनल स्टेशनापासून ७२ मैल दूर आहे. स्टेशनावर काटमांडूला जाण्याकरितां टांगे मिळतात. हें नेपाळमधील सर्वांत मोठें शहर आहे. येथील लोकसंख्या सुमारें ८०००० आहे. येथील बहुतेक रहिवासी नेवार आहेत व त्यांपैकीं दोन तृतीयांश बुद्धधर्मी आहेत.

शहरांत जी थोडी मुसुलमान वस्ती आहे ती एका भागांत स्वतंत्र रहाते. या मोहोल्याच्या बाहेर त्यांनां ताबुताची किंवा कसलीहि मिरवणूक काढतां येत नाहीं. हें शहर इ. स. ७२३ मध्यें राजा गुणकामदेव यानें बसविलें असें म्हणतात.

मंजुश्री नांवाच्या बुद्धधर्मी साधूच्या नांवावरून या शहरास प्राचीनकाळीं मंजुपाटण असें म्हणत असत. मिंदेशी, कांतीपूर, काठमांडू किंवा काटमांडू अशीं दुसरीं नांवें आहेत. ज्या ठिकाणीं हें शहर वसलें आहे त्या ठिकाणीं पूर्वीं एक मोठें तळें होतें व मंजुश्री साधू यानें तरवारीनें एक धरण खणलें व पाण्यास जाण्यास वाव दिली अशी दंतकथा आहे.

या शहराचा आकार वांकडा तिकडा आहे. हिंदू लोक म्हणतात कीं, देवीच्या खड्गासारखा आहे, व बुद्धलोक म्हणतात कीं तो मंजूश्रीच्या तरवारीसारखा आहे.

शहराच्या मध्यभागीं असलेल्या 'काटमांडू'-(हिंदी काट = लांकूड व मांडुआ = इमारत). लांकडी इमारत-नांवाच्या राजवाड्यावरून शहराला हें नांव पडलें असें सांगतात. हा राजवाडा राजा लछमनसिंग मल यानें भिक्षूंच्या उतरण्याच्या सोयीकरितां १५९६ सालीं बांधला. १७६९ च्या गुरख्यांच्या स्वारीपूर्वीं काटमांडू ही नेवार राजांची राजधानी होती.

शहरांत बरींच देवळें आहेत. पैकीं मोठीं म्हणजे तलेजू किंवा तल्लिजू (तुळजा भवानी) देवीचें होय. ही देवी व गोरखनाथ साधु राजघराण्याच्या रक्षक देवता होत. पुष्कळ देवळांतील मूर्तिशिल्प अश्लील आहे. दुष्ट देवता व भुतें यांपासून असलीं चित्रें रक्षण करतात असा समज दिसतो. बौद्धांचींही पुष्कळ देवळें आहेत. महाकालासारखीं देवळें हिंदू व बौद्ध या दोघांनांहि पूज्य वाटतात. पुराणवस्तुसंशोधनास या ठिकाणीं बराच वाव आहे; पण स्थानिक सरकार या कामीं फारशी मदत करीत नाहीं, तर उलट अडथळाच करतें. शहरांतील कांहीं रस्ते गाड्यांच्या रहदारीस अगदींच अरुंद असून फारच अस्वच्छ आहेत. रस्त्यांच्या बाजूच्या इमारती ३-४ मजली असून माणसांनीं गजबजलेल्या आहेत.

बहुतेक रस्ते " टोल " नांवाच्या चतुष्कोणाकृति फरसबंदी केलेल्या उघड्या जागांकडे जाणारे आहेत. येथें किरकोळ वस्तूंचे बाजार भरतात.

येथील सर्वांत मोठी व महत्वाची इमारत म्हणजे ' दरबार " अथवा " राजवाडा " होय. या राजवाड्याच्या वायव्येस " कोट " नांवाची एक इमारत आहे. १८४६ साली सर जंग बहादुर यानें याच इमारतींत देशांतील बहुतेक पुढाऱ्यांची कत्तल करून राज्य बळकावलें. ' दरबार ' अथवा ' राजवाडा ' याचा उपयोग कचेऱ्या भरविण्याकडे होतो. कारण राजा प्रधान व इतर सरदार वगैरे गांवाबाहेर पाश्चात्यांच्या पद्धतीस अनुसरून बंगले बांधून रहातात.

काटमांडू जरी आंतून गचाळ असलें तरी एकंदरींत प्रेक्षणीय आहे. याचें कारण असें आहे कीं येथील बांधकाम चीन देशांतील कामाच्या धर्तीवर आहे. येथील देवळें बुद्धांच्या देवळांसारखीं कित्येक मजले उंच व कोरीव काम, चित्रें वगैरेंनीं भूषविलेलीं आहेत.

१८९२ साली येथें पाण्याचा पुरवठा करण्यांत आला व अलीकडे ड्रेनेजचें कामहि सुरू झालें आहे. पुरुषांचें व बायकांचें, वीर इस्पितळ आणि चंद्र इस्पितळ अशीं तीन इस्पितळें शहरांत आहेत. दरबार, हायस्कूल, ट्रेनिंग स्कूल व कांहीं प्राथमिक शाळा असून एक वैद्यकशाळा आहे. एक मोफत वाचनालयहि आहे.

शहराच्या उत्तरेस सुमारें २ मैलांवर पशुपतिनाथाचें मंदिर आहे. हें मंदीर तीन मजली उंच असून सोन्याच्या पत्र्यानें मढविलेले पांच उंच कळस त्यावर आहेत. दरवर्षी माघशिवरात्रीस मोठी यात्रा जमते.

येथें ब्रिटिश सरकारचा एक रेसिडेंट ( प्रतिनिधी ) आहे. गांवाबाहेर एक मैलावर रेसिडेन्सी बांधली आहे.

रेसिडेन्सीच्या आवारांत रेसिडेंटच्या देखरेखीखालीं एक ब्रिटिश पोस्टऑफीस आहे.

[ राईट—हिस्टरी ऑफ नेपाळ. ओल्डफील्ड—स्केचेस फ्रॉम नेपाळ. ओलीफंट—ए जर्नी टु काटमांडू. ब्राऊन—पिक्चरस नेपाळ. सिल्व्हन लेव्ही—ला नेपाळ. ].

**काटवा** पोटविभाग—बंगाल प्रांतांत वरद्वान जिल्ह्याच्या ईशान्येस एक पोटविभाग. क्षेत्रफळ ४४१ चौरस मैल. जमीन सपाट आहे व पूर्वेस भागीरथीच्या किनाऱ्यावरील जमीन दलदलीची आहे. लोकसंख्या (१९११) २६१४६३ असून दर चौरस मैलास ६१६ इतकें प्रमाण पडतें. या पोटविभागांत काटवा व दैनहाट हीं दोन गांवें व ३७१ खेडीं आहेत. आम्रादोप व दादिया येथें दरवर्षी मोठया जत्रा भरतात. टसर नावाचें रेशिम काढणें हा येथील महत्वाचा धंदा आहे.

गां व.—बंगाल प्रांतांत वरद्वान जिल्ह्यांतील याच नांवाच्या पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें गांव भागीरथी आणि अजय या नद्यांच्या संगमावर वसलेलें आहे. लोकसंख्या (१९११) ६९०४. मुरादाबाद येथें पूर्वी बंगालची राजधानी असतांना काटवा गांव मुरादाबादेचें नाक समजलें जात असे. येथें एक किल्ला आहे. येथेंच आलिवर्दीखानानें मराठ्यांचा पराभव केला. येथें चैतन्य महाराजानीं संसाराचा त्याग करून तपस्व्याचें व्रत धारण केलें म्हणून वैष्णव लोक या स्थानास पवित्र मानतात. पूर्वी येथें आगबोटी जात येत असत; परंतु भागीरथीमध्यें गाळ बसून नदी उथळ झाल्यामुळें आतां आगबोटी चालत नाहींत. ईस्ट इंडिया रेल्वे निघाल्यापासून येथील व्यापार फारच मंदावला आहे. हुगळीपासून येथपर्यंत एक रेल्वेचा फांटा तयार करण्याचें ठरलें आहे.

१८६९ सालीं येथें म्युनिसीपालिटी स्थापन झाली. येथें एक लहानसा तुरुंगहि आहे.

**काटोडिया**—काठेवाड संस्थानांतील एक पोटसंस्थान. गोहिलवाड जिल्ह्यांतील स्वतंत्र खंडणी देणारा हा तालुका सोनगड ठाण्याच्या हद्दींत येतो. येथील जमीन फार सुपीक व आंब्याच्या उपयोगी अशी असल्यानें बऱ्याच आंबराया आहेत. तालुक्यांत एकच गांव आहे व तालुकदार गोहिलवंशीय आहे.

**काटोल** त ह शी ल—मध्यप्रांतांत नागपूर जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तहशील. क्षेत्रफळ. ६१७ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १४२७१३. ही गेल्या (१९०१) खानेसुमारीच्या दुप्पट आहे. या तहशिलींत काटोल, नाडखेड, माहोपो, केळोद व मोवार हीं पांच गांवें फार महत्वाचीं आहेत. या तहशिलींतील वर्धा आणि जाम या नद्यांमधील जमीन फारच सुपीक आहे. येथें कापूस फार पिकतो.

गां व.—याच नांवाच्या तहसिलीचें मुख्य ठिकाण. लो. सं. (१९११) ६२६९ नदीच्या पलीकडची बुधवारा नांवाची वस्ती (पेठ) हल्लीं काटोल गांवांतच धरतात. येथें एका जुनाट किल्ल्याचे अवशेष पहाण्यास सांपडतात. येथें एक फार जुनें देवालय पहाण्यासारखें आहे. महाभारतांत उल्लेखिलेलें कुंतलपूर हेंच असावें अशी समजूत आहे. या गांवास कापसाच्या व्यापारामुळें फार महत्व आलें आहे. येथें ४ सरकी काढण्याचे व ३ सरकी काढल्यानंतर गठ्ठे बांधण्याचे कारखाने आहेत. येथें होणारे संत्रे व आंबेहि बरे असतात. येथें एक मराठी-इंग्रजी शाळा व एक दवाखाना आहे.

**काठी** सं स्था न.—पश्चिमखानदेशांत, तळोदे तालुक्यांत, सातपुड्याच्या माथ्यावरील मेवाससंस्थानांतील एक प्रमुख व सर्वांत मोठें संस्थान. याचें साधारण क्षेत्रफळ १५० कोस असून लोकसंख्या ५-५॥ हजार व वसूल २५ हजारांचा आहे. उत्तरेस छोटा उदेपूर प्रांतातील रेवाकांठा एजन्सी, पूर्वेस अकराणी ( खानदेश ) महाल, दक्षिणेस सिंगपूर, चिखली वगैरे इतर मेवासी संस्थानें व पश्चिमेस राजपिंपळासंस्थान अशी याची चतुःसीमा आहे. या संस्थानांत सर्वत्र सातपुड्याचे तुटलेले कडे, अरुंद खोरीं व अतो-

नात झाडी आहे. सारा प्रदेश असल्या डोंगराळ प्रांतांत आहे. देव नांवाची एकच नदी यांतून वाहत जाऊन नर्मदेस मिळते. एप्रील व मे या दोन महिन्यांत येथील हवा उत्तम असते; बाकी सर्द असते. त्यामुळें हिंवतापाचीं, अपचनाचीं दुखणीं फार होतात. संस्थानांत सागाचें उत्पन्न फार येतें. त्याचप्रमाणें मोहाच्या फुलांचेंहि उत्पन्न मिळतें. मध, मेण हींहि होतात. येथील रहिवासी सर्व भील असून त्यांच्यांत, पावरा मेथवाडी, वारली, पाडवी या पोटजाती आहेत. गुजराथी–मराठी--मिली यांच्या मिश्रणाची अशी यांची भाषा आहे. कांहीं मुसुलमान व्यापारीहि हंगामांत येथें रहातात. पठारावरील जमीन वरी आहे. तींत भात, चारोळी, उडीद, वरी वगैरे धान्यें होतात.

या संस्थानचें मुख्य शहर काठीच होय. त्याला जावयास कुकुरमुंडे ( तळोदेतालुका ) वरून चिंचखिंडींतून एक व धडगांवहून दुसरा असे दोन रस्ते–साधारण गाडीबैल जाण्याजोगे वरे–आहेत. संस्थानांतून तांदूळ, इमारती लांकूड, तूप, वरी, उडीद, हिरडे व चारोळ्या हा माल निर्गत होतो. येथील राजा प्रथम बुधावल संस्थानचा मांडलिक होता. परंतु स. १८४५ मध्यें बुधावलसंस्थान (संस्थानिक निपुत्रिक मेल्यामुळें) इंग्रजांनीं खालसा केल्यावर हा स्वतंत्र संस्थानिक बनला. याचें आडनांव व पोटजात पाडवी आहे. मध्यंतरीं (१८२५।३०) येथील राजानें लुटालूट केली असतां, त्याचें पारिपत्य करण्यांत आलें होतें. त्याला इंग्रजांस वार्षिक थोडीशी खंडणी ( स. १८८० च्या वेळीं रु. १३३ ) द्यावी लागते. हल्लींचा संस्थानिक इंग्रजी व मराठी लिहिण्यावाचण्यास शिकलेला आहे असें म्हणतात [ खा. ग्या. ].

**काठी लोक.**—काठी ही काठेवाडामधील अनेक जातींपैकीं एक मुख्य जात असून तिची लोकसंख्या ( १९११ ) २८५८० आहे. रजपूत टोळ्यांप्रमाणें काठी लोकहि कच्छप्रांतांतूनच काठेवाडांत आले. परंतु त्यांचें मूलस्थान कोणचें हें अद्याप निश्चित झालें नाहीं. यांच्या नांवावरूनच या प्रांताला पूर्वीचें नांव सौराष्ट्र असें असतांहि हल्लीं काठेवाड असें पडलें आहे.

काठी लोक आपला इतिहास अगदीं महाभारत कालापर्यंत नेऊन भिडवितात; व यासंबंधीं खालील गोष्ट सांगतात. "धर्मराज आपल्या भावांसहवर्तमान अज्ञातवासांत गुजराथेंत विराटाच्या आश्रयाला आला तेव्हां दुर्योधन सैन्यासह विराटावर चाल करून आला. परंतु पांडव गुप्त असल्यामुळें त्याला पांडवांनां ओळखून काढतां येईना, तेव्हां त्याचा मंत्री कर्ण यानें त्याला अशी युक्ती सांगितली कीं, विराटाच्या गायी पळवून नेल्यास, त्यांनां सोडविण्याकरितां पांडव प्रकट होतील; परंतु गायी चोरणं हे त्या क्षत्रिय राजपुत्राला न आवडल्यामुळें कर्णानें आपली काठी जमीनीवर आपटून खाट (काष्ट) नांवाचा एक नवीनच पुरुष निर्माण केला व त्याला गायी चोरावयास सांगून चोरीच्या पापापासून त्याला मुक्त करण्याचें अभिवचन दिलें." तेव्हांपासून त्याच्या वंशजांस काठी हें नांव पडलें; व चोरी करणें हा आपला हक्क आहे असें ते समजूं लागले. दुसरी एक दंतकथा अशी आहे कीं, "आयोध्येच्या सूर्यवंशी वृत्रकेतु राजानें माळव्यांत माण्डवगड येथें राज्य स्थापलें. त्यावेळीं या लोकांनां(त्यांच्या जातींसह ) त्यानें आपल्यावरोवर आणिलें. त्याचा मुलगा अजकेतु यानें काठ्यांनां बरोबर घेऊन सौराष्ट्रांत प्रवेश केला." तेथून ते कच्छांत गेले व हल्लींच्या भूजजवळ पावरगड येथें त्यांनीं राज्य स्थापलें. सौराष्ट्रांत कालावड येथेंहि त्यांचें एक राज्य होतें. त्यांचा राजा विशलो होता. त्याच्या कन्येशीं, वालाचमार्डी गांवच्या धांनवाला नांवाच्या जमीनदाराचा पुत्र वेरावळजी यानें लग्न केलें व आपण स्वतः काठी झाला. त्यास सर्व काठी लोकांनीं आपला राजा कबूल केलें. त्याचा पुत्र वालाजी यानें कच्छच्या जामास पारकरवर स्वारी करण्यास मदत केली. परंतु पुढें दोघांत वैमनस्य येऊन वालाजीनें जामास ठार मारिलें. या वालाजीपासून काठ्यांनां वाला हें नांव पडलें. वेरावळचा दुसरा मुलगा खुमानजी ( हा नागांची पूजा करी म्हणून त्याला नागपाल असेंहि म्हणत ) यास दोन पुत्र होते. पैकीं मानसूर याच्या वंशजांस खुमानजीवरून खुमानवंश नांव पडलें. मानसूरचा पुत्र नागसूर यानें सावरकुंडला येथें गादी स्थापिली. वेरावळजीचा तिसरा पुत्र खाचर नांवाचा होता. त्याच्या वंशास खाचर म्हणूं लागले. या खाचरांनीं परमारापासून चोटिला गांव घेऊन तेथें गादी स्थापिली (सं. १६२२). काठी लोक हे हत्ती, नाग, वाघ, वानर व झाडें यांची पूजा करीत. गुजराथेंत वासुकी व धरणीधर (शेष) यांचीं देवळें यांनीं बांधिलीं. फोर्व्सनें रासमालेमध्यें असें लिहिलें आहे कीं "काठी लोक हे सिंधच्या सुम्री राजाचे प्रजाजन असून ते पावरभूमींत रहात होते. पुढें एकदां एका नर्तकीनें नाचतां नाचतां एक गाणें गाऊन राजाचा उपहास केला. तेव्हां राजानें तिला हद्दपार केलें. पण काठी सरदारांनीं तिला बोलावून त्यांनीं राजाच्या निंदेचें गाणें तिच्याकडून म्हणवून घेतलें. ह्यामुळें राजानें काठी लोकांचें आपल्या राज्यांतून उच्चाटन केलें. तेव्हां सोरठमधील ढांक गांवाचा राजा वालो याच्या आश्रयाला ते जाऊन राहिले." त्यांचें मूलस्थान कोणतें हें जरी नक्की समजत नाहीं तरी ते काठेवाडांत पांचशें सहाशें वर्षांपासून आहेत एवढें वरीक खरें. 'ते सिंध आणि कच्छ या प्रांतांमधील ओसाड प्रदेशांत प्रथम वस्ती करून राहिले," असें जरी कर्नल वॅाकरनें म्हटलें आहे तरी तेथें ते पुष्कळ कालपर्यंत राहिले असावेत असें दिसत नाहीं. ते इ. स. १४०० सालच्या दुष्काळांत चारण लोकांच्या टोळीबरोबर काठेवाडांत आले व तेथें गुरें चारणें हा एकच धंदा त्यांनीं चालविला असें दिसतें. त्यांच्यापैकीं कांहीं लोक उमराव पाटकरच्या नेतृत्वाखालीं ढांकला गेले. तेथें त्यावेळीं धन-

वालो नांवाचा रजपुत राजा राज्य करीत होता. तो उमरावची सुंदर मुलगी उमरावाई हिच्या प्रेमपाशांत सांपडला. त्यानें तिला मागणी घालतांच आपल्या पंक्तीला जेवण्याच्या अटीवर उमरावनें तें कबूल केलें. धनवालनें उमरावशीं एक पंगत करून उमरावाईशीं लग्न लाविलें; परंतु त्यामुळें त्याचा त्याच्या भावांनीं त्याग केला; तेव्हां तो काठी लोकांचा पुढारी झाला. त्याला उमरावाईपासून वाल, खुमान व खाचर असे तीन मुलगे झाले. या मुलांच्या वंशजांनां काठी लोकांतील सन्माननीय लोक समजतात. त्यांनां शाखायत असेंहि म्हणतात. इतर काठींच्या वंशजांनां अवर्तिया (इतर काठी). असें म्हणतात. पुढें धनवालोचे काठी लोक कच्छला परत येऊन तेथील राजाशीं भांडले व एका काठी स्त्रीला त्यानें भ्रष्ट केल्यावद्दल त्यांनीं त्याला ठार मारलें असें म्हणतात. पुन्हां भीतीमुळें ते तेथून ढांककडे पळाले, परंतु तेथें धनवालोच्या मागून राज्यावर वसलेल्या राजानें त्यांनां अटकाव केला, त्यावेळीं त्याचा त्यांनीं पराभव केला. पुढें कच्छमध्यें जाणें अशक्य झाल्यामुळें ते ढान आणि चोटीला हे प्रांत बळकावून वसले व ढांक हें आपली मुख्य राजधानी करून त्यांनीं तेथें एक सूर्याचें देवालय वांधिलें. ढांकच्या आसपासच्या कुरणांत ते गुरें चारीत व जवळच्या प्रांतांतून लुटालूट करीत. वालचे मुलगे खुमान, खाचर आणि हर्सुर यांनीं चोटिला, मिथिआली आणि जेतपूर येथें राज्यें स्थापलीं. परंतु आपल्या राज्याचा विस्तार करण्यापेक्षां त्यांनीं पुष्कळ वर्षेंपर्यंत लुटालूटच केली. काठी लोक फारशी शेती करीत नसत. सर्वत्र लुटारूपणा करीत, त्यामुळें लोक त्यांनां फार भीत. काठेवाडांतील पहिल्या १५० वर्षांच्या त्यांच्या अंमलांत त्यांच्या मालकीच्या फारशा जमिनी नव्हत्या. पुढें मुसुलमानांच्या सत्तेला उतरती कळा लागतांच त्यांनां जमीनजुमला मिळविण्याची इच्छा झाली, तेव्हां मात्र काठेवाडांत ते सर्वत्र पसरले व जाडेजांपासून जस्दन व जुनागडच्या आलग राजापासून धानानी हे प्रांत जिंकून घेतले. नंतर ते अमरेळीला जाऊन कुंडल वगैरे ठिकाणीं वस्ती करून राहिले. सर्वेय्यारजपुतांनीं त्यांनां चित्रक दिलें, व इतर रजपूतांनींहि त्यांनां आणखी कांहीं प्रांत दिले.

याप्रमाणें स्थायिक झाल्यावर त्यांनीं आपली हळूहळू सुधारणा केली. त्यांच्यासंबंधीं कर्नल वॉकरनें खालील हकीकत (इ. स. १८०८साली) लिहून ठेवली आहे. तो म्हणतो "काठी लोक क्रूर व लुटारू असून आपल्या या कृत्यांवद्दल त्यांनां पश्चात्ताप होत नाहीं. उलट ते आपल्या लुटारूपणावद्दल फुशारकी मारितात व आपण दरवडेखोर आहों, असें उघड उघड बोलून दाखवितात. त्यांच्या मालकीचा जमीनजुमला फार नाहीं. ते जमीनदारांना तुच्छ मानतात. ते उच्छृंखल असून आपल्याहून बलिष्ठ असतील त्यांच्या प्रांतांत सर्वत्र धुमाकूळ घालून अस्वस्थता माजवितात. मात्र यांच्या अगदीं उलट वालांच्या अंमलाखालील (जेतपूर–चितल प्रांतांतील) काठी लोक आहेत. त्यांनां वॉकरनें सुधारलेले काठी म्हटलें आहे. त्यांनीं चितल घेतल्यानंतर अमरेळीचा एक व्यापारी जुनागडच्या नवावाच्या त्रासामुळें त्यांच्या आश्रयाला येऊन राहिला. त्यानें काठी लोकांना आपली दौलत नवावाच्या हातून मिळवन देण्यास सांगितलें. तसें केल्यास त्यावद्दल त्यांना अर्धी दौलत वक्षीस देण्याचें कवूल केलें. तेव्हां काठी लोकांनीं अमरेळीवर हल्ला करून त्याची दौलत परत मिळविली! मात्र त्या व्यापाऱ्याला ठार मारून ती सगळी दौलत स्वतःच्या घशांत टाकण्याचा त्यांनीं विचार केला. परंतु त्यांच्या एका स्त्रीनें या गोष्टीचा इनकार केल्यावरून त्यांनीं त्याची सर्व दौलत त्याला दिली. इतकेंच नव्हे, तर तिचा अर्धा भाग घेण्याचेंहि नाकारलें. यामुळें त्या व्यापाऱ्याप्रमाणें चितल येथें आणखी इतर व्यापारी व तसेच आसपासचे छोटे जमीनदारहि त्यांच्या आश्रयाला येऊन राहिले इ. स. १७६० मध्यें जुनागडच्या नवावानें त्यांनां मेंदई भिल्क व जेतपूर हे महत्वाचे प्रांत दिले. याप्रमाणें काठी लोकांनां प्रामाणिकपणाची गोडी लागली व त्यांनीं लुटालूट सोडून देऊन चांगल्या प्रकारें राज्य करावयास सुरुवात केली.

मात्र जस्दनच्या खाचर नांवाच्या काठी राजानें ह्या लुटालुटीचा धंदा वरींच वर्षें सोडला नाहीं. त्यानें लिंवडी, धंदुका आणि रानपूर या प्रांतांत लुटालूट चालविली होती. त्याच्या मागून त्याचा पुतण्या वडसर यानें मात्र लुटालूट टाकून देऊन आपल्या जहागिरीची नीट व्यवस्था केली. तथापि यांपैकीं कांहीं धाडशी लोक गीरच्या डोंगरांत राहून आसपासच्या प्रदेशांत त्रास देत. पन्नास वर्षांपूर्वीं विसावदार वगैरे प्रांत कांहीं काल काठी लोकांच्या ताव्यांत होते ह्या प्रांतांचें क्षेत्रफळ मोठें पण सर्वत्र दाट झाडी. त्यामुळें तेथें फारशी वस्ती नव्हती. म्हणून तेथील सारा वसूल तेच दावून वसत. पुढें वांटवाच्या नवावानें त्यांच्यावर स्वाऱ्या केल्या तेव्हां ते गीरच्या रानांत जाऊन पुन्हां लुटारू वनले. त्यांच्यापैकीं वाल राणिंग नांवाच्या एका काठी सरदारानें मल्हारराव गायकवाडाला फितुरीनें फसविलें.

पुढें वाल राणिंग व वाल मातर या काठी सरदारांत तंटे सुरू झाले. दोघेहि काठेवाडांत लुटालूट करीत असत. वाल राणिंगचा धाडशी मुलगा वाव वाल यानें तर इ. स १८२० त हिंदुस्थानच्या आरमारांतील कॅप्टन ग्रँटला पकडून गीरच्या डोंगरी किल्ल्यांत चार महिनेपर्यंत कोंडून ठेविलें होतें. या शौर्याच्या कृत्यावद्दल काठेवाडांत लोक अद्यापि त्याची प्रशंसा करतात. इ. स. १८२४ मध्यें वाव वाल मेल्यानंतर त्याची सर्व जहागीर जुनागड संस्थानच्या ताव्यांत गेली. वाव वालच्या शौर्यावरील पोवाडे तिकडे फार प्रख्यात असून ते अद्यापि चारण, भाट व स्त्रियांच्या तोंडीं आहेत. काठी लोकांचें सर्वांत शूर कुल म्हटलें म्हणजे काठेवाडच्या नैर्ऋत्येकडील

खुमान काठी यांचें होय. हे लोक कुंदला या सुपीक प्रदेशांत रहात व भावनगर प्रांतांत लुटालूट करीत. सरते शेवटीं त्यांच्यांत आपापसांत भांडणें लागलीं असतां भावनगरवाल्यानें त्यांचा मोड केला (१७९३). त्याचप्रमाणें भावनगरकर वखतसिंगजीनें बोटाड आणि गधड येथील काठी लोकांचाहि पाडाव करून त्यांची सत्ता संपुष्टांत आणली. हल्लीं काठी लोकांचीं महत्वाचीं राज्यें म्हटलीं म्हणजे जेतपुर, चितल व जस्दन हीं होत. वगसर, चोटिला, बावरा, पलिआद येथें काठी जहागिरदार आहेत. काठी लोकांत पूर्वी सर्व भावांचा समान वारसा समजला जाई. परंतु या पद्धतीचे दुष्परिणाम त्यांनां कळूं लागल्यामुळें हल्लीं ते रजपुताप्रमाणेंच ज्येष्ठ पुत्राला वारस मानूं लागले आहेत.

काठी हे पूर्वी गुरें चारणारे असून त्यांनां जनावरें फार आवडत. हल्लीं सुद्धां काठी हे गुरांचे मोठे कळप पाळतात, व घोड्यांची उत्तम निपज करतात.

काठी लोक सूर्योपासक असून ते प्रत्येक कार्यामध्यें कोळ्याच्या (किडा) आकाराची सूर्याची खूण उपयोगांत आणतात; व तिच्याखालीं 'सूर्यनारायणाची प्रतिमा' असें लिहितात. त्यांचें पहिलें देवालय ढांक येथें होतें. परंतु पुढें तें देवालय परमारांनीं आपल्या ताब्यांत घेतलें. काठी लोक हे देव, गाय व ब्राह्मण यांनां पूज्य मानतात. ते देवभोळे असून शकुनांवर विश्वास ठेवतात. अंत्यकर्मांच्या वेळीं कावळ्या ऐवजीं धाकट्या तनमोर पक्ष्याला ते पिंड देतात. काठी लोक सुस्वभावी पण निरक्षर व आळशी असून चकाट्या पिटण्यांत व मजा मारण्यांत वेळ घालवितात. त्यांच्यांत खाण्यापिण्यासंबंधीं फारसा धरबंध नाहीं. काठी स्त्रिया सुंदर, सुस्वभावी व सद्गुणी आहेत. त्यांच्यांत स्त्रीपुरुषांचे समान हक्क मानले जातात एवढेंच नाहीं तर, रजपुतांप्रमाणें यांच्यांत पुरुषांवर स्त्रियांचा वरचष्मा असतो. अविवाहित अगर विवाहित स्त्रिया हातांत बांगड्या घालीत नाहींत. काठी स्त्रियांचा पोषाख काळा व नीटनेटका असतो. काठी पुरुष सहसा एकापेक्षां अधिक बायका एकाच वेळीं करीत नाहींत. विधवाविवाहाला जरी प्रतिबंध नाहीं, तरी फारसे विधवाविवाह यांच्यांत होत नाहींत; जे होतात ते धाकट्या दिराशींच होतात.

काठी लोकांची नेहमीं ऐकण्यांत येणारी हकीकत व कर्नेल वॅटसननें दिलेली हकीकत या दोहोंत फार अंतर आहे. हे लोक मध्यआशियामधून हिंदुस्थानांत आले असें वॅटसनचें म्हणणें आहे; परंतु तो त्यास सबळ पुरावा देत नाहीं. दुसऱ्या कांहींच्या मतें काठी लोक प्रथम आशियामायनरमधील खुर्दिस्तान प्रांतांत वसाहत करीत होते. तेथून त्यांनां असुरियाचा पहिला तिग्लथ पिलेसर यानें हुसकावून लाविलें. असुरियन शिलालेखांत त्यांनां खट्टी व जुन्या करारांत (बायबल) हिटाइट असें म्हटलें आहे. यावेळीं खट्टी लोकांचें कार्चेमिश हें राजधानीचें ठिकाण होतें. त्यांनां घोडे व रथ यांचा फार शोक असून ते भाडोत्री सैनिक होण्यास एका पायावर तयार असत. पुढें त्यांनीं दमास्कसचा राजा बेनहादाद याची बाजू उचलली. त्यांत असुरियाच्या सार्गननें त्यांच्यावर स्वारी केली. यानें कदाचित खट्टी लोकांनां आपल्याबरोबर कैद करून नेलें असावें; कारण याप्रमाणें जित राष्ट्रांतील सर्व प्रजेला कैद करून नेण्याची त्यांची वहिवाट होती. यावेळीं आशियामध्यें मीडिया आणि पर्शिया हीं राज्यें वैभवाच्या शिखराला जाऊन पोहोंचलीं होतीं. हॅड्रोओटिस नदीपासून ३ दिवसांच्या मजलीवर असलेल्या संगल गांवीं खट्टींनीं आलेक्झांडर बादशहाला आडविलें होतें. यानंतर केव्हां तरी खट्टी हे पूर्वेकडे गेले असावेत असें दिसतें. काठी हे भटकणारे असून ते कोणाच्याच छत्राखालीं रहात नाहींत असें मॅरियननें म्हटलें आहे. ही परकीयांनीं दिलेली माहिती झाली.

आतां भाटांच्या वखरी पुढील माहिती देतात. काठी लोक हे जेसलमीरच्या शालिवाहनाच्या कारकीर्दींत (११६८) जालोर शहरीं व अरवलीच्या माथ्यावर रहात होते. नंतर ते माळव्यांत येऊन तेथून मग कच्छांत व कच्छांतून काठेवाडांत उतरले. कदाचित् ते जालोरहूनच थेट कच्छ प्रांतांत आले असावेत. काठेवाडांत पहिल्यानदा केव्हां आले, हें सांगणें कठीण आहे. वाल हे खाचरांच्या अगोदर व वाब्रिया हे वालांच्याहि पूर्वी तेथें येऊन राहिले असावेत. खुमान हे खाचरांच्या बरोबर अगर त्यांच्यापूर्वींच येऊन राहिले असावेत. ज्यावेळीं खाचर काठेवाडांत आले, त्यावेळीं अगर त्यानंतर कांहीं काळानें धांदल लोक उदयास आले. खाचर हे इ. स. १४०० च्या सुमारास आले असावेत. ते प्रथम ढांक येथें रहात; तेथून पुढे ते चोटिला येथें गेले. या दोन ठिकाणांहून मग ते सर्व पंचमहालभर पसरले. शेजारच्या मुसुलमानी व मराठ्यांच्या प्रदेशांवर ते पुढें दरवडेहि घालूं लागले.

त्यांच्याविषयींचा अगदीं पहिला उल्लेख मिरात-इ-सिकंदरी या ग्रंथ तील होय. तसेंच सौराष्ट्राचा 'काठेवाड' या नांवानें केलेला पहिला उल्लेख मिरात-इ-अहमदी या ग्रंथांतील होय. भाटांच्या इतिहासांत त्यांच्या उत्पत्तीविषयीं पुढील माहिती आहे. वाल रजपूत राजा वेरावळजी व (अवर्तिया काठीवंशीय) विशाल पटगर याची मुलगी यांच्यापासून वाल, खुमान आणि खाचर काठी लोक उत्पन्न झाले. यांनां 'शाखायत' हे नांव पडलें व इतर या अर्थाच्या 'अवर' (अपर) या शब्दावरून इतरांनां 'अवर्तिया' असें नांव पडलें.

दुसरी एक हकीकत पुढीलप्रमाणें आहे. वाब्रिया आणि जेठवा यांच्या नात्याच्या पुष्कळ टोळ्या काठेवाडांत येऊन राहिल्या. त्यांच्या मागून वाल लोकांची टोळी आली. हे जेठवा वाल व चमार्डीचे वाल हे आपल्याला रजपूत म्हणूं लागले. जेठवा हे वाब्रिया आणि वाल लोकांशीं बेटीव्यवहार करतात.

वालांपैकीं धाक राजा हा जरी आपल्याला वाल रजपूत म्हणवितो तरी धाक राणीचा ( पोरबंदरच्या कागद पत्रांत ) " काठिआनि बाई " अगर " काठिआनि मा " या नांवानेंच उल्लेख केलेला आहे. यावरून वाल रजपूत हे पूर्वी काठी असावेत असें दिसतें. काठी लोक जेथें जेथें जातात तेथें तेथें ते आपल्यावरोबर मांडू हें नांव नेतात. त्यांनीं माळवा प्रांतांत एक मांडू म्हणून गांव स्थापिलें आहे. यावरून ते नेपाळहून काठेवाडांत आले असावेत असें दिसतें.प्रथम त्यांची एक शाखा पंजाबामध्यें मूलतान ( मूलस्थान) येथें राहिली असावी, तेथून ती काठेवाडांत आली तेव्हां तिनें आपल्यावरोबर मांडू व ठान हीं दोन्ही नांवें आणिलीं. ठान हें त्यांचें पूर्वीचें मांडव टेकडी जवळील रहाण्याचें ठिकाण होतें. रेवाकांठानजीकच्या माळवा प्रांताच्या भागाला (तेथें हे पूर्वी रहात असल्यानें) काठी असें अद्यापि म्हणतात. एकंदरींत पुढें आपल्याला रजपूत म्हणवून घेणारे वालकाठी माळव्यांतून व खुमान आणि खाचरकाठी मुलतानहून जेसलमीर, अबू व कच्छ या मार्गानीं काठेवाडांत आले असावेत हें संभवनीय दिसतें.

काठींपैकीं शाखायतांत एकाच कुलांतील वधुवरांत, अगर दोन भिन्न शाखायत वर्गांतील वधुवरांत विवाह होत नाहींत. शाखायत आणि अर्वातिया यांच्यामध्यें विवाह होऊं शकतो. शाखायतांत, वाल, खुमान, खाचर, हाटी आणि जोगिया खुमान अशा पांच शाखा आहेत व अर्वातियांत मांजरिआ, तोहरिआ, नरद अगर जातवड, गरीब, गुलिआ, पाडवा, नाटा आणि परगार या आठ शाखा आहेत. वाब्रिआ अगर वर्बर लोक हे शाखायत व अहीर यांच्याशीं नेहमीं बेटीव्यवहार करीत. कोटिल, धाणकदा व बरु अशा तीन शाखा बाब्रियांत आहेत. यांपैकीं कोणत्याहि दोन कुलांतील वधुवरांत विवाहसंबंध होऊं शकतो. अर्वातिया काठी लोक बाब्रियांनां अवर्तियाच समजतात. म्हणून त्या दोघांत बेटीव्यवहार होत नाहीं. काठींपैकीं अहिर लोक आपापसांत व इतर जातींशीं विवाह करतात. मात्र अवर्तिया काठी लोकांशीं करीत नाहींत.

काठी आणि अहिर लोकांचा अबुल फझलनें आपल्या ऐनेइ अकबरी ग्रंथांत उल्लेख केलेला आहे. त्यानें सोरठविषयीं असें लिहिलें आहे कीं, " या प्रांतांत अहीर जातीचे पुष्कळ काठी लोक आहेत. हे लढाईसाठीं घोड्यांची अवलाद तयार करतात. त्यांच्या सैन्यांत ६००० घोडेस्वार व ६००० पायदळ आहे. त्यांचे घोडे आरबी अवलादीचे असतात. त्यांची वर्तणूक साधारणतः लुच्चेगिरीची असते. तरी पण ते आतिथ्यपर आहेत. दिसण्यांत ते फार देखणे आहेत. धोंडी नदीच्या तीरावर काठी लोकांच्या वसतीजवळच बोरिया नांवाच्या अहीर जातीचें वसतिस्थान आहे. त्यांच्याजवळ ३००० घोडेस्वार व तितकेंच पायदळ आहे. या लोकांचें जामशीं सदैव वैर असतें. " प्राचीन काठीवालांविषयीं जेठवा आणि चुडासमा लोकांच्या इतिहासांत उल्लेख आला आहे. यावरून ते या प्रांतांत हजारबाराशें वर्षे रहात असावेत असें दिसतें ( वाल काठी अगर काठीवाल हे लोक जेथें राहतात तो प्रदेश काठीवाल अगर काठेवाड होय ).

परंतु कांहींच्या मतें अर्वाचीन वाल आणि खुमान, यांनां काठेवाडांत येऊन पांचशें वर्षे आणि खाचर यांनां चारशें वर्षे झालीं असावींत. तत्पूर्वी त्यांनीं कच्छप्रांत सोडला नव्हता. रावळजामानें सोळाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास, काठी लोकांवर स्वारी करून त्यांनां भादर नदीच्या दक्षिणेस पिटाळून लाविलें. पुढें ५० वर्षांनीं खडांचा प्रसिद्ध लोम खुमान यानें सुलतान मुझफरशाहला आश्रय दिला होता. त्यापुढील हकीकत अबुल फजलनें ऐनेइअकबरी ग्रंथांत दिली आहे; आणि त्यानंतरची हकीकत मिरात-इ-अहमदींत आहे. अठराव्या शतकांत शुजात खानानें ठानवर हल्ला करून तेथून खाचर लोकांनां हांकून दिलें. याच्याहि नंतरची माहिती दिवाण रणछोडजीनें दिली आहे. या माहितींत प्राचीन व अर्वाचीन काठी, म्हणजे खाचर व खुमान यांमधील भेद फार उत्तम तऱ्हेनें दाखविलेला आहे. तो म्हणतो कीं, काठी लोकांचीं ३० कुळें असून, त्यांच्यापैकीं कांहीं पंजाबांतून व कांहीं सिंधमधून काठेवाडांत आलीं.

पुढें ढांकच्या रजपूत वाल राजानें त्या काठी कुळांतील एका स्त्रीशीं विवाह केला. हीन जातींतील स्त्रीशीं विवाह केल्यामुळें त्या राजाला त्याच्या जातींतील लोकांनीं वाळींत टाकलें, तेव्हां तो काठी जातीचा बनला. त्याला त्या काठी स्त्रीपासून दोन मुलगे झाले, त्यांचीं नांवें खुमान व खाचर हीं होत. त्यांनां जुनागडच्या राजानें कांहीं प्रांत दिला. त्या प्रांतांत काठी लोकांची पुष्कळ वस्ती होतांच त्याला काठेवाड हें नांव पडलें. काठी लोक मांस खातात व कांहीं दारूहि पितात. यांचे उपाध्याय मोघ ( मग ? ) ब्राह्मण आहेत. जेतपुर येथें यांची एक मध्यवर्ती पंचायत असून तिचा अधिकार सबंध काठेवाडावर आहे.

एका वेरवालकाठीनें नवाब बाहादुरखानाच्या परवानगीनें जेतपुर येथें एक देवालय बांधिलें. काठी लोक जुनागडच्या राजाला दरसाल खंडणी व एक घोडा देतात. सांपडतील त्या सुंदर स्त्रिया पळवून नेण्याची वहिवाट काठी लोकांत पूर्वी असल्यामुळें त्यांच्या स्त्रिया सुंदर असतात अशी ख्याति आहे, परंतु हल्लीच्या काठी स्त्रिया दिसण्यांत उग्र व धिप्पाड दिसतात. काठी लोक जात्या शूर, उदार व आतिथ्यपर आहेत, काठेवाडांत त्यांचे जेतपुर, मंदर्द, बिल्ख, बगसर, कुंडल वगैरे मोठे किल्ले आहेत. यांची महिआ म्हणून एक पोटजात आहे. ती काठेवाडमधील सोरठप्रांतांत व गीरच्या डोंगराळ प्रांतांत आढळते. ते अत्यंत त्रासदायक लोक आहेत. त्यांनीं इ. स. १८६७ सालीं बंड केलें होतें. तेव्हां त्यांनां माफी करण्यांत येऊन शेतीसाठीं कांहीं जमीन बहाल करण्यांत आली. इ. स. १८७३ सालीं त्यांनां निःशस्त्र करण्यांत

आलें. हे आपापसांत विवाहसंबंध करतात. हे हल्लीं शेती करतात. कांहीं सैन्यांतहि दाखल झाले आहेत. पुष्कळसे काठीलोक जमीनदार व तालुकदार आहेत. यांच्या चालीरीति काठी आणि रजपूत लोकांच्या चालीरीतींप्रमाणें आहेत.

[संदर्भग्रंथ.—मुं. ग्या. भा. ८. काठेवाड; वॉटसन; वॉकर; लो-इं. ने; टॉड-राजस्तान भा. २; ऐने इ-अकबरी; मिरात-इ-शिकंदरी; मिरात-इ-अहमदी]

**काठेवाड—**मुंबई. हें आरबी समुद्रांतील गुजराथच्या पश्चिमेकडील द्वीपकल्प असून हें उ. अ. २०° ४०' ते २३° ४५' व पू. रे. ६९° ५५' ते ७२° २०' यावर आहे. याची सर्वांत जास्त लांबी सरासरी २१५ मैल व रुंदी १६० मैल असून याचें क्षेत्रफळ अजमासें २३५०० चौरस मैल व लोकसंख्या (१९२१) २५३८४९७ आहे. काठेवाडचा बराच भाग अमदावाद जिल्ह्यांत मोडत असून कांहीं गायकवाड, पोर्तुगीझ व पोलिटिकल एंजट यांच्या ताब्यांत आहे. पोलिटिकल एजन्सींत १९३ संस्थानें आहेत. काठेवाडचें प्राचीन नांव सौराष्ट्र; परंतु मराठ्यांनीं त्याला काठेवाड असें नांव दिलें. कारण येथील काठी लोकांनीं त्यांनां विशेष विरोध केला होता. त्या नांवावरून त्यांनीं सौराष्ट्राऐवजीं काठेवाड हें नांव ठेविलें आणि तेंच इंग्रजांनींहि पुढें कायम केलें. मुसुलमानी अंमलांत याला सोरठ म्हणत; आणि अद्यापिहि दक्षिणेकडील एक प्रांत याच नांवाचा आहे. हल्लीं या द्वीपकल्पाचे एकंदर चार मोठे प्रांत आहेत. ते झालवाड, हलर, गोहेलवाड व सोरट हे होत. इंग्रजांचा पो. एजंट राजकोटास (एक संस्थान) रहातो. एकंदर द्वीपकल्पाचें उत्पन्न सरासरी १॥कोटींचें आहे. पैकीं २लक्ष ६० हजारांचें उत्पन्न व १३२० चौ. मैलांचा प्रदेश अहमदावाद जिल्ह्यांतील (घोघा व धंदुका तालुक्यांचा) आहे. ७ चौरस मैल प्रदेश व ३८ हजार उत्पन्नाचा प्रांत दीवच्या पोर्तुगीजांचा आहे. तसेंच १३२० चौ. मै. चा व १ लक्ष उत्पन्नाचा मुलूख गायकवाडांच्या ताब्यांत असून बाकीचा २०८८० चौ. मैलांचा व १ कोटी ४८ ल. वसुलाचा मुलूख काठेवाड पोलिटिकल एजन्सीच्या ताब्यातील आहे.

काठेवाड द्वीपकल्प हें एकेकाळीं बेट असावें असा समज आहे. काठेवाडच्या पूर्वेस त्याच्या व गुजराथच्या मध्यें असलेल्या मिठाच्या जमिनीमुळें खंबायतचें भूशीर व कच्छचें रण यांनां जोडणारा पाण्याचा प्रवाह पूर्वी या भागांत असावा असा तर्क आहे. फार पूर्वी सिंधूनद याच भागांतून खंबायतच्या आखातास जाऊन मिळत असावा असें म्हणतात; आणि यामुळेंच कच्छ (आनर्त) हा प्रांतहि पूर्वी सौराष्ट्राचाच एक भाग होता असें कांहींचें मत आहे. काठेवावाडच्या मध्यभागीं पठार असून येथूनच बहुतेक द्वीपकल्पांतील सर्व नद्यांचा उगम होतो. याचा उत्तरेकडील पृष्ठभाग सपाट असून इतर ठिकाणीं अलेक, कमळ, वंसजाळी, दलकानिआ, शत्रुंजय, सनोसर वगैरे डोंगर आहेत. गीर पर्वताची ओळ किनाऱ्यापासून २० मैल उत्तरेस असून त्याला समांतर अशी आहे. याशिवाय ओसाम, गिरनार, वरदा वगैरे इतर पर्वत व टेंकड्याहि आहेत.

येथील मुख्य नदी भादर ही असून ती मांडव टेंकड्यांत उगम पावते. तिची एकंदर लांबी १२० मैल असून तिच्या दोन्ही कांठांवरील प्रदेश चांगला लागवडीचा आहे. याच भागांतून दुसरी एक सुखा भादर नांवाची नदी निघून खंबायतच्या आखातास मिळते. अजी, माछू, प्रख्यात सरस्वती, भोगवा आणि शेत्रुंजी या इतर नद्या असून शेवटच्या नदींच्या कांठीं सुंदर सृष्टिसौंदर्य पहावयास मिळतें. हंसथळ, भावनगर, सुंद्राइ व धोलेरा या खाऱ्या पाण्याच्या मुख्य खाड्या आहेत.

काठेवाडमध्यें वेट हें उत्तम बंदर असून त्याशिवाय बवानीआ, जोडीआ, बेडि, सलाया, धोलेरा, माधवपूर, वेरावळ, भावनगर, द्वारका, मूळद्वारका, दिव, पोरबंदर, धरबंदर, नविबंदर, मांगरोळ, जाफराबाद, गोघा वगैरे अनेक इतर बंदरेंहि आहेत. प्राचीन काळापासून ग्रीक, रोमन, मुसुलमान वगैरे बाह्य लोक या बंदरीं व्यापाराकरितां येत, त्यामुळें या बेटाची त्यावेळीं फार ख्याति होती. पिरम, चांच, शियळ, शंखोदर, नोर, करुंभर, दिव, हीं इतर बेटें आहेत. येथें सरोवरें थोडीं असून त्यांपैकीं नाल व घेडस हीं मुख्य आहेत.

साबरमतीच्या मुखापासून वायव्येकडे ३५ मैल दूरवर जाणाऱ्या दलदलीच्या पात्राला खंबायतचें रण म्हणतात. याच्या खालील भागांत समुद्रांतील गाळ विपुल असून पावसाळ्यांत हें पात्र भरल्यावर नाल तळ्याचें व याचें पाणी एक होतें. त्यामुळें इकडून अहमदाबादचें दळणवळण कांहीं दिवस बंद पडून कांहीं खेड्यांचीं तर बेटें बनतात.

दख्खनप्रमाणें या द्वीपकल्पांतहि बहुतेक सर्व ठिकाणीं बासाल्टचे थर आढळतात. उत्तरेकडील पर्वतांतून ग्रुमिआ व लॅमेटा जातीचे थर आढळतात. दक्षिण किनाऱ्यावर व पूर्वेकडे मळीची जमीन बरीच आहे. या द्वीपकल्पांत पाऊस साधारण पडतो. गीर अरण्याखेरीज इतर ठिकाणीं झाडी पातळ आहे. येथील इमारतीचें लांकूड मौल्यवान नाहीं. दक्षिण किनाऱ्यावर नारळांचीं झाडें लवकर वाढून मजबूत होतात. रानखजूर बहुतेक सर्व भागांत होतो. महुवा येथें उत्तम आंबे होतात.

सिंह, बिब्याबाघ, काळवीट, चित्ता, डुकर, कोल्हा, लांडगा व जंगली मांजर हे येथील मुख्य वन्यपशू आहेत. सरपटणाऱ्या प्राण्यांपैकीं साप, मगर व कांसव हे मुख्य आहेत. सिंह हा फक्त गीर जंगलांतच व क्वचित गिरनार पर्वतावर आढळतो.

काठेवाडचें एकंदर हवामान साधारण ठीक आहे. जानेवारी ते मार्च या तीन महिन्यांत दाट धुकें व पुष्कळ दंव पडतें. एप्रिल ते जून उन्हाळा असून तेव्हां हवा फार चांगली असते. सप्टेंबरपासून पुढें अडीच महिने हवा खराब असून ती

त्यावेळीं कोणालाच मानवत नाहीं. काठेवाडमध्यें सर्वांत जास्त पाऊस ( ४२ इंच ) जुनागड येथें पडतो. पावसाचे वारे जून ते आक्टोबरपर्यंत वहात असून खरा पाऊस जुलै ते सप्टेंबरमध्यें पडतो.

गेल्या शतकांत येथें वऱ्याच वेळां भूकंप झाला. सन १८६४ एप्रील ता. २९रोजीं दुपारीं ११ वाजतां बहुतेक सर्व भागांत भूकंप झाला. सूकंपाचे पूर्वी सुमारें ६ सेकंद एक तऱ्हेचा नाद-हुऊं लागल्यामुळें लोक फार घाबरून गेले होते. याशिवाय १८८१ व १८९८ सालींहि कांहीं कांहीं भागांतून पुन्हां भूकंप झाला.

इतिहास.-काठेवाडचा प्राचीन इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. जैन ग्रंथांतून प्राचीन माहिती थोडीफार मिळते. पण ती पौराणिक धर्तीची होय. श्रीकृष्ण इकडे येण्यापूर्वी येथें सर्व राक्षस होते. परंतु एक रेवत नांवाचा सूर्यवंशीय राजा त्यावेळीं येथें होता. त्याची मुलगी रेवती ही बलरामास पुढें दिली. प्रभासपट्टण येथेंच यादवांची शेवटची यादवी झाली. श्रीकृष्ण ज्या ठिकाणीं निजधामास गेले तें ठिकाण हल्लींहि वेरावळ व पट्टण यांच्यामध्यें दाखवितात. वेरावळ व पोरबंदर यांच्या-मधील माधवपुर येथें रुक्मिणीहरण झाल्याचें सांगतात. जैन लोक पालिठाणा व गिरनार डोंगरास फार पवित्र मानतात. गिरनारवरील हिंदु देवळांपैकीं कांहीं गुप्त घराण्यांनीं बांधलीं आहेत. काठेवाड त्या वेळीं फार सधन व बंदरें सोयीचीं यामुळें अनेक परकीय लोकांनीं त्याच्यावर पुष्कळदां स्वाऱ्या केल्या. या प्रांताचा अगदीं पहिला ऐतिहासिक उल्लेख चंद्रगुप्त मौर्याच्या वेळीं येतो. त्यानें नर्मदेपर्यंत हिंदुस्थान जिंकून त्याचे चार भाग केले. त्यांत पश्चिमेकडील भागांत सौराष्ट्र हें नांव येतें व त्याची राजधानी उज्जनी होती असा उल्लेख आढळतो ( ख्रि. पू. ३२० ). त्याचा सुभेदार सेन पुष्यगुप्त होता. हा चंद्रगुप्ताचा मेहुणा होता. यानें जुनागडजवळ सुदर्शन नांवाचें एक मोठें सरोवर बांधून त्याचे शेतीसाठीं कालवे काढले होते. अशोक हा उज्जनीस या प्रांताचा ( राजा होण्या-पूर्वी ) सुभेदार होता. तो राजा झाल्यानंतर त्यानें जुना-गडजवळ एका मोठ्या खडकावर आपल्या आज्ञा खोदल्या आहेत ( जुनागड पहा ). शिकंदरच्या वेळीं ( टॉलेमीचें मोनोग्लोसोन म्हणजे आजचें मंगरोळ होय ) व अशोकाच्या वेळीं लोकांनां हा भाग माहीत होता. ' सौराष्ट्रेने ' या नांवानें ग्रीक व रोमन लोक काठेवाडाला ओळखीत असत. मौर्य, ग्रीक, क्षत्रप, गुप्त वलभी वगैरे राजांनीं येथें राज्य केलें अशी माहिती मिळते. त्यावेळीं काठेवाडास सुराष्ट्र ( सौराष्ट्र ) असें नांव होतें. मौर्यांचें राज्य विस्कळित झाल्यानंतर बाह्य शक लोकांनीं येथें कांहीं शतकें राज्य केलें. पुढें गुप्त घरा-ण्यांतील प्रख्यात व अत्यंत शूर अशा चंद्रगुप्तानें ( दुसरा ) शकांपासून हा देश जिंकून घेऊन त्यांनां हांकलून दिलें (इ.स. ४०० ). सौराष्ट्रची प्राचीन राजधानी वामनस्थळी ( वन-थली ), नंतर प्रभासपट्टण व मग वेरावळ झाली. हीं तिन्हीं गांवें जवळजवळ आहेत. जुनागड हेंहि फार जुनें शहर आहे. हें बौद्ध धर्माचें एक मोठें ठिकाण होतें. येथेंच प्रख्यात अशो-काचा शिलालेख आहे. पोरबंदर, श्रीनगर, धुमळी डोंगर, भेराईबंदर पेरमवेट, शिआल (कोल्हा) बेट हीं सारीं प्राचीन ठिकाणें आहेत. दुसऱ्या ध्रुवसेनाच्या कारकीर्दीत(६३२–४०) चिनी प्रवाशी ह्युएनत्संग काठेवाडांत बाल येथें आला होता ( ६४० ). ' येथील लोक श्रीमंत असून व्यापार करतात, त्यांचा समुद्राच्या सानिध्यामुळें बराच फायदा होतो. गुजराथ हा सौराष्ट्राचाच एक भाग असून त्याची सरहद्द मही नदी आहे व एकंदर प्रांताचा परीघ ६०० कोस आहे ' असें त्यानें लिहिलें आहे. बुद्ध लोकांचे मठहि त्याला काठे-वाडांत आढळले. काठेवाडांतच प्रसिद्ध सोमनाथाचें देऊळ आहे. तें महंमुद गझनीकर यानें १०२५च्या सुमारास लुटलें. काठेवाड हें द्वीपकल्प असल्यानें व तो फार सुपीक प्रांत अस-ल्यानें त्याच्यावर अनेक घराण्यांनीं अनेकवार राज्यें केलीं. महंमुदानंतर मुसुलमानांच्या स्वाऱ्या वऱ्याच वेळां काठेवाडावर झाल्या. इ. स. ११९४ त त्यांनीं अनहिलवाडा राजधानी-वर हल्ला केला होता. पुढें १२९८ त त्यांनीं ती कायमची जिंकली. मध्यंतरीं लाखा फुलाणी यानें काठेवाड जिंकला होता ( १३२० ). मुसुलमानी अंमलांत काठेवाड हा प्रांत गुजराथच्या सुभ्यांत समाविष्ट होई व गुजराथच्या सुभेदाराचा अधिकार त्यावर चाले. झाफरखान ( १३२४ ) हा गुजरा-थचा पहिला मुसुलमान राजा होय. १६ व्या शतकाच्या अखेरीस अकबरानें गुजराथ पादाक्रांत केला. त्याच्या पूर्वी इ. स. १५०९ च्या सुमाराला पोर्तुगीझ लोकांपासून काठे-वाडला थोडासा त्रास झाला होता. १५३७ त बहादू-रशाहाला कपटानें मारून त्यांनीं दिव बंदरांत वखारीच्या ठिकाणीं किल्ला बांधला. तेव्हांपासून हा किल्ला व दीव बेट अद्यापि त्यांच्या ताब्यांत आहे. इ.स. १७०५ मध्यें गुज-राथेंत मराठ्यांचा शिरकाव होऊन कंठाजी कदम, बांडे व दमाजी गायकवाड यांच्या पुढारीपणाखालीं आपली सत्ता त्यांनीं तेथें कायमची स्थापित केली. त्यावेळीं पेशव्या-करितां व स्वतःकरितां मुलुखगिरी ( खंडणी ) मिळ-विण्याकरितां उत्तर व पश्चिम गुजराथमध्यें गायकवाड हे आपली फौज पाठवीत असत. तेव्हांपासून आतांपर्यंत कांहीं भाग वगळून बहुतेक काठेवाड गायकवाडांच्या आधिपत्या-खालीं आहे. १८०७–०८ पासून काठेवाडामधील लहान लहान सरदारांच्या यादवीचा शेवट झाला. त्यावेळीं इंग्रजांनीं गायकवाडच्या मुलुखगिरीपासून त्यांचें नुकसान होणार नाहीं अशी हमी घेतली व गायकवाडाला त्यांनीं भरावयाची खंडणी आपल्या (इंग्रजांच्या) मार्फतीनें भरावी असें दोन्हीं पक्षांच्या संमतीनें ठरविलें.

काठेवाडामध्यें प्राचीन कालचे अवशेष बरेच आहेत. ते दक्षिणेस व आग्नेयीस सांपडतात. अशोकाच्या वेळचे लेख, बौद्धांचीं लेणीं व जैनांचीं देवळें हीं येथें आहेत. मुंबई

व अहमदाबाद येथें काठेवाडी लोक फार आढळतात. इकडील कांहीं धाडशी मुसुलमान व्यापारी नाताळ व दक्षिण आफ्रिकेच्याहि सफरी करतात. जुनागड, भावनगर, नवानगर धंदुका, लिमडी, ध्रांगध्रा, वांकानेर, ध्रोळ, द्वारका, खंभालिया, जेतपुर, अमरेळी, पालिठाण, राजकोट, धोराजी, पोरबंदर, गोंडळ, मोरवी, महुवा, वेरावळ व वढवाण हीं मुख्य शहरें आहेत. हीं बहुतेक लहान लहान संस्थानेंच आहेत. येथें रजपूत, काठी, कुणबी, कोळी, ब्राह्मण, वाणी, लुहाणा, जाडेजा रजपूत, धेड, मेमन, खोजे व घानची जातीचे लोक आहेत. सर्वांत मुख्य काठी लोक आहेत. त्यांपैकीं वाणी, लुहाणा, मेमन व खोजे लोक व्यापार करतात व घानची लोक तेल काढतात. एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ४१.५ लोकांची उपजीविका शेतीवर आहे. येथील हवापाणी, पाऊस व जमिनीची जात चांगली असल्यामुळें शेतीला हा प्रदेश उत्तम आहे. जमीन काळी व लाल अशा दोन प्रकारची आहे. काळ्या जमिनींत कापूस होतो व लाल जमिनींत पाटाच्या पाण्यानें गहूं व सातू चांगला होतो. भादर नदीच्या कांठीं उत्तम फळफळावळ, भाज्या व ऊंस होतो. हळद व मूग यांचें उत्पन्न बहुतेक सर्व ठिकाणीं होतें.

अलीकडे कालव्याचें पाणी पुरविण्यांत बरीच सुधारणा झाली आहे. नवीन बांधलेल्या तलावांपैकीं लालपुरी, अलानसागर, पनेली, चंपा व मोलदी हे मुख्य आहेत.

येथील निरनिराळे संस्थानिक आपआपल्या खर्चानें पुष्कळ सार्वजनिक कामें करतात. इकडे प्रथमतः भावनगरकरांनीं स्वतःच्या खर्चानें आगगाडी सुरू केली. नंतर आतां हळू हळू इतर संस्थानिकांनींहि छोटे छोटे फांटे काढले आहेत. काठेवाडी घोडे प्रख्यात आहेत. याशिवाय गाई, म्हशी, उंट, गाढव, मेंढ्या वगैरे इतर जनावरें येथें आहेत.

वांकानेर व पंचाल येथें इमारती लांकूड होतें व भावनगर, मोरवी, गोंडल व मानवदार येथें जळाऊ लांकूड मिळतें. ताड व अंबा यांची लागवड भावनगर येथें मुद्दाम केली जाते.

काठेवाडांत खनिज पदार्थ ( बहुतकरून लोखंड ) व विशेषतः इमारती दगड पुष्कळ सांपडतात. नवानगरच्या आसपास चांगले मोती सांपडतात. पांढरीं व तांबडीं पोंवळीं कोठें कोठें सांपडतात.

ह्या द्वीपकल्पांतील लोक सधन आहेत. पाण्याचा पुरवठा मुबलक असल्यामुळें येथील जमिनीचें उत्पन्न चांगलें येतें.

मुंबई बंदरांतून परदेशी जाणाऱ्या कापसापैकीं एकशष्ठांश कापूस काठेवाडांतून येतो. सुती कापड, साखर, गूळ व कांहीं प्रकारचीं धान्यें बाहेरून काठेवाडांत जातात.

कापडाचे कारखाने व इमारती लांकडाचा व्यापार इकडे बराच भरभराटीस आला आहे. सोन्यारुप्याच्या कलाबतूचें विणकाम, सुगंधी तेलें व उटणीं, गुलाबाचें व इतर अत्तर आणि हस्तीदंती व चंदनी कोरींव काम येथें चांगलें होतें.

सडका व रस्त्यांच्या कामांत अलीकडे फारच सुधारणा झाली आहे. १८६५ सालीं काठेवाडांत एकहि पक्की चांगली सडक नव्हती. अलीकडे बऱ्याच पक्क्या चांगल्या सडका झाल्या असून उत्तम पूलहि बांधलेले आहेत. वढवाण ते जुनागड व भावनगर ते जोडिया असे मुख्य दोन हमरस्ते असून त्यांच्या शाखा सर्वत्र पसरल्या आहेत.

१८७२ त काठेवाडांमध्यें पहिली आगगाडीची सडक सुरू झाली. १८८० पासून निरनिराळ्या संस्थानांच्या खर्चानें नवीन फांटे तयार केल्यामुळें हल्लीं इकडील दळणवळण बरेंच सुलभ झालें आहे. काठेवाडांत इंग्रजांचीं व जुनागड संस्थानचीं टपालऑफिसें आहेत. या भागांत मधून मधून दुष्काळ पडतात.

[ मुं. ग्या. पु. ८; स्मिथ; डफ; सुरा. इति; तारिख-ई. सोरठ; वॉटसन; रासमालाः वेलकाठे. इति; अलबेरुणी; इंडि; क्रान; इंडि. अँ. पु. १५; ज. रा. ए. सो. १८९०, १८९९ आर्कि. सर्व्हे. वेस्ट. इंडि. भा. २; वेली–गुज. इति. ].

**काठेवाडी**—महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं तुरळक आढळणारे हे काठेवाडी लोक मूळचे गुजराथ व काठेवाड या भागांतील असून बरींच वर्षे महाराष्ट्रांत वस्ती करून राहिलेले आहेत. यांची मातृभाषा गुजराथी व काठेवाडी असून कामापुरतें मराठी भाषेचेंहि ज्ञान यांनां असतें. यांचा मुख्य धंदा विटा, कवलें वगैरे मातीकाम करण्याचा आहे. हे दिसण्यांत गलिच्छ परंतु मेहेनती व शिस्तीचे असे असतात. हे मांसाहारी आहेत. यांचा नित्याचा आहार तांदूळ, गव्हाची पोळी, उडदाची डाळ वगैरे आहे. मातीच्या भिंती व गवती छपराच्या लहानशा झोंपड्या यांतून हे बहुधा रहातात. मुलाचें नांव कुलगुरूच्या संमतीनें ठेवण्याची यांची पद्धत आहे. बाळंतीण तीन महिने होईतोपर्यंत घराबाहेर पडत नाहीं. ज्या घरीं मर्तिक झालें असेल, त्या घरीं समाचारास येणारांनां डाळ, खिचडी व विडी पुढें करण्याची चाल यांच्यांत आहे. हे खंडोबा, भैरोबा, व भवानी यांची पूजा करतात. परंतु त्यांचें आराध्यदैवत रामदेपीर हें आहे. जातींतील तंटे जातिसभा भरवून मिटविण्यांत येतात. हल्लीं हे लोक सुतारकाम व गवंडी काम आणि दगडी खोदकाम करतात. कांहीं ठिकाणीं यांनीं माळ्याचा ( भाजी विकण्याचा ) धंदाहि उचलेला आहे. कापडाचें दुकानहि एखादा काठेवाडी घालतो. [ मुं. ग्या. नाशिक, खानदेश वगैरे ].

**काठोर**—बडोदा संस्थानांतील नवसरी प्रांतांत कामरेज तालुक्यांतील एक शहर. हें नवसरीपासून २२ मैल व सुरतपासून १० मैलांवर तापी नदीच्या उत्तरकिनाऱ्यावर वसलें आहे. येथें एक मुनसफ कचेरी, एक धंदेशिक्षणाची शाळा, एक प्राथमिक शाळा व दवाखाना आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार असून मुसुलमान लोकच येथें फार आहेत. हे मुसुलमान सुनी पंथांतील बोहरी जातीचे आहेत. स्वभावतः धाडसी असल्यामुळें चीन, मॉरिशस, नाताळ वगैरे दूरदेशीं

व्यापारानिमित्त सफरी करून हे लोक चांगला पैसा मिळवितात. या शहरांत धान्य व कापडाचा व्यापार चांगला चालतो.

**कांडू**—भडवुंजे, हलवाई यांची एक जात. हिंदुस्थानांत यांची एकंदर वस्ती (१९११) ६६४४२३ आहे. पैकीं विहार-ओरिसांत ५०२८५५, संयुक्त प्रांतांत १४६८९२, वंगालयांत १२६०३ व बाकीची आसामांत आहे. कहार बाप व शूद्र आई यांपासून झालेली ही संतति असावी असें मानतात (रिस्ले-ट्राइब्स अँड कास्ट्स १। ४१४). वनियासारखी ही एक वैश्य जात आहे असेंहि कांहीं समजतात (ईस्टर्न इंडिया २ ४६५) खाद्य पदार्थ करण्याविकण्याखेरीज इतर पुष्कळ धंदे या जातीचे लोक करतात. म्हणून यांचा समाजांतील दर्जा ठरविणें कठिण जातें. वंगाल विहारमध्यें कांडूंच्या दहा पोटजाती आहेत, पैकीं संयुक्त प्रांतांत ३ आहेत. प्रत्येक पोटजातींत आणखी निरनिराळे अनेक वर्ग (मूल, कुरी) आहेतच. एकाच पोटजातीच्या लोकांत परस्परविवाह होतात; पण एकाच वर्गांतल्या किंवा कुरींतल्या लोकांत होत नाहींत. जवळच्या नातलगांत लग्नसंबंध होत नाहींत. त्याकरितां कांहीं पिढ्या जाव्या लागतात. पहिल्या वायकोच्या संमतीखेरीज दुसरें लग्न तिच्या जिवंतपणीं करतां येत नाहीं, अशी संयुक्त प्रांतांतील मिर्झापुर जिल्ह्यांत चाल आहे. पण फैझाबाद जिल्ह्यांत कांडू पुरुषाला एका वेळीं तीनपर्यंत वायका करतां येतात. लग्नविधींत मुख्यतः नवऱ्यानें वायकोच्या भांगांत शेंदूर भरावयाचा असतो. विधवाविवाह व नियोग रूढ आहे. एकंदर सर्व कांडू हिंदुधर्मी आहेत; पैकीं कांहीं शाक्त तर कांहीं वैष्णव आहेत. कांहीं कांडू रामानंदी व कांहीं कबीरपंथीहि आहेत. पाथरवट, गवंडी, वाणी यांचे धंदेहि कांडू लोक करतांना दिसतात. असामांतील कांडू चहाच्या मळ्यांत काम करतात. [क्रूक. सेन्सस रिपोर्ट १९११].

**काण्व घराणें**—यास काण्वायन असेंहि म्हणत. शुंग घराण्यांतील शेवटचा दुर्व्यसनी राजा देवभूति अगर देवभूमि यास त्याचा ब्राह्मण प्रधान वसुदेव यानें कट करून मारलें व आपण स्वतः राजा झाला (ख्रि. पू. ७३). सुमित्र युवराज याचा वध करणारा मित्रदेव हाहि बहुधा काण्व घराण्यांतीलच असावा. शुंग घराण्यांतील १० वा पुरुष देवभूति याचा खून वसुदेव (पहिला कण्व राजा) यानेंच केला याबद्दल बाण कवि व पुराणें यांची एकवाक्यता असल्यानें डॉ. रामकृष्णपंत भांडारकर यांचें जें म्हणणें—काण्व घराणें हें शुंग घराण्याच्या समकालीन होतें तें—मुळींच टिकत नाहीं. वसुदेवाच्या नंतर त्याचे तीन वंशज गादीवर बसून त्यांनीं ४५ वर्षें राज्य केलें (ख्रि. पू ६३ ते २८). या चारहि राजांबद्दल ऐतिहासिक माहिती मुळींच आढळत नाहीं. वसुदेवाचा पुत्र भूमिमित्र यानें १४ वर्षें, त्याचा पुत्र नारायण यानें १२ वर्षें व त्याचा मुलगा सुशर्मन् यानें १० वर्षें (व वसुदेवानें ९ वर्षें (मिळून एकंदर ४५ वर्षें) राज्य केलें. सुशर्मन् याला आंध्र शातवाहन घराण्यांतील एका राजानें मारून राज्य बळकाविलें (ख्रि. पू. २८।२७) व पाटलीपुत्र (काण्वांची राजधानी) एक सुभ्याचें ठिकाण झालें. या चौघांचा साधारण काल पुढीलप्रमाणें ठरविला आहेः—वसुदेव (ख्रि. पू. ७३–६७); भूमिमित्र (६७-५३); नारायण (५३–४१); सुशर्मन् (४०–३०). [हर्षचरित; पार्गिटर; भांडारकर-दख्खन; इ.; स्मिथ; बुद्धोत्तर जग].

**काण्वशाखा**—शुक्लयजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचे काण्व व माध्यंदिन असे दोन भेद आहेत. या दोन पाठांमध्यें विषयाच्या बाबतींत फारसा भेद नाहीं. फक्त कांहीं शाब्दिक फरक व तोहि गद्य भागामध्यें आढळून येतो; मंत्रभागांत आढळत नाहीं. हे पाठभेदहि त्यांनीं भिन्न भिन्न ठिकाणीं वस्ती केल्यामुळें उत्पन्न झाले असावे. त्यांच्या मंत्ररचनेच्या कालांत फारसें अंतर असेलसें दिसत नाहीं.

काण्व संहितेचे अध्याय चाळीस असून पहिल्या दोन अध्यायांत दर्शपूर्णमास, अध्याय ३ते४ मध्यें अग्न्याधान, चातुर्मास्यें, अध्याय ४ ते ९ अग्निष्टोम, दहाव्यांत वाजपेय, ११ व्यांत राजसूय, १२ ते २० मध्यें अग्निचयन, २१ते२४ मध्यें सौत्रामणी, २४ ते २७ मध्यें अश्वमेध, २८ ते ३३मध्यें संकीर्णमंत्र, ३४ ते ३५ मध्यें पुरुषमेध, ३६ मध्यें शांतिमंत्र, ३७ ते ३९ प्रवर्ग्य व शेवटच्या अध्यायांत ब्रह्मविद्या इत्यादि विषय आहेत.

या संहितेचें ब्राह्मण शतपथ या नांवाचें असून त्याचेहि माध्यंदिन व काण्व असे दोन पाठ आहेत. माध्यंदिन पाठांत चौदा प्रपाठक असून काण्व ब्राह्मणांत सतरा प्रपाठक आहेत.

शतपथ ब्राह्मणाचा शेवटचा भाग म्हणजेच बृहदारण्यक उपनिषद होय. याचेहि अर्थात् काण्व व माध्यंदिन पाठ आहेत.

या शाखेचें सूत्र कात्यायन हें होय. या शाखेचे ब्राह्मण वऱ्हाडामध्यें विशेष आढळतात. तेथें त्यांचें काण्णव असें नांव रूढ झालें आहे.

**कात, काताचे प्रकार व तयार करण्याची कृति.**—काताच्या तीन जाती आहेत. काळा कात, मुख्यतः औद्योगीक कामाकरितां उपयोग केला जातो; फिक्का कात हा विड्यांत खातात किंवा औषधांकरितां याचा उपयोग करतात; खैरसाल (वोर्नियो), कापराप्रमाणेंच हा कात लांकडांत सांपडतो. कात तयार करण्याकरितां झाड तोडून नंतर त्यांतून हा पदार्थ काढतात. त्यामुळें हीं झाडें झपाट्यानें कमी होत आहेत.

**काळा किंवा पेगु कात करण्याची कृति.**—कात तयार करण्याकरितां तीन मनुष्यें कामावर असतात; एक मनुष्य झाडें तोडून तीं जनावरांकडून ओढीत भट्टीपर्यंत नेतो. दुसरा त्या लांकडांचा गाभा काढून त्याचे तुकडे करतो व तिसरा भट्टीवर असतो. लांकडांचे तुकडे ३ ते ४ गॅलन (म्हणजे सुमारें १५। १६ शेर) पाणी असलेल्या

मातीच्या मांड्यांत उकळून अर्धे पाणी उरल्यावर, २०।२५ मांड्यांतील पाणी एका लोखंडी कढईत ओतून, पाकाप्रमाणें घट्ट होईपर्यंत सर्व रस आटवतात. नंतर कढई भट्टीवरून उतरून लांकडी ढवळण्यानें कढईतील द्रव्य थंड होईपर्यंत एकसारखें ढवळतात व थंड झाल्यावर एका विटाळ्यासारख्या लांकडीं साचांत पानें घालून त्यावर तें ओततात. हा आटवलेला रस रात्रभर अशा स्थितींत राहिला म्हणजे सकाळपर्यंत वाळून कात तयार होतो. कधीं कधीं लांकडाचे तेच तुकडे पुन्हां एक वेळ उकळतात. पण त्यांपासून फारसा कात निघत नाहीं. भट्टीवरून कढई खालीं उतरल्यावर कांहीं जण अर्धा तास किंवा तास भर तो ढवळतात.

बरेली काथगोदाम रेल्वेवरील बरेली जंक्शनपासून ६ मैलांवर असलेल्या इज्जतनगर स्टेशनाजवळ इंडियन वुड प्रॉडक्ट्स कंपनीचा काताचा कारखाना आहे. त्यांत कात यंत्राच्या सहाय्यानें बनतो. त्याचें वर्णन चित्रमयजगत्च्या एप्रिल १९२३ च्या अंकांत आहे. तेथें १०० टन लांकडापासून सुमारें १० टन चुरा व २ टन कात निघतो. कारखान्यांत रोज ४० टन लांकूड खपतें. या कारखान्याचें भांडवल सुमारें १२ लाख रुपये आहे.

हं गा म.—जून महिन्यापासून ते मार्च महिन्यापर्यंत कात तयार करण्याचा हंगाम असतो. पण विशेषतः डिसेंबर पासून मार्च महिन्यापर्यंत हें काम जोरांत चालतें. एक टन लांकडापासून २५० ते ३०० पौंड कात निघतो.

इ त र प्र का र.—कानडी मुलुख, धारवाड, खानदेश, सुरत, बडोदा, छोटा नागपूर, डेहराडून व गोंडा ( अयोध्या ) येथें काळा कात तयार करतात. हा कात तयार करण्याची कृति वरील कृतीपेक्षां फारशी भिन्न नसते. या भागांत हा धंदा विशेष मोठ्या प्रमाणावर चालत नाहीं. गुजराथेंत सबंध झाड न तोडतां झाडाच्या मोठमोठ्या फांद्या तोडतात व त्या लांकडाचे तुकडे करून ते पाण्यांत उकळून त्यांपासून कात काढतात.

या ठिकाणाहून बाजारांत विक्रीकरितां येणारा कात दिसण्यांत व आकारांत पेगू काताहून निराळ्या प्रकारचा असतो. या काताच्या वड्या चौकोनी, चपट्या असतात किंवा त्याचे गोल गोळेहि करतात. हा कात जरा लालसर असतो.

फि क्का का त.—हें नांव उत्तर हिंदुस्थानांतील करड्या पैलूदार स्फटिकाकृति कातास लावतात. खैराच्या निविष्ट काढ्यांत कांहीं फांद्या ठेवून तो थंड होऊं दिला असतां फांद्यावर काताचे स्फटिक जमतात व ते खरडून काढून त्याचे चौकोनी तुकडे तयार करतात. उरलेलें पाणी फेंकून देतात किंवा त्याचा हलक्या प्रतीचा कात तयार करतात. यासंबंधीं नक्की माहिती उपलब्ध नाहीं. एतद्देशीय लोक कात विड्यांत घालून खातात; विड्यांतील चुना व कात यांच्या मिश्रणानें तोंड रंगतें.

खै र सा ल किं वा की र सा ल का त.—खैराच्या लांकडांत कधीं कधीं एक स्फटिकाकार पदार्थ सांपडतो त्यासच खैरसाल म्हणतात. जळाऊ लांकडें तोडीत असतांना हा पदार्थ आढळतो. व लांकूडतोडे तो जमा करतात कारण तो औषधी असल्यामुळें त्याला बरीच किंमत येते. कातांत नागलीचें पीठ किंवा खडूची भुकटी घालून भेसळीचा कातहि करतात.

का त त या र क र ण्या च्या कृ तीं त सु धा र णा.—कात तयार करण्याची एतद्देशीय रीत उधळेपणाची व नुकसानकारक असल्यामुळें तींत सुधारणा करण्याकरितां पुष्कळांनीं प्रयोग करून पाहिले; त्यांपैकीं डॉ. नॉर्थ व हिंदुस्थानसरकारचे कृषिकर्मविषयक रसायनशास्त्रवेत्ते डॉ. लेथर हे दोन आहेत. काळ्या म्हणजे औद्योगिक कामाकरितां उपयोगांत येणाऱ्या कातांत काळें टॅनिन नांवाचें द्रव्य मुख्य असतें व खाण्याच्या म्हणजे फिक्कया कातांत "कातहसी" नांवाचें द्रव्य मुख्य असतें. कातिनचें काळ्या टॅनिनमध्यें सहज रूपांतर होतें. कातीन हें फक्त ऊन पाण्यांत द्रवतें; परंतु काळें ट्यानिन थंड पाण्यांतहि द्रवतें व या गोष्टीचा फायदा घेऊन एकाच कातांत असलेलीं हीं दोन्हीं द्रव्यें पृथक्करण करून कातीनयुक्त कात निराळा विकावा असें डॉ. नॉर्थचें मत आहे. काढा काढविण्याकरितां लोखंडी कढयांऐवजीं तांब्याच्या कढया वापराव्या असेंहि त्याचें म्हणणें आहे. वर पांढरा थर असलेल्या लांकडांत कातीन ( कॅटेचिनचें ) प्रमाण पुष्कळ सांपडतें. अशा प्रकारचें लांकूड ब्रह्मदेशापेक्षां अयोध्या प्रांतांतच जास्त सांपडतें. डॉ. लेथर यांनीं या बाबतींत पुष्कळ शोध लाविले आहेत. काताची बाजारांतील किंमत त्यांतील काळें ट्यानिन व कातीन यांच्या शेंकडा प्रमाणावर व बाह्य रंगावर अवलंबून असते कातडीं कमावणाऱ्यांच्या दृष्टीनें कातांत "कातीन" नसल्यास अधिक चांगलें.

उ त्त म री ती नें लां कू ड का प ण्या ची री त.—निरनिराळ्या पाण्यांचा परिणाम व लांकूड उकळण्यास लागणारा कालावधि यांसंबंधानेंहि हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या रीतींत पुष्कळच सुधारणा होण्यासारखी आहे. हल्लींप्रमाणें लांकडाचे तुकडे करण्यापेक्षां सुताराच्या रंध्यानें त्याच्या ढलप्या काढल्या असतां तें अधिक फायदेशीर होईल. असें केलें असतां "काळें ट्यानिन" व "कातीन" हीं दोन्हीं द्रव्यें अधिक उत्पन्न होतील; पाण्याचें व लांकडाच्या वजनाचें प्रमाण कमी करतां येईल व लांकूड उकळण्यास लागणारा कालावधि बारा तासांवरून अर्ध्या तासावर आणतां येईल. या सर्व गोष्टींमुळें हा धंदा फायदेशीर होईल इतकेंच नव्हे तर या कृतीप्रमाणें उत्पन्न होणारीं द्रव्यें अधिक चांगलीं निघतील. या पद्धतीप्रमाणें काम केल्यास हा धंदा व्यापारीदृष्ट्या केव्हांहि यशस्वीच होईल. खैराशिवाय दुसऱ्याहि कित्येक झाडांपासून कात तयार करितात.

सुपारीचा कात.—ताज्या सुपाऱ्या (पोफळें) सोलून व किंचित् दुखवून पाण्यांत घालून कढविल्या म्हणजे जो त्यांचा दाट व लाल द्रव होतो तो ज्यास्त आटविल्यावर घट्ट होतो, तो पानावर ओतून त्याच्या वड्या तयार करितात. दक्षिण हिंदुस्थानांत कापी व चिकणी सुपारी करतात, त्या ठिकाणीं हा कात तयार होतो.

आंवळीचा कात.—आंवळीच्या झाडापासूनहि कात करितात. या झाडाच्या फळांत व लांकडांत टयानिन अॅसिड असतें. आंवळीचा कात काळसर पांढऱ्या रंगाचा असतो.

गँविअर किंवा मलायी कात.—या नांवाचा एक पिंवळा कात बाजारांत मिळतो. मलायामधील गँविअर नांवाच्या झाडाच्या पानांपासून वरच्याप्रमाणेंच हा काढतात. या कातांचें झाड डिकेमालीच्या जातीचें असून तें ओलसर जागीं उगवतें खैरापेक्षां याची लागवड करणें सोपें व कमी खर्चाचें आहे. या झाडाच्या पानांपासून कात तयार होतो. याची निर्गत विलायतेंत फार होते.

निपज व व्यापार.—काताची निपज हिंदुस्थानांत किती होते यासंबंधीं विश्वसनीय आंकडे उपलब्ध नाहींत; कारण याचा व्यापार बहुतेक लहान लहान कारखानदर व व्यापारी यांच्या स्वाधीन आहे. जंगलखात्यामार्फत खैराच्या जंगलाचा मक्ता लिलांवानें किंवा मागणी अर्जानें देतात. हा मक्ता साधारणपणें चार महिन्यांकरितां असतो. साधारणपणें प्रत्येक कटाईंत ८० झाडांचा उपयोग करतात. प्रत्येक कटाईची किंमत सुमारें २२५ रुपये असते. तेव्हां प्रत्येक झाडाची किंमत २ रु. १३ आ. ठरते. प्रत्येक झाडापासून (२५ घनफूट लांकूड) अर्धा टन कात उत्पन्न होतो, म्हणजे प्रत्येक टनाची ५ रु. १० आ. किंमत ठरते.

ब्रह्मदेशांत १३०००० ते १५०००० हुंड्रेडवेटापर्यंत उत्पन्न, दक्षिण हिंदुस्थान १००० हं., मुंबई ५०० हं., बंगाल व सं. प्रान्त २००००० हं. हे वार्षिक निपजीचे आंकडे परदेशीय किनाऱ्यालगतच्या व अन्तर्गत व्यापारावरून काढले आहेत; त्यांत निश्चित आंकड्यांचा उपयोग केलेला नसल्यामुळें स्थानिक खर्च किती होतो याचा विचारच केलेला नाहीं. याचा व्यापार स्थिर नाहीं हें खालील आंकड्यांवरून दिसून येईल. परदेशी रवाना झालेल्या मालाचें कोष्टकः—

| सन | वजन हुंड्रेडवेट. | किंमत रु. |
|---|---|---|
| १८९५–१९९६ | १८३७२९ | ३६९६१०६ |
| १८९९–१९०० | १२७, ८१५ | २४७०४२२ |
| १९०४–१९०५ | ६२५६२ | ९७१०४१ |
| १९०६–१९०७ | ९१२६० | १५९२५६१ |
| १९१३–१९१४ | ५८८५९ | ६२१=२ |
| १९१५–१९१६ | १४५५११ | १६१३३३ |
| १९१७–१९१८ | ४२१३३ | ४४७५१ |
| १९१८–१९१९ | ५८१२५ | ७११८९ |

वरील आंकड्यावरून व्यापारांत होत असलेला फरक दिसून येतो. यांपैकीं शेंकडा ९८ व्यापार ब्रह्मदेशांतूनच होतो.

सर्वांत जास्त माल ग्रेटब्रिटनमध्यें जातो. त्याच्या खालो-खाल इजिप्तमध्यें जात असून त्याचे खालोखाल फ्रान्स, जर्मनी किंवा हॉलंड येतें.

सामान्य उपयोग.—काताचा उपयोग रंगविण्याकडे फार करितात. कातड्याच्या कारखान्यांमध्यें त्याचा शेवटचा हात देण्याच्या कामीं फार उपयोग होतो. रेशमाला याचा उत्तम रंग बसतो. याचा खाण्याकडे होणारा उपयोग सर्वांस माहीतच आहे.

काताचे अंगीं स्तंभकधर्म असल्यामुळें हगवणींत अथवा रक्तस्रावांत त्याचा चांगला उपयोग होतो. मुख्यतः लहान मुलांच्या हगवणीवर त्याचा अधिक चांगला उपयोग होतो. त्याचें चूर्ण, अर्क अथवा काढा ह्यांचा नुसता अथवा दालचिनी वगैरे दुसऱ्या स्तंभक औषधांवरोबर उपयोग करितात. घसा बसला असतां किंवा पाऱ्यामुळें हिरड्या सुजून लाळ गळूं लागली असतां व रक्त येऊं लागलें असतां काताचा तुकडा तोंडांत धरून तो हळूहळू चघळीत राहिल्यास चांगला उपयोग होतो. दांत किडल्यामुळें ठणकूं लागल्यास काताची पूड दांतांच्या खळग्यांत भरावी. साध्या मलमांत कात मिसळून तें मलम व्रणांवर लावलें असतां ते बरे होतात [वॅट; भि. वि. पु. १८ पृ. २०१]

कातकरी.—काथकरी, काथोडी, काथोडिया. लो. सं. ९१३१९. ठाणें व कुलाबा जिल्ह्यांतील पश्चिमघाट, सुरतेभोंवता-लचीं संस्थानें व पुणें आणि नाशिक रस्त्यांवरील सह्याद्रीचा पायथा या भागांतून हे मुख्यत्वेंकरून आढळतात. हे मूळचे भिल्ल असून ते उत्तरेंतून (गुजराथ अन्ना-विशी) सुरत जिल्ह्यांत आले असावे असा तर्क आहे. रामाच्या वानरसेनेपासून आपली उत्पत्ति आहे असें हे सांगतात. त्यांच्या चालीरीती, स्वरूप व धर्म हीं पहातां, ते स्थानिक राष्ट्रजातींपैकीं असून त्यांच्यावर ब्राह्मणांचे कांहीं संस्कार झाले नाहींत असें दिसतें. त्यांच्या भाषेमध्यें कांहीं भिल्ल लोकांच्या भाषेमधील शब्द आहेत.

यांचा मूळचा धंदा कात करण्याचा होता. अजूनहि कांहीं लोक कात करतात. धान्याचा पुरवठा संपल्यावर हे लोक जळाऊ लांकडें व मध विकून पोट भरतात व कांहीं ससे, हरणें, माकडें यांच्या शिकारीवर आपली उपजीविका कर-तात. हे लोक रानउंदीरहि खातात. हे चोर व लुटारू म्हणून प्रसिद्ध आहेत.

या लोकांचे (१) अथावर, (२) धेड किंवा ढोर, (३) सिधी, (४) सोन किंवा मराठे व (५) वरप असे पांच पोटभाग असून त्यांमध्यें बेटीव्यवहार होत नाहीं.

मराठे कातकरी लोक गाईचें मांस खात नाहींत. गांवच्या विहिरीवर यांनां पाणी भरण्याची मनाई नाहीं. कुणब्यांच्या देवळांतहि यांनां जातां येतें. वरप हे ख्रिस्ती किंवा मुसुलमान

असावे असा तर्क आहे. भेड हे गोमांसभक्षक असल्यामुळें यांचा दर्जा सर्वांत खालचा आहे. यांच्या आडनांवांवरून यांचीं कुळें ठरलेलीं असून आडनांवें देवकांवरून ठरलेलीं आहेत. मोरे, वाघमारे इत्यादि यांचीं देवकानुसार आडनांवें आहेत. सोन लोकांमध्यें एक आडनांवें असणाऱ्या लोकांत विवाहसंबंध होत नाहींत. मुलींचीं लग्नें १२ ते १५ वर्षांपर्यंत होतात. लग्नाच्या पूर्वी एखादी स्त्री गरोदर राहिल्यास तिचें लग्न झालें तर तिला अपराधाबद्दल क्षमा मिळते; परंतु असलें लग्न पुनर्विवाहपद्धतीनें करावें लागतें. मुलाचा बाप मुलीची मागणी करतो व मुलीबद्दल ५ रुपये 'देज' देतो. पुनर्विवाहाची चाल यांमध्यें आहे. परंतु विधवेला पहिल्या नवऱ्याच्या कुळांतील माणसाशीं व मामे व मावस भावाशीं लग्न करण्याची मनाई आहे. जातीच्या मुख्याची संमति असल्यास घटस्फोट करतां येतो. कातकरी बायका इतर जातीच्या माणसांनां पळवून नेत असत व अशा रीतीनें पुष्कळ परजातीचीं माणसें आपल्या जातींत घेत असत. ठाणें जिल्ह्यांत वारली, कुणवी इत्यादि उच्च जातींचे लोक ५ रुपये घेऊन यांच्या जातींत घेतले जात असत असें म्हणतात.

कातकरी लोक वन्यहिंदु आहेत. 'व्याघ्रदेवता" ही त्यांची मुख्य देवता असून ते कुणव्यांच्या "गामदेव" "माओल्या", "म्हश्या", "चेडा" इत्यादि देवतांची पूजा करतात. यांमध्यें धर्मगुरू किंवा उपाध्ये नाहींत.

कुलाबा जिल्ह्यांत कातकरी लोकांच्या वाड्या असून त्या प्रत्येकावर एक नाईक नेमलेला असतो. त्याची जागा परंपरागत असते; परंतु तो निर्वंश झाल्यास दुसरा नाईक निवडला जातो. वाडीमधील पुढारी लोकांच्या सभेंत नाईक किंवा कारभारी अध्यक्ष असून तींत मुसुलमान, ख्रिस्ती इत्यादिकांबरोबर जेवणें, बायकोनें नवऱ्याबरोबर न रहाणें इत्यादि सामाजिक प्रश्नांचा निकाल दिला जातो. अपराधाबद्दल ५ ते २० रुपयांपर्यंत दंड होतो व तो दारू पिण्याकडे खर्चिला जातो.

**काथोडिया.**—(काथवडी) कात करणारे. हे सुरतच्या पूर्वेकडील व आग्नेयीकडील संस्थानांतून आढळतात. त्यांच्या बोलण्यांत, मराठी व गुजराथी शब्द मिश्र असतात. आपण उत्तरकोंकणप्रांतांतून गुजराथेंत आलों असें ते सांगतात. ते काळे, आंखूड बांध्याचे व राकट चेहऱ्याचे आहेत. काथोडिया पुरुष थोडीशी दाढी राखतात. स्त्रिया वेण्या घालतात. ते झोंपड्यांतून राहतात व बहुतेक सर्व प्राण्यांचें मांस खातात. मात्र आपोआप मेलेल्या प्राण्यांचें व घोडा, गाढव, मांजर, कुत्रा वगैरेंचें मांस खात नाहींत. पुरुषांचा पोशाख पागोटें, धोतर व कमरेभोंवती एक उपरणें, हा होय. ते हातांत पितळेच्या अगर चांदीच्या आंगठ्या घालतात. स्त्रिया लुगडें नेसतात व अंगांत चोळी घालतात आणि डोक्यावर ओढण्या घेतात. त्या कानांत बुगड्या व गळ्यांत मण्यांच्या माळा घालतात व दंडांत वेळा घालतात. ते मजुरी करतात व कात तयार करितात. त्यांनां अस्पृश्य मानण्यांत येतें. काथोडिया लोक भिलदेवाची आराधना करतात. ते आपलें उपाध्येपण ब्राह्मणांना देत नाहींत.

मुलांच्या जन्मानंतर सहाव्या दिवशीं पुष्कळ स्त्रिया जमून सटीची पूजा करतात, व भाताच्या देवीच्या प्रतिमा करून त्यांच्यापुढें दिवा लावतात. मुलाचें नांव त्याचा बाप अगर आई ठेवते. नंतर आप्तेष्टांना जेवणावळ घालतात. त्यांच्यांत विवाहाच्या वेळीं मुलामुलींचें वय सुमारें १५ वर्षांचें असतें. मुलगा विवाहास योग्य झाला म्हणजे त्याच्या घरांतील स्त्रिया मुलगी शोधून काढतात; व तिच्या बापाकडे जाऊन तिला मागणी घालतात. त्यानें रुकार दिल्यास सर्व मंडळी दारू पितात व लग्न ठरतें. नंतर कांहीं दिवसांनीं मुलाचा बाप वधूला आपल्या घरीं बोलावून अहेर व ३।४ रुपये हुंडा देतो व विवाहदिवस ठरवितो. विवाहदिवशीं सकाळीं वधुवरांनां हळद लागते. दुपारीं कमरेला तलवार लटकावून आपल्या इष्टमित्रांसह वर वधूगृहीं जाण्यासाठीं निघतो. त्याच्या पुढें कोंकणा ढोलकें वाजवीत जातो. तेथें पोहोंचल्यावर वराला वोहोल्यावर बसवून वधूचा भाऊ वधूला वोहोल्यावर आणतो, मग त्या दोघांच्या वस्त्रांनां कोंकणा गांठ देतो. नंतर कांहीं वेळानें गांठ सोडल्यानंतर स्त्रिया गाणीं म्हणूं लागतात व वधूला तिचा भाऊ व वराला त्याचा चुलता उचलून घेतो. मग ते सर्व नाचतात व फेर धरतात. मुलीच्या बापाला परवडल्यास तो व्याहीभोजन देतो. जेवणानंतर वर वधूला बरोबर घेऊन परत आपल्या घरीं जातो. त्यांच्यांत विधवाविवाहाची चाल असून, पुरुषाला एकाच वेळीं अनेक बायका करतां येतात. ते प्रेताला स्नान घालून हळद फांसतात व मग त्याला चितेवर ठेवून त्याच्या तोंडांत भात घालतात व मग चितेला अग्नि लावतात. प्रेत पूर्णपणें जळल्यावर सर्व मंडळी परत जातांना वाटेनें दारू पितात. तिसऱ्या दिवशीं ते स्मशानांत जाऊन थोडीशी राख नदींत टाकतात, व बाकीच्या राखेचा ढिगारा करून त्यावर भात ठेवतात. नंतर मृताच्या नांवानें लहान मुलांना जेवण घालतात. पुढें सवड झाल्यावर ते मृताच्या नांवानें जातीला जेवण घालतात. यापुढें मृताचें श्राद्ध वगैरे कांहीं एक करीत नाहींत. यांच्यांत पंचायत ऊर्फ जातगंगा व तिचे पुढारी असतात. यांच्यांत शिक्षणाचा अभाव आहे [मुं. ग्या. पु. ९ भा. १].

**सोन कातकरी.**—हे साधारणतः ठाणें जिल्ह्यांत स्थानिक झाले आहेत. भिवंडी तालुक्यांत, तांदुळ स्वच्छ करणें वगैरे निरनिराळीं शेतकीचीं कामें हे लोक करतात त्यामुळें उदरनिर्वाहाकरितां त्यांनां दुसरीकडे जाण्याचें कारणच नसतें. यांचा पूर्वींचा व्यवसाय खैराच्या झाडापासून कात तयार करणें हा आहे व अजूनहि कांहीं कातकरी हा धंदा करतात. सरकारी जंगलें राखीव झाल्यापासून यांच्या धंद्याचें क्षेत्र बरेंच आकुंचित झालें आहे. खासगी व इनाम खेडेगांवांत

जो कच्चा माल मिळेल त्यावरच प्रायः यांनां अवलंबून रहावें लागतें. हे कामानिमित्त जंगलांत गेल्यावर आपली झोंपडी फार पवित्र मानतात व सूचना दिल्याशिवाय कोणालाहि आंत येऊं देत नाहींत. झाडकापणीस सुरुवात करण्याच्या आधीं ते झाडाची पूजा करतात, त्याला शेंदूर फांसतात, नारळ ठेवतात आणि भक्तीनें "कार्यांत यश येवो" अशी प्रार्थना करतात.

लग्न विधि—जातींतील धर्मशील असा एखादा कातकरी प्रायः लग्नविधि चालवितो व याला "गोतर्णी" असें म्हणतात. लग्नसमारंभ पांच दिवस चालतो. लग्नाच्या दिवशीं नवरामुलगा पांढरें पागोटें व धोतर नेसून मुलीच्या मंडपांत प्रवेश करतो. मुलाचा बाप मुलीला हिरवें लुगडें व तांबड्या चोळीचा आहेर करतो. मुलगी लुगडें नेसून येते व मंडपाच्या दाराशीं उभ्या असलेल्या नवऱ्याच्या गळ्यांत बापानें तयार केलेली फुलांची माळ घालते व जोडपें मंडपांत प्रवेश करतें. दोघांनां एकमेकांसमोर उभें करून अंतःपट धरतात. एका बाजूला गोतर्णी बसतो, व दुसऱ्या बाजूला जातींतील चार शिष्ट बसतात. मुलाचा बाप चार शिष्टांनां पैसा, सुपारी, अक्षता वाटतो व शिष्ट हे जिन्नस हातीं धरून बसतात. गोतर्णी घोंगडीवर विवक्षित तऱ्हेनें अक्षता मांडतो व मध्यें पैसा ठेऊन स्वतःच्या हातांतील पैसासुपारी त्यावर टाकतो. नंतर ते शिष्टहि पैसा, सुपारी, अक्षता वगैरे गोतर्ण्याप्रमाणें घोंगडीवर टाकतात. मग अंतःपट काढण्यांत येतो, व नवरानवरी मंडपाभोंवतीं ५ प्रदक्षिणा करतात. प्रदक्षिणा झाल्यावर नवरानवरी गोतर्ण्यानें मांडलेल्या पाटावर बसतात व जमलेले शिष्ट व इतर लोक नवरानवरींचीं डोकीं पाटासमोर मांडलेल्या अक्षतांनां स्पर्श होईल इतकीं खालीं नमवितात. इतकें झाल्यावर विवाहविधि आटपला असें समजण्यांत येतें. नंतर जेवण देण्यांत येतें. मुलीचें सासरचें नांव याच वेळीं ठेवतात. लग्नाच्या दुसऱ्या व तिसऱ्या दिवशीं नवरामुलगा आपल्या बायकोसह आपल्या घरीं जातो. गोतर्णी व इतर शिष्टमंडळीहि बरोबर असतात. घरीं गेल्यावर मंडपांत गोतर्णी दोन पाट मांडतो. व त्यापुढें बावीस तांदुळाचे ढीग मांडतो. पाटावर बसल्यावर मुलगी उजव्या हाताचा आंगठा व डाव्या पायाचा आंगठा प्रत्येक ढिगाला लावून नवऱ्याचें प्रत्येक वेळीं नांव घेते. चवथ्या दिवशीं गळ्यांतील माळा काढून टाकतात.

मूल जन्मल्यावर पांचवे दिवशीं घरांतील वृद्ध माणसांच्या विचारानें मुलाचें नांव ठेवण्याची चाल यांच्यांत आहे. बाळंतपणाच्या वेळीं सुइणीची मदत अवश्य घेतात. ती पांच दिवस बाळंतिणीस रोज दोन वेळां न्हाऊ घालते. ब्राह्मणाकडून मुलाची जन्मपत्रिका करवीत नाहींत.

ढोर कातकरीः—यांची विवाहपद्धति वेगळीच असते. लग्नाच्या दिवशीं नवरा मुलगा आप्तेष्टांसह मुलीच्या घरीं येतो व लग्नमंडपापासून दूर उभा रहातो. मुलगी हातीं उपरणें घेऊन बाहेर येते व तें नवऱ्याच्या गळ्याभोंवतीं टाकून त्याला म्हणते "उठा नवरदेव मंडपांत या." असें म्हटल्यावर नवरा मंडपांत येतो. मंडपांत पाहुणे मंडळी बसलेली असतात. नवरानवरी आंत आल्यावर त्यांच्यामध्यें एक धोतर पसरतात व नवरानवरी त्याचीं टोंकें अगर पदर हातीं धरतात. नवरा नवरीला "उरेल आणि पुरेल" असें म्हणून हातीं धरलेला पदर तिच्या बाजूस टाकतो. उलट ती नवऱ्यास 'नाहीं उरेल आणि नाहीं पुरेल' असें म्हणून हातचा पदर त्याच्या बाजूस टाकते. अशीं प्रश्नोत्तरें पांच वेळ झाल्यावर त्यांनां घोंगडीवर बसवतात. घोंगडीवर चार बाजूस चार व मध्यें एक असे पांच शिष्ट अगोदरच येऊन बसलेले असतात.

प्रत्येकाच्या हातीं पैसा, सुपारी, विड्याचीं पानें व अक्षता असतात. नवरानवरी घोंगडीवर येऊन बसण्याच्या आधीं शिष्ट हातांतले जिन्नस घोंगडीवर टाकतात, व त्यावर नवरानवरीला बसवतात. घोंगडीवर बसल्यावर नवरानवरी एकमेकांच्या गळ्यांत हार घालतात. नंतर जमलेल्या पाहुणे मंडळींना दारू व जेवण देण्यांत येऊन लग्नसमारंभ आटोपतो.

कातकऱ्यांत अशी एक विलक्षण चाल आहे कीं, पटकीनें मनुष्य मेला तर पटकीची सांथ बंद होईतोंपर्यंत त्याला पुरतात व सांथ बंद झाल्यावर पुन्हां प्रेत उकरून जाळतात. रात्रीं मयत झाल्यास दहनविधि सकाळीं उरकतात. मयताभोंवती जमून गाणेंबजावणें करून रात्र जागवतात.

भाद्रपद महिन्यांत, त्याचप्रमाणें शिमग्यांत व दिवाळींत मृताचें श्राद्ध करतात. घराच्या छपरावर पिंड ठेवणें हाच प्रायः श्राद्धविधि असतो. [ मुं. गॅ. सेसन्स रिपोर्ट; एंथोवेन ].

**कांतकाम**—कांतकाम याचा साधारण अर्थ, लांकूड किंवा धातू यास यंत्रावर चढवून, फिरवून हत्यारानें त्याला निरनिराळे आकार देणें असा आहे. कांतकामाचे जरूरीप्रमाणें पुष्कळ प्रकार आहेत. त्याप्रमाणें त्यास लागणारीं यंत्रें व हत्यारेंहि पुष्कळ प्रकारचीं आहेत. लोखंडाचें कांतकाम व धातूचें कांतकाम असे याचे दोन मुख्य प्रकार आहेत.

लांकूड हें धातूपेक्षां फारच मऊ असतें. त्यामुळें त्यावर काम करण्यास मेहनत कमी पडते व शक्तीहि कमी लागते. निरनिराळ्या लांकडांच्या मऊपणामध्यें पुष्कळ फरक असतो. तसेंच लांकडाचे दोरे ( रेषा ) हेहि निरनिराळे असतात. यामुळें सगळ्याच लांकडांवर सारखें कांतकाम होतें असें नाहीं. कांहींवर चांगलें स्वच्छ तर कांहींवर खरवरीत होतें. या दुसऱ्या जातीचीं लांकडें गुळगुळीत करावयाचीं असल्यास तीं हातानें घांसून करावीं लागतात. जुन्या तऱ्हेच्या देशी कांतकामामध्यें, दोन लांकडांच्या ठोकळ्यांनां समांतर असे दोन लोखंडी टोंकदार खिळे बसविलेले असत. त्यांमध्यें जें

लांकूड कांतावयाचें असेल तें बसवीत. या लांकडाला समांतर अशी जाड लोखंडाची किंवा टणक लांकडाची सळई असते. तिचा उपयोग कांतण्यासाठीं उपयोगांत आणण्याच्या हत्याराला टेंका देण्याच्या कामीं करीत. लांकूड फिरविण्यासाठीं एका वांकविलेल्या काठीला दोरी बांधून त्या दोरीचे एक दोन फेरे लांकडावर घेत असत. पण या युक्तीचा उपयोग फक्त लहान सहान कामें करण्याकडेच होतो. लांकडाचें मोठें कांतकाम करावयाचें असल्यास एक मोठें चाक व एक किंवा दोन माणसें लागतात. त्या चाकावरून कांतावयाच्या लांकडावर दोरी घेतलेली असते व तीमुळें लांकूड फिरतें. बाकी काम वरील प्रमाणेंच करावयाचें असतें.

आपल्याकडे होणारें सर्व देशी लांकडी काम या तऱ्हेनेंच होतें. सर्व तऱ्हेचीं निरनिराळीं रंगीत खेळणीं, खुर्च्या, टेबलें, पलंग, कठडे वगैरेंनां लागणारें सामान इत्यादि सर्व या तऱ्हेनेंच होतें. कारण यामध्यें चौकोनी लांकडाला निरनिराळे वाटोळे आकार द्यावयाचे असतात. हल्लीं विलायतेंत लांकडाचें काम फारच पुढें गेलेलें आहे. आरशांच्या फ्रेमीला लागणाऱ्या नक्षीदार पट्ट्या, पातळ लांकडी वशा निरनिराळ्या जातीचे दांडे इतकेच काय, पण पुष्कळ वेळां लहान लहान लांकडी पुतळेसुद्धां तिकडे यंत्रानें कांतून करतात.

या कामासाठीं निरनिराळीं यंत्रें लागतात. सर्वसाधारणपणें कांतकाम करण्यासाठीं लागणाऱ्या यंत्राला कांतयंत्र ( लेथ ) असें म्हणतात. याच्या तऱ्हा पुष्कळ आहेत. कांहींमध्यें लांकूड फिरत असतें व हत्यार स्थिर असतें, तर कांहींमध्यें हत्यार फिरत असतें पण लांकूड मात्र स्थिर असतें; कांहींमध्यें दोन्ही फिरत असतात. फ्रेमीच्या पट्ट्या तयार करणाऱ्या यंत्रांत एका लोखंडाच्या सळईवर बसविलेलें व ज्या तऱ्हेची पट्टीवरची नक्षी असेल त्या तऱ्हेचें एक चाक फिरत असतें. त्याला चांगली धार असते. त्याच्या खालून लांकडी पट्टी जात असते. चाक फिरत असतांना पट्टीला ठिकठिकाणीं घांसून, ज्या ठिकाणीं जो आकार पाहिजे असेल त्या ठिकाणीं वरील घांसण्यानें पट्टीला आकार मिळतो. एकाच चाकानें एकाच जातीचा आकार देतां येतो. निरनिराळे आकार द्यावयाचे असल्यास निरनिराळीं चाकें लावावीं लागतात.

लांकडाच्या लहान लहान पातळ वशा वगैरे करण्याचें कातयंत्र निराळें असतें. तें थोड्या कामाच्या मुळींच उपयोगी नसून जेव्हां पुष्कळ काम करावयाचें असेल तेव्हांच त्याच्यापासून फायदा होतो. लांकडाचे एकाच जातीचे दांडे करावयाचे असल्यास निराळेंच कांतयंत्र लागतें. प्रथम नमुन्याचा एक लोखंडी दांडा करतात. नंतर या यंत्राच्या मध्यभागीं दांड्याच्या लांबीचा एक लांकडाचा तुकडा बसवितात. दांडा कांतणारें हत्यार लांबीशीं समांतर मागेंपुढें होत असतें. याचें एक टोंक दांड्याला लागलेलें असतें व दुसरें टोंक वरील लोखंडाच्या दांड्यावर टेंकलेलें असतें. कातयंत्रांतील विशेष योजनेमुळें तें चालू केलें म्हणजे ज्या तऱ्हेचा आकार लोखंडी दांड्याला दिलेला असतो त्याच तऱ्हेचा हुबेहूब आकार लांकडी दांड्याला येतो. अशा रीतीनें एकाच आकाराचे हवे तेवढे दांडे तयार करतां येतात.

पुतळे करण्याचें कांतयंत्रहि ह्याच प्रकारचें असतें. त्यांत ज्या तऱ्हेचे पुतळे करावयाचे असतील तसला एक पुतळा प्रथम लोखंडी किंवा इतर टणक धातूचा बनवावा लागतो. मात्र या जातींचें कातयंत्र जास्त भानगडीचें असतें.

लांकडाचें कांतकाम व धातूंचें ( विशेषतः लोखंडाचें ) कांतकाम यांत फारच फरक आहे. धातूंचें काम चांगल्या यंत्राशिवाय चांगलें होत नाहीं. हीं कांतयंत्रें निरनिराळ्या प्रकारचीं असतात. ( १ ) अगदीं साधें, ( २ ) स्क्रू करणारें, (३) उभें ( व्हर्टिकल ), (४) सपाट ( हॉरिझॉंटल ), (५) टरेट ( ६ ), स्पेशल व ( ७ ) बोअरिंग इत्यादि. मिलिंग यंत्रहि याच सदरांत येतें. त्यांत फरक येवढाच कीं, साध्या कांतयंत्रावर जसें निरनिराळ्या प्रकारचें काम करितां येतें तसें उभें, सपाट किंवा मिलिंगयंत्रावर करितां येत नाहीं. हीं यंत्रें कांहीं विशेष कामाच्याच सोयीसाठीं केलेलीं असतात.

साध्या कांतयंत्रामध्यें एका बिडाच्या चौकटीवर डाव्या बाजूला दोन आंवणां( बेअरिंग )मध्यें एक लोखंडी चाती ( स्पिंडल ) बसविलेली असते. ही चाती बहुतकरून पोकळ असते. चातीवर दोन आंवणांमध्यें गति कमीजास्त करणारा एक कोन बसविलेला असतो. याला 'सिंगलगिअर हेडस्टॉक' असें म्हणतात. याचा उपयोग फक्त पितळेसारख्या मऊ धातूंच्या कामीं होतो. डबल गिअर हेडस्टॉकमध्यें कोनापासून चाती सुटी करतां येते. तसेंच दात्यांचीं चक्रें चातीवर चढविण्यासाठीं कोनाच्या बाजूला, दुसऱ्या एका दात्यांच्या चाकाची चाती बसविलेली असते. जेव्हां मुख्य चातीची गति कमी करावयाची असते तेव्हां तिच्या दुसऱ्या बाजूचें मोठ्या दात्यांचें चक्र कोनांतील दात्यांच्या लहान चक्रांत येऊन बसतें. त्या वेळच्या दुसऱ्या एका योजनेमुळें मुख्य चातीची गती वाढवितां येते. ज्यावेळेस मुख्य चाती व कोन बरोबरच चालावयाचे असतात त्या वेळेस ही दुसरी दात्यांची चाती बाजूला करतां येते.

या गिअरहेडच्या चातीच्या पोकळीमध्यें एक बारीक टोंकाचा "सेंटर" ( उर्फ टोंक ) तुकडा बरोबर मध्यांत बसविलेलें असून तें सतत फिरत असतें. याच्या समोरच पण यंत्राच्या चौकटीवर बसविलेला व मागेंपुढें करितां येणारा एक लोखंडी ठोकळा असतो. त्याला "सेंटर स्टॉक" किंवा सेंटरहेडस्टाक असें म्हणतात. या ठोकळ्यांत दुसरा एक लोखंडी सेंटर ( उर्फ टोंक ) मधोमध बसविलेला असतो, तो मात्र स्थिर असतो. चांगलें कांतकाम करावयाचें असल्यास हे दोन्ही सेंटर्स अगदीं समोरासमोर असावे लागतात. नाहीं

तर असल्या टोकांत लावलेलें काम सरळ सुतांत येत नाहीं; वांकडेंतिकडें येतें, विशेषतः निमुळतें येतें. कांतयंत्रांतील चौकटीवर बसविलेली व मागेंपुढें करितां येणारी " स्लाईड रेस्ट " ही या यंत्रांत एक अतिशय महत्वाची वस्तु आहे. यंत्राच्या ज्या बाजूला माणूस उभा असतो तिकडे एका ( यंत्राच्या लांबीइतक्या )दांड्याला दांते पाडलेले असतात. त्या दांत्यांत फिरेल असें एक चक्र या "स्लाईड रेस्ट" मध्यें बसविलेलें असतें. हें चाक फिरविलें असतां ही रेस्ट मागेंपुढें होते. या रेस्टवर काटकोनांत बसविलेला एक लांब स्क्रू असतो. हा स्क्रू, म्हणजे दांत्याचा दांडा, मागें पुढें न होतां जाग्यावरच फिरतो. ही रेस्ट त्याला फिरविणाऱ्या दांड्यासुद्धां वाटोळी फिरावी अशीहि एक योजना तेथें केलेली असते. याचा उपयोग निमुळतें काम करण्यासाठीं होतो व केव्हां केव्हां स्क्रू करण्यासाठींहि होतो. या रेस्टवर कांतण्याचें हत्यार बसवितात. एका विशिष्ट योजनेमुळें रेस्टवर लावलेलें हत्यार आपल्या कामाप्रमाणें मागेंपुढें व उभेंआडवें नेतां येतें. नटांना किंवा स्क्रूंना आटे पाडावयाचे असल्यास स्लाईड रेस्टच्या मागल्या बाजूला दांत्यांचीं चाकें जोडण्याची व्यवस्था केलेली असते. नट अगर स्क्रू लहान, मोठे किंवा कमी, जास्त व डावे उजवे असतील त्याप्रमाणें हीं चाकें बदलावीं लागतात. अलीकडे नवीन जातीचीं कांतयंत्रें निघालीं आहेत. त्यांमध्यें हीं सर्व चाकें एकदमच बसविलेलीं असतात. आटे जसे व जितके पाडावयाचे असतील त्याप्रमाणें चक्रावरचे एक दोन दांडे फिरवूनहि काम करतां येतें. या योजनेला क्विक चेंज गियर म्हणतात.

कांतयंत्रावर काम करण्यासाठीं जो डाग लावावयाचा, तो त्यावर जसें काम करावयाचें असेल त्याप्रमाणें पकडावा लागतो. याला बांधी करणें असें म्हणतात. हे बांधी करण्याचे प्रकार पुष्कळ आहेत. अगदीं साधा डाग ( जाड किंवा बारीक गज ) कांतावयाचा असल्यास त्याच्या दोन्ही टोंकांस त्याच्या मधोमध खुणा कराव्या लागतात. त्या साध्या अणकुचीदार पंचनें(खिळ्यानें)करतात, पण या खुणा सेंटर ड्रीलनें पाडल्यास जास्त चांगल्या. कारण पहिल्या तऱ्हेनें डाग यंत्रांत बरोबर मध्यें बसत नाहीं. कांतकाम करीत असतांना हत्याराचा जोर लागून या खुणा थोड्या चळतात. यामुळें काम थोडें निमुळतें होतें. ड्रीलनें खुणा पाडल्या असतां हत्याराचा जोर सर्व भागावर सारखा बसून डाग चळत नाहीं.

डाग फिरण्यासाठीं ( चातीशिवाय आणखी ) कशानें तरी पकडावा लागतो. त्या साधनाला पकड म्हणतात. तिला एक बोल्ट असतो. ती जो डाग करावयाचा असेल त्याच्या फिरत्या टोंकाला लावितात व बोल्टानें पिळून घट्ट बसवितात. तिचा दांडा बहुतकरून वांकडा केलेला असतो. डाग लहानमोठ्या व्यासाचा असेल त्याप्रमाणें लहानमोठ्या पकडी असाव्यात. कांतयंत्राच्या चातीवर डावीकडे तिच्या बाहेरच्या बाजूस आटे पाडलेले असतात. त्या आट्यांवर डाग पकडण्यासाठीं निरनिराळ्या आकारांचीं चाकें असतात. चाक त्या आट्यांवर बसविलें म्हणजे चातीबरोबर तेंहि फिरतें. या चाकाला एक भोंक असतें. त्या भोंकांत जो डाग कांतावयाचा असेल त्याचें एक टोंक जातें. अशा रीतीनें चाक फिरावयास लागलें म्हणजे त्याच्याबरोबर पकड व त्यानें धरलेला डागहि फिरावयास लागतो.

या चाकाचे प्रकार बरेच आहेत पण त्यांत विशेष मुख्य म्हणजे सपाट चाक व सेंटर चाक हेच आहेत. सपाट चाकाचा उपयोग फार असतो. बहुतेक सर्व तऱ्हेचीं वाकडीं तिकडीं कामें याच्यावरच पकडतात. हें चाक म्हणजे एक वाटोळा जाड बिडाचा पत्रा असतो. याला पुष्कळशीं भोंकें पाडलेलीं असतात. डाग लावतांना जमेल त्याप्रमाणें या निरनिराळ्या भोंकांतून बोल्ट घालून किंवा दुसऱ्या तऱ्हेनें जशी योग्य दिसेल तशी बांधणी करून घेतां येते. या चाकासारख्या आणखीहि डाग पकडण्याच्या दुसऱ्या योजना आहेत. त्यांनां घट्ट पकडी ( चक ) असें म्हणतात. या पकडीहि दोन चार प्रकारच्या आहेत. त्यांचीं नांवें कुत्तापकड, घंटीपकड, शारपकड वगैरे. यांपैकीं कुत्तापकडीचा उपयोग सपाट चाकाइतका होतो. तिच्यावरील चार पकडींत कुत्रा जसा आपल्या जबड्यांत पदार्थ पकडतो त्याप्रमाणेंच डाग या चक्रामध्यें पकडला जातो. या चारहि पकडी वरखालीं होत असतात. यामुळें आपणास हव्या असलेल्या जागेवर डाग पकडतां येतो. वाटोळे, चौकोनी, षट्कोनी, अष्टकोनी, वगैरे डाग पकडावयाचे असल्यास मध्यवर्ति म्हणून एक पकड आहे तिचा चांगला उपयोग होतो. कारण तिच्यामध्यें डाग नीट चांगला पकडला म्हणजे एकदम मधोमधच येतो. एकाच जातीचें पुष्कळ काम करावयाचें असल्यास याचा फारच उपयोग होतो. यामध्यें वेळ कमी लागून कामहि झपाट्यानें होतें. घंटीपकड ही आंतून पोकळ घंटेच्या आकाराची असते. हिला पुष्कळ भोंकें पाडलेलीं असतात. त्यांनां आटे पाडून त्यांत लांब बोल्ट बसविलेले असतात. या भोंकांमध्यें डाग घालून बोल्टांनीं दाबून त्याला आपणांस लागेल तसा पकडतां येतो. शारपकडीचा (ड्रीलचक) उपयोग भोंकें पाडण्यासाठीं फार होतो. ही लावावयाची असल्यास कांतयंत्राचीं सेंटरें काढून घेऊन त्या ठिकाणीं ती बसवितात. जर फिरत्या डागाला भोंक पाडावयाचें असेल तर डाग फिरता ठेवून स्थिर टोंकाच्या ठिकाणीं ही बसवितात व त्यांत शार घालतात व मग चाती चालू करून डाग किंवा शार पुढें आणून भोंक पाडतात.

जेथें साधारण काम करावयाचें असतें त्या ठिकाणीं साधें कांतयंत्र चालतें. बारीक कामाचें कातयंत्र भारी किंमतीचें असतें. असल्या कातयंत्राचा उपयोग विलायतेंत किंवा अमेरिकेंत फार होतो. असल्या यंत्राची चाकी पोकळ व मोठी असते यामुळें ती हालत नाहीं. ज्या स्क्रूनें हत्यार डागावर पुढें मागें होतें त्या स्क्रूवर तो फिरविण्याच्या दांड्यापाशीं

एक वाटोळी चकती बसविलेली असते. तिचे १२५ सारखे भाग पाडलेले असतात. क्वचित् २५० हि असतात. हा स्क्रू फार चांगला असावा लागतो. याचा पिंच (एक थ्रेड व एक ग्यांप यांचें अंतर) १/८ किंवा १/१६ इंच असतो. दांडा फिरवितांना स्क्रू जेव्हां एक भाग पुढें जातो तेव्हां हत्यार एक इंचाच्या एक हजारांश पुढें जातें. यामुळें काम अगदीं बरोबर करतां येतें. इतकें बारीक काम करण्याकरितां लागणारें हत्यारहि अगदीं धारेचें असावें लागतें. असलीं हत्यारें पोलादी असतात. त्यांची धार म्हणण्यासारखी बोथट होत नाहीं. व कामहि फार झपाट्यानें होतें. कांतयंत्रावर किती तऱ्हेनें काम करितां येतें हें सांगतांच येणार नाहीं. तें काम करणाऱ्यावर व त्याच्यापाशीं असलेल्या उपकरणांवर अवलंबून राहील. जवळ जवळ असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं बाकी सर्व यंत्रावरील (म्हणजे दात्यांचें यंत्र, भोंकें पाडण्याचें यंत्र, शेपिंग यंत्र इत्यादीवरील) होणारें बहुतेक काम कांतयंत्रावर करतां येतें व तें पुष्कळ वेळां जास्त चांगलें असतें. एका हुशार कामकऱ्यानें या कामाचे जवळ जवळ शंभर सवाशें प्रकार आपल्या यंत्राच्या चित्रांत दाखविले आहेत. त्यांत विशेषतः लांब दांडे कांतणें, नळकांडें तयार करणें, दट्ट्या, दट्ट्याच्या कड्या वगैरे कांतणें, भोंकें पाडणें, चावीचे गाळे पाडणें, लहान लहान मिलिंगचें काम करणें इत्यादि प्रकार आहेत. जेव्हां काम अगदीं बरोबर असून अगदीं गुळगुळीत व चकचकीत करावयाचें असतें त्यावेळचें घांसण्याचें कामहि कातयंत्रावर करतात. मोटारगाडीचा आंस, नळकांडे, पुष्कळ इंजिनांचे आंस वगैरे अगदीं घासून बरोबर करावे लागतात. कारण त्यामुळें घर्षणांत फुकट जाणारी पुष्कळ शक्ति वांचते. कोणत्याहि कारखान्यांत इतर यंत्रांपेक्षां हीं कांतयंत्रेंच जास्त असतात.

खास पोलादी हत्यारें चांगलीं. नुसत्या पोलादी पाण्याचीं पुष्कळ दिवस टिकत नाहींत. त्यांची धार लवकर खराब होते. पोलादाचें हत्यार फार टणक असतें. याला पाणी देण्याचें कारण पडत नाहीं. तसेंच त्याची धारहि वरेच दिवस खराब होत नाहीं. हत्यार चालत असतां तापून लाल झालें तरी त्याची धार लवत नाहीं किंवा बसत नाहीं. या हत्यारामुळें जुन्या तऱ्हेनें काम करण्यास जो वेळ लागतो त्याच्या पाव हिश्शांत यानें काम होतें व तेंहि चांगलें होतें. काम लवकर व सफाईदार करणें असल्यास हीं पोलादी हत्यारें अवश्य वापरलीं पाहिजेत. हें पोलाद बहुतेक चौकोनी असतें. क्वचित वाटोळेंहि मिळूं शकतें. जाड पोलाद वापरल्यास ज्या जातीचें हत्यार पाहिजे असेल त्या तऱ्हेचा आकार पहिल्यानें लोहाराकडून त्याला द्यावा लागतो. हवा तो आकार दिल्यावर तें हत्यार कुरुंदाच्या सहाणेवर घांसून चांगलें धारेचें करून घ्यावें लागतें. नेहमीं घासल्यामुळें हत्यारें अखूड होतात. यासाठीं अलीकडे एक नवी तऱ्हा निघाली आहे. पाव इंच किंवा तीन दोरे जाडीचे या जातीच्या पोलादाचे चौकोनी तुकडे मिळतात व त्यांना पकण्यासाठीं पकडीहि असतात. चौकोनी पोलादी तुकडा कुरुंदावर घांसून आपणांस हवा तसा आकार त्यास दिला म्हणजे तो या पकडीमध्यें पकडून काम केलें असतां तें फार चांगलें होऊन पोलादहि कमी लागतें व हत्यारें घडविण्याचा सर्वच त्रास वांचतो. परदेशी मालाच्या चढाओढीसाठीं ही रीत प्रचारांत आणणें भाग आहे. एखादें मोठें भोंक पाडावयाचें असल्यास शाराचा दांडा बोअरिंगबार म्हणून हत्यार असून तें दोन तऱ्हेचें असतें एकांत दांडा कातयंत्राच्या दोन टोकांत फिरत असतो व ज्या वस्तूचें भोंक मोठें करावयाचें असेल ती वस्तू चौकटीवर स्थीर असते. दुसऱ्या प्रकारांत वस्तु फिरत असते. पहिल्या जातीच्या शाराच्या दांड्याला मध्यें एक भोंक असतें त्यांत धार असलेला पोलादाचा तुकडा बसविलेला असतो. दुसऱ्या जातीच्या शाराच्या दांड्याच्या टोंकाला पोलादी हत्याराचा तुकडा बसविण्याची व्यवस्था असते.

कातयंत्राचा टरेट यंत्र म्हणून एक प्रकार आहे. जेव्हां एकाच कामाला पुष्कळ जातीचीं हत्यारें वापरावीं लागतात व असल्या तऱ्हेचें पुष्कळ काम करावयाचें असतें तेव्हां हें यंत्र वापरतात. याच्या हत्यारें पकडण्याच्या पकडींत व चाकांत सर्वत्र भोंकें पाडलेलीं असतात. भोंकांमध्यें हत्यारें धरण्याची व्यवस्था असते. यामुळें एकाच वेळेस त्यांत सहा प्रकारचीं हत्यारें भरतां येतात. यामुळें एका हत्याराचें काम संपल्यावरोबर टरेट फिरवून दुसरें हत्यार तावडतोब उपयोगांत आणतां येतें व वेळ वांचतो. केव्हां केव्हां काम केल्यावरोबर कोणीहि हात न लावतां आपोआप टरेट फिरून एका हत्याराच्या जागीं दुसरें हत्यार येतें.

भोंकें पाडण्याचें कांतयंत्र उभ्या आणि आडव्या दोन्ही जातीचें असतें. त्यावर पोकळ नळकांडें करणें, चाकें कांतणें वगैरे विशेष तऱ्हेचें काम होतें. दात्यांच्या यंत्रावर (मिलिंगयंत्र) पुष्कळ निरानिराळें काम होतें. दातें पाडणें हें त्याचें एक मुख्य काम आहे, पण निरनिराळीं हत्यारें लावून चावीचे गाळे पाडणें, दागिने घांसून काढणें इत्यादि पुष्कळच कामें या यंत्रावर करतां येतात. शेपिंग व प्लेनिंग या यंत्रांत कोणताहि दागिना घांसून काढण्याचें काम होतें, मात्र त्याची तऱ्हा निरनिराळी असते. कतकामांत मुख्यतः तीनच धातू वापरतात. त्या पितळ, पोलाद किंवा लोखंड आणि बींड ह्या होत. पितळ फार मऊ असल्यानें काम करण्यास जवळ जवळ लांकडा इतकें सोपें जातें. तें मऊ असल्यामुळें त्याच्या डागाला कांततांना पुष्कळ वेग द्यावा लागतो. कमी दिल्यास धातू कातली न जातां खड्डे पडावयास लागतात यावर चकाकीहि जलदी येते. लोखंड ही धातू पोलादापेक्षां कांहींशी मऊ आहे. ह्या धातूचें काम करतानां कांतयंत्र डबल गिअरचें अगर कोनांच्या मोठ्या चाकाचें असावें लागतें. याला वेताची गति पुरते. काम करतवेळीं याचे ढलपे न निघतां लांबचलांब तार निघत असते पोलाद निरनिराळ्या जातीचें असून लोखंड

सारखे मऊ व विडापेक्षां कडक असतें. यामुळें जसें पोलाद असेल त्याप्रमाणें गति व हत्यार असावें लागतें. बीड कांतींत असतांना मात्र गति फार ठेऊन चालत नाहीं. कारण तें घनवर्धनीय नाहीं. यामुळें त्याची लांब तार न निघतां बारीक ढलपेच निघत असतात. यामुळें बिडाच्या डागाच्या वेळीं कातयंत्र हें डबल गिअरनेंच चालवावें लागतें.

यंत्रावर डाग लावतांना तो मध्यबिंदूंत बरोबर बसविणें हें फार जरूरीचें असतें. जर तो तसा बसविला नाहीं तर काम निमुळतें होतें. यासाठीं डाग यंत्रावर पकडून त्यावर ताव-डतोब हत्यार न लावितां प्रथम तो हळूहळू फिरवावा. डाग फिरत असतांना हत्याराच्या बैठकीवर त्याला टेकेल पण दावला जाणार नाहीं असा खडूचा तुकडा हातानें धरावा.डाग फिरतांना जेथें तो ( मध्यबिंदूच्या ) पुढें आलेला असेल त्या ठिकाणीं त्याला खडू लागेल व अर्थातच त्याच्या दुसऱ्या बाजूला डाग आंत आल्यामुळें खडू लागणार नाहीं. अशा रितीनें डाग वारंवार तपासून व तो मागेंपुढें करून त्याला नीट मध्यावर पकडावा व मग त्यावर हत्यार लावून काम सुरू करावें. चांगले कामकरी ( जिनगर ) तर नुसत्या डोळ्यांनींहि ( सततच्या सवयीमुळें ) डाग मध्यबिंदूंत पकडतात.

हत्यारें लावण्याची ( पाजविण्याची ) तऱ्हाहि निरनिराळी आहे. मऊ धातूंवर काम करतांना लागणारा हत्यारांचा आकार, कडक धातूंवर लावण्याच्या हत्यारांच्या आकारापेक्षां थोडा निराळा असतो. तो हळूहळू अनुभवानें समजतो. हत्यार लावतांना तें बरोबर मधोमध लावलें पाहिजे, म्हणजे त्याची आणि कातयंत्राच्या मध्यबिंदूंची पातळी समांतर ( एक पातळींत ) असली पाहिजे नाहींतर काम करतांना डाग हादरावयास लागतो; म्हणून याकडे विशेष लक्ष द्यावें लागतें. कामाच्या वेळेस लागणारीं हत्यारेंहि चांगलीं धारेचीं ठेवण्याची काळजी घ्यावी म्हणजे काम चांगलें होतें. [ ले. व्ही. एच्. मनोहर ].

**कातडीं**--पूर्ण वाढ झालेल्या गाई, बैल, म्हशी, घोडे वगैरेंच्या कमावलेल्या कातड्यांनां बाजारांत पक्कें चामडें असें म्हणतात. वासरें, मेंढ्या, बकऱ्या, हरीण व दुसरीं जंगली जनावरें यांच्या चामड्यांनां कोवळें चामडें म्हणतात. व केंस असलेल्या शोभादायक चामड्यांना लोंकरयुक्त कातडीं म्हणतात.

लोंकरयुक्त कातडीं तसेंच हरीण, काळवीट, बिब्यावाघ, वगैरे जनावरांचीं कातडीं यांनां व्यापारी दृष्ट्या फार थोडें महत्व आहे. कुत्रा, साप,पाल यांसारख्या लहान प्राण्यांच्या कातड्यांकडे तर हिंदुस्थानांतील लोकांचें पूर्ण दुर्लक्ष आहे. कदाचित् हवामान व खारवण्याची सदोष पद्धति हीं अना-स्थेचीं कारणें असावींत.

हिंदुस्थानांतील गुराढोरांची संख्या २२,००००००० पेक्षां कमी नसून दरवर्षी शेकडा ४० गुरें मरतात अथवा मारलीं जातात. १९०३-०४ सालीं संपणाऱ्या वर्षांत सालीना सरासरी १२५ लक्ष कमावलेलीं कातडीं व ३७० लक्ष विनकमावलेलीं कातडीं परदेशीं गेलीं. या आंकड्यांत हिंदुस्थानांत उपयोगांत आलेलीं कमावलेलीं कातडीं व चामडीं धरलेलीं नसून ज्यांचीं कातडीं काढून घेतलीं जात नाहींत अशा मेलेल्या जनावरांचाहि वरील आंकड्यांत हिशोब नाहीं.

हिंदुस्थानांत तयार होणारा कातड्यांचा माल व त्याच वस्तूंचा परदेशीं असलेला व्यापार हे सारख्याच मह-त्वाचे आहेत. १९०६-०७ सालीं ( पुनर्निर्गत माल वजा जातां ) १५,१४,६६,३९२ रुपये किंमतीच्या मालाचा व्यापार झाला.

कमावलेलीं कातडीं व चामडीं यांचा व्यापार व कातड्यांचा माल तयार करण्याचा धंदा मुसुलमान अगर अंत्यज लोकांच्या हातीं असून लोकसंख्येच्या मानानें हा समाज लहान आहे. उत्तरहिंदुस्थानांत या समाजाला चर्मफराश म्हणतात. कातड्यांचे हलाली व मुर्दाडी असे दोन प्रकार आहेत. मारलेल्या जनावरांच्या कातड्यांनां हलाली व मेलेल्या जनावरांच्या कातड्यांनां मुर्दाडी असें म्हणतात. चांभार लोक मेलेल्या जनावराचीं कातडीं काढतात. दुष्काळाच्या वेळीं त्यांनां बराच फायदा होतो. इतर वेळीं पैशाच्या आशेनें हे लोक गुरांनां विष घालतात असेंहि म्हणतात. परंतु निष्का-ळजीपणा, अवर्षण व गुरांचे रोग यांनीं मरणाऱ्या गुरांचें प्रमाण बरेंच मोठें आहे. कातड्यांच्या व्यापारानें मर-णाऱ्या गुरांमुळें होणारी देशाची हानि मुळीच भरून निघत नाहीं. उलट, जेव्हां जेव्हां कातड्यांचा माल पर-देशीं जास्त जास्त जातो, तेव्हां तेव्हां तें सार्वजनिक हानीचें व व्यापारी अवनतीचें चिन्ह आहे असें समजावें. कातड्यांच्या व्यापारांत अवर्षण वगैरे कारणांनीं बराच फरक होत असतो. औद्योगिक धाडसांत सर्वत्र दिसून येणारी भांडवल गोळा करण्याची अडचण या धंद्यांत तर दुप्पट भासते. धार्मिक बंधनांनीं या लोकांनां अगदीं हलका दरजा आल्यामुळें, हा धंदा करण्याची जबाबदारी एका लहान समाजावर पडते; या कारणामुळें या धंद्यांत चढाओढीचें तत्व लागू नसल्याकारणानेंहि या संबंधींच्या व्यापारांत बरेंच नुकसान होत आहे.

१९०६-०७ मध्यें हिंदुस्थानांतील रेलवेनें २५१७७८७ हंड्रे.,कातडीं परदेशीं गेलीं; त्यांपैकीं बंगाल प्रांतांतून ३५७७९४ हं.,संयुक्तप्रांतांतून ४६४३७६ हं., मद्रासप्रांतांतून ३६८१२७ हं.,पंजाबप्रांतांतून २९६५७६ हं.,मुंबईइलाख्यांतून १७१७४६ हं.,म्हैसूरमधून ११७८६६ हं., राजपुताना व मध्यहिंदुस्थान ११८६१३ हं.,मध्यप्रांत व वऱ्हाड १२२७७४ हं., निजामच्या राज्यांतून ८६१८३ हं., सिंधमधून ५४५५९ हं.,व पूर्वबंगाल व आसाममधून २३४८१० हं., कातडीं परदेशीं गेलीं.

हिंदुस्थानांत साधारणतः २५-३० हजार हं. ( किं. १॥ लक्ष)पेक्षां जास्त कच्चीं जाड कातडीं परदेशाहून येत नाहींत.

(त्यांची १०॥ लाख रुपये किंमत असते.) १५ हजार हंड्रेड-वेट वजनाचीं कच्चीं कोंवळीं कातडीं व ६॥ हजार हंड्रेडवेट वजनाचीं कमावलेलीं जाड व कोंवळीं कातडीं असतात.

कच्चीं कातडीं व चामडीं यांची निर्गतः—१९०४-०५ सालीं कातड्यांची किंमत दर हंड्रेडवेटास ५५ रु. ७ आणे होती व चामड्यांची दर हंड्रेडवेटास ९० रु. ७ आणे १ पै होती. १९०६-०७ सालीं ३९८०६२८१ कातडीं व चामडीं परदेशीं गेलीं. त्यांपैकीं १२९१७२२७ कातडीं व २६८८९०५४ चामडीं होतीं.

१९१९-२० सालीं ३६ कोट रुपयांचीं कातडीं परदेशांत गेलीं. त्याच्या मागील वर्षी १९ कोटींचीं गेलीं होतीं. पण पुढील सालीं परदेशांतलि बाजारमंदीमुळें निर्गत पुन्हां कमी झाली. १९१९ च्या सप्टेंबरांत निर्गतकातड्यांतर १५ टक्के जकात वसविण्याचें बिल पुढें आलें; पण ब्रिटिश साम्राज्यांत होणाऱ्या निर्गतीवर मात्र १९ टक्केच जकात वसविली होती.

कमावलेलीं कातडीं.—समुद्रानें हिंदुस्थानांतून जाणाऱ्या कमावलेल्या कातड्यांच्या अंतर्गत व्यापारांतील विशेष हा आहे कीं, कमावलेल्या चामड्यांचें मद्रास हें महत्त्वाचें ठिकाण असून तेथील बराच माल ब्रह्मदेशांत जातो. ब्रह्मदेशाच्या खोलाखाल मुंबईचा नंबर लागतो. या व्यापाराचें मद्रास हें केंद्र आहे, असें परदेशांत जाणाऱ्या मालाच्या आंकड्यांवरूनहि दिसतें. परदेशीं जाणाऱ्या मालापैकीं शेंकडा ९१ कमावलेलीं कातडीं व शेंकडा ७३ कमावलेलीं चामडीं मद्रासहून गेलीं. बाकी बराचसा माल मुंबईहून गेला. मद्रासच्या कमावलेल्या चामड्यांनां आजपर्यंत संयुक्त संस्थानें हें महत्त्वाचें गिऱ्हाईक होतें; परंतु अलीकडे हिंदुस्थानच्या कमावलेल्या चामड्यांनां असलेली मागणी कमी होत असून बंगालच्या कच्च्या चामड्यांनां जास्त जास्त मागणी होत आहे.

हिंदुस्थानाबाहेरील देशांत नवीन शास्त्रीय शोधांच्या सहाय्यानें कातडीं कमावण्याच्या सरस व कमी खर्चाच्या पद्धती सुरु झाल्या आहेत. यावरून असें दिसतें कीं, हिंदुस्थानच्या मालांत कालगतीप्रमाणें सुधारणा झाली पाहिजे, नाहीं तर हिंदुस्थानच्या कातड्यांच्या व्यापाराचा पूर्ण नाश होईल. ज्याप्रमाणें हातमागावर काम करणारे कोष्टी गिरण्यांची भरभराट थांबवूं शकणार नाहींत, त्याचप्रमाणें येथील कातडीं कमावणारे लोक जर आपल्या जुन्या पद्धती सोडणार नाहींत, तर त्यांचा, कमी खर्चाच्या शास्त्रीय पद्धती उपयोगांत आणणाऱ्या पुढें टिकाव लागणार नाहीं. हिंदुस्थानांतील कातडीं कमावण्याची पद्धत इतकी असमाधानकारक होती व अजूनहि आहे कीं, ज्या देशांत येथील कमावलेलीं कातडीं जात तेथें तीं पुन्हां कमवावीं लागत असत. इ. स. १९०४-५ सालीं सरासरी २८५१७१७३ रुपये किंमतीचा माल परदेशीं गेला; परंतु पांच वर्षांपूर्वीच याच्या जवळजवळ दुप्पट माल परदेशीं जात असे.

हिंदुस्थानांत कातडीं व तीं कमावण्याचीं द्रव्यें विपुल असून स्वस्त आहेत. या दोन गोष्टींमुळें कातडीं कमावण्याचा धंदा पुरेसें भांडवल घालून आर्थिक तत्वांवर चालविला असता तर त्याची अधोगति झाली नसती, असें मुंबई व कानपूर येथील कारखान्यांच्या स्थितीकडे पाहिलें असतां दिसतें. अलीकडे कमावलेल्या कातड्यांत बरीच सुधारणा झाली असून त्यांचा व्यापारहि वाढत आहे. १९०६-७ सालीं ४४५१२५८१ रुपये किंमतीचीं चामडीं व कातडीं परदेशीं गेलीं.

बौद्ध, जैन व कांहीं प्रमाणांत हिंदुधर्मांतहि अहिंसातत्त्वाचें प्राबल्य असलें तरी कातडीं व कातड्याचे जिन्नस यांच्या व्यापाराला त्यामुळें विशेष अडथळा आलेला दिसत नाहीं. कातड्यांचा व चर्मांचा हल्लींपेक्षांहि पूर्वीं जास्त उपयोग केला जात असे. तिसऱ्या शतकांत लिहिलेला कातड्यावरील पत्रव्यवहार सांपडल्याचें स्टाइन यानें लिहिलें आहे. पुस्तकें बांधण्याकरितां व घोड्याचें खोगीर व इतर सामान करण्याकरितां पूर्वींहि कातड्यांचा उपयोग करीत कातड्याच्या पेट्या, बूट, वैद्यकीचीं शस्त्रें ठेवण्याच्या पेट्या, फोटोग्राफीच्या क्यामेऱ्यास असलेले भाते, मोटा, पैसे ठेवण्याचीं पाकिटें, एंजिनें चालविण्याकरितां पट्टे, हातमोजे, अंगांत घालण्याचे कपडे इत्यादि अनेक कामीं कातड्यांचा उपयोग केला जात असे.

कातड्यांचा माल तयार करण्यास पूर्वी शारीरिक श्रमाचीच जरूरी असे. परंतु हल्लीं कातडीं कमावण्यापासून तों निरनिराळे जिन्नस तयार होईपर्यंत सर्व कामें यांत्रीक सहाय्यानेंच होतात. यामुळें हा सर्व व्यापार परकीयांनींच बळकावला आहे. पूर्वीं कातडीं कमावण्यास वनस्पतिजन्य द्रव्यें वापरीत असल्यामुळें बराच वेळ कमावण्यास लागे. हल्लीं त्वरित फलदायी रासायनिक पद्धतीचा शोध लागला असून खनिज क्षारांचा अथवा विजेचा उपयोग करण्याची प्रवृत्ति जोरानें वाढत आहे. परंतु हिंदुस्थानांतील कातड्यांच्या धंद्यांत मात्र कालगतीबरोबर सुधारणा होत नाहीं. उदाहरणार्थ, क्रोमपद्धतीनें म्हशीच्या कच्च्या कातड्यावरून ७ दिवसांत, गाईच्या कातड्यापासून २४ तासांत, शेळ्या-मेंढयांच्या कातड्यापासून ६ ते ८तासांत उंची प्रकारचें कमावलेलें कातडें तयार करतां येतें. याच कामाला पूर्वी एक महिना किंवा केव्हां केव्हां १८ महिनेहि लागत असत. पालाश-द्विकुमित मध्यें कातडीं बुडविलीं असतां तीं उच्च प्रतीचीं होतात. रांपट द्रव्यांत योग्य कालपर्यंत कातडीं भिजत ठेवून नंतर एका मेजावर त्यांचा ढीग रचतात. म्हणजे फाजील रांपट द्रव्य त्यांतून झिरपतें व रांपविण्याची ही क्रिया पूर्ण होत असते. यानंतर तीं कातडीं कित्येक वेळां पाण्यानें धुतात. त्यानंतर तीं बोरॅक्स व पाणी यांच्या द्रावणांत बुडवितात. त्या योगानें

त्यांतील उरलेल्या अम्लाचें वल कमी होतें व त्यानंतर धुवून त्यांना रंग देतात अगर चरबी लावतात. क्रोमपद्धतीनें कमावलेलीं कातडीं एकदां वाळलीं म्हणजे पुन्हां त्यांवर कसलाहि प्रयोग करतां येत नाहीं, म्हणून जो पाहिजेतो आकार त्यांस तावडतोब द्यावा लागतो. कातडीं कमावण्याची नवीन पद्धति कठिण नसून खर्चाचीहि पण नाहीं. या कारणामुळें परदेशी व्यापारी हिंदुस्थानांतील अर्धवट चामडीं न घेतां खारवलेलीं कच्चीं जाड व कोंवळीं कातडीं विकत घेतात. हल्लीं शास्त्रीय पद्धतीनें कातडीं याहींपेक्षां विशेष जलद कमाविलीं जातात. अशा प्रकारच्या पद्धति हिंदुस्थानांतील कांहीं यूरोपियन कारखानदारांनीं मात्र गेल्या वीस वर्षांच्या शोधांच्या अनुरोधानें आपल्या कारखान्यांत सुरू केल्या आहेत.

कमावलेल्या कातड्यांची आयात.—एतद्देशीय कातडीं कमावण्याची रीत जरी मागसलेली आहे तरी येथें कमावलीं जाणारीं कांहीं कातडीं परदेशाहून आलेल्या उत्तम कमावलेल्या कातड्यांच्या तोडीचीं असून कानपूरच्या कारखान्यांत तयार होणारे रोजच्या वापरण्याचे बूट व इतर सामान तर किंमतीच्या मानानें त्याच दर्जाच्या परदेशाहून आलेल्या मालाहून सरस असतें.

१९००—१९०१ मध्यें ५५५९११ रुपये किंमतीचा व इ. स. १९०६—७ मध्यें ५०४४०४ रु. किंमतीचा माल येथें आला. या रकमेंत बूट व शूखेरीजकरून खोगीर वगैरेंच्या आयातमालाची किंमत मिळविली असतां १९०६–७ सालीं ३२५८६८१ रुपयांचा माल परदेशाहून इकडे आला असें दिसतें.

एतद्देशीय कातडीं कमावण्याचे कारखानें.—इ. स १८०३ मध्यें येथें कातडीं कमावण्याचे ४४ कारखाने होते व त्यांत ३८०४ लोक काम करीत असत. पुढें हे कारखाने वाढले परंतु पुन्हां कमी होत होत१९०४—५ सालीं लहान लहान कारखान्यांखेरीज ३५ कारखानेच राहिले. यांपैकीं वरेच मद्रासमध्यें असून कानपुरांत ६, कलकत्यांत ४, मुंबईत ३ व राजपुतान्यांत १ असे होते. सर्व हिंदुस्थानांत कानपूरचे कारखाने महत्वाचे असून तेथें उच्च प्रतीचीं कमावलेलीं कातडीं तयार होतात. कानपूरला उच्च प्रकारचे बूट, शू, खोगीर, कातड्यांच्या पेट्या, वगैरे जिन्नस तयार होतात.

कातडें कमावण्याच्या एतद्देशीय पद्धती.—खाटीक, ढोर, धेड, महार वगैरे लोक मेलेल्या जनावरांच्या आंगावरील कातडें काढतात; नंतर त्यावरील कचरा, मळ, वगैरे निघून जाण्याकरितां दोन दिवस तीं पाण्यांत भिजत ठेवतात. नंतर एक प्रकारचा दगड असतो, त्यावर तें ठेवून मोगरीनें वडवितात. त्या योगानें कातड्यावर मांस, चरबी वगैरे द्रव्यें असल्यास तीं निघून जाऊन तें स्वच्छ होतें. मग १० भाग चुना व ८० भाग पाणी यांच्या मिश्रणांत तें कातडें टाकून बारा किंवा पंधरा दिवस भिजत ठेवतात. तें पूर्ण भिजून फुगलें म्हणजे त्यावरील केंस निघूं लागतात. या मिश्रणांतून तें वाहेर काढल्यावर कोयत्यासारख्या बोंथट हत्यारानें त्यावरील केंस खरडून काढतात. पुढें तें कबुतराच्या विष्ठेच्या पाण्यांत टाकलें म्हणजे चुन्याच्या योगानें त्यास आलेला फुगीरपणा नाहींसा होतो. यानंतर तरवड किंवा वाभळीची साल यांच्या मिश्रणांत तें टाकावें. त्याची रीत अशी:—

तरवडाची किंवा वाभळीची साल आणून ती ८ पट पाण्यांत एक रात्र भिजत घालावी. म्हणजे सालींतलि रंगाचा अंश त्या पाण्यांत उतरतो. किंवा साल पाण्यांत घालून विस्तवावर उकळावी, म्हणजे तें पाणी उत्तम रंगदार होतें. या पाण्यांत कातडें भिजत ठेविलें असतां तें कुजण्याची क्रिया वंद होते. या मिश्रणांतून कातडें वाहेर काढल्यानंतर सुकवावें व सुकल्यावर पुनः तें स्वच्छ पाण्यांत टाकावें. तें चांगलें भिजलें म्हणजे वाहेर काढून एका लांकडाच्या वाटोळ्या ठोकळ्यावर केंसाची वाजू खालीं करून ठेवावें. मग सुरीसारखें एक मुठीचें हत्यार असतें, त्यानें तें कातडें खरडून साफ व आपणास पाहिजे इतकें पातळ करून घ्यावें. नंतर पुनः तें पाण्यांत टाकून गुळगुळीत वाटोळ्या दगडानें घोटावें, व मृदुत्व येण्याकरितां तूप व मेण एकत्र कढवून त्यावर सारवावें.

वाभळीची साल, तरवडाची साल, मायफळ, खैराची साल किंवा कात, हिरडा, ओक लांकडाची साल वगैरे जिनसा कातडीं कमावण्याकडे उपयोगांत आणतात. यांशिवाय वरींच द्रव्यें कातडीं कमावण्याच्या उपयोगी पडतात.

येथें कमावलेल्या कातड्यांच्या मालाला एतद्देशीय मागणी वरीच असते.

कातडीं कमावण्याच्या तीन रीती आहेत. (१)साल अथवा दुसऱ्या वनस्पतिजन्य पदार्थांच्या काढ्याचा उपयोग करून,(२) खनिज क्षारांचा उपयोग करून व(३) तेलाचा उपयोग करून. जोड्यांचे तळवे, यंत्राचे पट्टे व अश्वसामग्री तयार करण्याकडे मुख्यतः कातड्याचा उपयोग होतो. पुस्तकें बांधण्यास व बुटाच्या वरच्या भागाकरितां वांसरांचीं चामडीं कमाविलीं जातात. मेंढयापासून निरनिराळ्या प्रकारचीं कमावलेलीं चामडीं होतात. वकऱ्यांच्या कमावलेल्या चामड्यापासून हातमोजे करितात. जे देश कमी सुधारलेले आहेत, तेथील जनावरांचीं कातडीं सर्वांत जाड असतात; जनावरांचीं निगा ठेवल्यानें त्यांचीं कातडीं पातळ होतात. खच्ची केलेल्या जनावरांचीं कातडीं सारख्या जाडीचीं असतात. मेलेल्या जनावरांचीं कातडीं हलक्या प्रतीचीं असून तीं जर चांगल्या तऱ्हेनें कमावलीं गेलीं नाहींत तर त्यांपासून वापरणाऱ्याच्या शरीरास अपाय होण्याचा संभव आहे. कातड्यांच्या आंतल्या भागास मीठ लावलें असतां, अगर तीं हरताळाच्या द्रावणांत भिजविलीं असतां टिकाऊ होतात.

पादत्राणांचा व्यापार.—एतद्देशीय जोड्यांवर नकशी असून त्यांत कारागिरी दृष्टोत्पत्तीस येते. या कारागिरीच्या

कामासाठीं खालील ठिकाणें प्रसिद्ध आहेत. बंगाल्यांतील-कटक, पाटणा व सरण, संयुक्त प्रांतांतील.—रामपूर, लखनौ, आग्रा, झांशी व सहराणपूर. पंजाबांतीलः—कोहट, रावळपिंडी, पेशावर, डेरा गाझिखान होशियारपूर मध्यप्रांतील चांदा, राजपुतानाः— जयपूर व बिकानेर. मुंबई इलाखा— सुरत, अहमदावाद, नगर पुणें, रत्नागिरी व हैदराबाद. दक्षिण हिंदुस्थानः—रायचूर, सालेम, त्रिचनापल्ली, मद्रास व म्हैसूर. यूरोपिअन पद्धतीच्या जोड्याकरितां कानपूर हें विशेष महत्वाचें आहे. गेल्या दहा वर्षांत हिंदुस्थानांतून बूट बाहेर देशीं जाऊं लागले आहेत. १९०६–७ सालीं ८६८४९१ रुपयांचा माल परदेशीं गेला. हा माल नाताळ, केप कॉलनी, मॉरिशस व ईजिप्त येथें जातो, व फार थोडा माल इंग्लंड व रशियालाहि जातो.

का रा गि री चा मा ल —पट्टे, बुधले, खोगीर वगैरे माल सर्व हिंदुस्थानभर तयार होतो. कांहीं ठिकाणीं तयार होणारा माल उच्च प्रतीचा व उत्कृष्ट कारागिरीचा असतो. पेशावर, बन्नू, कोहट व क्वेटा येथें होणारे " सरहद्दीवरील पट्टे " प्रख्यात असून हिंदुस्थानच्या बऱ्याच भागांतून त्यांनां मागणी असते. सांबरांच्या कातड्याकरितां संयुक्तप्रांतांतील गोरखपूर व मध्यप्रांतांतील चांदा हीं ठिकाणें प्रसिद्ध आहेत. मद्रास इलाख्यांतील कर्नूल जिल्ह्यांत चामड्याच्या चटया विचित्र तऱ्हेनें रंगवितात. राजपुताना व मुंबई इलाखा येथील कांहीं ठिकाणीं पुस्तकें बांधण्याकरितां चामड्यावर ठसे उमटविणें व कोरीव काम करणें हीं कामें होतात. अलवार व अहमदाबाद हीं ठिकाणें या कामाकरितां फार प्रख्यात आहेत. गेंड्याच्या कातड्याच्या ढाली तयार करण्याचा धंदा गुजराथेंत बऱ्याच दिवसांपासून आहे. परंतु ढालीचा उपयोग बंद झाल्यासारखा असल्यामुळें हा धंदा कितपत किफायतशीर असेल याबद्दल संशय वाटतो.

प र दे शी का त डीं कमावण्याची कृति.–हिच्या तीन पद्धती आहेत. टॅनिक अम्लाचा त्यावर प्रयोग करून, खनिज मिठांचें सहाय्य घेऊन, तेल व चरबी लावून. तिसऱ्या पद्धतीस शामॉय म्हणतात. जड व हलकें असे कातड्यांत दोन प्रकार आहेत. गोचर्म हें जड कातड्याच्या सदरांत पडतें. गाईचीं कातडीं ब्रिटिश लोकांच्या घरांतील जिनसांनां उपयोगी पडतात. जंगली गाई व सखल प्रदेशावरील गाई यांच्या कातड्यांत फरक असतो; पहिलें जास्त मजबूत व जाड असतें. मेंढ्या, बकरीं, सील, देवमासे वगैरेंचीं कातडीं हलक्या कातड्यांत जमा होतात.

का त डीं क मा व ण्या चीं सा ध नें.–टॅनिक अम्ल यांत प्रमुख द्रव्य होय. कॅटेचोल व पायरोगालोल असे याचे दोन निरनिराळे वर्ग आहेत. पायरोगालोल टॅनिकपासून फार सुरेख कातडें तयार होतें. पण या दोहोंचें मिश्रण केलें तर सर्वोत्कृष्ट असाच परिणाम घडून येतो. कातडीं कमावण्याच्या प्रमुख साधनांचें वर्गीकरण पुढें दिल्याप्रमाणेंः—

| पायरोगालोल | कॅटेचोल |
|---|---|
| हिरडा | गँबिअर |
| चेस्टनट लांकूड | हेम्लॉक |
| दिवि-दिवि | क्वेब्राचो |
| अलगरोबिला | मॅनग्रोव्ह ( कच्छ ) |
| सुमाक | मिमोसा |
| ओक | लार्च |
| चेस्टनट ओक | कनैगर |
| माजूफळ | बर्च |
| विलो | कच्छी कात |

कारखान्यांत जीं गोचर्में येतात तीं चार तऱ्हेचीं असतात. (१) कसाईखान्यांतून थेट आलेलीं; हीं ओलीं व घाणीनें आणि रक्तानें माखलेलीं असतात; (२) ओलीं मिठाळलेलीं, (३) कोरडीं मिठाळलेलीं व (४) उन्हानें वाळलेलीं. हीं स्वच्छ व नरम करून चुन्यांत बुडवून ठेवितात. कातडें चुन्यांत किती वेळ ठेवावयाचें तें ज्या कारणाकरितां कातडें पाहिजे त्यावर अवलंबून असतें. नंतर कातडें चुन्यांतून काढून चाकूनें त्यावरील केंस काढतात. यावेळीं त्या कातड्याचे कमीजास्त महत्वाचे अनेक तुकडे पाडतात व ते निरनिराळे कमावतात. केंस काढलेलीं कातडीं ॲसिडमध्यें धुवून त्यांवरील चुना व घाण काढून टाकतात. यापुढें कमावण्याची क्रिया सुरू होते. या क्रियेंत तीन अवस्था असतात; (१) रंगाच्या हौदांत लोंबत ठेवून रंग देण्याची, (२) कातडीं पुन्हां पुन्हां हौदांतून काढण्याघालण्याची व ( ३ ) पुढें चढविण्याची या त्या होत. पुढें चढविण्याच्या कामीं टॅनिक अम्लीय द्रव्यांचा उपयोग करतात. निरनिराळ्या प्रकारच्या कातड्यांनां निरनिराळीं द्रव्यें वापरतात. यानंतर २।३ दिवस कातडीं निथळत ठेवतात व ज्या जिनसांकरितां कातडें पाहिजे असेल त्याप्रमाणें कातड्यावर चढविलेला रंग कमीजास्त धुवून पुसून काढतात.

याप्रमाणें तयार केलेलीं कातडीं तेल व चरबी यांत बुडविलीं: म्हणजे तीं मऊ व मजबूत होतात. नंतर त्यांनां खळ लावतात. हलकीं ( बकरीं, सील वगैरेंचीं ) कातडीं कमावतांना विशेष काळजी घेतात.

का र खा ने.—कातडी कमावण्याचा धंदा फार पुरातन आहे. ख्रि. पू. चार हजार वर्षें इतक्या मागें होऊन गेलेल्या फारोच्या थडग्यांतून चांगले चामड्याचे नमुने संशोधिले गेले आहेत. त्यांवरून आज देखील या धंद्याच्या स्वरूपांत फारसा फरक झालेला दिसून येत नाहीं. त्यावेळेप्रमाणें हल्लीं सुद्धां झाडांच्या साली व फळें यांपासून कमावण्याकरितां लागणारीं द्रव्यें तयार करतात. गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत फ्रान्स, आस्ट्रिया हंगारी आणि अमेरिका या देशांतून कातडीं कमावणारीं द्रव्यें तयार करण्याचे मोठमोठे कारखाने स्थापण्यांत आले. हीं नवीन वनस्पतिजन्य द्रव्यें वापरल्यानें कमावण्याची क्रिया फार जलद होऊन कातडें स्वस्त

व सुवक निघतें. हा धंदा सध्यां शास्त्रीय पद्धतीवर चालविण्यांत येतो.

ग्रेटब्रिटनमध्यें एका आठवड्यांत एक लाख पन्नास हजार कच्चीं कातडीं कमावलीं जातात. या कच्च्या कातड्यांच्या संख्येपैकीं सुमारें ५० हजारच ग्रेटब्रिटनमधील गुरांचीं असतात.

महायुद्धानंतर जगांतील निरनिराळ्या पेठांतून कच्चीं कातडीं भरपूर पडलीं होतीं व त्यामुळें कांहीं काळ त्यांचा भाव महायुद्धापूर्वीपेक्षांहि उतरला. पण तीं जमा करणें व वाहून नेणें याला वराच खर्च येत असल्यानें हजारों कातडीं निरुपयोगी होऊन पडून राहिलीं. तथापि आजचा भाव कमी नाहीं. मजूरी व वाहतुकी यांचे दर कमी झाल्याखेरीज तो युद्धापूर्वीइतका होणाराहि नाहीं.

कातडीं कमावण्याचा दुसरा प्रकार म्हणजे तुरटी व मीठ किंवा खनिज मीठ यांच्या पाण्यांत भिजवून ठेवण्याचा. लोकरींचे रंग या प्रकारानें वनवितात. कमावण्याची आणखी एक पद्धत म्हणजे 'क्रोम' ही होय. १८७८ च्या सुमारास डॉ. हीनझेर्लिंगनें या पद्धतीला व्यापारी महत्व प्राप्त करून दिलें. हलक्या कातड्यांवर हा प्रयोग बहुधा करण्यांत येतो; पण सध्यां जाड कातडींहि क्रोम वनवितात. कांहीं वेळां खनिज व वनस्पतिजन्य द्रव्यें एकत्र करून कातडीं कमावतात; त्यामुळें या दोन्हीं प्रकारांतील गुण कातड्यांत येतो.

तिसरा प्रकार शामॉयिंग किंवा तेली कमाईचा. कातड्याच्या धंद्यांत याला वरेंच महत्व आहे. कातड्याचे तंतू तेलानें माखणें, व अल्डेहाईड टॅनिक करणें हा शामॉयचा प्रकार होय

कातडीं कमावल्यावर त्यांना रंग देण्यांत येतात. रंग देतांना ज्या जिनसांनां कातडीं लागणार त्यांवर रंगांचे प्रकार व प्रमाण अवलंबून असतें. चकाकी आणण्यासाठीं कातडीं दावून ठेऊन त्यांवरून कांचेचा रूळ फिरवितात. हातमोजे, बुकबांधणी, पाकिटें यांचीं कातडीं निरनिराळ्या प्रकारांनीं कमावतात.

गाई, म्हशी, बैल, घोडे वगैरे पाळींव जनावरांखेरीज दुसऱ्या कित्येक प्राण्यांच्या कातड्यांचा व्यापार होतो. नार्वे, स्वीडन, बाल्टिक समुद्र वगैरे उत्तर-प्रदेशांतून सलि नांवाच्या माशाचीं कातडीं येतात. तीं आकारानें वरींच मोठीं असल्यामुळें त्यांचा उपयोग कोच व गाड्या मढविण्याकडे करितात. सफेत देवमाशाचें कातडें ज्यास ' पार्पाईज हाईड' म्हणतात त्याचे निरनिराळ्या प्रकारचे बूट वनवितात. अजगर, साप, वडूक, कांगारू वगैरे प्राण्यांचीं कातडीं सुद्धां नानाप्रकारचे चित्रविचित्र व्यापारी—जिन्नस तयार करण्याकडे लावितात. कृत्रिम कातडें किंवा कातड्याच्या रंगाचें कापड करण्यांत अमेरिकन लोकांनां चांगलें यश मिळालें आहे. तें कापड पुस्तकें वांधण्याकरितां, तसेंच खुर्च्या, मेजें, घोड्याच्या गाड्या, कांच वगैरे जिन्नस मढविण्याकडे लावितात. पार्चमेंट किंवा चर्मपत्र, हें सफेत रंगाचें अर्धपारदर्शक कातडें वकऱ्याच्या चामड्यांपासून विशिष्ट कृतीनें तयार करितात. महत्वाचे लेख किंवा दस्तैवज लिहिण्याकडे याचा उपयोग होतो. हें कातडें फार टिकाऊ असतें.

कातड्यावर नक्षी किंवा दाणा उठविणें.—घोड्याच्या खराऱ्याच्या आकाराचें एक हत्यार असतें. त्या हत्यारानें आडवें, उभें, किंवा चोहोंकडून कातडें घासतात. म्हणजे त्यावर दाणा उमटतो; नक्षी उठविणें असल्यास निरनिराळ्या प्रकारचे खिळे, छाप वगैरे असतात ते कातडें कमावल्यावर ओलसर असतानांचे त्यावर दावावे म्हणजे त्या छापावरील नक्षी कातड्यावर उमटते.

कातड्यावर रंग देणें.—काळा रंग देणें असल्यास कातडें कमावून तयार झाल्यावर हिराकसाचें पाण्यांत मिश्रण करून तें मिश्रण कुंचल्यानें लावावें व त्यावर काजळ व तेल मिश्र करून लावल्यानें उत्तम काळा रंग चढतो.

लाल रंगः—लाखेचा आळिता करून त्याचा किंवा किरमिजी दाणा पाण्यांत मिळवून त्याचा रंग देतात. त्याचप्रमाणे पाहिजे तो रंग पाण्यांत मिसळून कातड्यावर देतात व चकाकी येण्यास तो रंग तेलांत किंवा अंड्यांतील बलकांत खलून लावतात. जास्त चकाकी पाहिजे असल्यास वार्निसाचा हात देतात.

[ संदर्भग्रंथ—वेनेट–दि मॅन्युफॅक्चर ऑफ लेदर; ट्राटमन्–लेदर ट्रेड्स केमिस्ट्री; लँब–लेदर ड्रेसिंग; वॅट–लेदर मॅन्युफॅक्चर. प्रोक्टर–प्रिन्सिपल्स ऑफ लेदर मॅन्यु; फ्लेमिंग-प्रॅक्टिकल टॅनिंग; ब्रिटानिका; वॅट–कमर्शिअल प्रॉडक्टस् ऑफ इंडिया; मार्टिन—टॅनिंग अँड वार्कंग इन् लेदरः रिव्ह्यू ऑफ दि ट्रेड ऑफ इंडिया. ]

**कांतनगड**-वंगाल मधील दिनाजपूर जिल्ह्यांतील ठाकूरगांव तालुक्यांतील खेडें. उ. अ. २५°४८' व पू. रे. ८८° ३९'. येथें १८ व्या शतकांतील विष्णूचें देवालय आहे. हें दिनाजपूरच्या राजाचें कुलदैवत आहे. ' रास ' सणांत येथें जत्रा भरते.

**कातांगा**—कातांगा हा वेलजमकांगोमधील एक जिल्हा असून त्या वसाहतीचा आग्नेयीकडील भाग आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें १८०००० चौ. मै. असून लोकसंख्या अजमासें १० लाख आहे. येथील लोक वंटू जातीपैकीं लुवा-लुंडा शाखेंतील असावे. या प्रदेशांत खनिज पदार्थांची विशेष समृद्धि असून त्यांतल्यात्यांत तांबें फार सांपडतें. सोनें लोखंड व कथील यांच्या खाणी चालू आहेत. याच्या दक्षिणेस व आग्नेयीस उत्तर ऱ्होडेशिया आहे. या देशांतील सांपत्तिक स्थिति चांगली होण्याच्या कामीं बरेंच ब्रिटिश भांडवल गुंतलें असून राज्यकारभार पाहणाऱ्या कमिटींत ब्रिटिश सभासद आहेत. १९०९ मध्यें केपटाऊन व वैरा यांच्याशीं रेल्वेनें या प्रांताचा संबंध जोडण्यांत आला. कांगोच्या

मार्गानें पश्चिमकिनाऱ्यावर रेल्वेनें व नदीनें प्रवास करण्याची सोय आहे ( कांगोफ्रीस्टेट पहा ).

**कातारी.**—लांकडी कातकाम करणारांची ही एक जात आहे. यांची घरगुती बोली गुजराथी असते. यांची राहाणी निर्मळ असून हे स्वभावतः आतिथ्यतत्पर व मेहनती असतात. हे मांसाहारी आहेत. मूल जन्मल्यावर "पांचवी" पुजणें, बारसें करणें वगैरे विधी रूढ आहेत. मुलाची मुंज सहाव्या किंवा सातव्या वर्षी करतात. मताधिक्याप्रमाणें जातिसभा तंट्यांचा निवाडा लावते. मुलांनां शिक्षण देतात. काठेवाड व गुजराथमध्यें यांची वस्ती बरीच आढळते. दक्षिणेंतील कातान्यांची राहणी कुणब्याप्रमाणेंच असते. कांहीं कातान्यांस विशेषतः मुसुलमान कातान्यांस खराडी म्हणतात. हे मूळचे हिंदू असून नंतर बाटलेले आहेत. यांची राहणी इतर मुसुलमानांप्रमाणेंच असते. हे सुनीपैकीं हनाफी पंथाचे आहेत.

**कांतिगेल.**—'झिंकलिंग हकमती' हें याचें दुसरें नांव असून ब्रह्मदेशांतील चिंदविन जिल्ह्यांतील हें एक शान संस्थान आहे.

**कातिया.**—मुख्य वस्ती वऱ्हाड-मध्यप्रांत व मध्य-हिंदुस्थान. येथें १९११च्या खानेसुमारींत यांची संख्या ८११९७ होती; पैकीं वऱ्हाड-मध्यप्रांतांत ४१३११ कातिया होते. नर्मदा खोऱ्यांतील सातपुड्यांतलि जिल्ह्यांतून सूत कातणाऱ्या व गांवांची रखवालदारी करणाऱ्या लोकांची ही जात आहे. यांची गणती महार व कोरी लोकांमधून झाली आहे असें वाटतें. मध्यप्रांतांत कोठें कोठें यांस रजपूत म्हणतात.

यांच्या कुळांचीं व उपवर्गांचीं बरींच नांवें यांच्या राहण्याच्या ठिकाणावरून पडलीं आहेत; उदा० पथारी, मंडला, गथेलवाल. यांच्यांत सुमारें ५० भिन्न वर्गविवाही कुळें आहेत. त्यांनां नांवें स्थानांपासून, पशूंपासून व झाडांपासूनच मिळालीं आहेत व या कुळांपैकीं कांहीं कुळांत आणखीहि पोटभेद झाले आहेत. उदा० नागोतिया कुळाचे हिरात नाग, भारोबर नाग, कोसम करिया व हजारी नाग असे भेद आहेत. ह्या उपवर्गांत लग्नसंबंध होत नाहीं असें हे लोक जरी सांगतात तरी तो होत असावा असें वाटतें. कोसम करिया कुळाचे लोक विवाहप्रसंगींच नागाची पूजा करतात. झिगोरिया, घागर भरिया, व डोंगरिया या नांवांचे वर्गहि आहेत.

आपल्या किंवा आपल्या आईच्या व आजीच्या कुळांतली मुलगी बायको करूं नये असा नियम आहे. मुलींचीं लग्नें ८ ते १२ वर्षांच्या आंत होतात. नऊ रुपये वधूशुल्क द्यावें लागतें. विधुरांस १८ रुपये द्यावे लागतात. सजातीयाबरोबर व्यभिचार केलेल्या कुमारिकेचें लग्न तिच्या प्रियकराबरोबर पुनर्विवाहविधीनें करतात. विवाहानंतर वधूची आई व इतर बायका सर्वांसमोर नृत्य करतात. विवाहपद्धति म्हणजे लग्नस्तंभाभोंवतीं प्रदक्षिणा घालण्याची पद्धत उत्तरेकडील पद्धतीसारखीच असते. लग्न झाल्यावर वधू माहेरीं येते व गर्भाधानविधि करून मग नवऱ्याकडे राहण्यास जाते. लग्न व गर्भाधान यांच्या दरम्यान नवरा मेला तर त्याच्या धाकट्या भावानें किंवा कोणत्याहि भावानें अथवा तिऱ्हाइतानं सुद्धां तिचें गर्भाधान करून तिला न्यावें म्हणजे ती त्याची बायको समजली जाते. अशा बायकांस गोन्हायी बायको म्हणतात व विवाहानें झालेल्या बायकोस ब्याहता बायको म्हणतात. विधवांनां कोणाबरोबरहि लग्न करतां येतें. प्रथम वरास जर विधवेबरोबरच लग्न करावयाचें असलें तर रुईच्या झाडाबरोबर प्रथम लग्न करतात. नवराबायकोचें पटलें नाहीं तर जातिपंचाइती समोर दोघांनीं दोन काड्या घेऊन मोडून फेंकल्या म्हणजे विवाहसंबंध मोडतो.

हे लोक सोय व ऐपतीप्रमाणें प्रेतें पुरतात किंवा जाळतात. मृताचा मुख्य नातलग त्यास उद्देशून म्हणतो कीं "अमुक अमुक दिवशीं तू स्वर्गांतल्या संत मंडळींत प्रवेश करशील व मग तुला आपल्या कुटुंबाच्या मंडळीस कोणत्याहि प्रकारचा त्रास देतां कामा नये." त्याचा आत्मा एका मडक्यांत झांकण घालून आणतात व अखेरचा विधि करण्याच्या दिवशीं एका ओट्यावर तें मडकें ठेवतात व त्याला हार व फुलें घालतात. जवळच तांदुळाचा लहान ढीग करून त्यावर एक लवंग लोंबती बांधतात. तेथें गाणी म्हणतात व भजन झाल्यावर मडक्याचें झांकण उघडून मृताच्या आत्म्यास सर्व समाजांत आणतात. वेगानें गाणीं म्हणतात व भजन चालवितात. तांदुळाच्या ढिगावर बांधलेली लवंग मागेंपुढें हेलकावे खाऊं लागते. मग कांदा, कोंबडीचीं पिलें व डुकर तेथें आणून चिरडतात व ती लवंग तांदुळाच्या ढिगाला शिवली म्हणजे मयताचा आत्मा स्वर्गांतील संतमंडळांत शिरला असें समजून मग त्याच्याबद्दल कोणताच विधि कधींहि करीत नाहींत.

हे लग्नाचा मुहूर्त ठरविण्यास व मुलांचीं नावें ठेवण्यास ब्राह्मणांस बोलावतात. पहिल्या नांवानें ते कांहीं दिवस मुलास हाक मारतात व त्याचें नांव बदललें म्हणजे त्याचें लग्न होतें असें समजून दुसऱ्या नांवानें हांक मारूं लागतात. अविवाहित मुली दोन्ही हातांत कांचेच्या बांगड्या घालतात. पण विवाहांत बायका उजव्या हातांत गोट व डाव्या हातांत कांचेच्या बांगड्या घालतात. मुलींनां एकदां लहानपणीं व एकदां लग्न झाल्यावर गोंदतात. यांचा धंदा आजकाल अर्थातच बुडत चालला आहे. कांपैकीं कांहीं लोक मालगुजार बनले आहेत. कांहीं शेती करतात व कांहीं शेतीवर मजुरी करतात व कांहीं रखवालदारी करतात.

**कात्यायन.**—एक प्राचीन आचार्य व शुक्लयजुर्वेदावरील सूत्रकार. "भाषिक सूत्र" हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांत वैदिक स्वरपद्धति, वैदिक व्याकरण विशेषतः वाजसनेयी संहिता व शतपथ ब्राह्मण यांस अनुलक्षून विवेचन

आहे. पाणिनीचीं कांहीं सूत्रें कात्यायनाच्या वाजसनेयी प्रातिशाख्यांत आढळतात. तीं पाणिनीनें त्यावरून व कात्यायनानें त्यापेक्षांहि जुन्या आचार्यापासून घेतलीं असावींत. वार्तिककार म्हणूनहि एक कात्यायन प्रसिद्ध आहे. पाणिनी व पतंजलि यांच्या मधला दुवा कात्यायन हा होय. पतंजलीपूर्वी सुमारें १०० वर्षे हा होऊन गेला असावा असें रा. कुंटे म्हणतात ( आर्यन सिव्हिलिझेशन, पृ. ३३२ ). याच्या काळीं आरण्यक वाङ्मय उदयास आलें व पांडित्य सुरू झालें. पाणिनीच्या वेळीं सरसकट मांसाशन होत असे पण कात्यायनाच्या काळांत कोणतें मांस खावें, कोणतें खाऊं नये याविषयीं भेदाभेद सुरू झालेला दिसतो. कात्यायनानें शुक्लयजुर्वेदावर एक श्रौतसूत्र लिहिलें आहे. त्याची सर्वानुक्रमणी प्रसिद्ध आहे. त्यानें शुक्लयजुर्वेदाचीं अनेक परिशिष्टें लिहिलीं असें मानतात. पाणिनीच्या १२४५ सूत्रांवर त्यानें वार्तिकें लिहिलीं आहेत.

कात्यायनाच्या श्रौत्रसूत्राचे २५ अध्याय आहेत. शतपथ ब्राह्मणाला अनुसरून हें सूत्र लिहिलेलें दिसतें त्यांतील तीन अध्याय ( २२–२४ ) सामासंबंधीं आहेत.

यानें ऋग्वेदसर्वानुक्रमणी लिहिली असून तींत ऋक् सूक्तांचे ऋषि ठरवितांना वरीच लटपट केली आहे. व अर्थ न समजतां ऋचेंतील एखाद्या शब्दावरून ऋषीचें नांव बनविलें आहे असें रा. राजाराम शास्त्री भागवत कात्यायनाला दूषण देतात ( ' वेदार्थ यत्नकारांचें स्मारक ' वि. विस्तार पु. २५ अं. ११-१२ )

सूत्रकार कात्यायन, वार्तिककार कात्यायन आणि प्राकृत कात्यायन असे एकंदर तीन कात्यायन झाले असावे असें विंटरनिट्झ दर्शवितो.

कात्यायनाच्या ( कोणत्या ? ) बापाचें नांव सोमदत्त व आईचें नांव वसुदत्त असें असून हा कौशांबीचा राहणारा होता असें आधार न सांगतां अर्वाचीन कोशकार म्हणतात.

ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत राजवाडे म्हणतात. "शकपूर्व सहाशेंच्या सुमारास कात्यायन झाला. त्यानें विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील महिष्मत् प्रदेशाचा व नाशिक शहराचा उल्लेख केलेला आहे. कात्यायनाचा उल्लेख अशोकाच्या शिलाशासनांत आहे.

वररुचीचें गोत्र यद्यपि कात्यायन होतें तथापि तेवढ्यावरून तो व वार्तिककार कात्यायन एकच होते असें म्हणतां येत नाहीं; कारण अशोकाच्या शिलालेखांतील प्राकृत भाषा वररुचीच्या व्याकरणांतील प्राकृत भाषांहून जुन्या भासतात. आणि यावरून कात्यायन अशोकाच्या पूर्वीचा व वररुचीनंतरचा होय. बुद्धाच्या निर्वाणानंतर ३०० वर्षांनीं पाली वैयाकरणी 'कच्चायनी' हा झाला असें चिनी प्रवासी ह्युएन्त्संग म्हणतो. तो कात्यायन वार्तिककार नसावा."

राजवाडे यांचें मत जयस्वाल यास मान्य नाहीं. पाणिनी २.१,६० या सूत्रावरून वार्तिककार २४८-२०० यांच्यामध्यें कोठें तरी झाला असावा असें त्यांस वाटतें. कात्यायनाच्या कोशाविषयीं कोश शब्द पहा.

कात्यायनाची एक स्मृतीहि आहे. या स्मृतीचा भविष्यपुराणांत उल्लेखिलेल्या छत्तीस स्मृतींत उल्लेख आहे. या स्मृतीचीं २९ खंडें असून त्यांत पंच महायज्ञ,अग्न्याधान, श्राद्धविधी, पाकसंस्था, और्ध्वदेहिक इत्यादि विषय आहेत.

महाराष्ट्रांतील कास्त आपणांस कात्यायनसूत्री म्हणवितात व माध्यंदिन ब्राह्मणहि कात्यायनाचेंच सूत्र मानतात, तर या दोहोंच्यामध्यें धर्मविषयक पृथक्त्व काय आहे हें समजत नाहीं. जातिविषयक पृथक्त्व मात्र दिसतें तर या पृथक्त्वाचीं ऐतिहासिक कारणें धर्मेतर असावींत असें वाटतें.

**कात्रा किल्ला**—मुंबई नाशिक जिल्हा. अंकाईच्या पूर्वेस ४ मैलांवर हा किल्ला आहे. हा ज्या टेंकडीवर आहे ती बाजूच्या टेंकड्यांहून ठेंगणी असून याच्यापासून १००० यार्डांवर असलेल्या एका टेंकडीच्या हा पूर्णपणें माऱ्यांत आहे. याची चढण सोपी असून दरवाजा चांगला नाहीं. किल्ल्यावर टांकीं व तळघरें आहेत.

**कांथकोट**—वागडमधील ( कच्छ मुं. इ. ) एका उजाड व खडकाळ टेंकडीवरील जुना किल्ला. ८ व्या शतकांत काठी लोकांची येथें राजधानी होती. १० व्या शतकांत अनहिलवाड येथील मूल राजानें या गडाचा शत्रूंच्या भीतीनें आश्रय घेतला होता. ११ व्या शतकांत याला खंडावा म्हणत. महंमद गझनीनें भीमदेवाचा पराभव केल्यावर तो येथें लपून बसला होता. १३ व्या शतकांत वाघेला लोकांची येथें राजधानी होती. १५ व्या शतकांत मुजफरनें ( १३९०–१४११ ) तो काबीज केला. १८१६ त ब्रिटिशांनीं येथील तटबंदी जमिनदोस्त केली. टेंकडीवर आतां तीन जुनाट देवळांचे अवशेष आहेत.त्यांपैकीं दोन देवळें १३ व्या शतकांत बांधलीं असल्याचा पुरावा मिळतो. [ मुं. गॅ. ]

**काथगोदाम**—नैनीताल जिल्ह्याच्या ( संयुक्त प्रांत ) भावर प्रदेशांतील खेडें.उ.अ.२९°१६' व पू. रे. ७९° ३३'. लोकसंख्या ( इ. स. १९०१ ) ३७५. रोहिलखंड कुमाँऊन रेल्वेचें हें शेवटचें स्टेशन झाल्यापासून याला बरें महत्व आलें आहे. येथील राज्यव्यवस्था १८५६ सालच्या २० व्या ॲक्ट प्रमाणें आहे. एकंदर उत्पन्न ८०० रुपये आहे.

**काथर वाणी**—वाण्यांतील ही एक पोटजात आहे. यांनां कंथार, कथार अशींहि इतर नांवें आहेत. काहीस कंथार नांवाचे वनिया आहेत; परंतु त्यांचा व काथर वाण्यांचा कांहीं संबंध नाहीं असें ते म्हणतात. यांची एकंदर लोकसंख्या अजमासें ३५०० असून त्यांपैकीं २५०० लोक मोगलाईंत औरंगाबाद जिल्ह्यांमधील भोकरदन व कन्नड या दोन तालुक्यांत राहतात; पूर्वखानदेशांत ९०० लोक असून ते मुख्यतः जळगांव गांवीं व त्याच्या आसपास १५ ते २० कोसांच्या अंतरावरील गांवीं राहतात; बाकीचे १००।१५० लोक नाशिक जिल्ह्यांत बागलाणांत कळवण, आभोणें वगैरे

गांवात आहेत. यांच्यांत पंचायत ( जातगंगा ) असते. एका गांवच्या पंचायतीचा निकाल इतर गांवांच्या पंचायती मानतात. पंचायतींनां अध्यक्ष नसतो. गांवांतील सभ्य व प्रतिष्ठित (याच जातीचीं) माणसें तींत नेमतात. श्रीमंत असल्यास ही पंचागिरी त्याच्या वंशांत चालूच असते. पंचायतीची स्थावर सार्वजनिक मालमत्ता नाहीं.पंचायतीचा कर नसतो.फक्त लग्न, मोहतूर या प्रसंगीं पंचायत कांहीं रु.घेते.लग्नाची रक्कम ठराविक असते तशी मोहतराची नसते. पंचायती आपले निवाडे लिहून वगैरे ठेवीत नाहींत. त्यांचा निकाल अमान्य करणारास वाळींत टाकतात. त्याच्याशीं इतरांचा अन्नोदकव्यवहार तर होत नाहींच, परंतु त्याच्या घरीं मर्तिक झाल्यास त्यावेळींहि कोणी त्याच्या घरीं पुढील क्रियेसाठीं जात नाहींत. यामुळें पंचायतीचा मान बराच राहतो. अपराध्याची दंड व प्रायश्चित्त यांवर सुटका होते. या (अंमलबजाणीच्या)कामीं सरकारी मदत घेत नाहींत. वाण्यांपैकीं नेवे, चितोडे, लाडसक्के आणि लिंगायत यांच्या शिवाय चार पोटजाती आहेत. परंतु त्यांचा व काथरवाण्यांचा संबंध नाहीं.हे ब्राह्मणाशिवाय कोणाच्याहि हातचें अन्न खात नाहींत.परंतु कुणबी, फुलमाळी, परदेशी, मारवाडी ब्राह्मण, गुजराथी ब्राम्हण, गुजर, भाटे (ठक्कर),नेवे,लाडसक्के व चितोडे यांच्या हातचें हे पाणी पितात. यांच्या जातींत पोटजाती नाहींत. लग्नें व मोहतुरादि कार्यें ( खानदेशांत ) यजुर्वेदी भिक्षुकांकडून करतात. वाग्निश्चय, प्रायश्चित्त घेणें वगैरे बाबतींत भिक्षुकांचा सल्ला घेतात. बाकी पंचायतीचे निकाल जातच अंमलांत आणते. पंचायतींत प्रत्येक घरांतील घरच्या प्रमुख माणसास स्थान मिळतें. बहुमताप्रमाणें निकाल लागतो. जातिबद्दल सर्वसामान्य प्रश्न असल्यास जिल्ह्यांतील आसपासच्या सर्व गांवांतील प्रत्येक घरांतील एक एक प्रमुख माणूस जिल्ह्यांतील प्रमुख गांवीं बोलावून सभा भरवून बहुमतानें निर्णय लावतात. त्यावेळीं प्रत्येक माणसास आपलें म्हणणें पंचापुढें ठेवण्यास सवड असते. पंचांचा नेक किंवा लागा ( दंड ) न देणें, सोयरीकसंबंध मोडणें, फारकती ( नवऱ्याबायकोच्या ), ब्राह्मण व जात याविरहित इतरांच्या हातचें अन्न खाणें वगैरे प्रश्न पंचायतीपुढें येतात. हे आपणांस चातुर्वर्ण्यसंस्थेंतील वैश्य म्हणवितात. यांच्याबद्दलचे जातिविषयक जुने कागदपत्र उपलब्ध नाहींत. यांचें मूळचें स्थान उत्तरहिंदुस्थान. तिकडून हे गुजराथेंत आले व नंतर महाराष्ट्रांत यांची वस्ती ३००।४०० वर्षांच्या आधींची आहे. हल्लीं यांची भाषा मराठीच झाली आहे; क्वचित् गुजराथी शब्द व लकबा भाषणांत येतात. अलीकडे यांचीं स्थलांतरेंहि फारशीं झालेलीं नाहींत.व्यापारानिमित्त जीं झालीं तीं फारच थोडीं व १०५ कोसांच्या आंतच.या जातीचे भाट(मांगटे)मध्यहिंदुस्थानांतील आहेत असें म्हणतात व ते यांच्यांत मोहतुराची चाल पडल्यापासून महाराष्ट्रांत येत नाहींत. आचार, पोषाक वगैरे हल्लींच्या दिवसांस अनुसरून असतो.हे मद्यमांसनिवृत्त आहेत. यांच्यांत पुनर्विवाहा(मोहतुरा)ची चाल आहे. पहिल्या घरचे नातेवाईक नसल्यास बाईच्या पहिल्या घरच्या मुलांस मोहतुराचा नवरा वाळगतो व त्यांचीं लग्नकार्यें करतो. यांच्यांत मोठीं कर्तृत्ववान अशीं माणसें झालीं नाहींत असें दिसतें. यांची बुद्धि आपल्या व्यवसायाच्या पलीकडे अद्यापि गेली नाहीं.यांचा मुख्य व्यवसाय वाणसवदा व सावकारीचा; मोठे जमीनदार कोणी नाहींत. यांच्यांत शिक्षण फार बेताचें ( हिशेब ठेवणें व लिहितांवाचतां येणें ) आहे; जास्ती शिक्षण घेण्याची अपेक्षा नाहीं. बालविवाह रूढ आहे. मुलींचें ७ ते ८ व मुलाचें १० ते १२ वर्षांतच लग्न होतें. लग्नापूर्वी ५।५ वर्षें (क्वचित तान्हेपणींहि) सोयरीक ( वाङ्निश्चय )होते. मोहतुराच्या वेळीं विधवेच्या भाऊबंदास कांहीं रक्कम देतात. मोहतुरास ५०।७५ व लग्नास ७००।८०० रु. खर्च म्हणजे शिकस्त झाली. पैशाच्या बाबतींत हे लोक चिक्कू आहेत. घाटावरचे ( मोंगलाईंतलि ) व खानदेशांतील यांच्यांत लग्नें क्वचित होतात. हे अगदीं जवळच्या गांवांतूनच सोयरीकी करतात. सरकारी नोकरी हे लोक फारशी करीत नाहींत. मोंगलाईंत यांच्यांपैकीं कांहीं जणांनां पाटिलकीचीं वतनें आहेत. [ रामचंद्र वेडु जळगांवकर व सदाशिव नागेश वाणी जळगांवकर यांनीं पाठविलेल्या व इतर माहितिवरून ].

**काथारिया**—मुंबई. काठेवाडमधील लहान संस्थान. झालावाड जिल्ह्यांतील भोईका ठाण्यांत हा स्वतंत्र खंडणी भरणारा तालुका आहे. कांथारिया व सोरटा हीं दोन गांवें यांत आहेत. तालुकदार लिमडींचे भायाद व झाल रजपुतांपैकीं आहेत.

**काथौन**—ग्वालेर रेसिडेन्सीमधील ही ठाकुरात आहे.

**काध्रोटा**—काठेवाड. एक लहानसें पोटसंस्थान. हा लाखापादर ठाण्यांतील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका असून त्यांत काध्रोटा हा एकच गांव आहे. तालुकदार वालवंशीय काठी आहेत.

**कादंब कवि**—अदितिकुंडलाहरण नाटकाचा कर्ता. हा नामांकित कवि १३ व्या शतकांतल्या तेलंगणाचा प्रतापरुद्र राजाचा दिवाण होता. याचें मूळचें रहाणें कलिंग देशांतलें होतें. याच्या हातीं राजसत्ता असून लोकांत याचें वजनहि चांगलें होतें. हा ज्योतिषविद्येंत चांगला निपुण होता. याला त्या शास्त्राचा लहानपणापासून छंद असल्यामुळें यानें ज्योतिषार्णव नांवाचा एक ग्रंथ रचिला. या ग्रंथाचा उपयोग पंचांगें करण्यांत फार होतो. या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत यानें आपला जन्म शके १३८४ चित्रभानु संवत्सरीं लिहिला आहे.

**कादंबरी**—हा शब्द आपल्याकडे बाणभट्टाच्या कादंबरी या अद्भुत कथेवरून रूढ झाला. तथापि याची रूढता अलीकडील आहे. गोष्टी, कथा इत्यादि शब्द पूर्वीपासून होतेच.मराठींतील कथावाङ्मय हें नवीन नसून त्याची परंपरा अत्यंत प्राचीन आहे. आणि मराठींतील पहिलें कथावाङ्मय संस्कृत कथावाङ्मयाच्या रूपांतरांनीं निर्माण होऊन पुढें

त्यावर पाश्चात्य संस्कार झाले. त्यामुळें प्रथमतः संस्कृत व प्राचीन प्राकृत कथावाङ्मय, त्यानंतर पाश्चात्य कथावाङ्मय व शेवटीं मराठी कथावाङ्मय अशी निवेदनपरंपरा लावली तर ती अधिक स्वाभाविक होईल. प्रथमतः संस्कृत कथावाङ्मयाकडे वळूं.

यांत "पौराण" किंवा "ऐतिहासिक" आख्यानवाङ्मयाकडे दुर्लक्ष करून इतर वाङ्मयाकडेसच मोर्चा फिरविला पाहिजे [ इतिहास पहा ].

क था वा ङ्म य.—भारतीयांच्या बुद्धींतून ज्या वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें अतिशय मौल्यवान गोष्टी निघाल्या त्यांमध्यें गांधर्वकथा, कल्पित नीतिकथा व वृत्तांतपर कथा यांना स्थान द्यावें लागेल. इतर सुधारलेल्या लोकांपेक्षां भारतीयांमध्यें त्यांना फारच लवकर वाङ्मयीन दर्जा प्राप्त झाला. बौद्ध व जैन धर्मग्रंथांमध्यें त्यांनीं महत्वाचें स्थान पटकावलें, एवढेंच नव्हे तर भारतीय काव्यकलेंतील इतर कोणत्याहि शाखेपेक्षां त्यांचें महत्व अधिक आहे असें मत प्रो. विंटरनिझनें आपल्या भारतीय वाङ्मयेतिहासांत व्यक्त केलें आहे. गांधर्वकथेंत आश्चर्यकारक गुंतागुंतीच्या मांडणींत आढळणारें कल्पनासातत्य, नीतिकथेंतील गंभीर व हास्यजनक प्रसंगांना लागणारें सुभाषित, विनोद व वृत्तांतकथा, तशीच अद्भुत रम्यकथा आणि कादंबऱ्या यांतील नवीन व अफाट साधनसंपत्ति, हीं सारीं प्राचीन भारतीय कथावाङ्मयांत दिसून येतात. महाकाव्य आणि नाटयवाङ्मय यांत कथावाङ्मयाइतकी विविधता दिसत नाहीं. एकस्वरूपी पात्रें घालण्याची भारतीय काव्याच्या इतर शाखांतून आढळून येणारी विशेष प्रवृत्ति या वाङ्मयांत आपणांस आढळत नाहीं. ज्यांच्या ठिकाणीं व्यक्तिशः निरनिराळीं लक्षणें आहेत अशा लोकांशीं कथावाङ्मयांत आपली गांठ पडते. सद्गुणी राजे, धीरोदात्त पुरुष, सुंदर व सुस्वभावी राजकन्या आणि आदरार्ह आचार्य याच व्यक्ती केवळ महाकाव्य आणि नाटय या वाङ्मयांतल्या प्रमाणें आपणांस या वाङ्मयांत आढळत नसून शेतकरी, कारागीर, व्यापारी, जुगारी,जादुगार, ठक तसेंच आत्मज्ञानी ब्राह्मण, ढोंगी वैरागी, वेश्या आणि वारांगना इत्यादि समाजांतील इतर अनेक दर्जाचे लोक आपण या कथावाङ्मयांत पाहतों. कित्येक निरनिराळ्या स्वभावांचीं पात्रें आपणांस प्राण्यांच्या कथामधून देखील आढळतात. जागतिक वाङ्मयांत स्थान या दृष्टीनें ऐतिहासिक महत्वाची एक गोष्ट म्हटली म्हणजे कोणत्याहि भारतीय काव्याच्या शाखेनें बाह्य वाङ्मयावर याच्याइतका परिणाम केला नाहीं, किंवा दुसरी कोणतीहि शाखा जागतिक वाङ्मयाला याच्याइतकी महत्वाची म्हणून वाटली नाहीं. भारतीय कथा एका लोकसमूहापासून दुसऱ्या लोकसमूहाकडे इतक्या लवकर भटकत गेल्या कीं, आपणाला यूरोप आणि आशियाखंडांतील बहुतेक सर्व प्रदेशांतून, इतकेंच नव्हे तर आफ्रिकन लोकांतहि त्या अंशरूपानें आढळतात; व याविषयीं अतिशय आश्चर्य वाटतें. पुष्कळशा त्रुटित कथा हिंदुस्थानांतून इतर राष्ट्रांत व्यापारी व प्रवासी यांच्या द्वारें तोंडोतोंडीं गेल्या असें केवळ नसून सबंधच्या सबंध हिंदी ग्रंथ भाषांतरांच्या द्वारें सामान्य व सार्वराष्ट्रीय मालमत्तेप्रमाणें बनले आहेत. कांहीं काळ तर असें समजण्यांत येत असे कीं, सर्व गांधर्वकथांचें उत्पत्तिस्थान आपला हिंदुस्थान देश आहे! सार्वलौकिक कथांच्या ऐतिहासिक अभ्यासाच्या प्रगतीमुळें हा समज खोटा ठरूं पहात आहे. तरी अतिविसदृश लोकांतील पुष्कळशा गांधर्वकथा हिंदुस्थानांतूनच गेल्या आहेत यांत शंका नाहीं. भारतीय वाङ्मयांत कथावाङ्मय निर्माण होण्याच्या पुष्कळ आधीं लोकांच्या तोंडीं अनेक प्रकारच्या गोष्टी व धार्मिक किंवा साधारण शिक्षकांनीं उपदेशाकरितां रचलेल्या थोड्याफार कल्पितकथा असत. गांधर्वकथा, प्रहसनें, आख्यायिका व गोष्टी त्याचप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं वाङ्मयीन ग्रंथांतून गोंविल्या गेलेल्या कल्पित कथा, या सर्व वाङ्मयांतील गोष्टींचे कांहीं अंशीं उगम व कांहीं अंशीं प्रतिकृती म्हणण्यास हरकत नाहीं. उत्पादक वर्ग व प्रयोजन या दोन्ही बाबतींत, पौराणिककथा व गांधर्वकथा यांत भेद आहे. गांधर्वकथा करमणुकीसाठीं असून पुराणकथेचा उद्देश एखादें धार्मिक सत्य पटवून देण्याचा असे. गांधर्वकथा प्रामुख्यानें लौकिक उगमाची असून तिचा वाङ्मयांत प्रवेश होण्यापूर्वी व तिचें प्राकृत वाङ्मयांत देखील अस्तित्व येण्यापूर्वी बराच काळ ती लोकांत प्रचलित होती. उलट नीतिकथेचें मूळ अस्तित्व वाङ्मयांत असून पहिल्यापासून संस्कृत काव्यांत तिचा अंतर्भाव होत असे. प्राण्यांच्या गांधर्वकथा जेव्हां म्हणींशीं किंवा नीतिपर सूक्तांशीं जोडण्यांत आल्या त्यावेळीं कदाचित् प्राण्यासंबंधीं नीतिकथा प्रचलित असणेंहि शक्य आहे. पुष्कळ म्हणींतून थोडक्यांत नीतिकथा गोंविलेली दिसते. आपल्या कथाग्रंथांतून पुष्कळवेळां गोष्टींच्या शिरोभागीं त्यांचीं नांवें म्हणून अशा म्हणी योजीत. याच कारणामुळें भारतीयांच्या नीतिपर पद्यांचा एक महत्वाचा भाग म्हणून म्हणींच्या संग्रहाकडे पाहण्यांत येतें.

कथावाङ्मय हें गद्य व पद्य यांचें मिश्रण होऊन तयार झालें आहे. गद्यभागांत कांहीं उपदेशपर म्हणी व कांहीं गांधर्वकथा व नीतिकथा आहेत. अगदीं अलीकडचे कथाग्रंथ सबंधच्यासबंध पद्यांत रचलेले आपणास आढळतात. सबंध गद्यांत लिहिलेले ग्रंथ फार कमी. अद्भुतरम्य कथांतून कांहीं थोडीं पद्यें मधून मधून घातलेलीं असत.

सर्वांत प्राचीन अशा गांधर्वकथा व वृत्तांतपर कथा मुख्य वाङ्मयांत नसून त्यांचा उगम श्रौतस्मार्त वाङ्मयांत शोधणें फारसें फायदेशीर होणार नाहीं. वैदिक ग्रंथांतून आढळणाऱ्या कांहीं गांधर्वकथा, वैदिकपुराणकथा व आख्यायिका यासंबंधींच्या काव्यांत मोडतील व त्याचप्रमाणें उपनिषदांत दिसून येणाऱ्या थोड्याशा प्राणिकथा काल्पितनीति-

कथांच्या सदरांत पडण्यासारख्या नाहींत असें विंटरनिझ्झ समजतो "आपणाला हा पांढरा कुत्रा सूक्तें गाऊन अन्न मिळवून देईल या आशेनें त्याच्या भोंवतीं इतर कुत्रे जमले आहेत." ही कथा दोन हंसकांच्या संभाषणावरून धर्मनिष्ठ रैक्वाकडे जातीचें गेलेलें लक्ष, किंवा सत्यकामाला एक बैल, एक हंस, एक पाणबुडा पक्षी यांपासून एकामागून एक मिळालेले बोध यांच्या कथांस नीतिपर कल्पित कथावङ्मयांत विंटरनिझ्झ नाहीं.

भारतीय वाङ्मयांतील अति जुनाट नीतिकथा महाभारतात सांपडतील. भरहूत स्तूपावरील चित्रांवरून खिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत कल्पित नीतिकथा हिंदुस्थानांत होत्या असें सिद्ध होतें. पतंजलीच्या काळांतील पुरावा त्याच्या 'काकतालीयम्' 'अजाकृपाणीयम्' इत्यादि शब्दरूपांवरून मिळतो. उपलब्ध असणारें भारतीय कथावाङ्मय पुढीलप्रमाणें वर्गीकृत होईलः—

( १ ) धार्मिक किंवा अन्य कारणांकरितां रचिलेल्या मोठ्या कथासमूहाचे घटक म्हणूनच केवळ ज्या आपणाला माहीत आहेत, पण ज्या अगदीं आरंभीं केवळ तोंडातोंडीं पुढें चालत आल्या असें गांधर्वकथा, वृत्तान्त आणि प्रहसनें यांचें वाङ्मय प्रथम उल्लेखिलें पाहिजे. हीं वृत्तें प्रथम संस्कृतांत नसून स्थानिक भाषांतून लिहिलीं गेलीं असावींत.

( २ ) एक किंवा जास्त धार्मिक चळवळींकरितां तयार केलेले कथासमूह, यांत जातकें आणि इतर बौद्ध व जैन कथाग्रंथ येतात. हा महत्वाचा वर्ग होय.

(३) राजकीय ज्ञान व जगाची माहिती देण्याच्या इराद्यानें संस्कृतांत रचलेलीं पंचतंत्रासारखीं पुस्तकें.

( ४ ) ज्यांत मधून मधून गोष्टी घातल्या आहेत अशी अद्भुतरम्य कथेच्या स्वरूपांत केवळ मनोरंजनाकरितां रचलेले वृत्तान्तपर ग्रंथ. उदाहरणार्थ, वृहत्कथा व त्याच्या पुढील आवृत्ति; वेतालपंचविंशति शुकसप्तति, इत्यादि. प्रथम हीं पुस्तकें प्राकृतांत व नंतर संस्कृतांत झालीं.

(५) संस्कृत गद्य कादंबऱ्या व अद्भुतरम्यकथा. उदाहरणार्थ, दशकुमारचरित, वासवदत्ता, कादंबरी वगैरे.

शेवटल्या तीन वर्गांतील ग्रंथ हे समुच्चयात्मक नसून स्वतंत्र ग्रंथ होत. त्यांच्या कर्त्यांनीं पहिल्या दोन वर्गांकडून कांहीं अंशीं कथाविषय मिळविले असतील तरी पण नवीन ग्रंथ निर्माण करण्याच्या बुद्धीनें त्यांनीं पदरच्या बऱ्याच कल्पना घातल्या आहेत. 'गोष्टींत गोष्ट' घालण्याची पद्धत अशा वृत्तान्तपर ग्रंथांतून सार्वत्रिक व लोकप्रिय दिसते. एका कथेच्या चौकटींत अनेक लहान मोठ्या गोष्टी बसविल्या असून पुन्हां यांतील प्रत्येक गोष्ट एक किंवा अधिक गोष्टींनां चौकट म्हणून असते. पण भारतीय कथाग्रंथांच्या सर्व प्रकारांतून गांधर्वकथा, कल्पित नीतिकथा व वृत्तान्तपरकथा एकमेकींच्यावळ जवळ ठेवलेल्या आपण पाहतों. केवळ मानवी अवस्थांसंबंधींच्या गोष्टींमधूनसुद्धां अमानुष प्राण्यांच्या आश्चर्यकारक गांधर्वकथा त्याचप्रमाणें मनुष्यगुणारोपित प्राणिकथा आपणांस एकसारख्या आढळून येतात. ज्या ठिकाणीं शिक्षणाचें कार्य करावयाचें असेल त्या ठिकाणीं नीतिकथा व ज्या ठिकाणीं केवळ मनोरंजनाचेंच कार्य असतें त्या ठिकाणीं गांधर्वकथा प्रामुख्यानें पुढें असतात. म्हणून नीतिकथा गांधर्वकथेपेक्षां लौकिककथाश्रयीं कमी असतात. एखादें राजकीय तत्व किंवा व्यावहारिक शहाणपण शिकविणाऱ्या गोष्टी व नीतिकथा बहुधा कविनिर्मित असतात, व त्यांस खऱ्या अर्थानें लोकप्रिय म्हणता येणार नाहींत. मात्र कालांतरानें पंचतंत्र किंवा ईसापच्या गोष्टी यांप्रमाणें त्या लोकांना आवडूं लागतील. याच्या उलट गोष्ट गांधर्वकथांची आहे. धार्मिक कल्पना आणि पुराणकथा, लोकांची जादूविद्या व गोष्टी सांगणाऱ्या स्त्रीपुरुषांचे कल्पनातरंग यांपासून म्हणजे प्रत्यक्ष लोकात्म्यापासून गांधर्वकथेचा जन्म झाल्यानें गांधर्वकथा बहुधा लोकप्रिय असते. संस्कृत भाषेंत सर्व प्रकारच्या वृत्तांतपर गोष्टींनां आख्यायिका, कथा हीं नांवें आहेत. जरी काव्यशास्त्रांत आख्यायिका व कथा यांच्यांतील भेद दाखविण्याचे प्रयत्न झाले आहेत तरी त्यांच्या उपयोगासंबंधीं शास्त्रकारांत एकमत नाहीं.

**पंचतंत्र.**—थिओडर, बेन्फे आणि हरटेल यांनीं पंचतंत्राचा इतिहास हुडकून काढला आहे. अर्थशास्त्र किंवा नीतिशास्त्र यांत आढळणारें व्यावहारिक शाहणपण व शासन शास्त्राचीं तत्वें, हीं कल्पित नीतिकथा व न्यायसूत्रें यांच्या द्वारें शिकविण्याचा पंचतंत्राचा मूळ हेतू होता. आरंभीं राजपुत्रांकरितां एक ग्रंथमालिका तयार करण्याचा कर्त्याचा उद्देश दिसतो. पण पुढें सर्व दर्ज्यांच्या तरुणांकरितां म्हणून हें पुस्तक प्रचारांत आलें. याच्या मागाहूनच्या प्रतींतून शुद्ध नैतिक कथा घुसडण्यांत आलेल्या दिसतात. मूळप्रत जरी उपलब्ध नाहीं, तरी पांच जुन्या प्रती सांपडल्या आहेत. पैकीं एक काश्मीरांतील असून दुसरी इ.स.५७०च्या सुमाराची पेहेलवी भाषेंतील आहे; आणखी एक दक्षिण हिंदुस्थानांत सांपडलेली आहे. एकमेकांशीं पुष्कळ अंशीं जुळणाऱ्या या पांच प्रतींपैकीं "तंत्राख्यायिक" नांवाची काश्मिरी हस्तलिखित प्रत मूळ ग्रंथाशीं बरीचशी जुळती दिसते. त्यांतील पांडित्यदर्शक गद्यसंस्कृत आणि पद्यभागांचे कृत्रिम छंद, हीं पाहतां असें वाटतें कीं हा लौकिक कथांचा समूह नसून एखाद्या कुशल कवीनें रचिलेला ग्रंथ आहे. यांतील विषय जुने असले तरी स्वरूप नवें आहे. तंत्राख्यायिकांचा बौद्धसंप्रदायाशीं कांहीं एक संबंध आढळून येत नाहीं. तथापि कर्त्याचा नैतिक दृष्टिकोन अगदीं निराळा आहे. कुटुंबवत्सलाचें सद्गुण, आतिथ्य व मित्रांमधील एकनिष्ठपणा प्रशंसिली असली तरी, राजा आणि योद्धा ह्यांचे नीतिधर्म विशिष्ट असून बौद्ध संप्रदायाशीं ते जुळत नाहींत. राजा व योद्धा हे अहिंसेनें बांधले गेले नाहींत; त्यांनीं शरणागताला आश्रय मात्र द्यावा.

तंत्राख्यायिक संशोधिलें जाण्यापूर्वी हिंदुस्थानांतल्या वायव्य भागांतील प्रत अतिशय लोकप्रिय असून यूरोप खंडांत देखील तिचा सर्वत्र प्रसार झाला होता. इ. स. ९व्या किंवा १० व्या शतकाच्या उत्तरार्धांत एखाद्या जैनानें ही प्रत तयार केली असावी. हींत नीतिकथा जास्त असून मूळ ग्रंथांत नाहींत अशा अनेक गांधर्वकथाहि घुसडल्या आहेत. त्यांतील कोष्टयाची गोष्ट विशेष प्रसिद्ध आहे.त्यानें राजकन्या मिळविण्याकरितां विष्णूचें सोंग घेतलें.पण शेवटीं विष्णूनें त्याच्या देहांत शिरून राजाच्या गर्वामुळें उत्पन्न झालेला युद्धप्रसंग टाळला. मुत्सद्देगिरीसंबंधीं अनेक वचनें या प्रतींत आहेत. बाराव्या शतकाच्या अखेरीस पूर्णभेद नांवाच्या एका जैन यतीनें तिच्यावर बरेच परिश्रम करून दुसरी एक प्रत रचिली. या दोन जैन प्रती हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या असून संस्कृत व देशी भाषांतूनहि प्रती तयार झाल्या आहेत. १६५९–६० त मेघविजय नांवाच्या जैन यतीनें या नवीन प्रतींपैकीं एकीची मुलांनां शिकविण्याला उपयोगी पडावी म्हणून नवी संक्षिप्त रचना केली. तिचें नांव पंचाख्यानोद्धार असें होतें. भारतीय आणि ग्रीक नीतिकाव्य यांतील संबंध निश्चित करण्याच्या कामीं या पुस्तकांत नवीन घातलेल्या गांधर्व कथा फार महत्वाच्या आहेत. या प्रतीचें वैशिष्ट्य म्हणून दिसणाऱ्या रत्नपालाच्या कथा जैन ग्रंथकथा आहेत तरी कांहीं अंशीं सामान्य हिंदु कथांवर त्यांची उभारणी झाली आहे.

हि तो प दे श.—(इ. स. ९ वें तें १४ वें शतक यांमधील काळ) हा कथासमूह अधिक अर्वाचीन असून त्याचा कर्ता जो नारायण यानें पंचतंत्र व "दुसरा एक ग्रंथ" यावरून हा हितोपदेश तयार केला आहे. याचे चार अध्याय असून त्यांत अनुक्रमें मित्रलाभ, सुहृद्भेद, विग्रह व संधि असे चार विषय प्रतिपादिले आहेत. यांतील लढाई करणारे प्राणी घुवडें किंवा कावळे नसून एक हंस व एक मोर आहे. कल्पित नीतिकथांतून सुद्धां या पुस्तकाचें राजकीय स्वरूप झांकत नाहीं. यूरोपीय भाषेंतून याचीं अनेक भाषांतरें असून अल्बेरुणी यास एक हिंदी भाषांतर माहीत होतें.

जा ग ति क वा ङ्म य आ णि पं च तं त्र.—इ. स. ६ व्या शतकांत पेहलवींत, नंतर सिरियन भाषेंत पंचतंत्राचें भाषांतर झालें. "कालील आणि दिम्न" या नांवाचें अरबी भाषांतर ८ व्या शतकांत पुढें आलें. दहाव्या किंवा ११ व्या शतकांत अरबींतून ग्रीक भाषेंत, नंतर इटालियन, लॅटिन, जर्मन, आणि स्लाव्ह या भाषांतून भाषांतरें निघालीं. १२ व्या शतकाच्या आरंभीं रब्बी जेएल याचें हिब्रू भाषांतर व या हिब्रूचीं इतर भाषांतरें होऊन १४८३ पासून जर्मन वाङ्मयावर त्याचा परिणाम होत गेला. जर्मन भाषांतरांची डॅनिश, आईसलँडिक् व डच भाषांत भाषांतरें निघालीं. १३ व्या शतकांत एक दुसरें हिब्रू भाषांतर होऊन सर्व यूरोपभर या भारतीय कथांचा फैलाव झाला. सर्व मध्ययुगांत यूरोपीय कथालेखकांच्या रचनांतून यांचे मागमूस आढळतात. ज्या कथा फार दूरवर फिरून इतर देशांतून रुजल्या त्या पुढील होतः—एक ब्राह्मण आपल्या मुलाला मुंगसानें मारलें अशा समजुतीवर त्या प्राण्याला मारतो; वास्तविक मुंगसानें एका सापास मारून ब्राह्मणाच्या मुलाचा जीव वांचविला असतो. दुसरा एक ब्राह्मण आपल्या पिष्टपात्रापासून येणाऱ्या उत्पन्नाचा अजमास करून हवेंत भावी सौख्याच्या इमारती बांधतो; पण त्याचें भांडें त्याच्याच हातून फुटून पीठ सांडून जातें. एक पक्षी (टिटवी) आपल्या अंगावर आकाश कोसळूं नये म्हणून आपला एक पाय वर उचलून घेतो इ.

भारतीय व ग्रीक कल्पित नीतिकथांतील संबंध बरोबर निश्चित करतां येत नाहीं. सर्वांत प्राचीन भारतीय नीतिकथा ख्रिस्तपूर्व ४ थ्या किंवा ५ व्या शतकांतल्या होत असें अनुमानानें सांगतां येईल. कांहीं थोड्या कथा मात्र ख्रिस्तपूर्व ३ ऱ्या शतकांतल्याच असें नक्की सांगता येतें. ग्रीक नीतिकथांचा आरंभ हेसीऑईडपासून धरतां येतो. ख्रिस्तपूर्व ५ व्या आणि ६ व्या शतकांत ईसापमुळें ग्रीक प्राणिकथा कळसास पोहोंचली. तथापि पुढें बराच काळ पर्यंत ग्रीक नीतिकथा वाङ्मयाची एक विशिष्ट शाखा म्हणून प्रगत झाली नाहीं. जेव्हां हिंदुस्थान आणि ग्रीस यांच्यांत बौद्धिक दळणवळण सुरू झालें तेव्हां कथांचीहि प्रत्यक्ष देवघेव झाली असावी, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

बृ ह त् क था.—भारतीय कथावाङ्मयांतील अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे बृहत्कथा होय. इ. स. ३ ऱ्या शतकांत किंवा थोडा काल अगोदर गुणाढ्यानें हा ग्रंथ रचिला. यांत उदयन राजा आणि त्याचा मुलगा नरवाहनदत्त यांचीं धाडशी कृत्यें वर्णिलीं आहेत. गुणाढ्य ही खरी व्यक्ति असली तरी त्याच्या चरित्राविषयीं कांहीं एक माहिती नाहीं. तो शातवाहन राजाचा मंत्री होता. या आख्यायिकेंत ऐतिहासिक तथ्य नाहीं. त्याचें जन्मस्थान म्हणून समजलें जाणारें प्रतिष्ठान शहर दक्षिणेंतील नसून बहुधा उत्तरहिंदुस्थानांतील असावें असें मत विंटरनिझ व्यक्त करतो पण त्यासंबंधानें आम्हांस समाधान वाटत नाहीं. गुणाढ्याचा हा ग्रंथ पैशाची भाषेंत आहे. त्याच्या दोन प्रती आहेत. काश्मिरी प्रतींत क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी व सोमदेवाचें कथासरित्सागर हे दोन पद्यपाठ येतात. आणि नेपाळी प्रतींत बुधस्वामिकृत "बृहत्कथाश्लोकसंग्रह" हें अर्धवट असें एकच पुस्तक आहे. बुधस्वामीच्या ग्रंथांत ग्रीक कारागिरांचा जो उल्लेख आहे त्यावरून हा बहुधा ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत रचिला गेला असावा असें दिसतें. हा ग्रंथ अर्धवट आहे हें आपलें दुर्दैव होय. कारण फारच थोड्या भारतीय ग्रंथांतून आढळणारी विनोदी वृत्ति आणि संसाराचा आशाजनक आलोक यांत दिसतो. लोकांची रहाणी, जैनांची रहाणी व शिल्पी वर्गाचें चरित्र हीं यांत अतिशय स्पष्टपणें दाखविलीं आहेत.

क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी इ. स. १०३७ च्या सुमारास लिहिली गेली असावी. क्षेमेंद्राचा उद्देश मूळ ग्रंथाचा बराच संक्षेप करण्याचा होता. पण त्यानें कांहीं ठिकाणीं अर्थबोध होणार नाहीं इतका जरी संक्षेप केला आहे तरी शृंगारिक प्रसंग व धार्मिक भाग फार पाल्हाळ करून दिला आहे. क्षेमेंद्राच्या ग्रंथाच्या मागून सुमारें ३० वर्षांनीं, म्हणजे १०६३ आणि १०८१ यांमधील काळांत, सोमदेवाचा कथासरित्सागर रचिला गेला आहे. हाहि ग्रंथ काव्याच्या दृष्टीनें बराच महत्वाचा आहे. दोघांहि कवींचा आधारग्रंथ एकच; पण सोमदेवाची भाषा बरीच प्रौढ असून, कुशल व जोरदार अशा उत्तम उत्तम भारतीय कवींमध्यें तो एक गणला जातो. सुमारें ३५० नवीन गोष्टी ज्या यांत घातल्या आहेत त्या मुख्य कथाभागाहून जास्त मनोवेधक आहेत. त्यांमध्यें मूढ व शठ यांच्या कांहीं थोड्या गोष्टी आपणांस आढळतात. उदा० मूलदेव आणि त्याचा शहाणा मुलगा ही माणसें ज्यांत देवांनां फसवितात अशा गोष्टी आणि दुराचारी बायकांच्या गोष्टी वगैरे. हिंदुस्थानांतील धार्मिक परिस्थिति व स्त्रियांचा दर्जा यांसंबंधीं बरीचशी माहिती करून देणारा हा ग्रंथ म्हणता येईल.

वे ता ळ पं च विं श ति का.—हा भाग बृहत्कथेच्या काश्मिरी प्रतींत आहे. पण शिवदास व जंभलदत्त यांखेरीज सोमदेव आणि क्षेमेंद्र यांचे वेताळ पंचविंशतिकेवरचे पाठ आपणापुढें आहेत. यांतील गोष्टी बौद्ध किंवा जैन नसून सामान्य निवृत्तिपर वाङ्मयांतील आहेत. जादूविद्या त्यांत बरीचशी वोकाळलेली दिसते. जादूविद्या हस्तगत करण्याच्या कामीं विक्रमसेन राजाला मदत देणाऱ्या वेताळानें या गोष्टी सांगितल्या आहेत.

सिं हा स न द्वा त्रिं शि का.—हा वेताळपंचविंशतिकेप्रमाणें पण मागाहून रचिलेला असा राजा विक्रमासंबंधीं बत्तीस गोष्टींचा समूह आहे. याच्या अनेक पाठांपैकीं जो एक जैन पाठ आहे त्याला जैननीतितत्वांचें तिखटमीठ लाविलें असून प्रत्येक गोष्टीच्या शेवटीं एका पद्यांत गोष्टीचें तात्पर्य दिलेलें असतें. हें पुस्तक ११ व्या शतकाच्या अगोदरचें असूं शकणार नाहीं.

भारतीय लोकप्रिय वाङ्मयांतील आवडत्या गोष्टींमध्यें "माधवानल-कामकंदला-कथा" ही एक होय. भट्ट विद्याधर याच्या आनंद नांवाच्या शिष्यानें एक ब्राह्मण व एक नर्तिका यांची ही प्रेमकथा लिहिली आहे. ही गद्यकथा करुणरसपूर्ण आहे. विक्रमादित्याची कीर्ति वर्णन करणारा आणखी पद्यकथासमूह म्हणजे 'विक्रमोदय' होय. यांत शुकरूपांत कुशल न्यायाधिश म्हणून राजाला दाखविलें आहे. अनंताचें 'वीरचरित्र' हें चोपडें शक्तिकुमाराच्या शालिवाहन राजप्रतिनिधीचा सहकारी जो शुद्रक त्याचीं धाडशी कृत्यें वर्णन करतें. आकारांत महाकाव्यासारखें हें दिसत असलें तरी त्याचें अंतरंग वृत्तांतमय आहे.

शु क स प्त ति.—प्रभावती नांवाच्या एका दुराचारी स्त्रीला एका पोपटानें सांगितलेल्या ७० गोष्टींचें हें पुस्तक अर्वाचीन असून त्यांतील बहुतेक गोष्टी बायकांविषयीं आहेत. चौदाव्या शतकाच्या आरंभीं फारशींत याचें भाषांतर झालें. याच्याच एका श्लोकबद्ध तरजुम्याचें नांव "दिनालापनिकशुकसप्तति" असें आहे. सिंदवादची अरबी गोष्ट पुष्कळ अंशानें शुकसप्ततीशीं संबद्ध दिसते. पण 'अरबीसुरस कथा' (अरेबियन नाइट्स) हिंदी उगमाच्या आहेत कीं नाहींत याविषयीं जबरदस्त शंका आहे. मूळ हिंदी गोष्टींची नक्कल म्हणून एखाद्या फारशी कवीनेंहि हा ग्रंथ रचला असावा.

अर्वाचीन काळांतील कांहीं संस्कृत वृत्तांतग्रंथ देशी भाषांतून भाषांतरलेले असावेत. उदाहरणार्थ, 'भारतकद्वात्रिंशिका' यांत भिक्षा मागणाऱ्या जतींच्या किंवा भारतकांच्या गोष्टी व शिवदासकृत कथार्णव यांत चोरांच्या गोष्टी आहेत; हरिभद्रकृत धूर्ताख्यान यांत महाभारत आणि रामायण यांतील कथांची प्राकृतांत टर उडविली आहे; पुरुषपरीक्षा—कर्ता विद्यापति ( १४ वें शतक ), यांत पुरुषाचे गुण सांगणाऱ्या ४४ नैतिक कथा आहेत.

वृत्तांतग्रंथांमध्यें ऐतिहासिक पुरुषांच्या आख्यायिका सांगणारे ग्रंथहि घेतले पाहिजेत. मेरुतुंगाचें ' प्रबंधचिंतामणी ' राजशेखराचें 'प्रबंधकोश', बल्लाळाचें 'भोजप्रबंध' हीं पुस्तकें या वर्गांत येतील.

कृ त्रि म अ द् भु त र म्य क था.—संस्कृत गद्य काव्यांतील विषय गांधर्वकथांतील विषयांसारखेच असतात. दंडीच्या दशकुमारचरितांत दहा राजपुत्रांचीं धाडशीं कृत्यें सांगितलेलीं आहेत. एक कळवंतीण एका ऋषीला कशी मूर्ख बनवून सोडिते, यासारख्या कपटाच्या व अप्रामाणिक लोकांच्या आयुष्यक्रमावर मजेदार प्रकाश पाडणाऱ्या गोष्टी यांत आल्या आहेत. कळवंतिणीचा पेशा ईश्वरनिर्मित असून राजाश्रयानें त्या रहातात असें यांत दाखविलें आहे.

सुबंधूच्या वासवदत्तेचा ( इ. स. ६ वें किंवा ७ वें शतक) भासाच्या याच नांवाच्या नाटकाशीं कांहीं एक संबंध नाहीं. वासवदत्ता व कंदर्पकेतु यांची ही प्रेमकथा असून या काव्यप्रबंधाची उच्च अलंकारिक भाषा मुळींच भाषांतर करण्याजोगी नाहीं. इ. स. ६०६ ते ६४८ या काळांत होऊन गेलेल्या बाणभट्टानें हर्षचरित्र व कादंबरी या दोन अद्भुत व रम्य कथा लिहिल्या. हर्षाच्या वेळची राजकीय व धार्मिक परिस्थिति दाखविणारी 'हर्षचरित' ही एक ऐतिहासिक कादंबरी आहे. कादंबरी ही प्रेमकथा बापाच्या मृत्यूमुळें अपुरी राहिली होती ती त्याचा मुलगा भूषणभट्ट यानें पुरी केली. कादंबरी आणि चंद्रापीड यांच्यामध्यें प्रथमदृष्टिपातानें उत्पन्न झालेलें प्रेम हींत वर्णिलें असून त्यावेळच्या शैवपंथीय लोकांच्या धार्मिक आयुष्यक्रमावर हिनें बराच प्रकाश पडतो.

भारतीय व ग्रीक अद्भुत कथांचा परस्परसंबंधः— वासवदत्ता आणि कादंबरी या जातीच्या कादंबऱ्यांतून स्वतंत्र

भारतीय वैशिष्ट्य दिसून येते असल्यानें भारतीय कादंबऱ्यांच्या आधीं जन्म पावलेल्या ग्रीक कादंबऱ्यांचा त्यांवर परिणाम झाला असेल हें संभवनीय दिसत नाहीं. वनस्पतींमधील प्रेम व विवाह दाखविण्याची गोष्ट मात्र दोघांचा पुष्कळच सारखेपणा दाखविते.

चं पुः—गद्य आणि पद्यभाग एकत्र जोडून एक ग्रंथांत करण्याच्या या प्रकाराला काव्याची एक विशिष्ट शाखा म्हणता येईल. चंपूमध्यें गद्य आणि पद्य यांचे हेतु एकच असतात. या रचनेचीं जुनीं उदाहरणें म्हणजे बौद्धजातकमाला, राजा समुद्रगुप्तावरील हरिसेनाची प्रशस्ति ( सुमारें इ. स. ३४५ ) हीं होत. अतिशय सुप्रसिद्ध चंपु म्हणजे त्रिविक्रमभट्टाचा नलचंपु किंवा दमयंतीकथा होय. शिवाय भोजराजाचा रामायणचंपु आणि अनंताचा भारतचंपु. सोळाव्या शतकांतील अकबराच्या कारकीर्दींत पारिजातहरणचंपु आणि मंदारमरंदचंपु हे लिहिले गेले. त्याच शतकांत नारायणभट्टानें स्वाहासुधाकरचंपु व १८ व्या शतकांत शंकरकवीनें शंकरचेतोविलासचंपु रचिला. या शेवटल्या चंपूंत चेतसिंह राजाचे पराक्रम वर्णिले आहेत.

पा श्चि मा त्य का दं ब री सं बं धा चें वा ङ्म य.—हा साहित्याचा प्रकार पाश्चात्यांत चांगलाच वाढला असून, यांत कर्त्यांच्या समकालीन वा भूतकालीन समाजाच्या स्वभावाचें व चालीरीतींचें सूक्ष्म निरीक्षण करून, त्यावरून वनविलेल्या खऱ्या किंवा काल्पनिक कथानकांचा समावेश होतो. या कथानकांस ऐतिहासिक प्रसंगांची अगर समाजाच्या निरनिराळ्या अनुभवांची जोड कांहीं एका प्रमाणांत असावी लागते. हा साहित्यसेवेचा प्रकार पश्चिमेकडेहि बहुशः अर्वाचीनच आहे. देशांत स्वास्थ्य नांदलें असतां हें वाङ्मय निर्मित होतें. यापासून समाजांत धार्मिक, राजकीय, सामाजिक, शैक्षणिक इत्यादि सुधारणांची भावना व ( कांहीं एका परिणामापर्यंत ) तिच्या अनुरोधानें प्रयत्न होऊं शकतो; म्हणजे समाजसुधारणेच्या अनेक अंगांपैकीं हेंहि एक छोटेंसें अंग होय. करमणूक करणें, सृष्टीच्या गूढ तत्वांचा व नियमांचा जेणेंकरून सहज बोध होईल अशी रचना करणें हा मुद्दां कादंबरीचा एक हेतु असतो. पूर्वी या प्रकारचें साहित्य कोणत्याहि देशांत कमीच होतें. यूरोपमध्यें १८ व्या शतकानंतर लेखकांनीं या कामीं प्रयत्न केला व १९ व्या शतकांत साहित्यांतील ही एक महत्वाची गोष्ट आहे असें मानण्यांत येऊं लागलें. कादंबऱ्या लिहिण्यास साधारण प्रतीची बुद्धि लागते असें कांहींचें म्हणणें आहे; परंतु समाजावर जेणेंकरून परिणाम होऊन कांहीं तरी कार्य घडविण्याची ज्यांस इच्छा असेल अशा कादंबऱ्यांच्या लेखकांची बुद्धि मात्र बऱ्याच उच्च कोटींतील असावी लागते. प्रख्यात कवींचें काव्य व प्रख्यात लेखकांची कादंबरी यांत वस्तुतः भेद नाहीं. परंतु अशा दर्जाच्या कादंबऱ्या थोड्या निपजतात.

प्रा ची न.—यूरोपमध्यें शिकंदराच्या वेळेपासून या वाङ्मयास प्रारंभ झाला असें ठोकळ रीत्या मानितात. ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत आरिस्टीडी यानें सहा भागांची जी " मिलेसीआका " नांवाची गोष्ट लिहिली आहे, तीच यूरोपांतील पहिली कादंबरी असें म्हणतात. इच्यांत त्यावेळच्या समाजाच्या प्रणयकथा विनोदी व श्लेषात्मक भाषेंत दिल्या होत्या. यूरोपांत ल्युसिअन ( ख्रि. पू. २ रें शतक ), हेलिओडोरस ( ख्रि. ४ थें शतक ), लाँगस ( ६ वें शतक ), वगैरे प्राचीन कादंबरीकार झाले; पैकीं, लाँगस याच्या कादंबऱ्या म्हणजे उपलब्ध प्राचीन ग्रीक कादंबरीवाङ्मयाचा एक खासा नमुना होय; 'डाफनी' आणि 'चलोई' या त्याच्या मुख्य नवलकथा असून त्यांत तत्कालीन धनगरी समाजाचें दृश्य पहावयास सांपडतें. लॅटिन भाषेंतील अप्युलीअसची सुप्रसिद्ध कादंबरी "सुवर्णगर्दभ" अशा अर्थाच्या नांवाची आहे. रोमनसाम्राज्यकालांत गद्य वाङ्मय सुरू झालें; परंतु त्यांत कादंबऱ्यानीं कितपतःभाग घेतला होता तें नक्की समजत नाहीं. मात्र श्लेषात्मक पद्धतीचा या वेळीं प्रचार झाल्याचें आढळून येतें. पेट्रोनिअसच्या ' सत्रिकन ' कादंबरींत ही पद्धति अनुसरली असून शिवाय तत्कालीन समाजाच्या चालीरीतींचें सूक्ष्म व काळजीपूर्वक केलेलें परीक्षणहि तींत गोविलें आहे.

इ ट ली.—अर्वाचीन कादंबऱ्यांच्या जनकत्वाचा मान यूरोपांत उत्तर-इटलीला आहे. तेराव्या शतकांत इलनेव्हेलिनो या नांवाच्या नवलकथा तेथें उत्पन्न झाल्या [ इंग्रजी नॉव्हेल हा शब्द ल्याटीन नॉव्हेलस-नोव्हस म्हणजे नवीन ( संस्कृत नव, नवल ) या धातूपासून निघालेला आहे ]. या गोष्टींत स्त्रीदाक्षिण्य, पौराणिक गोष्टी, नीति, अनीति वगैरे गुणावगुणांच्या आधारें कथा सांगितलेल्या आहेत. तसेंच त्या वेळच्या समाजाचीं, वायकांविषयींचीं, उपाध्यायवर्गविषयक, शेतकऱ्यासंबंधाचीं व इतर चालीरीतींचीं दिग्दर्शक मतें यांत आलेलीं आहेत. पहिला इटालियन कादंबरीकार, फ्रांसिस्को बार्बेरिनो ( १३४८ ) हा असून, याची प्रख्यात कादंबरी डॉ. क्युमेंटिद अमूर ही होय. यानंतर बोक्याचियो, सच्चेही, फिओरेंटिनी, ( यानें ५० कादंबऱ्या लिहिल्या असून, प्रख्यात शेक्सपिरनें आपल्या "व्हेनिसचा व्यापारी" या नाटकास याच्या एका कादंबरीचा आधार घेतला होता ), मॉसुशिओ :हा दक्षिण इटलीचा रहिवासी असून अतिशय स्वतंत्र बुद्धीचा होता. याच्या कादंबऱ्यांत मत्सरी नवरे, जारिणी स्त्रिया व व्याभिचारी उपाध्ये यांची चरित्रें रंगविलेली आहेत. कॉर्नेझनो, ब्रेव्हिओ व बँडिलो हे प्रख्यात कादंबरीकार होऊन गेले. पैकीं सर्व इटालियन कादंबरीकारांत शेवटचा बँडिलो हा श्रेष्ठ होऊन गेला. याच्या कादंबऱ्यांची यूरोपांतील सर्व भाषांतून भाषांतरें झाली आहेत. याच्या नंतर नांवाजलेला इटालियन कादंवरलिखक असा झालाच नाहीं. यानंतर १८ व्या शतकांत जर्मन कादंबरीलेखनाच्या धर्तीवर इकडे कादंबऱ्या होऊं लागल्या. या कालांतील प्रख्यात व लोकप्रिय लेखक मन्झोनी ( १८७३ ), व्हर्गा व सेराओ ( १८५६ ) हे होत.

फ्रान्समध्यें १४ व्या शतकापर्यंत पौराणिक कथांवरच मुख्य भर होता. त्यानंतर इटलीच्या कादंबऱ्यांची भाषांतरें व त्याच्या आधारें रचलेल्या गोष्टी प्रचारांत आल्या. या वेळचा सेल म्हणून एक लेखक होऊन गेला. पंधराव्या व सोळाव्या शतकाच्या अर्धापर्यंत फ्रान्समध्यें काल्पनिक साध्या गद्य-गोष्टी प्रचारांत होत्या. त्या वेळचे बोनाव्हेंचूर, वेरोआल्दे हे लेखक होत. राबेले हा पहिला फ्रेंच ऐतिहासिक कादंबरी-लेखक होय. इ.स.१६१० मध्यें उर्फे यानें पहिली प्रेमविषयक कादंबरी लिहिली. हींत प्रत्येक पात्राचा स्वभाव उत्तम तऱ्हेनें उठवलेला आढळतो. गाम्बराव्हिल (१६७४) व गॅंबेल्ड यांच्या कादंबऱ्यांत धाडस, भावनोत्कटता वगैरे गुण आढळतात. स्कुडेरी(१७००) नांवाची एक स्त्रीहि नांवाजलेली लेखिका झाली. इनें मनुष्यस्वभावाचें चित्र रेखाटलेलें आहे. तिच्याच-सारखी फायेट नांवाची दुसरी एक लेखिका (साऱ्या यूरोपांत प्रख्यात अशी)होऊन गेली. तिनें निसर्गाचा परामर्श घेऊन आपल्या वेळच्या उमरावांच्या स्थितीरीतींचें वर्णन केलेलें आहे. फॉटेन, फेनेलन, लेसेज ( हा विनोदी ), मॅरिव्हो ( मानवीवृत्ति व ऊर्मींचा अभ्यासक ) वगैरे प्रसिद्ध फ्रेंच लेखक झाले. व्होल्टेरच्या कथा व वरील लेखकांच्या कादंबऱ्या यांचा मात्र एकाच वर्गांत समावेश होऊं शकत नाहीं. त्याच्या कथा श्लेषात्मक फार. इंग्रजी लेखकांची छाप डिडेरो रूसो वगैरे लेखकांवर पडलेली आढळते. पुढें पुढें मात्र ज्यांच्या वाचनानें लोकांच्या मनांत चांगल्या भावना जेणेंकरून उत्पन्न होऊन वाढीला लागतील अशा गोष्टी प्रेमविषयक कथा—फ्रान्समध्यें रचण्यांत आल्या पेरीच्या कादंबऱ्यांत नैतिक गुणांचा ठसा जास्त दिसतो. इ. स. १८३० नंतर निवळ काल्पनिक कादंबऱ्यास सुरुवात झाली. प्रख्यात लेखक अलेक्झांडर डूमास यानें वॉल्टर स्कॉटचा कित्ता उचलला होता. याच्या कादंबऱ्यांत सर्वत्र धाडस हेंच प्रामुख्यानें आढळतें. फ्लाबेर यानें काल्पनिक व व्यावहारिक या परस्परविरुद्ध गुणांचा मेळ उत्तम तऱ्हेनें आपल्या कादंबऱ्यांत बसविला आहे ( स. १८५६ ); झोला हाहि प्रख्यात लेखक होऊन गेला. यांशिवाय ह्यूगो, झोला मापासां हे गेल्या शतकांतील प्रसिद्ध कादंबरीकार होत.

इंग्लंड.—पहिली नवलकथा स. १४७० त मॅलोरी यानें लिहिली; तत्पूर्वी ग्रीक गोष्टींचीं निवळ भाषांतरें होत असत. मनुष्यस्वभावाचें चित्र मॅलेरीच्या गोष्टींत चांगलें उतरलें आहे. परंतु त्याला गद्यापेक्षां पद्यच म्हणणें शोभतें. इटलीपासूनच ही कला इंग्लंडनें घेतली आहे. स. १५६० पासून पुढें ४०।५० वर्षें इटालियन कादंबऱ्यांचींच भाषांतरें इंग्रजींत होत असत. प्रेमविषयक पण ज्यांत उत्कटत्वाचा गुण नाहीं अशा कादंबऱ्या लिहिणाऱ्यांच्या वर्गांत लिनी, ग्रीन, डिकिन्सन, लॉज, नाश वगैरे लेखक येतात. एलिझाबेथच्या काळीं गायकी व नाट्य विषयक पद्यवाङ्मय जास्त होतें. गद्य ( विनोदी गद्य ) वाङ्मयाचा त्यावेळीं शुकशुकाट होता. त्यावेळीं फ्रान्सच्या कादंबऱ्यांचें वाचन इंग्लंडांत जारीनें होई. नांवाजलेला पहिला इंग्रजी कादंबरीकार म्हणजे रिचर्डसन ( १७६० ) हा होय. कादंबरीलेखकानें तरुणांची नीतिमत्ता सुधारतां येईल या हेतूनें त्यानें या कामीं हात घातला होता. याच वेळीं स्मॉलेट म्हणून एक विनोदी लेखक होऊन गेला. याच्या गोष्टींत सत्यत्वापेक्षां अद्भुतता जास्त असे. या सुमारचा दुसरा फील्डिंग म्हणून लेखक होता. त्यानें तत्कालीन भोंदूपणावर हत्यार उचललें होतें; टॉम जोन्स ही याची कादंबरी याच मासल्याची आहे. धार्मिक प्रवचनांनां कादंबरीचें स्वरूप कसें देतां येतें हें डॉ. जान्सननें (१७५९) आपल्या रासेलसमध्यें चांगलें दाखविलें आहे. तर व्हिकार ऑफ वेकफील्डमध्यें गोल्डस्मिथनें ( १७६६ ) सौम्य विनोद व सहज साधेपणा यांसह तत्कालीन स्थितीचें चित्र वठविलें आहे. यापुढील ३०।४० वर्षांत नांवाजण्यासारख्या कादंबऱ्या झाल्या नाहींत. मात्र होरेस वॉलपोल म्हणून साधारण नांव घेण्यासारखा एक लेखक यावेळीं होऊन गेला. वरील स्थिति १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत होती. यानंतर मात्र मानसशास्त्राच्या अनुरोधानें व ऐतिहासिक व्यक्तींच्या गुणावगुणास अनुलक्षून कादंबरीलेखन सुरू झालें. या प्रकारचे दोन प्रख्यात लेखक म्हणजे जेन ऑस्टेन (सेन्स अँड सेन्सिबिलिटी याची कर्त्री) व वाल्टर स्कॉट ( वेव्हर्ले कादंबरी मालेचा कर्ता ) हे होत. या वेळेपासून कादंबरीलेखनास एक निराळीच दिशा लागली. यापुढील प्रख्यात लेखक म्हणजे चार्लस डिकन्स (१८७०)होय. यानें आपल्या शोधक बुद्धीनें कादंबरीलेखनास पुन्हां दुसरेंच एक वळण लाविलें ( याची पिकविक पेपर्स ही कादंबरी याची उत्कृष्ट साक्ष आहे ). या वेळचे दुसरे प्रसिद्ध लेखक म्हणजे थ्याकरे, इलिअट, मिसेस गास्केल हे होत. या मंडळीनें भूतदया आणि सामाजिक व नैतिक सुधारणांचा हव्यास धरून लेखन केलें. समाजांतील अन्याय व दुःखें हीं नाहींशीं कशीं होतील यांकडे ( आयुष्य म्हणजे मजा आहे, आनंद आहे ही भावना थोडीशी एकीकडे ठेवूनहि ) यांनीं जास्त लक्ष घातलें. यानंतरच्या १९ व्या शतकांतील उत्तरार्धांतील किंग्स्ले, रीड, मेरिडिथ वगैरे लेखकांनीं जें वळण कादंबरीलेखनास लाविलें तेंच हल्लीं चालू आहे. हल्लींचे प्रसिद्ध कादंबरीकार किपलिंग होत. ( आंग्लोइंडियन वाङ्मय पहा ) गार्विसच्या कादंबऱ्याहि लोकप्रिय आहेत.

स्पेन.—१५ व्या शतकांत बखरींच्या रूपानें गद्यवाङ्मय सुरू झालें. सोळाव्या शतकांत कादंबरीलेखनाची नुसती भूमिका तयार झाली होती. अमेरिकेच्या शोधामुळें या वेळीं अद्भुत गोष्टींचा बराच सुळसुळाट झाला. यानंतर धाडशी व विनोदी वाङ्मय उत्पन्न झालें. यावेळची कादंबरी 'डायाना' ही वरील गुणांचीच दर्शक होती. त्यामुळें ती त्यावेळीं साऱ्या यूरोपमध्यें आवडती झाली; हिचा कर्ता व दुसरी प्रसिद्ध कादंबरी ' डॉन क्विक्झो इचा कर्ता एकच ( मॉंटमर नांवाचा ) होता. या दुसऱ्या कादंबरीनें साऱ्या कादंबरी

लेखनास एक स्वतंत्रच दिशा लाविली. त्या कादंबऱ्यांत सर्वत्र आढळणाऱ्या स्त्रीदाक्षिण्यविषयक प्रणयी कथांचा नायनाट व्हावा या उद्देशानें लेखकानें ही कादंबरी लिहिण्यास घेतली; परंतु त्याचा उलटा परिणाम होऊन कादंबरीस लागणाऱ्या सर्व विषयांचें जणूं काय ही (कादंबरी) एक मायपोटच होऊन बसली. यूरोपांत शौर्यविषयक लाट, कादंबऱ्याच्या रूपानें जर कोणी प्रथम पसरविली असेल तर स्पेनच्या एका हीटा नांवाच्या शिपाई लेखकानें होय ( इ. स. १६०० ). शोधक व उपजत बुद्धीची अशी सेसिला वोहल ड फावर नांवाची लेखिका नुकतीच ( १८७० ) होऊन गेली. त्यानंतरचे लेखक साधारण प्रतीचे आहेत.

जर्मनीमध्यें या कलेचा उदय उशीरा झाला. त्यांचा पहिला कांदंबरीकार ग्रिमेलशौसेन हा १६७५ त होता. याची कादंबरी लढाईतील शौर्यविषयक गोष्टींची होती. पुढें १८ व्या शतकांतील कादंबऱ्यांत प्रणयाचा भरणा जास्त आढळतो. खरा स्वतंत्र लेखक म्हणजे गोएटे होय. त्याची प्रसिद्ध कादंबरी "तरुण वेरथरचीं दुःखें" ही होय. हिचें मराठी भाषांतर प्रसिद्ध करण्यास डॉ. गुणे यांनीं सुरुवात केली होती. दुसरा एक योहान पॉल ( १८२५ ) म्हणून उत्कृष्ट लेखक झाला. परंतु त्याच्या साऱ्या कादंबऱ्या प्रेमविषयक असल्यामुळें सगळ्या यूरोपांतील तत्कालीन प्रणयी कथांवर याचीच छाप बसलेली आढळते. यापुढील चांगले लेखक म्हणजे गस्टाव्ह फ्रेताग, अलेक्सीस, फॉन्टेन, एवर्स वगैरे होत. यानंतर म्हणजे १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत जर्मनींत नांवाजलेला कादंबरीकार झाला नाहीं.

रशियांत मात्र या कलेंत नेहमीं शोधकबुद्धि व स्वतंत्रपणा आढळतो. गोगोल यानें पूर्वीची रीत मोडून स्लाव लोकांच्या मनोवृत्ति ज्यांत अंतर्भूत होतील अशा कादंबऱ्या लिहिंगें सुरू केलें ( १८६४ ). त्यानंतर दया, दाक्षिण्य व वैराग्य यांनीं मिश्रित कादंबऱ्या रशियांत प्रसृत झाल्या. यांचे लेखक गोंचरोर, डोस्टोव्हस्की, पिसेम्स्की, टुर्गिन्ह व कौंट टॉल्स्टॉय हे होत. या लेखकांचें वजन सर्वत्र जगांत पडलें. यांनीं दाखविलेला मार्ग कादंबरीलेखनांत अगदीं नवीनच होता. सध्यांचा प्रसिद्ध कादंबरीकार मक्झिम गॉर्की होय.

आशियांत फार पूर्वीपासून कादंबरीलेखन ( ओबडधोबड स्वरूपांत ) होतें. चीनमधील पहिला कादंबरीकार ली कुआनचंग हा १३ व्या शतकांत होऊन गेला. याच्या कथांत लढाया अगर वाटसरूंचीं धाडसाचीं प्रवासवृत्तें येतात. नैतिक गुणांचा परिपोष झालेली 'दोन बहरी वृक्ष' नांवाची एक कादंबरी अति उत्तम असून ती १७ व्या शतकांत लिहिलेली आहे. याच वेळची ' लालमहालचें स्वप्न' ही कादंबरी साऱ्या चिनी कादंबऱ्यांत पहिल्या प्रतीची होय असें समजतात. इच्यांत चिनी समाजाचें उत्तम दृश्य आढळतें. जपानांत १० व्या शतकांत बखरींस सुरुवात झाली. जपानी कादंबरीलेखकाचा प्रथम मान मुरासाकी शिकिबु या बाईस आहे. ही कादंबरी इ. स. १००४ मध्यें रचली असल्यानें तिला हिंदुस्थानखेरीज साऱ्या जगांतील पहिली कादंबरी असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. यानंतर ५१६ शतकें या बाजूचा प्रयत्न फारसा झालेला दिसत नाहीं. पुढें सतराव्या शतकांत सौकाकु यानें विनोदी गोष्टी रचून कादंबरीलेखनास पुन्हां सुरुवात केली. जिशो व किसेकी हेहि प्रख्यात जपानी कादंबरीकार झाले. जपानमध्यें वास्तविक कादंबऱ्या लिहिण्याचा प्रघात वाढत आहे. " होतोतो गिसु " या कादंबरीचें इंग्रजी भाषांतर ( नामिको ) हें पुष्कळांस अर्वाचीन जपानची चांगली माहिती देईल.

कादंबऱ्यांचें मूळ करमणुकीच्या दंतकथांत व आजीबाईच्या कावळ्याचिमण्यांच्या गोष्टींत आहे. त्यांनां सत्याची, मानवी स्वभावनिरीक्षणाची, समाजस्वरूपाविष्करणाची जोड मिळत मिळत हल्लींचें रूप मिळालें आहे. हल्लीं जगावर एकहि असा सुशिक्षित इसम सांपडणार नाहीं कीं, ज्यानें या नाहीं त्या रूपानें एकसुद्धां कादंबरी वाचली नसेल. स्त्रियांनां व मुलांनां लिहितांवाचतां आल्यानें पूर्वीपेक्षां कादंबऱ्या जास्त उत्पन्न होऊं लागल्या आहेत. पाश्चिमात्य देशांत तर " फक्त मुलांसाठीं " गोष्टी लिहिणारे अनेक लोक असून अशांनीं या कलेवर बराच पैसाहि मिळविला आहे. सामान्य कादंबरीलेखकांचें लक्ष लोकांत चांगली अभिरुचि उत्पन्न व्हावी याकडे फारसें नसून द्रव्याकडे असतें. त्यामुळें उद्भवणाऱ्या हजारो कादंबऱ्यांत सदभिरुचीच्या व चांगलें वळण लावणाऱ्या कादंबऱ्या अति अल्प असतात; लेखकवर्गांतहि फारसे अभिजात लोक नसून सटरफटरांचाच भरणा जास्त असतो. कादंबरी म्हटली म्हणजे माणसाचें व समाजाचें चित्र होय. मात्र तें यथावस्तु चित्र पाहिजे. आतां त्याला जास्त खुमारी येण्यास रंगाच्या दोन चार छटा कमीजास्त असल्यास हरकत नाहीं; त्यामुळें मूळ स्वरूपांत मात्र फरक होतां कामा नये. अशा कामीं उत्कृष्ट चित्रकार लागतो. कादंबऱ्यांचें रास्त परीक्षण कोणी करीत नसल्यानें वाईट व हलक्या दर्जाच्या कादंबऱ्यांचा बराच सुळसुळाट फार होतो. भावी कादंबऱ्या उत्कृष्ट पाहिजे असतील तर वर दर्शविलेले दोष टाळणें भाग आहे. कोंवळ्या वयाच्या मुलांमुलींनीं प्रेमविषयक पाचकळ कादंबऱ्या वाचल्या असतां त्याचा परिणाम त्यांच्यावर व हळूहळू एकंदर समाजावरहि कसा अनिष्ट होतो यावद्दल पाश्चात्य विद्वानहि साक्ष देत आहेत. ( इंटरनॅशनल लायब्ररी ऑफ फेमस् लिटरेचर. पु. १४ पहा). सारांश, समाज व राष्ट्र जेणेंकरून अधोगतीच्या मार्गास लागणार नाहीं असलें वाङ्मय ( अर्थात् त्यांत कादंबऱ्याहि ) देशाला उपकारक असतें.

म रा ठी का दं ब ऱ्याः—यांची जागतिक कादंबरीसारस्वताशीं तुलना करून रा. वि. का. राजवाडे यांनीं जे विचार व्यक्त केले आहेत ते बरेच मार्मिक आहेत म्हणून त्यांचा सारांश येथें देतों.

मराठींतील कादंबरीमय सारस्वत हें ( १ ) लहान गोष्टी, ( २ ) अद्भुत कथा व ( ३ ) वस्तुस्थित्यादर्शक कथानकें या तीन घटकांनीं बनलेलें आहे. म्हणजे इसाबनीति, बाळमित्र, पंचोपाख्यान, वेताळपंचविशी वगैरे लहान लहान गोष्टींचा प्रथम उदय झाला; नंतर मुक्तामाला, मंजुघोषा, विचित्रपुरी वगैरे अभ्दुत कथा जन्मास आल्या आणि शेवटीं आजकालच्या गोष्टी, पण लक्षांत कोण घेतो, नारायणराव आणि गोदावरी, शिरस्तेदार, वेणू, वाईकर भटजी, वगैरे वस्तुस्थित्यादर्शक किंवा वास्तविक कथानकें लिहिलीं गेलीं, अशी आपल्या इकडील कादंबऱ्यांची तीन पायऱ्यांची परंपरा आहे. कादंबऱ्यांचें ऐतिहासिक म्हणून एक निराळें सदर काढीत असतात. परंतु तसें करण्याचें कांहीं एक कारण नाहीं. नाहीं तर नैतिक, शास्त्रीय, प्रावासिक, प्रेमळ, राजकीय वगैरे असंख्य वर्ग करणें जरूर पडेल व तें अशास्त्र होय असें राजवाडे समजतात. प्रथम ज्या लहान गोष्टी प्रसिद्ध झाल्या त्यांतच अद्भुत व वास्तविक असे दोन प्रकार होते. त्याच दोन प्रकारांचा पुढें परिपोष होऊन, एका प्रकारापासून अद्भुत कादंबऱ्यांचा व दुसऱ्या प्रकारापासून वास्तविक कथानकांचा प्रादुर्भाव झाला. त्यापैकीं बऱ्याच अद्भुत कादंबऱ्या व वास्तविक कथानकें वास्तविक गोष्टींप्रमाणेंच परभाषेंतील ग्रंथांचीं रूपान्तरें, भाषान्तरें किंवा सूचनान्तरें आहेत. तथापि तीं टाकाऊ आहेत असें कोणी समजूं नये. मात्र स्वतःच्या कमाईच्या फळांत जी गोडी आहे ती उसन्यांत कशी यावी ?

स्वतंत्र ग्रंथांपैकीं अद्भुत ग्रंथांत मुक्तामाला, रत्नप्रभा, मंजुघोषा व वास्तविकांपैकीं आजकालच्या गोष्टी, पण लक्षांत कोण घेतो? वेणु, नारायणराव व गोदावरी हे प्रारंभींचे ग्रंथ होत. वास्तविकसृष्टींतील अपूर्णता अद्भुतसृष्टींत पूर्णतेप्रत पोहोंचलेली आढळते. शास्त्रीयवाङ्मयाबाहेरचा प्रदेश म्हणजे अद्भुताच्या अत्यंत उत्कट विहाराचें स्थल होय. पश्चिमेकडील बायबल, संतचरित्रें, प्लेटोचे ग्रंथ व आपणांकडील महाभारतांतील गोष्टी, संतचरित्रें, पुराणें हे अद्भुताचे नमुने आहेत. परंतु या धर्मांतर्गत अद्भुत कथांचा पगडा हजारों लोकांच्या नित्यक्रमावर बेसुमार असलेला सर्वश्रुत आहे.

बालोपयोगी अद्भुत कथा सर्व राष्ट्रांत प्रचलित आहेत. तसेंच ज्या ज्या शक्तीला समाजावरती आपला अम्मल बसावा अशी इच्छा उत्पन्न झाली, त्या त्या शक्तीला अद्भुत कादंबरींचें साहाय्य अतोनात झालें आहे. उदाहरणार्थ शनिमहात्म्याचें फलज्योतिषाला, सत्यनारायणाचें नीतिज्ञाला, गजेंद्रमोक्षादिकांचें धर्मप्रसारकाला, ख्रिस्तानें तारलेल्या आत्म्यांच्या कथा किरिस्तावाला इ.

मुक्तामाला, मंजुघोषा वगैरे अद्भुत कादंबऱ्या लिहिण्यांत मनोरंजनाशिवाय दुसरा हेतु आढळत नाहीं. पुढें विचित्रपुरी व त्यासारख्याच गर्भागुभा, पांचापूरुष, डॉन किझोट या कादंबऱ्या अद्भुत पेहरावांत पण अद्भुत कादंबऱ्या व त्यांतील अद्भुत वीर यांची टर उडविण्याच्या हेतूनें लिहिलेल्या आहेत.

वास्तविकाची स्फूर्ति मराठी लेखकांना प्रायः इंग्रजीपासून मिळालेली आहे. इंग्लिश मासिकांतून वगैरे ज्या हप्त्याहप्त्यांनीं येणाऱ्या कादंबऱ्या आहेत त्या नामांकित नसून सरासरीच असतात. अर्थात् त्यांचें अनुकरण करणाऱ्या इकडील कादंबऱ्यांची योग्यता त्यांहूनहि कमीच असणार. यूरोपांतील कादंबऱ्यांचे व्यक्तिविषयक व समाजविषयक असे दोन भाग पडतात. वैयक्तिक कादंबऱ्यांत वैयक्तिक विकारांच्या संकोच-विकोसांचें चित्र काढलेलें असतें. यांतील कांहीं केवळ खुशालचंद अशा स्त्रीपुरुषांच्या करमणुकीचे विषय होत. यांस इंग्रजींत 'सोसायटी नॉव्हेल' म्हणतात. उलट गोल्डस्मिथ, फील्डिंग, स्मॉलेट, स्कॉट, थॅकरे, डिकन्स, इलियट यांच्या व्यक्तिविषयक कादंबऱ्यांत देशप्रीति, लोकोपकार, वात्सल्य, प्रेमबंधन वगैरे उदात्त भावनांची चिकित्सा असते. यांनीं अशीं अनेक पात्रें निर्माण केलीं आहेत कीं त्यांची ओळख इंग्रजी जाणणाऱ्या बहुतेक लोकांना झाली आहे. गोल्डस्मिथचा व्हिकार, स्मॉलेटचा अंकल टोबी, फील्डिंगचा ऑलवर्दी, स्कॉटचा आयव्हॅनो, डिकन्सचा पिकविक, इलियटची रोमोला वगैरे पात्रें प्रसिद्ध आहेत. यांच्याच तोडीला बाल्झाक, ड्यूमास वगैरे फ्रेंच कादंबरीकार बसविले पाहिजेत. पण कोंवळीं पोरें व घणधकट जवान यांमधील अंतरासारखें या दोहोंत अंतर आहे.

आणीबाणीचे प्रसंग आले म्हणजे महत्वाचे उद्गार बाहेर पडतात असा सिद्धान्त आहे. व यास अनुसरून वाङ्मय म्हणजे रामदास व मुद्गल यांचें रामायण, विशेषतः त्यांतील युद्धकांड हे महाराष्ट्रांतील ग्रंथ व टॉमस पेन याचा कॉमनसेन्स ( सारासार विचार ) हा निबंध, व मिसेस स्टौची "अंकल टॉम्स केबिन" नांवाची कादंबरी इत्यादि प्रकारचें होय. उलट इंग्लंडचे सध्याचे विचार साम्राज्याकडे वळल्यामुळें सामाजिक, धार्मिक, राजकीय वगैरे गोष्टींच्या सुधारणेकडे लक्ष देण्यास त्याला अवकाश नाहीं. अर्थात् इंग्लंडांतील ग्रथकारहि त्यासंबंधीं कळकळीनें लिहीत नाहींत. एक ग्रंथकर्ता मात्र इंग्लंडचें हृदय जाणतो आणि तो जगत्प्रसिद्ध रुड्यार्ड किप्लिंग हा होय. त्यानें इंग्लंडच्या मनांतल्या मनोगतांचें प्रदर्शन यथास्थित केलें आहे. व्हिक्टर ह्यूगोची 'ला मिझराब्ल' किंवा झोलाची 'पारिस' ही कादंबरी घेतली म्हणजे फ्रेंच समाजाच्या पोटांत कोणता वडवाग्नि पेट घेतो आहे तें कळतें. रशियांतील तरुण पिढींतील लोकांच्या मतांची रचना कौंट टॉलस्टॉय यांच्या कादंबऱ्यांच्या सेवनानें झाली आहे एवढें सांगितलें म्हणजे राष्ट्ररचनेंतील याच्या ग्रंथांचें कार्य कळून येईल. टॉलस्टॉय, झोला, ह्यूगो यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्यांच्या तोडीची इंग्रजी भाषेंत एकहि

कादंबरी नाहीं. जगांतील सर्व राष्ट्रांत प्रसिद्ध अशा निरनिराळ्या भाषांतील कादंबऱ्यांची गणना केली तर इंग्लंडांतील दोन, तीन व अमेरिकेंतील एकच कादंबरीचा यांत समावेश करावा लागेल. ' पिलग्रिम्स प्रोग्रेस, ' ' गलिव्हर्स ट्रॅव्हल्स ', ' रॉबिन्सन क्रुसो ' व ' अंकल टॉम्स केबिन ' या त्या चार कादंबऱ्या होत.

अर्वाचीन मराठी कादंबरीकारांत स्वतंत्र रचना करणारे ग्रंथकार रा. हरि नारायण आपटे होत. यांचे ग्रंथ इंग्रजी ' सोसायटी नॉव्हेल्स' च्या वरच्या दर्जाचे पण डिकन्स, थॅकरेच्या तोडीचे नाहींत. ह्यूगो, टॉलस्टॉय, झोला यांच्या पासून तर ते फारच दूर आहेत. यांनीं शंकरमामंजी, महाशब्दे, प्रो. ब्यांडी, शंखध्वनि,फेअरब्रेन वगैरे कांहीं नामांकित पात्रें निर्माण केलीं आहेत. रा. ओकक्रुत शिरस्तेदार ही कादंबरी सांगोपांग उठवून लिहिली असती तर चांगली वठली असती. रा. आपटे यांची स्फूर्ति कित्येक इंग्रजी कादंबरीकारांच्या ग्रंथांवरून झालेली दिसते;व त्यांच्या अद्भुत व वास्तविक यासंबंधींच्या कल्पना किंचित अस्पष्ट आहेत; त्यामुळें त्यांची कृति जितकी ठळक निपजावी तितकी निपजली नाहीं. यूरोपांतील कादंबरीकार एखाद्या विशिष्ट व्यक्तीचा किंवा विचाराचा अतिशयानें निष्कर्ष काढणें हें आपल्या कलेचें बीज समजतात व साक्षात संसाराच्या सुखदुःखांचीं वर्णनें ते अद्भुत शब्दांनीं करतात, म्हणून त्यांस वास्तविक ही संज्ञा लाविली जाते. उलट जें जसें असतें तें तसेंच वठवावयाचें असा ' रिआलिस्टिक ' अथवा वास्तविक याचा अर्थ रा. आपटे समजतात. तथापि अलीकडील तीस चाळीस वर्षांतील वास्तविक कादंबरीकारांत हे फारच मोठ्या योग्यतेचे आहेत.

भाषांतरित व रूपान्तरित ग्रंथांतील गुणांचें सर्व श्रेय मूळ ग्रंथकाराकडे जातें. व भाषांतर अगर रूपांतर गचाळ उतरल्यास भाषांतरकार दोषास मात्र धनी होतो. याकरितां स्वतंत्र कृति करणेंच श्रेयस्कर; तथापि मनोरंजनाचे रा. मित्र व कादंबरीकल्पद्रुमाचे चितळे यांची भाषा बरी असते.

बाळमित्राचें भाषांतर करणाऱ्या छत्र्यांपासून तो मोठमोठ्या वास्तविक कादंबऱ्या लिहिणाऱ्या आपट्यांपर्यंत वास्तविक कादंबरीची मजल कोठपर्यंत आली व ही लहानशी मजल गांठण्यास किती वर्षें लागलीं याचा विचार केला म्हणजे टॉलस्टॉयपर्यंत जाण्याला किती युगें लागतील तें हरी जाणे. समाधानाची बाब एवढीच कीं पाऊल पुढें आहे, मागें नाहीं.

प्रस्तुत कालीं सहृदय असे शिकलेले लोक उच्च प्रतीच्या यूरोपियन कादंबऱ्या वाचण्यांत गुंग झालेले दिसतात. या लोकांनां मराठी कादंबऱ्या वाचण्याला जो लावील व त्या वाचल्या नाहींत तर उत्कृष्ट विचारांनां आपण मुकूं असें जो त्यांनां भासवील तोच उत्कृष्ट कादंबरीकाराच्या पदवीला पात्र होईल.

लोक कादंबऱ्या फार वाचतात म्हणून नाकें मुरडणाऱ्या व हाकाटी करणाऱ्या कित्येक लोकांनां आपला प्रतिस्पर्धी किती जुनाट व केवढा बलाढ्य आहे याचा यथास्थित अंदाज झालेला नसतो असेंच म्हणावें लागतें. हा जर अंदाज त्यांनां होईल तर याचें सहाय्य घेणें जास्त हिताचें आहे हें त्यांच्या ध्यानांत येईल. समाजांत अमुक एका मताचा प्रसार व्हावा अशी इच्छा उत्पन्न झाली म्हणजे सरस्वतीच्या या मांडलिकाला ही इच्छा अंमलांत आणण्याची विनंति केली असतां ती तो खुशीनें मान्य करील. लहान मुलांनां पशुपक्ष्यांच्या गोष्टी सांगून त्यांच्या मनांत युक्ति व साहस यांचें बीजारोपण करील, स्त्रीजनांनां संसारसुखाची गुरुकिल्ली पढवील, तरुणांनां राष्ट्रीय महत्वाकांक्षेचें रहस्य कळवील, आणि वृद्धांनां आयुष्याच्या इतिकर्तव्यतेचें दिग्दर्शन करील; आणि इतकेंहि करून तें कसें व केव्हां केलें हें कोणाला समजून देणार नाहीं, अशी या मयासुराची करणी आहे. युधिष्ठिराप्रमाणें ती ज्या लोकांनां लाधली ते धन्य होत. [ संकीर्ण लेखसंग्रह ]

मराठीमधील कादंबऱ्यांची संख्या आज सुमारें दीड हजार आहे. सुमारें दीडएकशें अद्भुत कादंबऱ्या, दोनशें ऐतिहासिक कादंबऱ्या व उरलेल्यापैकीं बऱ्याचशा सामाजिक कादंबऱ्या, व वरेचसें बाह्य वाङ्मय किंवा भाषांतरवजा कादंबऱ्या,इतका मराठींतील कादंबऱ्यांच्या स्वरूपाचा वाङ्मयसंभार आहे. आपल्या शेजारच्या भाषांतून देखील मराठींत कादंबऱ्या आल्याच आहेत. प्रसिद्ध गुजराथी कादंबऱ्यांचीं भाषांतरें म्हटलीं म्हणजे " करण वाघेला", " सरस्वती चंद्र "चे दोन भाग व हिंद आणि ब्रिटानिया हीं होत. सुमारें दीडदोनशें बंगाली कादंबऱ्यांचीं भाषांतरें झालीं आहेत. हिंदींतूनहि थोड्याबहुत कादंबऱ्या मराठींत आल्या आहेतच. परंतु इतर देशी भाषांतून फारसें कादंबरीवाङ्मय मराठींत आलें नाहीं. गोष्टींच्या बाबतींत पहातां हिंदुस्थानच्या शेजारच्या देशांतील कांहीं गोष्टी आल्या आहेंतच. उदा. फारसींतून आलेला कथासमुच्चय. तथापि या समुच्चयापैकीं प्रत्यक्ष फारसींतून किती आला व इंग्रजीमार्फत किती आला याविषयीं संशय आहे. किरकोळ गोष्टी व कादंबऱ्या या जर एकत्र केल्या तर मराठींतील कथावाङ्मय जवळ जवळ दुप्पट होईल. म्हणजे सुमारें सात हजार लेखनामें त्यांखालीं येतील. देशी कादंबऱ्यांच्या एकंदर वाङ्मयाकडे साकल्यानें आपण पाहूं लागलों तर आपणांस असें दिसून येईल कीं बंगाली व मराठी कादंबऱ्यांच्या स्वरूपामध्यें बराचसा फरक दिसून येतो. बंगाली कादंबऱ्यांत नर्मवाक्यें, गोजिरवाण्या गोष्टी, अपूर्ण होणारे प्रेमसंबंध, सत्प्रेमाबद्दलहि पश्चाताप व वेड्या आत्महत्या यांची रेलचेल दिसते. याशिवाय बंगाली वाचकास लांबलचक कादंबरी खपत नसून पुस्तक लहान पाहिजे, व तें देखील हृदयांत कल्लोळ करून सोडणारें पाहिजे असें बंगाली

कादंबऱ्यांच्या धाटणीवरून दिसतें व त्या बाबतींत अर्वाचीन बंगाली कादंबरीवाङ्मय इव्हान टर्गेनिव्ह यांच्या संप्रदायाच्या रशियन कादंबऱ्यांशेजारीं चांगलें बसेल. वास्तविक स्थितीच्या कष्टमय नीरसतेमुळें, वास्तविक कादंबरी न लिहितां स्वच्छंदानें काल्पनिक परिस्थितींत विहार करण्याची प्रवृत्ति रशियन लोकांत जशी दृष्टीस पडते, तशी ती अधिकच तीव्रपणें बंगाली वाङ्मयांत दृष्टीस पडते आणि त्यामुळें बंगाली वाङ्मयांस न लपण्यासारखें वैशिष्ट्य प्राप्त झालें आहे. बंगालीचीं भाषांतरें जरी मराठींत पुष्कळ झालीं आहेत तरी त्यांचें अनुकरण मराठींत मुळींच झालें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मराठींत यूरोपांतील द्वीपकल्पीय भाषांतील ग्रंथाचेंहि फारसें अनुकरण होत नाहीं. महाराष्ट्रीय कादंबरीकारांस द्वीपकल्पीय भाषा जरी फारशा येत नसल्या तरी त्या वाङ्मयाशीं त्यांचा इंग्रजीमार्फत परिचय आहेच. तथापि त्यांच्या कादंबऱ्यांची भाषांतरें फारशीं नाहींत. फ्रेंचमधील मोलिअरचीं प्रहसनें बरींचशीं मराठींत अवतरलीं गेलीं आहेत, फ्रेंच कादंबऱ्यांचीं भाषांतरें फारशीं झालीं नाहींत. अमात्य दुहिता, तीन शिलेदार वगैरे पुस्तकें हीं द्वीपकल्पीय वाङ्मयाकडे इकडील लेखकवर्गाचें लक्ष्य थोडेंसें वळलें होतें असें दाखवितात. मराठीमध्यें कादंबरीलेखनाच्याकडे लागलेला काल फार थोडका आहे, आणि वेणू, नारायणराव आणि गोदावरी व शिरस्तेदार या कादंबऱ्या वगळल्या असतां वस्तुस्थितिविषयक कादंबऱ्या लिहिण्याकडे लक्ष बरेंच उशीरां लागलेलें आहे. सामाजिक कादंबऱ्यांच्या कालास सुरुवात तीस वर्षांपूर्वींच झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं व यांत प्रामुख्य मिळविलेले ग्रंथकार एकदोनच म्हणतां येतील. हरि नारायण आपटे व बाळकृष्ण संतुराम गडकरी हे दोन लेखक वगळले असतां सामाजिक कादंबऱ्यांच्या कर्त्यांमध्यें अभिमानानें नांव घेण्याजोग्या दुसऱ्या कोणत्याहि व्यक्ती नाहींत असें म्हणावें लागतें. वामन मल्हार जोशी व सी. के. दामले हेहि बऱ्या प्रकारच्या सामाजिक कादंबऱ्यांचे लेखक आहेत. ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्यें देखील आपट्यांच्या कादंबऱ्यांस अग्रस्थान दिलें पाहिजे. कादंबऱ्यांमध्यें नाटकांपेक्षां प्राप्ति बरीच कमी होत असल्यामुळें मराठींतील लेखनकुशल वर्ग छापखान्याकडे न धावतां नाटकगृहाकडे धांवला असें दिसून येईल.

उच्च स्वरूपाच्या कादंबऱ्यांच्या अभावावरून महाराष्ट्रांतील रचनाकौशल्य हीन प्रकारचें आहे असें धरतां यावयाचें नाहीं. कां कीं, नाटकांच्या घटनेंत रचनाकौशल्य उत्तम प्रकारें दिसून आलें आहे. महाराष्ट्रीय सामाजिक आयुष्याचींच अंगें अत्यंत नियमित असल्यामुळें त्यांचा कादंबरीवर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. साक्षर वर्गाचा आयुष्यक्रम तेवढाच चित्रिण्याची खटपट कादंबऱ्यांत दिसते. व्यापारी वर्ग, दूरच्या वसाहतींत जाऊन पैसे मिळविणारा वर्ग हे आपल्याकडे नाहींत. तसेंच गलेलठ्ठ जमीनदारहि नाहींत. त्यामुळें डॉक्टर, वकील व सरकारी नोकर व मधून मधून जहागीरदार यांच्यापलीकडे कादंबरीकारांचा वर्ग वळला नाहीं. दुसरी एक गोष्ट म्हटली म्हणजे स्त्रियांचें चांचल्य दाखविणाऱ्या कादंबऱ्या व नाटकें महाराष्ट्रीय अभिरुचीस रुचत नसल्यामुळें महाराष्ट्रीय कादंबरीस बरेंच नियंत्रण उत्पन्न झालें आहे. आणि त्यामुळें लेखकाच्या आश्चर्योत्पादन कौशल्यास बंध अस्तित्वांत आहेत.

कादंबरीकार व त्यांच्या कादंबऱ्या यांच्या नांवांची येथें जंत्री देण्याचें प्रयोजन नाहीं. ती वाङ्मयसूची चाळली असतांना सांपडेल.

[संदर्भग्रंथ.—संस्कृत व प्राकृत कादंबऱ्यांचें डॉ. विंटरनिझनें आपल्या भारतीय वाङ्मयेतिहासाच्या ग्रंथमालिकेंत ( पु. ३ ) फारच सुंदर व संक्षिप्त विवेचन दिलें आहे. पाश्चात्य कथावाङ्मयाचा थोडक्यांत इतिहास ब्रिटानिकेंनें 'नॉव्हेल' या लेखांत दिलाच आहे. डनलॉपनें तीन खंडांत कादंबऱ्यांचा संपूर्ण इतिहास गोंविला आहे. रा. विश्वनाथपंत राजवाडे यांनीं आपल्या संकीर्णलेखसंग्रहांत मराठी कादंबऱ्यांची झडती तर घेतली आहेच पण त्याशिवाय कादंबरी वाङ्मयाचें तात्विक विवेचन व कार्यक्षेत्र पाश्चात्य कादंबऱ्यांचीं उदाहरणें घेऊन आपल्या नेहमीच्या सडेतोड भाषेंत त्यांनीं दिलें आहे. विविधज्ञानविस्ताराच्या ४८ व्या पुस्तकांत रा. ल. ज. खरे यांनीं जी 'मराठी वाङ्मयाची गेल्या शंभर वर्षांतील वाढ' तीन लेखांकांत दिली आहे तींत मराठी कादंबऱ्यांचे गुणदोष वर्णिले आहेत. विस्ताराच्या ज्युबिली निबंधावलींत (ग्रंथ १, उत्तरार्ध ) 'मराठी कथात्मक वाङ्मय' नांवाचा रा. ना. के. बेहेरे यांचा एक लेख आहे; तोहि वाचनीय आहे. यावरील कांहीं ग्रंथांवरून या वाङ्मयाची चांगली कल्पना येण्यास हरकत नाहीं. यूरोपीय प्रत्येक भाषेंत कादंबऱ्यांच्या वाङ्मयसूची अनेक आहेत. मराठींतील कादंबऱ्यांची व गोष्टींची विस्तृत यादी महाराष्ट्रीय वाङ्मयसूचींत दिली आहे तींत ७ हजारांवर नांवनिशी आहे.]

**कादंबरी, बाणभट्टीय**—रचनाकाल सुमारें इ. स. ६०८–६४८. ही कथा प्रथम बाणभट्टानें लिहिण्यास सुरुवात केली आणि ती त्याचा मुलगा भूषणभट्ट यानें संपविली. सातव्या शतकाच्या चालीरीतींचें व शैवसंप्रदायाचें यांत चित्र उमटलें आहे. क्षेमेंद्र, अभिनाद या संस्कृत ग्रंथकारांनीं हिचीं रुपांतरें केलीं व मराठी ग्रंथकारांतहि तीं लोकप्रिय झालीं. मराठींतील शापसंभ्रम नाटकानें तें कथानक लोकपरिचित केलें. चंद्रापीड व कादंबरी यांचा प्रेमवृतांत यांत आला आहे व उपनायक व उपनायिका पुंडरीक व महाश्वेता यांचेंहि मनोहर कथानक यांत गुंतविलें आहे. प्रेमाची व्यापकता एका जन्मापुरती नसून अनेक जन्मांची आहे असें यांत दाखविलें आहे.

**कांदलूर**—येथें पहिला राजराज चोल यानें चेर राज्याच्या प्रचंड आरमाराचा पुरा मोड केला. हें बंदर प्रश्चिम किनाऱ्यावर आहे.

**कांदा**—यास इंग्रजींत ओनियन. लॅटिनमध्यें अलिअम्, मराठींत कांदा, हिंदींत प्याज, संस्कृतमध्यें पलांडु, गुजराथींत कान्दो, कानडींत उळ्ळे गड्डे इत्यादि नांवें आहेत.

हिंदुस्थानांत कांदा सर्वत्र पिकतो. कांद्याचे गड्डे जमिनींत येतात. कांद्याचा रोपा सुमारें हातभार उंच वाढतो. तो सरळ असून त्याच्या पाती वारीक नळ्यांसारख्या असतात. कांद्याचें बीं काळें असून बंदुकीच्या दारूप्रमाणें दिसतें. कांद्यामधून देंठ निघतो तो कोंवळा असतांना त्याची भाजी करितात. कांद्यांत तीन जाती आहेत. पांढरा, तांबडा व पिंवळा. यांपैकीं तांबडा कांदा जास्त तिखट असतो. पांढऱ्या कांद्याची लागवड कोंकणपट्टींत जास्त असून वहुतकरून तांबडा कांदा देशावर जास्त पिकतो. पिंवळ्या कांद्याची लागवड गुजराथेंत असते. मद्रास व मुंबई इलाख्यांत व विहार प्रांतांत कांदा विशेष पिकतो. कांद्याची निर्गत विशेषेंकरून सिलोन व स्टेटलमेंट्स वगैरेकडे फार होते. कांद्याच्या स्वतंत्र निर्गतीचे आंकडे उपलब्ध नसून ते "ताजा भाजीपाला" या सदराखालीं मोडतात. इ. स. १९१३।१४ सालीं मद्रास इलाख्यांतून १६,४५,५५२ रुपयांचे कांदे बाहेर रवाना झाले असून सन १९१४।१५ सालीं मुंबईतून त्यांची निर्गत पांच लक्ष रुपयांची झाली. १९१४ पासून १९२० पर्यंत लढाई चालू असतांना लाखों रुपयांचा कांदा रणक्षेत्रावर लढाऊ लोकांकरितां गेला.

कांदा बागाइतांत करितात, त्याला साधारण खोल व निचऱ्याची जमीन लागते. धारवाड जिल्ह्यांत मात्र कांहीं काळ्या जमीनींत खरिपांत कांद्याचें पीक घेतात. बीं पाभरीनें दर एकरीं सुमारें चार पौंड प्रमाणें पेरितात. या पिकाचा फेरपालट बटाटे, भुइमूग, बाजरी, मूग, उडीद वगैरे पिकांशीं करितात. कांद्याचें पीक स्वतंत्र घेतात, तथापि धारवाड जिल्ह्यांत कांद्यावरोवर धने टाकण्याची चाल आहे. फळझाडाच्या नवीन लागणीनंतर पहिलीं दोन तीन वर्षे बागेमध्यें कांद्याचें पीक घेतात. कांद्याची लागवड केव्हांहि व कोणत्याहि ऋतूंत वर्षभर करितां येते. परंतु त्याची लागवड हिंवाळ्यांत करण्याची जास्त वहिवाट आहे.

लागण. जमीन सुमारें नऊ इंच खोल नांगरावी, नंतर कुळवून ढेंकळें फोडून वारीक भुसभुशीत करावी. दर एकरीं शेणखत अगर सोनखत वीस पंचवीस गाड्या द्यावें. याशिवाय दर एकरीं अमोनियमसल्फेटचें वरखत तीन चारशें पौंड दिल्यास फायदा होतो असें अनुभवास आलें आहे.

कांद्याचें रोपहि मिरचीप्रमाणें तरव्यांत पेरून तयार करावें लागतें. याकरितां तरवा चांगला खतावून त्यांत सुमारें दोन गुंठ्यामागें दहावारा पौंड बीं टाकावें म्हणजे एक एकर जमिनीस रोप पुरें होईल. या रोपास कांहीं दिवस पावेतों रोज सकाळसंध्याकाळ पाणी द्यावें लागतें व पुढें दोन दिवसांनीं दिलें असतां पुरें होतें. रोप पांच सहा आठवड्यांत सुमारें सहा इंच उंच वाढतें व लावण्यास योग्य होतें. रोप नऊ इंचांपेक्षां जास्त उंच वाढल्यास वरचे शेंडे खुडावे लागतात. कांद्याची लागण करण्यापूर्वी बीं दीड महिना आधीं टाकिलें पाहिजे, म्हणजे सप्टेंबरांत बीं टाकिल्यास नोव्हेंबरांत रोप तयार होतें. लागण करण्यापूर्वी सपाट वाफे करावे अगर १५ इंचांच्या अंतरानें सऱ्या पाडून आडवे पाट १९ फुटांवर पाडून सऱ्या व वाफे करावे व नंतर वाफ्यांत पाणी सोडावें. सरीच्या दोन्ही कुशीला चार इंच अंतरानें रोपें लावावीं. दुसरें पाणी चवथ्या दिवशीं द्यावें व तिसरें पांचव्या दिवशीं द्यावें. नंतर जमिनीच्या मगदुराप्रमाणें सात ते दहा दिवसांच्या अंतरानें पाणी देत जावें. कांद्याला दोन, तीन खुरपण्या द्याव्या लागतात. चार महिन्यानंतर कांहीं झाडांनां फुलगोंडे येऊं लागतात, ते काढून टाकावे सुमारें पांच महिन्यांनीं पाती पिंवळ्या होऊन पडूं लागतात. त्या पडूं लागल्या म्हणजे कांदे काढण्यास तयार झाले म्हणून समजावें. कांदे उपटल्यानंतर त्यांच्या मुळ्या व शेंडे कापून कढावे म्हणजे कांदे विकण्यास तयार झाले. धारवाड जिल्ह्यामध्यें पावसाळी कांदे नोव्हेंबरांत तयार होतांत व हिंवाळी पीक मार्च एप्रिल महिन्यांत तयार होतें. धारवाड जिल्ह्यांत खरीप पिकाचें उत्पन्न दर एकरी सरासरी ५००० पौंड, देशावरील हिंवाळी पिकाचें ( मध्यम काळ्या जमिनींतील ) उत्पन्न २०००० ते ३०००० पौंड, देशावरील हलक्या जमीनींतील उत्पन्न १००० पौंड पर्यंत असतें. दर एकरी खर्च सरासरी १२५ रुपये पर्यंत येतो. कांदा हा रोज लागणाऱ्या खाद्यपदार्थांपैकीं आहे. तो पौष्टिक व औषधि आहे. औषधांत पांढऱ्या कांद्याचा जास्त उपयोग करितात. कांद्याचें पोटीस करतात व बियांचें तेल काढतात.

कांद्याच्या पिकावर 'थ्रिप' नांवाची कीड पडते. तिजवर राळ पाण्यांत मिसळून शिंपडली असतां ती कमी पडते. कांद्याचा माल एकाच वेळीं बाजारांत आल्यानें भाव चांगल येत नाहीं, म्हणून तो सांठवून ठेवणें फायदेशीर आहे. कोरड्या, थंड व हवाशीर अशा जागेंत कांदे विशेष नुकसान न होतां सांठवून ठेवितां येतात. कांदे सांठविण्याच्या जागा गवताच्या छपरीच्या केलेल्या असतात व छपरीच्या भिंती कांबटयाच्या करितात, यामुळें त्यांत हवा चांगली खेळते. वरचेवर सोलणी करून सडके नासके कांदे निवडून काढावे लागतात. ढीग जितका पातळ असेल त्यामानानें कुबटणें ( कुजकी घाण मारणें ) व सडणें कमी होतें. याकरितां शिड्यांवर जवळ जवळ मजले करून त्यांवर कांदे सांठविल्यास जागा कमी लागून कमी खर्चांत कांदे चांगले राहूं शकतात. उत्तरकोंकणांत कांद्यांच्या वेण्या बांधून त्या

टांगून ठेवितात. तीन चार महिने कांदे ठेविल्यास शेकडा २०।२५ भाग तूट येते.

कांद्याचें बी धरण्याकरितां निवडक कांदे घेऊन आक्टोबर नोव्हेंबर महिन्यांत खतावलेल्या जमिनींत ( सबंध गड्डे अगर मुळाकडील अर्धा भाग ) अठरा चौरस इंच अंतरानें लावावे. प्रत्येक गड्ड्यांतून बरेचसे फुलांचे गोंडे येऊन सुमारें पांच महिन्यांत बीं तयार होतें. पाणी देणें, खुरपणें वगैरे मेहनत लागेल तशी करावी. एका एकरांत सुमारें दोनशें पौंड बीं तयार होतें, व एक पौंडाची किंमत आठ ते बारा आणे पर्यंत येते.

फोरकाय व व्हाकिलियन या दोन विद्वानांनीं कांद्याचें तेल काढून त्याचें रसायनशास्त्राच्या साहाय्यानें पृथक्करण केलें, तेव्हां त्यांत खालील पदार्थ आढळले. गंधक, अल्बूमेन, साखर, फास्फेरिक ॲसिड, चिक्कण पदार्थ, चुना व लिगानिन. कांद्यांचें तेल फार लवकर उडून जातें. तें उत्तेजक, मूत्रवृद्धिकारक व कफादि मलनाशक आहे. ज्वर, उदर-रोग, पडसें व खोकला यांवर कांदा फार गुणकारी आहे. तसेंच मुखरोगावर हा उपयोगी पडतो. गळवावर कांदा उकडून त्याचें पोटीस बांधावें. अपस्मार, फेंपरें यानें मनुष्य बेशुद्ध झाला तर कांदा फोडून हुंगावयास देतात. नाकांतून रक्त वाहूं लागलें असतांहि कांदा फोडून हुंगतात.

[ संदर्भग्रंथ.—वाट; पदे; मुंबई, टाईम्स (३ मे १९१५); दुथी—फील्ड ॲंड गार्डन क्राप्स; मोलिसन—टेक्स्टबुक इंडि.; ॲग्रिकल्चर ३. २११ ].

**कादिर**—कादिर किंवा कादन. ही जात त्रावणकोरच्या उत्तरेकडील पर्वतांत व आनैमलै (हत्ती)टेंकड्यांत आढळते. हे लोक ठेंगणे व काळे असतात. यांचे दांत ताशीव असतात. बायका डोक्यांत बांबूच्या फण्या घालतात.हे अगदीं असंस्कृत व अडाणी असून जंगलांत इकडे तिकडे भटकतात. रानांतील लांकूड फांट्या वगैरे विकून हे आपली उपजीविका करतात. आनैमलै टेंकड्यांवर मेण, मध, वेलदोडे, आंवळे, सुंठ, धूप, हरणांचीं शिंगं, हत्तींचे सुळे वगैरे जिनसा गोळा करून दरवर्षी सुमारें२।३हजार रु. मिळवितात. कांहीं जण जंगलखात्यांत मजुरी करतात. हे हरणांची उत्तम शिकार करतात. हे सागूपासून अन्न तयार करून खातात व पशुपक्ष्यांचें मांस भाजून खातात.

जेव्हां कादिर तरुणाच्या मनांत लग्न करण्याचें येतें तेव्हां तो आपल्या निश्चित वधूच्या गांवीं जातो व तेथें एक वर्षभर काम करून तिला मोबदला ( यास वाटेल तर हुंडा म्हणावें ) देतो. वराची आई किंवा बहीण वधूच्या गळ्यांत चांदी सोन्याची ताली ( लग्नचिन्ह ) बांधते. दुस्वभाव, जारकर्म, आज्ञाभंग या आरोपांवरून गुरुजनांच्या संमतीनें लग्न मोडतां येतें. उत्तम स्वयंपाक करतां येणें हा वधूच्या अंगीं असावा लागणारा आवश्यक गुण समजतात. यांच्यांतील पुरुष अनेक बायका करतात. वडील बायकोचा मान मोठा असतो. प्रत्येक बायकोपाशीं स्वतंत्र स्वयंपाकाचीं भांडीं असतात.

ऋतुस्नात व प्रसूत बायकांकरितां वेगळें खोपटें केलेलें असतें. विधवांनीं पुन्हां लग्न करावयाचें नसतें, पण त्यांनां उपपत्नी या नात्यानें कोणाजवळहि रहातां येतें. पुरुष पुष्कळ अफू खातात पण बायकामुलांनां ती खाऊं देत नाहींत. अफू खाल्ल्यानें बायकांनां वांझपण येतें असा त्यांचा समज आहे. बायका तंबाकू खातात; व पुरुष जाडी भरडी तंबाकू ओढतात.

हे अनेक देवांनां भजतात. पैकुटलाथ, अथुविसरियाम्मा, वनथवाथी, इयप्पस्वामी, मासन्याथ हे यांचे मुख्य देव होत. हे कालीउपासकहि आहेत असें म्हणतात. हत्ती, बैल, वगैरेंत देव आहे असें हे मानितात. यांच्यांत जादूटोणाहि करतात.

हे मृतांनां पुरतात. यांच्यांतली एक चमत्कारिक चाल म्हणजे दांत तासण्याची होय. या योगानें सौंदर्य वाढतें असा यांचा समज आहे. बायका कानाच्या पाळ्यांत मोठीं ताडाच्या पानाचीं वेटोळीं किंवा लांकडी तवकड्या घालतात. पुरुषांच्या कनांबरोबर नाकहि टोंचलेलें असतें.

या लोकांनां कोचीनच्या राजाविषयीं फार आदर व प्रेम वाटतें. जेव्हां कोचीनचा राजा जंगलांतून फेरी करतो तेव्हां हे लोक त्याला फार मदत करतात; त्याचीं सर्व कामें करितात. राजाहि त्यांनां कपडेलत्ते, जेवण वगैरे देऊन संतोषित करतो.

गोमांस खाणाऱ्या मलसरांबरोबर कादिर जेवीत नाहींत. व गाईच्या कातड्याच्या बुटाला शिवत नाहींत. [ थर्स्टन ].

**कादिराबाद**—हैदराबाद संस्थान. औरंगाबाद जिल्हा. जालना तालुक्यांतील एक तटबंदीचें गांव. उत्तर अक्षांश १९° ५१' व पूर्वरेखांश ७५° ५५' व लोकसंख्या ( १९११ ) १०२७०. येथें आठवड्याचा बाजार भरत असून त्यावेळीं धान्य व कापूस यांचा मोठा व्यापार चालतो.

**कादिरि**, ता लु का.—मद्रास इलाखा. अनंतपूर जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तहशील. उत्तर अक्षांश १३° ४७'ते१४° ३१'व पूर्व रेखांश ७० ५१' ते ७८° २८'. क्षेत्रफळ ११६२ चौरस मैल. लोकसंख्या इ. स. ( १९२१ ) १५०३५२. यांत एक गांव व १४८ खेडीं आहेत. एकंदर उत्पन्न सुमारें दीड लाख आहे. हा तालुका खडकाळ व नापिक आहे. उन्हाळ्यांत या भागांतील नद्या व तळीं कोरडीं पडतात. बहुतेक जमीन निकस आहे.

गां व—मद्रास इलाखा. कडाप्पा जिल्ह्यांतील कादिरि तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १४°६' व पूर्व रेखांश ७८° १०'. लोकसंख्या ( १९११ ) १०४५६. येथील नरसिंहाचें देऊळ या भागांत प्रख्यात आहे. जानेवारी महिन्यांत येथें मोठी जत्रा भरते. रथयात्रा निघाल्यानंतर दोन दिवस अस्पृश्य लोकांस देवळांत जाण्याची परवानगी असते.

सदर्नमराठा रेल्वेचें हें स्टेशन असल्यामुळें यास व्यापारी महत्व आलें आहे.

**कांदी गांव**—बंगाल. मुर्शिदाबाद जिल्हा.कांदी विभागाचें हें मुख्य ठिकाण मोर नदीकांठीं आहे.उत्तर अक्षांश २३°५८' व पू. रे. ८८° ३'. लोकसंख्या (१९११) १२६३८. येथें पैकपाराचे राजे राहतात म्हणून यास थोडेंफार महत्व आहे. या घराण्याचा मूळ पुरुष गंगा गोविंद सिंग नांवाचा वॉरन हेस्टिंगच्या वेळीं होऊन गेला. हा येथेंच जन्मला होता. यानें पुष्कळ पैसा मिळविला व म्हातारपण त्यानें या गांवीं घालविलें. यानें दानधर्मांत व देवळें बांधण्यांत पुष्कळ पैसा खर्च केला. यानें आपल्या मातेचें श्राद्ध केलें त्यावेळीं २० लाख रुपयांचा दानधर्म केला होता असें म्हणतात. इ. स. १८६९ सालीं येथें म्युनसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४सालीं तिचें उत्पन्न९००० रु. व खर्च ८००० रुपये होता.

**कादीपुर**—संयुक्त प्रांत. सुलतानापुर जिल्ह्याची पूर्वेकडील तहशील. उ. अ. २५° ५९' ते २६° २३' व पू. रे. ८२° ६' ते ८२° ४१'. क्षेत्रफळ ४४२ चौ. मै. लोकसंख्या (१९११) २५९२५५ इ. स. १९०३-४ मधील जमीनमहसूल ३६९००० रुपये व इतर कर ५९००० रु. गोमती नदीस पूर येतो त्यावेळीं तहशील सखल असल्यामुळें हिचें फार नुकसान होतें.

**कांदी संस्थान**—हैदराबाद सं.मेदक जिल्हा. कलवगूर तालुक्यांतील एक खेडें.उ. अ. १७° ३५' व पू.रे.७८° ६'. लोकसंख्या (१९०१) १५७३. या ठिकाणीं मैदानांत दोन तेलगु लिपींत लिहिलेले शिलालेख आहेत.

**कादोद**—मुंबई इलाखा. भडोच जिल्हा. भडोच तालुक्यांतील हिंदूंचें एक यात्रेचें स्थान.उत्तर अक्षांश २१° ४४'व पूर्व रेखांश ७३° ८'. हें फक्त १२ घरांचें खेडें नर्मदातीरावर आहे. ज्यावेळीं वैशाख अधिक महिना येतो त्यावेळीं कोटेश्वर अथवा कोटिलिंगेश्वराची येथें मोठी यात्रा भरते. एक महिना यात्रा चालू असते. इ. स. १८१२ सालीं अशा एका यात्रेच्या प्रसंगीं दोन लाख लोक आले होते असा उल्लेख आढळतो.

**कादोली**—मुंबई इलाखा. बेळगांव जिल्हा. सांपगांवच्या दक्षिणेस सुमारें सहा मैलांवर मलप्रभा नदीकांठीं सुमारें १६०० लोकवस्तीचें (इ. स. १८८१) एक खेडें. येथें नदीच्या पात्रांत सुमारें दहाव्या शतकांत बांधलेलें शंकरलिंगाचें देऊळ असून त्यांत जुन्या कानडी लिपींत लिहिलेला एक शिलालेख इ. स. १०७५ सालांतील आहे.

**कांधळा**—संयुक्त प्रांत. मुझफरनगर जिल्हा. बुलढाणा तहशिलींतील एक गांव. उत्तर अक्षांश २९° १९' व पूर्व रेखांश ७७°१६'. मुझफरनगरच्या नैर्ऋत्येस २९ मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या (१९११) ८६९१. हा गांव सखल प्रदेशांत वसला असून आसपासचा प्रदेश दलदलीचा आहे. इ. स. १८७२ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न ११००० रुपये व खर्च तितकाच होता. येथें कापूस, लोंकर, धान्य वगैरेंचा व्यापार आहे.

**कानगी**—ह्या झाडास लॅटिनमध्यें मिरिस्टिका मल्वरिका, कानगी, पोल वेनगे, पथिरि वगैरे नावें आहेत. कोंकणच्या दक्षिण भागांतील नेहमीं हिरवें असणाऱ्या जंगलांतील हें एक मोठें झाड आहे.

उ प यो ग.—याच्या बिया उकळून त्यांचें साधारण पिंवळ्या रंगाचें तेल काढतात. हें तेल औषधासाठीं व जाळण्यासाठीं उपयोगी पडतें. जायफळांत याच्या फळांची भेसळ करतात. याचें लांकूड साधारणपणें कणखर असतें. तें इमारतीला लावतात.

**कानगुंडी**, त ह सी ल.—उत्तर अर्काट (मद्रास)मधील एक तहशील. उ. अ. १२° ३५' ते १२° ५६,'व पू. रे. ७८ १४' ते ७८' ३५'. क्षेत्रफळ ३४७ चौ. मैल. लोकसंख्या (१९०१) ६४४४६. येथील लोकसंख्या वाढण्याचें कारण येथील सोन्याच्या खाणी हें होय. एकंदर खेडीं २६८.

**कानडा**—अलास्का व न्यूफाउंडलंड खेरीज उत्तरअमेरिकेचा सर्व उत्तरार्ध कानडाच्या राज्यांत मोडतो. याची दक्षिणेकडील सरहद्द म्हणजे पॅसिफिक महासागर व वुंडस सरोवर यांच्या मधील ४९° अक्षांशाची समांतर रेषा होय व त्या रेषेनंतर सुपीरियर सरोवराच्या वायव्य बाजूला असलेली लहान सरोवराची व नद्यांची ओळ, व सेंट लॉरेन्स नदीच्या कांठचीं "ग्रेट लेक्स" हीं सरोवरें हींहि कानडाची दक्षिण सरहद्द नियंत्रित करितात. पाश्चिमसरहद्द म्हणजे दक्षिणेस पॅसिफिक महासागर किनाऱ्यापासून माउंट सेंट इलियस पर्यंत काढलेली ओवाडधोवड रेषा व आर्क्टिक समुद्रापर्यंत १४१ ची रेखांश रेषा ही होय.

अटलांटिक व पॅसिफिक महासागरांवरील किनाऱ्यावर पुष्कळ बेटें आहेत. कानडामध्यें अतिशय सरोवरें आहेत. सर्वांत मोठीं व पसरलेलीं सरोवरें हडसनबेच्या ५०० अथवा १००० मैलांत आहेत. सेंट लॉरेन्सच्या जवळपास असलेलीं सरोवरें सर्वांत प्रख्यांत आहेत. याशिवाय १०० मैलांपेक्षां जास्त लांबीचीं ९ सरोवरें व ५० मैल लांबीचीं ३५ सरोवरें आहेत. येथील बहुतेक सरोवरांनां निर्गममार्ग आहे. त्यामुळें सर्व सरोवरें स्वच्छ आहेत.

येथील नद्यांत सेंट लॉरेन्स नदी ऐतिहासिक व अर्थशास्त्र दृष्ट्या फार महत्वाची आहे. सेंट लॉरेन्स व हडसनचा उपसागर यांच्यामध्यें पुष्कळ नद्या आहेत. त्यांत व्हेल, विग, ईस्ट, मेन, रूपर्ट, नाटावे, मूझ, अलबनी, सेव्हर्न, नेलसन व चर्चहिल ह्या मुख्य आहेत. आलबर्टा व सास्कचेवान या उत्तरेकडील प्रांतांत अथाबास्का, पीस, सोव्ह व मॅकेंझी या मुख्य असून यांपैकीं मॅकेंझी ही १००० मैलपर्यंत नाव्य

आहे. परंतु ज्या समुद्रांत फारसें दळणवळण नाहीं अशा समुद्राला ती मिळत असल्यामुळें तिचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. वायव्येकडील नद्यांत यूकॉन मोठी असून ती पॅसिफिक महासागरास मिळते, व तिच्या प्रवाहापैकीं १८०० मैल भाग नाव्य आहे. पॅसिफिक महासागरास मिळणाऱ्या नद्यांत कोलंबिया ही सर्वांत मोठी आहे. फ्रेझर नदी व्हॅन्कोव्हरजवळ समुद्राला मिळते.

सेंट लॉरेन्सखेरीज कानडांतील सर्व नद्या दळणवळणाच्या दृष्टीनें वर्षानुवर्ष कमी महत्वाच्या होत आहेत. कारण जमीनीवर व पर्वतांवरून पॅसिफिक महासागरापर्यंत आगगाडी होत आहे. कानडाच्या बहुतेक नद्यांच्या प्रवाहांत धबधबे असल्यामुळें विद्युच्छक्ति उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें या नद्या फार महत्वाच्या आहेत व त्याप्रमाणें कानडांतील सर्व मोटीं शहरें या पाण्याच्या शक्तीचा उपयोग करीत आहेत.

ह वा पा णी.—निरनिराळ्या भागांत हवामान भिन्न आहे, म्हणून अमुक एक प्रकारची हवा कानडांत आहे असें सांगतां येत नाहीं. समुद्राच्या जवळ वार्षिक पावसाचें सरासरी मान जास्त आहे व तें ४० पासून ५६ इंच आहे. क्विबेक व उत्तर ऑंटारियो येथें पाऊस २०–४० इंच आहे. हिवाळ्यांत हिमवृष्टीहि बरीच होते. उन्हाळ्यांत ६०° ते६५° फा. उष्णता असते. पलीकडे पश्चिमेस पाऊस कमी पडतो व हिमवृष्टीहि बरीच कमी होते.

क्विबेक, मॅनिटोबा, ऑंटारियो या प्रांताचा सरहद्दी वाढविण्याचा कायदा १९११–१२ च्या बैठकींत पास झाला. त्याप्रमाणें त्या त्या प्रांताची सरहद्द किती झाली याचें कोष्टक खालीं दिलें आहे.

| प्रांताचें नांव | क्षेत्रफळ चौ. मै. |
|---|---|
| प्रिन्स एडवर्ड आयलंड | २१८४ |
| नोव्हास्कोशिया | २१४२८ |
| न्यूब्रन्सविक | २७९८५ |
| क्विबेक | ७०६८३४ |
| ऑंटारियो | ४०७२६२ |
| मॅनीटोबा | २५१८३२ |
| ब्रिटिश कोलंबिया | ३५५८५५ |
| आल्बर्टा | २५५२८५ |
| रुस्कचें रान | २५१७०० |
| यूकॉन | २०७०७६ |
| नार्थवेस्ट टेरिटोरीज | १२४२२२४ |
| एकंदर | ३७२९६७५ |

कॅनडाची लोकसंख्या सन १९२१ मध्यें ८० लक्षांपासून ९० लक्षांपर्यंत असावी असा अदमास तज्ज्ञांनीं काढलेला आहे. १९११ मध्यें ७२०६६४३ इतकी लोकवस्ती होती. लोकवस्तीची भराभर वाढ होण्याचें कारण, परराष्ट्रांतील लोक बरेच कानडांत येऊं लागले हें होय. सन १९११ मध्यें ग्रेटब्रिटनमधून १२३०१३ व अमेरिकेंतून ६६६२० इतके लोक आले तर १९२१मध्यें७४२६२ ग्रेटब्रिटनमधून, ४८०५९ अमेरिकेंतून व इतर राष्ट्रांमधून २६१५६ इतके लोक आले.

कानडामध्यें बहुजनमान्य असा एकहि धर्म नाहीं. येथील अमेरिकन इंडियन लोकसंख्या सुमारें १००००० आहे. १९०६ मध्यें सुमारें २०००० चिनी व जपानी लोक होते. १८८५ मध्यें कानडांत येणाऱ्या चिनी लोकांवर कर बसविला व तो १९०३ मध्यें १००पौं. करण्यांत आला.१९०५ मध्यें असल्याच प्रकारचीं बंधनें जपानी लोकांवर ठेवण्याचा ब्रिटिश कोलंबियानें प्रयत्न केला. परंतु संयुक्त कायदे करणाऱ्या सभेनें असला कायदा मान्य केला नाहीं. हिंदी लोकांनां मताचा हक्क देण्याविरुद्ध कोलंबियानें चंग बांधला आहे. जपानमधील बरेच लोक कानडांत वस्ती करण्याकरितां आलेले आहेत. त्यासंबंधानें १९२३–२४ सालांत बरीच चर्चा झाली. आपल्यापेक्षां कमी सुधारलेल्या लोकांनां कानडांत येऊं देऊं नये असें येथील लोकमत आहे.

संयुक्त सरकारनें काढलेल्या नोटा, सनद दिलेल्या पेढींच्या नोटा व सोनें चांदी व तांबें यांचीं नाणीं हा येथील चलनी पैसा होय. १९०६ पर्यंत नाणीं इंग्लंडमध्यें पाडलीं जात होतीं. परंतु १९०६ सालीं ऑटावा येथें टांकसाळ उघडण्यांत आली.

इ. सन १९०६ मध्यें येथें ३४ सनद असलेल्या पेढ्या होत्या व त्यांच्या १५६५ शाखा होत्या. १० वर्षांनीं एकदां पेढीच्या कायद्याची तपासणी होते. कानडांत ४ प्रकारच्या सेव्हिंग बँक्स आहेत; (१) पोस्ट ऑफिसची, (२) सरकारी, (३) मांट्रेल व क्विबेक येथील खास पेढ्या, (४) व सनदा असलेल्या पेढ्यांतील सेव्हिंग बँकेचें खातें. सरकारी व्याजाचा दर शेंकडा ३ आहे.

संयुक्त सरकारचें उत्पन्न मुख्यतः जकात व कर यांपासून असून शिवाय खाणीचे परवाने, इमारतीच्या लांकडांवरील कर व डांक वगैरेंपासून आहे. येथील१९०५ चें उत्पन्न ७,११८६,०७३ होतें. त्याच सालांतील कानडाचें कर्ज २६,६२,२४,१६७ होतें. १९१९–२० सालचें अंदाजपत्रक पुढीलप्रमाणें होतें:–जमा–३४,९७,४६,३३४ डॉलर व खर्च ३०,३८,४३,९२९ डॉलर.

व्या पा र.—१८६७ नंतर वायव्येकडील सुपीक जमिनीची मोकळीक, आगगाडीची सुरुवात व कालव्यांची सुधारणा या गोष्टींमुळें व्यापाराचे मार्ग, स्थिति व योजना बदलल्या आहेत. पाण्याच्या शक्तीच्या उपयोगाची वाढ कानडाला फार महत्वाची होती.

१८७८ त ' नॅशनल पॉलिसी ' नांवाच्या संरक्षक व्यापारी पद्धतीमुळें कारखान्यांची पुष्कळ भरभराट झाली. अद्याप कानडांत संरक्षक व्यापारी पद्धतच चालूं आहे. फक्त

ग्रेटब्रिटन व ब्रिटिश वसाहतींतून येणाऱ्या मालाला कांहीं सवलती दिल्या आहेत. १९०७ मध्यें येथील जकात कर बसविण्यासारख्या आयात मालावर शेंकडा २८ होती व एकंदर आयात मालावर शेंकडा १६ होती. अंतर्व्यापार खुला आहे, व येथील बाजारचें महत्व वाढत आहे. कानडासंबंधी व्यापारी तह करण्याचा अधिकार ग्रेटब्रिटनला आहे परंतु बहुतेक वेळां कानडाच्या अधिकाऱ्यांची अनुमती ग्रेटब्रिटनला असला तह करण्याच्या वेळीं मिळवावी लागते. कानडाचा बराचसा परदेशांशीं असलेला व्यापार ग्रेटब्रिटन व युनायटेड स्टेटस यांच्याशीं आहे युनायटेड स्टेट्समधून बहुतेक तयार आयात माल येतो. व बराच कच्चाहि माल येतो. शेतीचा माल हा निर्गत मालांत महत्वाचा आहे. सोनें. चांदी, तांबें व दुसरीं खनिज द्रव्यें या देशांतून परदेशांत जातात. अंतस्थ व्यापारांत वाढता भाग घेण्याच्या चढाओढीपेक्षां येथील कारखाने जास्त कांहीं करीत नाहींत. उपयोगाकरितां लागणाऱ्या तयार मालाचा कमींत कमी ⅔ हिस्सा येथें तयार होतो. १९२३ सालीं कानडामधून ९९.४ दशलक्ष डालरांची निर्गत व ९१२ दशलक्ष डॉलरांची आयात झाली. निर्गत मालाच्या बाबतींत साम्राज्यांत कानडाचा दुसरा नंबर लागतो.

द ळ ण व ळ ण.—हॅलिफॅक्स, सिडने, सेंटजॉन, क्विबेक व मांट्रिल हीं अॅटलांटिक महासागरावरील बंदरें आहेत व व्हँकोव्हर, एस्क्वीमाल्ट व व्हिक्टोरिया हीं पॅसिफिक महासागरावरील बंदरें आहेत. ग्रेटब्रिटन व कानडा यांच्यामध्यें आगबोटीचे बरेच रस्ते आहेत. फ्रान्सशीं प्रत्यक्ष दळणवळण आहे व जपान व आस्ट्रेलियाकडे नेमानें जहाजें जातात.

येथील आगगाड्यांच्या रस्त्यांचे मुख्य ४ विभाग आहेत. (१) ग्रँट ट्रंक, (२) कॅनेडिअन पॅसिफिक, (३) कॅनेडिअन नार्दर्न व (४) इंटर कलोनियल. आगगाडीच्या रचनेंकरितां संयुक्त, प्रांतिक व स्थानिक सरकारांकडून सढळ हातानें मदत मिळते.

इ.स.१९२१ मध्यें कॅनडांतील सर्व आगगाड्यांचें केंद्रीकरण होऊन त्यांच्या कॅनेडियन पॅसिफिक व नॅशनल रेल्वेज अशा दोनच मोठ्या कंपन्या झाल्या. १९१८ मध्यें ३८८७५ मैल रेल्वे चालू होती. त्यापैकीं २०००० मैल रेल्वे सरकारच्या ताब्यांत होती. सेंट लॉरेन्स नदीवर, तसेंच ऑंटारियो, एरि, सेंट क्लेअर इत्यादि सरोवरांवर कालवे बांधून, मॉंट्रिल ते पोर्ट ऑर्थर इतक्या अंतरापर्यंत म्हणजे जवळ जवळ १२१४ मैलपर्यंत जलमार्गानें दळणवळण चालू झालेलें आहे.

शि क्ष ण.—ब्रिटिश नॉर्थ अमेरिकेच्या कायद्यान्वयें शिक्षणावरील अधिकार त्या त्या प्रांतांकडे ठेविला आहे.सर्व प्रांतांत प्राथमिक शिक्षण फुकट व कांहीं कांहीं प्रांतांत दुय्यम शिक्षणहि फुकट आहे. यांचा खर्च स्थानिक करांतून व सरकारी मदतींतून भागतो. दुय्यम प्रतीचें शिक्षण हायस्कुलांतून, कॉलेजच्या संस्थांतून दिलें जातें व या संस्था सर्व शहरांतून आहेत. प्रत्येक प्रांतांत कांहीं शिक्षकशिक्षणसंस्था आहेत. उच्च शिक्षणाची सुद्धां पूर्ण व्यवस्था आहे. संयुक्त सरकारनें चालविलेलीं शेतकीचीं विद्यालयें व प्रयोगाचीं शेतें शेतकऱ्यांनां उत्तम शिक्षण व मदत देतात.

सन १९०१मध्यें एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ७६ लोकांनां व पांच वर्षांच्या वरील वयाच्या लोकसंख्येपैकीं शेंकडा ८६ लोकांनां लिहितां वाचतां येत होतें. सर्व प्रांताची शिक्षणपद्धति उत्तम आहे.येथें पुष्कळ वसतिगृहयुक्त शाळा असून देशाच्या सांपत्तिक भरभराटीबरोबर त्या वाढत आहेत. येथें एकंदर २२ विश्वविद्यालयें व ४३ कॉलेजें आहेत. बहुतेक मोठ्या शहरांत वाचनालयें आहेत पैकीं टोरॉंटोच्या वाचनालयांत मोठा ग्रंथसंग्रह व उत्तम व्यवस्था आहे. विद्वान लोकांच्या व शास्त्रीय अशा संस्थांत १८८१ मध्यें स्थापन झालेली "रॉयल सोसायटी ऑफ कॅनडा" ही मुख्य आहे. १९१७ सालीं सबंध कानडांत एकंदर १३७२ नियतकालिकें होतीं. पैकीं १३५ दैनिकें ४ आठवड्यांतून तीनदां निघणारीं, ४४ आठवड्यांतून दोनदां निघणारीं, ९३६ साप्ताहिकें, २१३ मासिकें, २५ अर्धमासिकें, ४ द्वैमासिकें व ११ त्रैमासिकें होतीं.

र क्ष ण.—आरमारी व लष्करी फौजेवरील अधिकार राजाला दिलेला आहे. परंतु या फौजेवर संयुक्त सरकारचा ताबा असतो. १९०५ पर्यंत हॅलिफॅक्स व इस्क्विमाल्ट हीं तटबंदीचीं बंदरें सार्वभौम सरकारकडून राखलीं जात होतीं; परंतु १९०५ पासून हा अधिकार कानडानें घेतला. १८ व ६० यांच्या दरम्यानच्या वयाच्या प्रत्येक योग्य मनुष्याचें नांव लष्करांत घातलें जातें. परंतु खडें सैन्य ४५००० आहे. कानडाच्या बाहेर जाण्यास यांच्यावर जबरदस्ती करितां येत नाहीं. व या कामाकरितां विशिष्ट लष्करभरती करावी लागते.

१९०४ च्या मिलिशिया अॅक्टप्रमाणें सर्व सैन्याचा मुख्य राजा हा असून त्याच्यातर्फे व्हाइसराय हा सैन्यावर सत्ता गाजवितो. या सैन्याची व्यवस्था सैन्य व संरक्षण या खात्याच्या प्रधानाकडे सोंपविलेली आहे. याशिवाय या प्रधानाच्या हाताखालीं एक असिस्टंट डेप्युटी, चार लष्करी अम्मलदार व एक इन्स्पेक्टर जनरल असे पांच इसम असतात. सैन्याचे अॅक्टिव्ह व रिझर्व असे दोन भाग आहेत. किंग्स्टन येथें सैन्याला लष्करी शिक्षण देण्यासाठीं एक लष्करी कॉलेज आहे. आरमारी सैन्याची व्यवस्था आरमारी खात्याच्या प्रधानाकडे आहे. आरमारी सैन्याला शिक्षण देण्याकरितां एक रॉयल नेव्हल कॉलेज उघडलेलें आहे.

न्या य व गु न्हे.—सर्व देशांतून न्याय उत्तम तऱ्हेनें दिला जातो. डोमिनियनच्या पार्लमेंटाकडून न्यायाधीश नेमिले जातात. कानडांतील वरिष्ठ कोर्टांतील निकालावर प्रिव्हि कौन्सिलच्या न्यायसभेकडे अपील करितां येतें.

१९१६ साली २३९४२ लोकांवर आरोप ठेवण्यांत आले. पैकीं १९१६० आरोपींनां शिक्षा झाली.

शे ती.—कानडा हा देश मुख्यत्वेंकरून शेतीचा आहे. एकंदर लोकसंख्येपैकीं १९०७ मध्यें शेंकडा ५० लोक प्रत्यक्ष रीतीनें शेतींत गुंतलेले होते. याशिवाय पुष्कळ लोक शेतीशीं संबंध असलेल्या धंद्यांत गुंतलेले आहेत. पुष्कळ प्रकारचा गहूं येथें होतो.

कानडांत १९१८ त २१,०३,१६,००० बुशील गहूं पिकला. एकंदर गहूं पेरला जाणारी जमीन १९१८त १,७३,५३,९०२ एकर होती. यूरोपच्या बाजारांत कानडांतलि कणिकेला बराच मान आहे. १९१८ सालांत कानडांतून ३६,६३,४१,५६५ डॉलर किंमतीचा गहूं बाहेर देशांत गेला व कणिक ९,५८,९६,४९२ डालर किंमतीची बाहेर गेली. गव्हाच्या खालोखाल ओट पिकतो. १९१८ त ३,७६,४४,२९३ डॉलर किंमतीचा ओट बाहेर गेला. याशिवाय जव, रायवक नांवाचा गहूं व वाटाणे येथें होतात. चांगल्या गुरांची पैदास करण्याचा धंदाहि येथें बराच चालतो. घोडे, मेंढ्या व डुकरें यांची बरीच निपज होते.

कानडाला दुधाचा व मधाचा देश असें म्हणण्यांत येतें. येथें दूध विपुल आहे व लोकांच्या खाण्यांत तें बरेंच येतें. दूधदुभत्याच्या धंद्याची कानडांतलि स्थिति नमुनेदार आहे व हा धंदा शेतकऱ्यांच्या परस्परसहकारी संस्थांकडून बहुतेक चालविला जातो. कानडांत दूधदुभत्याच्या कारखान्यांची पद्धत १८६४ मध्यें सुरू झाली. व तेव्हांपासून हा धंदा झपाट्यानें वाढत आहे. १८९१ मध्यें लोणी व मलई करण्याचे कारखाने कानडांत १७३३ होते. ते १८९९ मध्यें ३६०९ झाले, व १९०८ मध्यें ४३५५ झाले. ग्रेटब्रिटनमध्यें परदेशाहून येणाऱ्या 'चीझ'च्या किंमतीपैकीं शेंकडा ७२ किंमतीचें चीझ कानडाहून आलें. १९०६ त २,४४,४३,१६९ डॉ. किंमतीचें २१,५८,३४,५४३ पौंड चीझ परदेशांत गेलें व १९१७ त ४,११,७१,००० डॉ. किंमतीचें १९,४९,०४००० पौंड चीझ कारखान्यांतून तयार झालें. प्रयोगी शेतें चालवून गुरें वाढविण्याच्या, दूधदुभत्याच्या व फळाच्या धंद्याला मदत करून डोमिनियनचें सरकार येथील शेतीला मदत करितें. सरकार दूधदुभत्याचें काम चालविण्याकरितां लागणारी धंदेविषयक व सामान्य माहिती पुरवितें. याशिवाय लोणी व चीझ तयार करण्यास व परदेशांत पाठविण्यास लागणाऱ्या उत्तम योजनांचा प्रसार करण्याकरितां नमुनेदार चीझचे व मलई काढण्याचे कारखाने निरनिराळ्या ठिकाणीं काढण्यांत आले आहेत.

चांगल्या प्रतीचें बीं उत्पन्न करण्यास व उपयोगांत आणण्यास उत्तेजन देण्याकरितां १९०० सालीं बींखातें स्थापण्यांत आलें. प्रयोगशाळेंत बीजासंबंधीं शास्त्रीय शोध केले जातात व त्यासंबंधीं माहिती दिली जाते.

शेतकीचें उत्पन्न सन १९१८ मध्यें २,३८,००,००,००० इतकें डॉलर्स झालें. मेंढ्यांच्या संख्येंत मात्र बराच ऱ्हास झालेला आढळून आला. १८७१ मध्यें ३१,५५,५०९ इतकी मेंढयांची संख्या होती ती १९१९ सालीं२३,६९,३५८ इतकी भरली. १९१९ मध्यें ४३,५०,७०,००० डॉलर किंमतीचे घोडे, ३२,७८,१४,००० इतक्या किंमतीच्या दुभत्या गाई व ३८,१०,०७,००० डॉलरचीं इतर जनावरें कानडामध्यें होती. जंगलखात्याचेंहि उत्पन्न फार आहे. १९१७ मध्यें कानडामधील सागवानी लांकूड १९,००,००,००० डॉलरचें भरलें. जंगलखात्यांतील कच्च्या मालाचें उत्पन्न ५,६०,००,००० डॉलर व तयार मालाचें उत्पन्न १४,६३,३०,१९२ डॉलर सन १९१७ सालीं भरलें. जंगलखात्याची व्यवस्था, ब्रिटिश कोलंबियामध्यें फारच पद्धतशीर व उत्कृष्ट आहे. कानडांतील लंबर लांकडाचें उत्पन्न १९२१ त २२,२६,४८,७९० डॉलर झालें. १९२२ सालीं जंगलखात्यांत ४००० वणवे पेटले व त्यांमुळें सागवानी लांकूड पार जळून गेलें व कानडाला त्यामुळें फार नुकसान सोसावें लागलें. अशा प्रकारचे वणवे शक्य तितक्या जलद विझविण्यांत यावेत यासाठीं विमानांतून वणवे विझविण्याची सोय करण्यांत आली आहे. सन १९१९ त कानडांत९,१३,६२,९१३डॉ. किंमतीचा कागद व ४,८५,६२,०८८ डॉलर किंमतीचा लगदा तयार झाला. जंगली जनावरें व त्यांतल्या त्यांत ज्यापासून फार उत्पन्न होतें अशीं जनावरें संभाळण्याकरतां व तीं चांगलीं धष्टपुष्ट करून त्याच्यापासून शक्य तितकें अधिक उत्पन्न काढून घेण्याकरतां कानडासरकारनें निरनिराळीं प्राणिगृहें बांधलीं आहेत. १९१४ मध्यें ५५,६९,४७४ डॉलर किंमतीची लव व लोकर कानडामधून बाहेर गेली! व१९१९मध्यें१,३७३७,६२१ इतक्या किंमतीची फर बाहेर गेली; म्हणजे पांच वर्षांच्या अवधींत जवळजवळ दुपटीचा फरक पडला. यावरून या प्राणिगृहांचा किती उपयोग होत आहे हें दिसून येतें. कानडांतील प्रत्येक प्रांताच्या सरकारनें आपापलें स्वतंत्र मासळी खातें (फिशरी) उघडलें आहे. माशांची वृद्धि होण्यासाठीं त्यांनीं खटपट चालविली आहे. कानडामध्यें, ट्राउट ऑयस्टर वगैरे निरनिराळ्या माशांची पूर्ण समृद्धि आहे.

शे त की शि क्ष ण.—प्रत्येक प्रांताच्या सरकारी कारभारांत एक शेतकीखातें असतें. माहिती देणाऱ्या दुसऱ्या प्रांतिक साधनांत शेतकऱ्यांची संस्था, दूधदुभत्याच्या व गुरें वाढविणाऱ्या फिरत्या संस्था आहेत. या निरनिराळ्या प्रांतांकडून चालविल्या जातात, अथवा त्यांना मदत दिली जाते. या संस्थांच्या महत्त्वाच्या सभेच्या कामाचा अहवाल व भाषणें प्रांतिक सरकारांकडून प्रसिद्ध केलीं जातात व ज्यांनां तीं पाहिजे असतात त्यांनां तीं फुकट पाठविण्यांत येतात. उच्च प्रतीचीं वार्षिक शेतकीप्रदर्शनें भरतात व त्या ठिकाणीं शेतकीच्या उत्पन्नाचें चढाओढीनें प्रदर्शन होतें. साम्राज्य सरकार आपल्याकडूनहि पैशाची मदत स्थानिक प्रदर्शनांस करितें.

येथें अनेक महत्वाचीं शेतकीचीं विद्यालयें आहेत, त्यांत 'ऑंटारियो' शेतकी विद्यालय मुख्य आहे. बहुतेक प्रत्येक प्रांतात दूधदुभत्याच्या शाळा आहेत.

खनिज पदार्थ.—१९१७ सालीं कानडांतील खनिज पदार्थांचें उत्पन्न ७,९२,८६,२०२ डॉलर होतें, तें १९२० सालीं २१,७७,७१,०८० इतकें भरलें. कानडामध्यें निकल व ॲसबेस्टास यांची समृद्धि असल्यामुळें या धातूंचा व्यापार कानडानें जगभर चालविला आहे. १९२० मध्यें कोळसा, निकल, सोनें, सीमेंट, तांबें, रुपें व ॲसबेस्टास या मुख्य उत्पन्नाच्या बाबी होत्या. ब्रिटिश साम्राज्यामध्यें कोळशाच्या उत्पन्नाच्या बाबतींत कानडाचा दुसरा नंबर लागतो. १९२१ मध्यें ७,१०,००,००० डॉलर किंमतीचा कोळसा कानडांत तयार झाला. १९२० मध्यें लोखंड ३६,५०,१०,००० टन झालें. यूकन, मॅनिटोबा, नोव्हास्कॉशिया, क्विबेक, उत्तर ऑंटारियो इत्यादि ठिकाणीं सोन्याच्या खाणी आहेत. १९२२ सालीं, ऑंटारियोमधील गवताळ रानामध्यें असलेल्या सोन्याच्या खाणी खणण्याचें काम सुरू झालें असून त्या कामाला मदत करण्यासाठीं लंडनमध्यें एक कंपनी स्थापन झाली आहे. ब्रिटिश कोलंबियामध्यें स्लोकन तालुक्यांत, चांदीहि उपलब्ध होते. कानडामध्यें तांबें सर्व ठिकाणीं भरपूर सांपडतें. १९१७ मध्यें ११,००,००,००० पौंड तांबें कानडामध्यें निघालें.

राज्यव्यवस्था.—मुख्य अंमलबजावणीचा अधिकार साम्राज्याधिपतीला आहे. त्याचप्रमाणें त्याचा लष्करावर व आरमारावर अधिकार आहे. गव्हर्नर जनरल हा साम्राज्यधिपतीचा प्रतिनिधि असतो व तो त्याचें काम करितो. तो पांच वर्षेपर्यंत अधिकारारूढ असतो. त्याचा अधिकार कडकपणें नियंत्रित केलेला आहे. साम्राज्याच्या हिताशीं विरोधी असणाऱ्या कोणत्याहि बिलाला अनुमति देण्याचें नाकारण्याचा अधिकार त्याला आहे. सीनेट हें आयुर्मर्यादेपावेतों अधिकारारूढ असणाऱ्या सभासदांचें असतें व हे सभासद कौन्सिलच्या अनुमतीनें गव्हर्नरजनरल नेमतो. प्रथम यांच्यांत ७२ सभासद होते. क्विबेकहून २४ ऑंटारियोहून २४ व समुद्रतीरावरील प्रांतांतून २४ असे ते होते. पुढें जसजसे नवीन प्रांत जोडण्यांत आले तसतशी ह्या सभासदांची संख्या वाढत गेली. हाऊस ऑफ कामन्समध्यें लोकांनीं निवडलेले सभासद असतात. सभासदांची संख्या प्रथम १९६ होती परंतु दशवार्षिक खानेसुमारीच्या वेळेला ती बदलते. मूळ कायद्याप्रमाणें क्विबेकला ६५ सभासद पाठविण्याचा नेहमीं हक्क आहे व इतर प्रांतांना क्विबेकमध्यें लोकसंख्येचें व सभासदांचें जें प्रमाण असेल त्या प्रमाणांत सभासद पाठविण्याचा अधिकार आहे. १९०८ मध्यें हे सभासद २१८ होते. ब्रिटिश नार्थअमेरिका कायद्यानें प्रत्येक प्रांताला त्याचें अधिकारक्षेत्र आंखून दिलें व राहिलेले अधिकार संयुक्त सरकारला देण्यांत आले होते. प्रत्येक प्रांताला कायदे करण्याला बरेंच क्षेत्र आहे व हे कायदे प्रांतिक प्रतिनिधि सभा करते.

इतिहास.—कानडाचा यूरोपियन लोकांशीं म्हणण्यासारखा संबंध पंधराव्या शतकाच्या अखेरपर्यंत आला नाहीं. जॉन कॅबट हा ब्रिस्टलहून निघून कानडाच्या किनाऱ्यावर १४९७ मध्यें आला. लवकरच यूरोपांतून कोळी लोक न्यू फाउंडलंडच्या किनाऱ्यावर व नंतर खुद्द अमेरिकेच्या किनाऱ्यावर येऊं लागले. फ्रान्सच्या पहिल्या फ्रान्सिसनें "जाक्स कारटिअर" याच्या आधिपत्याखालीं एक टोळी पाठविली व ती सेंटलारेन्सच्या आखातांत १५३४ त शिरली. पुढील ६० वर्षांत मासे धरण्याच्या व लोंकरीच्या धंद्याकडे लोकांचें लक्ष गेलें, परंतु वसाहत झाली नाहीं. सतराव्या शतकाच्या आरंभीं साम्युअल दि चाम्प्लेन नांवाच्या फ्रेंच मनुष्यास लोंकरीच्या व्यापारानिमित्त येथें पाठविलें. त्यानें १६०३ मध्यें सेंट लारेन्सच्या वरच्या भागांत जलपर्यटन करून पहिली कायमची फ्रेंच वसाहत केली व ती हल्लींचा नोव्हास्कोशिया होय. इ. स. १६०८ मध्यें त्यानें क्विबेकची वसाहत सुरू केली. त्यानें आमरण कानडाची वसाहत या दृष्टीनें वाढ करण्यास व लोंकरीचा व मासे पकडण्याचा धंदा वाढविण्यास अविश्रांत मेहनत केली, व आंतील भाग शोधण्यांतहि त्यानें बरेच परिश्रम केले. तो ह्युरन व ऑंटारियो सरोवरापर्यंत पोहोंचला. इंग्रज व फ्रेंच यांच्यामधील तीस वर्षांच्या युद्धांत (इ स. १६१८–१६४८) व्हर्जिनियांतील इंग्रजांनीं फ्रेंच लोकांच्या वसाहती घेतल्या, परंतु १६३२ मध्यें झालेल्या तहान्वयें कानडा फ्रान्साला परत दिला. याच सुमारास फ्रान्समध्यें "दि कंपनी ऑफ वन्हंड्रेड असोसिएट्स" नांवाची कंपनी निघाली. तिला १६२९ पासून ५० वर्षेपर्यंत व्यापाराचा पूर्ण कुल अधिकार देण्यांत यावयाचा होता व तिच्या प्रदेशांतील माल फ्रान्समध्यें कर न घेतां येऊं दिला जात असे. मोबदला म्हणून नवीन फ्रान्समध्यें दरसाल ३०० वसाहतवाले न्यावे असें ठरलें. १६६३ पर्यंत या कंपनीच्या ताब्यांत नवीन फ्रान्स होता. परंतु या कंपनीनें व्यापाराच्या बाबतींत व वसाहतीच्या बाबतींत फार थोडें काम केल्यामुळें तिची सनद रद्द करण्यांत आली व नवीन फ्रान्स हा राज्याचा प्रांत झाला व गव्हर्नर वगैरे नेमून त्याची व्यवस्था फ्रान्सच्या प्रांताप्रमाणें करण्यांत आली. १६६४ मध्यें "कंपनी ऑफ दि वेस्ट इंडीज" नांवाची कंपनी स्थापण्यांत आली. कानडाच्या व आफ्रिकेच्या व्यापाराचा व वसाहतीचा तिला अधिकार दिला. परंतु १६६५ मधील तिच्या कामाखेरीज तिच्याकडून कांहीं काम झालें नाहीं. १६७४ मध्यें तिची सनद काढून घेण्यांत आली. मध्यंतरीं फ्रेंच शोधकांनीं बरीच प्रगति करून नवीन देश शोधून काढिला. १६८२ मध्यें मिसिसिपि नदीच्या कांठच्या प्रदेशांत वसाहत करून तिला लुसियाना असें नांव

दिलें. येथें आधिपत्याकरितां चर्च व राज्यकारभार पाहाणारे यांच्यांत वरीच चढाओढ होती.

इंग्रजांशीं तंटाः—अमेरिकेंत मोठें साम्राज्य स्थापण्याच्या फ्रान्सच्या हेतूला मूर्त स्वरूप प्राप्त होत होतें. यूरोपमध्यें ज्याप्रमाणें इंग्रज व फ्रेंच यांच्यांत रणकंदन सुरू होतें, त्याप्रमाणें तें येथेंहि सुरू झालें. फ्रेंच गव्हर्नर फांटिनॅक् यानें नवीन इंग्लंडवर हल्ला करण्याचा वेत केला व सरहद्दीवरील लढायांस उत्तेजन दिलें. त्याच्यावर इंग्रजांनीं उलट स्वारी केली. इ. स. १६९० मध्यें सर विल्यम फिप्स यानें स्वारी करून हल्लींचा नोव्हास्कोशिया जिंकला व क्विबेकवर स्वारी केली. परंतु त्याला अपयश घ्यावें लागलें. १६९७ च्या रिसविक्च्या तहामुळें हें भांडण थांबलें; परंतु तें पुन्हां इ. स. १७०१ मध्यें सुरू झालें. म्हणून ते अमेरिकेंतहि सुरू झालें. त्यांत फ्रान्सचें वरेंच नुकसान झालें. १७११ मध्यें क्विबेक घेण्याचा प्रयत्न इंग्रजांनीं केला, परंतु तो फसला. तरी पण त्यांनीं नोव्हास्कोशिया घेतला. १७१३ मध्यें झालेल्या तहान्वयें फ्रान्सनें हडसनवे, न्यू फाउंड लंड व नोव्हास्कोशिया यांच्यांवरील आपला हक्क सोडला. फ्रान्सच्या ताब्यांत सेंट लारेन्सच्या कांठचा प्रदेश व केप ब्रिटनचें बेट हीं होतीं. तेथें त्यांनीं लुईवर्गचा किल्ला बांधला व इंग्रजांनां तोंड देण्याची तयारी केली. इसवी सन १७०१ मध्यें डेट्राईट वसवलें गेलें. तें म्हणजे त्यांची वसाहत हल्लींच्या कॅनडियन वेस्टपर्यंत पाहोंचलें मिसिसिपीच्या मुखाजवळ न्युआर्लिअन्सची वसाहत केली. न्यू आर्लिअन्स व क्विबेक या वसाहती वसाहतींच्या रांगेनें फ्रान्सनें जोडल्या असत्या व इंग्रजांनां ॲटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावरील प्रदेशांतच कोंडून ठेविलें असतें तर नार्थ अमेरिका त्यांच्या ताब्यांत आली असती. जेव्हां आस्ट्रियन गादीच्या तंटयाची लढाई सुरू झाली तेव्हां १७४४ मध्यें लुईवर्ग किल्ला इंग्रजांनीं घेतला. परंतु १७४८ च्या तहान्वयें तो परत करण्यांत आला.इ. स. १७५६मध्यें सात वर्षांची लढाई सुरु झाली. फ्रान्सजवळ ब्रिटनला अमेरिकेंत तोंड देण्यापुरती सामुग्री नव्हती. त्यामुळें१७५९ मध्यें क्विबेक इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. पुढच्या वर्षी कानडांतील फ्रेंच सैन्य इंग्रजांस शरण गेलें. इ. स. १७६३ च्या पारिसच्या तह्यान्वयें सर्व नवीन फ्रान्स कायमचा इंग्रजांनां दिला गेला.

इ. स. १७६३ च्या तहानंतर कानडाचा राज्यकारभार राज्याच्या जाहीरनाम्यान्वयें करण्यांत येत होता. १७७४ मध्यें साम्राज्याच्या प्रतिनिधिसभेनें पास केलेल्या क्विबेकच्या कायद्याप्रमाणें राज्यकारभार चालूं लागला. या कायद्यान्वयें फ्रान्सच्या ताब्यांतील पश्चिमेकडील मुलूख कानडांत क्विबेक प्रांतास जोडला गेला, व ह्या प्रांताचा कारभार क्विबेकहून पहावयाचें ठरलें. रोमन कॅथोलिक चर्चला कानडांतील अधिकार दिले.

इ.स.१७७५ मध्यें अमेरिकेंत राज्यक्रांतीचें युद्ध सुरू झालें, व त्याच्या पुढाऱ्यांनीं कानडालाहि आपल्या गोटांत घेण्याचे प्रयत्न केले, परंतु ते यशस्वी झाले नाहींत. अमेरिकन राज्यक्रांतीमुळें कानडांत बराच फरक झाला, कारण जेथें यूरोपियन वसाहतवाले फार थोडे होते तेथें यूरोपियन लोक आणखी आले. इ. स.१७९१ त ब्रिटिश पार्लमेंटमध्यें कान्स्टिटयूशनल कायदा पास केला. त्याप्रमाणें कानडाचे ओटावा नदीच्या रेषेनें दोन भाग करण्यांत आले. त्यांनां वरचा व खालचा कानडा असें म्हणतात. खालच्या म्ह. लोअर कानडांत पूर्वींचीच राज्यपद्धति चालू होती. फक्त प्रतिनिधिपद्धत तेथें जास्त सुरू केली. वरच्या म्हणजे अपर कानडांत ब्रिटिश पद्धतीवर राज्यकारभार चालतो. १८१२ मध्यें युनायटेडस्टेट्शीं ब्रिटनचें युद्ध झालें, त्यावेळेस घेंटच्या तहान्वयें कानडाची राज्यपद्धत जशीच्या तशीच राहूं दिली.

सेंट लारेन्सवर फ्रेंच प्रजासत्ताक राज्यपद्धति सुरू करण्याच्या उद्देशानें लोअर कानडांतील फ्रेंच लोकांनीं १८३७त बंड केलें, त्याचप्रमाणें त्याच सालीं अपर कानडांतील लोकांनींहि बंड केलें. १८३८ मध्यें डरहॅमच्या अर्लला कानडावर पाठविलें. त्यानें असा रिपोर्ट लिहिला कीं कानडाचे हे दोन्ही भाग एक करून त्यास स्वराज्य द्यावें. त्यामुळें त्याला परत बोलाविलें. पुढें इ. स. १८४० मध्यें अपर व लोअर कानडा जोडणारा " ॲक्ट ऑफ युनियन " हा कायदा पास झाला. प्रत्येक प्रांत एका पार्लमेंटमध्यें सारखे प्रतिनिधी पाठवीत असे. या दोन प्रांतांच्या एकीकरणामुळें कारभार सुयंत्रित रीतीनें चालत नव्हता. प्रत्येक प्रांताला एकमेकांचा हेवा वाटत असे. इंग्लिश व फ्रेंच लोक सारखेच असल्यामुळें राज्यकारभार जवळ जवळ अशक्य झाला. १८६४ मध्यें क्विबेकला एक परिषद भरली. व तिनें एक योजना तयार केली व तीच थोड्याशा फेरफारानें साम्राज्याच्या पार्लमेंटमध्यें "दि ब्रिटिश नॉर्थ अमेरिका ॲक्ट" या नांवानें पास झाली. इ.स.१८६७च्या जुलईच्या पहिल्या तारखेस कानडाचें 'डोमिनियन' अस्तित्वांत आलें. कानडांतील प्रांतांनां अमेरिकन यूनियनपेक्षां कमी अधिकार दिले व संयुक्त सरकारनें राहिलेले अधिकार आपल्याकडे ठेविले. यावेळीं कानडाच्या डोमिनियनचे ४ प्रांत होते ते ऑंटारियो, क्विबेक, न्यूब्रन्सविक व नोव्हास्कोशिया होत. या ४प्रांतांकरितां चार लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आले व ७० सभासद नेमण्यांत आले. त्यांपैकीं निम्मे लिबरल व निम्मे कांझरव्हेटिव्ह होते. मुख्य प्रधानाला के. सी. बी. हा किताब देण्यांत आला.

संयुक्ततेच्या पूर्णतेनंतर लवकरच नोव्हास्कोशियांत विभक्त होण्याची चळवळ सुरू झाली, व राणीकडे हाऊ यांच्यावरोबर शिष्टमंडळ पाठविण्यांत आलें परंतु त्याचा कांहीं फायदा होत नाहीं असें पाहून हाऊनें संयुक्त होण्याच्या वेळीं नोव्हास्कोशियाशीं केलेल्या करारांत फेरफार करून घेतला

व त्याचप्रमाणें संयुक्तसरकारनें हमी घेतलेल्या नोव्हास्कोशियाच्या कर्जाची रकम वाढविली, व १० वर्षेपर्यंत संयुक्त सरकारनें ८२६९८ डॉलर मदत देण्याचें ठरलें. डोमीनियनच्या पहिल्या पार्लमेंट सभेनंतर १ महिन्यांतच रूपर्टस्लँड व वायव्यप्रांत कानडास जोडण्यासंबंधीं चळवळ सुरु झाली. हे प्रांत "हडसन बे कंपनीच्या" ताब्यांत होते. या कंपनीला आपला हक्क सोडून देण्यास सांगण्याकरितां एक शिष्टमंडळ विलायतेला गेलें. त्यांनीं पुष्कळ वाटाघाट करून कंपनीला ३ लक्ष पौंड देऊन तिनें हक्क सोडावे असें ठरलें. कंपनीनें आपल्याकडे कांहीं सुपीक जमीन ठेऊन घेतली. १८६८ त साम्राज्याच्या पार्लमेंटमध्यें हा अधिकार बदलण्याचा कायदा पास झाला. १८६९ मध्यें कनेडियन पार्लमेंटनें हा कायदा मान्य केला. "रेड रिव्हर" नांवाच्या वसाहतींत मध्यंतरी बंड झालें परंतु तें लवकरच मोडण्यांत आलें. "ब्रिटिश नार्थ अमेरिका" या कायद्यान्वयें डोमिनियनमध्यें नवीन प्रांत घेण्याची सवड होती. त्याप्रमाणें पहिल्यानें मानिटोबा जोडण्यांत आला, १८७१ मध्यें ब्रिटिश कोलंबिया जोडण्यांत आला. १८७३ मध्यें प्रिन्स एडवर्ड बेट जोडण्यांत आलें व १८७८ सालीं न्यू फाउंडलंड खेरीज उत्तर अमेरिकेंतील सर्व ब्रिटिशांच्या ताब्यांतील मुलूख संयुक्त करण्यांत आला आहे असें जाहीर करण्यांत आलें.

ब्रिटिश कोलंबियाची सरहद्द आंखलेली नसल्यामुळें व युनायटेड स्टेट्स व कानडा या दोघांच्याहि ताब्यांत असलेल्या नद्यांत नावा चालविण्याच्या अधिकाराबद्दलच्या तंट्यामुळें व दुसऱ्या कांहीं कारणांमुळें या दोन राष्ट्रांत वादाचें कारण उत्पन्न झालें. इंग्लंडला मध्यस्थी करण्याविषयीं विनंती करण्यांत आली. त्याप्रमाणें एक कमिशन बसवून या वादाचा निकाल समाधानकारक रीतीनें लावण्यांत आला.

इ. स. १८७२ सालीं डोमिनियनमध्यें दुसरी निवडणूक झाली, व तींत संयुक्ततेच्या विरुद्ध असलेल्या लोकांचा पराभव झाला. या सभेंत ट्रान्स-कॉन्टिनेंटल आगगाडी संबंधानें लढा माजला व शेवटीं ही आगगाडी तयार करण्याची मुदत वाढविण्यांत आली. त्यामुळें ब्रिटिश कोलंबियांत अस्वस्थता माजली, कारण त्यांनीं १० वर्षांत ही आगगाडी तयार होईल या अटीवरच संयुक्ततेस अनुमति दिली होती.

**अर्थशास्त्रीय 'राष्ट्रीय धोरण'.**—मॅकेंझच्या राज्यकारभाराच्या अवधींत एकसारखी डोमिनियनच्या उत्पन्नांत तूट आली. कानडांत सुरु असलेल्या कडक संरक्षक व्यापारीपद्धतीमुळें कानडांतील धंद्यांचा नाश झाला. या स्थितींत सर जे. मॅक्डोनल्ड यानें "नॅशनल पॉलिसी" नांवाची पद्धत सुरू करावी, असा ठराव आणला. व त्यावेळीं ठरलेली व्यापारी पद्धत थोड्या फेरफारानें लिबरल व कान्झर्व्हेटिव्ह या दोन्ही पक्षांच्या वेळीं कायम राहिली.

**कनेडीयन पॅसिफिक रेल्वेची पूर्तता.**—इ स. १८७८ मध्यें कान्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ झाला व तो १८९६ पर्यंत होता. दहा वर्षांत कॅनेडीयन पॅसिफिक रेल्वे तयार करण्यासंबंधीं एका कंपनीला मक्ता दिला. व तिला अडीच कोट डालर व अडीच कोट एकर जमीन देण्याचें ठरलें. १८८१ मध्यें पार्लमेंटनें याला आपली अनुमति दिली. या कंपनीनें पांच वर्षांतच पुष्कळ काम करून दाखविलें.

**रायलचें बंड:**—सास्काचेवान येथील व तेथें देशांतर करून आलेल्या मिश्र अवलादीच्या लोकांनां वाटलें कीं येथें होत असलेल्या सुधारणेमुळें आपला बराच तोटा होईल. याशिवाय त्यांच्या दुसऱ्या खऱ्या व काल्पनिक तक्रारी होत्या. त्यांनीं युनायटेड-स्टेट्समध्यें पळून गेलेल्या रायलला बोलावलें व या लोकांचें धुरिणत्व त्याला मिळालें. ओटावा येथील अधिकाऱ्यांनां प्रथम या बंडाचें महत्व वाटलें नाहीं, परंतु बंडवाल्या लोकांच्या ताब्यांत असलेली टेंकडी घेण्याकरितां पाठविलेले पोलीस मारले गेले तेव्हां लष्कराची योजना करण्यांत आली. बंडवाल्यांचा पराभव होऊन रायल याला कैद केलें. १८८५ मध्यें याच्या वधाच्या प्रश्नानें राजकीय वातावरणांत बरीच खळबळ उडाली. शेवटीं तो व त्याबरोबर कांहीं इंडियन सरदार फांशी दिले गेले.

इ. स. १८९६ पर्यंत कान्झरव्हेटिव्ह पक्ष अधिकारूढ होता व त्या नंतर उदारमतवादी पक्ष अधिकारूढ झाला.

विसाव्या शतकाच्या आरंभीं कानडाची बरीच भरभराट झाली. यूरोप व युनायटेड स्टेट्स मधून बरेच लोक येथें येत व ते पश्चिमेकडील मुलुखांत रहात. त्यामुळें या भागाची इतकी वाढ झाली कीं १९०५ मध्यें दोन नवीन प्रांत करावे लागले व ते आलबर्टा व सास्काचेवान होत. कनेडियन पॅसिफिक रेल्वे वाढविण्यांत आली. तिचा १२००० मैल रस्ता आहे.

**युनायटेड स्टेट्सशीं असलेलें नातें:**—ज्या अर्थी कानडा व युनायटेड स्टेटस यांमध्यें एका मोठ्या खंडाच्या व त्याच्या आसपासच्या समुद्राच्या अधिकाराची वांटणी झालेली आहे त्याअर्थी या दोन राष्ट्रांत वाद उत्पन्न व्हावा हें साहजिक आहे. व तो मिटविण्याचे वेळोवेळीं प्रयत्न केले गेले. मासे धरण्याच्या अधिकारासंबंधीं तंटे होत. १८८७ मध्यें या वादाचा निकाल लावण्याकरितां एक कमिशन बसलें. परंतु त्या कमिशननें शिफारस केलेल्या ठरावास सेनेट सभेंत अनुमति मिळाली नाहीं. १८८६ मध्यें पॅसिफिक महासागरावरील मासे धरण्याच्या अधिकारासंबंधीं तंटा होऊन ब्रिटनला मध्यस्थी करावी लागली. १८९७ मध्यें या वादाचा निकाल करण्याकरितां एक "हाय कमिशन" नेमण्याचें ग्रेटब्रिटनच्या व युनायटेड स्टेट्सच्या सरकारांनीं ठरविलें. या कमिशनमध्यें कानडाच्या प्रधानमंडळांतील ३ सभासद व न्यूफाउंडलंडचा प्रतिनीधी हे होते. व या कमिशनची बैठक क्विबेक येथें झाली (१८९८) नंतर वाशिंग्टन येथें

दुसरी बैठक झाली. अलास्काची चतुःसीमा. अलटांतिक महासागरावरील व आंतील खाड्यांत मासे धरण्याचे अधिकार, परकीय मजुरांचा कायदा, बेहरिंग समुद्रांत सील मासे धरण्याचा हक्क व कांहीं उत्पन्नांच्या बाबतींत मोबदल्याची व्यापार पद्धति या गोष्टी कमिशन पुढें विचाराकरितां होत्या. अलास्काच्या चतुःसीमेच्या लढ्यावरून कमिशन बंद झालें. इ. स. १९०३ मध्यें हा वादाचा प्रश्न सहा निःपक्षपाती न्यायाधीशांकडे द्यावा असें ठरलें. त्यांपैकीं ३ ब्रिटिश व ३ अमेरिकन होते. त्यांची बैठक लंडन येथें झाली, व त्यांनीं केलेल्या रिपोर्टावरून पोर्टलंड चानल पर्यंत दक्षिणेस महासागराच्या आंत आलेल्या भागावरील मासे धरण्याचा कॅनडियन लोकांचा हक्क काढिला.

अर्वाचीन इतिहास.—१९१० ते १९१३ पर्यंतच्या अवधींत अमेरिकेशीं व्यापार करण्यासंबंधींच्या व आरमारी धोरण ठरविण्याच्या प्रश्नांवर महत्वाची चर्चा चालू होती. १९११ मध्यें कानडाचा मुख्य प्रधान सर वुइल्फ्रिड लारियर हा होता. यानें अमेरिकेशीं व्यापारी तह कोणत्या अटींवर करावयाचा हें ठरविण्यासाठीं मतदारांचीं मतें घेण्याचें ठरविलें पण याच सुमारास लोकांचें लक्ष्य कानडाचें आरमारी धोरण कसें ठेवलें पाहिजे या प्रश्नाकडे वेधल्यामुळें, लारियरचा पराभव होऊन त्याला प्रधानमंडळासकट राजिनामा देणें भाग पडलें. त्यानंतर बोर्डन यानें १९११ च्या आक्टोबरमध्यें आपलें नवीन मंत्रिमंडळ बनविलें. नोव्हेंबर १५ ला कानडाचें पार्लमेंट उघडण्यांत आलें. हा समारंभ कानडाचा गव्हर्नर जनरल ड्यूक ऑफ कॅनॉट याच्या हस्तें झाला. १९१२ च्या नोव्हेंबरमधील पार्लमेंटच्या बैठकीमध्यें आरमारी धोरणासंबंधीं प्रश्न उपस्थित होऊन, कानडाचें आरमारी धोरण ब्रिटिश साम्राज्याला मदत करण्याचें असावें असें तात्पुरतें ठरविण्यांत आलें.

व्यापारी तहाचा प्रश्नः—या प्रश्नासंबंधीं मूळ वाटाघाट १९१० सालीं होऊन अमेरिका व कानडा यांच्या दरम्यान व्यापारी तहासंबंधींच्या कांहीं अटी निश्चित झाल्या. त्या अटी १९११ सालच्या पार्लमेंटांत कानडाचा फडणीस फील्डिंग यानें जाहीर केल्या. या अटींमध्यें असें ठरलें होतें कीं, दोन्ही राष्ट्रांनीं परस्परांच्या राष्ट्रांमध्यें येणाऱ्या कांहीं वस्तूंवरील कर अजिबात नाहींसा करावा व कांहीं बाबतींत कमी करावा. या अटी जाहीर करण्यांत आल्यावर त्यांच्या तर्फेनें भाषण करतांना अमेरिकेचा व कानडाचा पूर्वापार संबंध मैत्रीचा असून अमेरिकेशीं व्यापारी बाबतींत सख्य करणें अत्यंत जरूरीचें आहे असें प्रतिपादन करण्यांत आलें. या तहानें ग्रेटब्रिटनच्या व्यापाराला धक्का पोहोंचण्याचा संभव आहे या आक्षेपालाहि समर्पक उत्तर देण्यांत आलें. पण तेवढ्यानें या तहाच्या विरुद्ध असणाऱ्या पक्षाचें समाधान झालें नाहीं. प्रतिपक्षाचें म्हणणें असें होतें कीं, हा व्यापारी तह घडवून आणण्यांत अमेरिकेनें जो पुढाकार घेतला आहे त्यांत अमेरिकेचा कांहीं तरी डाव असावा. कानडामधील कच्च्या मालावर अमेरिकेचा डोळा असून त्याचा पूर्ण फायदा घेऊन अमेरिका कानडाचा व्यापार बसवून टाकील असें या पक्षाचें म्हणणें होतें. या प्रश्नावर बरेच दिवस कडाक्याचा वाद होऊन शेवटीं दोन्ही पक्षांनीं तडजोडीचा ठराव मंजूर करून हें भांडण मिटविलें. या तडजोडीच्या ठरावांतील अमेरिकेशीं कानडाचा तह झाला तरी कानडाचें ग्रेटब्रिटनशीं हितसंबंध आहेत ते अगदीं कायम राखावयाचे, व कानडाचा आपल्या आर्थिक धोरणावर पूर्ण ताबा रहावयाचा, अशा अर्थाचीं दोन कलमें होतीं.

आरमारी धोरणः—व्यापारी तहासंबंधींच्या इतकाच महत्वाचा दुसरा प्रश्न कानडानें आपलें आरमारी धोरण कसें ठेवावें या प्रश्नासंबंधीं होता. लॉरियरचें मत असें होतें कीं, कानडानें आपल्या स्वतःच्या खर्चानें आपलें स्वतःचें आरमार तयार करावें, व त्याच्यावर आपली स्वतःची देखरेख ठेवावी. पण बोर्डनचें म्हणणें याच्या उलट होतें. अशा रीतीनें कानडानें स्वतःचें आरमार ठेवण्याचा निश्चय केल्यास कानडाला आरमारासाठीं भयंकर खर्च सोसावा लागेल, व साम्राज्यांतील आरमाराशीं या आरमाराचा फारसा संबंध येणार नाहीं, असें त्याचें मत होतें. याहि प्रश्नावर खडाजंगी वादविवाद झाला. या प्रसंगीं बोर्डननें भाषण केलें तें फारच महत्वाचें होतें. या भाषणांत बोर्डननें असें प्रतिपादन केलें कीं साम्राज्याच्या आरमारखात्याच्या देखरेखीखालीं कानडानें आपल्या उपयोगासाठीं तीन जहाजें बांधून द्यावीं व तीं वाटेल त्यावेळीं कानडाला साम्राज्यांतील आरमारखात्यानें द्यावीत अशी व्यवस्था करण्यांत यावी; व साम्राज्याच्या आरमारखात्यामध्यें कानडातर्फे एक आरमारी अधिकारी असावा. असा अधिकारी नेमण्याची साम्राज्य सरकारनें परवानगी दिली आहे असेंहि बोर्डननें सांगितलें. या भाषणावर लॉरियरनें बरीच टीका केली. पण या प्रश्नाचा निर्णय लागण्याच्या पूर्वींच महायुद्धाला सुरवात झाल्यामुळें या प्रश्नाला निराळेंच स्वरूप प्राप्त झालें.

महायुद्धः—महायुद्ध सुरू होण्याच्या वेळीं कानडाजवळ सैन्य असें फारसें नव्हतें. फक्त ३००० च कायमचें सैन्य होतें, व तें देखील कानडामधील किल्ल्यांचें संरक्षण करण्याच्या निमित्तानें ठेवण्यांत आलें होतें. महायुद्धाला सुरुवात होतांच कानडानें आपलें सैन्य उभारण्यास जारीनें सुरुवात केली. १९१४ मध्यें कानडानें आपली ३३००० ची पहिली पलटण उभारून ती फ्रान्समध्यें लढाईसाठीं धाडून दिली. १९१५ च्या सप्टेंबरमध्यें दुसरी पलटण उभारली गेली. आणखी दोन पलटणी पुढील वर्षांत उभारण्यांत आल्या. कनेडियन घोडेस्वारांची पलटण तयार होऊन १९१५ त फ्रान्सच्या रणांगणावर चमकली. १९१७।१८ मध्यें सक्तीच्या सैन्यभरतीचा कायदा मंजूर करण्यांत आला, व ८३३५५ रिक्रूट जमविण्यांत आले. अशा रीतीनें महा-

युद्धासाठीं कानडानें आपलें ५९५४४१ सैन्य उभारलें. त्यांपैकीं २१००९६ इतके लोक महायुद्धांत मारले गेले. महायुद्धामध्यें कॅनेडियन सैन्यानें निरनिराळ्या लढायांमध्यें मर्दुमकी गाजविली. कानडानें आपल्या सैन्यांतील जखमी लोकांच्या शुश्रूषेसाठीं व मृतांच्या व्यवस्थेसाठीं फ्रान्स, इंग्लंड इत्यादि राष्ट्रांमध्यें पुष्कळ धर्मार्थ दवाखाने काढले.

महायुद्धाच्या सुरवातीस कानडाजवळ मोठीं लढाऊ जहाजें अशीं दोनच होतीं. पण युद्धानंतर आणखीं कांहीं छोटीं मोठीं जहाजें बांधण्यांत आलीं. पाणबुड्याहि बांधण्यांत आल्या. महायुद्ध संपण्याच्या वेळीं कानडाजवळ चांगलीं पांच जहाजें होतीं व आरमारी सैन्य अधिकारी वगैरे धरून ५००० होते. १९१८ मध्यें कानडानें आपल्या बंदरांचें संरक्षण करण्याकरतां वैमानिक दळहि उभारलें. विद्युत्तारायंत्राचीं स्टेशनें उघडलीं.

कानडाची महायुद्धांत दोस्तांनां अतिशय मदत झाली. या युद्धांत कानडांतील बायकांनींहि प्रामुख्यानें भाग घेतला होता. इंग्लंड, फ्रान्स, इजिप्त, बेल्जम इत्यादि ठिकाणीं सैनिकांनां मदत करण्यासाठीं एकंदर २४०० कॅनेडियन बायका कानडामधून गेल्या. त्यांपैकीं ५५ ते ६० मरण पावल्या. रोग्यांच्या व जखमी लोकांच्या शुश्रूषेंत देखील या बायकांची अतोनात मदत झाली.

महायुद्धांत दोस्त राष्ट्रांनां कानडाचें अतिशय साहाय्य झाल्यामुळें महायुद्धानंतर कानडाला उच्च प्रकारचा दर्जा प्राप्त झाला. साम्राज्याच्या युद्धमंडळांत बोर्डनला जागा मिळाली होती. त्याशिवाय शांततापरिषदेला हजर रहाण्याचा व तहावर सही करण्याचा मानहि कानडास मिळाला. कानडातर्फे स्वतंत्र असा प्रतिनिधी अमेरिकेंत ठेवण्याचा व त्याचे अधिकार पूर्णपणें स्वतंत्र असण्याचा अधिकार कानडाला मिळाला.

महायुद्ध संपल्यानंतर जी कानडामध्यें निवडणूक झाली तींत कानडामधील लिबरल पक्षाचें प्राबल्य झालें. तत्पूर्वी सुद्धां लिबरल पक्षानें आपलें अस्तित्व गाजविण्यास सुरवात केलीच होती. पण १९२१ च्या निवडणुकींत मात्र या पक्षाचे १२१ लोक निवडून आले व कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे अवघे ५१ लोक निवडून आले. अर्थातच लिबरल पक्षाचें मताधिक्य असल्यामुळें अमेरिकेशीं व्यापारी तह कायम करण्याचें काम अगदीं सुलभ झालें.

महायुद्धसमाप्तीनंतर कानडानें आपलें आरमारी धोरण कसें ठेवावें यासंबंधींचा सल्ला देण्याकरतां लार्ड जेलीको यानें कानडाला भेट दिली व आरमारी खात्याची तपासणी करून आपला रिपोर्ट १९२१ सालीं सादर केला. पण याहीपेक्षां अतिशय महत्वाची गोष्ट म्हणजे प्रिन्स ऑफ वेल्स यानें १९१९ सालीं कानडाला भेट दिली ही होय. त्याचें कानडांतील लोकांनीं अत्यंत उत्साहानें स्वागत केलें. ओटावा येथील पॉर्लमेंटच्या नवीन इमारतीची कोनशिला त्याच्या हस्तें बसविण्यांत आली.

म द्य पा ना ची बं दी.—महायुद्ध सुरू होतांच कानडांतील निरनिराळ्या प्रांतांनीं मद्यपानाच्या बंदीचा कायदा पास करून मद्यपानाला आळा घालण्याचा जारीनें प्रयत्न केला. क्विबेकमध्यें १९१८ सालीं मद्यपानबंदीचें बिल पार्लमेंटपुढें येऊन तें मंजूर झालें. पण इ. स. १९१९ मध्यें कांहीं हलक्या जातीची दारू वगैरे सोडून बाकीच्यावर निर्बंध घालण्याचें ठरलें. कांहीं प्रांतांनीं मद्यपानबंदी करण्याऐवजीं मद्यपानावर सरकारी नियंत्रण असावें असें ठरविलें. १९१९ च्या पार्लमेंटच्या बैठकींत कानडांतील कोणत्याहि प्रांताला जरूर वाटल्यास त्या प्रांतानें सर्व मतदारांचें मत घेऊन मद्याची आयात बंद करावी असें ठरलें. त्याप्रमाणें मतें घेतां खालीलप्रमाणें निरनिराळ्या प्रांतांच्या बाबतींत निकाल लागला.

| प्रदेशाचें नांव | मद्यविक्रीला बंदी करा म्हणणारे | मद्यविक्रीला अनुसरणारे |
|---|---|---|
| नोव्हास्कॉशिया | २३८७४ | ८३४२२ |
| मॅनीटोबा | ५५०५६ | ६८८३१ |
| आलबर्टा | ४४३२१ | ६३०१२ |
| सस्काचेवान | ५५२५९ | ८६९४९ |
| ऑंटारियो | ३७३९३८ | ५४०७३ |

कानडामध्यें दारूबंदीचे जे कायदे आहेत ते गरीबांनां अधिक जाचक होतात असें दिसून आलें आहे डॉक्टरांनीं पैसे घेऊन श्रीमंतांनां दारू पिण्यासंबंधींचा दाखला देण्याचा सपाटा सुरु ठेवला होता व त्यामुळें श्रीमंतांनां दारू पिण्यास मिळत असे. १९२०सालच्या दारूबंदीसंबंधींच्या आंकड्यांकडे लक्ष दिलें असतां डॉक्टरांनीं त्यांनां मिळालेल्या अधिकाराचा दुरुपयोग केल्याचें दिसून येतें. १९२३च्या आंकड्यांवरून कानडामध्यें९५००लोक व्यसनी होते असें आढळून आलें आहे. त्यापैकीं क्विबेक व कोलंबिया यांमध्येंच ७३०० लोक होते. १९२३ मध्यें अमेरिका व कानडा यांच्यामध्यें सरहद्दीवरील मुलुखांत दारूबंदीसंबंधानें कोणते उपाय योजण्यांत यावेत यासंबंधीं विचार करण्याकरतां एक बैठक भरली.

इ.स. १९११ पासून १९२१ च्या दरम्यान कानडाचे दोन व्हॉईसरॉय झाले. ते अनुक्रमें ड्यूक ऑफ कॅनॉट व ड्यूक ऑफ डेव्हनशायर होत. त्यानंतर लॉर्ड बिंग हे १९२१ पासून कानडाचे व्हॉईसरॉय झाले.

१९२२ च्या निवडणुकींत उदारमतवादी पक्षाची सरशी झाली. हुजूरपक्षाचे हितसंबंध, कॅनेडियन-पॅसिफिक रेल्वेच्या योजनेंत निगडित झाले असल्यानें त्यांनां संरक्षक व्यापाराचें तत्व मान्य होतें. पण उदारमतवादीपक्ष हा खुल्या व्यापाराला अनुकूल होता. कानडामध्यें स्वतंत्र असा मजूर पक्षच अस्तित्वांत नाहीं. १९२२ पूर्वी पूर्वकानडांतील व्यापारी वर्गाच्या ताब्यांतच राजकीय सत्ता केंद्रीभूत झाली होती.

पण हल्लीं पश्चिम कानडांतील व्यापारी वर्गाकडे ती सत्ता झुकूं लागली आहे असें दिसतें. १९२२ च्या एप्रिल महिन्यांत नवीन संरक्षणखातें निर्माण करून त्याच्या देखरेखीखालीं कानडामधील लष्करी, आरमारी, वैमानिक व इतर प्रकारचेंहि दळ ठेवण्यांत यावें अशा अर्थाचें एक बिल कानडाच्या पार्लमेंटमध्यें चर्चेकरतां आलें.

इ. स. १९२३ सालीं ब्रिटिश साम्राज्यांत कानडाला कोणतें स्थान आहे यासंबंधींची कानडाच्या पार्लमेंटमध्यें बरीच वाटाघाट झाली. १९२२ च्या सप्टेंबरमध्यें ज्यावेळीं आशियामायनरमध्यें लढाई होणार असा रंग दिसूं लागला होता त्यावेळीं ब्रिटिश पार्लमेंटनें कानडाला या भावी युद्धांत मदत करण्याबद्दल विनंति केली होती. त्यावेळीं १९२३ च्या फेब्रुवारींत कॅनेडियन प्रधानानें ब्रिटिश पार्लमेंटला असें कळविलें होतें कीं, साम्राज्यविषयक हितसंबंध कायम ठेवणें जरूर असेल तर साम्राज्यांतील सर्व राष्ट्रांनां निरनिराळ्या साम्राज्यविषयक प्रश्नांत भाग घेण्याला पूर्ण मोकळीक असली पाहिजे. १९२३ च्या एप्रिल महिन्यांत पॅसिफिक किनाऱ्यावरील मासे धरण्याच्या धंद्याच्या संरक्षणासंबंधीं कानडा व अमेरिका यांमध्यें एक तह झाला. हा तह फक्त कानडालाच लागू आहे कीं सर्व ब्रिटिश साम्राज्याला लागू आहे असा प्रश्न उपस्थित झाला. अमेरिकेनें हा तह सर्व ब्रिटिशसाम्राज्याला बंधनकारक आहे असें सांगितलें. अर्थातच कानडा व ब्रिटिशसाम्राज्य यांच्यामधील नातें कशा प्रकारचें आहे याबद्दल पुन्हां एकदां चर्चा सुरू झाली. लासेन येथें जो यूरोपांतील सर्व राष्ट्रांचा तह झाला त्यांत ब्रिटिश साम्राज्यांतील प्रतिनिधींमध्यें कानडातर्फे कोणीहि प्रतिनिधि नव्हता. पण तह झाल्यानंतर वसाहतमंत्र्यानें कानडाच्या प्रधानाला या तहाला संमति कळविण्याविषयीं सांगितलें. तेव्हां अशा तऱ्हेनें कानडाची संमति मिळविणें बरोबर आहे काय असा रोखठोक जबाब कानडाच्या प्रधानानें विचारला. पण याला ब्रिटिश वसाहतमंत्र्याकडून समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं. अद्यापिहि ब्रिटिश साम्राज्याचा व कानडाचा कशा प्रकारें संबंध असावा हें निश्चित झालेलें नाहीं.

कानडांतील बरेचसे रहिवासी अमेरिकेंत रहावयास जात असल्यामुळें कानडांतील लोकवस्तीचें मान कमी होत चालल्याचें दिसून आलें आहे व याला आळा घालण्याकरितां उपाय योजण्याचे कानडा सरकारनें बेत चालविले आहेत. ऑंटारियोमध्यें फ्रेंच व कॅथॉलिक लोक यांच्या विरुद्ध तेथील लोकमत असल्यानें हे लोक अमेरिकेंत रहाण्यास जाऊं लागले आहेत. क्विबेकमध्येंहि हीच स्थिति आहे. शिवाय अमेरिकन मतप्रसारकांनीं अमेरिकेंत पोटखर्च फार थोडा येतो व मजुरी पुष्कळ मिळते अशा प्रकारच्या कंड्या पिकविण्यास सुरुवात केल्यामुळेंहि कानडांतून बरेचसे लोक अमेरिकेंत जाऊं लागले आहेत. मॉंट्रील व इतर प्रांतांतील कारागीर, गवंडी इत्यादि लोक. अमेरिकेंत पुष्कळ मजुरी मिळेल या आशेनें तिकडे जात आहेत. याशिवाय १९१ सालीं मिन्नोइट पंथाचे १५०००० लोक अमेरिकेंत रहावयास गेले असून त्यांनीं १ लक्ष एकर जमीन अमेरिकेंत खरेदी केली आहे. हे लोक परदेशीं जाण्याचें कारण कानडांत मुलावर जी शिक्षणाची सक्ति केली जाते ती होय.

इं ग्र जी वा ङ्म य—हें वसाहतींतील जीवनक्रमाच्या गुणदोषांनीं विशिष्ट असें आहे. जीवनार्थ कलहामुळें विद्या व उच्च संस्कृति या दोन गोष्टींनां वसाहतींत अल्पावकाश असतो. कितीहि स्वतंत्रता असली तरी कानडा देश वसाहत आहे व हीच वस्तुस्थिति तेथील राष्ट्रीय वाङ्मयाच्या निर्मितीच्या आड येणारी आहे. इंग्रजी वाङ्मयाचा एक नवांकुर म्हणून कानडाचें वाङ्मय मानलें जात असलें तरी विषय व रचना या दोन्ही दृष्टींनीं त्यास परोपजीवि म्हणतां येणार नाहीं. तारुण्यांतील उत्साह व स्वातंत्र्याचें तेज हे कानडाचे विशिष्ट गुणहि त्याच्या वाङ्मयांत सांपडतात.

ब्रिटिश अमलापासून पहिल्या कांहीं वर्षांत इतिहासज्ञाला उपयोगी पडणाऱ्या कांहीं राजकीय चोपड्यांशिवाय तेथें फारशी प्रगति झाली नाहीं. सर अलेक्झँडर मॅकेन्झी, डेव्हिड टॉमसन्, अलेक्झांडर हेन्री, व डॅनियल बुइल्यम्स हारमन हे कर्तृत्ववान लोक होते. त्यांनां ग्रंथकार होण्याची हाव नव्हती तथापि त्यांच्या मनोरंजक लेखांचा तद्देशीय वाङ्मयांत प्रामुख्यानें अन्तर्भाव होतो.

कॅनेडियन इतिहासामध्यें मोठें ऐतिहासिक कार्य करण्याची बुद्धिमत्ता नाहीं व ऐतिहासिक दृष्टीहि नाहीं. अतिपरिचयामुळें त्यांनां वस्तूंचें खरें यथादर्शन होत नाहीं. भावी इतिहासज्ञांकरितां त्यांच्या जवळ साहित्य मात्र विपुल आहे. रॉबर्टख्राइस्टच्या 'हिस्टरी ऑफ लोअर कॅनडा १८४८–१८५४' या पुस्तकांत ब्रिटिश अंमलाचें वर्णन आहे. बुइल्यम किंगजफोर्ड यानें दहा विभागांत कॅनडाचा मूळापासून वृत्तांत देऊन १८४१ च्या यूनिअनची हकीकत दिली आहे. 'लास्ट फॉर्टी इयर्स' या पुस्तकांत जे. सी. डेंटनें किंग्जफोर्डचें कामच पुढें चालू केलें आहे. टॉमस चँडलर, हॅलिबर्टन वांएमिश मुरडॉक व जेम्स हॅने यांनीं समुद्राजवळच्या प्रांतांचा इतिहास लिहिला आहे. अलेक्झँडर बेगनें पश्चिम कानडाचा वृत्तांत लिहिला आहे. पार्लमेंटरी राज्यकारभारासंबंधीं आल्फीयस टॉडचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

चरित्रासंबंधीं पाहिलें तर तीं मुख्यतः राजकीय विषयालाच वाहिलेलीं दिसतात. जोसेफ पोपकृत 'मेमॉयर्स ऑफ सर जान मॅकडोनाल्ड,' सुळरकृत 'फ्रॉन्टेनॅक्,' सरजॉन बोरिनॉटकृत 'लॉर्ड एल्जिन,' डी. सी. स्कॉटकृत 'जॉन ग्रेव्हज् सिमको,' जे. डब्ल्यू. लॉंगलेकृत 'जोसेफ हौ' इत्यादि अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

कानडामध्यें श्रेष्ठ दर्जाचे कवी झाले नाहींत. तथापि लँपमन, कॅम्बेल, रॉबर्ट्स व कारमन यांची कविता चांगली

आहे. लँपमनच्या कृतींत महाकाव्याच्या गुणांपेक्षां कळकळ, पावित्र्य व उत्कटता इत्यादि व्यक्तिविषयक गुणच जास्त दिसून येतात. कॅम्बेलमध्यें नाट्याबद्दल उत्साह दिसून येतो. चतुर्दशपदी रचणें व भावनोद्दीपक स्फुट काव्य करणें हा रॉबर्ट्सचा विशेष होय. कारमन हा पोवाडे रचीत असे; व त्याचा साधेपणा व भाषाशैली पाहून मॅथ्यू अरनोल्ड-सारखा टीकाकारहि खुष झाला होता. चार्लस हेव्हीसेजचें एक नाटकहि तारीफ करण्यासारखें आहे. ड्रमंडच्या साध्या व विनोदोत्पादक कृतीस चित्रकाव्य असें सार्थ नांव देतां येईल.

१८१२ च्या लढाईविषयीं लिहिलेली 'वाकोउस्टा' नांवाची जॉन रिचर्ड्सनची कादंबरी हीच पहिली व अस्सल कॅनेडियन नवलकथा होय. कानडाच्या ऐतिहासिक प्रसंगावर त्यानें सुमारें सहा कादंबऱ्या लिहिल्या आहेत. सुसान्ना मूडी व कॅथेराइन पारट्रेल यांनीं नियतकालिकांमधून आपल्या नवलकथा प्रसिद्ध केल्या. जेम्स डी मिल्ले यानें तीस कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांपैकीं 'हेलेनाज हाउसहोल्ड' ही उत्तम आहे. डी मिल्ले कृत 'ए स्ट्रेंज मॅनस्क्रिप्ट फाउंड इन् ए कॉपर सिलिंडर' यांत संपत्तीपेक्षां दारिद्र्य श्रेष्ठ दर्जाचें ठरविलें आहे. सर गिल्बर्ट पार्कर हा समकालीन कादंबरी-कारांत पहिला मानला जात असे. साराजिॲनेट डंकन राल्फ कॉनॉर, ॲग्निस सॉलॅट, फ्रेझर व सिटान वगैरे नवलकथा-कार प्रसिद्ध आहेत. 'क्लॉकमेकर' 'दि ओल्ड जज्ज', "दि अटॅची,' 'नेचर अँड ह्यूमननेचर,' इत्यादि नवलकथा, टॉमस चँडलर हॅलिबर्टन यानें लिहिल्या असून 'माय अंकल टोबी' व 'पिकविक' हीं पुस्तकें लिहिणाऱ्याच्या बरोबरीचा विनोदी लेखक म्हणून तो प्रसिद्ध आहे. त्याच्या ग्रंथांत वसाहतींतील जीवितक्रमाचें प्रतिबिंब पहावयास सांपडतें. त्याला मनुष्यस्वभावाचें पूर्ण ज्ञान असून त्याचीं पात्रें सजीव भासतात.

फ्रेंच वाङ्मय.—याचें विसाव्या शतकाच्या आरंभीं वर्णन थोडक्यांत करावयाचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं, तें मागील दोन पिढ्यांचें संपूर्ण कार्य आहे. कॅनेडियन जीवितक्रमांतील कल्पनासृष्टीचें सर्व सामर्थ्य लौकिक कथेंत आहे व ती तर मूळ फ्रेंचांकडूनच त्यांनां मिळाली. त्या कथेचें सारसर्वस्व म्हणजे गाणीं हींच होत. जात्यभिमान हा फ्रेंच कॅनेडियन वाङ्मयाचा विशेष होय. व तो त्यांच्या राजकारणांत अगदीं बद्धमूल होऊन बसला आहे. १८४५ त फ्रँकोइस झेगिअर गारनेऊ कृत 'कानडाचा इतिहास' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. या पुस्तकांतील फाजील जात्याभिमानामुळें विश्वसनीय इतिहास म्हणून त्यास किंमत देतां येणार नाहीं. ए. जेरिन् लाजोइ या ग्रंथकाराचें 'जी अन रिव्हार्ड' हें पुस्तक एक गद्य लावणी म्हणून प्रसिद्ध आहे. 'लेस ॲनासएन्स कॅनेडिअन्स' नांवाची ऐतिहासिक नवलकथा फिलिप डी गॅसपे यानें लिहिली आहे. या कथेंत विषयांतर बरेंच असलें तरी सर्व कॅनेडियन जीवितक्रम त्यांत प्रतिबिंबित झाला आहे. ऑक्टेव्ह क्रेमेझी हा एक राष्ट्रीय कवी असून त्याच्या काव्यांत उत्कट देशप्रीति दिसून येते. ॲबे फरलंड हा एक उत्साही संपादक व इतिहासज्ञ होऊन गेला. पहिला कॅनेडियन तत्वज्ञ म्हणजे इटायने पॅरेंट हा होय. ॲबे कासग्रेन यानें 'पेलेरिनेज यूपेज डी इव्हँजेलाइन' 'मॉटकाम एट लेव्हिस' वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. 'हिस्टरी डेस कॅनेडियन्स लेव्हिस' हा विस्तृत ग्रंथ बेंजामिन सुल्ट यानें लिहिला. फ्रेंच कॅनेडियन लोकांनां वक्तृत्वाची फार आवड असून सर वुइलफ्रिड लाउरिअर याचें नांव या विषयासंबंधीं प्रसिद्ध आहे.

वाउव्हेऊ, लुईफिसेट, अडॉल्फ, पायसन हे कवी म्हणून प्रसिद्ध आहेत. परंतु कानडाबाहेर नांव मिळविलेला कवि म्हणजे लुइ फ्रेचेट हाच होय. त्याच्या कृतींत उत्कट देशाभिमान व काव्यदृष्ट्या रसभंग करणारें वक्तृत्व असे गुणदोष आढळतात. शब्दसंपत्ति, यमकनैपुण्य, कल्पनास्वातंत्र्य स्वभावगत भाषाशैली, स्वजनासंबंधीं सूक्ष्मदृष्टि व तारुण्याची तेजस्विता इत्यादि गुण त्याच्या काव्यांत स्फुरित झाल्यामुळें त्याची जगांत महाकवि म्हणून कीर्ति झाली आहे. कॅनेडियन नाटकें फारशीं उपलब्ध नाहींत. एफ्. सी. मरचँडनें कांहीं चांगलीं नाटकें रचलीं आहेत. त्यांच्या वाङ्मयांत कादंबऱ्याहि फारशा झालेल्या नाहींत. 'एल ओयूब्ली' नांवाची एक कादंबरी मॅडेनी कोनन हिनें लिहिली आहे. डॉ. चोकेटचा 'लेसरिवॉर्ड' हा ग्रंथ एक नाटकी कथा म्हणून प्रसिद्ध असून त्यांत लेखकाची कलात्मक मुग्धता दिसून येते.

युद्धोत्तर वाङ्मय.—इ. स. १९१० ते १९२१ च्या दरम्यानच्या कॅनेडियन वाङ्मयाचे स्थूलमानानें तीन भाग पडतात. (१) युद्धपूर्व वाङ्मय, (२) युद्धकालीन वाङ्मय, (३) व युद्धोत्तर वाङ्मय. १९१०–१४ या कालांतील वाङ्मयांत मुख्यत्वेंकरून कानडाच्या त्यावेळच्या परिस्थितीचें प्रतिबिंब दृष्टीस पडतें. या अवधींत कानडामध्यें पूर्णपणें राष्ट्रीय जागृति उत्पन्न झाली होती. ज्ञानाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत कानडानें भाग घेण्यास सुरवात केली होती; राष्ट्र आशावादी बनत चाललें होतें. अशा स्थितींत जें वाङ्मय उत्पन्न होणार तें या सर्व गुणांचें दर्शकच होणार यांत नवल नाहीं. हीच स्थिति युद्धकालीन वाङ्मयाची व युद्धोत्तर वाङ्मयाची व्हावी हेंहि साहजिकच होय. युद्धकालीन प्रत्येक ग्रंथांत युद्धासंबंधींच्या परिस्थितीचें प्रतिबिंब दृष्टिगोचर होत होतें. व युद्धोत्तर वाङ्मयांत, राष्ट्रीय पुनर्घटनेचें व नवीन नवीन विचारांचें प्रतिबिंब दिसून येत आहे.

युद्धपूर्व वाङ्मयांत १९१०–१४च्या अवधींत, डॉ. डॉटी व डॉ. शार्ट यांनीं संपादित केलेल्या कानडाच्या इतिहासग्रंथांची अमूल्य भर पडली. या इतिहासग्रंथाचे २३ भाग असून त्यांमध्यें कानडाच्या इतिहासाची व आर्थिक प्रश्नांची पूर्ण चर्चा आढळून येते. त्याच्या खालोखाल महत्वाचा ग्रंथ म्हणजे जॉर्ज रॉंग, व लँग्टन यांच्या देखरेखीखालीं ३२ भागांत

प्रकाशित झालेला "क्रॉनिकल्स ऑफ कानडा" हा ग्रंथ होय. या ग्रंथाचा प्रत्येक भाग त्यावेळच्या नामांकित झालेल्या विद्वानांनीं लिहिला आहे. १९११ मध्यें "मेकर्स ऑफ कॅनडा" या मालेचा शेवटचा भाग 'इंडेक्स अँड डिक्शनरी ऑफ कॅनेडियन हिस्टरी' हा बाहेर पडला.

याशिवाय किरकोळ वाङ्मय पुष्कळच बाहेर पडलें. प्रसिद्ध कॅनेडियन व्यक्तींचीं चरित्रें व आत्मवृत्तें बाहेर पडलीं. ह्याशिवाय महत्वाचीं पुस्तकें म्हटलीं म्हणजे अॅथ-र्टनचें मॉंट्रील ( १५३५-१९१४ ), जॉन रॉस रॉबर्टसन -लँडमार्क्स ऑफ टोरोंटो ( १९१४ ), आलिव्हर-दि कॅने-डियन नॉर्थवेस्ट( १९१४ ), व अॅटी अँड आॅर्थर-डॉक्यु-मेंट्स रिलेटिंग टु दि कॉन्स्टिट्यूशनल हिस्ट्री ऑफ कॅनडा हे होत. प्रवासात्मक व वर्णनात्मक ग्रंथ म्हणजे कोल्मन-दि कॅनेडियन रॉकीज ( १९११ ), सेटन-आर्टिक प्रेअरीज ( १९११ ), डी कँपबेल-कॅनेडियन लेकरीजन ( १९१० ), शेल्डन—विल्डरनेस ऑफ दि अपर युकॉन (१९११) हे होत. राजकीय व अर्थशास्त्रविषयक महत्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे डॉवर्टे-दि किंगडम् पेपर्स ( १९१४ ), पीटर्सन-कॅनडियन एसेज अँड अॅड्रेसेस ( १९१५ ), फॉस्टर्स-कॅनेडियन अॅड्रे-सेस, रॉबिन्सन-कॅनडा अँड कॅनेडियन डिफेन्स, इत्यादि होत. काल्पनिक पद्यवाङ्मयांत नांव घेण्यासारखे ग्रंथ म्हणजे-बुइल्यम कँपबेल-सॉंग्ज ऑफ व्हास्टर, ब्रिटन मार्जोरी पिक्थाल-ड्रिफ्ट ऑफ फिनियन्स ( १९१३ ), ड्रमंड-पोएटिकल वर्क्स. स्ट्रिजर-ओपन वॉटर ( १९१४ ); काल्पनिक गद्य वाङ्मयांत महत्वाचे ग्रंथ म्हणजे—मॉंटगोमरी रॉबर्टस, डंकन, गॉर्डन इत्यादि विद्वान लेखकांचे ग्रंथ होत.

युद्धकालीन वाङ्मयांत पुष्कळ ग्रंथ नांव घेण्यासारखे निर्माण झाले. त्यांपैकी अत्यंत महत्वाचा ग्रंथ म्हणजे, कर्नल वुइल्यम ए विशपकृत "वुइंगेड वॉरफेअर" हा होय. याशिवाय जॉर्ज नॅास्मिथ—ऑन दि फ्रिंज ऑफ दि ग्रेट फाइट ( १९१७ ), करी-फ्रॉम दि सेंट लॉरेन्स टु दि इसेर ( १९१७ ), वेल्स-फर्स्ट कॅनेडियन्स इन फ्रान्स हेंहि महत्वाचे ग्रंथ आहेत. युद्धसंबंधींची कानडाची काय कामगिरी आहे त्यासंबंधीं विश्वसनीय बातमी देण्याची कामगिरी 'कॅनडा इन दि वर्ल्ड वॉर,' या ६ भागी ग्रंथानें केली. याशिवाय 'कॅनडा इन फ्लँडर्स, या पुस्तकमालेनेंहि चांगली कामगिरी बजावली. याशिवाय युद्धाची माहिती असणारे पुष्कळ ग्रंथ निर्माण झाले.

युद्धोत्तर वाङ्मयांत विशेष नांव घेण्याजोगे ग्रंथ म्हणजे रॉबर्ट फाल्कनेर-आयडियालिझम इन दि नॅशनल कॅरेक्टर (१९२०), जे एल मॉरीसन-ब्रिटिश सुप्रीमसी अँड कॅने-डियन सेल्फगव्हर्नमेंट; मकेन्झी किंग-इंडस्ट्री अँड ह्यूमॅनिटी मॅकइव्हर-लेबर्स इन दि चेंजिंग वर्ल्ड; गुड्स-प्रॉडक्शन अँड टॅक्सेशन इन कानडा इत्यादि होत. इतिहास व चरित्र-ग्रंथ यांतील प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे-मॅकलेनन-सल्कफर्स वर्क इन कानडा (१९१६), रिड्ले—ओल्ड प्रॉव्हिन्स टेल्स (१९२०), प्रो. स्केल्टन-दि कॅनेडियन डोमिनियन (१९१९).

ह्या वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठीं पुष्कळ संस्था कानडामध्यें प्रयत्न करीत होत्या. त्यांत अत्यंत महत्वाच्या म्हटल्या म्हणजे डोमिनियन अर्कोइव्हज, दि रॉयल सोसायटी ऑफ कॅनडा, दि चँप्लेन सोसायटी इत्यादि संस्था होत. याशिवाय युनिव्हर्सिटी मॅगेझाईन व कॅनेडियन हिस्टॉरिकल रिव्ह्यू या मासिकांनींहि बहुमोल मदत केली. याशिवाय युद्धोतर वाङ्मयांत, बूले-सॉंग्ज फ्रॉम ए यंग मॅन्स लँड (१९१७), जॉन मॅक्रे-इन फ्लँडर्स फील्ड्स, लाईड रावर्ट्स पोएम्स (१९१९), डंकनस्कॉट्स-लँडी लेन अँड अदर पोएम्स, ट्राटर्स-कॅनेडियन ट्वायलाइट इत्यादि होत. विनोदी लेखकांत स्टीफन्स लीकॉक याचें नांव सर्व युरोपांत प्रसिद्ध आहे.

युद्धोत्तर फ्रेंच वाङ्मय.—१९१०-१९२१ या सालांच्या अवधींत फ्रेंच कॅनेडियन ग्रंथकारांनींहि वाङ्मयांत पुष्कळच भर घातली. या कामांत हेन्री बोरासा याच्या संपादकत्वाखालीं चाललेल्या 'डेव्हायर' या मासिकानें बहुमोल कामगिरी केली. याशिवाय, लॉ रेव्ह्यू मॉडर्ने, लॉ रेव्ह्यू ट्रिमेस्ट्रिले यांनीं चांगली कामगिरी बजावली. इस्टवार डू कॅनडा; कोर्स हिस्टोरे, व कोर्स हिस्टोयरे डु कॅनडा इत्यादि इतिहासावरील ग्रंथहि उत्कृष्ट निर्माण झाले. 'लौकिक कथा' संबंधींचेहि दोन तीन सुंदर असे ग्रंथ बाहेर पडले. फ्रेंच कॅनेडियन नाटकें अद्यापि अव्वल दर्जाचीं बाहेर पडली नव्हतीं; पण कांहीं कांहीं नाटककारांच्या भाषेवरून नाट्यलेखनालाहि चांगलीच स्थिति येईल असें वाटण्याला जागा होती.

[ संदर्भ ग्रंथ.-स्टॅटिस्टिकल ईयरबुक ऑफ कॅनडा. ऑफिशिअल हँडबुक ऑफ दि डोमिनियन ऑफ कॅनडा. हॉप्किन्स-कॅनडा (६ खंडांचा ज्ञानकोश ). मॉर्गन-कॅनेडियन अॅन्युअल रजिस्टर. रिव्ह्यू ऑफ हिस्टॉरिकल पाब्लिकेशन्स रिलेटिंग टु कॅनडा ( युनिव्हर्सिटी ऑफ टोरांटो ). अॅडाम्स-आउटलाइन हिस्टरी ऑफ कॅनेडियन लिटरेचर. मॅकमुर्डी-हँडबुक ऑफ कॅनेडियन लिटरेचर. 'लिटरेचर ऑफ अमेरिकन हिस्टरी' या ग्रंथांत कानडाच्या इतिहासावरचे उत्तम संदर्भग्रंथ सांपडतील. स्टेट्समन्स ईयरबुकांत प्रादेशिक माहितीसंबंधीं ग्रंथाची मोठी याद 'कॅनडा' या प्रकरणांत आहे तीहि उपयुक्त वाटेल. ].

**कानडा उत्तर.**—मुंबई इलाखा. दक्षिण भागांतील एक जिल्हा. उ. अ. १३° ५३' ते १५° ५२', व पू. रे. ७४° ४' ते ७५° ५' व क्षेत्रफळ ३९४५ चौरस मैल.

उत्तरेस बेळगांव जिल्हा; पूर्वेस धारवाड जिल्हा व म्हैसूरचें संस्थान; दक्षिणेस मद्रास इलाख्यांतील दक्षिण कानडा जिल्हा. पश्चिमेस अरबी समुद्र; वायव्येस गोंवें ( पोर्तुगीजांचा मुलूख ) प्रांत. मुंबई इलाख्यांतील हा दक्षिणेकडील जिल्हा होय. सुमारें २५०० ते ३००० फूट उंचीची सह्याद्रि पर्वताची ओळ या जिल्ह्यांतून उत्तरदक्षिण पसरलेली आहे. व त्यामुळें या जिल्ह्याचे दोन भाग झाले आहेत. एकाचें नांव बालाघाट

असून त्याचें क्षेत्रफळ २६३९ चौरस मैल आहे. दुसऱ्याचें नांव पायनघाट असें असून त्याचें क्षेत्रफळ १३०६ चौरस मैल आहे. ७६ मैल लांबीच्या किनाऱ्यांत पुष्कळ लहान लहान नद्या समुद्रास मिळाल्यामुळें समुद्राच्या भरतीचें पाणी त्या नद्यांतून या जिल्ह्यांत बरेंच दूरवर जातें. किनारा पुष्कळ ठिकाणीं रेताड आहे. तथापि कांहीं ठिकाणीं तो खडकाळ असलेलाहि आढळतो. किनाऱ्यावर व खाड्यांच्या कांठालगत नारळाच्या बागा असून त्याच्या थोडें आंत गेलें म्हणजे भातशेतीची सपाट व अरुंद अशी जमीन लागते. किनाऱ्यापासून आंत १५ मैलांपेक्षां जास्त सपाटीची जमीन लागत नाहीं. किनाऱ्यावरील नारळाच्या बागा व आंत डोंगरांतील बाराहि महिने असणारें हिरवें गार जंगल यांमुळें या जिल्ह्यांतील वनश्रीची शोभा फारच सुंदर आहे. रेल्वेच्या अभावीं या जिल्ह्यांतील बहुतेक सर्व भाग कोणी प्रवासी पहाण्यास जात नाहींत.

सह्याद्रि पर्वताच्या पठारावर दोन दिशेकडे वहाणाऱ्या नद्या सांपडतात. कांहीं पश्चिमेकडे वहात जाऊन अरबी समुद्रास मिळतात व कांहीं पूर्वेकडे वहात जाऊन बंगालच्या उपसागरास मिळतात. यांपैकीं या जिल्ह्यांत वहाणाऱ्या मुख्य नद्या म्हटल्या म्हणजे उत्तरेकडे काळी नदी,मध्यभागांत गंगावली आणि ताद्री व दक्षिणेकडे शरावती या नद्या होत. शरावती नदी होनावरच्या पूर्वेस ३५ मैलांवर ८२५ फूट उंचीच्या कड्यावरून उडी घेते. हा धबधबा गिरसप्पाचा धबधबा म्हणून प्रसिद्ध आहे.किनाऱ्यावर पाणी चांगलें असून पाणीपुरवठा भरपूर आहे.

ग्रनाइट आणि ट्रॅप हे मुख्य खडक या भागांत आढळतात. ग्रनाइट डोंगराच्या पायथ्याशीं लॅटॅराइट सांपडतो. हा दगड इमारतीच्या कामास फार उपयोगी आहे.

या जिल्ह्यांत जंगल विपुल आहे. सागवान, बांबू वगैरेंचीं जंगलें आहेत. कारवार, कुमठा, अकोला आणि होनावर या भागांत दारू (माडी) नारळाच्या झाडापासून काढतात.

या भागांत वन्य प्राणी देखील पुष्कळ आहेत. किंबहुना सबंध मुंबई इलाख्यांत या बाबतींत याच्या तोडीचा दुसरा जिल्हा नाहीं असें म्हटलें तरी चालेल. वाघ, चित्ते, अस्वलें, विवट, हरणें वगैरे वन्य प्राणी या जिल्ह्यांत विपुल आहेत.

किनाऱ्यावरील हवा जरी दमट आहे तरी ती निरोगी आहे. परंतु जंगलांतील हवा अतिशय हिंवतापकारक असून विशेषतः पावसाळ्याच्या प्रारंभीं दोन महिने व हिंवाळ्याच्या चार महिन्यांत हिंवतापाचा जोर या भागांत फार असतो. हिंवाळ्यांत उष्णमान ५९° अंश व उन्हाळ्यांत ९१° अंशांपर्यंत असतें. पाऊस जास्त पडतो.कारवार येथें सरासरी ११९ इंच पाऊस पडतो.

किनाऱ्यावर पाऊस फार पडत असल्यामुळें व समुद्र त्यावेळीं खवळत असल्यामुळें तेथें कधीं कधीं पूर येऊन पिकांचें नुकसान होतें.

इतिहास.—ख्रिस्ती शकापूर्वी तिसऱ्या शतकांत अशोकानें बनवासी येथें बौद्ध धर्माचे प्रचारक पाठविले होते. या भागांत पुष्कळ शिलालेख सांपडले आहेत त्यांवरून हा भाग निरनिराळ्या काळीं बनवासीचे कदंब, रट्ट, पश्चिमेकडील चालुक्य व यादव या राजांकडे होता असें दिसतें. जैन धर्माचें हें बरींच वर्षें अभेद्य स्थान होतें. सोळाव्या शतकांत ज्यावेळीं पोर्तुगिज लोकांनीं आपली सत्ता किनाऱ्यावर प्रस्थापित केली त्यावेळीं हा भाग विजयानगर राज्यांत होता.तेव्हां हा फार सधन व भरभराटींत असून दक्षिणेकडील मुसुलमान सुभेदारांच्या स्वाऱ्यांस यानें पुष्कळ वर्षें जुमानलें नाहीं. इ. स. १५६५ सालीं तालीकोटच्या लढाईंत विजयानगरचा समूळ नाश झाला व तें राज्य लयास गेलें. त्यावेळीं येथील विजयानगरचे मांडलिक संस्थानिक स्वतंत्र बनले. मुसुलमानांनीं पोर्तुगीजांच्या किनाऱ्यावरील वसाहतींवर स्वाऱ्या केल्या. परंतु त्यांस विजय मिळाला नाहीं. तरी या भागावर हळूहळू विजापूरकरांचा पगडा बसला. इ. स. १६७५ च्या सुमारास मराठ्यांचा ताबा या भागावर होता. परंतु औरंगझेबाचा मोर्चा या भागावर फिरला व विजापूर पादशाही इ. स. १६८६ सालीं नष्ट झाल्यावर हा भाग मोंगलाकडे आला,व सोंड आणि बेदनूरच्या राजांकडून औरंगझेबानें खंडणी वसूल केली. इ. स. १७०० नंतर मराठ्यांनीं पुनः कानड्यावर आपला ताबा बसविला. इ. स. १७६३ सालीं हैदरअल्लीनें बेदनूरवर हल्ला करून तेथें अपरिमित लूट मिळविली. सोंड संस्थान व किनाऱ्यावरील प्रदेशहि त्यानें जिंकले. त्यामुळें हैदर व मराठे समोरासमोर आले. परंतु हैदरअल्लीनें कृष्णा नदीपर्यंत मुलुख काबीज केला. ब्रिटिशांशीं लढाई सुरू असतांना टिपूनें इ. स. १७८३ सालीं होनावर गमावलें. श्रीरंगपट्टण येथें टिपूचा पराजय होऊन तो स्वतः मरण पावल्यावर ब्रिटिशांनीं इ. स. १७९९ सालीं सोंड खालसा केलें. सोंड संस्थानांत त्या वेळीं घाटमाथ्यावरील कानड्याच्या प्रदेशाचा अंतर्भाव झाला होता. वेळोवेळीं झालेल्या लढायांमुळें व लुटालुटींमुळें सर्व प्रदेश निर्जन व ओसाड झालेला होता. हा प्रदेश व हैदराकडून जिंकलेला किनाऱ्यावरील मुलूख मद्रास इलाख्यास इ. स. १७९९ सालीं जोडला. इ. स. १८६१ पर्यंत हा भाग त्याच इलाख्यांत होता. परंतु त्या सालीं या भागाचा मुंबई इलाख्याशीं फार संबंध येत असल्यामुळें हा भाग मुंबई इलाख्यांत सामील केला.

बनवासी, गिरसप्पा आणि भटकळ येथील जुनीं जैन देवळें पाहण्यासारखीं आहेत. बनवासी येथील देऊळ जखनाचार्यानें बांधलें असें म्हणतात. या आवारांत एक सुटी शिला असून तीवर दुसऱ्या शतकांतील एक लेख आहे. गिरसप्पाजवळ नगरबस्तिकेर येथें कांहीं जैन देवळें आहेत. गोकर्ण येथील हिंदु देवालयें पंधराव्या शतकांतील आहेत. भटकळ, बनवासी आणि गिरसाप्पा येथें बरेच शिलालेख सांपडले आहेत.

सुपा पेटयांत उळवी येथें कांहीं लिंगायत लेणीं असून लिंगासाधु बसवाची एक विहीर आहे. लोकसंख्या (१९२१) ४०१५२७. या जिल्ह्यांत ८ गांवें व १२८१ खेडीं आहेत.

जिल्ह्याचें मुख्य ठिकाण कारवार असून कुमठा, भटकळ, होनावर आणि शिरसी हीं प्रमुख गांवें होत. या जिल्ह्यांत शेंकडा ५७ लोक कानडी भाषा वोलतात.

पूर्वी या भागांत पोर्तुगीज लोकांनीं पुष्कळ लोकांनां ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली होती. इ. स. १७८४ च्या सुमारास त्यावेळीं ख्रिस्ती लोकांची सुमारें ८०००० वस्ती होती असें म्हणतात. त्या वर्षी टिपू सुलतानानें ब्रिटिशांस कानडयामधून हांकून लावलें व त्यानें राजकीय व धार्मिक दृष्ट्या विचार करून सर्व ख्रिस्ती लोकांस इस्लामी धर्माची दीक्षा देण्याचा निश्चय केला. त्या वेळीं या भागांतील सर्व ख्रिस्ती देवळांचा नाश करून ख्रिस्ती धर्माचें दृश्य रूप या भागांत यत्किंचितहि ठेवलें नाहीं. पंगु, स्त्रिया व मुलें यांखेरीज सर्वांस [सुमारें ६००००] वंदीवान करून त्यानें श्रीरंगपट्टणास नेलें. येथें पुरुषांची सुंता केली. अविवाहित तरुण मुलींस पुष्कळांनीं रखेल्या म्हणून नेल्या व पुष्कळ विवाहित स्त्रियांचा फार छळ करण्यांत आला. त्या वर्षी सुमारें १०००० माणसें टिपूनें केलेल्या छळामुळें प्राणांस मुकलीं असें म्हणतात.

मुख्य पिकें—भात, नाचणी, मूग, उडीद इत्यादि. किनाऱ्यावर नारळ, सुपारी यांच्या बागा आहेत. विडयाच्या पानांचेहि वरेच मळे आहेत. गुरांची अवलाद हलक्या प्रतीची आहे.

या भागांत जंगल विपुल आहे. एकंदर ३२६२ चौरस मैल जंगल असून त्यापैकीं ५४८ चौरस मैल संरक्षित आहे. या जंगलांत सांपडणारीं मुख्य झाडें खैर, हेदु, शिरस, धावडा, काजु, मोह, फणस, उंडी, शिसव, अवनुस, जांभुळ नांदरुक, एरंड, नाणा, आंबा, चंदन, चिंच, साग, हिरडा, इत्यादि. इ.स. १९०३–४ सालीं जंगलापासून ९ लाखांवर उत्पन्न झालें होतें. कुमठा व बनवासी येथें चंदनावर खोदकाम करणारे कारागीर आहेत. अंकोला तालुक्यांत मिठागरें आहेत. ख्रिस्ती शकाच्या पूर्वीपासून भटकळ आणि होनावर हीं बंदरें लोकांस माहित आहेत. पंधराव्या आणि सोळाव्या शतकांत हीं फार महत्वाचीं होतीं. हल्लीं कारवार, कुमठा, अंकोला, होनावर आणि भटकळ हीं बंदरें प्रमुख आहेत. या बंदरांतून इ. स. १९०३–४ सालीं एकंदर उलाढाल ६१ लाखांची झाली. तेथून तांदुळ, इमारतीचें लांकूड, नारळ व मसाल्याचे जिन्नस वाहेर जातात. सदर्न मराठा रेल्वे या जिल्ह्याच्या वायव्य भागांतून जाते. येथें पावसाळा नियमित असल्याकारणानें कधीं दुष्काळ पडत नाहीं. या जिल्ह्यांत आठ तालुके आहेत ते अंकोला, होनावर, कारवार, कुमठा, सिद्दापुर, शिरसी, हल्याळ आणि येल्लापुर हे होत. जिल्हाधिकारी कलेक्टर आहे.

या जिल्ह्यांत सहा म्युनिसिपालिटया आहेत. त्यांची नांवें: कारवार, कुमठा, शिरसी, हल्याळ, होनावर आणि भटकळ यांशिवाय गोकर्ण व उळवी येथें हंगामी म्युनिसिपालिटया आहेत.

**कानडा दक्षिण**—मद्रास इलाख्यांतील उत्तरेकडचा एक जिल्हा. उत्तरअक्षांश १२° ७' ते १३° ५९' व पूर्व रेखांश ७४° ३४' ते ७५° ४५'. क्षेत्रफळ ४०२१ चौरस मैल. दख्खनच्या दक्षिणभागांत ज्या ठिकाणीं काळी जमीन आहे त्या भागास कन्नड (काळा प्रदेश) असें कानडी भाषेंतील नांव आहे. उत्तरेस मुंबई इलाखा; पूर्वेस म्हैसूर आणि कूर्ग; दक्षिणेस कूर्ग आणि मलवार; पश्चिमेस अरबी समुद्र ह्या मर्यादा होत.

परशुरामानें समुद्रापासून ही जमीन मिळविली अशी दंतकथा आहे. भूस्तरशास्त्रदृष्टया देखील या भागावर पूर्वी समुद्र होता असें स्पष्ट दिसतें. या भागांत नद्या पुष्कळ आहेत परंतु त्यांची लांबी फार नाहीं. पावसाळ्यांत या नद्यांनां पूर येतो. परंतु उन्हाळ्यांत त्या जवळ जवळ कोरड्याच पडतात. भूस्तरशास्त्रदृष्टया या भागाची योग्य पहाणी अद्यापि झाली नाहीं. पावसाची सरासरी १४५ इंच आहे. नारळ, सुपारी, आंबे, फणस हीं झाडें विपुल आहेत. विड्याचीं पानें, केळीं, हळद, मिरच्या वगैरे वागाइती पिकें या भागांत होतात.

वन्य प्राणी.—वाघ, चित्ता, गवा, सांवर इत्यादि. येथील हवा दमट असते. उन्हाळ्यांत नेहमीं हिंवतापाची सांथ उद्भवते. पाऊस जरी पुष्कळ पडतो तरी नद्यांचीं पात्रें खोल असल्यामुळें या जिल्ह्यांत पुरानें फारसें नुकसान होत नाहीं.

इतिहास.—दक्षिण कानड्याचा पूर्वेतिहास फारसा उपलब्ध नाहीं. कांचीच्या पल्लवांच्या राज्यांत हा भाग मोडत होता असें शिलालेखांवरून दिसतें. कांची हें अर्वाचीन चिंगलपूट जिल्ह्यांतील कांजीवरम् होय. या पल्लवांची राजधानी वातापी मुंबई इलाख्यांतील विजापुर जिल्ह्यांतील वदामी नांवाचें शहर होतें. यानंतर उत्तर कानड्यांतील वनवासी येथील कदंबांचें राज्य या भागावर होतें. सहाव्या शतकाच्या सुमारास चालुक्यांचा अंमल सुरू झाला. आठव्या शतकांत कदंब राजा मयूरवर्मा यानें चालुक्यांस या भागांतून हांकलून दिलें. याच्या वंशजांनीं राष्ट्रकूट व नंतर कल्याणीचे पश्चिमेकडील चालुक्य यांचे मांडलिक म्हणून राज्य केलें असें दिसतें. वाराव्या शतकाच्या सुमारास द्वारसमुद्राच्या–म्हैसुरांतील अर्वाचीन हळेविड–होयसल बल्लाळांनीं हा प्रदेश पादाक्रांत केला. परंतु यांच्यांत आणि देवगिरी–निजाम राज्यांतील दौलतावाद–येथील यादवांच्या मध्यें आपसांत सारख्या लढाया होत असत. पुढें चवदाव्या शतकांत मुसुलमानांनीं या होयसल बल्लाळांची व यादवांची सत्ता उलथून पाडली. त्यावेळीं त्या भागांतील स्थानिक राजे बहुतांशीं स्वतंत्र झाले. चौदाव्या शतकाच्या पूर्वार्धांत हा जिल्हा विजयानगरच्या राज्यांत होता. पंधराव्या शतकांत पोर्तुगीज लोक पश्चिम किनाऱ्यावर वसाहत करूं लागले. व इ. स. १४९८ सालीं वास्को डि गामा हा उडिपिपासून कांहीं

अंतरावर असलेल्या एका बेटावर येऊन उतरला होता.इ. स. १५६५ सालीं तालीकोटच्या लढाईंत विजयानगरचें राज्य लयास गेल्यावर स्थानिक जैन राज्यांत स्वातंत्र्य प्राप्त झालें. परंतु सतराव्या शतकाच्या आरंभीं इक्केरीचा लिंगायत राजा वेंकटप्पा नाइक यानें या सर्व राजांस जिंकलें व सुमारें १५०–२०० वर्षें इक्केरीच्या राजांचाच अधिकार या भागावर चालत होता. यावेळीं त्यांची राजधानी वेदनुर होतें.

इ. स. १७३७ सालीं ब्रिटिशांचा संबंध या भागाशीं प्रथम आला. इ. स. १७६३ सालीं हैदरअल्लीनें वेदनुरचें राज्य खालसा केलें व मंगलोर हें आपलें आरमारी हालचाल करण्याचें ठिकाण केलें. इ. स. १७७८ सालीं इंग्लिशांनीं मंगलोर काबीज केलें. परंतु हैदरचा मोर्चा या भागाकडे वळल्यामुळें त्यांस मंगलोर सोडावें लागलें. इ. स. १७८० सालीं पुन्हां हैदराशीं लढाई सुरू झाली. त्यावेळीं ब्रिटिशांनीं प्रथम बराच भाग काबीज केला. परंतु टिपूनें त्या प्रांतावर स्वारी केली त्यावेळीं इंग्लिशांच्या सेनापतीस शस्त्रें खालीं ठेवून त्याच्या हस्तगत व्हावें लागलें. या लढाईंत या प्रांतांतील नेटिव्ह ख्रिश्चन लोक इंग्लिशांस गुप्तपणें मदत करतात असा संशय आला. त्यावरून त्यानें सर्व ख्रिश्चनांस हद्दपार करून म्हैसूर येथें पाठविलें व त्या सर्वांस मुसुलमान धर्माची दीक्षा दिली. टिपू इ. स. १७९९ सालीं लढाईंत मरण पावल्यावर या प्रांताचें लुटालुटीमुळें अत्यंत नुकसान झालें. त्या सालीं जो तह झाला त्यांत हा भाग ब्रिटिशांकडे आला. इ. स. १८३४ सालीं कुर्ग खालसा करण्यांत आलें. त्यावेळीं त्यांतील कांहीं भाग या जिल्ह्यांत घालण्यांत आला. इ. स. १८६२ सालीं कुंडपुर तालुक्याचा उत्तरेकडील भाग मुंबई इलाख्यांत घालण्यांत आला.

ज्या भागांवर जैनांचें बरींच वर्षे स्वामित्व होतें त्या भागांत म्हणजे करकल, मुडबिद्रि आणि येणूर वगैरे ठिकाणीं जैनांचे अवशेष पुष्कळ आहेत. हे अवशेष तीन प्रकारचे आहेत. ( १ ) बेटें—यांत मोठमोठ्या मूर्ती असून त्यांच्या भोंवती एक भिंत असते. ( २ ) बस्ति–जैन देवळें. ( ३ ) स्तंभ.

उंबराच्या झाडाखालीं पुष्कळ जुनाट दगडी सर्पाकृति दिसतात. या भागांतील हिंदु देवळें फारशीं मोठीं नाहींत.

या जिल्ह्याचे पांच तालुके आहेत. कुंडपुर, कासरगोड, मंगलोर, उडिपि व उप्पिनंगडि. या जिल्ह्यांतच हिंदी महासागरांतील अमिनादिवि बेटांचा अंतर्भाव होतो.

दक्षिण कानडांतील बहुतेक प्रदेश डोंगराळ व जंगलमय आहे. या कारणामुळें जरी या जिल्ह्यांत दुष्काळ पडत नाहींत तरी दर चौरस मैलीं लोकसंख्येचें प्रमाण बरेंच कमी आहे.

लोकसंख्या ( १९२१ ) १२४७३६८ होती. एकंदर लोकवस्तींत शेंकडा ८१ हिंदु, शेंकडा ११ मुसुलमान, शेंकडा ७ ख्रिश्चन आणि शेंकडा १ जैन यांची वस्ती आहे.

या जिल्ह्यांत तुळु, मल्याळम्, कानडी, कोंकणी या भाषा मुख्यत्वेंकरून बोलतात. शेंकडा ७५ लोकांचा निर्वाह शेतीवर चालतो.

मुख्य पीक—भात, सुपारी व नारळ यांच्या बागा यांत पुष्कळ आहेत. या जिल्ह्यांत एकंदर ६६२ चौरस मैल जंगल असून पैकीं ४०८ चौरस मैल ‘ संरक्षित ’ आहे. पूर्वी येथील जंगली लोक ‘कुमरी’ ची लागवड करीत असत. परंतु यामुळें जंगलाचें अपरिमित नुकसान होतें म्हणून सरकारनें इ. स. १८६० सालापासून ही चाल बंद केली आहे.

मडकीं व कौलें करण्यायोग्य माती या जिल्ह्यांत बऱ्याच ठिकाणीं आढळते. मंगलोर येथील कौलांचा कारखाना सर्वत्र प्रसिद्ध आहेच. या कारखान्यासाठीं माती नेत्रावती नदीच्या कांठावरील घेतात. सोनें व गार्नेट हे खनिज पदार्थ एक दोन ठिकाणीं सांपडतात. परंतु या दृष्टीनें या जिल्ह्याची पाहणी अद्यापि झाली नाहीं.

या जिल्ह्यांत कौलांचे कारखाने असून त्या कामावर पुष्कळ लोक लागलेले आहेत. त्याचप्रमाणें काथ्याचे दोरहि मोठ्या प्रमाणावर तयार होतात. किनाऱ्यावर मासे खारवण्याचा धंदा चालत असून मासे खारवणें ह्यास सरकारचा कर माफ आहे. येथून काफी, कौलें, नारळ, सुपारी, तांदुळ खारलेली मासळी, इमारती लांकूड व मसाल्याचीं द्रव्यें इत्यादि माल बाहेर जातो. मंगलोर हें या भागांतील प्रमुख बंदर असून येथून बहुतेक व्यापाराची ने आण होते. म्हैसूर संस्थानांतून चंदन आणून उडिपी तालुक्यांत त्याचें तेल काढतात.

इ. स. १९०७ सालापासून मंगलोरपर्यंत एक रेल्वेचा फांटा गेल्यामुळें मलबार व इतर मद्रास इलाखा यांतील दळणवळण बरेंच सुलभ झालें आहे.

येथें पाऊस भरपूर पडत असल्यामुळें दुष्काळाचा उपद्रव या जिल्ह्यास कधीं होत नाहीं. जमीनमहसूल सुमारें २८ लाख रुपये आहे; व इतर १८ लाख आहे.

**कानडी वाङ्मय**—कानडी ही तामिळ, तेलगू, आणि मल्याळम् भाषांशीं नातें असलेली आणि त्यामुळें द्राविड भाषाकुलांत मोडणारी भाषा होय. ही भाषा साहित्ययुक्त आहे. गोव्यापासून गंगातीरावरील राजमहालापर्यंत एक रेषा काढल्यास तिच्या दक्षिणेकडील भाग द्राविड भाषांनीं व उत्तरेकडील भाग आर्यन भाषांनीं व्यापला आहे, असें दिसून येईल. बलुचिस्तानांतील ब्राहुइ ही एक किरकोळ भाषा वगळल्यास, जगांत द्राविडी भाषांशीं निकट सबंध असणाऱ्या दुसऱ्या भाषा मुळींच आढळून येत नाहींत. गोव्याची भाषा ही देखील कानडीशीं संबद्ध आहे.

कानडी देश.—कानडी बोलणाऱ्या लोकांची संख्या एक कोटीहून अधिक आहे. ही भाषा बोलणाऱ्यांचा प्रदेश म्हणजे सबंध म्हैसूर संस्थान, निजामी राज्याचा पश्चिमार्ध, मुंबई इलाख्यांतील दक्षिण जिल्हे (ज्याला हल्लीं “ दक्षिण

महाराष्ट्र " म्हणतात तो प्रदेश ) आणि मद्रास इलाख्यांतील उत्तर कानडा व बल्लारी हे जिल्हे इतका मिळून आहे पश्चिम घाट व त्याच्या पायथ्याची जमीन सोडून दिल्यास हा प्रदेश समुद्रसपाटीपासून १,२०० ते ३,००० फूट उंच आहे.

कवि-राजमार्गांत ( इ. स ८५० ) कानडी देश कावेरी पासून गोदावरी नदीपर्यंत पसरला होता असा उल्लेख आहे. खोंदीव लेख, बखरी, स्थानिक नांवें इत्यादि पुराव्यांवरून कोल्हापूरसुद्धां एके काळीं कानडी हद्दींत होतें असें दिसतें. याचप्रमाणें सोलापूर शहर व जिल्हा यांतून पुष्कळ कानडी खोंदीव लेख आढळून येतात. यावरून कानडी देशाची उत्तरसरहद्द मराठ्यांच्या स्वाऱ्यांमुळें आंत जाऊं लागली, हें उघड होतें.

मद्रासच्या दक्षिणेस असणाऱ्या किनाऱ्याकडील भागास, ते मुख्य कानडी देशाच्या अगदीं बाहेर असून त्या जिल्ह्यांतून तामिळी भाषा प्रचारांत असतांहि, " कर्नाटक " असें जें संबोधण्यांत येतें याला कारण इंग्रजांनीं जेव्हां पूर्वकिनाऱ्यावर वस्ती केली, तेव्हां कृष्णानदीपासून कन्याकुमारीपर्यंत सबंध दक्षिण हिंदुस्थान विजयानगरच्या गादीवर असलेल्या कानडी घराण्याच्या अंमलाखालीं असून, त्याला कर्नाटकराज्य या नांवानें ओळखीत असत, हें होय.

कानडी भाषा—कानडी लिपींत १६ स्वर आहेत. मात्र ऐ ( ऱ्हस्व ए ) व ओ ( ऱ्हस्व ओ ) हे अधिक असून ऌ मुळींच नाहीं. मराठींतील सर्व व्यंजनेंहि आहेत. च व ज यांचे उच्चार मात्र शुद्ध-तालव्य व दंत-तालव्य असे दोन्ही आहेत. बाराखड्या मराठींतल्या प्रमाणेंच म्हणतात. अर्धीं, जोड व ऋकार हीं अक्षरेंहि आहेत. जोडाक्षरांतील उच्चाराच्या क्रमानें एका अक्षराखालीं दुसरें अक्षर जोडून लिहितात; पण त्या अक्षराचा शिरोभाग लिहीत नाहींत. जोडाक्षरास बाराखडीच्या खुणा जोडावयाच्या असल्यास त्या प्रथम अक्षराला जोडून मग खालीं दुसऱ्या अक्षराचें चिन्ह लिहितात. सूर्य, अर्क वगैरेंतील रेफ दाखविण्याला एक विशिष्ट चिन्ह ( ६ ) अक्षरापुढें लिहितात.

तीन लिंगें, तीन वचनें व आठ विभक्ती कानडींतहि आहेत. अनेकवचनीं गळु शब्द योजितात. विभक्ति प्रत्यय खालीलप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथ. | उ. | पंच. | इंद |
| द्वि. | अ, अंनु. | षष्ठि. | अ |
| तृ, | इंद. | सप्त. | अल्लि |
| चतु. | गे, इगे, क्के. | संबो. | अे. ए |

सर्व नामांचे प्रथम-द्वितीय-तृतीय असे तीन पुरुष आहेत. वर्णदर्शक, संख्यादर्शक व गुणदर्शक असे विशेषणांचे तीन प्रकार आहेत.

तत्पुरुष, कर्मधारय, बहुव्रीहि, द्वंद्व व द्विगु, हे संस्कृतांतल्याप्रमाणें समास आहेत.

क्रियापदांत सकर्मक व अकर्मक असे दोन भेद असून काल, अर्थ, पुरुष, लिंग व वचनें त्यांना असतात.

स्थल, काल, रीति, अनुकरण, विभक्ति, निपात, समुच्चय उद्गार व संबोध यांचीं वाचक अशीं अव्ययें आहेत. वाक्यरचना मराठींतल्याप्रमाणेंच असते.

भाषेचे अति प्राचीन नमुने.—इजिप्तमध्यें सांपडलेल्या एका ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांतील ग्रीक हस्तलिखितांत हिंदुस्थानामधल्या कोणत्यातरी एका भाषेंत लिहिलेले थोडे शब्द आढळतात; ते कानडी असावेत असें डॉ. हुल्ट्झशचें म्हणणें आहे. यानंतर कानडी भाषेंत लिहिलेले प्राचीन खोंदीव लेख साहाव्या शतकापासून पुढें आढळतात.

कानडी धुळाक्षरें व लेखनलिपि.—कानडी भाषा लेखनांत आणून जागतिक वाङ्मयांत तिचा प्रवेश करवून देण्याचें श्रेय सर्वस्वीं उत्तरेकडील संस्कृत पंडितांना आहे. या भाषेच्या व्याकरणसंज्ञा व धाटणी संस्कृताच्या धर्तीवर आहे.

वर्णमाला अक्षरविषयक असून, संस्कृत वर्णमालेच्या क्रमानुसार आहे. यांत देखील दहा महाप्राण व्यंजनें, दोन उष्मवर्ण आणि कांहीं स्वर व अंतस्थवर्ण आहेत. वास्तविक पहातां द्राविडी शब्दांना याची जरूरी नसते. आतां याच्या उलट संस्कृतामध्यें न येणारे असे पांच वर्ण या मालेंत आहेत. लहान मुलांकडून त्यांच्या शिक्षणारंभापासून अमरकोश पाठ म्हणून घेण्याची सार्वत्रिक पद्धत असल्यानें या भाषेंतील उच्चार संस्कृत उच्चारांसारखे बनण्यास बरीच मदत झाली आहे.

तेलगु व कानडी लेखनलिपि एक असून, ती पश्चिमहिंदुस्थानांतल्या लेण्यांवरील दक्षिण अशोकी लीपीपासून निघालेली आहे. ही लीपि दक्षिण हिंदुस्थानभर पसरून जावामध्येंसुद्धां गेलेली आहे.

ज्या भाषावस्थेला " प्राचीन कानडी " अशी संज्ञा आहे ती नष्टप्राय व अव्यावहारिक आहे अशांतला भाग नाहीं. आधुनिक कानडी कवितेंत तींतील शब्द व विभक्त्या यांचा उपयोग करतात.

शेजारच्या भाषांचा परिणाम.—बहुतेक सर्व अमूर्त, धार्मिक, शास्त्रीय, व तत्वज्ञानविषयक संज्ञा संस्कृत आहेत. अतिशय जुन्या ग्रंथांत सुद्धां संस्कृत शब्द भरपूर आहेत. संस्कृत ही कानडीची आई नसली तरी दाई खास आहे, असें जें म्हणण्यांत येतें त्यांत पुष्कळ तथ्य आहे. कारण संस्कृतनें तिच्या ठिकाणीं तेज घातल्यानें तर ती वाङ्मयभाषा होण्याला योग्य झाली.

तेलगूचा व हिचा अति निकट संबंध असल्यानें विभक्त्यांच्या बाबतींत तेलगूचा हिच्यावर परिणाम झालेला

दिसतो. या प्रदेशाच्या वायव्य भागांतील पोटभापांवर मराठी भाषेनें परिणाम केला आहे.

का न डी वा ङ्म या च्या इ ति हा सां ती ल यु गें:—एकामागून एक वळावत जाणाऱ्या धार्मिक संप्रदायानुसार कानडी वाङ्मयेतिहासांत कांहीं युगें कल्पितां येतील; तीं अशीः —

(१) बाराव्या शतकाच्या मध्यापर्यंत निव्वळ जैन वाङ्मय होतें; आणि तें यानंतर पुढेंहि कित्येक दिवस वरचढ राहिलें होतें. यांत सर्व प्राचीन आणि पुष्कळशीं अतिशय उच्च दर्जाचीं कानडी लिखाणें येतात. कर्नाटकी जैन वाङ्मय, हें एकंदर जैन वाङ्मयाचा अत्यंत महत्वाचा भाग होय. जैनांच्या इतिहासाच्या दृष्टीनें या संप्रदायाचें वैशिष्ट्य स्थापन करण्यांत जैन आचार्यांनीं जितकी खटपट केली तितकी कोणत्याहि भागांतील आचार्यांनीं केली नाहीं.

(२) इ.स. ११६०म्हणजे जेव्हां बसवाचार्यांनें जुन्या वीर-शैव किंवा लिंगायत धर्माचा पुनरुद्धार केला, त्या सालापासून लिंगायत वाङ्मयास सुरुवात झाली. या नव्या धर्मचालनेमुळें जी महत्वाची गोष्ट घडून आली ती ही कीं, जैनांच्यापेक्षां फार निराळी अशी एक मोठी वीर-शैव वाङ्मयविषयक चळवळीची लाट पसरली.

( ३ ) बाराव्या शतकाच्या प्रारंभीं रामानुजाचार्याकडून समुत्थित झालेला व मध्वाचार्य (सुमारें इ. स. १२३०) आणि चैतन्य ( १५०० ) यांनीं वाढवलेला वैष्णवधर्म कानडी वाङ्मयाच्या तिसऱ्या युगारंभास कारणीभूत झाला. या युगांत ब्राह्मणी विचार श्रेष्ठ स्थान पावले व त्यांनीं आपला दर्जा अद्याप कायम ठेवला आहे. कानडी वाङ्मयावरील यांच्या दृश्य परिणामाला इ. स. १५०८ पासून म्हणजे ज्या वेळीं भारताची कानडी आवृत्ति निघाली त्यावेळेपासून सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत दिसत नाहीं. पाखंडांनीं देशी भाषांचा प्रथम आश्रय करावा आणि ब्राह्मणांनीं नंतर स्वकीय देशी वाङ्मय तयार करून भाषा व लोक यांस ताब्यांत घ्यावें हा नियम कर्नाटकांतहि दिसतो.

४ सध्यां अर्वाचीन युगाला सुरुवात आहे. याचा जन्म कानडी वाङ्मयावर पाश्चात्य विचारांचा आघात व इंग्रजी वाङ्मयाचा परिणाम होऊन झालेला आहे.

हे कानडी वाङ्मयाचे भाग धार्मिक गोष्टींतच केवळ भिन्न आहेत असें नाहीं, तर वाङ्मयस्वरूपांतहि भिन्न आहेत. जैन ग्रंथ बहुधां चंपुरूपांत म्हणजे गद्यपद्यांत आहेत; पद्यांत निरनिराळे अनेक छंद असून त्यांत वाङ्मयकौशल्य चांगलें दृग्गोचर होतें. लिंगायत वाङ्मय बहुतेक गद्यरूपांत आहे. पद्यभाग कांहीं त्रिपदींत तर कांहीं षट्पदींत आहे. मोठमोठे ब्राह्मणी ग्रंथ देखील षट्पदींत म्हणजे सहा ओळींच्या पद्यांत आहेत. पण याखेरीज त्या ग्रंथांतून लोकमान्य झालेलीं रसात्मक काव्येंहि अनेक आहेत. अर्वाचीन युगांतील वाङ्मय बहुतेक गद्यमय आहे; तरी 'यक्षगान' यासारखें लेखन लोकप्रिय झालें आहे.

रा ज की य इ ति हा स, वा ङ्म ये ति हा स.—वाङ्मयाचें सातत्य समजावून घेण्यासाठीं आणि राजकीय परिस्थितीशीं वाङ्मयाची तुलना करण्यासाठीं कानडी देशांतील राज्यें व घराणीं यांची मोजदाद घेतली पाहिजे. खालील घराणीं या देशांत एकामागून एक होऊन गेलीं आहेत. त्यांचा प्रथम नामनिर्देश करणें बरें. कदंब, पल्लव, गंग, चालुक्य, राष्ट्रकूट, कलचुरि, चोल, होयसल, बल्लाळ, यादव, आदिलशाहि, विजयानगर व वोडेयर वगैरे तिसऱ्या शतकापासून आतांपर्यंत होऊन गेलेल्या घराण्यांची ही यादी आहे. कानडी वाङ्मयास आश्रय देणाऱ्या राजांच्या राजधानींचीं शहरें कालानुक्रमानें पुढें दिलीं आहेतः—

इ. स. ४००–५५० वनवासी ( कदंब ); वातापी (पहिले पल्लव ), तलकाद ( गंग ).

इ. स. ५२०–८२० वातापी ( चालुक्य आणि राष्ट्रकूट ); तलकाद.

इ. स. ८२०–१०४० तलकाद, मान्यखेत ( राष्ट्रकूट ).

इ. स. १०४०–१३१२ कल्याण ( पश्चिमचालुक्य ), द्वारसमुद्र ( बल्लाल ).

इ. स. १३१२–१५६५ विजयानगर.

इ. स. १५६५—म्हैसूर.

प्रत्येक राजघराण्याच्या आश्रयाखालीं कांहीं वाङ्मय तयार झालेंच आहे. सध्यां वाङ्मय कांहीं अंशीं राजाश्रयानें आणि कांहीं लोकाश्रयानें वाढत आहे. सध्यांचीं कानडी वाङ्मयाचीं केंद्रस्थानें म्हैसूर, बेंगळूर, धारवाड, मंगलोर व बल्लारी हीं होत. यांपैकीं म्हैसूर व बेंगळूर हीं मुख्यतः राजाश्रयाचीं स्थानें होत. धारवाड व मंगलोर येथें सर्व देशी भाषांस गळफास लावणारी इंग्रजी, देशी भाषांस जितकी वाव देईल तेवढी घेऊन कानडी वाङ्मय कसें बसें वाढत आहे. धारवाडच्या वाङ्मयावर मराठी भाषेच्या सान्निध्यानें मराठी भाषेचा परिणाम होतो. त्यांतलि मुख्य हा कीं ज्या शास्त्रीय संज्ञा व अर्वाचीन गोष्टींचे निदर्शक जे संस्कृत भाषेच्या पायावर रचलेले शब्द मराठींत वापरले जातात त्यांचा प्रसार कानडी भाषेंत होतो. शिवाय मराठी नाटकें, कादंबऱ्या यांचीं भाषांतरें याच केंद्रांत तयार होतात.

मंगलोर येथें कानडी वाङ्मय निर्माण करणाऱ्यांमध्यें सारस्वत ब्राह्मण बरेच आहेत. आणि त्यांच्या मानसिक वैशिष्ट्याचा आणि सामाजिक स्थितीचा कानडी वाङ्मयावर थोडासा परिणाम होतो.

क वि रा ज मा र्गा च्या ( इ. स. ८५० ) अ गो द र चे ले ख क.—ज्याचा काल ज्ञात आहे असा अगदीं जुना कानडी ग्रंथ म्हणजे कवि-राजमार्ग हा होय. हा राष्ट्रकूट राजा नृपतुंग यानें रचला असें प्रतिपादण्यांत येतें. पण नृपतुंगाच्या फक्त देखरेखीखालीं व आश्रयाखालीं हा तयार झाला असावा. याचा खरा लेखक श्रीविजय नांवाचा

नृपतुंगाच्या दरबारीं असलेला कवि होय. नृपतुंग हा मान्यखेतच्या गादीवर इ. स. ८१४ ते ८७७ पर्यंत होता. तेव्हां नवव्या शतकाचा मध्य हा कानडी साहित्याचा प्रारंभकाल होय.

तथापि त्याच्या पूर्वीच्या शतकांतून होऊन गेलेल्या पुष्कळ प्राचीन लेखकांविषयीं बरीच माहिती उपलब्ध आहे. कविराजमार्गांत सुद्धां आठ दहा गद्यपद्यलेखकांचा नामनिर्देश केला असून असे अनेक आहेत असें त्यांत म्हटलें आहे. ज्यांचीं नांवें दिलीं नाहींत अशा कांहीं कवींच्या दृष्टांतिक कविता घेऊन त्यांवर बराच उहापोह केला आहे. याशिवाय हा ग्रंथच मूळ कविकृतींवर चर्चा करण्यासाठीं केला असल्यानें काव्यवाङ्मय किती जुनें आणि लोकमान्य झालें होतें याला हा ग्रंथच साक्षीभूत आहे.

जुन्या कानडी लेखकांनीं आपल्या मागें होऊन गेलेल्या तीन महान् कवींचा वारंवार उल्लेख केलेला आढळून येतो. हे कवी म्हणजे समंतभद्र, कविपरमेष्ठि आणि पूज्यपाद हे होत. कविराजमार्गांत यांचा उल्लेख नाहीं. यांचे फक्त संस्कृत ग्रंथ माहीत आहेत; पण कानडींत त्यांनीं कांहीं रचना केली आहे कीं नाहीं याविषयीं माहिती मिळत नाहीं. पण ज्याअर्थी कानडी लेखकांनीं त्यांचा गौरवानें एकसारखा नामनिर्देश केला आहे, त्याअर्थी त्यांनीं कानडींतहि कांहीं रचना केली असावी हें संभवनीय वाटतें. आतां यांच्याविषयीं आपणांला काय माहिती आहे हें पाहूं.

जैनकथानुसार समंतभद्राचा काल दुसऱ्या शतकांत धरला आहे. तो बडा विवादक असून चांगला जैनधर्मोपदेशकहि होता. पाटलीपुत्र ( पाटणा ), थक्क ( पंजाव ) सिंध, माळवा, करहाटक ( कऱ्हाड ), वाराणसी, कांची इत्यादि स्थळीं त्यानें प्रवास केला होता.

कांचीच्या देवळांत कांहीं चमत्कार घडवून आणून यानें कांचीचा राजा जो शिवकोटि याला शैवधर्म टाकून जैन धर्माचा स्वीकार करावयास लाविलें. याच्या कांहीं संस्कृत ग्रंथांवरील प्राचीन कानडी टीका उपलब्ध आहेत, पण याचा एकहि कानडी ग्रंथ उपलब्ध नाहीं.

पूज्यपादाचें दुसरें नांव देवनंदी. हा तळकादच्या गादीवर इ. स. ४८२–५२२ पर्यंत असलेल्या दुर्विनीत नांवाच्या गंग राजाचा गुरु असावा. तेव्हां याचा काल पांचव्या शतकाच्या अखेरीस जातो. हा जैन मुनि असून योगसाधनी होता. योग्यासारखी अद्वितीय शक्ति याच्या ठायीं होती असें सांगतात. त्यानें जैन तत्वज्ञानावर ग्रंथ केले आहेत. पण त्याची जी ख्याति आहे ती त्याच्या व्याकरणग्रंथामुळें होय. " पाणिनिशब्दावतार " म्हणून त्यानें पाणिनीवर टीकाग्रंथ लिहिला, इतकेंच नव्हे तर त्यानें " जैनेंद्र " नांवाचें सर्वश्रुत संस्कृत व्याकरण रचिलें. वज्रनंदी नांवाच्या याच्या शिष्यानें मदुरेस एक तामिल संघ स्थापिला असें म्हणतात.

कविपरमेष्ठीविषयीं फारच थोडी माहिती आढळते. तो चवथ्या शतकांत होऊन गेला असावा. कविराजमार्गांत उल्लेखिलेला कवीश्वर आणि चामुंडराय ( ९७८ ) व नेमिचंद्र ( ११७० ) यांनीं स्तविलेला कविपरमेश्वर हीं याचींच नांवें असावीत.

वरील ग्रंथकारांनीं कानडींत ग्रंथ रचना केली कीं नाहीं हें जरी माहीत नाहीं तरी दुसऱ्या कित्येकांनीं केल्याचें नक्की माहीत आहे. यांपैकीं श्रीवर्धदेवाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. जन्मभूमीवरून याला तुमुलूराचार्य असें नांव पडलें. यानें तत्वार्थमहाशास्त्रावर टीका म्हणून, ९६००० श्लोकांचा " चूडामणि " नांवाचा एक फार मोठा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचें महत्व खालील दोन गोष्टींवरून दिसेल. इ. स. ११२८ च्या खोदीव लेखांत सहाव्या शतकांतल्या दंडी कवीचा एक श्लोक आहे. त्यांत त्यानें श्रीवर्धदेवाची स्तुति केलेली आढळते. भट्टाकलंक ( १६०४ ) नांवाच्या प्रसिद्ध कानडी वैय्याकरणानें " चूडामणींची " फार प्रशंसा करून, त्यावरून कानडी वाङ्मयाची किंमत व दर्जा चांगला कळून येईल असें ध्वनित केलें आहे. जर वरील शिलालेखांतील श्लोकाचा कर्ता निःसंशय दंडी असेल तर श्रीवर्धदेव हा सहाव्या शतकाच्या मागें जाईल. याच्या ग्रंथाची प्रत उपलब्ध नाहीं हें दुर्दैव होय. तथापि भट्टाकलंकाच्या वेळेपर्यंत हा ग्रंथ अस्तित्वांत होतासें दिसतें.

ज्यांच्या कृती उपलब्ध नाहींत असे कविराजमार्गांत उल्लेखिलेले दुसरे प्राचीन ग्रंथकार म्हणजे विमल, उदय, नागार्जुन, जयबन्धु, दुर्विनीत, श्रीविजय हे होत. " कर्णाटक कविचरितें " या ग्रंथांत याची त्रोटक माहिती आढळते. या ठिकाणीं गुणानंदां (९ वें शतक) या तत्वज्ञान, व्याकरण व साहित्य यांवरील ग्रंथकाराचाहि उल्लेख केला पाहिजे. ग्रंथकार दुर्विनीत व या नांवाचा ( इ. स. ४८२—५२२ पर्यंत राज्यावर असलेला ) गंगराजा या एकच व्यक्ती असाव्या असें दिसतें. तो शब्दावताराचा कर्ता देवनंदी पूज्यपाद याचा शिष्य असून यानें भारवीच्या किरातार्जुनीयांतील कठिण अशा १५ व्या सर्गांवर टीका लिहिली, असें शिलालेखांतून याचें वर्णन आढळतें. भारवीचा काल ६१० च्या पूर्वी केव्हांतरी असावा; पण तो जर कालिदासाचा समकालीन असेल तर त्याला पांचव्या शतकांत घालावा लागेल.

या प्रकरणांत उल्लेखिलेलीं कोणतींहि पुस्तकें जरी सध्यां पाहण्यांत नाहींत तरी अजूनहि कांहीं सांपडण्यासारखीं आहेत; कारण अशीं कांहीं प्राचीन जैनग्रंथसंग्रहालयें आहेत कीं त्यांतील ग्रंथ अद्याप नीटसे माहीत झाले नाहींत; ते विजातीयांच्या दृष्टीस पडूं नयेत म्हणून खबरदारी घेण्यांत येते व कधीं कधीं ते जमीनींत पुरून टाकण्यांतहि येतात !

**कविराजमार्गापासून लिंगायत समुत्थानकालापर्यंतचे जैन लेखक (८५०–११६०).**–कविराजमार्गाच्या पुढचा प्राचीन ग्रंथकार म्हणजे पाहिला गुणधर्म होय.

हा महेंद्रांतक ही पदवी धारण करणाऱ्या बहुधा एरेयप्पा ( ८८६–९१३ ) नांवाच्या गंगराजाच्या पदरीं होता. यानें हरिवंश " किंवा " नेमिनाथ पुराण " आणि " शूद्रक" नांवाचा ग्रंथ लिहिला.

दहाव्या शतकांतील तीन कवींनां तीन रत्नें म्हणून कधीं कधीं संबोधीत. हे तीन कवी म्हणजे, पंप, पोन्न आणि रन्न हे होत. उत्तरकालीन कानडी कवी यांची फार स्तुति गातात. कानडी वाङ्मयाच्या इतिहासांत दहावें शतक कांहींसें दैदीप्यमान दिसतें या शतकांत त्याला मान्यखेत येथील आणि गंग राजांचा आश्रय होता.

पंप हा इ. स. ९०२ मध्यें जन्मला. याला आदिपंप असें म्हणतात. याच्या नंतर दुसरा एक पंपकवि झालेला आहे. हा वेंगी येथील एका ब्राह्मण घराण्यांतला होता. पण त्याच्या बापानें ब्राह्मणधर्म सोडून देऊन जैन धर्माचा अंगिकार केला. पंप हा चालुक्य घराण्यांतील अरिकेसरी नांवाच्या एका राजपुरुषाच्या पदरीं होता. त्यानें याला धर्मपुर नांवाचें गांव बक्षिस दिलें. इ. स. ९४१ मध्यें या कवीनें एका वर्षांत दोन काव्यें रचिलीं. हीं काव्यें फार प्रख्यात असून कानडी वाङ्मयांत तीं भाषासरणीच्या दृष्टीनें नमुन्यादाखल आहेत. पहिलें आदिपुराण, यांत पहिल्या तीर्थंकराचें चरित्र आहे. दुसरें विक्रमार्जुनविजय, यालाच पंपभारत असें नांव आहे. यांत पांडवजन्मापासून कौरवनाश व अर्जुनाभिषेक येथपर्यंतची भारतकथा वर्णिली आहे. यांत संस्कृत शब्द कमी असूनहि हे फार सरस वठलें आहे. यांतील अर्जुन हा कवीचा आश्रयदाता अरिकेसरी असें कल्पून, कवीनें याला विष्णु, शिव, सूर्य, मदन इत्यादि विशेषणें देऊन चांगलेंच गौरविलें आहे. तथापि या अवास्तव्य स्तुतीमुळें काव्याला जरा कमीपणा येतो.

पोन्न हा जैनकवि पंप याचा समकालीन होता. हा संस्कृत व कानडी या दोनहि भाषांत ग्रंथरचना करीत असे; व त्यावरून याला उभय–कवि–चक्रवर्ति अशी बहुमानाची पदवी मिळाली होती. मान्यखेतच्या गादीवर ९३९–९६८ पर्यंत असलेल्या कृष्णराज नांवाच्या राष्ट्रकूट राजानें त्याला ही पदवी अर्पण केली होती. या कवीची ख्याति यानें रचिलेल्या शांतिपुराणावरून झाली. या पुराणांत १६ तीर्थंकरांच्या कथा आहेत. याचा दुसरा ग्रंथ म्हणजे "जिनाक्षरमाले " हें जिनस्तुतिमय विवक्षिताक्षरबंध काव्य होय. याच्या नांवानें प्रसिद्ध असलेले दुसरे ग्रंथ उपलब्ध नाहींत.

त्रैमूर्तींतील तिसरा जो रन्न हा कासार जातीचा वैश्य होता. मोहक भाषासरणी, काव्यौघ व कौशल्य हे गुण त्याच्या काव्यांत आढळून येतात. दहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेलेल्या पश्चिम चालुक्य राजांचा त्याला आश्रय असे. या कवीचा पहिला ग्रंथ " अजित पुराण "हा होय. यानें हा दुसऱ्या तीर्थंकराचा इतिहास ९९३ मध्यें लिहिला. याचा दुसरा ग्रंथ " साहस भीमविजय. " यांत भीमानें दुर्योधनाला मारण्याविषयीं केलेली प्रतिज्ञा कशी शेवटास नेली याविषयीं कथा आहे. याचे दुसरे ग्रंथ उपलब्ध नाहींत.

रन्नचा आश्रयदाता आणि " तीन रत्नां " चा समकालीन चावुंडराय ( सं. चामुंड ) हा स्वतःच लेखक होता. हा गंगराजा चवथा राचमल्ल ( ९७४–९८४ ) याचा एक मंत्री होता. हा चांगला योद्धाहि असे. यानेंच अलोट पैसा खर्च करून श्रवण बेळगोळ येथें गोमतेश्वराचा अजस्र पुतळा उभारला. " त्रिषष्ठिलक्षण महावीरपुराण " किंवा " चामुंडरायपुराण " या नांवानें ओळखिला जाणारा याचा एक गद्य ग्रंथ आहे. यांत २४ तीर्थंकरांचा संपूर्ण इतिहास आहे. हा ग्रंथ विशेष मनोरंजक व महत्वाचा असण्याचें कारण सबंध गद्यांत लिहिलेला जुना उपलब्ध असलेला गद्यग्रंथाचा नमुना काय तो हाच आहे. दहाव्या शतकांत प्रचलित असलेल्या भाषेचें ज्ञान आपणांस या ग्रंथावरून करून घेतां येतें. याचा काल ९७८ हा आहे.

इ. स. ९८४ च्या सुमारास पहिला नागवर्म, या प्रख्यात वैय्याकरणानें " छंदोम्बुधि " हा कानडी छंदःशास्त्रावरील ग्रंथ रचला. कर्त्यानें हा आपल्या पत्नीस संबोधून लिहिला असून प्रत्येक श्लोक त्या त्या वृत्ताचें उदाहरण म्हणून रचला आहे. बाणाच्या संस्कृत कादंबरीवरून यानें चंपूमध्यें कानडी " कादंबरी " केली आहे. याला चावुंडरायाचा आश्रय होता.

अकराव्या शतकांतले कानडी ग्रंथकार फारसे नाहींत; याचें कारण त्यावेळीं चोल राजांच्या स्वाऱ्यांमुळें देशांत फार अस्वस्थता होती. देश उध्वस्त केला गेला असून पुष्कळ जैन देवस्थानें पार नाहींशीं करून टाकण्यांत आलीं होतीं.

चोल स्वाऱ्या थांबल्यानंतर १०७९ सालीं चंद्रराजानें " मदनतिलक " नांवाचें एक लहानसें काव्य रचिलें. हें अशा खुबीदार रीतीनें रचिलें आहे कीं, ध्वनि व शब्द यांच्या अनेक वाङ्मयविक्षेपांनीं याचे निरनिराळे प्रकार करून दाखवितां येतात. अनेक तज्ज्ञांनीं हें म्हणतां येतें.

याच वेळीं बलिपुर ( शिमोगा जिल्ह्यांतलें बेलगामी ) येथें नागवर्माचार्य उदयास आला. यानें त्या ठिकाणीं देवळें व स्नानासाठीं घाट बांधिले आहेत. हा फार धार्मिक असे. याचा " चंद्रचूडामणिशतक " हा ग्रंथ वैराग्यपर आहे. याला केव्हां केव्हां " ज्ञान–सार " असेंहि संबोधण्यांत येतें.

नागचंद्र किंवा अभिनवपंप हा ११०० च्या सुमारास होऊन गेला. याची लेखनशैली व याच्या एका ग्रंथाचें अपूर्व महत्व या दृष्टीनें याचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. याचें वैयक्तिक चरित्र फारसें माहीत नाहीं. यानें " मल्लिनाथपुराण" लिहिलें. यांत १९साव्या तीर्थंकराची कथा असून, यांत कवीची वर्णन करण्याची अपूर्व शक्ति दृष्टोत्पत्तीस येते. तथापि याच्या " रामचंद्रचरित्रपुराणाला " विशेष मान्यता प्राप्त झालेली आहे. हा ग्रंथ " पंपरामायण " या नांवानें ओळखिला जात असून कवीनें आदिपंपाच्या पंपभारताला लोलक म्हणून हा तयार केला. हा ग्रंथ अद्वितीय व मौल्यवान्

असा आहे. या योगानें रामायणाचें, ब्राह्मणी पाठाहून पुष्कळ प्रमुख बाबतींत निराळें असें जैन पाठांतर आपणांस पहावयास मिळतें. या कथेंतील मुख्य धागा वाल्मिकीरामायणांतलाच असून इतर सर्व गोष्टींत फार फरक पडलेला आहे. विशेष लक्ष्यांत घेण्याजोगे कांहीं फरक खालीं देतोः—

सर्व वातावरण जैन आहे. सबंध हिंदुस्थान जैन प्रदेश बनलेला दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.ब्राह्मण किंवा ब्राह्मणी धर्म याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. वनांतील ऋषी हे जैन यती होत. राम, रावण वगैरे सर्व मंडळी जैन असून, अंतकाळीं ते बहुतेक जैन यती बनतात. राक्षसांनां राक्षस या नांवानें फार थोड्या वेळां संबोधण्यांत येतें. त्यांनां बहुधा विद्याधर असें म्हणत. वस्तुतः पृथ्वीवर राहाणाऱ्यांचे दोन वर्ग पाडण्यांत आले होते; एक खेचर व दुसरा भूचर, म्हणजे जिन आणि मानव, अशा दोन जाती कल्पिल्या आहेत. ब्राह्मणी कथेंतील अमानुष ( दैवी ) व विलक्षण चमत्कारांऐवजीं यांत सरळ साधी व अधिक विश्वसनीय कथा आढळून येते. उदाहरणार्थ, सुग्रीव, हनुमंत व त्यांचे अनुयायी हीं वानरें नसून त्यांच्या ध्वजावर वानराचिन्ह असे. कदंबांच्या ध्वजावरहि वानर–चिन्ह असून त्यांनां वानरध्वज असें नांव होतें. या ग्रंथांतील वानर मनुष्यप्राणी होते. पर्वताच्या मोडलेल्या शिखरांनीं समुद्रावर केलेला पूल बांधला नव्हता; तर " नभोगमनविद्येच्या योगानें अंतरिक्षांतून पुलावरून आणल्याप्रमाणें सैन्य समुद्रपार करण्यांत आलें. रावणाला " दशमुख " हें जें नांव मिळालें याचें कारण त्याला खरोखरीच दहा मुखें होतीं म्हणून नव्हे तर तो जेव्हां जन्मला तेव्हां त्या खोलींत असलेल्या रत्नादर्शांच्या दहा पैलूंमध्यें त्याचें मुख प्रतिबिंबित झालें होतें म्हणून.

राम व लक्ष्मण हे विष्णूचे अवतार नसून केवळ " कारण पुरुष" होते. शेवटीं आठवे अवतार वासुदेव व बलदेव यांशीं त्यांचें अनन्यीकरण करण्यांत आलें आहे. लक्ष्मणाला कृष्ण, केशव, अच्युत असें म्हटलें आहे. सबंध वनवासांत तो रामाच्या बाजूचा योद्धा व रक्षक असून सर्व मोठमोठ्या गोष्टी यानेंच केल्या आहेत. आणि शेवटीं रावणहि याच्याच शस्त्रप्रहारानें मारला जातो.

बारीकसारीक गोष्टी व प्रसंग वाल्मिकीरामायणांतल्यापेक्षां अगदींच भिन्न आहेत. उदाहरणार्थ, लक्ष्मण व शत्रुघ्न हे सहोदर नव्हते. रामाच्या आईचें नांव कौसल्या नसून अपराजिता असें आहे. सीतेला प्रभामंडळ नांवाचा एक जुळा भाऊ होता. तो लहानपणींच चोरीस गेला असून, सीतास्वयंवराच्या पणांत तो भाग घेऊं लागला असतांना हें नातें उघडकीस आलें. रावण हा देवगंधर्वादिकांनां अजिंक्य होता असें कोठेंच सांगितलें नाहीं.

रामायणाचीं दुसरीं जैनपाठांतरें कानडींत आहेत. त्यांपैकीं प्रमुख शतपदींत बसविलेलें " कुमुदेंदु रामायण " (१२७५) आणि देवचंद्र (१७९७) याचा " रामकथावतार " हा गद्यप्रबंध, हीं होत. ' चावुंडराय पुराण" (९७८), नयसेनाचें " धर्मामृत " (१११२) आणि नागराजाचें " पुण्याश्रव " (१६३१) या ग्रंथांतून रामायणकथा त्रोटक दिलेली आहे. यांची सविस्तर तुलना करणें मौजेचें होईल.

या कथेच्या मुळासंबंधीं जैनकथा अशी आहे कीं, ही प्रथम वृषभसेनानें भरताला सांगितली; नंतर ऋषिसमुदायाचा अग्रणी जो गौतम' यानें इ. स. पूर्वी ५२७ मध्यें शेवटचा वर्धमानतीर्थंकर याच्या देखत ती मगध राजाला निवेदन केली; यावेळपासून अव्याहत गुरुपरंपरेमार्फत ती आतांपर्यंत चालत आली आहे.

नागचंद्राच्या वेळचे दुसरे कवी म्हणजे कांति व राजादित्य हे होत.कांति ही ज्ञात असलेली पहिली कानडी कवियित्री होय. ती जैन होती. " कांति " हें नांव जैन परिव्राजिकांनां किंवा स्त्रीभक्तांनां लावण्यांत येतें. द्वार-समुद्राचा बल्लाळराजा तिचें कवित्व कसोटीला लावण्यासाठीं नागचंद्रानें म्हटलेला श्लोकार्ध तिला पुरा करण्यास सांगे व ती त्याप्रमाणें चटकन करी, अशी तिच्याविषयीं एक आख्यायिका आहे. दुसरी अशी एक गोष्ट सांगतात कीं, एकदां नागचंद्रानें तिच्याकडून आपली छंदोबद्ध स्तुति करवून घेण्याबद्दल पैज मारली, व ही पैज जिंकण्यासाठीं त्यानें मूर्च्छा आल्याचें निमित्त करून मेल्याचें सोंग घेतलें. तेव्हां कांतीला शोक होऊन ती त्याचें गुणसंकीर्तन करूं लागली असतां त्यानें चटकन उठून पैज जिंकल्याचें जाहीर केलें.

राजादित्य हा पाविनबागेचा जैन होता. त्यानें आपली काव्यप्रतिभा गणितविषयाचें विवेचन करण्याकडे लाविली. अंकगणित, क्षेत्रमापन व यासारखेच इतर गणितविषय यांच्या संबंधींचे नियम आणि सिद्धांत मोठ्या कौशल्यानें यानें पद्यांत गोंविले आहेत. या विषयांवरील कानडीभाषेंत त्याचे ग्रंथ पहिलेच होत.

बाराव्या शतकांत खालील ग्रंथकारांचा उल्लेख केला पाहिजेः—(१)न य से न(१११२),यानेंएक व्याकरण लिहिलेलें आहे पण तें उपलब्ध नाहीं. याची कीर्ति " धर्मामृत " नांवाच्या नीतिग्रंथावरून झाली. या ग्रंथांतल्या चौदा प्रकरणांतून यानें धैर्य, सत्यता, सद्वृत्त, न्याय इत्यादि सद्गुणासंबंधी सोप्या व मजेदार भाषेंत विवेचन केलें आहे. यानें प्रस्तावनेंतच संस्कृतपरिभाषा वापरण्याचा इतर कवींत जो दोष असतो तो टाळल्याचें लिहिलें आहे. हा याचा ग्रंथ १११२ सालीं धारवाड जिल्ह्यांत मुळुगुंद येथें लिहिला गेला. (२) दु स रा ना ग व र्मा—( सुमारें ११२० ),हा " काव्यावलोकन " आणि ' कर्णाटक भाषाभूषण " या दोन महत्वाच्या व्याकरणग्रंथांचा कर्ता होय. तो मूळ वेंगीचा असून कानडी देशांत येऊन राहिला होता.(३)ब्र ह्म शि व–(११२५) यानें आपल्या समयपरीक्षाग्रंथांत जैनेतर धर्मांतील दोष दाखवून जैनबाजू उचलून धरली आहे.(४)की र्ति व र्मा(११२५),

यानें गोवैद्य नांवाचा गुरांच्या रोगासंबंधीं एक पद्यग्रंथ लिहिला आहे. (५) क र्ण पा र्य (११४०), यानें दुसऱ्या अनेक ग्रंथांखेरीज नेमिनाथ पुराण म्हणजे २२ व्या तीर्थंकराचें चरित्र लिहिलें. यांत त्यानें कृष्ण, पांडव, भारतीय युद्ध इत्यादि कथा घुसडण्याचा प्रयत्न केला आहे. (६) वृ त्त वि ला स. ( ११६० )— यानें अमितगतीच्या संस्कृत ग्रंथाचें धर्मपरिक्षे नांवानें एक कानडी रूपांतर केलें आहे. यांत हिंदू देवांचे अनेक दुर्गुण दाखवून त्यांचीं पुराणें किती अविश्वसनीय असतात हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. कोणताहि देव कुमारीरक्षक होण्याच्या लायकीचा नाहीं हें यांत दाखविलें आहे. (७) दु र्ग सिं ह. ( ११४५ ),—हा जैन नसला तरी त्याचा या ठिकाणीं उल्लेख करणें बरें. हा किसुकाडु-नाड मधील सय्यदी गांवचा स्मार्त ब्राह्मण होता. यानें गुणाढ्याला अनुसरून चंपूमध्यें " पंचतंत्र " लिहिलें आहे.

लिं गा य त सं प्र दा या चा उ द य.-( इ. स. ११६० ) वसव आणि लिंगायतपंथाचे प्रचारकः—वसव हा लिंगायतमताचा संस्थापक नसून, त्याचा सुधारक व प्रचारक होता. लिंगायत संप्रदायास त्या संप्रदायाचे लोक वीरशैव धर्म म्हणतात व तो पंचाचार्यांच्या उपदेशावर रचला आहे व तो वेदोक्त धर्म आहे असें त्याचे अनुयायी समजतात. वसवाचीं सर्व कृत्यें धर्मसंमत होतीं असा कोणाचाच आग्रह नाहीं आणि वसवचरित्र आज स्पष्ट उपलब्ध आहे असेंहि कोणी मानीत नाहींत. कांहीं स्थूल गोष्टी तेवढ्या सांगतां येतील. वसवावर ख्रिस्तीमताचाहि परिणाम झाला होता असें कित्येक म्हणतात. तो कलादगी जिल्ह्यांत बागवाडी येथें जन्मला पण कृष्णा व मलप्रभा यांच्या संगमावर असलेल्या कप्पदि गांवीं तो राहात असे. तेथें एक संगमेश्वराचें स्थान आहे. या ठिकाणीं त्याला वीरशैवमताची पुनर्जागृति करण्यास अनुज्ञा मिळाली, असें सांगतात. वसव आराध्य ब्राह्मण होता. त्याची पहिली बायको ही कल्याण येथें ११५६–११६७ पर्यंत गादीवर असलेल्या विज्जल नांवाच्या कलचुरी राजाचा दिवाण जो वसवाचा मामा होता, त्याची मुलगी होय. जेव्हां त्याचा सासरा वारला तेव्हां वसवाला दिवाणगिरीचीं वस्त्रें मिळालीं. वसवाचा चन्नवसव नांवाचा एक भाचा होता; त्याच्या मदतीनें आपल्या नवीन मताचा व शिवोपासनेच्या नवीन मार्गाचा प्रसार करण्यास वसवानें आरंभ केला. लवकरच त्यानें पुष्कळ अनुयायी जमविले व जंगमाचा पुरोहितवर्ग स्थापला. या जंगमांचें पोषण राजाच्या खजिन्यांतून केल्याच्या आरोपावरून वसवाला पकडण्याचा जेव्हां हुकूम सुटला तेव्हां त्यानें पळून जाऊन आपल्या अनेक अनुयायांच्या साहाय्यानें राजाचा पराभव केला. यावर राजानें त्याला पुन्हां दिवाण केलें पण यापुढें खरा सलोखा न राहतां, वसवानें राजाला मारविलें. तेव्हां राजपुत्रानें बापाबद्दल सूड घेण्याच्या इराद्यानें त्याचा एकसारखा पाठलाग केला तेव्हां वसवानें अखेरीस विहिरींत उडी घेतली. लिंगायतांच्या मतें, तो संगमेश्वराला पळून जाऊन तेथील शिवलिंगांत गडप्प झाला. याच्या मागून चन्नवसव हा लिंगायतांचा पुढारी झाला.

वसवाच्या नांवाभोंवतीं अनेक अख्यायिका जमा होऊन त्यांचीं पुराणें बनलीं. ' वसव पुराण ' ( १३६९ ), ' महावसवपुराण ' ( १५ वें शतक ) आणि ' वृषभेंद्रविजय ' ( १६७१ ) हीं तीं पुराणें होत. ' राजशेखरा 'चा कर्ता षडक्षरिदेव यानें हें शेवटचें पुराण रचिलें आहे. वसवाला नन्दीचा अवतार मानण्यांत येतें.

वसवानें रचिलेले म्हणून मानण्यांत येणारे ग्रंथ, ' षट्–स्थल-वचन ', 'काल-ज्ञान-वचन', ' मन्त्र–गोप्य ', ' घटचक्र-वचन ' आणि ' राज–योग–वचन ' हे लिंगायतमतांचें निरूपण करणारे ग्रंथ होत.

मतप्रसाराच्या कामांत वसवाला अनेक लेखकांची मदत होती. त्यांनीं या नवीन पंथाची प्रशंसा व विवरण करणारीं पुस्तकें देशभर फैलविलीं. हीं पुस्तकें सर्वांस समजण्यासारख्या सोप्या गद्यांत किंवा सहज कळण्यासारख्या व गळ्यावर म्हणतां येण्याजोग्या सोप्या पद्यांत असल्यानें या मताचा प्रसार फारच जलदीनें झाला. पुस्तकांचीं नांवें सोपी व आंतील विषयांनां आदर्शासारखीं होतीं आणि पुष्कळदां तींच तींच नांवें देण्यांत येत, उदा. " षट्–स्थल वचन " किंवा ' कालज्ञान– वचन ' हेंच नांव निरनिराळ्या लेखकांनीं या विषयावर लिहिलेल्या पुस्तकांनां देण्यांत येतें.

वीरशैवपंथाचे प्रचारक अनेक आहेत; तेव्हां सर्वांचीं नांवें देतां येण्यासारखीं नाहींत. नीलम्मा हें वसवाच्या अनेक बायकांपैकीं एकीचें नांव प्रचारकांमध्यें पाहून नवल वाटेल. चन्नवसव हा वसवाचा फारच मोठा सहकारी असे. वसव जिवंत असतांना देखील चन्न कांहीं बाबतींत आपल्या मामापेक्षां श्रेष्ठ होता आणि या चळवळीचा धार्मिक भाग प्रमुखत्वानें चन्नाच्याच देखरेखीखालीं होता. वीरशैवपंथाचीं मतें वसवाला शिकविण्यासाठीं प्रणवा ( ॐ )नें त्याच्या ( चन्नाच्या ) ठिकाणीं अवतार घेतला होता असें सांगतात, म्हणून साहजिकच वसव नंदीचा अवतार असून, चन्नवसव साक्षात् शिव होता असें समजतात.

वसवाचे दुसरे प्रमुख सहकारी म्हणजे मडिवाल मचय्य, प्रभुदेव आणि सिद्धराम हे होत. "चन्नवसवपुराण" ( १५८५ ), " मडिवालय्य सांगत्य ", " प्रभुलिंगलीले " ( १४६० ), " सिद्धरामपुराण " आणि इतर कांहीं ग्रंथ यांतून वरील धर्मप्रवर्तकांबद्दलच्या आश्चर्यकारक व चमत्कारिक कथा सांगितल्या आहेत.

लिं गा य त सं प्र दा या ची थो डी मा हि ती.—बाराव्या शतकांत वसवाबरोबर हा संप्रदाय उत्पन्न झाला असें नसून तो प्राचीन कालापासून चालत आलेला आहे. वसवानें फक्त

त्याची सुधारणा व प्रसार केला. लिंगायतलोक केवळ शिवाची उपासना करितात, पण त्यांचें शैवांशीं साम्य नाहीं. केवळ शिवोपासना हें त्यांचें वैशिष्ट्य नसून अंगावर कोठें तरी नेहेमीं लिंग धारण करणें हेंच त्यांचें वैशिष्ट्य आहे. हें लिंग ( देव ) चिन्ह बहुधां चांदीच्या किंवा लांकडी करंडयांत ( करडिगे ) घालून गळयांत अडकवितात. जंगम तें आपल्या डोक्यावर धारण करितात. हें लिंग कोणत्याहि सबबीखालीं आपल्या पासून दूर करावयाचें नाहीं. लिंगायत लोक मोठे कडक शाकाहारी असतात. हे ब्राह्मणांचें वर्चस्व मानीत नसल्यानें ब्राह्मणांत व यांच्यांत वैर दिसून येतें. लिंगायत समाजांत कोणीहि मनुष्य जातिबाह्य असला तरी तो जातींत घ्यावा अशी बसवाची त्यांना शिकवण आहे.

यांचे कांहीं धर्मग्रंथ संस्कृतांत असून त्यांत २८ ' शैवागम ' नांवाचे ग्रंथ येतात. शिव–गीतेलाहि मोठा मान देण्यांत येतो. अशिक्षितांकरितां कानडींत ' वचनें ' तयार केलीं आहेत. यांत लहान लहान गद्यमय उपदेशपाठ असतात. बसवपुराण व चन्नवसवपुराण यांना फक्त अशिक्षित लोकच प्रमाण मानतात.

वीरशैवसंप्रदायाचीं मुख्य तत्वें व आचार, ' अष्टावरणम् ' व ' षट्स्थल ' या पारिभाषिक शब्दांत देतां येतील. अष्टावरणांत ( १ ) गुरूची आज्ञा पाळणें, ( २ ) लिंगपूजा, ( ३ ) जंगमाविषयीं आदर, ( ४ ) विभूति लावणें, ( ५ ) रुद्राक्षमाळा धारण करणें, (६) पादोदक घेणें, ( ७ ) प्रसाद भक्षण करणें ( नैवेद्य दाखवून ), ( ८ ) 'नमः शिवाय ' हीं पंचाक्षरें जपणें ( याला ' ओम् ' जोडल्यास हीं षडक्षरें होतात. ) या आठ गोष्टी येतात. या गोष्टी धर्मश्रद्धेला सहाय्यभूत म्हणून आहेत. षट्स्थल किंवा मोक्षाच्या सहा पायऱ्या म्हणजेः—भक्त, महेश, प्रसादि, प्राणलिंगि, शरण, व ऐक्य. शैवपंथाच्या ६३ जुनाट साधूं ( यांनां ' पुरातन ' असें म्हणतात. ) विषयीं व पुढील काळांतील ७७० साधूं ( ' नूतन पुरातन ' ) विषयीं यांच्यांत आदरबुद्धि बाळगण्यांत येते. बसव व त्याचे प्रमुख अनुयायी ' नूतन पुरातनांत ' येतात. या पंथाचें तत्वज्ञानांतील स्थान ब्राह्मणांच्या एकेश्वरी सारख्या पंथांच्या जोडीला लागेल. शिवाला परब्रह्म कल्पून त्याला शिवतत्व किंवा महा–शिव असें संबोधण्यांत येतें. हें तत्व ब्रह्मा, विष्णु व रुद्र या वैय्यक्तिक देवतांपेक्षां श्रेष्ठ आहे.

लिं गा य त ग्रं थ का र.—( ११६०–१६०० ) अगदीं पहिला लिंगायत ग्रंथकार हरीश्वर किंवा हरिहर हा नरसिंह बल्लाळाच्या कारकीर्दींत हळेबीड येथें मुख्य मुलकी हिशेबनीस असे. याची अशी आख्यायिका सांगतात कीं, हिशेब देण्यास याला राजानें बोलाविलें असतां, हंपीच्या विरूपाक्ष मंदिरांत आपण आरती करीत असतांना सर्व हिशेब अचानक जळून खाक झाले असें यानें राजास सांगितलें. यावरून त्याला बडतर्फ करण्यांत आलें. यापुढें त्यानें विरूपाक्ष मंदिरांत राहून आपले ग्रंथ लिहिले. याचा पहिला ग्रंथ " रगळे " हा असून, त्यांत ६३ पुरातनांची प्रशंसा आहे. त्याला " शिवगणद रगळे " किंवा प्रथम पुरातनाच्या नांवावरून " नंबियण्णन रगळे " असें नांव आहे. लहान लहान पद्यांपेक्षां ज्यास्त उच्च दर्जाची ग्रंथरचना यास करतां यावयाची नाहीं अशी लोकांची समजूत झालेली पाहून, यानें " गिरिजाकल्याण " किंवा " शिवपार्वतीविवाह–कथा " हा ग्रंथ मोठी आकांक्षा धरून लिहिला व लौकिकहि मिळविला. या ग्रंथाची फारच सुंदर व प्राचीन जैन तऱ्हेची धाटणी आहे व पुढील कवींनीं याची मोठी प्रशंसा केलेली आढळते. हंपीच्या विरूपाक्षाप्रीत्यर्थ " पंपाशतकम् " हा ग्रंथ यानेंच रचिला.

राघवांकः—हा हरीश्वराचा शिष्य होता. हा हंपीचा रहिवासी,पण यानें द्वारसमुद्र व वारंगळ दरबारीं जाऊन विजय मिळविले व आपल्या आयुष्यांतील शेवटचे दिवस हसन जिल्ह्यांतील बेलुर गांवीं कंठिले. यानें हरिश्चंद्रकाव्य लिहिलें तेव्हां त्यांत एका वैष्णव राजाची स्तुति गाइल्याबद्दल हरीश्वर त्याच्यावर नाराज झाला. तेव्हां, त्याचें परिमार्जन करण्याकरितां म्हणून राघवांकानें " सोमनाथचरित्रे " " सिद्धरामपुराण " " हरिहरमहत्व " यांसारखे आणखी ग्रंथ लिहिले. षट्पदींत लिहिण्यास यानेंच प्रथम सुरवात केली असें सांगतात. षट्पदीरचना पुढें फार लोकप्रिय झाली. सोळाव्या शतकांत चिक्कनंजेशानें " राघवांक " नांवाचें या ग्रंथकाराचें चरित्र लिहिलें.

केरेय पद्मरसः–याला " केरेय "( तळें बांधणरा ) हें उपपद मिळण्याचें कारण यानें बेलुर नांवाचें तळें बांधविलें हें होय. तो कांहीं काळ नरसिंह नांवाच्या बल्लाळराजाचा मंत्री होता. यानें वीरशैवसंप्रदाय चांगला वाढविला. यानें " दीक्षा बोधे " नांवाचें संवादात्मक एक काव्य केलें आहे. त्यांत एक गुरु आपल्या शिष्याला उपदेश करीत आहे, व शैव पंथाचीं तत्वें पढवीत आहे असें आहे. १३८५ च्या सुमारास त्याच्या एका वंशजानें लिहिलेल्या " पद्मराजपुराणां " तील हा नायक आहे. याच्या कुमारपद्मरस नांवाच्या मुलानें " सानंदचरित्रे " हा ग्रंथ लिहिला असून त्यांत एका ऋषीच्या मुलानें नरकांतील मृतांच्या यातना ऐकून " पंचाक्षरी " च्या प्रभावानें त्यांनां दुःखमुक्त करण्याचा कसा प्रयत्न केला हें सांगितलें आहे. मूळ संस्कृतावरून हा कथाभाग घेतला असें म्हणतात. हरीश्वर, राघवांक व केरेय पद्मरस यांचा काळ १२ व्या शतकांतील कीं १३ व्या शतकांतील आहे हें निश्चित झालें नाहीं.

पालकुरिके सोमः–(११९५) हा गोदावरी जिल्ह्यांत पालकुरिके येथें जन्मला. आपल्या गांवांतील वैष्णव शास्त्र्यांनां जिंकून तो कानडी प्रांतांत कल्लेय येथें गेला. याचें लेखन विशेषतः संस्कृत व तेलगू या भाषेंत फार आहे. याचें तेलगू " बसवपुराण " भीमकवीच्या " बसवपुराणाला " आधारभूत झालें

असें म्हणतात. याच्या कानडी ग्रंथांत एक "शतक "असून, कांहीं लोक तें प्रख्यात् " सोमेश्वरशतक " च असावें असें म्हणतात. "सोमेश्वरशतक " हा इतका विस्कळित व अशुद्ध ग्रंथ आहे कीं, पालकुरिकेसोमासारख्या संस्कृतज्ञानें तो लिहिला असेल हें संभवत नाहीं असें रा. नरसिंहाचार्यासारखे दुसरे कांहीं लोक प्रतिपादितात. शिवाय लिंगायत लोक स्वतः पालकुरिकेसोमानें केलेल्या ग्रंथांत या शतकाला जागा देत नाहींत; त्याचा लेखक आपणाला पालकुरीकेसोम म्हणवीत नसून पुलिगेरे ( लक्ष्मेश्वर ) येथील आपण रहिवासी आहों असें ध्वनित करतो.

देव कविः—( १२०० ) यानें " कुसुमावलि " नांवाची एक चंपूत सुंदर कादंवरी लिहिली आहे. एक राजकन्या व राजपुत्र एकमेकांच्या प्रतिमेवर अनुरक्त होऊन आपल्या प्रियजनाचा पुष्कळ कालपर्यंत शोध लावितात. नंतर त्यांच्या गांठी पडून त्यांचें लग्न लागतें अशी यांत गोष्ट आहे.

सोमराजः—( १२२२ ) हा बहुधा पश्चिम किनाऱ्यावरील चौत राजांपैकी एक असावा. यानें लिंगायत धर्म स्वीकारला होता. याच्या " शृंगार-रस " ग्रंथांत, एक राजा नायक असून तो आपल्यावरोबर सर्व शहरवासीयांनां कैलासाला घेऊन जातो असें दाखविलें आहे.

व स व पु रा ण.—इ.स.१३६९ त भीमकवि उदयास येईपावेतों दुसरा कोणीहि नांवाजण्यासारखा लिंगायत लेखक पुढें आला नाहीं. या कवीनें षट्पदी छंदांत लिहिलेलें "बसवपुराण" लिंगायतांत फारच लोकप्रिय झालें. " बसवपुराणां"त बसवाचें चरित्र व त्यानें केलेले अनेक चमत्कार रूढ पुराणकाव्याच्या पद्धतींत मनोरंजक रीतीनें ग्रथित केलेले आहेत. बसवाचे बोल इतके प्रभावशाली होते कीं, त्यायोगें विषाचें अमृत होई, मृत सजीव होई, अप्रबुद्ध मोठमोठ्या विद्वानांनांहि भारी होई, पर्वत चालूं लागत, आकाशांत सूर्य स्थिर होई, वाघीण दूध काढून देण्याइतकी गरीव होई अशा तऱ्हेच्या असंभवनीय गोष्टी आपल्या पंथाची प्रौढी दाखविण्यासाठीं इतर पुराणांतल्याप्रमाणें याहि पुराणांत आहेत. प्रभावसंपन्न शैवविधि आचरण्यानें—मग ते मनापासून आचरिले नसले तरी हरकत नाहीं—हलक्या धंद्यांचे व घाणेरड्या जातीचे लोकहि पवित्र झाले आहेत अशा तऱ्हेचा उपदेश यांत अलंकारिक भाषेंत केलेला कधींकधीं आढळतो. यानंतर वरील विधानांच्या पुराव्यासाठीं म्हणून गोष्टी बनविल्या आहेत. तेव्हां यावरून बसवानें केलेल्या अनेक चमत्कारांची कल्पना येईल. सरतेशेवटीं या पुराणांत संगमेश्वर येथील शिवाच्या देवालयांतील लिंगांत, बसव जसा त्यांतून आला तसा पुन्हां त्यांत मिळाला, असें दाखविलें आहे. यासंबंधीं वर्णन मोठें काव्यमय आहे तें असें:—

" ज्याप्रमाणें वावटळीनें वर उडविलेला धुळीचा लोट भूमीपासून वर निघून पुन्हां भूमींत नाहींसा होतो; दूध घुसळिलें असतां त्यावर फेंस येऊन पुन्हां जसा त्यांत जिरून जातो; जशी विजेची चमक आकाशांत उत्पन्न होऊन पुन्हां आकाशांतच अन्तर्धान पावते; ज्याप्रमाणें गारा पाण्यापासून तयार होऊन पुन्हां पाण्यांतच वितळून जातात, त्याप्रमाणें वसव गुरूच्या पोटीं येऊन शेवटीं चिरकाळ विश्रांति घेण्यासाठीं त्याच्याशीं (ईश्वराशीं) सायुज्यता पावला " .

या यु गां ती ल शे व ट चे लिं गा य त ग्रं थ का र.—भीमकवीच्या काळांतीलच, " पद्मराजपुराणाचा " कर्ता पद्मणांक (१३८५) होय. हा केरेय-पद्मरसाचा एक वंशज होता. पद्मराजपुराणांत या कवीनें केरेय-पद्मरस या त्याच्या पूर्वजानें २०० वर्षांपूर्वी अन्य-धर्मीय आचार्यांवर मिळविलेल्या विजयांबद्दल त्याची स्तुति गायली आहे.

चौदाव्या व पंधराव्या शतकांतील खालील ग्रंथकार होतः- गुव्वीच्या मल्लनार्यानें (१३७०) " वीरशैवामृत ", " शिव भक्तरपुराण ", " भावचिन्तारत्न ", किंवा " सत्येन्द्र-चोलकथे ", यांसारखे अनेक ग्रंथ रचिले आहेत. " सत्येन्द्र चोलकथे"ला आधारभूत म्हणून पिळ्ळे नयनारनें " ज्ञान-संबंधींत " गायलेली सत्येन्द्रचोल नांवाच्या राजाची शिव-भक्तिपर कथा घेतली आहे.

षट्पदींत लिहिलेल्या "महावसवचरित्रा"चा कर्ता सिंगि-राज आणि तिसरा, "प्रभुलिंग-लीले"चा कर्ता चामरस. प्रभु-लिंगलीले हा ग्रंथ षट्पदींत आहे. त्याचा नायक प्रभुलिंग किंवा अल्लम-प्रभु असून तो बसवाचा एक सहकारी आहे. या ग्रंथांत प्रभुलिंगाला गणपतीचा अवतार मानला आहे. एकदां पार्वतीनें त्याच्या संसारविरक्तीची परीक्षा पाहण्या-करितां बनवासे नांवाच्या एका राजकन्येच्या ठायीं प्रभु-लिंगाला तिनें मोह पाडावा म्हणून आपला कांहीं अंश घातला अशी एक त्यांत कथा आहे. हा ग्रंथकार विजया-नगरच्या दुसऱ्या प्रौढदेवरायाच्या ( १४४६-१४६७ ) दर-बारीं होता. याच राजानें त्याच्या ग्रंथाचें तेलगू व तामील भाषांत भाषांतर करवून घेतलें.

इ. स. १५८५ त ज्यावेळीं वैष्णवपंथ चांगल्या भरभ-राटींत होता पण विजयनगरचा पाडाव झाला होता, अशा वेळीं विरूपाक्ष पंडितानें षट्पदी छंदांत "चन्नवसवपुराण" लिहिलें. यांत चन्नवसवाचें चरित्र व माहात्म्य असून बराचसा भाग चन्नानें सोन्नलिगेच्या सिद्धरामाला वीर-शैवाविधे-संबंधीं दिलेल्या माहितीनें व्यापला गेला आहे. या माहितींत अद्भुत शिवलीला, शैवविधींचा आश्चर्यकारक प्रभाव, शैव-साधूंच्या कथा व शेवटीं विजयानगरचा नाश व पुढें येणारा लिंगायतपंथाच्या पुनःसंस्थापनेचा काळ यासंबंधीं भविष्य ग्रथित केलें आहे.

याच काळांत (१५९५) कोल्हापूरच्या अद्दशानें "प्रौढ-राय-चरित्रे" पडतें. यांत वैष्णवपंथापेक्षां लिंगायतपंथ श्रेष्ठ आहे अशी प्रौढदेवरायाची खात्री करून देण्याकरितां अनेक कथा सांगितल्या आहेत. याखेरीज सोळाव्या शतकांत

सिद्धलिंगयोगीनें केलेला "राजेंद्रविजयपुराण" नांवाचा चंपूग्रंथ येतो. यांत राजपुत्र भैरवेश्वर याचें वर्णन आहे.

लिं गा य त यु गां ती ल जै न ग्रं थ का र.—(११६०ते १६००) इकडे लिंगायत ग्रंथ भराभर बाहेर पडत असतां, जैनांमध्यें वाङ्मयीन चळवळीला ओहोटी लागली होती असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. वस्तुतः त्यावेळीं या वाङ्मयाचे दोन ओघ बरोबरीनें वहत होते.

पुष्कळशा जैन ग्रंथांना पुराणें म्हणतात व त्यावर कोणत्या तरी तीर्थंकराचें नांव असतें. अशा तऱ्हेचे चंपुपद्धतींत एक किंवा बरेचसे ग्रंथ लिहिल्याखेरीज कोणतेंहि वर्षदशक सुनें गेलें नाहीं, हें खालील यादीवरून दिसेलचः—

| सन. | ग्रंथकार | ग्रंथाचें नांव |
|---|---|---|
| ११७० | नेमिचंद्र | नेमिनाथ |
| ११८९ | अगगळ | चंद्रप्रभ (चंद्रप्रभु?) |
| ११९५ | असन्न | वर्धमान |
| १२०० | बंधुवर्मे | हरिवंशाभ्युदय |
| १२०५ | पार्श्वपंडित | पार्श्वनाथ |
| १२३० | जन्न | अनंतनाथ |
| १२३५ | गुणवर्म२रा | पुष्पदंत |
| १२३५ | कमलभव | शांतीश्वर |
| १२५४ | महाबलकवि | नेमिनाथ |

नेमिचंद्र हा कानडी भाषेंतील आद्य कादंबरीकार होय. यानें "लीलावती" ही कादंबरी चंपूपद्धतींत लिहिलेली असून तिची रचना फारच रमणीय आहे. हींतील कथा अशी आहे कीं एका कदंब राजपुत्रानें स्वप्नांत एक सुंदर राजकन्या (नायिका) पाहिली व तिलाहि याचप्रमाणें त्याचें स्वप्न पडलें. त्यांची एकमेकांची मुळींच ओळख नव्हती. पण पुढें दोघांनींहि बराच शोध व साहसें केल्यानंतर त्यांची गांठ पडून लग्न लागलें. यांत शृंगाररसहि बराच आहे. नेमिचंद्राचा लक्ष्मणराज व वीरवल्लाळ या बल्लाळ राजांच्या दरबारीं श्रेष्ठ दर्जा होता. वीरवल्लाळाच्या दिवाणाच्याच सूचनेवरून त्यानें "नेमिनाथपुराण" लिहिलें.

बंधुवर्म वैश्य जातीचा होता. "हरिवंशाभ्युदया"खेरीज यानें नीतिवैराग्यपर एक सुंदर ग्रंथ प्रसिद्ध केला. तो कोणा एका जीवन नांवाच्या व्यक्तीला संबोधून लिहिला असल्यानें त्याचें नांव "जीवसंबोधन" असें आहे.

जन्नाच्या अंगीं बरेच गुण होते. तो बल्लाळ राजांच्या दरबारीं राजकवि व सेनापतीहि होता. देवळें बांधणारा व त्यांची शोभा वाढविणारा अशीहि त्याची कीर्ति आहे. "अनंतनाथ" पुराणाखेरीज त्यानें बरींच "छंदोबद्ध शासनें" लिहिलीं. वीरवल्लाळाच्या कारकीर्दींत लिहिलेलें "यशोधर चरित्रे" (१२०९) हें काल्पनिक कीं ऐतिहासिक याचा उलगडा पडत नाहीं. यांत मारिअम्माला दोन मुलें बळी देण्यांत येत असतां, त्यांचा वृत्तांत ऐकून राजाला दया आली व त्यानें त्यांनां सोडून दिलें व तप आचरिलें अशी कथा आहे. याची शैली मोहक व भारदस्त आहे. पार्श्वपंडित व गुणवर्म ( २ रा ) हे सौंदत्ति राजांच्या दरबारीं असत.

याखेरीज खालील ग्रंथकारहि निर्देश करण्यायोग्य आहेत. यांचे सन अजमासानें दिलेले आहेत.

शिशुमायणः—(१२३२) हा 'सांगत्य' पदबंधांत लिहिणारा पहिला कवि होय. वाद्यावरोबर म्हणण्यासाठीं म्हणून सांगत्याची विशेष योजना केलेली असते. यानें "अंजनाचरित्रे" व "त्रिपुरदहन सांगत्य" नांवाचें एक रूपकात्मक काव्य लिहिलें आहे.

आण्डय्यः—(१२३५) हा "कब्बिगरकाव" (कवींचा रक्षक) नांवाच्या चंपुग्रंथाचा कर्ता होय. या ग्रंथाला "सोवगिन सुग्गि" (सौंदर्याचें पीक), "मदन-विजय" व "कावन-गेल्ल" (काम-विजय) अशींहि दुसरीं नांवें आहेत. या ग्रंथांतील विशेष मजा म्हणजे यांत पहिल्यापासून शेवटपर्यंत एकहि अपरिचित तत्सम (संस्कृत) शब्द नसून, यांतील शब्दकोशांत सर्व तद्भव (संस्कृतापासून बनलेले) व देश्य शब्द आहेत. या बाबतींत याच्या जोडीचा एकहि दुसरा कानडी ग्रंथ नाहीं. ग्रंथाचा विषय मदनविजय आहे. चंद्राला बद्ध केल्यामुळें शिवावर रागावून मदनानें त्याच्यावर बाणांचा मारा केला. तेव्हां शिवानें त्याला पत्नीवियोगाचा शाप दिला. पण त्यानें आपणाला शापमुक्त करून घेतलें व पुन्हां प्रियेशीं संयुक्त झाला. अशी कथा यांत आहे.

मल्लिकार्जुनः—(१२४५) "शब्दमणिदर्पणाचा" कर्ता जो केशिराज, त्याचा हा पिता होय. हा वीर सोमेश्वर (१२३४-१२५४) या होयसल राजाच्या वेळीं होता. यानें "सूक्तिसुधार्णव" किंवा "काव्य-सार" नांवाच्या ग्रंथांत त्याच्या पूर्वी झालेल्या सर्व कवींच्या कवितांचा समुद्र, पर्वत, नगर, ऋतु, चंद्रप्रकाश, संध्या, मैत्री, प्रणय, युद्ध वगैरे १८ विषयांखालीं मोठा उपयुक्त संग्रह करून ठेवला आहे. याच्यानंतर १६०० च्या सुमारास अभिनववादिविद्यानंदानें दुसरा काव्यसार ग्रंथ रचिला.

केशिराजः—(१२६०) हा मोठ्या वाङ्मय व्यवसायी कुळांत जन्मला. याचा पिता काव्यसारकर्ता मल्लिकार्जुन, आजोबा (आईचा बाप) शंकर किंवा सुमतोबाण नांवाचा एक कवि (याची कृति हयात नाहीं) व चुलता (किंवा मामा?) प्रख्यात ग्रंथकार जन्न होय. यानें "शब्दमणिदर्पण" नांवाचा प्रख्यात व प्रमाणभूत व्याकरणग्रंथ लिहिला आहे.

कुमुदेंदुः (१२७५) यानें षट्पदी छंदांत एक रामायण लिहिलें आहे. त्याचें नांव "कुमुदेन्दु रामायण." हें जैन कथेला अनुसरून लिहिलें असल्यानें "पंपरामायणा"शीं याची तुलना करतां येण्यासारखी आहे. पण हा ग्रंथ अद्याप समग्र उपलब्ध नाहीं.

रट्टकविः—(१३००) हा एका जैन ग्रामाचा इनामदार होता. याचीं बरींच नांवें आहेत. यानें "रट्टमत" किंवा

रट्टसूत्र या नांवाचा एक शास्त्रीय तऱ्हेचा ग्रंथ केला आहे. त्यांत पाऊस, भूकंप, विजा, ग्रह वगैरे नैसर्गिक दृश्यांवर विवेचन आहे. हा ग्रंथ चौदाव्या शतकांत भास्कर नांवाच्या तेलगू कवीनें तेलगूंत भाषांतर करून घेतला आहे.

नागराज ( १३३१ )—यानें आपल्या "पुण्याश्रवां" त गृहस्थधर्माच्या उदाहरणादाखल पौराणिक पुरुषांच्या ५२कथा लिहिल्या आहेत.

मंगराज १ ला ( १३६० ) यानें वैद्यकीवर " खगेंद्र मणि दर्पण " नांवाचा ग्रंथ केला असून त्यांत पांचव्या शतकांतील पूज्यपादाचा वैद्यकावरील ग्रंथ आधारादाखल घेतला आहे.

मधुरः—( १३८५) विजयानगरच्या हरिहराच्या दरबारीं कवि होता. याला राजाच्या मंत्र्याचा चांगला आश्रय असे. यानें " धर्मनाथ " ( १५ वा तीर्थंकार ) पुराण व श्रवण-बेळगोळच्या गोम्मतेश्वरावर एक प्रशंसापर ग्रंथ लिहिला. चौदाव्या शतकांतील असतांहि यानें प्राचीन जैन कवींच्या लेखनाची प्रौढ शैली बरोबर उचलली होती.

अभिनवचंद्रः—( १४०० )-यानें " अश्ववैद्य " नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. यानें पूर्वी झालेले अश्वावरील ग्रंथ विशेषतः चंद्रराज ( ११७० ) याचा ग्रंथ आधारभूत घेतला आहे. तरी त्याच्या काळापर्यंतची माहिती त्यांत गोंविली आहे.

प हि ले वै ष्ण व ग्रं थ.—वैष्णव कानडी वाङ्मयांत इतर ग्रंथांच्या मानानें पहातां नवीन असें फार थोडेंच आहे. यांत वरीचशीं पुस्तकें निरनिराळ्या प्रकारांनीं संस्कृतावरून तयार केलेलीं आहेत. वस्तुतः कानडींत लिहिणारा पहिला वैष्णव ग्रंथकार म्हणजे वीर बल्लाळच्या कारकीर्दीत ( ११७२–१२१९ ) झालेला रुद्रभट्ट नांवाचा स्मार्त ब्राह्मण होय. याच्या " जगन्नाथ विजय " ग्रंथांत विष्णुपुराणांतील कृष्णजन्मापासून बाणासुरयुद्धापर्यंत इतिहास दिला आहे. हा जैन कवींच्या धर्तीवर चंपुवृत्तांत लिहिलेला ग्रंथ आहे व बराच लोकप्रियहि आहे. यापुढें एक शतकानंतर(अजमासें १३००), चावुंडरस नांवाच्या पंढरीच्या विठोबाचा भक्त असलेल्या एका ब्राह्मणानें " अभिनव—दश—कुमार—चरित्र " या दंडीच्या संस्कृत ग्रंथाचें कानडींत चंपुपद्धतींत रूपांतर केलें.

सं स्कृ त ग्रं थां चीं भा षां त रें.—कानडी वाङ्मयांत वैष्णव धर्माचा उदय इ. स. १५०० पासून दिसून येतो. याला सुरुवात " महाभारताच्या " कानडी रूपांतरापासून झालेली दिसते. विजयानगरच्या कृष्णरायाचा ( १५०८–१५३० ) या कामाला मोठा आश्रय होता. याचीं पहिलीं १० पर्वें, धारवाड जिल्ह्यांतील कोडिवाल गांवच्या नारणप्पा नांवाच्या गौड ब्राह्मणानें तयार केलीं. हा ग्रंथकार " कुमार व्यास " या टोपण नांवानें ओळखिला जातो. यानें आपली कृति गदग–ग्रामदेवतेला अर्पण केली असल्यानें या भागाला कधीं कधीं " गदगिन भारत " असेंहि म्हणण्यांत येतें. राहिलेल्या पर्वांचें तिम्मण्णानें भाषांतर करून त्याला " कृष्णराय भारत " असें आपल्या आश्रयदात्या राजाचें नांव दिलें. हे दोनहि भाग षट्पदी छंदांत लिहिले आहेत. या भारतप्रकाशनाच्या कामाला यश आलेलें पाहून, ब्राह्मणी पद्धतीचें कानडी " रामायण " तयार करण्याचें काम हातीं घेण्यांत आलें. पण मध्यंतरीं विजयानगरची गादी उध्वस्त केली गेल्यामुळें ( १५६५ ) सोलापुर जिल्ह्यांतील तोरवे गांवीं हें काम पार पाडण्यांत आलें. म्हणून याला बहुधा " तोरवे रामायण " असें म्हणण्यांत येतें. हाहि ग्रंथ षट्पदींत आहे. याच्या लेखकाचें खरें नांव माहीत नाहीं; पण त्याचें टोपण नांव मात्र " कुमार वाल्मीकी " असें आहे. इ. स. १५९० च्या सुमारास हा ग्रंथ लिहिला गेला असावा.

आणखी दोन भारताचे ग्रंथ या प्रांतांत झाले, पण त्यांचा फारसा प्रसार झाला नाहीं. एक लक्ष्मकवीनें केलेलें " लक्ष्मकवी भारत " व दुसरें शाल्व नांवाच्या जैन कवीनें लिहिलेलें " शाल्व–भारत. " शाल्व, कोंकणांत नगर–नगरी येथें राज्य करीत असलेल्या शाल्वमल्ल–नरेंद्र नांवाच्या राजाच्या पदरीं होता. यानें जैन परंपरेला धरून आपलें भारत तयार केलें आहे. सतराव्या शतकांतलें सुकुमार भारतीनें केलेलें आणखी एक भारत आढळतें.

" तोरवे रामायणा " नंतर लवकरच षट्पदी वृत्तांत " भागवत पुराण " झालें. त्याच्या कर्त्यानें आपलें नांव चाटु विठ्ठलनाथ असें दिलें आहे. त्याला नित्यात्मशुक असेंहि नांव आहे. भागवताच्या दहाव्या स्कंदांत कृष्णकथा असून, तोच भाग जास्त वाचण्यांत येतो. कानडी भागवत पुराणाच्या वेळेसच या दशम स्कंदाचें " कृष्णलीलाभ्युदय " नांवाचें स्वतंत्र कानडी पुस्तक तयार झालें. याचा कर्ता वेंकय आर्य नांवाचा माध्व ब्राह्मण होता. त्यानें हा ग्रंथ तिरुपतीच्या वेंकटसौरिसंज्ञक कृष्णमूर्तीला अर्पण केला आहे.

रामायणकथांमध्यें, तिम्मार्याचें " आनन्द रामायण, " तिप्पनार्याचा " हनुमद्–विलास " आणि तिरुमल वैद्याचें " उत्तर रामायण " या ग्रंथांचा निर्देश केला पाहिजे. तिम्मार्य आनेकलजवळील सादलि गांवचा होता. याच्या विषयीं अशी आख्यायिका आहे कीं, जरी तो शिकलेला पंडित नव्हता, तरी वयाच्या १५ व्या वर्षापासून त्याचा नैसर्गिक काव्यस्फूर्तीचा गुण दृग्गोचर होऊं लागला; रोज सकाळीं स्नान केल्यानंतर तो आपल्या तिम्मराय स्वामिदेवापुढें स्वतः पदें करून म्हणत असे व त्याचा एक नातलग तीं उतरून घेई. हीं पदें षट्पदी छंदांत असत.

लौ कि क भ क्ति प र प दें.—वैष्णवदास किंवा गांवोंगावीं हिंडणारे गवई भिकारी " रगळे " ( भावनाकाव्य ) वृत्तांत जीं लहान लहान पदें म्हणत त्या योगानें कृष्णभक्ति लोकांत बरीच फैलावली. यांना मध्वाचार्य व चैतन्य यांच्याकडून ही कृष्णगानाची स्फूर्ति मिळाली. इ. स. १५१० च्या सुमारास चैतन्य दक्षिण हिंदुस्थानभर हिंडून त्यानें सर्वत्र लोकांना

हरिनामं घेण्याविषयीं उपदेश केला. या कानडींतील भक्तिपर पद्यांपैकीं ४०२ पद्यांचा रे. डॉ. मोएग्लिंगनें संग्रह करून, त्यांतील १७४ मंगळूर येथें इ. स. १८५३ त छापिलीं. हीं " दासर पदगळु " या नांवानें प्रसिद्ध आहेत. या गवई-भक्तांपैकीं अगदीं जुना, अतिशय प्रख्यात व जबर लेखक म्हणजे पुरंदरदास; याचें वास्तव्य पंढरपूर येथें व अच्युतरायाच्या कारकीर्दींत विजयानगर येथें असे. हा १५६४ त म्हणजे तालिकोटच्या लढाईच्या आधीं एक वर्ष वारला. याचा समकालीन कनकदास बेड ( व्याध ) जातीचा असून, कागिनेले ( चितलदुर्ग किंवा धारवाड ) गांवचा रहाणारा असे. यानें प्रासंगिक पदांखेरीज, " मोहन तरंगिणी " ( आणि त्यांत कृष्णाविषयीं पौराणिक कथा ), " नलचरित्रे " (षट्पदी छंदांत ), " कृष्णचरित्रे " आणि " विष्णुभक्तिसार " हे ग्रंथ लिहिले. इतर गवयांचीं नांवें म्हणजे, विठ्ठलदास, वेंकटदास, विजयदास आणि कृष्णदास. यांपैकीं शेवटले तीघे उडुपीचे रहाणारे होते. या गवयांच्या पंक्तीला वराह तिम्मप्प दास यालाहि बसविलें पाहिजे. जबर लेखनाच्या बाबतींत याचा नंबर पुरंदरदास व कनकदास यांच्या खालीं लागेल. पण हा त्यांचा समकालीन नसून दोन शतकें पुढें हैदर अल्लीच्या वेळीं होऊन गेला. सागर हैदर अल्लीच्या हातांत पडल्यावर तो तिरुपतीला पळाला. उडुपीचा मध्वदास याचा समकालीन होय.

या सर्व पद्यांचा हेतु, सर्व देवांपेक्षां विष्णूला श्रेष्ठपणा देऊन लोकांनां त्याची उपासना करण्यास वळवावयाचें. या पद्यांपैकीं एकाचा निष्कर्ष असा आहे कीं:—" विष्णुतुल्य दुसरा देव नाहीं; शालिग्रामतुल्य दुसरें तीर्थ नाहीं; भारततुल्य दुसरा ग्रंथ नाहीं; वायुतुल्य दुसरें चैतन्य नाहीं; मध्वशिक्षेसारखी दुसरी शिक्षा नाहीं; ब्राह्मण जातीसारखी दुसरी जात नाहीं. " कृष्णलीला वर्णन करून, तीर्थयात्रा करण्याचा उपदेश या पद्यांतून केलेला असतो. हें जग कंटाळवाणें आहे, आपण निराश्रित व पापी आहोंत, बाह्य संस्कारांनां कांहीं किंमत नाहीं. आपण अन्तर्बाह्य शुद्ध झालें पाहिजे, आपणाला दैवी मदतीची जरूरी आहे, अशा प्रकारची लोकांत जागृति करून देऊनच सन्निध असणाऱ्या मृत्यूची व नरकयातनांची त्यांनां आठवण देऊन आयुष्य धर्माप्रमाणें कंठण्याचा लोकांना हीं पदें सदुपदेश करितात.

कृष्णोपासनेची लोकांत आवड उत्पन्न करणारा दुसरा ग्रंथ म्हणजे, अठराव्या शतकांत चिदानंदानें रचिलेला " हरि भक्तिरसायन " होय. शैव( वीर-शैव नव्हे )भक्तिरसायण म्हणून १७ व्या शतकांत सहजानंदानें षट्पदी छंदांत रचिलेला दुसरा एक असाच ग्रंथ आहे.

**सतराव्या व अठराव्या शतकांतील कानडी वाङ्मय.**—सतराव्या शतकांत व अठराव्या शतकाच्या आरंभीं, विशेष नामानिर्देश करण्यासारखे असे तीन लेखक होऊन गेले व त्यांपैकी प्रत्येकानें आपआपल्या शाखेंत कांहीं उत्कृष्ट असें वाङ्मय निर्माण केलें आहे. हे तिघे तीन मुख्य पंथातले होते. एक जैन, तर दुसरा लिंगायत व तिसरा वैष्णव ब्राम्हण होता. यांपैकीं कोणालाहि राजाश्रय नव्हता.

**भट्टाकलंक देवः**—हा दक्षिण कर्नाटकांतील हाडुवल्लि मठाच्या जैन गुरूचा शिष्य होता. तो संस्कृत व कानडी या दोनहि भाषांचा चांगला पंडित होता. १६०४ मध्यें त्यानें आपला मोठा कानडी व्याकरणाचा ग्रंथ ५९२ संस्कृत सूत्रांत पुरा केला; त्याला संस्कृतांतच वृत्ति व व्याख्या जोडली आहे. मूळ सूत्रांचीं पानें थोडीं भरतील पण त्यांची टीका त्यांच्या पन्नास पट मोठी. होईल. या ग्रंथाचें नांव " कर्णाटक शब्दानुशासनम्"असें आहे. प्रमुख कानडी लेखकांचे उतारे व मागील काळांतील अनेक प्रमाणभूत विद्वानांचे उल्लेख यांत देऊन ग्रंथाचें महत्व वाढविलें आहे. ही भाषा विद्वानांच्या नजरेस आणावी, तिला सुसंस्कृत करावी, उपयोग करतांना तिचें याथार्थ्य व सौष्ठव वृद्धिंगत व्हावें, ती संस्कृतप्रमाणें अभ्यासली जावी या हेतूनें भट्टाकलंक देवानें परिश्रम केले आहेत. जरी ग्रंथ संस्कृतांत आहे तरी कोणत्याहि कानडी वाङ्मयाच्या इतिहासांत त्याला स्थान मिळण्याइतक्या योग्यतेचा तो आहे यांत संशय नाहीं.

**षडक्षर देव.**—हा येलंदूरचा लिंगायत असून, एका येलंदूर जवळच्या एका मठाचा आधिपति होता. त्यानें संस्कृतांत व कानडींत पद्यरचना केलेली आहे. कानडींत त्याचे तीन ग्रंथ आहेत, ते " राजशेखरविलास "(१६५७), " वृषभेंद्रविजय " (१६७१) , आणि " शबरशंकरविलास " हे होत. यांपैकीं पहिल्या ग्रंथावरून त्याचा लौकिक झाला. " जैमिनिभारता" नंतरचें या भाषेंतलें अतिविख्यात् काव्य हेंच आहे. अत्युत्तम काळच्या चंपुपद्धतींत हें लिहिलेलें आहे. ही एक नमुनेदार पद्यकादंबरी असून यांतील वर्णनाची शैली बहारीची आहे. या कथेची रूपरेषा येणेंप्रमाणें:—

कथानायक राजशेखर धर्मावतीच्या गादीवर असलेल्या सत्येंद्र चोलाचा पुत्र होता, त्याच्याच बरोबर वाढलेल्या मितवचन नांवाच्या प्रधानपुत्राशीं त्याचा अत्यंत स्नेह असे. त्या दोघांनीं लंकेवर स्वारी केली व तेथें राजशेखरानें राजाच्या मुलीशीं लग्न लविलें. राजधानीस परत आल्यावर कांहीं दिवसांनीं सिंधुराजाकडून राजशेखरला दोन पाणीदार घोडे नजराणा म्हणून आले; तेव्हां त्यानें या गजबजलेल्या शहरांतून घोड्यावरून रपेट करूंया अशी आपल्या मित्रापाशीं गोष्ट काढली. ' एखाद्या प्राणहानीबद्दल देहांत शिक्षा सांगितली आहे व गुन्हेगाराचा दर्जा कितीहि उच्च असला तरी आपण कायद्याची अंमलबजावणी निःपक्षपातानें करूं अशी तुझ्या पित्याची प्रतिज्ञा आहे ' अशाप्रकारें राजपुत्राला आठवण देऊन त्याचें मन वळविण्याचा मितवचनानें बराच प्रयत्न केला. या गोष्टीचे सर्व परिणाम मी स्वतः भोगीन असें राजशेखरानें उत्तर देऊन, मितवचनासह तो घोड्यावर

वसून निघाला. मितवचनाला आपला घोडा न आवरल्यामुळें तो एका मुलाच्या अंगावर जाऊन त्याची हत्या झाली. मृत मुलाच्या आईनें राजाकडे फिर्याद नेली तेव्हां मीच खरा दोषी आहे असं राजशेखरनें कबूल केलं; व त्याला देहांत शिक्षा झाली. तेव्हां शोकानें मितवचनानें स्वतःलां मारून घेतलें व हें पाहून त्याच्या मातापिरांनीं आत्महत्या केली. राजशेखराची माता व पत्नी तसेंच करण्याच्या वेतांत होत्या. इतक्यांत शिवानें आड येऊन सर्वांनां उठविलें व सत्येंद्रचोलाची त्याच्या अढळ स्थैर्याबद्दल स्तुति करून त्याला स्वर्गांतलि सुखें अनुभविण्यास बरोबर नेलें.

लक्ष्मीशः—हा अर्सीकेरे तालुक्यांतील देवनूर गांवचा वैष्णव ब्राम्हण होता. हा प्रख्यात " जैमिनि भारता "चा कर्ता होय. याच्याविषयीं फार थोडी माहिती सांपडते. तसेंच याचा कालहि अद्याप निश्चित नाहीं. अठराव्या शतकाच्या आरंभीं याला घालण्यांत येतें. याचें काव्य सबंध षट्पदींत लिहिलें असून त्या छंदांतील हें उत्तम उदाहरण म्हणून देतां येईल. कथा सांगणारा जैमिनि मुनि आहे म्हणून या काव्याचें " जैमिनिभारत " हें नांव ठेविलें आहे. युधिष्ठिराच्या अश्वमेधीय अश्वाचा संचार यांत वर्णिला आहे. महाभारतांतल्या अश्वमेधपर्वाशीं याचें साम्य आहे (जैमिनि अश्वमेध व कानडी-जैमिनि भारत यांतील कथा एकच आहेत व अनुक्रमहि तोच दिसतो, तेव्हां संस्कृत जैमिनि अश्वमेधाचें हें कानडी रूपांतर असावें ). या काव्याचा गोषवारा असाः—

कौरवांनां जिंकल्यावर युधिष्ठिर अश्वमेध करण्याचा बेत करतो. भद्रावतीहून भीमानें अश्वमेधास योग्य अश्व आणिल्यावर तो द्वारकेहून कृष्णाला हस्तिनापुरीं घेऊन येतो. नंतर घोडा मोकळा सोडून कृष्णार्जुन ससैन्य त्याच्या रक्षणार्थ मागें राहतात. माहिष्मती, चंपकापुर, स्त्रीराज्य ( पांड्य-व मल्याळम् देश ), राक्षसप्रदेश, मणीपुर, रत्नपुर, सारस्वत आणि कुंतल या ठिकाणीं जाऊन घोडा परत जिंकलेल्या राजांसह हस्तिनापुरीं येतो.

या काव्याची गोडी मुख्यतः त्यांतील उपाख्यानांत असून त्यांतील निवडक उपाख्यानें चार आहेत तीं ( १ ) सुधन्व्याची कथा ( २ ) बभ्रूवाहनाची कथा ( ३ ) मयूरध्वजाची कथा व ( ४ ) चंद्रहासकथा.

म्है सू र च्या रा ज द र बा रें वा ङ्म यः-१७व्या व १८ व्या शतकांतील कानडी वाङ्मयाचे पोशिंदे मुख्यतः म्हैसूरचे राजे असत. ते अजमासें १६१० पासून स्वतंत्र झाले होते. या म्हैसूर शाहींतील बरींचशीं पुस्तकें " इतिहास " शाखेंतलीं आहेत. आतांपर्यंतचा म्हैसूरशाहीचा इतिहास खोदीव लेखांतून पहावा लागे; पण यापुढें ग्रंथरूपांत तो दिसूं लागत चालला. या ग्रंथांपैकीं कांहीं खालील होत; नंज कवीचें " कंठीरव नरसराजचरित्र " गोविंद वैद्याचा " कंठीरव नरसराज-विजय " हे दोन्ही ग्रंथ या राजाच्या कारकीर्दी-संबंधाचे ( १६३८–५९ ) आहेत; " देवराजविजय " हा चन्नार्य यानें दोड्ड देवराज ( १६५९–७२ ) याच्या कारकीर्दीचा लिहिलेला छंदोबद्ध इतिहास होय. " चिक्कदेवराज यशोभूषण " आणि " चिक्कदेवराज वंशावळि " ( १६७२–१७०४ ) यांचा कर्ता तिरुमलय्येंगार; आणि पुढ्या याचा " मैसूर अरसुगळ पूर्वाभ्युदय " ( १८१३ ). १७९६ मध्यें टिपूनें घोड्यांचे चणे शिजविण्यासाठीं जुन्या कानडी ग्रंथांचा उपयोग करण्याचा जो हुकूम सोडला होता त्या संकटांतून हा शेवटचा ग्रंथ निभावलेला आहे. म्हैसूरचा इतिहास लिहिण्याच्या कामीं विल्कसनें याला प्रमाणभूत मानिलें आहे. याच ठिकाणीं वीरराजेंद्र ( १८०८ ) यानें " राजेंद्रनामे " नांवाचा कुर्ग राजांचा लिहिलेला इतिहास उल्लेखणें उचित आहे.

कानडी वाङ्मयासंबंधांत चिक्कदेव रायाच्या कारकीर्दीचा ( १६७२–१७०४ ) विशेष नामनिर्देश करणें अवश्य आहे. त्याच्या आयुष्याचा पूर्वभाग येलंदुर येथें गेला. " राजशेखर " लिहिला गेला त्यावेळीं तो त्या ठिकाणीं असावा. तेथें विशालाक्ष नांवाच्या जैन पंडिताशीं त्याचा दाट स्नेह जमला. तो इतका कीं, चिक्कदेव १३ वर्षें ( १६५९–७२ ) आपल्या चुलत्याच्या बंदिशाळेंत असतां विशालाक्ष त्याच्या जोडीला असे. या गोष्टीमुळें चिक्कदेव वाङ्मयभोक्ता होऊन त्याला आश्रय देण्यास प्रवृत्त झाला असेल. त्यानें ऐतिहासिक साधनांचा मोठा मौल्यवान संग्रह करून ठेवला होता. दुर्दैवानें यांपैकीं बहुतेकांचा टिपूनें नाश करून टाकिला आहे. चिक्कदेवानें स्वतः तीन ग्रंथ केलेले आहेत ते " शेषधर्म " " चिक्क देव राज विन्नपम " आणि " चिक्कदेवराज षट्पदि विन्नपम् " शेवटचा तीस पद्यांचा धर्मपर ग्रंथ असून त्यांत नारायणाचें स्तवन आढळतें. त्याचा दुसरा दिवाण जो तिरुमलय्येंगार यानें वर सांगितलेल्या दोन इतिहासांखेरीज " शेष कलानिधि " ( चंपु ), " गीत गोपाळ " आणि " अप्रतिम वीरचरित्र " नांवाचा साहित्यशास्त्रावरील ग्रंथ असे ग्रंथ लिहिले. चिकुपाध्याय ( याला अलसिंगार्य असेंहि म्हणत ) नांवाच्या आणखी एका दिवाणानें चंपु, सांगत्य व गद्यांत तीस ग्रंथ केले. " विष्णुपुराण ", " रुक्मांगद चरित्र " आणि " दिव्यसूरि–चरित्र " हे चंपुग्रंथांत येतात. गद्य ग्रंथांत " विष्णुपुराणा "ची दुसरी एक प्रत, " शुकसप्तति " आणि " यदुगिरी माहात्म्य " यांसारखे ग्रंथ आहेत. विशिष्टाद्वैताचें प्रतिपादन करणारा " सात्विक ब्रह्म-विद्याविलास " याचाच आहे.

चिक्कदेवरायाच्या दरबारचे दुसरे लेखक म्हणजे, तिरुमलार्याचा भाऊ व " मित्रविंद गोविंद " या नाटकाचा कर्ता सिंगरार्य; आणि चिकुपाध्यायाची शिष्यीण व राणीची दासी असलेली कवयित्री होन्नम्मा हे होत. होन्नम्मानें पतिव्रता-धर्मावर 'हदिबदेयधर्म' " नांवाचें एक सांगत्य लिहिलें आहे.

लिं गा य त, जै न आ णि ब्रा ह्म णी पं थां चे ग्रं थ.— मध्यंतरीं लिंगायत, जैन व ब्राह्मण या निरनिराळ्या धार्मिक

पंथांचीं मतें प्रतिपादणारे ग्रंथ एका पाठोपाठ तयार होत होते.

सतराव्या शतकाच्या मध्यांत, निजगुणयोगी नांवाचा एक विद्वान् लिंगायत लेखक होऊन गेला. "विवेक चिंतामणी" (चंपु)—शैवविद्येचा एक प्रकारचा ज्ञानकोश; "कैवल्य पद्धति"–तात्विक विषयांवरील रगळे पद्यें; पुरातन त्रिपदि–६३ पुरातनांची (शैव साधूंची) त्रिपदि छंदांत माहिती; "परमार्थ गीता" आणि "परमानु बोधे" हे तीन वेदांत शिक्षेचे ग्रंथ हे निजगुणयोगीनें केलेल्या ग्रंथांपैकीं होत. "ब्रह्मोत्तर खंड" किंवा "शिवकथामृतसार" हा कोणी अज्ञात कवीनें षट्पदि छंदांत केलेला ग्रंथ याच काळांतील आहे. १६८० च्या सुमारास जेव्हां चिक्कदेवरायानें जंगम धर्मोपदेशकांची कत्तल करून लिंगायत मठ उध्वस्त केले, तेव्हां लिंगायत संप्रदायाचें बरेंच नुकसान झालें. व यापुढें थोडेच लिंगायत ग्रंथकार झालेले दिसून येतात. १७६० च्या सुमारास दळवायि (म्हैसूर संस्थानचे परंपरागत सेनापति) घराण्यांतील नंजराजानें "शिवभक्तिमहात्म्य", "हरिवंश", "लिंगपुराण" हे ग्रंथ लिहिले. याच काळांतील सर्वज्ञमूर्ति यानें "सर्वज्ञ पदगळु" हें त्रिपदि छंदांतलें काव्य रचलें. यांत बरींच सुभाषितें असून तीं लोकांच्या नेहमीं तोंडीं आहेत. त्यांचीं कित्येक सामाजिक, धार्मिक व नैतिक पद्यें चांगलीं प्रचलित आहेत. मराठी वाङ्मयांत तुकारामाचा जो दर्जा, तोच कानडींत सर्वज्ञाचा आहे.

जैन संप्रदायाचे या दोन शतकांतील कांहीं ग्रंथ येणेंप्रमाणेः—

"जिनमुनितनय" कर्ता नूतनागचंद्र; "जिनभारत" कर्ता ब्रह्मकवि; "जिनस्तोत्रसंग्रह" आणि "तीर्थंकरपुराण" (गद्य); "पद्मावती देवी कथे" (रगळे). १७६१ मध्यें सुराल यानें पश्चिमकिनाऱ्यावरील एका राजकन्येकरितां हें रचिलें; १८०० त देवचंद्र यानें म्हैसूर राजघराण्यांतील एका राजकन्येकरितां जैन इतिहास व कथा यांचें सार "राजावळि कथे" (गद्य) या ग्रंथांत काढिलें; यानें पंप रामायणाच्या आधारें "रामकथावतार" (गद्य) रचिलें.

ब्राह्मणी सांप्रदायिक ग्रंथांत प्रसिद्ध असे ग्रंथ दोन. ते १७ व्या शतकांतील महालिंग रंग याचा "अनुभवामृत" (षट्पदी) आणि १८ व्या शतकांत चिदानंद अवधूत यानें केलेला "ज्ञान सिंधु" हे होत. हे दोनहि वेदावरील ग्रंथ आहेत.

**लहान गोष्टींचे संग्रह.**—या काळांत वाङ्मयाची दुसरी महत्वाची जी शाखा उदयास आली ती नवलकथांची. विशेषतः लहान कथांच्या संग्रहरूपांत असणाऱ्या नवलकथांची—होय. हे संग्रह बरेचसे गद्यांत असून त्यांचे वाचकहि बरेच आहेत. त्यांचीं मुळें संस्कृतांत आहेत व कोणत्या तरी रूपांत ते सर्व हिंदुस्थानच्या माहितीचे आहेत. या प्रकारच्या कानडी ग्रंथांपैकीं नामनिर्देश करण्यालायक म्हणजे खालील होतः—

"पंचतंत्र":—याची चंपूवृत्तांतलि प्रत ११४५ त दुर्गसिंहानें केलेली पूर्वी उल्लेखिलेली आहेच. कानडींत पंचतंत्राच्या अनेक गद्य प्रती असून त्यांतलि गोष्टींचा अनुक्रमहि निराळा आहे.

"बत्तीस पुत्तळि कथे":—मराठींतलि सिंहासनबत्तिशीप्रमाणें सिंहासनाच्या पायऱ्यांवरील ३२ पुतळ्यांनीं भोजराजाला सांगितलेल्या विक्रमादित्याविषयींच्या ३२ कथा.

"वेताळपंचविंशति कथे"—हा ग्रंथ चंपु, त्रिपादि आणि गद्य या तीन स्वरूपांत आहे. त्यांत उज्जनीच्या विक्रमाला कांहीं सिद्धींच्या प्राप्तीसाठीं रात्रीं अगदीं मुकाट्यानें झाडावरून एक प्रेत नेण्याला कसें सांगितलें तें दिलें आहे. विक्रम पंचवीस वेळां प्रयत्न करतो व प्रत्येक वेळीं एक वेताळ येऊन त्याला हाटकतो व कांहीं गोष्ट सांगून शेवटीं एक कोडें घालतो; विक्रमाचें चित्त आकर्षिलें जाऊन तो बोलावयास उद्युक्त होतो व अशा रीतीनें आपला कार्यनाश करून घेतो.

"शुकसप्तति":—जिचा नवरा प्रवासाला गेला आहे अशा एका युवतीला एका शुकानें सांगितलेल्या सत्तर गोष्टी.

"कथामंजरि" व 'कथासंग्रह":-निरनिराळ्या ठिकाणच्या बोधप्रद गोष्टी.

"तेन्नल रामकृष्ण कथे":— विजयानगरच्या कृष्णराजा (१५०८–३०) च्या वेळच्या आनेगुंदि येथील दरबारी नकल्याच्या हंसवणाऱ्या कथा यांत आहेत. यांतील एक पुढें दिली आहे.

**कानडी विनोदाचा एक नमुना.**—तेन्नाल रामकृष्ण व कुबडा मनुष्यः—नेहेमीच्या पेक्षां जास्त धिटाईनें एके दिवशीं तेन्नालरामकृष्णानें राजाची मस्करी केली त्यामुळें रागावून राजानें त्याला मारण्याचा निश्चय केला व "गळ्यापावेतों जमीनींत पुरून हत्तींकडून त्याला तुडवा" असा हुकूम सोडला. त्याप्रमाणें राजरक्षकांनीं तेन्नालरामाला उघड्या मैदानांत नेलें व तेथें एक खड्डा खणून त्यांत त्याला घातलें व डोक्यापावेतों वर माती लोटली. नंतर राजरक्षक राजाचा हत्ती घेऊन येण्यास निघून गेले. ते निघून गेल्यावर एक कुबडा त्या रस्त्यानें आला व जमीनीच्या वर माणसाचें फक्त डोकेंच दिसत असलेलें पाहून त्याला आश्चर्य वाटलें व तो सहाजिकच हें असें कसें घडलें म्हणून तेन्नालीरामाला विचारूं लागला. तेन्नालीरामानें उत्तर दिलें कीं, "बरींच वर्षें मला कुबडानें फार त्रास दिला होता व त्यापायीं मीं वैद्यांनां सर्वस्व दिलें पण कोणीहि मला बरा करीना, तेव्हां कोणी एकानें असा उपाय सुचविला कीं 'जर डोक्यापर्यंत जमीनींत पुरून घ्याल तर खात्रीनें तुमची पाठ आपोआप सरळ होईल. कधीं बरा होईन असें मला झाल्या कारणानें

मी माझ्या मित्रांनां तसें मला पुरून टाकण्यास विनंति केली. मला आतां कोणी वर काढण्यास पाहिजे." हें ऐकून कुबड्यानें माती उकरून त्याला बाहेर काढलें. तेव्हां तेन्नालराम मोठा आनंद व्यक्त करून म्हणाला "पहा माझें कुबड पार गेलें व मी आतां चांगला सरळ झालों आहे! आतां तूं आंत हो व आपलें कुबड बरें करून घे" यावर तो मनुष्य आंत उतरला व तेन्नालरामानें वर माती लोटली, आणि तेथून निघून जाऊन लपून बसला. जेव्हां राजरक्षक हत्तींनां घेऊन परत आले तेव्हां दुसराच मनुष्य त्या ठिकाणीं पुरलेला पाहून त्यांनां आश्चर्य वाटलें. त्या कुबड्याची हकीकत ऐकून त्यांनीं ती राजाला सांगितली. तेव्हां राजाला त्या नकल्याच्या थट्टेचें व कल्पकतेचें इतकें हंसू आलें कीं त्याचा सर्व राग मावळला व त्यानें तेन्नालरामाला क्षमा करून त्याला परत नोकरीवर घेतलें.

अ र्वा ची न यु ग, १९ वें शतकः—१९ व्या शतकापासून हिंदुस्थानांतलि ब्रिटिश राज्य, यूरोपीय संस्कृतीचा आघात आणि पाश्चात्य शास्त्रीय दृष्टीनें संशोधन व पांडित्य यांचा प्रवेश, यांच्या परिणामामुळें कानडी वाङ्मयांत एका अगदीं नवीन युगाला सुरुवात झाली. देशांतील शिक्षणाच्या पाश्चात्य पद्धतीवर झालेल्या मांडणीमुळें लोकांची वाचनाभिरुचि वाढली. त्याबरोबर स्ववाङ्मयाचें ज्ञान व आस्थाहि वाढली. हल्लींचें वाङ्मय बहुधा गद्यरूपांतच असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

स द्यः प्र य त्नां चे व र्गः—या काळांतील सर्व ग्रंथ व ग्रंथकार न सांगतां फक्त त्यांच्या परिश्रमांची दिशा दाखविण्यासाठीं या काळांतील विशिष्ट प्रयत्नांचे वर्ग पाडून कांहीं थोडीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

( अ ) बरेचसे शैक्षणिक ग्रंथ निघालेले असून ते हळूहळू जास्त जास्त योग्यतेचे तयार होत असलेले दृष्टीस पडतात. त्यांत भाषा, इतिहास, गणित, शेतकी, आरोग्य, वैद्यक व इतर विषयांवर ग्रंथ आहेत. अशा रीतीनें शास्त्रीय वाङ्मयास सुरुवात झाली आहे. फलज्योतिष आणि शकुन यांवरील ग्रंथांनां अद्याप बरीच मागणी आहे. तथापि निश्चित शास्त्रांची वाढ झाल्यावर हे मार्ग पडतलि असा भरंवसा आहे.

( आ ) जुन्या ब्राह्मणी काव्यावर विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं बऱ्याच टीका तयार झालेल्या आहेत. पण प्राचीन जैन साहित्यग्रंथावर ( तो धर्म लोकांच्या मनांतून उतरल्यामुळें ) टीका करण्याचें कोणाच्या मनांत आलें नाहीं.

( इ ) "यक्षगाना"च्या धर्तीवर लिहिलेल्या महाकाव्यांतील गोष्टींचा एक वर्ग पडतो. धंदेवाईक किंवा हौशी नटांनीं गांवढळ श्रोतृवृंदांपुढें म्हणण्याला योग्य अशा नाटकी पद्धतीवर या गोष्टी लिहिलेल्या असून त्या फारच लोकप्रिय आहेत. शांतय्या नांवाच्या गिरसप्पा येथील एका ब्राह्मणानें अशा तऱ्हेची बरीच रचना केलेली आहे.

उच्च दर्जाचीं नाटकें हल्लीं तयार होऊं लागलीं आहेत. मागील शतकांत ही वाङ्मयशाखा बहुतेक दुर्लक्षिली गेली होती. या संबंधांत पुढील नाटकांचा विशेष उल्लेख केला पाहिजे. "तपतीपरिणय" कर्ता, चामराजनगर तालुक्यांत सरगूर येथें राहाणारा वेंकटवरदाचार्य; "शकुंतला" हें चामराजेंद्र वोडेयर( १८६८–१८९४ )चा दरबारी कवि बसवप्पाशास्त्री यानें संस्कृतावरून तयार केलें.

( ई ) कादंबऱ्या जास्त लोकप्रिय होत चालल्या आहेत. आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांपैकीं बहुतेक इंग्रजी व बंगाली कादंबऱ्यांचीं रूपांतरें आहेत. शेक्सपियरच्या बऱ्याचशा नाट्यकथा यांत आहेत, उदा. "भ्रांतिविलास", "जयसिंहराज चरित्रे", "पंचाल परिणय" इत्यादि. बाबू बंकिमचंद्र चट्टोपाध्याय व सुरेंद्रनाथ यांच्या कादंबऱ्यांचीं रूपांतरें—विशेषतः रा. बी. व्यंकटाचार्य यांनीं केलेलीं आहेत. यांपैकीं प्रसिद्ध म्हणजे "दुर्गेशनंदिनी" होय.

( उ ) दैनिक किंवा साप्ताहिक वर्तमानपत्रें, मासिकें यासारखें नियतकालीन वाङ्मय या काळचें वैशिष्ट्य गणलें जातें. या वाङ्मयापैकीं कांहीं स्त्रीवाचकांकरितां मुद्दाम तयार केलेलें असतें. कांहीं सरकारी खात्यांचें, तर कांहीं समाजांतील विशिष्ट वर्गांचें ( उदा. वोक्कालिगर पत्रिके ) मुख म्हणून प्रसिद्ध होतें. म्हैसूर येथें प्रसिद्ध होणाऱ्या "वृत्तांत पत्रिके" नांवाच्या साप्ताहिकाचा बराच खप आहे.

( ऊ ) सर्व निरनिराळे संप्रदाय आपलीं तत्वें व देवता यांचा लोकांत प्रसार करण्याकरितां एकसारखें ग्रंथप्रकाशन करीत असतात. तिसरा कृष्णराज वोडेयर (१७९९–१८६८) याच्या आश्रयाखालीं बरेच ब्राह्मणी ग्रंथ तयार झाले. त्यांत "कृष्णराजवाणीविलास" नांवाची महाभारताची गद्यप्रत आहे. दुसरे ग्रंथ भक्तिसार वर्गांतले किंवा नीतिप्रबोधनाचे आहेत. कांहीं अर्वाचीन आस्तिक्यमताचे आहेत. या वर्गांत खालील ग्रंथांचा विशेष नामनिर्देश केला पाहिजे. रा. आर नरसिंहाचार्यांचा "नीतिमंजरी";—यांत कांहीं तामिळी नीतिग्रंथांतील भाग प्राचीन कानडी पद्यरूपांत उद्धृत केलेले आहेत; 'मूदरै' आणि "नलवले" कर्ता औवैः "नालडियार" इत्यादि.

या वाङ्मयांत ख्रिस्त्याचाहि प्रवेश झाला आहे. बायबल त्यावरील टीका; हिंदु ख्रिस्ती समाजाकरतां ख्रिस्त्याचा इतिहास व वचनें यासंबंधीं ग्रंथ; बनियनचें 'देशांतरीय प्रयाण' किंवा "यात्रिक संचार;" ऑगस्टिनचें आत्मनिवेदन इत्यादि ख्रिस्ती साहित्य ग्रंथांचीं भाषांतरें; आणि ख्रिस्ती धर्मोपासनार्थ सांगत्यें म्हणजे गाणीं यांवरून हें दिसेलच.

प्रकाशनाला सुरवात ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं करून दिली व त्यांनींच टाइपांमध्यें चांगली सुधारणा करून कानडीला ऋणी करून ठेविलें आहे. त्याचप्रमाणें भाषा व वाङ्मय यांचा काळजीपूर्वक अभ्यास करण्याचा धडा मिशनऱ्यांनींच घालून दिला आहे. उदाहरणार्थ पुढील ग्रंथ पहाः— बल्लारीच्या रे. डब्ल्यू. रीव्ह याचे "इंग्लिश–कर्नाटका" आणि "कर्नाटका-

इंग्लिश " कोश; रे. एफ. किटेल याचा " कन्नड इंग्लिश डिक्शनरी " कोश व ऐतिहासिक " कन्नड ग्रामर " नांवाचा व्याकरणग्रंथ; याच पंडितानें केलेले " छंदोंबुधि " व शब्दमणिदर्पण हे ग्रंथ; याशिवाय रे. मोएग्लिंग, वागिल, वुर्थ इत्यादिकांचे उपयोगी ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

- कानडी वाङ्मयाची सद्यःस्थिति व उत्कर्ष.— जर्मन मिशनरी आणि म्हैसूर सरकारच्या पुराणवस्तु खात्यांतील राइस आणि त्यांचे मदतनीस यांच्या संशोधनांनीं कानडी वाङ्मयाचें भांडार उघडकीस आलें आहे. त्यांतील मुख्य मुख्य लेखकांचा काल आणि त्यांच्याविषयीं वरीचशी माहिती उपलब्ध झाली आहे. म्हैसूर येथें स्थापलेल्या ओरिएन्टल लायब्ररीमध्यें हस्तलिखितांचा मोठा संग्रह आहे. " विब्लीओथेका कर्नाटिका " मध्यें अनेक महत्वाचे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत आणि " काव्यमंजरी " व " काव्यकलानिधि " या दोन ग्रंथमालांतून खासगी रीतीनें ग्रंथ प्रसिद्ध होत आहेत. १९१५ सालीं म्हैसूर सरकारच्या आश्रयानें " कन्नडसाहित्य परिषद " नांवाची एक संस्था स्थापण्यांत आलेली आहे. कानडी प्रदेशांतील सर्व भागांतील प्रतिनिधी तींत आहेत. हिचा उद्देश पूर्वीच्या वाङ्मयाचा अभ्यास करण्याचा आणि प्रस्तुतचे गुणी ग्रंथकार ह्यांनां आश्रय देण्याचा आहे. शिवाय भाषेची जोपासना व वाढ हेहि या संस्थेचे हेतू आहेत. ही जोपासना व वाढ व्हावयाची ती पोटभाषांचें एकीकरण, शास्त्रीय परिभाषा ठरविणें, आणि सामान्य वाङ्मयीन भाषासरणी वनवणें, यांच्या योगानें होणार आहे. भाषा एकसारखी वदलत असल्यानें वरील क्रियांची फार आवश्यकता आहे. हल्लींचें वरेंचसें वाङ्मय व याच्या पुढीलहि, पद्यांतलें न होतां गद्यांतलेंच होईल. म्हणून शब्दकोश आणि सामान्य वाचकांनां कळण्याजोगी धाटणी उपयोगी होणार आहे. पूर्वींचे जुने शब्द व रूपें रूढींतून जातील. अर्वाचीन लेखकांनीं नवीन युगाच्या कल्पना लोकांपुढें मांडतांना भाषेचे दोष वगळले पाहिजेत. हे दोष पुढील कारणामुळें होतातः—

( १ ) म्हैसूरमध्यें मुसुलमानी राज्य असतां फारशी भाषा दरवारच्या कामांत उपयोगांत आणली जाई; म्हणून जुन्या कानडीमध्यें फारशी शब्द व म्हणी विनाकारण बऱ्याचशा आढळून येतातच पण अजून देखील सरकारी कागदपत्रांत दिसून येतात. कशा तऱ्हेनें कानडी लिहावयाचें नाहीं याचें सरकारी कागदपत्र हें उदाहरणच बनलें आहे. इंग्रजी शिकलेले कानडी लोक बोलण्यामध्यें इंग्रजी भाषा वापरतात व त्यामुळें परभाषामिश्रणाच्या वावतींत वरील प्रमाणेंच स्थिति झाली आहे. घाईघाईनें लिहिलेल्या वर्तमानपत्रांतील लेखांतून हे दोष वरेचसे दृष्टीस पडतात आणि वाचकांना तीच संवय लागून त्यांची भाषा विघडते.

( २ ) कानडीची ही एक मजा आहे कीं, इंग्रजीमध्यें येणारे विराम आणि उद्गारचिन्हें यांची तिला गरज लागत नाहीं. तथापि अर्वाचीन कानडी ग्रंथांतून ही चिन्हांची पद्धत आल्याकारणानें भाषा ओवडधोवड दिसते व त्यामुळें लिहिण्याची धाटणी गचाळ होऊन तिच्यापासून वोध होण्याला वराचसा त्रास पडतो.

( ३ ) ग्रंथांतून दिसून येणारी आणखी एक वाईट पद्धत नालायक भाषांतरकारांमुळें पडली आहे. इंग्रजीप्रमाणें गुंतागुंतीचीं वाक्यें करून कानडींतील मूळची साधी धाटणी विघडून टाकली आहे. कानडी वाक्य मोठें असलें तरी त्यांत एकमेकांवर अवलंबून असलेलीं पोटवाक्यें फारशीं आढळत नाहींत व त्यामुळें प्रधान-गौणांचा प्रश्न पुढें येत नाहीं व अर्थवोधाची हानी होत नाहीं. अशा तऱ्हेनें परकीय भाषांचा प्रवेश कानडी भाषेंत झाल्याकारणानें तिचें मूळचें स्वरूप वदलत चाललें आहे.

या आक्षेपाच्या यथार्थतेविषयीं वराच मतभेद होण्याचा संभव आहे. कानडीवर कांहींतरी अर्वाचिन जगाचे व पूर्व परिस्थितीचे परिणाम होणारच. कानडी वाङ्मय समृद्ध करण्याकरितां पाश्चात्य भाषांचा असा उपयोग करावा कीं, त्यायोगानें नवीन उच्च कल्पना त्यांत येऊन जगभर पसरलेल्या दळणवळणापासून अस्तित्वांत येणाऱ्या गोष्टींचें आविष्करण करण्यास चांगलें शब्दभांडार तयार होईल.

कानडी वाङ्मयांतील कांहीं विशिष्ट गोष्टीः— (१) आपणांस असें दिसून येईल कीं, कानडी लेखकांचा कल सर्वस्वी पारमार्थिक आहे. जर व्याकरणें आणि भाषाग्रंथ वगळले तर १९ व्या शतकापर्यंत ज्याचा परमार्थाशीं संबंध नाहीं असा ग्रंथ क्वचितच सांपडेल. त्याकाळचा इतिहासहि पारमार्थिक विचारांचा आणि चळवळींचा इतिहासच होईल. पौराणिक कथेंतच लेखकांनीं आपलें कौशल्य खर्चिलें आहे. आणि प्रत्येक ग्रंथ उघडतांच देवता आणि कर्त्यांच्या संप्रदायांतील साधुसंत यांची भली लांवलचक स्तुति आढळून येते. याव्यतिरिक्त इतर इतिहास पाहण्याचा झाल्यास पुढील काळांत पहावा लागेल.

(२) १९ व्या शतकापर्यंतचें वरेचसें वाङ्मय पद्यांत आहे. जैन कवींनीं चंपु नांवाच्या पद्धतीचा उपयोग केला आहे. व मधून मधून पद्यमय खंडांतून गद्यांतील उतारेहि घातलेले आहेत. पण संबंध गद्यग्रंथ अलीकडे कांहीं वर्षांपावेतों अगदीं थोडे होते. साध्या वोलण्याच्या सुरांत कानडी पुस्तक वाचल्यास त्यांतील स्वारस्य जातें, कारण तें गाण्याकरितां रचलेलें असतें. काव्य वरोवर रीतीनें गाइल्यास कर्त्याचें पदलालित्य, अलंकार आणि छंद नवरेस पडून तें ऐकण्यालाहि गोड लागतें ज्यांनां अर्थ कळत नाहीं ते सुद्धां हें गाणें आनंदानें ऐकतील.

(३) काव्य आणि साहित्य या ग्रंथांनां शब्दांचीं प्राचीन रूपें आणि हल्लीं रूढ नसलेले शब्द व त्याचप्रमाणें संस्कृत परिभाषा यांची जरूरी लागते. त्यामुळें सामान्य कानडी मनुष्याला मोठाल्या ग्रंथकारांचा अर्थ ध्यानांत येत नाहीं.

अशीं पुस्तकें पंडितांकरितां लिहिलेलीं असतात. प्राथमिक शाळांतून जैमिनीभारतासारख्या ग्रंथांतील मोठमोठे भाग अर्थज्ञानाशिवाय मुलांकडून पाठ करुन घेण्याची पद्धत सार्वत्रिक आहे.

(४) लेखांतील विनोद आणि कल्पकता यांची जी इतर भारतीयांत फार आवड असते ती कन्नडांत देखील आहेच. द्व्यर्थी किंवा अनेकार्थी भाग ज्यांत आहे असे ग्रंथ तयार करणाऱ्याचा फार लौकिक होतो. एकापुढील एक शब्द ओळीनेंच लिहिले जातात त्यामुळें अक्षरें अनेक रितींनीं विभागतां येतात व त्यामुळेंच श्लेषाला मदत होते. अशाच पद्धतीवर लिहिलेला असा एक संस्कृत ग्रंथ आहे कीं, तो एका पद्धतीनें विभागल्यास ती रामायणकथा होते व अन्य तऱ्हेनें विभागल्यास ती महाभारतकथा होते. श्लेष आणि विरुद्ध शब्द यांचा उपयोग केल्याच्या योगानें दोन गोष्टी घडतात; एक म्हणजे कवीच्या ग्रंथांचें विवेचन करण्यासाठीं सविस्तरपणें टीका लिहाव्या लागतात, आणि दुसरी गोष्ट म्हणजे कानडी पद्याचें शब्दशः भाषांतर करणें जवळ जवळ अशक्य होतें; कारण मुळांतला अर्थ देण्यास श्लेषालंकाराचें संपूर्ण विवेचन करावें लागतें.

(५) कमळ, भ्रमर, वीची, इत्यादि अनेक ठराविक उपमांचा कवि आपल्या काव्यांत मोठ्या चातुर्यानें उपयोग करीत असतो. त्याचा कोणाला कंटाळा येत नाहीं. कांहीं उपमा वस्तुस्थितीशीं जुळत नसल्या तरी त्या काव्यांत शोभतात. उदाहणार्थ चकोर पक्षी केवळ चंद्रकिरणांवर आपली उपजीविका करितो, कमळें नद्यांतून वाढतात, अशोकांच्या झाडाला फळ येत नाहीं, चंद्रविकासी कमळें फक्त रात्रीं फुलतात इत्यादि. बाराव्या शतकांतील " काव्यावलोकन " ग्रंथांत याच्याविषयीं एक मजेदार प्रकरण आढळतें.

(६) पाश्चात्य वाङ्मयांत चांगलें आढळणारें शुद्ध मानवी प्रेम हिंदुस्तानांतील काव्यांत आढळत नाहीं याचें कांहीं अंशीं कारण स्त्रियांचा कनिष्ठ दर्जा हें होय. बहुतांशीं बालविवाहामुळें हें घडत असावें. येथें स्त्रीपुरुषांनां तरुणपणीं अविवाहित स्थितींत अनुनयाला व परस्पराविषयीं नैसर्गिक लज्जा, आदर यांना अवसर सांपडत नाहीं. हें एक खरें कीं बालविवाहामुळें तरुणांनां विघडण्याची भीति कमी असते. पण वाङ्मयावर दुर्दैवानें त्याचा असा परिणाम होतो कीं, प्रियेबद्दल एखादी गणिका पहावी लागते, व शुद्ध प्रेमाची आरोग्यशील भावना जाऊन त्याच्या जागीं काव्यग्रंथाला हानि करणारीं अनेक कामुक वर्णनें येतात. याला अपवाद म्हणून सीता व दमयंती यांचीं हृदयंगम उदाहरणें देतां येतील. कांहीं कानडी लेखक आपल्या भाषेंत चांगले प्रवीण आहेत, तरी जगाच्या ज्ञानांत व स्फूर्तींत त्यांनीं अतिशयच थोडी भर टाकिली आहे. आपल्या भाषेचा व्याकरणदृष्टीनें अभ्यास, बदलणाऱ्या ऋतुमानांचीं वर्णनें यांत ते बरेच पुढें गेलेले आहेत. पण मनुष्याला अक्षय्य हितकारक अशा प्रश्नासंबंधीं नवीन व कायमचे विचार यांच्यांत कमी दृष्टीस पडतात. हे निवृत्तिमार्गी असल्यामुळें मोठ्या कार्यांनां लागणारी आशा व स्फूर्ति ह्यांच्यामध्यें नाहीं. त्यांच्या कल्पना पौराणिक कथांच्या भोंवतीं फक्त फिरतात. स्फूर्ति देणारा चांगला उपदेशक किंवा तत्ववेत्ता यांच्यांत नाहीं. हें विवेचन कानडीप्रमाणें अनेक आर्वाचीन भारतीय वाङ्मयांना लागू पडेल. मराठींत मात्र गणिकाप्रेमाचीं काव्यें नाहींत.

कानडी भाषाशास्त्रकार.—प्राचीन काळापासून कानडी ग्रंथकारांनीं व्याकरण, साहित्य आणि काव्यकला ह्यांच्यांत बरेचसें कौशल्य दाखविलें आहे. हे ग्रंथ अनेक शतकांतले आहेत. बरेचसे वैय्याकरणी जैन असून कानडी वाङ्मयाला त्यांनीं चांगला हातभार लाविला आहे. इसवी सन ५०० मध्यें देवानंदी पूज्यपाद यानें " जैनेंद्र " नांवाचा एक संस्कृत व्याकरणग्रंथ लिहिला असल्याचें मागें सांगितलेंच आहे. तेराव्या शतकांतल्या बोपदेवानें संस्कृत व्याकरणावरील आठ आधारभूत ग्रंथांमध्यें ह्याचा समावेश केला आहे. " अनेकशेष व्याकरण " असें ह्याचें दुसरें नांव आहे.

इ. स. ८५० च्या सुमारास " कविराजमार्ग " नांवाचा एक साहित्य ग्रंथ तयार झाला. काव्यादर्श या दंडीच्या ग्रंथावर याची उभारणी आहे.

इ. स. ९८४ च्या सुमारास पहिला नागवर्मा यानें " छंदोंबुंधी " म्हणून कानडी छंदावर एक ग्रंथ लिहिला. त्यांतील प्रत्येक पद्य त्या त्या छंदाचें उदाहरण म्हणून आहे. १८७५ सालीं डॉ. किटेल यानें तो छापून प्रसिद्ध केला.

बाराव्या शतकांत याच नांवाचा दुसरा एक वैय्याकरणी होऊन गेला. यानें दोन प्रख्यात व्याकरणग्रंथ ( एक कानडी पद्यांत आणि दुसरा संस्कृत सूत्रांत ) लिहिले. पहिल्याचें नांव " शब्दस्मृति " असें आहे. काव्यावलोकन नांवाच्या मोठ्या ग्रंथाचा तो पहिला भाग आहे. काव्यनिबंधावर हा ग्रंथ असून भाषा, व्याकरण, निबंधांतील दोष आणि सौष्ठव व काव्याचे नियम एकापुढें एक प्रकरणांत दिले आहेत. " कर्नाटकभाषाभूषण " हा याचा दुसरा ग्रंथ असून यांत २६९ सूत्रांत व्याकरणाचे नियम आणि वृत्ती संस्कृतमध्यें दिल्या आहेत. संस्कृत-कानडी कोशहि यानें केला असून अशा तऱ्हेचा हा पहिलाच ग्रंथ आहे. त्याचें नांव " वस्तु कोश " असें आहे. अमरकोशाचा त्यांत उल्लेख आहे.

पुढील शतकांत केशिराज यानें " शब्दमणिदर्पण " नांवाचा कानडी भाषा-ग्रंथ लिहिला. " कंद " छंदांत भाषा-नियम दिले असून गद्यांत त्याच्या वृत्तीहि दिल्या आहेत. डॉ. किटेलनें १८७२ सालीं तो टीकेसहित प्रसिद्ध केला. तामीळ आणि तेलगु भाषा-ग्रंथांच्यापेक्षां शब्दमणिदर्पणाचें महत्व फार आहे. त्यांत प्रख्यात ग्रंथकारांचे

उल्लेख केले आहेत. ऐतिहासिक व शास्त्रीयदृष्ट्या हा ग्रंथ फार मौल्यवान आहे.

१६०४ सालीं "कर्नाटक शब्दानुशासन" नांवाचा ५९२ संस्कृत सूत्रांत भट्टाकलंकदेव यानें एक सटीक व्याकरणग्रंथ लिहिला. कानडी भाषेच्या अभ्यासकांनां उपयुक्त असे आणखीहि खालील ग्रंथ होत. ते कालानुक्रमानें पुढें दिले असून ज्यांच्या पुढें 'जै' असें आहे तो ग्रंथ जैन लेखकानें तयार केला आहे असें समजावें.

उदयादित्य ( सुमारें ११५० ). यानें काव्यकलेवर ७२ खंडांत "उदयादित्यालंकारम्" नांवाचा लिहिलेला ग्रंथ. आंडय (जै.) (सुमारें १२३५) याचा "कब्बिगर काव". नाचिराज ( सुमारें १३०० ), (जै.) याचा 'अमरकोश व्याख्यान' नांवाचा अमरकोशावरील टीकात्मक ग्रंथ. "कर्नाटक शब्दसार" ( सुमारें १३५० ) नांवाचा १४१६ शब्दांचा एक गद्य कोश. अभिनव भंगराज (जै.) (सुमारें १३९८) याचा "अभिनव निघंटु" नांवाचा संस्कृत शब्दांचा कानडींत अर्थ दिलेला कोशग्रंथ. बोमरस(सुमारें १४५०) याचा "चतुरास्य निघंटु" यांत १३० खंडांत दिलेले समानार्थक शब्द आहेत. लिंग (सुमारें १४६०) याचा "कब्बिगर कै-पिडी" हा शैव कवींसाठीं लिहिलेला ९९ पद्यांतील समानार्थक शब्दकोश आहे. तोटदार्य (सु. १४८०) याचा "कर्नाटकशब्दमंजरी" हा तद्भव आणि कानडी शब्द यांचा कोश. माधव (सु. पंधरावें शतक. )याचा दंडीच्या काव्यादर्शाचें भाषांतर केलेला 'माधवालंकार' नांवाचा ग्रंथ. ईश्वर कवि ( सु. १५१० ) याचा "कविजिव्हांबंधन" हा छंद, साहित्य आणि इतर विषय यांवरील ग्रंथ. "कर्नाटक संजीवन" (सोळावें शतक) नांवाचा शब्दकोश. देवोत्तम ( सोळावें शतक) (जै.) याचा "नानार्थरत्नाकर" नांवाचा संस्कृत शब्दकोश. शाल्व (सोळावें शतक ) (जै.) याचा "रसरत्नाकर" नांवाचा नाट्यावरील ग्रंथ. अभिनवविद्यानंद (सोळावें शतक), याचा "काव्यसार" नांवाचा काव्यावरील ग्रंथ. तिप्परस ( सोळावें शतक), याचा "नवरसालंकार" नांवाचा रस आणि साहित्यालंकारावरील ग्रंथ. "कविकंठाहार" (सुमारें १६१०) नांवाचा समानार्थक शब्दांचा छंदोबद्ध ग्रंथ. तेसमलपंगार ( सुमारें १७०० ), याचा "अप्रतीम वीर चरित्र" ग्रंथ इत्यादि.

आतां कांहीं कानडी व्याकरण-परिभाषांच्या व्याख्या खालीं दिल्या आहेतः —चंपु = मिश्र गद्यपद्य निबंध. रगळे = रागानुसार गावयाचा भावनात्मक प्रबंध. साहित्य = साहित्यात्मक पद्धतीवर लिहिलेला वाङ्मयनिबंध, वाङ्मय या अर्थानेंहि हा शब्द वापरतात. सांगत्य = वाद्यांवर गावयाचा निबंध. यक्षगान = रंगभूमीवर करून दाखवितां येण्याजोगा नाट्यनिबंध.

**कानडी प्रदेशांतील संस्कृत ग्रंथकार.**— कानडी प्रदेशांत कानडी माणसांनीं संस्कृत भाषेत अनेक विख्यात ग्रंथ लिहिले आहेत. त्यांचाहि उल्लेख केला पाहिजे. समंतभद्र आणि पूज्यपाद, देवनंदी यांच्यासारख्या जैन कवींनीं संस्कृतांत लिहिलेले ग्रंथ पाठीमागें आलेलेच आहेत. पोन्न, दुसरा नागवर्म, पलकुरीकेसोम, आणि षडक्षरदेव हे संस्कृत आणि कानडी ह्या दोन्ही भाषेंत चांगले पंडित असून कांहींनां "उभयकवी" अशी मानाची पदवी आहे. भट्टाकलंकाच्या संस्कृतमधील कानडी व्याकरणाचा उल्लेख मागें केलेलाच आहे. आणखी कांहीं लेखक पुढें दिले आहेतः—

नवव्या शतकांत शंकराचार्यांनीं शृंगेरी येथें आपला मुख्य मठ स्थापिला. त्यांच्या कांहीं टीका येथेंच लिहिल्या गेल्या असाव्यात.

१०८५ मध्यें बिल्हण नांवाच्या काश्मिरी ब्राह्मणानें "विक्रमार्क देवचरित्र" नांवाचें काव्य लिहिलें. त्यांत विक्रम नांवाच्या चालुक्य राजाचें वर्णन आहे. चालुक्याच्याच दरबारीं विज्ञानेश्वर यानें "मिताक्षरा" नांवाची याज्ञवल्क्य स्मृतीवर मोठी आधारभूत टीका लिहिली.

तेराव्या शतकांत मध्वाचार्यांनें द्वैतपंथ स्थापिला. कानडी प्रदेशांत उडुपी येथें त्याचा मुख्य मठ असून तेथें त्यानें आपले टीकात्मक ग्रंथ लिहिले. कानडी वाङ्मयावर त्याचा बराच प्रभाव पडला आहे.

चवदाव्या शतकांत मध्वाचार्य ह्यानें "सर्वदर्शन-संग्रह" हा विख्यात ग्रंथ लिहिला. याचा भाऊ सायणाचार्य यानें वेदांवर भाष्यें लिहिलीं. याच सुमारास उडुपी येथें जयतीर्थाचार्य नांवाचा माध्वपंथाचा एक मुख्य प्रतिनिधि होऊन गेला. शृंगेरी, मेलकोटें आणि उडुपी येथील मठांच्या गुरूंनीं अनेक जाडे जाडे संस्कृत ग्रंथ तयार केले असले पाहिजेत.

**कानडी व मराठी.**—या दोन भाषांत बरेंच साम्य आढळतें. शब्दकोश, व्याकरण, वाक्प्रचार वगैरेंची तुलना केल्यास (रा. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं केसरींत १९२३ च्या नोव्हेंबर, डिसेंबर महिन्यांत ४ लेख लिहून हें साम्य दिग्दर्शित केलेंच आहे ) कानडी भाषा संस्कृताप्रमाणेंच आधुनिक मराठीची एक जननी म्हणतां येईल. ज्ञानेश्वरालाहि आपल्या ग्रंथरचनेंत कानडी शब्द रूढ म्हणून घालावे लागले. अमृतानुभवांत आलेले कानडी शब्द म्हणून दाखविले आहेत. उदाः—आडवी (अरण्य), नींद ( नीज ), बोण ( नैवेद्य), मा, मत्तु ( आणखी ), उगळी ( ओक ), मुग ( मुका ) इत्यादि. शब्दाचे अंत्य स्वर 'उ' होणें ही प्राचीन मराठींतील पद्धत कानडींतून घेतलेली असणें अशक्य नाहीं. अप्पा, चक्का,अण्णा, आत्ते हे नात्याचे शब्द कानडींतून मराठींत आले आहेत. रा. अण्णा किर्लोस्करांनीं सुरू केलेलें मराठी नाट्यसंगीत हें यक्षगानासारखीं कानडी नाटकें बऱ्याच शतकांचीं जुनीं झाल्यावर त्यांच्या अनुकरणानें इकडे रूढ झालें. यावरून मराठी भाषेच्या सौंदर्यांत व वैभवांत कानडी भाषेनें बरीच भर टाकली आहे हें विसरून चालणार नाहीं. मराठींतील

मुलांचीं गाणीं ( अडगुलें मडगुलें, औडक चौडक दामाडू वगैरे ) व खेळ ( वखट लेंडमुंड ) हीं कानडी संस्कार दाखवितात.

[संदर्भग्रंथः—'दि हेरिटेज ऑफ इंडिया सीरीज' मधील राईस साहेबाचें कानडी वाङ्मयावरील पुस्तक आम्ही आधाराला घेतलें आहे. या लहानशा सुंदर पुस्तकांत कानडी वाङ्मयाचें चिकित्सक पद्धतीनें परीक्षण केलें आहे. याच कर्त्याचीं 'मायसोर' ( म्हैसूर ), 'मायसोर अँड कुर्ग फ्राम दि इन्स्क्रिप्शन्स' व 'दि लिटरेचर ऑफ कर्णाटक' ( कर्णाटक शब्दानुशासन या भट्टाकलंकदेवाच्या ग्रंथाला प्रस्तावना ) हीं पुस्तकेंहि उपयुक्त वाटतील. शिवाय इतर संदर्भग्रंथ म्हणजे, रेव्ह. किटेल—ओल्ड कॅनरीज लिटरेचर ( इं. अँ. पु. ४, १८७५ मधील निबंध ); काल्डवेल—कंपॅरिटिव्ह ग्रामर ऑफ दि द्रविडियन लँग्वेजेस; एपिग्राफि आ कर्नाटिका; आर. रघुनाथराव—एसेज ऑन कॅनरीज ग्रामर, कंपॅरिटिव्ह अँड हिस्टॉरिकल; किटेल—कन्नड इंग्लिश डिक्शनरी; नरसिंहाचार्य—कर्नाटक कविचरिते, कर्नाटक काव्यमंजरी;रा. वि. रा. शिंदे यांनीं १९२३ च्या अखेरीस केसरींत कानडी—मराठी भाषांवर तुलनात्मक लेख लिहिले आहेत, ते विचारणीय आहेत. कर्नाटकीय भाषाशास्त्राकडे आणि वाङ्मयेतिहासाकडे महाराष्ट्रीय लेखकवर्गाचें अजून चांगलें लक्ष लागलें नाहीं. ]

**कानपूर, जि ल्हा**—संयुक्त प्रांतांतील अलाहाबाद विभागाच्या उत्तरेकडील जिल्हा. उत्तर अक्षांश २५° ५६' ते २६° '१८' आणि पूर्व रेखांश ७९° ३१' ते ८०° ३४'. क्षेत्रफळ २३८४ चौ. मै. चतुःसीमाः—ईशान्येस गंगानदी; वायव्येस फरुकाबाद आणि इटावा; नैर्ऋत्येस यमुना नदी व आग्नेयेस फत्तेपूर.

कानपूर हा गंगा व यमुना ह्या दोन नद्यांमधील प्रदेश असून स्वाभाविक दृष्टीनें इतर जिल्ह्यात व ह्यांत फारसा फरक नाहीं. जमीन एकसारखी सपाट असून ठिकठिकाणीं लहान लहान ओढे व नद्या आहेत. नैर्ऋत्येकडे थोडासा उतार असून सर्व नद्या ह्याच दिशेनें वाहतात. नद्यांचीं नांवें इसान, पांडु, रिंद, सेन्गर हीं होत.

बहुतेक सर्व भागांत कंकर सांपडतो. ढाक नांवाचें मोठें जंगल आहे. चित्ता, रानडुकरें वगैरे जनावरें ह्या प्रदेशांत आहेत. मासे विपुल असून येथील लोक मासे खातात.

हवा साधारण उष्ण आहे. एप्रिल ते जुलैमध्यें पश्चिमेकडील वारे वाहतात. सप्टेंबर आक्टोबर महिन्यांत पावसाळा असतो व नोव्हेंबर महिन्यांत हिंवाळ्यास सुरुवात होते. एकंदर जिल्ह्याचें हवामान प्रकृतीला मानवेल असें आहे. पाऊसपाणी सरासरी ३३ इंच पडतो.

**इतिहास.**—याचा प्राचीन इतिहास उपलब्ध नाहींच म्हटलें तरी चालेल. अकबर बादशहाच्या राज्यांत ह्या जिल्ह्याचे तीन विभाग पाडण्यांत आले होते. ते कनोज सरकार, काल्पी सरकार व कोरा सरकार हे होत. मोंगलांच्या कारकीर्दीनंतर हा जिल्हा फरुकाबादच्या बंगश नवाबाच्या हातीं गेला. १७५४ सालीं मराठयांनीं दुआबच्या खालचा प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला. पानिपतच्या संग्रामानंतर फरुकाबादच्या नवाबास पुन्हां ह्या जिल्ह्यापैकीं कांहीं भाग मिळाला. पुढें फरुकाबादच्या नवाबानीं इंग्लिशांच्या विरुद्ध शुजाउद्दौल्यास मदत केली. पण त्यांत इंग्रजांचीच सरशी झाली ( १७६५ ). ह्या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं शहाअलम दुसरा ह्यास गंगा नदीचा दक्षिण प्रदेश व कानपूर जिल्ह्याचा बराचसा भाग मिळाला. पण मराठयांनीं पुन्हां शहाअलम यास आपल्या बाजूस घेतलें. पण अयोध्येच्या सैन्यानें मराठयांस हांकून लावलें व१७७३ सालीं बादशहास दिलेला प्रांत अयोध्येच्या नवाबास मिळाला. सन १७७८ सालीं ब्रिटिशांनीं कांहीं सैन्य कानपूर येथें ठेवलें व इतर प्रांतांबरोबर हा सर्व जिल्हा ब्रिटिशांस मिळाला.

ता.६ जून१८५७ रोजीं कांहीं शिपायांनीं सरकारी खजिना लुटला, तुरुंगाचे दरवाजे खुले केले व सरकारी ऑफिसें जाळून टाकलीं. तीन आठवडेपर्यंत इंग्रज शिपायांची एक तुकडी दम धरून होती पण तीस समोरासमोर मैदानांत यावें लागलें. छावण्यांतून वांचलेले कांहीं लोक नदींतून होडीनें अलाहाबादकडे जात असतां त्यांच्यावर गोळ्या झाडून पुष्कळांस ठार करण्यांत आलें. जनरल हॅवेलॉकनें १५ जुलैस आंग व पांडु नदी येथील लढाया जिंकून दुसऱ्या दिवशीं खुद्द कानपूर आपल्या ताब्यांत घेतलें. ता.१९ जुलै रोजीं विठूरचा व नानासाहेबांच्या वाड्याचा विध्वंस करण्यांत आला. नोव्हेंबर महिन्यांत ग्वाल्हेर येथील बंडखोर शिपाई यमुना ओलांडून पैलतीरीं आले व अयोध्येच्या बंडखोरांच्या मदतीनें त्यांनीं कानपूर शहर घेतलें. पण क्याम्पबेलनें दुसऱ्याच दिवशीं तें परत घेतलें. १८५८ सालीं काल्पी घेईपर्यंत ह्या जिल्ह्यांत शांतता स्थापित झाली नव्हती.

ह्या जिल्ह्यांत ६ शहरांचा व १९६२ खेड्यांचा समावेश होतो. १९२१ सालीं लोकसंख्या ११४८६६४ होती. ह्या जिल्ह्यांत अकबरपूर, बिल्हपूर भोगिपूर, कानपूर, देरापूर, नखल, शिवराजपूर, घाटमपूर ह्या आठ तहशिली आहेत. कानपूर हें बरेंच मोठें शहर व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे.

शेंकडा ९० लोक हिंदु आहेत. शेंकडा ९९ लोक हिंदी भाषा बोलतात. प्रचारांतील भाषा कनोजिआ. ब्राम्हण, चांभार, अहीर, रजपूत, लोध, कुर्मी कोरी, बोरीआ इत्यादि जातींचे लोक आहेत. शेंकडा ६२ लोक शेतकीवर उपजीविका करितात. एकंदर जमीन फार सुपीक आहे. पांडु व रिंद नद्यांच्या कांठची जमीन व त्या भागांतलि सर्व प्रदेशाची माती लालसर रंगाची आहे. अगदीं उत्तरेस इसनच्या कांठीं हलक्या तऱ्हेची ( भुरकट ) जमीन आहे. जमीनधाऱ्याची पद्धत संयुक्त प्रांतांतील जिल्ह्यांप्रमाणेंच आहे. यांत ४३३५ मीनदाऱ्या असून ९५७ पातीदाऱ्या आहेत. हरभरा, जवारी

जव, गहूं, मका, तांदूळ, बाजरी इत्यादि धान्य येथें होतें. कापूस. ऊंस, नीळ वगैरे मालहि निघतो. जिल्ह्याच्या नैर्ऋत्य व ईशान्य भागांत पाटाचें पाणी देण्याची व्यवस्था केली आहे. मकनपूर येथें मोठी जत्रा भरते.

'लोअर गांजीस कॅनाल'चें पाणी कानपूर शाखा, इटावा शाखा आणि भोग्निपूर शाखा अशा तीन शाखांच्या द्वारें जिल्ह्यांत खेळविलें आहे. विहिरींचें पाणी मोटेनें काढण्याची वहिवाट आहे. येथील खनिज पदार्थ चुनखडी व रेन हे आहेत.

जिल्ह्याकरितां एक ऑफीसर असून त्याला मदतनीस म्हणून दोन 'इंडियन सिव्हिल सर्व्हिस' चे मेंबर व चार डेप्युटिकलेक्टर आहेत. दरएक तहसिलीकरितां एक एक तहसीलदार आहे. १८०१ पूर्वी कानपूर जिल्ह्यांत फरुकाबाद व फत्तेपूर ह्या जिल्ह्यांचा समावेश होत असे. ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत हा जिल्हा गेला तेव्हां पहिल्या पहिल्यांदा थोड्या थोड्या वर्षांकरितां धारेबंदी करीत. १८४० साली पहिली खरी धारेबंदी करण्यांत आली. शेंकडा ४ लोकांनां लिहितां वाचतां येतें. कानपूर येथें कॉलेज आहे.

तहशील.—संयुक्त प्रांतांतील कानपूर जिल्ह्यांतील एक तहसील. हींत ह्याच नांवाचा एक परगणा आहे. त्यास पूर्वी जाजमऊ म्हणत असत. या तहसिलीचें क्षेत्रफळ २७९ चौरस मैल आहे. ह्या तहसिलींत २२६ खेडीं असून दोन शहरें आहेत, एक कानपूर व दुसरें बिठूर. लोकसंख्या १९११ सालीं २९७३१७ होती. १९०३–४ सालीं सुमारें १४१ चौरस मैल जमीन शेतकीच्या उपयोगीं आणली गेली होती.

शहर.—कानपूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अ. २६° २८' व पूर्व रे. ८०° २१' हें गंगानदीच्या उजव्या तीरावर वसलेलें असून प्रयागाच्या गंगायमुनांच्या संगमापासून वर १२० मैल आहे. औध-रोहिलखंड रेल्वे, ईस्ट-इंडियन, बेंगाल-नॉर्थ वेस्टर्न, बॉंबे-बरोडा व जी आय. पी. या पांच आगगाड्यांचें हें जंक्शन आहे. रेल्वेनें हें हावऱ्यापासून ६८४ मैल व मुंबईपासून ८३९ मैल आहे. संयुक्त प्रांतांतील मोठ्या व भरभराटीच्या शहरांत या शहराचा तिसरा नंबर आहे. १९२१ सालीं लोकसंख्या २१६४३६ होती. यांचें पौराणिक नांव कर्णपूर असें असून कर्ण येथें राहात असे. या स्थलीं कर्णतीर्थ म्हणून भागीरथीतीरीं एक तीर्थ आहे. येथून ब्रह्मावर्त ६ कोस लांब आहे. आठव्या शतकाच्या सुरवातीस कानपूर म्हणजे एक कन्हय्यापूर नांवाचें खेडें होतें. इ. स. १७६४ सालीं बक्सार येथें जय मिळाल्यावर ब्रिटिशांनीं १७७३ सालीं अयोध्येचा नवाब वजीर सुजाउद्दौला यांशीं फैजाबाद येथें तह केला. ह्या तहांत ब्रिटिश सरकारनें नवाबाच्या राज्यांत कोठें तरी दोन ठिकाणीं गोरें सैन्य ठेवावें असें ठरलें व त्याप्रमाणें फत्तेगड व कानपूर येथें दोन तुकड्या ठेवण्यांत आल्या. पुढें १८०१ मध्यें नवाबानें हा जिल्हा ब्रिटिशांस दिला. तेव्हांपासून कानपूर शहरास साऱ्या उत्तर हिंदुस्थानांत मोठें महत्व आलें आहे.

१८५७ सालच्या बंडांत कानपूरचा बराच संबंध येतो. व या बंडाचीं स्मारकें या शहरांत दिसतात. कानपूर येथें नानासाहेबांनीं इंग्रज स्त्रीपुरुषांची कत्तल करविली, तीबद्दलें 'स्मारक' येथें आहे. पण ती 'कत्तल'च आज खोटी ठरत आहे.

१८७१ पासून कानपूर येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें बरींच वर्षे बाहेरून आणलेल्या मालावर जकात घेत नसत. पण १८९२ पासून घेऊं लागले. येथें विजेच्या ट्रामगाड्या आहेत. सन १८६९ त येथें पहिली कापडाची गिरणी सुरु झाली. ह्यानंतर येथें आणखी पुष्कळ गिरण्या अस्तित्वांत आल्या आहेत. त्याचप्रमाणें चामड्याचे बूट व इतर सामान उत्तमोत्तम तयार करण्याचे सरकारी व खासगी कारखाने आहेत. लोंकरीचें कापड काढण्याच्या गिरण्या येथें आहेत. येथील व्यापार फार मोठा आहे. विटा व कौलें यांचे कारखाने बिसाहून कमी नाहींत. तीन आगपेट्यांचे, तीन ब्रशांचे व तीन रासायनिक कारखाने चालतात. कापडाच्या गिरण्यांखेरीज दळण्याच्या, वर्फाच्या, लोखंडी कामाच्या, तेलाच्या, साखरेच्या, कातडीं कमावण्याच्या, वगैरे प्रकारच्या पुष्कळ गिरण्या व कारखाने कानपुरांत आहेत.

कानपूर शहर हें संयुक्त प्रांतांतील व्यापाराचें सर्वांत महत्वाचें ठाणें आहे. सूत काढणें, विणणें, व जोडे वगैरे चामड्याचा माल तयार करणें हे येथील तीन मुख्य उद्योग धंदे होत. त्याचप्रमाणें लोखंडी सामान, उंची कपडा, साखर, इत्यादि इतर मालहि तयार होतो. कच्चा माल, मीठ, सोरा, खनिज धातु वगैरे माल बाहेरून येथें येतो. कानपूर हें रेल्वेचें स्टेशन असून मोठें जंक्शन आहे. १७८३–८४ च्या दुष्काळांत उपासमारीनें बरेच लोक मृत्युमुखीं पडले. त्याच्या नंतरचा १८०३–०४ दुष्काळहि वाईट गेला. पण १८३७ च्या दुष्काळानें सर्वांवर मात केली. या दुष्काळांत गांवेंच्या गांवें ओस पडलीं.

कानपूर येथें 'अपर इन्डिया चेम्बर ऑफ कॉमर्स'ची स्थापना १८८९ सालीं करण्यांत आली. युनायटेड प्राव्हिन्सेस चेंबर ऑफ कॉमर्स ही एक दुसरी व्यापारी संस्था आहे.

उच्च शिक्षणाकरतां येथें ख्राइस्ट चर्च कॉलेज, शेतकी कॉलेज व हिंदुमुसुलमानांचीं हायस्कुलें आहेत. मुलींच्याहि बऱ्याच शाळा आहेत. हिंदी, उर्दू व इंग्रजी नियतकालिकें निघतात. चांगलीं पांच सहा वाचनालयेंहि आहेत.

**कानफाटे**—हा शैव यतींचा एक पंथ आहे. कानाचा खालचा भाग चिरून त्यांतून मोठीं कर्णभूषणें घालण्याच्या त्यांच्या पद्धतीवरून त्यांनां कानफाटे हें नांव पडलेलें आहे. त्यांनां गोरखपंथी, गोरखनाथी अगर दर्शनी अशींहि नांवें आहेत.

हा पंथ केव्हां व कसा निर्माण झाला याची समाधानकारक उपपत्ति लागत नाहीं. या पंथाचे अनुयायी गोरखनाथाच्या पूर्वी या पंथाचा उदय झाला असें मानतात. गोरखनाथाचा गुरु मत्स्येन्द्रनाथ व मत्स्येन्द्रनाथाचा गुरु जो आदिनाथ त्या आदिनाथानें हा पंथ काढला असें यांच्या अनुयायांचें मत आहे. पण कांहीं अनुयायी या पंथाचा उदय आदिनाथाच्याहि अगोदर झाला होता असें मानतात. या पंथाच्या तत्वांची संगति लावून त्याचें पुनरुज्जीवन करण्याचें महत्वाचें काम मात्र गोरखनाथानें केलें व आपल्या नांवानें एक स्वतंत्र उपपंथ स्थापन केला. बंगाल प्रांताच्या रंगपूर जिल्ह्यामध्यें या पंथाची उपपत्ति निराळीच सांगण्यांत येते ती अशीः—

कानफाटे हे पूर्वी शंकराचार्यांच्या अनुयायीवर्गांतच मोडले जात असत. पण पुढें कांहीं अनुयायांनीं मद्य सेवन करण्याचें सुरू केल्यामुळें अशा अनुयायांनां आचार्यांनीं आपल्या संप्रदायांतून हांकून लावलें. अशा प्रकारचे वहिष्कृत अनुयायी म्हणजे हे कानफाटे होत. तिबेटमध्यें प्रचलित असलेल्या दंतकथेवरून गोरखनाथ हा बुद्धधर्मीय मांत्रिक असून त्याचे अनुयायी हे राजांची व त्याच्या अधिकाऱ्यांची मर्जी संपादन करण्यासाठीं बौद्धधर्माचा त्याग करून शैवधर्मीय बनले असें दिसतें. या निरनिराळ्या दंतकथांच्या मुळाशीं गेलें असतां असें दिसून येते कीं, उत्तर हिंदुस्थानांत बौद्धधर्माचा प्रसार झालेला होता, त्याकाळीं हा कानफाट्यांचा पंथ अस्तित्वांत असून बौद्धधर्माचा ज्यावेळीं ऱ्हास होऊन ब्राह्मण धर्माचा उदय होत होता त्या वेळीं या पंथालाहि चांगले दिवस लाभले असावेत व गोरखनाथानें उपनिषदांतील तत्वांनां धरून आपल्या पंथाचीं तत्वें बनविलीं असावीत.

या पंथाच्या तत्वज्ञानासंबंधीं संपूर्ण व स्पष्ट अशी माहिती उपलब्ध नाहीं. खुद्द या पंथांतील म्हणविणाऱ्या लोकांनांहि आपल्या पंथाचीं तत्वें नीटपणें अवगत नाहींत. या पंथामध्यें प्रमाणभूत असलेले ग्रंथ म्हणजे 'हटयोगप्रदीपिका,' 'गोरखनाथकी गोष्ठी,' दिगंबरपंथाचा कवि बनारसीदास कृत 'गोरखनाथ का वचन व गोरखबोध' हे होत. यांपैकीं 'हटयोगप्रदीपिका' व 'गोरखनाथका गोष्ठी' या ग्रंथांवरून या पंथाच्या तत्वांवर कांहींच प्रकाश पडत नाहीं. शिव हा परमदेव असून त्याच्यामध्यें मानवी आत्म्यानें योगमार्गानें लीन होऊन जाणें हेंच अंतिम मानवी ध्येय होय, एवढीच गोष्ट दोन ग्रंथांवरून समजते. गोरखबोध या ग्रंथांवरून मात्र या पंथाच्या तत्वज्ञानाची स्थूलमानानें माहिती होते. गोरखबोध म्हणजे मत्स्येंद्रनाथ व गोरखनाथ यांच्यामधील प्रश्नोत्तर संवादाचा संग्रह होय. हा ग्रंथ १४ व्या शतकांत झाला असें मानतात. हा ग्रंथ हिंदींत असून या ग्रंथांत अवघीं ६० पद्यें आहेत. ह्या ग्रंथाची भाषा संक्षिप्त व दुर्बोध असल्यामुळें हा ग्रंथ समजावयाला फार अवघड आहे. पातंजल योग व उपनिषदांतर्गत योग यांशीं या पंथांतील योगपद्धतीचें पुष्कळच साम्य आढळून येतें.

या ग्रंथावरून या पंथाचीं जीं तत्वें आढळून येतात तीं अशीं:—आत्मा हा नाभिचक्रांत वास करतो व तो शून्याश्रित असतो. या आत्म्यामुळेंच मानवाला चैतन्य प्राप्त होतें. मन, आत्मा व शून्य यांच्यावर अनुक्रमें चंद्र, सूर्य, व काल या तिघांचें वर्चस्व असतें. शब्द हा रूपस्थित दिसतो, अंतःकरण, नाभि, रूप व आकाश हीं उत्पन्न होण्यापूर्वी मन हें शून्यांत लीन झालेलें होतें; आत्मा हा निराकार होता, चंद्र हा प्रकाश व पृथ्वी यांच्या दरम्यानच्या अंतरालांत होता व शब्द हा अनुत्पन्न स्थितींत होता. या पंथाच्या मतें सहज, अनुभव, परस, व अतीत असे शून्याचे चार प्रकार आहेत. निद्रावस्थेंत व मृत्यूनंतर प्राण हा शून्यांत विलीन होतो. या विश्वांत एकंदर पांच तत्वें असून पूर्णावस्था प्राप्त होण्याचीं साधनें म्हणजे दहा द्वारें होत. हीं द्वारें कोणतीं आहेत हें या ग्रंथांत सांगितलें नाहीं. या विश्वांतील जें परम तत्व त्याचें वर्णन 'ज्या ठिकाणीं वाचा थांबते' अशा शब्दांनीं केलेलें आहे.

या ग्रंथांवरून पहातां या पंथाच्या अनुयायानें मठांतच नेहमीं राहिलें पाहिजे असा निर्बंध नाहीं. या ग्रंथाच्या दुसऱ्या श्लोकांवरून या पंथांतील अनुयायाला सार्वजनिक ठिकाणीं, झाडाखालीं, अगर रस्त्यावर सुद्धां राहतां येत असे असें दिसतें. या पंथांत अन्नग्रहणासंबंधानें विशेषसे निर्बंध नाहींत. या पंथांतील योग्यांनां अवधूत हें नांव आहे ('अवधूत' पहा). सारांश रामानंदाच्या वैष्णवसंप्रदायांत व या पंथांत बरेंच साम्य आहे असें दिसून येतें.

कानफाटे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आहेत. सर्व ठिकाणच्या कानफाट्यांच्या चालीरीती बहुतेक सारख्या आहेत. जातिविषयक निर्बंध यांच्यांत मुळींच आढळून येत नाहींत. गोमांस व डुकराचें मांस खेरीजकरून सर्व प्रकारचें मांस हे खातात. मद्य, अफू इत्यादि निषिद्ध वस्तूंचें हे सेवन करतात. मृत मनुष्यांनां पुरण्याची यांच्यांत चाल आढळून येते. या पंथांतील प्रापंचिक लोक सावकारी, विणकाम, शेतकी, शिपाईगिरी इत्यादि धंदे करतात. या लोकांची शूरत्वाबद्दल ख्याति आहे. या पंथांतील कांहीं लोक मंत्र, तंत्र व चेटूक इत्यादींवर आपला उदरनिर्वाह करतात असें आढळून येतें.

विवाहाची चाल सरसहा रूढ असून विवाहविषयक निर्बंध यांच्यांत आढळत नाहींत. यांच्यांतील भिक्षेकरी हे कटिवस्त्र नेसून कपाळाला भस्म फांसून व झोळी घेऊन भिक्षा मागतात. यांच्या गळ्यांत एक लोंकरी दोरी असते, कानांत शिंगाचीं अगर कांचेचीं दर्शनें अगर मुद्रा घातलेल्या असतात. हीं दर्शनें यांच्या धर्माचें मुख्य लक्षण असून तीं मोठ्या विधिपूर्वक घालण्याची चाल आहे.

कच्छच्या रणामध्यें कानफाट्यांची पुष्कळ वस्ती आहे. हे कानफाटे आपणाला गोरखनाथाचा शिष्य धर्मनाथ यांचे अनुयायी म्हणवतात. हे कानफाटे बहुतेक मठांत रहातात.

या कच्छच्या रणांत अशा प्रकारचे पुष्कळ मठ आहेत, पण त्यांतल्या त्यांत धर्मनाथानें बांधलेला कच्छमधील धीनोधर मठ व काठेवाडमधील गोरखमठीचा मठ हे प्रख्यात आहेत. या कानफाट्यांनां पूर्वीच्या रावराजांनीं पुष्कळच देणग्या दिल्या असल्यानें ते श्रीमंत व दानशूर आहेत. कोणत्याहि भिक्षेकऱ्याला हे विन्मुख पाठवीत नाहींत. धीनोधर येथील मठांत आतिथिगृहें, इतर लोकांनां रहाण्यासाठीं जागा, पीर, देवळें इत्यादि आहेत. या पिरांनां येथील राजेलोक फार मान देतात. या धीनोधर मठांतील योगी व पीर हे आजन्म ब्रह्मचारी रहातात. पण इतर मठांतलि बुवा अगर महंत हे गृहस्थाश्रमीहि असतात व संतति नसल्यास दत्तक घेण्याची चाल त्यांच्यांत आढळते. धीनोधर मठांत दररोज 'धर्मनाथ' याची पूजा करण्यांत येते.

मुंबईमध्यें, व वेळगांवमध्यें जे कानफाटे दृष्टीस पडतात त्यांच्यामध्यें व कच्छच्या रणांतील कानफाट्यांमध्यें फरक एवढाच कीं, मुंबई व वेळगांवांतील कानफाट्यांच्या हातांत भिक्षेच्या वेळीं एक त्रिशूळ असतो. यांशिवाय मुंबईतील कानफाटे हातांत डौर (डमरू) हि वाळगतात व त्यावरून त्यांनां डौरी गोसावी असेंहि नांव पडलेलें आहे. हे डौरी-गोसावी राजरोस लग्न करून घेतात. मृत मनुष्याला बसलेल्या स्थितींत पुरण्याची यांच्यांत चाल आढळते. उत्तरहिंदुस्थानांत व पूर्वहिंदुस्थानांत रहाणारे कानफाटे हे पुजाऱ्याचाहि धंदा करतात. भैरवनाथाच्या देवालयाचें पुजारीपण यांच्याकडे असतें. ग्रामदेवतांप्रीत्यर्थ प्राणिवध करण्याची चालहि यांच्यांत क्वचित आढळून येते. गोरखपूर येथील कानफाटे लोक भैरवनाथाशिवाय, वाला सुंदरी या देवीचीहि पूजा करतात. काशींतील कानफाटे कालभैरवाच्या देवळाच्या आसपास रहातात. त्यांच्यांत मृत मनुष्यांनां घरांतच पुरण्यांत येतें. डोंगराळ प्रदेशांत रहाणारे कानफाटे हे मंत्र-तंत्रावर उपजीविका करतात. हे फार व्यसनी असतात. यांचेंहि मुख्य उपास्य धर्मनाथच आहे.

[संदर्भग्रंथः—क्रूक; जी. एस. लीओनार्ड—नोट्स ऑन दि कानफाटा योगीज; मार्टिन—ईस्टर्न इंडिया; ].

**कानमैल**—संयुक्त प्रांतांमधील एका मुसुलमान जातीचें हें धंद्यावरून पडलेलें नांव आहे. या लोकांचा धंदा कानांतील मळ काढण्याचा आहे. या जातींत पोटजाती नाहींत. कांहीं विशिष्ट खेड्यांनां एक एक पंचायत नेमलेली असून तिचा अध्यक्ष "चौधरी" निवडण्यांत येतो. लग्नाच्या चालीरती वगैरेच्या अंशीं मुसुलमानांपेक्षां हिंदूप्रमाणेंच आहेत. यावरून ते हिंदुधर्म सोडून नुकतेच मुसुलमान झाले असावे असें दिसतें. या लोकांत दिराशीं विवाह लावण्याची चाल आहे. 'महावट नाट' या लोकांनांहि कानमैल या नांवानें संबोधितात. यावरून ही वरील 'कानमैल' जातीचीच पोटजात असावी [सेन्सस रिपोर्ट १९११ पु. १५].

**कानलदे**—पूर्वखानदेशांत जळगांवपासून उत्तरेकडे ७ कोसांवर गिरणेच्या कांठीं हें गांव असून येथें एक टेंकडीवर काळ्या खोदीव अशा दगडांचें देऊळ आहे. या देवळाशेजारीं एक गोसाव्याचा मठ असून त्याच्या तळघरांत कांहीं पायऱ्या उतरून गेलें म्हणजे एक दरवाजा लागतो. त्या दरवाज्यांतून आंत गेलें म्हणजे पुन्हां पायऱ्या लागतात व नंतर पुन्हां भुयार लागतें. त्या भुयारांत ४ गुहा आहेत. गुहांत देवी वगैरेंच्या मूर्ती आहेत. हीं टेंकडी भुसभुशीत मातीची आहे. हिच्याखालीं कण्वऋषीची गुहा आहे असें तेथील लोक म्हणतात. कदाचित उकरून काढल्यास कांहीं ऐतिहासिक अवशेप निघण्याचा संभव आहे [खानदेश ग्याझि.].

**कॉनवे**—हा उत्तर वेल्समधील कारनारव्हॉनशायरच्या ॲर्फानप्रतिनिधिविभागांत कॉनवे नांवाचा म्युनिसिपालिटीचा विभाग आहे. लंडन आणि नॉर्थवेस्टर्न रेल्वेनें लंडनच्या वायव्येस हें २२५ मैल आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ४६८१ होती. येथें १२८४ सालीं पाहिल्या एडवर्डनें बांधलेल्या किल्ल्याचे अवशेष अजून आहेत. येथील प्रतिनिधिविभागांतून पार्लमेंटांत १ सभासद जातो. लान्डुडनो हें येथून ४ मैलांवर आहे. सेंटमेरी नामक प्रार्थनामंदिर गॉथिक पद्धतीनें बांधलेलें आहे. एका एलिझाबेथकालीन इमारतींत कलाभुवन आहे.

सिस्टरसिअन मठाचे अवशेष अजून येथें आहेत. गोल्फ खेळ खेळण्याचीं मैदानें येथें आहेत. डेगॉन्वीपासून ट्रफिक पर्यंत आगवोटींचें दळणवळण आहे. गंधक व स्लेटपाटचा यांच्या व्यापारांत हें प्रसिद्ध आहे.

**कानाचे रोग**—कानाची रचना वगैरे माहिती शारीरशास्त्र व इंद्रियविज्ञान या लेखांत आढळेल. कानाचा बाहेरील दृश्य भाग हा श्रवणेंद्रियाचा कर्ण अगर ध्वनिलहरींचा संग्रह करणारा नलिकायुक्त बाह्य अवयव होय. या बाह्य कर्णास होणारे मुख्य रोग पुढील होतः—

इसब अगर कान चिडणें:—यांत आरंभीं बाह्य कान फार लाल होऊन तो सुजतो; त्यास स्पर्शाहि सहन होत नाहीं व त्यावर सुजेचा काळेनिळेपणा व तुकतुकी दिसते. नंतर पुटकुळ्या येण्यास आरंभ होऊन त्यांतून चिकट लस निघते व ती वाळून त्याचे पापुद्रे चिकटून बसतात. ते आपोआप गळले अथवा मुद्दाम काढले तर खालीं लाल त्वचा असते. रोग जुना झाला तर कानाचा बराच भाग रोगग्रस्त होतो, पण इतकी लाली नसते. कानाच्या नळींतहि रोग पसरल्यामुळें कानाच्या पडद्यापर्यंत कोंडा व खपल्या असतात. जरासा बहिरटपणा व कानांत दडा बसल्यासारखें वाटणें व कर्णनाद हीं लक्षणें यांत असतात. उपचारः—नवीन विकार असल्यास अफूच्या अर्काचे थेंब टाकून लेड असिटेट या औषधाच्या धावनाची पट्टी कानावर ठेवावी अथवा झिंक-ऑक्साइड आणि स्टार्च हे समभाग देऊन त्यांची मिश्र पूड भरपूर शिंपडावी. पांढरा कात म्हशीच्या दुधांत उगाळून

लावणें हा घरगुती उपायहि उत्तम आहे. सावगानें कान धुवूं नये कारण तो अधिकच चिडतो. पौष्टिक व स्निग्ध अन्न आणि शक्ति व पुष्टिवर्धक औषधें द्यावीत.

र क्त ग्रं थि.—कानावर मार लागून अगर इजा झाली असतां रक्त सांखळून तेथें लालसर गांठ बनते. अशी उपजत गांठ वेड्या माणसांमध्यें जन्मतःपाहण्यांत येते. ती कानाच्या पाळीच्या आंतील बाजूस लहान अगर मोठ्या आकाराची असून बहुधां टणक परंतु कधीं कधीं बिलबिलीत लागणारी असते. गांठीवरील चामडी बहुधा काळीनिळी असते पण क्वचित् नेहमींप्रमाणेंहि असते. ही गांठ हळू हळू कमी होत जाऊन नंतर नाहींशी होते; परंतु एखादे वेळीं पिकते व ती फुटल्यानंतर तेथें पूर्व विकृतीचें चिन्ह दिसतें. यावर उपचारः—थंड पट्टी अगर बर्फ ठेवावें. पिकल्यास ती शस्त्रानें फोडावी.

बा ह्य क र्ण न लि के स हो णा रे रो ग.—बाह्यकर्णदाह, खाजवणें, कोरणें, थंडी, थंड पाण्यांत नदी व समुद्र वगैरे ठिकाणीं स्नान करणें, उष्णता व कडकी, अशक्तपणा, देवी व गोंवरादि सांथीचे ताप येऊन जाणें यांपैकीं एखाद्या अगर अनेक कारणांमुळें यास आरंभ होऊन कानाचें छिद्र लाल व सुजलेलें दिसतें. कानांत दडा बसतो; आंत ठुसठुस होते व कानांत आवाज ऐकूं येतो. प्रथम कानांतून पाण्यासारखा नंतर चिकट व पिंवळसर स्राव सुरु होतो. नंतर कानांत, पापुद्रे जमतात व ते कुजल्यामुळें त्यांस दुर्गंधि येते व कानांत पिचकारी मारिली असतां त्या पाण्याबरोबर ते पापुद्रे सुटून येतात. या पापुद्र्याखालील त्वचा लाल व दाहयुक्त असते. एखादेवेळीं दाहामुळें कानाच्या पडद्यास छिद्रहि पडतें. कानांत वेदना चालू असतात व खाण्यापिण्यामुळें जबडा हालून अगर कानाची पाळी दाबल्यानें ती वेदना असह्य होते, ज्वरहि अमल असतोच. उपचारः—अगदीं आरंभीं थंड पाण्याची पट्टी ठेवावी. छिद्राच्या मुखाशीं एखाद दुसरी जळू लावावी अगर शेकावें. कान वाहूं लागल्यावरोवर त्यांत कोमट बोरिक ॲसिडच्या धावनाचे थेंब घालावेत; बरें न वाटल्यास डॉक्टराकडून योग्य उपचार करावे. या रोगानंतर कान फार दिवस वाहण्याचें व बहिरेपण येण्याचें भय नसतें.

बा री क ग ळ वें.—उष्ण प्रकृति, पंडुरोग, मधुमेहग्रस्त रोग्यांमध्यें गळवाच्या पुटकुळ्या एकाएकीं उत्पन्न होऊन त्यांच्या वेदना मस्तकाकडे यत्किंचित् हालचालीनें एकसारख्या होत असतात. पुटकुळ्यामुळें बाह्यकर्णनलिकामार्ग बंद होतो व म्हणून ऐकूं येत नाहीं व लालीहि नसते. त्या पुटकुळ्या गळवाच्या असतात व त्यांनां स्पर्शहि सहन होत नाहीं. नंतर तीं गळवें फुटतात व वेदना कमी होते खरी; परंतु एकामागून दुसरें अशीं अनेक गळवें आणि वेदना हा क्रम कांहीं दिवस चालतो. निद्रानाशामुळें व वेदनातिशयामळें रोग्यास जीव नकोसा होऊन जातो. याच्यावर उपचार म्हणजे पोटिसानें शेकणें अगर एकदोन जळवा लावणें चांगलें. शिवाय अल्कोहोलमध्यें बोरिक ॲसिड विरवून त्याचे थेंब कानांत घालावे. अफूचा अर्क व ग्लिसरिन यांच्या मिश्रणांत भिजविलेला बोळाहि कानांत बसवतात. या जागेंतील कच्चें गळूं कधीं फोडूं नये; पिकल्यावर फोडावें. शरीरप्रकृतींत जें व्यंग असेल त्यावर उपचार सुरू करावेत व झोंपेसाठीं औषध देत जावें.

का नां ती ल म ळ.—याचीं अनेक कारणांनीं मोठी गांठ बनते व त्यामुळें अर्धवट अगर पूर्ण बहिरेपणा एकाएकींच येतो. कानांत आवाज, चक्कर, घेरी, एकसारखी खोकल्याची ढांस अगर वेदना यांपैकीं कांहीं लक्षणें होतात. कानांत कोंडा फार जमून त्याची ही गांठ बनते. उपचारः—कोमट पाण्यानें कान धुतला असतां मळ बाहेर पडतो. तो बाहेर पडेपर्यंत कांहीं दिवस हें धुणें चालू ठेवलें पाहिजे. मळ काढणाऱ्या लोकांकडून मळ काढवूं नये; त्यामुळें इजा होण्याचा संभव असतो. जरूर तर मळ मऊ होण्यासाठीं डॉक्टराचें औषध घालावें.

अ ळं बी अ ग र छ त्री या जा ती ची उ द्भि ज की ड.—ही कानांत गेल्यास दडे, कर्णनाद, चक्कर, मोंवळ, कानांत कंडु अगर दुःख, किंचित् पाण्यासारखा स्राव व कर्णपथामध्यें सुटून पडलेले पापुद्रे हीं मुख्य लक्षणें होतात. टिपकागद भिजून त्यावर काळेपिवळे डाग पडावे तसे हे पापुद्रे दिसतात. त्या खालील त्वचा लाल अगर रक्ताळलेली असते. यावर उपचारः क्लोरिनेटेड लाइम अगर हायपोसल्फेट ऑफ सोडा या औषधांच्या द्रवानें हा रोग त्वरित बरा होतो. या औषधांनीं पिचकारीच्या साह्यानें कान धुवावा.

भ री व व भु स भु शी त प्र का र च्या अ स्थि ग्रं थीः—पहिल्या प्रकारच्या ग्रंथी शस्त्रवैद्याकडून शस्त्रानें कापून काढवाव्या. दुसऱ्या प्रकारच्या गांठी चिमट्यांत धरून काढतां येतात. असल्या गांठी एक अगर अनेक असतात. श्लेष्मलग्रंथि वगैरे अनेक इतर रोग कानास होतात पण ते येथें दिले नाहींत.

क र्ण पे टि के व री ल अ ग र म ध्य क र्णा चे रो ग.—या रोगांचें ज्ञान अवगत असणें फार अगत्याचें आहे. घशांत, कानांत, नाकांत अतिशय सर्दीमुळें अगर भयंकर सांथीचा ज्वर येऊन गेल्यावर किंवा नदी अगर समुद्रस्नानामुळें थंडी होऊन या रोगास प्रारंभ होतो. मस्तक जड होऊन त्यांत ठुसठुसल्यासारखें होते व नंतर शस्त्र भोंसकल्यासारख्या वेदना सुरू होतात. कर्णनाद, मोंवळ व बहिरेपणा, व कमी अगर अधिक ज्वर हीं लक्षणें असतात. कानाचा पडदा प्रथम लाल नसतो पण नंतर एके ठिकाणीं लाल रेषा दिसण्यास आरंभ होऊन नंतर ही लाली पडद्यावर सर्व ठिकाणीं पसरते. आणि त्यावर पुटकुळ्या व बारीक गळवें दिसतात. नंतर तेथून पांढरे पापुद्रे सुटून बाहेर येतात व पडदा सुजला असें दिसतें. कारण

त्याच्या मागें मध्यकर्ण नामक बारीक व चौकोनी पोकळी असून सूज व दाहामुळें ती स्रावानें भरलेली असते. कर्णकंठान्वयी नलिकेचें छिद्र बंद होतें. कांहीं दिवसांनंतर दाहशमन होऊन सर्व लक्षणें कमी होतात, नाहीं तर पडदा फुटतो व पू कर्णनलिकेवाटे वाहूं लागतो. यास उपचारः—रोग्यास अगदीं निजवून ठेवावा. रोग सौम्य असल्यास अंमल हिंडलें तरी चालेल. एक रेचक चार पांच जुलाब होतील असें घ्यावें व घशांतील सर्दीचें स्तंभन होईल अशा प्रकारचें गुळण्या करण्याचें औषध घ्यावें. वेदना फार असल्यास एक अगर दोन जळवा कानाच्या भोंकाजवळ लावाव्या. थंड पट्टी अगदीं ठेऊं नये. शेकणें रोग्यास मानवतें व आवडतेंहि. कोमट पाण्याच्या पिचकाऱ्या कानांत हळूहळू माराव्या. पडदा फुगला असल्यास शस्त्रवैद्याकडून तो चिरावा. कानाच्या मागें एक हाडाचें टेंगूळ असतें तेथें वेदना असतील तर तेथेंहि जळवा लावाव्या. नाहीं तर कर्णमूळनामक भयंकर रोगास आरंभ होतो. यानंतर रोगजंतुनाशक बोरिक ॲसिडादि औषधांनीं कान धूत जावा व मध्यकर्ण पूरहित होईल असें करावें. नंतर कानांत बोरिक ॲसिड फुंकून घालावें आणि वर कापसाचा बोळा बसवावा. कानांतून पू येत नसला व पाण्यासारखाच स्राव असला तर पडदा फुटला नाहीं असें समजावें व जरी पडदा फुटला तरी तें छिद्र मध्यकर्ण कोरडा राहिला असतां पूर्ण बरें होतें व बहिरेपण येत नाहीं. मध्यकर्णांतील पू अगर पाणी बाहेर पडण्यासाठीं रोग्यानें कान धुतेवेळीं व नंतर कांहीं जोरानें उच्छ्वास करावे.

वरील रोग योग्य उपचाराच्या अभावीं कायमचा व जुनाट होऊन बसतो. पडदा पाहिला असतां तो जाड व कांहीं ठिकाणीं पुवामुळें व पापुद्र्यामुळें पिंवळा व कांहीं ठिकाणीं सुजेमुळें लाल दिसतो. कोठें तरी लहान अगर मोठें व कडा रेखीव असलेलें पडद्यास पडलेलें छिद्र दिसतें. हें छिद्र मोठें असल्यास पडद्यापलीकडील मध्यकर्णांतील अंतरंग सुजेच्या कमी जास्तपणाप्रमाणें गुलाबी रंगाचें अगर लाल असलेलें दिसतें. फार बारीक असल्यास छिद्र दिसत नाहीं पण नाक व तोंड बंद करून उच्छ्वास करण्याचा प्रयत्न केला तर कानावाटे आवाज, बुडबुडे व हवा जाणें इत्यादि प्रकार अनुभवास येतात. बहिरेपण कमीजास्त प्रमाणांत व त्याचप्रमाणें चक्कर घेरी हीं असतेच. या जुनाट प्रकारच्या कर्णस्रावापासून नानाप्रकारची रोगपरंपरा व दुष्परिणाम होतात. त्यांपैकीं एखाद्या संकटांत रोगी सांपडण्याचा संभव असतो. त्यांचा नामनिर्देश व त्रोटक वर्णन पुढें केलें जाईल. यास उपचारः—एकंदर शरीरप्रकृति सुधारावी. कानांची स्वच्छता अतिशय राखावी. कानांतील पू व कोंड्याच्या खपल्या पिचकारीनें रोज धुवून काढाव्या व कान कोरडा करून त्यांत बोरिक ॲसिड फुंकून घालावें. हें न कंटाळतां वरेच दिवस केलें पाहिजे. त्यानें गुण न वाटल्यास बदलून दुसरीं औषधें घालावीं. छिद्र मोठें असल्यास त्याचें आकुंचन होऊन तें लहान करण्याचा यत्न कांहीं उपचारांनीं करावा. स्राव बंद झाला व बहिरेपण राहिलें तर कृत्रिम पडदा बसवावा. एक लांबोडा कापसाचा वळकटीप्रमाणें बारीक बोळा कानांत बारीक चिमट्यानें बसविला असतां त्याचा पडद्याप्रमाणें ध्वनिवाहनाच्या कामीं उपयोग होतो. अगर दुसरा प्रकार कृत्रिम प्रकारच्या चकत्या निरनिराळ्या कारखानदारांनीं तयार केलेल्या विकत मिळतात; त्या चिमट्यानें बसवणें. चकतीचा उपयोग कोणास होतो व कोणास होत नाहीं. कोणास उपयोग होतो परंतु ती चकती कानास फार खुपते व कोणास खुपत नाहीं. तरी गरजूंनीं त्याची उपयुक्तता अनुभव घेऊनच ठरविली पाहिजे. या जुनाट कर्णस्रावापासून जी अनर्थकारक रोगपरंपरा उद्भवण्याचा संभव असतो म्हणून मागें सांगितलें तें संक्षिप्त रोगवर्णन येणेंप्रमाणें:—श्लेष्मलग्रंथि उत्पन्न होतात व त्या जाळून, उपटून, खरडून अगर फांसांत पकडून अगर ओढून अगर विजेच्या पेटीनें जाळून काढतात व त्यांचें मूळ नष्ट होईल असें औषध तेथें लावतात.

**कर्णमूळ.**—यांत कानाच्या मागें हाडाचें टेंगूळ आहे; तें सुजण्यास आरंभ होतो. ही सूज उपचारांनीं कमी होते. उपचार नीट न झाल्यास या हाडावर गळूं होतें. त्यांतील पू मानेमध्यें पसरतो अगर कानामागें तें गळूं फुटतें; किंवा हें गळूं वर मस्तकाच्या कवटींत जाऊन फुटतें; कारण तेथें पू जाण्याजोगा मार्ग त्या हाडांत आहे. मस्तकांत हें गळूं फुटल्यास रोगी दगावण्याची फार भीति आहे. कारण ही रोगावस्था शस्त्रप्रयोगामुळें बरी होण्यासारखी परंतु कष्टसाध्य आहे. या रोगांत पोटीस, शेक, जळवा, लवकर गळूं फोडून पुवास बाहेर वाट करून देणें हे उपचार करावे व गळूं कांपल्यानंतरहि शेकणें सुरु ठेवावें.

**अस्थिव्रण.**—बाह्यकर्णनलिकेचा मागील भाग, मध्यकर्णाचा वरील भाग, अगर कानामागील हाडाचें टेंगूळ हें अस्थिमय असल्यामुळें दीर्घकालीन स्रावामुळें हाडें कुजून तेथें हाडीव्रण होतो. मध्यकर्णाच्या वरून चेहऱ्याकडे जाणाऱ्या व चेहरा प्रफुल्लित आणि चलन करणाऱ्या मज्जानाडीची खरावी झाल्यामुळें अर्धांगवायूच्या रोग्याचा चेहरा जसा अर्थशून्य व बावळट दिसतो तसा रोग्याचा अर्धा चेहरा दिसतो. यास उपचारः—शस्त्रवैद्याकडून सुधारणा होण्याजोगी स्थिति असल्यास करावी मस्तिष्कावरणदाह म्हणजे मेंदूच्या भोंवताली वेष्टन असतें त्याचा दाह, मस्तकशिरादाह व जंतुदूषित रक्तवाहिन्यात्मक ज्वर हे तीनहि रोग शस्त्रक्रियेनेंहि कष्टसाध्य आहेत. येणेंप्रमाणें ही रोगपरंपरा फुटलेला कान बरा करण्याची हयगय केल्यामुळें संभवते.

**पाण्यासारखा दीर्घकालीन स्राव.**—फिरंगोपदंश, संधिवातपीडित रोगी, फार दिवस कोयनेल घेणारे यांनां हा रोग झालेला पहाण्यांत येतो. हा बरा होण्यास वरील स्रावयुक्त रोगापेक्षां त्रासदायक असतो. याचीं लक्षणें स्रावयुक्तरोगाप्रमाणेंच असतात.

अंतस्थकर्णरोग.—कानाच्या या भागामध्यें कर्णमज्जानाडीचे सूक्ष्म तंतू असून त्यांच्या चमत्कारिक रचनेमुळें ध्वनीचें संवेदन मेंदूस होतें. या भागांतच अर्धचक्राकृति अस्थींचे बारीक बोगदे असतात. यांविषयीं माहिती पूर्वी फारशी नव्हती ती आतां अधिक झाली आहे. येथें रोग होणें म्हणजे वर सांगितलेल्या कर्णमज्जानाडीच्या ध्वनिसंवेदनक्रियेचा बिघाड होणें म्हणजे अर्थातच बहुधा बरा न होण्यासारखा बहिरेपणा येणें. याचीं कारणें बहुशः बाह्यकर्ण व मध्यकर्ण येथें होणारे वरील रोग, ह्यगयीमुळें अगर त्याच्या तीव्रतेमुळें अंतस्थ कर्णापर्यंत ते पसरत जाणें हें होय. शिवाय अशक्तता, मधुमेह, पंडुरोग, सांधीचे भयंकर ताप, फिरंगोपदंश किंवा मस्तकांतील धमन्यांनां विस्तरणरोग होणें अथवा तोफांचे आवाज फार जवळून ऐकणें किंवा कोयनेल फार घेणें हींहि कारणें होत.

भोंवळ.—वर सांगितलेल्या अर्धचक्राकार बोगद्यामध्यें रक्तसंचय होऊन त्यामुळें पूर्वी बहिरेपण नसलेल्या माणसास एकाएकीं मोठा कर्णनाद ऐकूं येणें व झोंक जाऊन पडेल इतकी मोठी भोंवळ येणें हीं लक्षणें होतात. नंतर मळमळूं लागून वांति होते व चक्कर येऊन अंगास थंडगार घाम सुटतो. जरा बरें वाटल्यावर आपण एका कानानें बहिरे आहोंत हें त्याला कळून येतें. कालांतरानें चक्कर कमी होतें; परंतु कर्णनाद व बहिरेपण कायम रहातें. फार बहिरेपण असल्यास कर्णनादहि पुढें कमी होतो. यावर उपचारः—क्विनाईन, पोटॅशियम ब्रोमाइड टोंचून पैलोकार्पीन नैट्रेट हें औषध घालणें व विजेची पेटी लावणें हें केलें असतां त्यांचा थोडाबहुत उपयोग होतो.

कर्णशूळ.—हें लक्षण कानाच्या बऱ्याच रोगांमध्यें असतें. परंतु कर्णरोग नसूनहि ज्याप्रमाणें कपाळशूळ, माथेशूळ, दंतशूळ त्याप्रमाणें शुद्ध मज्जातंतूंची दुर्बलतादर्शक अशा प्रकारचा निवळ कर्णशूळ रोग स्वतंत्रपणें आढळतो व त्यास उपचार इतर प्रकारच्या शूळाप्रमाणें करून शिवाय कानामागें पलिस्तर मारून कानांत कोकेनचे थेंब घातल्यानें शूळ थांबतो.

कानांतून रक्तस्राव.—पुढील कारणांमुळें कानांतून रक्त येतें. (१) मस्तकाच्या कवटीच्या तळाचा दुखापतीनें भंग होणें; व त्यामुळें मध्यकर्ण दुखावणें. (२) कान कोरल्यामुळें बाह्यकर्णनलिकेस होणाऱ्या इजा, जखमा व व्रण. (३) श्लेष्मलग्रंथि, गळवें वगैरे कानांत होणें. (४) कानशिलांतील टणक हाडास व्रण होऊन मध्यकर्ण बिघडणें व नासणें अगर कुजणें. (५) कानाचा पडदा फुटणें. हा प्रकार खोल दरी, समुद्राच्या तळीं अगर उंच पर्वतारोहणाच्या वेळीं होण्याचा संभव असतो. (६) अपवादात्मकपणें कानांतून स्त्रियांचें आर्तव वाहिल्याचीं उदाहरणें आढळतात.

आयुर्वेदीय विवेचनः—कानाच्या रोगांसंबंधीं आयुर्वेदीय विवेचन येणेंप्रमाणेंः—

निदान.—पडसें, पाण्यांत डुंबणें व कान कोरणें यांनीं, तसेंच शब्दाचा मिथ्यायोग झाल्यानें किंवा दुसऱ्या कांहीं प्रकोपक कारणांनीं वायु कुपित होऊन कानांतील शिरांत जाऊन कानांत जोराचा शूल उत्पन्न करतो. त्यानें अर्धशिशी दुखते, कान स्तब्ध होतो, थंड पदार्थांचा तिटकारा येतो. फार दिवसांनीं कान पिकतो व पिकला म्हणजे त्यांतून लस वहाते. एकदम कानाला दडे बसतात, व आंतून कांहीं झरझरतें असें वाटतें.

पित्तकोपानें शूल, दाह, चुरचुर, थंड पदार्थांची इच्छा, सूज, ताप, कान लवकर पिकून पिंवळट लस वहाणें आणि ती ज्या ज्या ठिकाणीं लागेल ती ती जागा पिकणें हे विकार होतात.

कफानें डोकें, हनवटी, व मान हीं जड होतात. कानांत ठणका कमी असतो, कंड येते, सूज असते व उष्णाची इच्छा असून पिकल्यावर त्यांतून पांढरा व दाट पू वहातो.

अभिघातादिकांनीं दूषित झालेल्या रक्तापासून पित्तकोपासारखे किंवा त्याहून किंचित अधिक असे विकार होतात.

तिन्ही दोषांच्या प्रकोपापासून कानांत शूळ, सूज, ताप, तीव्र कळा, कधीं थंड कधीं उष्ण पदार्थांची इच्छा, कानास जडत्व हीं लक्षणें होतात. आणि तो पिकला म्हणजे त्यांतून पांढरा, काळा, तांबुस व दाट असा पू येतो.

शब्दवाहक शिरांत वायु दुष्ट झाला असतां कारणांवांचून वरचेवर अनेक प्रकारचे शब्द ऐकूं येतात. त्यास कर्णनाद म्हणतात.

वायूस कफाची जोड मिळाली असतां किंवा कर्णनादाची उपेक्षा केली असतां मोठ्यानें बोललें तरी ऐकू येण्यास कष्ट पडतात. आणि पुढें कांहीं दिवसांनीं मुळीच ऐकू येईनासें होतें. म्हणजे बधिरता पूर्ण येते. वायूनें कफ शोषला जाऊन कान चिकटतो. कान जड होतो व चोंदतो त्यास प्रतिनाद म्हणतात.

कानांत नेहमीं खाज येते त्यास कर्णकंडू व फार दिवस सूज रहाते त्यास कर्णशोफ म्हणतात.

पित्तानें कफाचा विदाह होऊन कानांत दाट व दुर्गंधियुक्त अशी पुष्कळशी लस होते आणि ठणका होतो, किंवा क्वचित तो नसतोहि. त्यास पूतिकर्ण म्हणतात.

वातादि दोषांनीं कान दूषित होऊन त्यांत कृमी होतात. व ते कान खातात. आणि मांस व रक्त यांचा क्लेद होऊन त्यापासून फार तीव्र ठणका लागतो. त्यास कृमिकर्ण म्हणतात.

कान कोरल्यानें क्षत होऊन कानांत विद्रधी होतो त्यास कर्णविद्रधि म्हणतात.

नेत्रार्श व नेत्रार्बुदाप्रमाणें कानांत सूज येते तीस कर्णार्श व कर्णार्बुद म्हणतात. या विकारांत ठणका, कान सडून दुर्गंध येणें व बहिरेपणा हीं लक्षणें होतात.

वायूनें कानाचें छिद्र आंत संकुचित झालें असतां त्यास कूचिकर्णक म्हणतात.

कानाच्या आंतल्या अंगास एक किंवा अनेक न दुखणारे किंवा दुखणारे पिंपळीएवढे टणक मोड येतात त्यास कर्णपिप्पली म्हणतात.

तिन्ही दोषांपासून त्वचेच्याच रंगाची दुखणारी व ताठर अशी सूज येते तीस विदारिका म्हणतात. तिची उपेक्षा केली असतां ती पिकून तिच्यांतून शिरशेलासारखा स्राव होतो व व्रण भरून येण्यास फार त्रास पडतो; आणि भरला तर कानाचें छिद्र खचित आकुंचित होतें; कानाच्या शिरांतील वायु कानाची पाळ शुष्क करतो. त्यास पालिशोप म्हणतात.

वायूनें कानाची पाळ टणक व बारीक तारेसारखी होते, त्यास तंत्रिका म्हणतात. मूल किंवा सुकुमार माणसाचा नाजुक कान टोंचून कांहीं दिवस सोडून पुन्हां एकदम वाढवूं लागलें असतां पाळी सुजते, ठणकते, सूज तांबूस असते व तिच्यावर चिरा असतात. हा विकार वायूपासून होतो व यास परिपोट म्हणतात.

फार जड दागिन्यांच्या भारानें किंवा दुसऱ्या कांहीं अशाच कारणांनीं रक्त व पित्त कुपित होऊन कानास काळसर रंगाची सूज येते. त्यास उत्पात म्हणतात. यांत कळ, दाह, पाक, फोड, पुळ्या, लाली, चुरचुर व लस हे विकार होतात.

वायु व कफ यांपासून सगळ्या पाळीभर सूज येते. ती दुखत नाहीं. ती स्थिर, ताठलेली व त्वचेच्या वर्णाची असते, आणि तीस खाज सुटते. या विकारास उन्मथ म्हणतात.

कान बरोबर न टोंचला जाऊन वाढवूं लागलें असतां तिन्ही दोष कुपित होऊन त्यांपासून कान सुजतो, कंड सुटते, दाह होतो, पिकतो व ठणकतो. या विकारास दुःखवर्धन असें म्हणतात. कफ, रक्त व कृमी यांपासून पाळीवर लेह्य किंवा लेहिका नांवाच्या बारीक पुळ्या उठतात. त्यांत कंड, लस व वेदना हीं असतात. त्यांची हयगय केली असतां त्या पाळ खातात. कर्णपिप्पली, त्रिदोषात्मक शूलविदारिका, व कूचिकर्णक हे रोग असाध्य आहेत. तंत्रिका याप्य आहे. आणि बाकीचे साध्य आहेत. याप्रमाणें कानाचे एकंदर २५ रोग आहेत.

चिकित्सा.-वातजन्य कर्णशूळावरः—मांसरसाबरोबर जेऊन रात्रीं वातनाशक औषधांनीं सिद्ध केलेलें तूप प्यावें. नंतर कान शेकून मुळ्याचा रस कानांत घालावा. कान दुखत असतांना डोक्यावरून स्नान करूं नये आणि दिवसा देखील थंड पाणी पिऊं नये. रात्रीं तर थंड पाणी पिऊंच नये. पित्तशूळावरः—खडीसाखर घालून तूप प्यावें. त्यानें कोठा स्निग्ध झाला म्हणजे रेचक घ्यावें आणि ज्येष्ठमध, द्राक्षें यांच्या रसानें युक्त अंगावरचें दूध कानांत घालावें. जेष्ठमध, मंजिष्ठ वगैरे पित्तशामक औषधांचा लेप कानासभोंवती करावा. कफजन्य शूळावर पिंपळीनें सिद्ध केलेल्या तुपानें कोठा स्निग्ध करून वांती करवावी. आणि कफनाशक धूम्र, नस्य, गुळणे व शेकणें हे उपाय करावे. लसूण, आलें यांचे रस कानांत घालावे. रक्तजन्य कर्णशूळावर पित्तज शूळासारखी चिकित्सा करावी आणि लवकर शीर तोडावी. कान पिकून पू वाहूं लागला म्हणजे धूम्रपान, गुळणे, नस्यें, नाडीव्रणाचीं औषधें व दुष्ट व्रणाचीं औषधें योजावीं. चिकटलेला कान दोन वेळां धुवून कापसाच्या बोळ्यानें पुसून काढून गुग्गुळाची धुरी देऊन कानांत मध घालावा व मग कफनाशक औषधांनीं तयार केलेल्या कापसाच्या वाती कानांत घालाव्या अथवा चूर्णें कानांत घालावीं. कर्णनाद व बधिरता यांवर वातशूळावरची चिकित्सा करावी. आणि त्यांत कफाची जोड असल्यास प्रथम वमनादिक द्यावें. क्षारतेल ( अष्टांगहृदय उत्तरस्थान अ० १८ ) हें सर्व कर्णरोगनाशक आहे. कान मेहरी आल्यासारखे सुन्न झाले असतां रक्त काढावें. सूज व क्लेद असून कमी ऐकूं येत असल्यास वमन द्यावें. मुलांचा, म्हाताऱ्यांचा व पुष्कळ दिवसांचा बहिरेपणा असाध्य समजून सोडून द्यावा. प्रतिवाह रोगास कानांत तेल घालून व शेकून मळ नरम झाला म्हणजे तो कानकोरण्यानें काढून कानांत तेल घालावें. किंवा सैंधव व मध यांसह महाळुंगाचा रस घालावा. मळ काढल्यानें कानांत रुक्षता उत्पन्न झाल्यास तुपाची निवळी घालावी.

मळानें कान अगदीं भरून गेला असला तरीहि याचप्रमाणें करावें. कंड असल्यास कफघ्न नस्यादिक द्यावें. आणि सुजेवर तें करून शिवाय तिखट व उष्ण औषधांचा लेप करावा. पूतिकर्ण व कृमिकर्ण यांवर कर्णस्रावावरील औषध करावें. आणि कृमिकर्णांवर विशेषतः शिरसेल कानांत घालावें.

कर्णविद्रधीवर पूर्वी वमन देऊन विद्रधीवरची चिकित्सा करावी. क्षतविद्रधीवर पित्तजन्य कर्णशूळावरची चिकित्सा करावी. कर्णार्श व कर्णार्बुद यांवर नासार्श व नासार्बुदाप्रमाणें चिकित्सा करावी.

कर्णविदारिका अपक्व असतां तिची चिकित्सा दोषानुरोधानें कर्णविद्रधीप्रमाणें करावी. पालीशोषावर वातजन्य कर्णशूळाप्रमाणें नस्यलेप व स्वेद करावे. नंतर नेहमीं पुष्टिकारक असे स्नेह तविर चोळून जिरवावे. पाळी फारच क्षीण झाली असल्यास तितकी कापून काढून बाकीची डकवून नंतर तिचें पोषण करावें. तंत्रिकांहि याच उपायानें वाढूं न देतां तशीच राखावी आणि परिपोटावरहि हीच चिकित्सा करावी. उत्पातावर जळवा लावून रक्त काढावें आणि वर थंड औषधांचा लेप करावा. रोगानें कान तुटला असल्यास रोग्यास रेचक वगैरे देऊन शुद्ध करून त्याच्या कानाच्या तुटलेल्या बाजू कापून त्यांत शुद्ध रक्त आल्यावर त्या एकमेकांस जुळवून त्या जागेस योग्य बंध बांधावा. अपघातानें कान तुटला

असल्यास तो जुळवून बंध बांधून नंतर रेचक वगैरे देऊन शुद्ध करावें.

तुटका कान जुळवावयाचा असल्यास पुरुषांच्या शेंडीस व वायकाच्या केंसास गांठ मारून त्या तुटक्या तोंडांचें छेदन व लेखन करून त्याचा सांधा जुळवून उंचट किंवा खालपट न करतां जागच्याजागीं सारखा वसवून मध, तूप लावून वर कापसाचा बोळा वसवून सुतानें फार घट्ट नव्हे व फार सैल नव्हे असें बांधून वर रक्त बंद करणाऱ्या औषधांची पूड टाकावी, आणि व्रणाचे उपचार करावे. नंतर सात दिवसांनीं वर तेल सोडून हळू हळू बोळा काढावा. कान चांगला भरून आला, वर केंस आले, सांधा चांगला जडला आणि तो सारखा कठिण, सुरेख व लाल झाला म्हणजे हळू हळू कान वाढवावा.

**कानानोर**—मद्रास इलाख्यांत मलबार जिल्ह्यांतील चिरक्कल तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें कालिकतपासून ५६ मैल व बंगलोरपासून ८१ मैल दूर आहे. गांवाचे दोन भाग पडतात. एक जुना ( कानानोर ) व दुसरा कँप. ऐतिहासिक दृष्ट्या व व्यापारीदृष्ट्या हें महत्वाचें गांव असून येथें सरकारी कचेऱ्या, तुरुंग तसेंच बारीक सुताच्या कापडाच्या गिरण्या आहेत.

येथें पंधराव्या शतकापूर्वी एक मुसुलमानी राज्याची राजधानी होती. येथें पोर्तुगीजांनीं किल्ला बांधला तो कांहीं काळ पोर्तुगीज व त्यानंतर डच यांच्या ताब्यांत होता. व नंतर हैदरअल्लीच्या वेळीं मुसुलमानांच्या हातांत तो होता. व शेवटीं ब्रिटिशांच्या कबजांत आला. पण त्यांनीं तेथील सरदाराकडून कांहीं खंडणी घेऊन त्याच्याकडेच ठेविला. तो अद्याप तसाच आहे. येथें हा किल्ला, अरक्कल राजवाडा व जेल हीं ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत.

येथें उत्तम बंदर असल्यामुळें प्राचीन काळापासून हें समुद्रावरील परदेशी व्यापाराचें मोठें ठिकाण होतें. आजहि सुंदर व टिकाऊ कापडाकरितां कानानोर प्रसिद्ध आहे.

**कानिकर**—( कानी ). लोकसंख्या ( १९११ ) ४०३४. दक्षिण त्रावणकोरमधील डोंगराळ प्रदेशांत रहाणारी ही एक जात आहे. यांचा वर्ण काळा असून हे सशक्त, मध्यम उंचीचे, चपल, शांत व साधे आहेत. हे लोक शेतकी करतात. परंतु यांची मुख्यत्वेंकरून शिकारीवर उपजीविका होते. कानिकरण या शब्दाचा अर्थ आनुवंशिक जमीनदार असा आहे. जंगलांत झाडें लावणें व वाढविणें, मध जमविणें वगैरे धंदे डोंगराळ देशांत रहाणारे लोक करितात. यांच्या भाषेला 'मलंपाशै' असें नांव असून ती मल्याळीची एक पोटभाषा आहे. कानी लोक आपल्या लहान लहान टोळ्या करून मुत्तकानी या मुख्याच्या सत्तेखालीं एकत्र राहतात. सर्व सामाजिक बाबतींतील निवाडे पंचांमार्फत होतात. वारसा हक्काची पद्धत मक्कथायम ( पितृपारंपरिक ) आहे. मुलगा असतांना पुतण्यालाहि कांहीं वारसा मिळतो. विवाहापूर्वी शिष्टांची संमति घ्यावी लागते. सास्थन ही अरण्यदेवता यांचें मुख्य दैवत होय. विधवापुनर्विवाह व घटस्फोट यांनां कोणत्याहि तऱ्हेचा प्रत्यवाय नाहीं. परंतु अशा गोष्टी क्वचित् घडतात.

लग्नरीती.—ह्या लोकांत मुलामुलींचीं लग्नें त्यांच्या अनुक्रमें सोळाव्या व सातव्या वर्षानंतर करण्यांत येतात. तथापि मुलींनां पुष्कळ वेळां लवकर स्थळें मिळत नाहींत; व त्यामुळें त्या सोळा सोळा वर्षांच्या वयापावेतों अविवाहित असतात. ज्या पुरुषाला लग्न करण्याची इच्छा असेल तो दोघे चौघे नातलग बरोबर घेऊन मुलीच्या चुलत्यास भेटतो. त्याचे नातलग त्याच्या लग्नाची गोष्ट काढतात. ती पसंत पडल्यास लागलीच तिथिनिश्चय होतो. व पानसुपारी पाठवून इष्टमित्रांस लग्नाचें निमंत्रण करण्यांत येतें. नवरा नवरीच्या घरीं गेल्यावरोबर आपल्या सासूला घरांत नेसण्याचें वस्त्र—ज्यास ' अम्मा विदु मुंदु ' असें म्हणतात तें—देतो. नंतर वधूस लग्नमंडपांत आणितात. तेथें वरपक्षाचा कोणी मनुष्य वराच्या हातीं चार ' चक्रम् ' किंमतीची एक माळ देतो. नंतर वर ती माळ सूर्यास दाखवून वधूच्या कंठास लावितो. मग त्याची जवळ उभी असलेली बहीण ती माळ घेऊन वधूच्या गळ्यांत घालिते. तसेंच वर एक वस्त्र घेऊन आपल्या बहिणीजवळ देतो. तेंहि ती वधूस देते. नंतर कोणी प्रौढ मनुष्य बायकोचें संगोपन कसें करावें व तिला कसें वागवावें, ह्याविषयीं वरास कांहीं उपदेश करतो. त्यांतलि आशय असा आहे कीं, बायकोनें कांहीं अपराध केला असतां प्रथम तिला शब्दांनीं सांगावें, दुसऱ्या प्रसंगीं कांहीं शासन करावें व तिसऱ्या प्रसंगीं कडक शिक्षा करावी; आणि इतकेंहि करून ती नीट न वागल्यास अखेरीस तिला टाकून द्यावी. लग्नदिवशीं वधूच्या घरीं आणि दुसऱ्या दिवशीं वराच्या घरीं मेजवानी होते.

वधूपक्षाकडून वधूवरोवर कुऱ्हाड, फावडें, विळा, प्याले, मातीचीं भांडीं, वगैरे वस्तू अंदण देण्यांत येतात. [ सेन्सस रिपोर्ट १९११ (त्रावणकोर ) अलोनी—लग्न विधि व सोहाळे; थर्स्टन. ]

**कानिगिरी, तालुका**—मद्रास. नेलोर जिल्ह्यांतील एक तालुका. उ. अ. १५° १' ते १५° ३५' व पू. रे. ७९° ५' ते ७९° ४१'. क्षेत्रफळ १०१४ चौ. मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १२९४७४. या तालुक्यांत फक्त कानिगिरी ( लो. सं [१९११] ६९७४ ) हें एकच शहर व १८८ खेडीं आहेत. येथें लाल वाळूचीं व झाडें झुडुपें नसलेलीं मैदानें सर्वत्र आढळतात. रागि आणि कंबु हीं मुख्य धान्यें आहेत. तांदूळ बाहेरून येतो. शिक्षणाच्या बाबतींत हा तालुका मागसलेला आहे. पाटबंधाऱ्याचें पाणी खेळविण्यास बऱ्याच अडचणी आहेत.

**कानीफनाथ**—नवनाथांपैकीं जालंदरनाथाचा शिष्य. हा मद्रदेशच्या सुरथ राजाचा पुत्र. हा जातीचा क्षत्रिय होता. याच्या आईचें नांव भाभिनी होतें. नाथलीलामृताच्या १९ व्या अध्यायांत असें लिहिलें आहे कीं, हा पुत्र सुरथराजाला जालंदरनाथाच्या प्रसादानें झाला व राज्य न करितां जालंदराचा शिष्य होऊन त्याबरोबर वैराग्यवृत्तीनें हा हिंडू लागला. गोपीचंदानें जालंदरास लिदींत पुरलें असतां यानें तेथें जाऊन त्यास बाहेर काढिलें व गोपाचंदास अमर केलें.

**कानोर**—उदेपूर संस्थानांतील जहागीर व तिचें मुख्य ठिकाण. जहागिरींत ११६ खेडीं असून त्यांची लो. सं.(१९११) १२९६२ आहे. कानोर गांव उत्तर अक्षांश २४ ° २६′ व पू. रे. ७४ ° १६′. यांवर आहे लो. सं. ( १९०१ ) ४३००. जहागीरदार याला राउत म्हणतात. हा सारंगदेवत कुळांतील सिसोदिया रजपुतांपैकीं आहे.

**कानौद**—पंजाब. पतियाळा संस्थान. मोहिंदरगज निझामत आणि तहीशलीचें हें मुख्य ठिकाण असून दारीच्या दक्षिणेस चोवीस मैलांवर आहे. उ. अ.२८ ° १६′ व पू. रे. ७६ ° १३′. लो. सं. ( १९०१ ) ९९८४. हें गांव बाबरचा नोकर मलिक महमूदखान यानें वसविलें व कनोदिया नांवाच्या ब्राह्मणांनीं येथें प्रथम वसाहत केली म्हणून या गांवास हें नांव पडलें असें म्हणतात. मोंगलाच्या कारकीर्दीत नारनौल सरकारांतील हा एक परगणा होता. अठराव्या शतकाच्या प्रारंभीं जयपूरच्या ठाकुरानें हें गांव सर केलें होतें. परंतु शहाअलमचा उमराव नवाब नजफ कुलीखान यानें त्यास हांकून दिलें. हा उमराव मरण पावल्यावर त्याच्या स्त्रीनें किल्ला ताब्यांत घेऊन आपलें स्वातंत्र्य राखण्याचा प्रयत्न केला. परंतु इ. स. १७९२ सालीं शिंद्यांचा सेनापति डी. बॉइन यानें किल्ला सर करण्याकरितां सैन्य रवाना केलें. त्यावेळीं झालेल्या लढाईंत ती स्त्री मारली गेली. यापुढें शिंद्यांचा सेनापति अप्पा खंडेराव याच्या ताब्यांतील हा महत्त्वाचा किल्ला झाला. याच्या ताब्यांत रेवारी प्रदेश होता. पुढें रेवारी प्रदेश ब्रिटिशांकडे आल्यावर त्यांनीं तो झज्जरच्या नवाबास इनाम दिला. तारीख ४ जानेवारी सन १८६१ च्या सनदेनें ब्रिटिश सरकारनें १९.४ लाख रुपयांऐवजीं पतियाळाच्या महाराजास कानौद व कुधुआना हे परगणे दिले. कानौद किल्ल्याचें नांव मोहिंदरगड असें आहे.

**कान्ट इम्यान्युएल** (१७ ४–१८०४)—कनिग्सबर्ज या गांवीं कान्टचा जन्म १७२४ च्या एप्रिल महिन्यांत झाला. याच्या बापाचा कातड्याच्या वाद्या करण्याचा धंदा होता. त्याची घरची स्थिति फार गरीबीची होती, तरी पण तो मोठा बाणेदार मनुष्य होता; व त्याला आपल्या मतांचा मोठा अभिमान असे. कान्टची आईहि फारच भाविक असे व कान्टच्या मनावर तिच्या भक्तिपंथी शिक्षणाचा फार ठसा उमटला होता. कान्टचें सर्व शिक्षण या गांवांतच झालें. हा आपल्या सोळाव्या वर्षी मॅट्रिक्युलेशन पास होऊन कॉलेजांत गेला. युनिव्हर्सिटींत त्यानें एकंदर सात वर्षे अभ्यास केला. त्याच्या घरची गरीबी असल्यामुळें त्याचे मित्र त्याला थोडी फार पैशाची व इतर आवश्यक गोष्टींची मदत करीत असत आणि त्याच्या मोबदला कान्ट हा त्यांना शिकवीत असे. परंतु त्याला हे सर्व दिवस मोठ्या कष्टानेंच काढावे लागले.

१७४६ सालीं म्हणजे कान्टच्या २२ व्या वर्षी त्याचा बाप वारला आणि त्यामुळें त्याला आपलें शिक्षण सोडून पोटापाण्याच्या उद्योगाला लागावें लागलें. त्याची मोठी महत्वाकांक्षा म्हणजे कॉनिग्सबर्ज विश्वविद्यालयांतील प्रोफेसरची जागा मिळविण्याची होती. परंतु आतां त्याला आपलें शिक्षण अर्धवट टाकून, एका सुखवस्तु कुटुंबांतील खासगी शिक्षकाचा धंदा पत्करावा लागला. या रीतीनें त्यानें नऊ वर्षे काढलीं, व त्याच्या आयुष्यांतील हा कालच फक्त त्यानें कॉनिग्सबर्जच्या बाहेर घालविला. या काळांत तो तीन चार कुटुंबांत राहिला. १७५५ मध्यें त्यानें एक तात्त्विक विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहून डॉक्टरची पदवी मिळविली व नंतर त्याला कॉनिग्सबर्ज विश्वविद्यालयांत विनपगारी शिक्षकाची जागा मिळाली. तेव्हांपासून मरेपर्यंत म्हणजे सुमारें सतत पन्नास वर्षे, त्यानें प्रोफेसरचें काम केलें. विनपगारी शिक्षक या नात्यानें त्यानें सुमारें पंधरा वर्षे काढल्यानंतर १७७० सालीं त्याची महत्वाकांक्षा पुरी झाली. त्याला तत्वज्ञानाच्या प्रोफेसराची फार मोठ्या मानाची जागा मिळाली, व त्या जागेवर तो मरेपर्यंत होता. दुसऱ्या युनिव्हर्सिटीमध्यें त्याला प्रोफेसरांच्या जागा देऊं केल्या होत्या, परंतु त्यानें आपली युनिव्हर्सिटी सोडली नाहीं. व तेथलि जागा कमी पगाराची असतांना तेथेंच राहणें त्याला बरें वाटलें.

कान्टचें सर्व आयुष्य अध्ययन, अध्यापन आणि लेखन यांमध्येंच गेलें. कान्ट संसारपाशांत पडला नाहीं. प्रथमतः त्याची फार गरिबी होती; कुटुंबपोषण करण्यासारखी पैशाची स्थिति नव्हती. यामुळें त्यानें लग्न केलें नाहीं. पुढें चांगली स्थिति आल्यावर त्याला लग्न करतां आलें असतें व एका बाईवर त्याचें मनहि गेलें होतें; परंतु त्या बाईनें दुसऱ्या एका गृहस्थाशीं लग्न केल्यामुळें कान्टचा बेत तसाच राहिल. पुढें आपले लग्नाचे दिवस निघून गेले, असें समजून कान्ट ब्रह्मचारी राहिला.

कान्टचे मुख्य व्यवसाय म्हटले म्हणजे एक लेखन व दुसरा अध्ययन. हा फार मोठा तत्वज्ञानी होऊन गेला, अशी जरी त्याची कीर्ति आहे तरी तो मारूनमुटकून तत्वज्ञानी झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण लहानपणापासून त्याचे आवडते विषय म्हणजे गणित व आधिभौतिक शास्त्रें हे होत. अगदीं लहानपणापासून त्याला न्यूटनच्या ग्रंथांचा फार नाद लागलेला होता. तत्वज्ञानाकडे त्याचें लक्ष्य मागून गेलें व हाच शेवटीं त्याचा मुख्य विषय बनला. पण कान्ट हा केव्हांहि घटपटाची खटपट करणारा

तत्वज्ञानी बनला नाहीं. त्याच्या अंगीं बहुश्रुतपणा व विषय-वैचित्र्याची अभिरुचि शेवटपर्यंत कायम राहिली. त्याचे ग्रंथ व लेख निरनिराळ्या विषयांवर आहेत. तो मासिक-पुस्तकांत प्रचलित विषयांवर लिहीत असे. त्याच्या लेखांची भाषा दुर्बोध नसे.त्याचे कांहीं कांहीं लेख तर फारच मनोरंजक व विनोदानें भरलेले आहेत.

इ. स. १७५५ मध्यें लिस्बन शहरीं फार मोठा धरणीकंप झाला. त्यावरोबर या विलक्षण सृष्टिचमत्काराची माहिती देण्याकरतां कान्टनें ' धरणीकंप ' या विषयावर एक उत्तम लेख लिहिला व त्यांत यासंबंधाची उपलब्ध माहिती व या चमत्काराची उपपत्ति यांचें सुरस विवरण केलें. १७६० च्या सुमारास स्वीडनबार्ज नांवाचा मनुष्य प्रसिद्धीस आला. आपल्याला अतींद्रियज्ञान आहे व आपल्याला मेलेल्यांच्या आत्म्यांशीं संभाषण करतां येतें असें तो म्हणे. कान्टला या विषयासंबंधीं माहिती मिळविण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें स्वीडनबार्जेच्या ग्रंथावर सात पौंड खर्च केले व आपल्या स्नेह्यांच्या आग्रहावरून त्यानें यासंबंधीं एक सुरेख ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत त्यानें शास्त्रीय तत्वांवर, अशा गोष्टींचें ज्ञान मानवी शक्तीच्या बाहेर आहे असें आपलें मत प्रतिपादन केलें. जरी कान्ट कधीं प्रवास करीत नसे तरी त्याची अवलोकनशक्ति सूक्ष्म होती. त्यानें ' सौंदर्य व भव्यता ' या विषयावर १७६४मध्यें एक उत्तम निबंध लिहिला. तो भाषेच्या व मनोरंजकतेच्या दृष्टीनें त्याच्या उत्तम ग्रंथांपैकीं एक आहे. ईश्वरावर त्याचा भरंवसा होता. परंतु कर्मकांडावर त्याचा मुळींच विश्वास नसे. तो प्रार्थनामंदिरांत प्रार्थनेला कधींहि जात नसे. त्याच्या मताप्रमाणें मनुष्याची सर्व वागणूक हीच मुळीं प्रार्थना होय. मनुष्यानें सर्व व्यवहारांत आपलें कर्तव्य बजावलें म्हणजे ईश्वराची खरी भक्ति झाली असें तो समजत असे. कान्टच्या असल्या धर्ममतांमुळें व तीं मतें एका ग्रंथांत प्रतिपादन केल्याबद्दल कान्टवर जर्मन सरकारचा रोष झाला. कान्टनें आपल्या वर्तनानें आपल्या मताचें समर्थन केलें. परंतु सरकारच्या मर्जीखातर महाराजांचा राजनिष्ठ प्रजाजन या नात्यानें मी यापुढें या विषयावर लिहिणार नाहीं व बोलणार नाहीं असें त्यानें लिहून दिलें. कान्ट इ.स. १८०४ मध्यें मृत्यु पावला.

पूर्वींच्या सर्व तत्वज्ञानापासून आपल्या तत्वज्ञानाचा फरक दाखविण्याकरतां कान्टनें आपल्या तत्वज्ञानाला ' परीक्षणात्मक तत्वज्ञान ' असें नवीन नांव दिलें आहे व तें त्यानें तीन ग्रंथांत ग्रथित केलें आहे. प्रथमतः त्यानें ' शुद्ध विवेकाचें परीक्षण ' या नांवाचा ग्रंथ लिहिला. हाच त्याच्या तत्वज्ञानाचा मूळ ग्रंथ होय. यामध्यें कान्टनें आपल्या नव्या ज्ञानमीमांसेचें विवेचन केलें. नंतर त्यानें ' सदसद्विवेकाचें परीक्षण ' म्हणून दुसरा ग्रंथ लिहिला. यांत त्याचे नीतिशास्त्रविषयक विचार आलेले आहेत. शेवटीं त्यानें ' भावनेचें परीक्षण ' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ कान्टच्या तत्वज्ञानरूपी कमानीचा जणूं कांहीं मधला चिराच आहे. यामध्यें आपल्या पहिल्या दोन ग्रंथांतील विचारांचा मेळ घालून कान्टनें त्यांवर नवीन विचारांचा कळस चढविला आहे.

कान्टच्या पहिल्या परीक्षणात्मक ग्रंथांत ( १ ) गणितशास्त्र कां व कसें शक्य आहे. ( २ ) सृष्टिशास्त्र कां व कसें शक्य आहे. ( ३ ) तत्वज्ञान शक्य आहे कां ? व शक्य नसल्यास मानवी मनाची तत्वज्ञानविषयक स्वाभाविक प्रवृत्ति कां आहे ( ४ ) कोणत्या पायावर नवीन तत्वज्ञान बनवितां येईल. या चार प्रश्नांचीं चार भागांत उत्तरें आलेलीं आहेत.

कान्टच्या नव्या तत्वज्ञानाचा उल्लेख त्याच्या पहिल्या परीक्षणात्मक ग्रंथाच्या शेवटीं आला आहे व तेथें त्यानें या तत्वज्ञानाची रूपरेषा दिली आहे, तरी पण या तत्वज्ञानाचा शेवट त्याच्या या पहिल्या परीक्षणात्मक ग्रंथांत अज्ञेयवादांत होतो पण कान्ट येथेंच थांबत नाहीं. आपल्या ज्ञानानें सूचित केलेले ' आत्मा ', ' परमेश्वर ' इत्यादि प्रश्न आपल्या बुद्धीला सुटले नाहींत तरी ते मानवी मनाच्या इतर शक्तींच्या आंवाक्याबाहेरचे आहेत अशांतला भाग नाहीं, असें कान्टचें म्हणणें आहे व हा मुद्दाच त्यानें आपल्या पुढील परीक्षणात्मक ग्रंथांत प्रमुखपणें पुढें आणला आहे. त्याच्या दुसऱ्या परीक्षणात्मक पुस्तकाचा विषय सद्सद्विवेकशक्ति हा होय. " विवेकी मनुष्य म्हणून तूं हें केलें पाहिजेस, तुझें कर्तव्यकर्म म्हणून हें केलें पाहिजेस; फलाशा ठेवून कर्म करतां कामा नये " अशा तऱ्हेची ही आज्ञा असते. अर्थात् अशी आज्ञा पाळणें म्हणजे वासनांना बाजूस सारून केवळ विवेकाची कास धरणें होय. ही आज्ञाच सर्व नीतिनिर्बंधांचा मूळ पाया होय. या विनशर्त आज्ञेपासूनच नीतीचे सर्व नियम निघालेले आहेत.

' तूं अशा तऱ्हेनें वाग कीं तुझ्या वागण्याचें तत्व, तुझ्या इच्छेनें सार्वत्रिक नियम करतां आल्यास तुझ्या विवेकाला तें तत्व आवडेल ' असें या आज्ञेचें स्वरूप कान्टनें दिलें आहे. याला त्यानें नैतिक कायदा म्हटलें आहे व सर्व नीतिनियम या कायद्यापासून निष्पन्न होतात असें कान्टनें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

सारांश बुद्धीला ज्या गोष्टी शास्त्रीयदृष्ट्या म्हणजे संवेदनात्मक ज्ञानदृष्ट्या सिद्ध करतां येत नाहींत त्या गोष्टी आपल्या नैतिक अनुभवानें सिद्ध करतां येतात व म्हणून तत्वज्ञान हें बौद्धिक अनुभवाच्या पायावर न उभारतां-कारण तेथें अज्ञेयवाद व जडवाद आपल्याला निरुत्तर करतात-नैतिक अनुभवाच्या पायावर उभारावें असें कान्टच्या प्रतिपादनाचें सार आहे व यालाच तो आपलें नवें तत्वज्ञान म्हणतो. मात्र आत्मा, परमेश्वर वगैरे अतींद्रिय गोष्टींचें ज्ञान झालें असें न म्हणतां याबद्दल आपली विवेकश्रद्धा उत्पन्न झाली असें तो म्हणतो. अर्थात् ही तडजोड कान्टनें जडवाद्यांचें व अज्ञेयवाद्यांचें तोंड बंद करण्याकरितां सुचविली असावी असें दिसतें.

कान्टच्या तिसऱ्या परीक्षणात्मक पुस्तकाचा विषय जडाजड जगांत दिसून येणारें सौंदर्य, भव्यता, प्रयोजन व रचनाचातुर्य इत्यादि गोष्टींचें विवेचन करण्याचा आहे व या विवेचनावरून या जगाला कोणी तरी चिन्मय कर्ता आहे असें मानवी मनाला वाटावयाला लागतें. तेव्हां ज्याप्रमाणें आपल्या नैतिक अनुभवावरून मनुष्यामध्यें परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल श्रद्धा उत्पन्न होते त्याप्रमाणेंच मनुष्याच्या सौंदर्यविषयक अनुभवावरून परमेश्वरविषयक भावना मनांत उत्पन्न होते असें कान्टनें या ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे.

[संदर्भग्रंथः—कान्टवरचें वाङ्मय अफाट आहे. १८९६ पासून कान्टवरचे नवीन लेख व त्यावर लिहिलेल्या ग्रंथांचें परीक्षण प्रसिद्ध करणारें एक त्रैवार्षिक नियतकालिक हँवर्ग व बर्लिन येथें निघत असतें. १८८७ च्या मागील कान्टवाङ्मय एरिक अँडिकीजच्या फिलॉसॉफिकल रिव्ह्यूमध्यें सांपडेल. १८९०–९४ या वर्षांकरितां आर्. रीकेचा ' कान्ट विब्लिओग्राफी ' पहा ब्रिटानिका व ए. रि. ए मध्यें कान्टवर विस्तृत लेख आहेत. मराठी वाचकांकरितां प्रो. भाटे यांनीं ' तीन तत्वज्ञानी ' ( पुणें १९२१, जगद्धितेच्छु प्रेस ) या छोट्या पुस्तकांत कान्टचें चरित्र व तत्वज्ञान विवेचिलें आहे. ]

**कान्टन जॉन** ( १७१८-१७७२ )—जॉन कान्टन या इंग्लिश शास्त्रज्ञाचा जन्म ग्लूस्टर परगण्यांतील स्ट्रॉड नांवाच्या गांवीं झाला. याचें वय १९ वर्षांचें झालें असतां लंडन शहरांतील एका शाळेंत कांहीं दिवसपर्यंत कारकुनाचें काम त्यानें केलें व पुढें तो त्या शाळेंत भागीदार झाला. सन१७५० सालीं कृत्रिम लोहचुंबक तयार करण्याविषयीं एक निबंध रॉयल सोसायटीपुढें त्यानें वाचला. तेव्हां त्याला त्या सोसायटीचा सभासद करण्यांत आलें; व त्याला कोपले पदक देण्यांत आलें. मेघतडित् आणि कृत्रिमविद्युत् या एकच आहेत, असा जो बेन्जामिन् फ्रांकलीनचा सिद्धांत होता तो इंग्लंडांत यानेंच प्रथमतः सिद्ध केला. याशिवाय त्यानें विद्युद्विषयक दुसऱ्या कित्येक गोष्टी शोधून काढल्या. फ्लॉरेन्सच्या विश्वविद्यालयानें असें प्रसिद्ध केलें होतें कीं, पाणी हें असंकोच्य ( इनकॉंप्रेसिबल ) आहे. परंतु कान्टन यानें ( सन १७६२ ते ६४ ) असें सिद्ध करून दाखविलें कीं, पाणी हें संकोच्य आहे. सन १७५९ सालीं गंधकाच्या साहाय्यानें शिंपा एकत्र जाळून अंधेरांत चकाकणारा एक पदार्थ त्यानें तयार केला. शाळामास्तराचें काम करीत असतांनाच त्यानें आपल्या शोधांचें कार्य चालू ठेविलें होतें.

**कान्यकुब्ज, ब्राह्मण.**—उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मणांची ही एक शाखा असून तिचा अंतर्भाव पंचगौड ब्राह्मणांत होतो. फरुकाबाद जिल्ह्यांतील प्राचीन कान्यकुब्ज उर्फ कनोज शहरावरून त्यांनां हें नांव पडलें.

कनौजिया ब्राह्मणांची जातिविषयक घटना मोठी गुंतागुंतीची आहे. त्यांनां षट्कुल असेंहि म्हणतात. यासंबंधीं त्यांचा एक संकेत आहे. तो 'काक, सास, उभा' हा होय. या संकेताचा अर्थ का म्हणजे कात्यायन गोत्री ब्राह्मण, क म्हणजे कश्यप गोत्री, सा म्हणजे शांडिल्य गोत्री, स म्हणजे संकृत, उ म्हणजे उपमन्यु आणि भा म्हणजे भारद्वजगोत्री ब्राह्मण असा आहे. याप्रमाणें या मूळ सहा कुलांतील हे लोकच अस्सल कनौजिया ब्राह्मण होत.

षट्कुल कनौजियांमध्यें लग्नाच्या कांहीं विशिष्ट चाली आहेत. भिन्नगोत्र असेल तर पहिल्या बायकोच्या कुटुंबांतील माणसाबरोबर दुसऱ्या बायकोच्या मुलांनां विवाह करतां येतो. अदलाबदलीची अथवा साटेलोटें करण्याची पद्धतीहि त्यांच्यामध्यें रूढ आहे. दोन पुरुषांनां परस्परांच्या बहिणींची लग्नानें अदलाबदल करतां येते. वधू एकदा परगोत्रांत गेली कीं उभय कुटुंबांनां पांच पिढ्यापर्यंत परस्परांत लग्नें करतां येत नाहींत. षट्कुल नवऱ्यास प्रथम त्याच षट्कुल जातीच्या मुलीशीं लग्न करतां येतें; परंतु दुसरें लग्न करण्याचा प्रसंग आल्यास त्याला पंचादरी नांवाच्या हलक्या जातींतील वधूचेंच पाणिग्रहण करावें लागतें. षट्कुल कान्यकुब्जांत एकविवाहव्रत रूढ आहे. ते लोक पुनर्विवाह करीत नाहींत.

षट्कुलाखालोखाल पंचादरी व त्यांच्या खालीं धाकार अशा जाती आहेत. पंचादरी लोकांचें मूळ षट्कुलापासून आहे असें म्हणतात. शुद्ध पंचादरी व धाकारांशीं संबंध असलेले पंचादरी असे त्यांचे दोन भाग आहेत. धाकार ही एक हलकी जात असून ते लोक कृषिकर्म करतात. परंतु धाकार व पंचादरी यांच्यांत विवाहहि होतात. 'भुलनी है की पंचादरी' म्हणून धाकारांपेक्षांहि एक कनिष्ठ जात आहे; पण त्यांचें कुलहि षट्कुलांतच आढळतें. भुलनी है कनौजियांचा मूळ संबंध एक शतकापूर्वीं होऊन गेलेल्या सीतलप्रसाद त्रिवेदी नांवाच्या दरवडेखोराकडे पोंचतो अशी एक दंतकथा आहे.

वालाकीशुक्ल म्हणून षट्कुलामध्यें आणखी एक वर्ग आहे. हे लोक सुरापान करतात व 'छिन्नमस्तका' नांवाच्या देवीची उपासना करतात. षट्कुलापैकीं, ही एक प्रतिष्ठित जात समजली जाते व मद्यपानामुळें त्यांचा दर्जा कमी समजला जात नाहीं. षट्कुल कुटुंबांशीं यांचीं लग्नेंहि होतात. ज्याच्या मुळें ' वालाकीशुक्ल ' हें नांव पडलें असा वाला नांवाचा एक देवीचा उपासक होता. तो कोणालाहि लवून नमस्कार करीत नसे; हें पाहून तो नदीकडे स्नानार्थ जात असतांना कांहीं कनौजिया ब्राह्मण त्याजवर थुंकले; परंतु वालानें एका दगडास नमन करतांच तो भंग पावला. हा चमत्कार पाहून ब्राह्मण ओशाळले व त्यास श्रेष्ठ मानूं लागले.

यांच्या जातींत निरनिराळ्या पोटजातींचा सामाजिक दर्जा निरनिराळा असतो व त्याप्रमाणें त्यांस उत्तम, मध्यम, कनिष्ठ म्हणतात. सर्वांत उच्च जातीस महत्तर हें नांव असून त्यांचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन वर्ग आहेत. याखालची

जात म्हणजे गोहिया असून तिचेहि उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे तीन वर्ग आहेत. सर्वांत खालची जात म्हणजे धाकार ही होय; पण त्यांच्यांतहि उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे भेद आहेतच. या सर्व जातींत ज्ञातिविवाह रूढ आहेत. स्वतःच्या जातीपेक्षां हलक्या जातींत मुलगी दिल्यानें मुलीच्या बापाचा सामाजिक दर्जा कमी होतो. महत्तर उत्तम, महत्तर मध्यम, महत्तर निकृष्ट; गोहिया उत्तम, गोहिया मध्यम, गोहिया निकृष्ट; धाकार उत्तम, धाकार मध्यम, धाकर निकृष्ट येणेप्रमाणें या जातींची परंपरा आढळून येते.

उपाध्येपणाशिवाय कृषिकर्म, शिपाईगिरी व नोकरी इत्यादि धंदे कनौजिया ब्राह्मण करतात. सर्वारियांपेक्षां कनौजिया ब्राह्मण जरा कमी हेकेखोर असतो व आपल्या दर्जाबद्दल त्याच्या विपरीत कल्पना नसतात. सर्वारिया लोक आपली शेती; कुणब्याकडून करवितात परंतु कनौजिया ब्राह्मण नांगर स्वतःच हातीं धरितात. परंतु दोन्ही जाती कृषिकर्म करितात हें खरें आहे. हे लढवय्येहि आहेत. बंगालमध्यें पांडे रेजिमेंट म्हणून कनौजियांची एक स्वतंत्र तुकडीच होती.

**कान्स्टंटा**—रुमानिया. हें काळ्या समुद्रावरील बंदर असून त्याच नांवाच्या रुमानियाच्या प्रांताचें मुख्य ठिकाण आहे. हें बुखारेस्टशीं आगगाडीनें जोडलेलें आहे. सन १९०० मध्यें येथील लोकसंख्या १२७२५ होती. १८७८ मध्यें कान्स्टंटाची पुनर्घटना झाली. येथील मुख्य कारखाने कातडें कमावण्याचे व पेट्रोलियम तयार करण्याचे आहेत. येथें बाहेरून येणाऱ्या मालांत कोळसा व कोक हे मुख्य आहेत. कान्स्टंटा व कान्स्टांटिनोपल यांच्यांत साप्ताहिक बोटीचें दळणवळण सुरू आहे. रुमानियाचा काळ्या समुद्रावरील आरमारी विभाग येथें आहे.

कान्स्टंटाईन दि ग्रेटची बहीण कान्स्टीयाना इच्या स्मरणार्थ बांधलेलें कान्स्टांटियाना हेंच हल्लींचें कान्स्टंटा होय. रोमन कवि ओव्हिड यानें ज्या टोमी शहरांत आपले शेवटचे दिवस घालविले, तें या शहरानजीकच असलें पाहिजे, हें येथें सांपडणाऱ्या शिलालेखांवरून उघड होतें.

**कॉन्स्टन्टाईन**— अलजीरियामधील, कॉन्स्टन्टाईन प्रांताची राजधानी. ही उत्तरअक्षांश ३६°, २२' व पूर्वरेखांश ६° ३६' यांच्या दरम्यान आहे. या ठिकाणीं सेनाध्यक्ष, बिशप व इतर वडे अधिकारी राहतात. १९१२ सालीं लोकसंख्या ६५१७३ होती. पैकीं निम्मे यूरोपीय होते.

हें शहर एका खडकावर वसलें असून सभोंवतीच्या प्रदेशापासून एका खोल खिंडीच्या योगानें हें विभक्त झालेलें आहे. या खिंडींतून रुमेल नदी वाहते. ही खिंड जोडण्यासाठीं रोमन लोकांनीं पूल बांधला होता. पण १८५७ सालीं तो एकाएकीं मोडला.

या शहराला एक कोट आहे. 'रू डी फ्रन्स' नामक रस्ता शहराच्या आगदीं मधून जातो. 'डी नेमोर्स' चौक म्हणजे शहरांतील व्यापारी व सामाजिक जीवनक्रमाचें केन्द्रस्थान होय. अहमद पाशानें इ. स. १८३० ते १८३६ यांच्या दरम्यान बांधलेला प्रासाद म्हणजे १९ साव्या शतकांतील मुरिश शिल्पकलेचा एक उत्तमोत्तम नमुना होय. येथील पदार्थसंग्रहालयांत प्राचीन सुन्दर वस्तूंचा संग्रह आहे. यूरोपीयन व अरब संस्कृतीचें शिक्षण देण्यासाठीं एक विद्यालय व इतर लहानसहान शिक्षणसंस्था येथें आहेत.

कातड्याचें व लोंकरीचें सामान तयार करणें हा येथील एतद्देशीयांचा मुख्य धंदा आहे. कॉन्स्टन्टाईन, अलजीर्स, बोना, ट्यूनिस, आणि बिस्का हीं सर्व शहरें रेल्वेनें जोडलीं असल्यामुळें व्यापारास फार फायदा झालेला आहे. सिर्टा अथवा किर्था हें कॉन्स्टन्टाईनचें मूळचें नांव होय. प्राचीन काळीं उत्तर आफ्रिकेंतील नुमिडिआ देशांतील हें महत्त्वाचें शहर होतें. ख्रिस्तपूर्वी दुसऱ्या शतकांत हें भरभराटीच्या शिखरास पोंचलें होतें. सीझरच्या वेळीं येथें एक रोमन वसाहत करण्यांत आली, त्यावेळीं या शहरास 'कलोनिआ सिटीआनोरम' हें नांव प्राप्त झालें. अलेक्झँडरच्या विरुद्ध मॅक्झेंटीअसचें जें युद्ध झालें त्यांत या शहराची फार नासाडी झाली. इ. स. ३१३ त कॉन्स्टन्टाईननें याचा पुनरुद्धार केल्यामुळें या शहरास हें नांव पडलें आहे. ७ व्या शतकांत अरबांनीं या शहराची पुन्हां नासाडी केली. १२ व्या शतकांत फिरून हें शहर भरभराटीस आलें. तुर्कांच्या ताब्यांत गेल्यावर हें अलजर्सच्या डेच्या अंमलाखालीं देण्यांत आलें. १८२६ सालीं कॉन्स्टन्टाईननें डेचा अंमल झुगारून दिला. १८३६ सालीं फ्रेंचांनीं हें शहर घेण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. १८३७ सालीं मात्र फ्रेंचांनीं येथील राजा हाजी अहमद याचा पराभव करून शहर आपल्या ताब्यांत घेतलें व हाजी अहमद पळून गेला. नंतर १८४८ सालीं येथील राजा हाजी अहमद फ्रेंचांनां शरण गेला.

**कान्स्टन्टाईन दि ग्रेट** ( इ. स. २८८–३३७ )— हा रोमन बादशाहा पहिला कॉन्स्टंटियस व फ्लेव्हिआहेलेना यांचा अनौरस पुत्र होय. याचा जन्म इ. स. २८८ त झाला. इ. स. ३०२ च्या सुमारास तो लहानपणींच गॅलेरियसच्या हाताखालीं डान्यूबनदीकडील प्रांतांत नोकरीस होता. त्याचा बाप रोम येथें मोठ्या अधिकारावर चढला व पुढें तो ३०५ मध्यें फ्रान्समधून इंग्लंडांत पिक्ट व स्कॉट लोकांवर स्वारीस जात असतां कान्स्टंटाईन हा आपल्या नोकरीवरून पळून, बोलोन येथें त्याला येऊन मिळाला. इंग्लंडमध्यें त्याचा बाप एकाएकीं वारला तेव्हां सैन्यानें त्यालाच आपला सेनापति केलें. गॅलेरियसनें त्यास मान्यता दिली. नंतर कान्स्टंटाईननें फ्रँक लोक विरुद्ध जय मिळविले व ऱ्हाइन नदीकांठचीं रोमचीं ठाणीं मजबूत केलीं. रोम येथें मॅक्झेमिनसनें सम्राट पदाकरितां बंड केलें आणि कॉन्स्टन्टाइनला आपली मुलगी फौस्टा ही देऊन त्याला आपल्या मदतीस घेतलें. पुढें रोम येथें कान्स्टन्टाईन व मॅक्झेमिनस हे

कॉन्सल झाले. डायाक्लिटन व गॅलेरियस यांनीं त्याला हरकत घेतली. उलट कान्स्टन्टाईन यानें वादशहा ही पदवी धारण केली. सासऱ्याशीं भांडण झाल्यामुळें त्यानें त्याला मॅसिला येथें कैद करून ठार मारलें. येथें ३१२ मध्यें कान्स्टन्टाईन हा मॅक्झें-टियसवर चालून गेला. व ट्यूरिनला त्याचा पराभव करून तो एकदम रोमला परत आला. तेथें कांहीं चमत्काराचा त्याच्या मनावर परिणाम होऊन लवकरच कान्स्टन्टाईननें ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. पुढें मॅक्झेंटियसनें आपल्या १,७०,००० पायदळ व १८,००० घोडदळ येवढ्या मोठ्या सैन्यासह कॉन्स्टन्टाईनवर चाल केली; व टायवरनदीकांठीं पॉंस मुल्व्हियस येथें दोघांमध्यें तुमुल युद्ध झालें. कान्स्टन्टाईनच्या सैन्याची तयारी चांगली होती, त्यामुळें मॅक्झेंटियसला मार्गे हटावें लागलें व तो सैन्यासह टैवरनदीवरील जहाजाचा पूल उतरून जात असतां पूल कोसळून कांहीं सैन्यासकट नदींत बुडून मरण पावला. राहिलेलें सैन्य तावडतोव शरण आलें व तें कान्स्टन्टाईननें आपल्या सैन्यांत सामील करून घेतलें.

याप्रमाणें कान्स्टन्टाईन हा रोमसह पश्चिम रोमन साम्राज्याचा व ख्रिस्तीधर्माचा वादशाहा झाला. तथापि ३१३ मध्यें त्यानें जाहीरनामा काढून प्रजेला पूर्णपणें धर्म-स्वातंत्र्य दिलें. त्यानें लिसिनियसबरोबर सख्य केलें व ३१५ मध्यें दोघेहि कॉन्सल म्हणून कारभार पाहूं लागले. तें पुढें नऊ वर्षे तसेच राज्यकारभार पहात होते. त्या मुद-तींत कान्स्टन्टाईननें मोठ्या हुशारीनें आपलें वजन फार वाढविलें. उलट आळस व क्रूरपणा या दुर्गुणांमुळें लिसिनि-यसनें स्वतःला लोकांत अधिकाधिक अप्रिय करून घेतलें. यापुढें दोघांत हळू हळू शत्रुभाव वाढत चालला. दोघांनीं लष्कर व आरमार वाढवून लढाईची तयारी चालविली. शेवटीं ३२४ मध्यें युद्ध सुरू होऊन आड्रियानोपल व ख्रिसोपोलीस या दोन लढायांत लिसिनियसचा पूर्ण परा-भव झाला. तो कान्स्टन्टाईनच्या कैदेंत सांपडला व एक वर्षानें राजद्रोहाच्या आरोपावरून ठार मारला गेला.

आतां मात्र कान्स्टन्टाईन हा पूर्व व पश्चिम या दोन्ही रोमन साम्राज्यांचा एकटा वादशाहा झाला. तो रोम येथें असतां त्याचा थोरला मुलगा क्रिसपस याजवर फौस्टानें कांहीं आरोप केल्यावरून त्याला त्यानें पोला येथें हद्दपार करून ठार मारलें. पुढें त्याच्या निरपराधीपणाविषयीं कॉन्स्टंटाईनची खात्री झाली. तेव्हां त्यानें फौस्टाला ठार मारविलें. ३२६ मध्यें राजधानी रोम येथून हालवून पूर्वेकडे नेण्याचा त्यानें निश्चय करून कॉन्स्टांटिनोपल येथें तिची स्थापना केली. हा निश्चय होण्याचें कारण या सुमा-रास ख्रिस्तीधर्म हा सर्व साम्राज्याचा धर्म होय असें सरकारीरीत्या जाहीर करण्याचें त्यानें ठरविलें. रोम येथील सेनेटमधील वरेच वडेवडे लोक पुरातन धर्माचे पक्षपाती असल्यामुळें त्यांनां न दुखवितां राजधानीच वदलणें त्याला बरें वाटलें. याप्रमाणें ता. ११ मे ३३० पासून हें शहर राज-धानी वनलें. ३३२ च्या सुमारास गॉथलोकांविरुद्ध सार्मा-टियन लोकांनां त्यानें मदत केली व सायप्रसमध्यें झालेलें वंड मोडलें. ३३५ मध्यें त्यानें आपलें साम्राज्य आपले तीन मुलगे व दोन पुतणे यांत वाटून दिलें. ३३७ त इरा-णच्या २ ऱ्या शापूर राजानें डायॉक्लिटननें जिंकलेल्या प्रांता-वर पुन्हां हक्क सांगितला. तेव्हां तिकडे युद्धाकरितां स्वतः सैन्य घेऊन जाण्याची तो तयारी करीत असतां २२ मे ३३७ रोजीं आजारी पडून मरण पावला.

कान्स्टंटाइनला दि ग्रेट ही पदवी देतात, पण तिला आवश्यक अशी बुद्धिमत्ता किंवा नीतिमत्ता त्याच्या अंगीं नव्हती. मात्र ख्रिस्तीधर्माची भवितव्यता दूरदृष्टीनें जाणून त्या धर्माचा त्यानें आपल्या साम्राज्याच्या कामीं उपयोग करून घेतला. त्यानें रोमन साम्राज्याच्या राज्यकारभाराला अनियंत्रितपणाचें स्वरूप दिलें. ख्रिस्ती नीतितत्त्वांचा त्याच्या जीवनक्रमावर पुष्कळ परिणाम झाला होता; त्यामुळें त्यानें आपल्या मुलांनांहि ख्रिस्तीधर्मपद्धतीचें शिक्षण दिलें होतें. तथापि पुरातनधर्माविषयींहि त्याचें धोरण सहिष्णुतेचें होतें.

त्यानें राज्यव्यवस्थेची पद्धतहि नवी म्हणजे अनियंत्रित स्वरूपाची व ती आपल्या घराण्यांतच वंशपरंपरेनें चालेल अशी सुरू केली. सेनेटसभा त्यानें मोडून नवें अधिकारी लोकांचें मंडळ वनविलें. मुलकी व लष्करी हीं दोन खातीं निरनि-राळीं केलीं. प्रांतोप्रांतींच्या गव्हर्नरांचा लष्करावर कांहीं एक अधिकार ठेवला नाहीं. सरहद्दीवर लष्करी ठाणीं ठेऊन शिवाय स्वतःजवळ पुष्कळ खडें सैन्य ठेविलें व त्यांतील मोठ्या जवाबदारीच्या वरिष्ठ जागाहि जर्मन वगैरे रानटी लोकांनां दिल्या. यावेळीं समाजामध्यें धंदेविषयक जाती निर्माण होत चालल्या होत्या. आपल्या मित्रमंडळींच्या चैनी चालविणें व नवी राजधानी स्थापणें अशासारख्या मोठमोठ्या योजना पार पडण्याकरितां जे पैसे लागत त्याकरितां त्यानें प्रजेवर अनेक प्रकारचे कर वसविले. याच्या कारकीर्दींत नवीन कायदेहि पुष्कळ तयार करण्यांत आले. सुमारें तीनशें कायद्यांची जुन्या कायद्यांत भर पडली. त्यांपैकीं पुष्कळ कायदे ख्रिस्तीधर्मनियमानुसार करण्यांत आले होते. उदाहरणार्थ गुलाम व कैदी यांनां अधिक भूतदयेनें वागविण्यावद्दलचा आणि नीतिनियमांच्या उल्लंघ-नावद्दलच्या शिक्षा कभी कडक करण्यावद्दलचा. याच्या सर्व राज्यकारभाराचें मूलतत्व म्हणजे राजा करील तो कायदा, हें होतें. कान्स्टंटाईननें धर्म व राज्य या दोन्ही वावतींत पूर्ण सत्ता सर्वस्वीं आपल्या हातीं घेतली. हीच अनियं-त्रित पद्धति पुढें अनेक शतकें चालू होती. याच्यावद्दल एका प्राचीन ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं, हा पहिल्या दहा वर्षांत उत्तम राजा होता, पुढील वारा वर्षांत उत्तम चोर व लुटारु वनला आणि त्यानंतरच्या दहा वर्षांत खूप

उधळल्या वनला. [ फर्थ—कान्स्टंटाईन दि ग्रेट. युसेविअसचा चरित्रग्रंथ ]

**कॉन्स्टन्स** ( सरोवर )—या सरोवरास रोमन लोक लॅकस व्रिगॅन्टिनस अथवा ब्रेगेंझ सरोवर असें म्हणतात. पण जर्मन लोक यासच वोडेन्सी अथवा स्वेवियन समुद्र या नांवानें ओळखतात. याचा विस्तार जिनीव्हा सरोवराच्या खालोखाल आहे. स्विझर्लंडच्या ईशान्य मर्यादेवर हें असून ऱ्हाईन नदीच्या योगानें हें वनलेलें आहे. याचा आकार लांवट असून वायव्यटोंकाकडे याचे दोन वेगळे भाग पडले आहेत; एक उंटरसी ( कान्स्टन्सपासून स्टीन–अॅम–ऱ्हीनपर्यंत ) व दुसरा उवेरलिंगरसी ( लुड्विगशाफेनपर्यंत ). या दोन फांटयांची ब्रेगेंझपासून लांवी अनुक्रमें ४६॥ व ४० मैल आहे. हें समुद्रसपाटीपासून १३०९ फू. उंच आहे. सर्वांत जास्त रुंदी व खोली अनुक्रमें १०॥ मै व ८२७ फूट. आहे. २०४ चौ. मै. इतकें याचें क्षेत्रफळ आहे. पैकीं ८१। चौ.मै. स्वित्झर्लंडच्या ताव्यांत आहे. आग्नेय कोंपऱ्यावरील ब्रेगेंझ हें आस्ट्रियाच्या ताव्यांत आहे सरोगृहांचे अवशेष पुष्कळ ठिकाणीं सांपडतात.

**कान्स्टन्स** ( शहर )—समुद्रसपाटीपासून १३०३ फूट उंचीवर असलेलें वेडन संस्थानांतील एक शहर. लोकसंख्या ( १९०५ ) २४८१८. हें ऱ्हाईन नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेलें आहे. कान्स्टन्स सरोवरांतून ऱ्हाईन नदी जेथून वाहेर पडते तें स्थान येथून जवळच आहे. त्या सरोवराच्या किनाऱ्यावर असलेल्या सर्व शहरीं येथून आगवोटीनें जातां येतें. हें शहर इतकें प्रसिद्धीस येण्याचें कारण सहाव्या शतकापासून येथें विशपचें पीठ होतें हें होय.हें पीठ वरेंच प्रमुख असल्यामुळें१४१४–१८ ची धार्मिक सुधारणेची सभा येथें भरली होती. यूरोपांतील धार्मिक सुधारणेच्या वेळेपर्यंत येथें जवळ जवळ विशपचाच अंमल चालत होता. ऑस्ट्रियन लोकांचा ह्या शहरावर पूर्वीपासून डोळा असल्यामुळें १५४८ त पांचव्या चार्लसनें येथें आपलें वर्चस्व स्थापित केलें. परंतु १८०५ त प्रेसवर्गच्या तहानें हें शहर ऑस्ट्रियाकडून वेडनकडे आलें.

**कान्स्टान्टिनोपल**—तुर्कस्तान (यूरोप). मराठी वखरकार याला कुस्तुंतुनिया व मुसुलमान लोक इस्तंवोल असें म्हणतात. यूरोपांतील तुर्कस्तानची हल्लींची ही राजधानी आहे. हें शहर फार प्राचीन आहे. वॉस्परस सामुद्रधुनीच्या अगदीं दक्षिणटोंकास हें वसलेलें आहे. याच्या उत्तरेस गोल्डन हॉर्न ( सुवर्णशृंग ) नांवाची एक छोटी खाडी असून दक्षिणेस मार्मोराचा समुद्र आहे व मध्यें हें शहर वसलें आहे. हें वंदर म्हणूनहि प्रख्यात आहे. एकंदर शहराचा आकारहि गव्याच्या शिंगाप्रमाणें आहे.या गांवांतून एक छोटी नदी वहात जाते. रोमप्रमाणेंच या शहरांतहि टेंकाडें आहेत. एकंदर सात टेंकड्यांवर हें वसलेलें असून पुढीलप्रमाणें प्रख्यात स्थळें त्या त्या टेकड्यांवर आहेत. पहिल्या टेंकडीवर सेरागिलओ ( जनानखाना ), सेंट सोफिया, हिपोड्रोम; दुसरीवर कान्स्टन्टाईनचें थडगें व तुरी उस्मानिया मशीद; तिसरीवर युद्धखात्याची कचेरी, सेरास्केरिएट टॉवर व सुलतान सुलेमानची मशीद; चौथीवर दुसरा महंमद याची मशीद; पांचवीवर सेलीमची मशीद; सहावीवर टेकफर सराई व एगरी कपु; सातवीवर अवरेत ताश व सायतिभर. हें शहर प्रथम पूर्व रोमनसाम्राज्याची राजधानी ( स. ३३० ते १४५३), नंतर आटोमन साम्राज्याची राजधानी ( १४५३ पासून १९२४ पर्यंत) म्हणून आज १० शें वर्षें प्रसिद्ध आहे. अथेन्स, रोम व यरुशलेमप्रमाणें या शहराशीं रोमन कायदे, ग्रीक वाङ्मय व ख्रिस्ती धर्म यांचा जुनापुराणा संबंध जडलेला आहे. पहिला कान्स्टटाईन यानें रोम सोडून येथें आप राजधानी करून मूळच्या विझान्शिअम गांवास नवें रोम हें नांव दिलें (११ मे स. ३३०). तो मेल्यानंतर याल हल्लीचें नांव मिळालें. रोमन साम्राज्याची वाढ पूर्ण झाल्यावर व यापुढें साम्राज्यविस्तार न करतां आहे त्याचाच वचाव सुरक्षितपणें करण्याचें ठरल्यावर रोमसारखें अगदीं मध्यप्रदेशांत असलेलें शहर सोडून हें शहर राजधानी करणें भाग पडलें. शिवाय या सुमारास रोमनसाम्राज्य प्रतिनिधिसभेच्या हातून जाऊन एका सम्राटाच्या (एका व्यक्तीच्या) हातांत गेल्यानें, त्याच्या आवडीनिवडीस स्थळ देणें जरूर झालें. तसेंच इराणनें व रानटी लोकांनींहि यावेळीं उचल केली होती. सारांश या कारणांमुळें रोमच्या ऐवजीं हें शहर रोमन साम्राज्याची राजधानी झालें. आशिया व यूरोप या दोहोंच्या सांध्यावर व भूमध्य आणि काळासमुद्र या दोहोंच्या नाक्यावर हें वसलेलें असल्यानें राजकीयदृष्ट्या व व्यापारीदृष्ट्या जगातील एकंदर वंदरात याचें महत्व वरेंच वरच्या दर्जाचें झालें आहे. अड्रिआटिक समुद्र ते इराणी आखात व डान्यूब ते भूमध्यसमुद्र या इतक्या भूप्रदेशावर याच्यामुळें दाव ठेवतां येतो. शिवाय आसपास टेंकड्या असल्यानें खुद्द हें शहर लढाईत व अडचणीच्या वेळींहि सोयीचें–एकाएकीं शत्रूच्या हातीं न पडणारें–असें आहे. समुद्र व जमीन या दोहोंवरून शत्रु असंख्य सैन्यानिशीं चाल करून आला तरी सुद्धां त्याला शहर सुखानें कावीज करतां येणार नाहीं. शिवाय दार्दानेलिस व वॉस्परस या सामुद्रधुन्या वंद केल्या म्हणजे मार्मोराच्या समुद्रांत शत्रु अटकला जातो. एकंदरींत हें ठिकाण राजधानी करण्यास नैसर्गिकदृष्ट्या फारच उत्तम आहे. इ. स. ५३० मध्यें हिंदुस्थानचें म्हणून म्हटलेलें एक वकीलमंडळ जस्टिनियन वादशहाकडे येथें गेलें होतें. तत्पूर्वींहि ३३६ मध्यें असेंच एक वकीलमंडळ येथें गेलें होतें. सर्व शहराभोंवतीं मजवूत तटवंदी आहे. जनानखान्याच्या अक्रापोलिस नांवाच्या जुन्या किल्लयाखालींच मुख्य वाजारपेठ आहे. जवळच एक दगडी विजयस्तंभ–स. २६९ मधील क्लाडिअसच्या जयाचा निदर्शक असा–अद्यापि उभा आहे. शहराच्या तटवंदीस कान्स्टाइननेंच प्रारंभ केला होता. त्यानंतर तींत निरनिराळ्या वेळीं(इ. स. ४१३, ४३९, ४४७,

६२७, ८१३, ११८०) जास्त मजबुती होत गेली. बाजाराच्या जवळ आलती मरमर या भागांत थिओडोसिस(पहिला)च्या वेळीं एरिअन लोकांचीं धार्मिक कृत्यें होत असत (४४७). ५०८ मध्यें मोठे भूकंप होऊन शहराचे कांहीं भाग उध्वस्त झाले होते. या शहरावर अवार ( स. ६२७ ), सारासन ( ६७३-७७ ), बलोरियन ( ८१३-९१३ ), चवथें क्रुसेड ( १२०३-४ ),व तुर्क ( १४२२,१४५३ )यांनीं चढाई केली होती. इ. स. १२०४ ते १२६१ पर्यंत लॅटिन रियासत येथें होती; इ.स. १४५३ त आटोमन साम्राज्याची राजधानी येथें झाली. तटबंदीमध्यें पुढील ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत. (१) सुवर्णद्वार, येथेंच येदीकुलेह म्हणून एक छोटा किल्ला आहे. थिओडोसिस (पहिला) याच्या वेळची ही वेस आहे. (२) सेलिव्हरिया वेस, या वेशींतून १२६१ मध्यें अलेक्झीअस आंत आला व त्यानें लॅटिन रियासतीचा शेवट लावला. (३) तोप कापुसी, इच्यांतून १४५३ त सुलतान महंमद आंत आला व शहर मुसुलमानांच्या हातीं गेलें. (४) पॉर्फिराजेनिटसचा राजवाडा, हा वायझन्टाइन कारागिरीचा एक उत्तम नमुना आहे. ( ५ ) इसाक व अनेमस यांचे घुमट. ( ६ ) फनारचा व लिओचा तट. येथें १२०३ मधील क्रुसेड ( धर्म ) युद्ध घडलें. ( ७ ) हॅार्मिसडसचा राजवाडा आणि ( ८ ) संगमरवरी मनोरा. शहराचे साधारणतः तीन मोठे भाग पडतात. ते मार्मोराच्या समोरचा पठारावरचा पहिला, टेंकड्यावरील मध्याचा दुसरा व सुवर्णशृंगाच्या समोरचा माचीवरील तिसरा, हे होत. या तिन्ही भागांतून, पूर्वपश्चिम असा एक मोठा ‘ मेसे ’ नांवाचा राजरस्ता गेलेला आहे. या भागांतील प्रेक्षणीय स्थळें साधारणतः पुढीलप्रमाणें आहेत. सेंट सोफियाचें चर्च हें साऱ्या पौरस्त्य देशांतील ख्रिस्ती देवस्थानांत महत्वाचें चर्च आहे. पादशहाच्या राजवाड्याची चाल्के नांवाची मुख्य वेस, मजलीसगृह, मिलिअन, जस्टिनियन, युडोक्सिआ राणी व कान्स्टन्टाईन यांचे पुतळे. थिओडोसिस ( १ ला ), अर्काडिअस, मार्सिअन यांचे स्तंभ. बादशहाचा राजवाडा मूळचा कान्स्टन्टाइननें बांधलेला असून त्याच्यानंतरच्या राजांनीं त्यांत भर घातलेली आहे; मार्मोराच्या समुद्राकडे त्याचें तोंड आहे; चालसे, डाफ्ने व पवित्र वाडा अशा तीन मोठमोठया भागांचा तो बनलेला आहे. लावर्ते व पास्पेटस या कारागिरांनीं वाड्याचा बराच भाग बांधला आहे. वायव्येस असलेला जुना ब्लाचेर्नेचा राजवाडा हल्लीं रिकामा पडलेला आहे. असेच हेवदोमन व बकूली हे दोन जुने राजवाडे पडक्या स्थितींत हल्लीं उभे आहेत. म्युनिसिपल कामांच्या सोईकरितां शहराच्या चौदा पेठा केल्या आहेत. एके काळीं ख्रिस्ती पूर्वसाम्राज्याचें हें मुख्य ठिकाण असल्यानें त्या धर्माचीं निदर्शक अशीं स्थळें येथें बरींच आहेत. या चर्चोपैकीं पुष्कळ ख्रिस्ती देवळांच्या मुसुलमानांनीं मशिदी बनविल्या असल्या तरी कारागिरीच्या व जुनेपणाच्या दृष्टीनें तीं पहाण्यासारखींच आहेत, आणि या दृष्टीनेंच अद्यापिहि भाविक ख्रिस्ती लोक दुरून येथें त्यांच्या दर्शनास येतात. अमीर अकर जमीसी ही या शहरांतील सर्वांत जुनी ( ५ वें शतक ) इमारत आहे. सेंट सोफिया हें चर्च तर वायझंटाईन कलेचें उत्कृष्ट चित्र असून, साऱ्या जगांतील नांवाजलेल्या इमारतींपैकीं एक इमारत आहे. कलंदर जमीसी (६ वें शतक), सेंट इरेनी, इसा मशीद (स. ८८६), बोद्रम जामी (१० वें शतक), झैरेक जमीसी, खोजा मुस्तफाजमिसी, किलीसे जमिसी, इ. हल्लींच्या मशिदी ह्या पूर्वींचीं ख्रिस्ती देवालयें होतीं. सोफियाच्या मशिदीचें वर्णन फोसाती, साल्झेनबर्ग व लेथाबी यांच्या ग्रंथांत सांपडेल. इचा घुमट १०७ फूट व्यासाचा व ४६ फूट उंचीचा आहे. अतमैदान ( चौक ) म्हणून जें एक मोठें मैदान आहे तेथें या शहरांतील बहुतेक प्रमुख घडामोडी होत असतात. येथें घोड्यांच्या शर्यती होतात, लष्करी खेळ, पातशहांचे मानसन्मान, लष्करी जयदर्शक समारंभ, अपराध्यांना फांशी, शाहीद लोकांनां जाळणें वगैरे कृत्येंहि येथेंच होतात. शहराला पाणीपुरवठा लांबच्या दोन ठिकाणच्या जलाशयांतून भरपूर होतो. त्यासाठीं शहरांत मोठमोठे खजिने आहेत. पश्चिमेकडील टेंकड्यांमध्यें बंधारे घालून हे जलाशय केलेले आहेत. कांहीं बंधारे तर वायझन्टाईन कारकीर्दीइतके जुने आहेत. व्यापाराची पेठ म्हणून हें शहर प्रख्यात आहे. त्यासाठीं कृत्रिम बंदरें व गोद्या शहराच्या दक्षिणेस पूर्वीपासून आजपर्यंत अनेक राजांनीं तयार केल्या आहेत. खास पातशाही कामाकरतां जें बंदर आहे त्याचें नांव बुकोलिअन आहे. ख्रिस्ती राज्य जाऊन मुसुलमानी अंमल आल्यानंतर शहराच्या स्वरूपांत बराच फरक पडला. रस्ते अरुंद झाले, जुनी कला नाहींशी झाली, पुष्कळ देवालयें पाडलीं, राहिल्यापैकीं पुष्कळांच्या मशिदी केल्या, प्रजा, भाषा व पेहराव पौर्वात्य दिसूं लागला. जुन्या वायझंटाईन राजवाड्यांच्या धर्तीवर सुलतानांचे प्रचंड राजवाडे बांधले गेले. बाव-ई-हुमायूं (सैन्य वगैरे राहण्याची जागा), ओर्ता कपु (दरबारी दिवाणखाने)आणि बाह्-ई-सदत (खासगी कचेऱ्या)वगैरे भाग राजवाड्यांचे केले आहेत. जुन्या जनानखान्यांत महंमुद पैगंबराच्या कांहीं संस्मरणीय वस्तू आहेत. पुढील मशीदींचें कलाकुसरीचें काम पहाण्यासारखें असून त्यांवर पौरस्त्य कलेची छाया आहे. सुलतान महंमद याची मशीद, सेलीम, शहाजादा, सुलेमान व रुस्तुम पाशा या मशिदी १६ व्या शतकांतील तुर्की कलाकौशल्य उच्चतेस पोहोंचलें होतें त्या वेळच्या आहेत. तसेंच बायेझिद, अहमद, नुरी, जामिसी व पातशहांची व राजघराण्यांची तुरवती-स्मशानभूमि-याहि पहाण्यालायक आहेत. इस्तंबूलमध्यें अनेक उपनगरें असून तीं सुवर्णशृंगाच्या दोन्ही तीरांवर वसलेलीं असून स्कुटारी हें प्रख्यात गांव त्यांतच आहे. स्तंबूल म्हणजे ‘ शहरांत ’ ह्या मूळ जर्मन शब्दाचा अपभ्रंश आहे. गलत हा शहराचा भाग फार जुना आहे. स. १२६५ च्या सुमारास लॅटिन राज्य उलथविण्याच्या कामीं मदत केल्याबद्दल हा भाग जिनोईज

व्यापाऱ्यांनां मिचेलनें दिला होता. हे लोक १४५३ त तुर्कीनां शरण आले व हा भाग त्यांनीं त्यांनां दिला. हल्लीं हा भाग म्हणजे मुख्य व्यापाराचा—बँका, पोष्टें, आरमारी कचेऱ्या वगैरेचा—आहे. पेरा या भागांत परकीय वकिलाती व यूरोपीय वसाहती आहेत. एकोणिसाव्या शतकापासून या शहरानें हळू हळू पाश्चात्य रहाणी पत्करण्यास प्रारंभ केला व त्यामुळें मूळचें पौरस्त्य वळण व छाया अदृश्य होऊं लागली. रस्ते मोठे करण्यापासून तों पातशहाचे वाडे बांधण्यापर्यंत पाश्चात्य पद्धति स्वीकारण्यांत आली. जर्मन देखरेखीखालीं गोद्या व धक्के बांधले गेले. येथील अजवखान्यांत फार प्राचीन प्रेतांच्या पेट्यांचा एक मोठा संग्रह आहे. त्यावरून त्या काळच्या समाजाचा बराचसा इतिहास सांपडतो. कलाभवन, कलाशिक्षण, वैद्यकशाळा, अनाथगृह वगैरे बऱ्याच सरकारी संस्था आहेत. अमेरिकन व फ्रेंच यांच्या देखरेखीखालीं शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार करण्यास मूळ प्रारंभ झाला. मशिदीला जोडलेल्या जुन्या शाळा जाऊन शिक्षणमंत्र्याच्या खास देखरेखीखालीं शाळा उघडल्या गेल्या. परकीय धर्मांच्याहि पाठशाळा येथें आहेत. अबदुलहमीद (दुसरा) यानें या कामीं बरेंच लक्ष्य घातलें. शहराचें हवापाणी आरोग्यकारक आहे. परंतु उत्तरदक्षिणचे वारे सुटले म्हणजे हवा एकदम सर्द अगर गरम होते. उन्हाळा अगर हिंवाळा फारसा कडक नाहीं. रोगराई ( तापाशिवाय ) फार नसते. शहराच्या लोकसंख्येचा नक्की आंकडा आढळत नाहीं. अजमासें दहा लाखपर्यंत वस्ती असावी. अनेक देशांचे, धर्मांचे, जातींचे, भाषांचे, पोषाखांचे असे लोक येथें आहेत. "अनेक देशांचें शहर" असें याला खरोखरच म्हणण्यांत येतें. ठिकठिकाणीं पाण्याचे हौद आहेत. तेथून पाणके किंवा नौकर लोक ज्याच्या त्याच्या घरा पाणी नेतात. घरोघर नळ्या नाहींत. राजकीय घडामोडींमुळें शहराच्या व्यापारास नेहमीं धक्का बसतो. मोठमोठे व्यापारी बहुतेक परकीय ( आर्मेनियन व ग्रीक ) लोक आहेत ( मध्यंतरीं परकीयांनां व्यापाराची बंदी होती. ) तुर्क अगदींच थोडे आहेत. निर्गत व्यापार फार कमती आहे. मिठाई, जाळीचें व कशिद्याचें कापड, लोंकर, कातडीं, शिंगें, घोड्यांचे केस, हाडें, चिंध्या, गंजलेलें लोखंड, स्त्रियांच्या हातमोजांनां लागणारें कातडें, कच्चा माल ( रेशीम, लोंकर औषधें, धान्य, गालिचे वगैरेंचा ) यांचा निर्गत मालांत समावेश होतो. साधारण हा व्यापार चार कोटींचा व आयात व्यापार सात कोटी रुपयांचा होतो. निर्गतींत शेकडा चाळीसचा भाग इंग्लंडचा आहे. पूर्वी आयात व्यापार सर्वांत जास्त अमेरिका, नंतर इंग्लंड व नंतर जर्मनी अशा अनुक्रमें असे. हल्लीं जर्मनी आपला व्यापार वाढवूं लागला आहे. राज्यव्यवस्थेसाठीं शहराचे विभाग केले आहेत. ते स्तंबोल, पेरा—गलत, बेशिकतास, स्कूटारी हे होत. स्तंबोलचा जो गव्हर्नर तोच या चारी प्रांताचा मुख्याधिकारी असून तोच कोतवाली ( पोलीस ) खात्याचा मंत्री असतो. त्याच्या हाताखालीं चार गव्हर्नर्स असून, ते सुलतान नेमीत असे. यांच्याशिवाय चार निरनिराळे सेनापती असतात; सैन्याचे चार तळ केलेले आहेत. चारी म्युनिसिपालिटयांचा मुख्य अध्यक्ष सुलतानानें निवडलेला व गृहमंत्र्याला जबाबदार असे. त्याच्या हाताखालीं चोवीसजणांचें कार्यकारी मंडळ असे. हे सभासद सुलतान अगर गृहमंत्री नेमी. शहराच्या म्युनिसिपालिटीच्या कामासाठीं चौदा पुरे केले आहेत. या पुऱ्यांत अनेक मोहल्ले आहेत. शहराबाहेरील खेड्यांचे व बेटांचे सहा विभाग असून त्यांवरील अधिकारी स्वतंत्र आहेत. जुन्या तहाप्रमाणें परकीय लोकांनां येथें बरेच हक्क आहेत. स्वतःच्या कोर्टांपुढें व ज्यूरीपुढें चौकशी होते. तुर्की कोर्टांपुढें खटला चालल्यास आपल्या देशाच्या वकिलाचा एखादा प्रतिनिधी हजर ठेवणें, स्वतःच्या शाळा व दवाखानें स्थापणें, स्वतःचीं धार्मिक कृत्यें बिनभोभाट करणें आणि स्वतःचीं पोष्टें स्थापणें वगैरे हक्क त्यांनां आहेत. कोण्याहि तुर्की पोलिसाला, परक्याच्या घरांत ( त्या परकीय मनुष्याच्या देशाच्या वकिलाच्या परवानगी शिवाय ) शिरतां येत नाहीं. देशानें ख्रिस्ती वाटयांनां धार्मिक बाबतींत बरेंचसे स्वातंत्र्य दिलेलें आहे.

महायुद्धानंतर येथील महत्व थोडेंसें कमी झालें. हल्लीं ( १९२८ ) तुर्कस्तानची राजधानी येथून हलवून अंगोरा येथें नेली आहे. हल्लीं तुर्कस्तानांत सुलतानशाही नसून लोकसत्ताक राज्य स्थापिलें गेलें आहे. पूर्वी तुर्कांचा सुलतान हाच त्यांचा खलीफ असे, आणि त्याची गादी येथेंच असे. आतां त्या खलिफाचें तुर्कांनीं उच्चाटण केलें असून त्याचे वाडेहि जप्त केले आहेत [ ग्रोसव्हेनोर—कॉन्स्टांटिनोपल; गिबन. ]

**कान्हिरा किल्ला**—मुंबई. नाशिक जिल्हा. धोडपच्या वायव्येस ७ मैलांवर चांदोर टेंकड्यांमध्यें हा आहे. १८१८ मध्यें याचा तट बहुतेक सर्व पडून गेला होता. किल्ल्यावर टांकीं असून पाणी विपुल आहे. त्र्यंबकेश्वराबरोबर ब्रिटिशांच्या स्वाधीन झालेल्या सतरा किल्ल्यामध्यें हा एक होता. [ ब्रिग्स रिपोर्ट २० । ६। १८१८; ब्लाकर—मराठावार ७. ३२२ मुं. गॅ. १६ ]

**कान्हीरा खेडें**—पंजाब. कांग्रा तहसील व जिल्ह्यांतील खेडें. उ. अ. ३२° १२' व पू. रे. ७६° २४'. लोकसंख्या ( १९०१ ). ३४४६. येथें सांपडलेल्या दोन शिलालेखांवरून २ ऱ्या शतकांत येथें एक बौद्ध मठ होता असें अनुमान निघतें. स्लेटपाटीचा दगड खाणींतून बराच निघतो. १९०५ च्या धरणीकंपानें याची बरीच हानी झाली.

**कान्हेरी**—लेणीं. संस्कृत कृष्णगिरी शब्दाचा हा अपभ्रंश आहे. ठाणें शहराच्या पश्चिमेस सुमारें पांच मैलांच्या अंतरावर व मुंबईच्या उत्तरेस सुमारें २० मैलांच्या अंतरावर साष्टी बेटाच्या मध्यभागीं हीं लेणीं आहेत. हीं उत्तर अक्षांश १९ '१३' व पूर्व रेखांश ७२ '५९' यावर आहेत. हीं

लेणीं शंभरावर आहेत. जी. आय. पी. रेल्वेच्या भांडुप स्टेशनापासून किंवा बडोदा रेल्वेच्या बोरिवली स्टेशनापासून या स्थानीं जातां येतें.

बोरिवलीच्या रस्त्याच्या ज्या जागेपासून कान्हेरीची पायवाट फुटते त्या जागेपासून तुळशी तलावाच्या पात्रांत एक लेणें आहे. येथें उन्हाळ्यांत मात्र पाणी नसतें. तुळशीपासून वायव्येकडे कामन नांवाच्या डोंगराची जी ओळ आहे, तिची कान्हेरी ही शाखा आहे.

पश्चिमेकडील कड्याखालून दाट झाडीनें आच्छादिलेल्या एका ओढ्याच्या पात्रांतून झिजलेल्या खोदीव पायऱ्यांच्या जिन्यानें झुडपांनीं आच्छादिलेल्या एका पटांगणामधून वर गेलें म्हणजे एक थोडा पुढें आलेला खडक लागतो. त्याच्या पश्चिमेकडच्या बाजूस एक मोठें खोदीव लेणें आहे, त्याला 'चैत्य' म्हणजे देऊळ म्हणतात ( नं. ३ ). एका खोल व सरासरी पूर्वपश्चिम जाणाऱ्या अरुंद अशा घळीच्या तोंडाशीं हें लेणें आहे. ह्या अरुंद घळीच्या दोन्ही बाजूंच्या खडकांत हीं लेणीं खोदलेलीं आहेत. घळीच्या उत्तरेकडच्या टेंगण्या कडाकडे लेण्यांची एकच रांग खोदण्यापुरती जागा आहे. परंतु दक्षिणेकडच्या उंच डोंगरांत लेण्यांच्या एकावर एक अशा तीन रांगा खोदलेल्या असून, एका मजल्यावरच्या रांगेकडून दुसऱ्या मजल्यावरील रांगेकडे जाण्याकरितां ओबडधोबड अरुंद पायऱ्यांचे मोठाले जिने खोदलेले आहेत. उत्तरेकडच्या लेण्यांच्या रांगांच्या पाठीमागें खडकाचे दोन उंचवटे असून त्यांत धातुगोप ( दागोबा ) किंवा 'स्तूप' यांचे अवशिष्ट अंश आढळतात. ओबडधोबड खोदीव पायऱ्यांच्या जिन्यानें ह्या उंचवट्याकडे जातां येतें. दक्षिणेकडील लेण्यांच्या वरच्या बाजूची चढण व सपाट पटांगण ह्यांवर पायऱ्या व पाण्याचीं टांकीं खोदलेलीं आहेत. ह्या ठिकाणीं पूर्वी स्तूप, धातुगोप अथवा चैत्यें ( देवळें ) होतीं.

कान्हेरी येथील कोणत्याहि लेण्यांत तें अशोक राजाच्या कालाइतकें जुनें असल्याची खातरी होण्यासारखीं चिन्हें आज दिसून येत नाहींत. तथापि नंबर ५, ८, ९, ५८ व ५९ चीं लेणीं साधीं असल्यामुळें तीं अतिशयच जुनीं म्ह. इ. स. पू. १०० वर्षांपासून तों इ. स. नंतर५० वर्षांपर्यंतच्या काळांतलीं असावींत असें दिसतें. नाशिक येथील तिसऱ्या लेण्यांतील लेख नं. २६ यांत राजा द्वितिय गोतमीपुत्र ( इ. स. १७७–१९६ ) याच्या कारकीर्दींत सह्य, विंध्य व मलय ह्या पर्वतांच्या पंक्तीस बसण्यासारखा प्रसिद्ध कान्हेरीचा डोंगर होता असें सांगितलें आहे; त्यावरून पूर्वोक्त लेण्यांच्या जुनाटपणाविषयींच्या अनुमानास बळकटी येते. कान्हेरी येथील पांचव्या लेण्यांत एक कोरींव लेख आहे, त्यावरून असें दिसून येतें कीं, वासिष्ठिपुत्र नामक राजाच्या कारकीर्दींइतक्या जुन्या ( इ. स. १४० ) काळीं येथील जुन्या लेण्यांकरितां टांकीं केलेलीं होतीं. येथल्या सुमारें पन्नास कोरींव लेखांचा अर्थ लाविलेला आहे. त्यांपैकीं दहा लेखांच्या लिपीच्या वळणावरून ते लेख ख्रिस्ती शतकापूर्वीचे असावे, असें दिसतें. शातकर्णी वंशीय राजांच्या कारकीर्दींत ( इ. स. पू. २०० ते इ. स. नं. ३५० ) व विशेषतः दुसऱ्या यज्ञश्री गोतमीपुत्र नामक राजाच्या कारकीर्दींत ( व्हि. स्मिथच्या मतें इ. स. १७३–२०२ ) कान्हेरी येथील विहारांची फारच भरभराट होती असें दिसतें. पन्नास कोरींव लेखांपैकीं वीस कोरींव लेख या कारकीर्दीच्या सुमारास खोदलेले आहेत. त्यांत राजे, त्यांचे प्रधान व शेटसावकार यांनीं येथील जोग्यांच्या सोईकरितां लेणीं, पाण्याचीं टांकीं, जमिनी व रोकड पैका यांच्या देणग्या दिल्याचा उल्लेख आहे. तिसऱ्या रांगेंतलीं सगळीं व तिसऱ्या नंबरचें थोरलें चैत्य ( देऊळ ) हीं, ह्याच काळीं कोरलीं गेलीं असावीं. इ. स. ४ थ्या शतकांत ३८ व्या लेण्यांतील खोदीव चित्रयुक्त दगडी स्तूप बांधिला असावा व पांचव्या शतकांत तिसऱ्या लेण्याजवळचा स्तूप बांधिला असावा. पन्नासांपैकीं दहा कोरीव लेख इ. स. च्या पांचव्या व सहाव्या शतकांतील आहेत. यावरून ह्या दोन्ही शतकांत नवीं लेणीं कोरण्याचा व जुन्या लेण्यांस नवीन कोरींव दागिन्यांनीं भूषविण्याचा क्रम चालू होता असें दिसतें. हीं नवीं लेणीं व नवीं भूषणें जुन्यांहून विशेष सुबक आहेत. हीं बौद्धधर्माच्या अर्वाचीन म्हणजे महायान पंथाच्या काळीं निर्माण झालीं असावीं. ज्याला दरबार भरण्याचें लेणें म्हणतात तें १० वें लेणें, पहिल्या रांगेच्या शेवटचीं इतर लेणीं, चैत्याच्या [ नं. ३ ] पडवीच्या दान शेवटांकडील गौतम बुद्धाचे दोन राक्षसी पुतळे आणि इतर अनेक लहान खोदीव चैत्यें हीं याच काळचीं होत.

कान्हेरी येथील कोरीव लेखांपैकीं नं. ५४ चा अर्थ थोडाफार लागलेला आहे. यांपैकीं ६६ व्या लेण्यांतील तीन लेख पल्हवी भाषेंत आहेत. १० व्या लेण्यांतील एक व ७८ व्यांतील एक असे दोन लेख संस्कृत भाषेंत आहेत. बाकीचे सगळे लेख लेण्यांतील लेखांत ज्या प्रकारची प्राकृत ( पाल ) भाषा आढळते, तींत लिहिलेले आहेत. सतराव्या लेण्यांतील लेखाची भाषा मात्र कांहीं विशेष प्रकारची प्राकृत भाषा आहे. ८४ व्या लेखांत जो एक सुरेख लिपीनें कोरलेला लेख आहे त्याखेरीज बाकीच्यांची लिपि लेण्यांतील लेखांत आढळून येणाऱ्या लिपीसारखीच आहे. अक्षरांच्या वळणावरून यांतील दहा लेख वासिष्ठिपुत्र नामक राजाच्या वेळचे ( इ. स. १३३–१६२ ), वीस लेख दुसऱ्या गोतमी पुत्र राजाच्या वेळचे इ. स. १७३—२०२, दहा इ. स. पांचव्या व सहाव्या शतकांतले, एक आठव्या शतकांतला, तीन नवव्या किंवा दहाव्या शतकांतले व एक अकराव्या शतकांतला असावा, असें दिसतें. येथें सांपडलेलीं पुष्कळ नाणीं १५ व्या शतकांतलीं आहेत. १० व्या व ७८ व्या लेण्यांतील तीन लेखांत राजांचीं नांवें व काल आहेत. तिसऱ्या, ३६ व्या व ८१ व्या लेण्यांतल्या तीन लेखांत राजांचीं नांवें

आहेत, परंतु काल नाहीं. बाकीच्यांचे काल अक्षरांच्या वळणावरून ठरविलेले आहेत.

हीं लेणीं एकंदर १०२ आहेत. त्या सर्वांत सुलभ रीतीनें जातां येते. येथें पांच लहान गुहा आहेत, त्यांत मात्र जाण्यास अडचण पडते. सुमारें सत्तावीस लेणीं चांगलीं आहेत, छपन्न लहान आहेत आणि पंधरा अंशतः किंवा अगदींच मोडकळीस आलेलीं आहेत. चैत्यें ( देवळें ) व दहाव्या नंबरचें दरबार भरण्याचें लेणें यांखेरीज बाकीच्या सर्व लेण्यांत लोक रहात असत असें दिसून येतें. पुष्कळ लेण्यांत भिंतीला लागून निजण्याकरितां सभोंवार मंचक कोरलेले आहेत. प्रत्येक लेण्यांत शिरण्याची जी वाट आहे, तेथें दारांच्या चौकटी व झडपा बसविलेल्या होत्या व त्या बंद करण्याकरितां आडवे अडसर बाजूच्या दगडांत बसविलेले होते. कांहीं खिडक्यांच्या जागा खोदल्या होत्या व कांहींना चौकटी बसवून झडपा लावल्या होत्या. सगळ्या विहाराला पाण्याचा चांगला पुरवठा होता. डोंगराच्या माथ्यावरील खडकांत पाण्याचीं कित्येक टांकीं कोरलेलीं आहेत आणि बहुत करून प्रत्येक लेण्यांत एकेक टांकें असून त्यांत लेण्यांच्या माथ्यावरून पाणी येण्याकरितां पन्हळ खोदलेला आहे. लेण्यांच्या पूर्वेस एक भक्कम दगडी बांध होता तो हल्लीं मोडलेला आहे.

[ फर्ग्यूसन–बर्जेस–दि केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया; फर्ग्यूसन–हिस्टरी ऑफ इंडियन अँड ईस्टर्न आर्किटेक्चर. मुं. गॅ. ( ठाणें जिल्हा ). रा. ज. बा. मोडक यांनीं गॅझेटियरवरून एक लेख तयार केला तो वि. विस्ताराच्या पु. ४७ अं.१मध्यें प्रसिद्ध झाला आहे ].

**कान्होजी आंग्रे**—यांचें मूळचें आडनांव सकपाळ. हे अस्सल क्षत्रिय असून यांचें मूळ ठिकाण हर्णैजवळील आंगरवाडी होय. यांच्या आजाचें नांव सेखोजी व बापाचें तुकोजी आंग्रे. तुकोजीला शिवाजीच्या आरमारांत २५ असामींची सरदारी होती. तेथें त्यानें नांवलौकिकहि मिळविला होता. इ. स. १६९० च्या सुमारास कान्होजी आंग्रे हा सिधोजी ( भिवजी ) गुजर याच्या हाताखालीं सुवर्णदुर्गाचा सरनोबत म्हणून मराठ्यांच्या आरमारांत काम करीत होता. संभाजीच्या कारकीर्दीत याच्या कर्तृत्वास प्रारंभ झाला; त्यावेळीं हा फिरतें आरमार घेऊन कोंकणकिनाऱ्याचा बंदोबस्त करीत होता, असा उल्लेख बखरींत सांपडतो. म्हणजे, इ. स. १६८० पासून १६८९ पर्यंतच्या कालांत कान्होजी हा उदयास येत चालला होता. इ.स. १६८० च्या पूर्वी कान्होजी शिवाजीच्या आरमारांत असला पाहिजे हें उघड आहे. संभाजीच्या वेळीं माणकोजी मराठे,उदाजी पडवळ, सुभानजी खराटे व भिवजी गुजर हे खांदेरी, सागरगड, राजकोट व कुलाबा ह्या चार बंदरी किल्ल्यांवर अंमलदार होते. कान्होजी आंग्र्याकडे ह्यावेळीं कोणता बंदरी किल्ला होता तें समजत नाहीं. इ.स.१६८९नंतर माणकोजी मराठे, उदाजी पडवळ व सुभानजी खराटे आपले अंमल सोडून प्रबळगडास गेले व त्यांच्या जागीं भिवजी गुजर व कान्होजी आंग्रे हे दोघे राहिले. मुख्य सत्ता उध्वस्त झाली असतां, स्वतःच्या कर्तबगारीनें शत्रूला तोंड देणाऱ्या अनेक मराठा सरदारांपैकीं कान्होजी असल्यामुळें, त्याला उदयास येण्यास ही वेळ उत्तमोत्तम मिळाली.मोंगल व मराठे यांच्यांत इ.स. १६८९ त लढाई होऊन इ. स. १६९१ त ह्या दोनही सत्ताधाऱ्यांमध्यें तह होऊन कोंकणांत दुतर्फा अंमल कायम झाला. पुढें सन १६९८ त कान्होजी आंग्र्याचें व सिद्दीचें मोठें कडाक्याचें युद्ध झालें.

संभाजीच्या कारकिर्दींत मराठ्यांच्या झगड्यांचा बराच भाग कोंकणांत घडल्यामुळें लढाईचें बहुतेक ओझें आंग्र्यावर होतें. त्यांच्या ताब्यांतील बहुतेक प्रदेश व किल्ले मोंगलांनीं जिंकिले; शेवटीं तह होऊन मराठे सरदार व मोंगल यांनीं तिकडचा वसूल निम्मेनिम वांटून घेतला. तेव्हां भिवजी गुजर व कान्होजी आंग्रे हे कुलाबा व खांदेरी येथें येऊन राहिले. त्यांत गुजर हा मुख्य असून कान्होजी हा त्याच्या हाताखालीं होता. पुढें राजाराम जिंजीकडे जाऊन मोंगलांस शह देत असतां कान्होजीनेंहि समुद्रकिनाऱ्यावर आपली सत्ता वाढवून मोंगलांस हांकून लावण्याचा क्रम चालविला. कोंकणचा सुभा व आरमारचा अधिकार संभाजीनें भिवजी उर्फ सिधोजी गुजर याजकडे दिला होता. त्याच्या हाताखालीं कान्होजी आंग्रे हा होता. 'शहाणे! शूर, मर्द जाणोन राजारामानें आंगरे यास सुवर्णदुर्गी ठेविलें. त्यांनीं तेथें राहून बहुत खबरदारीनें सर्व जंजिरे व प्रांत राखिला; कांहीं किल्ले व ठाणीं पातशाहींत गेलीं तीं जवामर्दीनें घेतलीं. झाडींतून हिंडणें, स्वाऱ्या करणें,खराब केलेले व मोडलेले किल्ले नीट करून स्वारी-शिकारी करणें,असे बहुत कर्तें त्याजवरून महाराज(राजाराम) चंदीहून आल्यावर, त्यांनीं सर्फराजी करून, कान्होजीस 'सरखेल हा किताब दिला.' सारांश, मराठेशाहीवरील भयंकर आपत्तींत कान्होजी आंग्र्यानें पश्चिम किनाऱ्यावरील मराठ्यांच्या सत्तेचें उत्तमप्रकारें संरक्षण केलें होतें. सर्व राष्ट्रांच्या गलबतांवर तो हल्ले करी. त्रावणकोरपासून मुंबईपावेतों एकंदर किनाऱ्यावर कान्होजीची छाप बसली नाहीं असें एकहि ठिकाण नव्हतें. या किनाऱ्यावरचे सर्व किल्ले त्यानें मराठ्यांच्या ताब्यांत ठेविले. सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथें आरमारासंबंधींच्या सर्व साहित्याचीं कोठारें असून कुलाबा हें आरमाराचें मुख्य ठाणें होतें. खांदेरी व उंदेरी येथेंहि ठाणीं होतीं.

इ. स. १६९७–९८च्या सुमारास भिवजी गुजर व कान्होजी आंग्रे यांचा आपसांत कांहीं तंटा लागला व आंग्र्यानें गुजर यास अटकेंत ठेविलें. पुढें गुजर लवकरच वारला व आंग्रे हा मराठ्यांच्या आरमाराचा अधिपति झाला. तेव्हांपासून त्याचा प्रतिकार करण्याकरितां इंग्रज, फिरंगी व मुसुलमान हे त्रिवर्ग एकत्र जमून आंग्र्याशीं युद्ध करूं लागले. त्यांत मुसुलमानांनीं थोडक्याच दिवसांत आंग्र्याशीं तह

करून युद्धांतून आपलें अंग काढून घेतलें. इंग्रज व आंग्रे यांचा हा झगडा पुढें विशेष जोरानें चालला, त्यावरूनच आंग्र्यांची खरी योग्यता दिसून येते.

राजारामाच्या पुढची कान्होजीची कच्ची हकीकत उपलब्ध नाहीं. इतकें मात्र समजतें कीं, ताराबाईला या शूर पुरुषाचा फार उपयोग झाला व किनाऱ्यावरची बाजू, सिद्दी वगैरे परशत्रूंशीं अव्याहत झगडून त्यानें उत्तम प्रकारें संभाळिली. शाहु छत्रपति राज्याधिष्ठित झाल्यावर ताराबाईनें जे कित्येक सरदार आपणाकडे वळविले, त्यांपैकीं कान्होजी हाहि एक होय. तो बरेच दिवसपर्यंत ताराबाईच्या पक्षानें लढत होता.

बाळाजी विश्वनाथास शाहूनें कृष्णराव खटावकरावर पाठविलें, त्यावेळेस कान्होजी आंग्र्यानें कोंकणांत ताराबाईच्या तर्फेनें बराच उच्छेद मांडिला होता. सांवतवाडीपासून मुंबईपर्यंतची कोंकणपट्टी त्याच्या ताब्यांत असून शिवाय अलीकडे मुंबईच्या उत्तरेकडील पेशव्यांच्या ताब्यांतील कल्याण प्रांत काबीज करून, राजमाची, लोहगड वगैरे घाटमाथ्यावरचे किल्लेहि त्यानें हस्तगत केले होते. त्यांच्या बंदोबस्ताकरितां शाहूनें बहिरोपंत पिंगळे (पेशवा) यास फौज देऊन पाठविलें ( सुमारें सन १७१३ ). आंग्र्यानें त्याचा पराभव करून त्यास लोहगडावर कैदेंत ठेविलें. इतक्यांत बाळाजी खटावकराच्या मोहिमेहून परत आल्याबरोबर त्यास शाहूनें बरीच मोठी फौज देऊन आंग्र्यांवर पाठविलें. त्यावेळीं लोहगडाखालीं लोणावळ्याजवळचें वलवण म्हणजे ओलवण येथें कान्होजी आंग्रे लोहगडावरून येऊन बाळाजीस भेटला आणि पुढें तह होऊन लोहगड पेशव्यास मिळाला. बाळाजीनें बहिरोपंताची सुटका केली व शाहूच्या पक्षास कान्होजीस वळवून घेतलें.

पेशवाईच्या बखरींत ह्या प्रकरणासंबंधानें असें म्हटलें आहे कीं, "बाळाजी विश्वनाथाचा व आंग्रे यांचा कागदोपत्रीं घरोबा असल्यामुळें लोहगडाखालीं आल्यावर बाळाजीपंत नानांनीं आंग्रे यांस पत्र लिहून पाठविलें व दरमजल करीत कुलाब्यास गेले. 'सरखेल' पुढें सामोरे येऊन भेटीचा समारंभ झाला. पेशव्यांनीं त्यांस सांगितलें कीं, ' तुमचा आमचा भाऊपणा. पेशवाई तुमच्या घरांत. आयते किल्ले देत असाल तरी तसेंच सांगावें. सरखेलीचें पद ताराबाईकडून आहेच; इकडूनहि करार करून देववितोंच. महाराजांचे चाकर होऊन कृपा संपादून घ्यावी. त्याजवरून त्यांनीं मान्य करून राजमाची मात्र ठेवून, लोहगड व धनगड व तुंगतिकोना या किल्ल्याच्या चिठ्या देऊन किल्ले देवविले. जंजिरेकर हबशाचा व आंगरे यांचा कलह लागला होता तो तह करून दिला.

पेशव्यांनीं महाराजांकडून कान्होजी आंगरे यांस सरखेलीचें पद करार करून वस्त्रें व शिक्केकटार पाठविली. तह झाला त्याचीं कलमें:—(१) खांदेरी, कुलाबा, वगैरे दहा मोठे किल्ले व बहिरवगड, कोटला वगैरे सोळा लहान ठिकाणें व गढ्या, त्याखालील प्रदेशांसह इतकीं कान्होजीला दिलीं. (२) आरमाराचा अधिकार व सरखेल पदवी कान्होजीकडे कायम केली. (३) वरील कलमांत सांगितलेल्या मुलखाशिवाय बाकी सर्व नवीन जिंकलेला प्रदेश व ठाणीं कान्होजीनें सोडून दिलीं. (४) त्यानें संभाजीचा पक्ष सोडिला व कायमपणें शाहूच्या पक्षांत राहिला. राजमाची किल्ला तेवढा आंगरे यांजकडेच ठेविला. या तहान्वयें मुंबईपासून खारेपाटणपर्यंत सर्व मुलूख शाहूकडून आंग्र्यास मिळाला. वरील तहानें जंजिरेकर सिद्दीशीं त्याचा कांहीं प्रांत आंग्र्याकडे आल्यानें आंग्र्याचा तंटा लागला. तेव्हां कान्होजीनें बाळाजीच्या मदतीनें लवकरच त्याला वठणीवर आणिलें ( १७१३ ). गेल्या दहाबारा वर्षांत हबशानें कोंकणांत बरेच प्रांत हस्तगत केले होते ते परत घेण्यास बाळाजीनें आंग्र्यास मदत दिली, तेव्हां थोडा बहुत झगडा होऊन सिद्दी व आंगरे यांचाहि तह ठरला (सन १७१५, जानेवारी ). आठ महाल सिद्दीच्या ताब्यांत होते, त्यांचा निम्मा वसूल शाहूच्या कमावीसदारांनीं घ्यावा असें ठरलें.

कान्होजी व शाहुछत्रपति या उभयतांची भेट इ. स. १७१८ त जेजुरीस मोठ्या समारंभानें झाली. महाराजांनीं आंगऱ्याचा सन्मान केला. बादली चादर घातली; आंगऱ्यांनीं नजर केली. बंदरी जिन्नस उत्तम पदार्थ बहुत आणिले, ते सर्व व खजिना महाराजांस नजर केला. जेजूरीस शिमगी पौर्णिमा झाली. प्रतिपदेस कूच होऊन निघाले. तेव्हां आंगरे यांनीं पांच रंगांचा गुलाल व रंगीत सामान बहुत आणिलेलें, दरकूच हत्तीवर रंग व गुलाल भरून खेळत सातारा येऊन पावले. जेजुरीपासून साताऱ्यापर्यंत रस्ता गुलालांनीं भरला. महाराजास डेऱ्यास नेऊन पंचमीस समारंभ करून वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे ऐसें देऊन अष्टप्रधान सरदार दरखदार सुद्धां वस्त्रें देऊन मेजवानी केली. सुभ्याच्या सनदा व महाराजांनीं बहुमान दिला तो घेऊन आंगरे परत गेले. ( स. १७१८ ).

या सुमारास कान्होजीनें इंग्रजांस त्रास देण्यास सुरुवात केली. कोंकण किनाऱ्यावर आलेल्या सर्व जहाजापासून ( मग तीं कोणत्याहि राष्ट्राचीं असोत ) तो " चौथ " वसूल करी व त्यांचा झाडा घेई. नंतर त्यास आपला कौल ( परवाना ) देई हें इंग्रजांस खपेना. त्यांच्या त्या वेळच्या हकीकती व आंग्र्यावर दांत-ओंठ खाऊन त्यांनीं पाखडलेली आग या गोष्टी वाचल्या म्हणजे कान्होजीच्या कामगिरीची कल्पना होते. त्याचा एक मासला पुढें दिला आहे:—

" दर्यावर लूट करणाऱ्या ह्या सरदाराची हांव विजयदुर्ग हस्तगत करूनच थांबली नाहीं. पोर्तुगिज व इतर व्यापाऱ्यांस घालवून देऊन पश्चिम किनाऱ्यावर बंदरें व किल्ले बांधून तो एक स्वतंत्र राजाच बनला ( अलिबागचा व माणिकगडचा किल्ला कान्होजीनेंच बांधला ). एकदां सुंदर आरबी

घोड्यांनीं भरलेलें एक जहाज सहजगत्या त्याच्या हस्तगत झालें. तेणेंकरून नवीन घोडेस्वरांची फौज त्यानें तयार केली. हिंदु, मुसुलमान, डच, पोर्तुगीझ, फ्रेंच इत्यादि अठरापगड जातींचे लोक रक्तानें डागळलेल्या या चोराच्या निशाणाला मान देत. अर्थात् असे लोक म्हणजे निष्ठुर व बेपर्वा असावयाचे. त्यांस वस्त्राबाइटाची चाड थोडीच असणार. " एकंदरींत मराठी राज्याच्या तर्फेनें आंग्रे हा पश्चिम किनाऱ्याचा रखवाली करीत असतां, त्याजकडून पाश्चात्यांच्या मनमुराद संचाराला अडथळा होई म्हणून हे लोक त्याच्या नांवानें असे खडे फोडीत.

' पश्चिम किनाऱ्यावर आमच्या अनिरुद्ध संचारास अडथळा करील त्याची मी खोडकीच जिरवणार, ' असा बून नांवाच्या इंग्रज गव्हर्नरानें आपला निश्चय प्रगट करून दोन वर्षांच्या आंत नऊ उत्कृष्ट लढाऊ जहाजें मुंबईच्या बंदरांत नवीन तयार केलीं. या सर्वांवर मिळून १४८ तोफा व साडेबाराशें लढाऊ खलाशी होते. यांशिवाय जमिनीवरून लढण्यास अडीच हजार यूरोपियन व दीड हजार एतद्देशीय फौज मुद्दाम विजयदुर्ग वगैरे आंग्र्याचे किल्ले पाडाव करण्यासाठीं तयार केली. या सुमारास कान्होजीनें इंग्रजांचें एक प्रचंड लढाऊ जहाज ( ससेक्स ) धरून नेलें ( १७१७). त्यामुळें बून इंग्रज फार चिडला व त्यानें ता. १७ एप्रिल स. १७१७ रोजीं वरील जंगी आरमार विजयदुर्ग किल्ल्यावर आणलें. तेथें किल्ला हस्तगत करण्याचा त्यानें कसून प्रयत्न केला. परंतु कान्होजी आंग्र्याच्या मारापुढें नामोहरम होऊन मुठींत नाक घेऊन त्याला आरमारासह मुंबईस परत यावें लागलें. इंग्रजांचे दोनशें लोक मेले व तीनशें जखमी झाले. पुढें आणखी दोन नवीन जहाजें बांधून पुनः दीड वर्षानें बूननें खांदेरीवर आरमार पाठविलें. पण तेथेंहि चांगला मार खाऊन आरमार परत मुंबईस आलें. वरील दोन प्रसंगांनीं आंग्र्याचा जोर जास्तच वाढला व या दोन पराभवांची वातमी विलायतेस जाऊन तेथील अधिकाऱ्यांस ज्यास्तच चेव आला. त्यांनीं राजाची मनधरणी करून मुंबईस जास्त मदत पाठविली. अॅड्मिरल मॅथ्यूझच्या हाताखालीं हें आरमार सप्टेंबर १७२१ त मुंबईस आलें. पोर्तुगीझ लोकांचीहि या प्रसंगीं त्यांनीं मदत मिळविली. जय्यत तयारी करून त्यांनीं या वेळीं अलीबागचा किल्ला व कुलाबा यांजवर जलमार्गानें व खुष्कीनें हल्ला केला ( इ. सन १७२२ ). परंतु पूर्वीप्रमाणेंच त्यास ह्या प्रसंगींहि हार खावी लागली. सन १७२४ मध्यें डच लोकांनीं कान्होजीपासून विजयदुर्ग घेण्याचा प्रयत्न केला. पण त्यांचाहि हल्ला निष्फळ झाला. कान्होजीचा व सिद्दीचा तह झाल्यापासून दहा वर्षेंपर्यंत त्या दोघांची गोडी होती. तत्पूर्वी सिद्दी रसूल याकूबखान याचा व कान्होजीचा कैक वर्षें झगडा चालला होता. सन १७२५–२६ च्या सुमारास निजामानें सिद्दीची उठावणी केल्यामुळें त्याचा बंदोबस्त करण्याविषयीं बाजीरावास व कान्होजीस शाहूची आज्ञा झाली. परंतु कान्होजीनें तें काम एकदम अंगावर घेतलें नाहीं. त्यानें शाहूस असें कळविलें कीं, ' हुजुरून साहित्य गनिमास नतीजा पाठवावयाचे होत नाहीं; स्वामींनीं आपले स्थळास दुसरा पाठवून आपणास मामल्यापासून मुक्त करावें ( १७२६ ). ' याच सालच्या दसऱ्याच्या दिवशीं कान्होजी साताऱ्यास जाऊन शाहूस भेटला. यावेळीं कान्होजीनें इंग्रजांचीं अनेक जहाजें धरलीं होतीं. सन १७२७ मध्यें त्यानें डर्बी नांवाचें एक ईस्ट इंडिया कंपनीचें मालानें भरलेलें जहाज पकडून नेलें. कान्होजी आंग्र्याचें समुद्रकिनाऱ्यावरील सर्व किल्ले त्याकाळीं अजिंक्य समजले जात होते. कान्होजी आंग्रे जिवंत असेपर्यंत पाश्चात्यांचा शिरकाव पश्चिम किनाऱ्यावर झाला नाहीं.

कान्होजी हा इ. स. १७२९ त मरण पावला. तो अंगानें स्थूल, वर्णानें काळा व बांध्यानें मजबूत होता. त्याचा चेहरा उग्र व डोळे पाणीदार होते. त्याचे हुकूम कडक असून ते मोडणारास जबरदस्त शिक्षा होत असे. एरवीं हाताखालच्या लोकांशीं तो फार उदारबुद्धीनें, ममतेनें व बरोबरीच्या नात्यानें वागे.

कान्होजी आंग्रे हा बंदुका, दारूगोळा व इतर लष्करी सामुग्री यांच्या रूपानें पेशव्यांनां मदत करी आणि यूरोप व चीनमध्यें तयार झालेल्या मालांचे नजराणेहि वारंवार त्यांच्याकडे आणि छत्रपतीकडे पाठवी.

इंग्रजांनीं कान्होजीस चांचा म्हटलें आहे. पण त्यावेळीं पोर्तुगीज, डच व खास इंग्रज हेहि चांचेगिरी करीत. डग्लस म्हणतो कीं, " मराठे चांचे दुष्ट तर खरेंच, पण इंग्रज चांचे त्यांच्याहिपेक्षां जास्त दुष्ट होते. कारण इंग्रजांचें ज्ञान मराठ्यांपेक्षां जास्त असून त्यांची भूकहि जास्त होती. इंग्रजांचा तो ( चांचेगिरीचा ) पिढिजात धंदा होता. मराठे तर नवशिके होते. किड, एव्हरी व ग्रीन हे इंग्रज गृहस्थ तर अट्टल चांचे म्हणून प्रसिद्ध आहेत त्यांचा दरारा खुद्द इंग्रजांसहि होता. " कान्होजीचा दरारा इंग्रजांस इतका बसला होता कीं, आरबी समुद्रांतून येणारीं इंग्रजांचीं जहाजें किनाऱ्यावर सुखरूप आणण्याबद्दल आंग्र्यांचे वाटाड्यांस ५ हजार रु. बक्षिस देण्याचा कंपनीचा रिवाज पुढें पुष्कळ दिवस चालू होता. त्याच्या वाटेस कोणी जात नसे. त्याच्या अनियंत्रित दर्यासत्तेस जो कोणी अडथळा करी त्यास तो पोत्यांत घालून सागरगडच्या बुरुजावरून खालीं दर्यांत फेकून देई. कान्होजीस सेखोजी, संभाजी, येसाजी, मानाजी, तुळाजी, धोंडजी असे सहा पुत्र होते. यांपैकीं येसाजी व धोंडजी हे लेकवळे होते. त्याच्या मरणानंतर या भावांत तंटे लागून आंग्रे घराण्याची वाताहात झाली. [ डफ; म. रि. म. वि; शाहूमहाराज ब.; रा. खं. ४; डग्लसची मुंबई; व्हिक्टर सरीझचें हिंदुस्थान; इ. ऐतिहासिक अंक २६, २७ कैफी ].

**कान्होजी भोंसले**—वऱ्हाडांतील भोंसले घराण्याचा मूळ पुरुष परसोजी त्याचा हा पुत्र. याला १७०९ मध्यें सेनासाहेबसुभा हें पद व जरीपटका, साहेबीनौबत व शिक्केकटार शाहूनें दिली. हा वाळापूरच्या लढाईत निजामच्या विरुद्ध अलमअलीच्या बाजूस इतर मराठे सरदारांबरोबर होता ( आगष्ट १७२० ). पुढें निजामाला शाहूनें जी मदत, मुबारीजखानाच्या विरुद्ध पाठविली, तींतहि हा सामील होता ( १७२४ ). या वेळीं कान्होजीचा डोळा माळव्यावर होता. पण त्यास बाजीराव पेशवे यांनीं जरब देऊन दूर ठेवलें. यानें १८ वर्षे कारभार करून शाहूची मर्जी संपादली. यास आणखी दोन भाऊ होते. याचा व त्यांचा तंटा पडला असतां शाहूनें तो तोडला ( १७२७ ). मध्यंतरीं ( १७२९ ) मध्यें शाहूची मर्जी कान्होजीवरून उतरून त्याला सेनासाहेबसुभ्याच्या कारभारावरून दूर केलें. या वेळीं याचें व याच्या चुलत भावाच्या मुलाचें (रघूजीचें) वैमनस्य आलें होतें. गोंड राजांना कान्होजीनें कवजांत आणलें होतें. तेव्हां त्यांच्या मदतीनें रघूजीनें कान्होजीविरुद्ध खटपट चालविली. त्यानें साताऱ्यास येऊन शाहूची मर्जी संपादन केली. आणि त्या बळावर कान्होजीस पकडून साताऱ्यास आणलें. तेथें तो मरेपर्यंत कैदेंतच होता. पुढें कान्होजीच्या कबिल्यास रघूजी त्रास देऊं लागला असतां मात्र शाहूनें त्याचा निषेध केला. या कान्होजीचा वंश उमरावतीस आहे [ म. रि. म. वि. नागपूरकर भोंसल्यांची बखर ].

**कान्हो पाठक**—महाराष्ट्र ग्रंथकार, हे केंदूर पावळ( पुणें जिल्हा)येथील रहिवासी असून वृत्त्यंशी जोशी होते.यांचें घराणें पूर्वीपासून विद्वानांचें होतें. यांची वंशावळ सांपडते ती पिलापाठक,त्यांचे त्रिमल व त्यांचे कान्हो होत.कान्होचे पुत्र हरि व नातु नामा पाठक होते. हे यजुर्वेदी वाजसनेयी शाखेचे होते. हे ज्ञानेश्वराच्या वेळीं हयात असून त्यांच्या लोभांतील होते. ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतांना आपली सारी चीजवस्त यांनां दिली अशी वारकरी मंडळींत अद्यापि समजूत आहे. अजूनहि ज्ञानेश्वरांच्या आरतीच्या वेळीं विडा खिरापतीचा मान यांच्या वंशजाकडे आहे. यांचा एक गीतासार नांवाचा ग्रंथ व इतर काव्य उपलब्ध आहे. गीतासारावरून यांच्या गुरूचें नांव नागनाथ होतें असें समजतें.हे विरक्त होते.काशीचा एक पंडित यांच्या दर्शनास आला असतां हे मुलाला खेळवीत होते. तें पाहून त्यानें मायापाश अजून सुटला नाहीं काय ? असें म्हणतांच यांनीं मुलाला समोरच्या विहिरींत फेंकून दिलें. त्यास पुढें लोकांनीं काढलें. कान्हो त्रिमलदास असेंहि कोठें कोठें आढळतें तें यांचेंच दुसरें नांव असावें. यांच्या वडिलांचें नांव त्रिमल होतें. कान्हो त्रिमलदासांनीं पाताळकांड म्हणून एक ग्रंथ केला आहे. त्यांत त्यांनीं वडवाळसिद्ध नागेशाचें गुरु म्हणून नांव दिलें आहे. वरील नागनाथ व हे वडवाळसिद्ध नागनाथ एकच असतील. पाताळकांडांतील कथा जरा चमत्कारिक आहे ती अशीः—

"इंद्रजिताच्या मरणानंतर सुलोचना हिनें सती जाण्यापूर्वी आपल्या उदरीं असलेला गर्भ सागरांत टाकला व तो 'गिलगिल' व 'शशी' या दोन मत्स्यांनीं गिळिला. त्यापासून आलोटकेतु व पाताळकेतु असे दोन पुत्र उत्पन्न झाले. त्यांनीं रामसंस्थापित बिभीषणास हांकून देऊन लंकेचें राज्य घेतलें. पुढें इंद्र, ब्रह्मा, महेश, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, लवांकुश यांच्याशीं त्यांची लढाई होऊन तींत पाताळ केतू व आलोटकेतू यांचा जय झाला.शेवटीं रामाची व त्यांची गांठ पडून शत्रुघ्नानें रामाच्या सूचनेनें पातालकेतूचा वध केला. रामानें जो एक बाण सोडला तो असह्य होऊन आलोटकेतु पळत सुटला तो अद्याप आकाशांत ध्रुवास प्रदक्षिणा घालीत आहे; व रामाचा बाण त्याच्या मागें आहे. बाणास रामाची आज्ञा कीं, " आलोटकेतु " सन्मुख झाला कीं त्याच्या ललाटाचा वेध करावा. " वैऱ्यांचा पराभव करून राम बिभीषणास पुनः लंकापति करून अयोध्येस परत आले."

अशी ही आलोटकेतू व पाताळकेतूंची कथा आहे. या कथेचें मूळ समजत नाहीं. वाल्मिकी किंवा एकनाथी रामायणांत ही कथा नाहीं. याचे नातु नामा पाठक यांनीं नामापाठकी अश्वमेध म्हणून एक ग्रंथ केला असून नामरत्नमाला, भरतभेट वगैरे लहानसहान प्रकरणेंहि केलेली आहेत. [ अ. कोश; इ. सं. अह. १८३६; सं. क. सूचि ].

**कान्होपात्रा**—महाराष्ट्र संत-कवयित्री. मंगळवेढें येथें शामा नांवाची एक कळवंतीण रहात होती तिची ही कन्या. ही रूपानें अप्रतिम सुंदर होती व गाणारीहि उत्कृष्ट असे. ही वयांत आल्यावर हिच्या आईनें हिला बेदरास नेऊन हिचा गुण बादशहास दाखवावा व द्रव्य मिळवावें असा बेत केला. परंतु तो बेत हिनें नाकारून पंढरपुरास जाऊन देवापुढें भजन करणें आरंभलें. त्यावरून लोकांस आश्चर्य वाटलें. हिच्या रूपाची तारीफ बादशहाच्या कानावर जाऊन तो इच्छाविषयीं फारच लुब्ध झाल्यामुळें त्यानें हिला आणण्यासाठीं पंढरीस कामगार पाठविला. त्यानें येऊन हिला बादशहाकडील निरोप कळविल्यावर हिनें मी देवदर्शन करून येतें व मग आपणाबरोबर निघतें असें सांगितलें. त्यावरून कामगार बरें म्हणाला असतां ही देवळांत गेली व करुणा भाकून देवाची स्तुति करीत असतांच हिचें प्राणोत्क्रमण झालें.कान्होपात्रेनें ज्या अभंगांत पांडुरंगाची करुणा भाकली ते अभंग महाराष्ट्र-कविचरित्रकारांनीं आपल्या ग्रंथांत ( भाग ३ )दिले आहेत. भक्तविजयांत हिचें चरित्र ३९ व्या अध्यायांत सविस्तर आहे. इतिहाससंशोधक राजवाडे हिचा काल शके१३९० हा देतात [अ. कोश. महाराष्ट्र-कविचरित्र भा. ३; सं क. का. सूचि. ].

**काप**—तालुका केळापुर. जिल्हा यवतमाळ. लोकसंख्या ३७४. हें खेडेगांव पेनगंगानदतिरीं असून, गांवाच्या पूर्वेस एक हेमाडपंती तऱ्हेवर बांधलेलें मोठें देवालय

आहे. याठिकाणीं एक गरम पाण्याचा झरा असून त्याचें पाणी कधीं आटत नाहीं असें म्हणतात. शिवरात्रीस जत्रा भरते.

**कापडवंज**, ता लु का—खेडा जिल्ह्यांतील उत्तरेकडील हा तालुका आहे. उ.अ. २२°५१' ते २३° ७', आणि पू. रे. ७२° ५०' ते ७३° १९' यामध्यें हा असून याचें क्षेत्रफळ २७९ चौरस मैल आहे. या तालुक्यांत कापडवंज हेंच एक गांव आहे. सर्वंध तालुक्याची लो. सं. १९११ मध्यें ७६७३० होती. याचा दक्षिणेकडील व पश्चिमेकडील भाग बराच सुपीक आहे. मोहर व वेत्रक या नद्या यांतून वाहतात. पण या जहाजानें जाण्यायेण्याच्या उपयोगी नाहींत. कारण यांच्या पाण्यांत सोड्याचा भाग बराच आहे. पाण्याचा पुरवठा येथें फारसा नाहीं. बाजरी, ज्वारी व मका हें येथील लोकांचें मुख्य खाद्य आहे.

गां व.—मुंबई इलाख्यांतील खेडा जिल्ह्यामधील कापडवंज तालुक्याचें मुख्य ठिकाण. बॉम्बे बरोडा रेल्वेच्या नडियाद कापडवंज फांट्यावर हें स्टेशन आहे. उ. अ. २३° १' व पू. रे. ७३° ५'. लोकसंख्या (१९११) १३१२६. गांवासभोंवती भिंत असून जवळच जुन्या गांवाचा मोडका भाग आहे. मराठ्यांच्या वेळीं येथें कांहीं मोठ्या लढाया झाल्या होत्या. मध्यहिंदुस्थान व समुद्रकिनारा यांमधील रस्त्यावर हें असल्यामुळें याला महत्व आलें आहे. गांवांत एक सुंदर तलाव असून जवळच चालुक्यांच्या (सन १००० ते १३००) वेळच्या धर्तीवर बांधलेली विहिर आहे. जवळील कुंडांत स्नान केल्यास रोग बरे होतात असें सांगतात. येथील महादेवाचें देऊळ जमीनीच्या खालीं होतें तें १०४४ त लोकांनीं उकरून काढलें अशी दंतकथा आहे. नवीन इमारतींत येथील जैन देऊळ फार प्रेक्षणीय आहे. १८६३ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन करण्यांत आली. मोहर नदीच्या पात्रांत मौल्यवान माणकें सांपडतात. साबण, कांच व चामड्याच्या पिशव्यांचे कारखाने येथें असून दाण्याचा व्यापार मुख्य आहे. येथें सबजज्जाचें कोर्ट, दवाखाना व कांहीं शाळा आहेत.

**कापशी** (१)—मुंबई. कोल्हापूर संस्थान. हा गांव कोल्हापूरच्या दक्षिणेस १२ कोसांवर आहे. येथील जहागिरदार घोरपडे आडनांवाचे मराठे असून, ते प्रख्यात सेनापति संताजी घोरपडे यांचे वंशज आहेत. येथें खादी व धातूचीं भांडीं विकावयास येतात. ही जहागीर कोल्हापूरकराची मांडलिक आहे. संताजीची बायको द्वारकाबाई हिची समाधी येथें आहे. सोंडूरकर, गजेंद्रगडकर, दतवाडकर व मुधोळकर घोरपडे व कापशिकर घोरपडे हे भाऊबंद असून यांचा मूळपुरुष माहलोजी म्हणून होता. [ कैफीयती; को. ग्या. ].

(२) मध्यप्रांत. जिल्हा वर्धा. तहशील हिंगणघाट. हिंगणघाटच्या पश्चिमेस २० मैलांवर हें सुमारें ६०० लोकवस्तीचें खेडें आहे. येथें नानाजी महाराज नांवाचे प्रसिद्ध साधु रहात असत. त्यांची समाधि त्यांनीं बांधलेल्या लक्ष्मीनारायणाच्या देवळासमोरच आहे. त्यांच्या प्रीत्यर्थ माघ महिन्यांत दहा दिवसपर्यंत येथें जत्रा भरत असते. त्यावेळीं अन्नसत्र असतें. सुमारें ५००० लोक जत्रेस जमतात.

**कापालिक**—एक पाशुपत शैव पंथ. रामानुजानें यांचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. ज्याला सहा मुद्रिकांचें रहस्य समजलें व त्यांच्या योजनेंत जो कुशल आहे तो योनीच्या ठिकाणीं अधिष्ठित झालेल्या लिंगात्म्यामध्यें तल्लिन होऊन श्रेष्ठ सुखप्रद पोहोंचतो असें कापालिक समजतात. एक माळ, एक अलंकार, एक कुंडल, एक चूडामणि, राख व यज्ञोपवीत या त्या सहा मुद्रिका होत. शंकरादिग्विजयांत (अध्याय १५) आचार्य व कापालिक यांमधील भांडण दाखविलें आहे. योगसाधनामुळें यांची हालचाल फारच जलद होते. भवभूतीच्या मालतीमाधवांत कापालिकांचें मुख्य स्थान श्रीशैल असल्याचें समजतें. कपालकुंडला मालतीला पळवून कराला चामुंडेपुढें बळी म्हणून ठेविते. शिवाचें अत्युग्र स्वरूप जो भैरव व त्याची स्त्री चंडिका यांच्या गळ्यांत तर रुंडमाळा असून मद्यमांसाचा या कापालिकांच्या देवतांना नैवेद्य लागतो. कालामुख हा कापालिकांचा पुढारलेला वर्ग आहे. शिवपुराणांत यांनां महाव्रतधर म्हटलें आहे. नरकपालांत जेवणें, चिताभस्म फांसणें यांसारख्या अघोर गोष्टी महाव्रतांत येतात. नाशकास कापालेश्वराच्या देवळांत या पंथाचे जोगी आढळतात. इ. स. ६३९ च्या सुमारास होऊन गेलेला दुसरा पुलकेशीचा पुतण्या जो नागवर्धन त्याच्या एका ताम्रपटांत इगतपुरीजवळचें एक खेडें कापालेश्वराची उपासना होण्यासाठीं व महाव्रतींचा चरितार्थ चालण्यासाठीं दिलें असल्याची नोंद आहे.

कृष्णमिश्रकृत प्रबोधचंद्रोदय नांवाच्या उपदेशपर दृश्य काव्यांत कापालिक शैवांचा उल्लेख आहे. १०५० ते १११६ च्या दरम्यान कृष्णमिश्रानें हें नाटक चंदेलवंशी कीर्तिवर्मन् राजाकरितां लिहिलें आहे. वरील नाटकाच्या पांचव्या अंकांत खऱ्या धर्माच्या लाटेपुढें अखिल मिथ्याधर्म उध्वस्त झाले असें दर्शविलें आहे. त्यांतील एक जो कापालिक शैव पंथ त्यानें दुबळ्या लोकांनीं गजबजलेल्या आभीर, मालव व पांचाल इत्यादि देशांचा गुप्तपणानें आश्रय केल्याचें दाखविलें आहे. तिसऱ्या अंकांत परिचित विदूषक आढळत नाहीं, तरी भिन्नधर्मीय जातींच्या उपाध्यायांचीं सोंगें दाखविलीं आहेत उदाहरणार्थः—

कापालिक (इकडे तिकडे हिंडून):—"मानवांच्या हाडांची माळ हेंच माझें भूषण आहे. मी स्मशानांत रहातों. मनुष्यांच्या कवटींतून मी अन्न ग्रहण करतों. जादूच्या अंजनानें स्वच्छ झालेल्या माझ्या दृष्टीला असें आढळून येतें कीं, जगत् व ईश्वर हे एकसमयावच्छेदें करून एक व भिन्न आहेत.

त्याच्या धर्म व मोक्षाची कल्पना यांसंबंधीं एका जैन यतीनें त्याला पृच्छा करतांच तो कापालिक खालीलप्रमाणें आपल्या उपासनेचें निवेदन करतोः—"आम्ही मांस, अस्थि,

मज्जा व मेद यांचे अग्नीमध्यें हवी देतों. ब्राह्मणाच्या कवटीच्या पात्रांतून आम्हीं सुरापान करितों व नरयज्ञ करून महादेव व भैरव यांची आम्हीं उपासना करतों. नुक्तेच कापलेल्या गळ्यांतून येणारे लाल रक्ताचे लोट किती तरी रमणीय दिसत आहेत."

हें ऐकून भिक्षु म्हणतोः- हे बुद्धा, केवढी ही अघोर उपासना! तसेंच जैन यति म्हणतोः—अरे अर्हत, अर्हत! या बिचाऱ्यास एखाद्या भयंकर भुतानें फसविलें आहे रे!

नंतर शिवावर छद्माचा आरोप केल्यामुळें क्रुद्ध होऊन तो कापालिक तरवार उपसून त्या दोघांवर धांवून जातो. भिक्षु व जैन यती भयानें मागें सरतात व त्याची क्षमा मागतात. तेव्हां तरवार म्यानांत घालून तो पुन्हां आपल्या धर्माचें विवरण करूं लागतो. "विषयेंद्रियांशिवाय सुख संभवत नाहीं, व सुखशून्य अध्यात्मिक अवस्था हा मोक्ष होऊं शकत नाहीं. शिवस्वरूप होऊन पार्वतीसम स्त्रियेला जो प्रेमानें आलिंगतो तोच मुक्त पुरुष होय."

कामासक्त पुरुष मुक्त कसा होईल अशी त्या दोघांनींहि नम्रपणें शंका प्रदर्शित केल्यावर कापालिक आपल्या धर्माचें स्मरण करतो व तो धर्मच एखाद्या उतशृंखल स्त्रियेसारख्या कापालिनीचें रूप घेऊन अवतीर्ण होतो. कापालिक त्या दोघांनांहि धरण्यास तिला आज्ञा करतो. नंतर ती कापालिनी एकामागून एक अशी त्या दोघांनांहि आलिंगन देते. ते आनंदाचे उद्गार कसे काढतात व स्वधर्म सोडून कापालिक धर्माचा ते कसा स्वीकार करतात व कापालिकास गुरु करून दारू पीत पीत ते दोघे भैरवपंथाची कशी दीक्षा घेतात इत्यादि हकीगतीचें, गांवढळ विनोदाचें वर्णन उपर्युक्त नाटकांत करण्यांत आलें आहे. बुद्धस्वामीकृत बृहत्कथाश्लोकसंग्रहांत कापालिकाचा उल्लेख आढळून येतो. [ विंटरनिझ; भांडारकर ( शैविझम् इ. ) फर्कुहर-रिलिजिअस लिटरेचर ऑफ इंडिया. ].

**कांपिली**—हल्लींच्या म्हैसूर प्रांतांतील एक गांव. चोल राजांच्या वेळीं हें एक मोठें लष्करी ठाणें व सुभेदाराचें रहाण्याचें ठिकाण होतें. चालुक्य व चोल यांच्या सरहद्दीवर हें ठिकाण असे. हें चालुक्यांच्या राज्यांत सामील झालेलें होतें. त्यांचा सुभेदार येथें राहून सरहद्दीचें रक्षण करी. सोमेश्वर चालुक्याचा एक मुलगा वेंगई ( वेंगी ) मंडलेश्वर या उपपदाधिकाराचा, वेंगी प्रांताचा अधिकारी म्हणून येथें रहात होता ( १०६० ). त्याचा पराभव एका लढाईंत वीरराजेंद्र चोलानें करून कांपिल हें गांव जाळून फस्त केलें ( १०६८ ). यानंतर विष्णुवर्धनविजयादित्य चालुक्य हा नोलंबवाडी ( हल्लींचा सर्व म्हैसूर ) प्रांताचा सुभेदार म्हणून याच गांवीं रहात असे ( ११५० ). यावरून वीरराजेंद्रानें तें जाळल्यानंतर पुन्हां त्याची वसाहत झाली असावी [ अय्यर; प्रा. हिं. ].

**कांपिल्य**—( कांपोल्य ) संयुक्त प्रांत. यजुर्वेदामध्यें अश्वमेध प्रसंगीं कांपीलवासिनी म्हणून उल्लेख आहे. ( ७. ९, १४ ) यावरून महाभारतकालीं कांपिल्य नांवानें माहीत असलेलें शहर यजुर्वेदकालापासून अस्तित्वांत असावें असें दिसतें. महाभारतांत हें दक्षिणपांचालांचें राजधानीचें शहर असून तेथील राजा द्रुपद होता असें वर्णन आहे.

द्रौपदी स्वयंवर याच ठिकाणीं झालें. द्रुपदाचा राजवाडा व स्वयंवराचें स्थान अद्यापि कांपिलचे लोक दाखवितात. शांतिपर्वामध्यें येथें ब्रह्मदत्त राजा होता असें म्हटलें आहे. याची जागा फरुकाबाद जिल्ह्यामध्यें फत्तेगडच्या ईशान्येस २८ मैलांवर आहे. १३ व्या शतकाच्या अखेरीस हें दरोडेखोरांचें रहाण्याचें स्थान होतें असें वाटतें.

**कापुसतळणी**—तालुका दर्यापुर. जिल्हा उमरावती. घरें ६१४. लोकसंख्या २७९६. येथें आठवड्याचा बाजार भरत असून मराठी व उर्दू शाळा आहेत. येथें लष्करच्या छावणीच्या सोईची जागा असून इलिचपूरहून एका दिवसाच्या हें वाटेवर आहे. हें ठिकाण मूर्तिजापुर एलिचपुर रेल्वेवर असून स्टेशनापासून एक मैलाच्या अंतरावर आहे.

**कापू**—मद्रास, हैद्राबाद व ब्रह्मदेश या प्रांतांतून यांची वस्ती आहे. एकंदर लो. सं. ( १९११ ) ३३६१६२१. मद्रास इलाख्यांत कापू अथवा रेड्डी यांची मोठी जात असून तिची लोकसंख्या अडीच लक्षांवर आहे. तेलगू प्रांतांत हे लोक जमीनदारी करतात. समाजांत ह्यांचा दर्जा ब्राह्मणांच्या खालोखाल असतो. शेती हेंच कापूंचें मुख्य उपजीविकासाधन असून त्यांची रहाणी व घरें स्वच्छ असतात. व त्यांच्या स्त्रिया सुवर्णालंकार वापरतात. कापू म्हणजे पहारेकरी व रेड्डी म्हणजे राजा असा अर्थ आहे. कापू अथवा रेड्डी हें एक द्रविड राष्ट्र होतें. चालुक्यांनीं त्यांचा मोड केला तरी इ.स.१३२३ त ग्यासुद्दिन तघलखानें वारंगळच्या प्रतापरुद्राला बंदिवान केल्यानंतर बरींच जमीनदार कापू कुटुंबें अस्तित्वांत आलीं. कापू जातीच्या मुख्य पोटजाति १४ आहेत त्या मदुरा तिनेवेल्ली वगैरे भागांत आढळतात. अयोध्या, वलिजा, भूमंची, देसूर, गंडिकोट्टइ, गाझूला, कम्मापुरी, मोरसा, नेराटी, नेरवाटी अथवा नेराड्ड, ओरांगटी, पाकनाटी, पल्ले, पंटा, पेडागंटी या यांच्या मुख्य जाती असून, पोकानाड, वेलानाटी व येरलाम या ब्राह्मणापासून झालेल्या जाती आहेत. येरलाम यांच्या लग्नाकरितां ब्राह्मण लागत नाहीं. ते होम करीत नाहींत. व विघ्नेश्वराचें पूजनहि करीत नाहींत.

दक्षिणअर्काट व सालेम येथील पंटा रेड्डींचे लग्नविधी ब्राह्मणांच्या समारंभाप्रमाणेंच दिसतात. तेलगू देशांत थोडी निराळी चाल आहे. वरपक्ष हा वधूच्या घरीं थाटानें लग्ननिश्चयाकरितां जातो त्यावेळीं वधू विघ्नेश्वराची पूजा करीत असते. लग्नाच्या दिवशीं मोठी मिरवणूक काढतात व व्याही परस्परांस पानसुपारी देतात. त्यावेळीं वरपक्ष पुरोहित व धोबी बरोबर घेऊन वधूला आणण्यास जातो. एक कर्णीच्या झाडाचा

घुसळ खांब घरांत रोवतात. व कांहीं कापू मिरवणुकीनें धोब्याच्या घरीं धोर्णे (तोरण) व गंगाप्रतिमा या आणण्यास जातात. सोनार व कुंभार यांकडेहि ते जातात. कुंकुमाक्षतां, उत्तरीयबद्ध वधुवरांवर फेकतात. नंतर वस्त्र्यानें वधूच्या पायाच्या नखांस स्पर्श करण्याचा न्हाव्याचा मान असतो. वधूवर देवांत जातात त्यावेळीं त्यानां वाशिंग बांधलेलें असतें. वराजवळ नेहमीं भाट (भत्राझू) असतो. त्याप्रमाणें वधूवरोबरहि एक भोगळी (मुरली) असते. कापू लोकांच्या लग्नांत अंतरपाट, कंकणसमारंभ, अरुंधतिदर्शन, भेजवान्या, नालगू समारंभ, रुसणें, नागवली समारंभ, ब्राह्मणद्वारां कलशपूजन इत्यादि सर्व प्रकार आढळतात. पंटा–कापूंच्या लग्नांत गंगेची प्रतिमा, वकरें व कावड हीं सर्व देवळाकडे मिरवणुकीनें नेतात. त्यावेळीं धोबी हा स्त्रीचें रूप घेऊन मिरवणुकींत नाचतो. त्यांच्यामध्यें कंकण सुटल्यावरोवर लग्नसमारंभ संपतो. तामीळ देशच्या पंटा–रड्डी लोकांत लग्नाच्या पूर्वी तीन दिवस गंगेची मिरणूक काढतात.

तिनवेल्लीच्या रड्डी लोकांत १६ किंवा २० वर्षांच्या मुलीचें पांच सहा वर्षांच्या मुलांवरोवर लग्न करतात व मुलगा वयांत येईपर्यंत त्याची बायको वृद्ध होते. पण त्याच्या वायकोस जी मुलें होतात तीं त्याचींच मानलीं जातात. नंतर या वयांत आलेल्या मुलासहि इतर कोणा मुलाच्या बायकोपासून मुलें होतात. मारावण, कल्लण, अगमुदैय्यन वगैरे इतर जातींचें अनुकरण करून ही चाल या रड्डी लोकांत पडली आहे. १८९१ च्या सेन्सस रिपोर्टांत पंटा कापूमध्यें बहुभर्तृत्वाची चाल असल्याची माहिति आपणास मिळाली असें स्टुअर्टनें म्हटलें आहे. यानाडीरेड्डी लोकांत स्त्रीनें मृतपतीच्या भावाशीं लग्न करण्याची चाल आहे. बल्लारी, कर्नूल व नेलोर मधील मोटाटी व पेडा कापूंमध्यें जावयास दत्तक घेण्याची चाल आहे; व औरस पुत्राप्रमाणेंच त्याचा वारसाहक्कहि असतो. कर्नूल मॅन्युअलमध्यें (१८८६) म्हटल्याप्रमाणें पद्दिकोंड्याचे पकानाडू व रामलकोटा तालुक्यांतील पकानाडू या जातींत विधवेला त्याच जातीचा दुसरा पति करण्याची मुभा असते; पण सुवासिनीप्रमाणें बांगड्या व ताली घालण्याची तिला परवानगी नसते. या पुनर्विवाहाच्या सवलतीचा नैतिकदृष्ट्या वराच दुरुपयोगहि होतो. पेडाकंटी कापू स्त्रिया ताली व चोळी घालीत नाहींत.

तेलगु देशांतील कापूंमध्यें जे मृतासंबंधीं संस्कारविधी आहेत ते कामा व वालिजा जातींच्या विधींप्रमाणेंच आहेत. मृताच्या मुलाऐवजीं एक न्हावी ह्या मृतशरीरास तीन प्रदक्षिणा घालतो व जल सिंचून घट फोडतो. नंतर तीन दिवसांनीं तो न्हावी मृताची रक्षा भरतो. पूजेचें सामान धोबी आणतो; नंतर त्या ठिकाणीं पूजा करून अस्थी काशीस नेण्याकरितां गोळा करतात.

कापू लोक धर्मानें वैष्णव व शैव असून यल्लम्मा, नागरपम्मा, पुतलाम्मा, अंकम्मा, मुनेश्वर, पोलेरम्मा व देशम्मा इत्यादि देवतांची ते पूजा करतात. मुनेश्वर व देशम्मा यांनां भात अर्पितात व पोलेरम्मास रेडा सोडतात. भाद्रपद पौर्णिमेस शेतकरी लोक वरुणाला संतुष्ट करण्याकरितां जोकुमार समारंभ करतात. स्त्रिया भिक्षा व फुलें मागून आणतात व कांजी तयार करून शेतांत शिंपडतात. नंतर कुंभाराकडे जाऊन एक मातीची मनुष्याकृति तयार करून तिचें नांव जोकुमार उर्फ पावसाचा देव असें ठेवितात व त्याची पूजा करतात. ही मूर्ति कधीं लहानमोठी असते व नग्नहि असते. जोकुमारची पालखी काढून अभद्र गाणीं म्हटलीं जातात. या प्रकारानें पाऊस पडतो अशी त्यांची कल्पना असते. कापू स्त्रियांत दुसरी एक धार्मिक कल्पना आढळते. जेव्हां अवर्षण पडतें तेव्हां एक बेडूक पंख्यास बांधून तो मिरवीत घरोघर भिक्षा मागत फिरतात. घराची मालकीण त्या बेडकावर पाणी ओतते व भिक्षा घालते. जोकुमाराचे विविध प्रकार व हा प्रकार यामुळें अत्यंत जलवृष्टि होईल अशी कापू स्त्रीपुरुषांची श्रद्धा असते [थर्स्टन].

**व ऱ्हा ड म ध्य प्रां त.**—येथील कापूंनां कापेवार म्हणतात. लो. सं. (१९११) १८४८९. चंद्रपूर व वऱ्हाडांत यांची वस्ती आहे. यांच्या मुलींचीं लग्नें १० व्या वर्षापूर्वीच झालीं पाहिजेत नाहींतर आईबापांस वाळींत टाकतात व जातींत येण्यास कांहीं प्रायश्चित्त घ्यावें लागतें. पण गोदावरी तीरावरील कोणत्याहि क्षेत्रांत मुलीचें लग्न केलें तर कांहीं हरकत नाहीं. वधू लग्नाकरितां वराच्या घरीं जाते. लग्नाच्या चौथ्या रात्रीं वर नांगराचे सर्व भाग डोक्यावर घेतो व वधू आपल्या डोकीवर फडक्यांत बांधलेली शिदोरी घेते; वधूवरांच्या कपड्यांची गाठ बांधतात; वर मंडपाच्या शेवटीं जाऊन बैलाच्या पराणीनें जमीन खोदतो; त्यांत सरकी व जोंधळे टाकतो. वधूच्या डोक्यावरील शिदोरी सर्व लोक खातात व सरकी व जोंधळे पेरलेल्या जागीं हात धुतात. चांदा जिल्ह्यांत हे लोक दगडाचें खोंदीव काम करणारे आहेत. चांद्याचा कोट व किल्ला बांधण्याकरितां यांच्या पूर्वजांस चांद्यास आणिलें. हे लोक कपाळावर एक टिंब गोंदवितात. [रसेल व हिरालाल].

**कापूर, (१) नांवें.**—ऱ्याच यूरोपियन भाषांतील व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या देशभाषांतील कापराचीं नांवें जवळ जवळ सारखींच आहेत. उदा० इंग्रजी कॅम्फर, संस्कृत कर्पूर, आरबी काफूर, मराठी कापूर वगैरे.

टर्पीन द्रव्यांच्या कीटोन व मद्यार्क (अल्कोहल) यांनां सर्वसाधारण नांव कापूर असें आहे. कित्येक झाडांच्या तेलांत हे सांपडतात. तेलांचें ऊर्ध्वपातन करून हे निराळे करतात. यांचा रंग पांढरा असतो व यांस एक विशिष्ट प्रकारचा वास येतो. हे पाण्यांत विरघळत नाहींत परंतु मद्यार्क व इथरमध्यें लवकर विरघळतात. त्यांच्या अनेक जाती आहेत.

कापूर पांच दहा प्रकारच्या झाडांपासून निघतो. हिंदुस्थानांत केळीच्या जातीचें एक झाड आहे. त्यास कापूर केळ म्हणतात. या झाडापासूनहि कापूर काढतात. वैद्यकावरील संस्कृत लेखकांस पक्व व अपक्व असे दोन प्रकारचे कापूर माहीत होते. पक्व म्हणजे उष्णतेच्या सहाय्यानें तयार केलेला, हा सिनामोमम कॅम्फोरा चिनी किंवा जपानी असावा. अपक्व म्हणजे मूळचा, हा ड्रियोबॅलनॉप्स कॅम्फोरा असावा. ऐतिहासिक दृष्टया पाहिलें तर दुसरी जात प्रथम माहीत होती. वरील दोन्ही जातींचीं झाडें हिंदुस्थानांत मूळचीं नव्हतीं; अथवा सध्यां देखील त्यांची विशेष प्रमाणावर लागवड होत नाहीं. चिनी व अरबी व्यापार सुरू झाल्यावर वरील दोन्ही प्रकारचे कापूर हिंदुस्थानांत माहित झाले असावेत असा तर्क आहे. लवंग व दुसऱ्या कित्येक पदार्थांच्या नांवांच्या इतिहासावरून असें दिसून येईल कीं, प्रचलित व्यापारी नांवें मूळच्या नांवापासून निघालेलीं आहेत असें नाहीं. संस्कृत कर्पूर नांवावरून जावामधील कापूर हें नांव आलें असावें.

इ ति हा स.—ऐने-ई-अकबरीमध्यें भीमसेनी कापराचीं झाडें म्हणून ज्यांचा उल्लेख केला आहे तीं बहुधा सिनामोमम झेलॅनिकम असावीत. यांच्या लांकडाला कापरासारखा वास येत असल्यामुळें यांनां कापराचें लांकूड हें नांव मिळालें असावें. यावरूनच अबुलफजलला वाटलें असावें कीं, कापूर उत्पन्न होणारें हें हिंदुस्थानांतील एक झाड आहे. याच्या विषयीं प्राचीन उल्लेख सिंदबादच्या दुसऱ्या सफरींत येतो. त्यानें झाडांनां खांचा करून कापूर काढण्याची रीत वर्णन केली आहे.

" गार्शिया डी ओर्टा " यानें १६ व्या शतकांत जपानी कापूर व बोर्निया व सुमात्रामधील कापूर यांबद्दल माहिती दिली आहे.

जपानी कापूर ( सिनामोमम कँफोरा ) हें साधारण उंचीचें व नेहमीं हिरवें असणारें झाड असून चीन, जपान, कोचीनचीन व फोर्मोसा वगैरे ठिकाणीं होतें. हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं ह्या झाडाची लागवड सुरु असून योग्य ठिकाणीं हें झाड चांगलें वाढतें. कलकत्ता व साहरणपूर येथील बागांत कापराचीं सुंदर झाडें आहेत. हीं झाडें डेहराडूनमध्यें चांगलीं होत असून निलगिरी पर्वतांत ७००० फूट उंचीपर्यंतच्याहि प्रदेशांत हीं झाडें चांगलीं वाढतात.

या झाडांपासून कापराचा बराच पुरवठा होतो. फोर्मोसा बेटांत चांगल्या प्रतीचा पुष्कळ कापूर होतो. हें बेट जपानच्या ताब्यांत गेल्यापासून कापराचा व्यापार सर्वस्वी जपानी सरकारच्याच ताब्यांत आहे. १९०० सालीं जपानमध्यें १३४ टन, चीनमध्यें ९.८ टन व फोर्मोसांत २६८० टन कापूर झाला. असें म्हणतात कीं चीन देशाशीं झालेल्या कांहीं करारावरून चिच्यू ( फूकीएन ) येथून परदेशास जाणाऱ्या कापरावर जपानचें बरेंच वर्चस्व असतें. याच ठिकाणाहून पूर्वी सिकोक ( जपान ) मधील टोस्टप्रांत व पूर्व फोर्मोसा यांच्याप्रमाणें हिंदुस्थान व यूरोप यांच्याशीं कापराचा व्यापार चालत असे.

'बोर्निओ आणि सुमात्रामधील कापूराचें' ( ड्रिओबालनॉप्स ॲरोमॅटिका ) उंच झाड असून तें उच सुमात्रा बेटाचा वायव्य किनारा, उत्तर बोर्निओ व लेबुअनमध्यें होतें.

झाडाच्या लांकडांत ओबडधोबड स्फटिक तयार होतात. हा बेरसकॅम्फर ( बेरस कापूर ) असून हिंदुस्थानांत याला भीमसेनी अथवा बरस कापूर म्हणतात. झाडाच्या मध्यभागीं व फांद्या फुटतात त्या ठिकाणीं हे स्फटिक सांपडतात. परंतु सालीच्या खालीं सुद्धां कापूर सांपडतो. कापूर तयार करण्याकरितां झाड तोडून त्याचे लहान लहान तुकडे करतात. साधारण झाडापासून ११ पौंड कापूर निघतो. जुन्या झाडांपासून सर्वांत जास्त निघतो. मलाईलोक हा कापूर प्रेतांत भरून ठेवितात व होमहवनादिकांसाठीं याचा नेहमीं उपयोग करतात. यामुळें तेथें कापराला चांगली किंमत येते. प्रथमतः जगाला ज्या कापराची माहिती झाली तो कापूर याच झाडापासून काढला असावा.

न्गाई कापूर ज्यापासून निघतो त्या ' ब्लूमिआ बालसामिफेरा ' झाडाची वरीच प्रसिद्धि आहे.

सर्व जगास कापराचा पुरवठा करण्याचा मक्ता जपाननें आपल्याकडे ठेवल्यामुळें अलीकडे कापराचा भाव फारच वाढला आहे. ह्यामुळें अमेरिकेंत रासायनिक रीत्या बनावट कापूर तयार करण्याचे प्रयत्न सुरू आहेत. कापराचा भाव वाढल्यामुळें दुसराहि असा परिणाम झाला कीं, इतर देशांतील मळेवाल्यांचें लक्ष कापराच्या झाडांची लागवड करण्याकडे वेधलें आहे. सिनामोमम कॅम्फोरा ( जपानी कापूर ) याच्या पानाच्या तेलापासूनहि कापूर तयार करतां येतो असें हूपर यानें ॲग्रिकल्चरल लेजरमध्यें दिलेल्या प्रयोगांवरून दिसून येतें. ५० पासून १०० वर्षांच्या झाडाच्या लांकडापासून व मुळापासून कापूर निघतो अशी समजूत होती. त्यामुळें फक्त सरकारला काय तें अशा तऱ्हेचीं झाडें मोठया प्रमाणावर लावून त्यांचें उत्पन्न इतक्या वर्षांनीं घेणें शक्य होतें. परंतु हिंदुस्थान, अलजीरिया, संयुक्त संस्थानें व कांहीं जर्मन वसाहती यांत केलेल्या प्रयोगांवरून असें दिसून आलें कीं, चहा, काफी व नीळ वगैरे मळे असणाऱ्या लोकांनां कापराचें दुय्यम पीक काढतां येईल. परंतु पूर्वी जी याबद्दल आशा वाटत होती त्याप्रमाणें याचें पीक मात्र आलें नाहीं. यूरोपमध्यें कापराचा अति महत्वाचा उपयोग म्हणजे सेल्युलाईड तयार करणें हा होय.

व्या पा र.—कापूर शुद्ध करण्याचा मुंबई व दिल्ली येथें एक मोठा धंदाच आहे असें म्हटलें तरी चालेल. शुद्ध करणारा ज्या किंमतीला अशुद्ध कापूर विकत घेतो, त्याच किंमतीला जवळ जवळ शुद्ध केलेलाहि तो विकतो. परंतु बरेचसें पाणी कापरांत शोषलें जाऊन त्याचें वजन वाढतें यामुळें त्याला फायदा होतो.

कापराच्यासंबंधांत जपानी व्यापाराची वाढ ज्या मानानें होते त्याच मानानें संयुक्त राज्य, हांगकांग व स्ट्रेट सेटलमेंट येथील कापराची मागणी मंदावते.

जपानी कापूर व यूरोपियन कापूर यांच्या किंमतींची तुलना केली तर असें दिसून येईल कीं, जपानी कापराची किंमत जास्त आहे. याचें कारण जपानहून शुद्ध कापराचीच आयात जास्त होते. मुंबई व बंगाल येथून कापूर मुख्यत्वें-करून बाहेर जातो. साधारणतः नाताळ हें चांगलें गिन्हाईक आहे.परंतु स. १९०४ पासून संयुक्त राज्यानें पहिला नंबर पटकाविला आहे.

का प रा चें ते ल.—या नांवाचे अगदीं वेगळाले असे दोन पदार्थ आहेत. एक बोर्निओमधील ओलिओरेझिन हें होय. हें तेल लांकडांपासून ऊर्ध्वपातनक्रियेनें अथवा झाडाला नळ्या लावून काढतात; तेथील झाडें रसाचा दाब सहन करूं शकत नसल्यामुळें एकदम फुटतात अथवा त्यानां मोठया भेगा पडतात. गील्ड मीस्टर व हॉफमन म्हणतात कीं, हें तेल बाजारांत मिळत नाहीं.

दुसरें फॉर्मोसा व जपानमधील कापराचें तेल होय. हें पिंगट रंगाचें असून त्यांत कापराचा बराच अंश असतो. या तेलाचें उष्णमान कमी झाल्याबरोबर कापूर तळाशीं बसतो. तेल थंड केलें तर कापराचे स्फटिक बनतात. ते काढल्यावर तेलाचा पिंवळा जर्द अथवा तपकिरी पिंवळा रंग होऊन त्यास उग्र वास येतो.फोर्मोसा बेटांत हें तेल पूर्वी निरुपयोगी म्हणून टाकीत असत. जपानमध्यें लाखेच्या व रंगाच्या कामांत याचा उपयोग करीत असून त्यापासून कापूर देखील काढतात.

बाजारांत दोन जातींचा कापूर विकावयास येतो व तो दोन भिन्न जातींच्या झाडांपासून उत्पन्न होतो. एका जातीचीं झाडें बोर्निओ, सुमात्रा व लाव्युअन या बेटांत होतात व दुसऱ्या कापराचीं झाडें चीन व जपान देशांत होतात. फोर्मोसा बेटांत या झाडाच्या मोठाल्या बागा आहेत.या झाडांची लागवड इतर देशांत करण्याचे पुष्कळ प्रयत्न होत आहेत. परंतु त्यांत फारसें यश आलेलें दिसत नाहीं.

चिनी कापूर पाण्यांत डाहाळ्या वगैरे उकळून ऊर्ध्वपातन क्रियेनें काढतात व बोर्निओमधील कापूर झाडांत स्फटिक रूपानें सांपडतो हें वर सांगितलेंच आहे.

गु ण ध र्म.—शुद्ध केलेला कापूर पांढरा व अर्धवट पार-दर्शक असतो. त्याची पूड लवकर होत नाहीं. परंतु त्यांत मद्यार्काचा किंवा तेलाचा थेंब टाकल्याबरोबर तो वितळतो. याची रुचि कडवट व तिखट असते. कापूर ज्वालाग्राही असून त्याची ज्योत सतेज पण धुरकट असते. हवेंत उघडा राहिल्यास तो लवकर नाहींसा होतो. कापराचा वास उग्र असल्यामुळें कपडे व पुस्तकें ठेवण्याच्या कपाटांत व पेटयांत व त्याचप्रमाणें मृतप्राणी व वनस्पती ठेवण्याच्या पेटयांत कापूर घालतात. कापराचे अनेक औषधी उपयोग आहेत. [फार्माको. इंडिका. ३,२००. ऐनी—अकबरी; ट्रँडिस—इंडिअन ट्रीज; व हॉफमन—व्हालटाईल ऑईल्स; वॅट; पदे. ]

**कापूस**—या झाडास लॅटिनमध्यें गॉसिपिअम, इंग्रजींत कॉटन, संस्कृतांत कार्पास, मराठींत कापूस, गुजराथींत कपास, हिंदींत कपाशी इत्यादि नांवें आहेत.

खाण्याच्या धान्याच्या खालोखाल महत्वाचीं पिकें तंतूचीं होत. कारण अन्नानंतर मनुष्यप्राण्याला वस्त्रप्रावरणाची जरूरी आहे तंतुवर्गांत कापूस व ज्यूट हीं फार महत्वाचीं आहेत. त्याच्या खालोखाल काथ्या, केक-ताड, ताग, अंबाडी, कागद करण्याचे तंतू, दोऱ्या वळण्याचे तंतू, हातऱ्या अगर चटया विणण्याचे तंतू वगैरे होत.प्राण्यांपासून होणाऱ्या तंतूंत रेशीम, लोंकर व केंस मोडतात. सर्वांमध्यें कापसाची वस्त्रें जास्त वापरलीं जातात व कापसाचें पीक सर्व उष्ण कटिबंधांत व समशीतोष्ण कटिबंधांतील कांहीं भाग मिळून विषुववृत्ताच्या उत्तरेस व दक्षिणेस ३०° ते ४०° अंशांपर्यंत चांगलें येतें. म्हणून कापसाचें विशेष महत्व आहे.

याशिवाय हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या मालांत कापूस व कापड हे जिन्नस फार महत्वाचे आहेत.महायुद्धापूर्वीच्या पांच वर्षांची सरासरी, मार्च सन १९१४ अखेर पाहिली तर कापूस व कापड यांची पंचेचाळीस कोटि व ताग व तागाचें कापड यांची बेचाळीस कोटि रुपये किंमतीची निर्गत होती.

हिंदुस्थानांत कापसाचें कापड विणण्याची पहिली गिरणी इ. स. १८१८ सालीं कलकत्ता येथें स्थापन झाली व वाफेनें चालणारी पहिली गिरणी मुंबई येथें सन १८५३ सालीं उभारली गेली. सन १८८२ सालापासून हिंदुस्थानांत गिरण्यांची वाढ झपाटयानें होऊं लागली. गिरण्यांची ही वाढ कसकशी होत गेली याची कल्पना पुढील कोष्टकावरून स्पष्ट होईल.

| वर्ष | गिरण्यांची संख्या | माग ( हजार ) | चात्या (लक्ष) |
|---|---|---|---|
| १८७८ | ५८ | ९.१ | १२.८९ |
| १८८८ | ११४ | १९.४ | २४.८८ |
| १९१४ | १७८ | १०४.१ | ६७.७८ |

सन १९१४ सालापासून महायुद्धास सुरवात झाली. या तीन वर्षांत चात्यांची संख्या साठ हजार व मागांची संख्या सहा हजारांपर्यंत वाढलेली आहे. परंतु इंग्लंडांतील लोक-संख्या व तेथील चात्या व माग यांचें प्रमाण पाहिलें असतां, हिंदुस्थानांतील हा धंदा किती मागें आहे हें सहज दिसून येईल. इंग्लंडांतील लोकसंख्येंत दर हजारीं ३१८.२ चात्या व १७.८ माग पडत असून हिंदुस्थानांत तें प्रमाण दरहजारीं २१.७ चात्या व ०.३५ माग इतकें अल्प आहे.

मुंबई इलाख्यांत एकंदर २५७,००० सुती व २३,००० रेशमी कापड विणणारे कोष्टी आहेत.

इ ति हा स.—वेदामध्यें आश्वलायन श्रौतसूत्रांत कापसाच्या वस्त्राबद्दल उल्लेख आहे. हिंदुस्थानांत फार प्राचीन कालापासून कापसाचा उपयोग माहीत आहे. अगदीं प्राचीनकाळीं, जेव्हांपासून वर्णव्यवस्था अस्तित्वांत आली तेव्हांपासून ब्राह्मणानें यज्ञोपवीत कापसाचें असावें असा नियम रूढ आहे. यावरून हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं कापसाची लागवड होती असें दिसतें. ख्रिस्ती शकापूर्वी ४५० या वर्षी हिरोडोटस नांवाचा ग्रीक प्रवासी आला होता, त्यानें "हिंदुस्थानांत कांहीं झाडें आहेत, त्यांच्या फळांस लोंकर येते" असें नमूद केलें आहे. इसवी सन १५० त अरिअन यानें ' अरब लोक पात्याला, भडोच वगैरे ठिकाणांतून कापूस तांबड्या समुद्राच्या मार्गानें अदोलीपावेतों नेत असत व त्याप्रमाणेंच मच्छलीपट्टणांत रंगविलेल्या कपड्याचा पुष्कळ व्यापार चालतो ' असें म्हटलें आहे.

शिकंदर बादशहाच्याबरोबर आलेल्या लोकांकडून ग्रीक लोकांनां कापसाच्या झाडासंबंधीं माहिती मिळाली. अति प्राचीन लेखकांनीं लेप, गाथा, वगैरेंकडे कापसाचा उपयोग होतो असा उल्लेख आहे. परंतु कापूस कातणें व कापड विणणें यासंबंधीं त्यांनीं मौन धारण केलें आहे. हिंदुस्थानांतील विणकामासंबंधीं उल्लेख करणारा पहिला यूरोपीय लेखक क्टेसिअस हा आहे. अरिअनच्या " इंडिका " ग्रंथांत ( इ. स. १५८ ) त्यानें हिंदुस्थानचा कापूस इतर देशांतील कापसापेक्षां जास्त पांढरा व चकचकीत असतो असें लिहिलें आहे. यानंतर अरबी ग्रंथकार व मार्कोपोलो वगैरे प्रवाशांच्या ग्रंथांत कापूस व त्याच्या वस्त्रांचा उल्लेख बराच आढळतो.

ईजिप्तमध्यें प्राचीन ग्रंथांत किंवा चित्रांत कापसाचा उल्लेख कोठेंच आढळत नाहीं. यावरून ईजिप्तमध्यें कापूस बाहेरून येत असावा. परंतु ईजिप्त व हिंदुस्थानांतील कापसाच्या झाडांसंबंधीं बहुवर्षजीवि असा उल्लेख आढळतो, तेव्हां वर्षजीवि झाडें अरबस्तानांतील असावींत व अरबांनींच त्यांचा प्रसार आपल्याबरोबर सिसली, मेसापोटेमिया वगैरे ठिकाणीं केला असावा. अमेरिकेचा शोध लागला त्यावेळीं तेथील रानटी लोकांत लागवड केलेल्या कापसाचीं वस्त्रें विणण्याची कला आढळून आली. पुढें अमेरिकेमध्यें प्रथम व्हर्जिनियांत कापसाची पद्धतशीर लागवड करण्यास सुरुवात होऊन तींत वरचेवर वाढ व सुधारणा होत गेली.

हिंदुस्थानांतून येणाऱ्या सुती कापडाविरुद्ध इंग्लंडच्या लोकांनीं ओरड सुरु केली, तेव्हां १८व्या शतकाच्या आरंभीं ब्रिटिश पार्लमेंटनें हिंदुस्थानचा चिटाचा व्यापार दडपून टाकण्याकरितां कायदे केले. इ. स. १७८२ मध्यें इंग्लंडांत प्रथमतः मलमल करण्यास आरंभ झाला व तेव्हांपासून दक्षिण अमेरिकेंतून कापूस येण्यास सुरुवात झाली.

त्यांपैकीं १,००,००,००० पौंड ग्रेटब्रिटन घेत असे. तेथें एकंदर ५४० लक्ष पौंड कापसाची आयात होत असे. त्यांपैकीं हिंदुस्थानांतून ६५ लक्ष पौंड जात असे.

इसवी सन १७८८ सालीं ईस्ट इंडिया कंपनीनें डाका येथील व्यापारी मुखत्यार याजकडे तेथील कापसासंबंधीं रिपोर्ट मागविला. ते मुखत्यार म्हणतात कीं, 'सर्व जगांत उत्तम असा कापूस येथेंच होतो.' त्याचा तलम कपडा बनतो. हें झाड बहुवर्षायु आहे व हा कापूस डाकाच्या वायव्येकडील जिल्ह्यांत गंगेच्या कांठीं व तिच्या फांटयावर पिकतो. त्याला बैराटी कापूस असें म्हणतात. या कापसाचे तंतू मजबूत, रेशमासारखे नरम व मऊ असतात. याची मलमल करतात. इ. स. १७९८ सालीं रासबर्ग लिहितो कीं, ' डाका येथील कापसाच्या झाडांचा, पानांचा व फुलांचा रंग तांबूस असतो'.

डाकाची मलमल ग्रीक लोकांनां ' गंगेतिका' या नांवानें माहीत होती. यावरून कापसाचें सूत काढून कापड तयार करण्याची कला सुमारें २००० वर्षांपासून हिंदुस्थानास अवगत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्लंडांत कापड विणण्याची कला १७ व्या शतकांत सुरू झाली; व इ. स. १७२१ सालीं मँचेस्टरकरितां हिंदुस्थानातून 'कालिको ' चें कापड आणण्याच्या बंदीबद्दल कायदा पसार करण्यांत आला. इ. स. १७८४ सालीं अमेरिकेंतून पहिल्यानें लिव्हरपूल येथें थोडा कापूस आला व त्यानंतर कापसाच्या व्यापाराची दिशा बदलली. तेव्हांपासून हलके हलके ज्या हिंदुस्थानांतून पाश्चात्य देशांत कापड जात असे, तेंच हिंदुस्थान आपल्याला लागणाऱ्या कापडाकरितां यूरोपवर अवलंबून राहूं लागलें. याचें कारण यूरोपखंडांत विद्या व कला यांची वाढ होऊन यंत्राच्या व वाफेच्या सहाय्यानें बहुतेक माल तयार होऊं लागला हें होय. त्याचा परिणाम असा झाला कीं, इकडील हातमागांचा धंदा बसला व बऱ्याच कोष्टयांनां आपला धंदा सोडून शेतीकडे वळावें लागलें किंवा नोकरीसाठीं बाहेरदेशीं रस्ता धरणें भाग पडलें.

वि या ण्यां ती ल सु धा र णा.—जगांतील लागवडींत असलेल्या कापसाच्या जाती आशिया, आफ्रिका व अमेरिका या ठिकाणीं होतात. पहिल्या दोन ठिकाणीं होणाऱ्या कापसाला सूक्ष्मतंत्वावरण असलेल्या सरकीचा एशियाटिक कापूस व दुसऱ्या कापसाला सूक्ष्मतंत्वावरणरहित सरकीचा कापूस असे यांचे दोन वर्ग करण्यांत यावे असें कांहीं लोक प्रतिपादितात. परंतु आशियांतील कापसाच्या सर्व जाती सूक्ष्मतंत्वावरण असलेल्या सरकीच्याच असतात व अमेरिकेंतील सर्व जाती सूक्ष्मतंत्वावरणरहित सरकीच्याच असतात असें नाहीं. आशियांतील मूळच्या कापसाच्या कोणत्याहि जातीची सरकी सूक्ष्मतंत्वावरणरहित नसते. आशियांतील कापसांत सूक्ष्मतंत्वावरण असलें तरी सरकीच्या कापसाच्या झाडांचीं पुष्पोपांगपर्णे खालीं जोडलेलीं असतात व अमेरिकेंतील सूक्ष्मतंत्वावरण असलेल्या सरकीच्या कापसाच्या

जातींच्या झाडांचीं पुष्पोपांगपणें तशीं जोडलेलीं नसतात.

सूक्ष्मतंत्वावरणरहित व सूक्ष्मतंत्वावरणसहित अशा कापसाच्या जातींचा संकर होणें शक्य नाहीं असें कांहीं लोकांचें मत आहे. परंतु त्या मतांत फारसें तथ्य नाहीं. कापसाच्या जातींचा संकर न होऊं देणें फार कठीण आहे असें एका वर्गाचें मत आहे, तर दुसरा वर्ग म्हणतो कीं असलें मिश्रण जरी सृष्टिनियमाविरुद्ध नाहीं तरी त्यापासून कांहींच तादृश फायदा नाहीं. तोडॅरोसारखे कांहीं वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणतात कीं, कापसाच्या ५४ पोटजाती आहेत, व पाल्टोरसारखे वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणतात कीं, त्या फक्त सातच असून प्रत्येकीचे असंख्य प्रकार आहेत. हल्लीं कापसाच्या वर्गीकरणाकरितां ज्या जाती निःसंशय वन्य आहेत त्या आधारभूत धरल्यामुळें वादास जागाच रहात नाहीं.

हिंदुस्थानांतील कापसाच्या जातींचा अभ्यास केल्यानंतर वॅटचें असें मत पडलें कीं, संकर हा एक कापसाची निपज सुधारण्यास महत्वाचा उपाय आहे. कापसाच्या मूळ पांचच पोटजाती आहेत हें मत मात्र त्याला मान्य नाहीं. अमेरिकेंतील तज्ज्ञांनीं संकराच्या योगानें असंख्य प्रकार उत्पन्न केले असून संकराचा उपाय अतिशय महत्वाचा आहे असें त्यांचें मत आहे.

संकीर्ण जातींच्या झाडांचे गुणधर्म, ज्या दोन झाडांच्या मिश्रणापासून ती झाली असेल त्यांतील स्त्रीवनस्पतीप्रमाणें असतात. व वोंडें व कापूस ही पूंवनस्पतीप्रमाणें असतात. त्याचप्रमाणें कापसाच्या कोणत्याहि प्रकाराची प्रवृत्ति नेहमीं मूळ नमुन्याकडे असते. या व असल्या प्रकारच्या विचारावरूनच असें प्रतिपादण्यांत येतें कीं, संकरापासून सर्व प्रकारचा कापूस उत्पन्न करणें शक्य आहे.

कापसाकरितां साधारणतः योग्य अशी जमीन शोधण्याकरितां हिंदुस्थान सरकारच्या हुकुमानें वरेच प्रयत्न झाले. हिंदुस्थानांतील मूळ जातींच्या सुधारणेकडे अगदीं अलीकडील कालापर्यंत दुर्लक्ष केलें होतें. हिंदुस्थानच्या कापसाच्या प्रगतीकरितां सर्व जगांत अस्तित्वांत असलेल्या कापसाच्या जातींचा शास्त्रीय दृष्टया शोध लावणें अवश्य आहे अशी वॅटची शिफारस आहे. संकीर्ण जाती उत्पन्न करण्याचा फायदा शास्त्रीय दृष्टया घेऊन प्रत्येक प्रकाराचे गुणधर्म निश्चित करून प्रत्येक प्रदेशांत योग्य जातीची लागवड होणें अवश्य आहे.

सरकी काढण्याच्या कामीं वाष्पयंत्रांचा हिंदुस्थानांत प्रसार झाल्यामुळें येथील कापसाला एक नवीनच विघ्न उपस्थित झालें. कारण अशा ठिकाणीं निरनिराळ्या जातींचा कापूस येतो व तो वटवून जी सरकी निघते तीच शेतकरीवर्ग जातीचा अगर आपल्या शेतांत त्याचें चांगलें पीक येईल किंवा नाहीं या गोष्टींचा विचार न करितां, आपल्या शेतांत पेरतो. अज्ञान, दारिद्र्य व कर्जबाजारीपणा या गोष्टींमुळें शेतकरीवर्ग आपला स्वतःचा सरकीचा सांठा ठेवूं शकत नाहीं.

संयुक्त संस्थानांतील लांब धाग्याच्या कापसाचा कपडा तयार करण्याच्या अनुरोधानें इंग्लंडनें आपली यंत्रसामुग्री सुधारल्यामुळें हिंदुस्थानच्या लहान धाग्याच्या कापसाचा खप तेथें होत नसे; परंतु जर्मनी, जपान व हिंदुस्थान येथें हलक्या प्रतीचा माल तयार करणाऱ्या गिरण्या स्थापण्यांत आल्या व शेतकरीवर्गाला असें सांगण्यांत आलें कीं, त्यांनां लांब धाग्याच्या कापसाला जास्त किंमत मिळणार नाहीं. यापूर्वी लांब धाग्याच्या कापसाचें पीक थोडें येई, त्याची भरपाई जास्त किंमतीमुळें होत असे; परंतु आता ती आशा नष्ट झाल्यामुळें सर्व देशभर हलक्या प्रतीच्या कापसाचें पीक काढतात. हें अरिष्ट दूर करण्यास कमींत कमी एक शतक तरी लागेल.

मध्यप्रांत व वऱ्हाड येथील वेलाति अथवा जरी जातीच्या कापसाबद्दल एका युरोपांतील व्यापाऱ्यानें असें लिहिलें आहे कीं ( १ ) याचें पीक लवकर येतें, यामुळें शेतकऱ्यांनां लवकर मोबदला मिळतो; ( २ ) त्याला अकाली थंडीपासून भीति नसते, ( ३ ) या झाडांनां रोग होत नाहीं व पावसामुळें नुकसान होत नाहीं. ( ४ ) यापासून अधिक वजनाचा विनसरकीचा कापूस निघतो व ( ५ ) बाजारांत या जातीचा कापूस इतर जातींपेक्षां स्वच्छ स्थितींत येतो.

अगदीं पूर्वी शेतकींत सर्वसाधारण सुधारणा करण्याचे प्रयत्न न करतां एखाद्या विवक्षित पिकाच्याच सुधारणेकडे जास्त लक्ष देण्यांत येत असे. असें असल्यामुळें स्वाभाविकच कापसाच्या सुधारणेकडे जास्त लक्ष देण्यांत आलें. या सुधारणेला तीन दिशांनीं सुरवात झाली.

पहिलीः—परदेशी लांब धाग्याच्या कापसाचें बीं आणून तें शेतकऱ्यांत वांटणें. उदाहरणार्थ अमेरिकन कापूस ( अपलॅन्ड, न्यू ऑर्लिअन्स व वोरबोन ) व इजिप्शिअन ( मिसर देशांतील ) कापूस.

दुसरीः—कापसाच्या लोडणीसाठीं सॉ जिन्स ( करवतीचरक ) व रोलर जिन्स ( रुळाचा चरक ) वापरणें.

तिसरीः—निर्भेळ बियांचा प्रसार.

सन १७८३ सालापासून हिंदुस्थानांतील कापूस कमीजास्त प्रमाणानें विलायतेला जात आहे; परंतु १८०३ सालीं जेव्हां अमेरिकन कापसाला जास्त भाव मागूं लागले तेव्हांपासून येथें त्याच्या सुधारणेकडे जास्त लक्ष जाऊं लागलें. बोरबोन कापसाचे प्रयोग खेडाजिल्हा, मालवण, रत्नागिरी, करंजे ( कुलाबा जिल्हा ) व साष्टी येथें करण्यांत आले. पण कोंकणपट्टींतील हे प्रयोग लवकरच बंद करण्यांत आले. हल्लीं बोरबोन कापसाचें जें झाड कोठें कोठें परड्यांत आढळतें ( ज्याला देवकापूस म्हणतात ) तें यापैकींच होय. मद्रास इलाख्यांत कोईमतूर जिल्ह्यांत बोरबोन कापसाची लागवड थोड्या प्रमाणावर राहिली आहे. स. १८२९ सालीं भडोच

व धारवाड येथें प्रयोगाचीं क्षेत्र स्थापन झालीं. अमेरिकेंतून बीं आणून तें मोफत किंवा माफक दरानें देण्यांत आलें. ज्यांचीं उत्तम पिकें आलीं त्यांस बक्षिसें देण्यांत आलीं. इ. स. १८३३ सालीं धारवाडास गठ्ठे बांधण्याकरितां वखारी काढल्या. खानदेशांत १८४५ सालीं कापसाचे प्रयोग सुरू केले. त्याचप्रमाणें सोलापूर, सातारा, बेळगांव, विजापूर, खेडा, सुरत, अहमदाबाद वगैरे जिल्ह्यांत कापसाच्या सुधारणेसंबंधीं नवे नवे प्रयोग करण्यांत आले. पैकीं फक्त अमेरिकन कापसाची लागवड धारवाड जिल्ह्यांतील कांहीं भागांत सफल झाल्यामुळें ती मात्र अद्याप टिकून राहिली आहे. यापैकीं खानदेश व मध्यप्रांतांतील अमेरिकन कापसाच्या लागवडींच्या प्रयोगांतलि अवशिष्ट झाडें अद्यापि कांहीं कांहीं ठिकाणीं वऱ्हाडी कापसाबरोबर मिश्र झालेलीं आढळतात.

धारवाडी कापूस लोढण्यास सॉ जिन्सच्या गिरण्या काढिल्या व त्या अद्यापि कोठें कोठें आहेत. इ. सन १८२९, १८६३ व १८७८ या सालीं कापसाच्या भेसळीसंबंधानें कायदे करण्यांत आले पण ते सर्व इ. स. १८८२ सालीं रद्द झाले.

अमेरिकेंत ( इ. स. १८६२–६६) जेव्हां यादवी युद्ध सुरू झालें व अमेरिकेंत कापसाचा दुष्काळ पडला, त्यावेळीं इ. स. १८६३ सालीं मुंबई इलाख्यांत कापसाकरितां स्वतंत्र कमिशनर नेमण्यांत आला व दुसऱ्या वर्षी( १८६४ ). वऱ्हाड व मध्यप्रांत यांताहि कमिशनरची नेमणूक झाली. सन १८६३ चा नववा कॉटन फ्रॉड्स ( कापसांतील लबाडी ) चा कायदा पसार करण्यांत आला. या कायद्यानें मुळींच फायदा झाला नाहीं. इ. स. १८७८ सालीं वरील कायद्यांत सुधारणा होऊन पुन्हां हा कायदा सुरू करण्यांत आला. मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत बनी अगर हिंगणघाट या जातीच्या कापसाचें निवडक बीं कमिशनरांनीं वऱ्हाड, नेमाड, जबलपूर आणि छत्तीसगड या जिल्ह्यांत व इतर प्रांतांत वाटलें. सन १८६७ सालीं तर ८५५ टन बीं वांटण्यांत आलें. यावेळींच अमेरिकन कापसाचें बीं वांटण्यांत आलें. परंतु हे दोन्ही तऱ्हेचे प्रयत्न निष्फळ झाले. या वेळीं कॉटन–कमिशनरनीं कापसाची नेआण करण्याच्या सोईसाठीं वऱ्हाडांत आगगाडीचे रस्ते बांधण्याबद्दल केलेले प्रयत्न, कापूस सांठविण्याकरितां व विक्रीकरितां नवीन उघडलेलीं मार्केटें व सरकी काढण्याचीं यंत्रें काढिलीं. त्यांपैकीं गठ्ठे बांधण्याच्या गिरण्या तेवढ्या फायदेशीर होऊन कापसाच्या सुधारणेचें पाऊल १८६७ नंतर पांच वर्षांनीं पूर्वस्थितीवर आलें.

वर नमूद केलेल्या यादवी युद्धाचा असा परिणाम झाला कीं, हिंदुस्थानांतून कापसाची निर्गत अतोनात वाढली. इ. स. १८६९ अखेर पुऱ्या झालेल्या दहा वर्षांची सरासरीनें ग्रेट ब्रिटनची एकंदर आयात २७३६६६१ गठ्ठे ( प्रत्येक गठ्ठा ४०० पौंड ) होती. त्यांपैकीं १८४७७५९ गठ्ठे हिंदुस्थानांतून रवाना झाले. पुढें पुढें १९ व्या शतकाच्या शेवटीं हिंदुस्थानांतून कापूस पाठविण्याच्या ऐवजीं तें उलटपक्षी सुमारें २,००,००,००० पौंडांचें कापड घेणारें गिऱ्हाईक बनलें.

या एकंदर हकिगतीवरून असें स्पष्ट दिसतें कीं, कापसाच्या सुधारणेसंबंधानें सुमारें सन १९०० सालापावेतों जे प्रयत्न करण्यांत आले ते सर्व कापूस पिकणाऱ्या भागांत लांब धाग्याच्या कापसाचें उत्पन्न व्हावें म्हणून करण्यांत आले. हवामान व तेथें होणाऱ्या कपाशीच्या जाती वगैरेसंबंधीं पूर्वी जितका विचार व्हावयास पाहिजे होता तितका झालेला दिसत नाहीं. इ. सन १९०० सालापासून कापसांत सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्न पद्धतशीर चालले आहेत व त्यांचें फळहि कोठें कोठें दृष्टीस पडूं लागलें आहे. उदाहरणार्थ, सिंधमध्यें कालव्याखालीं होणारा अमेरिकन अपलंड जातीचा कापूस, भडोच व सुरत येथें भडोची बियांची निवड करून सुधारलेला कापूस, धारवाड जिल्ह्यांत कुमठा कापसांत सुधारणा व भडोची कापसाचा प्रसार, गदगभागांत ( जिल्हा धारवाड ) कांबोडिया वगैरे. हीं वर दिलेलीं उदाहरणें फक्त सरकारी प्रयोगशाळेंत झालेलीं नसून मोठ्या प्रमाणांत शेतकऱ्यांच्या शेतांत झालेलीं आहेत. परंतु एकंदरींत हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणांत होणाऱ्या कापसाचें क्षेत्र म्हटलें म्हणजे आंखूड धाग्याचेंच होय. खानदेशांतील कापसांत पुष्कळ भेसळ असते, व या जातीचा कापूस जेथें जेथें होतो तेथें तेथें त्यांत अशीच भेसळ सांपडते. या भेसळींतील निरनिराळ्या जाती वेगवेगळ्या तपासून कांहीं वर्षांच्या प्रयोगाअंतीं असें ठरलें आहे कीं, ज्या झाडांचीं फुलें पांढरीं असून पानें लांब बोटासारखीं चिरलेलीं असतात त्या झाडांच्या कापसाचें उत्पन्न जास्त येतें. पण त्याचा धागा आंखूड असून खरवरीत असतो. मध्यप्रांतांत इ. स. १९०४ सालीं केलेले प्रयत्न निष्फळ झाले. पुन्हां शेतकी खात्याकडून १९०६ सालीं जरी ( देशी ) नामक कापसांतील पोटजाती वेगवेगळ्या करून त्यांची निरनिराळी लागवड पांच वर्षें करून शेतकऱ्याला फायदेशीर जात रेझिया असा निर्णय ठरविण्यांत आला. पोटजातींचा तपशील खालीं दिला आहे.

कापसाचें ससरासरी दरएकरी उत्पन्न

| जात. | कच्चा कापूस. | पक्का कापूस. | सरकी | किंमत. × |
|---|---|---|---|---|
| | पौंड | पौंड | पौंड | रु. आ. |
| गॉसिपियम् निग्लेटक्स् | | | | |
| (मालव्हेन्सीस) | ३७३ | ११२ | २६१ | ५७–५ |
| ” ” (व्हेरा) | ३४३ | ११५ | २२८ | ५९–११ |
| रोझिया | ४०२ | १६१ | २४१ | ६९–१४ |
| रोझिआ कच्छिका. | ४१२ | १५० | २६२ | ६६–० |
| वऱ्हाड जरी | ३७१ | १३२ | २३९ | ५८–५ |
| भुरी ( अमेरिकन् टाइप ) | ३०३ | १०० | २०३ | ५७–१५ |
| बनी. | २५५ | ७४ | १८१ | ४४–३ |

× ही किंमत सन १९११ ची असून ती सरकी व कापूस यांची मिळून आहे.

याशिवाय कापसांत तीन तऱ्हांनीं अंतर्गत सुधारणा करण्याचे प्रयत्न चालू आहेत. पहिला,–धाग्याची लांबी वाढविण्याविषयीं; दुसरा,–उत्पन्न वाढविणें, व तिसरा,–रुईचें प्रमाण वाढविणें.

शेतकऱ्याच्या फायद्याच्या दृष्टीनें विचार केला असतां, दर एकरीं कापसाचें उत्पन्न व रुईचें प्रमाण जास्त पडणें हें महत्वाचें आहे. आखूड धाग्याच्या जातीचें उत्पन्न जास्त येऊन रुईचें प्रमाण जास्त पडतें. या कापसाचें झाड कणखर असून तें हवापाण्याच्या फेरफारांनां फारशी दाद देत नाहीं. म्हणूनच शेतकरी ही जात अधिक पसंत करतात. याकरितां मध्यप्रांत, संयुक्तप्रांतांतील पश्चिमभाग, खानदेश जिल्हा, अहमदनगर, सोलापूर वगैरे मुंबई इलाख्यांतील जिल्ह्यांत पांढऱ्या फुलाचें व चिरक्या पानांच्या जातीचें उत्पन्न लांब धाग्याच्या जातीपेक्षां जास्त येत असून, रुईचें प्रमाणहि जास्त येतें; म्हणून याचा प्रसार जारीनें करण्याचे प्रयत्न शेतकी खात्याकडून चालू आहेत. वऱ्हाडांतील सुमारें एकतृतीयांश क्षेत्र या निवडलेल्या सरकीनें पेरलें जातें; व खानदेशांत दरसाल सगसरी ३०,००० एकर क्षेत्रांत या जातीची लागवड होते. ब्रह्मदेशांत आंखूड धाग्याचाच कापूस चांगला होतो. सरकारी क्षेत्रांत बियांची निवड करून तें शेतकऱ्यांस देण्याचा क्रम चालू आहे. त्याप्रमाणेंच भडोच जातीच्या कपाशीचा कर्नाटकांत बराच प्रसार होत आहे. मुंबई इलाख्यांत गुजराथ व कर्नाटक, मद्रास इलाख्यांत तिनेवेल्ली व निझामच्या राज्यांत कांहीं ठिकाणीं लांब धाग्याचा कापूस पैदा होतो. सिंध प्रांतांत, पंजाबांतील नव्या वसाहतींत, संयुक्त प्रांतापैकीं कांहीं भागांत व त्याप्रमाणेंच मुंबई व मद्रासपैकीं कांहीं भागांत परदेशी कापसाचा फैलाव वाढत आहे. सिंधमधील अनुभवानें असें ठरलें आहे कीं, ट्रएम्प नांवाची अमेरिकन जात तेथें चांगली होते. संयुक्त प्रांतांत अमेरिकन जातीच्या कापसाचा, पाण्याची सोय असेल त्या ठिकाणीं प्रसार होत आहे. मुंबई व मद्रास या दोन इलाख्यांत कॅम्बोडिआचा प्रसार होत आहे. मद्रास इलाख्यांत याची लागवड सन १९०४ सालीं सुरू झाली. सरासरीनें हिंदुस्थानांतील कापसाखालीं असलेल्या क्षेत्रापैकीं निम्में क्षेत्र मुंबई इलाखा व वऱ्हाड प्रांत यांत असतें. व बाकीचें क्षेत्र मध्यप्रांत, मद्रास इलाखा, निजामचें राज्य, संयुक्तप्रांत व पंजाब यांत वाटलेलें असतें. शिवाय बंगाल, आसाम, ब्रह्मदेश व सिंध यांतहि थोडथोडें क्षेत्र कापसाखालीं असतें. एकंदरींत कापसाच्या लागवडीचें क्षेत्र वर्षानुवर्ष वाढत्या प्रमाणांत आहे.

मुंबई इलाख्यांत कोंकणखेरीज कापसाची लागवड सर्वत्र होते. गुजराथेंत पंचमहालखेरीज सर्व ठिकाणीं कापूस पिकतो. खानदेश व कर्नाटक येथें कापसाची लागवड फार महत्वाची आहे. हल्लीं कापसाचा प्रसार नाशिक, नगर व सोलापूर या जिल्ह्यांत झपाट्यानें होत आहे.

वऱ्हाड ( पेनघाट, उमरावती, अकोला, बुलढाणा ) व मध्यप्रांत ( नागपूर व नर्मदाप्रांत ) यांत कापसाचें क्षेत्र विशेष असून, निझामच्या राज्यांत ( मराठवाडा ) औरंगाबाद, परभणी, नांदेड, बीड, उस्मानाबाद, गुलबर्गा, बेदर वगैरे ठिकाणीं कापसाची बरीच लागवड होते.

**क्षेत्र व उत्पन्न.**—इसवी सन १९१४–१५ सालीं ब्रिटिशहिंदुस्थानांत १,५२,२२,००० एकर क्षेत्र कापसाखालीं होतें. यापैकीं शेंकडा ३१ मध्यप्रांत व वऱ्हाड, २८ मुंबई, १४ मद्रास, ११ पंजाब व १० संयुक्तप्रांतांत होतें.

| प्रांत | वर्ष | एकर | गठ्ठे (गठ्ठा व.४०० पौंड) |
|---|---|---|---|
| मुंबई, संस्थानांसहित | १९१५।१६ | ५००५००० | १०५१००० |
| | १९१६।१७ | ६३९४००० | १५१९००० |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | १९१५।१६ | ४०६१००० | ११०६००० |
| | १९१६।१७ | ४४.१००० | ६००००० |
| निजाम हैद्राबाद | १५१५।१६ | २९६४००० | ४५०००० |
| | १९१६।१७ | ३२००००० | ५००००० |

सर्व हिंदुस्थानांत कांहीं विवक्षित भागांखेरीज हलक्या दर्जाचा, खरबरीत व आंखूड धाग्याचा कापूस पिकतो.

निरनिराळ्या ठिकाणची गठ्ठे बांधण्यासंबंधीं मि. रॉबर्ट ( प्रिन्सी. लयालपूर, शेतकीकॉलेज ) यांनीं दिलेली माहितीः—

| देशाचें नांव | गठ्ठे वजन पौंड | माप इं. | घनफूट वजन पौं. | बारदान वजन |
|---|---|---|---|---|
| हिंदुस्थान | ४०० | ४९×२०×१७ | ४२–८ | ८ |
| इजिप्त | ७४० | ५२×२१॥×३२ | ३५–८ | २५ |
| अमेरिका | ५०० | ५८×२९×२२ | २३–० | २९ |

जगांतील कापसाचा पुरवठा व त्यांतील ब्रिटिश राज्याचा वांटा.

| धाग्याचें नांव, गुण | पैदाशीचें ठिकाण | जगांतील कापसाचे गठ्ठे हजार | ब्रिटनचा वांटा गठ्ठे. हजार | शें. प्र. |
|---|---|---|---|---|
| उत्तम सी आयलंड लांब धागा. | आयलंडस दक्षिण कॅरोलिना | १० | | |
| | वे. इंडीज | ५ | | |
| | | १५ | ५ | ३३ |
| दुसरा दर्जा सी आयलंड. | फ्लॉरिडा, जार्जिया | ७० | | |
| | वेस्ट इंडीज | २४ | | |
| उत्तम ईजिप्शियन (लांबधागा). | ईजिप्त | ४३० | | |
| | | ५०२ | ४,३२ | ८६ |
| ईजिप्शियन | ईजिप्त | १,००० | | |
| | सूदन | २५ | | |

( ३४१ पृष्ठ पुढें चालूं. )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अमेरिका (उत्तम धागा). | मिसिसिपी दुआब इ. | २०० | | |
| | न्यासा लँड, युगांडा, पूर्व आणि दक्षिण आफ्रिका | ५० | | |
| | पेरू देशांतील | १२५ | | |
| | | १४,०० | १,०७५ | ७७ |
| अमेरिका साधारण (धागा) | युनायटेड स्टेस्टस् अमेरिका | १५,००० | | |
| | मेक्सिको | १५० | | |
| | ब्राझिल | ३०० | | |
| | रशिया | १००० | | |
| | प.आफ्रिका | १५ | | |
| | लिव्हेन्ट | १०० | | |
| | हिंदुस्थान | २५० | | |
| | चीन कोरिया | २५० | | |
| | | १७,०६५ | २६५, | १.६ |
| हिंदुस्थान ( आखुड धागा). | हिंदुस्थान | ५,००० | | |
| | रशिया | ४०० | | |
| | चीन | १८,०० | | |
| | | ७२,०० | ५,००० | ६६ |
| | एकूण | २६,१८२ | ६,७७७ | २६ |

ब्रिटिश कॉटन ग्रोइंग असोसिएशनचे अध्यक्ष मि. जे. आर्थर हटनसाहेब यांनीं ब्रिटिशराज्यांतील कापूस पिकणारीं ठिकाणें व कापसाचें उत्पन्न वगैरेंबद्दल दिलेली उपयुक्त माहिती खालीलप्रमाणें आहेः—

| देशाचें नांव धा. व. | क्षेत्र चौरस मैल | लोकसंख्या | उत्पन्न गठ्ठे ( गठ्ठा सुमारें ४०० पौंड). |
|---|---|---|---|
| अत्युत्तम नरम | | | |
| वेस्टइंडीज | १२१४० | १७१८२१६ | ४५०० |
| लांब धाग्याचा | | | |
| ईजिप्त | ३६३१८१ | ११२८७३५९ | १३६०००० |
| सूदन | ९८४५२० | ३०००००० | १६००० |
| उंगाडा मध्यम | | | |
| धागा | १२१४३७ | २८९३४९४ | ३२००० |

( पुढें चालूं. )

| | | | |
|---|---|---|---|
| न्यासालँड व | | | |
| ना.ई.व्होडेशि. | ३२९८०१ | १८४७९०४ | ५५०० |
| नायजिरिआ | ३३६००० | १७६११९४१ | ३२००० |
| हिंदुस्थान | | | |
| आंखूड धा. | १८०२६५७. | ३१५१५६३९६. | ४०००.०० |
| एकंदर | ३९४९७३६. | ३५३५१५३१०. | ५४५०००० |

वरील आंकड्यांवरून असें दिसतें कीं, सर्व ब्रिटिश राज्यांत पुरेसा कापूस पिकतो. कारण एकंदर उत्पन्न ५५ लक्ष गठ्ठे असून लांकाशायरला फक्त ४० लक्ष गठ्ठे लागतात. परंतु हिंदुस्थानच्या उत्पन्नापैकीं निम्में पीक हिंदुस्थानांतच खपतें.

जगांत देशपरत्वें कापसाच्या अनेक जाती आहेत. त्यांपैकीं कांहीं वर्षायु आहेत व कांहीं बहुवर्षायु आहेत. परंतु कोणत्याहि कापसास पाणी वगैरे असल्यास त्याचें झाड पुष्कळ वर्षें टिकूं शकतें. कित्येक वेळां त्याचीं मोठमोठीं १२ ते १५ फूट उंचीचीं झाडें होतात. कांहींचीं झाडें हिरवींगार असतात, कांहीं तांबड्या रंगावर असतात व त्यांचे देंठ, पानें, फुलें व बोंडें हीं तांबड्या रंगावर असतात. उदाहरणार्थः—देवकापशी. एकंदरींत वर्षायु कापशीचीच लागवड जास्त प्रमाणावर करतात. बहुवर्षायु झाडें देवळाजवळ अगर परड्यांत पुष्कळ आढळतात. यांनांच देवकापूस म्हणण्याची चाल आहे.

कित्येकांचा कापूस खरबरीत व आंखूड धाग्याचा असतो. (उदाहरणार्थ, वऱ्हाडी कापूस.) व कित्येकांचा नरम व लांब धाग्याचा असतो ( उदाहरणार्थ भडोच कपाशी ). कित्येकांत कांहीं कापूस सरकीला चिकटून रहातो ( उदाहरणार्थ धारवाड अमेरिकन वगैरे.).

शिवाय कापसामध्यें लवकर व उशिरां निघणाऱ्या जाती असे दोन भेद करतां येतील. पहिली ८।९ महिने लागणाऱ्या लांब धाग्याची जाती. दुसरी सुमारें ४।५ महिने लागणाऱ्या आंखूड धाग्याच्या जाती. अधिक महिने लागणाऱ्या जातींची लागवड काळ्या, खोल, ओलावा धरून ठेवणाऱ्या अगर पाऊसकाळ बरेच महिने असणाऱ्या ठिकाणीं करतात. कापूस फेब्रुवारी–मार्च महिन्यांत तयार होतो. उदाहरणार्थः—भडोच, सुरत, वगैरे ( गुजराथ ); धारवाड, बेळगांव (कर्नाटक ); तिनेवेल्ली वगैरे ( मद्रास ). या जातीचा कापूस लांब धाग्याचा, मजबूत व नरम असा असतो. रुवाचें प्रमाण शेंकडा ३२–३७ पर्यंत भडोची कापसाचें असून अगदीं कमी मद्रासेकडील तिनेवेल्ली व कर्नाटकांतलि कुमठा येथील कापसांत तें शेंकडा २५ असतें. या जातीचीं झाडें कमी उंच व गेंदेदार असतात. यांचें सूत ३० ते ४० काउंट ( नंबरी )पर्यंत निघतें.

लवकर होणाऱ्या कापसाच्या जाती अनेक आहेत. त्यांत पुष्कळ पोटजातींची भेसळ असते. या सर्व जातींचा कापूस हिंगणघाट अगर वनी खेरीज करून आंखूड, खरखरीत पण जास्त पांढऱ्या रंगावर असतो. हा कापूस नोव्हेंबर, डिसेंबर व जानेवारींत तयार होतो. या कापसाचा उपयोग निमलोंकरी कपडा तयार करण्याच्या कामीं फार होतो; म्हणून याला जपानांतून व यूरोपांतील राष्ट्रांतून जास्त मागणी असते.या जातींत रुवाचें प्रमाण शेंकडा तीस ते पंचेचाळीसपर्यंत असतें. या जातीचीं झाडें उंच असून फांद्या थोड्या असतात.या जाती कमी पावसाच्या प्रदेशांत चांगल्या होतात; व सर्वसाधारणरीत्या पाऊस वेतशीर पडल्यास यांचें उत्पन्न चांगलें येतें.

का प सा च्या जा ती.—सर्व जगांत उत्तम कापूस म्हटला तर सीआयलंड होय. दुसरा इजिप्शियन, तिसरा अमेरिकन, चवथा भडोच व कुमठा व पांचवा वऱ्हाडी वगैरे. हिंदुस्थानांतील कापसाच्या जातींचे खालीं दिल्याप्रमाणें वर्ग करण्यांत येतातः—

( १ ) लाल झाडांचा वर्गः—या जातीचीं झाडें उंच वाढणारीं, निमुळत्या फांद्यांचीं व लाल किंवा पिंवळ्या फुलांचीं असून झाडास कापूस थोडा येऊन रुवाचें प्रमाणहि थोडें असतें. उदाहरणार्थः—लाल नवसरी, रोझी, वगरसिया, वगरसफेद (पंजाब) (२) भडोची (डेरेदार झाडांचा )वर्गः—या जातीचीं झाडें तीन चार फूट उंच वाढतात व त्यांच्या फांद्या खालपासून वरपर्यंत झाडास आच्छादून टाकितात. पानांचा रंग पिंवळसर हिरवा असतो. पान जाड व नरम असतें व कापूस नरम असून त्याची लांबी एक इंचपर्यंत असते. रुवाचें प्रमाण अजमासें शेंकडा ३३ असतें. उदाहरणार्थः—भडोच, घोगारी, वागड, कुमठा ( मुंबई ), जेटी ( बंगाल ) ज्वारीहाति, उप्पम तिन्नेवेल्ली, ( मद्रास ) ( ३ ) वनीवर्गः—या जातीचीं झाडें सहा सात फूट उंच वाढवतात व खालील फांद्या लहान असून मध्यें लांबट व शेंड्यास आंखूड अशा असतात. यांचीं फुलें पिंवळीं असून पानें साधारण रुंद, पातळ व दाट हिरव्या रंगाचीं असतात. यांचीं बोंडें लांबट, त्रिकोनी आणि अणकुचीदार असून आंतील कापूस नरम व सुमारें एक इंच लांब असतो. परंतु रुवाचें प्रमाण शेंकडा २५ असतें. झाडावर वरींच पानें लहान व विनकाऱ्याचीं अशीं असतात. उदाहरणार्थः—वनी, ( हिंगणघाट ), नेमाडी, चांदा, करकेली वगैरे. ( ४ ) जरी वर्गः—या जातीचीं झाडें वरीलप्रमाणेंच असून फक्त त्यांचीं पानें बोटासारखीं चिरलेलीं असतात. यांचीं फुलें पिंवळीं असून बोंडांतील कापूस साधारण खरखरीत, सुमारें ¾ इंच लांब व रुवाचें प्रमाण शेंकडा ३३–३४ असतें. उदाहरणार्थः—जरी, माठियो, काटी, विलायती, हिरवाणी वगैरे.( ५ ) वऱ्हाडी वर्गः—या जातीचीं झाडें वरीलप्रमाणेंच असतात. फुलें मात्र पांढरीं असून कापूस खरखरीत व सुमारें ¾ इंच लांब असतो. रुवाचें प्रमाण शेंकडा ३७ ते ४० असतें. उदाहरणार्थः—वऱ्हाडी वगैरे. ( ६ ) कोमिलावर्गः—या वर्गांतील झाडें वरींच लहान असून पानें फारच चिमटलेलीं असतात. ही जात आसाम, ब्रह्मदेश वगैरे ज्या प्रांतांत पाऊस फार पडतो अशा ठिकाणीं होते. या जातीचीं बोंडें लांबट व अणकुचीदार असून आंतील कापूस लोंकरीप्रमाणें खरखरीत व फार आंखूड धाग्याचा असतो. रुवाचें प्रमाण शेंकडा ४५ पर्यंत असतें. उदा.:—कील, कोमिला, गारोहिल, खुनसा, खोंखोचिकाओ वगैरे. ( ७ ) अमेरिकन वर्गः—या जातीचीं झाडें ठेंगणीं व रुंद पानाचीं असून फुलें पांढरवट पिंवळीं असतात व त्यांवर लाल रंगाचा ठिपका नसतो. फुलांवरील वेष्टण करवतीदार असून त्यांचीं टोकें बोंडांवर एकमेकांत वेष्टण करतात. बोंडें गोल आकाराचीं असून कापूस मऊ व सुमारें एक इंच लांब असतो. रुवाचें प्रमाण शेंकडा सुमारें ३३ ते ३६ पर्यंत असतें. सरकीचा रंग काळा व हिरवट असून ती मोठी असते, व तिला बारीक कापूस चिकटलेला असतो. उदाहरणार्थः—धारवाड, अमेरिकन, कांबोडियाबुरी, अपलंड जॉर्जिअन आणि खाकी ( लायलपूर ).

गॉसीपीयम हर्बेसिअम् या नांवाची जात उत्तर अरवस्तान व आशियामायनर येथील असून वन्यस्थितींत कोठेंच आढळत नाहीं. सिसिली माल्टापासून ग्रीस, मेसापोटेमिया, इराण ते वायव्येकडील प्रांत वगैरे ठिकाणीं ही जात आढळते. बहुतेक समशीतोष्ण कटिबंधांतील उष्ण प्रदेशांत ही जात सांपडते असें म्हणण्यास हरकत नाहीं. अमेरिकेंतील लहान धाग्याच्या कापसासारखा कापूस या जातीपासून निघतो. कापसाची ही जात लेव्हॅंटमधून युरोपखंडांत व तेथून अमेरिकेंत गेली आहे.

गॉसीपिअम अर्बोरीयम अथवा देवकापूसः—याचें झाड लहान असतें. तें मूळचें आफ्रिकाखंडांतलें आहे असें म्हणतात. परंतु वनस्पतिशास्त्रज्ञांनां तें अद्याप मूळचें कोणत्या देशांतील असावें हें समजलें नाहीं. ईजिप्त, आफ्रिका, अरबस्तान व हिंदुस्थान येथें हीं झाडें देवळांजवळच्या बगिच्यांतून आढळतात. चीन, जावा, जपान आणि मलाया येथेंहि तीं वाढतात. माकासर येथें तीं विपुल आहेत.

हिंदुस्थानांतील दंतकथांवरून हाच कापूस यज्ञोपवीत तयार करण्याला उपयोगांत आणला पाहिजे असें दिसतें; व इजिप्शियन धर्मोपाध्याय याच कापसाचा उपयोग धार्मिक कृत्यांकडे करीत असावेत असें वाटतें.

हिंदुस्थानांत देवकापसाची लागवड इतर जातींच्यापेक्षां प्राचीन नसली तरी ती निदान त्याच्याइतकी प्राचीन खास आहे.

तांबड्या फुलांचा कापूसः—या झाडांनां लाल फुलें येतात. हिंदुस्थानांत या जातीचीं झाडें क्वचित आढळतात.

तीं आफ्रिकेंत वरींच आहेत. एके काळीं या जातीचीं झाडें हिंदुस्थानांत सर्वत्र होतीं. हल्लीं तीं अयोध्याप्रांतांत सांपडतात.

बंगाल्यांत बेलाति, विलायति, खानदेश, कटेली मठी, जरी वगैरे जातींचा कापूस होतो.

चिनी कापूस.—ह्या जातीचीं झाडें बहुवर्षजीवि आथवा वर्षजीवि असून त्यांच्या फांद्या नाजुक व जांभळया रंगाच्या असतात. चीन, जपान, मलाया, सयाम, ब्रह्मदेश, हिंदुस्थान, वायव्य-हिमालय, इराण, मध्य-आशिया, उत्तर-ईजिप्त व आफ्रिका या ठिकाणीं या जातीची लागवड वरींच होते.

वतनी कापूसः—या जातीचीं झाडें लहान असून तीं वर्षजीवि अथवा द्विवर्षजीवि असतात. त्यांनां पिवळीं फुलें येतात. हिमालयाच्या भागांत व हिंदुस्थानांतील उंचवट्याच्या प्रदेशांत याच जातीची लागवड करतात. याला वगर अथवा वतनी कापूस म्हणतात. हिंदुस्थान व चीन येथें होणाऱ्या या जातीच्या झाडांत फरक असतो. चीन व जपान येथें होणारा कापूस धाग्याच्या बाबतींत सरस असतो. हिंदुस्थानांत होणाऱ्या झाडांचीं पानें मोठीं व रुंद असून त्यांचा खालचा भाग बदामी आकाराचा असतो व सर्व रोंपावर कुसें असतात.

कोकोनाडी कापूसः—हीं झाडें साधारणतः बहुवर्षजीवि असून झुडुपांसारखीं असतात; व त्यांच्या पानांचा रंग काळसर हिरवा व देंठाचा रंग गहिरा-तांबडा असतो. ब्रह्मदेशांतील वागले नांवाचीं बहुवर्षजीवि झाडें, वानि नांवाचा खाकी कापूस व बहुवर्षजीवि वाग्यि नांवाचा कापूस हे तिन्ही याच जातीचे. परंतु निरनिराळ्या स्थितींतील आहेत. या जातीच्या एका प्रकारची लागवड दक्षिण-हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर होते व ते त्याला नाद म्हणतात. हा मद्रास इलाख्यांतील हलक्या प्रतीचा कापूस असून या झाडांचीं फुलें उमलण्यापूर्वी गुलाबी रंगाचीं व उमलल्यानंतर तांबूस नांभळया रंगाचीं असतात. सप्टेंबर-पासून नोव्हेंबरपर्यंत अगर एप्रिल ते जूनपर्यंत याची पेरणी करतात. म्हणून तेथें दोन पिकें होतात. तांबूस, रेताड अगर खडकाळ जमिनीवर याची लागवड करतात. क्वचित काळ्या जमिनींतहि यांची पेरणी करतात. हीं झाडें बहुवर्षजीवि असून त्यांची उंची ६ पासून ८ फुटांपर्यंत असते. शेतांत या जातीचीं झाडें रांगेनें अगर कुंपण म्हणून दुसऱ्या पिकांच्या रक्षणाकरितां लावतात.

हिंगणघाटी कापूसः—या जातीच्या झाडापासून उत्कृष्ट व अतिशय मऊ कापूस निघतो. त्याला बाजारांत उमरस, हिंगणघाटी, नागपुरी बिहारी कापूस म्हणतात. वनि व जरी असे दोन प्रकार वरील कापसाचे आहेत. वनि उंचवटयाच्या व रुक्ष जमिनींत होतो; तो उत्तम व मऊ असतो. परंतु त्याचें पीक कमी येतें. जरी कापसाची लागवड उत्तर प्रदेशांतील जमिनींत होते. हा कापूस हलक्या प्रतीचा व लोंकरी-सारखा असून त्याचें पीक भरपूर येतें. जरी ही वनी जातीची हलकी प्रत आहे. वनि जात चिनी जातीपैकींच एक असल्यामुळें त्या जातीच्या कापसाचा धागा रेशमासारखा असतो. या जातीच्या झाडांच्या पानांचा आकार व फुलांचा रंग नादप्रमाणें असतो. परंतु तीं मोठीं व केसाळ असतात.

या जातीच्या कापसाचा धागा अनेक प्रकारचा असतो. याला विहारमध्यें जेथि अथवा देशी, बंगालमध्यें मोगल, वऱ्हाडांत तिडकी व जडी म्हणतात. हैद्राबाद संस्थानांत भैसि येथें होणारी जात सर्वांत उत्तम असते. वऱ्हाड, मध्यप्रांत, विहार व बंगालचा कांहीं भाग या ठिकाणीं ही जात थोडथोडी आढळते.

रोझी कापूसः—या जातीचीं झाडें झुडुपांसारखीं असून बहुवर्षजीवि असतात. त्यांनां पिवळीं फुलें येतात. ही जात विशेषतः बडोदा व खेडा या ठिकाणीं आढळते. या जातीचीं झाडें ६ पासून ८ फूट उंच असून त्यांनां अतिशय फांद्या असतात. रोझी जातीच्या झाडांनां कुंपणांत वाढूं दिलें असतां तीं वेलासारखीं पसरतात व त्यांचा कापूस आंखूड धाग्याचा व तांबूस होतो. शेतांत जर हीं झाडें ३।४ वर्षांपेक्षां जास्त दिवस राहूं दिलीं तर त्यांचा कापूस हलक्या प्रतीचा होतो.

हिंदी रान-कापूसः—या जातीचीं झाडें झुडुपांसारखीं असून त्यांचीं पानें लहान असतात. बोंडें लंबाकृति असून सरकीच्या भोंवतीं राखेच्या रंगाचे धागे असतात. हीं झाडें मूळचीं सिलोनमधील असून त्यांची लागवड करीत नाहींत. ही जात वर्षजीवि असून यांतील सरकी फार लहान असते.

कापसाच्या कांहीं मुख्य जाती खालीं दिलेल्या आहेत.

(अ) शुद्ध प्रकारः—(१)कहनामी-भडोच, सुरत, नवसारि, वडोदा वगैरे ठिकाणचा " देशी " कापूस.

(२) बडोदा व भडोच येथील हलक्या प्रतीचा गोघरि नांवाचा कापूस.

(३) लालिओः—अहमदाबाद व काठेवाड येथील धोलेरा नांवाचा देशी कापूस.

(४) दक्षिणमहाराष्ट्रांतील कुमठा नांवाचा कापूस.

(५) उप्पम नांवाचा दक्षिण हिंदुस्थानांतील लांब धाग्याचा कापूस. हा विशेषतः तिनेवेल्लि व कोइमतुर येथें होतो.

(आ) संकीर्ण प्रकारः—(१) कनविः-या जातीच्या कापसाला बहुधा खानपुरी म्हणतात. गॉ. अॅबोरिअम निगलेक्टा या जातीशीं झालेल्या संकरापासून हा प्रकार झाला असावा. (२) वागरिआकापूस उत्तरगुजराथ, काठेवाड, कच्छ येथें होणारा असून बहुधा गॉ. नागकिंग जातीशीं झालेल्या संकरापासून हा प्रकार झाला असावा. (३) तेलपढि,

दक्षिणहिंदुस्थानांतील काळ्या वियाच्या कापसाचें हें नांव असून उप्पम व बुर्बोन कापसाच्या संकरापासून हा झाला असावा.

बहुतेक वन्य कापसाच्या वियांनां सूक्ष्मतंतूंचें आवरण असतें.

पेरुवियन व इजिप्शियन कापूसः—या जातीचीं झाडें मूळचीं मध्य व दक्षिण अमेरिकेंतील असून याला पेरुव्हियन कापूस म्हणतात. ह्या जातीचीं झाडें कापूस होणाऱ्या सर्व प्रदेशांत आढळतात. हीं झाडें विशेषेंकरून पश्चिम आफ्रिकेंत आढळतात व तेथें त्यांनां ओबु, उकोको वगैरे नांवें आहेत. आफ्रिका व अमेरिका येथें लागवडींत असलेल्या कापसाच्या जातींत सूक्ष्मतंत्वावरण असलेली सरकी असते; व झाडांचीं पानें थोडीबहुत केशाच्छादित असतात. केशाच्छादनरहित पानांच्या जातीच्या कापसाची सरकी सूक्ष्मतंत्वावरणरहित असते.

सू क्ष्म तं त्वा व र ण र हि त स र की च्या का प सा च्या जा ती- बोर्बोनः—(गॉ.पापेरॅसन्स)या झाडांची लागवड होत असून तीं बहुवर्षजीवि असतात. या जातीचे वरेच प्रकार असून त्यांपासून निघणाऱ्या कापसाला बाजारांत बुर्बोन व पोर्टोरिको कापूस म्हणतात.

या जातीच्या कापसांतील सरकी सूक्ष्मतंत्वावरणरहित असते व झाडाचीं पानें गुळगुळीत असतात. हीं झाडें बेटांतच चांगलीं होतात; म्हणून यांच्या लागवडीच्या बाबतींत उत्तर हिंदुस्थानापेक्षां दक्षिणहिंदुस्थानांतच जास्त यश आलें आहे.

गॉ. बार्बाडेन्स—याला बाजारांत "सीआयलंड" कापूस म्हणतात. या जातींत सर्व लांब धाग्याचे व उच्च प्रतीचे कापसाचे प्रकार येतात. या जातीचीं झाडें झुडुपांसारखीं असून बहुवर्षजीवि असतात. हीं फक्त लागवडीच्या अवस्थेंतच आढळतात व त्यांची लागवड वार्षिक असते. हीं झाडें देंठ व कोंवळ्या पानांच्या शिरांखेरीज गुळगुळीत असतात.

प्राचीन लेखकांनां गॉ वेस्ट्या, गॉ व्हेटी, फोलियम् हीं नांवें एकाच जातीच्या झाडांचीं आहेत हें माहित नव्हतें. लागवड व मिश्रण या योगानें सी आयलंड नांवाचा एक प्रकार उत्पन्न झाला, त्यालाच अलीकडल्या लेखकांनीं गॉ. बार्बाडेन्स हें नांव दिलें.

जरी अनेक वेळां या जातीची लागवड हिंदुस्थानांत करण्यांत आली तरी कोणत्याहि प्रदेशांत ती यशस्वी झाली नाहीं. अंदमान व निकोबार बेटांत व तेनासरिमच्या कांहीं भागांत कदाचित् या जातीची लागवड फायदेशीर होण्याचा संभव आहे.

का प सां ती ल भे स ळ व ति चा प रि णा म.—शुद्ध कापूस परदेशीं पाठविण्यासंबंधीं कितीहि काळजी घेतली तरी थोडीच आहे असें मिल्वर्न यानें लिहिलें असून हिंदुस्थानांतील कापसांतील भेसळ व त्याचा गुणऱ्हास या गोष्टीकडे एक शतकापासून लक्ष लागलें आहे. हिंदुस्थानच्या कापसाला कमी किंमत येण्याचीं सेंट जार्ज टकर यानें दहा कारणें दिलीं आहेत. निरनिराळ्या जातीची निरनिराळी लागवड करून त्यांचे निरनिराळे वेंचे करण्याला एतद्देशीय शेतकऱ्यांनां उत्तेजन मिळत नाहीं, हें त्याचें कारण नसून भेसळ नसलेल्या कापसाला जास्त किंमत मिळते हें होय असें रायल यानें लिहिलें आहे.याचप्रमाणें हिंदुस्थानचा कापूस लहान धाग्याचा असल्यामुळें त्याला इंग्लंडच्या बाजारांत तेजीची मागणी नाहीं; परंतु बाजारांत तो भेसळस्थितींत मिळतो, हेंहि त्याची कमी किंमत होण्याचें एक कारण आहे.हलक्या प्रतीचा कापूस उच्च दर्जाच्या कापसांत मिसळण्याच्या विरुद्ध वरीच ओरड सुरू झाली तेव्हां 'कॉटन फ्रॉड' कायदा पास झाला. ( १८६३ ) व इ. स. १८७८ च्या कायद्यानें त्यांत दुरुस्ती केली.

विशार्ट यानें कापसाची भेसळ यावर एक लेख लिहिला आहे ( १८९१ ). त्यांत तो म्हणतो कीं, आपल्या हलक्या प्रतीच्या कापसाला खरें गिऱ्हाईक राहिलें नाहीं. कारण एतद्देशीय कोष्टी त्याचा उपयोग करूं शकत नाहींत व चिनी लोकांनांहि तो फायदेशीर पडत नाहीं.

इ. स. १८९१ मध्यें सिंधच्या कमिशनरनें कापसासंबंधीं एक पत्रक काढलें; त्याला मुंबईच्या कॉमर्स सभेनें जें उत्तर दिलें त्यांत तिनें असें मत दिलें कीं कापसाची सुधारणा करणें अवश्य आहे; परंतु त्याकरितां प्रतिबंधक कायद्यांची जरूर नाहीं. हेंच मत सरकारचेंहि होतें. हिंदुस्थानच्या कापसाची निकृष्टावस्था सरकार व गिरण्यांच्या मालकांच्या संस्था यांच्या नजरेस ना.पेटिट यांनीं इ. स. १९०१ मध्यें आणली. चीन व जपान हे दोन देश आपल्या देशांतच हलक्या प्रतीचें कापड तयार करूं लागल्यामुळें हिंदुस्थानचीं दोन मुख्य गिऱ्हाईकें तुटल्यासारखें झालें. अर्थातच हिंदुस्थानांतील गिरण्यांच्या मालकांनां आपल्या मालांत सुधारणा करणें भाग झालें. २० नंबरच्या सुताऐवजीं त्यांनां आतां ८० नंबरचें सूत काढण्याचा विचार करणें भाग पडलें. परंतु त्याकरितां लागणारा कापूस त्यांनां इजिप्त व अमेरिकेंतूनहि आणणें भाग आहे. अशा रीतीनें भेसळीमुळें कापड तयार करण्याच्या धंद्याला वराच अडथळा झाला आहे. म्हणून भेसळ करण्याविरुद्ध कायदा असावा, अशी ओरड पुन्हां सुरू झाली असून ज्या प्रदेशांत कापूस झाला, त्या प्रांताचा गाठीवर छाप असला म्हणजे वराच प्रतिबंध होईल असेंहि सुचविण्यांत आलें आहे.

क पा शी च्या ला ग व डी स ज मी न.—उत्तम, खोल, काळ्या व चिकण जमिनींत कापूस चांगला होतो. तथापि त्याची लागवड मध्यम, काळ्या व मिसळीच्या जमिनींतहि करितात. उत्तम जातीच्या कापसाची लागवड सिंध, गुजराथ, कर्नाटक, मद्रास व निझामच्या राज्यांत होते. हलक्या काप-

साची लागवड खानदेश, नगर, सोलापूर, वऱ्हाड व मध्य-प्रांतांत--जेथें जेथें तीस ते चाळीस इंच पाऊस पडतो--तेथें होते. उत्तर गुजराथेंत सोय असेल तेथें कापसाला पाणी देतात. इतर प्रांतांत बहुतकरून आंखूड धाग्याचा कापूस होतो. उत्तम कपाशी पिकण्याचे जे जे प्रदेश आहेत तेथें सरपणाची अतिशय महागाई आहे व त्यामुळें सरपणाच्या कामीं शेणाच्या गोंवऱ्यांचा उपयोग करणें भाग पडतें. तथापि जें कांहीं खत असेल तें ज्या वर्षी कपाशी पेरितात, त्या वर्षी देण्याची चाल असते. धारवाडाकडे मात्र जमीन खत--विण्यांत फरक आढळतो तो असा कीं, कापसाशीं ज्वारीचा फेरपालट असल्यामुळें ज्या वर्षी ज्वारी करतात त्या वर्षी तिकडे खत देतात. भडोच व जळगांव येथें सरकारी प्रयोगशाळेंत ताज्या मैल्याचे खतासाठीं प्रयोग कापसावर करण्यांत आले. हें खत फार फायदेशीर आहे, असें खालीं दिलेल्या आंकड्यांवरून स्पष्टपणें दिसून येईल. खताचें प्रमाण दर एकरी पौंडांत दिलें आहे

| नांव | मैला ए. गाड्या | किंमत दर ए. | विनखती भाग | खताचा भाग. |
|---|---|---|---|---|
| भडोच | ७० | ४९ | २६४ | ११९८ |
| जळगांव | ३४॥ | ३६ | २१३ | ९८८ |

कापसाच्या लागवडींत सुधारणा करावयाची असल्यास ती प्रांतवारीनें निरनिराळी करावी लागेल. सुधारणा करावयाच्या मुख्य तऱ्हा तीन आहेत. ( १ ) व्यापारी व परिस्थितीच्या दृष्टीनें बियांची निवड, ( २ ) संकर्ण जातीचा शोध, ( ३ ) परदेशांतील मौल्यवान जाती एतद्देशीय हवेशीं सात्म्य करणें. या तिन्ही उपायांचा अवलंब हल्लीं हिंदुस्थानांत होत असून बहुतेक भागांत अस्तित्वांत असलेल्या जातींतून केलेली निवडच आशाजनक वाटते. अगदीं नवीन जात शोधून काढण्यास संकराचा उपायच जास्त श्रेयस्कर वाटतो.

**बि यां ची नि व ड.**—हिंदुस्थानांतील शेतकरी बियांची फारशी काळजी घेत नाहींत. ते बहुतकरून सरकी जिनांतून आणतात. गिरण्या आल्यापासून हातचरक बंद झाले.

सर्वांत मोठ्या व ज्याला सर्वांत जास्त बोंडें आलीं असतील अशा झाडांच्या कापसांतून काढलेली सरकी पुढील सालच्या पेरणीकरितां राखून ठेवावी. बोंडावरील किडे ज्या झाडांवर आहेत त्यांच्या कापसांतील सरकी बियांकरितां उपयोगांत आणू नये. बोंडांनां किडे लागूं नयेत म्हणून पेरणी करण्यापूर्वी बियांची सरकी मोरचुदाच्या पाण्यांत ( १०० भाग पाण्यांत ½ भाग मोरचूद ) भिजवून उन्हांत वाळवावी. हवेंतील अकालीन बदलामुळें कापसाच्या पिकावर वाईट परिणाम होण्याचा बराच संभव असतो.

**प र दे शां ती ल का प सा च्या जा ती.**—कर्नाटकमध्यें एक अमेरिकेंतील कापसाची जात तेथील हवेशीं साम्य झाली आहे. याखेरीज कोठेंहि परदेशच्या कापसाच्या जातीला म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. ( घाटापलीकडच्या प्रदेशांत पावसाळ्याखेरीजच्या आठ महिन्यांत इजिप्शियन कापसाचें पीक काढण्याचा प. वा. टाटांनीं प्रयत्न केला होता. इ. स. १९०० मध्यें पुण्याला २ इजिप्शियन जातींचा प्रयोग करून पहाण्यांत आला. पहिल्यापासूनच हीं झाडें रोगट दिसत व पुष्कळ बोंडें उमलण्यापूर्वीच गळून पडलीं. दोन्ही जाती मिळून दरएकरीं सरासरी ४०१ पौंड ( रू व सरकी ) उत्पन्न झालें.

अमेरिकेंतील शेतकरी बियाणाची निवड कशी करितात, ह्यासंबंधानें मे. रॉबर्टसन —लायलपूर कॉलेजचे प्रिन्सिपाल—हे आपल्या अमेरिकेंतील प्रवासवर्णनांत लिहितात कीं, अमेरिकेंत सर्व शेतकरी सरकीच्या निवडीसंबंधीं जास्त काळजी घेतात. बहुतेक शेतकऱ्यांचे बियांची निवड करण्यासाठीं तीन वेगवेगळाले भाग असतात.

पहिल्या सालीं सर्व शेतांत फिरून एक उत्तम झाड निवडून त्याची सर्व सरकी पुढील सालीं एका भागांत पेरितात. कापूस तयार झाल्यावर पुन्हां या भागांत एक उत्तम झाड निवडून दुसऱ्या सालीं त्याचें बीं वेगळ्या भागांत पेराचें व बाकी निवडलेल्या झाडांची सरकी मोठ्या प्रमाणावर शेतांत पेरावयाची. तिसऱ्या सालीं पुन्हां एक उत्तम झाड निवडावयाचें व पुन्हां त्याची वेगळी सरकी पेरावयाची. असा क्रम वर्षानुवर्ष चालू ठेवितात. या योगानें दर वर्षी चांगल्या बियांची उपज होऊन जास्त प्रमाणावर पेरण्यासाठीं उत्तम बीं मिळतें.

याप्रमाणें दर एक मोठ्या इस्टेटींवर एक भाग, निवडक एका झाडाच्या बियांचा, दुसरा भाग, थोड्या प्रमाणावर सरसकट निवडक बियांचा व तिसरा भाग जास्त प्रमाणावर सरसकट निवडक बियांचा असतो.

**गु ज रा थें ती ल ला ग व ड.**—भडोच व सुरत येथें सुमारें तीस चाळीस इंचांवर पाऊस पडतो. कपाशीच्या जमिनीस उन्हाळ्यांत पाळ्या घालितात व पूर्वीच्या पिकाचें गवाळ काढून टाकितात. खत असल्यास मे महिन्यांत देऊन नंतर पाऊस सुरू झाल्यावरोबर एकदोन वेळ वखरून दोन फणी पाभरीनें बीं पेरितात. दोन ओळींमधील अंतर सुमारें २२ ते २६ इंच असतें. सरकी पेरण्यापूर्वी बीजास, शेण व माती पाण्यांत एकत्र कालवून त्याचें पूट देतात. याचा हेतु, सरकीस जे कापसाचे तंतु चिकटून राहिलेले असतात ते त्या सरकीच्या अंगाला वळकट चिकटून जाऊन तें बीं चाड्यांतून विनहरकत पडावें असा असतो. बहुतेक शेतांत वर्षाआड कापूस पेरितात. कांहीं ठिकाणीं जमीन पड ठेवितात. कांहीं ठिकाणीं पहिल्या वर्षी ज्वारी व दुसऱ्या वर्षी कापूस पेरितात. कांहीं ठिकाणीं हंगामांत गहूं, शाळू, अगर तूर व तीळ पेरतात. कित्येक ठिकाणीं कापसाच्या बियांबरोबर तूर, तीळ व अंबाडी व भडोच जिल्ह्यांत व कहानम भागांत जेथें जास्त पाऊस पडतो तेथें कापसाच्या ओळींत अगर मधील जागेंत भाताचीं तासें घालितात. खेडा जिल्ह्यांत गोराडू वगैरे जमीनींत 'रोझी'

नांवाच्या कापसाच्या ओळी दूरदूर घालून, मधील जागेंत बाजरी अगर इतर कडधान्यें पेरितात. दरएकरीं बियांचें प्रमाण दहा ते पंधरा पौंडपर्यंत असतें. पीक सुमारें चार सहा इंचांवर आल्यावर पहिली कोळपणी व निंदणी देतात. दाट झाडें पातळ करून ओळींत अठरा इंचांपासून ते दोन फुटांपर्यंतच्या अंतरानें झाडें ठेवितात. पुढें एक दोन कोळपण्या देऊन सप्टेंबर-आक्टोबर महिन्यांचे शेवटीं ओळीमध्यें एक नांगराचें तास घालितात. आक्टोबर-नोव्हेंबर-मध्यें फुलें येण्यास सुरवात होऊन तीं जानेवारीपर्यंत येत असतात. वेंचणी जानेवारीअखेर सुरू होऊन मार्च-एप्रिल-पावेतों चालते.वेंचणीस सकाळची वेळ चांगली समजली जाते.

कर्नाटक, धारवाड वगैरे जिल्ह्यांत पहिले व नंतरचेहि वळीव पाऊस पडतात. अशा स्थितीमुळें जूनमध्यें वी पेर-ल्यास ऐन वेंचणीच्या वेळीं पावसानें कापूस न नासावा म्हणून पेरणीचा हंगाम ऑगष्ट महिन्यांत सुरू होतो. पेरणी फणाच्या मागें चाडीं बांधून खानदेशाप्रमाणें करितात. रोपें भडोच व सुरतेप्रमाणें पातळ करीत नाहींत. कोळपणी, निंदणी, टिपणी, वेंचणी वगैरे गुजराथप्रमाणेंच करितात.

कर्नाटक सोडून जों जों पुढें दक्षिणेकडे मद्रास इलाख्यांत जावें, तों तों कापूस पेरण्याचा हंगाम पुढें सरसावत जातो. कर्नूल व कडाप्पा जिल्ह्यांत कापसाची पेरणी ऑगष्ट-सप्टेंबरांत होते व तिनेवेल्लीस कापसाची (करांगणी व उप्पम मिसळ जात.) लागण आक्टोबर-नोव्हेंबरांत होते.

खानदेश, वऱ्हाड, मध्यप्रांत व निझामचें राज्य यांतील कापसाच्या लागवडींत फारसा फरक नाहीं. कारण जमीन, हवापाणी, उष्णता, पाऊसकाळ वगैरेंत वरील प्रांतांत वरीच साम्यता आहे.

खानदेशांत कापसाचा पेरा अव्वल काळ्या, हलक्या व मध्यम काळ्या जमिनींतहि करतात. हलक्या व मध्यम काळ्या जमिनींत एक वर्ष कापूस व दुसऱ्या वर्षी ज्वारी, बाजरी अगर तीळ करून तिसऱ्या वर्षी पुन्हां कापूस पेरितात. अव्वल काळ्या जमिनींत कापसाचा फेरपालट ज्वारी, गहूं, हरभरा, जंवस वगैरे रब्बी पिकांशीं करतात. वऱ्हाडांत वनी व जरी अशा दोन कपाशीच्या जाती असून पैनघाटाच्या दक्षिणभागांत बहुतकरून वनीची पूर्वी जास्त लागवड होत असे. पण आतां ती कमी झाली आहे. वनीला सप्टेंबरमध्यें फुलें येऊन त्यांचा कापूस नोव्हेंबरमध्यें वेंचण्यास येतो. वनीचा कापूस उत्तम असतो. परंतु उत्पन्न कमी येऊन रुवाचें प्रमाण फार कमी असतें. यालाच हिंगणघाट कापूस म्हणतात.

कापूस करण्याकरितां जमीन बहुतकरून दरसाल नांगरीत नाहींत. त्याऐवजीं चार पांच कुळवाच्या पाळ्या करून काम भागवितात. हें काम उन्हाळ्यांत सुरू होतें. खत असल्यास दर एकरीं शेणखताच्या दहा गाड्यांपर्यंत देतात. पेरा जून महिन्यांत ओलावा पुरेसा झाला म्हणजे होईल तितका लवकर करतात. पेरा करतांना दुस्याच्या मागें दोऱ्या अडकवून त्याला मोगण्या बांधितात; व तयार केलेलें वीं वायकांकडून पेरतात. ओळींमधील अंतर सुमारें दीड फूट असतें. बियांत तुरीचा, अंबाडीचा, तिळाचा, ज्वारीचा वगैरे उतवडा असतो. कांहीं ठिकाणीं तुरीचीं तासें घालतात. दर एकरीं सुमारें बारा ते वीस पौंड वीं पेरितात. कित्येक ठिकाणीं मागसलेल्या भागांत (तळोदें, शहादें वगैरे भागांत) पूर्वी फारशी मशागत न करितां कुळवाला मोगणी बांधून दर खेपेस एकेक तास असा पेरा करितात. रोपें सहा ते आठ इंच झालीं म्हणजे कोळपणी (वऱ्हाडांत डवरा मारणें) सुरू होते अशा तीन चार कोळपण्या देतात. कोळप्याच्या योगानें तण मुळासकट उपटतें. जमीन भुसभुशीत होऊन रोपांनां थोडथोडी मातीची भर पडते.सवडीप्रमाणें व पैशाच्या वळाप्रमाणें कपाशीला दोन किंवा तीन निंदण्या देतात. निंदणीच्या वेळीं बायका ओळींतील तणें व दाट असल्यास कपाशीचीं रोपें उपटून काढितात. कापूस निंदणें व तो वेंचणें हीं कामें बऱ्याच खर्चाचीं आहेत. कापूस वेंचण्याचें काम बहुतकरून अक्टोबर (पश्चिम खानदेश) व नोव्हेंबर (पूर्वखानदेश व वऱ्हाड) या महिन्यांत सुरू होतें. उत्तम पिकाचे तीन ते चार वेंचे होतात. यांपैकीं पहिल्या व दुसऱ्या वेंचणीच्या कापसाची सरकी पुढील सालाकरितां राखून ठेवितात. जे मजूर कापूस वेंचतात त्यांस पूर्वी मजुरीबद्दल पैसे न देतां कापूसच देत असत. हा दर बाजारांतील रुईच्या भावावर अवलंबून असे. साधारण मान असें असे कीं, पहिल्या वेंचणीच्या वेळीं एका दिवसांत वेंचलेल्या काप-साच्या एक दशांश हिस्सा, दुसऱ्या वेंचणीचा एक षष्ठांश व तिसऱ्या वेंचणीचा एक तृतीयांश हिस्सा देत असत. परंतु हल्लीं कापसाचा भाव वाढल्यानें रोकड पैसे देण्याचा प्रचार सुरू झाला आहे. याप्रमाणें दिलेल्या रुईची किंमत दर एकरीं दहापासून पंधरा रुपयांपर्यंत होते. पंजाबांत अद्यापि वांट्याची चाल प्रचलित आहे वांट्यानें दिलेल्या कापसाची किंमत तेथें सन १९१७-१८ सालीं दर एकरी सुमारें आठ रुपये होती.

हिंदुस्थानांत निरनिराळ्या भागांत कापसाच्या निरनि-राळ्या जाती असून त्यांनां देशपरत्वें वेगवेगळालीं नांवें पडलेलीं आहेत. हीं नांवें व व्यापारांत प्रचलित असलेलीं कापसाचीं नांवें वरींच भिन्न आहेत.

| जात | धाग्याची लां. इं. | धाग्याचें वर्णन |
|---|---|---|
| गुजराथ– | | |
| माथिओ | ४/८–५/८ | खरखरीत व पांढरा |
| भडोच | ५/८–६/८ | नरम पांढरा. |
| नवसारी | ७/८–१ | ... ... |
| घोगारी | ४/८–५/८ | " " |
| लालिओ | ५/८–६/८ | " " |
| वाघड | ६/८–७/८ | थोडा अंधुक |
| रोझि | ५/८ | खरखरीत अंधुक |

खा न दे श—

| | | | |
|---|---|---|---|
| खानदेशरोझी | | ३/८–५/८ | खरखरीत पांढरा |
| एन्. आर. | व्ऱ्हाडी | ३/८–१ | ,, ,, |
| एन्. आर. सी. | व्ऱ्हाडी | | |
| एन्. व्ही. | जडी | | व्ऱ्हाडीपेक्षां बरा |
| एन. व्ही. एस्. | जडी | ५/८ | ,, ,, |
| एन्. व्ही. के. | जडी | | ,, ,, |
| वनी | | १–११/८ | लांब धाग्याचा अंधुक पांढरा. |

क र्ना ट क—

| | | |
|---|---|---|
| कुमठा | ७/८ | नरम थोडा अंधुक |
| धारवाड अमेरिकन | ७/८३–५/८ | ,, ,, |
| कांबोडिया | ५/८–७/८ | नरम सफेत. |

क पा शी व री ल रो ग व त्यां व र उ पा य.—कापसाला बरेच रोग होतात त्यांपैकीं पानें खाणारे व बोंडांतील बीं खाऊन कापूस विघडविणारे किडे हे मुख्य होत. शिवाय कधीं कधीं झाडांच्या मुळया कुजूनहि थोडें नुकसान होतें. तथापि रोगानें अजिबात पीक जातें असें कधींहि होत नाहीं.

कापसाचें पीक हलक्या प्रतीचें कां येतें याच्या कारणांबद्दल फार थोडी माहिती उपलब्ध आहे. चहा व कॉफी यांच्या पिकाच्या मानानें पाहातां कापसाच्या पिकाचें प्रतिकूल हंगामापेक्षां, रोगांमुळेंच जास्त नुकसान होतें, असें म्हणतां येणार नाहीं.

मॅक्सवेल लेफ्रॉय यानें १४ प्रकारच्या रोगांची माहिती दिली असून त्यांचे चार वर्ग केले आहेत. ( १ ) मुख्यतः सप्टेंबरपर्यंत दिसणारे पानांवरील किडे, ( २ ) बुंध्यांतील किडे, ( ३ )बोंडांतील किडे, ( ४ ) संकीर्ण वर्ग. त्यांनी लिहिलें आहे कीं, आगष्ट व सप्टेंबर महिन्यांत किड्यांवर लक्ष ठेवून ज्या फांद्यांवर व बोंडांवर किडे दिसतील त्या फांद्या व तीं बोंडें काढून टाकावीत.

ज्याला एतद्देशीय लोक गोसावी अथवा तुलसी म्हणतात, तो हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणांत आढळतो. या रोगामुळें प्रथमतः मोठीं व जोमदार असलेलीं पानें पुढें गुंडाळलीं जातात व त्यांच्यावर कुसीचें आवरण चढतें. या झाडांनां फुलें व फळें येत नाहींत. गुजराथमध्यें हा रोग बराच असून शेंकडा ५ ते १० झाडें या रोगामुळें निरुपयोगी होतात. या रोगावर गंधक अथवा केरोसीन एमल्शन यांचा उपयोग करावा.

टोंका किड्यांचा नाश करण्याच्या कामीं ग्वाटिमालामधील केकची नांवाची कापसाची जात लावल्यापासून बराच फायदा होतो, असें ओ. एफ. कूक यानें लिहिलें आहे.

का प सा चे बा जा रः—गुजराथेंत, नवसरी, सुरत, भडोच, डभोई, अहमदाबाद, विरमगांव; खानदेशांत—अमळनेर व धुळें; कर्नाटकांत—हुबळी, गदग, धारवाड व विजापूर; वऱ्हाडांत—उमरावती, खामगांव, आकोट, शेगांव, अकोला, मूर्तिजापूर वगैरे होत; निजामच्या राज्यांत — करकेली, परभणी, नांदेड व बार्शी.

सर्व कापसाच्या क्षेत्रांत जागोजागीं सरकी काढण्याचीं इंजिनें ( गिरण्या ) व यंत्रांनें दाबून रुवाचे गठ्ठे बांधण्याचे कारखाने झाले आहेत. पुष्कळ शेतकरी आपला माल जागेवरच लहान व्यापाऱ्यांस विकतात. कित्येक शेतकरी लोक आपला माल मोठमोठ्या बाजाराच्या ठिकाणीं आणितात व बाकीचा माल त्या गांवच्या सावकार लोकांमार्फत येतो. मोठमोठ्या शहरीं हिंदी व युरोपियन असे दोन्ही जातींचे व्यापारी असतात; ते रुई खरेदी करून रेल्वेनें परठिकाणीं पाठवितात. लांब पल्यावरच्या ठिकाणीं त्यांचे मुखत्यार असतात; ते आसपासच्या शेतकऱ्यांकडून कापूस खरेदी करून आपापल्या कारखान्यांत पाठवितात.

उ प यो ग.—कापसाच्या पळाट्यांचा उपयोग सरपणाकडे पांट्या, कणगी, गाड्याच्या बाजू विणण्याकडे फार करितात. हल्लीं पळाट्यांपासून कागद तयार होतो अगर होण्याचा संभव आहे असें नागपूर शेतकी कॉलेजांतील रसायन शास्त्रवेत्ते यांनीं प्रसिद्ध केलें आहे. सरकी गुरांस खावयास घालतात. ती फार पौष्टिक असून दुभत्या गुरांस दिल्यास दुधांत लोण्याचें प्रमाण वाढतें. हल्लीं नवसरी येथें व वऱ्हाडांत अकोला येथें सरकीचें तेल व पेंड करितात. या तेलाचा तळण्याकडे व साबण करण्याकडेहि चांगला उपयोग होतो. विलायतेकडे सरकीच्या तेलापासून मारगाईरन तयार करितात. याची पेंड गुरांस चांगली मानवते. सरकीच्या वरचीं टरफलें कडब्यांऐवजीं गुरांस चांगलीं उपयोगीं पडतात. सरकी सन १८९८–९९ सालापासून परदेशीं जाऊं लागली असून वर्षानुवर्ष ती जास्त प्रमाणांत जात आहे.

सन १८९८ ते १९०७ सालापर्यंत हिंदुस्थानांतून सरकीची निर्गत खालीं दिल्याप्रमाणें झालेली आहे. खालील आंकडे (हंड्रेडवेट्सचे) ११२ पौंडांचा एक हंड्रेडवेट, या प्रमाणांत आहेत.

| सन. | हंड्रेडवेट. |
|---|---|
| १८९८।९९ | ३७,००० |
| १९०२।०३ | ३९७४,००० |
| १९०६।०७ | ४३७८,५३४ |

हल्लीं दरसाल हिंदुस्थानांत सरासरीनें अठरा लक्ष टन सरकी उत्पन्न होते. यापैकीं दोन लक्ष टन बीं कापसाच्या लागवडीकडे खर्च होऊन १५१५९५ टन सरकीची दरसाल निर्गत होते. सगळ्यांत जास्त निर्यात २८४३२७ टन सन (१९१३।१४ सालीं) झाली आहे.

इंडियन कॉटन कमिटीच्या रिपोर्टांत पानें ७ ते ११ यांत दिलेल्या परिशिष्टांतील माहिती.

| व्यापारी वर्गीकरण | जातीचें नांव | तंतूची लांबी इंच | रुवाचें शें.प्रमाण | कापूस पैदास होण्याचें ठिकाण | क्षेत्र ( एकर ) हजार |
|---|---|---|---|---|---|
| उमराज | १ वनी (हिंगणघाट, वार्शी अगर गांवरानी ) | १—१ १/८ | २५ | हिंगणघाट, चांदा ( मध्यप्रांत ) निजामचे राज्यांतील उत्तर भाग | ८४० |
| | २ बुरी | ७/८—१ | ३१ | हैदराबादचा वायव्येकडील भाग, छोटानागपूर, संयुक्त व मध्यप्रांत | २ |
| | ३ माळवा | ६/८ | २५ | माळवा ( मध्यहिंदुस्थान ) | ११२ |
| | ४ मध्यहिंदुस्थान | ५/८—६/८ | ३३ | मध्यहिंदुस्थानांतील संस्थानें | १४०० |
| | ५ वऱ्हाड व मध्यप्रांत | ५/८—६/८ | ३५ | वऱ्हाड आणि मध्यप्रांताचा पश्चिम भाग | ३७०० |
| | ६ रोझियम | ३/४—५/८ | ४० | वऱ्हाड आणि शेजारील भाग | ७०० |
| | ७ खानदेश | ३/४—५/८ | ३२ | पूर्व व पश्चिमखानदेश, अहमदनगर, सोलापूर, नाशिक, उत्तर भाग विजापूर आणि निजामहैद्राबादेच्या शेजारील भाग | ३६२० |
| | ८ खानदेश रोझियम | ३/४—५/८ | ३८ | „ „ „ „ | ३० |
| धोलेरा | ९ वागड | ६/८—७/८ | ३३ | उत्तर गुजराथ (विरमगांव) आणि काठेवाड | २१०० |
| | १० लालियो | ५/८—६/८ | ३३ | उ. गुजराथेंतील हलक्या जमिनीवर होणारा | |
| | ११ घोगारी | ५/८—५/८ | ४० | भडोचच्या उत्तर भागांतील निर्भेळ | |
| | १२ रोझी व जरिआ | ३/४—५/८ | ३५ | खेडा व वडोदे संस्थान यांचा उत्तरभाग | |
| | १३ माठिओ | खानदेशांतील मिसळीप्रमाणें | ३२ | कच्छ, काठेवाड व अहमदाबाद | |
| बंगाल | १४ संयुक्त प्रांत | ३/४—६/८ (मिसळ पीक) | ३३–४० | संयुक्त प्रांत | ११२० |
| | | | | | १२० |
| | १५ पांढऱ्या फुलाचा अलिगड | ३/४ | ३९ | अलिगड शेजारील भाग | |
| | १६ राजपुताना | नंबर १४ प्र. | ३३ | राजपुताना | ३७२ |
| | १७ साऊथ ईस्ट पंजाब | „ „ | ३३ | साऊथ ईस्ट पंजाब, म्हणजे हिसारपासून अंबालापर्यंत येणाऱ्या लाईनींतील भाग | ३०९ |
| सिंध, पंजाब | १८ सिंध | ७/८—५/८ | ३५ | सिंध | २४५ |
| | १९ पंजाब | ३/४ | ३३ | पंजाब-अंबाला ते हिसारच्या वायव्यदिशेस | १४०० |
| इतर | २० वायव्य सरहद्दीवरीलप्रांत | ५/८—६/८ | ३२ | पेशावरचें खोरें | ८ |
| | २१ बहार-ओरिसा | ७/८—३/४ | ३४ | मुख्यतः सारण, शांतळ परगणा व रांची जि. | ७४ |
| भडोच | २२ नवसारी | ७/८—१ | ३१ | बिलमोरा. व नवसारी | १२१० |
| | २३ सुरत | ७/८— | ३२ | सुरत व भडोचचा दक्षिण भाग | |
| | २४ भडोच | ५/८— ६/८ | ३२ | भडोचचा उ. भाग (हांसोट ते आमोद पावे.) | |
| | २५ भडोच घोगारी व कानवी | ३/८—६/८ | ३५ | आमोदचा भाग व जंबुसरच्या सर्व तालुक्यांत घोगारी कापूस पेरतात. | |

( ३४९ पृष्ठावरील कोष्टक पुढें चालू )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कुमठा धारवाड | २६ कुमठा, धारवाड | ७/८ | २६ | सातारा जिल्ह्यांतील दक्षिण भाग ते म्हैसुरांतील उत्तर जिल्हे सुद्धां | १२०० |
| | २७ सॉ जिन धारवाड | ६/८—७/८ | ३० | धारवाडचा दाक्षि.भा., म्हैसुरांतील उत्तरजिल्हे. | २५० |
| वेस्टर्न व नॉर्दन्स | २८ वेस्टर्न्स | ६/८ | २५ | अनंतपूर बल्लारी ( मद्रास ) | ६५० |
| | | | | विजापूर (मुंबई) निझाम हैदराबाद नै.भाग | ५०० |
| | २९ नॉर्दन्स | ७/८ | २७ | कर्नूल व कडप्पाचा कांहीं भाग | ४३९ |
| कोकोनाडा | ३० कोकोनाडा | ५/८—७/८ | २३ | गंटूर, नेरोल, कृष्णा व गोदावरी जिल्ह्यांतील कांहीं भाग; हैदराबादच्या आग्नेयेकडील भाग. | २६१ |
| तिनेवेल्ली | ३१ कारंगणी | ७/८ | २७ | तिनेवेल्ली मदूरा व रामनद | २२० |
| | ३२ तिनेवेल्ली | ६/८—७/८ | ३२ | मदूरा व रामनद | ३२० |
| सालेम | ३३ उप्पम | ६/८ | २५ | कोइमतूर, त्रिचनापल्ली, व दक्षिण अर्काटचा कांहीं भाग | १५४ |
| | ३४ नदम | ६/८—७/८ | २३ | | २०० |
| | ३५ बोरवन | १ | २५ | | १० |
| कांबोडिआ | ३६ कांबोडिआ | ५/८—७/८ (कोरड वाहू) | ३३ | कोइमतूर, त्रिचनापल्ली, मदुरा ( तांबडी जमीन, मद्रास ) | १८८ |
| | | ६/८—१ १/८ ( पाणभरतें ) | | धारवाड जिल्ह्यांतील कांहीं भाग; छत्तीसगड (मध्यप्रां); हैदराबादेंतील कांहीं भाग | २८३ |
| | ३७ पंजाब अमेरिकन | ७/८—१ | ३२—३३ | पंजाब व कनाल कॉलनी-लियालपूर, मॉंटगॉमरी. जंग, शहापूर. गुजराणवाला, मुलतान | २७६ |
| | ३८ कानपूर अमेरिकन | ७/८ | ३१ | कानपूर | २ |
| | ३९ कोमिला | ३/८—५/८ | ४५ | पूर्वबंगाल व आसाम | ९८ |
| | ४० वागेल | ५/८—६/८ | ३० | ब्रह्मदेशांतील कोरडवाहू भाग | २४६ |
| | ४१ वागी | ६/८ | ३९—४० | प्रोम व थायेट मेया | |
| | ४२ शानहिल्स | १ | २५ | शान हिल्स | |
| | ४३ [illegible]तिया | [illegible] ६/८ | ... | बहार व ओरिसा | आंकडे माहित नाहींत |
| | ४४ बलुचिस्तान | ६/८ | २८ | बलुचिस्तान | |
| | एकूण | | | | २२४९९ |

लँकॅशायरला योग्य व मुंबईस होणारा माल

| | | | क्षेत्र ( ए॰र ). हजार | गठ्ठे. (हजार) |
|---|---|---|---|---|
| क्लास १ | लँकॅशायरला योग्य— | तिनेवेल्ली ( करांगणी ), बोरबोन, कांबोडिया ( पाणभरता ), पंजाब अमेरिकन, कानपूर अमेरिकन, बुरी, ब्रोच—नवसारी, ब्रोच-सुरत, वनी, नॉर्दर्न्स, कुमठा. | ३१७७ | ७२६ |
| क्लास २ | मुंबईस खपणारा | —कांबोडिया ( कोरडवाहू ), तिनेवेल्ली, वेस्टर्नस, सॉ जिन धारवाड, वागड, सालेम ( उप्पम व नदम ) माळवा, कोकोनाडा, वागी. | २५४० | ४७८ |
| एकूण | | | ५७१७ | १२०४ |

स र की का ढ णें, ग ठ्ठे बां ध णें व गै रे.—शिकंदर बादशहाबरोबर आलेल्या शास्त्रीय अधिकाऱ्यांनीं हिंदुस्थानांतील कापूस वटणें, सूत काढणें, विणणें वगैरे कलांबद्दल माहिती दिली आहे. प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत कापूस वटण्याकरितां २ तऱ्हेचीं यंत्रें उपयोगांत होतीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या यंत्रांपैकीं पायानें चालविल्या जाणाऱ्या रुळांचा अलीकडे फारसा उपयोग होत नाहीं. दुसऱ्या प्रकारच्या यंत्रांतच हल्लीं सुधारणा करून तीं चालविण्याकरितां वाष्पशक्तीचा उपयोग केला जातो. पूर्वी अशा प्रकारच्या यंत्रांनां चरक हें नांव असून त्यांत विरुद्ध दिशेनें फिरणारे दोन लांकडी अथवा लोखंडी रूळ व त्यांनां फिरविण्याकरितां त्यांनां जोडलेलें एक चाक असे व हें चाक हातानें फिरवीत असत. कापसाच्या बोंडांतून सरकी काढणें व सूत विणणें यांसंबंधीं १७३१ ते १७६४ चे दरम्यान इंग्लंडमध्यें फार महत्वाचे यांत्रिक शोध झाले; व त्याच सुमारास जेम्स वॅट यानें वाफेचें यंत्र शोधून काढलें. सरकीला घट्ट चिकटलेलें तंतावरण काढण्याकरितां मॅकॉर्थीयाच्या सॉ जिनाचा उपयोग होऊं लागला. लांब धाग्याचा कापूस वटविण्याकरितांहि या यंत्राचा चांगला उपयोग होतो. अर्वाचीन यंत्रांनीं एतद्देशीय चरकांपेक्षां कापूस व सरकी यांची जरी किंचित जास्त खरावी होते, तरी कापूस वटविण्याला जुन्या चरकानें जास्त वेळ लागतो व पुष्कळ कापूस वटविण्याकरितां त्याचा उपयोग होत नाहीं. या कारणामुळें कापूस पिकणाऱ्या प्रदेशांत वाष्पशक्तीनें चालणारे कापूस वटविण्याचे मोठमोठे कारखाने निघाले आहेत. या सुधारणेपासून फायद्यावरोबर थोडा तोटाहि झाला आहे. कारण जिनांतून सरकी काढतेवेळेस निरनिराळ्या प्रकारची रुई त्यांत मिसळली जाते व शेतकरीवर्गाला मिश्र बीं उपयोगांत आणावें लागतें. यामुळें हिंदुस्तानांतील कापूस हलक्या दर्जाचा झाला असा समज आहे. यासाठीं उत्तम व एकच जातीचें बीं वापरण्यांत यावें यावद्दल सध्या सरकारचे प्रयत्न सुरू आहेत.

इ. स. १९०४ सालीं हिंदुस्थानांत कापूस वटविण्याचे व त्याचे गठ्ठे बांधण्याचे ९५१ कारखाने असून त्यांत८५,५५९ लोक काम करीत होते.

कित्येक वर्षेपर्यंत बहुतकरून फक्त मुंबईसच गांठी बांधल्या जात असत. ने-आण करण्याकरितां लागणाऱ्या खर्चांत काटकसर करण्याच्या उद्देशानें गांठी बांधण्याचे निराळे कारखाने काढणें जरूर पडलें. अलीकडे बहुतेक ठिकाणीं कापूस वटविण्याच्या कारखान्यांतच गांठी बांधण्याचें काम होत असतें.

स र की.—तेल काढण्याकरतां व जनावरांनां खावयाला घालण्याकरितां सरकीचा उपयोग होतो. सन१८९८ सालापर्यंत हिंदुस्थानाबाहेर सरकी जात नसे. परंतु १८९९ पासून तेल काढण्याकरितां सरकीला परदेशची मागणी एकदम वाढली असून ही निर्यात विशेषतः संयुक्त राष्ट्रांतच जास्त होत आहे. १८९९-१९०० सालीं ४६,००० हं. सरकी वाहेरदेशीं गेली. त्याच्या पुढील सालीं म्हणजे १९००--०१ त २,२५००० हं. सरकी परदेशीं गेली. ह्या निर्गतीचा आंकडा सारखा वाढत असून १९१३-१४ सालीं ७२ लक्ष हंड्रेडवेट किंवा ३,६४००० टन झाला. सरकीचें टरफल काढण्याच्या यंत्रांचा शोध, अमेरिकेंतून होणाऱ्या पुरवठ्याची कमतरता, सरकीच्या तेलाचा चरबीच्या ऐवजीं होणारा वाढता उपयोग वगैरे कारणांमुळें सरकीची सर्व जगांतील मागणी वाढली असावी; तरी हिंदुस्थानांतून एकंदर जगाच्या पुरवठ्यापैकीं सुमारें शेकडा ३३ पेक्षां जास्त माल बाहेर जात नाहीं.

स र की चें ते ल.—तेल काढण्याकरितां सरकीवरचें सूक्ष्म तंतावरण काढून नंतर तिच्यावरचें फोलकट काढतात. सरकींत शेकडा २० ते २५ पर्यंत तेलाचा भाग असतो. तेल काढल्यानंतर ढेप गुरांनां खाण्यास उपयोगी पडावी म्हणून फोल काढणें अवश्य असतें. तेलाचा ज्या कामाकडे उपयोग करावयाचा असेल त्याप्रमाणें तेल काढण्याची रीत वदलते. फोल काढलेल्या सरकीवर थंड दाव घालून तिच्यांतील शेकडा १० ते १२ तेलाचा अंश काढतात. हें तेल बेचव असून त्याचा ऑलिव्ह तेलांत मिसळण्याकडे अगर ओलिव्ह तेल म्हणून विकण्याकडे उपयोग करतात. तळणाच्या कामीं याचा चांगला उपयोग होतो. थंड दाबानें तेल काढल्यानंतर उष्णतेचा उपयोग करून त्यांतून शेकडा १० या प्रमाणांत तेल काढलें जातें. ढेपेमध्यें तेलाचें योग्य प्रमाण नसलें तर ती गुरांच्या खाण्याकडे उपयोगी पडत नाहीं. हिंदुस्थानांत गुरांनां सरकी देतात. यामुळें तेल काढण्याच्या कामीं तिचा फार थोडा उपयोग केला जातो. याचें कारण सरकीचें तेल वैद्यशास्त्रदृष्ट्या खाण्यास पथ्यकर नाहीं, अशी लोकांची भ्रामक समजूत झालेली आहे हें होय. गुरांनां खावयास घालण्याकडे सरकीचा उपयोग प्राचीन काळींहि करीत असा उल्लेख आहे. परंतु हिंदुस्थानांतील बऱ्याच भागांत हल्लींसुद्धा सरकीला किंमत नाहीं.

अलीकडे असें आढळून आलें आहे कीं, सरकी अथवा सरकीचें टरफल यांचा उच्च प्रतीचा कागद तयार करण्याच्या कामीं उपयोग होतो. कापसाचे वेंचे झाल्यानंतर व गुरांनीं पऱ्हाटीचा खाण्यासारखा भाग खाल्यानंतर तिची साल काढतात. पऱ्हाटी व साल यांचें ५:१ हें प्रमाण असतें. या सालीपासून तंतू काढून त्याचा तागाप्रमाणें उपयोग करतात. १ टन सालीपासून ७०५० शेर ताग निघतो. कपाशीच्या झाडापासून कागदहि तयार करतां येईल असें दिसून आलें आहे.

सर्वसाधारणतः हिंदुस्थानांतील कापसाच्या धाग्याची लांबी पाऊण इंचापेक्षां जास्त असत नाहीं. "सीआयलंड"

जातीच्या कांहीं जातींच्या कापसाच्या धाग्याची लांबी २ इंच असते. महत्वाच्या जातींच्या कापसाच्या धाग्याची जास्तींत जास्त लांबी खालीं दिली आहे. न्यू ऑर्लिन्स १.१६ इंच, "सीआयलंड" १.८० इंच; ब्राझिलियन १.३१ इंच, ईजिप्शियन १.५२ इंच, एतद्देशीय १.०२ इंच, हिंदुस्थानांत लागवडींत असलेला अमेरिकन कापूस १.२१ इंच, हिंदुस्थानांत होणारा सी आयलंड कापूस १.६५ इंच.

कापसाच्या बोंडाच्या टरफलाचे दोन भाग असतात. एक वरचा व दुसरा आंतील. या दोहोंनाहि सूक्ष्म छिद्रें असतात. या शोधावरून बोंडांच्या आंत ओलेपणा कोठून जातो या गोष्टीचा उलगडा होतो. पूर्ण वाढीस पोहोंचलेल्या तंत्वावरणांत अपुऱ्या वाढीचे कांहीं तंतू असतात. ते वारीक असून त्यांनां पीळ नसतो. असल्या तंतूमुळेंच कापसाची किंमत कमी होते; कारण पूर्ण वाढ झालेल्या तंतूप्रमाणें त्यांनां रंग वगैरे देतां येत नाहीं. त्यांनां मृत कापूस म्हणतात. हलक्या प्रतीच्या कापसांत मृतकापूस पुष्कळ असतो व सीआयलंड जातीच्या कापसांत तो क्वचित् आढळतो.

धाग्यांची लांबी व सारखेपणा यांवर कापसाची किंमत मुख्यतः अवलंबून असते, मऊपणा, बळकटी, स्वच्छपणा व रंग या बाबीहि महत्वाच्या आहेत. बाजारांतील कापसांत शेंकडा ७॥ ते १२॥ ओलेपणा असतो.

कॉस्टिक सोड्याच्या द्रावणांत कापूस भिजविला असतां त्याच्या तंतूंना रेशमाप्रमाणें तुकतुकी येऊन ते जाड होतात व अधिक वजनदार व बळकट होतात. याशिवाय कांहीं रंग त्यांनां अधिक पक्के बसतात. या रीतीनें तयार केलेल्या कापसाला 'मरसिराइझ्ड' कापूस म्हणतात. पाणी, मद्यार्क, ईथर, वनस्पतिजन्य अम्ल यांत कापसाचे तंतू विरघळत नाहींत. परंतु तीव्र अल्कलीच्या द्रवांत ते विरतात व तीव्र खनिज अम्लाच्या योगानें त्यांचें विघटण होतें.

**कापड तयार करण्याचे हिंदुस्थानांतील कारखाने.**—या कारखान्यांचें (१) हिंदी हातमाग, (२) वाष्पशक्तीनें चालणाऱ्या हिंदी लोकांच्या मालकीच्या सुताच्या व कापडाच्या गिरण्या व(३) वाष्पशक्तीनें चालणाऱ्या विदेशी यांच्या गिरण्या असे तीन विभाग आहेत.

**हातमाग.**—हल्लीं हातमागावर काम करणारे लोक बहुधा फावल्या वेळींच तें काम करतात. याखेरीज पूर्वीपासून जेथें कोष्टयांची वस्ती आहे अशा ठिकाणीं अद्याप विणकामाचाच धंदा करणारे लोक आढळतात. सुतावरील कर काढणें व त्याची भरपाई करणारा कर बाष्पशक्तीनें चालणाऱ्या मागांच्या कारखान्यांवर बसविणें या दोन कारणांमुळें कोष्टयांनां ऊर्जित दशा येईल असें कांहीं लेखकाचें मत आहे. एतद्देशीय कोष्टयांनां धावत्या धोटयांचा व इतर कांहीं योजनांचा उपयोग शिकविला असतां हातमागाच्या धंद्याला ऊर्जितावस्था येईल असें वाटतें. बाष्पशक्तीनें चालणाऱ्या मागांशीं झालेल्या हातमागांच्या चढाओढींत यूरोपखंडांत या योजनांनां यश आलें नाहीं. परंतु यूरोपपेक्षां हिंदुस्थानांतील परिस्थिति भिन्न असल्यामुळें हातमागांच्या धंद्याला अतिशय महत्व आलें आहे. याकरितांच असें प्रतिपादण्यांत येत असे कीं, जो माल गिरण्यांनां किफायतशीर रीतीनें तयार करतां येणार नाहीं, तो माल तयार करण्याकडे हातमागांचा उपयोग झाला तर त्यांची ऊर्जितावस्था होण्याची आशा आहे. विशिष्ट प्रकारच्या साड्या व लुगडीं तयार करण्याचा धंदा हातमागांनां योग्य आहे. कारण त्या बाबतींत चढाओढ करण्यांत गिरण्यांच्या मालकांनां यश येणार नाहीं. गिरण्यांत फक्त साधीं लुगडीं निघतात.

हातमागवाल्यानें इंग्लंडमध्यें तयार झालेलें उत्तम सूत घेऊन त्याचें कापड विणावें, म्हणजे त्याचा माल हिंदुस्थानांतील गिरण्यांत तयार होणाऱ्या मालापेक्षां खात्रीनें चांगला निघेल. ज्या मालाला फार मोठी मागणी आहे असा माल तयार करण्यापेक्षां ज्याला फक्त स्थानिक मागणी आहे असाच माल तयार करणें कोष्टयाला धोक्याचें होणार नाहीं.

कच्च्या मालाचें सान्निध्य, धंदेवाईक कोष्टीवर्गाचें अस्तित्व व व्यापाराच्या मुख्य ठिकाणीं मालाची ने-आण करण्याची सोय, या तीन गोष्टींच्या अनुरोधानें वाफेनें चालणाऱ्या कारखान्याला लागणाऱ्या जागेची निवड होते. साधारणतः असें दिसतें कीं, हिंदुस्थानांत ज्या ज्या ठिकाणीं प्राचीन काळीं हातमागांचा धंदा होता, त्या त्या ठिकाणीं वाफेनें चालणारे कारखाने आतां निघाले आहेत.

डाक्का, बनारस वगैरे ठिकाणीं अद्याप पातळ मलमल होते. दिल्लीच्या बादशाहीच्या लयाबरोबरच डाक्काच्या मलमलीच्या धंद्याचाहि मागणीच्या अभावीं लय होईल असें वाटत होतें; परंतु १९०३ सालच्या दिल्लीच्या प्रदर्शनाच्या वेळीं जी मलमल विकली गेली ती १८८४ मध्यें तयार झालेल्या कलकत्ता म्यूझियममधील मलमलीच्या तोडीची होती. डाक्काच्या प्राचीन मलमलीचे नमुने कोठेंच सांपडत नाहींत. डाक्काच्या हल्लींच्या मालाचें सूत ४०० अथवा ४५० नंबराचें असतें व इंग्लंडातील कारखान्यांत ६०० नंबरचें सूत होतें.

डाक्काच्या मलमलींतील विशेष हा आहे कीं, तेथील सूत कांतणारे लोक इतकें उत्तम सूत काढतात कीं, ते जो हलक्या प्रतीचा कच्चा माल उपयोगांत आणतात, त्याच मालापासून जगांतील कोणत्याहि यंत्राच्या साहाय्यानें तितकें उत्तम सूत निघणार नाहीं. ओपविण्याच्या वेळीं अमेरिकन कापसाचें सूत फुगतें व डाक्काचें सूत बारीक व बळकट राहातें; म्हणून डाक्काचें सूत काढणारे लोक अमेरिकन सुताचा उपयोग करीत नाहींत.

**फक्त हिंदुस्थानांत खपणारें कापड.**—हिंदुस्थानांत होणाऱ्या कारागिरी कापडाचे, रेशमी जरतारी कापड व साधी अथवा चित्रित मलमल, असे दोन प्रकार आहेत.

या कापडावर असलेलीं चित्रें बहुधा ठशानें उमटविलेलीं नसून विणलेलीं असतात. याशिवाय फक्त हिंदुस्थानांत खपणारें कापड म्हणजे धोतरें, साड्या, पटके वगैरे होत.

पोषाखाच्या बाबतींत हिंदुस्थानांतलि लोक जितके जुन्या रूढीला चिकटून राणारे आहेत तितके जगांतील कोणतेहि लोक नाहींत. याकरितां ज्या व्यापाऱ्याला वर दिलेल्या विशिष्ट मालाचा कारखाना काढावयाचा असेल, त्याला प्रत्येक ठिकाणीं खपणाऱ्या कापडाचा आकार, रंग, वगैरे गोष्टीं-बद्दल माहिती मिळविली पाहिजे.

कापसाच्या मालापैकीं चित्रित मलमलींत विशेष कारागिरी दिसते. डाका, शांतिपूर, चितागांग वगैरे ठिकाणें या मालाकरितां वरींच प्रसिद्ध आहेत.

**जगाच्या निरनिराळ्या भागांत किती चात्या जालतात त्याचें सन १९२८ मधलि कोष्टक.**

| देश. | चात्या. | देश | चात्या |
|---|---|---|---|
| ग्रेटब्रिटन | ५६६०५१७६ | पोर्तुगाल | ४८७१५२ |
| फ्रान्स | ९६००००० | फिन्लंड | २३८८६२ |
| जर्मनी | ९५००००० | डेन्मार्क | ९६६४४ |
| रशिया | ७१००००० | नॉर्वे | ६५४६४ |
| इटली | ४५६०००० | हिंदुस्थान | ६८७०८०४ |
| झेको–स्लोव्हाकिया | ३५४९४८५ | जपान | ४६४५८५३ |
| स्पेन | १८०५७८५ | चीन | २२४७९३६ |
| वेल्जम | १६२९९२१ | अमेरिका. संयुक्त संस्थानें | ३६९४३००० |
| स्वित्झर्लंड | १५१९००० | कानडा | १०५१११२ |
| पोलंड | १२००१९१ | मेक्सिको | ७५३८३७ |
| आस्ट्रिया | १०२२७९२ | ब्राझिल | १६००००० |
| नेदर्लंड्स | ६३४८५६ | इतर देश | २५१५०० |
| स्वीडन | ५७५८९७ | एकूण चात्या | १५४५५५२६७. |

**हिंदुस्थानांत सन १९१८–१९ सालीं यांत्रिक शक्तीनें चालणाऱ्या गिरण्या.**

| स्थान | गिरण्यांची संख्या | अधिकृत भांडवल | मागांची संख्या | चात्यांची संख्या | कामकऱ्यांची सरासरी दैनिक संख्या |
|---|---|---|---|---|---|
| ब्रिटिश हिंदुस्थान | | | | | |
| बंगाल | १४ | १५७०००००० | २०२६ | ३६११८१ | १११७७ |
| संयुक्तप्रांत | १९ | १९६८५००० | ४६०७ | ४५९६३० | १५७३५ |
| अजमीर–मेरवाड | २ | १३४०००० | ७३९ | २२२१२ | ११३८ |
| दिल्ली | २ | १२००००० | २५७ | ३३२१६ | ११५७ |
| पंजाव | ३ | ७००००० | २८७ | ४८२९६ | १२०८ |
| मुंबई | १७२ | १९१७६६००० | ९२६५२ | ४६०४७१३ | १९८७११ |
| मध्य प्रांत | ६ | १४८७३६७४ | ३७९४ | १९३००८ | १२४१० |
| वऱ्हाड | ३ | २२०५००० | ९८१ | ४६१०८ | २६३० |
| मद्रास | १४ | १२४४२३७७ | २७१६ | ४०७३१२ | २३५०३ |
| संस्थानें व परमुलूख | २९ | १७०७०१६६ | ८०३५ | ४१५२४२ | २२५८६ |
| एकंदर हिंदुस्थान | | | | | |
| सन.–१९१६—१७ | २६७ | २२२८०५०५८ | ११०८१२ | ६६७०१६२ | २७७३७० |
| १९१७—१८ | २६९ | २३८८५५९६६ | ११४८०५ | ६६१४२६९ | २८४०५४ |
| १९१८—१९ | २६४ | २७६९८२२१७ | ११६०९४ | ६५९०९१८ | २९०२५५ |

**का प डा च्या का र खा न्यां ती ल का म क ऱ्यां चें वे त न.**— कापडाच्या कारखान्यांतील निरनिराळीं कामें करणारांस निरनिराळें वेतन मिळतें. सर्व हिंदुस्थानभर वेतनाचें एकच प्रमाण नाहीं.

**क र, ज का ती व गै रे.**—१८५७ च्या बंडानंतर कांहीं दिवसपर्यंत कापसाच्या आयात मालावर शेंकडा पांच टक्के कर होता. पुढें तो दहा टक्के होऊन १८६४ मध्यें ७॥ झाला. १८७५ मध्यें तो पुन्हां ५ झाला.

हाउस ऑफ कॉमन्स सभेच्या ठरावान्वयें १८८२ मध्यें आयात मालावरील कर उठविण्यांत आला. १८९४ मध्यें कापसाच्या मालाखेरीज इतर आयात मालावर कर बसविण्यांत आला. तेव्हां एतद्देशीय कारखानदारांनीं तक्रार केल्यावरून कांहीं आयात मालावर जकात बसविण्यांत आली. हिंदुस्थानांत परदेशाहून येणारें कापड व सूत मुख्यतः उच्च प्रतीचें असतें व हिंदुस्थानांत होणारा माल हलक्या प्रतीचा असतो. तथापि मध्यम प्रतीचा माल हिंदुस्थानांतहि होतो व बाहेरूनहि येतो. याकरतां बाहेरून येणाऱ्या मध्यम प्रतीच्या मालावर कर बसविल्यामुळें त्याला संरक्षित व्यापाराच्या तत्वावरील कराचें स्वरूप येऊं नये म्हणून हिंदुस्थानांत होणाऱ्या कांहीं मालावर जकात बसविण्यांत आली. कराचा बोजा दोन्ही कारखानदारांवर सारखा बसविण्याच्या या प्रयत्नास यश आलें नाहीं. याकरितां इ. स. १८९६ मध्यें सुतावरील कर उठविण्यांत आला व बाहेरून येणाऱ्या व एतद्देशीय कारखान्यांत होणाऱ्या कापडावर सरसहा ३॥ टक्के कर बसविण्यांत आला. सध्यां परकी कापडावर ११ टक्के जकात आहे. येथील कापडावरील जकात उठविण्याचा ठराव लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत पास झाला आहे. १९२०-२१ सालीं या करावें उत्पन्न २॥ लाख रुपये होतें.

**कापूस, देशी व परदेशी कापड व सूत यांचा व्यापार.**—१९१९-२० सालीं हिंदुस्थानांत २३०६३००० एकर जमीन कापसाच्या लागवडीखालीं असून ५८४५००० गाठी कापूस झाला. हल्लीं हातमागांवर काम करणारे कोष्टी क्वचितच सूत काढतात. ते परदेशी अथवा देशी सूत विकत घेतात. इ. स.१९१९-२० सालीं ८५६६६०० हंड्रेडवेट कापूस परदेशांत गेला. त्याची किंमत सरासरी ५८॥ कोटी रुपये होती.

हिंदुस्थानांत होणारा कापूस आंखूड धाग्याचा व हलक्या प्रतीचा असतो. लांब धाग्याच्या कापसाला कारखानदार जास्त किंमत देत नसत. म्हणून शेतकरीवर्ग अर्थातच जास्त पीक येणाऱ्या आंखूड धाग्याच्या कापसाची लागवड करूं लागले. या कारणामुळेंच गेल्या तीस वर्षांत लांब धाग्याचा व उच्च प्रतीचा कापूस हिंदुस्थानांतून नामशेष झाला. हलक्या प्रतीच्या कापसाचा पुरवठा जवळ असल्यामुळें एतद्देशीय गिरणीवाल्यांनीं हलक्या प्रतीचा माल तयार करण्यांतच लक्ष घातलें व थोड्याच वेळांत निदान या मालाच्या बाबतींत तरी हिंदी बाजारांत परकीय आयात माल बंद झाला. संयुक्त संस्थानाचा लांब धाग्याचा कापूस घेऊन इंग्लंड उच्च प्रतीचा माल तयार करूं लागलें व अशा रीतीनें हलक्या प्रतीच्या हिंदी मालास इंग्लंडचा बाजार बंद झाला.

**सुताचा स्थानिक व्यापार.**—हिंदुस्थानांतील गिरण्यांत दिवसेंदिवस दिवस जास्त सूत निघत आहे. १९१९-२० सालीं हिंदुस्थानांत ६३,५७,६०,२७३ पौंड सूत तयार झालें. यापैकीं मुंबई इलाख्यांत४३,९७,९९,६२५पौंड, बंगालमध्यें ३,५२,२९,१७९ पौंड, मद्रासमध्यें४,४३,४६,२६८ पौंड, संयुक्तप्रांतांत ३,५१,८१,२८४ पौंड, पंजाबांत ३३,५९,१०७ पौंड व एतद्देशीय संस्थानांत ३,८४,०४,९८३ पौंड सूत काढण्यांत आलें.या सालच्या सुतापैकीं ३५,५९,९६७ पौं.सूत उच्च प्रतीचें म्हणजे.४० नंबरा सुतापेक्षां चांगलें होतें. अर्वाचीन व्यापारांतील विशेष हा आहे कीं, हिंदुस्थानांत होणाऱ्या उच्च प्रतीच्या सुताचा पुरवठा वाढत असून त्याकरितां परदेशी कापसाची जास्त जास्त आयात होत आहे. इ. स. १९०५-६ सालीं संयुक्त राज्य, जर्मनी, ईजिप्त व संयुक्त संस्थानें येथून१,६१,४७६हंड्रेडवेट कापूस हिंदुस्थानांत आला. हिंदुस्थानच्या कापसाच्या व्यापाराचे आंकडे पाहिले असतां असें दिसून येतें कीं, उच्च प्रतीच्या आयातीची वाढ व हिंदुस्थानांत होणाऱ्या त्याच वर्गाच्या सुताच्या निर्गतीची वाढ यांचें प्रमाण व्यस्त आहे.

१८८८-८९ सालीं ५,२५,००,००० पौंड सूत परदेशाहून आलें. हा आंकडा कमी कमी होत १९०३-०४ सालीं २,८०,००,००० पौंड झाला. परंतु १९०५-०६ सालीं तो ४,५७,५०,००० पौंड झाला.

१८७६-७७ सालीं८०,००,०००पौंड हिंदुस्थानांत होणारें सूत परदेशी गेलें. त्याची किंमत ३६,७५,००० रु. होती. १९०६-०७ सालीं हाच आंकडा २४,३५,००,००० पौंड असून त्याची किंमत १० कोटि रुपये होती. १९१९-२० सालीं १५॥ कोटी पौंड सूत परदेशीं गेलें.

१९०५-०६ सालीं हिंदुस्थानांत तयार झालेल्या सुतांतून त्या सालीं परदेशीं गेलेल्या सुताचें वजन वजा जातां येथें ३५,७५,००,०००पौंड सूत राहिलें. याशिवाय४५,७५,०००० पौंड सूत परदेशाहून आलें. हें एकंदर सूत हिंदुस्थानांतील गिरण्या व हातमाग यांच्या उपयोगीं पडलें.

**कापड.**—हिंदुस्थानांतील गिरण्यांत१८९९-१९००सालीं ९५०००००० पौंड कापड तयार झालें. १९०५-०६ सालीं संस्थानांत तयार झालेला माल धरून १६३०००००० पौंड कापड तयार झालें. १९१८-१९ सालीं ३४९१८०४५० पौंड कापड झालें. हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या मालापैकीं शेंकडा ८३ पांढऱ्या रंगाचा कोरा माल असतो. १ पौंड वजनाचा कोरा कपडा सरासरी ४ वार लांब असतो. येथें होणाऱ्या उच्च प्रतीच्या कापडाचें प्रमाण निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळें असून मद्रासमध्यें शेंकडा ६४ कापड उच्च प्रतीचें असतें. मध्यप्रांतांत शेंकडा ३८ व मुंबई इलाख्यांत शेंकडा १७ उच्च प्रतीचें असतें.

१९१८-१९ सालीं ६४५ लक्ष रुपयांचें येथें होणारें कापड परदेशीं गेलें.

**कापडाची आयात.**-परदेशाहून हिंदुस्थानांत येणाऱ्या कापडाचा ⅘ भाग ग्रेटब्रिटनहून येतो. कापडाचे कोरें, धुवट व रंगित असे प्रकार आहेत. १९०५-०६ सालीं या तीन प्रकारचें २,४६,३०,००,००० वार कापड परदेशाहून हिंदुस्थानांत आलें. यापैकीं ६,७०,००,००० वार कापड पुन्हां परदेशीं गेलें म्हणजे येथें २,३९,६०,००,००० वार कापड

राहिलें. याच सालीं हिंदुस्थानांत होणाऱ्या कापडांतून निर्गत वजा जातां ५४,७०,००,००० वार कापड येथें राहिलें असें दिसतें. म्हणजे या सालीं एकंदर हिंदुस्थानांत ३,०१,६०,००,००० वार कापडाचा पुरवठा होता असें दिसतें. ३०,००,००,००० लोकसंख्येच्या मानानें पहातां दर माणशी दरवर्षी १० वार कापड पडूं शकतें. १९१९–२० सालीं ५४ कोटी ७२ लाख रुपये किंमतीचें कापड परदेशांतून इकडे आलें.

एकंदरींत पहातां, हिंदुस्थानांतील गिरण्यांत होणारें सूत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत चीन व इतर देशांत जातें. येथें होणारें कापड बहुतांशीं याच देशांत खपतें. हिंदुस्थानांत होणाऱ्या कापसापैकीं निम्मा कापसाच्या रूपांतच परदेशीं जातो, १/९ सुताच्या रूपांत परदेशीं जातो, ४/९ हिंदुस्थानांत उपयोगांत येतो. ज्याप्रमाणें येथें होणाऱ्या सुतानें सुताची आयात बहुतेक थांबविली त्याचप्रमाणें येथें होणाऱ्या कापडानें कापडाची आयात कितपत थांबते हें भविष्यकालीं दिसून येईल.

का पू स वा जा रः—कापसाचा बाजार सर्व जगाचा आहे. कारण हा माल टिकाऊ असून इकडून तिकडे नेण्यासारखा आहे. याच्या जाती आणि निरनिराळ्या तऱ्हा यांची नमुन्यांवरून पारख करतां येते. अगर त्या त्या जातींनां त्यांच्या चांगलेपणावद्दल कांहीं ठराविक नांवें दिलेलीं असल्यामुळें नमुन्यांशिवाय नुसत्या नांवावर, तारेनें अगर पत्रानें दुरूनसुद्धां खरेदीविक्री करतां येऊन भावहि ठरवितां येतात. नमुन्याप्रमाणें अगर नांवांत गृहीत धरलेल्या चांगुलपणाप्रमाणें माल न मिळतां जर वांधा पडला, तर दोन्ही बाजूचे तपासनीस (सर्व्हेअर) नेमून मालाची परीक्षा करण्यांत येते आणि शेवटीं ते जो निकाल देतील तो ग्राह्य मानावा लागतो. अशा अनेक सोयी असल्यामुळें अगदीं थोड्या वेळांत अवाढव्य घेवाळ देवाळ होते; आणि भावांत सर्व जगामध्यें फारशी तफावत राहूं शकत नाहीं.

वा य द्यां चें प्र यो ज न.—कापसाच्या व्यापारांत हजर-मालाची, त्याप्रमाणेंच वायद्याची खरेदीविक्री करतां येते. वायद्याच्या खरेदीविक्रींत व्यापाऱ्यांस मालाची खरोखरी जरुरी असेल किंवा त्यांचा केवळ सट्टयाचाच हेतू असूं शकेल. वायद्याच्या प्रयोजनांत याप्रमाणें पुढील गरजेकरितां आज-पासूनच तयारी ठेवावी हें कांहीं अयोग्य नाहीं. दर एक कारखानदार भविष्यकालीं आपणाला अजमासें किती माल लागेल याचा नक्की पडताळा ठरवून ठेवित असतो. त्याला ज्या भावांत माल विकावयास परवडेल त्याच भावाला तो बांधला गेलेला असतो, आणि म्हणूनच कच्चा माल काय भावांत पुढें मिळेल याचा विचार त्याला अगोदरच करून ठेवावा लागतो. कापसाचे पुढील भाव म्हणजे वायद्याचे भाव हे स्थानिक शेतकऱ्यांच्या मजुरीवर अवलंबून नसून जगांतलि एकंदर पुरवठ्यावर, एकंदर मागणिवर आणि पिकांच्या वातम्यांवर तसेंच बाजारच्या कांहीं विशिष्ट चळवळीवर अवलंबून असल्यामुळें त्यावर विचार करणें फारच भानगडीचें असतें. कांहीं तरवेज धंदेवाईक तर केवळ या बाजारच्या चळवळींचाच अभ्यास करतात, आणि पुढील मागणीच्या कमीजास्त प्रमाणावर चालू भावांत फेरवदल अगर वाढघट कशी काय करावयाची याचा ते आपल्या या अभ्यासानें कयास बांधून त्याप्रमाणें बाजार-भावाची घटना घडवून आणितात. याप्रमाणें कापसाचे दलाल नवीन पीक कमी निघेल असा अजमास पहातांच आपले भाव वाढवितात आणि चालू मागणीस बराच आळा घालतात. यामुळें असें होतें कीं, पुढील मागणीकरितां बराच माल शिल्लक राहूं शकतो व असें केल्याखेरीज गत्यंतरच नसतें. नाहीं तर चालू कमी भावांत बहुतेक माल उठविला जाऊन पुढें पीक कमी निघाल्यावर भाव भलताच कडकेल. अशा रीतीनें भावाच्या वाढघटीला मोठ्या धोरणानें आळा घालावा लागतो. कारण भलतीच वाढघट होणें व्यापाराला अहित-कारक असतें. या व्यापारांत कांहीं लोक असे असतात कीं, त्यांनां व्यापारांतील पूर्ण ज्ञान कसें तें मुळींच नसतें; परंतु केवळ सट्टेबाजी अगर जुगार खेळण्याकरितांच ते या धंद्यांत शिरलेले असतात. आणि त्यामुळें या लोकांत आणि पद्धत-शीर खरेदीविक्री करणारे व्यापारी यांच्यांत सारखी चढा-ओढ लागून भावाचा निकाल ठरतो. अर्थातच पद्धतशीर काम करणारेच शेवटीं विजयी होतात हें निराळें सांगणें नको.

ह ज र मा ला ची ख रे दी.—अमका एक हजरमाल घेण्याचें ठरलें ह्मणजे त्याचा नमुना पाहून भाव नक्की केला गेल्यावर त्यावर (गांसडीवर) ते आपला मार्क म्हणजे छाप घालून ठेवितात, व छाप घालून ठेवल्यापासून २१ दिवसांच्या आंत त्या मालाची 'डिलिव्हरी' घ्यावी लागते. गिरणीवाला माल घेणारा असेल आणि गिरणीकरितां त्याला माल पाहिजे असेल तर तो माल गिरणीवाला गिरणीकडे रवाना करील. बाहेर-देशीं व्यापार करणारा असेल तर तो जहाजाच्या सोयीप्रमाणें बाहेरदेशीं रवाना करील किंवा खरेदीविक्रीकरतांच केवळ घेतला असेल तर आपल्या गोडाऊनमध्यें तो माल मनाप्रमाणें भाव येईपर्यंत नेऊन ठेवील. हजरमाल गोडा-ऊनमध्यें पडलेल्या लॉटवर घ्यावा लागतो. समजा, गोडाऊन-मध्यें १४६ गांठी एका नमुन्याच्या आहेत. एखादा व्यापारी त्यांपैकीं शंभरच घेईल. आतां बाकी राहिलेल्या ४६ गांठी मात्र एकदम सर्व घ्याव्या लागतील. त्याखालीं सौदाच होणार नाहीं.

ग जा न न.—माल तोल करून घेतांनां 'गजानन' म्हणून एक दोन रत्तलाचा दगड वजनाच्या बाजूला लाद-ण्यांत येतो; आणि माल नमुन्याप्रमाणें आहे कीं नाहीं हें मधून मधून गांसडींतील माल काढून घेऊन पहावें लागतें. शंका असल्यास गांसडी खुशाल फोडावी. माल नमुन्यासारखा

असला तर ठीक, नाहीं तर ती गांसडी बाजूला ठेऊन पुढें माल घेण्यास आरंभ करावा. नंतर वांध्याच्या गांसडीचा निकाल करावा. वांध्याच्या गासडीचा आपसांत निकाल न झाला तर दोन्ही पक्षाचे सर्वेअर नेमून त्यांच्या मार्फत निकाल करून घ्यावयाचा असतो. अर्थात त्यांच्या निकालाप्रमाणें शेवटीं निमुटपणें वागावें लागतें.

ख र्चा चा त प शी ल.—हजरमालाच्या व्यापारांत होतां होई तोंपर्यंत इतर कांहीं भानगडी होत नाहींत. वांधा पडल्यास तो फक्त माल नमुन्याप्रमाणें नसला तरच होतो. अगर हिशेवाचे वेळीं 'बारदान' आणि 'नमुन्या' विषयींचा वांधा होतो. डिलिव्हरी घेतल्यानंतर रक्कम ठरीव दिवसांनीं द्यावी लागते.

भाव खंडीचा असल्यामुळें तोलाची वगैरे विशेष भानगड नसते. हा तोल येणेंप्रमाणें:—२८ रत्तल = १ मण, ४ मण = १ हंड्रेडवेट, ७ हंड्रेडवेट = १ खंडी. अलीकडे वटाव ५॥ टक्के देण्याचें बंद आहे. फक्त गांसडीमागें दलाली आठ आणे, मुकादमी बारा आणे बारदान वगैरे (७॥- पासून १३ रत्तल) नमुना आठ आणे धर्मादाय वगैरे कापून हिशेव मिळतो.

वायद्याच्या खरेदीविक्रींत आजच रक्कम द्यावी लागत नाहीं. रोजची खरेदीविक्री जमा नांवें होऊन वायदा तुटेल त्या दिवशीं प्रत्यक्ष माल अगर सट्टा असल्यास हिशेवांतील फरक घ्यावा द्यावा लागतो.

वा य दे.—ठराविक वायदे पुढीलप्रमाणें करतात. या धंद्यांत तूर्त तरी रक्कम गुंतून पडत नाहीं. व्यापारी नसून हा धंदा करावयाचा असेल तर त्याला पेढी अगर दलालामार्फतच तो करावा लागेल. अर्थात नफानुकसानीबद्दलची हमी म्हणून बाजारच्या परिस्थितीप्रमाणें जमा रक्कम ठेवावी लागेल. डिपॉझीट रक्कम दलालाजवळ ठेवण्यापेक्षां पेढीवर ठेवणें अधिक चांगलें. पेढीवरील काम सुद्धां दलालच करीत असतात. परंतु पेढीची स्थायिकता जास्त असते. दलाल केव्हां बारगळेल याचा नेम नसतो. पेढीचा व्यवहार फार मोठा आणि कांहीं तरी व्यवस्थित चाललेला असतो. म्हणून अनामत रक्कम बुडण्याचा धोका बराच कमी असतो. शिवाय पेढीमार्फत वाटेल तसा धंदाहि करतां येतो. हजर मालाचा, वायद्याचा किंवा तेजीमंदीचा यांपैकीं मनास येईल तो धंदा करावा. तेजीमंदीप्रत्यर्थ कच्च्या खंडीला काय अगर पक्क्या खंडीला काय दर एक खंडीमागें २॥- रुपये तरी निदान डिपॉझिट ठेवावें लागतें. मग तें दलालाजवळ ठेवावें अगर पेढीवर ठेवावें.

वरील सर्व व्यवहार दलालामार्फत चालतात. त्यांची दलाली दर एक गांसडीपाठीमागें ८ आणे असते. ही दलाली माल देतांघेतां मिळूनची असते. नुसता माल घेऊन दिला अगर नुसता विकून दिला तर दलाली अर्थात ४ आणेच त्यांनां मिळेल. मोठ्या धंद्यांत शेंमर खंडीमागें ७५ रु. असे कांहीं उक्ते ठरावहि करून घेतां येतात. २ गांसडी म्हणजे जवळजवळ १ खंडी होते.

कच्च्या खंडीच्या व्यवहारांत दलालास दलाली माल देतां घेतां दर खंडीमागें चार आणे असते. कच्च्या खंडीचा अर्थ असा आहे कीं त्यांत केवळ सट्टा असून माल प्रत्यक्ष देवाण घेवाण होत नसतो. आणि सौदे बहुधा ५० खंडीच्या खालीं आणि स्टँपवर नोंदल्याशिवाय होत असतात. येथील तेजीमंदी ५१ च्या वर गेल्यास देण्याघेण्याची नसते असें ठरलें आहे. कच्च्या खंडीच्या व्यवहारांत मोठमोठाले व्यापारी अगर दलाल नसतात. हा धंदा किरकोळ लोकच करतात. याचा बाजार (मुंबई) सराफ बाजाराजवळ काळबादेवी रोडवर आहे. हिशेवाचा दिवस सोमवार ठरलेला आहे.

कुलाब्याचें—हल्लीं शेवडीचें—मार्केट फार मोठें आहे. वरीलप्रमाणें हजर मालाच्या खेरीज करून वायद्याच्या वगैरे शंभर गांसडीखालीं येथें सौदाच होत नाहीं. सर्व व्यवहार स्टँपवर वगैरे चोख होतात. तेथील हिशेवाच्या तारखा अलीकडे दर महिन्यास १० वी आणि २५ वी अशा दोन ठरलेल्या आहेत. या दिवशीं सर्वांनीं एकमेकांचा हिशेव पुरा करून चुकता केला पाहिजे असा नियम केला गेला आहे. तरी पण आपापसांत खात्यावर बाक्या ओढून व्यापारी व्यवहार पुढें चालू करतात.

या व्यवहारांत निरनिराळे प्रकार आहेत ते असे:— (१) स्वतःच्या पैशावर, म्हणजे पेढीवाले अगर इतर व्यापारी व गिऱ्हाईक. (२) पेढीमार्फत, म्हणजे पेढीच्या पैशावर अगर स्वतःच्या पैशावर. (३) मार्जिन ठेऊन म्हणजे पेढीवाल्याजवळ अगर दलालाजवळ मार्जिन म्हणजे तेजीमंदीच्या फरकाची रक्कम ठेऊन.

स्वतःच्या पैशावर व्यापारी रीतीप्रमाणें पेढीवाले अगर व्यापारी अगर त्यांचीं गिऱ्हाइकें (देशी किंवा परदेशी) खरेदीविक्री करूं शकतात. फक्त दलालाची मध्यस्थी असली म्हणजे झालें. या व्यवहारांत हजर माल तर घेतां येतोच पण वायदा अगर सट्टाहि करतां येतो. किंवा इतकी तेजी किंवा इतकी मंदी होईल असें स्वतःशीं ठरवून "तेजी" लावावयास किंवा "मंदी" लावावयास येते; अगर दोन्हीहि लावावयास येतात.

पेढीमार्फत स्वतःच्या पैशावर धंदा केला तर पेढीवाल्यास फक्त आडत व दलालास (पेढीवाल्याच्या) दलाली द्यावी लागते. पेढीचा पैसा वापरला तर अर्थात् वरच्या दोन कलमांत व्याजाचें तिसरें कलम अंगावर येतें. पेढीवाल्यामार्फत वरीलप्रमाणें सर्व व्यवहार करतां येतात.

पेढीवाल्यामार्फत अगर कपाशीच्या धंदेवाईक दलालाजवळ 'मार्जिन' बद्दल म्हणजे फरकाबद्दल पैसे आगाऊ भरून त्यावर धंदा करतां येतो. फक्त 'हजरमाला'च्या धंद्याचा यांत अंतर्भाव होऊं शकत नाहीं. "वायदा" आणि "तेजीमंदी"चा धंदा मात्र करतां येईल.

वरील तीनहि प्रकारांत 'अदलाबदल' वाटेल तशी वाटेल त्यावेळीं आपल्या धोरणाप्रमाणें करतां येते. मार्जिन ठेऊन धंदा केल्यास मात्र मार्जिनच्या रकमेबाहेर नुकसानीची रक्कम जाणार नाहीं अशी काळजी घेतली जाते.

अ द ला ब द ल.—समजा मडोचजिनचा कापसाचा भाव ६०८रु. आहे व त्यांत खरेदी अगर विक्री केलेली आहे. थोड्या वेळानें अगर दुसऱ्या दिवशीं जर भाव खालीं गेला (म्हणजे५९९अगर खालीं), किंवा चढला(६०१अगर वर) तर त्या चढत्या अगर उतरत्या भावांत खरेदी अगर विक्री करतां येतें. म्हणजे आपल्या धोरणाप्रमाणें ६०५ च्या वरती भाव जाईल असें नसेल तर ६०५ भाव आल्याबरोबर आपला खरेदीचा माल काढून टाकणें अगर पुनः बाजारचें "ध्यान" तेजींतच असलें तर पुनः त्या भावांत खरेदी करून चढत्या भावांत विक्री करतां येते. याचप्रमाणें उतरत्या भावांतहि करतां येतें. यामुळें नुकसान होतां होईतों येत नाहीं; किंवा आलेंच तर फार कमी येतें. ५९९ भाव झाला तर दर खंडी-मागें १रु. नुकसान येईल. भाव भलताच उतरला तर या एवढ्या नुकसानीवरच सुटका होईल. पण समजा पुनः तेजीचा रंग दिसला आणि चालू भाव ५७० असला तर पुनः खरेदी करून अपेक्षेप्रमाणें तेजीच्या भावांत विक्री करतां येते. पण भाव उतरून आपलें धोरण चुकीचें ठरलें तर चट-कन पुनः विक्री करतां येते अशी चढत्या व पडत्या भावांत खरेदीविक्री करणें याला अदलाबदल करणें म्हणतात.

या बाजारांत सर्वस्वी मारवाडी लोकांचाच जोर आहे. गुजराथी आणि भाटियेहि पुष्कळ आहेत. पण त्यांचा जोर मारवाडी लोकांपुढें टिकाव धरूं शकत नाहीं. गुजराथी व भाटिये हे बहुधा हजर मालांत विशेष धंदा करतात. बाजा-रांत भाषा मारवाडी व गुजराथी वापरली जाते.इतर देशांच्या व्यापाऱ्यांचे एजंटहि मारवाडी अगर गुजराथी असल्यामुळें परदेशी लोक बाजारांत फारकरून दिसत नाहींत. बाजारांत परदेशी लोक म्हणजे जपानी आणि यूरोपीयन हे आलेच तर ते प्रत्यक्ष भाग न घेतां बाजूस एकत्र उभे राहून आपापल्या दलालास काय करावयाचें त्याबद्दल सूचना करतात.

कपाशीच्या तेजीमंदीचीं कारणें अनेक आहेत. पाऊस पाणी व्यवस्थित असेल तर मालाची पैदास जास्त होईल आणि वायद्याच्या धोरणापेक्षां मालाची पैदास जास्त झाली तर अर्थात त्यावेळीं भाव घटून चढत्या भावाच्या विक्रींत वायद्याच्या कमी भावाच्या खरेदीनें नफा मिळवितां येईल. आणि अजमासापेक्षां कमी झाली तर अर्थात उलट परिणाम होईल म्हणजे चालू भावापेक्षांहि वायद्याचा भाव तेजीचा होईल आणि साहजिक नुकसान अंगावर येईल. यावरून असें दिसून येईल कीं,मालाची पैदास आणि मागणी यांचा एकमेकांवर उलट परिणाम होऊन भाव घटतो अगर वाढतो. येथील मिलवाले यांच्याहि अनपेक्षित मागणीमुळें बाजारांत बरीच चढघट होते.

बंदरांत आगबोटी पुष्कळ असल्या तर लगेच परदेशी व्यापारी अगर त्यांचे एजंट मालाच्या खरेदीला सुरवात करतात आणि लागलीच माल बाहेरदेशी रवाना करतात. अर्थात् मागणी जास्त झाल्यामुळें भाव वाढतो.याच वेळीं आगबोटीच्या भाड्या-बद्दलहि विचार करावा लागतो. भाडें जास्त असल्यास येथून माल त्या देशीं कोणत्या भावांत जाऊन पडेल आणि इतर देशचा त्याच नमुन्याचा माल तेथें कोणत्या भावांत जाऊन पडेल याचा हिशेब पाहतां ज्या ठिकाणाहून माल स्वस्त येऊं शकेल तेथें खरेदी होईल. आणि येथील मालाची मागणी मंदावून भाव लागलीच मंदींत येईल.पुरेशा आगबोटी बंदरांत नसल्या तर आगाऊच मालाच्या खरेदीकरितां कोणीहि परदेशी व्यापारी खटपट करणार नाहीं. कारण माल घेऊन विनाकारण रक्कम गुंतवून आणि जोखीम अंगावर ठेवून घेण्यास सहसा कोणी तयार होणार नाहीं. सट्टाच करावयाचा असेल तर मात्र गोष्ट निराळी.

रोकडबाजारांत नाण्याची टंचाई झाली तर भाव उतर-ण्याचा बराच संभव असतो. कारण लोकांजवळ रोकड नस-ल्यामुळें खरेदी कमी होईल आणि भाव उतरेल.

लढाई वगैरे जरी नेहमीचीं तेजीमंदीचीं कारणें नसलीं तरी या चारपांच वर्षांत भावामध्यें भयंकर खळबळ होऊन कशासच धरबंध राहिलेला नाहीं; आणि नक्की धोरण बांधणें फार मुष्किलीचें झालें आहे.

हा व्यापार सर्वस्वी परदेशी बाजारावर अवलंबून आहे. लिव्हरपूल आणि न्यूयार्क येथील भावावर मुंबई येथील मार्केटमधील भाव चढतात अगर उतरतात. हिंदुस्थानचा हा व्यापार जरी फार मोठा आहे तरी हिंदुस्थानच्या भावावर कोणतेंहि परदेशी मार्केट, हिंदुस्थान ज्याप्रमाणें परदेशी मार्केटवर अवलंबून आहे, त्याप्रमाणें अवलंबून नाहीं. म्हणजे स्वतःच्या हिमतीवर भावांत चढउतार करण्याची आणि पर-देशास त्या भावांतच खरेदी करण्याला लावण्याची ताकद हिंदुस्थानास नाहीं. एक्सपोर्ट कस्टम ड्युटी दर एक गांठडी-मागें चार आणे आहे.

प र दे शी को टे श न.—हा माल परदेशाहून इकडे थोडा येतो तर येथून परदेशी जास्त रवाना होतो.बहुधा इंग्लंड आणि जपान या दोन देशांत माल जास्त जातो. या परदेशच्या मागणीवर फार बारकाईनें नजर ठेवावी लागते. परदेशी लोकहि वायदे, सट्टे वगैरे करतात. परंतु या धंद्यांत सुद्धां ते फार पद्धतशीर रीतीनें वागतात. एखाद्या वेळीं माल तेजींत जरी अंगावर आला तरी तो बाहेरदेशीं पाठवून त्याचा पक्का माल तयार करवून त्यांनां फायदा करून घेतां येतो तसा मारवाडी वगैरे लोकांस करून घेतां येत नाहीं. कारण पक्का माल पुरेसा तयार करण्याइतक्या गिरण्या हिंदुस्थानांत नाहींत.

देशावरील उर्भा शेनें खरेदी करण्याची पद्धत रॅली ब्रदर्स वगैरेंनीं अमलांत आणली होती. ही तऱ्हाहि जवळजवळ

सट्ट्यासारखी होती. कारण अपेक्षेप्रमाणें माल उतरला तर ठीक, नाहीं तर नुकसान ठरलेलेंच. अलीकडे हा प्रकार बंद झाला आहे.

[ संदर्भग्रंथ—डी. वाच्छा यांनीं १९१८ सालीं लंडनच्या 'रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्स' पुढें वाचलेला निबंध; केसरी ११।१२।१९१७; आश्व. श्रौ. सूत्र; इं. गॅ. ३; सातव्या इंडस्ट्रिअल कॉन्फरन्सचा रिपोर्ट; रिव्ह्यू ऑफ ट्रेड इन् इंडिया; पुसा त्रैमासिक १९१८; प्रेस कम्युनिक् ऑफ इंडियन गव्हर्मेंट ३ जुलै १९१८; ब्रिटानिकेंत ग्रेट्ब्रिटन व इतर देश यांतील कापडाच्या कारखान्यावरचे वरेचसे संदर्भग्रंथ आढळतील; दि इंडियन ईयर बुक व सरकारी कमार्शिअल स्टॅटिस्टिक्स यांत हिंदुस्थानांतील गिरण्यांची स्थिति दिग्दर्शित केलेली आहे. ]

**कॉंपेन**—उत्तर फ्रान्सांतील ऑइज विभागांतील एक परगण्याचें हें मुख्य नगर असून तें पॅरिसच्या उत्तरईशान्य दिशेस ५२ मैलांवर आहे. १९०६सालीं याची लो. सं. १४०५२होती. हें शहर उन्हाळ्यांत राहण्याकरितां फार उत्तम असून लोकांनां फार पसंत आहे. ऑइजच्या वामतटावर हें शहर असून कॉंपेन जंगलाच्या वायव्य टोंकावर आहे. येथें जुन्या काळच्या इमारती व देवालयें बरींच आहेत. शिवाय एक पदार्थसंग्रहालयहि आहे. येथील मुख्य संस्था न्यायकोर्ट, व्यापारी न्यायकोर्ट, एक कॉम्यूनची मोठी शाळा, ग्रंथसंग्रहालय व एक दवाखाना वगैरे होत.

कॉंपेन ( किंवा लॅटिन इतिहासाप्रमाणें कॉंपेंडिअम) हें फ्रेंच राजांचें मूळचें मृगयास्थान असावें. येथें चार्लस दि बोल्ड ह्यानें दोन दुर्ग व एक बेनिडिक्ट संप्रदायी मठ बांधला. ह्या मठांतील धार्मिक भिक्षुकांस १८ व्या शतकापर्यंत एक विचित्र हक्क दिला होता; त्याप्रमाणें तीन दिवस कॉंपेनचे मालकीचे पूर्ण हक्क त्यांजकडे येत. ह्या अवधींत त्यांस कोणताहि कैदी सोडणें, अपराध्यास शिक्षा किंवा फांशी देणें इत्यादि अधिकार मिळत.

इ. स. ८३३ मध्यें पहिला लुई दि डेबोनियर ह्यास येथेंच पदच्युत केलें व१४३० सालीं जोन ऑफ आर्कला येथेंच पकडण्यांत आलें.१६२४ च्या डच व रिचेलूच्या मैत्रीच्या तहाचें नांव ह्या शहरावरून पडलें. येथील राजवाड्यांत पंधराव्या लुईनें मारी आंट्वानेटचें स्वागत केलें. पहिल्या नेपोलियननें आस्ट्रियाच्या मेरी लुईसाशीं लग्न लावलें. १८व्या लुईनें रशियाचा सार्वभौमराजा अलेक्झांडर ह्यास येथें पाहुणचार दिला व पहिल्या लिओपोल्ड (बेल्जिअमचा राजा) व कुमारी लुईसा यांचें येथें लग्न झालें. १८१४ त प्रशियन लोकांशीं कॉंपेननें चांगली टक्कर दिली. तिसऱ्या नेपोलियनच्या काळांत येथें शिकारीच्या वेळीं दरबार भरत असे. १८७० ते १८७१ मध्यें जर्मन सैन्याच्या मुख्य ठाण्यांपैकीं हें एक ठाणें होतें.

**कॉप्ट**—ईजिप्तमधील तद्देशीय प्राचीन ख्रिस्ती लोकांनां कॉप्ट म्हणतात. कॉप्ट हें नांव या लोकांनां १४ व्या शतकापासून लावण्यांत आलें आहे. हल्लीं ईजिप्तमधील फक्त शुद्ध बीजाच्या ख्रिस्ती लोकांनांच हें नांव दिलें जातें.

ईजिप्तमध्यें मुसुलमानीं अंमल सुरू झाल्यानंतर तद्देशीय ख्रिस्ती लोकांचा छळ होऊं लागला व त्यामुळें पुष्कळ लोक मुसुलमान झाले व त्याचप्रमाणें पुष्कळ अरब लोक येथें राहण्यास आले. यामुळें मुसुलमानांची संख्या कॉप्ट लोकांपेक्षां जास्त झाली.

कॉप्ट शेतकरी मुसुलमानी शेतकऱ्याप्रमाणेंच आहेत. शहरांत राहून बैठें काम करणारे कॉप्ट नाजूक बांध्याचे आहेत. यांच्यांत एकपत्नीत्व फार कडकपणें पाळलें जातें. धर्मोपदेशकांशिवाय इतर सर्व कॉप्ट मुसुलमानांप्रमाणेंच पोषाख करतात. त्यांच्या उजव्या तळहाताच्याखालीं क्रॉसचें चिन्ह गोंदलेलें असतें. त्यांच्या बायकांत पूर्वी बुरखा घेण्याची चाल होती परंतु अलीकडे ती बंद झाली आहे.

कॉप्ट लोक प्राचीन ईजिप्तमधील भाषेपासून झालेल्या उपभाषा बोलतात. सरकारी नोकरी व शेती हे त्यांचे मुख्य धंदे आहेत.

**काफा**—ईशान्य आफ्रिकेंतील एक देश. अबिसीनियन साम्राज्याचा हा देश एक भाग आहे. खुद्द काफा देशाचें क्षेत्रफळ ५००० चौरस मैल आहे. परंतु काफा देशांत जीमिरा, जिम्मा, एनारीआ इत्यादि शेजारच्या मुलुखांचाहि समावेश करण्यांत येतो. काफा देश अबिसीनियाच्या डोंगराचा नैर्ऋत्य भाग होय. या देशांतील मुख्य नदी ओमो ही होय. काफीचीं झाडें येथें फार वाढत असल्यामुळें या देशाला काफा हें नांव मिळालें आहे.

या ठिकाणीं कॉफीचो व मुसुलमानी गालाज लोक राहतात. काफीचो लोकांनीं आपलें स्वैरस्य कायम राखलें आहे. हे लोक खुद्द काफा देशांत राहतात व मुसुलमानी गालाज लोक जिम्मा येथें राहतात. सुमारें १८९५ सालीं अबिसीनियनांनीं हा देश जिंकला.

**काफिरकोट**—वायव्येकडील सरहद्दीवरील प्रांत. डेरा इस्माएलखान जिल्ह्यांतील कांहीं अवशेष भाग. उत्तर अक्षांश ३२°६०' व पूर्व रेखांश ७१°२१'. या स्थलास तिल-काफिरकोट अथवा राजा शिरकोट अशींहि नांवें आहेत. या ठिकाणीं तटबंदीचीं फार जुनाट अशीं पडकीं कामें असून आंतील भागांत असलेल्या पुरातन इमारतींचे अवशेष पुष्कळ आहेत. यांपैकीं हिंदूंचीं चार देवळें जरा बऱ्या स्थितींत आहेत. याच्या दक्षिणेस सुमारें ३० मैलांवर बिलट येथें याच नांवाचे कांहीं अवशेष आहेत. [ आर्किआलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट-पु. १४. डॉ. स्टीनचा रिपोर्ट (१९०३-०५): इं. गॅ. १४. ]

**काफिरलोक**—आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर रहाणाऱ्या जातींनां अरब लोकांनीं काफिर हें नांव दिलेलें आहे. दक्षिण आफ्रिकेंतील निग्रो लोकांनां चुकीनें काफिर असें म्हणतात. काफिर लोकांचे मुख्य दोन विभाग आहेत.

ते अमाझुळु व अमाटोंग ( खरे काफिर ) हे होत. झुळु काफिर ही संज्ञा सर्व जातींच्या काफिरांनां लागू पडणारी आहे. झुळु काफिरांच्या उत्पत्तीबद्दल अद्याप बराच वाद आहे. त्यांची भाषा व शरीररचना यांचें दक्षिण आफ्रिकेंतील निग्रो लोकांच्या भाषेशीं व रचनेशीं साम्य आढळून येतें, यावरून ते निग्रो जातीचे असावे असें दिसतें त्यांचें नाक रुंद व ओठ जाड असतात. त्यांची सरासरी उंची ५ फूट ९ इंच आहे व कोठें कोठें तर ६ फुट उंचीचे पुरुषहि आढळतात. त्यांच्या बायका पुरुषांपेक्षां कुरूप असतात. बहुपत्नीत्वाची चाल त्यांच्यांत रूढ असून बायका विकत घेण्याची चाल अद्याप प्रचलित आहे. यांची जास्त माहिती बंटु लेखांत सांपडेल.

**काफिरिस्तान**—काफिरिस्तान हें अफगाणिस्तानच्या एका प्रांताचें नांव आहे. कर्नल लॉकहार्ट याचें मिशन या प्रदेशांत जाण्यापूर्वी यासंबंधीं फारच थोडी माहिती होती. इ. सन १८८९ मध्यें मि. जी. एस. रॉबर्टसन यांनीं आपलें मिशन या देशांत नेल्यावर जी माहिती गोळा केली व ज्या गोष्टी नमूद केल्या त्याच काय त्या चित्तवेधक असून या देशाविषयींच्या आपल्या माहितीचा विश्वसनीय आधार होत.

काफिरिस्तान म्हणजे काफिर किंवा नास्तिक लोकांचा देश. चित्रळ अफगाणी राज्य यांनीं वेष्टिलेल्या प्रदेशास काफिरिस्तान म्हणतात. पूर्वी या देशांत नास्तिक पहाडी लोक रहात असत. ते स्वतंत्र होते, पण १८९५ मध्यें त्यांनां अफगाणिस्तानचा अमीर अबदुल रहमान यानें जिंकिलें व त्यांनां इस्लामधर्माची दीक्षा बलात्कारानें दिली. या प्रदेशाचा समावेश उत्तर अ. ३४° ७१'' ते ३६° आणि पूर्व रे. ७०° ते ७१ ' ३०' दरम्यान होतो. ह्याचें एकंदर क्षेत्रफळ ५००० चौरस मैल आहे.

साधारणतः हा प्रदेश खोल, निरुंद व नागमोडी अशा ओबडधोबड दऱ्या व त्यांच्या आंत लहान लहान दऱ्या यांचा बनलेला आहे. या सबंध भागांत मैदान म्हणून मुळींच नाहीं. निश्चल शिखरें, कठिण, निराच्छादित कडे, बर्फमय प्रदेश, बर्फाच्या नद्या, पाईन झाडांचीं वनें, विस्तीर्ण वृक्षाच्छादित उतरणी, वाहत्या झऱ्यांच्या कांठावरील जंगली द्राक्षें व डाळिंबें यांचीं अरण्यें वगैरे पर्वतदृश्यांचा प्रत्येक प्रकार येथें आढळतो. निरनिराळ्या उंचीवर रानटी फुलें आहेत. नद्यांत विपुल मासे आहेत. तांबड्या पायाचीं तितिरें, कबुतरें, डोंग्ह, फेझन्ट वगैरे पक्षी येथें आहेत. वन्य पशूंपैकीं मुख्य मारखोर ( एक प्रकारचा बकरा ) व ऊरियल ( एक प्रकारची शेळी ) हे होत. या प्रदेशांत अस्वलें व चित्ते बरेच आढळतात. 'आयबेक्स' नांवाचें जनावर फार क्वचित आढळतें.

**घांटवरस्ते.**—बदकशानकडे जाणारे सर्व उत्तरेकडील घांट १५००० फुटांहून जास्त उंच आहेत. यांपैकीं मुख्य मंडळ, कामाह, क्वी, कुलाम व रामगळ घांट हे होत. चित्रळकडे जाणारे घांट, उदाहरणार्थ, झिडिंग, शुई, शावल, पारपिट, पाटकुन हे कांहींसे कमी उंचीवर आहेत. वाटाड्याशिवाय या मार्गानें जाणें परकी माणसास फार धोक्याचें आहे. अतिशय दुर्गम अशा बहुतेक घांटांवरून या प्रदेशांतील चपल जनावरांच्या साहाय्यानें जातां येतें.

**नद्या.**—या प्रदेशांतील सर्व नद्यांचे क्षुब्ध प्रवाह काबूलमध्यें जातात. पूर्व काफिरिस्तानांत बाश्गल नदी वहाते. हिला मिळणाऱ्या नद्या स्कोरिगाल व माननूगाल ह्या होत. या देशाच्या मध्यभागांत पेच, कामा, प्रेसन अथवा व्हिरोन अशीं निरनिराळीं नांवें असलेली नदी वाहते. हिला उजवीकडून क्वी व अश्किन व डावीकडून वाई ह्या नद्या मिळतात व अखेरीस ही नदी चिगारसराईजवळ कुनार नदीला मिळते. पश्चिम काफिरिस्तानांतून वहाणाऱ्या आलिंगर अथवा काव या नदीसंबंधीं खात्रीलायक सविस्तर माहिती नाहीं.

**हवा.**—उंचीच्या मानानें हवा बदलते. उंचावरील दऱ्यांत हिंवाळा कडक असतो. समुद्रसपाटीपासून ४,००० फुटांहून जास्त उंचीच्या प्रदेशांत सर्वत्र बर्फ पडतें. पुष्कळशा दऱ्यांतून वाऱ्याचा अभाव असतो. त्यामुळें बरीच थंडी विशेष त्रास न होतां सहन करतां येते. पर्जन्याच्या अभावामुळें कालवे वगैरे पाणीपुरवठ्याच्या साधनांची जरूर पडते व हे कालवे, पाटबंधारे वगैरेंची व्यवस्था बर्फ पडण्यावर अवलंबून असते.

**काफिर लोक.**—या देशांतील सध्यांचे रहिवाशी बहुशः महंमदाच्या अनुयायांनीं इस्लाम धर्म न स्वीकारल्याबद्दल हांकून लाविलेल्या पूर्वअफगाणिस्तानच्या विस्कळित झालेल्या टोळ्यांचे वंशज आहेत. ह्यांनीं या देशांतील उतरणीवरील व खोऱ्यांतील मूळच्या लोकांवर हल्ला करून त्यांनां पादाक्रांत केलें, गुलाम केलें व त्यांच्याशीं कांहींसे ते संलग्न झाले. हे पुरातन लोक म्हटले म्हणजे प्रेसन लोक, गुलाम व नामशेष झालेल्या जझी व अरॉम लोकांपैकीं शिलकी लोक होत. सध्यां या लोकांचे ( १ ) शिया-पोश, ( २ ) वायगुली, ( ३ ) प्रेसनगली किंवा व्हायरन लोक असे विभाग करतां येतील.

**गुलाम.**—या प्रदेशांत गुलाम पुष्कळ आहेत. यांची उत्पत्ति फार पुरातन रहिवाशी व लढाईतील कैदी यांच्यापासून झालेली आहे. हे गुलाम खेड्यांतील एका विशिष्ट भागांत रहातात त्यांनां लोक अपवित्र समजत असत व कांहीं पवित्र क्षेत्राजवळ जाण्याची त्यांनां मुभा नव्हती. सर्व गुलाम शियापोशांप्रमाणें पोशाख वापरतात असें आढळून येतें.

**स्त्रीस्वातंत्र्य**—हे लोक बायकांनां फारच थोडा मान देतात. साधारणतः त्या पुरुषांच्या राखा व गुलाम असतात. त्यांनां विकतां येतें व शेतकीच्या कामांत मजुरांप्रमाणें त्यांचा उपयोग करून घेतां येतो. त्या कांहींशा कुरूप असतात. त्यांचा वर्ण काळा असतो. शेतकीचीं सर्व प्रकारचीं कामें

व ओझीं वहाण्याचें वगैरे हलक्या प्रतीचे धंदे त्यांनां करावे लागतात. त्यांनां त्यांचे नवरे अगर पुरुषवर्गांतील त्यांचे नातलग यांच्यापासून कोणतेच हक्क मिळत नाहींत. त्यांनां मालमत्तेचा ताबा मिळूं शकत नाहीं, किंवा मालमत्तेवर त्या वारसा सांगू शकत नाहींत.

भा षा.—या देशांत तीन भाषा बोलतात. याशिवाय पुष्कळ उपभाषाहि आहेत. पैकीं शिया-पोष लोकांची भाषा जास्त प्रचारांत आहे. ही एक प्राकृत भाषा आहे. यूरोपिय लोकांनां ही भाषा शिकणें अशक्य आहे.

ध र्म.—अबदूर रहमान यानें या लोकांनां जिंकण्यापूर्वी काफिर लोक मूर्तिपूजक होते. यांच्यामध्यें पूर्वजांची पूजा व अग्निपूजाहि थोडथोडी होती. देवांची संख्या अगणित होती. इम्र हा विधाता होता व इतर सर्व देवता त्याच्या ताब्यांत असत. हलक्या प्रतीच्या देवतांपैकीं मोनी ही फार पुरातन होय; व गिश ही रणदेवता असून फार लोकप्रिय होती. प्रत्येक खेड्यांत ह्या देवतांचें एक अगर निरनिराळीं देवळें असत. देवळांत दगडाच्या अगर लांकडाच्या मूर्ती असत. यांच्यापुढें जनावरांचे बळी देत असत. इम्रदेवतेला गाई, बकरें व बैल यांचा आणि धनदेवतेला शेळ्या यांचा बळी देत असत. वंशपरंपरागत धंदा करीत आलेल्या धर्मोपाध्यायांकडून पूजाअर्चा होत असे. देवतांपुढें गाणें, नाचणें इत्यादि हे लोक करीत असत. व या लोकांची, नरक म्हणजे पापी लोक मरणोत्तर जेथें जाळतात ती जागा अशी समजूत असे.

ज्ञा ती सं घ ट ना.—या टोळ्यांपैकीं बऱ्याचशा निरनिराळ्या घराण्याच्या बनलेल्या होत्या. कोणाहि माणसाचें महत्व त्याच्या घराण्याची संपत्ति व त्या घराण्यांतील पुरुषमंडळींची संख्या यांवर अवलंबून असे. जसजसें एखाद्या घराण्यांतील पुरुष मंडळीचें अंगीं शौर्य जास्त व जसजशी त्यांची संख्या जास्त तसतसें त्या घराण्याचें वजन जास्त. गुलामांच्या वरच्या पण अगदीं हलक्या प्रतीच्या घराण्याचे लोक उच्च दर्जाच्या घराण्यांतील लोकांची मेंढपाळ वगैरे होऊन सेवा करीत असत. कोणाहि श्रमिंत माणसाला धार्मिक विधी अगर मोठे सामाजिक समारंभ व मेठमोठ्या मेजवान्या देऊन "जास्ट" अथवा वडील बनतां येत असे. व त्याहिपेक्षां जास्त खर्च करून लोकांनां मीर अथवा नायक बनतां येत असे. परंतु असे लोक थोडे असत. प्रत्येक टोळीचें सर्व महत्वाचें व कामकाज जास्ट लोक पंचायतींत लांत करीत असत. फार महत्वाच्या प्रश्नांचा निकाल टोळींतील सर्व लोकांच्या बनलेल्या सभेंत होत असे. टोळींतील अंतर्व्यवस्था बारा मदतनिसांच्या सहाय्यानें एक लोकनियुक्त न्यायाधीश पहात असे. त्याचें काम म्हटलें म्हणजे लोकांच्या चालीरीती योग्य रीतीनें पाळल्या जातात किंवा नाहीं हें पहाणें व फळें व पिकें गोळा करण्याकरितां लोक योग्य वेळीं आरंभ करतात किंवा नाहीं हें पाहणें होय. ते पाटबंधारे वगैरेंचें नियमन करीत असत. प्रत्येक घराच्या मालकापासून मिळालेल्या धान्य वगैरेंच्या वर्गणीच्या योगानें ह्या लोकांचा नायक टोळींतील पाहुण्यांचें आदरातिथ्य करीत असे.

घ रें व खे डीं—यांचीं घरें साधारणतः मजबूत असतात. व तीं लांकडाचीं बनविलेलीं असतात. तीं दोन किंवा जास्त मजली असून त्यांच्यावर उघडी गच्ची असते. श्रीमंत लोक घरांवरील साध्या नमुन्याच्या कोरीव कामाचे फार शोकी आहेत. खोल्या चौकोनी असून त्यांनां लहान खिडक्या असतात. दरवाज्यांनां बंद करण्याकरितां मागेंपुढें सरकणारे लांकडी अडसर असतात. कांहीं खेडीं अगदीं दाट वस्तीचीं लांबट व किल्ल्याच्या आकाराचीं असतात. कांहीं खेडीं थोड्याशा झोंपड्यांचीं असून एखाद्या टेंकडीवर बसविलेलीं असतात. त्यांत प्रवेश करण्याकरितां शिडी असते. कांहीं थंड खोऱ्यांतील घरें जमीनींत खोल असतात. खांचा असलेल्या खांबांचा शिड्यांसारखा उपयोग करतात.

स्व भा व—काफिर लोक सरासरी ५ फुट ६ इंच उंच असतात. ते अशक्त असतात. ते नेहमीं निकृष्ट स्थितींतच आढळतात. ते फार चपल, उड्या मारणारे, कधींहि न थकतां चालणारे व डोंगर चढण्यांत वस्ताद असतात. कांहीं थोडेसे लोक उंच व मजबूत असतात. दिसण्यांत ते पूर्वेकडील लोकांप्रमाणें असतात. ते आपल्या सोबत्यांशीं कधींहि बेइमान होत नाहींत. काफिर लोक आपल्या मित्रांनां अंतर देत नाहींत. ते क्रूर नसतात. मुलें व जनावरें यांच्यावर ते दया करतात, दुबळे व म्हातारे यांचें ते रक्षण करतात. लोभ व मत्सरामुळें यांच्यांत परस्परांत जरी नेहमीं भांडणें होतात. तरी गोतावळ्याशीं किंवा नातेवाईकाशीं मात्र ते तीं भांडणें विसरतात.

पो शा ख, ह त्या रें व भां डीं कुं डीं—येथील पुरुषांचा राष्ट्रीय पोशाख म्हटला म्हणजे ओबडधोबड रीतीनें कमाविलेलें बकऱ्याचें कातडें होय. हें कातडें छातीजवळ खिळे जडविलेल्या चामड्याच्या पट्ट्यानें आवळलेलें असतें व या पट्ट्यांत लोखंड किंवा तांब्यानें मढविलेल्या लांकडी म्यानांत बसविलेली एक ओबडधोबड आकाराची व गुलामांनीं बनविलेली कट्यार अडकविलेली असते. बायकांच्या अंगांत काळ्या रंगाचें लोंकरी झबलें असतें. हें खांद्याखालीं घेरदार असतें व याला तांबडी किनार असते. हें छातीजवळ लोखंडी टांचणी अगर कांट्यानें अडकविलेलें असतें व शरीराभोंवती हें एका विणलेल्या पट्ट्यानें आंवळलेलें असतें. याला पुढच्या अंगास गांठ मारून याचा घोळ ( झालर ) खालीं सोडलेला असतो; कांहीं टोळ्या कापसाचे कपडे वापरतात. या प्रदेशांत कपड्यांची दुर्मिळता आहे. बकऱ्याच्या केसानें बनविलेले बर्फांत चालण्याकरितां उत्तम "गेरट" नांवाचे जोडे हे लोक वापरतात. लोंकरी घोंगड्या व बकऱ्याच्या केंसांचे बनविलेले बुरणूस हे लोक आंथरण्या पांघरण्याकरितां वापरतात. वीरांचीं आयुधें म्हटलीं म्हणजे

चकमकीनें उडविण्याच्या बंदुका, सोटे, व हलक्या कुऱ्हाडी हीं होत. मऊ दगड खाणींतून काढून त्यांचीं भांडीं करतात व धान्य ठेवण्याकरितां लांकडाच्या कोरून पेट्या व करंडे बनवितात दूध, लोणी, पाणी वगैरे ठेवण्याकरितां मुठीसहित सुबक खोदीव काम असलेले पेले करतात. बकऱ्याच्या चामड्याच्या बनविलेल्या पिशव्यांत दारू, धान्य वगैरे साठवितात. बांसरी लहान नगारे जुन्या तऱ्हेच्या सारंग्या व एक प्रकारची वीणा हीं त्यांचीं गीतवाद्यें आहेत.

वि शि ष्ट चा ली री ती.—प्रत्येक खेड्यांत वस्तीबाहेर एका बाजूस बाळंतिणी व विटाळशी बायकाकरितां एक जागा असते. जन्मल्याबरोबर मुलांचीं नांवें ठेवितात. लग्न म्हणजे दलालामार्फत बायको विकत घेणें होय. घटस्फोट म्हणजे बायकोला गुलाम म्हणून विकणें.यांचे प्रेतसंस्कार फार लांबलचक असतात व ते पुरुष असल्यास त्याच्या शौर्यावर व स्त्री असल्यास तिच्या घराण्याची संपत्ति व नांवारूपावर अवलंबून असतात. येथील लोक प्रेतांनां पुरीत नाहींत; तर तीं लांकडी पेटींत घालून त्या पेटया दूर एकीकडे जमा करून ठेवितात. या लोकांची नीतिमत्ता फार हलक्या दर्जाची आहे. यांच्यात रंगेलपणा फार असून व्यभिचार म्हणजे शिष्टाचार समजला जातो ! मात्र तो नवऱ्याच्या लक्षांत येतां कामा नये ! चोरी, मारामारी व इतर गुन्हे यांबद्दलच्या शिक्षा नुकसानभरपाईच्या तत्वावर बसविलेल्या आहेत. न्यायाची कल्पना काफीर लोकांनां पूर्ण आहे. शेतकीचीं कामें बायका करतात. गुरें चारणें व दूधदुभतें करणें हे काफीर लोकांचे मुख्य धंदे आहेत.

इ ति हा स.—काफिरिस्तानचा इतिहास प्रचारांत असलेल्या दंतकथांचा बनलेला आहे. ज्याला मध्ययुगीन आशियाखंडांतील लोक बिलौर म्हणत असत अशा काश्मीर व काबूल यांच्या मधल्या लोकांच्या प्रदेशालाच सध्यां काफिरिस्तान म्हणतात, असें सर हेन्री यूल म्हणतो. तैमूरच्या इतिहासांत काफीर लोकांच्या नांवाचा उल्लेख आहे. अंदारब येथील लोकांच्या विनंतीवरून हिंदुस्थानच्या स्वारीवर जातांनां तैमूरनें या देशावर स्वारी केली होती. काटूरच्या दऱ्याखोऱ्यांत त्यानें आपल्या स्वारीच्या स्मरणार्थ एक शिलालेख लिहविला. या प्रदेशासंबंधीं माहिती बाबरनें आपल्या स्मरणवहींत दिली आहे. ऐने-इ-अकबरींत या लोकांचा एखाद-दुसरा उल्लेख सांपडतो. सर जॉर्ज रॉबर्टसन या लोकांत जाऊन राहिल्यानंतर १८९२ मध्यें त्याच्याबरोबर कांहीं काफीरलोक हिंदुस्थानांत आले व यानंतर या लोकांशीं बरेंच दळणवळण सुरू झालें. अखेरीस १८९५ मध्यें हिंदुस्थानसरकार व काबूलचा अमीर यांच्यामधील तहान्वयें हा प्रदेश काबूलचा अमीर अबदूल रहमान याच्या नामधारी सत्तेखालीं आला. [ रॉबर्टसन-दि काफीर्स ऑफ दि हिंदुकुश; बेल्यू-अफगाणिस्तान अँड दि अफगाण्स; मॅकमोहन-दि सदर्न बॉर्डर्स ऑफ अफगाणिस्तान; टेट-नॉर्दन अफगाणिस्तान ].

कॉफी—काफीच्या झाडांस लॅटिनमध्यें काफियां, अराबिका; मराठींत कॉफी किंवा बुंद हीं नांवें आहेत.

अरब लोकांनां जेव्हां पहिल्यानें कॉफी माहित झाली तेव्हां तिचा मादक गुणधर्म असल्यामुळें इस्लामी धर्मांत सांगितल्याप्रमाणें इतर सर्व मादक पदार्थांबरोबर ते हिचाहि तिटकारा करूं लागले.

व स्तु क्षे त्र.—काफीचें झाड मूळचें अबिसीनिया, सुदान, गिनी व मोझँबिक् येथील डोंगराळ प्रदेशांतील आहे, असें वनस्पतिशास्त्रज्ञांचें मत आहे. तें मूळचें अरबस्तानांतील आहे असेंहि कित्येक लेखकांचें मत आहे. कॉफीचीं झाडें अरबस्तानांत पुष्कळ आहेत ही गोष्ट मात्र खरी.

इ ति हा स.—कुराणांत अथवा हिब्रू धर्मग्रंथांत कॉफीचा उल्लेख नसल्यामुळें कॉफीचें झाड अरबस्तानांत जरी मूळचेंच असलें तरी तें फार थोड्यांनां माहीत असावें असें वाटतें. मक्का, मदीना व बगदाद येथील लोकांनां १४ व्या शतकापर्यंत कॉफी चांगली माहित नसल्याचा पुरावा मिळतो. कॉफीपासून पेय तयार करण्याची कल्पना फार अलीकडची असून तिचा उगम इराणांत झाला असावा असें वाटतें. काव्हा नांवाचें पेय फळाच्या आंतील गाभ्याचें करीत असल्यामुळें कांहीं वेळ पर्यंत तें तसेंच ठेवल्यास तें मादक बनून त्याला एकप्रकारचा वासहि येत असे. ईजिप्तमध्यें गेलेल्या अल्पीनस ( १५८३ ), व्हेस्लींग ( १७३५ ) वगैरे प्रवाशांनीं कॉफीचें बरेंच वर्णन केलें आहे व त्यापूर्वी तेथें काफीचा उल्लेख आढळत नाहीं. यावरून त्याच सुमारास ईजिप्तमध्यें काफीचा उपयोग लोकांनां माहीत झाला असावा.

सँडिजीनें ( १६१० ) कॉन्स्टांटिनोपल येथील कॉफीगृहांचा उल्लेख केला असून पिएट्रो डेलाव्हॅले ( १६६५ ) यानें कॉफीची कृति दिली असून कॉफी पाचक, तरतरी आणणारी व रक्तशुद्धि करणारी आहे असें मत दिलें आहे. हरबर्ट ( १६७७ ) व फ्रायर या प्रवाशांनीं कॉफी हें इराणी पेय असून दुकानांतून विकत मिळत असे व दरबारांतून समारंभाच्या वेळीं तिचा उपयोग करीत असत, अशी माहिती दिली आहे. कॉफीच्या भाजलेल्या बियांचा उपयोग प्रमुखत्वानें आरंभीं एडन येथें करण्यांत आला. लवकरच बियांची उपयुक्तता मक्का, मदीना व केरो येथील लोकांनां माहीत झाली व एका शतकाच्या आंतच दमास्कस, अलेप्पो व कॉन्स्टांटिनोपल येथील लोकहि भाजलेल्या बिया उपयोगांत आणूं लागले. पुढें लवकरच जास्त धर्मभोळ्या लोकांनीं सार्वजनिक कॉफीगृहांनां प्रतिबंध केला व अशा रीतीनें तेथें होणारे नाच तमाशे बंद केले. १५११ मध्यें मक्केच्या गव्हर्नरनें कॉफी हें पेय मादक असल्यामुळें त्याचें सेवन जाहीर रीतीनें बंद पाडलें. परंतु सुलतान हा स्वतः कॉफी पिणारा असल्यामुळें त्यानें आपल्या गव्हर्नरचा हुकूम रद्द केला. पुढें काफीगृहांत दंगे धोपे होऊं लागल्यामुळें तीं बंद करण्यांत आलीं. १५३३ त कॉफी पिणें कायदेशीर मानणारे व न

मानणारे असे केरोच्या लोकांत दोन तट झाले. कॉफीच्या बिया भाजल्या म्हणजे त्या कोळशाप्रमाणें होतात व कोळसा खाण्याकरितां विकणें बेकायदेशीर आहे या सबबीवर १५५४ मध्यें कॉन्स्टांटिनोपल येथील कॉफीगृहें कायमचीं बंद करण्यांत आलीं.

हिंदुस्थानचे प्राचीन राजे, प्रवाशी व वनस्पतिशास्त्रज्ञ यांच्या पैकीं फारच थोड्या लोकांनीं कॉफीची माहिती दिली आहे. टॅव्हरनिअर (१६७६) नें हिंदुस्थानांत व इराणांत काफी होत नसून तिचा पुरवठा अरवस्तानांतून होत असें अशी माहिती दिली आहे.

१६९० पर्यंत जगांतील कॉफीचा पुरवठा अरवस्तान व अबिसीनिया येथूनच होत असे.

हिंदुस्थानांत कॉफी केव्हां आली याची खात्रीपूर्वक माहिती मिळत नाहीं. परंतु सुमारें दोन शतकांपूर्वी बावाबुदन नांवाच्या एका मुसुलमान यात्रेकरूनें मक्केहून परत येतांना आपणाबरोबर सात बिया आणल्या असें पुष्कळांचें मत आहे. १८२३ च्या सुमारास कलकत्याच्या बागांतून कॉफीचीं झाडें असल्याची माहिती मिळते. परंतु हिंदुस्थानच्या सपाट प्रदेशापेक्षां दक्षिणेकडील डोंगराळ प्रदेशांतच कॉफीचीं झाडें चांगलीं वाढतात. चिकमुग्लूरच्या जवळ कॅनन्सनें १८३० त कॉफीची लागवड पहिल्यानें पद्धतशीर रीतीनें केली. १८४० त मनान्टोडी व १८४६ त नीलगिरी टेकड्यांतून तिची लागवड केली गेली. पोर्तुगीझ लोक सिलोनमध्यें येण्यापूर्वींच अरब लोकांनीं कॉफी तेथें नेली होती व १६९० त डच लोकांनीं तिची पद्धतशीर लागवड सिलोनमध्यें सुरू केली. पुढें कॉफीच्या झाडांवर कांहीं रोग पडल्यामुळें १८८७ पासून सिलोन येथील कॉफीची लागवड अजीबात बंद झाली.

**काफीचा प्रसार.**—कॉफीच्या वाढत्या मागणीबरोबर अरवस्तान व अबिसीनिया या दोनच ठिकाणीं तिची लागवड न होतां जगाच्या इतर भागांतूनहि ती सुरू झाली. डच ईस्ट इंडिया कंपनीनें बटाव्हिया येथें तिची लागवड करून कॉफीच्या व्यापारांत बराच पुढाकार घेतला. उष्ण कटिबंधांतील डोंगराळ प्रदेशांत कॉफीची लागवड होऊं लागून उत्तम प्रकारची कॉफी निघूं लागली. अलीकडे सर्व जगांत कॉफीची एका दररोजच्या जरूरीच्या पेयांत गणना होते.

**लागवडीच्या उपजाती व प्रकार.**—अलीकडील कॉफीच्या लागवडींत तीन उपजाती महत्वाच्या आहेत. त्यांचें वर्णन खील प्रमाणें:—

लिबेरिका कॉफी:—उष्ण कटिबंधांतील पश्चिम आफ्रिकेंत हीं झाडें मूळचींच आहेत. परंतु येथें त्यांच्या लागवडीकडे कोणी फारसें लक्ष देत नाहीं. फर्ग्युसन यानें या झाडांचा सिलोनमधील लागवडीचा १८७८ पर्यंतचा इतिहास दिला आहे. सिलोनमध्यें जेव्हां कॉफीच्या पानांचा रोग सुरू झाला त्याच सुमारास यूरोपमध्यें ह्या उपजातींची माहिती झाली. हिचीं झाडें मजबूत असल्यामुळें या वरील रोगांपासून या झाडाचें फारसें नुकसान होणार नाहीं असा समज झाला व तो पुढें थोडा बहुत खरा ठरला. कॉफिआ अरेबिका प्रमाणेंच या झाडांनाहि हेमिलिआ नांवाच्या रोगापासून उपद्रव होतो. परंतु रोपांची चांगली जोपासना केल्यास लवकरच त्यांची पूर्ण वाढ होऊन या रोगाशीं झगडण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं येतें असें सर डॅनिअल मॉरिस यांचें म्हणणें आहे.

हिंदुस्थानांतील अनुभव असा आहे कीं, अरेबिका व हीं झाडें यांनां वाढण्यास सारखीच सुपीक जमीन लागते. सर्द व गरम हवेची त्यांनां जरूर असून सर्व वर्षभर मिळून १०० इंच पाऊस पडणारा भाग या झाडांच्या वाढीला फार चांगला. अवर्षणापासून ह्या झाडांचें फार नुकसान होतें. उथळ, पाणथळ, वाळू व दगडांचें प्रमाण जास्त असलेली व फार काळी अशा जमीनींत या झाडांची वाढ होत नाहीं. नेहमीं ओलसर असणाऱ्या व जेथें पाटबंधाऱ्यांचें पाणी देतां येतें अशा जागीं हीं झाडें चांगलीं वाढतात. डोंगराळ प्रदेशापेक्षां सपाट मैदान या झाडांनां मानवतें. वर सांगितलेली परिस्थिति या झाडांनां जरूर असल्यामुळें तीं वेस्ट इंडीज, सिलोन, मलायाद्वीपकल्प, उत्तर बोर्निओ, सुमात्रा, जावा व हिंदुस्थानांतील सिलहट, आसाम, ब्रह्मदेश व अंदमान बेटें येथें हीं झाडें होतात. मादागास्करच्या पूर्वकिनाऱ्यावर यांची बरीच लागवड होते. येथील झाडें मिश्र जातींचीं असून त्यांपासून तयार होणारी कॉफी अरवस्तानांतील कॉफीपेक्षां चांगली असते. हीं झाडें मोठालीं होत असल्यामुळें एका एकरांत सरासरी ४०० झाडें लाविवात. अलीकडे बरींच वर्षें सर्व जगभर निरनिराळ्या मिश्र जातींची लागवड करूं लागले आहेत. अशा झाडांनां कॉफीच्या रोगांपासून भीति कमी असते. लिबेरियन झाडांपासून नियमित व पुष्कळ उत्पन्न होतें व तीं झाडें इतर जातींच्या झाडांपेक्षां जास्त मजबूत असतात. सखल प्रदेशांतील झाडांनां उंचवट्यावरील झाडांपेक्षां पुष्कळ व मोठालीं फळें येतात. परंतु तीं फारशीं रुचकर नसतात. फळांपासून कॉफीचें उत्पन्न करणें जरा मेहनतीचें काम आहे. परंतु बिया सावकाश व काळजीपूर्वक वाळविल्यास त्या मेहनतीचें फळ मिळतें. या झाडांतील या कमीपणामुळें व्यापारांत या कॉफीला फारसें महत्व नाहीं.

स्टेनोफिला.—कॉफी—या उपजातीचीं झाडें पश्चिम आफ्रिकेंत होतात. हा अरेबिकाच्या पैकींच एक प्रकार असावा असें वेन्थामला वाटलें होतें. या झाडांची लागवड प्रयोगाकरितां म्हणून त्रिनिदाद, जावा, सिलोन, म्हैसूर व इतर कांहीं ठिकाणीं केली आहे. अरेबिका व लिबेरिका कॉफी यांपासून या जातींत कांहीं मिश्र झाडें झालीं आहेत. या जातीचीं

झाडें चांगलीं वाढतात व त्यांच्यांपासून पुष्कळ उत्पन्न होतें, परंतु त्यांना वहार फार उशीरां येतो.

लॅरॅटी कॉफी.—आफ्रिकेच्या उष्णकटिबंधांत या जातींचीं झाडें होतात. या झाडांनां 'कांगो कॉफी' असें म्हणतात; यांची वाढ सपाटून होते. कॉफीच्या रोगांपासून त्यांचें फारसें नुकसान होत नाहीं व बियांनां एक तऱ्हेचा चांगला वास येतो. हीं झाडें बहुतेक ओढ्यांच्या कांठांवरून होतात. त्यांनां ओलसर जमीन लागत असून दाट छाया मुळींच मानवत नाहीं. लिबेरिका जातीच्या झाडांप्रमाणें हें झाड शेंड्याकडे निमुळतें नसून वाटोळेंच असतें. नुनेझ नदीच्या कांठीं हीं झाडें पहिल्यानें दिसल्यामुळें त्यांनां 'रिओनुनेझ कॉफी' असेंहि म्हणतात. हिंदुस्थान व सिलोनमधील या झाडांच्या लागवडीचे प्रयत्न निष्फळ झाले.

लागवडीचें क्षेत्रफळ.—सरकारी आंकड्यांवरून गेल्या ५० वर्षांत कॉफीच्या लागवडींत विलक्षण फेरफार झाला आहे असें आढळतें. १८८९, १८९१ व १८९३ सालीं झालेल्या ब्राझीलमधील घडामोडींमुळें पुढें एकदोन वर्षे कॉफीचें पीक तेथें फार कमी आलें. यामुळें हिंदुस्थानच्या कॉफीच्या लागवडीला यापासून बराच फायदा झाला. १९०४ सालीं कॉफीच्या लागवडीचें क्षेत्रफळ २,१२,९६४ एकर होतें, तेंच १९०६ सालीं २,१०,६८८ एकर झालें.

१९१७–१८ सालीं हिंदुस्थानांत कॉफीच्या पिकाखालीं लागवडीस असलेली जमीन.

| स्थल. | एकर. |
|---|---|
| म्हैसूरसंस्थान | १०८१७८ |
| मद्रासइलाखा | ५२६८६ |
| कुर्ग | ४२४९१ |
| कोचीन | ५९२२ |
| त्रावणकोर | १२८८ |
| ब्रह्मदेश | ८५ |
| मुंबईइलाखा | ४९ |
| एकूण | २१०६९४ |

कॉफीचें उत्पन्नः—हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व कॉफीची निर्गत मुख्यत्वेंकरून ग्रेटब्रिटन व फ्रान्सकडे होते. आजपर्यंत (म्हणजे १८८५–८६ सालीं) सर्वांत जास्त ४ कोटी १० लक्ष पौंड कॉफी परदेशीं पाठविण्यांत आली. १८९५ सालीं ३ कोटी पौंडांची निर्गत झाली. १९०५–०६ सालीं ४,०१,४०,३८४ पौंड,१९१५–१६सालीं १,९८,२४,०००पौंड व १९२०–२१ मध्यें २,६१,४०८००० पौंड कॉफी परदेशीं रवाना झाली. ब्राझीलची स्वस्त कॉफी यूरोपच्या बाजारपेठेंत असल्यानें हिंदुस्थानांतून होणारी निर्गत कमी होत आहे.

सन १९२०–२१ सालीं कॉफीची निर्गत मागील सालापेक्षां १४ टक्क्यानीं कमी झाली. प्रतिकूल परिस्थितीमुळें फ्रान्सनें शेंकडा ५० इतकी हिंदी कॉफीची मागणी कमी केली, पण ग्रेटब्रिटन–आयर्लंडनें ३७ टक्के मागणी वाढविली. या सालीं नेहमींप्रमाणें ग्रीसकडे निर्गत झाली नाहीं. आशियांतील तुर्कस्तानानें चौपट व अरबस्तान, बेहेरीन बेटें आणि ऑस्ट्रेलिया यांनीं पूर्वीच्या दुप्पट कॉफी आणविली. पण सिंहलद्वीपांत होणारा पुरवठा निम्म्यापेक्षां उतरला.

[सँडी, हर्बर्ट, टॅव्हर्नियर, थेव्हेनॉट, ब्रूस यांचीं प्रवासवृत्तें; ऐनी अकबरी; लेहमॅन–कॉफी कल्टिव्हेशन; ईलियट–गोल्ड; स्पोर्ट अँड कॉफी इन मायसोर; थुर्बर–कॉफी, फ्रॉम प्लँटेशन टु कप; वाल–मॅन्युअरिंग ऑफ कॉफी इस्टेट्स; बर्जेस ब्राऊन—कॉफी प्लँटिंग; ह्यूजेस–सिलोन कॉफी सॉईल्स अँड मॅन्युअर्स; हार्मन–कॉफी–लीफ डिसीज; बँगलोर; ब्रिटानिका; वॅट वगैरे.]

**काफीखान.**—याचें खरें नांव महमद हाशमखान हें असून त्याचा बाप खाजे मीर हा देखील एक इतिहासकारच होता. खाजे मीर हा आरंभीं मुरादवक्षाच्या चाकरींतील एक उच्च दर्जाचा अधिकारी होता. परंतु मुरादवक्षाचा कारागृहांत अंत झाल्यावर खाजे मीर अवरंगजेबाच्या पदरीं नोकरीस राहिला. त्याचा मुलगा महंमद हाशमखान हा अवरंगजेबाच्या चाकरींतच लहानाचा मोठा झाला. महमद हाशमखानानें अवरंगजेबाच्या सैन्यांत व त्याचप्रमाणें दरबारांतहि कामें केलीं होतीं. यानें आपला इतिहास अवरंगजेबाच्या मरणा (इ. स. १७०७) नंतर २६ वर्षांनीं लिहिला. ग्रँटडफ आपला इतिहास प्रसिद्ध करीपावेतों (मे १८२६) याच्या इतिहासाचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध झालें नव्हतें.

शहाजहानाची स्वारी व औरंगजेबाची पूर्वकारकीर्द ही काफीखानानें सरकारी कागदपत्रांतून सारांशरूपानें दिलेली आहे. तसेंच बाप व मित्र यांच्या सांगण्यावरूनहि त्यानें कांहीं भाग रचला आहे. मात्र १६८८ पासून पुढील भाग त्यानें स्वतः पाहिलेला लिहिला आहे. त्याच्या इतिहासांत मुसुलमानांची अवास्तव व खोटी स्तुति व हिंदूंची निर्भर्त्सना आहे. तो निःपक्षपाति नसल्यानें त्याच्या इतिहासास बखरीचें स्वरूप आलें आहे (डफ. जदुनाथ.)

**काफ्रारिया**—दक्षिणअफ्रिकेंतील केप प्रांताच्या आग्नेयकडील भागास काफ्रारिआ म्हणतात. याचा अर्थ काफीर लोकांचा देश असा होतो. ब्रिटिश काफ्रारिआ १८६५ सालीं केपकॉलनीस जोडलें गेलें. यांत विल्यम राजाचें शहर व पूर्व लंडन अशीं दोन शहरें आहेत. ड्रेकनवर्ग पर्वताच्या दक्षिणेकडील केनदीच्या पलीकडे थेट नाताळ सरहद्दीपर्यंत खास काफ्रारिआ आहे. ट्रॅन्स्के, पोंडोलँड, टेंबुलँड व पूर्व ग्रीक्वालँड ह्यांचा केप प्रांतांत समावेश होतो. यांचें क्षेत्रफळ १८३१० चौरसमैल आहे. १९०४ सालीं येथील लोकसंख्या ८,३४,६४४

होती. के, बाशी, उमटाटा, सेन्ट जॉन (उमझीमव्हुबु) व उमटामव्हुना ह्या येथील प्रसिद्ध नद्या आहेत.

सेंट जॉन नदीचें खोरें १४० मैल लांब आहे. काफ्रारिआ फार सुपीक आहे. येथील हवा आरोग्यकारक आहे. सेन्ट जॉन नदीजवळ गंधकाचे झरे आहेत. येथें गहुं व दुसरीं द्विदल धान्यें पिकतात. यांतील मुख्य शहरें, त्यांची लोकसंख्या व महत्व पुढीलप्रमाणेः—कॉकस्टाड, लो. सं २९०३; हें पूर्वग्रीक्वालँडच्या राजधानीचें शहर होतें. उमटाटा, लो. सं. २३४२; हें टेंबुलँडची राजधानी व अँग्लिकन बिशपचें राहण्याचें ठिकाण होय. पोर्ट सेंटजॉन, हें पोन्डोलंडचें मुख्य शहर. बुटरवर्थ. हें ट्रँस्केचें मुख्य शहर. काला लो. सं. १००० हें काफ्रारिआमधील शिक्षणाचें केंद्रस्थान. पूर्वलंडनपासून बुटरवर्थवरून उमटाटापर्यंत मुख्य रेल्वे आहे.

राज्यकारभारः—येथील शासनपद्धति केप प्रांतासारखीच आहे. खरी सत्ता मुख्य मॅजिस्ट्रेटच्या हातांत असते.

प्रॉटेस्टंट धर्मप्रसारक-मंडळाचीं मंदिरें व शिक्षण संस्था येथें वऱ्याच आहेत. फिंगोलंड येथील लोक मूर्तिपूजक असून बाकीलोक ख्रिश्चन धर्माचे आहेत.

कीसकामा नदीच्या पूर्वेकडील भागात १८४७ सालीं ब्रिटिश काफ्रारिआ साम्राज्याची वसाहत करण्यांत येऊन १८६५ सालीं ती केप कॉलनीला जोडली गेली. १८७५पर्यंत ट्रान्स्कियन प्रांत स्वतंत्र होता. परंतु या वेळेस टेंबुलोक ब्रिटीशांचे आश्रित होऊन राहिले. १८७७ सालीं फिंगो व ग्यालेकामध्यें झालेल्या युद्धांत केली नांवाच्या ग्यालेक सरदाराचा मुलुख ब्रिटीशांनां मिळाला. १८८५ सालीं ग्वालकालँड, ट्रँस्के, टेंबुलँड, बोमव्हानालँड वगैरे प्रांत कॉलनीला जोडले गेले. १८८४ सालीं सेंट जॉनचा केपकॉलनींत समावेश झाला.

**कावरा**-(कॅपारिसस्पिनोसा) या नांवाचीं लहान लहान भुईवर पसरलेलीं झुडपें उत्तरहिंदुस्थानांतील डोंगराळ प्रदेशांत आढळतात. यूरोपमध्यें यांनां खाण्याची केपर (एडिबलकेपर), हिंदी भाषेंत काब्रा, सिंधी भाषेंत कालवारी वगैरे निरनिराळीं नांवें आहेत. या झुडपाच्या पुष्कळ जाती आहेत. परंतु त्यांपैकीं कावरा करीला अथवा नेपतीचें झाड (कॅपारिस ॲफिल), अरदंड (कॅपारिस हॉरिडा) व पचोवंद (कॅपारिस ग्रांडिस) ह्या जाती महत्वाच्या आहेत.

नेपतीचीं झुडपें (कॅपारिस अफिला) पंजाब, गुजराथ, राजपुताना, दक्षिणमहाराष्ट्र व दक्षिणकर्नाटकमधील रुक्ष भागांतून होतात. अरदंड (कॅपारिस हॉरिडा) नांवाचीं झुडपें गंगाथडी, चितागांग, पेगू आणि सिलोन (लंका) ह्या भागांतून व पचोवंद (कॅपारिस ग्रांडिस) हीं दक्षिणकर्नाटक व सिलोन मधून अढळतात.

या निरनिराळ्या जातींपासून तेल काढितात व यासाठीं अफगाणिस्तान, पश्चिम आशिया, यूरोप, उत्तर आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व सॅन्डविच् बेटें वगैरे ठिकाणा हीं पाठवितात. पचोवंदपासून निघणाऱ्या तेलाचा जाळण्याकरितां व औषधाकरितां उपयोग करितात. कावरापासून एक प्रकारचें बाष्पभावी तेल निघतें. ग्रीक व लॅटिन् लेखांतून या झुडुपांचा उल्लेख केला आहे आणि त्या लोकांपासूनच अरब लोकांना ह्यांचा औषधांत कसा उपयोग करावा हें माहित झालें असावें. यकृत् (लिव्हर) व प्लीहा या रोगांवर ह्या झुडपांच्या औषधाचा उपयोग करीत असत. या झुडपांच्या कोणत्याहि भागापासून तयार केलेलें औषध उत्तेजक म्हणून हिंदुस्तानांत अंगाला लावण्याकरितां वापरतात. करीला (कॅपारिस अफिला) व कावरा (स्पिनोसा) यांचीं फळें व कळया यांचा हिंदुस्तानांतील लोक खाण्याकडे उपयोग करितात. इंग्लंडमधील खुल्या हवेच्या जागीं याची चांगल्या तऱ्हेनें लागवड होते. परंतु हिंवाळयांत त्याची फार काळजी घ्यावी लागते. करीलाच्या लांकडाच्या हिंदुस्थानांत फण्या करितात. या लांकडाला वाळवी लागत नसल्यामुळें इमारतीकरितां त्याच्या तुळया व वांसे उपयोगांत आणितात.

**कावूर**—मुंबई इलाखा. बेळगांव जिल्हा. चिकोडीच्या नैर्ऋत्येस सुमारें १२ मैलांवर हें गांव आहे. येथें ईश्वर देवाचें जुनाट व पडकें देऊळ असून त्यांत एक शिलालेख आहे. गांवाबाहेर मोंगलांच्या वेळचे दोन घुमट आहेत.

**काबूल**, प्रांत.—अफगाणिस्तानाचा मध्यवर्ती व महत्वाचा प्रांत. उत्तरेस अफगाण-तुर्कस्तान, पूर्वेस जलालाबाद जिल्हा, दक्षिणेस आणि पश्चिमेस कंदहार आणि हिरात. ह्या प्रांत समुद्रापासून सुमारें ७००० फूट किंवा त्याहून जास्त उंचीवर असावा. कोहिस्तान, पंजशीर, बामिआन, सैघान आणि निजराव हे उत्तरेकडील जिल्हे होत. हजारजात, पश्चिमेकडील व नैर्ऋत्येकडील जिल्हा होय. गझनी, गर्देश, खोस्ट आणि लोंगर हे जिल्हे दक्षिणेस व आग्नेयीस आहेत. येथील हिंवाळा फार कडक असतो. परंतु इतर ऋतू अगदीं यूरोपांतील ऋतूंप्रमाणें असतात.

या भागांत पर्शियन, ग्रीक, हिंदु, बौद्ध व मुसुलमान या लोकांचें अस्तित्व शाबीद करणारे पुष्कळ प्राचीन अवशेष सांपडतात.

शहर.—अफगाणिस्तानची राजधानी. उत्तर अक्षांश ३४° ३०′ व पूर्व रेखांश ६९°१३′. हें शहर पेशावरपासून १८१ मैलांवर काबूल नदीच्या दक्षिण-तीरावर वसलेलें आहे. हें शहर समुद्रसपाटीपासून ५७८० फूट उंचीवर आहे. शहराच्या उत्तरेस नदीच्या वामतीरावर असलेल्या काबूल शहरभागाच्या पलीकडे शेरपुर नांवाचा लष्करी छावणी असून जवळच बेमारू नांवाचा पर्वत आहे. येथें सुमारें दीड लाख वसती असून पैकीं एक लाख काबुली व चार हजार हिंदु असावेत. शहरचा परिघ ३ ३/४ मैल असून हल्लीं शहरास तट नाहीं. परंतु पूर्वी या शहरास तट होता याविषयीं पुष्कळ दृश्य दाखले अद्यापि आहेत.

अमीराच्या राज्यांतील जरी हें सर्वांत श्रीमंत शहर आहे तरी वरकांती तें तसें दिसत नाहीं. घरें साधीं विटांचींच आहेत. यास पूर्वी सात दरवाजे होते. हल्लीं पूर्वेकडील दरवाजा-इ-लाहुरि हा एकच शिल्लक आहे. शहराचे मोहल्ले पाडलेले आहेत. रस्ते फरसबंदी आहेत पण सांडपाण्याची योग्य व्यवस्था केलेली नसल्यामुळें ते अत्यंत घाणेरडे आहेत.

काबुलची हवा निरोगी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. शेरपुर छावणीपलीकडील वझिराबाद नांवाचा मोठा तलाव हल्लीं कोरडा पडला आहे; परंतु वाला हिस्सार व वेनी हिस्सार या पर्वतांतील प्रदेश दलदलीचा असल्यामुळें हिंवतापाची सांथ वारंवार उद्भवते. तथापि पाण्याची सोय, सुंदर हवा व आल्हाददायक असा आसमंतांतील प्रदेश असल्यामुळें काबुलशहरांतील मृत्यूचें प्रमाण अफगाणिस्तानांतील इतर कोणत्याहि गांवांपेक्षां कमी आहे. येथें धान्य वरेंच स्वस्त असतें. प्राचीन महत्वाचीं ठिकाणें काबूल शहरांत फारशीं नाहींत. तैमूरनें बांधलेली मशीद-इ-सफेद, बाबरनें बांधलेली मशीद-इ-वाला-चौक, व पूर्वीच्या एका अमीरानें बांधलेली जाम मशीद या इमारती पहाण्यासारख्या आहेत. बाबरच्या दरग्याभोंवती सुंदर बागबगीचा केलेला आहे. अबदुल रहिमानखान हा अमीर झाल्यापासून यानें पुष्कळ सुधारणा केली. त्यानें निरनिराळ्या कारखान्यांवर युरोपिअन तज्ज्ञ माणसांची नेमणूक करून बऱ्याच लष्करी उपयोगाच्या वस्तू आपल्याच राज्यांत करविल्या आहेत. काबुली लोकांनीं स्वतः एकाद्या विशिष्ट धंद्यांतील तत्व समजून घेतल्यानंतर तो ते धंदा उत्तम चालवूं शकतात. इ. स. १८९४ सालीं एकंदर १४युरोपिअन या अमीरानें नेमले होते. इ. स. १९०४ सालीं फक्त दोनच होते. त्यांपैकीं एक तोफा करणारा व एक इलेक्ट्रिकल इंजीनिअर होता.

काबूल नदीवर एकंदर पांच पूल असून त्यांपैकीं एक बाबरच्या वेळचा असून तो हल्लीं पडलेला आहे; व दुसरा शहाजहाननें बांधलेला आहे.

काबुलांतील फळफळावळ फार प्रसिद्ध आहे. या भागांत कित्येक मैल फळबागा सारख्या लागलेल्या आहेत. येथें सफरचंद, पिअर, क्विन्स, प्लम, अप्रिकॉट, पीच, चेरी, मलबेरी, द्राक्षें इत्यादि फळें पुष्कळ पिकतात. येथील कलिंगडें हिंदुस्थानांत फार दूरवर पाठविलीं जातात.

**इतिहास.**—काबूलचें प्राचीन नांव ( ह्युएनत्संगच्या वेळचें, कदाचित् चिनी ) कपिश होतें (६३०). त्यावेळीं येथील राजा क्षत्रिय असून बौद्धमतानुयायी होता. त्याचें नांव ह्युएननें दिलें नाहीं; पण त्याचा अंमल लंपाक, नगर व गांधार या प्रांतांवर होता. गांधार प्रांत प्रभाकरवर्धनाच्या नंतर या कपिश राज्यांत सामील झाला असावा. फार प्राचीन काळीं काबूल हा भारतवर्षांचाच एक प्रांत असावा. ऋग्वेदांत सप्तसिन्धूमध्यें कुभा व क्रुमु या नद्यांचीं नांवें येतात. याच हल्लींच्या काबूल व कुर्रम नद्या होत. इराणच्या इतिहासांतील प्रति भीम रुस्तुम यानें एका काबुली राजकन्येशीं लग्न लावल्याचा उल्लेख आहे. तेथील पारसिक साम्राज्यांत केव्हां केव्हां काबूल जाई यावरून काबुली लोक व राजे हे आर्यवंशी असून एकीकडे भारतीय व दुसरीकडे पारसिक आर्यांशीं त्यांचा विवाहसंबंध होई. हल्लींचे अफगाण हे आर्य व तुर्क यांचें मिश्रण असल्याचें रिस्ले यानें लिहिलें आहे. प्राचीन ग्रीक त्यांनां आर्यवंशोद्भवच समजत. इसिडोरस म्हणतो कीं, काबुली लोकांच्या देशाचें नांव आराकोसिया ( पारसिक-हरह्वती; संस्कृत-सरस्वति ) होय. पार्थिअन लोक त्याला 'श्वेतभारत' म्हणत. तुर्कांनीं काबूल जिंकीपर्यंत हा प्रदेश हिंदुस्थानांतच मोडत असे ( १०२० ). ह्युएनच्या वेळीं हें राज्य वरेंच मोठें होतें. तत्पूर्वीची सांधार माहिती उपलब्ध नाहीं. अलेक्झांडर हा काबुलास आला होता असें म्हणतात ( ख्रि. पू.३२७) चंद्रगुप्त मौर्य यानें सर्व अफगाणिस्तान जिंकलें होतें. त्यानंतर अशोकाचा काबूल हा एक प्रांत होता. पुढें ( ख्रि. पू. २०८) अंटायोकस यानें काबूलचा राजा सुभागसेनाचा पराभव केला. डेमेट्रिअस यानेंहि काबूल काबीज केलें होतें ( ख्रि. पू.१७५ ) पुढें तर मिलिंद हा साक्षात् काबूल येथेंच राज्य करूं लागला ( ख्रि पू. १६०-१४० ). पहिला कुशाण कडफिसेस हाहि काबूलचा राजा होता. (४८). ह्युएनच्या वेळचा राजा स्वतःस शहा म्हणवी. ही पदवी इराणी भाषेंतून घेतली होती. कारण काबूल राज्य इराणी साम्राज्यांत बहुधा सामील असे. सारांश काबूल राजा धर्मानें बौद्ध, वर्णानें क्षत्रिय व पदवी (शहा) नें इराणी असल्यानें हिंदी-इराणी परंपरेचा व सुधारणांचा त्यानें एकत्र मिलाफ केला होता. राजाची प्रजा सामान्यतः बौद्धधर्मी होती. लंपाक व गांधार येथील लोक हिंदु होते. काबूलची प्रजा थंड हवेंत असल्यानें गौरवर्णी असे म्हणून त्या देशाला श्वेतभारत म्हणत. अरबांनीं काबूलराजाला 'झंतबिल' म्हटलें आहे. याचा खरा अर्थ समजत नाहीं. स. ६४०-१००० पर्यंतच्या ४०० वर्षांच्या काळांतील साऱ्या राजांनां अरब लोक वरीलच नांव देत. आरबांनीं मेकरान ( ६४० ,व हिरात (६५०) जिंकून काबूलची हद्द गांठली. पुढें अबदुल रहिमाननें ६६३ त वर्षभर वेढा देऊन तें घेऊन तेथील लष्करी लोकांची कत्तल करून बायकामुलांनां गुलाम केलें. राजा मुसुलमान झाला व त्यामुळें त्याला गादीवर कायम ठेविलें; परंतु अरब परत गेल्यावर तो स्वतंत्र झाला; तेव्हां त्याच्यावर हज्जाजनें अबदुल्ला म्हणून एक अरब सेनापति पाठविला. त्याला डोंगरांत कोंडून शहानें त्याचा पराभव करून, सात लाख दीनार दंड घेऊन त्याला सोडून दिलें. तेव्हां हज्जाजनें अबदुल रहिमानास पाठविलें, त्याचाहि वरील युक्तीनेंच शहानें पराभव केला व अबदुलनेंहि बंड उभारलें ( ७०० ). पुढें ७८६ मध्यें हरून अल रशिदनें अब्बासला काबुलवर पाठविलें. त्यानें तेथील शहाविहार (बौद्ध मठ) लुटला. मात्र शहानें पूर्वीच्या लढायांप्रमाणें ( गनिमी काव्यानें ) त्याचाहि पराभव केला. या वेळीं शहा व त्याची प्रजा बौद्धच होती.

त्यानंतर समानी आरबांनीं काबूल जिंकलें ( ८५० ). तरी शहा एक शतकभर गझनीचा मांडलिक म्हणून राहिला होता. यानंतर ९३४ त तुर्की अल्फ तेगीन ( अल्फतगीन असा एकत्र उच्चार चूक आहे ) यानें गझनी घेतली, त्यावेळीं काबूलच्या हिंदुशहानें गझनीकरास साहाय्य केलें होतें. ९७५ त सबक्तगीननें काबूलचें राज्य जिंकलें, तेव्हां काबूलशहा त्याचा मांडलिक झाला. महंमूद गझनीकर यानें १०२१ त राज्यलोभानें काबूलचें सारें राज्य वशांत घातलें; त्यावेळीं शहानें निकरानें तोंड दिलें, पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. प्रजेला जुलुमानें बाटविलें. त्या वेळची एक गमतीची हकीकत आढळते ती अशी कीं, काबुलच्या सुभेदारानें, आपण बौद्ध पण गोमांस भक्षण करणार नाहीं, व खोजे बाळगणार नाहीं अशा अटी घातल्या होत्या. पण पुढें या लोकांचा व मुसुलमानांचा सर्व बाजूंनीं इतका एकजीव झाला कीं, काबूल येथें पूर्वी कधीं काळीं एक हिंदुराज्य होतें ही स्मृती सुद्धां कोणांस राहिली नाहीं !

राजतरंगिणीवरून पुढील हकीकत समजते. काश्मीरराज शंकरवर्मा यानें काबूलशहा लल्लिय याचा पराभव करून त्याचें राज्य बळकाविलें ( ९०० ). व लल्लिय पळून आलखान गुर्जराच्या आश्रयास गेला. शंकरवर्मा मेल्यावर शाहीराजांनीं काबूल पुन्हां घेतलें; यावेळीं लल्लियाचा पुत्र तोरमाण होता. या शाहीराजघराण्यांतील एक राजकन्या काश्मीरराज क्षेमगुप्तास दिली होती. दहाव्या शतकांत काबूलराज भीमशहा होता. त्यानें बौद्धधर्म टाकून व हिंदुधर्म स्वीकारून काश्मीरांत एक विष्णुमंदीर बांधलें. या घराण्यांतील शेवटचा हिंदुराजा त्रिलोचनपाल याच्यावर गझनीकरानें स्वारी केली असतां, त्यानें काश्मीरराजाच्या मदतीनें त्याला तोंड दिलें; पण शहानें सांगितलेली गनिमीकाव्याच्या. लढाईची आज्ञा काश्मीरसेनापतीनें न ऐकून उघड्या मैदानांत लढाई दिल्यानें मुसुलमानांचा जय झाला व काबूलचें हिंदु राज्य नष्ट झालें ! तुर्कांनीं राज्यांतील साऱ्या प्रजेस बाटविलें. त्रिलोचनपाल परदेशांत पळाला ( १०२० ). या काबूलशहांच्या नांवापुढें "पाल" हें उपपद येतें; त्यावरून झंतबील म्हणजे रणपाल असें नांव असावें व हा पुरुष शाहीराजघराण्याचा मूळ संस्थापक असावा अशी इतिहासज्ञांची समजूत आहे. ह्युएनत्संगच्या वेळचें क्षत्रिय घराणें व हें शाही घराणें भिन्न दिसतें. हें घराणें तुर्की होतें असें स्मिथ म्हणतो पण तें चूक आहे. राजतरंगिणीवरून लल्लिय व त्याचा वंश हा ब्राम्हण होता असें दिसतें. मात्र यांच्या राजकन्या क्षत्रियांच्या वाटेल त्या घराण्यांत देत. स्मिथचें दुसरें म्हणणें कीं ह्युएनत्संगच्या वेळचें क्षत्रिय घराणें हें कनिष्कार्चे वंशज घराणें होतें, तेंहि चुकीचें आहे. कनिष्काचे वंशज पेशावरास होते व ते ह्युएनत्संग येण्यापूर्वींच नष्ट झालें होतें. काबूलच्या क्षत्रिय घराण्यांतील शेवटच्या शहास पदच्युत करून त्याच्या लल्लिय ( अलबिरुणीचा कल्लर ) या ब्राम्हण सेनापतीनें गादी बळकाविली त्यानें "शहा" व "स्पलपति" ( स्थलपति ? समरपति ? ) या राजाच्या पदव्याहि आपल्याला घेतल्या; याच्या वंशजांचीं जीं नाणीं सांपडतात त्यांवर एका बाजूस शंकराचा नंदी व त्रिशूळ असून दुसऱ्या बाजूस भाला घेतलेला घोडेस्वार व स्पलपति हा शब्द असतो. हीं नाणीं तिकडे इतकीं लोकप्रिय होतीं कीं, महंमुद गझनीकरास तींच कायम ठेवावीं ( फक्त आपलें नांव संस्कृतांत लिहून ) लागलीं. या शाहीघराण्याची वंशावळ अशी बसवितां येते. तीः-(१)स्पलपतिदेव, ( लल्लिय, कल्लर ) स. ८८०-९००; (२) सामन्तदेव, स. ९००-९२०; ( ३ ) खर्मयक, ( कमलु, कमलुक, तोरमाण ) स. ९२०-९४०; ( ४ ) भीमदेव, स. ९४०-९६०; ( ५ ) जयपाल, स. ९६०-९८०;( ६ ) आनंदपाल, स. ९८०-१०००;(७) त्रिलोचनपाल, स. १०००-१०२१. देव उपपदावरून हे ब्राम्हण होते हें स्पष्ट दिसतें. क्षत्रिय घराण्यांशीं बेटीव्यवहार झाल्यामुळें पुढें हे क्षत्रिय बनले असावेत व पाल हें उपपद त्यांनीं धारण केलें असावें. त्रिलोचनपालाचा, अलबिरुणी हा समकालीन होता. त्यानें या हिंदुराज्याच्या अंताबद्दल कल्हणाच्या ( राजतरंगिणी ) प्रमाणेंच दुःखोद्गार काढले असून ते वाचण्यासारखे आहेत.

स. १०२१ त महंमुद गझनीकरानें हें ब्राम्हणी राज्य नष्ट केल्यावर तो प्रांत गिझनीच्या अंमलाखालीं मोडूं लागला. नंतर घोरी व गझनी या घराण्यांत भांडणें लागलीं असतां हा प्रांत कोणाकडे तरी राही. असें एक मोठें भांडण ११५० त झालें होतें. पुढें ११७३ त घियासुद्दीन घोरी हा काबूलचा राजा झाला. यानंतर प्रख्यात महंमद घोरी हा गादीवर आला. यानें येथूनच हिंदुस्थानावर स्वारी केली. यानंतर हें राज्य चेंगीझखानाच्या अंमलाखालीं कांहीं दिवस होतें. नंतर तैमूरलंगाच्या हातीं जाऊन त्याच्या वंशजांच्या ताब्यांत पुढें हा प्रांत सतत २०० वर्षे होता. खुद्द बाबर हा १५०४ मध्यें काबूल येथें राज्य करीत होता. हुमायून व कामरान यांच्या भांडणांत हुमायुननें इराणच्या शहाच्या मदतीनें प्रथम काबूल घेऊन नंतर दिल्ली घेतली ( १५५३-५४ ).अकबराचा सावत्र भाऊ महंमद हकीम यानें बंड करून काबूल बळकाविलें ( १५८० ).अकबरानें त्याचा पराभव केला; मात्र त्याच्या मरणापर्यंत काबूल त्याच्याकडे ठेविलें ( १५८५ ). नंतर पुन्हां हा मोंगली सुभा झाला. पुढें नादीरशहाच्या ताब्यांत ( १७३७ ) काबूल गेलें. यानंतर अहंमदशहा दुराण्याचा ताबा या देशावर बसला; त्याचाच नातु शाहशुजा होय. याच्या कारकीर्दीतच इंग्रजाचा पाय प्रथम अफगाणीस्तानांत पडला ( १८३८ ). याबद्दलची साग्र माहिती "अफगाणिस्तान" या सदराखालीं पहा [ व्हि. स्मिथ; वैद्य; प्राचीन भूवर्णन, ह्युएनत्संग; राजतरंगिणी; ऋग्वेद; रिस्ले-सेन्सस रिपोर्ट; अलबिरुणी, रॉबर्टी; कनिंगह्याम—म. भा. नाणीं वगैरे ].

**काबूल नदी**—ही हिंदुस्थानच्या वायव्येस असून अफगाणिस्तानांत युनई खिंडीजवळ व काबूल शहराच्या पश्चिमेस सुमारें ४० मैलांवर उगम पावते. उ. अ. ३४° २१' व पू. रे. ६८° २०' आहे. हीस पुष्कळ लहान लहान नद्या मिळतात. डोंगराळ प्रदेशांतून वहात असल्यामुळें हीस खळखळ फार आहे व जलालाबादेजवळ उत्तरेकडून कुनर नदी मिळाल्यावर काबूल नदीला उतार नाहीं. ही नदी मिचनी किल्ल्याजवळ ब्रिटिश मुलखांत शिरते. येथें हिला दोन फांटे फुटतात. यांपैकीं उत्तरेकडे वहाणाऱ्या फांट्यास अदेझाई व दक्षिणेकडील फांट्यास नगूमान अशीं नांवें आहेत. हे फांटे दहा मैलांवर पुन्हां एकत्र होतात व अटकजवळ अखेरीस ही सिंधु नदीस मिळते.

काबुल नदीच्या वेसुट तीरावर सिमसन यास एक विहार व विहार–मालिका सांपडली. रेव्हरंड स्विनर्टन यासहि हद्दा येथें तसाच शोध लागला आहे. हीं बुद्ध लोकांनीं बांधलेलीं निदान उपयोगांत आणलेलीं असावीं यावद्दल संशय नाहीं. (इं. अँ. पु. ८, पृ. ८२, मार्च १८७९).

**काबूल नदीचा कालवा**—वायव्य प्रांताच्या पेशावर जिल्ह्यांतील एक कालवा. हें मोगलांच्या वेळचें काम आहे. ब्रिटिश सरहद्दीवर वारसक नांवाच्या खेड्याजवळ काबूल नदीच्या उजव्या तीरापासून हा कालवा सुरू होतो. याची एकंदर लांबी १९ मैल असून ३०००० एकर जमीन याखालीं आहे. इ. स. १९०३–४ सालीं २७८०० एकर जमीन या पाण्यानें भिजली होती. हा कालवा इ. स. १८९३ सालीं सुरु करण्यांत आला. इ. स. १९०४ पर्यंत या कामावर एकंदर ६४५,००० रुपये खर्च झाले असून इ. स. १९०३–४ सालीं खर्च वजा जातां याचें निव्वळ उत्पन्न ९०८०० रुपये होतें.

**कांबोज**—भरतखंडाच्या वायव्येकडील एक राष्ट्र. या राष्ट्राचा उल्लेख यास्कांनीं निरुक्तांत केला आहे. तेथें कांबोजांची भाषा आर्यांच्या भाषेहून निराळी आहे असें म्हटलें आहे. पाणिनीनें 'कम्बोजाल्लुक या सूत्रांत कांबोजांचा उल्लेख केला आहे. वंशब्राह्मणामध्यें मद्रगार याचा शिष्य कांबोज औपमन्यव या नांवाचा होता असा उल्लेख आहे. यावरून मद्रांचा विशेषतः उत्तर मद्रांचा व कांबोजांचा संबंध असावा असें मॅक्डोनेल म्हणतो. तसेंच हे सिंधुनदीच्या वायव्येस रहात असत व फारसी शिलालेखांत कम्बुजीय असें यांचें नांव आढळतें. यावरून त्यांचा इराणी लोकांशीं संबंध असावा असेंहि तो विधान करितो.

महाभारतामध्यें कांबोज राष्ट्राचा उल्लेख अनेक ठिकाणीं आलेला आहे. अर्जुनाद्विग्विजयामध्यें अर्जुनानें दरदांवरोबर यांचा पराजय केल्याचा उल्लेख आहे. कलियुगामध्यें ज्या रानटी लोकांस राज्यप्राप्ति होईल असें म्हटलें आहे, त्यांत काम्बोजांचा उल्लेख आहे. यांनां कांहीं ठिकाणीं यवन कांबोज असें म्हटलें आहे. हे भारतीय युद्धांत दुर्योधनाच्या बाजूनें लढले व त्यांचा त्या वेळेससुदक्षिण या नांवाचा राजा होता. त्याचा अर्जुनानें वध केला. यांचा पूर्वी कर्णानें पराभव केला असून त्यांनां दुर्योधनास खंडणी द्यावयास लाविलें होतें. यांचा शक, वाल्हिक वगैरेंबरोबर उल्लेख आलेला आहे. शांतिपर्वांत यवन, किरात, गांधार, चीन, शबर, बर्बर, शक, तुषार, कंक, पल्हव, आंध्र, मद्रक, पौंड्र, पुलिंद, रमठ आणि कांबोज हे सर्व ब्राह्मणांपासून व क्षत्रियांपासून उत्पन्न झालेले वैश्य व शूद्र या जातीचे संकरवर्ण असून चौर्यावर उपजीविका करणारे आहेत असें वर्णन आहे.

विष्णु, वायु वगैरे पुराणांत सगरानें हैहय, तालजंघ वगैरे शक, यवन, कांबोज, पारद आणि पल्हव यांचा पराजय केला व केवळ वसिष्ठाच्या विनंतीवरूनच त्यांचा समूळ नाश न करतां त्यास जिवंत ठेवलें असा उल्लेख आहे. वसिष्ठानें यवन व कांबोज यांनां सर्व शिराचें मुंडण करावयास लाविलें. पारदांनीं केस मोकळे ठेवावे व पल्हवांनीं दाढी राखावी असें ठरविलें. यांनीं स्वाध्याय पठण करूं नये असेंहि ठरवून दिलें.

कांबोजांचा उल्लेख शक, यवन, इत्यादि रानटी जातींवरोवर अनेक ठिकाणीं येतो. या देशाची उत्तम घोड्यांकरितां प्रसिद्धी होती. रामायणामध्यें ते सुवर्णाचीं कमलें धारण करीत असा उल्लेख आहे.

भागवतामध्येंहि यांचा उल्लेख आढळतो. वराहमिहिरानें बृहत्संहितेंत (१४.१७) यवन, पल्हव यांच्यावरोबर यांचा उल्लेख केला आहे. अशोकाच्या एका शासनांतहि यांचा उल्लेख आहे.

ॲरियन यानें कम्बिस्थली असा उल्लेख केला आहे. हा कम्बोजस्थल याचा अपभ्रंश असावा. काफिरस्थानामध्यें कौमोजी या नांवाचे लोक आढळतात. हे तुर्कांची स्वारी आली त्यावेळीं डोंगराळ प्रदेशांत जाऊन राहिले असें एलिफन्स्टन वर्णन करतो. (एम्बसी टू काबूल) हे वरील कांबोजांचे वंशज असावेत. काफिरस्तान सध्यां अफगाणिस्थानांत मोडतें. पंजाबांत आजहि सुमारें पावणेदोन लाख लोकवस्तीची कांबोह नांवाची एक जात आहे. तिचा या कांबोजांशीं संबंध असावा. ('कांबोह' पहा.)

हल्लीं ज्याला कँबोडिया देश म्हणतात त्याचें प्राचीन नांव कांबोज होतें; पण त्याचा व या देशाचा कांहीं संबंध नाहीं.

**कांबोह**—जमिनदारी व शेती करणारा हा वर्ग पंजाब व संयुक्तप्रांत या विभागांत आढळून येतो. १९११ च्या शिरोगणतींत एकंदर १,७९,०६७ कांबोह लोक आढळले. पैकीं पंजाबांत १,७२,४३४ व संयुक्त प्रांतांत ६६३३ लोक होते. हे लोक सुमारें ७० हजार मुसुलमान, तितकेच शीख व बाकी हिंदु आहेत. या जातीच्या कुळावद्दल जालंदर येथें एक अशी दंतकथा प्रचलित आहे कीं, इ. स. १६५४ मध्यें पंजाब प्रांत पुरामुळें उध्वस्त झाला असतांना जहांगिरानें शेरशहास साहाय्यार्थ बोलावलें व त्यानें रहू व अच्छरा हे

कांबोहाचे मूळ पुरुष आणून अच्छरास लाहोर नजीक पुरिआन येथें ठेवलें व रहूस कपुर्थळ्याजवळ सुलतानपुरानजीक टिवा येथें राहण्यास सांगितलें. दुसरी व्युत्पत्ति 'वारा' या शब्दापासून आहे असें म्हणतात. शिखांच्या वेळीं ते कपुर्थळ्याहून जालंदरास आले. ते मथुरेचे मूळ राहणारे असून क्षत्रिय होत असें म्हणतात. विजनूर खांबू हे खत्री जातीचे आहेत अशी आख्यायिका आहे. यांचे कलमी खांबू व जमिनदारी खांबू असे दोन वर्ग आढळतात. परंतु जमिनदारी खांबू हेच जास्त आढळतात. हे लोक चांगली शेती करणारे, शांतताप्रिय व चांगल्या मनाचे आहेत. आपल्या जातीच्या बावन शाखा आहेत असें हे लोक म्हणतात. गौरे, हांडे व मोमी हीं नांवें त्यांच्या दोन्ही वर्गांत आहेत. परंतु अरैन (इराण) वर्गाचा त्यांत उल्लेख नाहीं. फिलाऊर कांबोह हे सूर्यवंशी रजपूत असून ब्रह्मपुत्रातीरावरील कामरूपदेशाहून हुमायूनाच्या वेळीं हे दिल्लीस आले. बोधराय लाहोरास गेला व दालराम जालंदरास गेला. अरेन (इराण) लोकांशीं आपला संबंध नसल्याचें हे लोक सांगतात. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. लामावाला कांबोह व टप्पावाला कांबोह अशा दोन जाती कांबोहांमध्यें आहेत. चुइल्सन म्हणतो कीं, कांबोह हें नांव कांबा उर्फ कांबी देश यावरून पडलें असावें.

पंजाबाहून हे लोक खालीं आले. हे स्वतंत्र व कष्टाळू लोक असून मुख्य जातीला फारसा मान देत नाहींत. शेजाऱ्यांनां हे लोक आवडत नाहींत. हिंदूंप्रमाणें ही जात नेमळट नसून अफगाणी लोकांप्रमाणें कडवी आहे. बदमाषगिरींत अफगाण हा पहिला, कांबोह हा दुसरा व काश्मिरी हा तिसरा आहे, अशी म्हण उत्तरहिंदुस्थानांत आहे. कांहीं लोक, सिंधी, जाट व काश्मिरी यांबद्दलहि वरील म्हण असावी असें म्हणतात. त्यांच्या जातींच्या विभागावरून त्यांच्या मूळाचा शोध लागत नाहीं. कांहींचा संबंध रजपूत जातींशीं पोंचतो, तर इतर कित्येक स्थानिकच आहेत. यामुळें यांच्याबद्दल माहिती फारशी उपलब्ध नाहीं [ क्रूक; सेन्सस रिपोर्ट, १९११ ( पंजाब ) ].

**काम, कामदेव.**—प्रेमाची देवता. ऋग्वेदांत (१०. १२९, ४) परमेश्वराच्या मनांत प्रथम कामोत्पत्ति झाल्याचें सांगितलें आहे. अथर्ववेदांत एक सबंध सूक्त (११. २) या कामाच्या स्तुतीप्रीत्यर्थ दिलें आहे. त्यांत कामदेव आद्यजन्मा असून देव, पितर किंवा मानव यांपैकीं कोणीहि त्याच्या तोडीचे नाहींत असें म्हटलें आहे. या वेदांत पुष्कळदां काम आणि अग्नि एकच मानिला असून, जेव्हां या दोघांत तुलना करावयाची असेल तेव्हां काम हेंच अग्निस्वरूप श्रेष्ठ मानावें असें स्पष्ट सांगितलें आहे (९.३६,३) श्रद्धेच्या पोटीं धर्माला झालेला हा पुत्र होय असें तैत्तिरीय ब्राह्मण सांगतें; पण हरिवंशांत याला लक्ष्मीच्या पोटीं घातलें आहे. आणखी एका ठिकाणीं ब्रह्मदेवाच्या हृत्कमलापासून हा स्फुरला असल्याचें वर्णन सांपडतें. हा पाण्यापासून जन्मला म्हणून याला 'इराज' म्हणतात असें चवथें मत आहे. पांचव्या मताप्रमाणें हा आत्मभू असून इतर देवांप्रमाणे अज, अनन्यज हीं विशेषणें याला लावितात. याची पुराणांतली बायको, रती किंवा रेवा आहे. तपाचरणांत मग्न असलेल्या शिवाच्या मनांत पार्वतीविषयीं कामुक विकार यानें उत्पन्न केले, म्हणून शिवानें आपला तृतीय नेत्र उघडून याला भस्म केलें. पण पुनः शिवाची कृपा होऊन कामदेवानें कृष्ण-रुक्मिणीच्या पोटीं जन्म घेतला. हाच कृष्णपुत्र प्रद्युम्न होय. या प्रद्युम्नाला अनिरुद्ध व तृपा अशीं दोन मुलें होतीं.

कामदेवाचें वर्णन काव्य व पुराणांतून फार मनोहर केलेलें आढळतें. हा अप्सरांचा राजा असून, हातीं धनुष्य-बाण घेऊन सज्ज असतो. धनुष्य उंसाचें असून दोरी भ्रमरपंक्तीची केलेली असते. अप्सरागणानें वेष्टित असा हा शुकावर बसून जातो; याच्या ध्वजावर मकरचिन्ह असतें. याचा चमत्कारिक रीतीनें झालेला जन्म व सर्व सृष्टींत कामविकार उत्पन्न करण्याचें याचें कार्य, यांमुळें याला अनेक निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. उदा. दीपक किंवा दर्पक, ( उद्दीपन करणारा ), मार, ( नाश करणारा ), मायी ( फसविणारा ), मधुदीप ( मधाचा किंवा वसंताचा दिवा ), रूपास्त्र ( रूपाचें अस्त्र वाळगणारा ), संसार-गुरु ( संसाराचे धडे देणारा). याच्या धनुष्यबाणावरून याला कुसुमायुध, पुष्पधनु यांसारखीं आणखी दुसरीं नांवेंहि पडलीं आहेत.

**कामकार**—ही मजुरांची जात संयुक्त प्रांतांतली आहे. लो. सं. ( १९११ ) ३६८४५. ही जात पूर्व जिल्ह्यांत विशेषतः जास्त आढळून येते. कामकार लोक तेथील हिंदु लोकांकडे नोकरीस असतात. 'कर्मकार' यापासून कामकार शब्द झाला. 'का', 'काम' म्हणजे पाणी; ह्यावरून 'पाणी ओढणारे' असाहि कित्येक अर्थ करितात. पश्चिम वंगालमध्यें कामकार ही एक कहारांचीच पदवी किंवा नांव आहे. मगधचा राजा जरासंध यापासून आपली उत्पत्ति आहे असें ते म्हणतात. स्वतः कहारांचे सुद्धां आपल्या कुलासंबंधीं यांहून भिन्न मत नाहीं. वस्ती येथें, चंडवार व निकुंभ अशा त्यांच्या दोन पोट जाती आहेत. लग्नाची वयोमर्यादा या लोकांत १२ ते १३ पर्यंत असते. बहुपत्नीत्वाची चाल असली तरी बहुभर्तृत्वास मनाई आहे. सोडचिठ्ठी मिळालेल्या बायकोस पुनः दुसरें लग्न करितां येथें. हे लोक हिंदु असून, शैव, वैष्णव व शाक्त या पंथांचे अनुयायी असतात. ब्राह्मण हेच त्यांचे धर्मगुरू असून ते महादेव, दुर्गा व कालीची पूजा करितात. राजे लोक व उच्च हिंदु लोक यांच्या घरीं नोकर म्हणून काम करणें हाच या कामकारांचा धंदा आहे. विश्वासूपणा, कौशल्य व उद्योगासक्ति यांबद्दल त्यांची प्रसिद्धि आहे. यांपैकीं कांहीं लोकांच्या मालकीच्या जमिनीहि आहेत. ते दारू पितात व बकरी

हरीण व मासे इत्यादि खातात. परंतु वानर, गाई, कोल्हे व नक्र यांचें मांस वर्ज्य मानतात. जे 'भगत' असतात ते मद्यमांसाशन करीत नाहींत. चाइ, अहीर व कहार यांच्या हातची पक्की रसई हे कामकरी खातात. ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या हातची कच्ची रसई खाणें ते निषिद्ध मानीत नाहींत. कोरी व कहार यांच्या हातचें ते पाणी पितात. पण तंबाकू मात्र स्वजातीयांच्या माणसावरोवरच ओढतात. [ क्रूक ].

**कामगारहितवर्धक सभा**—मुंबईतील मजूर वर्गाची सर्वांगीण उन्नति करण्याच्या उद्देशानें ही संस्था १९०९ सालीं मुंबईत स्थापण्यांत आली. मजुरांचे कामाचे तास कमी करणें, मद्यपानाला आळा घालणें, रात्रीच्या शाळा सुरू करून शिक्षण देणें, कारखानदार व मजूर यांतील भांडणें सलोख्यानें मिटविणें व सरकारची सहानुभूति मजुरांनां मिळवून देणें या गोष्टी आजपर्यंत या संस्थेनें आस्थेवाईकपणें केल्या आहेत वॅ. तालचेरकर व आमदार बोले हे या संस्थेचे चिटणीस असून, परेळ, दादर व भोईवाडा या भागांत संस्थेच्या शाखा आहेत. कचेरीचा पत्ता—नं. ९ टॅमरिंड लेन, फोर्ट मुंबई.

कामगार ( मजूर ) व त्यांच्यासंबंधीं प्रश्न यांचा विचार 'मजूर' या लेखांत होईलच.

**कामटा-राजौला**—मध्यहिंदुस्थान. चोवे जहागिरीपैकीं ही एक जहागीर असून बघेलखंड येथील पोलिटिकल एजंटच्या हुकमतीखालीं ही आहे. हिचें क्षेत्रफळ १३ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १२३२. जहागीरदार कायस्थ जातीचा आहे. मूळ पुरुषास ही जहागीर इ. स. १८१२ सालीं इनाम मिळाली. इ. स. १८६२ सालीं जहागीरदारास दत्तक घेण्याचा अधिकार मिळाला. हींत ३ खेडीं आहेत. लागवडीखालीं एकंदर ८९९ एकर जमीन असून पैकीं १२६ वागायती आहे. वार्षिक उत्पन्न २५०० रुपये. राजौला हें जहागिरीचें मुख्य ठिकाण जी. आय. पी. रेल्वेच्या झांशी-माणिकपूर फांट्यावर असलेल्या कारवी स्टेशनच्या दक्षिणेस आठ मैलांवर आहे. राजौला गांवाची लोकसंख्या (१९०१) २११.

**कामटी शहर**—मध्यप्रांत. जिल्हा नागपूर. नागपुरपासून १० मैलांवर बंगाल-नागपूर रेल्वेचें हें एक स्टेशन असून नागपूर जिल्ह्यांतील लष्कर येथें असतें. कन्हान नदीच्या कांठीं हा गांव असून येथें झाडी पुष्कळ आहे. या गांवाचा सर्वांत उंच भाग समुद्रसपाटीपासून ९९६ फूट आहे. इ. स. १८१७ मध्यें सीतावर्डीची लढाई झाल्यानंतर बरेंच सैन्य नागपुरांत होतें. परंतु तेथील हवा बरोबर नसल्याकारणानें दुसरी जागा जवळच शोधणें जरूर झालें. इ. स. १८२१ सालीं कामटीस लष्कर नेलें. कामटी हा गांव त्यावेळीं कन्हान नदीच्या डाव्या तीरावर असून इ. स. १८२१ सालापूर्वी तेथें फार थोडीं घरें होतीं. या जागेचें क्षे.फ. ८ चौरस मैल असून ही जागा अंजिनी, वारेगांव व येरखेडा या तीन गांवांतून घेतलेली आहे.

लष्कराच्या सर्व सोयी लक्षांत आणून हें गांव वसविलें आहे. परेडीकरितां खुलीं मैदानें असून पलीकडे सदरबाजार आहे. सदर बाजाराचा आणि लष्कराचा संबंध या खुल्या मैदानांनीं साफ तोडला आहे. सदरबाजार देखील व्यवस्थित रीतीनें वसविला असून रस्ते वगैरे सर्व काटकोनांत आहेत.

इ. स. १८२१ सालीं येथें बरेंच सैन्य होतें. परंतु पुढें इ. स. १९०५ पर्यंत सैन्य कमी कमी होत गेलें. व त्याच (१९०५) सालीं लॉर्ड किचनेरनें कामटी येथून लष्करी ठाणें अजीबात उठविण्याचें ठरविलें व तेथील लष्कर अहमदनगरास नेलें. हल्लीं कामटीस लष्करी महत्व फार कमी आहे. परंतु नव्वद वर्षांची स्वच्छता आणि टापटीप यामुळें कामटी लष्कर सर्वस्वी अनुकरणीय झालें होतें. बंडाच्या वेळीं नागपूर येथें थोडी गडवड झाली होती. परंतु कामटी येथील सैन्यानें ती लगेच मोडली. १९०१ मध्यें वस्ती ३८,८८८ होती, पण पुढल्या खानेसुमारींत ती १७,१५५ भरली. मराठी अंमल चालू असतांना देखील कामटाची व्यापारी दृष्टीनें भरभराट होत होती. परंतु हल्लीं रेल्वे वगैरे झाल्यामुळें नागपुरास च सर्व व्यापारी देवघेव मोठ्या प्रमाणांत होत असल्यामुळें कामटीचें महत्व जात चाललें आहे. जवळपास मॅंगनीजच्या खाणी असल्यामुळें येथें मॅंगनीजचा व्यापार मोठ्या प्रमाणावर होतो. ॲसवेस्टास, दारू व लोंकरीचें कापड तयार करण्याचे कारखाने येथें आहेत. येथें कांहीं सरकारी व खासगी शाळा आहेत. स्टेशन हॉस्पिटल व कॅंटोन्मेंट जनरल हॉस्पिटल अशीं दोन इस्पितळें आहेत.

**कामठा, जमीनदारी**—जिल्हा भंडारा. टिरोरा तहशीलीच्या ईशान्येस ही जमीनदारी असून प्रदेश फार सुपीक आहे. एकंदर क्षेत्रफळ २८८ चौरस मैल. हींतील एकंदर खेडीं १२८. गोंदिया गांव याच जमिनदारींत आहे.

इतिहास.—हल्लींची कामठा जमीनदारी ही पूर्वींच्या जमीनदारीचा एक भाग आहे. इ. स. १७५० च्या सुमारास एका कुणबी शेतकऱ्यास येथें जमीन मिळाली. पुढें हळू हळू ही जमीनदारी वाढतां वाढतां तींत टिरोरा तहशील, हट्टा, किर्णापुर आणि भाद्रा ( बालाघाट जिल्हा ) व देवरी किशोरी या जमीनदारींचा समावेश होऊं लागला. इ. स. १८१८ सालीं कामठा तालुक्याचा वहिवाटदार चिमणा हा आप्पासाहेबांच्या बंडांत त्यांच्या बाजूस मिळाला. याचा परिणाम असा झाला कीं बहुतेक सर्व जमीनदार घराणीं या जमीनदारांस मुकली. कामठा, हट्टा आणि देवरी किशोरी या जमीनदारी नर्मद पटेल नांवाच्या लोधीला दोन वर्षांच्या करारानें वहिवाटीकारतां दिल्या. याच्या घराण्याकडे या जमीनदारीची तेव्हांपासून वहिवाट आहे.

या जमीनदारीची लोकसंख्या (सन १९०१) ८२९४१ व उत्पन्न १.०९ लाख. टाकोळी ५१००० रुपये. या जमीनदारींत सुमारें १५ शाळा आहेत.

गां व.—तहशिल टिरोरा जिल्हा भांडारा. टिरोरापासून ३४ मैलांवर हें खेडें असून कामठा जमीनदारीस याच खेड्याचें नांव आहे. उन्हाळ्यांत कामठाचे जमीनदार येथें रहाण्यास येतात.लोकसंख्या (१९०१) १४००.येथें एक २० फूट चौरस चौरस जुनें देऊळ असून एक किल्लाहि आहे. गांवांत एका घराजवळ एका काळ्या दगडावर चांभाराच्या रांपीची आकृति कोरली असून एक लेखहि आहे. इ. स. १८१८ सालीं ब्रिटिशांनीं या किल्ल्यावर भडिमार केला होता. कोर्ट ऑफ् वार्डस्च्या ताब्यांत ज्यावेळीं ही इस्टेट होती त्यावेळीं किल्ल्याची दुरुस्ती केली आहे. येथें अडकित्ते आणि जोडे तयार होतात.

**कामठी** ( तळेगांव )—मध्यप्रांत. नागपूर जिल्हा. सावनेरच्या पश्चिमेस ४ मैल व नागपूरपासून २४ मैलांवर हें २५०० लोकवस्तीचें खेडेंगांव असून धाकटे भोंसले यांच्या इस्टेटीपैकीं आहे. गांवांत एक मातीची गढी दृष्टीस पडते. ही गवळी राजांनीं बांधली असावी असें म्हणतात. इ. स. १९०७ सालापासून आरोग्यरक्षणार्थ लोकांपासून कर घेतात. अठवड्याचा बाजार दर सोमवारीं भरत असून येथें एक प्राथमिक शिक्षणाची शाळा आहे.

**कामतीलांग**—उत्तरब्रम्हदेश. हीं लहान लहान शान संस्थानें आहेत. ह्यांचें क्षेत्रफळ ५७९ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें ८००० आहे. ह्यांतून मलिखा नदी वाहते. हा देश सुपीक आहे. येथील लोक शान व काचिन जातीचे आहेत.

**कामद**—हुशंगाबाद व निमाड या जिल्ह्यांतून फिरणाऱ्या जादूगारांची ही जाति आहे. यांच्या बायका चोह्रोबाजूंनीं आठ नऊ झांजा पायांत बांधून, कधीं कधीं तोंडांत तरवार धरून शरीर वांकवून झांजा वाजवीत नाचतात. यांचा पोशाख रजपुतांसारखा असतो. यांच्या वर्गांचीं नांवें रजपूतच आहेत. हे इतके नीच जातीचे समजले जातात कीं, भंगी लोक देखील यांच्या हातचें खात नाहींत. डोम लोक यांच्यासारखाच धोब्यांचा विटाळ मानतात म्हणून रसेल यांस डोमांचे संबंधी समजतो. हे प्रेतास मांडी घालून पुरतात. मारवाडांतील रामदेव साधूच्या पादुका व रजपूतान्यांतील हिंगलज देवीची हे पूजा करतात.

**कामंदक** ( कि )—काश्मीराकडील एक कवि. नीतिसार ग्रंथाचा कर्ता. डॉ. विंटरनिट्झनें नीतिसाराचें केलेलें सुंदर परीक्षण 'अर्थशास्त्र' या लेखांत ( पा. ४४२–४३ ) दिलेंच आहे. डॉक्टर साहेबांच्या मतें नीतिसार हा शासनशास्त्रावरील ग्रंथ इ. स. ७००–७५० या कालांतला आहे. भवभूतीच्या मालतीमाधवांतील स्त्री–मुत्सद्दी कामंदकी या कामंदकी ( का ) ची आठवण करून देतें. कणिक– कौटिल्य यांप्रमाणें कामंदकहि शाठ्य नीतिविषयीं प्रसिद्ध होतासें दिसतें.

**कामधेनु**—मुंबई इलाखा; धारवाड जिल्हा. कलघटगीच्या ईशान्येस सहा मैलांवर हें एक खेडें असून तेथील कळमेश्वराच्या देवळाजवळ जीर्ण झालेले दोन शिलालेख आहेत. खेड्याच्या दक्षिणेस सुमारें एका मैलावर कल्हल नांवाचा ओढा असून त्यास इ. स. १८५० सालच्या सुमारास सरकारनें १०,००० रुपये खर्चून एक बांध घातला आहे. अडविलेल्या पाण्याचा बागाइतीकडे उपयोग होतो.

**कामन**—राजपुताना. भरतपूर संस्थानांतील याच नांवाच्या तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश २७°३९' व पूर्वरेखांश ७७° १६'.लोकसंख्या (१९११) ८९१२. याचें प्राचीन नांव कदंववन होतें असें म्हणतात. याचेंच लहान रूप कामवन असें झालें. कोणा कामसेन राजानें हें गांव वसविलें म्हणून यास हें नांव पडलें असें म्हणतात. व्रिजमंडलाच्या बारा तीर्थांपैकीं हें एक असून येथील गोपीनाथाच्या दर्शनास पुष्कळ यात्रेकरू येतात. गांवांत एक जुनाट गढी असून 'चौऱ्यांशीं खांब' नांवाची एक मशीद आहे. या मशिदीच्या एका खांबावर शूरसेनाचा एक संस्कृत शिलालेख आहे, परंतु त्यावर तारीख नाहीं तथापि तो आठव्या शतकांतील असावा असें वाटतें [ इं. अँ. १०; आर्किऑलाजिकल सर्व्हे ऑफ नार्दर्न इंडिया, पु. २०; इं. गॅ. १४ ].

**कामबक्ष**—( राजपुत्र ) अलमगीर बादशहाचा सर्वांत धाकटा मुलगा.बापानें मरणसमयीं मृत्युपत्रांत याला दक्षिणची सुभेदारी दिली होती.पुढें त्याचा वडील भाऊ जो बहादुरशहा हा गादीवर आल्यानंतर त्याचें वर्चस्व कबूल न करतां हा आपल्या नांवानें जेव्हां नाणीं पाडूं लागला तेव्हां बाहादुरशहानें त्याला पुष्कळ सवलती देऊन आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला. पण तो ऐकेना,तेव्हां त्यानें दक्षिणेंत त्याच्यावर स्वारी केली व हैद्राबादजवळ त्याचा पराभव केला. या लढाईत कामबक्षाला जखम लागून इ. स. १७०९ च्या ३ जानेवारी रोजीं तो मरण पावला. त्याच्या आईचें नांव उदेपुरीमहाल असें होतें ( उदेपुरी बेगम पहा ). याचा जन्म दिल्लीस २४ फेब्रुवारी १६६७ मध्यें झाला होता.

हिंदुस्थानच्या इतिहासांत याच्या हातून विशेष अशी कांहींच कामगिरी झाली नाहीं. यानें बापाविरुद्ध थोडीशी चळवळ केल्यामुळें बापानें त्याला कांहीं दिवस (१६९८ दिसेंबर ते १६९९ जून ) कैदेंत ठेविलें होतें. परंतु याच्यावर औरंगझेबाचें फार प्रेम असे.यानें किरकोळ अपराध केले असल्यास त्यास तो क्षमा करीत असे. राजाराम छत्रपति जिंजीस असतां तेथें वेढा घालून बसलेल्या झुलफिकरखानाच्या मदतीस कामबक्ष आला होता. परंतु त्या दोघांत भांडणें सुरू झालीं व कामबक्ष मराठ्यांकडे राजकारणें करूं लागला. तेव्हां झुलफिकरखानानें त्याला कैद करून औरंगझेबाकडे पाठवून

दिलें होतें ( इ. स. ६९२ ). [ वील-ओरिएंटल बॉयाग्राफिकल डिक्शनरी; जदुनाथ—औरंगझेब; जेधे. शकावली ].

**कामरगांव**—वऱ्हाड. मध्यप्रांत. जिल्हा अकोला. तालुका मुर्तिजापूर. मूर्तिजापूरच्या दक्षिणेस १३ मैलांवर हें गांव आहे. लोकसंख्या ( १९०१ ) २३४६. येथें दर बुधवारीं बाजार भरतो. धर्मशाळा व शाळा येथें आहे. मीर इमाम अलीखान रिसालदार यास १८५७ च्या बंडापूर्वी एक्स्ट्रा अ. कमिशनर नेमलें होतें व त्यास १६ गांवांची वसुली करण्यास परवानगी दिली होती. पुढें त्या बंडांतच हा रिसालदार बंदा येथें लढाईत पडला. तरी तो हक्क त्याच्या वंशजांकडे अजून चालत आहे. याला 'कामरगांव इस्टेट' असें म्हणत असून मालकास जहागिरदार असें म्हणतात. एकंदर उत्पन्न रु. १८,००० आहे. पैकीं सरकार ९००० रुपये घेतें. व २००० रुपये खर्च वेंच यांकडे जात असून जहागिरदारांस ७००० रुपये मिळतात.

**कामरान**—बाबरशहाचा हा मुलगा. याचा वडील भाऊ हूमायून. कामरान हा तिरसट व विश्वासघातकी होता. हूमायून तक्तावर आला तेव्हां हा काबूलचा सुभा होता. त्यास हुमायूननें काबूल व पंजाव हे दोन प्रांत तोडून दिले. पुढें शेरखानाचें बंड झालें त्यावेळीं ( १५३८ ) कामरान यानें हूमायूनास आयत्यावेळीं मदत केली नाहीं. उलट तो काबूलहून त्याच्यावर चाल करून येण्यास निघाला. हुमायून पळाला व त्याची आणि कामरानची गांठ लाहोरास पडली. हुमायूनला या वेळीं तरी कामरान आपल्याला मदत करील असें वाटलें होतें. परंतु कामराननें त्याला फसविलें. त्यानें हुमायूनच्या पाठीवर आलेल्या शेरखानास पंजाव देऊन त्याच्याशीं सख्य केलें व आपला बचाव करून तो काबुलास निघून गेला. नंतर हुमायून इराणांत गेला. तेथील सैन्य घेऊन (१५४५) तो काबुलाकडे आला. प्रथम त्यानें कामरानची समजूत करण्यासाठीं बहरामखानास पुढें पाठविलें, पण त्याला कामराननें दाद दिली नाहीं. यावेळीं कामरानला त्या बाजूस बरेच शत्रू उत्पन्न झाल्याची बातमी समजल्यावरून हुमायून काबूलवर आला. तेव्हां कामरान सिंधांत पळाला. परंतु तेथें त्याला आश्रय न मिळाल्यामुळें तो परत काबुलास आला. यावेळीं हुमायून तेथें नव्हता; म्हणून त्यानें काबूल काबीज केलें. त्यावेळीं तेथें शहाजादा अकबर होता. तो त्याच्या हातीं सांपडला. इतक्यांत बदकशानकडून हुमायून परत येऊन त्यानें किल्ल्यास वेढा दिला. यावेळीं कामरानच्या मनांत अकबरास अपाय करावा असें होतें. परंतु तें साधलें नाहीं. हुमायूननें काबूल घेतलें व कामरान बदकशानकडे पळाला. हूमायूननें त्याला थोड्याच दिवसांत पकडलें (१५४८). पण त्याला ममतेनें वागविलें; परंतु लवकरच कामराननें पुन्हां काबूल घेतलें व बंड उभारलें. तें हूमायूननें मोडलें. तेव्हां तो पंजाबांत पळाला. त्यावेळीं हूमायूननें त्याला पुष्कळ ममतेचीं पत्रें लिहिलीं व आपल्याजवळ राहण्यास त्याला बोलाविलें पण तें त्यास रुचलें नाहीं; तेव्हां त्याच्यावर हिंदाल ( त्याचा दुसरा भाऊ ) यास पाठविण्यांत आलें. त्या पाठलागांत हिंदाल मारला गेला ( १५५१ ). कामरानास सेलीमशहासूरकडून आश्रय न मिळाल्यामुळें तो गक्कर वगैरे रानटी लोकांत भटकत होता. शेवटीं त्यांनीं त्याचा विश्वासघात करून त्याला पकडून हुमायूनच्या स्वाधीन केलें ( १५५२ ). तेवीस वर्षें त्यानें हुमायूनशीं बेइमानगिरी केल्यानें हुमायूननें त्याचे डोळे काढले ( १५५३ ). एकदां दोघां भावांची गांठ पडल्यावर कामरानची ती दीन स्थिति पाहून हुमायूनास रडें कोसळलें. कामरानासहि पश्चात्ताप होऊन त्यानें त्याची क्षमा मागितली. कांहीं दिवसांनीं तो मक्केस जाण्यास निघाला. परंतु वाटेंत सिंधप्रांतांतच तो मरण पावला ( १५५६ ). तो शूर, धाडसी, कपटी व क्रूर होता [ मु.रि. ].

वील म्हणतो तो मक्केस पोहोंचला होता व तेथें तीन वर्षें राहिल्यानंतर तो मेला. त्याचा मुलगा अवुल कासिम मिर्झा हा ग्वालेरच्या किल्ल्यांत कैदी होता. त्याला अकबरानें ठार मारलें ( १५६५ ).

**कामरूप.**—आसाम प्रांतांतील एक जिल्हा. उत्तर अक्षांश २५° ४३' ते २६° ५३' व पूर्व रेखांश ९०° ३९' ते ९२° ११'. क्षेत्रफळ ३८५८ चौरस मैल.

उत्तरेस भूतानचें संस्थान; पूर्वेस दरंग आणि नौगांग; दक्षिणेस खासी पर्वत; पश्चिमेस गोलपारा. ब्रह्मपुत्रा नदी या जिल्ह्यांतून वाहते. या नदीच्या दक्षिणेकडील प्रदेश डोंगराळ असून या जिल्ह्याचा मध्यभाग सपाट आहे व त्यांत भाताची लागवड होते. त्याचप्रमाणें या जिल्ह्याचा उत्तरेकडील भाग डोंगराळ आहे. दक्षिणेकडील पर्वताच्या पायथ्याशीं जंगल आहे. परंतु उत्तरेकडील भागांत जंगल मुळींच नाहीं. यांत हत्ती, गवे, वाघ, चित्ते, अस्वल, डुक्कर, हरीण, ससा इत्यादि आहेत.

येथील हवा आसामांतील इतर भागांप्रमाणेंच आहे. हिंवाळ्यांत येथें चांगली थंडी पडते. गौहत्ती येथील वार्षिक पावसाची सरासरी ६७ इंच आहे. डोंगराळ भागांत ८० ते ८५ इंच पाऊस पडतो. परंतु सर्व पाऊस थोडक्या वेळांत पडून जात असल्यामुळें भातशेतीचें नुकसान होतें. तारीख १२ जून इ. स. १८९७ रोजीं येथें धरणीकंपाचा मोठा धक्का बसला. त्यामुळें या भागाचें फार नुकसान झालें. या दैवी आपत्तीच्या दुसऱ्या वर्षीं ब्रह्मपुत्रा नदीस मोठा पूर येऊन शेतीचें भयंकर नुकसान झालें.

कामरूप हें नांव भारतांत कोठें आढळत नाहीं. परंतु प्राग्ज्योतिषपूरचा राजा भगदत्त याचा उल्लेख आढळतो. हा राजा कौरवांच्या बाजूनें भारतीयुद्धांत लढत होता. रघुवंशांत दोन तीन वेळां हें नांव आलें आहे. (४. ८३, ८४ आणि ७. १७ पहा ) रघु हा दिग्विजयाच्या वेळीं प्रथम पूर्वेस जाऊन, दक्षिण व पश्चिम या दिशांकडून उत्तरेस वळला.

लौहित्या नामक नदी उतरून प्राग्ज्योतिष देशांत जाऊन त्यापलीकडे कामरूप देशांत तो गेला. तेथें त्याचा दिग्विजय समाप्त झाला. तेव्हां हा कामरूप देश ईशान्येस किंवा पूर्वेसहि असणें संभवतें. तेथील राजानें रघूस हत्ती दिले असें वर्णन आहे. यावरून तो देश ( कामरूप ) हत्तींविषयीं प्रसिद्ध होता असें दिसतें. तेव्हां वरील दिशा व वर्णन असामर्शी जुळतें.

पुंड्रवर्धन येथून पूर्वेस १५० मैलांवर मध्यें एक नदी उतरून ह्युएनत्संग कामरूप देशांत गेला. कामरूप हें आसाम देशाचें संस्कृत नांव आहे. या प्रांताचा घेर १६६७ मैल सांगितला आहे. यावरून त्यांत ब्रह्मपुत्रा नदीचा सर्व प्रदेश व कुचबिहार आणि भूतान हीं येत असावीं. ब्रह्मपुत्रा प्रदेशाचे पूर्वी तीन भाग होते; ते सदिया, आसाम आणि कामरूप. ह्यांस पूर्वेचा, मधला आणि पश्चिमचा असें म्हटलें तरी चालेल. कामरूप हें संस्थान सर्वांत बलिष्ठ म्हणून सर्व प्रदेशास त्याचें नांव पडलें. कुचबिहार हा मुख्य कामरूपचा पश्चिम भाग होता. तो प्रदेश फार समृद्ध असल्यामुळें राजे त्यांत रहात असत व त्याची कामतीपुर राजधानी होती. तविरून सर्व प्रदेशास हें नांव पडलें. परंतु ब्रह्मपुत्रा नदीवरील गोहत्ती शहर ही कामरूपची जुनी राजधानी होती असें म्हणतात. कामतीपुर हें पुवनपासून उत्तरेस बरोबर १५० मैलांवर आहे. आणि गोहत्ती हें ३१० मैलांवर ईशान्येस आहे कामतीपुरचें अंतर मिळतें. यावरून ७ व्या शतकांत तीच राजधानी असावी. येथील भाषा हिंदुस्थानांतल्या सारखीच होती असें ह्युएन लिहितो. यावरूनहि गोहत्तीपेक्षां जवळचें जें कामतीपुर तीच याची राजधानी होती असें म्हणतां येतें. ह्युएनत्संग मोठी नदी उतरला ती तिस्ता होय. ह्या राज्याच्या पूर्वेस चिनी शू प्रांत होता. आग्नेयीस अरण्य होतें, त्यांत पुष्कळ रानहत्ती होते, त्याप्रमाणें हल्लींहि आहेत.

कामरूप (आसाम) देशांत भगदत्ताचा वंश राज्य करीत असून ह्युएनत्संग तेथें गेला असतां कुमार किंवा भास्करवर्मा हा तेथें राजा होता ( ६४३ ). हा प्रख्यात हर्षवर्धनाचा मित्र होता. हें ब्राह्मणघराणें पुढें दोन शतकें तेथें चालू होतें. भगदत्तकुल हें ब्राह्मण असूनहि त्यांतील राजे क्षत्रियांच्या मुली करीत व क्षत्रियांनां ( वलभी वगैरे ) आपल्या मुली देत. हे राजे गौड, वंग, ओरिसा वगैरे राज्यांवर मधून मधून आपलें वर्चस्व स्थापन करीत; आणि स्वतःचा देश पर्वतवेष्टित असल्यानें ते स्वतः सुरक्षित असत. महाभारत कालापासून स. ८०० पर्यंत हें भगदत्तकुल एकटेंच राज्य करीत होतें, इतकीं शतकें एकच कुळ राज्य करणारें असें जगांत दुसरें आढळत नाहीं. कदाचित् ही दंतकथाहि असेल. परंतु हिमालयाच्या आंत हें राज्य असल्यानें महत्वाकांक्षी राजांच्या आहाराबाहेर हें राही. [वैद्य म. भा. १ पा. २].

मध्यंतरीं ( १२ वें शतक ) कांहीं काळपर्यंत वंगालच्या पाल राजांनीं येथें राज्य केलें होतें (एपि. इंडि. भा. २). परंतु अरब प्रवाशांनीं भगदत्ताच्या वंशाचाच उल्लेख केला आहे. त्यांनीं या देशाला 'कामन' असें नांव दिलें आहे. ते म्हणतात " येथील प्रजाजन फारच सुरेख असून त्यांच्यांत कानाला भोंकें पाडण्याची चाल आहे. समुद्रगुप्ताच्या राज्याची पूर्वसरहद्द या कामरूपाला भिडली होती ( स्मिथ. प्रा. हिं. ). भास्करवर्मा ( कुमारराज ) हा बौद्धधर्मीय नसून ब्राह्मणधर्मीय होता, ( डाका रिव्ह्यु १९१३ जून ). त्यावेळीं कामरूप देशाची मर्यादा पश्चिमेस करतोया नदीपर्यंत होती. इ. स. १२२८ च्या सुमारास शान जातीपैकीं अहोमांनीं हा प्रदेश काबीज करून घेतला. येथील धर्म अलीकडे ( मंगोलियन लोकांच्या रहिवासामुळें ) तांत्रिक बौद्ध व तांत्रिक हिंदु आहे. या प्रांतांतच प्रख्यात शाक्त मार्गाची अधिदेवता जी कामाख्या देवी तिचें स्थान ( गौहत्तीजवळ ) आहे. अद्यापि मंत्रतंत्राबद्दल हा प्रदेश प्रख्यात आहे. येथील हिंदुराजांनीं अनेक वेळां मुसुलमानांचा पराभव करून आपलें स्वातंत्र्य कायम ठेविलें होतें. बखतियार महंमदानें १२०४ मध्यें त्यांच्यावर चढाई केली होती. परंतु दार्जिलिंगच्या पुढें त्याला जातां आलें नाहीं. परत येतांना नदीवरील पूल आसामी लोकांनां पाडून टाकल्यामुळें त्याचें बहुतेक सैन्य बुडून मेलें. तो मोठ्या शिकस्तीनें पांच पन्नास लोकांसह वांचला; परंतु त्याच्या पुढल्याच वर्षी आसाम्यांनीं त्याचा वध केला.

सोळाव्या शतकांत काक राज्याचा अधिकार या भागावर चालत होता. राजा नरनारायण यानें अहोम आणि काचार, जेन्तिआ, सिलहेट आणि टिपरा येथील राजांशीं पुष्कळ लढाया मारल्या. पुढें या राज्याचे दोन भाग झाले. त्यांच्यांत भाऊबंदकी सुरू होऊन भांडणें उपस्थित झालीं व त्यांत एकानें मुसुलमानांची व दुसऱ्यानें अहोमांची मदत मागितली. पुष्कळ दिवस हें वैर सुरू होतें. अखेरीस इ. स. १६३७ सालीं मुसुलमान विजयी झाले व त्यांनीं गोहत्ती आपल्या ताब्यांत घेतली. यापूर्वी मुसुलमानांनीं तेराव्या शतकाच्या आरंभीं आसामवर स्वारी केली होती. त्यांत त्यांचा थोडाफार जयहि झाला होता. परंतु जिंकलेल्या मुलुखावर त्यांस सत्ता राखतां आली नाहीं. इ. स. १६६०-६२ सालीं मीर जुमला यानें आसामवर स्वारी केली. परंतु त्याचें बरेंच नुकसान होऊन त्यास परतावें लागलें. त्या वेळीं गोलपारा ही मुसुलमानांची सरहद्द ठरली व कामरूपचें राज्य अहोमांच्या राज्यांत समाविष्ट झालें. अठराव्या शतकाच्या अखेरीस अहोमच्या राजाची सत्ता संपुष्टांत आली होती व त्या राज्यांत त्यावेळीं बरेच बखेडे माजले होते. त्यांनां आळा घालण्याकरितां इ. स. १७९२ सालीं कॅप्टन वेल्श यास पाठविलें होतें. परंतु दोन वर्षांनंतर त्यास परत बोलाविलें. त्यानंतर त्या भागांत दंगे वगैरे फार झाले व अखेरीस तो सर्व प्रदेश ब्रह्मी लोकांनीं आपल्या ताब्यांत घेतला.

इ. स. १८२६ सालीं पहिली ब्रह्मी लढाई झाल्यावर कामरूप ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आलें. तोपर्यंत तेथें हिंदु राज्य होतें. हिमालयाच्या पायथ्याशीं असलेलें दुआर भेतियांकडे इ. स. १८४१ पर्यंत होतें. या सालीं ब्रिटिशांनीं तें खालसा केलें व तेथील डोंगरी जातीस त्या मुलखावद्दल नुकसानभरपाई दिली. भूतानच्या लढाईंत इ. स. १८६५ सालीं देवांगिरी ब्रिटिशाकडे आलें. प्रथमतः आसाम प्रांताचें मुख्य ठिकाण गोहत्ती होतें; परंतु इ. स. १८७४सालीं आसाम बंगालपासून वेगळा करण्यांत आला व त्याच वेळीं शिलांग हें मुख्य ठिकाण करण्यांत आलें.

गोहत्ती, कामाख्या आणि हाजो येथें प्राचीन हिंदु देवळांचे अवशेष पुष्कळ सांपडतात. लोकसंख्या १९२१ सालीं ७,६२,६७१ इतकी होती. या जिल्ह्याचे दोन विभाग आहेत. एक बारपेटा आणि दुसरा गोहत्ती यांत एकंदर १७१६ खेडीं आहेत.

या जिल्ह्यांत हिंदूंची वस्ती शेंकडा ६९,मुसुलमान शेंकडा ९ व वन्यधर्मी लोक शेंकडा २१ आहेत. कामरूप जिल्ह्यांत स्त्रियांची संख्या पुरुषांपेक्षां अधिक आहे.

मुख्य पीक भाताचें असून व्यापारी दृष्टीनें ताग लावण्याचा प्रयत्न इकडे होत आहे. १८९१–१९०१ च्या दरम्यान येथील धरणीकंपामुळें व लोकसंख्या कमी झाल्यामुळें या जिल्ह्याचें बरेंच नुकसान झालें आहे. या जिल्ह्यांत १४९ चौरस मैल संरक्षित जंगल आहे.

धं दे—चहाच्या लागवडीशिवाय या जिल्ह्यांत दुसरा महत्वाचा धंदा नाहीं. येथील व्यापारी वर्ग बहुतेक मारवाडी यांचा आहे. गोहत्ती, बारपेटा, पळसवारी, नळवारी इत्यादि व्यापाराचीं ठिकाणें आहेत. आसाम–बंगाल रेल्वेचा ३३ मैल लांबीचा मार्ग या जिल्ह्यांतून आहे. याशिवाय ब्रह्मपुत्रा नदीवर आगबोटी चालत असून त्या गोहत्ती, सोलकुची, पळसवारी, खोलावांद इत्यादि ठिकाणीं लागतात.

आसामांतील इतर भागांप्रमाणें कामरूपमध्यें दुष्काळ कधींहि पडत नाहीं. या जिल्ह्याचा अधिकार डेप्यूटी कमिशनरकडे असतो. [ आसामचीं नाणीं–ॲलन; ग्रेट– आसामचा इतिहास; लयल-एशि. स्टडि; रावर्टी बॉल. भा. १; वाटर्स. भा. १; एपि. इंडि. २; हंटर–आसाम. कामरूप गॅ.].

**कामरेज**—मुंबई इलाख्यांतील बडोद्याच्या कामरेज पोटभागाचें मुख्य ठिकाण. हें शहर तापी नदीच्या दक्षिणतीरावर आहे. येथें वहिवाटदार व फौजदार यांच्या कचेऱ्या, प्राथमिक शिक्षणाची शाळा व एक धर्मशाळा आहे. वास्तुसौंदर्यशास्त्राच्या दृष्टीनें पुढील देवळें महत्वाचीं आहेत. ( १ ) श्री नारदब्रह्माचें देऊळ. ( २ ) श्री कोटेश्वराचें देऊळ ( ३ ) श्री मोक्षनाथ महादेवाचें देऊळ, ( ४ ) श्री कालभैरवाचें देऊळ.

**कामली**—ठाणें जिल्ह्यांतील शेतकऱ्यांची एक जात. लोकसंख्या ( १९०१ ) ११५६. हे लोक डहाणु व वाड या भागांत आढळतात. हे सुमारें पांचशें वर्षांपूर्वी काठेवाडाकडून या भागांत आले व त्यांनां काम्ब रजपूत असें म्हणत असा समज आहे

यांची रहाणी स्वच्छ असून हे स्वभावतः इमानी, मेहेनती, शांत व आतिथ्यतत्पर असतात. अलीकडे बहुतेकांचा व्यवसाय शेतकीचा असतो. हे मद्यपी व मांसाहारी आहेत. यांचा पेहेराव म्हणजे चड्डी, खरवरीत लोंकरी जाकीट व लहानसें पागोटें हा असतो. मूल जन्मल्यावर सहावी पुजतात. बाराव्या दिवशीं वाळवाळंतीण दहा बारा घरीं जाते व त्या दिवशीं मुलाचें नांव ठेवतात. मुलींचीं लग्नें १२–१३ व्या वर्षी करतात. उपाध्याय गुजराथी ब्राह्मण असतो. मृतांचा दहावा व बारावा हे दिवस पाळतात. विधवाविवाहाची पद्धति नाहीं. मारुती, गणपती, महादेव हीं उपास्यदैवतें असतात. दसरा, दिवाळी, शिमगा वगैरे सर्व सण पाळतात. यांच्यांत जातिप्रमुख असतो. त्याला पाटील असें म्हणतात. पाटील जातीच्या संमतीनें तंट्यांचा निकाल करतो. यांची स्थिती गरिबीची असते. यांची भाषा धेडगुजरी गुजराथी असते. हे मुलांनां शिक्षण देतात. [ मुं. गॅ. १३. एन्थोवेन ].

**कामशास्त्र**—भरतखंडांत अर्थशास्त्राच्या जोडीनें हें शास्त्र प्रगत झालें. धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गांपासून निघालेलीं हीं दोन्ही शास्त्रें शुद्ध व्यावहारिक स्वरूपाचीं आहेत ज्याप्रमाणें अर्थ मिळविण्याचीं साधनें व मार्ग दाखविण्याखेरीज व त्याचें रक्षण करण्याखेरीज अर्थशास्त्राचा दुसरा उद्देश नाहीं, त्याचप्रमाणें आपला काम अति उत्तम तऱ्हेनें कसा तृप्त करितां येईल याचीं साधनें व मार्ग यांचें शिक्षण देण्याचाच केवळ उद्देश कामशास्त्राचा आहे. साम्राज्य कसें उत्कृष्टतेनें जिंकावें व शासित करावें त्याचे धडे देण्याकरितां ज्याप्रमाणें अर्थशास्त्र, प्रथम राजे व मंत्री या शासनाधिकाऱ्यांनां संबोधून लिहिलें आहे, त्याचप्रमाणें कामोपभोग सर्वोत्कृष्टपणें कसा घ्यावा हें दाखविण्याकरितां कामशास्त्र मुख्यतः नागरकांनां उद्देशून लिहिलें आहे. स्त्रिया या नागरकांशीं संबंध असणाऱ्या किंवा त्यांच्याच कोटींतल्या असल्यानें त्यांनीं या शास्त्रांत केवळ एक भाग घ्यावयाचा आहे. या दोन शास्त्रग्रंथांच्या रचनेंत व पद्धतींत सुद्धां विशेषतः अति जुनाट प्रतींतून विलक्षण साम्य दिसून येतें. प्रेमकलेवरील उपलब्ध असणारा अतिपुरातन ग्रंथ जो मल्लनाग वात्स्यायन कृत कामसूत्र, तो तर कौटिलीय अर्थशास्त्राच्या धर्तीवर लिहिलेला उघड दिसतो. भाष्यरचनेसारखी याची सूत्ररूप रचना असून प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं कांहीं श्लोक असतात. अर्थशास्त्राप्रमाणेंच कामसूत्राचा आरंभ, विषयानुक्रमणिका, त्रिवर्गाचें विवेचन आणि विद्यासमुद्देश नांवाचा एक अध्याय यांसहित एका प्रस्तावनेनें होऊन औपनिषदिकम्

या अधिकारणानेंच त्याचा शेवट झाला आहे. कामसूत्र आणि अर्थशास्त्र या दोहोंनाहि ब्राह्मणी अर्थाचा धर्म आणि नीतितत्वें पूर्णपणें मान्य आहेत. तरी या धर्माच्या अनुरोधानें म्हणजे पुण्य आणि पाप यांच्या कक्षेंत राहून ते आपलें सिद्धांत मांडीत नाहींत. एखाद्या माणसानें एखाद्या कुमारिकेला किंवा परदारेला जिंकण्याच्या ( वश करण्याच्या ) युक्त्या व कला जेव्हां वात्स्यायन शिकवितो तेव्हां तो प्रेमराज्यांतील 'मॅकिआव्हेली' चांगला शोभतो. उदाहरणार्थ—अर्थशास्त्रांत ज्याप्रमाणें राजाचे मित्र हेर आणि वकील सांगितले आहेत त्याचप्रमाणें त्याच परिभाषेंत कामसूत्रांत प्रेमीमाणसाचे पुरुष मित्र व स्त्रिया संदेशवाहिका सांगितल्या आहेत.

कामसूत्रांतील वहुतेक विषय यूरोपीयन वाचकास अश्लील वाटतील पण भारतीयांनीं यूरोपियन लोकांहूनहि जास्त उघडपणें वैषयिक जीविताची चर्चा पुष्कळ केली आहे असें डॉ. विंटरनिझ म्हणतो. सूत्राच्या शेवटच्या श्लोकांतून वात्स्यायन आपणांस अशी खात्री देतो कीं, धर्म, अर्थ आणि काम यांनां उपयुक्त म्हणून विनय आणि अतिशय पूज्य बुद्धि ठेऊन आपण हा ग्रंथ लिहिला आहे; कामविकार उद्युक्त करण्याच्या हेतूनें हा लिहिलेला नाहीं. कारण या शास्त्राचें खरें महत्व ओळखणारा पुरुष आपल्या इच्छा दावून ठेवतो व संसारामध्यें धर्म, अर्थ आणि काम या तिहींनां त्यांच्यायोग्य असें स्थळ देतो. तेव्हां या शास्त्रांत तज्ज्ञ असणारा कुशल माणूस कामोपभोगाच्या वेळीं धर्म आणि अर्थ मनांत वागवील व अमर्यादित विकारावरोवर वाहून जाणार नाहीं हें वात्स्यायनाचें म्हणणें जरी आपल्याला अगदीं खरें धरून चालतां यावयाचें नाहीं, तरी केवळ रुक्ष अशा एखाद्या ग्रंथरचनेप्रमाणें कामसूत्राची एकंदर रचना आहे असें आपणाला कबूल केलें पाहिजे. इतर ग्रंथांतल्याप्रमाणें पांडित्यदर्शक व्याख्या, वर्गीकरणें या ग्रंथांत आढळून येतात. तेव्हां ओव्हिडच्या 'आर्स ॲमोटोरिया' या कृतीशीं, त्याची मुळींच तुलना करतां येणार नाहीं.

ग्रंथाचा वराचसा भाग मानववंशशास्त्रज्ञ किंवा स्त्रीपुरुषविषयक प्रश्नांचे विवेचक यांखेरीज दुसऱ्या कोणालाहि मनोरंजक वाटणार नाहीं. तथापि संस्कृति व वाङ्मय यांच्या इतिहासांत याचें महत्व केवळ प्राचीनतेच्या दृष्टीनें पाहिल्यास कमी मानतां यावयाचें नाहीं. प्रास्ताविक भागांत त्रिवर्गांचें महत्वाचें असें तात्विक-नैतिक विवेचन व सुशिक्षित स्त्रियांनां आवश्यक समजलीं जाणारीं शास्त्रें आणि विद्या यांची मनोरंजक यादी यांत दिलेली आहे. तिसऱ्या अधिकरणांत गृह्य व धर्मसूत्रांतून दिलेल्या लग्नविधींची व चालींची चांगली प्रशंसा केली असून सहाव्या अधिकरणांत वेश्यांची रहाणी व आचार जे सांगितले आहेत ते समाजेतिहासाच्या दृष्टीनें फार महत्वाचे आहेत.

अशा प्रकारच्या ग्रंथांत कामसूत्र हा उपलब्ध असणारा अत्यंत प्राचीन ग्रंथ असला तरी तो कामशास्त्रावरील अतिशय प्राचीन ग्रंथ आहे असें मुळींच नाहीं. स्वतः वात्स्यायनच कामसूत्राच्या आरंभीं एक अर्धवट पौराणिक, अर्धवट ऐतिहासिक अशी जी प्रस्तावना जोडतो, तीवरून असें कळतें कीं, औद्दालकि श्वेतकेतूचा कामशास्त्रावर एक पुरातन ग्रंथ होता. त्यावरून बाभ्रव्य पांचालानें एक संक्षिप्त रचना केली, तरी ती वरीच मोठी दिसूं लागली. तींत सात अधिकरणें होतीं. वेश्यांसंबंधींचें सहावें अधिकरण पाटलीपुत्र येथील वेश्यांच्या सांगण्यावरूनच दत्तकानें एका वेगळ्या ग्रंथांत काढलें. त्यानंतर इतर अधिकरणांतील विषयावर चारायण, सुवर्णनाभ, घोटकमुख, गोनर्दीय, गोणिकापुत्र आणि कुचुमार या पंडितांनीं निरनिराळीं भाष्यें लिहिलीं. अशा रीतीनें हें सवंध कामशास्त्र खंडशः विवेचिलें गेल्यावर वात्स्यायनानें अभ्यासकाला त्रासदायक अशी बाभ्रव्याची सवंध प्रत घेऊन आपल्या कामसूत्रांत तींतील सर्व विषय थोडक्यांत ग्रथित केले. वर सांगितलेले सर्व आचार्य या ग्रंथांत पुन्हां आले आहेत. इतकेंच नव्हे तर टीकेसुद्धां त्यांचीं मतें व त्यांच्या ग्रंथांतील श्लोक उद्धृत केले आहेत. तेव्हां या आचार्यांचे ग्रंथ होते हें खरें दिसतें. कौटिलीय अर्थशास्त्रांत देखील चारायण आणि घोटकमुख यांचे उल्लेख आहेत. पतंजलीच्या महाभाष्यांत गोनर्दीय व गोणिकापुत्र हे वैय्याकरण म्हणून आढळतात. कौटिलीयांखेरीज नंदीसूत्र व अनुयोगोद्वार या जैन ग्रंथांतून ब्राह्मणी ग्रंथामध्यें उल्लेखिलेलें म्हणून घोटकमुखाचें नांव येतें. बाभ्रव्याचाहि एक संप्रदाय असावा. कारण वात्स्यायन हीं बाभ्रवीयांचीं मतें आहेत असें नेहमीं म्हणतो.

याप्रमाणें अर्थशास्त्राच्या जोडीनें वाढलेलें हें कामशास्त्र एक चांगलें पुरातन शास्त्र आहे असें दिसतें. राजदरबारच्या सूतांच्या कृत्रिम काव्याशीं याचा निकट संवंध आहे. कृत्रिम पद्यरचना करणाऱ्या कवीला कामशास्त्राचा अभ्यास करावा लागे व कामशास्त्रांतील बरेचसे विषय काव्यशास्त्रग्रंथांतून विवेचले असतात. आपल्याला कामसूत्र चांगलें अवगत आहे अशी प्रौढी बरेचसे कवी सांगतात. उदाहरणार्थं रघुवंशाच्या १९ व्या सर्गांत कालिदास, नैषधचरित्रांत श्रीहर्ष, मयूराष्टकांत मयूर, कुट्टनीमतांत दामोदर गुप्त आणि दशकुमारचरितांत दंडी. कालिदासाला जरी कामशास्त्र अवगत होतें, तरी वात्स्यायनाचा हा ग्रंथ त्याला माहीत होता कीं नाहीं हें निश्चित नाहीं. उलट सुबंधु आपल्या वासवदत्तेंत मल्लनागाचा नामनिर्देश करतो व कामशास्त्राचें आपल्याला असलेलें सविस्तर ज्ञान पुढें मांडतो. भवभूतीहि कामसूत्राचा उल्लेख करतो. तेव्हां वात्स्यायनाचें कामसूत्र सातव्या शतकापूर्वी लिहिलें असलें पाहिजे. किती वर्षांपूर्वी तें नक्की सांगतां येणार नाहीं. कौटिलीय अर्थशास्त्रानंतर झालेला हा ग्रंथ आहे यांत शंका नाहीं. पण त्यानंतर थोड्याच कालानें हा रचिला गेला असावा. कारण या दोन ग्रंथांमधील बरेचसें साम्य पाहून या दोहोंत फारच थोडा काळ लोटला

असला पाहिजे. जर आपण अनुमानानें कौटिलीय अर्थशास्त्राला इ. स. ३ ऱ्या शतकांत टाकलें तर वात्स्यायनाच्या कामसूत्राला ४ थ्या शतकांत घालणें बरें दिसेल. पण हें केवळ अनुमानच होय.

धर्मशास्त्र, अर्थशास्त्र व कामशास्त्र हीं सर्व आपणच आहे त अशी महाभारतानें अगोदरच प्रौढी मिरविली आहे. खगोलीय ज्योतिषशास्त्रावरील वराहमिहिरकृत बृहत्संहितेंत ( इ. स. ६ वें शतक ) कामशास्त्राप्रमाणें काहीं अध्याय आहेत.

कामसूत्राच्या अंतरंगाचें परीक्षण.—वात्स्यायनानें आपल्या ग्रंथाचे सात भाग केले आहेत. त्यांस अधिकरणें म्हणतात. प्रत्येक अधिकरणांत केवळ लांबलचक मजकूर तोडण्याकरितां केलेला कृत्रिम पोटभाग ( अध्याय ) असून प्रत्येक अध्यायांत एक किंवा अनेक प्रकरणें आहेत. प्रत्येक प्रकरणांत एक विशिष्ट प्रश्न घेऊन त्याचा विचार केलेला असतो. असे ६४ प्रश्न ६४ प्रकरणांत विवेचिले आहेत. ( अधि. १, अ. १–५, प्र. १–५ )

पहिल्या साधारण अधिकरणाच्या पहिल्या प्रकरणांत कामशास्त्रामध्यें कोणते विषय आहेत, त्यांची अनुक्रमणिका दिली आहे. त्यालाच ग्रंथकारानें शास्त्रसंग्रह असें नांव दिलें आहे. दुसऱ्या प्रकरणामध्यें धर्म, अर्थ व कामरूपी त्रिवर्गाची आवश्यकता मनुष्यास कितपत पाहिजे याची सोपपत्तिक माहिती दिली आहे. म्हणून याला त्रिवर्गप्रतीपत्ति असें ग्रंथकारानें नांव दिलें आहे.

विद्यासमुच्चय नांवाच्या तिसऱ्या प्रकरणामध्यें कामशास्त्र शिकण्याला अधिकारी कोण? व्यावहारिक किंवा शास्त्रीय ज्ञान, यांपैकीं स्त्रियांनां कोणत्या प्रकारच्या ज्ञानाची विशेष जरूरी आहे, याचा विचार या प्रकरणामध्यें केला असल्यामुळें या प्रकरणाला ' विद्यासमुद्देश ' असें नांव आहे.

रंगेल किंवा अनुनयकुशल ( नागरक ) माणसानें कसें वागावें, त्याचा रोजचा व्यवहार कोणत्या प्रकारचा असावा, त्याच्या मदतीला स्नेही कोणत्या जातीचे किंवा दर्जाचे असावेत, याचा विचार पुढल्या दोन प्रकरणांमध्यें केला आहे व म्हणून त्या दोन प्रकरणांस नायक व सहाय्य करणारे मदतनीस यांचीं कामें ( नायक सहाय्यदूतिकर्मविमर्श ) असें नांव दिलें आहे.

सांप्रयोगिक (अधि. २ अ. १०; प्र. १ ते १७):—हें अधिकरण शृंगाराच्या प्रयोगानेंच भरलेलें असल्यामुळें त्यास सांप्रयोगिक हें नांव ग्रंथकारानें दिलें आहे. या अधिकरणाच्या प्रथमप्रकरणास ' समरत ' असें नांव आहे. समरत म्हणजे समान स्त्री–पुरुषांचा शृंगारिक व्यवहार. वीर्यस्खलनापासून, समसमान स्त्री-पुरुषांपैकीं कोणास प्रारंभीं अथवा शेवटीं विसृष्टि सुख होतें, याचा विचार प्रीतिविशेष प्रकरणामध्यें केलेला आहे. हींच प्रीतिविशेषाला वाढविणारीं दुसरीं कारणें खालील प्रकरणांमध्यें दिलीं आहेत. चुंबन, नखदंतप्रहरण, निरनिराळ्या देशांतील चुंबनादिकांचे रीतिरिवाज, नायिकेकडून नायकाप्रमाणें कृति होणें ( पुरुषायित ), पंढसमागमवर्तन, प्रणयकलह पशुपक्ष्यांप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेनें रतिक्रिडा करणें ( चित्रयोग ) इत्यादि.

कन्यासंप्रयुक्तक.-( अधि. ३ रें. अ. १–५ प्र. १ ते ९ ):—तिसऱ्या अधिकरणामध्यें नक्षत्रें व लक्षणें या दृष्टीनें विवाह करण्यास ' योग्य ' म्हणजे भावी कल्याण सुचविणारी मुलगी कोणती व अयोग्य कोणती हें प्रथम नायकानें ठरवून मग तिच्याशीं विवाह करावा असें सांगितलें आहे. आश्वलायन सूत्रामध्यें सांगितलेली दैवीपरीक्षा वात्स्यायनाला मान्य होती हें त्याच्या ' दैवं परीक्षणंचावधि स्थापयेयुः ' या सूत्रांतील ' दैवं परीक्षणं ' हें वाक्य साक्ष देत आहे. ( दैवी प. आ. सू. अ. १ खं. ६ सू. ५ ). विवाहाला अडचणी कशा येतात, त्या टाळण्याची साधनसामुग्री कोणती, नूतन विवाह झाल्यावर तरुणानें तरुणीशीं कसें वागावें म्हणजे परस्परांमध्यें वैर उत्पन्न होणार नाहीं या सर्व गोष्टींचा विचार या अधिकरणामध्यें केला आहे म्हणून याला 'कन्यासांप्रदायिक' असें नांव आहे.

भार्याधिकरण—( अधि. ४ अ. २ प्र. ८ ):—भार्या, पुनर्भू व वेश्या या त्रिविध नायिकांनीं घरामध्यें कसें वागावें, याचा येथें विचार केला असल्यामुळें या अधिकरणास ' भार्याधिकारिक ' म्हटलें आहे. या अधिकरणांत भार्येकडे सोंपवावयाचीं कामें, गृहकृत्यांविषयीं दक्षता, सवतीशीं वागण्याचे नियम, दुर्दैवी स्त्रीची वर्तणूक, पुष्कळ स्त्रियांशीं पुरुषानें ( राजानें ) वागण्याचे नियम इत्यादि प्रकरणें आहेत.

पारदारिक ( अधि. ५ वें अ. १–६ प्र. १ ते १० ):—चंचल वृत्तीच्या स्त्रियांचीं लक्षणें कशीं असतात तें समजून घेऊन आपल्या स्त्रीला त्या वृत्तीपासून दूर कसें ठेवावें, हा या अधिकरणाचा मूळ उद्देश आहे. म्हणून याला पारदारिक ( परस्त्रीविषयक ) हें नांव दिलें आहे. यत्नसाध्य व अयत्नसाध्य स्त्रियांचीं लक्षणें, स्त्रीपुरुषांचा शीलविचार, व्यावृत्तिपूर्वक प्रवृत्तीचीं कारणें, परिचय करण्याचीं साधनें, भाव परीक्षा, अंतःपुरांतील स्त्रियांच्या रक्षणाचे उपाय वगैरे प्रकरणें या अधिकरणामध्यें आहेत.

वैशिक ( अधि. ६ वें, अ. १–६ प्र. १–६ ):—वेश्येसंबंधीं माहिती यामध्यें दिलेली आहे म्हणून या प्रकरणाला ' वैशिक ' अधिकरण असें नांव आहे. यामध्यें वेश्येनें वागण्याचे नियम, वेश्येस मदतनिसांची आवश्यकता, अगम्यचिंता ( संबंध करण्यास कुष्ठादि दोषरहित योग्य पुरुष विचार ), नायकनायिकागुणविचार, द्रव्य मिळविण्याचे मार्ग, विरक्त पुरुषांचीं चिन्हें, विरक्तास अनुरक्त करण्याचे उपाय, द्रव्यरहित नायकास घालवून देण्याचा प्रयत्न, इत्यादि प्रकरणें या अधिकरणामध्यें आहेत.

औपनिषदिक (अ. ७ वें १–२ प्र. १–६):—वशीकरण, लिंगवृद्धि वगैरे गुप्त उपाय या अधिकरणामध्यें सांगितलेले

आहेत म्हणून याला औपनिषदिक (गुप्त उपाय अधिकरण) असें नांव आहे.

तेराव्या शतकांतील यशोधर इंद्रपदानें रचिलेल्या कामसूत्रावरील जयमंगलाख्य या विस्तृत टीकेखेरीज बऱ्याच अर्वाचीन टीका यावर आहेत. कामशास्त्र–वाङ्मयांतील कामसूत्रानंतरच्या अनेक ग्रंथांपैकीं थोड्यांचा येथें उल्लेख करणें जरूर आहे.

तेराव्या शतकांत कोक्कोकानें रतिरहस्य हा ग्रंथ लिहिला. तो कोकशास्त्र या नावानें प्रसिद्ध आहे. याचीं बऱ्याच देशी भाषांतून भाषांतरें झालीं असून सर्व हिंदुस्थानांत याचा फार प्रसार झाला आहे. आपण केवळ वात्स्यायन सिद्धांताचा सारांश काढला नसून नंदिकेश्वर आणि गोणिकापुत्र या प्राचीनतर आचार्यांनांहि आधाराला घेतलें आहे अशी हा कवि प्रौढी मिरवितो. ज्योतिरीश्वर कविशेखराच्या पंचसायक या ग्रंथांत गोणिकापुत्र, नंदीश्वर, मूळदेव आणि रतिदेव यांचा उल्लेख केला आहे. ज्याअर्थी हा कवि क्षेमेंद्राचा उल्लेख करतो त्याअर्थी ११ व्या शतकानंतरचा तो असला पाहिजे. अनंगरंग हा लोकप्रिय ग्रंथ सुमारें १६ व्या शतकांत होऊन गेलेल्या कल्याणमल्ल या राजकवीनें लिहिला आहे. कामशास्त्रावरील आणखी एक छोटा ग्रंथ म्हणजे साठ पद्यांत पुरी केलेली जयदेव कवीची सुप्रसिद्ध रतिमंजरी होय. गीतगोविंदाचा कर्ता जयदेव व हा जयदेव हे एक नसावेत. भारतीय वाङ्मयांत विशेषतः कामशास्त्रीय वाङ्मयांत नटी व वेश्या यांत फरक केलेला नसतो. वेश्येला दिल्या जाणाऱ्या शिक्षणामध्यें नाट्यकला हेंहि एक अंग असतें.

नवव्या शतकाच्या मध्यांत महावीराचार्य या जैन लेखकानें जो एक मोठा ग्रंथ रचिला आहे त्यांत कामतंत्रावर एक प्रकरण आहे. गणितसारसंग्रह या महावीराचार्यकृत ग्रंथाच्या पद्यमय प्रस्तावनेंत कामशास्त्राचा उल्लेख आलेला आहे.

**कामश्चाटका**—हें द्वीपकल्प सैबेरियाच्या ईशान्येस ओखोटस्क समुद्र व बेहरिंग समुद्र यांमध्यें आहे. रशियाचा हा एक समुद्रतीरस्थ प्रांत असून त्याचें क्षेत्रफळ १,०४,२६० चौ. मैल आहे. तेथील पर्वतांची एक रांग, मधून मधून त्रुटित झालेली दिसते. १८९९ पर्यंत येथें बर्फाचे डोंगर नव्हते. परंतु ते त्याच सालीं, बायलाया व उशीकिन्सकाया नांवांच्या १५,४०० फूट उंचीच्या डोंगरावर आढळून आले. मध्यवर्ति पर्वतराजींच्या दक्षिण भागांत ग्रेनाइट दगड व स्फटिकमय दगड सांपडतात व हचिनुस्का या ज्वालामुखीच्या उत्तरभागांत ज्वालामुखीचे खडक व वाळूचे दगड सांपडतात. हा ज्वालामुखी पर्वत १६,९२० फूट उंच आहे. तेथें कोळशाचा चुरा शिंपायुक्त प्राणी व गारगोट्या यांचे थर पडलेले आढळून येतात. या द्वीपकल्पाच्या मध्यभागीं गारगोट्या, ज्वालामुखींचे अवशेष व मातीचे थर पसरलेले आहेत. आग्नेय भागांत ज्वालामुखी पर्वतांची मालिका लागलेली असून तिची मर्यादा लोपाटका भूशिरापासून क्रोनोटस्काय भूशिरापर्यंत पसरलेली आहे. दुसरी ज्वालामुखीची मालिका, हचिनुस्कायापासून शिव्हेलूचपर्यंत असून वरील मालिकेस समांतर आहे. या दोन्ही ज्वालामुखी पर्वतांच्या मालिकांत एकंदर बारा सजीव व २६ निर्जीव असे ज्वालामुखी असून त्यांची उंची ७००० ते १५,००० फुटांपेक्षांहि जास्तच आहे. सर्वांत उंच कलचेव्हस्काया नांवाचा ज्वालामुखी हा १६,९९० फूट उंचीवर असून तो नेहमींच प्रदीप्त असतो व त्याचा रसप्रवाह कामश्चाटका नदीपर्यंत येऊन पोंचतो. या कामश्चाटका द्वीपकल्पांत तांबें, पारा व लोखंड सांपडतें. कामश्चाटका नांवाची मुख्य नदी ३२५ मैल लांब असून ती पूर्वदिशेकडे एकदम वळसा घेऊन उपर्युक्त ज्वालामुखीकडे जाते. टिघई व वॉलस्ट्राया या नद्या ओखोटस्कसमुद्रास मिळतात व अव्हाचा नदी पॅसिफिक महासागरास मिळते. ओखोटस्क समुद्राच्या उत्तरभागांत जमणारें वाहतें बर्फ व पूर्व किनाऱ्यावरून वहाणारा शीतल वारा यांमुळें येथें उन्हाळ्यांतहि थंडी असते व हिंवाळ्यांत उष्मा होतो. पर्जन्य व बर्फ तेथें विपुल असतें व उन्हाळ्यांत घनदाट धुक्यामुळें सर्व किनारा आच्छादिलेला असतो. पर्वत व जामीन वृक्षतृणांनीं सर्वदा आच्छादिलेल्या दिसतात. तेथील रहिवाशी ‘नेटल’ झाडाच्या तंतूंपासून वस्त्रें विणून तयार करितात. १८७० सालीं लोकसंख्या ५८४६ होती ती १९०० सालीं ७२७० झाली. १९१५त रशियनांची या प्रांतांत४१४००वस्ती होती. या प्रांताचें क्षेत्रफळ ५,०२,४२४ चौ. मै. होतें. दक्षिण भागांत कामश्चाडेल लोक रहातात. मंगोलियन वंशाचे गुण व आशिया व अमेरिका येथील मूळच्या रहिवाश्यांचे गुण त्यांच्यामध्यें दिसून येतात. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे मासे धरणें व शिकार करणें हा होय. दळणवळणार्थ ते कुत्र्याच्या गाड्यांचा उपयोग करतात. कामश्चाडेल भाषेचें कोणत्योहि प्रचलित भाषेशीं नातें दिसत नाहीं. त्यांची शब्दसंपत्ति तर फारच कमी आहे. तेथील मुख्य रशियन वसाहती म्हणजे पूर्वकिनाऱ्यावरील पेट्रोपॅव्ह लोस्क; कामश्चाटका नदीच्या दरींतील वर्खने–कामश्चाटका व निझने कामश्चाटका; बोलशायानजीक मोलशयॅटस्क व पश्चिम किनाऱ्यावरील टिघई ह्या मुख्य आहेत. सतराव्या शतकाच्या अखेरीस रशियन लोकांनीं कामश्चाटकामध्यें पहिली वसाहत केली. १६९६ मध्यें ॲटलासोव्हनें वर्खने-कामश्चाटका हें गांव वसविलें व १७०४ मध्यें रॉबेलेन्हनें बोलशर्यटस्क वसविलें; १७२० मध्यें या द्वीपकल्पाची पहाणी करण्यांत आली. १७२५ ते १७४५ च्या दरम्यान बेरिंग, क्रॅशेनिनिकोव्ह व स्टेलर यांनीं तेथें प्रवास करून मोठें कार्य केलें आहे.

**कामाख्य अथवा कामाक्षी**—आसाम. गोहत्तीच्या पश्चिमेस सुमारें दोन मैलांवर ब्रह्मपुत्रा नदीकांठीं नीलाचल डोंगरावर हें सतीचें देऊळ आहे. उत्तरअक्षांश २६° १०′ व पूर्वरेखांश ९१° ४५′. महाभारतकालीं प्रसिद्ध असलेल्या

नरक नामक राजानें हें देऊळ बांधून तेथें जाण्याकरतां डोंगरांत पायऱ्यांचा रस्ता बांधला अशी दंतकथा आहे. या पायऱ्या अद्यापि अस्तित्वांत आहेत. इ. स. १५६५ च्या सुमारास नरनारायणानें हें पुन्हां बांधलें व त्यांवेळीं १४० नरवध केले असें म्हणतात. नरनारायणानें बांधलेल्या देवळांपैकीं फारच थोडा भाग आज अस्तित्वांत आहे. या ठिकाणीं सतीचें गर्भाशयस्थान गळून पडलें व त्यावरच देऊळ बांधलें अशी आख्यायिका आहे. हें एक तीर्थक्षेत्र मानतात. डिसेंबर महिन्याच्या अखेरीस येथें मोठा उत्सव होतो.

**कामाठी**—एकंदर वस्ती (१९११) ३५१२; पैकीं ३३७० मुंबई इलाख्यांत असून बाकीची वऱ्हाड-मध्यप्रांतांत आहे. मुंबई इलाख्यांत मुंबई शहर, महाराष्ट्र, कर्नाटक व ठाणें जिल्हा यांमध्यें हे लोक आढळतात. हैद्राबाद व मद्रास मधून मजुरवार, मोलेवार, गुल्लोडा, सुंगलोला व साल्लोडा हे तेलगु जातीचे लोक सुमारें १०० वर्षांपूर्वी या इलाख्यांत आले. हे पुष्कळ धंदे करतात. परंतु साधारणपणें ते बहुधा कोणचा तरी कलाकुसरीचा धंदाच हातीं घेतात.

हे लोक प्रायः मजूर असतात म्हणून यांनां 'कामाठी' म्हणतात असें कित्येकांचें म्हणणें आहे. यांच्यांत बऱ्याच जातींचा समावेश आहे; यावरून असें अनुमान निघत आहे कीं, हैद्राबादच्या आग्नेयीस कोमोमेथ जिल्हा आहे त्यावरून कदाचित् हें नांव पडलें असावें. एकंदरींत असें दिसतें कीं, कामाठी हा शब्द जातिवाचक नसून स्थलवाचक आहे. या जिल्ह्यांतील कामाठी बहुतेक खालच्या वर्गाचे मजूर आहे.

हे लोक उंच, कृष्णवर्णी व धडधाकट असून यांची भाषा तेलगू असते. यांची रहाणी स्वच्छ असून ते स्वभावतः मेहेनती व काटकसरी असतात. यांचा पेहेराव कुणब्याप्रमाणें असतो. बालविवाहाची चाल प्रचलित आहे. तेलंगी ब्राह्मण विवाहमुहूर्त ठरवितो. विवाहपद्धति, साधारणतः हिंदूप्रमाणेंच असते. वरात घरीं आल्यावर, दारापाशीं दोन माणसें उभीं असतात व नवरानवरीला खांद्यावर घेऊन नाचूं लागतात; व अशा तऱ्हेचा नाच कांहीं तासपर्यंत करण्याची यांच्यांत चाल आहे.

मुलीस ऋतु प्राप्त झाल्यावर तेलंगी ब्राह्मणास बोलावतात व तो पंचांग पाहून मुलीस १० किंवा १३ दिवस मखरांत बसावयास सांगतो. आप्तेष्ट मुलीला अहेर करतात. शेवटच्या दिवशीं मुलाकडील मंडळी मुलीला आपल्या दर्जाप्रमाणें अहेर करून जातिबांधवांनां जेवण देतात.

मूल जन्मल्यावर तिसऱ्या दिवशीं मुलाला पोशाख चढवितात व सुईण त्यास कडेवर घेते. यावेळीं सुइणीस पाठीवर मुष्टिप्रहार सहन करावा लागतो. सातव्या दिवशीं मुलाचें नांव ठेवतात. बाराव्या दिवशीं आप्तेष्टांनां जेवण देतात.

हे स्मार्त किंवा भागवतपंथी असतात., स्मार्तपंथी भस्म व गंध लावतात व भागवतपंथी नाम लावतात. हिंदु देवतांचे हे उपासक असून पंढरपूर, काशी, नाशिक, जेजुरी, वगैरे क्षेत्रीं यात्रेस जातात. यांशिवाय तेलंगणाकडील राजेसदेव, नर्शिराम आणि नरसिंहाड्ड वगैरे देवता हे पूज्य मानतात. भागवतपंथी विष्णूला नारायण, गोविंद, श्रीमान वगैरे नांवांनीं आळवितात. हे हिंदूंचे सर्व सण पाळतात. कामाठ्यांपैकीं कोमटी, सोनार व सुतार या जाती मार्जविधंनाविधि करतात.

यांचा कुलगुरु तेलंगी ब्राह्मण असतो. यांत अंतर्भूत असलेला प्रत्येक जात आपले २ पासून ६ पर्यंत जातिप्रमुख निवडते. जातिप्रमुखाला 'मुकादम' असें म्हणतात.

व ऱ्हा ड व म ध्य प्रां त.—मद्रासेकडून मध्यप्रांतांतील मराठी जिल्ह्यांत वसाहत करण्यास आलेल्या लोकांस हा शब्द लावतात. यांची येथें जात बनली आहे असें मात्र अजून म्हणतां येत नाहीं. मद्रास इलाख्याच्या बाहेर या नांवाखालीं मोडणारे ७००० लोक आहेत. खुद्द मद्रासमध्यें मात्र या नांवाचे कोणीहि लोक नाहींत.

मध्यप्रांतांत हे लोक गवंड्याचें काम करतात. कांहीं ठिकाणीं यांची स्वतंत्र जात बनली असून कुणब्यांच्या चालीरीती यांनीं कांहीं उचलल्या आहेत. यांचे उपाध्याय तेलगू ब्राह्मण असतात. बाळंतिणी चौथ्या दिवसापासून मुलास पाजूं लागतात. आई दुसऱ्यांदा गरोदर होईपर्यंत पहिल्या मुलास शेंडी ठेवीत नाहींत. ती गरोदर झाली म्हणजे मुलासह तिला देवळांत नेतात व मुलाची शेंडी राखतात [रसेल व हिरालाल. मुं. गॅ. ( ठाणें जिल्हा ); एन्थोव्हेन].

**कामारेड्डीपेठ**—हैद्राबाद संस्थान. निझामाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ १५५ चौरस मैल. यांत १३० खेडीं असून त्यांपैकीं २५ जहागिरी आहेत. कामारेड्डीपेठ हें मुख्य ठिकाण असून त्याची लोकसंख्या सुमारें तीन हजार आहे व तालुक्याची लोकसंख्या (१९११) १११५०२ आहे. जमीनमहसूल २.२ लाख आहे. इ. स. १९०५ सालीं या तालुक्यांत शेजारच्या कांहीं तालुक्यांतलि भर घातली आहे.

**कामाऱ्हाटी**—बंगाल. चोवीस परगणे जिल्हा. बरकपूर विभागांतील एक गांव. उ. अ. २२° ४०' व पू. रे. ८८° २३'. लोकसंख्या ( इ. स. १९११ ) १८०१५. या गांवाच्या म्युनिसिपल क्षेत्रांत दाक्षिणेश्वर नांवाचें एक खेडें असून त्यांत राणी रासमणीचें नवरत्न नांवाचें देवालय आहे. यांत काली व कृष्ण यांचीं दोन देवळें प्रमुख असून सभोंवार बारा लहान लहान शिवालयें आहेत. पूर्वी हा गांव बरानगर म्युनिसिपालिटींत मोडत होता, परंतु इ. स. १८९९ सालीं येथें स्वतंत्र म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न १६००० रुपये व खर्च १५००० रुपये होता.

**कामालिया**—( कोट कामालिया ) पंजाब. मॉंटगामेरी जिल्हा व तहशिलींतील एक गांव मॉंटगमेरीच्या पश्चिमेस २७ मैलांवर आहे. उं. अ. ३०° ४३' व पू. रे. ७२° ४०'. लोकसंख्या ( १९११ ) ८२३७. अलेक्झांडरनें जीं गांवें जिंकलीं

त्यांत हें गांव होतें असें कनिंगहॅम म्हणतो. अर्वाचीन गांव चवदाव्या शतकांत खाम कमाल नांवाच्या खरल संस्थानिकानें वसविला. इ. स. १८५७ सालीं बंडवाल्यांनीं हा गांव एक आठवडाभर आपल्या ताब्यांत घेऊन त्या अवधींत सफई लुटला. इ. स. १८६८ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली

इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न ८८०० रुपये व खर्च १०२०० रुपये होता. ब्रिटिशांचा अंमल सुरू झाल्यापासून येथील व्यापार वाढत आहे.

**कामेरालिझम्**, उ पो द् घा त.—हें जर्मन मुत्सद्यांचें अर्थशास्त्र जर्मनींत उत्पन्न झालें. राजाच्या खासगी मालमत्तेची व्यवस्था करण्याला अवश्य असलेल्या ज्ञानाला प्रथमतः 'कॅमेरल् विझेन्शाफ्ट' हा शब्द लावीत असत. नंतर त्या शब्दाचा अर्थ व्यापक झाला व राजाची खासगी मालमत्ता हा या शास्त्राचा प्रतिपाद्य विषय न राहतां, संस्थानची अगर राष्ट्राची मालमत्ता व मिळकत यांविषयींचें तें शास्त्र बनलें. सध्यां तर शासनशास्त्राची उपपत्ति व कायदा यांचाहि त्या शास्त्रांत अंतर्भाव होतो.

या शा स्त्रा व री ल ग्रं थ व ग्रं थ का र.—ह्या शास्त्रावरचें वाङ्मय इ.स१५५५ सालापासूनचें आहे असें आढळून येतें. आंत्रे, ओसे, सेशेन्डोर्फ, वेशेर, श्रोडर, गेर्हर्ड, रोहर, गॅसर, डिथ्मर, झिंक, डरायस्, जस्टि, सोन्नेफेल्स् हे ह्या वर्गांतील मुख्य अर्थशास्त्रज्ञ आहेत. प्रो. अल्बिअन् व्ही. स्माल यानें "दि कॅमेरालिस्ट, दि पायोनिअर्स ऑफ् जर्मन सोशल पॉलिटी" नामक एक पुस्तक लिहिलें आहे. प्रो. स्मालच्या ग्रंथात क्यामेरालिस्टच्या ग्रंथांची माहिती व गोषवारे दिले असून ते महत्वाचे आहेत; तथापि त्यांची वकीली करण्याकरता जी प्रस्तावना व जो उपसंहार लिहिला आहे तो सदोष आहे. या सदोषतेचीं कारणें येणेंप्रमाणेंः—

(१) मर्कॅंटॅलिझम् व कॅमेरॅलिझम् एकच आहेत असा प्रो. स्मालचा चुकीचा समज आहे. म्हणून मर्कॅंटॅलिझमवर केलेली टीका कॅमेरॅलिझमवर केली आहे असा त्याचा गैरसमज झाला आहे.

(२) मर्कॅंटॅलिस्टांचीं जीं मतें चुकीचीं गणलेलीं आहेत, तीं मतें कॅमेरॅलिस्टांच्या ग्रंथांत आढळून येत नाहींत असें दाखविल्यानें, मर्कॅंटॅलिझमच्या टीकेचें निराकरण होतें असा त्याचा चुकीचा समज आहे.

(३) कॅमेरॅलिस्ट हे शासनशास्त्रज्ञ आहेत; अर्थशास्त्रज्ञ नाहींत असें नुसतें विधान केलें आहे. पण तें विधान सिद्ध केलें नाहीं. "कॅमेरल् शास्त्र" या संज्ञेचे दोन अर्थ आहेत. राजाच्या मालमत्तेची व्यवस्था करण्याकरितां अवश्य असलेलें ज्ञान हा एक अर्थ व आयव्ययशास्त्र हा दुसरा अर्थ. पहिला अर्थ, प्रो. स्मॉलनें घेतला असें म्हणावें तर त्या अर्थाचें समर्थन करणाऱ्या ग्रंथकाराचा त्यानें आधार दिलेला नाहीं. दुसरा अर्थ घेतला असें म्हणावें तर आयव्ययशास्त्र हा अर्थशास्त्राचा विभाग आहे अथवा शासनशास्त्राचा आहे हा पूर्वी ठरून गेलेला प्रश्न पुनः उपस्थित करणें निष्कारण आहे.

(४) मर्कॅंटॅलिझमविषयींची त्याची कल्पना त्यानें स्पष्टपणें सांगितली नाहीं. श्मोलरनें राष्ट्रसंपत्ति वाढवून संस्थान श्रीमंत करणें असा मर्कॅंटॅलिझम्चा अर्थ घेतला आहे. पण युद्धाकरितां संस्थान तयार ठेवण्याचें राष्ट्रीय नैसर्गिक धोरण असा अर्थ स्मॉलनें घेतला आहे; तथापि हा अर्थ बदलण्याचें कारण मात्र त्यानें दिलें नाहीं.

(५) स्मॉलच्या मतें 'पोलिटिकल एकॉनमी' ही एक विचारपद्धति आहे. मर्कॅंटॅलिझम् नांवाची एक विचार पद्धति आहे असें भासविण्याचा अॅडम् स्मिथ्चा प्रयत्न आहे असें स्मॉलला वाटतें. परंतु लोक अथवा संस्थान यांच्या कार्याला पुरेल इतका पैसा गोळा करणें व त्याचा व्यय करणें एवढाच शासनशास्त्रांतर्गत अर्थशास्त्राचा अर्थ स्मिथनें घेतला आहे.

(६) अर्थशास्त्राच्या दृष्टीनें लिहिले नाहींत अशा ग्रंथांचें परीक्षण अर्थशास्त्रदृष्ट्यां करणें बरोबर नाहीं असें तत्व प्रतिपादन करून, कॅमेरालिस्टचे कल्पनादोष लपविण्याचा प्रयत्न स्मॉलनें केला आहे.

(७) साधारण ज्ञान व शास्त्रीय ज्ञान एका जातीचें नसतें असें समजून कॅमेरालिस्टांची 'नॅशनल् ओकोनमी' ही तत्वज्ञानमय नाहीं आणि त्याअर्थी स्मिथच्या निंदेस तें पात्र नाहीं. असें त्यानें प्रतिपादिलें आहे.

ह्या पुस्तकाचा उपयोग शासनशास्त्रावर व अर्थशास्त्रावर जर्मन लोकांचीं काय मतें आहेत. हें समजण्याला होईल.

ह्या शा स्त्रा चा इ ति हा सः—डब्ल्यू लेक्सिस् ह्यानें कामेरल विझेन्शाफ्टवर एक लेख लिहिला आहे. "हॅन्ड. वोर्टर डर स्टाटसविझेनशाफ्टन" (जेना १९००)- या ग्रंथांत कॅमेरालिझम् व मर्कॅंटॅलिझम् ह्या विषयांवर अनेक लेख ग्रथित केले आहेत. त्यांत लेक्सिसचा लेख आलेला आहे. लेक्सिसनें कॅमेरॅलिझम्वर दिलेली माहिती येणेंप्रमाणेंः—

"गेल्या शतकाच्या आरंभापासून 'कामेरल विझेन्शाफ्ट' हें नांव जर्मनींत 'कॅमर" च्या व्यवस्थेसंबंधीं उपयुक्त ज्ञानाला लावलें गेलें. फ्रेंच राजांनीं प्रथमतः कामरचा अर्थ राजाची मालमत्ता असा केला. नंतर तो अर्थ विस्तृत झाला व राष्ट्रांच्या वसूलीचाहि त्या संज्ञेच्या अर्थांत अंतर्भाव झाला. इ.स.१७७९ त जुंगनें एकपुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत राजाचें व संस्थानचें उत्पन्न उत्तम रीतीनें कसें मिळावावें व त्याची व्यवस्था कशी करावी यासंबंधींच्या निममांचाहि ह्या कामेरल शास्त्रांत अंतर्भाव केला आहे. व्यापार व उद्योगधंदे ह्यांचें ज्ञान प्रस्तुत शास्त्राला अवश्यक झालें. इ.स.१८१९ त स्मॉलनें लिहिलें आहे कीं, राष्ट्राची मालमत्ता व

मिळकत, ती मिळविण्याचीं व वाढविण्याचीं साधनें, संस्थानची चाकरी करण्याबद्दल करांची माफी व अशा चाकरीबद्दलचा पगार, ह्या गोष्टींशीं संबंध असणाऱ्या सर्व गोष्टींचा ह्या शास्त्रांत अंतर्भाव होतो. त्यानें ह्या शास्त्राचे दोन विभाग केले आहेत. (१) व्यापार, कला (कार्यपद्धति विषयक व व्यापारविषयक) व (२) अर्थशास्त्र (ह्याचे तीन विभाग.—राष्ट्राचें अर्थशास्त्र, व्यापाराचे नियम व आयव्ययशास्त्र). १८२५ त रोनें खासगी अर्थशास्त्र शासनशास्त्रविषयक अर्थशास्त्रापासून भिन्न केलें. स. १८३५ त व्हॉन् राउमस्टार्क ह्यानें ह्या शास्त्राचें जुन्या पद्धतीनें विवरण केलें. व्यापार व उद्योगधंदे यांचा अभ्यास व उत्पत्ति विषयक शाखांची कार्यपद्धति ह्यांचा त्यानें ह्या शास्त्रांत अंतर्भाव केला, परंतु सामान्य अर्थशास्त्रविषयक उपपत्तीला ह्या शास्त्रांत स्थल दिलं नाहीं. सध्यां ट्युबिंजन् येथें अर्थशास्त्राच्या शासनशास्त्राच्या ज्या शाखा आहेत त्या शासनशास्त्राची उपपत्ति व कायदा या गोष्टींचा ह्या शास्त्रांत अंतर्भाव करितात.

म र्कें टॅ लि झ म् (अर्थशास्त्रीय व्यापारी मतें.) ई. लेसर् ह्यांच्या मतें व्यापारपद्धतीचीं तत्वें खालीलप्रमाणें आहेतः

(१) देशांत जितका पैसा अधिक तितका देश अधिक श्रीमंत.

(२) परदेशीय व्यापारामुळें मौल्यवान् धातूंची किंमत ठरते.

(३) देशाच्या व्यापाऱ्यांनीं त्याच देशाच्या जहाजांत परदेशाशीं व्यापार करणें फायदेशीर असतें.

(४) परदेशापासून कमी खरेदी करणें व परदेशांत जास्त विक्री करणें या योगानें संपत्ति वाढते. आयात व निर्गत मालांच्या किंमतींतला फरक सोनें व चांदी यांत दिला पाहिजे. ह्यामुळें व्यापाराच्या समतोलनाची कल्पना उत्पन्न होते.

(५) काम व कामाकरितां जितकी संधी जास्त तितकें देशाला हितावह असतें.

(६) लोकसंख्या जितकी जास्त तितकी अर्थशास्त्रदृष्ट्या सुबत्ता असते.

(७) तयार केलेल्या वस्तू परदेशीं पाठविल्या जाव्यात, कच्चा माल जाऊं नये.

(८) सत्तेखालीं असलेल्या देशांशीं अथवा वसाहतींशीं व्यापार फायदेशीर असतो.

(९) हे फायदे घडवून आणण्यास व्यापार व दळणवळण यांचे नियम संस्थानानें ठरविले पाहिजेत.

(१०) व्यापारांत वर्चस्व झालें म्हणजे राजकारणांत वर्चस्व प्राप्त होतें [ स्मॉलर्स बुक; ॲडम स्मिथ ].

**कामेरून**—पश्चिम आफ्रिकेंतील एक संरक्षित संस्थान. १५ व १६ व्या शतकांतील पोर्तुगीज शोधकांनीं कामेरून हें नांव प्रथम प्रचारांत आणलें. कामेरून उपसागर एका मोठ्या पर्वताच्या आग्नेयीस असून तो पर्वतहि समुद्रालगतच आहे. तेथील पर्वतांनां कामेरून हें नांव एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत इंग्रज देत असत. १८८४मध्यें जर्मनीनें ह्या देश काबीज केल्यावर या देशाचें कामेरून असेंच नांव कायम ठेविलें. याच्या पश्चिमेस अटलांटिक महासागर, वायव्येस ब्रिटिश नायगेरीया, उत्तरेस चाड सरोवर व पूर्वेस व दक्षिणेस फ्रेंच कांगो हीं आहेत. संस्थानची समुद्राकडील सरहद्द रिओडेलरेपासून, कँपो नदीपर्यंत २०० मैल पसरली आहे. ग्रेटब्रिटन व जर्मनी यांच्यांत इ. स. १८९३मधील करारानें ठरलेली वायव्य मर्यादा, रिओडेलरेपासून कांस नदीच्या 'रॅपिड्स' पर्यंत पूर्वेस पसरली आहे. तेथून ती ईशान्य बाजूनें योला शहराच्या हद्दीपर्यंत जाऊन दक्षिणेकडे वळते व पुनः उत्तराभिमुख होऊन वेन्यू नदी ओलांडते. या सरहद्दीची रेषा ईशान्येस वळून चाड सरोवरास जाऊन मिळते. दक्षिण व पूर्वमर्यादा जर्मनी व फ्रान्स यांच्यांतील निरनिराळ्या वेळीं झालेल्या तहांनीं ठरविल्या आहेत. दक्षिणमर्यादा कँपो नदीच्या मुखापासून तों शा नदीपर्यंत लांबली असून पूर्वमर्यादा संगा नदीपासून उत्तरेस वळून योला येथें ब्रिटिश सरहद्दीस जाऊन मिळते. १९११ सालीं फ्रेंच काँगोंतील बराचसा मुलुख कामेरूनमध्यें समाविष्ट झाला व या मुलुखाला नवा कामेरून म्हणूं लागले. १९१३ सालीं नायगेरिया व कामेरून यांच्या सरहद्दी ठरविण्यांत आल्या. संस्थानचें क्षेत्रफळ सुमारें १९०,००० चौरस मैल असून, १९१३ मध्यें लोकसंख्या २५,४०,००० होती.

येथें संगा लोम, मंगो, आणि क्रिबि, नायॅंगो, कांगो इत्यादि लहानमोठ्या नद्या आहेत.

भू ग र्भ र च ना—येथील अत्यंत जुनाट खडक जंबूर व ग्रेनाईट दगडांनीं बनलेले आहेत. वेनू नदीच्या दोन्ही तीरांवरून वाळूचे खडक पसरले आहेत. कामेरून पर्वताजवळ लोखंडासारख्या काळ्या दगडांचें पीठ बनलें असून त्यांभोंवतीं चुनखडी दगडांचा थर आहे. अन्तर्भागांतील विस्तृत प्रदेश काळ्या चिक्कण मातीनें आच्छादिलेला आहे.

कामेरून व अप्पर गिनी हे दोन पर्वत आहेत. त्यांपैकीं कामेरून पर्वतांची बडा कामेरून व छोटा कामेरून अशा दोन प्रसिद्ध शिखरांपैकीं, अत्यंत उंच शिखराचें स्थानिक नांव 'मॉंगोमा लोबा' असें आहे. व उंची १३३७० फूट इ. स. १९०९ मध्यें तेथील ज्वालामुखी जागा झाला होता.

तेथील प्रसिद्ध शहरें म्हटलीं म्हणजे दुआला, बेलटाउन अक्काटाउन, व्हिक्टोरिया अशीं आहेत. बाटंगा, व कँपो हीं शहरें व्यापाराकरितां विशेष प्रसिद्ध आहेत.

ह वा मा न.—कामेरून संस्थान ऊष्ण कटिबंधांत वसलें आहे; अर्थात येथील हवाहि ऊष्णकटिबंधांतील हवेप्रमाणें आहे. जुलै ते आक्टोबरपर्यंत कडाक्याची थंडी असते व पर्जन्यहि फार असतो. किनाऱ्यावर ऊष्णतेचें मान जास्त असतें व डोंगराळ भागांत त्याहून कमी असतें. हिंवतापाची

सांथ नेहमींच असते.कामेरून पर्वताच्या मध्य भागीं आरोग्य स्थानाला लायक अशी समशीतोष्ण हवा असते.

प्रा णी व व न स्प ती.—डोंगराळ प्रदेश अरण्यानें आच्छादिला असून त्यांत इमारती व इतर उपयुक्त लांकूड उत्पन्न होतें. बेनु नदीच्या उत्तरेकडील प्रदेश समृद्ध व सुपीक आहे. कापूस, रबर, मका, तांदूळ, ऊंस, इत्यादि पिकें या ठिकाणीं उत्पन्न होतात. येथील जंगलांत मांसभक्षक व जाड कातडीचे प्राणी विपुल सांपडतात. गोरिला नांवाच्या मनुष्यासारख्या मोठ्या वानरांचें हें अरण्य निवासस्थान आहे.

र हि वा शी.—कामेरूनच्या उत्तरभागांत फ्यूला व हौसा जातींचे लोक राहतात व दक्षिणेस बांटु भाषा बोलणाऱ्या जाती राहतात.

बांटु निग्रो लोकांच्या ड्युआला, बाकिरी, बा-लाँग, बुरी, घाफरामीआवा व बाकुडू ह्या मुख्य जाती होत. किनाऱ्यावरील शहरांत क्रुमेन लोकांची वस्ती आहे. फ्युला व हौसा ह्या जाती मुसुलमान आहेत. व बाकीच्या जाती मूर्तिपूजक आहेत. शिवाय प्रॉटेस्टंट व रोमन कॅथोलिक मिशनऱ्यांच्या संस्था व शाळा आहेतच.सर्व शाळांतून जर्मन भाषा शिकविण्यांत येते. ड्युआला हें संस्थानचें मुख्य शहर आहे.

व्या पा र व उ द्यो ग धं दे.—लोखंड गाळणें,भाले, बाण, वरच्या व तरवारी बनविणें, इत्यादि धंद्यांत एतद्देशीय लोक वाकबगार आहेत. कामेरून पर्वताजवळील लोक लांकडी खोदीव कामें फार कुशलतेनें करतात. शिवाय ऊंस, मका, बटाटे वगैरेंची लागवडहि हे लोक करतात. रबर, हस्तीदंत, व इतर पदार्थ येथून बाहेरदेशीं व्यापारार्थ जातात. कापसाचा माल, अनेक प्रकारची दारू, इमारती सामान, मीठ, लोखंडी सामान वगैरे जिनसा या ठिकाणीं बाहेरून येतात. १९०७ सालीं व्यापाराची एकंदर देवघेव१७,००००० पौंडांवर गेली होती. त्या सालीं जर्मनीशीं या देशाचा व्यापार वाढत होता. व इंग्लंडाशीं व्यापाराचें प्रमाण कमी होत चाललें होतें. आयात व निर्गत मालाचें सुमारें ७० टक्के प्रमाण जर्मनीशीं होणाऱ्या व्यापाराचें पडतें.

द ळ ण व ळ ण.—जर्मन व ब्रिटिश आगबोटींतून यूरोपशीं दळणवळण असे. नद्यांच्या पृष्ठभागावरूनहि लहान लहान होड्या खेळत असतात. व्हिकोरीपासून बेयांगपर्यंत एक रेल्वे फांटा गेला आहे.ड्युआलापासून नीयांगपर्यंत दुसरा फांटा गेला आहे. १९१३ सालीं १४९ मैल लांबीची रेल्वे होती. सरकारी ठाण्यांच्या शेजारीं सुंदर रस्ते बांधले आहेत. व किनाऱ्यावरील शहरें तारायंत्रांनीं व शब्दवाहक यंत्रांनीं जोडलीं आहेत.

शा स न प द्ध ति.—येथील राज्यकारभार साम्राज्य सरकारनियुक्त गव्हर्नर पहात असे. तो साम्राज्यसरकारला जबाबदार असे. गव्हर्नरास मदतनीस म्हणून एक चॅन्सेलर असे; व वेळोवेळीं सल्ला देण्याकरितां एक सल्लागारमंडळ असे. या मंडळांत संस्थानांतील व्यापारी सभासद असत. आदामावा व बोर्नु येथील सुलतानांच्या दरबारीं जर्मनीनें आपले रेसिडेंट्स ठेवले होते. दारू व तंबाखूवर कर बसवून सारावाढ करण्यांत आली होती. तेथील रहिवाशांवर डोईपट्टीहि बसलेली होती १९०५ सालीं स्थानिक उत्पन्न १,३१,००० पौंड होतें. त्यांत सरकारी ग्रँटची भरहि नंतर पडली होती.

इ ति हा स.–कामेरून व त्याच्या लगतचा किनारा पोर्तुगीज नाविक फारनँडोपो यानें प्रथम पंधराव्या शतकाच्या अखेरीस शोधून काढला.सतराव्या शतकाच्या सुरवातीस युरोपिअनांनीं येथें व्यापारी वखारी घातल्या. एतद्देशीय व्यापाऱ्यांशीं हे लोक देवाण-घेवाण पद्धतीवर व्यापार करीत. ही पद्धत जर्मनीनें पुढें बंद केली. 'आक्वा व बेल' हीं येथील दोन पिढीजात श्रीमंत व्यापारी घराणीं होतीं. १८३७ मध्यें बिंबिआच्या राजानें आपल्या राज्याचा बराच मोठा भाग ग्रेटब्रिटनला दिला. १८४५ त ब्याप्टिस्ट मिशनरी सोसायटीनें अक्वा घराण्यापासून आपल्या संस्थेकरितां जागा मिळविली.१८४५ त बिंबिआ येथें दुसरें एक मिशनरी ठाणें वसविण्यांत आलें. १८५८ त आलफ्रेड सेकर यानें अंवास बे येथें स्वतंत्र झालेल्या निग्रोंची एक वसाहत स्थापिली. ती पुढें व्हिक्टोरिया म्हणून प्रसिद्धीस आली.पुढें दोन वर्षांनंतर तेथील खाडीवर जर्मनीनें पहिली वखार घातली.१८८२मध्यें ड्युआला जातीच्या पुढाऱ्यांनीं आपला प्रदेश ग्रेटब्रिटननें आपल्या राज्यास जोडावा अशी आग्रहाची विनंति केली पण ती ग्रेटब्रिटननें नाकारली असें सांगतात. १८८४ त जर्मनीनें बेल राणीवरोबर तह केला. इंग्लंडनें जर्मनीचा बेल शहरावरील नव्हे, तर सबंध कामेरूनवरील हक्क मान्य केला. १७८७ मध्यें व्हिक्टोरिया येथील इंग्रजी ठाणें देखील जर्मनीच्या स्वाधीन करण्यांत आलें. हळू हळू जर्मनीनें आपलें वर्चस्व अन्तर्भागावर देखील स्थापिलें. १९०२ मध्यें चाड सरोवराचा किनारा जर्मनीनें प्रथम शोधून काढला. जर्मनीला प्रथम प्रथम एतद्देशीयांवर सत्ता गाजविणें जरा जड गेलें.१९०४-५ मध्यें या लोकांनीं बंडें उभारलीं.१९०५ मध्यें जर्मनीला संगा नदीकडे जाण्याला मोकळा मार्ग झाला. महायुद्धाच्या अमदानींत फ्रेंच व इंग्लिश सैन्यानें १९१६ मध्यें ही वसाहत जिंकून घेतली. १९११ च्या फ्रँको—जर्मन तहान्वयें फ्रेंच इक्वेटोरियल आफ्रिकेंतील जे जिल्हे कामेरूनमध्यें समाविष्ट केले होते,ते नंतर फ्रेंच इक्वेटोरियल आफ्रिकेच्या गव्हर्नर जनरलच्या देखरेखीखालीं ठेविले; व बाकीचा जिंकलेला मुलूख नायगेरिया सरकारकडे गेला.

**काम्यकवन**—काम्यकवन आणि द्वैतवन हीं भारतांत प्रसिद्ध आहेत. वनवासांत असतां पांडव पुष्कळ काळ या वनांत राहिले होते. हस्तिनापुराच्या पश्चिम भागीं कुरुक्षेत्राच्याहि पश्चिमेस सरस्वतीतीरावर काम्यकवन होतें. मरुधन्व प्रदेश ( सांप्रतचें मोठें वाळवंट ) याच्या जवळच होता

असें वनपर्वांतील वर्णनावरून दिसतें. काम्यकवन ज्या प्रदेशांत होतें त्या देशास कुरुजंगल असें नांव होतें.

हस्तिनापुराहून रथांतून तीन दिवसांत पांडव काम्यकवनांत गेले. पांडव काम्यकवनांतून द्वैतवनांत व द्वैतांतून काम्यक वनांत असे दोन–तीन वेळां गेले. द्वैतवनहि सरस्वतीच्या तरीं मरुधन्व प्रदेशाच्या समीप होतें असें वनपर्वांतील अनेक उल्लेखांवरून दिसतें. यांत पांडवांनीं तीर्थयात्रेहून आल्यावर एक पर्जन्यकाळ काढला, तेव्हां पाऊस पुष्कळ पडून नद्यास पूर आले वगैरे वर्णन आहे. काम्यकवनहि फलपुष्पयुक्त चांगलें होतें. त्यांत पांडवांनीं पांच वर्षें काढिलीं. यावरून हीं वनें ओसाड मैदानाच्या अगदीं समीप नसावीं. दोन्हींहि परस्पर जवळ जवळ होतीं असें दिसतें. कार्तिकी पौर्णिमेस द्वैतवनांतून पांडव काम्यकवनांत आले.

यावरून हीं वनें फार तर दहा पांच कोसांच्या अंतरानें असतील. तीर्थयात्रेहून उत्तरेकडून पांडव आले त्यास द्वैत वन लागलें. मग ते काम्यकवनांत गेले. यावरून उत्तरेकडून येतांना प्रथम द्वैत मग नैर्ऋत्येस काम्यक असावें असें दिसतें. कारण दोन्हींहि सरस्वतीतीरीं होतीं. ती ईशान्येकडून नैर्ऋत्येस वहाते. द्वैतवनांत एक मोठें सरोवर होतें असें दिसतें. द्वैतवनाचा उल्लेख जेथें जेथें आला आहे, त्यांतून पुष्कळ ठिकाणीं "द्वैतवन सरः" असें आढळतें [ दीक्षित प्राचीन भूवर्णन महाभारत ].

**कायगांवकर,**—( दीक्षित पाटणकर ) नारायण दीक्षित पाटणकर नांवाचा एक कोंकणांतील ब्राह्मण सतराव्या शतकांत इ. स. १६५० नंतर देशावर येऊन गंगातीरीं पैठण येथें तपश्चर्या करूं लागला. तो संस्कृतज्ञ विद्वान् व कर्मठ होता. पुढें तो भिक्षावृत्ति अवलंबन करून औरंगाबादेजवळ सातारें या गांवीं रहात असे. कांहीं काळानें तीर्थयात्रा करीत तो हिंदुस्थानभर फिरला. त्याच्या साधुवृत्तीची, तपश्चर्येची व अन्नदानाची कीर्ति बाळाजी विश्वनाथाच्या कानावर जाऊन त्याची त्या साधु पुरुषाच्या ठिकाणीं भक्ति जडली. पुढें शाहू महाराजहि त्याच्या भजनीं लागले. आपल्या कार्यांत अशा सत्पुरुषांचे आशीर्वाद घेण्याचा प्रघात त्या वेळीं सार्वत्रिक होता. ब्रह्मेंद्रस्वामी व नारायण दीक्षित समकालीन होते. दक्षिणेंतील व कोंकणांतील कारस्थानांत दीक्षितांचें अंग होतें. दीक्षितांचें वास्तव्य पुढें बहुधा काशीसच झालें आणि त्यानें अनेक ठिकाणीं अन्नछत्रें सदावर्तें वगैरे घातलीं. काशीस दीक्षितपुरा म्हणून त्यांनीं बसविलेला एक भाग आहे. आपल्या प्रवासांत ठिकठिकाणच्या राजकारणांची बातमी ठेवून ती तो बहुधा पेशव्यांस देत होता असें दिसतें. बाजीराव, चिमाजी आप्पा व नानासाहेब यांचा दीक्षितांशीं पत्रव्यवहार होता. चिमाजी आप्पा लिहितो. "आम्ही लेकरें स्वामींचीं आहों. आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कार्याचें ठायीं दिवसेंदिवस लागून यशाची अभिवृद्धि होय, ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच व देवाची प्रार्थना करतीलच यांत संशय नाहीं. त्यावर दीक्षित म्हणतात 'कै. बाळाजी पंतापासून आमचें त्यांचें चालत आलें आमच्या वचनाचा त्यांस विश्वास असे. त्यापेक्षां तुमच्या तीर्थरूपांची निष्ठा आमच्या उभयतांच्या स्थळीं असे, जे तीर्थरूपास रखे मानीत. आम्ही क्रोधेंकरून नाना प्रकारें रागेजून पत्रें लिहीत असों. परंतु त्यांस क्रोध तिलमात्र येत नसे. त्यापेक्षां तुमचें नांव उत्कृष्ट व्हावें असा ईश्वरें आम्हांस दृष्टांत झाला आहे. तुमच्या पित्याच्या स्थळीं ममता होती, त्यापेक्षां तुम्हांवर अधिक आहे. हेच ईश्वराजवळ प्रार्थना करितों कीं, यांचें उत्कृष्ट चालो,' पेशवे किंवा सरदार राज्यांत आपला जम बसवूं लागेल म्हणजे हें केवळ तपश्चर्येचें व आशीर्वादाचें फल होय, असें हे साधुपुरुष त्यास स्मरण देत व त्याचा मोबदला मागत. बहुधा अल्प मोबदला त्यास पुरत नसे. ब्रह्मेंद्रस्वामी व दीक्षित एकाच वर्गांतले दिसतात. 'काशी येथें वैशाखमासीं पंचपक्वान्नाचें लक्ष भोजन करावयाचा प्रारंभ करून मग कार्तिक मासपर्यंत वांचलों तर एकवेळ त्या प्रांतास सिंहस्थास गोदास्नान करून सर्वांच्या भेटी घेऊन यावें. दर्शनानंतर सर्व विदित होईल.' असें दीक्षित पेशव्यांजवळ मागतात. नारायण दीक्षितानें बाजीरावाजवळ मथुरेसंनिध धर्मकृत्यास दहा गांव मागितले. याचा अर्थ बाजीरावानें तो प्रांत जिंकण्याचा उद्योग करावा असा दीक्षितांचा उद्देश होता. त्या वेळच्या लौकिक भावना कशा प्रकारच्या होत्या हें यावरून दृग्गोचर होतें. गोदाप्रवरासंगमीं कायगांवास दीक्षितांनीं वास्तव्य केलें, म्हणून त्यांस कायगांवकर हें नांव पडलें. हें गांव गोदावरीच्या कांठीं उत्तर हिंदुस्थानच्या हमरस्त्यावर होतें. दीक्षित सावकारी करीत. निजामाकडील व उत्तरेंतील व्यवहारांत दीक्षितांचा उपयोग पेशव्यांस होत असे. शेंदुर्णीचे ( पूर्वखानदेश ) हल्लींचे जहागीरदार यांचे वंशज होत. यांची वंशावळ अशी.—

नारायण गोविंद दीक्षित टकले (मृ. १४।१०।१७४८).




नारायणदीक्षितानंतर वासुदेव दीक्षित व बाळकृष्ण दीक्षित यांचा व पेशव्यांचा पत्रव्यवहार आढळतो. निजामानें

व पेशव्यांनीं यांनां बरीच जहागीर दिली होती. त्यांपैकीं हल्लीं कांहीं चालत आहे [ का. सं. प. या.: इ. सं. ऐ. च; राजवाडे खं. ३; म. रि. म. वि. ३ ].

**कायदा**—समाजनियमनाच्या अनेक साहित्यांपैकीं 'कायदा' हें एक साहित्य होय. समाजनियमन हें केवळ कायद्यानेंच होतें असें नाहीं. प्रचलित नीतिनियम, पारमार्थिक विचार, विशिष्ट वर्गाबद्दल आदर इत्यादि अनेक साधनांनीं समाजनियमन होतें. त्यांपैकीं राजशासनास कायदा म्हणण्याची वहिवाट आज पडली आहे. पाश्चात्य कायदेशास्त्राच्या अभ्यासकांत शासनसंस्थांनीं उत्पन्न केलेल्या नियमांसच कायदा म्हणावें काय याविषयीं एक मत नाहीं. तथापि आपण आज कायदा म्हणजे शासनसंस्थेचीं शासनें असा अर्थ करूनच अर्वाचीन कायदेशास्त्राविषयीं येथें विवेचन करूं. भारतीय धर्मशास्त्र, ख्रिस्ती सांप्रदायिक कायदा इत्यादि गोष्टी स्वतंत्र लेखाचा विषय करूं.

**अर्वाचीन कायदेशास्त्र.**—मनुष्यजात ही अनेक भिन्नभिन्न मानवसमूहांची अथवा समाजांची बनलेली आहे. हे समाज परस्परांपासून कितीहि भिन्न असले तरी त्यांची आपसांतील परस्परांशीं वागणूक विशिष्ट नियमानुसार होत असते. प्रत्येक समाजाची कांहीं तरी नियमनपद्धति असते. हे नियम हाच कायदेशास्त्राचा विषय होय. या नियमसमुच्चयांचा अभ्यास अनेक तऱ्हेनें करतां येईल. उदाहरणार्थ या समुच्चयांतील नियम अथवा कायदा, हक्क, कर्तव्य, मालमत्ता, गुन्हा इत्यादि सदृशवस्तुबोधक शब्द व ते देखील निरनिराळ्या पद्धतींतील घेऊन त्यांचा अभ्यास करणें यास इंग्लंडमध्यें 'पृथक्करणात्मक कायदेशास्त्र' म्हणतात. या अभ्यासांत हक्क अथवा कर्तव्य म्हणजे काय व परस्परसंबंध काय इत्यादि प्रश्न येतात.

दुसरी अभ्यासाची पद्धति म्हणजे विशिष्ट नियम अबाधित रहातात काय, किंवा त्यांत फरक होत गेल्यास तो कसकसा होत जातो याचा अभ्यास करणें; यास ऐतिहासिक अथवा तौलनिक कायदेशास्त्र असें म्हणतात. " तौलनिक कायदेशास्त्र " आणि " ऐतिहासिक कायदेशास्त्र " हे वस्तुतः भिन्न अभ्यासविषय होत. तथापि ऐतिहासिक कायदेशास्त्रांत तौलनिक पद्धतीच बरीच वापरली गेली आहे म्हणून या दोहोंचें नीट पृथक्त्व झालें नाहीं. या अभ्यासाला सर्व कायदेपद्धतींचा विश्वसनीय इतिहास उपलब्ध झाला पाहिजे. या अभ्यासपद्धतीमध्यें विशिष्ट नियमपद्धतींत निरनिराळ्या वेळीं कसा फरक होत गेला हेंच पहाणें नसून अनेक नियमपद्धतींची उदा० इंग्रजी व रोमन, हिंदू व इराणी अशा नियमांची तुलना करावयाची असते. प्रत्येक समाजांत कायद्यांचा उद्देश विशिष्ट गोष्टी घडवून आणावयाचा असतो व सर्व कायदेपद्धतींचें अंतिम ध्येय जवळ जवळ एकच असतें. " उपयुक्तता " हें कायद्याचें व नीतिशास्त्राचें ध्येय असावें म्हणून बेन्थामनें व त्याच्या अनुयायांनी विचारमाला प्रचलित केली. हें ध्येय साध्य करण्याकरतां जे अनेक निरनिराळे उपाय भिन्नभिन्न पद्धतींत योजले जातात त्यांची तुलना केली असतां कायदे करणाऱ्याला कोणते उपाय सदोष आहेत व ते दोष कसे काढून टाकावे हें समजतें.

" कायदेशास्त्र " हा शब्द वरील दोहोंपैकीं कोणत्यातरी पद्धतीनें कायद्याचें परीक्षण करणें या अर्थी योजतात. अर्थात कायदेशास्त्राचा विषय म्हणजे विशिष्ट समाजांत रूढ असलेले कायदे युक्ततादि दृष्टीनीं तपासून पहाणें व त्यांचा इतर कायदेपद्धतींशीं तुलनात्मक अभ्यास करणें हें होय. कायद्याच्या मूलभूत कल्पना व संज्ञा या अभ्यासास तात्विक अभ्यास म्हणतां येईल.

" तात्विक " कायदेशास्त्राचा पाया इंग्लंडमध्यें जॉन ऑस्टिन यानें घातला. कायदा म्हणजे वागण्याचा नियम. हा शासनसंस्थेपासून आज्ञारूपानें अस्तित्वांत येतो. ऑस्टिननें प्रथम ज्यांनां वास्तविकपणें 'कायदा' ही संज्ञा लावतां येईल व जे केवळ लाक्षणिक अर्थानें कायदे म्हणून समजले जातात त्यांमध्यें फरक दाखविला आहे. ब्लॅकस्टोन यानें ( १ ) निर्जीव पदार्थांचे नियम. ( २ ) प्राण्यांचें पोषण, पचन वगैरे संबंधींचे नियम. ( ३ ) केवळ बुद्धिगम्य असे सृष्टिनियम. ( ४ ) दैवी अथवा साक्षात्कारानें प्राप्त होणारे नियम असें कायद्याचें वर्गीकरण केलें आहे. हें " लॉ " या शब्दाच्या अनेक अर्थांचें वर्गीकरण म्हणतां येईल. या सर्व नियमांच्या मुळाशीं वरिष्ठ सत्तेपासून निघणारी आज्ञा ही कल्पना स्पष्ट अगर लक्षणेनें असते. ऑस्टिन यानें वरील नियमांपैकीं कांहीं आज्ञारूपी असून, कांहीं तसे नाहींत असा भेद दाखविला आहे व सृष्टिनियम हे आज्ञारूपी नाहींत म्हणून त्यांस कायदे म्हणतां येत नाहीं असें प्रतिपादिलें आहे.

आज्ञा ही अर्थात वरिष्ठ व्यक्तीकडून कनिष्ठ व्यक्तीला केली जाते व कनिष्ठ व्यक्तीनें ती पाळली नाहीं तर वरिष्ठाकडून निचें नुकसान होण्याचा संभव असतो. अर्थात वरिष्ठाची आज्ञा पाळणें हें कनिष्ठाचें कर्तव्य होतें व न पाळल्यास होणाऱ्या नुकसानीस 'शासन' असें म्हणतात. याप्रमाणें आज्ञा, कर्तव्य व शासन या तीन गोष्टी परस्परसंबंधीं आहेत.

तथापि सर्व आज्ञा म्हणजे कायदे नव्हत. ज्या आज्ञा विशिष्ट व्यक्तीस उद्देशून केलेल्या नसून एखाद्या वर्गास बंधनकारक असतात त्याच कायदा या संज्ञेस पात्र होतात. तथापि या नियमास अपवादहि आहेत. उदा० एखाद्या धन्यानें चाकरास अमुक दिवशीं सकाळीं ६ वाजतां उठलें पाहिजे अशी आज्ञा केल्यास ती विशिष्ट आज्ञा होऊन तीस नियम अथवा कायद्याचें स्वरूप येत नाहीं. परंतु रोज सकाळीं सहा वाजतां उठलें पाहिजे हा नियम होतो. तसेंच विशिष्ट हुद्यावर असणाऱ्या मनुष्यानें अवश्य करावयाच्या गोष्टी बोधणारा नियम कायदा या संज्ञेस पात्र होतो. उलट विशिष्ट दिवशीं सर्व नागरिकांनीं सुतक पाळावें या राजकीय वरिष्ठाकडून निघालेल्या विधिवाक्यास कायद्याचें स्वरूप नसतें.

कायदा ही विशिष्ट आज्ञा आहे असें म्हटलें असतां सर्व कायदे हे विशिष्ट वरिष्ठ सत्तेपासून निघतात असें ध्वनित होतें. परंतु वरेच कायदे असे आहेत कीं ज्यांचा उगम विशिष्ट सत्तेपर्यंत नेतां येत नाहीं. कांहीं कायदे प्राचीन परंपरागत असतात तर कांहीं वजनदार अशा खासगी व्यक्तींच्या मान्यतेमुळें रूढ होतात, तर कांहीं कायदेपंडित अथवा कायद्यावरील ग्रंथकारापासून उत्पन्न होतात. व कांहीं तर दुसऱ्या समाजांच्या अनुकरणापासून निघालेलें असतात. हा विषय अर्थात ऐतिहासिक अभ्यासाचा आहे. कायद्यावरील ग्रंथांमध्यें हे निरनिराळे कायद्याचे उत्पादक होत असें म्हटलेलें आढळतें. तथापि या सर्वांच्या मुळाशीं एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं राजा जो कायदा अमलांत आणील त्यालाच वास्तविक कायदा ही संज्ञा योग्य होईल. थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं कायद्याचें साहित्य म्हणजे नियम अनेक ठिकाणांहून येतात पण त्यांस कायदेपणा शासनसंस्थेमुळें येतो.

कोणत्याहि देशांत प्रचलित असलेले सर्व कायदे घेतले तर प्रत्यक्ष राजाज्ञेनें अथवा वरिष्ठ सत्तेच्या हुकमानें प्रस्थापित झालेले कायदे थोडेच असतात. वरिष्ठ सत्ता हा कायदे प्रस्थापित होण्याचा एक विशिष्ट मार्ग आहे एवढेंच. याप्रमाणें कायदे प्रस्थापित होण्याचे दुसरेहि मार्ग आहेत. जस्टिनियननें अशा प्रकारचे चार पांच मार्ग दाखविले आहेत. त्यांपैकीं निवाडा देतांना न्यायाधीश कांहीं नियम प्रस्थापित करतो ते आहेत.

यापुढें कायद्यांचें " साक्षात कायदा " व " तद्व्यतिरिक्त नियम " असें ऑस्टिननें वर्गीकरण केलेलें आहे. साक्षात कायद्याव्यतिरिक्त नियम म्हटले म्हणजे (१) नैसर्गिक स्थितींत रहाणाऱ्या मनुष्यानें आपणास बंधनकारक मानलेले नियम. ( २ ) राजांनीं आपल्या साक्षात अधिकाराखालीं नसलेल्या लोकांकरितां केलेले नियम; उदा. सार्वराष्ट्रीय कायदा. ( ३ ) प्रजेनें एकमेकांसंबंधीं पाळावयाचे परंतु कायदेशीर हक्कानें बंधनकारक असलेले नियम; यांनां ऑस्टिननें शुद्ध नीतिनियम असें नांव दिलें आहे.

मनुष्यें जेव्हां एखाद्या विशिष्ट शासनसत्तेच्या नियंत्रणाखालीं अथवा एखाद्या राजकीय समाजाचे घटक म्हणून रहात नसतील तेव्हां तीं नैसर्गिक स्थितींत अथवा वैराज्यांत रहात असलीं पाहिजेत. यावरून कायदेपद्धतीला शासनसंस्थायुक्त समाजाचें अस्तित्व अवश्य आहे; परंतु कोणत्या समाजाला राजकीय समाज म्हणतां येईल याबद्दल निरनिराळ्या पंडितांत मतभेद आहे. वर उल्लेखिलेल्या तीन प्रकारच्या नियमांत, तिसऱ्या प्रकारच्या नियमापैकीं कांहीं कायदे असे असतात कीं, ज्यांस साक्षात् कायदे म्हणावें किंवा नीतिनियम म्हणावें हें निश्चित करतां येत नाहीं. उदा. एखाद्या पालकानें ज्या बाबतींत त्याला नियम घालण्याचा हक्क आहे अशा बाबतींत आपल्या पाल्याकरितां तयार केलेले नियम हे साक्षात् कायदा या सदरांत येतात. तसेंच एखाद्या धन्यानें आपल्या गुलामास घालून दिलेले नियम यांस साक्षात् कायद्याचें व नीतिनियमांचें हीं दोन्हींहि स्वरूपें असतात. उलट एखाद्या संस्थेनें आपल्या सभासदांकरितां केलेले नियम हे जरी कायदे असले तरी त्यांस साक्षात् कायदे म्हणतां येत नाहीं. कारण हे नियम जरी निश्चित सत्तेपासून उद्भूत होत असले तरी त्यांस राजकीय शासन नसतें.

ऑस्टिन हा सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्रा( इंटर न्याशनल )ला कायदा ही संज्ञा लावीत नाहीं, याबद्दल पुष्कळांनां आश्चर्य वाटतें. तथापि या कायद्याला जरी केवळ नीतिनियम ही संज्ञा योग्य होणार नाहीं तरी सार्वराष्ट्रीय व्यवहारनियम करणारी सत्ता सर्वमान्य अथवा शासनक्षम नसते ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं व म्हणून त्या नियमांस कायदा या सदरांत घेतां येणार नाहीं.

आतां साक्षात् कायदा याची व्याख्या करूं. प्रत्येक साक्षात् कायदा हा वरिष्ठ सत्ताधिष्ठित व्यक्ति अथवा व्यक्तिसमूह यांजकडून एखाद्या स्वतंत्र अशा राजकीय समाजाच्या घटकास किंवा घटकसमूहास बंधनकारक असा असतो व ती सत्ताधिष्ठित व्यक्ति अथवा व्यक्तिसमूह ही अंतिम सत्ता असते. कायदे करणारा म्हणजे ज्यानें विशिष्ट नियम प्रथम तयार केला ती व्यक्ति नसून ज्याच्या सत्तेमुळें तो नियम अबाधित राहतो ती व्यक्ति होय. याप्रमाणें कायद्याची व्याख्या केली तर आपणांस वरिष्ठ सत्ता, स्वतंत्र राजकीय समाज इत्यादि गोष्टींचें नीट विवरण केलें पाहिजे. या गोष्टींचें विवेचन ऑस्टिन यानें आपल्या ग्रंथांत उत्तम रीतीनें केलें आहे. विशिष्ट समाज हा स्वतंत्र राजकीय समाज आहे किंवा नाहीं हें पहावयाचें मुख्य गमक म्हणजे त्यांतील बहुसंख्याक व्यक्ती सर्वसाधारणतः एखाद्या विशिष्ट व्यक्तिची सत्ता मान्य करीत असल्या पाहिजेत व ती विशिष्ट व्यक्ति अथवा व्यक्तिसमूह दुसऱ्या कोणत्या विशिष्ट व्यक्तीच्या अगर व्यक्तिसमूहाच्या सामान्यतः अंकित असतां कामा नये. त्याप्रमाणेंच विशिष्ट राजकीय समाजांत विशिष्ट सत्ताधिष्ठित व्यक्ति अथवा व्यक्तिसमूह कोणता व विशिष्ट कायदा किंवा नियम अशा कोणत्या वरिष्ट सत्तेपासून प्रादुर्भूत झाला हें निश्चित करणेंहि बरेंच मनोरंजक आहे. ऑस्टिन यानें वरिष्ठ सत्तेचीं लक्षणें अशीं सांगितलीं आहेत कीं, ही सत्ता कायद्यानें अनियंत्रित असते, प्रत्येक कायदा या सत्तेपासून प्रादुर्भूत होतो व कोणताहि करार त्या सत्तेवर बंधनकारक नसतो.

वरील ऑस्टिनच्या उपपत्तीला दोन मुद्यांवर विरोध झाला. पण तो विरोध फारसा सयुक्तिक नव्हता. ( १ ) बरेचसे नियम ज्यांनां आपण सामान्य व्यवहारांत कायदा म्हणतो, व ज्यांस कायदा म्हणण्यास वास्तविक कांहीं हरकत नाहीं—असे नियम आस्टिनयाच्या व्याख्येच्या

प्रमाणें कायद्यांत येत नाहींत. ( २ ) वरिष्ठ सत्तेची उपपत्ती संबधानें ऑस्टिनयाची व्याख्या बरीच सदोष समजली गेली आहे. फ्रेड्रिक हॅरिसन यानें असे बरेच नियम अथवा कायदे दिले आहेत कीं ज्यांत ऑस्टिनची उपपत्ती बरीच अपूर्ण वाटेल. उदाहरणार्थः—प्रत्येक मृत्युपत्र लेखनिविष्ट असलें पाहिजे हा नियम घ्या. या नियमामुळें कोणास कायदेशीर हक्क उत्पन्न झाला आहे या प्रश्नाचें उत्तर ऑस्टिन मतवादी कोणीहि सहज देईल. कोणत्याहि कायद्याच्या पुस्तकांतील विशिष्ट वाक्य हें व्याख्येप्रमाणें कायदा या संज्ञेस प्राप्त होईलच असें नाहीं; तें तसें व्हावयास तें योग्य शब्दांत मांडलें गेलें पाहिजे. त्याप्रमाणेंच वरील वाक्य हें एका विशिष्ट नियमाचा केवळ एक भाग आहे असें म्हणतां येईल. "कोणत्याहि व्यक्तीनें आपल्या अखेरच्या मृत्युपत्रानें विशिष्ट व्यक्तीस दिलेल्या मिळकतीची ती विशिष्ट व्यक्ती कायदेशीर मालक समजली जाईल". हें वाक्य कायदा या संज्ञेस पात्र असून त्यानें वरिष्ठ सत्तेची आज्ञा व तीमुळें विशिष्ट व्यक्तीस प्राप्त होणारा हक्क हीं स्पष्ट निर्देशिलीं जातात. वरील वाक्यांत मृत्युपत्रानें या शब्दापूर्वी लेखनिविष्ट हा शब्द घातला असतां या वाक्याचें कायद्याचें स्वरूप कायम रहातें, व त्याप्रमाणें वरील विवेचनास घेतलेले शब्द हे विशिष्ट कायद्याचा भाग कसे आहेत हें दाखवितां येतें. याप्रमाणें बहुतेक सर्व नियमांची व्यवस्था लावितां येते व हॅरिसनच्या आक्षेपांचे निराकरण करतां येतें या बाबतींत घोंटाळा होण्याचें मुख्य कारण म्हणजे सर्व कायदे नेहमींच आज्ञार्थी वाक्यांत लिहिलेले नसतात हें होय. जसजसी एकाद्या कायदेपद्धतीची वाढ होत जाते तसतसें त्या पद्धतींतील कायद्यांचें आज्ञार्थी स्वरूप कमी कमी होत जातें.

ऑस्टिनलाहि वरील आक्षेपाचें महत्व कळून येऊन त्यानें असें म्हटलें आहे कीं, केवळ विधानात्मक कायदे व जुने कायदे रद्द करणारे कायदे हे जरी साक्षात कायदे नसले तरी त्यांस 'कायदा' या सदरांत घालण्यास हरकत नाहीं. तथापि तो त्यांस साक्षात् नीतिनियम किंवा लाक्षणिक कायदे या सदरांत घालतो. पण असें करण्याचें वास्तविक कारण नाहीं. कारण विधानात्मक कायदा अथवा रद्द करणारा कायदा यांच्याशीं संबद्ध अशा जुन्या कायद्यावरोबर वाचला असतां दोहोंमिळून आपणास नवीन आज्ञार्थक स्वरूपाचा कायदा पहावयास मिळेल.

काम चालविण्याचे कायदे हेहि अपवादादाखलच समजण्यांत येत असत. तथापि त्यांमध्येंहि आज्ञा अंतर्भूत असून त्यांत शासनाचें वर्णन व पद्धति हीं दिली असल्यामुळें त्यांसहि साक्षात् कायदा म्हणण्यास हरकत नाहीं.

ऑस्टिनच्या कायद्याच्या व्याख्येवर दुसरा आक्षेप म्हणजे वरिष्ठ सत्तेसंबंधींचा होय. असे अनेक समाज पृथ्वीच्या पाठीवर आढळतात कीं ज्यांचे व्यवहार पूर्वापार रूढीप्रमाणें अव्याहत चाललेले असतात, व त्या प्रदेशांतील राजा हा केवळ कर घेणारा व तो घेण्याच्या हक्काकरितां युद्ध, तह वगैरे करणारा असतो. परंतु तो जन्मांत एकहि कायदा करीत नाहीं. उदाहरणार्थ रणजितसिंग हा जरी अनियंत्रित सत्ताधारी राजा होता तरी त्याचें काम फक्त कर वसूल करण्याचें असून त्याच्या राज्यांतील अनेक भिन्न भिन्न लहान लहान समाज आपले व्यवहार प्राचीन रूढींप्रमाणें सुरळीत रीतीनें चालवित होते व समाजनियंत्रणाकरितां कायदा करण्याचा प्रसंग त्याला क्वचितच आला असेल. त्याप्रमाणेंच अथेन्स येथील लोकसभा ॲटिका प्रांतांतील लोकांकरितां जे कायदे पास करी ते वास्तविक कायदे असून इतर शहरांवर व बेटांवर अथेन्सची सत्ता कायदे करण्याइतकी नसून केवळ कर वसूल करण्यापुरतीच असे. अशा प्रसंगीं ऑस्टिन म्हणेल कीं स्थानिक कायदे सत्ताधीश कायदे म्हणून मानतो म्हणूनच कायदे होत, नाहीं तर नाहींत. याप्रमाणेंच जे धार्मिक स्वरूपाचे कायदे वरीष्ठ राजकीय सत्ता मान्य करणार नाहींत तेहि 'वास्तविक कायदे' या सदरांत न येतां नीतिनियम अथवा दैवीनियम या सदरांत पडतील. एवढेंच मात्र खरें कीं, लोकांस किंवा वकीलास नेहमी उपयोगी पडणारी ऑस्टिनची व्याख्या नव्हे. तिचें दौर्बल्य जेम्सब्राइसनें दाखवून दिलें आहे.

ऑस्टिनच्या उपपत्तीचें सार थोडक्यांत असें दिसतें कीं, जे नियम मोडले असतां समाजांतील शासनसंस्थेकडून प्रत्यक्ष शासन होईल अशा भीतीनें पाळले जातात त्या नियमांस वास्तविकपणें कायदे ही संज्ञा देतां येईल. कोर्टानीं स्वीकारलेल्या सर्व नियम, रूढी, आचार व कायदे यांच्या मुळाशीं ही शासनाची कल्पना असते व नसल्यास ते कायदे या संज्ञेस प्राप्त होत नाहींत.

आतां आपण 'हक्क' या कायद्यांतील संज्ञेकडे वळूं. कायद्यामुळें विशिष्ट व्यक्तीला विशिष्ट गोष्ट करण्याचें अथवा न करण्याचें कर्तव्य उत्पन्न होतें. कायद्यानें निषिद्ध गोष्ट जर त्या व्यक्तीनें केली तर तो गुन्हा होतो व त्याबद्दल त्या व्यक्तीस शासन होतें. याप्रमाणें ज्या व्यक्तीच्या हातांत वरिष्ठ सत्तेकडून विशिष्ट व्यक्तीस एखादें कर्तव्य न केल्याबद्दल अथवा निषिद्ध गोष्ट केल्याबद्दल वरिष्ठ सत्तेकडून शासन करविण्याची सत्ता येते, त्या व्यक्तीला तो हक्क प्राप्त झाला आहे असें आपण समजतों. हक्क या शब्दाची सुलभ व्याख्या करणें बरेंच कठिण आहे. हॉलंड यानें हक्क या शब्दाची व्याख्या पुढें दिल्याप्रमाणें केली आहे. हक्क म्हणजे विशिष्ट व्यक्तीच्या वर्तनावर स्वतः शक्तीनें नव्हे, तर समाजाच्या शक्तीनें दाब उत्पन्न करण्याची सत्ता. जेव्हां ही समाजाची शक्ति अप्रत्यक्ष असते तेव्हां नैतिक हक्क उत्पन्न होतो आणि जेव्हां ही शक्ति वरिष्ठ सत्तेकडून प्रत्यक्ष उपयोजिली जाते तेव्हां तो हक्क कायदेशीर असतो.

कांहीं हक्क सार्वजनिक स्वरूपाचे म्हणजे सर्व जगाविरुद्ध वापरण्यासारखे असतात तर कांहीं व्यक्तिविषयक अथवा

विशिष्ट व्यक्तीविरुद्ध वापरावयाचे असतात. उदाहरणार्थ एखाद्या मालमत्तेच्या मालकाला त्या मालमत्तेचा पूर्णपणें उपभोग घेण्याचा सर्व जगाविरुद्ध हक्क असतो. पण ज्या दोन व्यक्तींमध्यें एखादा करार होतो त्या दोन व्यक्तींनां फक्त परस्परांविरुद्ध त्या कराराप्रमाणें हक्क प्राप्त होतात. इतरांविरुद्ध होत नाहींत.

कायद्यांचें व्यक्तिविषयक कायदे व वस्तुविषयक कायदे असेंहि एक वर्गीकरण करण्यांत येतें. आपणाला समाजांतील व्यक्तींचे विशिष्ट हक्क व कर्तव्य यांनीं युक्त असे गट बनवितां येतात. या विशिष्ट हक्क, कर्तव्यें वगैरे गोष्टींच्या समूहास त्या विशिष्ट व्यक्तींचा दर्जा अथवा समाजांतील स्थान असेंहि म्हणतात. अर्थात् निरनिराळ्या दृष्टींनीं विचार केल्यास विशिष्ट समाजांतील विशिष्ट व्यक्तींचें स्थान एकसमयावच्छेदेंकरूनच भिन्नाभिन्न असूं शकेल. उदाहरणार्थ एकच मनुष्य एकाचा धनको तर दुसऱ्याचा ऋणको असूं शकेल. व्यक्तिविषयक कायदा म्हणजे ज्या हक्क, कर्तव्यें इत्यादींमुळें व्यक्तीचा समाजांतील दर्जा ठरविला जातो त्यांस दाखविणारा नियमसमुच्चय होय. इतर सर्व कायदा वस्तुविषयक कायदा होय.

हॉलंड हा ऑस्टिनचें वरील वस्तुविषयक व व्यक्तिविषयक वर्गीकरण अमान्य करून सार्वजनिक व खासगी असें कायद्याचें वर्गीकरण करतो, व व्यक्तींनां अथवा व्यक्तिसमूहाला विशिष्ट हक्क उत्पन्न होतात तो खासगी अगर सार्वजनिक समजला जाईल असें प्रतिपादितो. ऑस्टिन याच्या उलट राजसत्तेला कायदेशीर हक्क अगर कर्तव्यें नसतातच असें म्हणून वरील भेद करीत नाहीं. ऑस्टिनच्या मतें सार्वजनिक कायदा हा शब्द फक्त राजकीय व्यवस्थेसंबंधींच्या नियमांस लावतां येईल, व तो इतर कायद्यांहून अगदीं निराळा असेल. तथापि तो व्यक्तिविषयक कायद्यांतच अन्तर्भूत होईल.

ऑस्टिननें व्यक्तिविषयक कायद्यांचें वर्गीकरण प्राथमिक हक्क व प्राथमिक कर्तव्यें आणि शासनात्मक हक्क व शासनात्मक कर्तव्यें असें केलें आहे. पहिल्या प्रकारचे हक्क स्वाभाविकच असतात. परंतु दुसऱ्या प्रकारचे हक्क हिल्यावर अवलंबून असतात. व हक्क व कर्तव्यें हीं विशिष्ट वस्तुस्थिति अथवा गोष्टी यांवर अवलंबून असतात व त्यांस प्रतिबंध अगर विरोध ज्या गोष्टींमुळें होतो त्यास गुन्हा अथवा नुकसानी म्हणतात. गुन्हा अथवा नुकसानीपासून उत्पन्न होणाऱ्या हक्कास अगर कर्तव्यास शासनात्मक हक्क अगर कर्तव्यें म्हणतात.

फ्रेडरिक हॅरिसन यानें असें म्हटलें आहे कीं, इंग्रजी कायद्यांचें शास्त्रीय वर्गीकरण करणें फायदेशीर होणार नाहीं. जर सर्व कायद्यांचा संग्रह करून त्यांचें एकीकरण करावयाचें असेल तर या वर्गीकरणापासून फायदा होईल, नाहीं तर श्रमाच्या मानानें सध्यां आहे या स्थितींतच कायदा ठेवावयाचा असल्यास किंवा त्याचा साकल्यानें अभ्यास करावयाचा विचार नसल्यास शास्त्रीय वर्गीकरणाचे श्रम व्यर्थ होत. असें वर्गीकरण केल्यास त्याचा धंदेवाईक कायदेपंडितांपेक्षां कायद्याच्या अभ्यासकांस व कायदेशिक्षणास उपयोग होईल.

कायद्यांच्या ऐतिहासिक अभ्यासास सर हेनरी मेन यानें सुरवात केली. त्या पद्धतीचा प्रसार बराच झाला व कायद्याचे इतिहास बनूं लागले व शासनशास्त्राच्या अभ्यासाचा फायदा पुष्कळच झाला. तौलनिक कायदेशास्त्राचा नुकताच उदय होत आहे व तें एक नवीनच शास्त्र बनूं पहात आहे. सध्यां हें शास्त्र केवळ ऐतिहासिक तत्वज्ञान या स्वरूपांत आहे. या शास्त्रापासून मुख्य फायदा म्हणजे आतांपर्यंत जीं कायद्याचीं तत्वें विशिष्ट सामाजिक संस्थांशीं संबद्ध अशीं चुकीनें मानलीं जात होतीं किंवा कांहीं केवळ अंतिम सत्यें म्हणून मानलीं जात होतीं त्यांच्या परंपरेवर व परस्पर संबंधावर पडलेला प्रकाश होय. कायद्याचे ऐतिहासिक दृष्टीनें विवेचन केल्यामुळें पूर्वींच्या बऱ्याचशा चुकीच्या कल्पना नाहींशा होंत चाललेल्या आहेत. पूर्वीं एखाद्या कायद्याची सयुक्तिकता दाखविण्याकरितां त्यांतील पारिभाषिक संज्ञांच्या ओढून ताणून केलेल्या व्युत्पत्तीवर भर देण्यांत येत असे.

दुसरी एक कायद्याची सयुक्तिकता पटविण्याची रीत म्हणजे आध्यात्मिक होय. या पद्धतीनें विशिष्ट कायद्याचें स्पष्टीकरण निसर्गांत आढळून येणाऱ्या तत्सदृश अशा एखाद्या सर्वव्यापी नियमावरून करण्यात येत असे. उदाहरणार्थ इंग्लंडमध्यें इ. स. १८३३ च्या पूर्वीं मृत्युपत्र केल्याशिवाय मृत झालेल्या मनुष्याची मालमत्ता त्याच्या बापाला अथवा इतर पूर्वजाला न मिळतां मामा किंवा मावशीला मिळत असे. या गोष्टीचें अनेक कायदेपंडितांनां आश्चर्य वाटत असे व ती संयुक्तिक रीत आहे असें दाखविण्याकरतां धडपड चालू होती व व्युत्पत्तिशास्त्रहि मदतीला घेतलें जाई. ब्रॅक्टन याच्या काळीं 'डिसेन्ट' (जन्म अगर अवतार) या शब्दाच्या यौगिक अर्थावरून हा कायदा प्रचारांत आला असें याचें स्पष्टीकरण देण्यांत येत असे. परंतु वास्तविक गोष्ट अशी होती कीं, कांहीं विशिष्ट सामाजिक कारणामुळेंच हीच चाल पडली व नंतर हिला कायद्याचें स्वरूप आलें. या दृष्टीनें निरनिराळ्या अस्तित्वांत असलेल्या कायद्यांचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न आपणांस प्रथम ब्लॅकस्टोन याच्या ग्रंथांत आढळून येतो. अर्थात् त्यास उपलब्ध असलेली साधनसामुग्री अपुरी असल्यामुळें त्याचें विवेचनहि अपुरेंच आहे.

ऐतिहासिक अभ्यासामुळें जरी व्युत्पत्यात्मक अभ्यास व आध्यात्मिक पद्धतीचा अभ्यास यांपेक्षां कायद्याच्या अभ्यासांत प्रगति झाली आहे तथापि ऐतिहासिक अभ्यासानें प्राप्त झालेले कांहीं सिद्धांत पृथक्करणात्मक अभ्यासापासून निघालेल्या सिद्धांतांशीं विरोधी दिसतात. हा विरोध विशेषतः रूढ

परंपरेनें प्रचारांत आलेल्या कायद्यांच्या बाबतींत आढळून येतो. पृथक्करणात्मक पद्धतीमध्यें ज्या समाजांत विशिष्ट कायद्यांच्या पाठीमागें सत्तात्मक शासन असतें व ज्या समाजांतील नियमांमागें असें प्रत्यक्ष सत्तात्मक शासन नसतें त्या समाजांत मोठा भेद करण्यांत येतो. तसेंच विशिष्ट समाजाला स्वतंत्र राजकीय समाजाचें स्वरूप केव्हां येतें हेंहि निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. ऐतिहासिक पद्धतीनें अभ्यास करणाऱ्यालाहि अडचण येत नाहीं. त्याच्या दृष्टीनें विशिष्ट नियमाला एका समाजांत स्वरूप आलेलें असणें व दुसऱ्या समाजांत त्याच वेळीं तो नियम समजला जाणें ही गोष्ट नित्यपरिचयाची असते. पृथक्करणात्मक अभ्यासकाला आज कायद्याच्या स्वरूपांत असलेली गोष्ट व कांहीं कालापूर्वी रूढीच्या स्वरूपांत असलेली तीच गोष्ट यांमध्यें महत्वाचा फरक वाटतो. त्याचें क्षेत्र वरिष्ठ सत्तेनें घालून दिलेल्या नियमांच्या पलीकडे जात नाहीं. उलट ऐतिहासिक अभ्यासकाला या दोन्ही गोष्टी सारख्याच महत्वाच्या वाटतात. याप्रमाणें ऐतिहासिक अभ्यासकाला चालीरीती व रूढी यांचें कायद्याइतकेंच महत्व वाटतें, आणि या चालीरीतींची उत्पत्ति, वाढ, त्यांचें समाजावरील वजन, त्यांचें समाजाच्या निरनिराळ्या काळच्या बौद्धिक प्रगतीवर अवलंबून असणारें महत्व इत्यादि गोष्टींचा अभ्यास मुख्यतः करावयाचा असतो. या शास्त्रासारखेंच दुसरें शास्त्र म्हटलें म्हणजे भाषाशास्त्र होय. एकाला कायदे व रूढी यांचें जितकें महत्व वाटतें तितकेंच दुसऱ्याला शब्दाचें वाटतें. तथापि शब्दांच्या अभ्यासानें व्युत्पत्तिशास्त्राची जितकी वाढ झाली आहे तितकी ऐतिहासिक अभ्यासानें कायदेशास्त्राची वाढ झाली नाहीं. तथापि रोमन कायद्यांच्या अभ्यासानें या अभ्यासाला विशेषतः जर्मनीमध्यें विशेष चालन मिळालें. त्यांनीं आपल्या चालीरीतींचा व त्यांपासून उत्पन्न झालेल्या कायद्यांचा अभ्यास करून आणि त्यांची रोमन चालीरीतींशीं व कायद्यांशीं तुलना करून कायद्यांतील तत्वांचा ऐतिहासिक अभ्यास केला. साव्हिनी यानें ऐतिहासिक पद्धतीची इतकी वाढ केली कीं सध्यां पृथक्करणात्मक, ऐतिहासिक व उपपत्यात्मक या तीन निरनिराळ्या सदरांखालीं होणारा अभ्यास त्यानें आपल्या सर्वव्यापी तात्विक अभ्यासांत अन्तर्भूत केला आहे. जर्मन कायदेशास्त्रांत आध्यात्मिक विवेचन वरेंच असून साक्षात कायद्याचें पृथक्करणहि सदोष आहे. तथापि त्यांची एकंदर कायद्यासंबंधींची कल्पना ऐतिहासिक तत्वज्ञानाच्या वाढीला पोषक असून तिच्यापासून निघणारीं अनुमानें फार महत्वाचीं आहेत. साव्हिनीचें ताब्यासंबंधीं कायद्याचें पृथक्करण हें या गोष्टीचें उदाहरण म्हणून देतां येईल.

इंग्रजी कायद्याची वाढहि अगदीं स्वतंत्र तऱ्हेनें झाली आहे. जरी रोमन कायद्याचा बराच भाग आज इंग्रजी कायदेपद्धतींत अन्तर्भूत झाला आहे तरी एकंदर इंग्रजी कायद्याची वाढ स्वतंत्र रीतीनें झाली असून इंग्रजी कायदा हा स्वतंत्र अभ्यासास योग्य विषय आहे.

[संदर्भग्रंथ—लेखांत उल्लेखिलेल्या ग्रंथांशिवाय अत्यंत वाचनीय ग्रंथ म्हटला म्हणजे जेम्स ब्राइसचा 'स्टडीज इन हिस्टरी अँड ज्युरीसप्रुडन्स' हा होय.]

**कायनकुलम**—त्रावणकोर संस्थान. कार्तिकपल्ली तालुक्यांतील एक शहर. या शहराची लोकसंख्या १९११ सालीं ५८३० होती. प्राचीन काळीं ओनाद नांवाचें एक छोटेंसें राज्य होतें त्याची ही राजधानी होती व त्यावेळीं त्रावणकोर शहराइतकें याचें महत्व असे. सोळाव्या शतकांत या ठिकाणीं पोर्तुगीज लोकांनीं एक वखार घातली होती. डच लोकांशीं सख्य करणारा पहिला राजा ओनादचा होय. पण पुढें १७४६ मध्यें त्रावणकोरचें वर्चस्व त्याला मान्य करावें लागलें. ८२९ मध्यें सीरियन लोकांनीं आपलें प्रार्थनामंदिर या ठिकाणीं बांधलें. या शहरांत एक मंडई असून शिवाय मॅजिस्ट्रेट कोर्टहि आहे.

**कायर**.—वऱ्हाड. जिल्हा यवतमाळ. तालुका वणी. वणीच्या दक्षिणेस १४ मैलांवर हा गांव आहे. लोकवस्ती १४६०. एदलाबादवरून जो हैद्राबाद-नागपूर रस्ता गेला आहे त्या रस्त्यावर हें खेडेंगांव आहे. गरम पाण्याच्या झऱ्याबद्दल हें खेडें प्रसिद्ध आहे. झऱ्याच्या उगमाजवळील ओढ्याकांठीं एक किल्ल्याचा भाग आहे. किल्ल्याचे मोडकळीस आलेले भाग अजून दृष्टीस पडतात. कायर हा पूर्वी ठाण्याचा गांव होता. ज्याठिकाणीं गरम पाण्याचे झरे उगम पावतात त्याठिकाणीं हेमाडपंती तऱ्हेवर बांधलेलीं देवळें आहेत. या झऱ्यांनां ऋषींचीं नांवें आहेत. येथें एक गोंड देशमुख रहातो.

**कायल**—मद्रास इलाखा. तिन्नेवेल्ली जिल्ह्याच्या श्रीवैकुंठम् तालुक्यांतील हें एक खेडें असून हें ताम्रपर्णी नदीच्या उत्तरतीरावर वसलेलें आहे. १२९२ मध्यें मार्कोपोलो हा ज्या वेळीं या ठिकाणीं आला, त्यावेळीं हें एक प्रसिद्ध बंदर म्हणून नांवाजलेलें होतें. या बंदराचें वर्णन दोघां फारशी इतिहासकारांनीं केलें आहे. ताम्रपर्णी नदीच्या गाळामुळें हें बंदर मागें हटत जाऊन आतां तें एक नुसतें खेडें बनलें आहे. या ठिकाणीं जुनीं कौलें व भांडीं सांपडलीं आहेत त्यावरून या खेड्यांत पूर्वी चांगलीं भांडीं तयार होत असावीं असें दिसतें. या ठिकाणीं दोन जीर्ण देवळें असून त्यांत शिलालेख आहेत.

**कायलपट्टणम्**.—मद्रास इलाख्यांतील तिनेवेल्ली जिल्ह्यांतील श्रीवैकुंठम् तालुक्यामधील बंदर. हें ताम्रपर्णी नदीच्या दक्षिण तीरावर तुतीकोरीनच्या दक्षिणेस १८ मैलांवर वसलेलें आहे. याची लोकसंख्या १९११ मध्यें १२८६२ होती. या बंदराचा सिलोनशीं तांदुळ व नारळ यांचा व त्रावणकोरशीं सागवानी लांकडांचा व्यापार चालतो. हा व्यापार बहुतेक मुसुलमान करतात. या ठिकाणीं मीठ तयार करण्याचें एक मिठागर आहे. येथें थोडा फार साखरेचा व्यापारहि चालतो.

**कायस्थ**—कायस्थांची हिंदुस्थानांतील एकंदर लो. सं. १९११ सालीं २१,७७,३९० भरली त्यांपैकीं २१,७६,७११ ब्राह्मणधर्मीय असून १९६ शीख, १८० जैन, १ बौद्ध व १३०२ मुसुलमान होते. यांची प्रांतवार विभागणी पाहिली असतां आपणांस सर्वांत जास्त संख्या बंगाल प्रांतांत (११,१३,६८४) आढळते. नंतर संयुक्त प्रांतांत ४,८५,०७३; बहार ओरिसामध्यें ३४७६१३: आसामांत ८९९६७; मध्य हिंदुस्थानांत ७१,३९२; मध्यप्रांत-वऱ्हाडांत ३३,५८४; राजपुतान्यांत २३,६१०; पंजाबांत १३,३७४ व इतर प्रांतांत ८०९३ याप्रमाणें यांची वस्ती आढळते. वर दिलेल्या आंकड्यांत कायस्थ प्रभूंची लोकसंख्या येत नाहीं. कायस्थ प्रभूंची संख्या सेन्सस रिपोर्टमध्यें प्रभु ( परभु ) या सदरांत दाखविली असून याच संख्येंत मुंबई प्रांतांतील कायस्थ प्रभूंचा अंतर्भाव होतो अशी टीप दिली आहे. प्रभू( परभू)ची एकंदर लोकसंख्या हिंदुस्थानांत ३३,२८० असून त्यांपैकीं २७,१२० मुंबई इलाख्यांत व ६१६० इतर प्रांतांत आहे.

यापुढें आम्ही ज्या कायस्थ जातीचें विवेचन मुख्यतः करीत आहों ती संयुक्त प्रांतांतील कायस्थ जात होय, कां कीं कायस्थ जातीचा केंद्रहि मध्यदेशच होय. संयुक्त प्रांतांतील कायस्थ व बंगाल प्रांतांतील कायस्थ यांत फरक आहे. बंगालमध्यें जरी कायस्थांची संख्या संयुक्त प्रांतांतील संख्येपेक्षां मोठी दिसली तरी तींत कलितांचें मिश्रण आहे. संयुक्त प्रांतांतील कायस्थ बंगालमध्यें जाऊन वसाहत करून राहिले असें म्हणावें तर संयुक्त प्रांताकडून कायस्थांची संख्या बंगालकडे कमी कमी होत जावयास पाहिजे तसें दिसत नाहीं. उलट कलित्यांचें स्थान जें आसाम,तिकडून कलकत्याकडे कमी होत आलेली आढळते. कलकत्याकडे कायस्थ व वैद्य या दोन जातींत लग्नव्यवहार होतो तसा संयुक्त प्रांतात होत नाहीं. कलकत्यांतील कायस्थाचा दर्जा उच्च व्हावा म्हणून मूळ ५ कुलीन घराणीं ( मित्र, घोस, बोस वगैरे ) बाहेरून आणलीं अशी समजूत तेथें रूढ आहे. यावरून बंगालमधील कायस्थ व संयुक्त प्रांतांतील कायस्थ हे पूर्णपणें एकवंशीय नसावेत.

कोणत्याहि जातीच्या समाजांतील स्थानाकडे दोन दृष्टींनीं पहातां येतें. एक कायद्याप्रमाणें विशिष्ट जातीचा दर्जा काय ठरतो ही दृष्टि व दुसरी ऐतिहासिक दृष्टि. कायद्याचा प्रश्न फक्त विशिष्ट व्यक्तीची मालमत्ता कोणत्या वारसास मिळावी हें पहाण्याचा असतो. विशिष्ट जातींतील पुरुषानें दुसऱ्या एखाद्या स्त्रीशीं विवाह केला अगर अनीतिमूलक संबंध ठेवला, तर त्या लग्नापासून अगर संबंधापासून झालेली संतति त्याच्या इस्टेटीस कायदेशीर वारस होऊं शकते किंवा नाहीं एवढाच विचार न्यायाधीश करतो, व शूद्र व क्षत्रिय असा भेद त्यावेळीं करण्याचा प्रसंग येतो. कायदेपंडितांस ऐतिहासिकदृष्ट्या फार खोलांत जाण्याची प्रवृत्ति त्या विशिष्ट जातीचे पूर्वज कोण होते, त्यांचा त्यावेळीं समाजांत कोणता दर्जा होता, जातिप्रपंचांत त्यांचें स्थान कोणतें होतें, त्यांचें कसकसें स्थलांतर होत गेलें व त्या स्थलांतराप्रमाणें त्यांच्या सामाजिक दर्जांत कसकसा फरक पडत गेला, त्यांच्या निरनिराळ्या पोटजाती वगैरे कशा पडत गेल्या त्यांचे परस्परसंबंध कसकसे तुटत गेले वगैरे मानववंशीय व मानवेतिहासात्मक गोष्टी ऐतिहासिक अभ्यासकास ज्ञातव्य असतात. जुना इतिहास व निकटवर्ती परंपरा वगैरे भिन्नभिन्न गोष्टींस व स्थानिक रूढींस महत्व हायकोर्टांनां द्यावें लागतें. यामुळें अगदीं निरनिराळीं व केव्हां केव्हां विसदृश अनुमानें काढतात. याप्रमाणें कलकत्ता हायकोर्टाच्या दोन कायस्थ जातींच्या न्यायमूर्तींनीच कायस्थ जात ही शूद्र जात आहे असें ठरविलें आहे. परंतु हा निकाल अलाहाबाद हायकोर्ट मान्य करीत नाहीं. इतिहासप्रज्ञतेचा दोषारोप हायकोर्टांवर आम्हीं करीत नाहीं. व विशिष्ट जातीच्या उत्पत्तीस अगर इतिहासास त्याच्या निर्णयाचा उपयोग मुळींच नाहीं.

**पूर्वगत ऐतिहासिक विवेचन.**—कायस्थ ज्ञातीसंबंधीं पूर्वगत ऐतिहासिक विवेचन पाहूं जातां त्यांत अनेक प्रकार आढळतील. धर्मशास्त्रीय अगर पुराणांतील वचनें सत्य म्हणून गृहीत धरून त्यांवरून कल्पना करीत बसणें हा एक प्रकार कायस्थांनीं व त्यांच्या विरुद्ध लेखकांनीं अवलंबिला आहे. व त्याचीच कांहीं यूरोपीय लेखकांनीं ( उदाहरणार्थ रसेल, एन्थॉवेन,रिस्ले वगैरे) री ओढली आहे. अधिक व्यापक विवेचन रा. भागवत व रा. वि. का. राजवाडे यांनीं केलें आहे. पण राजवाडे यांनीं देखील उत्पत्तिविषयक मत संस्कृत ग्रंथकारांचेंच स्वीकारलें आहे. आम्हांस यांपैकीं कोणतेंहि मत स्वीकारतां येत नाहीं. तथापि रा. भागवत व रा. राजवाडे यांचीं मतें येथें देणें अवश्य म्हणून दिलीं आहेत.

काश्मीरच्या राजतरंगिणीमध्यें कायस्थांविषयीं तिरस्कारव्यंजक वाक्यें आहेत,त्यांवरून रा.रा. राजारामशास्त्री भागवत कल्पना करतात कीं, ब्राह्मण व कायस्थ यांचा परस्पर द्वेष असे. कां कीं कल्हण हा ब्राह्मण होता. कायस्थ हा शब्द वराहमिहिरांत नाहीं; तथापि वराहमिहिरापेक्षां हा शब्द अधिक जुना आहे असें मृच्छकटिकावरून भागवत ठरवितात. भागवत मृच्छकटिकाचा काल शालिवाहनाचें दुसरें शतक समजतात. कायस्थ म्हणजे 'देहांत रहाणारा' अशी व्युत्पत्ति चूक असून 'कैथ' शब्दापासून कायस्थ शब्द बनला आहे आणि कैथ शब्दाचा कथ् धातूबरोबर आणि गाथा शब्दाबरोबर संबंध असावा. कैथ ही मूळ जात जुन्या कथा सांगणारी आणि गाथा म्हणजे जुनीं गाणीं म्हणणारी असावी व त्यावरून कैथ हें नांव पडलें असावें. कैथांनीं जी लिपी शोधून काढली ती कैथी. कैथी लिपींत 'पडमात्रा' म्हणजे एकाराच्या ऐवजीं अक्षराच्या पाठीमागें ओल असते उदाहरण याचें के—क असें आढळतें.

यादवांचे किंवा जाधवांचे शिलालेख जे विद्यमान आहेत त्या सर्वांत पडमात्रा पहाण्यांत येते. ब्राह्मणधर्मीयांस पूर्वी

लेखनकला माहित नव्हती. पाणिनिकाळीं लेखनकला ब्राह्मणांस इतर लोकांपासून मिळाली. तिचा जरी ब्राह्मणांत प्रचार झाला तरी ब्राह्मणांनीं लिखितपाठकत्वाचा निषेध केला आहे. वेद लिहिलेला वाचतो तो चांगला पाठक नव्हे असा निर्बंध शिक्षेत आढळतो.

देवनागरी व बालबोध या दोन्हीं शब्दांचा कोणत्याहि संस्कृत ग्रंथांत पत्ता लागत नाहीं. रामायण, महाभारत वगैरे ग्रंथांत देवनगर कोठेंहि येत नाहीं. तेव्हां लेखनकला प्रथम ब्राह्मणांनीं काढली असें म्हणण्यास आधार बिलकल नाहीं.

राजाराम शास्त्र्यांचा कल्पना आधिक दूर न्यावयाची म्हणजे कायस्थांचा सूतांशीं म्हणजे इतिहासरक्षकांशीं संबंध जोडावयाचा.

राजारामशास्त्री गाणखी म्हणतात, "आपल्या देशांत कायस्थ शब्दापेक्षां 'परभु' शब्द अधिक प्रचारांत आहे. कायस्थ शब्द संस्कृतांत बराच वापरला जातो, तसा परभु शब्द वापरला जात नाहीं. कऱ्हाड्यांतील, कुडाळ्यांतील व शेणव्यांतील प्रभु आडनांव असणारे मूळचे परबु होते अशी शंका येते.

शालिवाहनाच्या शतकांत 'चित्रगुप्त' निःसंशय सुप्रसिद्ध होता. चित्रगुप्त म्हणजे यमास दिलेला कारकून.

हल्लीं कायस्थ परबु नांवाची जात अस्सल कोंकणी होय. हे लोक मूळचे मावळे असून मावळांतून खालीं उतरले. यांचें आद्यस्थान लोणावळ्याजवळील कारली हें असलें पाहिजे.

कारलीजवळ एकवीरा आहे ती आमच्या देशी कायस्थांचें कुलदैवत होय. एकवीरा व रेणुका हीं एकच असं कायस्थाचा व परशुरामाचा संबंध जोडण्याकरतां मानविलेलें दिसतें. एकवीरा बोलून चालून वीरांची देवी. तिला कोंबडी व बकरीं चालतात. जिचा जमदग्नीनें विनाकारण वध केला त्या बाईमध्यें वीरपणा होता हे म्हणणें म्हणजे अजप्रयोग करणें होय.

कायस्थांचीं नांवें कांहीं गांवांवरून व कांहीं हुद्यांवरून पडलीं आहेत. कोरडे कोरलई हें नांव गांवावरून पडलें आहे. दिघे कायस्थांत आहेत तसे कऱ्हाड्यांत आहेत. तेव्हां तें नांव गांवावरून पडलें असलें पाहिजे. ताम्हणे नांवांचें एक गांव राजापुराजवळ आहे पण तें कायस्थांचें नसावें. दवणे हें नांव दमण ( फिरंग्यांचें ) यावरून पडलें आहे. फणसी नांवाचीं गांवें कोंकणांत व देशावर बरींच आहत; त्यावरून फणसे; भिशे किंवा भिसे गांव रोहे तालुक्यांत आहे त्यावरून भिसे मोहिली पेण तालुक्यांत आहे. शृंगारपूर हवसाणांत बरेंच प्रसिद्ध आहे त्यावरून शृंगारपुरे. वखार नांवाचें गांव आहे किंवा वखार ज्याची तो वखारे, येणेंप्रमाणें वखारे नांवाच्या दोन व्युत्पत्ती असाव्यात. या आडनांवांवरून कायस्थांचें मूळ ठिकाण चेऊल किंवा अष्टागर प्रांत ठरतें. हा कायस्थांचा इतिहास शालिवाहन शकाच्या नवव्या शतकापलिकडे फारसा पोंचत नाहीं." ( भागवत. वि. वि. पुस्तक २३ अंक ११ ).

रा. वि. का. राजवाडे कायस्थ शब्दाची व्युत्पत्ति साधण्याचा पुढें दिल्याप्रमाणें प्रयत्न करतात.

"कायस्थ, कायथ, काइन, काइथ. हा शब्द काय व स्थ यांच्या संहितेपासून निघाला आहे. 'क्षत्रियात् शूद्रायां जातः कायस्थः' अशा धर्मशास्त्रीय वचनानें इतिहास खुला होतो अशी समजूत करून घेऊन राजवाडे चालतात आणि काय म्हणजे धन, त्यावर उपजीविका करणारा तो कायस्थ. "काये कायेन वा तिष्ठति यः स कायस्थः" असा त्याचा अर्थ देऊन सांगतात कीं, यांचा मूळ धंदा व्याजबट्टा करण्याचा दिसतो. नंतर लेखन चित्रकर्मे यांनां नेमून दिलीं असें दिसतें. अथवा बोटाचीं शेवटें म्हणजे काय व त्यांच्या साहाय्यानें उपजीविका करणारा तो कायस्थ. लेखन व चित्रकर्म हा कायस्थांचा मूळ धंदा व तदनंतर इतर धंदे. कायस्थांनां प्रभुपणा महाराष्ट्रांतच व विशेषतः कोंकणांत मिळालेला आहे. कोंकणांत ब्राह्मण, शेणवई, मराठे हे प्रभु आहेत तसेच कायस्थहि प्रभु आहेत. हे मूळचे उत्तर हिंदुस्थानांतील आहेत यांत संशय नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य उत्तर हिंदुस्थानांतूनच आले. इतकेंच कीं, कायस्थ इतरांच्या बरेच नंतर आले. यांची संख्या महाराष्ट्रांत फार थोडी आहे. जर हे ब्राह्मणादिकांच्या बरोबर आले असते तर त्यांचीहि लोकसंख्या इतरांप्रमाणेंच असती. गुप्ते, राजे, कर्णिक, समर्थ इत्यादि आडनांवांवरून त्यांचा संबंध गुप्त राजांबरोबर लावतात. तो तसा असणें शक्य आहे, पण आहेच असें निश्चित नाहीं. हे क्षत्रियोत्पन्न आहेत, पण इतकेंच कीं मूळ शूद्रक्षेत्राच्या ठायीं उत्पन्न झालेले आहेत. मनुसंहिता, मुद्राराक्षस, मृच्छकटिक व याज्ञवल्क्य यांत हा शब्द येतो. ( भा. इ. सं. मं. १८३२).

राजवाडे आणि भागवत यांच्या शोधांत कायस्थेतिहास नैरुक्त, पौराणसाहित्याचा व बाहेरच्या कायस्थांविषयीं विचार वगळून एकदम महाराष्ट्रांतील कायस्थांशीं संगति लावण्याचा प्रयत्न हा दोष प्रधान आहे.

**कायस्थाचे ऐतिहासिक व पौराणिक उल्लेख.**— कायस्थ शब्दाचा उल्लेख माळव्याच्या शिलालेखांत इ. स. ७३८ ते ७३९ सालीं केलेला आहे. इ. स. ९८७ शिलालेखांत यांचें नांव 'कांचन' असें लिहिलेलें आढळतें. इ. स. ११८४ त केलेल्या दिल्ली येथील शिवालिक स्तंभावरील लेखांत माहवाचा पुत्र शितपती कायस्थानें हा लिहिला असें लिहिलें असून या लेखांत कायस्थ शब्द जाति या अर्थानें उपयोगांत आणला.

कायस्थांच्या कुलसंबंधीं बऱ्याच दंतकथा आहेत. पद्मपुराणांत असें लिहिलें आहे कीं, ब्रह्मा हा एकदां ध्यानस्थ बसलेला असतांनां त्याच्या कायेपासून एक दौत व लेखणी घेतलेला पुरुष निर्माण झाला. त्यास चित्रगुप्त असें नांव देण्यांत आलें. ब्रह्मदेवाच्या कायेपासून हा पुरुष झाला म्हणून त्यास कायस्थ म्हणतात. भविष्यपुराणांतहि यास कायेपासून झाला म्हणून कायस्थ म्हटलें आहे. त्याचें लौकिक नांव चित्रगुप्त असें ठेवण्यांत आलें. चित्रगुप्त हाच या लोकांचा मूळपुरुष मानण्यांत येतो. एका खानेसुमारींत १९६७लोक चित्रगुप्ताचे

उपासना करणारे आढळले. यावरून कायस्थ हे शैव किंवा वैष्णव असून चित्रगुप्ताची पूजा करतात असें दिसून येतें. हे स्वतःची उत्पत्ति यमाची खाते-वही लिहिण्याकरितां ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या चित्रगुप्तापासून झाली आहे असें सांगतात. चित्रगुप्ताच्या दोन बायका होत्या. एक सूर्याची नात व दुसरी एका ऋषीची कन्या होती. या कन्येपासून त्याला ८ मुलें झालीं. त्यांनीं नागकन्यांबरोबर विवाह केले. पहिल्या बायकोपासून चार मुलें झालीं. या १२ मुलांस आर्यावर्तातील निरनिराळ्या भागांत राज्यव्यवस्थेचीं कामें वांटून दिलीं व त्या स्थानावरून यांच्या जातीचीं नांवें पडलीं आहेत. परशुराम पृथ्वी निःक्षत्रिय करीत असतां एका गर्भवती राजपत्नीस एका ऋषीनें आश्रय दिला आणि पुढें त्या गर्भास तो पुढें कारकून बनेल अशा अटीवर जाऊं दिलें व त्या गर्भापासून कायस्थांची उत्पत्ति आहे अशी कथाहि प्रचलित आहे. वरील पौराणिक उल्लेखांचाहि ऐतिहासिक जिज्ञासेस फारसा उपयोग नाहीं.

सामान्यतः एखाद्या विशिष्ट जातीची उत्पत्ति निरनिराळ्या तीन चार प्रकारांनीं होऊं शकते. (१) एखादी गोंड, इंग्रज, भिल्ल यांसारखी राष्ट्रजाति हळूहळू जातिस्वरूप पावते. (२) दुसरा प्रकार असा आहे की एखादा वर्ग विशिष्ट धंदा करीत असतो पण पुढें तो धंदा अशक्य झाला व त्या धंद्यामुळें उत्पन्न होणारें स्थानहि नवीनास मिळविणें अशक्य झालें तरी त्या वर्गाचे वंशज त्याच वर्गांत मोडतात. याप्रमाणें विशिष्ट वर्गास पुढें जातीचें स्वरूप येतें. ब्राह्मण वर्गाचें जातित्व याच तऱ्हेनें झालें आहे. (३) एखादा विशिष्ट धंदा करणारे लोक आपली श्रेणी बनवितात व त्या श्रेणीला अंतर्घटना उत्पन्न होते तेव्हां त्या श्रेणीचा धंदा बंद झाला नाहीं तर त्या श्रेणी अंतर्व्यवस्थेमुळें जातिस्वरूप पावतात. अनेक धंदेवाइकांच्या व व्यापाऱ्यांच्या जाती य प्रमाणें बनल्या आहेत. (४) इतर जातींचा संकर होऊन एखादी नवीन जात निर्माण होते.

आतां कायस्थांची उत्पत्ति यांपैकीं कोणत्या कारणापासून झाली असावी असा विचार करूं लागल्यास आपणांस चवथें कारण अगदींच असंभाव्य दिसतें. क्षत्रिय ही जात कधींच नव्हती व तो वर्गहि निश्चितपद नव्हता. निरनिराळ्या जाती व कुल जेव्हां महत्त्व पावत तेव्हां त्यांस क्षत्रियत्व प्राप्त होई. निश्चित जात अनिश्चित वर्गापासून उत्पादणें अशास्त्रीय आहे. शिवाय २१ लाख कायस्थ संकरानें उत्पन्न होण्यास क्षत्रिय कितां पाहिजेत व अधर्मानें उत्पन्न झालेले नेमका लेखकाचाच धंदा कसा करीत? अर्थात् पूर्वी ही एखादी विशिष्ट राष्ट्रजाति असली पाहिजे किंवा विशिष्ट धंद्याच्या संघास (गिल्ड) जातीचें स्वरूप आलें असलें पाहिजे. जर ही एखादी परकीय जाति असून आद्य लिपिप्रवर्तक किंवा एखादी स्वतंत्र लिपिप्रवर्तक जाति असेल तर तिची राष्ट्रजातिमूलक उत्पत्ति असणें संभवतें. म्हणून हा विशिष्ट धंदा करणारा संघ असून पुढें जातिस्वरूप पावला असें असण्याचा जास्त संभव आहे. हा वर्ग अर्थात ब्राह्मणांप्रमाणें सामान्य लोकांतूनच निघाला असला पाहिजे. कारण यांचा लेखनाचा धंदा असून निरनिराळ्या ठिकाणच्या लेखकांस ही जातिसंज्ञा प्राप्त झाली असावी. कारण यांच्या ज्या पोटजाती आहेत त्यांत अनेक जातींचीं नांवें केवळ स्थानिक आहेत. उदा० माथुर, गौड, भटनागर इ. श्रीवास्तवांचाहि श्रावस्तीशीं संबंध असेल. कांहीं पोटजातींचीं नांवें कुलनामावरून पडलेलीं दिसतात. तेव्हां जेथें एखादा जातिस्वरूपी वर्ग हा धंदा करीत असेल तेथें त्यास त्या स्थानाचें नांव त्या वर्गास मिळून ती पोटजात बनली असेल व जेथें थोडीं कुटुंबें या धंद्यांत असतील तेथें कुलनामप्राप्त नांव पोटजातीस पडलें असावेंसें वाटतें. अशा अनेक पोटजाती तयार होऊन पुढें त्या कायस्थ या नांवाखालीं आल्या असतील.

राष्ट्रजातविरून ही जात तयार होणें हेंहि प्रथम वाटतें तितकें अशक्य नाहीं. कायस्थ हें एक प्रथम राष्ट्र असून तें पुढें नामशेप झालें असावें हेंहि शक्य आहे. ज्याप्रमाणें मांध्यंदिन हें राष्ट्र असणें व तें राष्ट्रनाम ब्राह्मणशाखेस मिळणें हें जसें शक्य आहे तसेंच कायस्थ हें प्रादेशिक राष्ट्रनाम असून तें पुढें जातिनाम होणें शक्य आहे. पांचाल हें राष्ट्र नष्ट झाल्यानंतर त्यांतील व्यक्ती किंवा समूह निरनिराळ्या जातींच्या पोटजाती म्हणून राहिले. त्याप्रमाणें थोडासा प्रकार कायस्थांतहि दिसतो. उदाहरणार्थः—संयुक्तप्रांतांत भडभुंज्यांमध्यें कायस्थ व कैथिया या दोन पोटजाती असल्यामुळें थोडा घोंटाळा होतो. कैथिया ही पोटजात आपली उत्पत्ति सक्सेन कायस्थांपासून झाली असें सांगतात. कायस्थ भडभुंजे हीहि पोटजात पुष्कळ ठिकाणीं आहे असें ब्लंटचें मत आहे. या लोकांत दिराशीं लग्न लावण्याची चाल प्रचलित आहे. गोरखपूर, एटा, व मुरादाबाद या जिल्ह्यांत कायस्थ दरजी जातीचे लोक आहेत. एटा व मुरादाबाद येथील कायस्थ दरजी लोक सक्सेन कुळांतले आहेत. या लोकांत निरनिराळ्या गोत्रांचे लोक आहेत. ह्यांत कायस्थ हेंहि एक गोत्र आहे. यांनीं आपल्या जातीच्या इतिहासाबद्दल एक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. या लोकांची एक पंचायतहि आहे. कानपूर प्रांतांत कायस्थ मोची हे लोक आपण श्रीवास्तव कायस्थांपैकीं आहोंत आणि मोची हें नांव आम्हांस फक्त आमच्या धंद्यावरून पडलें असें म्हणतात. या लोकांचा धंदा जोडे करण्याचा नसून खोगीर, जीन इत्यादि वस्तू करण्याचा आहे. त्यामुळें त्यांनां कायस्थ जिनगर हें नांव जास्त आवडतें. हे मोच्याचा धंदा करीत नाहींत व त्यांचा मोची जातीशीं कोणताहि संबंध नाहीं. ते कायस्थ लोकांशीं संबंध जोडतात व जन्म, लग्न व मरण या प्रसंगीं यांच्या चालिरीती उच्च हिंदूप्रमाणेंच असतात. यांच्यांतहि विधवा दिराशीं लग्न लावते. कायस्थ सेंदुरिया, ही जात गोरखपूर प्रांतांत आढळते. तिचें तेथील दरजी जातीशीं बरेंच साम्य आहे. [ सेन्सस रिपोर्ट संयुक्तप्रांत १९११. ]

कायस्थ अशी जर राष्ट्रजाति असेल तर तींतील लेखक वर्ग निरनिराळ्या देशांत जाऊन तेथें कारकून बनला असणें अशक्य नाहीं. व कायस्थ राष्ट्रांतील इतर धंदे करणारे लोक आपणांस कायस्थ शिंपी, कायस्थ मोची असें म्हणवूं लागले असावे.

पुढें कायस्थ हें लिहिण्याच्या धंद्याचें वाचक नांव होऊन त्या धंद्याचे इतर जातींतील लोक आपणांस कायस्थ म्हणवूं लागले असावेत व या रीतिनें त्यांच्या पोटजाती वाढूं लागल्या असाव्यात. आसाम बंगाल्यांतील कलिते दिवसानुदिवस कायस्थ होत चालले आहेत हें आपण आज पहातच आहोंत. उलटपक्षीं ओरिसांतील करण हे इतर उडियांतून पूर्णपणें निराळे नसतां त्यांस करण पोटजात म्हणून कायस्थांत ओढण्याचा प्रयत्न दिसतो. ओरिसामध्यें क्षत्रिय, करण, खांडाइत, उडिया यांच्यांत अनुलोमविवाह होतात.

आपणांस कायस्थांचा हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत कोठकोठें प्रसार झाला आहे तें पूर्वी दिलेल्या आंकड्यांवरून कळून आलेंच आहे.त्यांत आपणांस मद्रासकडे कायस्थ मुळींच दिसत नाहींत. आतां निरनिराळ्या कायस्थांतील कांहीं विशेष सांगून नंतर त्यांची प्रांतवार माहिती देऊं.

महाराष्ट्रांतील कायस्थ प्रभू मांडवगडाहून उज्जनी वगैरे बाजूनें आले असें म्हणतात पण त्यास आधार नाहीं.हे आपला बंगालशीं संबंध लावतात तोहि लागू पडत नाहीं. कारण ते बंगाल्याकडून महाराष्ट्रांत आले असते तर मध्यंतरीं त्यांचे कांहीं कांहीं जमाव तत्तत्स्थानीय लोकांशीं सदृश असे असते; व परस्परांच्या भाषांवर परिणाम झाला असता. तसेंच त्यांची संख्या कोंकणापेक्षां देशावर अधिक असती. तशी ती आढळत नाहीं. यावरून सारस्वत, कायस्थ प्रभु आणि बहुतकरून चित्पावन हे समुद्रमार्गानें कराची, गुजराथ या बाजूनें सिंधुमुखाकडून कोंकणांत आले असावे. ज्याअर्थी त्यांच्या भाषेंत मराठीखेरीस इतर भाषांचा अंशहि सांपडत नाहीं त्याअर्थी वरील समुद्रमार्गाचीच उपपत्ति युक्त दिसते. महाराष्ट्रीय कायस्थ प्रभु आणि उत्तरेकडील कायस्थ एकवंशसंभव आहेत काय हाहि प्रश्नच आहे.

आतां आपण संयुक्त प्रांतांतील कायस्थांकडे वळूं. कायस्थांच्या बारा पोटजाती आहेत. त्या श्रीवास्तव्य अथवा श्रीवास्तव, भटनागर, सकसेन, अमिष्ठ अथवा अन्वस्त, ऐथन, अस्थान, वाल्मिकी, माथुर, सूर्यध्वज, कुलश्रेष्ठ, करण, गौर अथवा गौड उर्फ निगम या होत. तेराव्या एका जातीला उनाय म्हणतात. या सर्व जाती तेथील स्थानिक आहेत अशी आमची खात्री नाहीं.

कायस्थ सगोत्र अथवा सापिंड्यविवाह करीत नाहींत. मृतपत्नीच्या धाकट्या बहिणीशीं लग्न करण्याची चाल त्यांच्यामध्यें आहे. पापकर्म करणाऱ्या बहिष्कृतांस प्रायश्चित्त विधीनें स्वजातींत घेतलें जातें. प्रौढविवाह रूढ असून बहुभर्तृत्वास मनाई आहे. बहुपत्नीत्व तत्वतः मान्य असलें तरी सर्वसाधारण तशी चाल नाहीं. स्त्रियांच्या पुनर्विवाहास सक्त मनाई असून एखादी स्त्री वाईट चालीची असल्यास ती तिच्या नातेवाईकांकडून बहिष्कृत होते. लग्नापूर्वी वराची सोडमुंज किंवा मुंज झाली पाहिजे असा निर्बंध असून कन्यादान,पाणिग्रहण, सप्तपदी व सिंदूरदान इत्यादि सर्व लग्नविधि कायस्थांमध्यें आहेत. अयोध्या प्रांतांतील खेडेंगांवामध्यें जीं हलक्या जातीचीं लग्नें होतात त्यांमध्यें निरनिराळे धार्मिक व सामाजिक असे अनेक रूढ विधी आहेत. वधूवरांची पत्रिका पहाणें, गणगोत ठरविणें व हुंड्यावद्दल वाटाघाट करणें वगैरे गोष्टी लग्नापूर्वी झाल्यानंतर प्रत्यक्ष लग्नाच्या आधीं चार दिवसांपासून तें लग्न संपेपर्यंत निरनिराळे विधी व समारंभ करण्यांत येतात. उभयतांकडे एकेक पंडित व न्हावी असतो. धर्मासंबंधीं सर्व काम पंडित करतो व पाय धुण्याचें आणि सरबत तयार करून तें वाटण्याचें वगैरे अनेक उद्योग न्हावी व त्याची बायको हे करीत असतात. गौरीगणेश व नवग्रह यांचें पूजन वराला करावें लागतें. तिलक लावण्याचा समारंभ व कलशपूजन हे विधी मुख्य मानले जातात. प्रत्येक समारंभाच्या वेळीं सुवासिनी स्त्रियांनीं त्या त्या विधीला उचित अशीं गाणीं म्हणण्याची चाल कायस्थांमध्यें आहे. वराच्या वहिणीस लग्नसभारंभांत फार मान असतो. वरीच गाणीं वधूनें कसें वागावें यावर असतात. राम, कृष्ण इत्यादि देवांच्या लग्नावरहि रचलेलीं वरींच गाणीं असल्या प्रसंगीं म्हणण्यांत येतात. खेडेंगांवांतील कायस्थांच्या लग्नसमारंभांत स्त्रिया चरख्यावरील व कोष्ट्यावरीलहि कांहीं गाणीं म्हणतात. नाच व जेवणावळी चाललेल्या असतात. सोहागबंधन ( सौभाग्य बंधन ) हा समारंभ करतेवेळीं वधूला सात घरें जाऊन कुंकुम द्यावयाचें असतें. मोठ्या थाटानें वर वधूच्या घरीं लग्नसमारंभास जातो. त्यावेळीं ' तर्की फेरना ' व ' डेरा चपावन ' हे समारंभ करण्यांत येतात.

कायस्थ हे प्रचलित असलेल्या निरनिराळ्या पंथांचे अनुयायी आहेत. कांहीं शैव, शाक्त व वैष्णव असे आहेत. नानकशाही, कबीरपंथी, आचारी असेहि कायस्थ लोक आहेत. कांहीं आर्यसमाजी आहेत. परंतु संप्रदायभिन्नत्वामुळें त्यांच्यांत जातीला बट्टा लागत नाहीं. वैष्णवपंथी कायस्थाला शाक्तपंथी स्त्रीशीं लग्न करतां येतें. मात्र गोत्रांतर विवाहाचें बंधन पाळिलें पाहिजे. वैष्णव नवरा शाकाहारी असला व मद्यमांसाशन करीत नसला तरी त्याच्या शाक्त स्त्रियेस मद्य व मांस खाण्याची किंवा न खाण्याची पूर्ण स्वतंत्रता असते. कायस्थ आपल्या कुलदेवतेची म्हणजे चित्रगुप्ताची प्रत्यही पूजा करतात.इतर ठिकाणीं कार्तिक शुद्ध द्वितीयेस यांचा सार्वजनिक उत्सव होतो.कार्तिकांतलि द्वितीयेस यमद्वितीया असें समजतात व चित्रगुप्त हा चौदा यमांपैकीं एक मानतात. चैत्र वद्य द्वितीयेस ही पूजा करण्यांत येते. फळें, मिठाई व पैसे अर्पण केले जातात. हे पैसे देवळाचा पूजारी घेतो. विविध

कुटुंबांच्या विविध देवता असतात व त्यांचीहि अर्चा करण्यांत येते. कायस्थांच्या इतर देवता दुर्गा, जयन्ती, लक्ष्मी, शांभरी, महादेव, विष्णु, गणेश, कृष्ण, राम, गंगा, अनंत व नारायण इत्यादि आहेत. सर्व धर्मविधींत ब्राम्हण लागतात व त्यांनां पुरोहित, उपाध्याय व आचार्य म्हणतात.

कायस्थांबद्दल कितीहि मत्सर इतर लोकांत दिसून आला तरी त्यांचा सामाजिक दर्जा मोठा आहे यांत शंका नाहीं. जे वैष्णव पंथाचे असतात असे कायस्थ मांस खात नाहींत. जे कायस्थ शाक्त असतात ते सुरापान करतात. अलीकडे त्यांनीं या बाबतींत बराच आळा घातला आहे असें म्हणतात. वैष्णव सुरापान वर्ज्य मानतात. वैष्णव कायस्थ हे आपली ज्ञाति सोडून इतरांच्या एकाच ताटांतील कच्ची किंवा पक्की रसई खात नाहींत; एकाच भांड्यांतून पाणी पीत नाहींत व एकाच हुक्क्यांतून तंबाखू सुद्धां ओढीत नाहींत. सर्व पोटजाती पक्की रसई एकत्र बसून खातात पण कच्ची खात नाहींत.

लेखन, शिक्षणविषयक काम करणें हाच या जातीचा धंदा असून, शिक्षण, कायदेकानू वगैरे खात्यांत त्यांनीं सरकारी अधिकाऱ्यांचीं कामें केलीं आहेत. लेखक, लिपिकार, अक्षरजीवक, अक्षररचना, इत्यादि अनेक संस्कृत नांवें यांचा धंदा ध्वनित करतात; परंतु सध्यांची जात वरील नामनिर्दिष्ट धंदाच करणारी आहे असें नाहीं. या जातीच्या उच्च वर्गांतील लोकांचा बराच लौकिक असला तरी खेडेगांवांतील 'लाला' हा एक हिशेबी कारकूनच असतो व त्याचा फारसा चांगला लौकिक नसतो.

मध्यप्रांतांत हे लोक विशेषेंकरून सागर, दमोह,जबलपूर नरसिंगपूर जिल्ह्यांतून रहात असून तुरळक तुरळक सर्व प्रांतांत पसरले आहेत. यांबद्दल रिस्ले व हिरालाल हे आपल्या ग्रंथांत ( कास्ट्स अँड ट्राइब्स इन सी. पी. ) पुढील माहिती देतात. यांचा धंदा लेखकांचा व गांवच्या पटवारीपणाचा आहे पण मराठी जिल्ह्यांत यांची जागा परभू व विदुरांनीं पटकाविली आहे.

गु ज रा थें ती ल का य स्थ.-हे मुख्यतः सुरत परगण्यांत सांपडतात. हे संख्येनें जरी थोडे असले तरी बुद्धीनें व शिक्षणानें गुजराथेंतील इतर हिंदूंमध्यें यांनांच प्राधान्य मिळालें आहे. यांच्या शाखांपैकीं वाल्मीक, माथुर व भटनगर हे तीनच पोटभेद गुजराथेंत आढळतात. हे इतर गुजराथी हिंदूंपेक्षां अलग आहेत एवढेंच नव्हे तर आपसांतहि रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत.

वाल्मीक कायस्थः—सुरत परगण्यांत हे आढळतात. काठेवाडांतील वाल्हा नांवाच्या गांवीं ४ थ्या शतकांत कायस्थ स्थायिक झाल्याचा दाखला सांपडतो. परंतु दक्षिण गुजराथेंत कायस्थ लोक १६ व्या शतकांत आले असें दिसतें. यांचे औदिच्य ब्राह्मण उपाध्याय आहेत. हे वल्लभानुयायी आहेत. लग्नापूर्वीं दोन तीन दिवस वधूवर घरांतील मुलांबरोबर आपापल्या भावी श्वशुराच्या घरीं जातात व तेथें गणपतिपूजन करतात. त्यांनां केळीं, मिठाई व थोडेसे पैसे देतात. लग्नाच्या दिवशीं वधूच्या घरीं व लग्नापूर्वीं एकदोन दिवस अगोदर वराच्या घरीं ग्रहशान्ति नांवाचा विधि करण्यांत येऊन वधूवरांनां हळद लावतात. लग्नाच्या दिवशीं वधूकडे व वराकडे जातींतील मंडळींनां मेजवानी होते. सूर्यास्ताच्या सुमारास वर वधूकडे मिरवत जातो. वधूगृहीं आल्यावर वर एका चौरंगावर उभा राहतो व वधूची आई वरावरून पिठाच्या गोळ्या ओवाळून चारी दिशेला टाकते व नंतर वराला एक छोटासा नांगर, मुसळ, रवी व बाण दाखवून वराचें नाक ओढते. त्यानंतर ती वराला हातीं धरून मांडवांत नेते व त्या ठिकाणीं एका बांबूच्या छत्राखालीं त्याला बसविते. मुलीचा मामा मुलीला वराच्या समोर एका चौरंगावर आणून बसवितो व मग त्यांच्यामध्यें अंतःपट धरतात. पाणिग्रहणसमयीं वल्लभाचार्य महाराजांनां तेथें हजर रहावें लागतें. वधूवरांचे वडील या महाराजांनां रोकड दक्षिणा देतात. व महाराज वधुवरांस कांहीं वस्त्रें वगैरे देतात. मंत्रपठण झाल्यानंतर वधुवराचे हात एकमेकांच्या हातांत घालतात व मधील अंतःपट दूर करतात. पाणिग्रहणानंतर वरपक्षाकडील मंडळी रुसून मंडपांतून उठून जातात व वधूपक्षाकडील मंडळी त्यांची समजूत घालून त्यांनां नजराणे वगैरे देऊन परत आणतात. नंतर वधूवर अग्नीभोंवती चार प्रदक्षिणा घालतात. नवरा मुलगा खरोखरीच लहान मुलगा असला तर आपल्या 'मेथाजीनें' अथवा पंतोजीनें शिकविलेलीं लग्नासंबंधींचीं गाणीं म्हणतो. यानंतर वधूवर 'कंसार' नांवाच्या गव्हाचें पीठ, तूप, साखर वगैरे घालून तयार केलेल्या पक्वान्नाचा एकमेकांनां घास देतात. नंतर वधूवर पालखींत बसून वरगृहीं जातात. त्यांचें स्वागत वरमाता करते. नंतर वधूवर कुलदेवतेचें पूजन करून पत्ते खेळतात. लग्नाच्या दिवशीं मुलाचा बाप जातींतील लोकांनां मेजवानी देतो. नंतर दोन तीन दिवसांनीं वधूवर परत वधूच्या घरीं वाजतगाजत जातात. त्या ठिकाणीं त्यांनां अभ्यंगस्नान घालून उंची पोषाख लेववितात. वधूच्या माहेरी ह्या दिवशीं दोन पांढऱ्या कबुतरांचें एक जोडपें ब्राह्मणाच्या करवीं आणतात. त्या कबूतरांच्या गळ्याला तांबडी दोरी बांधलेली असते. वधूवर त्यांनां तेल लावतात. त्यांचीं पिसें सारखीं करतात व त्यांनां आरशांत पहावयास लावितात. त्यांनां कुंकवाच्या भिवया लावून कपाळावर अक्षता लावतात. अशा रीतीनें हें पक्षीपूजन आटोपलें म्हणजे त्या कबुतरांना एका मुसुलमानाच्या हवालीं करतात. त्या मुसुलमानाला वाढणें व आठ आणे देतात; व नंतर वधूवर एकमेकांच्या केसास तेल लावून विंचरतात; व एकमेकाला हातरुमालाचा पिळा करून मारतात. नंतर वर वधूला आपल्या घरीं नतो. पांचसहा दिवसांनीं कुलदेवतेचें पूजन

होतें; त्यावेळीं जातिभोजन होतें व वधूवर पुन्हां एकमेकांचे केस तेल लावून विंचरतात.

यांच्यांतील जातिभोजनें इतर जातींप्रमाणें होत नसून रात्रौ नवापासून बारापर्यंत होतात. वधू आपल्या सासूच्या व सासऱ्याच्या ताटांतील थोडें थोडें उष्टें खातें.

यांच्यांतील मृतांचे संस्कार इतर जातींप्रमाणेंच आहेत. परंतु मृताच्या ११ व्या १२ व्या व १३ व्या दिवशीं चार संन्याशांनां याच्यांत जेऊं घालतात.

माथुर कायस्थः—अमदावाद, वडोदें, दाभोई, सुरत, राधनपूर व नडियाद येथें हे आढळतात.हे लोक गुजराथेंतून खानदेशांतील नंदुरबार येथें व वऱ्हाडांतील वऱ्हाणपूर येथें जाऊन राहिलेले आहेत. यांच्या नांवावरून पहातां यांचें मूळचें ठिकाण मथुरा असावें असें वाटतें. मोंगल सुभेदारा-बरोबर कारकून म्हणून हे इ. स. १५७३–१७५० च्या दरम्यान गुजराथेंत आले.

दिसण्यांत हे वनिया लोकांसारखेच दिसतात. तीस वर्षांपूर्वी स्त्रीपुरुष दोघेहि घरांत हिंदुस्थानी भाषा बोलत असत. अलीकडे मात्र गुजराथी भाषेचा ते उपयोग करूं लागले आहेत. पूर्वी यांच्या स्त्रिया गोपा पाळीत असत, परंतु अलीकडे पाळीत नाहींत. हे लोक पूर्वी मांसाहारी होते, परंतु आता शाकाहारी बनले आहेत. चैत्र व आश्विन महिन्यांत आपल्या कुलदेवतांचें पूजन करतांनां मद्यमांसाचा नैवेद्य समर्पण करण्याचा यांच्यांत प्रघात असे, परंतु बरेच दिवस गुजराथी ब्राह्मणांशीं सहवास झाल्यामुळें त्यांनीं तो प्रघात आतां मोडला आहे. भोजनाच्या पूर्वी ब्राह्मणांप्रमाणें हे वैश्वदेव करतात व भोजनप्रसंगीं चित्राहुती घालतात.

या माथुर कायस्थांपैकीं कांहीं रामानुजपंथी,कांहीं वल्लभाचार्यांचे अनुयायी व कांहीं शैव आहेत. यांची उपजीविका सर्वथैव कारकुनीच्या पेशावर अवलंबून असते.

यांच्यांतील लग्नाची तऱ्हा मात्र जरा विलक्षण आहे. लग्नापूर्वी एक दिवस अगोदर वधू पुरुषाचा उंची पोशाख करून अश्वारूढ होऊन वराच्या घरीं जाते.वराच्या नात्यांतील सर्वांत वडाल माणसानें वधूचें मंडपांत स्वागत केल्यानंतर वधू आल्या वाटेनें परत स्वगृहीं जाते. वधू मंडपांत असेतों-पर्यंत वरानें तेथें येऊन तिचें तोंड पहावयाचें नसतें. दुसऱ्या दिवशीं वर वधूच्या घरीं जातो.लग्नापूर्वी वधूचा चुलता वधूला खांद्यावर घेतो व वराचा चुलता वराला खांद्यावर घेतो. नंतर दोघेहि नाचतात.वधूच्या हातांत एका वृक्षाच्या फांद्या दिलेल्या असतात. त्या फांद्यांनीं ती आपल्या भावी पतीला मारण्याचा प्रयत्न करते व वर त्या फांद्या तिच्या हातातून ओढून घेण्याचा प्रयत्न करतो. अशा रीतीनें बराच वेळ धुमाकूळ घातल्यानंतर त्यांचें लग्न लागतें.

इतर हिंदु सणांखेरीज माथुर कायस्थांचे पुष्कळ सण असतात. कार्तिक शुद्ध द्वितीया व चैत्र शुद्ध द्वितीया या दिवशीं हे लोक आपला मूळपुरुष जो चित्रगुप्त त्याची पूजा करून हे दिवस सणासारखे पाळतात. फाल्गुन शुद्ध सप्तमीला माथुर कायस्थ स्त्रिया गार पाण्यानें स्नान करतात व आदल्या दिवशींचें शिळें अन्न खातात.

भटनगर कायस्थः—अमदावाद, वडोदें व तुरळक तुरळक सुरत येथें हे आढळतात. उत्तर हिंदुस्थानांतून हे लोक गुजराथेंत आले. त्यांचाहि मूळपुरुष चित्रगुप्तच आहे. विस व दाश असे ह्यांचे आणखी दोन पोटभेद आहेत. विस लोक दाशांनीं शिजविलेलें अन्न खात नसत परंतु दाशांच्या मुलींशीं लग्नें मात्र लावीत पण आपल्या मुली दाशांच्या घरीं देत नसत. या भटनगर कायस्थांचे आचारविचार माथुर कायस्थांच्या आचारविचारावरोबर पुष्कळ वावतींत जुळतात. यांचे उपाध्याय श्रीगौड ब्राह्मण असतात. यांच्या जातींतील भांडणें मताधिक्यानें मिटविलीं जातात.

लग्नाच्या दिवशीं वधूवरांच्या घरीं गृहपूजा करण्यांत येते; व वधुवरांनां मंगल स्नान घालण्यांत येतें. स्नान झाल्यानंतर वराचें डोकें तांबड्या फडक्यानें आच्छादितात.ह्या फडक्याचें एक टोंक त्याच्या केसांत गोंवून केसांच्या शेवटीं चांदीची गोफनी लावतात. वराच्या अंगांत तांबडं कुडतें घालतात. पायांत चाळ घालतात.अशा तऱ्हेच्या पोषाखांत तो एखाद्या मुलीप्रमाणें दिसूं लागतो. असा पोशाख केल्यानंतर तो आपलें तोंड फुलांच्या माळांनीं व पल्लवांनीं आच्छादित करून आपल्या आप्तेष्टांसमवेत वधूगृहीं येऊन दाखल होतो. लग्नमंडपांत प्रविष्ट होण्यापूर्वी नवरदेवास नांगराचें व सूत काढण्याच्या चातीचें दर्शन देतात.

खानदेशात कायस्थ जातीचे लोक भुसावळ व चोपडा येथें सांपडतात. यांचा धंदा लेखकाचा–कारकुनीचा असून, यांनीं बऱ्याच मुसुलमानी चालीरीती उचलल्या आहेत. हे मांस खातात व त्याचप्रमाणें दारू देखील पितात. पण दुसऱ्या जातीच्या हातचें अन्न खात नाहींत. बायका आपलें सबंध शरीर वस्त्रानें झांकून घेतल्यावर चार चौघांत कधींहि जात नाहींत इतकेंच नव्हे तर स्वज्ञातीच्या वडील माणसांशीं सुद्धां भाषण करीत नाहींत. पुरुष गळयांत यज्ञोपवीत घालतात व दारू प्यावयाची असल्यास ते काढून ठेवतात. यांच्यांत विधवांनां पुनर्विवाहाचा अधिकार नाहीं महाराष्ट्रांतील कायस्थांचा इतर भागांतील कायस्थांशीं एक वंशात्वाच्या कितपत संभव आहे याचा विचार “ प्रभू ” या लेखांत केला जाईल. [ क्रूक, रसेल व हिरालाल; एन्थोवेन. सेन्सस रिपोर्ट १९११ मुं. गॅ. पु. ९, १२ वगैरे ].

**काये.** ( सर जॉन विल्यम )—( १८१४–१८७६ ). जॉन स्टुअर्ट मिलनंतर इंडिया ऑफीसच्या राजकीय व गुप्त खात्यांचा चिटणीस. ग्रंथः—हिस्टरी ऑफ दि सीपॉय वॉर इन् इंडिया; हिस्टरी ऑफ दि वॉर इन् अफगाणिस्तान; अडमिनीस्ट्रेशन ऑफ दि ईस्ट इंडिया कंपनी; लाइफ अँड कॉरसपाँडन्स ऑफ मेट्कॉफ; लाइफ ऑफ हेन्री सेंट जॉर्जटकर; लाइफ ऑफ सर जॉन मालकम्;ख्रिश्चॅनिटी इन् इंडिया; लाइफ ऑफ इंडियन ऑफीसर्स' इत्यादि.

**कायेनी**—कायेनी ही फ्रेंच ग्वायनाची राजधानी व बंदर आहे. हें कायेनी बेटाच्या वायव्य टोंकावर कायेनी नदीच्या मुखाजवळ उत्तर अ. ४°५६'२८" व पश्चिम रे. ५२°२०'३६" यांच्यावर आहे. लोकसंख्या १२६००. या शहराचा आकार चौकोनी असून येथील रस्ते स्वच्छ व पक्के आहेत. येथील घरें दुमजली व लांकडी असून तळमजल्यास विटांचे मजबूत चौथरे आहेत. जुन्या शहरांत सरकारी कचेरी व जेसुइट विद्यालय आहे. परंतु रस्ते नवीन शहराच्या रस्त्यांप्रमाणें प्रमाणशीर व बांधीव नाहींत. या दोन शहरांमध्यें 'प्लेस दि आर्म्स' नांवाचें चौकोनी छानदार पटांगण आहे. गव्हर्नरच्या वाड्याच्या उजव्या बाजूस माउन्ट केपेरॉन आहे व याच्यावर फोर्ट सेंट मायकल, खलाशांच्या चाळी, सिमल स्टेशन व दीपगृह हीं आहेत. येथें शहरच्या पाणीपुरवठ्याचे खाजिने आहेत. बंदर उथळ असल्यामुळें येथें गोदी नाहीं. फक्त मालाचे दोन धक्के आहेत. येथून सोनें, कोको, फास्फरस कातडीं, लांकडें व मसाले बाहेरदेशीं पाठवितात व फ्रेंच दारू, स्पिरिट, लिकर, रेशमी व कापसाचें कापड, तंबाकू, लोखंडी सामान, कांचेचें सामान, मातीचीं भांडीं, मसाले लावलेलें मांस व मासे, भाजीपाला, मका, कणीक, वाळलेलें गवत, भुसा, तेल व गुरें बाहेर देशांहून येथें येतात. येथून मार्टिनिकला महिन्यांतून एक वेळां नियमितपणें एक बोट जाते. येथें पूर्वी राजकीय कैदी हद्दपार करून ठेवीत असत. अन्न व प्रावरण फार महाग असून भाकर व फ्रेंच दारू हे खाण्याचे पदार्थ स्वस्त आहेत. पूर्वेकडील वाऱ्यानें उष्णता कमी भासते. डिसेंबर ते मार्चपर्यंत वाहणारा उत्तरेकडचा वारा अशक्त लोकांच्या प्रकृतीस अपायकारक असतो. व इतर प्रकारच्या तापाच्या सांथी वारंवार येतात परंतु हवा सर्द असून साधारणपणें निरोगी असते.

**कारकळ**—मद्रास इलाखा. दक्षिण कानडा जिल्ह्यामधील उडिपि तालुक्यांतील खेडें. लो. सं. (१९११) ४९६१. येथें एका काळीं जैनांची वस्ती वरीच असून भैररस वोडेयार नांवाचें प्रसिद्ध जैन घराणें येथें रहात असे. आसपासच्या भागांत पुष्कळ जैन देवालयें आहेत. जवळच हलेंगडी येथें प्रसिद्ध जैन स्तंभ आहे. गांवाच्या सभोंवतालचा प्रदेश सुपीक असून त्यांत पोफळीच्या पुष्कळ बागा आहेत. येथें तांदुळाचा वराच व्यापार चालतो.

**कारंजा**—वऱ्हाड. जिल्हा अकोला. तालुका मूर्तिजापूर. हें वरींच वर्षें तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें. या गांवास म्युनिसिपालिटी आहे.

कारंजा हें गांव फार पुरातन असून तेथील किल्ला व राहिलेले चार दरवाजे पुरातनत्वाची साक्ष देतात. हें हल्लीं व्यापाराचें ठिकाण असून आठवड्यांतून सहा वेळ कापसाचा बाजार भरत असून दर रविवारी त्याच जागेवर इतर सर्व जिनसांचा बाजार भरतो. इ. स. १८९५ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

येथें कै. रामजी नाइक काण्णव यांचा वाडा असून तो पहाण्यालायक आहे. दवाखाना, पोलिस कचेरी, इंग्रजी मराठी शाळा, टपाल व तारघर आणि एक मोठी सराई येथें आहे. मंगरूळ रस्त्याजवळ एक सुंदर डाकबंगला आहे. येथें एक ऋषितलाव असून त्याची लांबी दोन मैल आहे. कारंज नांवाच्या ऋषीस झालेला रोग बरा करण्याकरितां अंबा देवीनें हें तळें उत्पन्न केलें अशी आख्याइका याच्याबद्दल आहे. याच ऋषीच्या नांवावरून या गांवास कारंजगांव असें नांव पडलें असें म्हणतात. गांवाच्या पूर्वेस चंड्या अथवा लेंडी तलाव आहे. या पाण्यानें खरूज बरी होते असें म्हणतात. गांवामध्यें विंदुतीर्थ नांवाचें एक चौकोनी व पायऱ्या असलेलें कुंड आहे. त्यांतून बेंबळ नदीचा उगम असल्याचें मानतात.

शिवाजी महाराजांच्या वेळीं हें फार श्रीमंत गांव होतें. येथें अगणित द्रव्य पुरून ठेविलें होतें. महाराजांनीं (१६७० च्या अखेरीस ) येथें स्वारी केली. दोन तीन दिवस येथें मुक्काम करून मोठमोठ्या श्रीमंतांच्या घरांना खणत्या लावून पुष्कळ संपत्ति गोळा केली. शहरची संपत्ति व प्रांताची चौथाई वसूल करून महाराज परत फिरले (जेधे शकावली). जदुनाथ सरकारच्या मतें प्रतापराव गुजरानें कारंजें लुटून एक कोट रुपयांचा ऐवज नेला ( शिवाजी, पा. २०७—९ )

या गांवास एकेकाळीं कारंजा बिबी असें म्हणत असत. कारण हा गांव त्यावेळीं अहमदनगरच्या राजाच्या मुलीच्या स्त्रीधनापैकीं होता. हिचें थडगें येथें आहे. नंतर या गांवास 'लाडांचा कारंजा' असें म्हणूं लागले. कारण येथें लाड आडनांवाचे लोक रहात होते. या ठिकाणीं तीन जैनमंदिरें आहेत. भाद्रपद महिन्यांत येथें उत्सव होतो. येथें एक कस्तुरी नांवाची हवेली आहे.

येथील लोक फार सधन अ त्याबद्दल सांगतात. येथें दुसरींहि पुष्कळ देवळें आहेत. कमलाक्षी देवी, एकाक्षी देवी आणि खोलेश्वर महादेव यांचीं देवळें दाशरथी रामचंद्रानें बांधलीं असें म्हणतात. त्यांत विशेष पाहण्यासारखें कांहीं नाहीं. अवरंगझेबानें येथील हेमाडपंती देऊळ मोडून त्याची मशीद बनविली आहे असें दिसतें. समर्थ परंपरेंतील रोकडारामाची समाधि व मठ येथें आहे.

**कारडगी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. बंकापूरच्या ईशान्येच्या कारडगी पेट्याचें हें मुख्य ठिकाण आहे. कारडगीचे देशपांडे वतनदार आहेत. इ. स. १७६० च्या सुमारास बंकापुर सरकारांतील कारडगी हा एक परगणा असून त्याचें उत्पन्न १,२०,००० रुपये होतें असें दिसतें.

**कारडी**—हें गांव हनगुंदच्या ईशान्येस १० मैलांवर व कृष्णेच्या दक्षिणेस पांच मैलांवर आहे. येथें तीन देवळें असून तीन शिलालेख आहेत. देवळें पूर्वीचीं जैनांचीं असावींत असें दिसतें. शिलालेख ११५३ व १५५३मधील असून

त्यांतील दुसरा विजयानगरच्या अकराव्या राजाचा म्हणजे सदाशिव देवरे ( १५४२—१५७३ ) याचा आहे.

**कारडोना**—कारडोना हें शहर स्पेनच्या ईशान्य भागांत बारसिलोना शहराच्या वायव्येस५५ मैल असून बहुतेक कारडोनर नदीनें वेष्टिलेल्या टेंकडीवर आहे. याची लोकसंख्या १९०० मध्यें ३८५५ होती. याच्या लगत असलेल्या सैंधवाकरितां हें प्रसिद्ध असून येथें ३०० फूट उंचीचा व ३ मैल घेराचा सैंधवाचा पर्वत आहे.

**कारलें**—या वेलास लॅटिनमध्यें मॉमोंडिका चार्कूलिया, मराठींत कारली, गुजराथींत करेली इत्यादि नांवें आहेत.पावसाळ्यांत परसांत आळीं करून त्यांत घरगुती उपयोगाकरितां कारलीचें बीं लावतात. जास्त उत्पन्न करणें असल्यास जमीन तयार करून सरीचे वाफे करून सरीच्या वगलेस सहा फुटांच्या अंतरावर दोन दोन बिया टोंचतात. वेल वाढल्यावर ते काठ्या लावून त्यांवर चढवितात. कधीं कधीं वेल जमीनीवरच वाढूं देतात. सुरतेकडे खारवट जमिनींत व हिंवाळ्यानंतर कोरडवाहू जमिनींत कारलीं लावितात. तीं जमिनीवरच पसरतात. उन्हाळ्यांतील दमट हवेंत तेथें वेल चांगले वाढतात व फळेंहि उत्कृष्ट येतात.

कारलीचे मोसमावरून उन्हाळी व पावसाळी व रंगावरून पांढरीं व हिरवीं, व महाराष्ट्राबाहेर आकारावरून " कारेली " ( लहान )," कारेला " ( मोठा ) असे प्रकार बनले आहेत. हिरवीं कारलीं लहान व मोठीं दोन्ही निराळीं असतात. उन्हाळी कारलीं लहान असतात. पावसाळी कारलीं मोठीं वाढतात. पांढरीं कारलीं मोठींच असतात. पांढऱ्या कारल्याचें बीं मिळणें फार मुष्किलीचें असतें. बीं विकणाऱ्याकडेहि खात्रीलायक बीं मिळत नाहीं. पांढऱ्या कारल्याचें बीं हिरव्या बारीक कारल्याच्या दीडपट मोठें असतें पण पावसाळी मोठ्या हिरव्या कारल्याएवढेंच असतें. म्हणून त्यांत फसवणूक होते.

कारल्याची भाजी, कोशिंबीर इत्यादि पदार्थ करितात. व कारल्याच्या वेलाचा औषधी उपयोगहि आहे.

उ प यो ग.—पित्तविकार झाल्यास कारलीच्या पाल्याचा रस द्यावा. म्हणजे वमन होऊन पित्त पडेल. वमन न झाल्यास एक दोन रेच होऊन पित्ताचा नाश होईल. उतारासाठीं तूप द्यावें. [ वनौषधि गुणादर्श भाग २ ]

**कारवान**—बडोदें संस्थान. मियागावपासून पूर्वेस ५ मैलांवर व दभोईपासून पश्चिमेस ७ मैलांवर हें प्राचीन क्षेत्र आहे.

चार युगांत यास अनुक्रमें तेहपुरी,मयपुरी किंवा कानभद्र, मेघावती व कायाविरोहण हीं नांवें होती असें म्हणतात. शेवटच्या नांवावरूनच आधुनिक नांव पडलें. कारवानच्या माहात्म्याबद्दल अनेक कथा सांगतात. कारवानमाहात्म्य नांवाचा एक ग्रंथ आहे. येथील तळें फार पवित्र मानतात. अनेक जुनीं देवळें व लिंगें याठिकाणीं आहेत. मुसुलमानांनीं हें स्थान उध्वस्त केलेलें उघड दिसतें. नलेश्वर, वागनाथ, रामनाथ, पंचनाथ, भीमनाथ, काशीविश्वनाथ हीं महादेवाचीं मोठीं देवळें आहेत मुख्य देवस्थान कोटेश्वर महादेवाचें होय. डोंगराच्या पायथ्याशीं चांदीतांब्याचीं नाणीं व हलकीं कांकणें आढळतात.

इ. स.१३व्या शतकांतल्या अर्जुनदेव या वाघेला राजाच्या अमदानीपर्यंत हें गांव क्षेत्र म्हणून प्रसिद्ध होतें. शैवपंथीय नकुलीशाचा पाशुपत संप्रदाय या ठिकाणीं चालू होता असें नक्लेश्वर या नांवावरून दिसतें [ मुं. गॅ. पु. १. १, ७. ].

**कारवार, ता लु का**—मुंबई इलाखा. कानडा जिल्ह्यांतील अगदीं वायव्येकडील तालुका. क्षेत्रफळ २८१ चौ. मै. यांत कारवार हें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण आणि दुसरीं ५४ गांवें आहेत. एकंदर लो. सं. ( १९११ ) ५९,६६३. या जिल्ह्याच्या मध्यभागांतून कालीनदी पूर्व पश्चिम वहात जाऊन समुद्रास मिळते. या नदीच्या दोन्हीं तीराला व त्याचप्रमाणें समुद्रकिनाऱ्याला पुळणीची (नदींतील गाळ सांचून तयार झालेली काळी) जमीन आहे. परंतु तींत मिठाचा अंश बराच असून, भरतीच्यावेळीं तेथें पाणी येण्याचा संभव असल्यामुळें समुद्रकाठीं मजबूत धक्का बांधल्याखेरीज ती लागवडीस आणणें शक्य नाहीं. कारवार येथें वार्षिक पाऊस सरासरी ११० इंच पडतो.

श ह र—कारवार तालुक्याचें मुख्य ठिकाण.याचें जुनें नांव काडवाड. हें गोव्याच्या आग्नेयीस ५० मैलांवर व मुंबईच्या आग्नेयीस २९५ मैलांवर आहे. लो. सं ( १९११ )१८,१५९. येथील म्युनिसिपालिटीचें वार्षिक उत्पन्न सुमारें १२,००० रु. आहे. नवीन शहराच्या पूर्वेस ३ मैलांवर काली नदीच्या कांठीं जुनें काडवाड शहर असून तेथें पूर्वी बराच व्यापार चालत असे. हें सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत विजापूरच्या राज्यांत असून देसाई नामक मुलकी अधिकारी येथें असे. सोंड येथील मिऱ्यांची प्रसिद्धि ऐकून ईस्ट इंडिया कंपनीनें १६३८ त कारवार येथें आपली वखार उघडली. १६६५ त येथील इंग्रजांपासून शिवाजीनें ११२० रु. वसूल केले; नंतर १६७४ त कारवार शहर जाळून टाकलें, परंतु इंग्रजांस त्रास दिला नाहीं असें इंग्रज ग्रंथकार कबूल करतात. १६९७ त मराठ्यांनीं कारवार उध्वस्त केलें व १७१५ त सोंडच्या राजानें कारवारचा जुना किल्ला पाडून सदाशिव गड नांवाचा नवा किल्ला बांधला.१८०१ त जुनें कारवार शहर बहुतेक नष्ट झालें असून तेथील प्रख्यात पुरातन व्यापाराचे फारच थोडे अवशेष त्यावेळीं दृष्टीस पडत होते.

उत्तरकानडा जिल्हा मुंबई इलाख्यांत सामील झाल्यापासून नवें शहर अस्तित्वांत आलें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण तत्पूर्वी तें केवळ लहानसें खेडें होतें. हल्लींच्या गांवाच्या म्युनिसिपल हद्दींत ९ गांवांचा समावेश झालेला आहे.

मुंबई व कोचीन यांच्या दरम्यान सर्वकाल सुरक्षित असें कारवार हें एकच बंदर आहे. किनाऱ्याला बेटांचा एक समूह असून, देवगड नांवाच्या सर्वांत मोठ्या बेटावर एक दीपगृह आहे. फेब्रुवारीपासून ते एप्रिलपर्यंत, वायव्येकडील जोराचे वारे सुरू असतां लहान जहाजांनां या बेटांपैकीं दोन बेटांचा चांगला आश्रय मिळतो. नैर्ऋत्येस ५ मैलांवर जमिनीपासून २ मैल अंतरावर अंजिदिव नांवाच्या बेटावर लहानशी पोर्तुगीज वसाहत आहे. मुंबईपासून कारवारपर्यंत आगबोटीनें ३६ तासांत जातां येतें. कारवार बंदरची शोभा फार प्रेक्षणीय आहे. कारवार येथें सरकारी कचेऱ्यांखेरीज, एक इस्पितळ, एक हायस्कूल व कित्येक दुसऱ्या शाळा आहेत.

**कारवाल, करौल**—यांची वस्ती आग्रा, अयोध्या परगण्यांत आहे. हे लोक कोल जातीपैकीं आहेत. ते बेरियास ह्या जातीशीं विवाहसंबंध जोडतात. अहेरिया, बहेलिया, भंगी व चांभार या जातींत देखील करोल किंवा कारवाल ही एक पोटजात आहे. कारवाल लोकांच्या फिरत्या टोळ्यांवर पोलिसची नजर असते. जहारपीर, पंचपीर, मदार साहेब आणि गाझी मेन ह्यांचे हे लोक भक्त आहेत. त्याच प्रमाणें कधीं कधीं कालीदेवी व गंगा यांचीहि ते पूजा करतात. ह्या लोकांत कांहीं विचित्र चाली आढळतात. मूल जन्मास येतेवेळीं नाळेबरोबर विंचवाची नांगी, दारु इत्यादि जिनसा ते जमिनींत पुरून ठेवितात. या योगानें मुलाचें पुढील आयुष्य आरोग्यांत जातें असा त्यांचा समज आहे. याचप्रमाणें अंत्यविधीसंबंधीं कांहीं विशिष्ट संस्कार या लोकांत असतात. "ज्या प्रेतांनां ते पक्कीं समजतात त्यांनां अग्नि देण्यांत येतो पण त्यांच्या मतें जीं 'कच्चीं' असतात त्यांनां पुरून ठेविलें जातें." [ सेन्सस रिपोर्ट १९११. पु. १५ ].

**कारवी**, पो ट वि भा ग— संयुक्त प्रांतांतील, बांडा जिल्ह्यांतील पोटविभाग. यांत कमासिन, कारवी व मौ ह्या तहसिली आहेत.

**ता लु का.**—संयुक्त प्रांतांतील बांडा जिल्ह्याची आग्नेयीकडील तहसील. क्षे. फ. ४७८ चौ. मै. लो. सं. ( १९११ ) ३४७५९. तहसिलीचें मुख्य ठिकाण कारवी. याच्या खेरीज तहसिलींत दुसरीं २०० गांवें आहेत. तहसिलीपैकीं अर्धा प्रदेश सपाट असून बाकीचा भाग विंध्य पर्वताच्या पहिल्या रांगेला लागून असलेल्या डोंगरसपाटीवर आहे. पश्चिमेस, पैशुनी नदी तहसिलीच्या सरहद्दीवरून जाऊन नंतर तहसिलींतून पलीकडे जाते.

**गां व.**—संयुक्त प्रांतांतील बांडा जिल्ह्यामध्यें याच नांवाच्या तहसिलीचें मुख्य ठिकाण. येथून चित्रकूट जवळ आहे. हें गांव पैशुनी नदीजवळ ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वेच्या एका शाखेवर आहे. लो. सं. ( १९११ ) ८०३१. १८०५ ते १८१६ पर्यंत येथें ब्रिटिश छावणी होती. १८२९ मध्यें कारवी येथें रावबाजीचे दत्तक भाऊ अमृतराव पेशवे यांचे चिरंजीव विनायकराव यांनीं आपली राजधानी केली. यांनां ७ लक्षांची जहागीर होती. यांनीं येथें कित्येक सुंदर देवालयें, वाडे व विहिरी बांधल्या या वेळीं दक्षिणेंतील पुष्कळ व्यापारीहि तेथें रहावयास गेले. बंडाच्या वेळीं विनायकरावांचे पुत्र नारायणराव हे स्वतंत्र होऊन, त्यांनीं आपलें स्वातंत्र्य कांहीं महिने कायम ठेविलें होतें; परंतु अखेर इंग्रजांनीं त्यांचा पराभव करून त्यांची सर्व मालमत्ता लुटली. त्यांच्या गणेशबाग ( ? ) राजवाड्यांत हल्लीं तालुकाकचेऱ्या व शाळा आहेत. वस्तुतः नारायणराव हे बंडांत सामील झाले नव्हते. हल्लीं कारवीस विनायकराव यांच्या मुलीचा दत्तकवंश हयात आहे. त्यांचें आडनांव जोग. त्यांचें उत्पन्न सालीना १०॥ हजार पर्यंत आहे ( अमृत राव पहा. ) या गांवांत दोन मिशनरी लोकांच्या शाखा आहेत. हें गांव व शेजारचें तरहुवान खेडें, या दोहोंचा स्थानिक कारभार १८५६ च्या २० व्या ॲक्टाप्रमाणें चालतो. बंडानंतर कांहीं काळपर्यंत या गांवाला उतरती कळा लागली होती. परंतु आगगाडी सुरू झाल्यापासून हें जिल्ह्यांतील सर्वांत मोठें व्यापारी ठिकाण झालें आहे. कापूस, धान्य, तूप वगैरे जिन्नस येथून बाहेर रवाना होतात. [ ज्ञानकोश. वि.६ ( अमृतराव ). इं. गॅ पु. १५; इति. सं. ].

**कारस्कर**—बौधायन श्रौतसूत्र ( २०. १३ ), धर्मसूत्र ( १. २, १४ ), आपस्तंबसूत्र ( २२. ६. १८ ) व हिरण्यकेशीसूत्र ( १७. ६ ) यांतून कारस्कर लोकांचा उल्लेख आढळतो. रा. राजवाडे यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या १८३४ च्या वृत्तांत कारस्करांची माहिती दिली आहे. कारस्कर हा शब्द कर्णपर्वाच्या चव्वेचाळीसाव्या अध्यायांत आला आहे. या कारस्कर शब्दाचा एक रानटी जात, या अर्थीं उपयोग दोन्ही ठिकाणीं केला आहे. या लोकांच्या देशांत जो कोणी जाईल व वास्तव्य करील त्याला बौधायनानें प्रायश्चित्त सांगितलेलें आहे. हे कारस्कर लोक दक्षिणेकडचे असावे, असा बुह्लरचा तर्क आहे ( सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट, पु, १४. बौधायन भाषांतर. पृ. १४७टीप ). हा तर्क खरा असेल तर त्याचा पाणिनीच्या अष्टाध्यायीच्या सहाव्या अध्यायाच्या प्रथम पादाच्या १५६ व्या 'कारस्करो वृक्षः' सूत्रावर चांगला प्रकाश पडतो. पारस्करादि गणांतहि कारस्कर शब्द आला आहे. यावरून पाणिनीला कारस्कर शब्द माहीत होता असें दिसतें. कोणी कोणी कस्कादि गणांत हा शब्द घेतात परंतु तें बहुमान्य नाहीं. 'कारस्करो वृक्षः' म्हणजे कारस्कर देशांत झालेलें एक झाड तें कारस्कर संज्ञक होय. तात्पर्य कारस्कर नांवाचा एक देश होता, व तेथील वृक्षांनां कारस्कर वृक्ष म्हणत. या दोन गोष्टी पाणिनीला माहीत होत्या. हा देश विंध्याच्या दक्षिणेकडील असावा असा तर्क आहे, व तो जर खरा असेल तर दक्षिणेकडील कारस्कर देश पाणिनीला माहीत होता व तेथून कांहीं मौल्यवान लांकडें उत्तर

हिंदुस्थानांत पाणिनीच्या कालीं आणीत, या दोन गोष्टी सिद्ध होतात.

बौधायन म्हणतो कीं, कारस्कर हें रानटी लोकांचें नांव आहे. तेव्हां हे लोक कोण व त्यांच्या नांवाचा हल्लीं अपभ्रंश कोणता झाला हें शोधणें आहे. राजवाडे यांच्या मतें पाणिनीच्या व बौधायनाच्या वेळचे हे कारस्कर म्हणजे सध्याच्या महाराष्ट्रांतील कातकरी लोक होत. कारस्कर = कारचकर = काचकर = कातकर, अशा अपभ्रंशानें हा कातकरी शब्द मराठींत आला असें राजवाडे म्हणतात.ते विंध्याच्या दक्षिणेस आरण्यांत रहात, व त्यांनां तेव्हां कारस्कर हें नांव मिळालें.कात करणारे ते कातकरी ही व्युत्पत्ति राजवाड्यांच्या मतें चुकीची आहे. सारांश पाणिनीला महाकांतारांतील कारस्कर देश, वृक्ष व लोक माहीत होते हें अगदीं स्पष्ट दिसतें.

**कराकुल**—ह्या नांवाचीं मोठीं व लहान अशीं दोन सरोवरें रशियन तुर्कस्थानांत फरघन प्रांतांत पामीर पठारावर आहेत.

मोठें कराकुल.—याची लांबी १२मैल व रुंदी १०मैल असून ट्रान्सअलाइ पर्वतराजीच्या दक्षिणेस उत्तरअक्षांश ३९ वर आहे. सरोवर सरासरी १३,२०० फूट उंचीवर आहे. सरोवरामोंवतीं मोठे पर्वत असून उत्तरेकडील कायझल-अर्ट घाटानें सरोवरास जावें लागतें. दक्षिणकिनाऱ्यावरील एक द्वीपकल्प व उत्तर किनाऱ्यावरील एक बेट यांमुळें सरोवराचे दोन विभाग झाले आहेत. पूर्वेकडील विभाग लहान असून पाण्याची खोली अजमासें ४२–४३ फूट आहे. पश्चिमेकडील विभागाची खोली ७२६–७५६ फूट असते. सरोवरास सांडवाट नाहीं.

लहान कराकुल.—हें सरोवर ईशान्येस पामीर पठारावर १२७००फूट उंचीवर आहे. दक्षिणभागीं सरोवराची खोली ७९ फूट, मध्यभागीं ५० ते ७० फूट व उत्तरभागी १००० फूट आहे. सरोवर हिमनदीच्या गाळानें भरलेलें असतें. सरोवरामधून गाळाचा एक प्रवाह वहातो व या प्रवाहाला पूर्वतुर्कस्तानांत काशगरकडे वहात आल्यावर "गेझ" असें म्हणतात.

**काराकोरम**—काराकोरम हें मंगोलियांतील दोन शहरांचें नांव होतें. एक शहर ८ व्या शतकांतल्या उईघुर राज्याची राजधानी होतें व दुसरें शहर १३ व्या शतकांत मंगोलियांतील एका राज्याची राजधानी होतें. हेंच नांव खांगाई पर्वतावलीस लावितात. उईघुर—काराकोरम आर्खोनच्या डाव्या तीरावर आहे.उईघुर राज्याचा न्हास झाल्यामुळें हें शहर ओसाड पडलें होतें. १० व्या शतकांत खितान राज्याचा संस्थापक अवकी यानें येथें एक विजयस्तंभ रोविला. चेंगीझखानानें स्थापिलेल्या मंगोलियन राजसत्तेच्या उदयकाळीं मंगोलियन काराकोरम वसविण्यांत आलें. १२३४ त खानासाठीं एक राजवाडा व १२३५ मध्यें तटबंदी बांधण्यांत आली. नवथा राजा कुबलाईखान यानें पेकिंगच्या जवळची कैपिनफु ही राजधानी केली. परंतु खान अरिकबागनें स्वातंत्र्य जाहीर केल्यामुळें कुबलाईखानानें काराकोरमला वेढा दिला व तें शहर जमीनदोस्त केलें.

**कारामुंगी**—हैद्राबाद संस्थानांत बेदर जिल्ह्यांतील सर्फ इ-खासमधील तालुका. क्षे. फ. ३६२ चौ. मै. जहागिरीसुद्धा लो. सं. (१९०१) ५१,८०८. तालुक्यांत एकंदर १३० खेडीं आहेत; पैकीं १९ जहागिरी गांवें आहेत. मुख्य ठिकाण जनवाड. लो. सं. २१६५. १९०५ पासून या तालुक्यांत जुन्या औराद तालुक्याचाहि समावेश होतो. त्याचें क्षे. फ. १८९ चौ. मै. व लो. सं. (१९०१) ११,३०१ असून त्यांत ६५ खेडीं होतीं. या तालुक्यांतून मांजरा नदी वहाते.

**कारिकल**—कारोमांडेल किनाऱ्यावर तंजावर जिल्ह्यांतील मायवरम्, नन्निलम् व नेगापट्टम् हे तालुके व बंगालचा उपसागर यांच्यामधील फ्रेंच वसाहत. हिचें एकंदर क्षे. फ. ५३ चौ. मै. असून पाँडेचरीच्या सुभेदाराच्या (गव्हर्नरच्या) हाताखालचा एक अधिकारी येथील कारभार पहातो. लो. सं. (१९१७) ५६,५४८. कारिकल, लाग्रांड अल्डी, व नेडुंगाडु असे या वसाहतीचे तीन कांम्यूव अथवा विभाग असून प्रत्येक विभागावर एकेक मेयर नेमलेला आहे. नंदलार, नात्तार, अरसलार, तिरुमलाजनार, मुदिकोंडानार, वांजियार व नूलार अशा कावेरीच्या सात शाखा व शिवाय इतर लहान प्रवाह या प्रदेशांतून वहात असल्यामुळें तो फार सुपीक आहे.

अरसलारच्या उत्तरतीरावर, तिच्या मुखापासून सुमारें १॥ मैलावर या वसाहतीचें मुख्य ठिकाण आहे. येथें तांदुळाचा बराच व्यापार चालतो. कारिकल येथून पुष्कळ हिंदी मजूर फ्रेंचांच्या वसाहतींत जातात. कारिकलपासून तंजावर जिल्ह्यांतील पेरलमपर्यंत आगगाडी झालेली आहे.

इ. स. १७३८ त तंजावरांतून घालवून दिलेल्या सयाजी राजानें फ्रेंचांनां त्यांनीं केलेल्या मदतीबद्दल कारिकल देण्याचें कबूल केलें होतें. परंतु त्यानें आपलें वचन पाळलें नाहीं. तेव्हां त्याचा प्रतिस्पर्धी चंदासाहेब याजकडून फ्रेंचांनीं तें गांव मिळविलें. १७४९ त अशाच परिस्थितींत फ्रेंचांनां आणखी ८१ गांवें मिळालीं. ही सर्व वसाहत कित्येक वेळां इंग्रजांच्या ताब्यांत आली होती. परंतु १८१७ त ती कायमची परत करण्यांत आली.

**कॉरिन्थ**—ग्रीसमधील एक शहर. हें कॉरिंथच्या संयोगभूमीजवळ आहे. येथील जमीन जरी खडकाळ आणि नापीक आहे तरी सारॉनिक आणि कॉरिन्थची संयोगभूमी यांच्या माध्यावर असल्यामुळें हें एक व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. कॉरिन्थ शहरापासून कॉरिन्थ संयोगभूमीपर्यंत ट्रॅमगाडी असल्यामुळें तर व्यापाराला फारच मदत झाली आहे. शहरासभोंवतीं १० मैल घेराची भिंत आहे.

होमरच्या वेळेस कॉरिन्थ हें स्वयंशासित राष्ट्र नसून परतंत्र राष्ट्र होतें. येथें फार प्राचीन काळीं आयोनियन लोकांची दाट वस्ती असे. दंतकथेप्रमाणें कॉरिन्थवर इ. स. पूर्वी १०७४ ते ७७४ पर्यंत अलेटीस वंशांतील राजांचें राज्य होतें. यानंतर बॅकिस या राजाचे सरदार वंशज गादीवर आले. इ. स. पूर्वी ६५७ ते ५८१ हीं वर्षे कॉरिन्थला फार भरभराटीचीं गेलीं. यावेळीं सिप्सेलस आणि नंतर त्याचा मुलगा पेरीअँडर हे राज्यकर्ते होते. यांच्या आमदानींत कॉरिन्थनें ग्रीसच्या वायव्येकडील भागांत पुष्कळशा वसाहती केल्या. यावेळीं कॉरिन्थमध्यें निरनिराळीं कलाकुसरीचीं कामें होत असत. मातीचीं भांडीं आणि चित्रकला यांत कॉरिंथ सर्व यूरोपच्या पुढें होतें. भव्य देवळें आणि टोलेजंग इमारतींनीं शहराला फार शोभा आली होती.

पेरीअँडरच्यानंतर अल्पजनसत्तेला आरंभ होऊन व्यापारी धोरणाला प्रारंभ झाला व लष्करी नैपुण्याकडे दुर्लक्ष होऊं लागलें. इ. स. पूर्वी ४८० च्या युद्धांत कॉरिन्थनें अथेन्सला मदत केली व एजीनाला अथेन्स शह देऊं शकलें तें तरी कॉरिंथच्या मदतीमुळेंच होय. परंतु अथेन्सच्या वाढत्या वैभवाची धास्ती वाटून ४५९ त कॉरिन्थ अथेन्सवर उलटलें व पराभूत झालें. इ. स. पूर्वी ४३२ त स्पार्टाच्या मदतीनें पुनः अथेन्सनें कॉरिन्थवर चाल केली. इ. स. पूर्वी ३९५ त स्पार्टाच्या महत्वाकांक्षेमुळें पुन्हां कॉरिंथिअन युद्ध उपस्थित झालें. इ. स. पूर्वी २२४ या वर्षी कॉरिन्थ मॅसिडोनियाच्या ताब्यांत गेलें. परंतु ग्रीस ज्यावेळीं स्वतंत्र झालें ( इ. स. पूर्वी १९६ ) त्यावेळीं कॉरिंथदेखील स्वतंत्र होऊन त्याचें राजकीय आणि व्यापारी महत्व फिरून वाढलें. परंतु इ. स. पूर्वी १४६ व्या वर्षी रोमन सेनानायकांनीं कॉरिंथ येथील कलाकुसरीचा आणि सुन्दर वस्तूंचा निर्दयपणें नाश केला. ज्युलिअस सीझरच्या अंमलाखालीं कॉरिंथचा व्यापार पुन्हां वाढला. मोडकळीस आलेल्या इमारतींचा व स्मारकांचा जीर्णोद्धार करून हॅड्रिअन बादशहानें पुष्कळशीं नवीन बांधकामेंहि केलीं. इ. स. २६७ आणि ३९५ त गॉथ लोकांनीं कॉरिंथवर स्वाऱ्या केल्यामुळें या शहराला तटबंदी बांधण्यांत आली. १२१० त कॉरिंथ मोरिआला जोडण्यांत आलें. यापुढें कॉरिंथच्या इतिहासांत घडलेल्या मुख्य गोष्टी म्हटल्या म्हणजे तुर्कांची स्वारी ( १४५९ ) आणि मालटीज लोकांनीं केलेली स्वारी ( १६११ ) ह्या होत.

कॉरिंथमधील निरनिराळ्या जागा खणून काढून प्राचीन अवशेष उपलब्ध करण्याचें काम अमेरिकनांनीं रुफस बी. रीचर्डसन याच्या नेतृत्वाखालीं १८९६ त सुरू केलें. ज्याचा उल्लेख प्राचीन वाङ्मयांत नाहीं अशीं पुष्कळशीं स्मारकें सांपडलेलीं आहेत. पुष्कळशीं खोदकामेंहि ग्रीक सरकारनें मुद्दाम बांधलेल्या पदार्थसंग्रहालयांत संगृहीत केलेलीं आहेत. अर्वाचीन शहर प्राचीन शहराच्या ईशान्येस ३॥ मैलांवर १८५८ त वसलें. अथेन्स ( ५७ मैल ), पाट्रास ( ८० मैल ) व नौप्लिआ ( ४० मै. ) यांशीं आगगाडीनें हें जोडलेलें आहे. जलमार्गानेंहि दळणवळण चालतें. १८८३ त कॉरिन्थियन कालवा सुरू झाला. विनवियांचीं द्राक्षें, ऑलिव्ह तेल, रेशीम व धान्य येथून बाहेर जातें. लो. सं. ( १९०५ ) ४३००. [ ब्रिटानिका. अमेरिकन जर्नल ऑफ आर्किऑलाजी. ].

**कॉरेली, मेरी**—( १८६४–१९२४ ) या प्रसिद्ध आंग्ल कादंबरीलेखिकेचा जन्म इटालियन बाप व स्कॉटिश आई याच्या पोटीं सन १८६४ मध्यें झाला. ती लहान असतांनाच प्रसिद्ध पद्यलेखक व वर्तमानपत्रकार चार्लस मॅके यानें तिला दत्तक घेतलें होतें. मॅकेच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा एरिक यानें तिचें पालन केलें. चार्लस मॅके हा स्वतः गवई असल्यामुळें, आपल्या कृतककन्येनेंहि गायन शिकावें व गवयाचा धंदा करावा असें त्याच्या मनांत होतें. यासाठीं त्यानें एका फ्रेंच कॉन्व्हेंट ( मठ ) मध्यें तिला संगीतशिक्षणासाठीं ठेवलें. लहानपणींच तिला गाण्याच्या चालीवर पद्यें रचण्याचा नाद असे व तिनें तशीं पुष्कळ पद्येंहि केलीं होतीं. पण पद्यरचनेपेक्षां तिचा वर्तमानपत्रकारांच्या धंद्याकडे ओढा होता व तिनें आपल्या बापाच्या व त्याच्या इतर व्यवसायबंधूंच्या पत्रांतून आपले लेख लिहिण्यास सुरुवात केली होती. अकरा, बारा वर्षे वयाला होण्यापूर्वींच स्कॉट, थॅकरे, डिकन्स इत्यादि कादंबरीकारांच्या कादंबऱ्या तिनें वाचून टाकल्या होत्या. शेले, बायरन व कीट्स या प्रसिद्ध आंग्लकवींच्या कवितांचेंहि तिनें अध्ययन केलें. बायबल व शेक्सपियर यांवर तिची फार भक्ति होती व तिच्या कादंबऱ्यांमध्यें गूढ व अद्भुत कल्पनांची जी छटा दिसून येते त्याचें कारण तिचा बायबलचा खोल अभ्यास होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

सन १८८६ मध्यें तिनें 'ए रोमान्स ऑफ टू वर्ल्ड्स' ही पहिली कादंबरी प्रसिद्ध केली. या कादंबरींत तिचा अद्भुतावर सारा भर आहे. या कादंबरीवर पुष्कळच प्रतिकूल चर्चा प्रसिद्ध झाली. पण तिनें तिकडे लक्ष्य न देतां आपला कादंबरीलेखनाचा व्यवसाय मरेतोंपर्यंत अव्याहत चालू ठेवला. या कादंबरीवर जरी विरुद्ध अभिप्राय पडले होते तरी तिचा खप पुष्कळच झाला व त्यामुळें अशाच धर्तीच्या कादंबऱ्या लिहिण्याचें तिनें मनावर घेतलें. १८८७ सालीं तिनें 'थेल्मा' नांवाची कादंबरी लिहिली. यानंतर 'अर्डाथ' ( १८८९ ), 'दि सोल ऑफ लिलिथ' ( १८९२ ), 'बॅराब्बास' ( १८९३ ), 'दि सॉरोज ऑफ सेटन' ( १८९५ ), 'दि माइटी ॲटम' ( १८९६ ), 'दि मास्टर ख्रिश्चन' ( १९०० ). 'टेंपोरल पॉवर' ( १९०२ ), 'व्हेंडेट्टा' 'झिस्का', 'लव्ह लँड, दि फिलॉसॉफर' इत्यादि कादंबऱ्या लिहिल्या. यांतल्या त्यांत, 'थेल्मा', 'टेंपोरल पॉवर'. 'सॉरोज ऑफ सेटन' या तिच्या कादंबऱ्या फार प्रसिद्ध आहेत.

आपल्या कादंबऱ्यांनां चित्ताकर्षक नांवें देण्यांत ती पटाइत होती. प्रत्येक कादंबरींत कोणत्या तरी तत्वाचें उद्घाटन करावयाचें असा तिचा क्रम असे. जगताचें आदिकारण ' प्रचंड मरमाणू ' नसून, कोणी तरी अतर्क्य शक्तीचा परमेश्वर आहे हें तत्व ' माइटी ॲटम ' या कादंबरींत तिनें विशद रीतीनें मांडलें आहे. 'वर्मवुड' ही कादंबरी दारूपासून किती अनर्थ होतात हें दाखविण्यासाठीं लिहिली आहे. धर्माची समाजाला किती आवश्यकता आहे याचें सुंदर चित्र ' मास्टर ख्रिश्चन ' या कादंबरींत तिनें रेखाटलेलें आढळतें.

वाङ्मयदृष्ट्या मेरी कॉरेलीच्या कादंबऱ्यांनां पहिल्या दर्जाचें स्थान मिळणार नाहीं हें खरें; पण तिच्या कादंबऱ्यांनां जितकी लोकप्रियता मिळाली तितकी फारच थोड्या लेखकांनां मिळाली असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. व्हिक्टोरिया महाराणीला तिच्या कादंबऱ्या फार आवडत असत, व या समजुतीमुळें पुष्कळ लोक तिच्या कादंबऱ्या विकत घेऊन वाचीत असत असें म्हणतात. इंग्लंडमधील वराचसा समाज तिच्या कादंबऱ्यांचा तिटकारा करीत असे. तथापि तिनें या गोष्टीची बिलकुल पर्वा न करतां तत्कालीन इंग्लिश समाजांतील व्यंगें चव्हाट्यावर मांडण्याचा सपाटा चालविला. ग्लॅडस्टन, टेनिसन यांच्याकडून तिनें शाबासकी मिळविली. तिची भाषा आवेशयुक्त पण सुंदर असे. बुद्धीची कल्पकता व अद्भुताची आवड हे गुण तिच्या कादंबऱ्यांत मुख्यत्वेंकरून दिसून येतात.

आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस तिनें शेक्सपियरच्या निवासामुळें पवित्र झालेल्या ' स्ट्रॅटफोर्ड ऑन ॲव्हन ' या ठिकाणीं घालविले. तत्कालीन स्त्रीसमाजांत तिला फार मान मिळत असे. गरीब लोकांच्याविषयीं तिला फार कळकळ वाटत असे व तिच्या कादंबऱ्यांत ही कळकळ जागोजागीं व्यक्त होते. ती १९२४ च्या एप्रिल महिन्याच्या २१ साव्या तारखेस वारली.

**कारेवक्कल**—शेतकरी जात. लोकसंख्या (१९११) १०,६४१. अंकोला तालुक्यांतील जंगली भाग, खेडीं व कानडा जिल्ह्यांतील जंगली प्रदेश यांमध्यें हे लोक आहेत. ते इतर वक्कल लोकांहून काळे असल्यानें यांनां कारे वक्कल म्हणतात. बहुतेकांची भाषा कानडी आहे. वृक्ष व प्राणी यांच्या देवकांवरून यांचे सात पोटवर्ग पडले आहेत. हे आपल्या जातिनामाच्या वृक्षाला किंवा प्राण्याला इजा करीत नाहींत. चालीरीती, संस्कार व धर्म हीं हालवक्की वक्कलांप्रमाणेंच आहेत. यांच्या प्रदेशाचे १२ शिमे (तुकडे) पाडलेले असून प्रत्येक तुकड्यावर एक शिमेगौडा हा अधिकारी असतो. याशिवाय प्रत्येक खेड्यांत एक 'ग्रामगौडा' किंवा 'बुधवंत' नेमलेला असतो. ग्रामगौडाला कांहीं रकमेपर्यंत दंड करण्याचा अधिकार आहे. परंतु शिमेगौडाला त्याच्या मर्जीप्रमाणें दंड करतां येतो. बहुपत्नीत्व व पुनर्विवाह ज्ञातीला मान्य आहे. पण बहुपतित्व नाहीं. तिरुपतीचा व्यंकटराम हुलिदेव ( व्याघ्रदेवता ), शिवेगुळीचा कारिदेव, गांवातील अम्मा किंवा शक्ति यांची हे उपासना करतात. मृतांनां जाळतात किंवा पुरतात. कारेवक्कल मद्यमांसाशन करतात. [ सेन्सस रिपोर्ट १९११ (मुंबई). एन्थोवेन ].

**कारैकुडी**—मद्रास इलाख्यातील रामनद जिल्ह्यामधील तिरुप्पत्तूर तहसिलींतील एक गांव. लोकसंख्या (१९११) १४,६४८. या गांवांतील नाट्टू कोट्टई चेट्टी नांवाचे सावकार व व्यापारी लोक प्रसिद्ध आहेत. त्यांनीं बांधलेल्या सुंदर घरांमुळें गांवाची शोभा वाढली आहे.

**कारोमान्डल किनारा**—मद्रास इलाख्याचा पूर्वकिनारा. हा इतिहासांतरीं व सरकारी कागदपत्रांत 'कारोमान्डल' ह्या नांवानें संबोधला जात आहे. ह्या नांवाचा कांहीं एक विशिष्ट अर्थ नसून आजकाल त्याचा फारसा उपयोगहि करीत नाहींत.

हा शब्द मूळ कसा प्रचारांत आला व ह्याचा अर्थ कोणता समजला जात असावा, ह्यावद्दल तज्ज्ञांत मोठा वाद असून हा शब्द 'चोलमन्डलम्' म्हणजे चोलांचा प्रदेश ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा, असा एक तर्क आहे.

**कॉर्क**— आयर्लंडांतील कार्क शहर हें कार्क परगण्याचें मुख्य शहर असून डब्लीनच्या नैर्ऋत्येस ली नदीच्या कांठीं असून फार रमणीय आहे. येथें प्रॉटेस्टंट लोकांचें एक ख्रिस्ती देवालय आहे. याशिवाय येथें दुसरींहि अनेक देवालयें आहेत. याच्या मध्यभागीं फादर मॅथ्यूचा पुतळा आहे. येथें १८४९ त स्थापलेलें क्वीन्स कॉलेज नांवाचें विद्यालय व एक सुंदर न्यायमंदिर आहे. या शहराच्या पश्चिमेस मार्डाईक नांवाचें सहल करण्याचें एक रमणीय स्थल असून पूर्वेस सुंदर मॅरिना परेड आहे. याच्या आग्नेयीस शर्यती खेळण्याचा रमणबाग असून ईशान्येस लष्करी छावण्या आहेत. येथील मुख्य उद्योगधंदे म्हटले म्हणजे चामडें कमाविणें, मद्य काढणें व शुद्ध करणें, लोखंड गाळणें, लोकरीचीं वस्त्रें विणणें व रासायनिक द्रव्यें तयार करणें हे होत. येथें लोणी, खाद्यपदार्थ, कातडीं, गुरेंढोरें, अंडीं वगैरे जिनसांचा व्यापार चालतो. या बंदरांत भरतीच्या वेळेस ३६ व ओहटीच्या वेळेस १३ फूट पाणी असून तेथून १००० टनाचीं जहाजें जाऊं येऊं शकतात. हें आयर्लंडांतील तिसरें व्यापारी शहर आहे. या शहरास संयुक्त पार्लमेंटकरितां दोन सभासद निवडण्याचा हक्क होता. ७ व्या शतकांत येथें सेंट फिन्बार यानें एक मठ स्थापन केला. पुढें लवकरच या मठाभोंवती लोकांची वसाहत झाली असावी. ९ व्या शतकांत डेन लोकांनीं हें शहर लुटून तेली बेटावर जाऊन राहिले व तेथें यांची नवीनच वसाहत झाली. १६४९ त या शहरानें राष्ट्रांतील यादवीच्या वेळेस पहिला चार्लसचा पक्ष उचलिला होता पण पुढें लवकरच याला क्रॉम्वेल यास शरण जावें लागलें. १६९० त यानें दुसऱ्या जेम्सचा पक्ष उचलिला व याहि वेळेस मार्लबरोच्या सैन्यापुढें याला हार

खावी लागली. या शहराचें क्षेत्रफळ २२६६ एकर असून लोकसंख्या ८०००० आहे.

बंदर.—हें ली नदीच्या मुखावर असून चोहों-बाजूनीं तें जमिनीनें घेरलेलें आहे. हें इतकें विस्तृत आहे कीं, यांत सर्व इंग्रजी आरमार मावूं शकतें. या बंदराचा महासागरावरील क्वीन्स टाऊन भाग ग्रेट आयलंड या बेटावर आहे. या बंदराच्या दक्षिणभागास क्वीन्सटाऊन म्हणतात. याचा विस्तार पूर्वपश्चिम असून याच्याजवळच स्पाईक बेट आहे. येथें पूर्वी गुन्हेगार लोकांस पाठवीत असत. याशिवाय याच्या शेजारील रॉकी आयलंड बेटावर दारूगोळ्याचा सांठा आहे. हें बंदर ५ मैल लांब व २ मैल रुंद असून येथील समुद्राची खाडी २ मैल लांब व १ मैल रुंद आहे.

**कार्डिफ**—इंग्लंडमधील ग्लॅमोर्गनशायर परगण्याचें मुख्य शहर. या शहरांतून पार्लमेंटांत तीन प्रतिनिधी जातात. हें एक चांगलें बंदर असून व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. लंडनहून हें शहर १४५ मैलांवर आहे. कार्डिफ येथें टॅफ व्हेल, रिम्नेव ग्रेटवेस्टर्न या रेल्वेचे रस्ते येऊन मिळतात. १७९४ सालीं कार्डिफपासून मेर्थिर टिडफिलपर्यंत "ग्लॅमोर्गनशायर कालवा" उघडला गेला. १९ साव्या शतकांत कार्डिफ परगण्यांतील लोकसंख्या विलक्षण वाढली होती. पण १९२१ मध्यें ती २,१९,६४३ भरली.

येथें १८८३ मध्यें युनिव्हर्सिटी कॉलेज स्थापिलें गेलें. या संस्थेंत शास्त्रें, शिल्पकला, आरोग्यशास्त्र, वैद्यकशास्त्र इत्यादि निरनिराळ्या विषयांचें शिक्षण दिलें जातें. या विद्यापीठाच्या ग्रंथसंग्रहालयांत वेल्सच्या इतिहासासंबंधीं पुष्कळ पुस्तकें आहेत. "अबरडेअर हॉल" या इमारतींत विद्यार्थिनींची रहाण्याची सोय आहे.

कार्डिफ येथील सार्वजनिक वाचनालय व अजवखाना य संस्था १८८२ सालीं स्थापिल्या गेल्या. वाचनालयामधील ग्रंथसंग्रह फार मोठा असून त्यामध्यें केल्टिक वाङ्मय व वेल्सचा इतिहास यासंबंधीं पुष्कळ पुस्तकें, हस्तलिखित ग्रंथ व कागदपत्र आहेत. अजवखान्यांत प्रस्तरावशेष, वेल्समधील पक्षी, घरगुती हत्यारें, धातूंच्या व हस्तिदंताच्या कामाचे नमुने इत्यादि जिनसा आहेत. त्याचप्रमाणें यूरोपमधील चित्रकलापारंगत लोकांनीं काढलेल्या २७ तजविरी येथें ठेवण्यांत आल्या आहेत.

अनाथगृहें, दवाखाने, भाजीबाजार मूक व अंधविद्यालयें, औद्योगिक शाळा, नार्मलस्कुलें इत्यादि इतर सार्वजनिक इमारती पहाण्याजोग्या आहेत.

कार्डिफ शहरांतील रस्ते रुंद व मोठाले असून त्यांवर दोन्ही बाजूंनीं झाडें आहेत. टाफ या नदीवर दान पूल आहेत.

१५३५ सालीं कार्डिफ शहराला पार्लमेंटांत एक प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क मिळाला. १८३२ सालापासून कार्डिफ परगण्यांत कौब्रिज व लॅंट्रिसंट यांचा समावेश झाल्यामुळें कार्डिफमधून पार्लमेंटांत दोन प्रतिनिधी जाऊं लागले.

व्यापार व कारखाने.—दुसऱ्या एडवर्डच्या राज्यांत कार्डिफ हें व्यापाराचें व जलमार्गानें परदेशीं माल पाठविण्याचें मुख्य ठिकाण होतें. एलिझाबेथ व पहिला जेम्स यांच्या वेळेस कार्डिफ हें चांचे लोकांचें ठाणें झालें होतें. कोळशाच्या व्यापारामुळें कार्डिफ शहर फार भरभराटीस आलें आहे. येथें मोठमोठ्या गोद्या आहेत. या शहरांतील निर्गतीपेक्षां आयातीचें प्रमाण फार कमी आहे. १९०६ सालीं एकंदर निर्गत ८७,६७,५०२ टन होती. त्यापैकीं पुष्कळशी निर्गत कोळशाचीच होती. आयात २१,०८,१३३ टन होती. कोळशांच्या निर्गतींत कार्डिफ बंदराचा सर्व जगांतील बंदरांत पहिला नंबर लागतो.

कोळशाच्या व लोखंडाच्या व्यापाराखेरीज कार्डिफ येथें कागद, कापड, यंत्रें, भांडीं, टिन व एनॅमलचीं कामें इत्यादि करण्याचे कारखाने पुष्कळ आहेत. कार्डिफ येथें दोन साप्ताहिकें व चार दैनिकें निघतात.

इतिहास:—१८८९ सालीं कार्डिफ शहरांत जुन्या अवशेषांचा शोध लागला. त्यावरून रोमन लोकांनीं पूर्वी या शहरीं वस्ती केली असावी असें समजतें. नॉर्मन लोकांनीं कार्डिफ परगणा जिंकल्यावर या परगण्याची जहागिरी १५५० पर्यंत परंपरागत चालत आली.

कार्डिफला म्युनिसिपालिटीचे हक्क पहिल्यानें ११४७ च्या सुमारास मिळाले. कार्डिफ शहराला सर्वांत महत्वाची सनद १३४० सालीं मिळाली. या सनदेमुळें कार्डिफ येथील व्यापाराला चांगलें उत्तेजन मिळालें. सांप्रतचें कार्डिफ शहर बनविण्याचे पहिले प्रयत्न १७७४ सालीं सुरु झाले. या वेळेपासून कार्डिफ शहर उत्तरोत्तर वाढत आहे.

ख्रिस्टोफर लव्ह, विल्यम एरबरी, वॉल्टर क्रॅडॉक हे प्रसिद्ध पुरुष कार्डिफ येथें जन्मले होते.

**कार्तवीर्य**—हैहयाधिपति कृतवीर्याचा पुत्र. याचें नांव अर्जुन किंवा ( सहस्रबाहू असल्यानें ) सहस्रार्जुन होतें. हा अनुपदेशावर राज्य करीत असे. याची राजधानी माहिष्मती होती. दत्तात्रेयाच्या प्रसादानें त्याला सहस्र हस्त व सुवर्णमय रथ यांची प्राप्ति झाली होती. पृथ्वीवरचे सर्व प्राणी त्याच्या अंकित असत. त्याच्या रथाची गति कोठेंहि कुंठित होत नसे. रावणास तर यानें ललिनें पराजित केलें होतें. दत्ताच्या वरप्रसादानें त्याच्या हातून कांहीं पाप होत नसे. यानें ८५,००० वर्षे पृथ्वीचें उत्तम प्रकारें राज्य केलें.

एकदां जमदग्नीच्या आश्रमांत जाऊन कार्तवीर्यानें त्याच्या होमधेनूचें वांसरू हरण करून आश्रमाचा नाश केला. तेव्हां जमदग्निपुत्र भार्गवरामानें त्याच्याशीं युद्ध करून त्याचे हजार हात तोडिले व त्यास ठार मारलें. कार्तवीर्याचें वर्तन वाईट होतें असें एके ठिकाणीं दाखविलें आहे. असें असेल तर जमदग्नीशीं त्यानें केलेली दांडगाई त्याच्या स्वभावानुरूप होती असें म्हणतां

येईल. तो फार दुष्ट होता, त्यानें देव, ऋषि, यक्ष व मानव यांनां जेव्हां अतिशय त्रास दिला तेव्हां ते सर्व विष्णूकडे गेले. विष्णूनें परशुराम अवतार घेऊन कार्तवीर्याला मारिलें. ( महाभारत, वनपर्व अ. ११५—११७ ) विष्णुपुराण व वायुपुराण ( अ. ९४ )यांतहि कार्तवीर्य कथा सांपडेल.

**कार्तागो**—मध्यअमेरिका. कोस्टारिकाच्या कार्तागो प्रांताची राजधानी. लोकसंख्या ( १९०० )४५३६. हें शहर सॅन जोसेच्या सुपीक व सुंदर पठारावर समुद्रसपाटीपासून ४९३० फूट उंचीवर असून इराझु ज्वालामुखीच्या दक्षिणेकडील पायथ्याशीं आहे. येथील जुनीं धर्ममंदिरें विशेष प्रेक्षणीय आहेत. ज्वालामुखीच्या स्फोटानें ह्या शहराचें बरेंच नुकसान झालें आहे. जवळच तीन मैलांवर बेला व्हिस्टा येथें ऊन पाण्याचे झरे आहेत. येथें मुख्यत्वेंकरून कॉफीचा व्यापार चालतो. हें १५२२ त अस्तित्वांत होतें असें ह्मणतात. १८२३पर्यंत हें राजधानीचें शहर होतें परंतु सॅन जोसे ही राजधानी झाल्यामुळें ह्याचें महत्व कमी झालें.

**कार्तिकस्वामी**—मद्रास इलाख्यांत सोंडुरपासून कार्तिकस्वामीचें स्थान तीन कोसांवर आहे. पुढें लोहाचल पर्वत चढावा लागतो म्हणून वैलगाड्यांचा उपयोग नाहीं. त्या पर्वतावर स्त्रिया जात नाहींत. मार्गांत एक शिवस्थान लागतें त्या देवापुढें शिवतीर्थ आहे.

स्वामी कार्तिकाचें दर्शन कृत्तिकायोग आहे तोंपर्यंत सर्वांस झालें पाहिजे, ह्मणून त्यावेळीं मोठी यात्रा लोटते. स्वामीकार्तिकाची मूर्ति काळ्या पाषाणाचीच पण फार सुंदर आहे. तिला मुख एकच आहे. खालीं क्रौंच पक्षी असून मूर्ति उभी बारा वर्षांच्या मुला इतकी उंच आहे. मूर्तीवर बाल्यावस्था दिसते. मध्यभागीं स्वामीचें मंदीर असून उजव्या बाजूस शिवमंदीर व डाव्या बाजूस पार्वतीचें मंदीर आहे. लोहाचल पर्वतावर कपटस्वामी, मयूरस्वामी, गुप्तस्वामी, कार्तिकस्वामी व इतर दोन, अशीं सहा स्थानें आहेत. कांहीं स्थलें पर्वतावर अतिविकट ठिकाणीं असल्यामुळें त्या सर्वांचें दर्शन होत नाहीं.

ज्या स्थलीं कार्तिकेयानें मातेचें पान केलेलें दुग्ध तोंडांत राहूं नये ह्मणून ओकून टाकिलें त्याचें तेथें पांढरें भस्म झालें; तें अद्याप दाखवितात. त्या भस्माचें धारण करण्याविषयीं क्षेत्रमाहात्म्यांत फार प्रशंसा लिहिली आहे. दूध ओकण्याच्या जागीं मोठाली पेवें केलेलीं आहेत. त्या पेवांत दगड टाकितात. तीन वर्षांनीं कृत्तिकायोगांत यात्रा जमते, तेव्हां तीं पेवें उकरतात. त्याकाळीं आंत टाकिलेल्या दगडांचें भस्म होऊन मोठाले खडे निघतात असें सांगतात. बायका तें भस्म लहान मुलांस कांहीं रोगांवर औषध ह्मणून देतात. कार्तिकेयानें जेथें काजळ टाकिलें तेथें खाण असून तींत काळे खडे आहेत. ते यात्रेकरूंस दाखवितात.

अगस्तीनें स्नानाकरितां येथें जें तीर्थ निर्माण केलें त्यास अगस्तितीर्थ ह्मणतात. तेथें तीर्थासन्निध अगस्तीश्वर व लोपामुद्रेश्वर अशीं दोन शिवलिंगें आहेत. त्याक्षेत्रीं मुख्य तीर्थ हेंच आहे. मुख्य देवळांत कांहीं शिलालेख आहेत.

शेवटचे बाजीराव पेशवे हे दोन वेळ या क्षेत्रीं कृत्तिका योगीं स्वामीदर्शनास गेले होते. त्यांत दुसऱ्या वेळीं अगस्ति. तीर्थीं स्नान करून ते संध्या करीत बसले असतां पर्वतशिखरावरून एक मोठा दगड ढासळून बाजीरावसाहेब होते त्याच्या सन्निध येऊन पडला. तेव्हां तेथून ते लागलेच कूच करून चालते झाले. त्यावर पुन्हां ते त्या क्षेत्रीं गेले नाहींत. तो दगड अगस्तितीर्थावर अद्यापि पडला आहे. त्यास बाजीरावाचा धोंडा असें म्हणतात. [ तीर्थयात्राप्रबंध ]

**कार्तिकेय**—देवांचा सेनानी. याला स्कंद असेंहि नांव आहे. कोठेंकोठें यास अयोनिसंभव शिव ( रुद्र ) पुत्र म्हटलें आहे. शिवाचें रेत अग्नि व गंगा यांनीं धारण केलें, व याला जन्म दिला. म्हणून याला अग्निभू, गंगात्मज अशीं विशेषणें लावितात. महाभारतांत अंगिरामुनीच्या शिवा नामक भार्येशीं अग्नीचा संयोग होऊन कार्तिकेय झाला. याचें देवसेनेशीं लग्न लागलें, वगैरे विलक्षण कथा दिली आहे ( वनपर्व अ. २२४—२३२ ). अग्नीचें वीर्य स्कन्न पावलें म्हणून याला स्कंद म्हणतात. सहा कृत्तिकांपैकीं प्रत्येकीपासून यास दोन हात व एक मुख मिळालें. याच्या या आकृतीवरून यास षडानन किंवा षण्मुख म्हणतात. परवाणी नांवाच्या मोरावर बसून एका हातांत धनुष्य व दुसऱ्या हातांत बाण घेतलेला असा कार्तिकेय प्रतिमेंत दाखवितात. देवांनां भारी झालेल्या तारकासुराला मारण्यासाठीं याचा जन्म होता असें कांहीं पुराणांतून सांगितलें आहे. याची नामावलि वनपर्वाच्या २३२ व्या अध्यायांत दिली आहे. कालिदासाच्या कुमारसंभवांत कार्तिकेयजन्मकथा आहे.

स्त्रियांनीं कार्तिकेयाचें दर्शन घ्यावयाचें नाहीं याच्या मुळाशीं एक पौराणिक कथा आढळते. मारुतीचें दर्शन तो ब्रह्मचारी असूनहि स्त्रिया घेतात. कौमारी किंवा सेना या नांवाची त्याला बायको होती असें कांहीं ठिकाणीं आढळतें तर दुसऱ्या कांहीं ठिकाणीं तो चिरब्रह्मचारी असून स्त्रियांचें कधीं तोंडहि पाहावयाचें नाहीं अशी त्यानें प्रतिज्ञा केली होती असें लिहिलें आहे. कार्तिकेयाच्या कांहीं प्राचीन मूर्ती संशोधिल्या गेल्या असून त्याचीं देवळेंहि हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं आहेत. (' कार्तिकस्वामी ' पहा )

**कार्थेज**—कार्थेज हें आफ्रिकेच्या उत्तरकिनाऱ्यावरील अति प्राचीन व प्रसिद्ध शहरांपैकीं एक शहर होतें. फिनिशियन लोकांनीं हें शहर ख्रि. पू. ८२२ मध्यें वसविलें. परंतु रोमन लोकांनीं ख्रि. पू. १४६ त याचा नाश केला. त्यांनींच पुन्हां हें शहर वसविलें. तें अखेरीस अरबांनीं इ. स. ६९८ त कायमचेंच पाडून टाकिलें. फिनिशियन भाषेंत याचा अर्थ ' नवें शहर ' असा होतो. सायनस युटीसेन्सीस ( आधुनिक-ट्युनीसचें आखात ) याच्या मध्यभागीं हें

असून याच्या पश्चिमेस ॲपोलो भूशीर ( आधुनिक रासअली एल मेक्की ) व पूर्वेस मर्क्युरी अथवा केप बॉन ( आधुनिक रास अद्दार ) आहेत. केप गॅमार्ट, सिद्दी बुसैद खेडें ( हें टेंकडीवर असून याची उंची ४९० फूट आहे ) व गोलेटाबंदर हीं तीन मिळून कार्थेजची त्रिकोणाकृति सरहद्द होते. केप गॅमार्टवर मुख्य स्मशानभूमि होती. वालेकिल्ला बिर्साच्या टेकडीवर ( सध्यां येथें एक मठ व प्रार्थनामंदीर आहे ) होता. बिर्साच्या दक्षिणेस कांहीं अंतरावर बंदरें होतीं. गॅमार्ट व गोलेटा यांमधील अंतर ६ मैल होतें.

टयुनीसच्या आखाताच्या दुसऱ्या बाजूस पर्वताची एक उंच ओळ असून येथें रोम व कार्थेज, आणि रोम व व्हॅन्डाल यांच्यामधील निकराच्या लढाया झाल्या. यांपैकीं कित्येक ठिकाणीं जुने अवशेष पुष्कळ आहेत. बिर्साच्या भोंवतीं व मैदानांत जिकडे तिकडे जवांचीं शेतें व द्राक्षांचे मळे दृष्टीस पडतात. कार्थेजमुळें आसपासच्या समुद्रावर व जमीनीवरील बऱ्याचशा प्रदेशावर नजर ठेवतां येते.

येथील प्राचीन बंदरें लष्करी व व्यापारी अशा दोन्ही सोयीचीं असत. याशिवाय मालउतारासाठीं किनाऱ्यावर एक मोठा धक्का असे. लष्करी बंदर कोथोन याचा संबंध व्यापारी बंदराशीं एका कालव्यानें जोडला होता. बंदरांत २२० गलबतें राहण्याची सोय होती. त्याच्या मध्यभागीं एक अगदीं लहान बेट असून तेथून बंदरांतील सर्व आरमाराची पहाणी करतां येई.

येथील अवशेषांत घोडदौडीचें ठिकाण, एक मैदान, प्रतिनिधिसभागृह, सराफकट्टा, अपोलोचें मंदीर, न्यायसभा व थिओडोरसचें स्नानगृह वगैरे अवशेष आढळतात. सेंट लुईच्या टेंकडीवर प्राचीन वालेकिल्ला बिर्सा असून कांहीं ठिकाणीं त्यावर तटबंदीच्या रांगा होत्या. हा किल्ला पुन्हां पाडला व बांधला गेला आहे. या पठारावर सर्वांत प्राचीन ( प्युनिक ) कबरी व मोठाले हौद, एशमुन ह्या प्रसिद्ध मंदिराचा पाया व रोमन सुभेदाराचा राजवाडा यांचे अवशेष सांपडले.

लामाल्गा स्टेशनपासून कांहीं अंतरावर एक नाटकगृह, चार स्मशानें व मायव्येस इद्रिसी नांवाच्या अरबी भूगोलज्ञाच्या वेळेचे ( २४ पैकीं ) १४ हौदांचे अवशेष आढळतात.

पेटिट सेमिनेर टेंकडीवर एक ख्रिस्ती मंदिर, गार्गिलीयसचे हमामखाने व कांहीं मोठ्या कबरी पडक्या स्थितींत आढळतात. डर्मेशे भागांत ॲंटोनियसचे हमामखाने, डुईमेसमध्यें एक संगमरवरी दगडाचा ( रोमनकाळचा ) राजवाडा, कांहीं मोठीं पाण्याचीं टांकीं, बोर्ज किल्ल्याच्या पलीकडे पठारावर एक नाटकगृह व ( रोमनकाळांतील ) बरेचसे संगमरवरी पुतळे सांपडले. येथील महत्वाचा अवशेष म्हणजे रोमन कालव्याचा होय. हा सुमारें ५६ मैल लांब होता.

कार्थेज येथील अवशेषांच्या शास्त्रीय शोधास १८३३ पासून सुरुवात झाली. सर्व संशोधकांत डेलट्रे याचे शोध फार महत्वाचे आहेत.

**इ ति हा स.**—कार्थेजच्या इतिहासाचे चार भाग पडतात. ( १ ) स्थापनेपासून ख्रि. पू. ५५० त झालेल्या सिसिलीयन ग्रीकांबरोबरच्या युद्धापर्यंत; ( २ ) ५५० पासून २६५ म्हणजे प्युनिक युद्धाच्या सुरुवातीपर्यंत; ( ३ ) प्यूनिक युद्धापासून कार्थेजचा पाडाव होईपर्यंत ( ख्रि. पू १४६ ); ( ४ )रोमन व बायझन्टाईन अंमलापासून अरबांनीं इ. स. ६९८ त याचा नाश करीपर्यंत.

**स्था प ने पा सू न ख्रि. पू ५५० प र्यं त चा का ळ.**—अतिप्राचीन काळापासून फिनिशियन दर्यावर्दी आफ्रिकेच्या किनाऱ्यावर जात असत व तेथील लिबियन लोकांशीं मालाची देवघेव करीत. ख्रि. पू. १६ व्या शतकांत किनाऱ्यावर सिडोनियन लोकांच्या वखारी होत्या. त्यांपैकीं कंबे येथील वखारीच्याच जागीं पुढें कार्थेज वसलें. बोर्जे जेदिदजवळ या वसाहतीच्या बऱ्याच खाणाखुणा सांपडल्या आहेत.कार्थेजची स्थापना ख्रि.पू.८५०त टीरियन लोकांनीं केली असें दंतकथेवरून कळतें. या लोकांत टीरीयन राजाची कन्या एलिसा ही मुख्य असून तीं आपल्या भावाच्या गांजणुकीनें त्रासून येथें पळून आली. या नवीन लोकांनीं जमीन विकत घेऊन त्यावर शहर बांधण्याचें ठरविलें. एलिसानें बैलाच्या कातड्याइतकी जमीन मागितली व ती लीबियन राजानें देण्याचें कबूल केलें. नंतर तिनें त्या कातड्याच्या बारीक वाद्या काढल्या व त्या एकीस एक बांधून इतक्या मोठ्या केल्या कीं, त्यांनीं सबंध टेंकडी व्यापिली आणि कार्थेज वसविलें. एलिसानें हें केल्याबद्दल टायर देशांतील एका देवळास कार्थेजचें लोक पुढें वरींच वर्षें दरसाल देणगी पाठवीत असत. तसेच एलिसा उर्फ डिडोचें चित्र रोमन साम्राज्याच्या वेळीं नाण्यावर कोरीत असत.

कार्थेजचा प्राचीन इतिहास उपलब्ध नसून ६ व्या शतकाच्या पुढील उपलब्ध होतो. या वेळीं या शहराला राजधानीचें पूर्ण वैभव प्राप्त झालें होतें. शहराचे ब्युगिटाना बायझांशियम व सौदागर पेठ असे तीन मोठमोठे भाग पडले होते. प्रांताच्या सरहद्दी ठरविण्यावरून येथील लोकांचें व ग्रीकांचें पाहिलें भांडण झालें

पुढें ६ व्या शतकांत टायरचा नाश झाल्यावर भूमध्यसमुद्रावर अर्थातच कार्थेजचें वर्चस्व बसलें. ग्रीकांच्या विरुद्ध स्पेन व सिसिलीमधील टायर व सिडॉन वसाहतवाल्यांनीं कार्थेजची मदत मागितली. त्यावेळेपासून वर सांगितल्याप्रमाणें कार्थेज हें भूमध्यसमुद्राचें नाक बनलें. याप्रमाणें सिसिलींतल्या वसाहतींनां कार्थेजवाल्यांनीं अडथळा करून आपल्या स्वतःच्या वसाहती तेथें व स्पेन आणि आसपासची

बेटें यांत केल्यामुळें त्यांचा परिणाम म्हणून अखेरीस ख्रि. पू. ५५० च्या सुमारास या दोघां ( ग्रीक व कार्थेज ) मध्यें युद्ध सुरू झालें.

ग्री कां च्या ब रो ब र झा ले लीं यु द्धें:— प्रथम ख्रि. पू. ५५० त कार्थेजवाल्यांनीं बहुतेक सिसिली प्रांत जिंकून तेथून ग्रीकांनां हांकून लाविलें. या लढाईत कार्थेजवाल्यांच्या एका मलकस नांवाच्या सेनापतीनें कसूर केल्यामुळें त्यांनीं त्याला हद्दपार केलें असतां, त्यानें या गोष्टीचा सूड घेण्याची प्रतिज्ञा करून कार्थेजला वेढा दिला व स्वतःच्या मुलाचा बळी देऊन शहर सर केलें. नंतर बरेच दिवस त्यानें शहराचा कारभार केला. परंतु अखेरीस त्याच्याच पक्षाच्या लोकांनीं त्याला ठार केलें.त्याच्या नंतर मॅगो हा कार्थेजचा सुभेदार झाला. हाच कार्थेजच्या खऱ्या लष्करी सत्तेचा उत्पादक होय. यानें सार्डिनिया वगैरे बेटें जिंकून कार्थेजची सत्ता इतकी वाढविली कीं, सिसिली व इटालींतील वसाहतवाल्यांवर त्यानें व्यापारी तहनामे लादले. कार्थेज व रोममधील पहिला तहनामा ख्रि. पू. ५०९ मध्यें झाला. त्यांत इटली रोमन लोकांच्या कडे राहून आफ्रिकेचा किनारा कार्थेजच्या ताब्यांत राहिला. सिसिली तटस्थ समजण्यांत आलें. मॅगोनेंतर त्याचा मुलगा हस्ड्रूबल हा सुभेदार झाला. तो ख्रि. पू.४८५च्या सुमारास मरण पावल्यावर त्याचा भाऊ हॅमिलकार यानें सिसिली जिंकण्यासाठीं २०० जहाजांचें आरमार तयार करून स्वारी केली. परंतु ख्रि. पू. ४८० मध्यें हिमेरा येथें त्याचा पराभव झाला व दीड लक्ष कार्थेजियन शत्रूच्या हातीं लागले.

हस्ड्रूबल याला हॅनिबॉल हस्ड्रुबल व सॅफो आणि हॅमिलकारला हिमिलको, हॅनो, व गिस्को अशी मुलें होतीं. हे सर्व पुरुष पुढें मोठमोठ्या अधिकारावर चढले होते; हॅनोनें ४६० मध्यें पश्चिम आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील हल्लींच्या सेनेगाल व गिनी आणि मदिरा व कॅनरी या प्रदेशांत वसाहती स्थापन केल्या.

सिसिलींतलि युद्ध १०० वर्षेंपर्यंत चाललें होतें. ४०६ त हॅनिबॉल यानें ॲग्रिजेन्टमचा नाश करून या स्थळास वेढा दिला असतां, तिकडे कार्थेजमध्यें भयंकर प्लेग सुरू झाला व य दवी माजली त्यामुळें व शत्रूनें जोर धरल्यामुळें हॅनिबालला मागें हटावें लागलें.

पुढें ६६ वर्षांनीं हॅनो नांवाच्या एका कार्थेजच्या सरदारानें बंडाचा प्रयत्न केला परंतु तो फसला. मात्र या यादवीचा फायदा घेऊन सिसिलीच्या तत्कालीन सुभेदारानें कार्थेजवाल्यांचा चांगलाच पराभव केला. त्या वेळीं त्या दोघांत तह झाला; पण तो फार दिवस टिकला नाहीं. तीस वर्षांनंतर बोमिलकार नांवाच्या एका कार्थेजवाल्यानें खूळ ( बंड ) माजविलें. त्याचा फायदा घेऊन सिसिलीच्या सुभेदारानें कार्थेजला वेढा दिला. परंतु लोकांनीं बोमिलकारला फांशी देऊन सिसिलीवाल्यांच्या पराभव केला, एवढेंच नव्हे तर थोड्या दिवसांनीं कार्थेजवाल्यांनीं आपली सत्ता सिसिलीवर बसविली व पिऱ्हसच्या विरुद्ध रोमला मदत करण्याचें कबूल केलें.

याप्रमाणें हळूहळू वळावत जाऊन कार्थेजनें समुद्रावर आपला हक्क प्रस्थापित केला. त्या समुद्रांत वावरणाऱ्या गलबतांनां ते लुटूं लागले. ते इतके सावधपणें वागत कीं आपले दर्यावर्दी मार्ग ते कधींच कोणास सांगत नसत.मार्ग उघड करण्यापेक्षां आपलें जहाज बुडविण्यास ते तयार होत.पॉलिबियस म्हणतो कीं, कोणीं कोणत्याहि मार्गानें संपत्ति मिळविली तरी कार्थेज येथें त्याला त्यावेळीं लोक दोष देत नसत.

रो म शीं यु द्धें.—पहिलें प्युनिक युद्ध २७ वर्षे ( ख्रि. पू. २६८–२४१ ) टिकलें. यांत कार्थेजचा हेतु फक्त सिसिलींतला आपला प्रांत व टिर्हेनियन समुद्रावरील आपली सत्ता राखण्याचा होता. कार्थेजविरुद्ध दोन ठिकाणीं रोमवाल्यांनां जय मिळाल्यामुळें ते रेग्युलसच्या आधिपत्याखालीं आफ्रिकेंत चालून आले. परंतु त्यांचा कार्थेजियनांनीं स्पार्टन लोकांच्या मदतीनें पराभव केला. यानंतर सिसिलीमध्यें या दोघांमध्यें अनेक झटापटी होऊन व एकमेकांचा जयापजय होऊन रोमन लोकांस जय मिळून युद्ध थांबलें (ख्रि.पू. २४१ ). यावेळीं कार्थेजनें आपल्या सैन्यास रजा देण्याचें ठरविलें. सैनिकांनीं आपल्या थकलेल्या पगाराची मागणी केली. परंतु सरकारनें ती नाकारल्यामुळें फौजेनें बंडाळी करून कार्थेजला वेढा दिला. त्यावेळीं हॅमिलकार नांवाच्या सरदारानें मोठ्या युक्तीनें बंडवाल्यांचा मोड करून त्यांची कत्तल केली.

नंतर कार्थेजनें स्पेन जिंकण्यास सुरुवात केली. सेनापति हॅमिलकारनें ९ वर्षें लढून हें काम पुरें केलें; या कामांतच तो मरण पावला (ख्रि. पू. २२८)त्याचा जांवई हस्ड्रूबल यानें ख्रि. पू. २२७ त कार्थेजिन शहर वसवून व रोमशीं तह करून कार्थेजची आणि रोमची सरहद्द ठरवून टाकिली. हॅमिलकारच्या मागें हा कार्थेजचा सुभेदार झाला.

ह्यावेळीं कार्थेजची लोकसंख्या सुमारें १० लाख असून तें भरभराटीच्या शिखरास पोहोंचलें होतें. अंतर्गत व परकीय व्यापार फार चांगला होतो. येथील एका जातीचें उंची कापड बहुतेक देशांत खपत असे. गुलाम, हस्तिदंत, धातु, जवाहीर व मध्यआफ्रिकेंतून येणारा माल कार्थेजियन लोक ग्रीस, इटली व सिसिलींत विकीत. स्पेनमध्यें ते तांबें व रुपें विकीत. ओस्का व कार्थेजिना येथील खाणी प्रथम यांनींच शोधून काढल्या. कार्थेजच्या भोंवतालचा प्रांत फारच सुपीक असून येथूनच कार्थेजला ( व नंतर रोमला ) धान्याचा पुरवठा होई.

ह्या उत्कर्षाच्या काळांतच रोमशीं दुसरें युद्ध जुंपलें.यावेळीं कार्थेजचा अलौकिक बुद्धिमान् पुरुष जो हॅनिबाल त्यानें केलेल्या स्पेन, इटली व आफ्रिका यांतील लढाया, लष्करी दृष्टीनें तज्ज्ञांच्या प्रशंसेस अद्यापि पात्र झालेल्या आहेत. रोमन लोकांचें शहर सागन्टम हॅनिबालनें ख्रि.पू.२१९ त घेऊन स्पेन

गॉलमधून प्रवेश करून इटलींत लढाई आणली (ख्रि.पू.२१८). या वेळच्या टिसिनस.ट्रेबिया, ट्रॅसिमेनी व कॅनी या महत्वाच्या लढाया झाल्या. यापुढें रोमचा मार्ग हॅनिबॉलला खुला होता, परंतु त्यानें त्याचा फायदा घेऊन पुढें चाल केली नाहीं व कार्थेजियन सीनेटनेंहि त्याला मदत पाठविली नाहीं. त्याच्या पाठपुराव्यास त्याचा भाऊ हस्डुबल हा येत असतां, रोमन लोकांनीं त्याचा वाटेंत पराभव केला; नंतर रोमन लोकांनीं स्पेनमध्यें आपला तावा पुन्हां वसविला व हॅनिबॉलला इटलींत चढाई करतां येत नाहीं असें पाहून त्यांनीं आफ्रिकेंत लढाई सुरू केली. आपला भाऊ हस्डूबल याचा पराभव झाला असें पाहून हॅनिबॉल इटलीहून परत निघाला. वाटेंत रोमन लोकांनीं त्याचाहि पराभव केला (ख्रि. पू.२०२). यानंतर झालेल्या रोम व कार्थेजच्या तहांत कार्थेजचें आरमार नष्ट होऊन त्याच्या आफ्रिकेवाहेरच्या सर्व वसाहती हातांतून गेल्या.परंतु या युद्धानंतर लवकरच कार्थेज पुन्हां भरभराटीस आलें.अजूनहि त्याची लोकसंख्या ७ लक्ष असून रोमला त्याचा दरारा वाटत असे. रोमन सीनेटच्या संमतीशिवाय,कार्थेजनें युद्ध पुकारूं नये ह्या ( २०२ मधील ) तहांतील कलमाचा फायदा घेऊन रोमन पक्षांतील न्युमिडियाच्या राजानें कार्थेजचा प्रांत बळकाविला. कार्थेजची तक्रार ऐकण्यास रोमहून वकीलमंडळ आलें होतें. त्यांतील केटो हा कार्थेजची संपत्ति व वैभव पाहून दिपून गेला होता.

यावेळीं कार्थेजमध्यें तीन राजकीय पक्ष होते. पहिला पक्ष रोमशीं सख्य करण्यास इच्छिणारा; दुसरा न्युमिडियन लोकांशीं संधि करण्यास तयार असणारा व तिसरा लोकपक्ष. लोकपक्षाचा नेता हस्द्रुबल होता. लोकपक्षानें दुसऱ्या पक्षाचा पराभव करून न्युमिडियाच्या विरुद्ध लढाई जाहीर केली (ख्रि.पू.१४९). यावेळीं कार्थेजचा पूर्ण नाश करण्याचा निश्चय मनांत करून रोमनें आपल्या संमतीशिवाय कार्थेजनें न्युमिडियाशीं युद्ध पुकारलें या सबबीवर कार्थेजवर स्वारी केली. हें तिसरें प्युनिक युद्ध तीन वर्षेपर्यंत चाललें. त्यांत कार्थेजनें शौर्यानें बचाव केला, पण अखेरीस ख्रि. पू. १४६त तें शत्रूच्या हातीं पडलें. शेवटच्या प्रतिकारांत हस्द्रुवलच्या आधिपत्याखालीं कार्थेजच्या सर्व शूरवीरांनीं चांगलाच पराक्रम केला. परंतु त्यांचें दैव फिरलें होतें. त्यांचा पूर्ण पराभव झाला व रोमन शिपायांनीं शहर लुटून, जाळून व पोळून फस्त केलें. रोमहून आलेल्या व्यवस्थापक मंडळानें सर्व शहर, मंदिरें, घरें व तटबंदीसुद्धां जमीनदोस्त केली. सर्व प्रांत बेचिराख केला. आज जमीनींत १६।१७ फुटांखालीं सांपडणाऱ्या झाडांच्या व कोळसे वगैरे इतर वस्तूंच्या मुबलकपणावरून या नाशाची बरींच कल्पना येईल.

रा ज्य प द्ध ति.—कार्थेजची राज्यपद्धति उमरावपक्षसत्ताक असून तींत कुलशीलापेक्षां संपत्तीचाच वरचष्मा असे. प्रतिनिधिसभेंत लोकपक्षाचें वर्चस्व राही व या पक्षांत कांहीं सरदारघराणींहि असत. पुष्कळ वेळां प्रसिद्ध वक्ते अधिकारारूढ होत. खरें पाहिलें असतां धनिक लोकांचा तेथें सत्ता असे. उमरावपक्षचे दोन सुफेट नांवाचे अंमलदार व सिनेटसभा असून लोकपक्षाचीहि एकं सभा असे. सुफेट सर्व दिवाणी कारभार पहात. सुफेटांची निवडणूक दरवर्षी होई पण एकच सुफेट अनेकदां पुन्हां पुन्हां निवडून येई. हॅनिबॉल हा एकसारखा २२ वर्षेपर्यंत सुफेट होता. सीनेट नांवाच्या उमरावसभेंत तीनशें सभासद असून तिचा अधिकार सार्वजनिक कामावर चाले. युद्ध व तह तिच्याच अनुरोधानें ठरे. ही सीनेटसभा सुफेटनां मदत करण्यास एक दहा जणांचें मंडळनिवडीत असे. कधीं कधीं या मंडळाऐवजीं शंभर सभासदांचें एक महामंडळीहि नेमीत. हें महामंडळ न्याय,शांतता, लष्करी चौकशी वगैरेंकडे लक्ष देई. पुढें पुढें हें महामंडळ फार जुलमी झालें.

लोकसभेंत सर्वसाधारण लोक नेमीत नसून, टिमुकी म्हणजे थोडीफार मालमत्ता असलेले लोक नेमीत. सुफिट सभेच्या निवडणुकीस या सभेची मान्यता लागत असून या दोन सभांची एकवाक्यता कधींच होत नसे. कार्थेजचा नाश होण्यास हें एक मुख्य कारण होतें.

सीनेटर लोक हे सैन्यांत शिपायांची भरती करीत. ते निरनिराळ्या देशांतील मुख्य मुख्य व्यापारीशहरांत जाऊन तेथील अधिकाऱ्यांबरोबर अथवा राजांबरोबर मक्ता ठरवून शिपाई गोळा करीत. या मक्त्याची बाकी नेहमीं थकलेली राही आणि त्यामुळें वारंवार शिपायांचीं बंडें होत. कार्थेजनें युद्धांत हत्तींचा उपयोग ३ ऱ्या शतकांत सुरू केला. वर सांगितलेल्या भाडोत्री सैन्यापेक्षां राज्यांतील खानदानीच्या घराण्यांतील तरुणांचें एक वेगळें लष्करी—पथक असून त्यांतील लोकांनां पुढें अधिकाराच्या जागा देत.

प र मा र्थ सा ध न.—कार्थेजियन व फिनिशियन हे एकाच धर्माचे होते. त्यांच्यांत अनेक देव असून त्या सर्वांवर बॉल अमॉन ( शनी ), टनिट( चंद्र ) व एस्मुन (संरक्षक) हे तीन देव मुख्य असत. यांशिवाय अनेक देवता व त्यांचे उपासक पंथ बरेच होते. ख्रि. पू. ४ थ्या शतकाच्या अखेरपासून कार्थेजियन लोकांशीं सिसिलियन व ग्रीक यांचें दळणवळण सुरू झाल्यामुळें त्यांच्यांत ग्रीक धार्मिक कल्पनांचा शिरकाव झाला. येथील सार्वजनिक पटांगणांत असलेली अॅपोलोची मूर्ति रोम येथें नेण्यांत आली. यांचा मुख्य देव जो बॉल अॅम्मॉन तो वृद्ध असून त्याच्या कपाळावर एडक्याप्रमाणें शिंगें असत. त्याला लहान मुलांचे बळी देत. मुलांनां अग्निकुंडांत बळी देण्याची ही चाल रोमन अमलांत सुद्धां चालू होती.

रो म न का ल.—ख्रि. पू. १२२ त रोमन सीनेटनें हें शहर पुन्हां वसविण्याचें ठरविलें. या नवीन शहराला कालोनिया जुनोनिया ( ल्याटिन वसाहत ) असें नांव मिळालें. परंतु या शहराची पहिल्यासारखी भरभराट झाली नाहीं. पन्नास वर्षानंतरचा प्रवासी मेरीयस याला हें शहर त्यावेळीं ओसाड स्थितींत दिसलें. फक्त कांहीं प्युनिक लोक आसपास

राहत होते. पुढें पांपेच्या पक्षाच्या लोकांचा पाठलाग करीत असतां, येथें ज्युलीयस सीझरनें सैन्याचा तळ दिला होता. त्यावेळीं त्याला येथें स्वप्न पडलें, म्हणून त्यानें कार्थेज पुन्हां वसविण्याचा हुकूम दिला अशी एक दंतकथा आहे. ऑगस्टसनेंहि येथें वसाहत करविली व कांहीं सरकारी सुभेदाराहि येथें राहूं लागले. ते म्हणजे आफ्रिकेंतलि प्रांताचे "प्रोकान्सल" होत (ख्रि. पू. १४–१३). त्यावेळीं कार्थेजला कॉलोनिया जुलीया कार्थेगो हें नांव मिळालें. सर्व रोमन साम्राज्यांत कार्थेज हें सर्वांत मोठें व श्रीमान् शहर असल्याचें मेला व स्ट्रेबो हे लिहितात. हेरोडीयनच्या मतें हें रोमच्या खालोखाल होतें. व्हर्जिल कवीनें डिडोची कहाणी आपल्या काव्यांत दिली आहे. त्यावेळीं येथें डिडोची पूजा सार्वजनिक रीतीनें होत असे. या दंतकथा, कार्थेजनें आफ्रिकेंत पुन्हां वसविलेली सत्ता व त्याचा स्वातंत्र्याकडे असलेला कल या गोष्टी लक्षांत घेऊन, रोमच्या मनांत पुन्हां संशय उत्पन्न झाला व त्यानें व्हॅन्डालच्या स्वारीपर्यंत कार्थेजला तटबंदी बांधूं दिली नाहीं. इ. स. ६८ त न्युमिडीयाचा सुभेदार क्लोडीयस यानें बंड केलें असतां त्याला कार्थेजनें साहाय्य केलें. व्हिटेलीयसच्या अभिषेकाच्या वेळीं आफ्रिकेचा सुभेदार पिसो याची बादशहा म्हणून कार्थेज येथें द्वाही फिरविण्यांत आली. अँटोनियस पायस याच्या वेळीं मोठ्या मैदानाकडील कार्थेजचा भाग जळून खाक झाला. हेड्रीयन याच्या अंमलांत येथील प्रचंड झाघवान कालवा बांधला गेला. या कालव्यांतून दररोज ७० लक्ष ग्यालन पाणी तळ्यांत पडत असे.

ख्रिस्ती संप्रदायाच्या सुरुवातीला कार्थेजनें त्यांत बराच महत्वाचा भाग घेतला होता. येथें बरेच ख्रिस्ती लोक होते. त्यावेळच्या पुढाऱ्यांची विद्वत्ता, उपदेशकांचें धैर्य व वक्तृत्व, ख्रिस्त्यांचा छळ, पाखंड मताचा प्रसार व उत्कर्ष वगैरे गोष्टी प्रसिद्ध आहेत. दुसऱ्या शतकाच्या अखेरीस येथें बिशपची स्थापना झाली. बादशहा डेसियस व व्हॅलेरीयन यांच्या अंमलांत ख्रिस्त्यांचा छळ झाला. इ. स. २६४–६५ च्या सुमारास सेलससनें आर्थेजचें सम्राट्पद धारण केल्याची द्वाही फिरविली; परंतु तो लवकरच मारला गेला. पुढें मॅक्झेंटीयस व डोमीटस यांनींहि आफ्रिकेंत व कार्थेज येथें स्वतःची द्वाही फिरविली, परंतु मॅक्झेंटीयसनें डोमीटस यास ठार मारलें. इ. स. ३११ च्या सुमारास प्रसिद्ध डोनाटिस्ट पंथाचा उदय झाला.

इ. स. ४१३ त कार्थेजच्या लोकांनीं बंड करून हेरॅक्लिअसला बादशहा केलें. परंतु पुढें त्याला ठार मारण्यांत आलें. डोनाटिझमच्या नंतर पेलाजियनिझम या पंथाचा उदय झाला. या धर्मांत निरनिराळ्या संप्रदायांच्या भानगडी चालू असतां इ. स. २९ मध्यें व्हँडाल लोकांनीं जिब्राल्टरची सामुद्रधुनी ओलांडून मारेटॅनियावर स्वारी केली. दुसऱ्या थिओडोसिअसनें कार्थेज येथें नवीन कोट बांधला (४३९). यावेळीं कार्थेजची लोकसंख्या ५ लक्ष असून तटाला २ बुरूज होते. परंतु आतां त्याचें महत्व कमी झालें. इ. स. ४७० त रोमन पूर्वसाम्राज्याचें आरमार कार्थेजवर चालून आलें असतां तेथील लोकांनीं व व्हँडाल अधिकाऱ्यांनीं त्याचा नाश केला.

बा य झ न्टा ई न अं म ल.—व्हँडाल राजांच्या अंमलांत कार्थेजमध्यें बरींच क्रूर कृत्यें झालीं. अखेरीस बायझन्टाइन सेनापति बेलीसॅरियसनें शेवटचा व्हँडाल राजा जेलिमर याचा पराभव करून कार्थेज सर केलें. त्यानें शहराचा कोट पुन्हां दुरुस्त करून येथील कारभार सालोमनच्या हातीं सोंपविला. त्यानें इमारती, स्तंभ वगैरे बांधले. या बायझन्टाईनच्या शंभर वर्षें पर्यंतच्या अंमलांत कार्थेजची पुन्हां भरभराट झाली.

शेवटीं इ. स. ६९७ मध्यें अरबांची धाड कार्थेजच्या पुढें येऊन थडकली. ईजिप्तचा सुभेदार हसन यानें कार्थेजवर हल्ला करून तें सहज घेतलें. तो गेल्यानंतर कार्थेजच्या लोकांनीं त्याच्या सरदारास हांकून लाविलें; तेव्हां हसननें परत फिरून पुन्हां बायझन्टाईन लोकांचा पराभव करून शहर काबीज केलें व शेवटीं तें जमीनदोस्त करण्याचा हुकूम सोडला. याप्रमाणें इ. स. ६९८ त कार्थेज इतिहासांतून कायमचें नाहींसें झालें. पुढें (इ.स. १२७०) फ्रेंच राजा नववा लुई हा ख्रिस्ती धर्मयुद्धावर जात असतां येथें उतरला होता.

[संदर्भग्रंथः—पॉलिबिअस डिडोरस, सिसुलस, लिव्ही, जस्टिन, स्ट्रॅबो, टर्टुलिअन, सायप्रिअस, आगस्टाईन हे प्राचीन ग्रंथ. नायन डेव्हिस–कार्थेज अँड हर रिमेन्स. गिलमन-कार्थेज (स्टोरी ऑफ दि नेशन्स)].

**कॉर्नवालीस**—लॉर्ड कॉर्नवालीस हा बंगालचा दुसरा गव्हर्नर-जनरल इ. स. १७८६ च्या सप्टेंबर महिन्यांत आपल्या वयाच्या ४८ व्या वर्षी मोठ्या नाखुषीनें कामावर रुजू झाला. हा जातीचा शिपाई होता. याचा अमेरिकेमध्यें १७८१ त पराभव झाला होता. यावेळीं विलायतेंत सरदार-मंडळाचें वर्चस्व असल्यानें याला इकडे नेमिलें. हेस्टिंग्जला आपलें पद कायम ठेवण्याकरितां अनेक लटपटी कराव्या लागल्या, तसें याला कांहीं करावें लागलें नाहीं. याच्यावर प्रधानमंडळाचा पुरा विश्वास असल्यानें याला मुलकी व लष्करी सारे अधिकार दिले होते. कौन्सिलचा एकमुखी निकालहि योग्य वाटल्यास धाब्यावर बसविण्याचा त्याला अधिकार मिळाला होता. हेस्टिंग्जच्या मार्गांत हीच मोठी अडचण होती. कॉर्नवालीस हा उपजत तैलबुद्धीचा नसला तरी धाडशी व करारी होता. त्याच्या हातून चुका व त्याचे पराभव झाले तरी तो मुत्सद्दी होता हें खास. त्यानें पहिल्या तीन वर्षांत सिव्हिल सर्विसच्या नियमांची दुरुस्ती केली. कंपनीचा मारवाडी कंजूषपणा त्यानें कमी करविला. मोठ्या नोकरांचे अगडबंब पगार कमी करून त्यानें खालच्या दर्जाच्या नोकरांचे वाढविले. होता होईतों चढाईचें धोरण स्वकारावयाचें नाहीं असें त्यानें ठरविल्यामुळें, इकडे आल्याबरोबर पेशवे व निजामअल्ली यांनां पत्रें पाठवून, त्यांचें टिपूशीं जें युद्ध चाललें होतें त्यांत भाग घेण्याची आपली मुळींच इच्छा नाहीं, असें त्यानें स्पष्ट

कळविलें. तथापि त्यानें तीन्हीहि इलाख्यांतील आपलें लष्कर वाढवून त्याची तयारी मात्र जय्यत ठेविली होती. यामुळें आपणाशीं युद्ध करण्याकरितां इंग्रजांनीं ही पूर्वतयारी चालविली आहे अशी टिपूस शंका येऊन त्याच्या मनांत इंग्रजांविषयीं पक्की अढी बसली व त्यानें पेशवे व निजामअल्ली यांच्याशीं तह करून त्यांच्याशीं चाललेलें युद्ध बंद केलें.

सन १७६८ सालीं इंग्रज व निजामअल्ली यांच्या दरम्यान जो तह झाला होता त्या तहान्वयें सलावतजंगाच्या मरणानंतर निजामअल्लीनें गंतूर जिल्हा इंग्रजांच्या स्वाधीन करावयास हवा होता. परंतु सलावतजंग मरून सहा वर्षे होऊन गेलीं तरी तो निजामअल्लीकडून इंग्रजांनां मिळाला नाहीं. म्हणून कॉर्नवालीस यानें निजामअल्लीच्या दरबारीं आपला वकील पाठवून तो जिल्हा स्वाधीन करण्याविषयीं आतां मागणी केली (१७८८). निजामअल्लीस आपल्या राज्याच्या कमकुवतपणाची पूर्ण जाणीव असल्यामुळें त्यानें गंतूर जिल्हा तावडतोब इंग्रजांच्या पदरांत घातला (सप्टेंबर). अशा रीतीनें कॉर्नवालीस यानें अल्प आयासांत एक जिल्हा मिळविला खरा, परंतु त्यायोगें जो एक निराळाच प्रश्न त्याच्यापुढें उपस्थित झाला तो सोडविण्याकरितां त्याला दुटप्पी धोरणाचाच अवलंब केल्याशिवाय गत्यंतर राहिलें नव्हतें. कारण १७६८ सालच्या तहांत टिपूचें राज्य काबीज करण्याकरितां इंग्रजांनीं निजामअल्लीच्या मदतीस दोन पलटणी व सहा तोफा पाठवाव्या अशीहि एक अट होती. निजामअल्लीनें आतां ती अट पूर्ण करण्याविषयीं गव्हर्नर जनरलास कळविलें (१७८९). तेव्हां तो फार पेंचांत सांपडला. कारण १७६९सालीं मंगलोर येथें हैदराशीं व १७८४त पुन्हां टिपूशीं असे इंग्रजांचे त्या बापलेकांशीं जे दोन तह झाले होते, त्या तहांनीं इंग्रजांनीं टिपूचा त्याच्या राज्यावरील हक्क कबूल केला असल्यामुळें त्याचें राज्य काबीज करून तें निजामअल्लीस देण्याचा इंग्रजांनां कांहींच हक्क नव्हता; म्हणून कॉर्नवालीस यानें निजामअल्लीस एक असा खलीता पाठविला कीं, जर पुढेंमागें टिपूचा मुलूख आमच्याकडे आला तर त्या तहाच्या अटी आपण पूर्ण केल्याशिवाय रहाणार नाहीं. यावरून टिपूवर स्वारी करण्याचा कॉर्नवालीसचा विचार होता असें अनुमान निघतें व या अनुमानास त्याच्या पुढील वाक्यांनीं अधिकच बळकटी येते. इ.स.१७६८ च्या तहांत इंग्रजांनां गरज नसेल तेव्हां त्यांनीं निजामअल्लीच्या मदतीस दोन पलटणी व सहा तोफा पाठवाव्या असें म्हटलें होतें. पण या खलित्यांत कॉर्नवालीस यानें निजामअल्लीस गरज लागेल तेव्हां ही मदत पाठविण्याचें कबूल केलें होतें. इंग्रजांच्या दोस्तांविरुद्ध लढण्यांत या पलटणींचा उपयोग केला जाऊं नये अशीहि एक अट घालण्यांत आली होती खरी; पण दोस्तांची जी नावनिशीवार यादी दिली होती तींत मराठ्यांचें नांव नमूद केलें असून टिपूचा मुळीं उल्लेखच नव्हता. ह्यामुळें इंग्रजांनीं आपल्यावर स्वारी करण्याकरितां निजामअल्लीशीं गट्टी केली आहे अशी टिपूची साहजीकच समजूत होऊन त्यानें ता. २९ डिसेंबर सन १७८९रोजीं त्रावणकोरच्या तटबंदीवर उघड उघड हल्ला केला. त्रावणकोरचें राज्य काबीज करण्यासाठीं टिपूनें बरेच दिवस अगोदरपासून तयारी चालविली होती. त्यानें इतके दिवसपर्यंत इंग्रजांची प्रत्यक्ष जरी कांहीं आगळिक केली नव्हती तरी त्याच्या एकंदर धोरणावरून कॉर्नवालीसचें मन त्याच्या हेतूविषयीं साशंक होऊन त्याला मराठे व निजामअल्ली यांच्याशीं असलेली दोस्ती पक्की करण्याची अवश्यकता भासूं लागली होती. निजामअल्लीस जवळ ओढण्याकरितां दुटप्पी धोरण स्वीकारून त्यानें टिपूच्या रोषास स्वतःला जें पात्र करून घेतलें त्याला अंशतः हीहि गोष्ट कारण झाली होती. सन १७८७ सालीं नाना फडनविसानें टिपूपासून मराठी राज्याचें संरक्षण करण्याकरितां कार्नवालीसची मदत मागितली तेव्हां, "कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्या" हुकमाशिवाय गव्हर्नर जनरलानें आपण होऊन हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांशीं भांडण उकरून काढूं नये, असा पार्लमेंटचा ठराव झाला असल्यामुळें, त्यानें ती नाकारली होती. पण आतां नाना फडनविसानें मॅलेटमार्फत कॉर्नवालीसशीं पुन्हां बोलणें लाविलें. तेव्हां तो टिपूवर स्वारी करण्यास कबूल झाला (१७९०) व इंग्रज, मराठे व निजामअल्ली या तिघांनीं मिळून टिपूवर मोहीम करून जिंकलेला मुलुख तिघांमध्यें सारखा वांटून घ्यावा असें ठरविण्यांत आलें (१७९०) कॉर्नवालीसनें मद्रासच्या गव्हर्नरास सैन्याची तयारी करावयास हुकूम सोडले परंतु त्या शिस्तवान गव्हर्नरानें (हॉलंड) ते फेटाळून लाविले! पुढें त्याला बडतर्फ करून दुसरा सुभेदार नेमावा लागला !!

टिपूवरील मोहिमेचें काम पाहिले आठ महिने सेनापति मेडोज याजकडे सोंपविलें होतें. सन १७९१ सालच्या जानेवारी महिन्यांत तो परत आल्यावर त्याच महिन्याच्या २९ व्या तारखेस ब्रिटिश सैन्याचें आधिपत्य आपल्या स्वतःकडे घेऊन कॉर्नवालीस मोहिमेवर निघाला. या मोहिमेंत टिपूनें त्याची सारी रसद मारली तेव्हां तो बंगलोर येथें असतांनां त्याला उपासमारीनें नाइलाजामुळें मोहीम थांबवावी लागली. एवढेंच नव्हे, तर त्याची फार विकट स्थिति झाली तेव्हां परशुरामभाऊ पटवर्धनांनीं तात्काळ त्याच्या मदतीस येऊन त्याची लाज राखिली. कॅप्टन मूर म्हणतो "दैवानेंच मराठ्यांनां आमच्या मदतीस पाठविलें" पुढें मराठ्यांच्याच साहाय्यानें या युद्धांत टिपूचा पराभव होऊन इंग्रजांनां एक कोटि दहा हजार रुपये खंडणी व दिंदिगल, बारामहाल, कुर्ग व मलबार हे जिल्हे मिळाले. सर्व दोस्तांनां मिळून टिपूचें अर्धे राज्य व तीन कोटी तीस लाख रुपये खंडणी मिळाली होती. या मोहिमेचें काम आटोपल्यावर सन १७९२

सालच्या मार्च महिन्याच्या अखेरीस कॉर्नवालीस आपल्या मुलखांत परत यावयास निघाला. पार्लमेंटचा कायदा मोडून टिपूचा मुलुख दाबल्याबद्दल बक्षीस म्हणून कंपनीनें कार्नवालीस याला मार्क्विस केलें.

यावेळीं त्यानें बंगाल, बहार, बनारस व ओरिसा या प्रांतांत कायमधाऱ्याची पद्धत प्रचारांत आणली. पण त्यामुळें तीन कोटींचा तोटयाचा बोजा विनाकारण इतर प्रांतांवर बसविला गेला.

त्यानें पोलीस खातें आयरिश पद्धतीवर स्थापलें. न्यायखात्यांत हेस्टिंग्जची पद्धति बदलून, मुसुलमानी कायद्यांचा निष्कारण कांच काढून दरेक जिल्ह्यास हल्लींसारखीं ( पण फिरतीं ) सवजज्जांचीं कोर्टें स्थापून सुधारणा केली. त्याचा येथील कोण्याहि ( हिंदु अगर मुसुलमान ) अधिकाऱ्यांवर अजिबात विश्वास नसल्यानें सर्व वरिष्ठ अधिकारी त्यानें यूरोपियनच नेमिले,!" एतद्देशीय मग तो कोणत्याहि जातीचा असो त्याच्या हातीं निदान या खात्याचें तरी काम दिलें तर योजिलेल्या सर्व सुधारणा निष्फळ होतील!" असें तो स्वतःच म्हणतो; आणि त्यासाठीं नेमलेल्या यूरोपियन अधिकाऱ्यास मात्र हिंदीलोकांपेक्षा भरमसाट जास्त पगार देतो! या बाबतींत मार्शमन म्हणतो " याच्या या, म्हणजे हिंदीलोकांना कोणत्याहि महत्वाच्या जागेवर अविश्वासानें न नेमण्याच्या,अत्यंत मोठ्या घोडचुकीमुळें त्यांची कायदेशीर व मानसिक महत्वाकांक्षा मुळांतच त्यानें खुडून टाकून " प्रजेंत या नवीन राज्यकर्त्यांबद्दल असंतोष व अप्रीति उत्पन्न केली ! बरें यामुळें कांहीं फायदा न होतां उलट " पुष्कळ वर्षें प्रजेला न्यायच मिळाला नाहीं " !! इ. स. १७९५ मध्यें बनारस येथील कोर्टांत तीस हजार खटले शिल्लक राहिले होते!! याच्यानें कर्नाटक व अयोध्या येथील राज्यकारभार सुरळीत चालविला गेला नाहीं. टिपूशीं चाललेलें युद्ध संपल्यावर कॉर्नवालीसच्या मनांत आपण मध्यस्थी करून निजाम व मराठे यांच्यामधील देण्याघेण्याच्या प्रश्नांसंबंधीं कांहीं तरी तडजोड करून द्यावी व देशांत शांतता राहील अशी व्यवस्था करावी असें होतें. परंतु ह्याचा अर्थ इंग्रज आपणांस मराठ्यांविरुद्ध मदत करण्यास तयार आहेत असा करून निजामानें मराठ्यांचें बाजवी देणेंहि फेंटाळून लावण्याचा विचार चालविला व मराठ्यांनां कार्नवालीसचें हें कृत्य म्हणजे आपल्या कामांत निष्कारण ढवळाढवळ आहे असें वाटून, त्यांनीं कॉर्नवालीस यानें सुचविलेल्या अटींनां उत्तर देण्याची चालढकल चालविली.

इ. स. १७९३ च्या आक्टोबर महिन्यांत लॉर्ड कॉर्नवालीस हा सर जॉन शोअर याच्या हवालीं आपलें काम करून विलायतेस निघून गेला. तत्पूर्वी त्यानें कंपनीची सनद पार्लमेंटकडून आणखी वीस वर्षें वाढवून घेतली. मिशनरी लोकांनां त्यानें इकडे येऊं न देण्याबद्दल मत दिलें. कंपनीशिवाय इतर व्यापारी अगर इंग्रजी रयत यांनां जास्त हक्क देऊं नयेत म्हणून खटपट केली. कंपनीच्या कोणाहि नोकरास गव्हर्नरजनरलची जागा देऊं नये असेंहि त्याचें मत होतें.

शोअरच्या नंतर मार्क्विस वेलस्ली हा गव्हर्नर जनरल होऊन आला. यानें एतद्देशीय संस्थानिकांशीं युद्धें करण्यांत आपली सर्व कारकीर्द खर्च करून कंपनीस बरेंच कर्ज करून ठेविल्यामुळें व डायरेक्टरांचें तो ऐकेनासा झाल्यामुळें तो इंग्लंडांतील लोकांस फार अप्रिय झाल्यानें इंग्लंडांतील अगदीं वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं व डायरेक्टरांनीं आग्रह धरून वेलस्लीस स्वदेशीं परत बोलाविलें. व त्याच्या ऐवजीं मार्क्विस कॉर्नवालीस याची गव्हर्नर जनरलच्या जागीं पुन्हां एकदां नेमणूक करून पाठविलें. कार्नवालीस हा १८०५ सालीं जुलै महिन्याच्या ३० व्या तारखेस कलकत्यास येऊन पोंचला व त्याच दिवशीं तो आपल्या कामावर रुजू झाला. परकीय शत्रूनें स्वारी केली असतां तिजपासून स्वतःचें रक्षण करण्याकरितां परस्परांनीं परस्परांस मदत करण्यासंबंधीं वेलस्ली यानें एतद्देशीय संस्थानिकांशीं केलेले तह व त्यांकरितां त्यानें शोधून काढलेली कुमकी सैन्याची टूम या दोन्हींहि गोष्टी कॉर्नवालीस यास मुळींच पसंत नव्हत्या. होळकराशीं चाललेल्या युद्धाचा एकदांचा शेवट करण्यास तो इतका उत्सुक झाला होता कीं, शिंद्यानें ब्रिटिश वकीलास कैदेंत ठेविलें असतांहि ती गोष्ट विसरून जाऊन तो ग्वाल्हेर, गोहद व त्याच्या खालचा मुलुख या सर्वांवर पाणी सोडून यमुना ही इंग्रजांची सरहद्द कबूल करण्यास तयार झाला. चालू युद्धांत जिंकून घेतलेला सर्व मुलुख परत करून आपण तह करण्यास तयार आहों असें त्यानें होळकरास कळविलें होतें. जोधपूर, जयपूर, भरतपूर, माचेडी व बुंदी येथील संस्थानिकांच्या मुलुखांचें शत्रूंपासून संरक्षण करण्याची वेलस्लीनें घेतलेली जबाबदारीहि तो जमल्यास स्वतःवरून काढून टाकूं पाहात होता. यांपैकीं जोधपूरच्या राजास तर त्याच्या वकीलानें इंग्रजांशीं केलेला तह मान्यच नव्हता. जयपूरच्या राजानेंहि आपल्या तहाच्या अटी अद्याप पूर्ण पाळल्या नसल्यानें कार्नवालीस यानें इंग्रजांचा त्याच्याशीं झालेला तह रद्द समजण्यांत यावा असें तावडतोब त्यास कळविलें. राहतां राहिले भरतपूर, माचेडी व बुंदी येथील राजे; त्यांच्यासंबंधींची जबाबदारी काढून टाकण्याकरितां दिल्लीच्या दक्षिणेकडील व यमुनेच्या पश्चिमेकडील शिंद्यापासून जिंकून घेतलेला मुलुख ह्या संस्थानिकास वांटून देऊन ते आपले इंग्रजांशीं झालेले पूर्वीचे सर्व करारमदार रद्द समजण्यास तयार होत असल्यास प्रयत्न करून पहावा, असें त्यानें से. लेक यास १९ सप्टेंबर रोजीं लिहूनहि पाठविलें. परंतु हा खलिता लेक याला मिळण्यापूर्वीच त्यानें गव्हर्नर जनरलचें धोरण ओळखून, अंबाजी इंगळयास शिंद्यांच्या कारभाऱ्याची जागा मिळाली होती या गोष्टीचा फायदा घेऊन शिंद्यांकडून तहाचें बोलणें आणविलें होतें व शिंद्यांनीं

ब्रिटिश वकिलास बंधमुक्त करण्याचें कबूल करतांच शिंद्या-संबंधीच्या तडजोडीची योजना, गव्हर्नरजनराकडे रवाना केली होती. ही योजना रवाना केल्यावर गव्हर्नरजनरलाचें पत्र (से. लेक) याच्या हातीं पडलें; तेव्हां शिंद्यानें तहाचें बोलणें लावलें असल्यामुळें उत्पन्न झालेली अनुकूल परिस्थिति व राजपुतान्यांतील संस्थानिकांशीं झालेले करारमदार रद्द करण्यापासून उद्भवणारा घोंटाळा पुढें ठेवून, स्वतःच्या योजनेचा विचार होऊन उत्तर येईपावेतों आपण वाट पहाण्याचें ठरविलें आहे, असें त्यानें गव्हर्नरजनरलास कळविलें. हें पत्र कॉर्नवालीस यास पोंचण्यापूर्वींच तो आजारी पडला व त्या दुखण्यांतच त्याचा तारीख ५ आक्टोबर रोजीं गाझीपुर येथें अंत झाला. त्याच्या मागून बंगाल कौन्सिलचा सीनियर मेंबर सर जॉर्ज बार्लो हा त्याचें काम पाहूं लागला. कॉर्नवालीसच्या हिंदुस्थानांतील राजे लोकांशीं सख्यत्वाच्या ठेविलेल्या या धोरणाचा साम्राज्याभिमानी इंग्रज अधिकाऱ्यांनीं व स्मिथसारख्या पक्षाभिमानी इतिहासकारांनीं निषेध केला आहे व त्यानें हिंदुराज्यें घशाखालीं उतरविण्याचा वेलस्लीच्या प्रयत्नाला पाठिंबा दिला नाहीं, म्हणून त्याला दोष दिला आहे. [ डफ, इ. स्मिथ, मालकम पहा. ]

**कार्नू मेरी आलेरे** —मेरी आलेरेड कार्नू या फ्रेंच पदार्थविज्ञानशास्त्रवेत्याचा जन्म आर्लीअन्स येथें झाला. येथील विविध शाळांत त्याचें शिक्षण झालें.पुढें सन१८६७सालीं त्याला त्याच संस्थेंत प्रोफेसर नेमण्यांत आलें. याच संस्थेंत त्यानें आपलें शेष आयुष्य घालविलें. यानें पदार्थविज्ञान शास्त्राच्या निरनिराळ्या शाखांत अनेक शोध लावले परंतु त्याचें महत्वाचें कार्य प्रकाशशास्त्र आणि प्रकाश-पृथक्करणशास्त्र या दोन शास्त्रांत मुख्यत्वेंकरून झालें आहे. फिझो नांवाच्या शास्त्रज्ञानें प्रकाशाची गति प्रयोगानें काढली होती. कार्नू यानें फिझोच्या युक्तीचें अवलंबन करून ही गति अति सूक्ष्म प्रमाणांत निश्चित केली व यासंबंधानें प्रयोग करावयाच्या यांत्रिक साधनांत अत्यंत सुधारणा केली. याबद्दल त्याला 'प्रिक्स लाकेझ' नांवाचें पारितोषक सन १८७९ सालीं मिळालें; व ॲक्याडेमी आफ् सायन्सेस नांवाच्या फ्रेंच संस्थेचा त्याला सभासद करण्यांत आलें; इंग्लंडांतील रॉयल सोसायटीनें त्याला रम्फोर्ड पदक अर्पण केलें. सन १८९९ सालीं सर जॉन स्टोक याची जुबिली झाली, त्या समारंभांत त्यानें प्रकाशाच्या प्रकंपनाचा सिद्धान्त व या सिद्धान्ताचा आधुनिक शास्त्रांवर होणारा परिणाम या विषयावर व्याख्यानें दिलीं. या प्रसंगीं त्याला डी, एससी. ही पदवी अर्पण करण्यांत आली. तारीख ११ एप्रिल १९०२ रोजीं पारीस येथें याचा मृत्यु झाला.

**कॉर्नेजी अँड्र्यू** —अँड्र्यू कॉर्नेजी हा एक अमेरिकेंतील सुप्रसिद्ध कोट्याधीश व लोकहितकारी गृहस्थ असून त्याचा जन्म इ. स. १८३५ सालीं स्कॉटलंड देशांतील डन्फर्मलीइन ह्या गांवीं झाला. याचा बाप अगदीं सामान्य स्थितींतील विणकराचा धंदा करणारा गृहस्थ होता; परंतु त्याची नांवालौकिकास येण्याची महत्वाकांक्षा जबर असल्यामुळें व प्रातिनिधिक शासनपद्धतीचा तो अभिमानी असल्यामुळें १८४५ मध्यें त्यानें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत येऊन पिट्सबर्ग येथें वस्ती केली. यानंतर दोन वर्षांनीं अँड्र्यू यानें एका छोटेखानी वाष्पयंत्राची स्थापना करून आपल्या व्यापारी आयुष्यक्रमास सुरुवात केली व नंतर तो तारायंत्रानें संदेश पोहोंचविण्याचें काम करूं लागला. ध्वनिवाहक तारायंत्राच्या खुणा ध्वनीनेंच प्रथम लिहिणारांपैकींच तो एक होता. पुढें पेनसिल्व्हेनिया रेल्वेच्या अधिकाऱ्याचा तो कारकून होऊन, नंतर तो ध्वनिवाहक तारायंत्राचा चालक झाला. या रीतीनें त्यानें लहान लहान रकमा गुंतविण्याचें काम सुरु केलें व आपल्या क्रोडोगणती संपत्तीचा मूलाधार संपादन केला."पेन्सिल्व्हेनिया"रेल्वेच्या पिटजबर्ग विभागाचा मुख्याधिकारी झाल्यावर त्यानें व दुसऱ्या कांहीं गृहस्थानीं मिळून ऑईल क्रीक येथील ४०,००० पौंड किमतीची मालमत्ता खरेदी केली व ह्या धंद्यापासून त्यांनां एका वर्षात रोख १०,००,००० पौंडांचा फायदा झाला. ह्यानंतर कांहीं गृहस्थांच्या मदतीनें त्यानें एक जंगी लोखंडी पत्र्यांचा कारखाना उघडला व अशा रीतीनें अमेरिकेंतील निरनिराळ्या लोखंडाच्या व पोलादाच्या कारखान्यांस ह्यानें मोठाच पुरवठा केला. कॉर्नेजी हा पुढें " होमस्टेड अँड एडगर थॉम्सन् स्टील वर्क्स " आणि दुसरे कांहीं मोठे कारखाने ह्यांचा मालक झाला. १८९९ मध्यें ह्या सर्व इतर धंद्यांचें चालकत्व "कॉर्नेजी स्टील कंपनी"कडे गेलें आणि दोन वर्षांनीं कॉर्नेजी ह्यानें वरील पोलादाचा कारखानाहि संयुक्त संस्थानांस विकला व व्यापारांतून आपलें अंग काढलें.

ह्यां मोठ्या कारखान्यांशिवाय दुसरीं अठरा इंग्लिश वृत्तपत्रें आपल्या मतप्रतिपादनार्थ त्यानें कित्येक वर्षेपर्यंत चालविलीं होतीं. लोककल्याणकारक व शैक्षणिक संस्थांनां त्यानें खूप मोठमोठ्या देणग्या दिल्या. १८७९ मध्यें स्कॉटलंडमधील डन्फर्म्लीइन ह्या जन्मभूमींत सार्वजनिक उपयोगाकरितां सोइस्कर अशा पोहण्याचा जागा त्यानें बांधून व पुढच्याच वर्षीं एका मोफत वाचनालयाकरितां४००० पौंडांची देणगी दिली. १८८४ मध्यें त्यानें बेलेव्ह्यू हॉस्पिटल व मेडिकल कॉलेजमध्यें एक ऐतिहासिक प्रयोगशाळा स्थापन करण्याकरितां ५०,००० पौंडांची देणगी दिली. नंतर त्यानें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें व ग्रेटब्रिटन ह्या देशांतील कित्येक शहरांमध्यें व गांवांत मोठमोठीं मोफत वाचनालयें स्थापन करण्याकरितां असंख्य देणग्या दिल्या. ह्या सर्व वाचनालयांची देणगीरक्कम सुमारें ४,००,००,००० पौंडावर असून त्यांतून सुमारें १,५०० वाचनालयें स्थापन झालीं आहेत. कॉर्नेजी ह्यानें कित्येक ग्रंथ व लेख लिहिले त्यांपैकीं मुख्य म्हटले म्हणजे ॲन अमेरिकन फोर–इन्–हँड इन् ब्रिटन (१८८३), राऊंड दि वर्ल्ड (१८८४), ट्राइंफंट डेमाक्रसी

(१८८६), दि गॉस्पेल ऑफ वेल्थ (१९००) व एंपायर ऑफ बिझिनेस" (१९०२) वगैरे होत.

**कार्नो, सादी निकोलस लिओनार्ड.**—(१७९६–१८३२) सादी निकोलस लिओनार्ड हा एल्. एन्. एम्. कार्नो नांवाच्या प्रसिद्ध फ्रेंच सेनापतीचा मुलगा होय. याचा जन्म पॅरीस येथें झाला. हा एक प्रसिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ होता. एकोल ऐथील विविधकलाशाळेंत सन १८१२ सालीं त्याचा प्रवेश झाला आणि १८१४ सालीं त्यानें तें विद्यालय सोडलें व त्याला एंजिनिअरची सनद मिळाली. व एंजिनीअर या नात्यानें बढती होण्याची त्याला पुष्कळ आशा होती; परंतु वाटर्लूच्या युद्धानंतर पुष्कळ जणांवर जप्त्या बसल्या व त्यांत त्याचा बापहि सांपडला; व जरी त्यावर प्रत्यक्षपणें कांहींच परिणाम झाला नाहीं तरी त्याच्याकडे फक्त खर्डेघाशीचें काम राहूं दिलें. अर्थात त्यानेंहि नोकरी सोडून दिली व लष्करी परीक्षा देऊन लेफ्टेनंटची जागा मिळवली. नंतर त्यानें मोठ्या उत्साहानें गणित, रसायनशास्त्र, विविधकला आणि अर्थशास्त्र इतक्या शास्त्रांचा अभ्यास सुरु केला. याशिवाय संगीत व इतर ललितकला यांत त्यानें बरेंच प्राविण्य संपादन केलें. अभ्यासाचा कंटाळा घालविण्याकरितां तो मर्दानी खेळ खेळत असे. तसेंच तो पोहत असे व तलवारीचे हातहि करीत असे. त्याची प्रकृति मूळचीच नाजूक होती ती या दांडग्या अभ्यासक्रमानें सन १८३२ सालीं कायमची बिघडली. त्याला प्रथमतः मस्तिष्कगामी–ज्वर झाला व या आजारांतून तो बरा होतो न होतो तोंच, महामारी (कॉलरा) नें त्याच्यावर झडप घातली; व तारीख २४ आगष्ट १८३२ सालीं त्याचा पारीस येथें त्याच दुखण्यांत अंत झाला.

त्याच्याप्रमाणें कल्पक आणि खोलवर विचार करणारे शास्त्रज्ञ फारच थोडे झाले आहेत. त्यानें एकच पुस्तक (१८२४) प्रसिद्ध केलें आहे, व त्यांत त्यानें लावलेल्या शोधांपैकीं फारच थोड्या शोधांचा समावेश केला गेला आहे. असें जरी आहे, तरी त्या एकाच पुस्तकावरून अत्युच्च प्रतीच्या शास्त्रज्ञांत त्याची गणना करण्यास प्रत्यवाय नाहीं. थॉमस केल्व्हिन यानें या गृहस्थाची योग्यता १८४५ च्या सुमारास शास्त्रज्ञांच्या नजरेस आणली. "कार्नोचें तत्व" म्हणून उष्णताशास्त्रांत जी गोष्ट गृहीत धरतात ती गोष्ट गत्युष्णता शास्त्रांत आधारस्तंभ मानिली गेली आहे.

**कार्पेथियन पर्वत**—ही मध्ययूरोपांतील पर्वताच्या रांगेंतलि पूर्वेकडील ओळ होय. केवळ दक्षिण व आग्नेय फांटयांखेरीजकरून या पर्वताचा भाग ऑस्ट्रियाहंगेरींत आहे. डॅन्यूब नदीवर असलेल्या प्रेसवर्ग शहराजवळ हा निघून हंगेरी व ट्रान्सिल्व्हेनियास अर्धवर्तुळाकार वळसा घालून पुन्हां डॅन्यूबवरच ओर्सोव्हाजवळ संपला आहे. याची लांबी ८००मै. असून रुंदी ७ते २३० मै. इतकी आहे. यूरोपमध्यें आल्पसच्या खालोखाल, सर्वांत जास्त लांबवर पसरलेला असा हाच पर्वत होय. ७२,६०० मैल क्षेत्रफळ यानें व्यापिलें आहे. ही पर्वताची रांग सलग नसून सृष्टिसौंदर्य, धबधबे, सरोवरें इ० बाबतींत ही आल्पसची बरोबरी करूं शकणार नाहीं. आल्प्सच्या मध्यभागाशीं याचें बरेंच साम्य आहे. डॅन्यूब नदीनें कार्पेथियन पर्वताला आल्प्सपासून तोडून काढलें आहे. व पुन्हां बेकनी पर्वतापासूनहि त्यास हीच विभक्त करते. हा पर्वत हंगेरी व ट्रान्सिल्व्हेनिया यास गॅलिशिया, रुमानिया इ० देशांपासून वेगळा काढतो. त्याचे ४ फाटे बुकोव्हीया, हंगेरीच्या उत्तरप्रदेशांत पसरले आहेत.

या पर्वताच्या भोंवतालीं सपाट प्रदेश असून आसमंतांतील प्रदेशास ह्याच्यापासूनच पाण्याचा पुरवठा होतो. कार्पेथियन व ट्रान्सिल्व्हेनियन असे याचे दोन भाग करतात. या कार्पेथियनचे आणखी तीन भाग आहेत. (१) पश्चिम (२) पूर्व व (३) मध्य कार्पेथियन.

**कार्लस्क्रोना**—हें स्वीडनच्या बाल्टीक समुद्राच्या किनाऱ्यावरील एक बंदर आहे. येथें स्वीडन देशाच्या आरमारखात्याचें मुख्य ठाणें आहे. याची लोकसंख्या १९०० सालीं २३९५५ होती. हें एक विस्तृत बंदर असून येथें मोठालीं जहाजें येऊं शकतात. येथें आरमारी शिलेखाना, दवाखाना व आरमारी शाळा आहेत. येथें अकराव्या चार्लस राजाचा १८९७ सालांत उभारलेला ब्राँझ धातूचा पुतळा आहे. येथें आरमारास लागणाऱ्या वस्तू तयार करण्याचे कारखाने आहेत. यांशिवाय येथें कॅनव्हसचा कपडा, कमावलेलीं कातडीं वगैरे जिन्नस तयार होतात. येथून दगड व इमारतीलांकूड परदेशीं जातें. कोळसा, पीठ, खाद्यपदार्थ, यंत्रें वगैरे जिन्नस स्वीडन देशांतून येतात.

**कार्लस्टाट**—हें आग्राम कोशिया–स्लॅव्होनिया विभागांत असून खास राजाच्या ताब्यांतील स्वतंत्र शहरांपैकीं एक आहे. येथें नगरव्यवस्थेकरितां एक गांवसभा असून लष्करी ठाणें आहे. हें उंचवटयावर वसलें असून लो. सं. ७३९६ आहे. येथें कॅथोलीक व आर्थोडॉक्स पंथाचीं पुष्कळ देवालयें आहेत येथील पाहण्यासारखी इमारत म्हटली म्हणजे फ्रॅंसीस्कन लोकांचा मठ ही होय. यांशिवाय येथें एक लष्करी शाळा आहे. येथें धान्य, मद्य, मध वगैरे जिनसांचा बराच व्यापार चालतो.

**कार्लाइल**—इग्लंड देशांतील कम्बरलन्ड परगण्याचें हें शहर लन्डन शहरापासून वायव्य–उत्तरेस २९९ मैलांवर आणि स्कॉटिश सरहद्दीपासून ८ मैल दक्षिणेस आहे. येथील लोकसंख्या (१९२१) ५३२०० होती. हें शहर इडेन नदीच्या दक्षिणतीरावर आहे. कार्लाइल येथें लंडन अॅन्ड नॉर्थ वेस्टर्न रेल्वे, इग्लंड मिडलंड रेल्वे, व स्कॉटलन्डच्या कॅलिडोनिअन, नॉर्थ ब्रिटिश व ग्लासगो अॅंड साउथ वेस्टर्न या रेल्वे येऊन मिळतात. येथें बिशपचें राहण्याचें ठिकाण असून आर्च डीकन पॅलेचें स्मारकहि आहे. येथील एका दुर्गांत स्कॉटलंडची मेरी राणी कैदेंत होती. येथील नगर-

भुवन, कचेऱ्या, पदार्थसंग्रहालय व कलाभुवन या प्रेक्षणीय इमारती आहेत. येथें कापूस व लोंकरीचे कारखाने, लोखंड गाळण्याच्या भट्या व दारू करण्याच्या भट्या आहेत. या बरोमधून पार्लमेंटसभेस एक प्रतिनिधी निवडून जातो. हें शहर हेड्रिअन भिंतीच्या दक्षिणेस १ मैलावर होतें. स.६८६ मध्यें सेंट कथबर्ट यानें येथें एक अत्युत्तम रोमन कारंजें पाहिलें होतें. येथें विल्यम रूफस यानें एक किल्ला बांधला. १७४५ पावेतों या देशाच्या इतिहासांत हा किल्ला स्कॉट लोकांपासून पश्चिम सरहद्दीचें मुख्य रक्षणाचें साधन म्हणून प्रसिद्ध होता. १२९२ च्या आगींत येथील इमारती व स्मारकें भस्म झाल्यामुळें तत्पूर्वीचे कोणतेच कागदपत्र सांपडत नाहींत. यानंतर येथील लोकांस निरनिराळ्या प्रसंगीं इंग्लंडच्या राजांकडून सनदा मिळाल्या. पुढें १५६६ मध्यें एलिझाबेथकडून सनद मिळाल्यामुळें येथें एक मेअर, ११ शिष्टलोक व २४ सभ्य गृहस्थ यांचें मंडळ स्थापन झालें. यापुढें १६३८ च्या पहिल्या चार्ल्सच्या सनदीप्रमाणें १८३५ पावेतों तीच शासनपद्धति कायम राहिली. डॅरमॉट बुक व आठ शिल्पसंघाच्या लेखांवरून या शहराबद्दल बरीच माहिती मिळण्यासारखी आहे. स्कॉटिश युद्धांत इ.स. १३०० व १३०७ मध्यें पहिल्या एडवर्डनें येथें दोन पार्लमेंटच्या सभा भरविल्या होत्या. १२९५ ते १८८५ पावेतों येथून दोन प्रतिनिधी पार्लमेंट सभेत पाठविण्यांत येत असत.

**कार्लाइल टॉमस** (१७९५–१८८१):—इंग्लिश निबंधकार, इतिहासकार व तत्ववेत्ता. हा इक्लेफेशन येथें १७९५ सालीं जन्मला. बालपणचें शिक्षण एडिंबरो येथें होऊन १८०९ सालीं हा प्रवेशपरीक्षेंत उत्तीर्ण झाला. १८१४ सालीं याला "आनन ॲकाडेमी"मध्यें शिक्षकाची जागा मिळाली. येथें हा गणितविषय शिकवीत असे. १८१७ सालीं कर्ककाल्डि येथून परत आल्यावर हा एडिंबरो येथें शिकवण्या व चरित्रलेखन यांवर उदरनिर्वाह करीत असे. याच वेळेस यानें जर्मन भाषेचा अभ्यास करून तींत चांगलें प्रावीण्य मिळविलें. १८२४ सालीं यानें "विलहेल्म मीस्टर"या गोएटे याच्या लेखाचें भाषांतर व शिलरचें चरित्र हीं दोन पुस्तकें लिहिल्यामुळें त्याचा गोएटेशीं असलेला परिचय जास्त दृढ झाला व गोएटेच्या उत्तेजनामुळें त्याला हुरूप येऊन पुढील सर्व आयुष्य त्यानें इतिहास व तत्वज्ञान या विषयांवर लेख लिहिण्यांत घालविलें.

इ. स.१८२६मध्यें जेन वेली वेल्श ह्या बाईशीं यानें विवाह केला. १८२९ सालीं कार्लाइलनें क्रेजेनपटॉक येथें रहाण्याचें कायम केल्यावर त्यानें 'सारटर रिसार्टस हें पुस्तक लिहिलें व "फ्रेंच रेव्होल्यूशन" व "हिस्टरी ऑफ जर्मन लिटरेचर" हीं दोन पुस्तकें लिहिण्याची योजना केली. १८३६ व ३७ सालीं हीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं व त्यांमुळें कार्लाइलचा फार गौरव झाला. पुढें १८५१ पर्यंत हिरोवर्शिप, पास्ट अँड प्रेझेंट, लेटर्स अँड स्पीचेस ऑफ ऑलिव्हर क्रॉमवेल इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध करून १८५२ सालीं हिस्टरी ऑफ फ्रेड्रिक दि ग्रेट हें पुस्तक लिहिण्यास त्यानें आरंभ केला. हें पुस्तक त्यानें १८६५ सालीं संपविलें. १८६७ सालीं "आयुष्यांतील आठवणी" हें पुस्तक त्यानें हातीं घेतलें; परंतु त्याच्या हयातींत तें प्रसिद्ध झालें नाहीं. तो १८८१ सालीं मरण पावला.

'फ्रेंच रेव्होल्युशन' या पुस्तकावरून त्याच्या बुद्धिमत्तेची योग्य कल्पना येते. या पुस्तकांत, त्या वेळच्या संशयात्मक परिस्थितींत घडलेल्या गोष्टी व त्यांवरील त्याचें तात्विक विवेचन हीं स्पष्टपणें व स्फूर्तीनें वर्णन केलेलीं आहेत, त्यामुळें या पुस्तकास फार महत्व प्राप्त झालें आहे.

"इतिहास हा एक घडलेल्या गोष्टींचा क्रमवार समुच्चय नसून त्या त्या कालांतील निरनिराळ्या पुरुषांच्या चरित्रांची हकीकत व त्यांतून घेण्यासारखे धडे, यांचा समग्र ग्रंथ समजला पाहिजे. इतिहासाचें सार म्हणजे त्यांतील चरित्रें" असें त्याचें मत होतें. हें मत त्यानें "लाइफ अँड लेटर्स ऑफ ऑलिव्हर क्रॉमवेल' या पुस्तकांत प्रतिपादिलें आहे.

व्यक्तिशः व लेखनद्वारें कार्लाइलनें आपल्या काळच्या विचारावर जबरदस्त पगडा बसविला यांत शंका नाहीं. राष्ट्रांतील त्यावेळच्या कल्पनांतून त्याच्या क्रांतिकारक व नवीन कल्पना बेमालूम रीतीनें सहज गोंविल्या गेलेल्या दिसतात. इंग्लिश वाङ्मयांत त्याची लेखनपद्धति अतिशय संस्मरणीय होऊन राहिली. ही लेखनपद्धति मोठी सामर्थ्यवान्, स्पष्ट व सुंदर असून मधून मधून तींत बंडखोरीची झांक दिसते. उच्च दर्जाची काव्यकल्पनाशक्ति कार्लाइलच्या ठिकाणीं वसत असून शिवाय अपरिहार्य विनोद, वक्रोक्ति, अंतर्दृष्टि, कोमलता व भयंकर राग हे गुण (!) त्याच्या लेखनांतून चटदिशीं निवडितां येतात.

तो जड व नास्तिकवाद यांचा द्वेष करीत असे परंतु त्याचीं धार्मिक मतें फार संदिग्ध व दुर्बोध अशीं होतीं. तीं 'सार्टर रिसारटस' या पुस्तकांत प्रतिबिंबित झालेलीं आहेत.

**कार्ले**—पुणें जिल्ह्यांत मावळ तालुक्यामध्यें पुण्याहून १७ कोसांवर जी. आय. पी. रेल्वेच्या मळवली स्टेशनहून १ कोसावर हें खेडें आहे. याला विहारगांव असें दुसरें नांव आहे. सह्याद्रीच्या ज्या फांट्यावर येथील लेणें आहे त्याची उंची जमीनीपासून ४०० फूट आहे. कार्ल्याचीं लेणीं प्रसिद्ध आहेत इंद्रायणी खोऱ्यांत हा पहाड आहे. पायथ्यापासून थेट लेण्यापर्यंत गाडीरस्ता आहे. या पहाडाच्या माथ्यावरून कुडबचा डोंगर, वदराशीचा डोंगर, विसापूर व लोहगड किल्ले, तुंग व मोरगिरी गड व साखरपठार वगैरे ठिकाणें स्पष्ट दिसतात. लेण्याच्या तोंडाशीं दगडी कमानीवरील नगारखाना व एकवीरा देवीचें देऊळ आहे. नगारखान्याची नेमणूक पेशवे सरकारनीं केली होती. एकवीरा देवीच्या देवळाचा जीर्णोद्धार इ. स. १८६६ मध्यें झाल्याचा

शिलालेख देवळावर आहे. देवीचें स्थान फार प्राचीन आहे. लेण्याच्या महाद्वाराजवळ बऱ्याच घंटा टांगलेल्या आहेत. पैकीं एका मोठ्या घंटेवर इंग्रजी १८५७ चा आंकडा खोदलेला आहे. ही एकवीरा देवी ठाणें व पुणें जिल्ह्यांतील आणि कोकणांतील कोळ्यांची (व प्रभु लोकांचीहि) कुलदेवता असल्यानें त्यांनीं देवीला नजर केलेल्या वस्तु येथें आहेत. देवीचा नंदादीप सतत तेवत असतो. मूळ देवीची मूर्ती ही पाषाणाची ( डोंगराच्या दगडांत कोरलेली ) असून सध्यां ती फार झिजली आहे. तिच्या अंगावर दागदागिने व मुखवटे वगैरे घालतात. हिची यात्रा चैत्र शु. अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत असते.देवळाची व्यवस्था पंचांच्या ताब्यांत आहे. कोळी लोक यात्रेस येतांना वारकऱ्यांप्रमाणें पालख्या आणून त्यांत एकवीरा देवीचे चांदीचे टांक व मुखवटे आणीत असतात. कोंबडीं व बकरीं यांचे बळी येथें देतात. एकवीरा हें नांव द्रविडी अक्का अवेयार ( पूजनीय माता ) या नांवापासून झालें असावें. ही देवी येथील बौद्ध विहाराच्याहि पूर्वीची असावी. कदाचित् तिच्या या प्रांतांतील प्रसिद्धीमुळेंहि येथें बौद्धांनीं लेणें कोरलें असावें असें वाटतें. परशुराम हा एकच वीर जिच्या पोटीं झाला ती ( रेणुका ) एकवीरा असेंहि म्हणतात.

लेण्यांबद्दल नेहमींप्रमाणें पांडवांच्या कथा सांगण्यांत येतात. मुख्य चैत्याला धर्मराजाचा डेरा असें म्हणतात. या मुख्य चैत्याशिवाय विहार ( रहाण्याच्या खोल्या ) बरेच आहेत. चैत्याची लांबी १२५ व रुंदी ४५ फूट आहे. एकंदर (दोन्ही बाजूंचे मिळून)३० खांब आहेत.खांब अष्टकोनी असून सुंदर कोरलेले आहेत. त्यावर दोन हत्ती व स्त्रीपुरुषांचें एक एक जोडपें आहे. लेण्याच्या मागील व महाद्वाराजवळील कांहीं खांबांवर नकशी फार थोडी आहे. कांहीं खांबावर रंगीत चित्रें आढळतात. उजव्या हाताकडील आठव्या खांबावर एक धर्मचक्र व हरिणें वगैरे चित्रें कोरलेलीं असून खांब सोळा कोनी आहे. सभामंडपाच्या ओवऱ्यांच्या बाजूस घोडेस्वारांच्या मूर्ती आहेत. घोडे मात्र प्रमाणबद्ध नाहींत. प्रत्येक खांबावर निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें आहेत. मेंढा, घोडा, गरुड, नंदी, हत्ती, रेडा, स्त्री व पुरुष यांचीं चित्रें–मूर्ती– खोदलेलीं आहेत. वरील छत अर्धचंद्राकार असून त्यांत लांकडी फळ्या बसविलेल्या आढळतात. मुख्य गाभाऱ्यांत बुद्धाचा दागोबा (धातुगर्भ) आहे. हा इतर ठिकाणच्या दागोबापेक्षां साधा असून दोन मजली आहे व साधारण भेलसाचैत्याप्रमाणें दिसतो. दागोबाच्या माथ्यावर फार जुनी अशी लांकडी छत्री आहे. तिच्याखालीं दागोबाच्या माथ्याच्या कडांवर नकशी कोरलेली आहे. दागोबाच्या वायव्येस, माथ्यावर एक १० इंचांचें भोंक आहे; यांतून बुद्धाचा अवशेष आंत ठेवतां येत असावा. याशिवाय आणखी ८ भोकें आहेत, त्यांचा उपयोग कांहीं वस्तु अडकविण्याच्या कामीं होत असावा. या चैत्याच्या वरतीं सज्जा आहे. त्यांत ठेवलेल्या खिडक्यांतून खालीं उजेड पडण्याची सोय केलेली आहे. अशा सोयी भाजे, कोंडाणें व भेलसा येथील लेण्यांत केलेल्या आहेत. महाद्वाराजवळच्या कमानीला लांकडी कमानीचा आधार आहे. ही जुनी असावी; जरी ती नवी असली तरी प्राचीन कमानीचाच तो नमुना असावा हें खास. सांची येथील दगडी कमानीबरहुकूम ही आहे. यावरून वरील म्हणणें ग्राह्य ठरतें. कांहींचें म्हणणें असें आहे कीं, कमान ही मुसुलमानांनींच हिंदुस्थानांत प्रथम (इमारत कामांत ) उपयोगांत आणिली. परंतु हें खरें वाटत नाहीं. पुढील द्वारमंडप हा गाभाऱ्यापेक्षां जास्त रुंद असून मोठ्या दोन अष्टकोणी खांबांचा त्याला आधार आहे. यावरील सज्यांतून मोठ्या सज्जांत असलेल्या खिडक्यांना उजेड पुरविण्याची व्यवस्था केलेली आहे. चैत्याच्या पुढील पडवींत दोन अष्टकोनी कोरींव खांब आहेत. तेथील तीन हत्ती, त्यांच्यावर असलेल्या उत्तरकालीन ( ५ व्या अगर ६ व्या शतकांतील ) बुद्धाच्या बैठ्या मूर्ती, शिलालेखाच्या शिलापट्टिका, देवळाचे दरवाजे, स्त्रीपुरुषनर्तकांची व दोन जोडपीं हीं पहाण्यासारखीं आहेत. या जोडप्यांच्या माथ्यावरहि दरवाजे व खिडक्या एकावर एक अशा दोनचारदां दाखविलेल्या असून त्यांवरील कोरींव काम पाहण्यालायक आहे. या पडवीस एक मधील व दोन बाजूंचीं अशीं तीन दारें असून त्यांच्यावरील कमानी घोड्याच्या नालासारख्या आहेत. मधल्या दाराशीं दोन्ही बाजूस स्त्रीपुरुषांचें एक जोडपें आहे. स्त्रीच्या पायांत सांखळ्या, कमरेस कमरपट्टा व कानांत वाळ्या आहेत. पुरुषानें केसांची गांठ कपाळाच्या मधोमध मारलेली असून त्याच्या कानांत कुंडलें व कमरेस कमरपट्टा आहे. उजव्या बाजूस एक बुद्धाची मूर्ती असून तिचें आसन कमळाचें असून तें नागांनीं उचलून धरलेलें आहे. बुद्धाच्या दोन्ही बाजूस चोपदार, चवरीवाले व इतर कांहीं मूर्ती आहेत. या ठिकाणीं अनेक मूर्ती कोरलेल्या आहेत. एकमेकांच्या खांद्यावर अगर गळ्यांत हात घातलेल्या व अंगावर दागदागिने घातलेल्या अशा स्त्रीपुरुषांच्या जोडप्यांच्या बऱ्याच मूर्ती आहेत. त्यांच्यावरून तत्कालीन पोषाख, केशरचना व दागदागिने यांची चांगली कल्पना होते. बुद्धाच्याहि चार पांच मूर्ती आहेत. त्यांपैकीं कांहीं उभ्या, कांहीं बैठ्या व कांहीं उपदेश अगर व्याख्यान करीत असलेल्या आणि शिष्यांनीं घेरलेल्या अशा आहेत. पुरुषांच्या हातांतहि कडीं अगर मणिबंधासारखे दागिने असत असें दिसतें. पद्मपाणी बुद्धाच्याहि दोन तीन मूर्ती आढळतात. ही मूर्ती कमळाच्या सिंहासनावर उभी असलेली, डाव्या हातांत कमळ व उजवा हात अभयदर्शक अशी कोरलेली असते. तिच्या दोन्ही बाजूस भक्तगण दाखविलेले असतात. कांहीं बुद्धांच्या मूर्तींवर नागाचें छत्र असतें. एके ठिकाणीं विचारांत तंद्री लागलेला बुद्ध दाखविलेला असून त्यावर एक कमान आहे. जवळच एक शिलालेखहि आहे. पडवीच्या डाव्या बाजूसहि मूर्ती वगैरे

आहेत. तेथें असलेले तीन सोंडतुटके हत्ती अति उत्तम कुसरीचे आहेत. हत्तींच्या वर व बाजूस समाधि लागलेल्या बुद्धाच्या मूर्ती आहेत. पडवीच्या पाठीमागील भिंतींत तीन दारें असून त्यांवरील तीन शिलापट्टिकांत कोरींव छोट्या मूर्ती व दोन शिलालेख आहेत. या दारांच्या प्रत्येक बाजूस एक स्त्रीपुरुषांचें जोडपें आहे. त्यांच्या पोषाखावरून व पुष्कळ दागिन्यांवरून शातकर्णी कालांतील या मूर्ती असाव्यात असें वाटतें. याला वळकटी, त्यांच्या शेजारीं असलेल्या शिलालेखांवरून मिळते. येथें बुद्ध हा उपदेश करणारा दाखविला आहे. जवळच एक मोठी व डोक्यांत पुष्कळ दागिने घातलेली अशी स्त्रीची मूर्ति आहे. बहुधा हिनेंच या ठिकाणचें कोरींव काम केलें असावें. हा भाग बहुधा ५ व्या अगर ६ व्या शतकांतील असावा असें त्याच्या एकंदर स्वरूपावरून वाटतें. पडवीच्या उत्तरेस वरीलप्रमाणेंच तीन हत्ती व बुद्धाच्या तीन मूर्ती ( वरीलप्रमाणें परिवारासह ) आहेत. येथील कांहीं भाग अपुरा राहिला आहे. हा भाग महायानपंथाचा असून तो इ. स. ४००-५०० च्या सुमाराचा असावा. येथेंच लेणें कोरणाऱ्याचा मूळ शिलालेख आहे. जवळच नर्तन करणाऱ्या व इतर स्त्रीपुरुषांच्या लहान लहान अनेक मूर्ती आहेत. पडवीच्या पुढील भागांत पहाण्यालायक असा सिंहस्तंभ आहे. हा सोळाकोनी असून याचा एकंदर आकार भेलसा येथील खांबासारखा आहे. याच्यावर चारी बाजूस चार सिंह आहेत. त्यांचे मागील भाग एकमेकांस जोडलेले आहेत. परंतु ते निरनिराळे असल्याचें दिसत नाहीं व जोडले असल्यास त्यांचे जोड तर मुळींच आढळत नाहींत. याच्याच जोडीला दुसरा खांब ( हल्लींच्या एकवीरा देवीच्या देवळाच्या भागाखालीं ) असावा व त्यावर बौद्धधर्माचें प्रख्यात चिन्ह जें चक्र तें असावें असें वाटतें.

पडवी व गाभारा मिळून सर्व लेण्यांत एकंदर बावीस शिलालेख आहेत. त्यांतील सारांश पुढीलप्रमाणें आहे:— (१) पडवीच्या डाव्या टोंकास, तीन हत्तींच्या माथ्यावरील.—"वैजयंतीच्या भूतपाल शेट यानें जंबुद्वीपांतील उत्तम असें शिलागृह बांधिलें". (२) सिंहस्तंभावरील—"मराठा, मोठा योद्धा. गोतीचा मुलगा अग्मिमित्राणक यानें दिलेली सिंहस्तंभाची देणगी". (३) पडवीच्या उजव्या टोंकास हत्तीच्या पायथ्याशीं—"पहिल्या दोन हत्तींची व त्यांच्यावरील व खालील पट्टिकांची देणगी देणारा पूज्य भदंत इंददेव". (४) उजवीकडील लहान दरवाज्यावरील—"धेनुकाकतचा सिंहदत्त गांधी ( अत्तरवाला ) याची दरवाज्याची देणगी". (५) पडवीच्या बाहेरील खांबावर—"महादेवनक गृहस्थाची आई भाईल हिची देणगी". (६) त्याच खांबावर खालच्या बाजूस—"धेनुकाकतचा रहिवाशी वेणुवस सुतार याचा मुलगा शमीक यानें दार व द्वारमार्ग तयार केला". (७) गाभाऱ्यांत डावीकडील चौथ्या खांबावर -"धेनुकाकतच्या सिहधय नांवाच्या यवनाची खांबाची देणगी". (८) पांचव्या खांबावर उत्तर बाजूस —"सोपारक येथील नंदा नांवाच्या बाईचा पुत्र शतिमित यानें आपल्या आईबापांसह ही खांबाची देणगी आपला मामा व गुरु जो भदंत धमुतरय त्याच्या संस्मरणार्थ सेवेसाठीं दिली". (९) वरील लेखाखालीं—"भदंत धमुतरय याचा भाचा सोपारकचा शतिमित यानें, ज्यांत (बुद्धाचा) अवशेष आहे अशा खांबाची देणगी दिली". (१०) याच बाजूच्या तिसऱ्या खांबावर—"धेनुकाकतच्या धम नांवाच्या यवनाची देणगी". (११) पुढील सातव्या खांबावर—"धेनुकाकतच्या उसभदतचा पुत्र मितदेवनक याची खांबाची देणगी". (१२) सज्जांतील आंतल्या भागांत—"जोगीण अशाढमिता इची देणगी". (१३) मध्य दरवाजाच्या उजवीकडे वरती—"पूर्णाप्रत दीनिक याचा पुत्र व राजा खहराट खतप नहपान याचा जांवई, तीन लक्ष गाई देणारा, ज्यानें सोनें (दान) दिलें आणि जो बनासा नदीच्या तीर्थास आला होता, देवब्राह्मणांस सोळा गांवें देणारा, पवित्र पभास क्षेत्रीं आठ ब्राह्मणांचीं लग्नें करून देणारा, तीन लक्ष गाईचें दान करणारा, आणि पावसाळ्यांत या लेण्यांत आश्रयार्थ राहणाऱ्या व चाऱ्ही दिशांकडून आलेल्या संघांतील भिक्षूंनां ज्यानें वलुरक येथें मुक्काम असतांना करजक गांव इनाम दिलें असा उसभदत". (१४) याच दरवाज्याच्या डावीकडे—"राजा वासीठीपुत प्रख्यात प्रभु ( सामिसिरी ) [ पुळुमायी ] सातव्या वर्षी उष्णकाळांतील पांचव्या पंधरवड्याचा, आणि पहिला दिवस; त्या दिवशीं सोमदेव, फार शूर वसीठी व मितदेव यांचा पुत्र कोसीकीचा नातु. ओखलकीयचा मोठा लढवय्या, यानें वालुरकांच्या संघास एक गांव दिलें. या देणगीचा उपयोग वालुरकाच्या लेण्याची दुरुस्ती करण्याकडे करणें". (१५) उजव्या हाताकडील दरवाजाच्या उजव्या बाजूस स्त्रीपुरुषजोडप्यांच्या वर—"भदसम भिक्षूनें दिलेली जोडप्यांची देणगी". (१६) पडवीच्या पुढें, उजव्या कोंपऱ्यास आंतील बाजूस, एका जोडप्यावर वरील १५ व्याप्रमाणेंच. (१७) मध्यदरवाजाच्या डावीकडे, चित्राच्याखालीं—"... समणची आई हिची वेदिकाची देणगी". (१८) याच दरवाजाच्या उजवीकडे खालीं—"धूणिक याची आई कोडी भिक्षुणी इची वेदिकाची देणगी; नदिक यानें तयार केली." (१९) मध्यदरवाजा व उजवीकडील दरवाजा यांच्यामधील बुद्धमूर्तीच्या वर—यांत "मामल (मावळ) येथील तालुकदारानें भिक्षूंनां वासिस्ठी पुत्राच्या १९ व्या वर्षी दिलेली देणगी" नमूद केली आहे.

सिंहस्तंभाच्या वायव्येस कांहीं विहार आहेत. एक पाण्याचें टांकें व जवळच एक पडका दागोबा आहे. याच्या उत्तरेस १०० फूट लांबीच्या लेण्यांत २।३ विहार आहेत. त्याच्याहि उत्तरेस आणखी विहार, टांकीं व पडका दागोबा

आहे. यांच्यावर एक २८×२६×८ फुटांचा विहार असून त्यांत ४ खोल्या दोन बाजूस व पांच खोल्या मागें आहेत. खोलींत एक एक दगडी ओटा ( निजण्यास ) आहे. एका खोलींतून वर जाण्यास जिना आहे. याच्या वर आणखी एक विहार ३४×८×९ फुटांचा आहे. यांत १४ खोल्या आहेत; डावीकडे एक मोठा दगडी ओटा आहे; येथें लांकडीकामाचा अवशेष दिसतो. पूर्व व दक्षिण बाजूच्या भिंतींत अलीकडे कोरलेल्या बुद्धाच्या दोन मूर्ती आहेत. याच्या पुढें चार खिडक्या व त्याच्या पुढें ४०×७×१२ फुटांची पडवी आहे. तिच्या पुढें उत्तरेस एक पाण्याचें टांकें व त्याच्या पुढें सज्जा आहे. उत्तरेस आणखी एक ३८×१७ फूट लांबीरुंदीचा विहार असून त्यांत सहा खोल्या—निजावयाच्या दगडी ओट्यांसह—आहेत. या विहाराच्या पूर्वभिंतीवर ( २० वा ) शिलालेख आहे—" पूर्णाप्रत. राजा वासिठीपुत प्रख्यात ( सिरी ) पुलीमावी, ( त्याच्या राज्याच्या ) चोविसाव्या वर्षी, हेमंतऋतूंतील तिसऱ्या पंधरवड्यांतील, दुसऱ्या दिवशीं नऊ खोल्यांच्या या मंडपाची उदार देणगी अबुलामचा रहिवासी एक सोवसक, सेतफरनचा मुलगा हरफरन यानें दिलेली, चारी दिशांतून आलेल्या महासंघांतील संघाच्या ताब्यासाठीं. बाप, आई, सर्व लोक व जीवंत वस्तू यांच्या सततच्या कल्याणाभिवृद्धीसाठीं. एकविसाव्या वर्षी स्थापिलें. माझ्या-सह बुधरखित आणि त्याची आई उपासिका. बुधरखिताच्या आईनें एक रस्ता तयार करून अणीक धर्मकृत्यास मदत केली. " यापुढील खोलींतील पाण्याच्या टांक्यावर पुढील ( २१ वा ) शिलालेख आहे—" ( पुळुमायीच्या ) पांचव्या वर्षी व हेमंतपक्षांत भदंताच्या शिशिष्यिणीनें हें लेणें कोलें व एका श्राविकेच्या भाचीनें हें टांकें भिक्षुसंघा-करिता केलें. "

चैत्यागाराच्या दक्षिणेस अनेक कोरींव कामें आहेत. एक प्रशस्त पण अपुरा असा दिवाणखाना, एक लहान खोली ( हिच्यांत पाठीमागील भिंतींत बुद्धमूर्ति आहे ), एक पाण्याचें टांकें, एक मोठा विहार ( आंत नऊ खोल्या असलेला ) आहे. या विहारांत मागल्या भिंतींत एक बुद्धाची मूर्ति, कमळावर बसलेली, कमळाखालीं दोन हरिणांच्यामध्यें चक्र असलेली, मागें दोन पूजक असलेली, दोन्ही बाजूंस चवरीवाले व डोकीवर दोन विद्याधर असलेली अशी आहे. या दिवाणखान्यांत एक दरवाजा, दोन खिडक्या व पडवी असून उत्तरेकडे एक खोली आहे. समोर दोन अष्टकोनी खांब व त्यांवर लहानसा एक सज्जा आहे. या दिवाणखा-न्याच्या पुढें दोन खोल्या आहेत, त्यांपैकीं दक्षिणाभिमुखी खोलीच्या पूर्वबाजूच्या भिंतींत पुढील ( २२ वा ) शिलालेख आहे—" पूर्णाप्रत. बुधरखिताची पुण्यकारक देणगी. " याच्याहि पलीकडे पूर्वेस एक गुहा, असून तींत एक खोली व एक टांकें आहे.

मुख्य लेण्याच्या उजव्या बाजूनें या पर्वताच्या माथ्या-वर जाण्यास एक वाट आहे. या रस्त्यावर तीन जुन्या इमारतींचे अवशेष आढळतात. पैकीं एक देऊळ व दुसरी स्तूपाची असावी. ही जागा कार्ले बंगल्याच्या जागेहून ५५० फूट उंच आहे.

कार्ल्याच्या आसपासच्या डोंगरांत अनेक ठिकाणीं थोडथोडीं व अपुरीं कोरींव कामें आहेत. कोठें खोल्या तर कोठें पाण्याचीं टांकीं आढळतात. कार्ल्याजवळील देवगड येथें एक अपुरा विहार आहे. त्यांतील खांब पहाण्यासारखे आहेत. गांवाच्या पूर्वेस पहाडाच्या चढावावर तळीं व टांकीं आहेत. शेलेटण गांवाच्या दक्षिणेस एक मोठें तळें व कुंड आहे. उत्तरेस धान्याचें दगडी अंबार व एक गोलस्तंभ ( अपुरा दागोबा ) आहे. टांकवें गांवीं दोन मोठीं तळीं, वळक गांवीं एक अपुरा लहानसा दागोबा, एक लहान लेणें, एक कमान, एक खोली व एक अंबार आहे. अयरें गांवीं व कार्ले गांवच्या ईशान्येकडील डोंगरांत अनेक ठिकाणीं पुष्कळ कोरींव कामें आहेत तीं बहुधा एक एक भिक्षूच्या राहण्याच्या सोईचीं आहेत. वलुरक हें कार्ल्याच्या बौद्धविहाराचें प्राचीन नांव असावें. [ पुणें. ग्याझे. भाग ३; फर्ग्युसन–केव्ह टेंपलस् ऑफ इंडिया; मुंबई ग्याझे. पु. १५ भा. २; कित्ता. पु. १६; आर्कि ऑलॉ. सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया. नं. १०; मुंबई. ग्याझे. पु. १३ ]

**कार्लोविझ**—हें शहर सिर्मिया या प्रांतांत डान्यूब नदीच्या उजव्या तीरावर आहे. ह्या शहराची लो. सं. १९०० सालीं ५६४३ होती. हें एका धर्मगुरूच्या राहण्याचें ठिकाण आहे. येथें पुष्कळ शाळा, देवालयें व दवाखाने आहेत. येथील द्राक्षांपासून उत्तम मद्य काढतात. या शहरीं १६९१ मध्यें तुर्कांचा पराभव झाला.

**कार्वेटिनगर**, जमीनदारी.—मद्रास इलाख्यांत उत्तर अर्काट जिल्ह्यातील प्राचीन जमीनदारी. क्षे. फ. ९४६ चौ. मै हींत ६६७ खेडीं असून एकंदर लो. सं. ( १९०१) ३,४१,२४० आहे. आग्नेय भागाखेरीज सर्व मुलुख डोंगराळ असून त्यांतून पुष्कळ लहान लहान नद्या वहातात. पैकीं सदाशिवकोण नांवाच्या दरींतून जाणाऱ्या प्रवाहाकांठचा प्रदेश फार रमणीय आहे. जमीनदारींतील मुख्य नद्यांनां नदीकांठच्या गांवांचीं नांवें दिलेलीं आहेत. उ. नारायणवनम्, नगरि व तिरुत्तनि. येथील जमीन सुपीक आहे. कृत्रिम नीळ निघाल्यापासून नैसर्गिक निळीचा खप कमी झाला; तरी येथें अद्याप निळीची लागवड बरीच होते. जमीन-दारीचें वार्षीक उत्पन्न ६ व ७ लक्ष रुपये यांच्या दर-म्यान आहे. पत्तुर स्टेशनपासून ७ मैलांवर कार्वेटीनगर हें जमीनदारीचें मुख्य ठिकाण आहे. व येथेंच जमीनदार ( याला राजा असा किताब आहे. ) राहतो.

इ. स. आठव्या किंवा नवव्या शतकाच्या सुमारास गोदा-वरीच्या मुखाजवळील पीठापुरम् येथून साल्वरेड्डी कुळांतील

पुरुषांनीं येऊन कार्वेटीनगरम् येथील जमीनदारी मिळविली अशी माहिती तेथील एका स्थानिक विश्वसनीय अशा इतिहासावरून मिळते. यांच्यापैकीं साल्व नरसा रेड्डी नांवाच्या पुरुषानें शेवटचा पूर्व चालुक्यवंशांतील राजा विक्रमादित्य( इ. स. १०१६–१०२३ –सर वॉल्टर इलिअट यांनीं इ. स. ९३० हा दिलेला सन 'सेवेल' यांच्या मतें चूक आहे.) याची मर्जी संपादन केली व त्यानें त्याला तिरुपतीच्या भोंवतालच्या प्रदेशावरील अधिकारी नेमलें. तेथें साल्वनरसा रेड्डी यानें नरसापुरम् नांवाचें गांव वसविलें. याची वंशावळ पुढें दिल्याप्रमाणें सांपडते.

साल्वनरसा रेड्डि
पहिला राजा ( सुमारें इ. स. १०२० )
|
× × ×
|
साल्व वेंकटपति नायडु
|
साल्व भीम नायडु
|
साल्वनरसिंह नायडु.
|
साल्व भुजंग नायडु

शाली. श. ११५२ (इ. स. १२३०) मध्यें चोलराजा राजराज यानें वेंकटपति नायडु याच्याकडे फक्त २४ गांवें ठेवलीं; पण पुढील चार पिढ्यांमध्यें चोल राजांची सत्ता कमी कमी होत गेली व वेंकटपतीचा मुलगा भीम व त्याचा नरसिंह व त्याचा भुजंग यांनीं कार्वेटिनगर घराण्याचें वैभव वाढविलें. शाली. श. १२३६ ( इ. स. १३१४ )मध्यें या घराण्यांतील मुलगी, कोंडवीडुरेड्डी घराण्याचा मूलपुरुष प्रोलि अथवा प्रोलेयरेड्डी यास दिली. भीम नायडूनें आपली जहागीर वाढविली होती. नारसिंहानें चेर ( ? )राजा कीर्तिवर्मा यास मदत केली व तो स्वतंत्र बनला. त्यानें मोठ्या दक्षतेनें ३५ वर्षें राज्य केलें. भुजंगाचा पश्चिम चालुक्यराजा सोमेश्वरानें पराभव करून त्याला कल्याणीस नेऊन कैदेंत ठेविलें. तेथें तो कैदेंतच मेला. यानंतर लवकरच हें विजयानगरच्या सत्तेखालीं गेलें. पुढें दोनशें वर्षांनीं यांचा वंश खुंटला व हल्लींचे बोम्म राझु घराणें यांच्या जागीं आलें. रेड्डिवंशांतील शेवटचा पुरुष शेषाचलरेड्डी हा होता. त्यानें आपल्या कुळाचें नांव पुढें चालविलें पाहिजे अशी अट घातली. त्यामुळें हल्लींचे जमीनदार हे आपल्याला साल्व हें उपपद लावितात.

नरसारेड्डी यास चालुक्य राजानें चालुक्यांचा शिक्का व त्यांचें सूकरचिन्ह वापरण्याची परवानगी दिली होती. हल्लींचे जमीनदार हें मानाचें चिन्ह अद्याप वापरीत असतात.

मि. कॉक्स यानें बोम्म राझू घराण्याची पुढीलप्रमाणें हकीकत दिली आहे. उत्तरसरकार प्रांतांतील एका कुळांतील पुरुष, गेड्डीमखराझू व वोप्पा राझू हे दक्षिणेंत प्रवास करीत करीत आले व त्यांनीं एका लुटारूंच्या टोळीस हांकून दिलें. ही बातमी कार्वेटिनगरच्या जमीनदारास लागून त्यानें त्यांस बोलाविलें. त्यांनीं जमीनदाराची चाकरी पत्करली. त्यांपैकीं मखराझू हा मुख्य दिवाण झाला व पुढें त्याच्या मालकाचा वंश खुंटल्यामुळें तोच जमीनदारीचा मालक झाला व वोप्पाराझू त्याचा मुख्य दिवाण झाला. हल्लींचे जमीनदार याचे वंशज आहेत. ते आपणास शुद्ध क्षत्रिय समजतात. [सर वॉल्टर इलियट न्युमिसम्याटिक ग्लॅनॉग्ज; मद्रास जर्नल व्हा. ७; २०; सिवेल—डिनस्टिज ऑफ साऊथ इंडिया; म्यानुएल नॉर्थ अर्काट ].

**कालकेय** (१)—कश्यप ऋषीची स्त्री काला हिचे पुत्र व त्यांचे वंशज. हे वृत्रासुराच्या बळानें देवांशीं युद्ध करीत असतां ज्यावेळीं इंद्रानें वृत्रासुरास मारिलें त्यावेळीं हे सर्व समुद्रांत लपले. यांनीं दिवसास लपून राहून, रात्रीं बाहेर निघावें व ऋषींनां भक्षावें असा क्रम चालविला असतां च्यवन ऋषीच्या आश्रयास रहाणारे शंभर व भरद्वाजाश्रित वीस याप्रमाणें असंख्य ऋषी यांनीं भक्षिले. तेणेंकरून उर्वरित ऋषी भय पावून गुहांतून लपून राहिले. तरीहि त्यांचा उपद्रव कमी न होता यज्ञयागादिक कार्यें होईनातशीं झालीं. पुढें सर्व ऋषी इंद्रास पुढें करून ब्रह्मदेवास शरण गेले. त्याकाळीं त्यांनीं अगस्त्य ऋषीकडे जाण्यास सर्वांस आज्ञा दिली. त्यावरून ते सर्व अगस्त्याकडे आले. आणि कालकेयांनीं दिलेल्या त्रासाचें वृत्त त्यांनीं त्यास निवेदन केलें. तें ऐकून अगस्त्यानें सर्वांस अभय देऊन समुद्रतीरीं आगमन केलें व तपोबलानें सर्व समुद्र प्राशिला. त्या योगानें हे सर्व कालकेय त्याच्या उदरांत प्रविष्ट होऊन आयतेच मरण पावले.

(२)मारीच नामक असुराची स्त्री कालका, हिचे पुत्र. यांस कालखंड असेंहि म्हटलेलें आहे. हे सर्व हिरण्यपुरांत राहून इंद्रास भारी त्रास देत असत. परंतु इंद्राचें यापुढें कांहीं चालेना. पुढें द्वापरयुग समाप्तिकाळीं पंडुपुत्र अर्जुन स्वर्गास गेला असतां, इंद्रानें त्यास यांच्यावर पाठविल्यावरून त्याचें व ह्यांचें बराच काळपर्यंत युद्ध होऊन शेवटीं हे सर्व व पौलोम, अर्जुनाच्या हातून मरण पावले. [ प्राचीन कोश ].

**कालगणना**.— 'विज्ञानेतिहास' या ज्ञानकोशाच्या पांचव्या विभागांत 'प्राथमिक ज्ञानाची उत्पत्ति—कालगणना आणि तिच्यासाठीं आरंभबिंदूची योजना' नांवाचें एक प्रकरण ( ४ थें ) आहे. त्यांत कालगणनेचा नैसर्गिक व व्यावहारिक गोष्टींशीं संबंध, हिंदु पंचाग, बौद्ध, जैन, बाबिलोनी, ईजिप्ती, रोमन, आर्मेनियन, मुसुलमानी, ईजियन इत्यादि कालगणना, मृत कालगणनापद्धती, कालगणनाशास्त्राचा इतिहास, भरतखंडांतील शकसंवत्सरात्मक कालगणना, सौर व चांद्र वर्ष, कालमापनाच्या प्रारंभबिंदूंतील विविधता

यासारखे महत्वाचे विषय सविस्तर विवेचिले आहेत. याच ग्रंथांतील ज्योतिषशास्त्राच्या इतिहासावरील प्रकरण, ( ८ वें ) वरील प्रकरणांतील माहितीला पूरक म्हणून चांगलें उपयोगी पडेल. अलीकडील पंचांगसंशोधनाची हकीकतहि यांत आहे. आपल्याकडे ज्याप्रमाणें पंचांगशुद्धिविचार चालू आहेत त्याचप्रमाणें यूरोपांतहि कॅलेंडरची सुधारणा होत आहे. वर्षांतील सर्व महिन्यांच्या सर्व तारखा ठराविक वारींच याव्या असा तेथें प्रयत्न चालू आहे. सर्व महिन्यांचे सारखे दिवस असावे असे प्रयत्न चालू आहेत. वर्षे अनेक किंवा सर्व काळ उपयोगी पडणारीं कॅलेंडरें ( कालादर्शकें ) निघत आहेत. जास्तींत जास्त २०० वर्षे टिकणारीं कॅलेंडरें आजपर्यंत दिसत असत. पण आज चारपांच हजार वर्षेहि टिकतील अशीं कॅलेंडरें मिळतात ( उदा. रा. शरच्चंद्र वामन रानडे यांचें सर्वकालीन कालादर्श-नांवाचें पर्पेच्युअल कॅलेंडर ). आपल्या पंचांगांतील तिथींपेक्षां इंग्रजी तारखा डोळ्यांसमोर असणें साधारण सुशिक्षितालाहि आज अत्यावश्य झालें असल्याकारणानें इंग्रजी कॅलेंडरें आज जिकडे तिकडे दिसतात. व्यापारी जाहिराती म्हणूनहि तीं वांटलीं जातात. सर्वत्र चालणारें व सर्वांनां समजणारें कालमापन आज इंग्रजी कॅलेंडर होऊन बसलें आहे यांत शंका नाहीं.

**कालंदर**—संयुक्तप्रांत, पंजाब व काश्मिर यांतील मुसुलमानांची जात. हे सुनी पंथांतील धार्मिक विधी आचरितात. इ.स.१३२३–२४मध्यें पानिपत येथें होऊन गेलेल्या अलीकालंदर साधूचे अनुयायी असल्याचें हे सांगतात. कालंदराचा अर्थ, सर्वसंगपरित्याग करून परमेश्वरभजनीं लागलेला मुसुलमान साधु. हे लोक माकडें, अस्वलें वगैरे घेऊन गांवोंगांव हिंडतात व चोऱ्याहि करतात. हे प्रथम हिंदु असून धर्मांतरानें मुसुलमान झालेले असावे.

क्रूक म्हणतो त्याप्रमाणें हे लोक गारुडी नाहींत. लांग्रे कालंदर या लोकांशीं या जातीचा कांहीं संबंध नाहीं; परंतु रामपूरच्या रोहिला कालंदर या लोकांशीं त्यांचा संबंध आहे. या लोकांत (गोत्रांतर विवाह करणाऱ्या) तीन गोत्रें अथवा पोटजाती आहेत. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—खोखर, घोरावाल व चिंदी. या तीन जातींपैकीं चिंदी या जातीला पंक्तिबाह्य समजतात. या लोकांची एक संयुक्त पंचायत आहे व तिचा सरपंच चिंदी जातीचा आहे. जेवण व दंड या रूपानें अपराधाबद्दल शिक्षा दिली जाते. कधीं कधीं गुन्ह्याबद्दल जातींबाहेरहि काढलें जातें [सें. रि. १९११ (पंजाब व सं. प्रां.क्रूक]

**कालना, वि भा ग.**—बंगाल इलाखा. वरद्वान जिल्ह्याचा आग्नेयीकडील विभाग. उत्तरअक्षांश २३°,७' ते २३° ३६' व पूर्वरेखांश ८८° ते ८८° २५'. क्षेत्रफळ ३८६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) २,२५,२२५. कालना, पुरवस्थली व मंतेश्वर हे तीन तालुके या विभागांत आहेत. यांत कालना शहर व ५५६ खेडीं आहेत. या विभागांतील नादनघाट येथें नदीमार्गानें तांदुळाचा मोठा व्यापार चालतो.

ता लु का—क्षे. फ. १३३ चौरस मैल, लोकसंख्या (१९११) ३९,४११. यांत कालना शहर व २०९ खेडीं आहेत.

गां व.—बंगाल इलाखा, वरद्वान जिल्हा. कालना विभागाचें मुख्य ठिकाण असून भागीरथीच्या उजव्या तीरावर वसलेलें आहे. उत्तरअक्षांश २३° १३' व पूर्वरेखांश ८८° २२'. लोकसंख्या ( १९११ ) ८६०३. मुसुलमानी अमलांत हें फार महत्वाचें ठिकाण असून भागीरथीच्या कांठावर पूर्वी असलेल्या एका विस्तीर्ण किल्ल्याचे अवशेष येथें अद्यापि पहावयास सांपडतात. बाराहि महिने येथपर्यंत बोटी येऊं शकतात. पूर्वी येथें मोठा व्यापार चालत असे; परंतु ईस्ट इंडिया रेल्वे सुरू झाल्यापासून या गांवाचें महत्व उत्तरोत्तर कमी होत चाललें आहे. येथें इ. स. १८०९ सालीं बांधलेला १०९ शिवांच्या देवळांचा समूह आहे. इ. स. १८६९ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३–४ सालीं तिचें उत्पन्न १६००० रुपये असून खर्च १४००० रुपये होता.

**कालनेमी**—लंकेंतील एक राक्षस. युद्धांत लक्ष्मण मूर्च्छित झाला असतां मारुती द्रोणाचलावरील औषधी आणावयास जात आहे असें रावणानें ऐकून यास त्यानें त्याच्या मार्गात विरोध करावा म्हणून पाठविलें होतें. त्याप्रमाणें हा ऋषिवेष धारण करून मारुतीच्या मार्गांत बसला असतां, जलपानार्थ मारुती तेथें थांबला. परंतु मारुतीस तें त्याचें कपट लवकरच समजलें. म्हणून त्यानें मग विलंब न करतां त्यास मारून आपल्या कार्यार्थ पुढें गमन केलें. ( अध्यात्मरामायण युद्धकांड स. ७ ).

**कालमक**—रशियांतील एक मानववंश. हा मंगोल महावंशांत मोडतो. रशियाच्या आस्त्राखान मुलुखांत कालमक नांवाचा जो प्रदेश आहे तो या लोकांचा होय. या कालमकचें क्षेत्रफळ ३६,९०० चौ. मै. असून लोकसंख्या सुमारें १,३०,००० आहे. या लोकसंख्येपैकीं २७,७०० वर वस्ती किबितकां ( तंबू ) तून राहाते. या प्रदेशांत ६० हून अधिक बौद्ध मठ आहेत. पुष्कळसे कालमक लोक भटकत रहातात. उत्तम जमीनीवरहि त्यांनां शेतकी करतां येत नाहीं. कृषि, वृक्षसंवर्धन हीं कामें यांच्याकडून करून घेण्याचे प्रयत्न चालले आहेत. बहुधा घोडे व गुरें बाळगून हे रहातात. यांच्या बायका कांहीं घरगुती धंदे करतात व पोटाला मिळवितात. चीनमधील मिंग घराण्याच्या कारकीर्दीत टेघोन नांवाचा एक कालमक खान प्रसिद्धीस येऊन त्यानें वायव्य आशियांत एक राज्य स्थापिलें. त्याच्या मृत्यूनंतर ( १४४४ ) हें फार काळ टिकलें नाहीं. पण या कालमकांनीं रशियन मुलुखाला फार त्रास दिला. १७व्या शतकांत झुंगारियांतून ते व्होल्गामुखाकडे आले. त्यांनीं तेथील तार्तार व नोगाई लोकांनां हांकून लावून डॉन कोसॅक लोकांशीं ते युद्ध खेळले.

१६४८ त सायापंडितानें कालमक लिपी निर्माण करून मंगोल भाषेला सुलभता आणली. पूर्व मंगोल व कालमक या पोटभाषांत फारसा फरक नाहीं. मंगोल खागन शब्दाचें कालमक रूप खान असें होतें.

कालमकांचा धर्म लामासंप्रदायी आहे. त्यांचे अचारविधी फारसे उच्च व सुसंस्कृत दिसत नाहींत.

ह्यांच्यांत लग्न म्हणजे एक शर्यतच आहे. कुमारिका घोड्यावर बसून तो घोडा भरधांव फेंकिते. तिच्यामागून तिला वरण्याची इच्छा करणारा तरुण मनुष्य आपला घोडा सोडितो. मागून जाऊनहि त्यानें तिला गांठिलें म्हणजे ती त्याची वधू होते व ज्या जागेवर तो तिला गांठील त्याच ठिकाणीं त्या उभयतांचें लग्न लागतें. ह्या लोकांत नीतीचें मान शून्य अंशावर आहे असें म्हणावें लागतें. ह्या लोकांचे उपाध्याय लग्नें करीत नाहींत. पण समाजांतील वाटेल त्या स्त्रीशीं एक रात्र गमन करण्यास त्यांना मुळींच प्रत्यवाय नसतो ! उलट उपाध्यायाशीं गमन करणें हा एक मोठा मान समजला जातो ! मंगोल व कालमक लोकांत शरीरसंबंध कोणाशीं करावा व कोणाशीं करूं नये ह्याविषयीं कांहींच निर्बंध नाहीं. कोणीहि स्त्री निपुत्रिक राहूं नये येवढाच काय तो त्यांचा पुरुषार्थ आहे व त्याअन्वयें ते पाहिजे त्या स्त्रीशीं पशुवत् गमन करितात. या लोकांची आणखी माहिती 'मंगोल' या लेखांत सांपडेल.

[ संदर्भ ग्रंथ.—स्ट्राहलेनवर्ग—डिस्क्रिप्शन्-रशिया, सायबेरिया अँड ग्रेट टार्टरी; बेल—ट्रॅव्हेल्स टु डायव्हर्स पार्ट्स ऑफ एशिया; गिलमोर—अमंग दि मोंगोल्स; पोपोव्ह रिपोर्ट ऑन दि नोमाड्स ऑफ मोंगोलिया; पार्करचा ए. रि. ए. मधील मोंगोल वरील लेख ३ रा. ].

**कालयवन.**—कोणा एका यवनाधिपतीनें यादवांच्या पराभवार्थ आपल्या स्त्रीच्या ठायीं क्षेत्रांत गर्गमुनी पासून निर्माण करविलेला पुत्र. हा मोठा प्रतापी व यादवांस अजिंक्य असे. एकदां हा मोठ्या सैन्यासहित यादवांवर चालून आला असतां त्यांशीं याचा मोठा भयंकर संग्राम झाला. त्यांत कृष्णानें पाहिलें कीं यापुढें युद्ध करून जय मिळणें मोठें कठिण दिसतें. यास्तव यास युक्तीनेंच मारिलें पाहिजे. नंतर हा कशानें मरेल हें कृष्णानें मनांत आणून त्यास आपण पळत आहों असें दिसण्याजोगा पळ काढतांच हा त्याच्या पाठीस लागला. पळतां पळतां कृष्ण एकाएकीं मुचकुंद राजा ज्या पर्वतगुहेंत निजला होता तींत प्रवेश केला व गुहेंत जाऊन आपलें उत्तरीय वस्त्र त्याच्या अंगावर पांघरूण घालून पलीकडच्या अंगास लपून बसून काय होतें तें पाहूं लागला. मागून कालयवन येतच होता. त्यानें कृष्णास दरींत शिरलेला पाहून आपणहि आंत शिरला व आंत पाहूं लागला तों उत्तरीय वस्त्र पांघरून कृष्णच निजला आहे असें यास वाटलें. यानें क्रोधेंकरून त्यास लत्ताप्रहार केला. तेणेंकरून मुचकुंद जागा होऊन त्यानें नेत्र उघडले व याकडे पाहतांच त्याच्या कोपानलानें हा तत्काळ दग्ध होऊन मरण पावला. पुढें मुचकुंदाची व कृष्णाची भेट होऊन परस्परांचें कांहीं संभाषण झाल्यावर तो उत्तरदिशेकडे निघून गेला असतां, कृष्ण द्वारकेस परत आला ( भाग. स्कं. १० अ. ५१ ).

**कालरा**—पंजाब. शाहपूर जिल्हा व तहशिलींतील एक जमीनदारी. क्षेत्रफळ १३ चौरस मैल. बंडांत चांगली मदत दिल्यावरून मिठा तिवानांपैकीं एका तिवान घराण्याच्या मलिक साहिबखान नांवाच्या माणसास शाहपूर तहशिलींत ८७०० एकर जमीन बक्षीस मिळाली. बागायती करण्याकरितां यानें एक कालवा तयार केल्यामुळें हल्लीं या जमिनीचें मोल फारच वाढलें आहे. याशिवाय इतर ठिकाणीं या जमीनदाराची सुमारें १३००० एकर जमीन असून एकंदर उत्पन्न सालीना दोन लाख रुपये आहे. अलीकडे या मलिकास घोड्याची अवलाद तयार करण्याकरितां म्हणून झेलम वसाहतींत २,२७० एकर जमीन बक्षीस देण्यांत आली आहे.

**कालवे**—कालवे म्हणजे सखल जमीनींतील पाणी काढून नेण्याकरतां, किंवा शेतकीला पाणी पुरविण्याकरितां किंवा होड्या, जहाजें, बोटी वगैरे वाहनें चालविण्याकरतां तयार केलेला कृत्रिम जलमार्ग. कालव्यांचा अगदीं प्रथम सुचलेला उपयोग म्हणजे शेतकीकरतां पाणी पुरविणें हा असला पाहिजे; तथापि असुरिया, ईजिप्त इत्यादि राष्ट्रांत प्राचीनकाळीं वाहातुकीकरतां तयार केलेले कालवे असल्याचें सिद्ध झालेलें आहे. रोमन लोकांनींहि असले कालवे पुष्कळ बांधिले होते. याप्रमाणें कालवे बांधण्याची कल्पना ही अत्यंत जुन्या शोधांपैकीं एक शोध होय; आणि असले कालवे फार मोठ्या प्रमाणावर बांधलेले भूपृष्ठावरील सर्व भागांत आढळतात. येथें जलमार्गाकरितां म्हणजे गलवतें वगैरे जाण्याकरितां तयार केलेल्या कालव्यांची माहिती व शेतीला पाणी पुरविण्याच्या कालव्यांसंबंधीं सर्वसामान्य माहिती दिली आहे.

चीन देशामध्यें ख्रिस्तपूर्व ८०० वर्षांच्या सुमारास बांधलेला एक कालवा असून त्याची लांबी १०० मैल व रुंदी २०० फूट आहे. तसेंच निरनिराळ्या संयोगभूमींतून कालवे खणून समुद्र जोडण्याचे प्रयत्नहि फार जुने आहेत. तांबडा समुद्र व भूमध्यसमुद्र जोडणारे लहान लहान कालवे ख्रिस्तपूर्व कालांत होते हें सिद्ध झालें आहे. कॉरिंथ संयोगभूमीमधून कालवा खणण्याचें बऱ्याच रोमन बादशहांच्या मनांत होतें हा गोष्ट सुप्रसिद्ध आहे. बोटी आंतबाहेर नेण्याकरतां कालव्यांत खोल्या करण्याची कल्पना मात्र अगदीं आधुनिक काळांतील म्हणजे इसवी सनाच्या १४ व्या शतकांतील असून या युक्तीचें श्रेय हॉलंडला आहे. त्याच्या पूर्वीचे सर्व कालवे एका पातळींत खणावे लागत असल्यामुळें कालवे करण्याच्या कामांत ती मोठी अडचण होती. इंग्लंड देशांत कालवे होण्यापूर्वी हॉलंड व फ्रान्समध्यें कालवे बांधले

गेले. उदाहरणार्थ, बिस्केचा उपसागर भूमध्यसमुद्राशीं जोडण्यास १५० मैल लांबीचा कालवा फ्रान्समध्यें तयार केलेला असून तो ६० फूट रुंद आहे. इंग्लंडमध्यें कालवे करण्यास १८ व्या शतकापासून सुरुवात होऊन मांचेस्टर-लिव्हरपूल हा पहिला कालवा होय. हा कालवा वाहतुकीच्या दृष्टीनें फार फायदेशीर झालेला आहे. कारण जमीनीवरील वाहतुकीला जेथें पूर्वी दर टनास ४० शिलींग भाडें पडत असे, तेथें या कालव्यामुळें दर टनी ६ शिलींग भाड्यांत काम होऊं लागलें. नंतर लवकरच ट्रेंट मर्सीबरोबर जोडणारा कालवा तयार झाला. हे दोन्ही कालवे तयार करणारा सुप्रसिद्ध इंजिनियर ब्रिंडले यानें आपल्या कामांतील अनुल्लंघनीय वाटणाऱ्या अडचणी मोठ्या कौशल्यानें दूर केल्या; व जे अनेक बोगदे खोदले, त्यांपैकीं हेअरकॅसलनामक टेंकडीमधील बोगदा तर दीड मैल लांबीचा आहे. या कामाला भांडवल पुरविणारा मालक ब्रिजवॉटरचा ड्यूक होय. या गृहस्थाला स्वतःच्या सहीचा कर्जरोखा देऊनहि ४०० पौंड कर्जाऊ देण्यास आरंभीं कोणी तयार नव्हता. पण तोच ड्यूक १८०३ मध्यें मरण पावला, त्यावेळीं राजासारखा श्रीमंत बनलेला होता. मरणाच्या पूर्वी कांहीं वर्षे प्राप्तीवरील कराची आकारणी करण्याकरतां त्यानें आपलें दरसालचें उत्पन्न १,१०,००० पौंड असल्याचें दाखल केलें होतें. त्यामुळें कालवे बांधण्याची कल्पना इंग्लंडमध्यें इतकी लोकप्रिय झाली होती कीं, आगगाड्यांचे रस्ते तयार होण्यापूर्वी इंग्लंडांतील बहुतेक शहरें कालव्यांनीं एकमेकांशीं जोडलीं गेलीं होतीं पण आगगाड्यांची युक्ति निघतांच कालव्यांचें महत्व एकदम फार कमी झालें. तथापि जो माल फार अवजड असा असतो व जो कालदृष्ट्या लवकर जाण्याची अवश्यकता नसते अशा ठिकाणीं कालव्यांनां रेल्वेबरोबरहि चढाओढ करून असा माल कमी भाड्यांत नेतां येतो असा अनुभव आल्यामुळें कालव्यांचा उपयोग इंग्लंडमध्यें अद्यापहि कायम आहे. १९०६ मध्यें युनायटेड किंगडममध्यें कालव्यांची एकंदर लांबी ३९०१ मैल होती. युनैटेड स्टेट्समध्यें १७९३ मध्यें कालवे बांधण्यास प्रथम सुरुवात होऊन, हल्लीं ४२०० मैल इतकी कालव्यांच्या लांबीची मर्यादा वाढलेली आहे. जगांतील एकंदर कालव्यांपैकीं सुवेज कॅनॉल, पनामा कॅनॉल व कीलकॅनॉल, यांची माहिती या लेखांत दिलेली आहे.

**कालव्यांचें बांधकामः**—कालवे तयार करण्यास साधे रस्ते व आगगाड्यांचे रस्ते करण्यापेक्षां अधिक नडी असतात. पाण्याचा धर्म नेहमीं सखल प्रदेशाकडे वहात जाण्याचा असल्यामुळें कालव्यांच्या मार्गांत उंचसखलपणा मुळींच असूं शकत नाहीं. त्यामुळें कालव्यांची आंखणी नेहमीं देशांतील उंच भागाकडून सखल भागाकडेच करीत जावें लागतें; म्हणून बहुतेक कालवे टेंकड्यांच्या बाजूबाजूंनीं उतरत उतरत नेलेले असतात व वाटेंत टेंकड्या आडव्या आल्यास मोठालीं खोदकामें किंवा बोगदे करावे लागतात. यांपैकीं कांहीं ठिकाणचे बोगदे मैलाहून अधिक लांबीचे आहेत.

**लांबी रुंदीः**—कालव्यांची रुंदी व खोली त्यांमधून जावयाच्या जहाजांच्या आकारमानावर अवलंबून असते. मोकळ्या समुद्रावर बोटींनां पाण्याचा जितका अडथळा होतो त्यापेक्षां जास्त अडथळा होणार नाहीं इतकी रुंदी व खोली कालव्याची असली पाहिजे व त्याविषयीं जे. एम. रँकिन यांनीं पुढील प्रमाणविषयक नियम दिले आहेत.

तळाची कमींत कमी रुंदी दोन बोटींच्या जास्तींत जास्त रुंदीइतकी असली पाहिजे. तसेंच पाण्याची कमींत कमी खोली जास्तींत जास्त मोठें जहाज तरतें रहाण्यास लागणाऱ्या खोलीच्या दीडपट असली पाहिजे, व जलमार्गाचें कमींत कमी क्षेत्रफळ बोटीच्या जास्तींत जास्त मोठ्या मध्यभागाच्या सहापट पाहिजे साधारणपणें अंतःप्रदेशीय कालव्याची सामान्यतः तळाशीं रुंदी २५ ते ३० फूट असते. व पाण्याच्या पृष्ठभागाशीं रुंदी ४० ते ५० फूट असते, आणि खोली ४ ते ५ फूट असते. व बाजवांचा उतार जमीनीच्या स्वरूपाच्या मानानें कमजास्त असतो. जमीनींतून पाणी झिरपून जाऊं नये म्हणून कालव्याचा तळ व बाजू गिलावा लावून पक्क्या निरोधी बनवाव्या लागतात. हा गिलावा चिकण मातीचे थर एकावर एक बसवून प्लॅस्टरप्रमाणें घट्ट बनवितात. या गिलाव्याची जाडी २ ते ३ फूट असते. बोटी जातां येतांना पाणी आपटून बाजू खराब होऊं नयेत म्हणून दगडी फरशीहि करतात. कांहीं जुन्या कालव्यांत दोन्ही बाजूंनां उभ्या सरळ भिंतीच बांधलेल्या असतात.

**पाण्याचा पुरवठाः**—वर्षांतील अत्यंत कोरड्या ऋतूंतहि पाण्याचा पुरवठा भरपूर राहील अशी योजना केल्याखेरीज कालव्याचा उपयोग योग्य तऱ्हेनें होणें शक्य नाहीं. सृष्टिनिर्मित सरोवर किंवा सतत वाहणारा जलप्रवाह नसल्यास इंजिनियरनें पाण्याच्या पुरवठ्याकरतां कृत्रिम जलसंचय उर्फ तलाव बांधणें जरूर असतें. असे तलाव बांधतांना पिण्याच्या पाण्याकरितां बांधले जाणाऱ्या तलावांसारखीच जागा पाहून बांधकाम वगैरे करावें लागतें. तलावाची जागा कालव्याच्या जागेहून उंच असली पाहिजे, व तलावाचें क्षेत्रफळ पाणी वाफ होऊन व झिरपून गेलें तरी भरपूर शिल्लक राहील इतकें मोठें असलें पाहिजे. नाहीं तर कालव्याला पाण्याचा पुरवठा भरपूर न मिळाल्यास मोठाल्या बोटी जात नाहींशा होऊन मालाची नेआण कमी होऊन दर टनी भाडें अधिक होईल. दरवाजे असल्यास तर कालव्यांनां पाण्याचा पुरवठा फारच मोठ्या प्रमाणावर असावा लागतो. कारण दरवाजे जितके मोठे व जहाजांची वाहतुक जितकी अधिक तितका पाण्याचा व्यय अधिक होतो. म्हणून पाण्याच्या पुरवठ्याच्या मानानें बोटींचा आकार व संख्या मर्यादित करावी लागते. येथें ही गोष्ट विशेष

लक्षांत ठेविली पाहिजे कीं. अशा दरवाजांतून जहाजें खालीं जातांना पाणी लागतें त्यापेक्षां वर जातांना अधिक पाणी लागतें. वर चढत असलेलें जहाज दरवाजांतून शिरलें कीं, जहाजाच्या जलनिविष्ट भागाइतकें पाणी स्थलभ्रष्ट होतें. हें स्थलभ्रष्ट पाणी कालव्याच्या खालच्या भागांत उतरतें, आणि दरवाजांतून जहाज जाऊं लागलें म्हणजे त्याला कालव्यावरच्या भागांतून पाण्याचा पुरवठा होत असतो. उलटपक्षीं जहाज खालीं उतरत असतें त्यावेळीं जहाजाच्या जलनिविष्ट भागानें स्थलभ्रष्ट झालेलें पाणी कालव्याच्या वरच्या भागांत जातें व दरवाजे बंद होऊन तें तेथेंच कायम रहातें.

उ त्स र्ज क व नि रो ध क द्वा रें.—कालव्यांना पुरामुळें आलेलें फाजील पाणी वाहून जावें म्हणून उत्सर्जक द्वारांची जोड देणें जरूर असतें. नाहींतर पुराचें पाणी कांठावरून वाहूं लागून जहाजांची वाहतुक बंद होईल, व शेजारच्या शेतजमिनीची खराबी होईल. अशा द्वारांची संख्या ज्या भूप्रदेशांतून कालवा जात असेल त्याच्या स्वरूपावर अवलंबून असते. ज्या ज्या ठिकाणीं कालव्यांत पाण्याची भर मोठ्या प्रमाणांत पडण्याचा संभव असेल तेथें तेथें आसपासच्या ओढ्यांत पाणी वाहून जाईल अशीं द्वारें ठेविलीं पाहिजेत.

तसेंच निरोधक दरवाजे कालव्यामध्यें थोडथोड्या मैलांच्या अंतरावर ठेविलेले असतात. त्या योगानें कालवा कोठें फुटला तर हे दरवाजे बंद करतात. म्हणजे पाणी वाहून जातें तें अशा दोन दरवाजांमधील क्षेत्रामधलेंच कायतें जातें; सबंध कालव्यांतील जात नाहीं.

सु वे झ चा का ल वा.—तांबडा समुद्र आणि भूमध्य समुद्र जोडण्याचा जलमार्ग करण्याची कल्पना आलीकडील काळांतली आहे असें नाहीं. या दोन समुद्रांमध्यें दळणवळण नाइल नदीमार्फत प्राचीन काळीं चालत असे, आणि नाइल नदी तांबड्या समुद्राला जोडणारा कालवा बांधण्याचें मूळ श्रेय सेसॉस्ट्रिस नामक दंतकथान्तर्गत व्यक्तीस आहे, असा उल्लेख आरिस्टॉटल, स्ट्रेबो व प्लिनी यांच्या ग्रंथांत आढळतो. कर्णक येथील एका देवालयावरील खोदलेखावरून असें दिसतें कीं, अशा प्रकारचा कालवा पहिला सेती ( ख्रि पू. १३८० ) याच्या वेळीं अस्तित्वांत होता. सदरहु कालवा नाईल नदीकांठच्या बुवास्टिस ठिकाणापासून टिमसाह सरावरामधून नंतर बिटर सरोवरापर्यंत जाऊन त्या सरोवरामधून सुवेजपर्यंत गेलेला होता. या कालव्यामधून थेट जाण्यास जहाजाला चार दिवस लागत असत असा उल्लेख हिरोडोटसनें आपल्या ग्रंथांत केलेला आहे. पुढें कांहीं शतकांनीं हा कालवा वाळूनें भरून गेल्यामुळें ख्रिस्तोत्तर ७ व्या शतकांत खलिफ ओमारनें तो पुन्हां उकरून चालू केला असून त्याच्या खुणा कांहीं ठिकाणीं अद्यापहि दृष्टीस पडतात. तथापि सेतीचा कालवा फार अरुंद असल्यामुळें फारोह नेचो यानें ( ख्रि. पू. ६०९ ) दुसरा मोठा कालवा बांधण्यास सुरुवात केली. परंतु तें काम पुरें झालें नाहीं. १,२०,००० माणसें त्या कामांत मेलीं असें हिरोडोटसनें लिहून ठेविलें आहे. डरायसनें ( ख्रि. पू. ५२० ) नेचोनें अर्धवट टाकलेलें कालव्याचें काम हातीं घेऊन जहाजें जाण्याइतका चांगला कालवा तयार करून सुरू केला. तथापि या कालव्यानें थेट तांबड्या समुद्रांत जहाजें जाण्याची सोय झाली नव्हती. म्हणून टॉलेमी फिलडेल्फसनें ( ख्रि. पू. २८५ ) सुवेझ संयोगभूमीमधून कालवा खणून तांबड्या समुद्रांत थेट जाण्याची सोय केली. तथापि पुढें कांहीं वर्षांनीं या कालव्याला जोडणारी नाईल नदीची उपशाखाच भरत आल्यामुळें हा दळणवळणाचा मार्ग क्लिओपाट्रा राणीच्या कारकीर्दीत ( ख्रि. पू. ३१ ) बंद पडलेला होता. ट्राजननें ( इ. स. ९८ ) या कालव्याची दुरुस्ती करून तो चालू केला. याप्रमाणें हा जलमार्ग ईजिप्तवर मुसुलमानांचा अम्मल प्रथम चालू झाला त्या वेळीं उपयोगांत होता, तो इ. स. ७७० सालीं बगदादचा संस्थापक दुसरा आब्बासि खलीफ आबू जाफर यानें आपल्या हुकुमानें बंद केला. कारण अरबस्तानांतील आपल्या शत्रूंस ईजिप्तमधून युद्धसामुग्री पोहोंचूं नये असा त्याचा हेतु होता. याप्रमाणें ८ व्या शतकांत बंद पडल्यावर पुन्हां १००० च्या सुमारास सुलतान हकीमानें तो चालू केला. पण तो लवकरच बंद पडला. तथापि कालव्याचा कांहीं भाग अस्तित्वांत होता त्याचाच उपयोग करून इ. स. १८६१-६३ मध्यें फ्रेंच इंजिनियरांनीं कायरोपासून सुवेझपर्यंत एक गोड्या पाण्याचा कालवा तयार केला. याप्रमाणें २५०० वर्षांनंतर या कालव्याचा कांहीं भाग चांगला उपयोगांत आला आहे.

हल्लीं अस्तित्वांत असलेल्या प्रकारचा (भूमध्यसमुद्र व तांबडा समुद्र यांनां जोडणारा सुवेझ संयोगभूमीमधून खणलेला) कालवा तयार करण्याची कल्पना हारून अल-रशीद यानें इसवी सनाच्या ८ व्या शतकांत डोक्यांत आणली होती. परंतु बायझंटाईन आरमाराला अरबस्तानावर स्वारी करण्यास सोपा मार्ग होईल या भीतीनें त्यानें तो बेत सोडून दिला. पुढें १५ व्या शतकांत केप ऑफ गुडहोपला वळसा घालून हिंदुस्थानास जाण्याचा मार्ग सांपडल्यावर व्हेनीसच्या ज्या व्यापारी वर्गाच्या हातांत यूरोप आणि पूर्वेकडील देश यांच्यामधील ईजिप्त व तांबडा समुद्र या मार्गानें चालणारा व्यापार कित्येक शतकें होता त्या व्हेनिशियन व्यापाऱ्यांनीं सुवेझ संयोगभूमीमधून कालवा तयार करण्यासंबंधानें इजिप्शियन लोकांबरोबर बोलणें सुरू केलें. परंतु ईजिप्त देश तुर्कांनीं जिंकून घेतल्यामुळें पुन्हां ही योजना मागें पडली. इ. स. १६७१ मध्यें लीबनिझनें फ्रान्सच्या १४ व्या लुईला ईजिप्तवर स्वारी करण्याचा सल्ला देतांना सदरहु प्रकारचा कालवा तयार करण्याबद्दलहि सुचविलें होतें. शेख अल-बालाद अल्ली बे ( इ. स. १७७० ) याच्या मनांत ही योजना अमलांत आणण्याचें आलें होतें.

पुढें नेपोलियन बोनापार्ट १७९८ मध्यें ईजिप्तमध्यें आला होता तेव्हां कालवा तयार करण्याच्या उद्देशानें या संयोग-भूमीची पहाणी करविली होती. तेव्हां त्यानें नेमलेल्या जे. एम्. लेपर नामक इंजिनियरानें असा अभिप्राय दिला कीं, तांबडा समुद्र व भूमध्य समुद्र हे समपातळींत नसून त्यांच्यामध्यें २९ फुटांचें अंतर आहे; हें मत चुकीचें असल्याबद्दलची त्याच वेळीं लाप्लास व फोरियर यांनीं सामान्य कारणें दाखविलीं होतीं. आणि पुढें १८४६–१८४७ सालीं सुवेझ कॅनॉल सोसायटीनें करविलेल्या पाहणींत तर तें मत चुकीचें असल्याचें ठाम ठरलें. ही सोसायटी प्रॉस्पर एंफाटिन नांवाच्या सेंट सायमनपंथी इसमानें १८४६ मध्यें स्थापन केली. सेंट सायमन पंथाच्या कार्यक्रमापैकीं जगाच्या सुधारणेकरितां करावयाच्या गोष्टींत पनामा व सुवेझ संयोगीभूमींत कालवे बांधणें याहि गोष्टी होत्या. या उद्देशास अनुसरून तत्पंथी उपर्युक्त अनुयायानें ईजिप्तमध्यें जाऊन सदरहु संयोगीभूमीची पाहणी केली व परत येऊन त्यानें वर सांगितलेल्या नांवाची सोसायटी स्थापन केली. या सोसायटीनें एक तज्ज्ञांचें कमिशन नेमून या प्रश्नासंबंधानें अभिप्राय मागविला. तो बहुमतानें पॉलिन टॅलबॉटच्या योजनेला अनुकूल पडला. ती योजना म्हणजे सुवेझपासून अलेक्झांड्रियापर्यंत कायरोमार्गानें कालवा बांधणें ही होय. यानंतर कांहीं वर्षें हा प्रश्न मागें पडून १८५४ मध्यें याच पंथाच्या फर्डिनांड डी लेसेप्स नांवाच्या अनुयायानें तो पुन्हां हातीं घेतला. लेसेप्सचा मित्र सय्यद पाशा हा या वर्षी ईजिप्तचा व्हाइसराय झाला व त्यानें लेसेप्सला सुवेझ कॅनॉल कंपनी स्थापण्याची परवानगी दिली. लेसेप्सनें लिनंट बे व मोंगल बे या दोन फ्रेंच इंजिनियरांच्या मदतीनें हा कालवा तिमसा सरोवर, बिटर सरोवर व मेंझाला सरोवराचा पूर्वकिनारा या मार्गानीं खोदण्याचें ठरविलें. त्याच्या पुढल्या वर्षी सार्वराष्ट्रीय कमिशननें थोड्या फेरफारानें हीच योजना पास केली, व तिच्याप्रमाणें कालवा तयार करण्याची परवानगी एका अटीवर याच कंपनीला देण्यांत आली. ती अट अशी कीं, वाहतुकीच्या कालव्याला समांतर असा एक सुवेझपर्यंत व दुसरा पेल्युशियमपर्यंत असे दोन गोड्या पाण्याचे कालवे कंपनीनें बांधून द्यावे. कंपनीला ९९ वर्षे कालव्यावर हक्क दिलेला असून त्यानंतर दुसरी कांहीं निराळी व्यवस्था न झाल्यास कालवा ईजिप्तच्या सरकारच्या ताब्यांत जावयाचा असें या करारांत आणखी एक कलम आहे. इतकें झाल्यावर डी. लेसेप्स हा तुर्कस्तानच्या सुलतानाची परवानगी मिळविण्याकरितां कान्स्टांटिनोपलला गेला. परंतु तेथें ब्रिटिशांच्या कारस्थानामुळें सुलतानाकडून परवानगी मिळेना. ब्रिटिशांनीं विरुद्ध सल्ला देण्याचें कारण, असा कालवा करणें भौतिक दृष्ट्या अशक्य आहे, असें पुढें लंडन येथें लेसेप्सला लॉर्ड पामरस्टननें कळविलें. शिवाय असा कालवा केल्यानें ब्रिटिशांचें समुद्रावरील वर्चस्व नाहींसें करून फ्रेंचांनां पूर्वेकडील देशांत ढवळाढवळ करण्यास सोईचें जावें असा फ्रेंचांचा गुप्त हेतु असल्यामुळें हा कालवा होणें इष्ट नाहीं असेंहि लेसेप्सला कळविण्यांत आलें.

या ब्रिटिशांच्या अडचणीमुळें सुलतानाची परवानगी १८६६ पर्यंत मिळाली नव्हती. तथापि त्याच्या अगोदरच डी. लेसेप्सनें ५०० फ्रँकांचा एक शेअर याप्रमाणें ४००,००० शेअरांवर २००० लक्ष भांडवल उभारण्यास सुरुवात केली. या शेअरांपैकीं ३१४,४९४ शेअर एक महिन्याच्या आंत खपले आणि त्यांपैकीं २००,००० शेअर खुद्द फ्रान्समध्यें व ९६,००० आटोमन साम्राज्यांत खपले. इतर देशांत थोडथोडे खपले. पण इंग्लंड, ऑस्ट्रिया, रशिया व युनैटेड स्टेट्स या देशांत एकहि शेअर खपला नाहीं. उरलेले ८५,५०६ शेअर ईजिप्तच्या व्हाइसरायनें घेतले. १८५९ एप्रिल २५ रोजीं कालव्याच्या कामास पोर्ट सय्यदनजीक समारंभपूर्वक सुरुवात करण्यांत आली. तथापि आरंभीं काम फारसें झपाट्यानें चालू नव्हतें. कामावर माणसें तद्देशीय मजूर होतीं. व पहिल्या करारांत मजुरांपैकीं चारपंचमांश इजिप्शियन मजूर असावे अशी अट होती. सय्यद पाशानें कॅनॉल कंपनीला मजूर मिळवून दिले. मजुरीचे दराहि बरे होते. तथापि मजूर मिळविण्याकरितां सय्यद पाशाला सक्ति करावी लागे. या सक्तीबद्दल इंग्लंडनें जोराचा निषेध केला. सय्यदनंतर आलेल्या खेदिव इस्मायलनें या तक्रारीकडे लक्ष पुरवून कंपनीनें आपल्या ताब्यांतल्या मजुरांनां सोडून द्यावें व सय्यदनें दिलेल्या जमानीहि इजिप्शियन सरकारच्या ताब्यांत परत द्याव्या असा हुकूम कान्स्टांटिनोपलच्या सुलतानकडून मिळविला. या हुकुमाला कंपनानें हरकत घेतल्यामुळें अखेर हें प्रकरण निकालाकरितां तिसरा नेपोलियन बादशहा याच्याकडे गेलें. त्याचा निकाल इ.स. १८६४च्या जुलैमध्यें बादशहानें असा दिला कीं, इजिप्शियन मजुरांवरील हक्क सोडण्याबद्दल नुकसानभरपाई म्हणून ३८० लाख फ्रँक कंपनीला द्यावे; १६० लाख फ्रँक वाडी, तिमसा सरोवर व सुवेझ यांमधील गोड्या पाण्याचा कालवा मागें हटविण्याबद्दल द्यावे आणि ३०० लाख फ्रँक सय्यदनें दिलेल्या जमीनीवरील हक्क सोडून देण्याबद्दल द्यावे. शिवाय कालवा बांधण्याकरितां जरूर इतकी जमीन कंपनीकडे रहावी. वाडी व सुवेझ यांमधील गोड्या पाण्याचा कालवा कंपनीनें पुरा करून द्यावा. वर सांगितलेली ८४० लाखांची नुकसानभरपाईची रकम हप्त्याहप्त्यांनीं १५ वर्षांत पुरी करावी.

याप्रमाणें ठरल्यावर सक्तीचें मजूरकाम बंद पडलें पण कालव्याच्या कामाच्या दृष्टीनें ही फारच हिताची गोष्ट झाली. कारण हें वेठीचें काम बंद पडल्यामुळें यांत्रिक साधनें व आधुनिक सुधारलेली बांधकामाची पद्धति त्यांऐवजीं उपयोगांत आली. एकंदर कामाचीं निरनिराळीं चार कंत्राटें देण्यांत आलीं. पहिलें कंत्राट पोर्ट सय्यदच्या धक्क्याकरितां २,५०,००० क्युबिकमीटर कांक्रीटचे ब्लॉक्स बांधण्याचें,

दुसरें पोर्ट सय्यदपासून ६० किलोमीटर कालवा खणण्याचें, तिसरें त्याच्या पुढील १३ किलोमीटर कालवा एल गिसर या उंच प्रदेशांतून खणण्याचें, आणि चवथें तिमसा सरोवरापासून तांबड्या समुद्रापर्यंतच्या उरलेल्या सर्वांत मोठ्या भूपृष्ठभागांतून कालवा खणून तयार करण्याचें होतें. हें शेवटचें कंत्राट पॉल वॅरेल आणि अलेक्झांडर लेव्हॅली यांनीं घेतलें होतें व यांनींच पुढें दुसरें ६० किलोमीटरचें कंत्राट पुरें करून दिलें. बहुतेक खोदकाम जमीन नरम असल्यामुळें सोपें गेलें. कालवा खणण्याचें बहुतेक काम गाळ काढण्याच्या आधुनिक यंत्रांनीं करण्यांत आलें.

इ. स. १८६१ मध्यें लेसेप्सनें कालव्याचें तयार झालेलें काम दाखविण्याकरतां जगांतील निरनिराळ्या व्यापारीमंडळांचे मिळून १००प्रतिनिधी बोलाविले, व त्यांनां झालेलें सर्व काम हिंडून दाखविलें. त्याच्या पुढल्या वर्षी पैशाची जरूर लागल्यामुळें एल्. वाडीची मिळकत इजिप्शियन सरकाराला विकून १०० लाख फ्रँक मिळविले. शिवाय १८६४ मध्यें ठरल्याप्रमाणें १८७९ मध्यें मिळावयाची रक्कम कंपनीला १८६९ मध्येंच मिळावी अशीहि सवलत मिळविली. इतकें करूनहि पैसे पुरेनात म्हणून १८६७ सालीं १००० लाख फ्रँक कर्ज काढण्याचें ठरविलें. अशा रीतीनें पैशाच्या अडचणीला तोंड देतां देतां १८६९ च्या अखेरीस वाहतूक चालू करतां येईल इतकें कालव्याचें काम तयार झालें, व त्याला एकंदर खर्च ४३,२८,०७,८८२ फ्रँक लागला. सार्वराष्ट्रीय कमिशननें १८५६ मध्यें एकंदर खर्च २००० लाख फ्रँक पुरेल असा अंदाज केला होता. कालव्याचा प्रवेशसमारंभ १८६९ च्या नवंबरांत झाला. तारिख १६ रोजीं पोर्ट सय्यद येथें समारंभ होऊन दुसऱ्या दिवशीं निरनिराळ्या राष्ट्रांच्या मिळून ६८ आगबोटींनीं कालव्यांतून प्रवासास सुरवात केली. त्यावेळीं फ्रान्सची राणी युजीनी बसलेली 'ईगल' नांवाची आगबोट सर्वांच्या पुढें चालली होती त्या दिवशीं त्या आगबोटींनीं तिमसा सरोवरावरील इस्मालिया बंदरापर्यंत प्रवास केला. नंतर १९ तारखेस बिटर सरोवरापर्यंत जाऊन ता. २० रोजीं सुवेझला सर्व बोटी पोहोंचल्या. याप्रमाणें प्रवेशसमारंभ आटोपल्यानंतर लवकरच नियमितपणें वाहतुक सुरु झाली. १८७० सालीं या कालव्यांतून ५०० बोटी गेल्या. परंतु पहिलीं दोन वर्षे कंपनीला खर्चापेक्षां उत्पन्न कमीच झालें. १८७१ मध्यें कंपनीनें पुन्हां २०० लाख फ्रँक कर्जाची मागणी केली. पण कोणी कर्ज देईना; त्यामुळें कंपनीचें दिवाळें निघण्याचीच पाळी येणार होती, परंतु लवकरच कंपनीला वाहतुकीचें उत्पन्न पुष्कळ होऊं लागून दिवाळ्याची आपत्ति टळली.

सुवेझचा कालवा हा वास्तविक शिल्पकलेंतल्या अद्भुत विजयाचें द्योतक नसून पैशाच्या व राजकारणाच्या अनेक अडचणींनां तोंड देऊन तो पुरा करण्याच्या कामीं एम्. लेसेप्सनें दाखविलेल्या त्याच्या अंगच्या साहस व दृढनिश्चय या गुणांचें स्मारक आहे. या महत्कार्याबद्दल फ्रेंच सरकारनें कालवा पुरा होऊन चालू झाल्यावर सरकारी जाहीर पत्रक काढून लेसेप्सचा मोठा गौरव केला व त्याला लिजन ऑफ ऑनरचा ग्रँड क्रॉस समर्पण केला.

सुवेझच्या कालव्याची पोर्ट सय्यदपासून सुवेझपर्यंत लांबी १०० मैल आहे. प्रथम कालव्याची खोली ८ मीटर आणि तळाची रुंदी २२ मीटर होती. परंतु ही रुंदी व खोली अधिक वाढविली पाहिजे अशी अवश्यकता लवकरच भासूं लागली. म्हणून १८८५ मध्यें खोली ९ मीटर आणि रुंदी पोर्ट सय्यदपासून बिटर सरोवरापर्यंत ६५ मीटर आणि बिटर सरोवरापासून सुवेझपर्यंत ७५ मीटर व वळणांच्या ठिकाणीं ८० मीटर करावी असें ठरलें. या कामाकरितां १००० लाख फ्रँकचें आणखी कर्ज काढलें, व वरच्या प्रमाणें खोलीरुंदी वाढवितांच विरुद्ध दिशांनीं जाणाऱ्या येणाऱ्या बोटींच्या वाहतुकीला फार सोयीचें झालें. १८८७ च्या मार्चपासून इलेक्ट्रिक सर्च लाईट असलेल्या बोटींनांकालव्यांतून रात्रीचा प्रवास करण्याची परवानगीहि देण्यांत आली. यामुळें १८८६ पर्यंत कालव्यांतील प्रवासाला ३६ तास वेळ लागत असे त्याचा निम्मा वेळ नंतर पुरूं लागला. कालव्यांतून जास्तींत जास्त १० किलोमीटर या वेगानें प्रवास करण्याची हल्लीं परवानगी आहे.

वा हा तु की व री ल ज का त.—१८५६ च्या करारानें कॅनॉल कंपनीला वाहुतकीबद्दल जकात म्हणून दर टनी १० फ्रँक बोटवाल्याजवळून वसूल करण्यास हक्क मिळालेला होता. परंतु हे टन मोजावे कसे याबद्दल प्रश्न उद्भवून तो मिटविण्याकरितां कान्स्टांटिनोपल येथें सर्वराष्ट्रीय परिषद भरून तिनें असें ठरविलें कीं, बोटीवरील रजिस्टरांत नोंदलेल्या टनांवर १० फ्रँक दर टनी आकार घेऊन शिवाय दर टनी ३ फ्रँक जादा जकात कंपनीनें घ्यावी. पण कालव्यांतील सालीना वाहतुक २६,००,००० टनांहून अधिक होऊं लागली, म्हणजे कंपनीनें जादा जकात अजीबात बंद करावी या ठरावाविरुद्ध डी लेसेप्सनें तक्रार केली. परंतु सुलतानानें धमकी दिल्यामुळें त्यानें ठरलेले दर १८७४ पासून सुरू केले. पुढें १८७५ मध्यें ब्रिटिश सरकारनें खेदिवाचे सर्व शेअर विकत घेतल्यावर वर सांगितलेली जादा जकात कमी करण्यासंबंधानें कंपनीबरोबर पत्रव्यवहार करून १८८४ नंतर जादा जकात बंद व्हावी व फक्त दर टनी १० फ्रँक जकात घेण्यांत यावी असें ठरविलें. हा करार अमलांत येण्यापूर्वीच मुख्य १० फ्रँकांचा दरहि कमी करण्यांत यावा अशी मागणी ब्रिटिश जहाजांच्या मालकांनीं जोरानें सुरू केली, इतकेंच नव्हे तर दर कमी न केल्यास दुसरा स्वतंत्र कालवा बांधूं असा धाक घातला. तेव्हां १८८३ मध्यें लंडन येथें दोन्ही पक्षांचे प्रतिनिधी जमून असें ठरलें कीं, १८८५ पासून दर टनी जकात ९॥ फ्रँक करावी, आणि शेअरचा नफा जसजसा अधिक पडत जाईल तसतसा हा

दर कमी होत जाऊन शेंकडा २५ नफा पडूं लागल्यावर जादा होणारा नफा दर कमी करण्यांत लावावा व अखेर दर दर टनी ५ फ्रँकपर्यंत उतरवावा. या करारान्वयें १९०६ च्या आरंभीं दर टनी जकात ७॥ फ्रँक करण्यांत आली. तथापि माणसांच्या बोटींवर पूर्वीची १० फ्रँकांची जकातच घेण्यांत येत असते.

जकातीचे दर १८५६ सालच्या कराराप्रमाणेंच सर्व देशांच्या बोटींवर सारखे असावे, कोणावर कमजास्त नसावे असें ठरलें होतें. आणि राष्ट्राराष्ट्रांमध्यें भेदभाव न करतां सर्वांच्या व्यापारी जहाजांना कालव्यांतून जाण्याची मोकळीक असावी असेंहि ठरलेलें होतें. परंतु १८८१-८२ मध्यें ईजिप्तमधील स्थिति निकरावर आली होती, त्या वेळीं ब्रिटिश सैन्यावरचा अधिकारी सर गार्नेट वुल्सले यानें चार दिवस जहजाची वाहतुक बंद पाडली होती. पुढें १८८८ आक्टोबर २९ रोजीं कान्स्टांटिनापल येथें भरलेल्या सार्वराष्ट्रीय परिषदेच्या बैठकींत ग्रेटब्रिटन, जर्मनी, आस्ट्रिया, स्पेन, फ्रान्स, इटली, नेदरलंड, रशिया आणि टर्की इतक्या राष्ट्रांच्या सह्यांनीं असा करार ठरला कीं, सुवेझ कालवा " नेहमीं म्हणजे शांततेच्या कालांत व त्याचप्रमाणें युद्धाच्या कालांतहि राष्ट्राराष्ट्रांमध्यें यत्किंचितहि पक्षपात न करता प्रत्येक व्यापारी जहाजाला किंवा लढाऊ जहाजाला जाण्याला मोकळा असावा ". हा करार ईजिप्तमधील ब्रिटिश सरकारच्या कारभाराला बाधक होत नसल तरच पाळूं अशी अट ग्रेटब्रिटननें करारावर सही करतांना घातली होती. परंतु पुढें १९०४ सालीं इंग्रज व फ्रेंच सरकारामधील करारानें वरील अट रद्द करण्यांत येऊन तो करार विनशर्त पाळण्याचें ग्रेटब्रिटननें कबूल केलें. या नव्या कबुलीप्रमाणें १९०४-१९०५ सालीं रशियाच्या आरमाराला पूर्वेकडे जपानवर चालून जाण्याच्या वेळीं या कालव्यातून जाण्यास परवानगी देण्यांत आली. परंतु १८९८ सालीं स्पेन व युनायटेड स्टेट्स मध्यें युद्ध सुरू होतें त्या वेळीं स्पेनला सुवेझ कालव्यातून जाण्यास मार्ग मिळाला नव्हता.

प ना मा का ल वा —कोलंबस जेव्हां अटलांटिक महासागर ओलांडून गेला तेव्हां त्याचा उद्देश युरोपाहून कॅथेला जाण्याचा पश्चिमेकडील जलमार्ग शोधून काढण्याचा होता. परंतु असा मार्ग सरळ सांपडणें अशक्य आहे, कारण अमेरिका हें खंड फार मोठें व दक्षिणोत्तर लांबवर पसरलेलें आहे, ही गोष्ट कळून येण्यास कोलंबसानंतर शोधकांची एक पिढी जावी लागली. अमेरिकेच्या भूभागाच्यामध्यें येणारा हा अडथळा एखादा कालवा तयार करून दूर करण्याची कल्पना त्यानंतर लवकरच पुढें आली. इ. स. १५५० मध्यें अँटोनिओ गाल्व्हाओ या पोर्तुगीज नाविकानें टेह्वांनटपेक, पनामा, डेरियन किंवा निकाराग्वा या ठिकाणीं कालवा खणतां येईल अशी माहिती पुस्तकद्वारां प्रसिद्ध केली व हें काम तावडतोब हातीं घ्यावें अशी शिफारस दुसऱ्या फिलिपला १५५१ मध्यें करण्यांत आली होती. परंतु अमेरिकेकडील सर्व वाहतुक आपल्या ताब्यांत राहावी व जलमार्गांचें महत्व कायम राहावें म्हणून स्पेननें खुष्कीचे मार्ग शोधून काढणें किंवा कालवे तयार करणें या दोन्हीं गोष्टींना जोराचा विरोध सुरू केला; त्यामुळें सुमारें दोनशें वर्षें ही कालव्याची कल्पना मागें पडून राहिली. पुढें १७७१ मध्यें स्पॅनिश सरकारनें आपलें धोरण बदलून उपर्युक्त कालव्याची कल्पना अमलांत आणण्यासाठीं तिकडील प्रदेशाची पाहणी करविली व त्यांत निकाराग्वा येथें कालवा करणें इष्ट असल्याचें ठरलें. परंतु पुढें कित्येक वर्षें यूरोपाची राजकीय परिस्थिति विघडल्यामुळें पुन्हां ती योजना तहकूब राहिली. १८२३ मध्यें जेव्हां मध्यअमेरिकेंतील राज्यें स्वतंत्र झालीं तेव्हां कालव्याच्या प्रश्नाकडे पुन्हां जोरानें लक्ष गेलें. मध्यभागच्या रिपब्लिकनें हा कालवा करण्याच्या कामीं युनायटेडस्टेटस् व ग्रेट ब्रिटन जवळ मदतहि मागितली, पण त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. यानंतर, युनोयटेडस्टेटस्, फ्रान्स व बेल्जममध्यें अनेक कंपन्या निरनिराळया वेळीं याच कार्याकरितां स्थापण्यांत आल्या, परंतु प्रत्यक्ष कामास सुरवात यांपैकीं एकीच्याहि हातून झाली नाहीं. तथापि या भूप्रदेशाची पाहणी मात्र फार बारकाईनें केली गेली. युनायटेड स्टेटस् व ग्रेटब्रिटन यांचे करारमदार होऊन कालवा तयार झाल्यावर तो तटस्थ रहावा व त्या दोघा देशांच्या नागरिकांस विशेष पण समान सवलती असाव्या असेंहि ठरलें.

१८६९ मध्यें सुवेझचा कालवा तयार होऊन तो व्यापारदृष्ट्या लवकरच फार फायदेशीर झाला. तेव्हां मात्र या अमेरिकेंतील संयोगीभूमीच्या कालव्याकडे फार जोरानें लक्ष गेलें. १८७६ मध्यें पॅरिस येथें एक संस्था स्थापन होऊन तिनें लेफ्टनंट एल. एन. बी. वाइस नामक एका फ्रेंच आरमारी अधिकाऱ्याकडून पनामामार्गाची पाहणी करविली. १८७९ मध्यें निरनिराळ्या राष्ट्रांच्या मिळून १३५ प्रतिनिधींची सार्वराष्ट्रीय कॉंग्रेसची बैठक पॅरिस येथें करण्यांत आली. बैठकीचें काम फर्डिनांड डी लेसेप्स याच्या नेतृत्वाखालीं झालें. बैठकींत असें ठरलें कीं, सदरहु कालव्याचें काम पनामा येथें व्हावें व तो कालवा समुद्रसपाटीबरोबर करावा. बैठक आटोपल्यानंतर लवकरच पनामा कॅनाल कंपनी नांवाची संस्था स्थापन होऊन ५०० फ्रँकचा एक याप्रमाणें ६०,००,००० शेअर काढण्याचें ठरलें. आणि २९॥ फूट खोलीचा व ७२ फूट रुंदीचा कालवा करण्याचें निश्चित झालें. या कामाला खर्च ६५,८०,००,००० फ्रँक आणि मुदत आठ वर्षें लागेल असा लेसेप्सचा अंदाज प्रसिद्ध झाला. परंतु कालव्याच्या मार्गांत क्युलेब्रा नामक उंच टेकडी आणि नंतर चेग्रीस नामक नदीची मोठी दरी व नदीचा जोराचा प्रवाह या अडचणी होत्या त्या लक्षांत घेऊन अखेर समुद्र-

सपाटीचा कालवा न करतां दरवाज्यांची योजना असलेली समुद्रसपाटीपासून उंच टेंकडीवरून जाणारा कालवा करण्याचें ठरलें. परंतु या योजनेप्रमाणें सुरू केलेल्या कामांत आरंभींच खर्च फार होऊन उपर्युक्त कंपनीचें दिवाळें निघालें. तेव्हां १८९४ आक्टोबर २० रोजीं दुसरी पनामा कंपनी स्थापन झाली व तिला कोलंबियाच्या सरकारनें मान्यताहि दिली व ५०,००० शेअर विकत घेतले. नंतर १८९५ पासून २००० मजूर लावून कामास सुरुवात करण्यांत आली. तें काम १९०० पर्यंत चालू होतें. १८९८ मध्यें पांचजणांचें एक कमिशन बसून त्यानें चाललेल्या कामाला अनुकूल असा रिपोर्टहि प्रसिद्ध केला. याप्रमाणें काम यशस्वी रीतीनें चाललें असतां हा कालवा सर्वस्वीं यूरोपीय लोकांच्या हातीं जाणार या गोष्टीचें युनायटेड स्टेट्सला वैषम्य वाटूं लागलें. म्हणून निकाराग्वामधून कालवा करणेंच अधिक फायद्याचें आहे असें प्रतिपादन करण्याची चळवळ सुरू होऊन त्या बाजूनें कालवा करण्याच्या उद्देशानें न्यूयार्कमध्यें निकाराग्वाची मेरिटाइम कॅनॉल कंपनी १८८९ मध्यें स्थापन होऊन युनायटेड स्टेटसच्या कॉंग्रेसची तिला मान्यताहि मिळाली. या कंपनीनें १८९३ पर्यंत थोडथोडें कामहि केलें. पण त्या सुमारास सांपत्तिक अडचणी उत्पन्न होऊन कंपनीचें दिवाळें निघालें.

युनायटेड स्टेट्सच्या कॉंग्रेसनें इंजिनियरांचें बोर्ड नेमून पुन्हां माहिती मिळविली. त्यांत पनामा कालव्याची योजनाच ग्राह्य असल्याचें ठरलें. तेव्हां १८९९ मध्यें इस्थमियन कॅनॉल कंपनी नांवाची नवी कंपनी निघाली. या कंपनीमार्फत पुन्हां एकदा पहाणी होऊन तिचा रिपोर्ट कॉंग्रेसपुढें गेला व अखेर पनामा कालव्याची योजनाच १९०२ मध्यें अखेर मंजूर करण्यांत आली. नंतर १९०३ मध्यें कोलंबियाच्या नव्या रिपब्लिकन सरकारपासून कालव्याकरितां १० मैल रुंदीचा भूप्रदेश विकत घेण्यांत आला, तसेंच पूर्वी फ्रेंच कंपनीनें केलेलें कामहि विकत घेण्यांत आलें. कालवा समुद्रसपाटीचा असावा किंवा उंचीवरचा (दरवाजे-पद्धतीचा) असावा, हा प्रश्न सोडविण्याकरितां कॉंग्रेसनें इंजिनियरांचें बोर्ड पुन्हां एकदां नेमिलें. त्या रिपोर्टांत दरवाजे-पद्धती ग्राह्य ठरल्यामुळें ती योजना कॉंग्रेसनें पास केली, व प्रेसिडेंट रुझवेल्टनें सर्व काम सरकारी इंजिनियरांच्या हुकमतीखालीं करण्याचें प्रथम ठरविलें. कालव्याची सर्वांत अधिक उंची समुद्रसपाटीवर ८५ फूट आहे व लांबी ४३·८४ नाविक मैल आहे. कालव्याची रुंदी ३०० फुटांपासून १००० फुटांपर्यंत आहे, व कमींत कमी खोली ४१ फूट आहे. कालव्यांतील प्रवासाला सरासरी ७८ तास लागतात कमींत कमी वेळ ४ तास १० मिनिटें लागल्याचें उदाहरण आहे. कालव्यांतून जास्तींत जास्त वाहतुक दररोज ३६ जहाजांची होऊं शकते. या कालव्याच्या बांधकामापैकीं गट्टन बंधारा सर्वांत मोठा म्हणजे ८००० फूट लांब व जास्तींतजास्त २१०० फूट रुंद आहे

कालव्याचें काम पुरें होऊन १९१४ आगष्ट १५ रोजीं कालव्याचा प्रवेशसमारंभ झाला. त्या दिवशीं अन्कन् नांवाच्या ९००० टनी जहाजानें बड्याबड्या निमंत्रित गृहस्थांनां घेऊन दहा तासांत सुखरूप प्रवास केला. तेव्हांपासून जहाजांची रहदारी चालू झालेली आहे. मध्यंतरीं १९१५ सप्टेंबर २३ ते १९१६ एप्रिल १६ पर्यंत दुरुस्तीच्या कामाकरतां रहदारी पूर्णपणें बंद करण्यांत आली होती. रहदारीसंबंधानें माहिती देणारें कोष्टकः—

| | पसिफिककडून अटलांटिककडे | | अटलांटिककडून पॅसिफिककडे | |
|---|---|---|---|---|
| साल | जहा. | माल टन | जहा. | माल टन |
| १९१५ | ५३० | २१,२५,७३५ | ५५८ | २८,८४,०५७ |
| १९१६ | ४११ | १४,३४,२३६ | ३७६ | १७,०५,८१० |
| १९१६ | ९०५ | ३०,७६,८४३ | ९७१ | ४१,५२,४१२ |
| १९१८ | १२०९ | ४९,२२,६६५ | ९२१ | २६,३९,४६६ |

१९१८ सालच्या वाहतुकीपैकीं ६९९ जहाजें ब्रिटिश, ६२५ अमेरिकन, २९६ नार्वेजियन, १०० डॅनिश, ९६ चिलियन, ८३ पेरुव्हियन, ५३ जपानी, ५२ फ्रेंच आणि ४९ डच होतीं. १९०१ च्या ग्रेटब्रिटन व युनायटेड स्टेट्समधील तहानें कालव्याचा उपयोग सर्व राष्ट्रांच्या जहाजांना करूं देण्याचें ठरलें. १९१२ सालीं पास केलेल्या एका कायद्यानें युनायटेड स्टेट्सनें अमेरिकन जहाजांनां विशेष सवलती दिल्या. परंतु ब्रिटिश सरकारनें तक्रार केल्यामुळें १९१४ मध्यें त्या सवलती काढून घेण्यांत आल्या.

कालव्याच्या दहा मैलांच्या हद्दींत नवी वसाहत झालेली असून तेथील एकंदर वस्ती १९१८ मध्यें २१,७०७ होती. तीपैकीं ६,६९० अमेरिकन होते. वसाहतीच्या व्यवस्थेकरितां एक गव्हर्नर नेमण्यांत येत असतो.

प रि णा म.—हा कालवा करण्यासंबंधाची कल्पना गेली चारशें वर्षें लोकांच्या डोक्यांत घोळत होती. कारण या कालव्याच्या योगानें पृथ्वीपर्यटनाचें अंतर एकतृतीयांशानें कमी होणार होतें. इ स. १५५१ मध्येंच स्पॅनिश इतिहासकार गोमारा यानें दुसऱ्या फिलिप राजाला या कालव्याचें महत्व समजाऊन दिलें होतें. डॉ. जोसिआ स्ट्रॉंग यानें हा कालवा सुरू झाल्यामुळें जगाच्या सुधारणेवर होणाऱ्या परिणामाचें विवेचन केलें आहे. कोलंबसाच्या कल्पनेप्रमाणें त्यावेळीं त्यालाच जर असल्या प्रकारच्या कालव्यामधून जातां येऊन यूरोपचें दळणवळण पूर्वेकडील देशांशीं सुरू करून देतां आलें असतें तर जगाचा अलीकडील एकंदर इतिहासच फार निराळा झाला असता. तसेंच स्पॅनिश व फ्रेंच लोकांची सत्ता तिकडे प्रबल होती अशा वेळीं कालवा तयार झाला असता तरी त्याचे परिणाम एकंदर निराळे झाले असते;व आज२०व्या शतकाच्या आरंभीं युनायटेड स्टेट्सच्या

प्रभुत्वाखालीं तो तयार झाल्यामुळें त्याचे परिणाम कांहीं निराळ्या प्रकारचे होणार हें उघड आहे. युनायटेड स्टेट्सच्या पूर्वकिनाऱ्यापासून पॅसिफिक किनाऱ्यावरील बंदरें जलमार्गानें खुद्द युरोपइतकीं लांब पडतात. परंतु या कालव्यामुळें हें अंतर एकदम ३००० मैल कमी झालें आहे. मिसिसिपी नदीचें बहुतेक पाणी पॅसिफिक महासागरांत जाऊन पडणार. पिट्सबर्गपासून हांगकांगला आणि नेब्रास्कापासून आस्ट्रेलियाला चिकागोपासून व डुलुथपासून शांघायला व मॅनिलाला बोटीनें प्रवास करतां येत आहे. पॅसिफिक महासागराभोंवतालच्या प्रदेशांत ५०,००,००,००० म्हणजे जगांतील एकंदर लोकसंख्यैच्या एक तृतीयांत लोकवस्ती आहे. शिवाय हिंदुस्थानलाहि पॅसिफिक महासागरामार्फत दळणवळण ठेवणें सोयीचें होणार असल्यामुळें ती लोकसंख्या मिळविल्यास एकंदर ८०,००,००,००० लोकांचा परस्पर संबंध येण्यास सुलभ मार्ग उपलब्ध झाला आहे. पृथ्वीच्या पाठीवरील वसाहतीस योग्य पण अद्याप मागासलेला असा बहुतेक प्रदेश पॅसिफिक महासागराभोंवतींच आहे. यांत अलास्का, ब्रिटिश अमेरिका, आस्ट्रेलिया, ईस्ट इंडीज व सायबेरिया इतके देश येतात. औद्योगिक बाबतींत जगांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांत मोडणाऱ्या युनायटेड स्टेटस या देशाला व्यापाराच्या बाबतींत या कालव्यामुळें यूरोपपेक्षांहि फार सोयीचें होणार आहे.

### कांहीं शहरांपासून सॅन फ्रॅन्सिस्कोपर्यंत अंतर.

| शहरापासून | जुना मार्ग | पनामा मार्ग |
|---|---|---|
| न्यूयॉर्क | १३,२४४ | ५२९९ |
| लिव्हरपूल | १३,८४४ | ८०३८ |
| जिब्राल्टर | ... | ७,६७२ |

**कीलचा कालवा ऊर्फ नार्थ सी कॅनॉल.**—कील कालवा समुद्रांत जाणाऱ्या बोटींच्या सोईकरितां पृथ्वीच्या पाठीवर जे अनेक कालवे तयार केलेले आहेत, त्यांपैकीं एक असून त्यासंबंधाची योजना फार पूर्वीपासून तयार झालेली होती. बाल्टिक समुद्राचा उत्तर समुद्राशीं संबंध जोडण्यासंबंधीं कल्पना मध्ययुगांतच पुढें आलेली होती. इतकेंच नव्हे तर १३८९ मध्यें अशा प्रकारचा एक लहानसा कालवा तयार करण्यांत आला होता. परंतु हा कालवा अपुरा असल्याचें भासत असल्याचा पुरावा हा आहे कीं, तेव्हांपासून सुमारें सोळा निरनिराळ्या योजना पुढें आलेल्या असून त्यांपैकीं हल्लीं अस्तित्वांत असलेला कील कालवा फारच मोठा आहे; इतका कीं, त्याच्या पुढें इतर योजना अगदींच क्षुल्लक भासतात. हा कालवा बांधण्याचें काम १८८७ मध्यें सुरू झालें आणि १८९५ता. २० जून रोजीं त्याचा प्रवेशसमारंभ तत्कालीन जर्मन बादशाहा दुसरा वुइल्यम याच्या हस्तें करण्यांत आला. हा समारंभ फारच थाटाचा झाला; त्यावेळीं पृथ्वी-वरील महान्‌महान आरमारांपैकीं मिळून सुमारें शंभर जहाजांनीं समारंभांत भाग घेतला होता. या कालव्याचें महत्व व्यापारी दृष्ट्या फार आहे. हा कालवा तयार होईपावेतों बाल्टिक समुद्रांत जाण्याकरतां जहाजांनां डेन्मार्कच्या द्वीपकल्पाला प्रदक्षिणा घालून जावें लागत असे, व तो मार्गहि लहान लहान सामुद्रधुन्यांतून असल्यामुळें दर्यावर्दी लोकांनां मोठ्या धोक्याचा असे. कारण त्या भागांत खडक फार असून वादळेंहि वरचेवर होत असतात. इतकें असून या मार्गानें होणारी वाहतूक इतकी वाढली होती कीं, दरसाल ३५,००० जहाजें तिकडून जात असत. या आंकड्यावरून बाल्टिक समुद्रामार्फत जगाशीं होणारें जहाजाचें दळणवळण किती मोठें आहे हें स्पष्ट होतें. उलट पक्षीं हा मार्ग किती धोक्याचा होता याची कल्पना ह्यावरून येईल कीं, १८५८ पासून सुमारें ३००० जहाजें फुटून गेलीं, व त्यांहूनहि अधिक जायबंदी झालीं. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, सर्व यूरोपमध्यें जहाजांच्या वाहतुकीला अधिक अपायकारक असा दुसरा मार्ग क्वचित्‌च आढळेल. म्हणून या कालव्याचें महत्व त्याच्या मोठेपणावर किंवा त्याच्या योगानें जहाजांनां पडणाऱ्या कमी प्रवासावरच केवळ नसून, या मार्गाच्या सुरक्षितपणावरहि तें पुष्कळअंशीं अवलंबून आहे.

हा कालवा ६१ मैल लांब, पृष्ठभागावर २०० फूट रुंद आणि तळाशीं ८५ फुट रुंद असून यांतून १०००० टनाचीं जहाजें जाऊं शकतात, आणि कालवा ओलांडण्यास सरासरी वेळ १२ तास लागतो. या कालव्याचा अंदाजी खर्च ८२,५० लक्ष पौंड असून त्यांपैकीं एक-तृतीयांश रक्कम जर्मन सरकारनें दिलेली आहे. जर्मनीला या कालव्याचा उपयोग सैन्यरचनाकौशल्याच्या दृष्टीनें फार आहे; कां कीं, या कालव्यामुळें आतां जर्मन आरमाराला परकी सत्तेखालच्या जलमार्गानें जाण्याची जरूरी नाहींशी झाली आहे. या फायद्याकडे दृष्टि देऊनच कालव्याचें काम शक्य तितक्या लवकर पुरें करण्याकरितां फार खटपट करण्यांत आली. कांहीं वेळां तर ८,६०० मजूरांपर्यंत संख्या कालव्याच्या कामावर खपत होती. कील येथें मोठें आरमारी ठाणें असून येथें उत्तम बंदरहि आहे. या जलमार्गाचा योजनाकार व इंजिनियर हर ऑटो बेंश हा होय. यानें या कामाकरितां म्हणून मुद्दाम अनेक प्रकारची नवी यंत्रयोजना तयार केली. भरतीचें जोराचें पाणी अडवून धरण्याकरितां खोल्यांची योजना व कालवा जागजागीं ओलांडण्याकरतां रेल्वेच्या झुलत्या पुलांची योजना यानेंच स्वबुद्धिमत्तेनें केलेली आहे. हा कालवा ओलांडण्याच्या मार्गांत अडचणी विशेष नसल्यामुळें पर्वतांतलि मोठाले बोगदे किंवा दऱ्यावरील मोठाले पूल असलीं शिल्पकलेचीं अचाट कामें येथें पहावयास मिळत नाहींत आणि ज्या प्रदेशांतून हा कालवा जातो तो प्रदेशहि निसर्गरमणीय नाहीं.

हिंदुस्थानांतील कालवे.—पाश्चात्य देशांत शेतकीकरितां केलेला कालवा ही क्वचित् आढळणारी चैनीची गोष्ट होय. कारण यूरोपांतील बहुतेक देशांत पाऊस नियमितपणें भरपूर पडून शेती नेहमीच चांगली पिकते. उलटपक्षीं पौरस्त्य देशांत, विशेषतः हिंदुस्थानांत शेतकीचे कालवे ही एक आवश्यक बाब आहे. कारण हिंदुस्थानांतील मोठमोठ्या भागांत, विशेषतः सिंधमधील निर्जन प्रदेश,पंजाबच्या नैऋत्येकडील प्रांत इत्यादि भागांत पाऊस बहुतेक मुळींच पडत नाहीं. तसेंच दक्षिणेकडील भागांत ( डेक्कन प्लेटो ) पर्जन्यवृष्टि अत्यंत अनियमित असल्यामुळें शेती चांगली पिकणें ही गोष्ट फार अनिश्चित असते. त्यामुळें पुष्कळ ठिकाणीं भाताचें व उंसाचें पीक कालव्याचें पाणी मिळाल्याशिवाय तयार होणें शक्यच नसतें. पुष्कळशा प्रदेशांत खरीपाचें पीक म्हणजे पावसाळ्यांतलें एक पीक केवळ पावसाच्या पाण्यावर तयार होतें. परंतु दुसरें रब्बीचें पीक म्हणजे हिंवाळ्यांतलें पीक मात्र बहुतांशीं कालव्याच्या पाण्यावर अवलंबून असतें; आणि हिंदुस्थानांतील शेंकडा ६५ लोक शेतीच्या उत्पन्नावर उदरनिर्वाह करणारे आहेत ही गोष्ट ध्यानांत घेतली, म्हणजे हिंदुस्थानला कालवे व पाटबंधारे यांचें महत्व किती मोठें आहे हें सहज लक्षांत येईल.

प्राचीन इतिहास.—अशी परिस्थिति असल्यामुळें हिंदुस्थानांत कालवे व पाटबंधारे फार प्राचीन काळापासून उपयोगांत आणले जात हें अगदीं स्वाभाविक आहे. वापी, कूप ( विहीर ) व पाणी ओढण्याचीं साधनें हे शब्द हिंदुस्थानांतील वाङ्मयांत व इतिहासांत सुप्रसिद्ध असून अद्यापहि या गोष्टींचें महत्व कायम आहे. इसवीसनापूर्वीच्या अनेक शतकांतील प्राचीन वाङ्मयांत कालवे व पाटबंधारे यांचा उल्लेख आहे. हिंदुस्थानांत विहीरी अनंत काळापासून अस्तित्वांत आहेत. मोठमोठाले तलाव दक्षिणहिंदुस्थानांत असंख्य आहेत. तसेंच सिंधुनदी व तिला मिळणाऱ्या नद्या यांच्या पुराचें पाणी सांठवून त्याचे केलेले कालवे प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत आहेत. तथापि मोठालीं धरणें बांधून नद्यांचें पाणी अडवून त्याचा शेतीकडे उपयोग करण्याची व्यवस्था ब्रिटिश अमदानीपासूनच काय ती हिंदुस्थानांत पहावयास सांपडते.

सरकारी व्यवस्था.—शेतीला पाणी देण्याचीं साधनें तीन प्रकारचीं आहेत. विहीर, तलाव व कालवे. यापैकीं कालवे हेंच साधन फार मोठें व महत्वाचें असल्यामुळें, व शेतीच्या उत्पन्नाची नियमितता मुख्यतः त्यांवरच अवलंबून असल्यामुळें त्यांचीच प्रथम विस्तारपूर्वक माहिती येथें देऊं. हे सर्व कालवे येथें ब्रिटिश सरकारनें स्वतः सरकारी व्यवस्थेनें बांधविले आहेत. या आधुनिक कालव्यांपैकीं आरंभींचे मद्रास इलाख्यांतील कांहीं कालवे व ओरिसामधील एक कालवा सरकारनें हमी घेतलेल्या दोन कंपन्यांकडून करवून घेण्यास सुरुवात केली होती. परंतु या दोन्ही कंपन्या अडचणीमुळें बुडाल्या आणि त्यामुळें खासगी कंपन्यामार्फत कामें करण्याची ही पद्धतीच त्याज्य ठरली. आणि लॉर्ड लॉरेन्स या व्हाइसरायच्या कारकीर्दीपासून असें ठरलें कीं, कालव्यांचीं कामें, सरकारनें स्वतः कर्जाऊ रक्कम घेऊन स्वतःच्या पब्लिक वर्क्स खात्यामार्फत करावीं.

ब्रिटिशपूर्वकालीन कालवे.—ब्रिटिशसरकारला पूर्वी तयार केलेल्या कांहीं मोठ्या कालव्यांचा फायदा आयता मिळाला. त्यांपैकीं मद्रास इलाख्यांतील कावेरी नदीचा कालवा हा एक होय. तसेंच पंजाबमध्यें मुसुलमान व शीख राज्यकर्त्यांनीं कांहीं कालवे बांधले होते. मोंगल बादशहांनीं दिल्ली शहराला पाण्याचा पुरवठा करण्याकरितां शेजारच्या यमुना नदीला कालवा बांधला होता. पूर्वीच्या कालव्याचा शेतीला मोठ्या प्रमाणावर उपयोग होत असे असें नाहीं; तथापि कोणत्या ठिकाणीं कसे कालवे करावे यासंबंधानें नमुन्यादाखल या कालव्यांचा ब्रिटिश सरकारच्या इंजिनियरांनां चांगला उपयोग झाला. कावेरी नदीच्या ग्रँड अनिकट नांवाच्या कालव्याचा शेतीला चांगला उपयोग करून घेतां यावा म्हणून, सर आर्थर कॉटन या इंजिनियरानें कोलेरून नदीला अपर अनिकट नांवाचा अधिक ऊंचीवर कालवा बांधला.तसेंच याच इंजिनियरानें तीन कोट रुपये खर्चांत गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या कांठच्या २० लाख एकर शेतजमिनीला पाणी देतां येईल इतक्या मोठ्या प्रमाणावर कालवे बांधले. उत्तर हिंदुस्थानांत सर प्रोबिन कॉटले यानें गंगानदी, हरिद्वारजवळच अडवून गंगेचा मोठा कालवा तयार केला. ह्या कालव्याइतका मोठा व धाडसाची रचना असलेला कालवा हिंदुस्थानांत किंवा इतरत्र कोठेंहि पाहावयास सांपडत नाहीं.याप्रमाणें हिंदुस्थानांतील कालव्यांच्या योजनेचा पाया घालण्यांत आला व कालवे अधिकाधिक बांधण्याचें काम चालू ठेवण्यांत आलें. उत्तरहिंस्थानांत पंजाब व संयुक्तप्रांत यांमध्यें बरेच कालवे बांधण्यांत आले. यांपैकीं चिनाब नदीचा कालवा हा जगांतील एक आश्चर्य म्हणून गणला जाण्यासारखा आहे. या एकाच कालव्यानें २० लाख एकर जमीन, म्हणजे ईजिप्तमधील एकंदर शेतजमिनीचा दोनपंचमांश भाग भिजला जातो. या कालव्यांतून दर सेकंदास अकरा हजार घनफूट पाणी, अथवा टेडिंगटन येथें थेम्स नदींतून दर सेकंदास जितकें पाणी बाहेर पडतें त्याच्या सुमारें सहापट पाणी बाहेर पडत असतें. चिनाब आणि झेलम नद्यांच्या कालव्यांनीं शेंकडो एकर सरकारी पडित जमीन लागवडीस आणली असून त्यामुळें सरकारमार्फत वसाहती स्थापण्याच्या कामास मदत झाली आहे; तसेंच पंजाबमध्यें कित्येक पुरातन खेड्यांत लोकवस्ती जी अत्यंत दाट झाली होती ती मोडून जेथें पूर्वी किरकोळ रानटी भटके लोक रहात असत असल्या ओसाड प्रदेशांत उत्तम शेतकरी लोकांची वसाहत झाली आहे मुंबई इलाख्यांत नीरा, प्रवरा, मुठा वगैरे कालवे चालू असून नीरा कालवा वाढविण्याचें व सकर कालवा बांधण्याचें काम चालू

आहे. मद्रास इलाख्यांत तर कालवे व पाटबंधारे यांचीं कामें इतकीं धाडसाचीं व कल्पकतेचीं केलेलीं आहेत कीं, त्याच्या तोडीचीं कामें जगांत थोडींच आढळतात. घाटमाथ्याच्या उतरणीवर पेरियर येथें बांधलेला तलाव व मध्यें आलेल्या टेंकडींतून पाणी नेण्याकरितां बांधलेला बोगदा हीं अशा आश्चर्यकारक कामांचीं उदाहरणें असून या कालव्यानें केवळ पाण्याच्या अभावीं ओसाड पडत असलेली उत्तम जमीन लागवडीस आणली गेली आहे. तथापि दक्षिणेंतील कालव्यांपासून सरकारला खर्चाच्या मानानें कांहींच फायदा पडत नसे; कारण पर्जन्य चांगला होईल त्या सालीं शेतकरी कालव्याचें पाणी मुळींच घेत नसत आणि अवर्षणाचें साल आल्यास सर्व शेतीला पुरेसें पाणी देण्याला सरकारजवळ भरपूर सांठा नसे; यामुळें उत्तरहिंदुस्थानांतच कालव्यांवर विशेष भर देण्याचें सरकारनें ठरविलें.

पाटबंधारेविषयक कमिशन.—वर उल्लेखिलेलीं सर्वत्र चाललेलीं कामें कांहीं तरी ठराविक धोरणावर चालावीं म्हणून व्हाइसराय लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दींत इ.स.१९०० सालीं या विषयावर माहिती मिळवून सविस्तर रिपोर्ट करण्याकरितां एक कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशनच्या रिपोर्टानुसार ठरलेलें धोरण हल्लीं चालू आहे. कमिशनच्या सालापर्यंतची रिपोर्टांत दिलेली माहिती पुढीलप्रमाणें होती. हिंदुस्थानांतील पाटबंधारे असलेल्या प्रांतांत दरसाल लागवड होणारी एकंदर जमीन २२६० लक्ष एकर होती. तीपैकीं सुमारें ४४० लक्ष एकर जमिनीला म्हणजे शेंकडा १९½ एकर जमिनीला पाटाचें पाणी मिळत होतें. अशा जमिनीपैकीं १८½ दशलक्ष एकर म्हणजे शेंकडा ४२ एकर जमीन सरकारी कालवे व तलाव यांच्या पाण्यानें भिजत असे आणि २५½ दशलक्ष एकर म्हणजे शेंकडा ५८एकर खासगी साधनांनीं भिजत असे व अशा जमिनीपैकीं निम्म्याहून अधिक जमीन विहिरीच्या पाण्यानें भिजत असे. कमिशनच्या सालच्या पूर्वीच्या पावशतकांत सरकारी पाण्यानें एकंदर ८० लक्ष एकर अधिक जमीन भिजूं लागली व खासगी पाण्यानें ३० लक्ष एकर अधिक जमीन भिजूं लागली.म्हणजे पंचवीस वर्षांत११० लक्ष म्हणजे शेंकडा ३३एकर अधिक जमीन भिजूं लागली. याबरोबरच देशी संस्थानांत भिजूं लागलेली जमीन हिशेबांत धरल्यास एकंदर ५३० लक्ष एकर जमीन (१९० लक्ष एकर कालव्यांच्या पाण्यानें, १६० लक्ष एकर विहिरीच्या पाण्यानें, १०० लक्ष एकर तलावांच्या पाण्यानें आणि ८० लक्ष एकर इतर साधनांनीं ) पाण्यानें भिजूं लागली. नवे कालवे मोठ्या प्रमाणावर बांधण्यासंबंधानें कमिशनचें मत असें पडलें कीं, पाटबंधाऱ्यांच्या कामाकरितां काढलेल्या कर्जावर व्याज सुटून शिवाय फायदा होईल असें प्रांत म्हणजे पंजाब, सिंध आणि मद्रास हे होत. कारण अवर्षण व दुष्काळ या प्रांतांत फारच क्वचित पडतात. याच भागांत कालवे लवकर व मोठ्या प्रमाणांत बांधण्यांत यावे, याचें कारण हे कालवे आर्थिकदृष्ट्या सरकारला फायदेशीर पडतील इतकेंच नव्हे तर त्यामुळें देशांतील धान्याचा एकंदर पुरवठा पुष्कळच वाढेल. दुष्काळनिवारणविषयींचा प्रश्न हातीं घेऊन मुंबई इलाख्यांतील सर्वांत अधिक दुष्काळ पडणाऱ्या सोलापूर जिल्ह्याविषयींच्या माहितीवरून कमिशननें असें मत पुढें मांडलें कीं, सदरहू जिल्ह्यांत दुष्काळी मदत म्हणून दरसाल सरासरी खर्च सरकारला १ लाख रुपये करावा लागत असल्यामुळें व दुष्काळनिवारणार्थ खर्च करण्यापेक्षां दुष्काळप्रतिबंधक उपायावर खर्च करणें अधिक इष्ट असल्यामुळें या कामीं म्हणजे कालव्यांनीं शेतीला पाणी पुरविण्याच्या कामीं सरकारनें दर एकरीं २२१ रुपये खर्चीं घालणें अयोग्य नाहीं. या धोरणानुसार मुंबई इलाख्यांतील जिल्ह्यांना पाणी पुरविण्याकरितां, सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर अवर्षणाच्या सालींहि पर्जन्यवृष्टि होत असल्यामुळें तेथें जलसंचय करण्याकरितां मोठाले तलाव बांधावे असें कमिशननें सुचविलें. मद्रास इलाख्यांत तुंगभद्रा नदीच्या कालव्याचीच जुनी योजना हातीं घ्यावी व कृष्णा नदी अडवून पाण्याचा सांठा करावा असें त्यांनीं मत दिलें. मध्यप्रांतांतल्या भातशेतीच्या जिल्ह्यांकरितां दुष्काळी सालांत पाणी देण्याकरितां कालवे बांधावे आणि बुंदेलखंडांतील केन कालव्याचें काम हातीं घ्यावें अशी सूचना केली. अखेर एकंदर हिंदुस्थानांत मोठमोठीं कालव्यांचीं कामें हातीं घेण्यासंबंधाची साधारण योजना पुढें मांडून त्या कामीं ४४ कोट रुपये सरकारनें खर्च करावे व त्यायोगानें ६५,००,०००एकर अधिक जमिनीला पाणी पुरविण्याची सोय करावी अशी त्यांची सूचना होती. या योजनेमुळें खर्च होणाऱ्या कर्जाऊ रकमांवरील व्याज भागविण्याकरितां कालव्यांपासून होणाऱ्या उत्पन्नाच्या भरीला, शिवाय दरसाल ७४ लाख रुपये सरकाराचा कायमचा खर्चाचा बोजा वाढणार, यांत दरसाल दुष्काळनिवारणाकडे होणारी रक्कम अजमासें ३१ लाख रुपये वजा करून बाकी ४३ लक्ष रुपये सरकारला खर्च करावे लागणार; त्याचा मोबदला म्हणून दुष्काळनिवारण व इतर फायदे मिळविणें अयोग्य नाहीं असा सल्ला कमिशननें अखेर दिलेला आहे. एकंदरीनें पाहतां या कमिशनचा मुख्य परिणाम असा झाला कीं, पाटबंधाऱ्यासंबंधाच्या कामाला एक विशिष्ट धोरण लागलें व तेव्हांपासून या बाबतींत विशेष लक्षांत भरण्यासारखी प्रगति झालेली आहे.

पाण्यावरील सरकारी आकार.— हा आकार कोठें कोठें जमीनसारा वाढवून घेतात, व कोठें कोठें जमीनीच्या मलकापासून किंवा शेतकऱ्यापासून स्वतंत्र पाणीपट्टी उर्फ नळपट्टी आकारून घेतात. हा आकार पिकाची जात, पाण्याचें परिणाम, जमीनीचा मगदूर, आठवड्यांतील पाणी देण्याच्या वेळा आणि शेतकऱ्याला या पाण्यापासून होणारा फायदा इत्यादि गोष्टींवरून ठरवितात. पुण्याच्या आसपास उंसाच्या पिकावर एकरीं रु. ५० आकार घेतात.

हा अगदीं अपवादात्मक दर आहे व तो अगदीं थोडक्या भागापुरताच लागू आहे. हा येवढा भारी दर क्षम्य मानण्याचें कारण असें कीं,ऊंस पिकविणारे लोक चांगलीं उंची खतें घालून दर एकरी आठशें रुपयेपर्यंत उत्पन्न काढतात. मुठा कालव्याच्या इतर भागांत एकरी दर रु. ४० पासून रु. १२ आहे, आणि मुंबई इलाख्यांतलि इतर कालव्यांच्या पाण्यावर आकार एकरी रु. २५ ते १० पर्यंत आहे. मद्रास इलाख्यांत उंसाच्या पिकावर जास्तींत जास्त आकार रु. १० असून पंजाबांत रु. ८॥ च्या वर कोठेंहि नाहीं. मद्रास इलाख्यांतील भाताच्या पिकावर रु. ५ ते २ पर्यंत दर असून बंगाल्यांत याच जातीच्या पिकावर फक्त रु. २॥ ते १॥ पर्यंत आकार घेतात. या दोन्ही प्रांतांत पाटाचें पाणी बहुतेक भाताच्या पिकाकरितांच घेत असतात. पंजाबांत भाताचें पीक फारसें होत नसूनहि तेथें सदरहू दर एकरी रु. ७ ते रु. ३। पर्यंत आहे. पंजाबांत मुख्य पीक गव्हाचें असून त्या पिकावर आकार रु. ४। ते ३॥। च्या दरम्यान आहे; आणि वैरणीच्या पिकावर रु. ३ ते २॥ पर्यंत आहे. कालव्यांच्या पाण्यावरील सरासरी दर एकरी ३॥ रुपये असून सिंध व बंगाल या प्रांतांत ही सरासरी १॥ रु. पडते. पंजाबांत रु. ३।. आणि मद्रास, संयुक्त प्रांत व मुंबई इलाख्यांतील दक्षिण भागांत ४॥ रुपये पडते. प्रांतिक दृष्टया पिकाच्या किंमतीवर शें. १० ते १२ ह्या आकाराची सरासरी पडते आणि बंगाल व मुंबई इलाख्याच्या मध्य व दक्षिण भागांत ही सरासरी शे. ६ हून जरा अधिक पडते.

**वा ह तु की चे का ल वे.**—वीस वर्षांपूर्वी केवळ वाहतुकीकरितां किंवा शेती व वाहतूक या दोन्ही कामांकरितां उपयोगी पडणारे असे कालवे बांधण्यासंबंधानें बराच विचार चालू होता. परंतु आतां हा विचार पूर्णपणें त्याज्य ठरलेला आहे. हा विचार पुढें येण्याचें कारण असें कीं, आगगाडया प्रथम फायदेशीर होत नव्हत्या, आणि अलीकडे आगगाडयावर नफा पडूं लागल्यापासून हा वाहतुकीच्या कालव्यांचा प्रश्न कायमचा मागें पडला. वाहतुकीचे कालवे बांधणें हें फार खर्चाचें काम आहे, इतकेंच नव्हे तर पाण्याचा पुरवठा कमी पडला कीं वाहतूक बंद करावी लागते. असे वाहतुकीचे कालवे बंगाल, मद्रास, सिंध व ओरिसा या प्रांतांतील दुआबांशिवाय इतर कोठेंच उपयुक्त होण्यासारखे नाहींत. विशेषतः पूर्वबंगालमध्यें अशा कालव्यांचा वाहतुकीच्या दृष्टीनें फार उपयोग होण्यासारखा असल्यामुळें तिकडे सरकारचें हल्लीं लक्ष गेलें आहे.

[सं द र्भ ग्रं थ—राबर्ट रूटलेज डिस्कव्हरीज अँड इनव्हेन्शन्स; व्हर्नान-हरकोर्ट-रिव्हर्स अँड कॅनॉल्स; चापमन-कॅनॉल नॅव्हिगेशन; फुल्टान—कॅनॉल नॅव्हिगेशन; व्हॅलन्सी-ट्रीटाइज ऑन इन्लंड नॅव्हिगेशन; स्टीव्हन्सन—कॅनाल अँड रिव्हर इंजिनियरिंग रिपोर्ट अँड एव्हिडन्स ऑफ दि रॉयल कमिशन ऑन कॅनाल्स; ए. ब्रिटानिका ( कॅनाल, पनामा कॅनाल व सुएझ कॅनाल ) एन्सायक्लो. सोशल रिफॉर्म्स; इंडियन ईयर बुक. ].

**कालसी.**—संयुक्त प्रांत. डेहराडून जिल्हा. चक्राट तहशिलींतील एक गांव. उ. अं. ३०° ३२' व पू. रे. ७७५१'.

यमुना आणि टॉन या नद्यांच्या संगमाजवळ हें ७६० लोकवस्तीचें ( इ. स. १९०१ ) एक गांव आहे. हल्लीं हें तहशिलीचें ठिकाण नसल्यामुळें याचें महत्त्व कमी होत चाललें आहे. जवळच अशोकाचीं शासनें आहेत. त्यांपैकीं एकावर पश्चिम आशिया, ग्रीस आणि इजिप्त या देशांच्या समकालीन राजांचीं नांवें खोदलेलीं आहेत. [ कॉर्पस इन्स्क्रिप्शनस् इंडिकारम्, पु. १ ].

**कालसेडान**—कालसेडान हें आशियामायनरमधील बिथिनियाचें समुद्रकांठचें शहर होतें. हें बिझान्शियमच्या समोर असून, स्कुटारीच्या दक्षिणेस होतें. हें शहर मिगेरीयन लोकांची वसाहत असून देववाणीनें याला 'आंधळ्याचें शहर' असें नांव दिलें असें म्हणतात. याचा पूर्वीचा इतिहास बिझान्शियमच्याच इतिहासांत अंतर्भूत होतो. याच्यासंबंधीं बरेच लढे होऊन शेवटीं परगाममच्या तिसऱ्या ॲटॅलसनें ( इ. स. पूर्वी १३३ ) तें रोमन लोकांनां दिलें. मिथ्रिडाटीझनें ह्याचा नाश केला. बिझान्शियमचा नाश करणाऱ्या रानटी लोकांनीं कालसेडानवर पुष्कळ हल्ले केले. सध्यां ह्याच जागेवर कॅडीक्युई खेडें आहे. येथील लोकसंख्या ३३००० आहे. येथें ब्रिटीश वसाहत व प्रार्थनामंदीर आहे. ह्याच्या दक्षिणेस पॅन्टी चिऑनचे ( आधुनिक पेन्डिक ) अवशेष आहेत. याच ठिकाणीं बेलिसेरिअसनें आपला एकांतवास काढला.

**कालहस्ती,** ज मी न दा री.— ( कालस्त्री ) मद्रास इलाख्यांतील ही सर्वांत मोठी जमीनदारी असून तीपैकीं कांहीं भाग उत्तरअर्काट जिल्हा, कांहीं नेलोर व कांहीं चिंगलपुट जिल्ह्यांत आहे. या जमीनदारींतील जिल्हे, खेडीं व त्यांचें क्षेत्रफळ पुढीलप्रमाणें:—

| जिल्हा | खेडीं | क्षेत्रफळ ( चौ. मैल. ) |
|---|---|---|
| उत्तर अर्काट | ४०६ | ६३८ |
| नेलोर | २०१ | ५७६ |
| चिंगलपट | २०६ | २५० |

कालहस्ती गांव हें मुख्य ठिकाण असून येथेंच जमीनदार रहातो. जमीनदार पेलमा जातीचा असून त्याच्या घराण्याचा इतिहास अप्रसिद्ध आहे. वारंगळ येथील दोहोंपैकीं एका प्रतापरुद्राकडून ही जहागीर दामरल जविराय ( तेलगू-रायुडु ) यास प्रथम मिळाली, असें येथील जमीनदार सांगतात. इ स. १६३९ मध्यें असलेला पाळेगार दारगल वेंकटाद्रि नायुडु यानें चेन्नकुप्पुम हें खेडें इंग्रजांस दिलें. इंग्रजांनीं त्याबद्दल चंद्रगिरीच्या राजा( विजयानगर

सोडून आलेला )पासून सनद मिळविली. या दारगल पाळेगारानें अशी अट घातली होती कीं, या इंग्रजांच्या वसाहतीला त्याच्या बापाच्या नांवा ( चेन्नप्पानायुडु ) वरून 'चेन्नपट्टणम्' असें नांव द्यावें. कंपनीच्या वखारींचा अधिकारी मि. डे यानें या ठिकाणीं 'फोर्ट सेंट जॉर्ज' हा किल्ला बांधला व तेथें एक शहर वसविलें. त्याला इंग्रज लोक 'मद्रास' असें म्हणतात पण तेथील रहिवाशी 'चेन्नपट्टणम्' असेंच म्हणतात.

इ. स. १७९२ सालीं ही जमीनदारी ब्रिटिश सत्तेखालीं आली व इ. स. १८०१ सालीं जमीनदारास जमीनदारी आपल्या ताब्यांत ठेवण्याबद्दल सनद देण्यांत आली. पुढें लवकरच जमीनदारास वंशपरंपरेनें राजा हा किताब देण्यांत आला. एकंदर उत्पन्न ५ लाखांवर असून ब्रिटिश सरकारास पेशकाश म्हणून १.७ लाख रुपये द्यावे लागतात. पूर्वी जमीनदारीस फार कर्ज झाल्यामुळें सर्व व्यवस्था कोर्ट ऑफ वार्ड्सकडे घेण्यांत आली होती. परंतु आतां ती पुन्हां जमीनदाराकडे देण्यांत आली आहे. येथील जमीन फारशी सुपीक नाहीं[ सिवेल—दक्षिण हिं. घराणीं; कॉक्स–मॅन्युअल ऑफ नॉर्थ अर्काट ].

**त ह शी ल.**—मद्रास इलाखा उत्तर अर्काट जिल्ह्याच्या ईशान्येस कालहस्ती जमिनदारींतील एक तहशील. उ. अ. १३° १४' ते १३° ५५ व पू. रे. ७९° २७' ते ७९° ५९'. क्षेत्रफळ ६३८ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ )९४१३२. या तहशिलींत एक गांव व ३२४ खेडीं आहेत. इ. स. १९०३–४सालीं एकंदर उत्पन्न ७८,००० रुपये होते.

**गां व.**—मद्रास इलाखा. उत्तर अर्काट जिल्ह्यांतील कालहस्ती तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ. अ. १३° ४५' व पू. रे. ७९° ४२'. याची लोकसंख्या ( १९०१ ) ११९९२ असून हें साउथ इंडियन रेल्वेचें स्टेशन आहे. येथें कालहस्तीचा राजा राहतो. येथें बराच व्यापार चालतो. येथील शिवाचें देऊळ प्रसिद्ध असून काशीइतकें या देवस्थानाचें महत्व येथील लोक मानितात.

**कालाटिआ**—हें इटलीमध्यें कॅम्पानिआ प्रांतांतील जुनें शहर आहे. हें कापुआच्या आग्नेय दिशेस व्हाया ॲपिया सडकेवर आहे. येथें प्राचीन अवशेष नाहींत परंतु खडकापासून तुटून पडलेले दगडाचे ढीग पुष्कळ आहेत.

जमीन खाणतांना या शहरांत रोमन लोकांच्या पूर्वीची असलेली स्मशानें इ.स.१८८२सालीं आढळलीं. हें शहर व्हाया-ॲपिया या मुख्य रस्त्यावर असल्यामुळें तें लष्करीदृष्ट्या महत्वाचें आहे. ख्रि. पू. ३१३ मध्यें हें शहर सॅमनाइट या लोकांनीं घेतलें होतें परंतु फॅबिअसनें तें पुनः जिंकलें .ख्रि. पू. ३११ मध्यें सॅमनाइट लोकांनी तें पुनः काबीज केलें. तिसऱ्या शतकांत या शहरांत टांकसाळ होती. ख्रि. पू. ५९ व्या वर्षी सीझरनें येथें एक वसाहत स्थापिली.

**कालिकत,**ता लु का.—मद्रास इलाखा. मलबार जिल्ह्यांतील तालुका व समुद्रकांठचा विभाग. उ. अ. ११ ° १०' ते ११ ° ३३' आणि पू. रे. ७५ ° ४५' ते ७६ ° ९'. क्षेत्रफळ ३७९ चौ. मैल. लो. सं. ( १९२१ ) २,९०,७३९. ह्या जिल्ह्यांत एकंदर ७४ आमसम किंवा लहान विभाग आहेत.

कालिकत येथें म्युनिसिपालिटी आहे व बेथपूर नांवाचें एक बंदर आहे. शिवाय कोनोली कॅनॉल नांवाचा एक कालवा आहे. तालुक्याच्या उत्तरेस वायनटचा सपाट प्रदेश आहे. सर्व तालुकाभर जंगल असून कोठें कोठें तांदुळाचें पीक काढतात. जमीन सर्वत्र उच्चनीच आहे. जमीनमहसूल सुमारें २॥ लाख आहे.

**श ह र.**—कालिकत तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. ११ ° १५' व पू. रे. ७५ ° ४७'. हें मद्रास रेल्वे लाइनीवर स्टेशन असून मद्रासपासून ४१४ मैल आहे. स्थल फार प्रेक्षणीय असून मोठमोठे वृक्ष आहेत. येथें एक वेड्याचें इस्पितळ आहे. कलाई येथें उत्तमपैकीं इमारती लांकडाचा व्यापार चालतो. लोकसंख्या ( १९२१ ) ८२३३४. हवामान प्रकृतीला मानवेलसें आहे. शहराचे दाट वस्तीचे कांहीं भाग अस्वच्छ व रोगकारक आहेत.

जेव्हां चेरमान पेरुमल नांवाचा मलबारचा शेवटचा राजा मक्केस गेला तेव्हां त्यानें आपलें राज्य आपल्या सरदारांस वांटून दिलें. आणि त्यानें कालिकतच्या झामोरिनास 'कोंबड्याचें आरवणें जितक्या लांब ऐकू जाईल तितकी जागा दिली म्हणतात. व ह्यावरून त्यास 'कोलीकोड' हें नांव मिळालें. कालिकत हा त्याचाच अपभ्रंश आहे. तेराव्या शतकांत अरब लोकांनीं ह्या शहराची व झामोरिनची फार तारीफ केली आहे. १५ व्या शतकांत तर ह्या शहरास मलबार किनाऱ्यावरचें शहर म्हणून फार महत्व आलें होतें. जरी यूरोपियन लोक पहिल्यानदां कालिकतास आले तथापि अरब व्यापाऱ्यांनीं त्यांची येथें फारशी डाळ न शिजूं दिल्यामुळें त्यांच्या कोचीन व कनानोर येथील वसाहतींसच फार महत्व आलें. पोर्तुगीज धाष्टी कोविलहाम हा कालिकत येथें येणारा पहिला यूरोपियन होय ( १४८६ ). पण व्यापाराला खरा आरंभ व्हास्को डी गामा आल्यानंतरच झाला (१४९८). पण झामोरिननें त्याला चांगलें वागविलें नाहीं. दोन वर्षांनंतर केब्रलनें येथें येऊन वखार घातली. पण मापीला लोकांनीं नासधूस करून त्याच्या लोकांस मारून टाकलें. तदनंतर ह्या शहरावर गोळीबार करण्यांत आला. इ. स. १५१० सालीं कोचीनच्या राजाच्या सांगण्यावरून अलबुकर्कनें कालिकत वर छापा घातला. परंतु त्यांत त्यास हार खावी लागली. एक वर्षानंतर झामोरिननें पोर्तुगीज लोकांस वखार घालण्याची परवानगी दिली. पण १५२५ मध्यें त्यांनीं कालिकत सोडून दिलें.

१६१५ सालीं क्याप्टन किलिंग नांवाच्या इंग्रजानें येऊन झामोरिनशीं तह केला. पण त्यांनीं १५६४ सालीं वसाहत केली. फ्रेंचांनीं येथें १६९८ सालीं वसाहत केली. फ्रान्सशीं झालेल्या लढायांत इंग्रजांनीं हें शहर तीनदां आपल्या ताब्यांत घेतलें पण १८१९ सालीं तें फ्रेंचांस परत दिलें. डॅनिश लोकांनीं येथें १७५२ सालीं वखार उघडली. पण १७८४ सालीं तिचा नाश करण्यांत आला. डच लोकांनीं मात्र ह्या शहराकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं. म्हैसूरशीं झालेल्या लढायांत ह्या शहरास फार त्रास पोहोंचला. मुसुलमानांनीं १७७३ व १७८८ सालीं असें दोनदां हें शहर उध्वस्त केलें. सन १७९० सालीं टिपूशीं लढण्यांत इंग्रजांनीं हें शहर घेतलें व १७९२ सालीं श्रीरंगपट्टणच्या तहानें तें कंपनी सरकाराकडे कायमच राहिलें. मलबारकिनाऱ्यावरील बंदरांत कालिकतचा दुसरा नंबर आहे. धान्य व मीठ हा आयात माल असून बाहेर जाणाऱ्या मालांत कॉफीचें आधिक्य आहे.

येथें कापूस पिंजण्याच्या व सूत काढण्याच्या दोन गिरण्या असून चार कॉफीचे, तीन विटांचे, एक लोखंडी व दोन तेलाचे कारखाने आहेत.

येथें तीन कॉलेजें व वरीचशीं हायस्कुलें, मुलींकरितां व स्त्री पुरुष शिक्षकांकरितांहि शाळा आहेत. केरळसंचारी व मनोरमा (मल्याळी)हीं साप्ताहिकें, दोन इंग्रजी द्विसाप्ताहिकें व एक मितवादी मासिक येथें निघतें.

**कालिकापुराण**—एक उपपुराण. या पुराणांत ९३ अध्याय व ९००० श्लोकसंख्या आहे. गिरिजा, देवी, भद्रकाली, काली, महामाया यांसारखीं असंख्य रूपें धारण करणाऱ्या शिवपत्नीच्या उपासनेसाठीं हें रचिलें आहे. तेव्हां हें शाक्तपंथीय असणार हें उघड आहे. ग्रंथाच्या पहिल्या अध्यायांत ब्रह्मा आपल्या संध्या नांवाच्या मुलीवर कसा कामासक्त झाला याचें वर्णन वायु, लिंग किंवा शिवपुराण यांतून न आढळणाऱ्या भाषेंत केलेलें आहे. शिवपार्वतीविवाह, दक्षयज्ञ व सतीचा मृत्यु हे विषय पुराणाच्या आरंभीं येऊन गेले असून पुढें पीठस्थानांची कशी उत्पत्ति झाली व कोठकोठें लिंगें स्थापिलीं गेलीं तो इतिहास या पुराणांत आहे. भैरव आणि वेताळ यांनीं देवीचीं निरनिराळ्या स्वरूपांत केलेली उपासना कथन करितांनां, देवीपूजेचे विधी व संप्रदायहि सविस्तर वर्णन करण्याची संधी साधून घेतलेली दिसते. प्राण्यांचे वळी देण्याचे विधीहि सांगितले आहेत. या पुराणाचा दुसरा विशेष म्हणजे आसामांतील कामरूप तीर्थासमीपचे पर्वत व नद्या तसेंच त्या प्रदेशांतील पवित्र अशा कामाक्षीचें देवस्थान यांचें कंटाळवाणें वर्णन हा होय. वेदपुराणधर्मांतर्गत म्हणविणारा हा अभिचारी तांत्रिक किंवा शाक्त पंथ आसाम किंवा ईशान्य बंगाल या भागांतून निघावा हें विलक्षण होय असें विल्सन म्हणतो.

पार्वतीनें केलेल्या शिवाराधनव्रतांत कांहीं विधी सांगतांना महिन्यांचा आश्विनापासून आरंभ धरिला आहे. याची भाषा प्रौढसंस्कृत अशी नाहीं. हाव–भाव या शब्दाची आविर्भाव या अर्थी वऱ्याच ठिकाणीं योजना केली आहे.

या पुराणांत कथेच्या अनुरोधानें वरील मुख्य कथानकाशिवाय वसिष्ठअरुंधतीविवाह, जनकास भूमीपासून सीतेची प्राप्ति, नरकासुरजन्म व त्याचा कृष्णाच्या हस्तें वध, तारकासुरोत्पत्ति व कार्तिकेयाच्या हस्तें त्याचा वध, या उपकथा असून शिवपार्वती यांनीं चंद्रशेखर व तारावती हीं नामाभिधानें धारण करून घेतलेले मानवी अवतार इत्यादि कथा आहेत.

**कालिंगी**—कालिंजी पहा.

**कालिंजर (१)**—संयुक्तप्रांत. बांदा जिल्हा. गिर्वाण तहशिलींतील एक गांव आणि किल्ला. उत्तर अक्षांश २५° १' व पूर्व रेखांश ८०° २९'. लोकसंख्या (१९०१) ३०१५. समुद्रसपाटीपासून उंची १२०३ फूट. बुंदेलखंडांतील हा एक अति प्राचीन किल्ला होय. सत्ययुगांत रत्नकूट, त्रेतायुगांत महागिरी व द्वापारयुगांत पिंगालु अशा निरनिराळ्या नांवांनीं याविषयींचा उल्लेख आढळतो. हल्लींचें कालिंजर हेंहि नांव प्राचीन असून महाभारतांत याच नांवानें याचा उल्लेख आलेला आहे. टॉलेमीनें टमसि या नांवानें याचा उल्लेख केला आहे. शिवपुराणांत नऊ उत्कलांपैकीं हा एक आहे असें म्हटलें आहे. हल्लीं यास कालंजर असेंहि नांव आहे. कारण येथें कालंजराचें (जो कालास वृद्धत्व आणतो तो 'शिव') देऊळ आहे. एकंदरींत शैवांचें हें फार प्राचीन स्थळ असून चंदेल राजाच्या दंतकथेंतलि मूळपुरुष चंद्रब्रिम अथवा वर्मा यानें यास तटबंदी केली, अशाविषयीं या प्रांतात दंतकथा प्रचलित आहेत.

महाभारतामध्यें हें एक मोठें प्रसिद्ध शहर आहे असें वर्णिलें असून येथील देवतलावांत जो कोणी स्नान करील त्यास हजार गाई दान दिल्याचें पुण्य लागेल असें या स्थानाचें महात्म्य वर्णिलें आहे. डोंगरावर इतस्ततः असलेल्या व पवित्र मानलेल्या जागांवरील शिलालेख किल्ल्याच्या दरवाजावरील शिलालेखांपेक्षां अधिक जुने आहेत. त्यारून किल्ला बांधण्यापूर्वी या डोंगरावर हिंदु देवळें होतीं हें स्पष्ट आहे. त्याचप्रमाणें तटाला जे कांहीं खोदकाम केलेले दगड उपयोगांत आणलेले दिसतात, ते पूर्वीच्या कामांचे काढून तेथें लवले आहेत असें दिसतें. सातव्या शतकांत केदारनाथ यानें हें शहर वसविलें असें फेरिस्ता म्हणतो. लाहोरचा राजा जयपाल यानें इ. स. ९७८ सालीं गझनिवर जी यशस्वी स्वारी केली तींत कालिंजराचा राजा त्यास मदत करण्याकरतां होता असें मुसुलमान इतिहासकारांनीं नमूद करून ठेविलें आहे. गिझनीच्या महंमुदानें हिंदुस्थानावर जी चौथी स्वारी केली तिला इ. स. १००८ सालीं आनंदपाल यानें पेशावर येथें विरोध केला. त्यावेळीं झालेल्या लढाईंत कालिंजरचा राजा हजर होता. इ.स.१०२१ सालीं कालिंजरचा चंदेल राजा गंग अथवा नंद यानें

कनोजच्या राजाचा पराभव केला. इ. स. १०२३ त गिझनीच्या महंमुदानें कालिंजरच्या किल्यास वेढा दिला होता. परंतु लवकरच दोघांनीं तह केला. इ. स. ११८२ च्या सुमारास दिल्लीचा चव्हाण वंशांतील राजा पृथ्वीराज यानें चंदेल्यांचा पराजय केला, त्यावेळीं त्यांनीं महोबा येथून आपलें राज्यकारभाराचें ठाणें उचलून कालिंजर येथें आणलें. इ. स. १२०३ सालीं महंमद घोरीचा सेनापति कुतुबुद्दीन यानें कालिंजर सर केलें व हिंदुदेवळें भ्रष्ट केलीं. परंतु या वेळीं मुसुलमानांची सत्ता या भागावर फार दिवस टिकली नाहीं. कारण इ. स. १२३४व पुन्हां १२५१ सालीं कालिंजरावर मुसुलमानांनीं स्वाऱ्या केल्या होत्या असा उल्लेख सांपडतो. इ. स. १२४७ सालीं सुलतान नासिरुद्दीन महंमदनें कालिंजरच्या आसपासचा प्रदेश जिंकला. परंतु कालिंजरचा किल्ला चंदेल्यांकडे निदान तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत तरी होता, हें इ. स. १२४७ नंतरच्या तेथें सांपडलेल्या शिलालेखांवरून स्पष्ट दिसतें.

यानंतर इ. स. १५३० सालीं कालिंजरचा उल्लेख इतिहासांत येतो. हुमायुनानें या सालापासून पंधरा वर्षें हा किल्ला घेण्याचा प्रयत्न केला. इ. स, १५४५ सालीं शेरशहा या किल्ल्यावर चाल करून आला. त्या वेळ्यांत किल्ल्यावर गोळे सोडीत असतां एक गोळा उलट फिरून शेरशहा ज्या ठिकाणीं उभा होता त्या ठिकाणीं फुटला व तेथें असलेल्या दारूनें एकदम पेट घेतला, त्यांतच शेरशहाचें अंग भाजलें व त्याचमुळें दुसऱ्या दिवशीं तो प्राणास मुकला. परंतु त्याच्या अगोदर किल्ल्यावर हल्ला करण्याचा त्यानें हुकूम दिला होता. किल्ला सर झाला व शेरशहाचा पुत्र जलालखान यानें किल्ल्यांत आपणांस तख्ताभिषेक करून घेतला व ' इस्लामशहा ' असें नाव धारण केलें. इ. स. १५६९ सालीं मज्नूनखानानें अकबराच्या वतीनें किल्ल्यावर हल्ला केला व अखेरीस त्यास तो शरण आला. अकबराच्या कारकीर्दींत हें एका ' सरकाराचें ' मुख्य ठिकाण असून तें राजा बिरबल याच्या जहागिरींत मोडत होतें. यापुढें हा भाग बुंदेल्यांच्या ताब्यांत गेला ( बांदा जिल्हा पहा ). छत्रसालच्या मृत्यूनंतर पन्नाचा हरदेव शाह याच्याकडे आला. याच्याच वंशजांकडे बरेच दिवस हा किल्ला असून पुढें त्यांनीं त्यांच्या आश्रितांपैकीं कैम जी नांवाच्या घराण्यास दिला.

मराठ्यांच्या काळांत अलीबहाद्दुरानें दोन वर्षें वेढा देऊन हा किल्ला सर करण्याचा यत्न केला. परंतु त्यास यशप्राप्ति झाली नाहीं. ब्रिटिशांचा अंमल या भागांत सुरू झाल्यावर कैम जी घराण्याचा वंशज दर्यासिंग याचा किल्ल्यावरील हक्क कायम केला; परंतु तो ब्रिटिशांच्या विरुद्ध कारस्थान करूं लागल्यामुळें किल्ल्यावर ब्रिटिशांनीं हल्ला चढविला. हल्ल्यांत किल्ला पडला नाहीं, पण लवकरच दर्यासिंग शरण आला; त्यावेळीं किल्ल्याच्या मोबदला सपाट प्रदेशावरील तितकाच मुलुख देऊन किल्ला ब्रिटिशांनीं आपणांकडे ठेविला. इ. स. १८५७ च्या बंडांत ब्रिटिश सैन्याच्या एका तुकडीनें किल्ल्यावर बंदोबस्त ठेविला होता, त्यावेळीं पन्नाच्या राजानें त्यास मदत केली होती. इ. स. १८६६ सालीं हा किल्ला निकामी करण्यांत आला.

किल्ल्याचा वरील परिघ ४।५ मैलांचा असून तटबंदी अगदीं कड्यापासून आहे. किल्ल्यास आंत जातांना पायऱ्या असून सात दरवाजे लागतात. पैकीं कांहींवर निरनिराळ्या वेळचे शिलालेख आहेत. वर खडकांत खोदलेलीं तळीं, कांहीं देवळें व इतस्ततः पडलेले शिलालेख पुष्कळ दिसतात. येथील नीलकंठाचें देऊळ अद्यापि सुस्थितींत आहे. तसेंच येथें पुष्कळ लेणीं असून, त्यांपैकीं कांहींवर शिलालेख आहेत [ कनिंगहॅम—आर्किऑलॉजिकल सर्व्हे, रिपोर्ट पु. २१; जर्नल आशिया सोसायटी, बंगाल पु. १७. स्मिथ; वैद्य ]

( २ ) राजपुताना. बांसवाडा संस्थानांतील एक खेडें उ.अ. २३°२१' व पू. रे. ७४°१९'. येथें पूर्वी मोठा व्यापार चालत असे. परंतु या भागावर मराठ्यांच्या स्वाऱ्या होऊं लागल्यामुळें याचें महत्व कमी झालें. येथें एक पडकें जैन मंदिर असून त्याचें वर्णन हेबरनें केलें आहे.

**कालिंजी, कालिंगी**—मद्रास इलाख्यांतील एक शेतकरी जात. कालिंगींची लोकसंख्या ( १९११ ). ८३४४२ व कालिंजींची ५१,५१८ आहे. कालिंगी व कालिंजी या दोन वर्गाच्या वृत्तांतांत बराच घोंटाळा झाला आहे. गंजम जिल्ह्यांत कालिंजी हे शेतकरी असून विजगापट्टण येथें हे लोक शेतीच करितात; परंतु जयपुरास त्यांनां पाइके ( लढवय्यांची जात ) म्हणतात. १८९१ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत गंजम येथें कालिंगींची लोकसंख्या फार आहे असें म्हटलें आहे. कालिंगी म्हणजे कलिंगपुरस्थ होत व कलिंग हा तेलगू देशाचा हा एक समुद्रकिनारा लोक होय. त्रिकलिंगाचा अपभ्रंश तेलगू असा आहे असें डॉ. काल्डवेल म्हणतो. बुरागम, किंतल व ओडिया असे या जातीचे मुख्य विभाग आहेत. १९०१ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत जी माहिती सांपडते ती अशी कीं, कलिंग राजांनीं या लोकांनां हिंदु देवळांत पूजारी म्हणून काम करण्यास प्रथम आणलें. कालिंगी हे उडिया व तेलगू भाषा बोलतात. बुरागम व किंतल–कालिंगी यांच्या चालीरीतींत फार अंतर आहे. या दोन जातींतील बहिष्कृतांची एक जात आहे तिला पंडिरी किंवा बेवारीनीं असें म्हणतात. कालिंगी खेड्याचे पुढारी व उपाध्ये असतात. त्यांचीं गोत्रें विविध असून प्रत्येक कुटुंबाचें व वंशाचें एक देवक असतें. अरुद्रा-पक्षी व रेविचेट्ट वृक्ष हीं कांहींची देवकें आहेत व ते इष्ट देवकांची पूजा करितात. त्यांच्यांत बालविवाह रूढ आहे. पुरागम जातींत विधवाविवाह नाहीं, परंतु किंतलामध्यें त्यास मुभा आहे. कालिंगी लोक श्री राधाकृष्ण व चैतन्य यांची उपासना करितात. मृतांस पुरण्याची चाल यांच्यामध्यें आहे व मृतांचें श्राद्ध फक्त किंतल–कालिंगी हे

करितात. त्यांच्या स्त्रिया मनगटापासून कोंपरापर्यंत वांगड्या घालतात. नायडू, नायारलू, चौधरी, विसोयी, पोढानो, जेन्ना, स्वायी व नायकू अशीं आडनांवें कांहीं कालिंगींचीं आहेत.

वरील खानेसुमारीच्या रिपोर्टांत उडिया व तेलगू भाषा बोलणाऱ्या कालिंगींचा वृत्तांत दिला आहे तो असाः- कालिंगी हे मुख्यतः तेलगू आहेत व ते विजगापट्टम् व जंगमचे रहिवासी आहेत. कालिंजी हे ओरिसाचे रहिवासी असून दोलुवा, आलिया, बोरंतिया इत्यादि जातींप्रमाणें ते शेती करितात. कालिंगी हे जानवें घालतात पण कालिंजी घालीत नाहींत. कालिंजी जातींचे फारसे पोटभेद नाहींत तथापि मोहिरी कालिंजी म्हणून एक भेद आहे. मोहिरी कालिंजी हेच उरिया देशांत वसाहत करून राहणारे, तेलगू-कालिंजी होत असें म्हणतात. भानु, शुक्र, शंख, नाग इत्यादि कालिंजी जातींचीं गोत्रें आहेत. वोराड, विसोई, बारिको, विहार, डोलेइ, गौड, मोलिको, नायकू, पात्रो, स्तऊ, स्वाइ, गुरु इत्यादि आडनांवें कालिंजींमध्यें आढळतात. त्यांच्यांत सगोत्र विवाह होत नाहींत. कालिंजींच्या मुख्य पुढाऱ्यांस संतों म्हणतात व त्याच्या हाताखालच्या दुय्यम पुढाऱ्यास पात्रो म्हणतात. ह्यांची पंचायतहि असते.

वयांत येण्यापूर्वींच या जातींत मुलींचीं लग्नें करितात व खरा नवरा वराच काल पुढें आला नाहीं तर वधू आपल्या वडील वहिणीच्या नवऱ्याशीं लग्न करून घेते. एखाद्या अविवाहितास विधवेचें पाणिग्रहण कर्तव्य असेल तर त्यास साडो नांवाच्या झाडाशीं प्रथम लग्न करावें लागतें. सर्व लग्नविधी उरिया पद्धतीप्रमाणें होतात. अंत्यविधीच्या बाबतींत हे लोक अन्नांत कडवट पानें घालून तें सर्वांस वाटतात. चितेंतून एक हाड घेऊन तें पिंपळाखालीं पुरण्यांत येतें. दहा दिवस त्या जागेवर पाणी शिंपण्यांत येतें. दहाव्या दिवशीं ' जोला जोला हंडी ' नांवाचा एक धार्मिक विधि करण्याची चाल या लोकांत प्रचलित आहे [ थर्स्टन, से. रि. मद्रास].

**कालिदास.** जी व न वृ त्त.—अशी एक दंतकथा आहे कीं, कालिदास हा जातींचा ब्राम्हण असून बालपणींच पोरका झाल्यामुळें त्याचें पालनपोषण एका गवळ्यानें केलें. पुढें कालिदासाचें एका राजकन्येशीं लग्न झालें व तिला आपल्या गवळी नवऱ्याची साहजिकच लाज वाटूं लागली. परंतु काली देवीवरील नितांत भक्तीमुळें कालिदास लवकरच महासाधु व पंडित बनला. विशेषतः सिंहलद्वीपामध्यें प्रचलित असलेल्या दंतकथेवरून असें दिसतें कीं, ख्रिस्ती शकाच्या सहाव्या शतकांत झालेला कुमारदास कवि व सिंहली राजा यांचा कालिदास हा समकालीन असावा. पंडितजनांच्या बोलण्यांत अजून असलेल्या व भोजप्रबंधासारख्या ग्रंथांत कथन केलेल्या अनेक आख्यायिकांवरून एवढेंच दिसून येतें कीं, पुष्कळ काल्पनिक गोष्टींत कालिदास या नांवाचा वराच उपयोग केलेला आहे.

कालिदास हा त्याच्या ग्रंथांवरून वेदांतपंथी शैव दिसतो. हिमालयावरील देखाव्याशीं तर त्याचा चांगलाच परीचय होता. ' मेघदूतांतील ' उज्जयिनी नगरीचें प्रेमळ वर्णन वाचून तो त्या ठिकाणचा रहिवाशी असावा हेंच सिद्ध होतें. ज्याच्या दरबारीं कालिदास राहिला होता तो विक्रमादित्य म्हणजेच दुसरा चंद्रगुप्त होय. याविषयीं विंटरनिझ्झ व स्टेन कानो यांचें एकमत आहे. तें कसेंहि असो, इ. स. ३५० तें ४६० या कालाच्या दरम्यान तो होऊन गेला असला पाहिजे असें विंटरनिझ्झ म्हणतो.

कालिदासाच्या कालाबद्दल वराच वादविवाद व वाङ्मय उपलब्ध आहे. धारचे रा. का. कृ. लेले व शि. का. ओक यांनीं अनेक प्रमाणें देऊन कालिदास व शककर्ता विक्रमादित्य यांचें समकालीनत्व प्रतिपादिलें आहे (वि. विस्तार पु. २३). सतीशचंद्र विद्याभूषण यांनीं कालिदास, सिंहलद्वीपाचा राजा कुमारदास ( मृ. इ. स. ६२४ ) याच्या बोलावण्यावरून तिकडे गेला व मरण पावला असें लिहिलें आहे ( फर्स्ट ओरिएंटल कॉन्फरन्स-निबंध ). कालिदासाची बंगाल्यांत एक मूर्ति सांपडल्याबद्दलहि मॉडर्न रिव्ह्यूंत एक निबंध आला होता.

का लि दा सा चे ग्रं थः—कालिदासाच्या कालासंबंधीं जी अनिश्चितता दिसते तीच कोणत्या ग्रंथांचें कर्तृत्व ह्याच्याकडे येतें या प्रश्नासंबंधींहि दिसून येते. तथापि खालील ग्रंथ ठाम त्याचेच आहेत हें निश्चित आहे.

महाकाव्यें:—कुमारसंभव व रघुवंश. नाटकें:—शाकुंतल व विक्रमोर्वशीय. रसात्मक काव्यः—मेघदूत. मालविकाग्निमित्र हें नाटक बहुतेक त्याचेंच आहे. ऋतुसंहार हें गीतसमुच्चयहि कदाचित् त्याचेंच असावें. १३६३ मध्यें शार्ङ्गधरानें केलेल्या ' शार्ङ्गधरपद्धति ' नांवाच्या काव्यसंग्रहांतील एक कविता कालिदासाचीच आहे असें म्हणतात.

कालिदासाचीं महाकाव्यें:—रघुवंशांत रामकथा सांगितली असून कुमारसंभवांत पौराणिक देवांच्या हकीगतींचें वर्णन केलें आहे. कुमारसंभव हें बहुतेक त्याचें पहिलें महाकाव्य असावें. याचे १ ते ८ सर्गच विश्वसनीय असून त्यांत हिमालयकन्या उमा ( पार्वती ) हिनें आपल्या तारुण्यगत सौंदर्यानें व भक्तीनें उग्र व तपस्वी शिवाला कसें प्रेमवश केलें, याचें वर्णन उपर्युक्त सर्गांत केलें आहे. त्या नवपरिणत जोडप्याचा आनंद आठव्या सर्गांत वर्णिलेला असून कामशास्त्राचें अचुक ज्ञानहि त्यांत प्रतिबिंबित झालें आहे. एवढें भावनोत्पादक व स्पष्ट वर्णन वाचून हें काव्य कालिदासाचेंच होय याबद्दल खात्री होते. शिवाय कालिदासाच्या ठराविक उपमा व सूर्यास्ताचीं वर्णनेंहि त्यांत आहेत. कुमाराच्या प्रत्यक्ष संभवाचें थोडेसें वर्णण केलेला एखादा सर्ग किंवा थोड्याशा कविता कदाचित् गहाळ झाल्या असाव्यात. उपलब्ध असलेले ९ ते १७ सर्ग भाषेवरून व विषयावरून अलीकडचे व प्रक्षिप्त आहेत हें सहज ओळखूं येतें. रघुवंश या काव्यांत कालिदासानें वाल्मिकीच्या कृतीचें वळण

उघडपणें स्वीकारलें असून १० ते १५ सर्गांत संबंध रामकथा संक्षेपानें दिली असून पहिल्या ९ सर्गांत रामाच्या पूर्वींच्या चार राजांचीं वर्णनें आहेत. रघु व त्याचा पुत्र अज यासंबंधीं असलेल्या सर्गांत त्यानें आपल्या कलेचें श्रेष्ठत्व दाखविलें आहे. भोजराजाची कन्या इन्दुमती हिच्या बरोबर अजाचें लग्न होतें त्यावेळेचा स्वयंवराचा थाट कालिदासानें मोठ्या बहारीनें वर्णन केला आहे. नंतर स्वयंवरांत अपयश पावलेल्यांनीं केलेला हल्ला, अजाचा नमुनेदार राज्यकारभार, इन्दुमतीचा मृत्यु व अजविलाप हीं वर्णनें उत्कृष्ट आहेत. अजपुत्र वराच वयांत आल्यानंतर इन्दुमतीला भेटण्याकरितां तो इहलोक सोडून स्वर्गी जातो असें वर्णन आहे. ९ ते १५ सर्ग रामायणासारखे आहेत. १६ ते १८ या सर्गांत रामानंतरच्या राजांचीं वर्णनें आहेत. १९ व्या सर्गांत अग्निवर्णराजानें प्रधानाच्या हातीं राज्यकारभार देऊन व दुराचरणांत काळ काढून युवराजाच्या जन्मापूर्वीच इहलोक सोडला अशी हकीकत आहे. युवराजाच्या जन्माचा नामनिर्देश व भरतवाक्यांतील आशीर्वचनें या दोन गोष्टींचा या काव्यांत अभाव असल्यानें, कांहीं कविता यांतून गहाळ झाल्या असाव्या असें अनुमान होतें. कुमारसंभवावर २० व रघुवंशावर ३३ टीका आहेत. रघुवंशावरून कालिदासाचें नीतिशास्त्रविषयक ज्ञान दिसून आल्यावाचून राहत नाहीं.

कालिदासाचीं भावगीतें:—अश्वघोषाची प्रार्थनापर बुद्ध गीतें, थोडीशी भासाची कविता व मातृचेताचीं स्फुट गीतें यांपलीकडे एकंदर जुन्या काव्यसंग्रहांत फारशीं भावगीतें सांपडत नाहींत. एतावता कालिदासास आद्य संस्कृत भावनाप्रधान कवि असें म्हणावयास हरकत नाहीं. त्याच्या नाटकांत व महाकाव्यांत उत्कृष्ट भावनाप्रधान वर्णनें आढळतात. तथापि त्याचें हृदयस्पर्शी काव्य मेघदूत हेंच होय. एक संवत्सरपर्यंत हद्दपार झालेल्या यक्षानें आपल्या दुःखीदयितेस मेघदूत पाठविला, हा प्रसंगच मुळीं कालिदासाच्या कौशल्यास खुलावट व पूर्णावकाश देणारा आहे. अलीकडे या काव्याचे अनेक पाठ आढळून येतात. ऋतुसंहारांत षड्ऋतूंचें वर्णन असून त्यास कालिदासाचें काव्य असें म्हणण्यास हरकत नाहीं. जीवसृष्टि व निसर्ग यांचें सूक्ष्म निरीक्षण यांत दिसून येतेंच; तथापि निरनिराळ्या ऋतूंतील प्रेमप्रसंगांचीं उत्तम वर्णनेंहि या काव्यांत कमी नाहींत.

कालिदासावर चुकीनें लादलेलें वाङ्मयः—'श्रुतबोध' नांवाचा एक ग्रंथ कालिदासाचा आहे असें म्हणतात. 'रावणवह ऊर्फ सेतुबंधु' हा ग्रंथ काश्मीरच्या दुसऱ्या प्रवरसेनानें लिहिलेला असावा. याची भाषा फार कृत्रिम व बोजड आहे. 'नलोदय' या ग्रंथाची भाषा कालिदासासारखी मुळींच नाहीं. हा ग्रंथ रविदेवानें लिहिलेला असावा; तसेंच 'काव्यराक्षस किंवा राक्षसकाव्य' हा ग्रंथहि त्याचाच असावा. 'शृंगारातिलक' या काव्याबद्दल शंकाच आहे. 'श्यामला दंडक' नांवाचें दुर्गास्तोत्र व 'सरस्वती स्तोत्र' आणि 'मंगलाष्टक' यांची तिचेटी तंजावर येथें भाषांतरें झालीं आहेत. 'घटकर्पर' नांवाच्या २२ श्लोकी काव्यांत एका स्त्रीनें आपल्या नवऱ्याकडे एक मेघदूत पाठविला असें वर्णन केलें आहे. परंतु या श्लोकांची भाषाशैली कालिदासाहून फारच हलक्या दर्जाची आहे यांत शंका नाहीं.

[संदर्भग्रंथ.-विंटरनिझ; फर्स्ट ओरि. कॉन्फरन्स-निबंध. वि. विस्तार पु. ५२-५४ संस्कृत वाङ्मयेइतिहास व कालिदासाचा ग्रंथ]

**कालिंदी**—कृष्णाची सातवी स्त्री. कृष्ण हा पति मिळावा म्हणून ही यमुनातीरीं तप करीत होती. ही प्रायः यमुनेची मूर्तिमान देवता असावी. कारण ही कोणाची कन्या किंवा नातेवाईक होती, हें वृत्त कोठेंच आढळत नाहीं. एकदां कृष्ण चातुर्मास्यांत इंद्रप्रस्थीं असतां, अर्जुनास समागमें घेऊन मृगयेस गेला होता; त्या काळीं त्यानें हिला तेथें तप करितांना पाहिलें. नंतर चातुर्मास्य संपून द्वारकेस गेल्यावर कृष्णानें हिचें विधीनें पाणिग्रहण करून आपल्या अष्टनायिकात हिची गणना केली. हिला श्रुत वगैरे पुत्र होते. (भाग. स्कं. १० अ. ५८)

**कालिंदी नदी**—अंशुमती नदीचें एक नांव. यमुना नदीसहि हें नांव आढळतें.

**कालिंपॉंग**, वि भा ग.—बंगाल दार्जिलिंग जिल्ह्यांतील एक डोंगराळ प्रदेश. उत्तर अक्षांश २६° ५१' ते २७ १२' व पूर्व रेखांश ८८° २८' ते ८८° ५३'. क्षेत्रफळ ४१२ चौरस मैल. लो. सं. (१९११) ४९,५२०. हा प्रदेश इ. स. १८६४-६५ सालच्या मोहिमेनंतर भूतानपासून ब्रिटिशांस मिळाला. यापैकीं २१३ चौरस मैल संरक्षित जंगल आहे. एकंदर उत्पन्न (इ. स. १९०३-४) ३०००० रुपये. कालिंपॉंग हें मुख्य ठिकाण पेडोंग तिबेटच्या व्यापारी मार्गावर असून तेथें मोठा बाजार भरतो मुनसंग येथें अलीकडे सिंकोनाची लागवड केली आहे.

गां व.—विभागाचें मुख्य ठिकाण. उत्तरअक्षांश २७° ४' व पूर्वरेखांश ८८° २८'. समुद्रसपाटीपासून उंची ३९३३ फूट. लोकसंख्या (इ. स. १९०१) १०६९. तिबेटांतून आलेली लोंकर येथील बाजारांत विकली जाते. इ. स. १८९१ सालापासून येथें नोव्हेंबर महिन्यांत एक जत्रा भरते. त्यावेळीं पुष्कळ तऱ्हेचा माल विकला जातो.

**कालिमिर**—(भूशीर) मद्रास. तंजावर जिल्ह्यांतील तिरुतुरैपुंडी तालुक्यांत, सिलोनमधील पेड्रोया भूशिरापासून ४० मैल असलेलें भूशिर. येथें १९०२ मध्यें एक दीपगृह बांधलें आहे. जमीनीच्या बाजूस एक मोठें राखीव अरण्य आहे. जवळील प्रदेशांत तट्टें पाळिलीं जातात व तंबाखूची फार लागवड होते. येथें समुद्रस्नानार्थ यात्रा भरत असते.

**कालिया** (१)—काद्रवेय कुलोत्पन्न नाग. त्याला पांच फणा होत्या. पूर्वी हा रमणक द्वीपांत रहात असे. याचें विष इतकें उग्र होतें कीं, डोहावरून गेलेला पक्षीहि त्या जलवायुस्पर्शानें प्राणास मुकत असे. त्यामुळें तो डोह अगदीं वर्ज्य

असतांहि कृष्णाचे गोपाळ एके वेळीं अजाणतः तेथें गायी सहवर्तमान गेले व तेथील जलप्राशन केल्यानें सर्व मरण पावले. हें कृष्णास कळतांच तो तेथें गेला, व समीप असणाऱ्या एका वृक्षावर चढून त्यानें डोहांत उडी टाकली. नंतर कालिया जेथें होता तेथें जाऊन त्यास त्यानें आपल्या अद्भुत शक्तीनें धरलें आणि इतकें मर्दन केलें कीं, त्याचे प्राण कासावीस होऊन गेले. इतक्यांत त्याच्या स्त्रियांनीं त्यास प्राणदान द्यावें अशी कृष्णाची प्रार्थना केली असतां व तोहि शरण आला असतां, कृष्णानें यमुनेचें जल अगदीं शुद्ध करवून व गायीगोपाळांस पूर्वस्थितीवर आणवून यास पुनः रमणक द्वीपास परत घालविलें [ भाग. स्कं. १०, अ. १६ ].

( २ )दाशरथी रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

**काली**(१)—वैदिक काळीं काली हें अग्निजिव्हानाम होतें. अग्नीच्या सात जिव्हांपैकीं काली जिव्हा कृष्णवर्ण व भयंकर होती. पण आज हा अर्थ राहिला नसून देवीचें एक स्वरूप म्हणून हें नांव रूढ आहे. सतीनें हिमालयाच्या उदरीं जन्म घेतला असतां तिची अंगकांति श्यामवर्ण झाल्यामुळें तिला हें नांव पडलें. बंगाल्यांत हिची उपासना विशेष दृष्टीस पडते.

दिपवाळींत लक्ष्मीपूजेबद्दल कालीपूजाहि करतात. कालीपूजेचा मोठा सण कार्तिक वद्य ६ ला असतो. कालीची मूर्ति दिसण्यांत भयप्रद दिसते. हिच्या थैमानामुळें जेव्हां विश्वाचा प्रलय होण्याची वेळ आली तेव्हां शंकरानें स्वशरीर हिच्या पायाखालीं लोटून दिलें. आपल्या पतीच्या शरीरावर आपण नाचत आहों असें जेव्हां हिनें पाहिलें तेव्हां लज्जेनें जीभ चावली व नृत्य बंद ठेविलें. अशी कथा दर्शविणारें कालीचें स्वरूप देवळांतून असतें.

( २ ) कालिका म्हणून जी शक्ति ती. हिनें शुंभनिशुंभांचा वध केला ( शुंभनिशुंभ शब्द पहा ).

( ३ )मत्स्यीच्या उदरीं जन्मलेली उपरिचर–वसु राजाची कन्या. हिला मत्स्यगंधिनी, योजनगंधा इ. नांवें असून, पुढें सत्यवती असें नांवहि पडलें. पुढें हीच शंतनूची स्त्री झाली व कौमारावस्थेंत हिला पराशर ऋषीपासून कृष्णद्वैपायन पुत्र झाला होता.

( ४ ) पंडुपुत्र भीमसेनाची दुसरी स्त्री. हिला त्यापासून सर्वग नामक पुत्र झाला होता.

( ५ ) भारतवर्षीय एक नदी.

**कालीघाट**—कलकत्याच्या दक्षिणेस हा घाट व कालीचें प्रख्यात देवस्थान आहे. टॉलीनला (नाला) या हुगळीपासून निघालेल्या गंगेच्या फांटयाच्या कांठीं हें देवालय बांधिलें आहे. या फांटयाला गंगा हेंच नांव असून कालीघाटाला येणारे यात्रेकरू या गंगेच्या प्रवाहाला फार पवित्र समजतात. इ. स. १७७५ त कोणी कर्नल टॉली नांवाच्या गृहस्थानें हा नाला जास्त खोल केला म्हणून त्याचें नांव या नाल्याला पडलें आहे. कालीच्या यात्रेकरूंकरितां तेथें घाट बांधिला असल्यानें याला कालीघाट नांव मिळालें.

मूळ कालीचें देवालय सध्याच्या कालीघाटाच्या ठिकाणीं नगरोपांतांत नसून खुद्द कलकत्ता शहरांत होतें. या क्षेत्राचें पावित्र्य व पुण्य पुराणांत वर्णिलें आहे. दक्षयज्ञाच्या वेळीं शंकर अति कोपायमान होऊन सतीचें कलेवर घेऊन जेव्हां थैमान घालूं लागला व जगप्रलयाची भीति दाखवूं लागला, तेव्हां श्री विष्णूनें आपल्या चक्रानें महादेवाच्या हातांतील सतीशवाचे एक्कावन्न तुकडे केले. ज्या ज्या ठिकाणीं ते तुकडे पडले तें तें स्थान फार पवित्र झालें.सतीच्या उजव्या पायाची करांगुली कलकत्याच्या जागीं पडून तें एक्कावन काली क्षेत्रांतील एक क्षेत्र बनलें. अशी कलकत्याची–पूर्वीच्या कालीक्षेत्राची–कथा आहे. बाराव्या शतकांतील निगमकल्पाच्या पीठमालिकेंत कालीक्षेत्राचा उल्लेख आहे. यासंबंधीं दुसऱ्याहि कथा आहेत. कालीघाटापासून कलकत्ता हें नांव बनलें आहे असें कोणी म्हणतात. (हंटर–स्टॅटिस्टिकल अकाउंट ऑफ बंगाल पु. १). कलकत्यांतील कालीच्या देवालयाऐवजीं कालीघाटचें देवालय केव्हां व कसें मान्यता पावलें हें माहीत नाहीं; पण इ. स. १४९५ च्या सुमारास कालीघाट व कलकत्ता हीं दोन्ही वेगवेगळीं आस्तित्वांत होतीं. व कालीघाट क्षेत्राचें ठिकाण बनलें होतें यांत संशय नाहीं. ( विल्सनच्या 'अर्ली ॲनल्स ऑफ दि इंग्लिश इन बंगाल' यांतील बंगाली कवि विप्रो दास पहा; शिवाय डब्ल्यू. वार्ड—हिंदूज, मद्रास १८१५ पहा. ).

१५ व्या शतकांतल्या एका भूकंपानें कलकत्यांतील कालीचें देवालय नाहींसें झालें अशी दंतकथा आहे. त्यानंतर भवानीपूरच्या शंकराच्या देवळाच्या जवळ कालीघाट येथें कालीचें देऊळ बांधण्यांत आलें. जंगलगीर नांवाच्या एका साधूनें या ठिकाणीं कालीची स्थापना करून भाविक लोक जमा केले, कलकत्याच्या कालीचें महात्म्य या कालीला जोडलें व अशा रीतीनें हें नवें क्षेत्र प्रसिद्धीला आणिलें.

विप्रो दासानंतर दोन शतकांनीं इ. स. १६७६ मध्यें स्ट्रेनशॅम मास्टर जेव्हां ईस्ट इंडिया कंपनीच्या वतीनें हुगळीला आला त्यावेळच्या प्रवासवर्णनांत त्यानें कालीघाट देवालयाचा उल्लेख केला आहे. पण कलकत्याचा नामनिर्देश मुळींच नाहीं. १८ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास कालीघाटची कीर्ति बरीच दिसून येते. कलकत्ताशहर सोडल्यानंतर पूर्वेला कालीघाटाला जाणारा 'दि ब्रॉडरोड' नांवाचा यात्रेकरूंच्या रहदारीचा रस्ता असे. हल्लीं त्याचें नांव बेंटिंक स्ट्रीट व चौरिंघी रोड असें आहे. इ. स. १७४० च्या सुमारास रचलेल्या " गंगाभक्ति तरंगिणी " नांवाच्या ग्रंथांत कालीघाट हें अपूर्व ठिकाण असून त्या ठिकाणीं पूजेचा मोठा थाट असतो असें वर्णन आढळतें. राजा मानसिंग हा बंगालचा सुभेदार असतांना हें स्थान व कालीपूजेंतील तांत्रिक विधी मोठया प्रसिद्धीस येऊं लागले असावेत असा तर्क आहे.

देवळाच्या आवारांतील इमारती फारशा चांगल्या किंवा कलाकुसरी केलेल्या आहेत असें नाहीं. कालीघाटाचें चित्र म्हणजे यात्रेकरूंची अतोनात गर्दी व दुर्गापूजा आणि कालीपूजा ज्या दिवशीं असतात त्यावेळीं घेण्यांत येणारे पुष्कळ बकऱ्यांचे बळी असें देतां येईल. दुर्गापूजा उत्सवाच्या तीन दिवसांत सातशेंपासून आठशेंपर्यंत बळी दिलेल्या बकऱ्यांच्या मुंडक्यांची देवीपुढें रास करून ठेवतात व धडें भक्त आपल्या घरीं नेतात.

जेथें असंख्य प्राणी बळी दिले जातात असें हिंदुस्थानांत किंबहुना सर्व जगांत जें हें प्रमुखस्थान आहे तें धर्माच्या अभ्यासकाला विशेष महत्वाचें वाटल्यावाचून रहाणार नाहीं. काली, माता, अम्मन यांसारख्या कांहीं देवतांच्या पूजेच्या वेळीं असे बळी दिले जातात. हिंदुधर्मांतील शक्ति आणि तांत्रिक स्वरूप यांवर कालीघाटची ही प्राणीहत्या चांगला प्रकाश पाडते. [ ए.रि.ए. कलकत्ता रिव्ह्यू, पु. ३, १८ व ३५. सेन्सस रिपोर्ट, १९०१ ( बंगाल व कलकत्ता )].

**काली फ्लॉवर**—फुलवर-फुलगोभी, गोभी (हिंदी), ही एक उत्तम भाजी आहे. ही विलायतेकडून हिंदुस्थानांत आली. हवेंत थंडी असेपर्यंत ही भाजी खाण्यास स्वादिष्ट लागते. उन्हाळा सुरू झाला म्हणजे त्या भाजीस उग्र वास येऊं लागतो व मग तिची रुची कमी होते.

ही भाजी मोहोरीच्या वर्गांतील आहे. ही हिंदुस्थानांत थंडीच्या मोसमांत तयार व्हावी लागते. पावसाळ्यांत श्रावण भाद्रपदांत लागवड झाल्यास फुलें थंडींत येतात. उशीरा लागण झाल्यास फुलें उशीरां येऊन तीं चांगलीं येत नाहींत. कधीं कधीं योग्य जातीची लागण न झाल्यामुळें फुलें मुळींच येत नाहींत, नुसतीं झाडेंच वाढतात. म्हणजे फुलें न येतां पालाच फुटत राहातो. कधीं कधीं उशीरां होणाऱ्या जातीचें बीं लागलें गेल्यास तीं झाडें सर्व उन्हाळा व पावसाळा वाढत राहून थंडी पडूं लागतांच फुलावयास लागतात व तीं तशीं वाढलीं असतां कंबरेपासून छातीइतकीं उंच वाढतात.

हिंदुस्थानांत हळव्या (' अर्ली ') म्हणजे लवकर होणाऱ्या जातींचेंच बीं लाविलें पाहिजे. गरव्या जाती उत्तर हिंदुस्थानांत होतात. पण दक्षिण हिंदुस्थानांत थंडी कमी असते व ती सुमारें २-२॥ महिनेच टिकते. तेव्हां येथें लवकर होणाऱ्या फुलवरीचेंच बीं आणिलें पाहिजे.

फुलवरचें बीं श्रावणांत पेरतात. भाद्रपदांत रोपाची लागण करितात. मार्गशीर्षअखेरपासून पुढें तिला फुलें यावयास लागतात. फुलवर शिमग्यापुढें टिकत नाहीं. फुलवरीस जमीन उत्तम लागते. जमिनींत लागणीच्या वेळीं कुजलेलें खत घातलें पाहिजे. झाडें जोरावण्याच्या सुमारास पुन्हां पेंडीचें खोडखत दिल्यानें वाढ लवकर व जोराची होते. पुन्हां कार्तिकांत मासळीचें खत ( कुटी ) दिल्यास व मुबलक पाणी दिल्यास हळवार उत्तम जातीस नऊ इंच ते फूट सवा फूट मुद्दां व्यासाचीं फुलें आलेलीं आहेत. अशीं फुलें येण्यासः—( १ ) बीं चांगल्या जातीचें मिळालें पाहिजे, ( २ ) रोप पावसाच्या झोडीनें व किडीमुळें कमजोर झालेलें नसलें पाहिजे, ( ३ ) वेळींच लागण झाली असली पाहिजे, ( ४ ) लागणीनंतरची मशागत उत्तम झाली पाहिजे, व ( ५ ) हवेंत थंडी जास्त दिवस टिकली पाहिजे. ( ६ ) जमीन उत्तम कसदार पाहिजे.

कॉली फ्लावरला महाराष्ट्रांत बीं येत नाहीं. जो भाग खाण्यांत येतो तो अपक्व फुलांचा एक समुदाय होय. कधीं कधीं हीं फुलें पूर्ण वाढून मोहरीच्या फुलाप्रमाणें उमलतात व त्यांस मोहरीप्रमाणें लांब दांड्यांवर शेंगाहि येतात. शेंगांत मोहोरीसारखें बीं क्वचित् असतें. बहुतेक शेंगा वांझ्या असतात. हिमालयाच्या पायथ्याकडे गंगायमुनांच्या कांठच्या कित्येक भागांत फुलवरीस बीं येतें, व हिंदुस्थानांत धरलेलें बीं तिकडच्या भागांत मिळतें; पण त्या बियापासून दुसऱ्या प्रांतांत चांगली पैदास होईलच अशी खात्री नाहीं. म्हणून नेहमीं विलायतेकडील हळवें बीं वापरणेंच श्रेयस्कर होतें.

**काले**—मुंबई इलाखा. सातारा जिल्हा. कऱ्हाड तालुक्यांतील एक खेडें. उत्तर अक्षांश १७° १४' व पूर्व रेखांश ७४° १३'. लोकसंख्या ( १९०१ ) १०७७. या खेड्याजवळ अगाशिव नांवाचीं बौद्ध लेणीं आहेत.

**कालोल ता लु का.**—बडोदें संस्थान. कडी प्रांताचा दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ २६७ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ८१,१८७. यांत कालोल गांव व ८९ खेडीं आहेत. उत्तर सरहद्दीवरून साबरमती नदी वहात गेली असून येथील जमीन चांगली सुपीक आहे. इ. स. १९०४-५ सालीं जमीनमहसूल २,१५००० रुपये होता.

**गां व.**—बडोदें संस्थान. कालोल तालुक्याचें हें मुख्य ठिकाण असून राजपुताना माळवा रेल्वेचें स्टेशन आहे. उत्तर अक्षांश २३° १५' व पूर्व रेखांश ७२° ३२'. येथून गायकवाड संस्थानांतील रेल्वे एका बाजूस विजापूर व दुसरीकडे कडीस जाते. लोकसंख्या ( १९११ ) ६३७६. येथें धान्याचा बराच व्यापार चालतो.

**कालोल, ता लु का.**—मुंबई इलाखा. पंचमहाल जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ( हालोल पेटा धरून ) ४१५ चौरस मैल. उत्तर अक्षांश २२° १५' ते २२° ४४' व पूर्वरेखांश ७३° २२' ते ७३° ४४'. यांत एक गांव व २१९ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ९०८१२. येथील प्रदेश सपाट व सुपीक आहे. येथील जमिनीस गोराडू जमीन असें नांव आहे. पाऊस सरासरी ३७ इंच पडतो. एकंदर उत्पन्न (इ. स. १९०३-४) १.१ लाख रुपये आहे.

**काल्का**—पंजाब इलाखा. अंबाला जिल्हा. खरार तहशिलींतील एक गांव. दिल्ली-अंबाला-काल्का आणि काल्का

सिमला रेल्वे यांचें हें जंक्शन आहे. उत्तर अक्षांश ३०°५०' व पूर्वरेखांश ७६°५७'. लोकसंख्या ( १९०१ ) ७०४५. उंची २४०० फूट. या गांवाभोंवतीं पत्याळाचा मुलुख असून तो हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. इ. स. १८४३ सालीं पत्याळा संस्थानापासून ब्रिटिशांनीं हें गांव मिळविलें. येथें जंगली जिनसांचा मोठा व्यापार चालतो. कुरुंद दगड येथें चांगले व बरेच सांपडतात.

**काल्पी, त ह शी ल.**—संयुक्त प्रांत. जालौन जिल्ह्याची पूर्वेकडील तहशील. क्षेत्रफळ ४०५ चौरस मैल. उत्तर-अक्षांश २५°५३' ते २६°.२२' व पूर्व रेखांश ७९° २५' ते ७९°५२'. या तहशिलींत मोठें गांव काल्पी व १५९ खेडीं आहेत. लोकसंख्या(१९०१) ७९,९४४ इ. स. १९०३-४ सालीं जमीनमहसूल १,५५,००० रु. पैकीं कर २५००० रु. होता. इ. स. १८९९-१९०० सालीं १५८ चौरस मैल जमीन लागवडीखालीं असून पैकीं फक्त ९ चौ. मै. बागाइती होती.

**गां व**—संयुक्तप्रांत. जालौन जिल्हा. काल्पी तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश २६°८' व पूर्व रेखांश ७९°४५'. हें यमुना नदीच्या तीरावर असून जी. आय. पी. रेल्वेचें स्टेशन आहे. लोकसंख्या ( १९११ )१०५६८.

काल्पीस पूर्वी मोठा साखरेचा व्यापार चाले. १८५८ च्या बंडांत जेव्हां काल्पीस हिंदूंचा मोड झाला तेव्हां इंग्रज शिपायांनीं काल्पी लुटून साखर रस्त्यावर ओतली ! त्यामुळें सर्व रस्ते साखरेचे दिसत होते ( गोडसे कृत ' माझा प्रवास ' पा. १४३ ). शहराच्या पश्चिमेस चौऱ्यांशीं घुमटाचें मैदान आहे. चौदाव्या शतकांत कोणी वासदेवानें काल्पी गांव वसविला अशी दंतकथा आहे. इ. स. ११९६ सालीं कुतुबुद्दीनाच्या हातांत हें गांव गेलें व त्याच वेळेपासून तें मुसुलमानांच्या ताब्यांतील महत्वाचा किल्ला झालें. पंधराव्या शतकांत जोनपूरच्या इब्राहिमशहानें काल्पी सर करण्याचा दोनदां निष्फळ प्रयत्न केला. इ. स. १४३५ सालीं माळव्याच्या हुशंग शहानें हें ठिकाण काबीज केलें. नंतर कांहीं वर्षांनीं इब्राहिमशहाच्या मागून गादीवर बसलेल्या महमुदास तेथील सुभेदारास त्रास देण्याकरितां म्हणून या शहराचा ताबा घेऊं दिला. महमुदानें शहर लुटलें व माळव्याच्या बादशहास तें परत देण्याचें प्रथम नाकारलें. पुढें दोघांचा आपसांत कांहीं तह झाल्यानें तें प्रकरण मिटलें. जोनपूरची पातशाही व दिल्लीची पातशाही यांच्यांत ज्या लढाया झाल्या त्यांत काल्पी येथें इ. स. १४७७ सालीं मोठी लढाई झाली व तींत जोनपूरच्या बादशहाचा पराभव झाला व तो कनोज येथें पळून गेला. तेथेंहि त्याचा पराजय झाला व जोनपूर पातशाही नष्ट झाली. इ. स. १५२६ सालीं बाबरास पानिपत येथें जय मिळाला, तेव्हां चितोडचा राणा व अफगाण यांनीं बाबराचा मार्ग अडविण्याकरितां काल्पी हस्तगत केली. त्यावेळीं हें सैन्य आग्र्यावर चालून जात असतां बाबरानें फत्तेपूर शिक्री येथें त्याचा पराजय केला. इ. स. १५२७सालीं हुमायूननें काल्पी शहर सर केलें. तें मोंगलांकडे इ.स.१५४० सालीं शीरशहानें कनोज येथें त्यांचा पराजय करीपर्यंत होतें. यानंतर या ठिकाणीं अफगाणांच्या व मोंगलांच्या पुष्कळ झटापटी झाल्या व अफगाणांचा अखेरीस पराजय होऊन मोंगलास जय मिळाला. अकबराच्या कारकीर्दींत काल्पी गांव एका सरकाराचें ( प्रांत ) मुख्य ठिकाण असून त्यांत हल्लीं असलेल्या इटावा, कानपूर, आणि हमीरपूर या जिल्ह्यांतील भाग व ग्वाल्हेर संस्थानांतील कांहीं भाग मोडत होते.

ज्यावेळीं मराठ्यांनीं बुंदेलखंडाचा कांहीं भाग जिंकला त्यावेळीं काल्पी हें त्या भागावरील सुभेदाराचें मुख्य ठिकाण होतें. इ. स. १७९८ सालीं काल्पी गांव ब्रिटिशांनीं सर केला होता. परंतु लवकरच त्यांनीं त्या गांवावरील आपला ताबा सोडला. पुन्हां इ. स. १८०३ सालीं ब्रिटिशांनीं हा गांव जिंकून तो हिंमतबहाद्दरास बहाल केला. हिंमतबहाद्दर दुसऱ्याच वर्षी मरण पावला व इनाम खालसा करण्यांत येऊन हा गांव जालौनचा गोविंदराव यास देण्यांत आला. त्यानें इ. स. १८०६ सालीं या गांवाच्या मोबदला दुसरा मुलूख दिल्यामुळें हा गांव ब्रिटिशांकडे आला. इ. स. १८५८ सालीं येथें झांशीच्या राणीवर व तिच्या पक्षांतील लोकांवर ब्रिटिशांनीं मोठा जय मिळविला.

हा गांव बराच प्राचीन असल्यामुळें येथें पुष्कळ जुन्या इमारती आहेत. नदीकांठावर एका पडक्या किल्ल्याचे अवशेष दिसत असून त्या भागांत हल्लीं एकच इमारत शाबूद आहे. मराठ्यांच्या वेळीं या इमारतींत खजिना ठेवीत असत असें म्हणतात.

येथें इ. स. १८६८ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न१४००० रुपये असून खर्च तितकाच होता. येथें कापूस व धान्य यांचा व्यापार बराच चालतो.

**कावळा**—पक्षिवर्गांतील हा प्राणी सर्वांच्या पूर्ण परिचयाचा आहे. हा मोठा धूर्त, विलक्षण धीट आणि लोचट असतो. आपल्या खादाड स्वभावानें तो सर्वांस अगदीं भंडावून सोडतो. कावळ्यांत मृतात्मा वास करितो, अशी हिंदु लोकांची समजूत आहे म्हणून और्ध्वदेहिक विधीमध्यें दहाव्या दिवशीं पिंडदानप्रसंगीं अर्पण केलेल्या भाताच्या पिंडास कावळ्यानें स्पर्श केला असतां तो मृतात्म्यास पोंचतो अशी श्रद्धाळू हिंदूंची समजूत आहे. कांहींच्या मतें ही हिंदु कल्पना देवकोपासनेचा अवशेष होय. पुष्कळ रानटी जातींतून अशाच कल्पना दिसतात.

काकदृष्टि, काकतालीय न्याय, काकदंतपरीक्षा इत्यादि वाक्प्रचारांतून यानें आपल्या अंगच्या गुणांची जाणीव विद्वान् पंडितांनांहि करून दिली असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें.

मृत जनावरांचें सडकें मांस, झाडावरील कृमी, कीटक, सर्व प्रकारचें धान्य, वृक्षांचीं उपयोगी व निरुपयोगी फळें हें त्याचें खाद्य होय. प्रसंग पडल्यास कावळे पुष्कळदां घारीचाहि पाठलाग करतांनां आढळून येतात.

काकमैथुन पाहिल्यास सहा महिन्यांत मृत्यू येतो ही खुळी समजूत पुष्कळ लोक उराशीं बाळगितात. कावळे पावसाळ्याच्या आरंभीं वर्षांतून एकदांच दोन अंडीं घालतात, व सुमारें दोन अडीच महिन्यांत त्यांचीं पिलें मोठीं होऊन उडूंहि लागतात. हे दरवर्षी नवें घरटें करतात. जागा मात्र पुष्कळ वेळां पूर्वीचीच पसंत करतात. कावळ्याच्या घरट्यांत कोकीळ आपलीं अंडीं घालते व कावळी तीं उबविते अशी समजूत आहे. कावळा हजार वर्षे जगतो किंवा त्याला एका वेळीं एकाच डोळ्यानें दिसतें वगैरे आपल्या जुन्या समजुती चुकीच्या आहेत.

साध्या कावळ्याचा रंग मानेभोंवतीं फिका असतो. डोमकावळा हा साध्या कावळ्याहून थोडा मोठा, राकट व मजबूत असून त्याचें सर्वांग काळेंभोर असतें. ह्वाडपणांत दोन्ही जाती एकाच मासल्याच्या आहेत. कावळ्याचें मांस शिकारी पक्ष्यांनां घालतात. नाकाडोळ्याचे वैदूहि कावळे मारून खातात.

यूरोपांत कावळ्याच्या मुख्य दोन जाती आहेत. एक कॅरिअन अथवा काळा कावळा व दुसरी हूडेड अथवा पांढरा कावळा. कॅरिअन कावळा हिंदुस्थानांतील कावळ्यापेक्षां आकारानें थोडा मोठा, परंतु स्वभावानें त्यासारखाच असतो. वाटेल त्या प्राण्याचें सडकें मांस हें त्याचें भक्ष्य होय. तें नच मिळाल्यास नुसत्या कृमिकीटकांवर देखील तो राहूं शकतो. पिकलेलीं चेरी फळें व अक्रोड यांचा तो खूप फडशा उडवितो. हा उंच झाडावर काटक्यांचें घरटें बांधतो. याची मादी वर्षांतून एकदां चारपांच अंडीं घालते. कदाचित त्यांचा कशानें तरी नाश झाल्यास ती पुनः घालते. पांढरा कावळा याच्यापेक्षां लहान पण स्वभावानें अति क्रूर असतो. याचें डोकें काळें असून सर्वांग करड्या रंगाचें असतें. लहान लहान कोकरांचे व साधल्यास घोड्यांचेहि डोळे फोडून खाण्यास हा कमी करीत नाहीं. या दोन जातींत भेसळ होऊन नवीन उत्पत्ति नेहमीं होत असते. फेरोई बेटांतील कांहीं भागांत हजारों कावळे तास तास एकत्र जमून आळापाळीनें शब्द करतात व शेवटीं पहावें तों एखादादुसरा कावळा त्या जागीं मरून पडलेला आढळतो. यावरून तेथील लोकांची अशी समजूत झाली आहे कीं, जातींतील अपराध्यास देहांत प्रायश्चित्त देण्यासाठीं या सभा भरत असतात !

या दोन जातींखेरीज रूक, रॅव्हन, डो, पै, जय वगैरे काकजाती यूरोपांत प्रसिद्ध आहेत. रूक हा ब्रिटिश बेटांत विशेषेंकरून आढळतो. रॅव्हन अथवा डोमकावळा हा दोन फूट लांबीचा असून त्याचे पंख चार फूट लांब पसरतात. याचा विशेष हा आहे कीं माणसाच्या अवाजाची बरोबर नक्कल करण्यांत हा मोठा चतुर असतो. यामुळें हौशी लोक यास बाळगतात व बोलावयास शिकवितात. हा साधारणपणें सर्वत्र आढळतो. आफ्रिकेंत एक मुढया म्हणजे डोकीवर पिसें नसलेल्या कावळ्याची जात आहे. अमेरिकेंत मासे खाणारा कावळा असून तो नद्या व तळीं धुंडीत असतो. अॅबिसीनियामधील कावळ्याची चोंच लांबच लांब व भक्कम अशी असते. फिलीपाइनमधील कावळे दिसण्यांत फार सुंदर दिसतात. त्यांच्या मस्तकावर मोराप्रमाणें तुरा असून तो त्यांस मर्जीप्रमाणें उभारतां येतो.

**कावली** ता लु का.—मद्रास इलाख्यांत नेलोर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५४८ चौरस मैल. लोकसंख्या इ. स. ( १९२१ ) १,०१,६६७. या तालुक्यांत १ शहर व ७८ खेडीं आहेत. कावली हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. येथील जमीन सपाट आहे. मधून मधून लहान टेंकड्याहि दृष्टीस पडतात. जमीन रुक्ष व नापीक आहे. या तालुक्यांतून उपुतेरु, गंडलवागु, उब्वलीवागु व पिल्लिवागु या चार नद्या वाहतात. पब्लिक वर्कस् खात्याच्या ताब्यांत ३५ तळीं आहेत. या तळ्यांस पावसाखेरीज पाण्याचा पुरवठा नसल्याकारणानें पिकांस याचा कांहीं उपयोग होत नाहीं.

गां व—मद्रास इलाख्यांत नेलोर जिल्ह्यांत याच नांवाच्या तहसिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) ६३८०. येथें जिल्हामुनसफ कचेरी व इतर कचेऱ्या आहेत.

**कावीळ**—कावीळ झाली असतां रोग्याची त्वचा व डोळे इत्यादि ठिकाणची गुलाबी श्लेष्मल त्वचा पिंवळी होते. यकृतांत पित्त नेहमीं उत्पन्न होतें व त्यांत पीत रंगाचा एक पदार्थ असतो. हें पित्त आंतड्यांत वाहून नेणारी नाडी अगर नलिका असून तिच्या शाखा व उपशाखा असतात. यांत दाह व सूज रोगकारणपरत्वें उत्पन्न झाली असतां पित्ताच्या अभिसरणास अवरोध होऊन हें सांचलेलें पित्त यकृतरक्तवाहिन्यांत शिरून सर्व शरीरांत पसरतें व त्यामुळें शरीरवर्ण हळदीप्रमाणें अगर कमी अधिक प्रमाणांत पिंवळा होतो. येणेंप्रमाणें झालेल्या काविळीमध्यें डोळ्यांतील पांढरा भाग पिंवळा दिसतो. रोग जुनाट झाल्यावर हा सर्व ठिकाणचा रंग वाढत जाऊन शेवटीं काळसर. हिरवट अगर पिंगट पिंवळा दिसतो. पित्ताभिसरण रक्तांत होऊं लागल्यामुळें लघवीमध्यें पिंवळा रंग येतो व पित्ताचें कमी अधीक प्रमाण असेल त्या मानानें लघवीहि कमी अगर अगदीं हळदीप्रमाणें पिंवळी होते; ती इतकी कीं तींत पांढरा कपडा अगर कागदाचा तुकडा टाकला असतां तो पिंवळा दिसतो ! क्वचित प्रसंगीं घाम व स्त्रीरोग्याचें दूध यांसहि पिंवळेपणा आलेला पहाण्यांत येतो. अश्रू, जठररस वगैरे अन्य प्रवाही रस मात्र पिंवळे होत नाहींत. रोग्याची विष्ठा पांढरी अगर मातट रंगाची होते. तिचा नेहमींचा पिंवळा रंग नाहींसा होतो. कारण पित्ताभिसरणास अवरोध उत्पन्न झाल्यामुळें आंतड्यांतील अन्न

पचन होत असलेल्या अन्नरसांत तें पित्त मिसळूं शकत नाहीं. पित्तामध्यें वसामय अन्नपाचक व जंतुनाशक धर्म असल्यामुळें त्याच्या अभावी मळ पीतवर्णहीन व दुर्गंधिमय होतो हें उघड आहे. रोग्यास मलावरोध तरी होतो अगर तो मळ कुजल्यामुळें अतिसार तरी होतो.रक्तामध्यें पित्ताभिसरण होऊं लागल्यामुळें नाडी अति सावकाश चालते; अंगास कंडू सुटते व त्यामुळें लाल डाग, गांधी वगैरे अंगावर उठतात. तोंड कडू होणें,अपचन,स्निग्धपदार्थ न पचणें व न आवडणें,ग्लानि, थकवा, सुस्ती, आळस, घेरी, चक्कर, चिरडखोर स्वभाव, औदासिन्य हीं लक्षणें होतात. रोग जुनाट झाल्यास अग्निमांद्यामुळें रोगी कृश होत जातो.गुंगी, झांपड हीं अधिक वाढतात. रक्तपित्ताचे लाल डाग त्वचेवर दिसतात. कांहीं कारणामुळें रक्तस्राव सुरू झाला असतां तो लवकर थांबत नाहीं. असाध्य स्थितीमध्यें वायु होऊन रोगी वडबडणें, त्यास झटके येणें हीं लक्षणें होतात.

वरील प्रकारच्या काविळीमध्यें पित्तनलिकेंत अवरोध कसा होतो व त्याचे परिणाम काय होतात हें सांगितलेंच आहे. परंतु पित्तनलिकेच्या सूक्ष्मदर्शक यंत्रगोचर अतिसूक्ष्म अशा शाखांमध्येंहि कांहीं रोगांत दाह, सूज व अवरोध उत्पन्न होतो आणि या नळ्यांत अवरोध असतां मुख्य पित्तनलिकांवाटें पित्त आंतड्यांत पडून अन्नपचन व मलशुद्धि होणार नाहीं हें उघडच आहे. अशा प्रकारची अवस्था अनेक जंतुजन्य रोग, विषमज्वर, सप्तदिन पुनरावर्तीज्वर, पित्तज्वर या व इतर रोगांमध्यें व सांथीच्या दुखण्यांत व नंतर उत्पन्न होते. शिवाय फास्फरस, सोमल व सुरमा यांचे दीर्घकाळपर्यंत सूक्ष्म परमाणू पोटांत जाऊनहि हा रोग होतो. हे पदार्थ कांहीं धंद्यांत व कारखान्यांत वापरतात व तेथील कामकरी व वर्गामध्यें अशी दीर्घकालीन कावीळप्रधान विषबाधा उत्पन्न होते.

येणेंप्रमाणें मोठ्या पित्तवाहिन्या व सूक्ष्मदर्शकगोचर अतिसूक्ष्म पित्तवाहिन्या यांत हें रोगलक्षण ज्या कारणांनीं उत्पन्न होतें तीं कारणें पुष्कळच आहेत व त्यांपैकीं मुख्य कारणें वर सांगितलीं. जीं थोडीं कारणें अद्याप राहिलीं आहेत त्यांचा नामनिर्देश व स्थल निर्देश पुढें लिहिल्याप्रमाणें आहे.

(१)मोठ्या पित्तवाहिन्यांत सुजेनें अवरोध पुढील रोगामध्यें होतोः—पित्ताश्मरी म्हणजे पित्ताचे खडे बनणें; जंत व कृमी अगर कुपथ्याहारामुळें झालेलें अग्निमांद्य, जागरणें व श्रम; गर्भाशय, मळाच्या गांठी अण्डाशयग्रंथि व उदरांतील होणारे इतर गुल्म व ग्रंथिरोग, गळवं इत्यादिकांचा दाब पित्तनालिकेवर पडणें.

(२) अतिसूक्ष्म पित्तवाहिन्यांतील अवरोधाचीं राहिलेलीं कारणेंः—हिंवताप, अपरिमित व दीर्घकालीन मद्यसेवन यामुळें होणारी यकृतवृद्धि,पाऱ्याचा विषार, सर्पदंश,विषबाधा, फुप्फुसदाह, यकृतसंकोचनरोग, क्यान्सर(व्रण)ग्रंथि या रोगांत कावीळ होते. कांहीं रासायनिक पदार्थ पोटांत देऊन कावीळ उत्पन्न करितां येते. या सूक्ष्मनलिकेंत पित्तावरोध असलाच तर फार अल्प असतो व कधीं तर नुसत्या डोळ्यांस दिसेल इतकाहि तो नसतो. अशा वेळीं कावीळ का व्हावी हें कोडेंच आहे. मोठ्या नलिकेंत थोडा अगर फार अवरोध झाला असतां कावीळ उत्पन्न होणें कसें साहजिक आहे हें वर सांगितलेंच आहे. नूतन उपजलेल्या बालकामध्यें एक दोन आठवडे टिकणारी कावीळ कधीं कधीं होते व ती आपोआप बरी होते.

यावरून अनेकविध रुग्णस्थितींचें कावीळ हें एक रोगलक्षण समजणें युक्त आहे. काविळीला स्वतंत्र रोग कल्पून तीवर ठराविक उपचार न करतां ती होण्याच्या कारणांची परीक्षा करवून त्या कारणानुसार औषधयोजना करतात. वरीलपैकीं कोणत्या तरी कारणानें यकृत विघडल्याचें कावीळ हें एक लक्षण होय. ज्याप्रमाणें यकृत, मूत्रपिंड अगर हृदय विघडल्याचें चिन्ह जलोदर हें आहे तद्वत कावीळ हें यकृतरोगसूचक लक्षण आहे असें हल्लीं समजतात.

आ यु र्वे दी य नि दा न.—पांडुरोग्यानें पित्तकर पदार्थ खाल्ले असतां ते कोठा व रक्तादिधातु आणि त्वचा यांतील पित्त, रक्त व मांस यांस जाळून कावीळ उत्पन्न करितात. हींत डोळे, लघ्वी, त्वचा, नखें, तोंड व मळ हीं पिंवळीं होतात, दाह होतो, अन्न पचत नाहीं, तहान लागते, वेडकासारखी कांती होते आणि इंद्रियें दुर्बल होतात. ज्याचें पित्त वाढलें आहे अशा मनुष्यास पांडुरोगावांचूनहि कावीळ होते. काविळीची हयगय केली असतां तींत फार सूज येते. हीस कुंभकामला म्हणतात. ही कष्टसाध्य असते.

कावीळ झालेल्या रोग्यास फार सूज आली असतां अथवा लघ्वी, मळ, हीं काळीं किंवा पिवळीं झालीं असतां व तोंड, डोळे, हीं लाल झालीं असतां,ओकारींतून रक्त पडत असतां तो रोग असाध्य समजावा.

आंगाची आग, अरुची, तहान, पोट फुगणें, झांपड, मोह आणी ज्याचा अग्नी मंद झाला आहे आणि जो वेशुद्ध आहे त्याचा कावीळ रोग असाध्य समजावा.

चि कि त्सा.—काविळीवर जी चिकित्सा करावयाची ती पित्तनाशक असून पांडुरोगास अविरुद्ध अशी असावी. हळद व आवळकाठी यांचें अंजन करावें.

ज्या कावीळ झालेल्या रोग्यास वाटलेल्या तिळांसारखें शौचास होतें त्याच्या पित्ताचा मार्ग कफानें बंद झालेला असतो. म्हणून त्यास कफनाशक औषधें देऊन त्याचें पित्त वसवावें. रुक्ष, थंड, जड व मधुर पदार्थ खाणें,व्यायाम व वायूचा अवरोध यांनीं कुपित होऊन कफाशीं मिसळलेला वायु जेव्हां पित्तास बाहेर टाकतो तेव्हां मनुष्याचे डोळे, लघ्वी व त्वचा हीं पिंवळी होतात. पोटांत अवष्टंभ होऊन गुडगुड शब्द होतो आणि हृदय जड होणें, अशक्तपणा, अग्निमांद्य बरगड्यांत वेदना, उचकी, दमा, अरुचि व ताप

हे विकार उत्पन्न करून तो कुपित वायु हळुहळु शाखांतील अल्प पित्तांतहि मिसळतो. त्यास मांसरस, मुळे व कुळिथाचें काढ, याच्याबरोबर अतिशय आंबट, तीक्ष्ण, खारट, व उष्ण असे पदार्थ खाऊं घालणें प्रशस्त आहे. यापासून पित्त स्वस्थानीं म्हणजे आंतड्यांत येऊन मळास रंग येतो.

कुंभकामलेवर एक महिनापर्यंत शिलाजीत, सुवर्णमाक्षिक, किंवा रौप्यभस्म गोमूत्रांतून द्यावें [चरक;वाग्भट;योगरत्नाकर]

**कावेरी**—दक्षिणहिंदुस्थानांतील एक मोठी नदी. धार्मिकदृष्ट्या ही पवित्र मानली जात असून हिच्यामुळें ज्या प्रदेशांतून ही वहाते त्या प्रदेशांस शोभा आलेली आहे. शेतकीकडेहि हिच्या पाण्याचा उपयोग करितात.

ही कूर्गमधील ब्रह्मगिरी येथील डोंगरांतून उगम पाऊन आग्नेय मार्गानें म्हैसूरच्या सपाट मैदानांतून वहात जाते व मद्रास इलाख्यांतील तंजावर जिल्ह्यांतून बंगालच्या उपसागरास जाऊन मिळते. या नदीची लांबी ४७५ मैल आहे. भाविक हिंदु लोक हिला दक्षिणगंगा म्हणतात. आग्नेय व स्कंधपुराणांतून या नदीविषयीं पुढील कथा आढळते. विष्णुभार्या किंवा लोपामुद्रा नांवाची एक ब्रम्हदेवाची मुलगी होती व ती कावेर मुनीपाशीं, त्यांस आपला पिता समजून राहिली. तेव्हां तिनें पापी जनांनां पुनित करण्याकरितां नदीचें रूप घेण्याचा निर्धार केला. वर्षांतून एकदां गंगानदी देखील स्वर्गांतून अवतरून कावेरीस आपली भेट देते, अशी कथा आहे. तळकावेरी येथें हिचा प्रवाह जोराचा आहे आणि भागमंडळ येथें हिला पहिली उपनदी येऊन मिळते. येथें भाविक लोक तूळमासांत फार येतात.

ही नदी खडकाळ प्रदेशांतून वहाते, पण तिच्या दोन्ही बाजूंस जमीन सुपीक असून हिरवींगार झाडें आहेत. उन्हाळ्याच्या दिवसांत नदीपार जातां येतें, पण पावसाळ्यांत पाणी २० ते ३० फूटपर्यंत वाढतें. या नदीस कूर्गमध्यें येऊन मिळणाऱ्या उपनद्यांचीं नांवें खालीं दिलीं आहेत.

कक्कवे, कदनूर, कुम्महोल, मुतारमुडी, चिक्कहोळ व सुवर्णवती किंवा हारिंगी. फ्रेझरपेठ स्टेशनावर ह्या नदीवर एक मोठा भव्य पूल आहे. कवानी नदी येऊन मिळाल्यावर ह्या नदीचें पात्र बरेंच मोठें होतें. या नदीचा प्रवाह श्रीरंगपट्टम व शिवसमुद्रम् ह्या दोन शहरांस वेष्टून पुढें जात असल्यामुळें हीं दोन शहरें जणुं काय बेटेंच बनलीं आहेत.ह्या नदीचे दोन धबधबे फार प्रेक्षणीय आहेत. एकाला ‘ गगनचक्की ’ व दुसऱ्यास ‘ भारचक्की ’ म्हणतात. येथून ९२ मैलांवर सुवर्ण खाणी आहेत. त्यांकरितां लागणारी वीज उत्पन्न करण्याकडे कावेरीच्या पाण्याचा उपयोग करितात. नदींत मगर पुष्कळ आहेत, पण ते भीतिदायक नाहींत.

म्हैसूर संस्थानांत कावेरीस येऊन मिळणाऱ्या नद्याः हेमावती, लोकपावनी, शिम्शा, कर्कावती, लक्ष्मणतीर्थ, कब्बनी आणि सुवर्णवती किंवा हीनुहीले. शिवसमुद्रमच्या धबधब्या नजीकच कावेरी नदी मद्रास इलाख्यांत शिरते. कोईमतूर व सालेम ह्या दोन जिल्ह्यांमधील ही नदी सीमा आहे. मद्रास इलाख्यांत ह्या नदीस मिळणाऱ्या मुख्य उपनद्या भवानी, नोईल व अमरावती या होत. म्हैसूर संस्थानांत जरी कावेरीच्या पाण्याचा शेतकीकडे उपयोग करितात व जरी त्रिचनापल्ली व कोइमतुर जिल्ह्यांस हिच्या पाण्याचा उपयोग होतो तरी हिच्या मुखाशीं असलेल्या प्रदेशांत हिच्या पाण्याचा जितका फायदा घेतां येतो तितका दुसऱ्या कोठेंहि घेतां येत नाहीं असें म्हणतां येईल. कावेरीच्या एका शाखेस वेण्णार म्हणतात.

तंजावर, त्रिचनापल्ली व दक्षिण अर्काट ह्या तीन जिल्ह्यांत साधारणपणें ११,००,००० एकरांस ह्या दोन नद्यांपासून पाणी मिळतें.

**कावेरीपट्टणम**—मद्रास इलाखा. सालेम जिल्ह्यांतील कृष्णागिरी तालुक्यांतील एक खेडें. हें पोन्नइयार नदीच्या पूर्वकिनाऱ्यावर कृष्णगिरीपासून ७ मैलांवर वसलेलें आहे. लोकसंख्या (१९०१) ४,९५४. धर्मपुरी तालुक्यांत जावयास येथून रस्ता आहे.

करिकाल चोल यानें हें शहर वसवून तेथें ( पूर्वीची राजधानी जी उरईयूर ती बदलून ) आपली नवी राजधानी केली. यावेळीं करिकालाला आजूबाजूंच्या राजेरजवाड्यांची भीति नसल्यामुळें त्यानें ही राजधानीची बदली केली. महावंशांत याबद्दल उल्लेख आला आहे. गजबाहु ( पहिला ) याच्याकडे एका सिलोनी म्हातारीनें रडत रडत तक्रार केली कीं, “ माझ्या एकुलत्या एक मुलला, तेलंगी राजानें नुकतीच स्वारी केली तींत बारा हजार सिंहली लोकांबरोबर पकडून नेऊन ‘ कावेरीग्रामा ’ वर कामास लाविलें आहे ( महा वंसो १. २२८ )”. हें गांव बंदर आहे.त्यावेळीं दाक्षिणेंत व्यापार भरभराटीस आला होता, म्हणून तो आपल्या ताब्यांत ठेवण्यासाठीं व राज्यांतील समुद्रकिनारा हातांत ठेवण्याकरितां करिकालानें ही राजधानी वसविली. यांच्या कारकीर्दीत हें शहर देशांत व समुद्रावर एक मोठी थोरली व्यापाराची पेठ होऊन बसलें होतें. या शहरावर “ पट्टिनप्पालई ” नांवाचें एक काव्य झालें असून त्यांत करिकालाच्या वेळची माहिती ग्रथित केलेली आहे. शहराच्या रक्षणाकरितां राजानें कावेरी नदीस मोठीं धरणें बांधलीं आहेत. वरील काव्य करिकालाच्या हयातींतच झालें आहे. त्यानें कर्त्याला त्याबद्दल १ लक्ष ६० हजार होन बक्षीस दिले म्हणतात. किळि राजाच्या वेळीं हें शहर समुद्राच्या भरतीनें वाहून गेलें होतें असें म्हणतात. शहराची देवता जी मणिमेखलाई तिच्या वार्षिक उत्सवांत किळिराजाच्या हातून कांहीं चूक झाल्यानें हें शहर बुडालें आणि त्यानंतर या चोल घराण्यांत सर्वत्र झगडे सुरू झाले असें सांगतात [ अय्यर. प्रा. हिं. ].

म्हैसूरच्या लढायांच्या वेळीं या ठिकाणास फार महत्व असून येथें तटबंदीहि केली होती. १७६७ सालीं इंग्रजांनीं हें

हैदर अल्लीपासून घेतलें परंतु हैदरनें तें लगेच फेर हल्ला चढवून परत घेतलें, आणि आपल्या स्वारीचें मोर्च्यांचें ठिकाण केलें. नंतर कर्नल वुडनें पुनः तें काबीज केलें आणि १७९० सालीं कर्नल मॅक्सवेल यानें टिपूच्या स्वारीच्या वेळीं आपल्या फौजेचें मुख्य ठाणें येथें ठेवलें.

**कावेरीपाक.**—मद्रास इलाख्यांत उत्तर अर्काट जिल्ह्यांत वालाजापेट तालुक्यांतील एक गांव. हें १७५२ सालीं क्लाइव्हनें राजासाहेब आणि फ्रेंच यांवर मिळविलेल्या जयाबद्दल प्रसिद्ध आहे. येथें एक लहानसा किल्लाहि होता. पण तो आतां पाडून टाकण्यांत आला आहे येथें एक तळें असून त्याच्या बंधाऱ्याची लांबी ४ मैल आहे. या तळ्यांत रानबदकें व पाणकोंबडें विपुल आहेत. तलावांत पाणी नेहमीं असतें पण दिवसेंदिवस गाळ सांठून तळें उथळ होत चाललें आहे.

**कावेल्ली व्यंकट बोरय्या**—एक तेलंगी ब्राह्मण कवि. एलोर गांवीं याचा जन्म शके १६९८ त झाला. व्यंकट बोरय्या लहानपणापासूनच संस्कृत कविता करी. फारसी, हिंदी व इंग्रजी भाषा अवगत करून घेऊन वयाच्या १५व्या वर्षी इंग्रजी सैन्यांत पगार वाटण्याची नोकरी यानें धरली. पुढें एका इंग्रज इंजिनियराजवळ दुभाष्या म्हणून हा राहिला. शके १७२० मध्यें इंग्रज व टिपू यांमध्यें जें युद्ध झालें त्यांत मॅकेन्झी साहेबाबरोबर हा होता. या युद्धाचा वृत्तांत व्यंकटानें तेलगूंत पद्यरूपानें लिहिला. हें काव्य करुणरसपूर्ण व बहारीचें आहे असें सांगतात. मॅकेन्झीला हिंदुस्थानचा इतिहास लिहिण्याला लागणारें साहित्य यानेंच पुरविलें. धोंडी वाघाला वेलस्लीनें हरिहरास कसें पकडलें याचें वर्णन एका तेलगू काव्यांत यानें ग्रथित केलें आहे. श्रीरंगचरित्र—यांत श्रीरंगपट्टणचा इतिहास आहे. एका साधूचें शतश्लोकी चरित्र, वगैरे याची आणखी कांहीं ग्रंथरचना आहे. हा नकाशेहि काढीत असे. शके १७२५ त अपस्मार रोगानें लहान वयांतच हा कवि वारला. मॅकेन्झीनें मद्रासच्या वाळवंटावर याचा एक पुतळा उभा केला आहे अशी माहिती अर्वाचीन कोशकार देतात.

**काव्य**—हा शब्द संस्कृत कविशब्दापासून साधलेला आहे. कवि म्हणजे शहाणा, विचारी मनुष्य, ऋषि असा मूलार्थ असून पुढें त्याला पद्यकार असा अर्थ आला. कल्पनेचे बोल, अंतःशक्तीची खळबळ व मानववंशाच्या प्रगतीला सहाय्यक अशा श्रेष्ठ व आद्य मानवी सामर्थ्यापैकीं एक, अशा व्यापक दृष्टीनें काव्याकडे पाहिल्यास भौतिक शास्त्रांप्रमाणेंच काव्यानें जगांत एक महत्वाची कामगिरी बजाविली आहे असें दिसून येईल. इंग्लंडसारख्या कांहीं राष्ट्रांच्या वाङ्मयांत तर काव्याचेंच प्राबल्य असतें. कांहीं कांहीं कवींनाहि हेंच महत्व आलेलें दिसतें.

वेदांसारखीं जागतिक व राष्ट्रीय काव्यें ज्ञानकोशांत स्वतंत्रपणें विवेचिलेलीं आढळतील. मोठमोठ्या कवींचीं चरित्रेंहि ज्ञानकोशांत घेतलीं आहेत. निरनिराळ्या भाषांतील काव्य त्या त्या भाषावाङ्मयांत दिलेंच आहे. तेव्हां या ठिकाणीं काव्यावर थोडें सामान्य विवेचन, व संस्कृत आणि मराठी काव्यासंबंधीं सामान्य टीका पहाण्यास मिळेल. हा विषय इतका व्यापक व भानगडीचा आहे कीं, यावर जितकें लिहावें तितकें थोडेंच होणार आहे. तथापि संक्षेपरूपानें पुढील विवेचन केलें आहे.

**काव्य म्हणजे काय?**—काव्याची व्याख्या करणें अत्यंत कठिण आहे. कोणत्याहि वाङ्मयांतील व्याख्या समाधानकारक वाटणार नाहीं हें खास. थोडक्यांत कल्पना द्यावयाची म्हणजे भावना आणि लय यांनीं युक्त असलेल्या भाषेंत उच्चारलेले मानवी मनाचे मूर्त आणि चतुर असे जे बोल, त्यांनां काव्य म्हणतां येईल. जर एखादी साहित्योक्ति मग तिचा विषय कोणताहि असो, हृदय उचंबळण्याला लावीत नसेल तर तिला काव्य हें नांवच शोभणार नाहीं, एवढें तरी सर्वांनां पटेल. जें कांहीं कवीला सांगावयाचें असेल तें त्यानें स्पष्टपणें मूर्तस्वरूपांत मांडलें पाहिजे. एरव्हीं त्याच्या कल्पना लोकांनां कळणार नाहींत हें उघड आहे. तसेंच काव्यनिपुणाला छंदोबद्ध भाषेंत कविता करण्याची साहजिकच स्फूर्ति होते. कांहीं टीकाकार म्हणतात कीं, काव्याला छंदोबद्ध किंवा लयात्मक रचना आवश्यक नाहीं. दुसऱ्या कांहींच्या मतें गद्यरचनेला लागणारें भावनात्मक व बौद्धिक जीवन काव्यालाहि लागत असून शिवाय त्याला लयात्मक जीवनहि अत्यावश्य आहे.

काव्याचें शरीर किंवा त्याची रचना मोठ्या कुशलतेनें केली असली पाहिजे. तसेंच त्यांत कल्पकता असावी. कवीच्या भोंवतीं एक विशिष्ट वातावरण असून त्यांतून तो जगाकडे पाहतो व काव्य म्हणतो. या वातावरणाला काव्यकल्पना म्हणतां येईल. खरें काव्य प्रसविण्याला कवीचा आत्मा कांहीं काळ स्वतःला विसरून ब्रह्मानंदीं विलीन झाला पाहिजे. असे काव्यासंबंधीं तात्त्विक विचार नेहमीं ऐकूं येतात.

**काव्य व इतर कला यांतील संबंध.**—कांहीं टीकाकार काव्याला चित्रकला व मूर्तिशिल्प यांची दासी बनवितात तर १९ व्या शतकांतील संगीतकलाभिज्ञ वाग्नेरच्या अनुयायांसारखे लोक त्याला संगीतकलेची परिचारिका म्हणतात. ज्यांच्यांत कलाविषयक ज्ञान पूर्णपणें प्रगट झालें होतें, त्या प्राचीन ग्रीक लोकांनीं संगीत व गद्य यांमध्यें काव्याला स्थान दिलें होतें.

रोमन लोकांत काव्य म्हणजे गाणें, ही जुनी कल्पना रूढ झालेली वारंवार दिसून येते. काव्य व संगीत या दोन कलांत अधिक मैत्री आहे हें उघड दिसतें; पण पुष्कळ वेळां उत्तम कवीहि संगीतानभिज्ञ असल्याचें आपण पहातों. काव्यविवेचकांनां तर संगीताचें फारसें ज्ञान नसतें.

गद्यरचना व काव्य यांसंबंधीं बोलतांनां कोलरिज्नें एकदां असें ठांसून सांगितलें कीं, काव्याचा खरा विरोध गद्याशीं नसून शास्त्राशीं आहे. कसेंहि असलें तरी एवढें निश्चित आहे कीं, गद्य कितीहि उत्कट व भावनामय बनविलें तरी त्याचा लगाम नेहमीं तर्कशास्त्राच्या हातीं असतो, म्हणजे बांधून ठेविलेल्या विमानाप्रमाणें तें पृथ्वी सोडून जाणें खरो-खरीच शक्य नाहीं उलट ज्ञानाच्या साहित्याशीं काव्याचा कांहीं संबंध नाहीं. मानवी आत्म्याशीं संबंध आणला जाई-पर्यंतच्या मजकुराला काव्यांत जागा मिळत नाहीं. ट्रॉयवर चालून येणाऱ्या वीरांचें बल, ऐश्वर्य व अभिमान दाखवीत असेल, तर केवळ गलबतांची यादीहि काव्यमय ठरेल. संगीत आणि काव्य यांमधील संबंधांत ज्याप्रमाणें संगीतांतून जितकें जास्त उसनें घेतां येईल, तितकें घेणारा व छंदामधून जितकें कमी टाकतां येईल तितके टाकणारा तो सर्वश्रेष्ठ पंडित असें ठरतें. त्याचप्रमाणें गद्यरचना आणि काव्य यांमधील संबंधांत, जो गद्यामधून जास्तींत जास्त उसनें घेणारा व पद्यामधून कमींत कमी टाकणारा तो सर्वश्रेष्ठ मानिला जातो. प्रत्येक कवि स्वयंस्फूर्तीनें या गोष्टी करीत असतोच व या गद्यपद्यांसंबंधांत दोन्ही बाजूंनां कांहीं नुकसान येतें. या बाबतींत हल्लींच्या कवींचे तरी दोन वर्ग पडतात. एक, सौंदर्यहानि करून आला-पाला प्राधान्य देणारा; व दुसरा, आलापाची हानि सोसून सौंदर्याला प्राधान्य देणारा. याप्रमाणें काव्य हें गद्याच्या साम्राज्यावर स्वारी करितें म्हणावें, तर गद्यहि कधीं कधीं काव्यप्रवेश आक्रमितें. तेव्हां काव्य करणें निराळें व गद्य, संगीत यांसारख्या कलात्मक विषयांवर ग्रंथ निर्माण करणें निराळें आहे यांत शंका नाहीं. तथापि या कलांमध्यें परस्परविरोध मुळींच नाहीं.

छंदस्कलेवरील संगीतकलेचें जें वर्चस्व दिसतें त्यांतील महत्वाचा मुद्दा असा कीं, संगीतांत एकतानतेची व्याप्ति मोठी असते. लयाच्या दृष्टीनें काव्य जरी संगीताच्या मागें पडतांना दिसलें तरी, भावना उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्यामध्यें आहे हें विसरून चालणार नाहीं. या भावना, विचारांत विलीन झाल्या म्हणजे काव्याची गद्यकलेशीं प्रत्यक्ष स्पर्धा सुरू होते. अर्थाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं ध्वनीचा उपयोग करून संगातकलेपेक्षांहि जास्त असें मानवी आत्म्याचें पूर्ण दिग्दर्शन काव्याला करितां येतें.

सर्व लयांमध्यें निसर्गाचा लय हा सर्वांत खोल आहे. हा लय म्हणजेच जीवनाचा लय होय. हा गद्य व पद्य या दोहोंतहि अंतर्निर्दिष्ट करितां येतो. इंग्रजी बायबलसारख्या गद्यग्रंथांत हा दिसेल. शेक्सपियरसारखे कवी पद्यांत हा लय स्फुरतात. इतर लयांप्रमाणें हा नियमबद्ध अस-णारच, पण याचे नियम मात्र लिहून काढतां येणार नाहींत, तर पक्ष्यांच्या आलापांत, वृक्षपर्णांच्या कुजबुजण्यांत व समुद्र आणि वायु यांच्या आक्रंदनांत ऐकावयास मिळेल. गद्य किंवा पद्य कोठेंहि हा निसर्गलय समाविष्ट झालेला असो, तो भाषांतरितां येतो यांत शंका नाहीं. मनुष्याच्या एकाकित्वा-विषयीं मनूचें पुढील वचन याच प्रकारचें आहे.

"प्रत्येक मनुष्य जगांत एकटा जन्मतो, एकटा मरतो, सत्कृत्याबद्दल बक्षीस तो एकटा मिळवितो व दुष्कृत्याबद्दल शासनहि एकटाच भोगितो. तो मेल्यानंतर त्याचें शरीर मोडून पडलेल्या झाडाप्रमाणें पृथ्वीवर पडतें, पण त्याचे सद्गुण त्याच्या आत्म्याबरोबर जातात. म्हणून मनुष्यानें सद्गुण कमावून जतन करावेत, म्हणजे प्रवासाला अत्यंत कठिण अशा अंध कारांतून जाण्याला त्याला एक अखंड मित्र मिळेल.

येथें भावना व अर्थ यांचें आपोआप चलन होऊन उत्पन्न झालेला लय जगांतील प्रत्येक वाङ्मयांत भाषांतरितां येईल.

चित्रकला व मूर्तिशिल्प यांच्याशीं काव्याची तुलना करतां असें दिसून येतें कीं, निसर्गाच्या नकलेसाठीं काव्यांत जें माध्यम योजावें लागतें तें नेहमीं शब्दांचेंच असूं शकतें. पण कांहीं प्रसंग असे असतात कीं, ते शब्दांनीं कधींहि वठवितां यावयाचे नाहींत. या बाबतींत काव्यकला लंगडी ठरते. तेव्हां शिल्पचित्र–कलांप्रमाणें काव्यकलेला भावनांची उत्कटता वठवितां येत नसली तरी भावनांची अनेक प्रका-रचीं अदलाबदल चांगली दर्शवितां येते.

**काव्यकलेंतील विविध प्रकारः**—सर्व राष्ट्रांच्या काव्यवाङ्मयांतून एकच प्रवृत्ति दिसून येते; कमी जास्तपणाचाच फरक कायतो आढळेल काव्यकल्पनेंत जे दोन अगदीं भिन्न प्रकार आहेत. ते म्हणजे (१) शेक्स-पियर, होमर वगैरेंत उत्कृष्टपणें दिसणारी काव्यकल्पना, व (२) डांटे, मिल्टन, शेलेसारख्या कवींत आढळणारी काव्यकल्पना. पहिला वैयक्तिक किंवा वीणाकाव्यानें मुळींच नियमित नसून एक श्रेष्ठ नाट्यप्रबंध म्हणून दिसतो; याला पाहिजे तर केवळ 'नाट्य कल्पना' म्हणावें. दुसऱ्यांत कमी अधिक वैयक्तिक किंवा वीणाकाव्यप्रवृत्ति नियामक म्हणून असते; याला सापेक्ष 'नाट्य' कल्पना म्हणावें. स्तोत्रें, गीतें, शोकगीतें, भावगीतें या सर्वांनां सापेक्षकल्पनेची जरूरी असते. बहुतेक काव्यप्रबंधांत तें वरवर पाहिल्यास केवळ कल्पनोद्गम दिसलें तरी ही सापेक्षकल्पनाच अंतरंगांत वावरत असते. आशिया खंडांतील बहुतेक सर्व वाङ्मयां-तून केवळ कल्पनेचा अभाव दृष्टीस पडतो. खरें नाट्य प्रसविण्याची मनःप्रवृत्ति फक्त यूरोपांत सांपडेल असें कांहीं पाश्चात्य पंडित छातीठोकपणें सांगतात. विश्वांतील अतर्क्य चमत्कार, दैवाच्या अद्भुत लीला व अघटित घटना यांसारख्या गोष्टी आशियाखंडांतील कवींच्या डोक्यांत खेळत असतात. या प्रसंगांत सांपडणाऱ्या पात्रांच्या अंगचा चमत्कार किंवा कर्तबगारी त्यांनां दिसत नाहीं. परंतु ती पाश्चात्य कवींनां कळते; म्हणून त्यांनीं आकिलीझ, ओडे-

क्षिअस, हेलेन, प्रायम यांसारखीं पात्रें निर्माण केलीं असें ते म्हणतात.

सापेक्ष व केवळ कल्पनांत फरक असा कीं, सापेक्ष कल्पना कल्पित परिस्थितींत कवीच्या स्वतःचें अस्तित्व जागृत ठेविते; तर केवळ कल्पना त्या कल्पित परिस्थितींत कवीहून निराळ्या व विशेष व्यक्ति कवीद्वारें आपल्यापुढें ठेवते. सापेक्ष कल्पनेचे कवी बाह्यसृष्टि सामान्यपणें रंगवितात, तर केवळ कल्पनेचे कवी निसर्गाशीं स्पर्धा करून सामान्यावलोकनाबरोबरच सृष्टीचें विशिष्टावलोकनहि करितात. हें खरें धरून चालल्यास आपणाला काव्याचें व कवींचें वर्गीकरण करण्यास जागा मिळेल. सर्व कवी गायक असतात. या गायकांचे तीन वर्ग पडतात; शुद्ध वीणागायक-यांपैकीं प्रत्येक आपल्या एका आवाजानें एकच सूर काढितो; महाकवि हे वृत्तान्त निवेदक व अर्धनाटय कवी असून आपल्या एकाच आवाजानें अनेक सूर काढतात; व तिसरा वर्ग खऱ्या नाट्यकवींचा—हे अनेक आवाजांनीं सर्व सूर गातात.

एक दोन प्रकारांखेरीज काव्यकलेचे सर्व प्रकार सापेक्ष कल्पनेनें पोसलेले असतात. नाटयकल्पना ही मात्र प्रत्यक्षपणें केवळ कल्पनेंत येते. ईलियडसारखें ग्रीक महाकाव्यहि यांत थोडेंबहुत येऊं शकेल.

संस्कृत प्राकृत.—काव्य या शब्दाचा अर्थ कविता असा असून उच्च कल्पनांचा अवलंब करून लिहिलेली कविता असा काव्याचा विशेषार्थ आहे. प्रत्यक्ष वस्तुविषयापेक्षां तीवरील कल्पनेला अधिक महत्व देणें हा असल्या काव्यांचा विशेष होय. भारतीय राजांच्या दरबारीं या प्रकारच्या काव्यांची विशेष वाढ झालेली असल्यानें साहाजिकच अशा काव्यास वंदिगीतें किंवा सूतकाव्यें असें नांव देण्यास हरकत नाहीं.

रामायण व महाभारत यांमध्यें आढळणारी व पुढें विशेष लोकप्रिय झालेली प्राचीन वीररसपर कविता आरंभीं तरी बहुधा या वंदिगीतांच्या अथवा सूतकाव्यांच्या स्वरूपाची होती. सूत अथवा भाट हे असल्या कवितेचे पुरस्कर्ते असून ते राजदरबारीं राहून नृपस्तुति करीत असत. चक्षुर्वैसत्यं या न्यायानें वीरांची कृति पाहण्यास स्वतः समरभूमीवर जाऊन ते योध्यांच्या कृतीसंबंधीं काव्य करीत असत. यांचा पंडितजनांपेक्षां योध्यांशींच निकट परिचय असे. वीरांचें सारथ्य करून ते लढाईंत प्रत्यक्ष भाग घेत. हीं वीररसप्रधान काव्यें जन्मास आलीं तो काळ सांस्कृतिकदृष्ट्या फारसा प्रगत झालेला नव्हता. कां कीं, त्या काळांत युद्धें, आर्ष चालीरीती, शिकार, द्यूत इत्यादि सर्व गोष्टी प्रचलित असून राजांनां यांपासून मोठी करमणूक वाटत असे. उत्सवाचे प्रसंग मोठालीं संमेलनें, विजयोत्सव, सत्रादि प्रचंड यज्ञसमारंभ अशा विविध प्रसंगीं हे भाट लोक आपलें काव्य गात असत. पुढें राजदरबारांत जास्त सांस्कृतिक प्रगति होऊं लागल्यानंतर ब्राह्मण संप्रदायांत वाढलेल्या व ब्राह्मणांशीं पांडित्यांत अहमहमिका बाळगणाऱ्या विद्वान् कवींनीं भाटांची जागा काबीज केली. हे लोक केवळ ऐकीव माहितीवरून युद्धांचीं वर्णनें करीत व त्यांचें लिहिणेंहि ठराविक साच्याचें असे. नावीन्य, कल्पना व प्रतिभा या गुणांपेक्षां पांडित्य व भाषास्वारस्य यांकडेच जास्त लक्ष्य देण्यांत येत असे. ( प्रासंगिक उपमा देऊन आपल्या व्याकरणाचें पांडित्य दाखविण्यास कालिदास सुद्धां कचरत नसे ). अत्यंत कृत्रिम कवितेच्या द्वारां आपल्या आश्रयदात्यांची स्तुति गाणारे प्रशंसाकाव्यप्रवीण लोकच काव्यकलाप्रवीण होते. प्रशंसा हा विषय या काव्यरीतीचा प्रथमविषयच असावा व त्याची वाढहि दरबारांतच झालेली होती. ऋग्वेदांत आपणांस गाथा नाराशंसींचा उल्लेख आढळतो. यावरून या काव्यपद्धतीचें, विशेषतः दरबारी काव्यपद्धतीचें मूळ काय होतें हें समजून येईल. कवी जितकें जास्त श्रम घेत, तितक्या प्रमाणांत त्यांस आपल्या कलेचा अधिक उपयोग करावा लागत असे. ज्या मानानें कवींची कलात्मक कृति अवघड असे त्या मानानें राजांनांहि जास्त खुषामत झाल्यासारखें वाटे.

रामायणांत या तऱ्हेच्या स्तुतिपर कृत्रिम काव्याचें मूळ सांपडतें. या काव्याचा आदिकवि वाल्मिकी असून रामायण हेंच असल्या काव्याचें उदाहरण होय. या काव्यपद्धतीचा विशेष काय असतो हें महाकाव्यावरून दिसून येतेंच. पण संस्कृत काव्याच्या अभिजात युगाचें जें हें दरबारी महाकाव्य आहे त्यावरून असें दिसते कीं, वरील दरबारी काव्यरीतीस त्यावेळीं पूर्ण भर आला होता. एवढेंच नव्हे, तर वरील दरबारी काव्यानें भावनात्मक कविता, चुटके, नाटकें व कथा इत्यादि वाङ्मय व्यापून टाकून जैन व बौद्ध लोकांच्या धार्मिक कवितेचा प्रांतहि काबीज केला होता.

असल्या काव्यपद्धतीचे महत्वाचे विशेष खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—उपमा अलंकारांची गर्दी, लांबलचक वर्णनांकडे कल, रजनी, कौमुदी, सूर्योदय व ऋतु यांचीं ठराविक शब्दचित्रें; असल्या वर्णनांमुळें इतकी जागा अडून जाते कीं, मुख्य काव्यविषयच मुळीं मागें पडतो व त्यामुळें एखाद्या महाकाव्याच्या सर्गांतील मजकूर अथवा एखाद्या अद्भुत कथेचा बराचसा भाग दोन पानांतहि सांगून टाकतां येणें शक्य होतें. जोडयमकें, कृत्रिम वृत्तें, अपरिचित शब्द, अनेकार्थी सामासिक शब्द, श्लेष, शब्दच्छल व कोटया, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सरळ न बोलतां मुद्दाम कृत्रिम बोलून वळसे घेऊन कूट स्वरूपानें प्रत्येक गोष्टींतून ध्वन्यर्थ काढणें, इत्यादि अनेक गोष्टी असल्या काव्यांत असतात. आनंदवर्धन कवीनेंहि या पद्धतिचा उल्लेख केलेला आहे. एकाच काव्यांतील एक किंवा अधिक शब्दांचे एकसमयावच्छेदेंकरून अनेक अर्थ करणें म्हणजे काव्याची परमावधी होय असें मानलें जात असे.

परंतु असलें काव्य जरी कृत्रिम असतें तरी विद्वत्ताप्रचुरहि असतें. खऱ्या कवीला ज्ञानाच्या विविध शाखांशीं परिचय

करून घेणें जरूर असतें. अपरिचित शब्द हुडकून काढण्यास त्याला शब्दकोश अभ्यासावा लागतो. ते शब्दहि अनेकार्थी, व लांबलचक समासांत उपयोगिण्याजोगे असले पाहिजेत. अशा कवीला नियमांचें उल्लंघन होऊं नये एतदर्थ व्याकरण पढणें जरूर असतें. आपल्या काव्यांत योग्य युद्धवर्णनें व पारिभाषिक शब्द आले पाहिजेत म्हणून त्याला युद्ध व राजकारण यांवरील पुस्तकें चाळावीं लागतात. त्याला कामशास्त्रांतहि प्रवीण व्हावें लागतें; कारण शृंगारप्रसंग व प्रणयी जनांचे चंचल विकार रेखाटणें त्यास वर्णनप्रसंगानें भाग पडतें. गुंतागुतीच्या कविता व भरपूर अलंकार यांनीं आपलें काव्य सजविण्याकरितां त्यास काव्यशास्त्राचा अभ्यास करावा लागतो. यूरोपियन, ज्यास काव्यशास्त्र किंवा साहित्य म्हणतात, त्यासच भारतीय लोक अलंकारशास्त्र असें नांव देतात.

बहुधा सातव्या शतकांत होऊन गेलेल्या दण्डि कवीनें आपल्या 'काव्यादर्श' नामक ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, प्रत्येक कवितेस शरीर व अलंकार असे असतात. शरीर म्हणजे शब्दावली होय, व ती अर्थाप्रमाणें वाक्यरूपानें विभागली जाते. गद्य, पद्य व मिश्र असेंहि काव्य असूं शकतें. कवितेला अनेक वृत्तें जरूर असून तीं विराम व अक्षरमात्रागणवृत्तांनीं युक्त अशीं असतात. परंतु वृत्त हें कांहीं काव्याचें प्रधान अंग नव्हे. काव्य हें गद्य, पद्य व मिश्र असेंहि असूं शकतें, असा भारतीयांचा सिद्धांत आहे. नुसत्या यमकांनीं व वृत्तांनीं युक्त असलेली कविता हें काव्य नव्हे एकाद्या शास्त्रीय ग्रंथाला जर छंदोबद्ध स्वरूप दिलें तर त्यास बोधपर कविता असें कोणीहि म्हणणार नाहीं. व्याकरण, शब्दकोश, वैद्यकीय व ज्योतिषविषयक ग्रंथांना काव्याचें बाह्य स्वरुप दिलें तर ते ग्रंथ काव्य या संज्ञेस पात्र होणार नाहींत. फार तर गद्यापेक्षां पद्याचा अवलंब करण्यानें तो विषय स्मृतीच्या अंकित लवकर होऊं शकेल. परंतु, वराहमिहिरकृत बृहत्संहिता या शास्त्रीय ग्रंथासहि कृत्रिमकाव्य म्हणतां येईल. तसेंच एखाद्या गद्य नवलकथेंत जर भरपूर अलंकार असतील तर छंदोबद्ध महाकाव्याप्रमाणें त्या कादंबरीसहि काव्य असें म्हणतां येईल."

संस्कृत व अपभ्रंश अथवा प्राकृत भाषेंत काव्य करण्यास कांहींच हरकत नाहीं अशी स्पष्ट लोकसमजूत होती. संस्कृताप्रमाणेंच प्राकृताचाहि उपयोग काव्य करण्याकरितां भारतीय कवींनीं केलेला आहे. किंबहुना कांहीं कवींनीं आपली कविता संस्कृत व प्राकृत अशा दोन्ही भाषेंत लिहिली आहे. परंतु प्राकृत काव्य म्हणजे संस्कृताची नक्कल होय हें उघड आहे

काव्यारंभ.—पाणिनी कवीनें पातालविजय व जांबवतिविजय असे दोन काव्यग्रंथ लिहिले असा, नमी व रायमुकुट या कवींनीं उल्लेख केलेला आढळतो. या काव्याचा कर्ता पाणिनि व व्याकरणकार पाणिनि हे जर एकच असतील तर काव्य हा विषय, ख्रिस्ती शकापूर्वी निदान सातवें (सातशें ?) वर्षांपासून सुरू झाला असला पाहिजे. परंतु वरील दोन्ही काव्यें उपलब्ध नसून पातालविजय व जांबवतिविजय हे दोन स्वतंत्र ग्रंथ आहेत कां एकाच ग्रंथाचीं भिन्न नांवें आहेत हेंहि अनिश्चित आहे. पाणिनीनें, रुद्राच्या कृपेमुळें प्रथम व्याकरण लिहून नंतर जांबवतिविजय हें काव्य लिहिलें, असें राजशेखरानें म्हटलें आहे. दहाव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेलेला नाटककार राजशेखर यानें अनेक कवींचा आपल्या काव्यांत उल्लेख केला आहे. पाणिनीचा उल्लेख करणारा राजशेखर व नाटककार राजशेखर हे एक कीं दोन हा वादग्रस्त प्रश्न आहे. राजशेखराचा, वेदकालाच्या अखेर व्याकरण लिहिणाऱ्या पाणिनीचा उल्लेख अपुरा असून नाटककार राजशेखराची भाषाहि कालिदासाहून फारशी भिन्न दिसत नाहीं. शिवाय, पाणिनीच्या पातालविजयांतील एका श्लोकांत कांहीं व्याकरणनियमबाह्य रूपें आढळून येतात व तीं खुद्द पाणिनीचींच नसावींत. वरील रूपें नमीसाधूनें १०६८ मध्यें झालेल्या रुद्रटाच्या काव्यालंकारावरील टीकेंत उद्धृत केलीं आहेत.

कृत्रिम वृत्तांत लिहिलेलें भावनात्मक काव्य आणि ख्रिस्ती शतकापूर्वीं असलेली दरबारी काव्यपद्धति या दोहोंचें अस्तित्व पतंजलिकृत महाभाष्यावरूनहि सिद्ध होतें; कारण त्या ग्रंथांतहि कृत्रिम काव्य आढळून येतें सुभाषितादि काव्यसंग्रहांतून पतंजलीचा अनेक काव्यें करणारा म्हणून उल्लेख आढळतो. कालाच्या दृष्टीनें, पिंगल हा जर पतंजलीचा समकालीन मानला तर पिंगलाच्या वृत्तांवरील ग्रंथावरून ख्रिस्ती शकापूर्वीं दोनशें वर्षे, शृंगारपर कृत्रिम काव्य होतें, हीच गोष्ट पुराव्यानें सिद्ध होत आहे. ख्रिस्ती शकापूर्वीं दोनशें वर्षांपासून ख्रिस्ती शकानंतर दोनशें वर्षांपर्यंत, संस्कृत भाषेंत, दरबारी कृत्रिम पद्यरचना फारशी राहिली नाहीं. या काळांत भारतीय राजांच्या दरबारीं प्राकृत काव्याची वाढ झाली व याच गोष्टीचें फल म्हणजे, दुर्दैवानें मूळ स्वरूपांत सध्यां उपलब्ध नसलेले, हालकृत सप्तशति व गुणाढ्यकृत बृहत्कथा हे ग्रंथ होत. बुद्धधर्मीय गाथेंतहि काव्यपद्धति असलेली आढळते. प्राकृतांतील दुसरें लिखाण म्हणजे नाशिक येथील लेण्यांतील शिलालेख होत. त्यांत इ. स. १५४ मध्यें असलेल्या आंध्र घराण्यांतील राजा पुलुमायि याच्या राज्याचें १९ वें वर्ष नमूद केलें आहे. या लेखांवरून कृत्रिय गद्य रीतीचे विशेष दिसून येतात.

याच कालाचा आणखी एक मोठा संस्कृत शिलालेख आहे व तो महाक्षत्रप रुद्रदामन् याचा होय. हा लेख म्हणजे एक कृत्रिम गद्य काव्यच होय. कारण त्यांत लांबलचक समास, जाडे शब्द, मोठमोठीं वाक्यें व विविध अलंकार आहेत. या पद्धतीला 'विदर्भरीति' असें दंडीनें नांव दिलें आहे. इ. स. च्या दुसऱ्या शतकांत काव्यपद्धतीचें स्थलांतर गद्याच्या क्षेत्रांत झालें होतें व ती शिलालेखांत उपयोजिली जात होती. या दोन गोष्टींवरून असें दिसतें कीं, या पद्धतीची